महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## अंतरंगपरिचय

प्रस्तुत विभागांत 'अ' ची पृष्ठें ४३१ ते ७०० आली आहेत. आणि 'आ' चीं पृष्ठें १ ते १७६ आलीं आहेत. या पृष्ठांत जे अनेक विषय येऊन गेले त्यांचें वर्गीकरण येणें प्रमाणें:—

### अर्थशास्त्र–अज्ञेयवाद

**वैदिक**—दे व तें —अर्यमा, अश्विन्, अष्टावसु वि धि.—अश्वमेध, अष्टका. अ र्थ वि वे च क —अर्य

**पौराणिक**—चरित्रें व कल्पना —अलंबुष, अलायुध, अश्वपति, अश्वसेन, अष्टक, अष्टनाग, अष्टनायिका अष्टावक्र, असमंजा. भू गो ल व र्ण न.—अष्टउपद्वीप, अष्टकुलाचल, अष्टदिग्गज, अष्टमर्यादागिरी. पा र मा र्थि क क ल्प ना व दे व तें.—अवतार, अष्टदिक्पाल, अष्टभैरव, अष्टविनायक, अष्टयोगिनी. क र्म —अविधवानवमी, अष्टविवाह, अष्टमांगल्य, अष्टवायन.

**बौद्ध**—वा ङ्म य.—अवतंसक, अवदान, अवलंबन, ग्रं थ का र.—अश्वघोष, असंग, दे व तें.—अवलोकितेश्वर.

**जैन**—अवसर्पिणी. अष्टान्हिकपर्व.

**इतरसंप्रदाय**—अर्हत्, अलखबुलाखी, अलखनामी, अलंप्रभु, अवचितसुत-काशी, अवधूत.

**इतिहास**—प्रा ची न हिं दु.—अल्ह, अवंतिवर्मा, अशोक, अश्मक, मु स ल मा नी —अलाउद्दीन, अलाउद्दीनशहा, अलीआदिलशहा, अलीवर्दीखान, असदखान, असफखान, अस्करीमिर्झा, अहमदखान बंगष, अहमद निजामशहा, अहमदशहा ( गुजराथ ), अहमदशहा ( दिल्ली ), अहमदशहावली, अहमदशहा अबदाली.

**ज्योतिषशास्त्र**—अश्विनी

**प्राणी**—अष्टपाका, अष्टपाद, अस्वल.

**वनस्पती**—अशोक, अश्वगंधा, अश्वत्थ, अलुबुखार, अक्रोनेट

**वैद्यक**—अर्धशिशी, अर्धांगवायु, अष्टमहारोग, अस्थिमार्दवरोग.

**भाषाशास्त्र**—अर्धमागधी.

**पदार्थविज्ञान**—च रि त्रें.—अॅव्हेनिअस.

**रसायनशास्त्र**—अर्क, अल्क, अल्कलॉइड, अल्कहल, अल्कोर्हे, अल्युमिनियम्, अल्युमिनमभांस, अश्वमूत्राम्ल, असबस्ट, असिटिलीन, असिटोन

**शास्त्रेतिहास**—च रि त्रें —अल्हाजन, अल्ड्रोव, अल्हिसेना, अल्हेगड्डो.

**मानसशास्त्र**—अष्टभाव

**सामाजिकशास्त्रें**—अ र्थ शा स्त्र.—अर्थशास्त्र. सं सा र म ड न शा स्त्र.—अर्धनारीश्वर ( मूर्तिशिल्पांतर्गत ), अलंकार, अश्रुपात्रें, अष्टगंध, अष्टमंगल. शा स न शा स्त्र.—अलुतीबलुती, अष्टाधिकार, अष्टप्रधान, असहकारिता. सा मा जि क —अस्पृश्यता

**वाङ्मयेतिहास**, आं ग्ल.—अरसुथनाट. ते लु गु —अलसानीपेदन्ना, अल्वन अ र बी.—अल्बीरुणी. सं स्कृ त ग्रं थ.— अष्टावक्रगीता ग्रं थ का र— अविनाशीश्वर ता मी ळ —अव्वैयार.

**जाती**—अलावन, असुर

**प्राचीनजग**—अ सु र दे श.—असुर, असुरबानिपाल, असुरिया, अस्कालन. ग्री क —अलेक्झांड्रिआ ट्रोआस.

**मुंबईइलाखा**—म हा रा ष्ट्र.—अलीबाग, अवचितगड, अवसरीबुद्रुक, अष्टमी, अष्टागर, अष्टें, अहमदनगर, अहिरगाव, अहिवंतकिल्ला, अळें. क र्ना ट क —अलमेल, असुंदी, अळतें, अळनावर. गु ज रा थ.—अंजेज, अलमपुर, अलवा, अहमदनगरगाव, अहमदाबाद.

**मद्रासइलाखा**— खु द्द म द्रा स इ ला खा —अलगरकोविल, अल्लूर, अवनी, अहोबिलम्. त्रा व ण को र सं स्था न —अर्येकावू, अलवये, अलेप्पे, है द रा बा द सं स्था न.—अलमपुर, अलीखेर, असई म्है सू र स स्था न.—अष्टग्राम.

**वऱ्हाड-मध्यप्रांत**, व ऱ्हा ड —असदपुर, असळगाव, अळेगाव. म ध्य प्रा न्त-म रा ठी —अंबीपुर, अष्टी, असरली, असोदा, अहिरी म ध्य प्रां त-हिं दी —अलमोद, असीरगड.

**मध्यहिंदुस्थान**—अलमपुर, अलवार, अलीगड, अलीपुरा, अलीराजपुर, अष्टें, अर्शाद, अहार.

**संयुक्तप्रांत**—अल्कनंदा, अल्मोरा, अलाहाबाद, अलीगड, अवलिया, अकबरहारीर, अहरौरा, अहार.

पंजाब—अलावलपुर, अलीपुर. अलीवाल, असरूर, असिक्नी, अहमदपुर.

बंगाल—अलमगीर डोंगर, अलयपुर, अलीपुर, असनसोल.

आसाम-ब्रह्मदेश—अलनम्यो.

इतर—अलीमसजीद.

प्राचीन-हिंदुस्थान—अलका, अवनी, अश्मक, असिक, असिक्नी, अहिच्छत्र.

आशिया—अर्देबिल ( इराण ), अलताई पर्वत, अलेप्पो ( तुर्कस्तान ).

यूरोप—अलबालाँगा, अलभिभम, अलेक्झान्डर्सबाद, अलेक्झाड्रिया ट्रोआस, अल्डरशॉट, अल्निक, अल्बेनिया, ॲलेसेंटर, ॲस्कालॉन, ॲग्हवरी, ॲग्हिमॉन, ॲशबर्टन, ॲशबोर्न.

अमेरिका—अलास्का, अल्कातारा, असन्शन.

आफ्रिका—अलेक्झाड्रिया, अल्जीरिया, अलजीर्स, अशांटी.

आ—आफ्रिका.

हिंदुस्थान—

2 इतिहास, वै दि क:—( श्रौतस्मार्त ) आयु, आग्नीध्र, आघारी, आचमन, आतुरसंन्यास, आपद्धर्म, आपस्तंब, आप्री. पौ रा णि क—आकृति, आकृति, आग्नीध्र, आज्यप. बौद्ध—आजीविक, आदिबुद्ध, आनंद. जै न—आदिपुराण. मु स ल मा नी इ ति हा स— आदमखान, आदिलशहा. म रा ठे शा ही.—आकाबाई, आगरे, आडगावची लढाई, आनंदराव गायकवाड, आनंदराव धुळप, आनंदराव पवार, आनंदराव रास्ते, डॉ. आनंदीबाईबाई जोशी, आनंदीबाई पेशवे, आपटे महादेव चिमणाजी, आप्पा देसाई निपाणकर, आप्पा बळवंत. इं ग्र जी अ म दा नी.— आक्टरलोनी, आंग्लो इंडियन.

वाङ्मय, सं स्कृ त—आत्मानंद, आत्मारामस्वामी, आनंदकवि, आनंदगिरि, आनंदवर्धन, आपटे वामन शिवराम, आपिशलि. म रा ठी.—आगरकर, आनंदतनय, आनंदनाथ, आनंदमूर्ति, आपटे हरि नारायण. बौ द्ध-आनंद शी स.—आदिग्रंथ. ते लं गी—आंध्र कालिदास, आप्पा कवि. गु ज रा थी-आख्योभगत. पाश्चात्य—आंग्लो इंडियन वाङ्मय.

भौगोलिक—मुं ब ई इ ला खा, महाराष्ट्र—आगाशी, आटपाडी, आनंदवल्ली. गु ज रा थ -आकाडिया, आदकोट, आदितियाना, आनंद, आनंदपुर, आन्सोदर. व ऱ्हाड,म ध्य-प्रां त.—आंजी. आटनेर, आडेगाव. सं यु क्त प्रां त.— आग्रा. पं जा ब:—आनंदपुर. बं गा ल:-आनंदपुर. प्रा चीन हिं दु स्था न— आकर. आग्नेयकोसल, आंध्र, आनर्त. जा ती—आगरवाल, आगरी, आगेर, आंजणा, आतार, आदिनारायण.

आशिया, हिंदुस्थानेतर-आदाम आदामचें शिखर, आनाम.

यूरोप,भौ गो लि क.—आक्सफर्ड, आग्जबर्ग, ऑगस्टसबाद, आडेनार्ड. ऐ ति हा सि क-आगस्टस बादशहा. आगस्ट्राम, आडवी आंद्रून. आंग्लो साक्सन धा र्मि क.— आदाम, आदामाईट.

आफ्रिका-भौ गो लि क—आक्झम. आदिस अबाबा. आफ्रिका प्रा त—आक्र.

आस्ट्रेलिया—आकलंड.

दैवतशास्त्र—आकाश.

शास्त्रें—

आध्यात्मिक—आत्मा.

समाजशास्त्र—आडनांव, आत्महत्या, आनुवंशिकता.

विज्ञानशास्त्र—आंकडेशास्त्र, आन्वीक्षिकी.

संसारमंडनशास्त्र—आखाडे, आगगाडी, आगपेटी आगबोट आट्यापाट्या, आतिथ्य.

ज्योतिषशास्त्र-आकाश, आचार्य.

गणित—आकृति, आकृतिलेखक

पदार्थविज्ञान—आकाश.

चरित्रें—आंगस्ट्राम.

यंत्रें—आदोलन लेखक.

रसायन—आर्तीम, आत्रेय, आप्वन.

वैद्यक-आकडी, आगबोट लागणें, आग्यादेवी, आघात आतपमूर्च्छा, आंत्रावरोध

इंद्रियविज्ञान—आत्रपद्धति.

प्राणिशास्त्र—आगीमाशी. आदिमसंघ, आनुवंशिकता.

वनस्पति-आपटा.

भाषाशास्त्र—आगरी भाषा.

लिपि—आ, आद्याक्षरसंयोग.

प्रयत्न केला पाहिजे हें सांगतो. किंवा पर्व ४. अ. ४, येथें दरबारी लोकांनीं कसें वागावें याचें विवेचन केलें आहे पर्व १५ यांतील अध्याय ५-७ हे सन्याशाच्या नीतिशास्त्रापासून उसने घेतां येतील.] त्याच्या १२ व्या पर्वांत अर्थशास्त्राच्या पूर्वकलीन अस्तित्वाचा पुरावा आढळतो. या ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, "महादेवानें स्वतः लोककल्याणकारक असा एक लक्ष अध्यायाचा ग्रंथ निर्माण केला. यामध्यें त्रिवर्गाचें विवेचन आहे" (शांतिपर्व अ. ५९) जगदुद्धाराकरितां व त्रिवर्गाची स्थापना करण्याकरितां त्यानें दंडनीतीचा उपदेश केला. यापुढें वरील एक लक्ष अध्यायाची विषयवारी दिली आहे. तीवरून हा ग्रंथ अर्थशास्त्राशीं किती संतोतंत जुळतो हें दिसून येतें. नंतर असें सांगितलें आहे कीं, विशालाक्ष श्रीशंकरानीं या नीतीचा प्रथम स्वीकार करून व प्रजेचें आयुष्य ऱ्हास पावत आहे हें जाणून या शास्त्राला संक्षिप्तरूप दिलें. या संक्षिप्त नीतिग्रंथाला वैशालाक्ष असें नाव आहे. पुढें भगवान इंद्रानें दहा हजार अध्याय असलेल्या या शांकर संक्षिप्त शास्त्राचा आणखी संक्षेप केला व पांच हजार अध्याय बनविले. या नवीन बाहुदंतक नावाच्या नीतिग्रंथाचा बृहस्पतीनें पुन्हा संक्षेप करून अध्यायाची संख्या तीन हजारांवर आणली या तीन हजारीला बार्हस्पत्य असें संक्षेपकारावरून नाव पडलें शेवटीं काव्यानें (शुक्राचार्यानें) आणखी संक्षेप करून एक हजार अध्याय केले या विधानांत कांहींसा इतिहास असेल पण ग्रंथ दिवसानुदिवस वाढत जाण्याऐवजी संक्षिप्त होत गेला ही मात्र येथें कविकल्पना आहे. [महाभा. १२. ५९, २८६ ७६ इ.] कौटिल्य अर्थशास्त्रांत विशालाक्ष, बाहुदंतीपुत्र, बृहस्पति आणि उशनस हे अर्थाचार्य म्हणून उल्लेखिले आहेत त्याचप्रमाणें कामसूत्रांत (१, १) असें सांगितलें आहे कीं त्रिवर्गावरील प्रजापतीच्या मोठ्या ग्रंथांतील "धर्मा"चा भाग मनूनें, "अर्था"चा बृहस्पतीनें व "कामा"चा महादेवानुचर नंदीनें भाग तयार केला.

विद्वान भारतीय कवी नीतिशास्त्राशीं विशेष परिचित असत. नीतिशास्त्राचा अभ्यास हा एक कवीचा गुण समजला जात असे इतकेंच नव्हे तर मोठाले कवी या शास्त्रांतील आपलें प्राविण्य व्यक्त करण्यासाठीं झटत. उदाह. कालिदास रघुवंशांत (सर्ग ११, ५५; १२, ६९, १७, ४५ इ.), भारवि किरातार्जुनीयांत (१, आणि २) आणि माघ तर शिशुपालवधाच्या संबंध २ऱ्या सर्गांत आपलें नीतिशास्त्रज्ञान पुढें मांडतो. सोमदेव सुद्धां कथासरित्सागरांत आपण नीतिशास्त्रपटु असल्याचें दर्शवितो. कल्हणानें आपल्या राजतरंगिणीमध्यें (४, ३४४ इ.) राजा ललितादित्य याच्या तोंडीं घातलेलीं नीतिशास्त्रतत्त्वें काश्मीरमधील तत्कालीन ज्ञानस्थितिदर्शक म्हणतां येतील.

अर्थशास्त्रावरील अतिप्राचीन ग्रंथ उपलब्ध नाहींत वर दिलेल्या महाभारतांतील उताऱ्यावरून अर्थशास्त्राच्या उत्पादकत्वाचा मान बृहस्पतीकडे जातो. बृहस्पति हा लोकायतांत सुद्धां प्रवीण होता. लोकायत आणि अर्थशास्त्र याच्या निकट संबंधाविषयीं हिलेब्रँटनें चांगलें विवेचन केलें आहे. महाभारतांत दुसऱ्या एका स्थळीं (३. ३२, ६० इ.) द्रौपदी म्हणते कीं, एक विद्वान ब्राह्मण माझ्या भावांना शिकवीत असतां मीं बृहस्पतिप्रोक्त नीतितत्त्वें श्रवण केलीं. "मीं बार्हस्पत्य अर्थशास्त्राचें अध्ययन केलें आहे' असें भासाच्या प्रतिमा नाटकांत रावण सांगतो. दुर्दैवानें सध्यां आपणाकडे परंपरागत आलेलें जें अर्थशास्त्र आहे तें म्हणजे प्राचीन बृहस्पतीच्या अर्थशास्त्राची बरीच फरक होऊन आलेली व अर्वाचीन गोष्टींनीं भरलेली अशी प्रत होय. आज उपलब्ध असणाऱ्या अशा प्रतींत, विशेषत. २ऱ्या व ३ऱ्या अध्यायांत पाहिल्यावर जे हल्ले चढविले आहेत ते प्राचीन अर्थशास्त्रांत मुळींच असूं शकणार नाहींत. कौटिलीय अर्थशास्त्रांत अनेक ठिकाणीं बार्हस्पत्याचीं मतें म्हणून जीं उद्धृत केलीं आहेत तीं आपल्या या ग्रंथांत मुळींच सांपडत नाहींत. यावरून असें सिद्ध होतें कीं, त्या लहान ग्रंथाचा केवळ एक लहानसा भाग कायतो जुन्या बृहस्पतीच्या अर्थशास्त्राचा असावा.

**कौटिलीय अर्थशास्त्र व त्यावर अभ्यास.**— अर्थशास्त्रवाङ्मयांत अति महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे कौटिलीय-अर्थशास्त्र होय. हा मौर्य घराण्यांतील चंद्रगुप्त राजाचा मंत्रि कौटिल्य (चाणक्य किंवा विष्णुगुप्त) यानें राज्यशासनावर लिहिलेला आहे. भारतीय वाङ्मयांतील दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत राज्य व आर्थिक स्थिति या संबंधीं प्राचीन काळची इतकी भरपूर व महत्त्वाची माहिती सांपडणार नाहीं हा ग्रंथ आपल्या ऐकण्यांत बरेच दिवसांपासून आहे, पण १९०९ सालापासून याची प्रत आपल्या परिचयाची झाली [प्रकाशक आर. शामशास्त्री, म्हैसूर १९०९; दुसरी आवृत्ति १९१९;] याचें समग्र भाषांतर बंगलोर येथें १९१५ त प्रसिद्ध झालें. तुटक तुटक उतारे व भाषांतरें पूर्वींच इंडि. ॲंटि. मध्यें (पु. ३७, ३८ आणि ३९) आलेले होते मूळ ग्रंथावर टीकात्मक निबंध पाश्चात्य व बंगाली लेखकाकडून अनेक लिहिले गेले आहेत. मराठींत प्रो. गो गो. टिपणीस यानीं कांहीं लिहिले आहेत. या ग्रंथाची इतर पाश्चात्य भाषांत भाषांतरेंहि झालीं आहेत. नरेंद्रनाथ लॉ यानीं अर्थशास्त्राच्या पूर्वार्धावर स्टडीज इन एन्शंट हिंदु पालिटी, लंडन, (१९१४) व उत्तरार्धावर "इंटर स्टेट रिलेशनस इन् एन्शंट इंडिया भाग १ला, (कलकत्ता आणि लंडन) १९२० हे ग्रंथ रचिले आहेत चाणक्याचा किंवा त्याच्या नांवावर खपला जाणारा हा ग्रंथ गद्यांत लिहिला असून, त्याची घाटणी सूत्र व भाष्य याची मिसळ होऊन झाली आहे मधून मधून म्हणी व स्मृतिपाठ समाविष्ट केले असून, ते बहुतेक श्लोकांत व कांहीं थोडे उपजाति वृत्तांत आहेत. प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं एक किंवा अधिक श्लोक असून, त्यांतील अर्थ

मागील गद्याला योग्य उपसंहारात्मक असावें असतो. माध्यापासून सूत्रें नेमकीं निराळीं काढणें अवळ जवळ अशक्यच आहे. शामशास्त्री असें धरतात कीं, १५० अध्यायांतील प्रत्येकाच्या शिरोभागीं असणारी विषयसूचक हीं सूत्रें धरावीत, पण तेच पुढें असें म्हणतात कीं, पुष्कळ ठिकाणीं भाष्य सूत्रपद्धतीपेक्षा फारसें निराळें वाटत नाहीं, व काहीं ठिकाणीं भाषा, उपनिषदें व पुढील ब्राह्मणें यांतील भाषेप्रमाणें आहे. डॉ. थॉमस ( जर्नल रायल ए. सो. १९१० ) कौटिलीयाच्या धाटणीची पतंजलीच्या धाटणीशीं तुलना करितो, व याकोबीहि यास्काचें निरुक्त व पतंजलीचें महाभाष्य यासारख्या ग्रंथाच्या पंक्तीला कौटिलीयाला बसवितो. काहीं असलें तरी महाभाष्याचें गद्य जास्त सरस आहे हें खरें. शामशास्त्री च्या दुसऱ्या आवृत्तीच्या परिशिष्टात "चाणक्यसूत्राणि" म्हणून जो भाग आहे, त्याचें सूत्रांशीं फारच थोडें साम्य दिसतें. यांत ५७१ लहान लहान वाक्यें असून तीं सूत्रापेक्षा गद्याशीं अधिक जुळतात. यांतील फार थोडीं वाक्यें मूळ कौटिलीयांत आढळतात.

कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ तत्पूर्वीच्या विद्वानांनीं केलेल्या अर्थशास्त्रविषयक ग्रंथांचा सामान्यतः सारांश घेऊन तयार केला आहे, असें या ग्रंथाच्या प्रारंभींच सांगितलें असून नंतर ग्रंथांतील विषयांची अनुक्रमणिका दिली आहे. या ग्रंथाचे मुख्य भाग किंवा 'अधिकरणें' १५ असून त्यांत १८० विषय उर्फ 'प्रकरणें' आहेत. या ग्रंथांतील प्रत्येक अधिकरणाचे अध्यायवारहि विभाग पाडलेले आढळतात हे 'अध्याय' वार विभाग मागाहूनचे असावेत असें विंटरनिट्झला वाटतें.

पहिलें अधिकरण.—पहिल्या 'विनयाधिकारिक' नांवाच्या अधिकारणांत 'राजाचें शिक्षण व उपदेश' याविषयीं विवेचन आहे. राजाला ज्या विद्या अवगत पाहिजेत त्या तत्वज्ञान ( आन्वीक्षकी ), वेद ( त्रयी ). अर्थशास्त्र ( वार्ता ) व शासनशास्त्र (दण्डनीति) या होत. तत्वज्ञान हें इतर विद्यांचा पाया आहे. त्यानें आयुष्यांतील सर्व अडचणींना तोंड देण्यास मनुष्याची बुद्धि तयार होते. आणि विचार, उच्चार व आचार यांना लागणारें चातुर्य अंगीं येतें त्रयी म्ह० तीन वेदांचें ( ऋक, साम, यजु ) व सहा वेदांगांचे ( शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष ) ज्ञान. यावरून चार वर्ण व चार आश्रम या विषयींचीं कर्तव्यें समजून येतात. हीं कर्तव्यें किंवा वर्णाश्रमधर्म या अर्थशास्त्रांत ब्राह्मणी धर्माला पूर्णपणें अनुसरून सांगितलीं असून स्मृतिग्रंथांतल्याप्रमाणें या ग्रंथांत प्रत्येक वर्णाचीं व प्रत्येक आश्रमाचीं कर्तव्यें नमूद केलीं आहेत. अर्थशास्त्राचें ( कृषि, पशुपालन, वाणिज्य ) ज्ञान राजाला अधिकाऱ्यांनीं द्यावें आणि शासनशास्त्र ( दण्डनीति ) मुत्सद्यांनीं व राजकारणी पुरुषांनीं शिकवावें. शिवाय शिक्षण परिपूर्ण व्हावें म्हणून राजानें नेहमीं वृद्ध व अनुभवी पुरुषांच्या संगतींत काल घालवावा. त्यानें सकाळीं युद्धशिक्षण घ्यावें, व सायंकाल इतिहासश्रवणांत घालवावा. 'इतिहास' यामध्यें पुराण, इतिवृत्त, आख्यायिका, उदाहरण, धर्मशास्त्र व अर्थशास्त्र, यांचा समावेश होतो ( १.२ ) राजाला सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे इंद्रियनिग्रह करणें, आणि काम, क्रोध, लोभ, अभिमान, मद व हर्ष या षड्रिपूंवर जय मिळविणें ही होय. शिवाय वरील सर्व गोष्टी राजाच्या अंगीं असल्या तरी योग्य मित्र व सेवक मिळाल्याशिवाय कारकीर्द यशस्वी होण्याची खात्री राजाला धरता येत नाहीं, म्हणून अमात्य मंत्री, पुरोहित वगैरे अधिकारी कसे निवडावे याबद्दल या अर्थशास्त्रांतील अनेक प्रकरणांत विवरण केलें आहे राजाच्या सेवकांत कोणकोणते अत्यंत महत्त्वाचे गुण असावे, आणि राजाला स्वतःचें मंत्रिमंडळ पूर्ण विश्वासाई कशा रीतीनें बनविता येतें याबद्दल माहिती दिली आहे या कार्याकरितां हेर, गुप्त दूत वगैरे ( गूढपुरुष ) नेमण्यावांचून गत्यंतर नाहीं खरोखरच, अंतर्बाह्य शत्रूंचें निर्मूलन करण्याकरितां राजाला हेर वापरणें अत्यंत जरूर असतें, म्हणून अनेक प्रकारचे हेर व त्यांच्या कार्यपद्धती, या विषयाला या ग्रंथांत बराच जागा दिली आहे. काहीं हेर, विद्यार्थ्यांचीं, काहीं संन्याशांचीं काहीं शेतकऱ्यांचीं व काहीं व्यापाऱ्यांचीं सोंगें घेतलेले असतात भिक्षुकिणींचीं सोंगें घेण हाहि बराच प्रचलित प्रकार दिसतो 'तीक्ष्ण' ह्या नावाच्या हेराचा एक वर्ग सांगितलेला आहे शिवाय विषप्रयोग करून राजद्रोही इसमांना किंवा शत्रूंना ठार मारण्याचीं कामें करणारे लोक असत. राज्यांतील अधिकारीवर्गाच्या खाजगी वर्तनावर गुप्त देखरेख ठेवण्याच्या कामीं आचारी, न्हावी, नट, नर्तक, फिरते उपदेशक वगैरे लोकांचा फार उपयोग होतो अशा अनेक प्रकारच्या हेरांचें सर्वत्र जाळें पसरून अंतर्बाह्य शत्रुविषयीं बातम्या गुप्त रीतीनें मिळविण्याची व्यवस्था राजा करतो. यांच हेरांकडून शहरांत तसेंच खेड्यापाड्यांतहि राजनिष्ठ लोक कोणकोण आहेत, व असंतुष्ट लोक कोणते हें शोधून काढण्याचें काम केलें जातें राजनिष्ठ लोकांना योग्य मान किंवा बक्षीस राजाकडून मिळतें, आणि असंतुष्टांकडून राजाला त्रास पोंचणार नाहीं, अशी व्यवस्था करण्यात येते. किंवा त्यांना नष्ट करण्यांत येतें. हेरांचा आणखी उपयोग शेजारी शत्रुराष्ट्रांत असंतोष पसरविणें, व स्वतःच्या राजाच्या पक्षाला मिळणारे लोक तयार करणं या कामींहि करतात.

एका प्रकरणांत मंत्रिलोक कसे पारखून नेमावे व त्यांच्या वरोवर केलेल्या मसलती कशा गुप्त राखाव्या याबद्दल विवेचन आहे दुसऱ्या एका प्रकारणांत परराष्ट्रांत पाठवावयाच्या वकीलांसंबंधीं माहिती दिली आहे. हे वकील नुसती बातमी पोंहोचविणारे असून भागत नाहीं. तर त्यांनीं परराज्यांतील

राजाला ती माहिती पुरविण्याचें काम करणें जरूर असतें. यानंतरच्या एका उदाहरणाच्या प्रकरणात 'राजपुत्रावरील देखरेख' चा विषय आहे. राजाचे स्वतःचे मुलगे हे राजाला एक कायमचें भयकारण असतें. त्याच्या जन्मापासून राजानें त्याच्यावर चांगली नजर ठेवणें जरूर असतें. कारण "राजपुत्र हे खेकड्याप्रमाणें स्वपितृभक्षक असतात."

या अर्थशास्त्रातील माहितीचा धर्मशास्त्रातील विषयाशी संबंध येतो. असें प्रकरण म्हटलें म्हणजे राजाचें नित्यकर्म ज्यांत सांगितलें आहे तें प्रकरण होय. या प्रकरणातील राजाच्या कर्तव्याविषयींचें वर्णन वाचलें म्हणजे राजाच्या आयुष्यक्रमाइतका अवघड व दगदगीचा आयुष्यक्रम दुसऱ्या कोणाचाच नसेल असें वाटूं लागतें. या प्रकरणांत शेवटीं ( १, १९ ) धर्मशास्त्रांतून उद्धृत केलेल्या पुढील ओळी आहेतः—

प्रजासुखे सुखं राज्ञः प्रजानाच हिते हितं ॥
नात्मप्रियं हितं राज्ञः प्रजानां तु प्रियं हितं ॥

म्हणजे, प्रजेच्या सुखात राजाचें सुख असतें. आणि प्रजेच्या कल्याणांतच राजाचें कल्याण असतें. राजाला स्वतःच्या प्रिय गोष्टानें सुख होत नाहीं. तर प्रजेला जें प्रिय त्यानेंच राजाला सुख होतें.

एक समग्र प्रकरण राजाच्या अन्तःपुराची रचना व व्यवस्था याच्या वर्णनाला दिलें आहे. राजानें स्वस्त्रियांचें रक्षण क्लीब पुरुषाच्या मार्फत व स्वतःचें संरक्षण अनेक उपाययोजनांनी कसें करावें त्याची माहिती विशेष विस्तारानें दिली आहे. राजानें अन्तःपुरात जाताना इतर कोणत्याहि ठिकाणच्यापेक्षा अधिक सावधगिरीनें असलें पाहिजे. पुष्कळ राजे अन्तःपुरातील प्राणघातक हल्ल्यांना बळी पडले आहेत. या ठिकाणीं अन्तःपुरातील कारस्थानांना विषप्रयोगामुळें किंवा शस्त्रप्रयोगामुळे बळी पडलेल्या अनेक राजांचीं उदाहरणें दिलीं आहेत. या पहिल्या अधिकरणातल्या शेवटल्या प्रकरणांत राजानें राजमार्गांत, राजमार्ग व इतर सार्वजनिक ठिकाणीं विषप्रयोगादि संकटापासून स्वसंरक्षण कसें करावें यावावत सावधगिरीच्या सूचनांची माहिती दिली आहे.

दुसरें अधिकरण.—या 'अध्यक्षप्रचार." नामक अधिकरणातील विस्तारपूर्वक विषयांची कल्पना येथें त्यांची यादी दिल्यानेंच कायती येईल. राज्यकारभाराच्या प्रत्येक खात्याकरिता खास तपासनीस असतात, त्याच्या विषयाच्या प्रकरणात निरनिराळ्या खात्याच्या कारभाराचीहि सविस्तर माहिती दिली आहे. गावें व नगरें, यांची रचना, जमिनींची वाटणी, उद्योगधंद्याच्या योजना, खाणी, पाणीपुरवठा, बाजार, तसेंच निराश्रित असलेल्या अनाथ, रोगी, वृद्ध, इत्यादिकांच्या व विशेषतः आसन्नप्रसव स्त्रियांच्या मदतीकरितां सार्वजनिक संस्था, यासंबंधाची, तसेंच वनरक्षणविद्या, हत्तींची शिकार, किल्ल्यांचें बांधकाम व संरक्षण, तसेंच खजिना, कर, जकाती, खजिन्याच्या संरक्षणाबद्दल अधिकारी व त्यांनी पैशाची अफरातफर केल्यास त्याबद्दल कडक शिक्षा; अशा अनेक विषयासंबंधीं या अधिकरणात माहिती आहे. सरकारी अधिकाऱ्यावर केव्हाहि विश्वास टाकूं नये अशाबद्दल पुढील वर्णन आढळतें ( २. २७ )

यथा ह्यनास्वादयितु नशक्यं जिव्हातलस्थं मधु वा विषंवा
अर्थस्तथा ह्यर्थचरेणराज्ञःस्वल्पाऽप्यनास्वादयितुं नशक्यः
मत्स्या यथान्तस्सलिलेचरन्तो ज्ञातुं न शक्या सलिलंपिबन्तः
युक्तास्तथा कार्यविधौ नियुक्ताःज्ञातुं न शक्या धनमाददानाः

याचा अर्थ असा कीं, जिभेवर मधाचा किंवा विषाचा बिंदु पडल्यावर त्याची चव न घेणें हें केव्हांहि शक्य नाहीं. त्याप्रमाणें राजाच्या खजिनाकामगारांनें राजाचें द्रव्य थोडें तरी अपहरण न करणें अशक्य आहे. तसेंच ज्याप्रमाणें पाण्यात राहणारा मासा पाणी पितो किंवा नाहीं हें समजणें अशक्य आहे त्याप्रमाणें राजाचे खजिन्याकडील कामगार पैसा खातात किंवा नाहीं हें कळणें अशक्य आहे.

इतर प्रकरणांतील कांहीं थोडके विषय सांगतों ते येणेंप्रमाणेंः—राजाचा अपराध्यांना क्षमा करण्याचा अधिकार व त्याचा उपयोग, रत्नपरीक्षा, खाणी खणणें, मिठाचा व्यापार, नाणीं पाडणें, खाद्य पदार्थांची निपज व देवघेव, आयात, व निर्गत व्यापार, सरहद्दीवरील व्यापाराचें नियंत्रण, सुतकाम व विणकाम, कृषि ( खतें, वातावरणशास्त्र इत्यादि ), दारू तयार करण्याचे कारखाने, भोजनगृहावरील नियन्त्रण, वेश्यावृत्तीवरील नियन्त्रण, हत्ती माणसाळणें, पाळणें व त्यांना युद्धोपयोगी करण्याकरिता शिक्षण देणें, करवसुली इत्यादि. वर वातावरणशास्त्र असे शब्द वापरले आहेत त्याचें कारण असें कीं, पाऊस मोजण्याचें साधन त्या काळीं माहित होतें (रॉयलीमिटि ऑरॉलॉजिकल सोसायटीचें क्वार्टर्ली जर्नल १९१२ पृ ६५.)

तिसरें अधिकरण.—या "धर्मस्थीयम्" नांवाच्या अधिकरणांत न्यायदानाविषयीं विवेचन असून त्यांत न्याय मिळविण्याचे कायदेशीर मार्ग व लोकांचे नागरिकत्वाचे हक्क याविषयींची माहिती आहे.

चवथें अधिकरण.—या "कण्टकशोधनम्" नांवाच्या अधिकरणात राज्याला अपायकारक अशा सर्व गोष्टींचा पोलीसांच्या मदतीनें व दण्डशिक्षा वगैरे करून कसा बंदोबस्त करावा तें सांगितलें आहे. यातील पहिल्या प्रकरणात ज्या "कंटका" संबंधीं विचार केला आहे ते लबाड कारागीर, खोटीं नाणीं करणारे, बेइमानी वैद्य, फिरते उपदेशक नर्तक वगैरे लबाड लोक होत अशांचा बंदोबस्त राजानें करणें जरूर आहे. कारण असले लबाड लोक प्रत्यक्ष नावानें नसले तरी वास्तविक 'चोर' या सदराखालीं येतात. बाकीच्या प्रकरणांत व्यापारावरील देखरेख ( पदार्थांच्या किंमती वाढूं नयेत, खाण्याच्या जिनसात लबाडी होऊं नये वगैरे बंदोबस्ताकरिता ), सार्वजनिक आरोग्य व इतर सामाजिक बाबींची व्यवस्था, आणि या बाबतींतील

गुन्हेगारास शिक्षा करण्याचा अधिकार याविषयीं विवेचन आहे. तिसऱ्या व चवथ्या अधिकरणातील मजकूर पुष्कळसा धर्मशास्त्रातल्या सारखा आहे, व त्याचें याज्ञवल्क्य व नारद-स्मृतींशीं फार साम्य आहे. या प्रथाच्या कालदृष्ट्या पौर्वा पर्याबद्दल मतभेद आहे, पण ते अवळजवळचे असावे असा संभव दिसतो.

पा च वें अ धि क र ण—या "योगवृत्तम्" अधिकरणात प्रथम राज्याचे शत्रू व राजद्रोहादि भयंकर गुन्हे करणाऱ्या ज्या लोकाविरुद्ध उघडपणें राजाला कांहीं करता येत नाहीं अशा लोकांनां नाहींसें करण्याकरिता कसे धूर्तपणाचे उपाय योजावे तें सांगितलें आहे. कावेबाजपणाच्या सर्व युक्त्या येथें सांगितल्या आहेत. इष्टकार्यसिद्ध्यर्थ योजलेला कोण-ताहि अश्लाध्य मार्ग त्याज्य मानला नाहीं, किंवा त्याची पर्वा केलेली नाहीं उदाहरणार्थ, राजद्रोहाचा संशय आलेल्या एकाद्या प्रधानास राजा एकाद्या बंडखोर रानटी टोळीचा मोड करण्यास पाठवितो, आणि त्या कामात लढाई होऊन प्रधान त्याच्या बरोबर मुद्दाम पाठविलेल्या दुष्ट लोकाकडून किंवा दरवडेखोराच्या वेषात आलेल्या गुप्त हेराकडून मारला गेला, तरी जनतेला असें जाहीर करण्यांत येतें कीं, प्रधान लढाईतच मारला गेला, किंवा राजा लढाईला व शिकारीला जाण्याच्या बेतांत असता तो संशयास्पद बनलेल्या प्रधानांना गाठ घेण्यास बोलावितो, आणि ते राजाकडे निघाले आहेत इतक्यात पूर्वसंकेतानुरूप गळेकापू लोक शस्त्रास्त्रें छपवून घेऊन राजवाड्यात शिरतात व पकडले जाऊन त्यांची झडती होते तेंव्हा त्यांच्या जवळील हत्यारें सापडतात व प्रधानांनीं त्याना राजवधार्थ प्रयुक्त केलें असल्याचा ते बाहाणा करतात. नंतर सर्व प्रकरण जनतेला कळवून अशा संशयित प्रधानाचा वध करण्यात येतो, आणि गळेकापू लोकांबद्दल दुसऱ्याच कोणाला तरी पकडून त्यांना मरणाची शिक्षा देण्यात येते.

या अधिकरणातील दुसऱ्या प्रकरणात राजानें पैशाच्या अडचणींत असता खजिना भरण्याचे कोणते उपाय योजावे तें सांगितलें आहे, व या उपायापैकीं कांहीं फारच कवेबाज-पणाचे आहेत. प्रथम जमीनदार, व्यापारी व उद्योगधंदेवाले यांच्याकडून गोड बोलून किंवा धमक्या देऊन शक्य तितकें द्रव्य कररूपानें किंवा खंडणीरूपानें काढावें. नंतर श्रीमंत लोकाकडून मोठाल्या देणग्या मानाच्या जागा व पदव्या मिळण्याच्या आश्वासनावर मिळवाव्या. तसेंच पाखंडी लोकांच्या व देवालयाच्या मालमत्तेनें सरकारी खजिन्यात भर करावी. आणि राजानें एकाद्या ठिकाणीं देवासकट एकादें देवालय एका रात्रींत तयार करून तें स्वयंभू निर्माण झालें अशी वार्ता लोकांत पसरवावी, आणि लोक तेथें यात्रेला व धार्मिक मिरवणूकींना जमूं लागले म्हणजे त्यांपासून होणारें उत्पन्न सरकारी खजिन्यांत टाकावें. किंवा दुसरा उपाय म्हणजे राजाच्या हस्तकांनीं मांत्रिक असल्याचें जाहीर करून व एकाद्या झाडावर एकादें भूत आहे अशी लोकांच्या मनांत भीति उत्पन्न करून तन्निवारणार्थ म्हणून लोकांकडून पैसे उकळावे. शिवाय एका दगडानें दोन पक्षी मारण्याप्रमाणें असा उपाय करावा कीं, गैरविश्वासू लोकांनां कांहीं तरी गुन्ह्यांत पकडून त्यांनां कैदेची किंवा मरणाची शिक्षा द्यावी, व त्याबरोबरच त्याची इस्टेट खालसा करून खजिन्यांत भर घालावी. तिसऱ्या प्रकरणांत लहानमोठ्या सर्व अधिकाऱ्यांचे व नोकरांचे पगारमान सांगितलें आहे राजपुरोहित व प्रधान यांच्या ४८००० पासून अगदीं खालच्या नोकराच्या ६० "पण" पगारापर्यंत वार्षिक वेतनाचे आकडे बरोबर हिशोबानें दिले आहेत पुढील प्रकरणांत दरबारी लोकासंबंधींचे नियम आणि मंत्रीमंडळींनां उपदेश केलेला असून त्यांनीं आपापल्या हातांत पूर्ण अधिकार कसा घ्यावा तें सांगितलें आहे.

स हा वें अ धि क र ण.—या "मंडलयोनिः" नामक अधिकरणापासून शासनशास्त्र या विषयाला खरा आरंभ होतो पहिल्या प्रकरणात सात प्रकृती उर्फ मुख्य सत्तेचीं सात अंगें किंवा तत्त्वें (राजा, मंत्री, प्रजा, जनपद, दुर्ग, ठिकाणें, खजिना, सैन्य व मित्र) व त्या प्रत्येकाला लाग-णारे गुण सांगितले आहेत. दुसऱ्या प्रकरणांत आसपासच्या शत्रुमित्र मंडलाबद्दल व्याख्या दिल्या आहेत. शत्रुमित्र ठरावण्यात पुढील बारकाईचे भेद दिले आहेतः शत्रू, मित्र, शत्रूचा मित्र, मित्राचा मित्र, शत्रूच्या मित्राचा मित्र, प्रच्छन्न शत्रू, प्रच्छन्न मित्र, प्रच्छन्न शत्रूचा मित्र, प्रच्छन्न मित्राचा मित्र मध्यस्थ, तटस्थ; या वर्गीकरणानंतर मित्र व शत्रू याचे सहज व कृत्रिम असे दोन पोटवर्ग केले आहेत. यानंतर राज्याची आर्थिक उन्नति व संरक्षण यासंबंधींच्या तत्त्वांची माहिती दिली आहे.

सा त वें अ धि क र ण.—याला "षाड्गुण्यम्" असें नांव असू‍न त्यात शासनशास्त्रातील सहा पद्धती आहेत त्याः—शांतता, युद्ध, तटस्थपणा, युद्धाची सिद्धता, दोस्ती आणि द्वैधीभाव म्हणजे शत्रुत्व व मैत्री या उभयतांना साजेल अशी वृत्ति. या सहापैकीं प्रत्येक पद्धति केव्हां व कशी उपयोगात आणावी याविषयीं माहिती याच अधिकरणांत दिली आहे.

आ ठ वें अ धि क र ण—या "व्यसनाधिकारिक" नांवाच्या अधिकरणात राजाचीं व्यसनें म्हणजे शिकार, जुगार, मद्यपान, स्त्रियांवर आसक्ति याबद्दल तसेंच राजावरील संकटें म्हणजे रोग, अग्निप्रलय, जलप्रलय इत्यादिकांबद्दल वर्णन असून त्यांपैकीं अत्यंत भयंकर व्यसनें कोणतीं तें सांगितलें आहे.

न व वें स द हा वें अ धि क र ण.—या "अभियास्यत्कर्म" आणि "सांग्रामिकम्" या नांवाच्या दोन प्रकणांत सर्वसर्वा युद्धविषयक गोष्टींची म्हणजे (सैन्यात भरती, सैन्याचे निरनिराळे प्रकार, सैन्याच्या छावणीची रचना व व्यवस्था वगैरे) माहिती दिली आहे. ज्याला सरळ युद्धांत शत्रूचा पराभव करण्याचें सामर्थ्य नसेल त्या राजानें

शत्रुनाशाच्या कोणत्याहि कुटिल उपायाचें अवलंबन करण्यास कचरूं नये जेव्हां प्रत्यक्ष लढाईची वेळ येईल त्यावेळीं राजानें सैनिकांनां आपणांनीं ; उत्तेजन द्यावें या कामांत त्यानें ज्योतिषि, पुरोहित व दरबारचे भाट यांची मदत घ्यावी; आणि त्यांनीं शूरांना स्वर्ग व भीरूंनां नरक हें बक्षीस मिळतें असें सैनिकांनां सांगावें. शेवटीं असें सांगितलें आहे कीं, शत्रूचा पराजय करण्याकरितां केवळ सैन्यावर भिस्त ठेवून भागत नाहीं, तर कपटाचा प्रयोगहि करणें जरूर असतें; कारण,

एकं हन्यान्न वा हन्यादिषुः क्षिप्तो धनुष्मता ।
प्राज्ञेन तु मतिः क्षिप्ता हन्याद्गर्भगतानपि ॥

म्हणजे योद्ध्यानें सोडलेल्या एका बाणानें फार तर एक इसम मरेल, कदाचित कोणीहि मरणार नाहीं.परंतु बुद्धिमान मनुष्यानें योजिलेली युक्ति गर्भात असलेल्या शत्रूला सुद्धां मारूं शकते. ही कविता दिल्यावर पुढील अधिकरणांत युद्धप्रसंगीं योजावयाच्या अनेक युक्त्यांचें वर्णन केलें आहे.

अकरावें अधिकरण.—याचें "संघवृत्तम्" असें नांव असून त्यांत युद्धजीवी अशा संघाशीं राजानें वर्तन कसें करावें तें सांगितलें आहे. प्रथम राजानें त्यांनां स्वपक्षाकडे ओढून घेऊन त्यांचा स्वतःच्या फायद्यासाठीं उपयोग करून घेण्याचा प्रयत्न करावा. पण हा प्रयत्न न साधल्यास राजानें अनेक युक्त्याप्रयुक्त्यांनीं अशा संघांतील लोकांत परस्पर वैमनस्यें उत्पन्न करून ते निरुपद्रवी होतील असें करावें. या कामीं राजानें स्त्रियांचा उपयोग करावा. स्त्रियांच्या प्राप्तीसाठीं त्यांची आपसांत चुरस व भांडणें लागलीं म्हणजे गळेकापू लोक धाडून त्यांतील मुख्याला ठार करावें.

बारावें अधिकरण–यास"आबलीयसम्"नांव असून त्यांत असमर्थ राजानें प्रबल शत्रूच्या नाशासाठीं हेराच्या, गुप्तहस्तकाच्या, गळेकापूच्या व विषप्रयोग करणाऱ्या इसमाच्या मदतीनें काय काय करावें तें सांगितलें आहे. उदाहरणार्थ, गुप्त हस्तकांनां मांत्रिकाचा वेष घेण्यास सांगून त्यांच्याकडून कामपीडित राजांना कामोद्दीपक औषधें पण जें वास्तविक प्राणघातक विष असेल तें दववेणें, किंवा राजानें आपल्या हेरानां व्यापारी, धनगर, किंवा संन्यासी अशा वेषानें सरहद्दीवर पाठविणें म्हणजे ते शत्रूच्या मुलुखांत सर्वत्र संचार करूं शकतात. किंवा मद्यमांसाचे व्यापारी या नात्यानें लोकांनां फसवून विषप्रयोग करूं शकतात. किंवा शत्रुपक्षाचे लोक ज्या देवालयांत किंवा यात्रेच्या जागीं जमत असतील त्या ठिकाणीं यंत्राच्या साहाय्यानें जमलेल्या शत्रुपक्षीय लोकांच्या डोक्यांत भिंती किंवा खडक कोसळून त्यांचा नाश होईल असें करणें इत्यादि प्रकारच्या युक्त्या सुचविल्या आहेत.

तेरावें अधिकरण—या "दुर्गलम्भोपायः" नामक अधिकरणांत तटबंदीचीं ठिकाणें काबीज करण्याचे उपाय सांगितले आहेत.जर शत्रूचें एखादें गांव काबीज करणें असेल तर राजानें स्वतःला अनुकूल असलेल्या लोकांनां उत्तेजन द्यावें आणि शत्रुपक्षीयांच्या मनांत स्वतःच्या सर्वज्ञतेचे व देवतांच्या अनुकूलतेचे चमत्कार प्रसिद्ध करून धास्ती उत्पन्न करावी. सर्वज्ञतेची कीर्ति पसरविण्याकरितां गुप्त हेराच्या व कबुतरांच्या साहाय्यानें मिळविलेली माहिती प्रसिद्ध करावी व ती माहिती दैवी सामर्थ्यानें मिळाली असा बहाणा करावा. दैवतें बोलतात अशी कीर्ति पुढील उपायांनीं मिळवावी—कुंडांतून अग्निदेवता किंवा मूर्तींतून देवता बोलते असें दाखविण्याकरितां अग्निकुंडाखालीं किंवा मूर्तिमधील पोकळ भागांत स्वतःचा हस्तक गुप्तपणें बसवून त्याच्या तोंडून भाषण वदवावें. शत्रुत्व करणाऱ्या राजाचा नाश करण्याच्या युक्त्यांपैकीं एक पुढीलप्रमाणें आहे. (१३ १७२). "शत्रूच्या गांवानजीकच्या एका डोंगरांतील गुहेंत मुण्डन केलेला किंवा जटा वाढविलेला एक कपटवेषधारी संन्यासी बसवावा. त्यानें चारशें वर्षें वय असल्याचें सांगावें व त्याचे बरेचसे शिष्य असावे. त्या शिष्यांनीं फलमूलांची भेट घेऊन प्रधान व राजा यांच्याकडे जावें आणि संन्यासी महाराजांच्या भेटीस त्यांनां बोलवावें. राजा भेटीला आला म्हणजे त्याला संन्याशानें जुन्या राजांच्या व जुन्या स्थळांच्या गोष्टी सांगाव्या आणि म्हणावें "शंभर वर्षें पुरीं झालीं कीं, त्या प्रत्येक वेळीं मी अग्नींत प्रवेश करतों आणि पुन्हां तरुण होतों आतां तुझ्या देखत चौथ्या खेपेस मी अग्नींत प्रवेश करणार आहे परंतु तूं मजजवळ असणें जरूर आहे, तूं तीन वर माग." राजानें संमति दिली म्हणजे संन्याशानें पुन्हां म्हणावें: "हें पाहाण्याकरितां व आहुति देण्याकरितां सात दिवस व सात रात्रीं बायकामुलांसह तूं येथें राहिलें पाहिजे." याप्रमाणें राजा तेथें राहात असतां त्याचा घात करावा."

तटबंदीचें ठिकाण काबीज करण्याच्या कपटाच्या योजनाच्या वर्णनाला बरींच प्रकरणें खर्च केल्यावर नंतरच्या एका प्रकरणांत असलें ठिकाण सरळ मार्गानें वेढा घालून कसें हस्तगत करावें तें सांगितलें आहे. नंतर एक महत्वाचें प्रकरण आहे त्यांत जिंकून घेतलेल्या प्रदेशांत शांतता कशी प्रस्थापित करावी तें सांगितलें आहे. त्यांत असें आहे कीं, "जेव्हां राजा एखादा नवा मुलूख हस्तगत करतो तेव्हां त्यानें तेथील पराभूत राजाचे दुर्गुण स्वतःच्या गुणांनीं झाकून टाकावे व त्याचे गुण स्वतःच्या अंगचे गुण दुप्पट वाढवून फिके पाडावेत. स्वतःचीं कर्तव्यें नियमितपणानें करून, उदार देणग्या देऊन व नव्या प्रजेला हक्क व मानमरातब देऊन त्यांचें कल्याण साधण्यास झटावें....पोषाख, रीतिभाती, भाषा व राहाणी या बाबतींत त्यानें या नव्या प्रजेचें अनुकरण करावें. तसेंच त्यांच्या देवता, समारंभ, उत्सव, वगैरे धार्मिक बाबी त्यानें पाळाव्या. त्यानें विद्वानांचा व इतर शिष्टांचा सन्मान इनामें, देणग्या किंवा करमाफी देऊन करावा. कैदी मुक्त करावे. कित्येक

सणाच्या दिवशीं प्राणिहत्या बंद करावी. आणि भूतदया-दर्शक इतर अनेक गोष्टी सुरू कराव्या. "अर्थशास्त्रात" ह्या या गोष्टी उपयुक्ततेच्या दृष्टीला सोडून नाहींत, मात्र भूतदया, व न्यायबुद्धि या तत्त्वाकरिता या गोष्टी सांगितलेल्या नसून केवळ जिंकलेल्या देशात शांतता प्रस्थापित करण्याचे उत्तम उपाय म्हणून त्या सांगितल्या आहेत.

चवदावें अधिकरण.—याचें नाव "औपनिषदिकम्" असें असून ते गुप्त उपाय म्हणजे अभिचार ( जादूटोणा ) यासंबधाचें असून तें समजण्यास कठीण आहे. त्यात आगी लावण्याचीं व ठार मारण्याचीं मनुष्याला वेड लावण्याची व दुसरे अनेक प्रकारचे रोग उत्पन्न करण्याचीं औषधें, मिश्रणें वगैरे सांगितलीं आहेत. तसेंच एकेक महिना अन्नावाचून राहतां येईल, शरीरवर्ण पालटतां येईल, अग्नीवरून चालत जाता येईल, स्वतःला व इतरांना अदृश्य बनवितां येईल, मनुष्यास व इतर प्राण्यास झोंप लावता येईल, इत्यादि प्रकारचे औषधिउपायहि सांगितले आहेत.

पंधरावें अधिकरण.—या "तंत्रयुक्तिः नावाच्या शेवटच्या अधिकरणात या एकंदर ग्रंथाच्या रचनेची योजना दिली असून त्यात दिलेल्या अनुमान पद्धतींची यादी दिली आहे. मीमांसाकाराच्या तर्कपद्धतींत व तत्त्ववेत्याच्या भाष्यात फक्त पांच किंवा सहाच अनुमानपद्धति आढळतात, तर या ग्रंथात बत्तीस अनुमानपद्धति, त्याच्या व्याख्या व या ग्रंथांतीलच उदाहरणें यासह दिल्या आहेत. या बत्तीस पारिभाषिक शब्दप्रयोगात कांहीं न्यायपद्धतींतील व तर्कपद्धतींतील शब्दप्रयोगासारखे आहेत. पण त्यावरून अनुमान असें काढावयाचें असेल कीं ख्रिस्तपूर्व ४ थ्या शतकात तर्कशास्त्राचे नियम अस्तित्वात होते, तर मात्र सदरहू अर्थशास्त्र हा ग्रंथ ख्रि. पू. चवथ्या शतकांतील सुप्रसिद्ध राजकारणी पुरुषानें लिहिला असे मानण्याऐवजीं नंतरच्या कोणी पंडितानें जुन्या ग्रंथाच्या आधारे तो लिहिला असावा असें मानण्यास या शेवटच्या प्रकरणात पुरावा आहे असें प्रो. विंटरनिझ याचें मत आहे.

कौटिलीय अर्थशास्त्राच्या या विषयवार पहाणीवरून असें सहज दिसून येईल कीं हा ग्रंथ अप्रतिम असून भारतीय वाङ्मयांतील दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथापेक्षा प्राचीन भारताचा सार्वजनिक व्याप व सांस्कृतिक स्थिति यावर यानें अधिक प्रकाश पाडला आहे. मोठमोठे पंडित धरतात तें म्हणजे विख्यात चंद्रगुप्त राजाच्या मंत्र्यानें हा रचला हें जर खरें असेल तर हें साहित्य निःसंशय अमोलिक आहे. व इ. स. पू. ४ थ्या शतकातला हा धरावा लागेल. शिवाय इतक्या प्राचीन काळच्या भारतीय वाङ्मय व संस्कृति या संबंधींचा हा पहिला असा एकच ग्रंथ म्हणतां येईल कीं, ज्याचा रचनाकाल नक्की करता येतो प्रथमतः हा कौटिल्याचाच ग्रंथ असावा असेंच मत होतें. उदाहरणार्थ, प्रथम याकोबी [ भारतीय तत्त्वज्ञानाचा प्राचीन इतिहास ", एस बीए १९११, ७३२ इ, कौटिल्यावरून वाङ्मय व भाषा याचा इतिहास आणि संस्कृतिविषयक विवेचन ". एस् बीए १९११ ९५४; इ ;" कौटिलीय अर्थशास्त्राच्या खरेपणाविषयीं खात्री" एस् बीए १९१२, ८३२ इ; झेड्डीएमजी. ७४, १९२०;२४८इ २५४ इ. या लेखात] या ग्रंथाच्या चाणक्यकर्तृत्वाविषयीं अनुकूल मत देता झाला, अनेक याकोबीमत ग्राह्य धरतात; [उ चार्पेटियेर डब्ल्यू. झेड. के. एम. २८, १९१४, २११; स्मिथ-अर्ली हिस्ट्री १५१ इ.; फ्लीट-इंट्रोडक्टरी नोट टु शामशास्त्रीज् इंग्लिश ट्रान्सलेशन (१९१५) सौली-इंट्रोडुझिओने पा. १६ इ., गार्बे-सांख्यफिलॉसॉफी, पा. ३ इ.] पुढील भारतीय पंडितांना कौटिल्याच्या या ग्रंथ संपादनाबद्दल मुळींच शंका नाहीं [शामशास्त्री ( ग्रंथाच्या संस्कृत व भाषांतराच्या प्रतींतील इंग्रजी प्रस्तावना ); एन्. एन्. लाहा-स्टडीज् इन् एन्शंट हिंदु पॉलिटी(लंडन १९१४) आणि राधाकुमुद मुकर्जीची लाहाच्या ग्रंथावर प्रस्तावना; हर प्रसादशास्त्री, जेएएस् बीं ६,१९१०, ३०५ इ. आणि के. पी. जयस्वाल, इं-ॲं ४२, १९१३, ३०६. त्याच प्रकारचें मत व्यक्त करणारे इंग्रज लेखकहि आहेत. पार्गिटर जे आरए एस् १९१७१५७ इ., १५९ इ.; एल् डी. बार्नेट, ॲंटिक्विटीज् ऑफ इंडिया, लंडन १९१३, पॅरा ९८.]

अशा स्वरूपाचा ग्रंथ उपलब्ध असल्याची भावना आल्हादकारक आहे यामुळेंच आपल्या निर्णयबुद्धीवर भावनाचा पगडा न बसूं देणें व या ग्रंथाचा रचनाकाल इ. स. पू. ४ थें शतक हा आहे कीं नाहीं हें फार बारकाईनं पाहणें अवश्यक आहे. हिलेब्रॅन्ट, [ झेड्डीएम्जी. ६९, १९१५, ३६० इ., आणि जीजीए १९१५, ६२९ याशीं तुलना करा.] म्हणतो:—या सबंध ग्रंथाचा एकटा कौटिल्यच कर्ता असेल असें आपण समजता कामा नये. त्याच्या शाखेबरोबर याची उत्पत्ति झाली. हर्टेल ( तंत्राख्यायिकाचें भाषांतर १ पान, २२ ) हा हिलेब्रॅन्टप्रमाणेंच कौटिलीय अर्थशास्त्र एकदम रचलें गेलें नाहीं असें समजतो पण त्याचें असें मत दिसतें कीं, या ग्रंथाचा व भाष्याचा मूलांश चाणक्याच्या काळींच प्रादुर्भुत झाला यात शंका नाहीं. ओल्डनबर्ग १९१३ सालात म्हणतो कीं कौटिलीय हें इ. स पू. ३०० च्या सुमारास चाणक्याकडून किंवा त्याच्या नंतरच्या पंडिताकडून रचले गेलें, पण पुढें [ एनुजीजीडब्ल्यू. १९१८ यात ] त्याची एतद्विषयक जास्त अश्रद्धा दिसून येते. जॉलीला प्रथम हा ग्रंथ चाणक्याचा वाटला ( " राजनीतीवर एक प्राचीन भारतीय ग्रंथ. जर्मन लेख१९१२ )पण हळूहळू त्याच्या कालाविषयीं व खरेपणाविषयीं त्याला संशय येत चालला ( झेड्डीएम्जी ६८, १९१४, ३५९ ) व

१९१९ मध्यें तो कौटिलीयाचा काल इ. स. ४ थें किंवा ५ वें शतक असा निश्चित करितो ("तौलनिक न्यायतत्त्व शास्त्राचें नियतकालिक मासिक. ३७ पा. १२९) ए. बी. कीथ (जे.आर्.ए.एस्. १९१६, १३० इ, १९२०, ६२८) आणि डॉ. भांडारकर (प्रोसीडिंग्ज् ॲंड ट्रॅन्सॅक्शन्स् ऑफ् दि फर्स्ट ओरिएंटल् कॉन्फरन्स् पुणें १९२०) यांनी या ग्रंथाच्या खरेपणाविषयीं संशय घेतला आहे व चाणक्याचें संपादन अमान्य केलें आहे.

आपणाला कौटिल्याविषयीं कितपत माहिती आहे? पुराणें (भविष्यकथनाचें स्वरूप देऊन) असें सांगतात कीं, कौटिल्यानें नंदराजवंशाचा उच्छेद करून चंद्रगुप्त मौर्याला राज्याभिषेक केला. [एफ्. ई. पार्गिटेर-दि पुराणाज् ऑन दि डिनॅस्टीज् ऑफ दि कलि एज", ] कर्ता पुरुष या नात्यानें प्रसिद्धि असली तरी आचार्य किंवा ग्रंथकर्ता म्हणून पुराणें कौटिल्याचें मुळींच वर्णन करीत नाहींत चंद्रगुप्त इ. स. पू ३२२ च्या सुमारास राज्यारूढ झाला, इ स. पू ३०२ मध्यें त्याच्या दरबारीं मेगॅस्थिनीस हा ग्रीक मनुष्य सेल्युकस निकेटारचा वकील म्हणून आला त्यानें आपल्या अनेक वर्षांच्या परदेशवासाचा इतिहास लिहून ठेवलेला उपलब्ध आहे. हा ग्रीक मेगॅस्थिनीस, किंवा पुढचे प्राचीन ग्रंथकार या प्रसिद्ध चंद्रगुप्ताच्या मंत्र्यासंबंधीं कांहींहि लिहीत नाहींत हें चमत्कारिक नव्हे का? मेगॅस्थिनीजच्या इतिहासाशीं अर्थशास्त्र किती जरी बारकाईनें ताडून पाहिलें तरी अर्थशास्त्रकर्ता मेगॅस्थिनीजचा समकालीन होता असें मानण्याला मुळींच आधार मिळत नाहीं. [आर. मुकर्जी यांचें लाहा यांच्या "स्टडीज् इन् एन्शंट हिंदु पॉलिटी" याला प्रस्तावना, पहा.] मुकर्जी आणि स्मिथ (अर्ली हिस्ट्री) हे आपणाला मेगॅस्थिनीस आणि कौटिल्य यामध्यें असें साम्य सापडलें असें समजतात. एच्. जी रॉलिन्सन (इंटरकोर्स बिट्वीन इंडिया ॲंड वेस्टर्न वर्ल्ड केंब्रिज १९१६), हे, कौटिल्य आणि मेगॅस्थिनीज कांहीं अंशीं एकमेकांशीं जुळतात असें सिद्ध करण्याला लाहाचा आधार घेतात. कांहीं बाबतींत असें साम्य आहे खरें पण ओटो स्टीनप्रमाणें ("मेगॅस्थिनीज, ॲंड' कौटिल्य", एस्.डब्ल्यू.ए १९२१) ग्रीक रिपोर्टांची कौटिलीयाशीं पूर्ण तुलना केल्यास, महत्त्वाच्या बाबतींत साम्यापेक्षा विरोधस्थळेंच जास्त निघतील. शिवाय, अशोककालीन स्थिति व कौटिल्यांत वर्णिलेली स्थिति यामध्यें म्हणण्यासारखें साम्य आढळत नाहीं. डॉ थामसनें जेआर्.एएस् १९१५, यांत जे उतारे घेतले आहेत त्यावरून कांहीं सिद्ध होत नाहीं महाभाष्यांत मौर्यांचा व चंद्रगुप्ताच्या सभेचा उल्लेख केलेला आहे, पण कौटिल्याविषयीं तें कांहींच बोलत नाहीं कौटिल्याविषयीं जी इतर माहिती आढळते ती केवळ दंतकथा व कादंबरी असा म्हणता येईल; उदा "मुद्राराक्षस" नाटकांतील कथा 'सोमदेवाचें' कथासरित्सागर"आणि हेमचंद्राचें परिशिष्टपर्वन्' यांतील कथा या ठिकाणीं चाणक्य हा बहुतेक वेळां धूर्त व कपटी मुत्सद्दी असा दाखविला असून, या स्वभावाच्या कोणत्याहि कथा त्याच्यावर लादलेल्या दिसतात. आणि या कथांतून सुद्धां कौटिल्याची आचार्य किंवा ग्रंथकर्ता म्हणून कांहींच कामगिरी सांगितली नाहीं मुद्राराक्षसाच्या पहिल्या अंकांत फक्त कौटिल्य आपल्या शिष्यासह प्रवेश करितो असें आचार्यस्वरूप दाखविलें आहे खरें, तथापि कौटिलीय अर्थशास्त्राच्या प्रधान भागांत नंद, मौर्य, राजा चंद्रगुप्त किंवा तत्कालीन स्थिति यासंबंधीं कोठेंच उल्लेख आढळत नाहीं मुकर्जींना कांहीं ठिकाणीं (लाहा. पा. ३३ पहा) चंद्रगुप्तासंबंधी उल्लेख दिसतात पण ते कोणालाहि कळण्यासारखे नाहींत असें विंटरनिझला वाटतें.

खुद्द अर्थशास्त्रांत तो कौटिल्याचा ग्रंथ असल्याचें प्रतिपादिलें आहे; १. १ आणि २ १० याच्या शेवटच्या श्लोकांत व ग्रंथाच्या शेवटीं. म्हणजे ज्या ठिकाणीं "ज्यानें शास्त्र व शस्त्र उत्कण्ठापूर्वक नंदराजाकडे असलेली भूमि, तरवार व ज्ञान उद्धृत केलें तो" असा नंदनाशाबद्दलचा उल्लेख आहे त्या स्थळीं याचा दाखला सापडेल "उद्धृत केलें" (उद्धृतानि) याचे येथें तीन निरनिराळे अर्थ आहेत. त्याचा आशय हा: "ज्यानें तारतम्यानें निश्चित केलेलें, ज्ञान (जुन्या ग्रंथावरून हें अर्थशास्त्र) बाहेर काढलें, ज्यानें म्यान्यांतून तरवार बाहेर काढिली आणि ज्यानें नंद राज्याच्या हातून त्याच्याच मालकीची जमीन हिसकावून घेतली" असे आहेत पण ज्यांत हे श्लोक आहेत ते अध्याय जरी ग्रंथाच्या मूळ भागांतले असले व सरतेशेवटीं जोडलेले नसले (सरते शेवटीं जोडलेले असावे असेंच विंटरनिझला संभवनीय दिसतें) तरीसुद्धां अर्थशास्त्र हें कौटिल्याचें आहे असें होणार नाहीं, तें कदाचित् त्याचें असूं शकेल असें म्हणता येईल मूळ ग्रंथांत देखील कर्ता चाणक्य किंवा विष्णुगुप्त असें न म्हणता केवळ कौटिल्य या नांवानें नेहमीं त्याचा उल्लेख आढळतो व "कौटिल्य" हें नांवच मुळीं तें ग्रंथकर्त्याचें खरें नाव नसावें असें उघड सांगतें. "कौटिल्य" म्हणजे खोटेपणा, ढोंगीपणा कौटिल्य नांवांतील हा अर्थ मुद्राराक्षसाच्या कर्त्याला माहीत होता (१ श्लो ७. १ आणि ४ श्लो २ पहा) व म्हणून चंद्रगुप्ताच्या मंत्र्यानें आपण स्वतःला हें नांव लावून घेतलें असेल असा मुळींच संभव दिसत नाहीं असें विंटरनिझ समजतो. पण एखाद्या ग्रंथकारास अशा नांवाची आवड असणें शक्य नाहीं असेंहि म्हणत नाहीं. याकोबीच्या मतें या ग्रंथाचा कर्ता पंडित नसून एखादा मुत्सद्दी असावा तो त्याला "भारतांतील बिस्मार्क" असें नाव देतो व फ्रेडरिक दि ग्रेटप्रमाणें त्यानें फुरसतीच्या वेळीं किंवा म्हातारपणीं आपल्या आयुष्यांतील कामगिरीवर एक औपपत्तिक ग्रंथ लिहिला असें याकोबी म्हणतो. पण ही याकोबीची उपपत्ति अर्थशास्त्रांतील विषयां

वरून खरी असेल असें विंटरनिझला वाटत नाहीं. कां कीं, पंडितांनीं रचलेल्या इतर शास्त्रीय ग्रंथांतल्याप्रमाणें या अर्थशास्त्रांत आपणाला तीच व्याख्यांची आवड, पांडित्यदर्शक वर्गीकरण, प्रकरणें आणि सूत्रें आढळून येतात. शिवाय नीतिसूत्रांची त्यावेळीं उपलब्ध असलेली व प्रगत अशी परिभाषा या ग्रंथांत गृहीत धरलेली दिसते. नीतिशास्त्राभ्यासाची एक फार पुरातन कालापासून चालत आलेली शाखा गृहीत धरल्यासच, आचार्य, किंवा ( मानव, बार्हस्पत्य, औशनस यासारख्या ) काहीं शाखा, किंवा ( भारद्वाज, विशालाक्ष, पराशर यासारखे ) व्यक्तिशः लेखक यांचीं मतें कौटिल्याच्या मताशीं तुलना करण्याकरितां जीं मांडिलीं आहेत, तीं व त्यावरील चर्चा यांचा अर्थ आपणास लावतां येईल. अशा चर्चांच्या शेवटीं "इति कौटिल्य असें म्हणतो " या शब्दांत प्रमाणभूत मत सांगितलें असतें तेव्हां या ग्रंथाचें कर्तृत्व कौटिल्याकडे जातें हें खोटें नाहीं, तथापि हा कर्त्याचें नाव सांगण्याची पद्धत बहुधा सूत्र ग्रंथांतच आढळते. हे सूत्रग्रंथ वैयक्तिक लेखकाचे म्हणून मानले जात नाहींत. उदाहरणार्थ, पूर्वमीमांसासूत्रांत जैमिनीचें, वेदांत सूत्रांत बादरायणाचें व बौधायनधर्मसूत्रांत बौधायनाचें नांव आलेलें आहे. येणेंप्रमाणें विंटरनिझ विवेचन करतो व कौटिलीय अर्थशास्त्र कौटिल्याचें जें समजण्यांत येतें तें केवळ एकाच कारणाकरितां होय असें म्हणतो व तें कारण म्हणजे हा दंतकथांतील चंद्रगुप्त राजाचा मंत्रि शासनशास्त्राचा उत्पादक नसला तरी एक नमुनेदार गुरु होता एवढेंच दाखवितो. चाणक्य किंवा कौटिल्य हा सुसंस्कृत धूर्त व कावेबाज मंत्र्याचा आदर्श; पण आपल्या राजाशीं फार इमानी व एकनिष्ठ असा पुरुष म्हणतां येईल व अशाच पुरुषाचा नमुना आपल्याला भासापासून पुढच्या नाट्यवाङ्मयामध्यें नेहमीं आढळतो, व यामुळें पुढील काळीं सर्व नीतिवाक्यें मागें चाणक्यापर्यंत नेऊन भिडविलीं आहेत.

या मूळ ग्रंथांतील विषयाकडे दृष्टि फेंकल्यास आपणास असें दिसून येईल कीं, शासनशास्त्र ( संकुचित अर्थानें ) या विषयाखेरीज व्यवहारांतील अनेक विषय यांत भरले आहेत. या विषयाच्या विवेचनांत कलाकौशल्य, कृषिकर्म, खनिखोदन युद्धशास्त्र इ. यासारख्या क्षेत्रांतील सविस्तर ज्ञान तत्कालीं पूर्णपणें लोकांमध्यें असल्याचें गृहीत धरलेलें आहे, व हें ज्ञान त्या प्राचीन काळींसुद्धां एकट्या माणसाला आपलेसें करणें अगदीं अशक्य होतें. आपण अशी कल्पना करूं या कीं, या विभागासाठीं कौटिल्यानें निरनिराळे अधिकारी आपल्या मदतीस घेतले होते. या तऱ्हेचें याकोबीचें मत होतें आणि तें कामंदकीय समजुतीशीं विसंगत नाहीं. हर्टेल व शार्पेंटियर यांचेंहि मत तसेंच दिसतें. अर्थशास्त्रांतून ज्यानें नीतिशास्त्राचें अमृत काढलें त्या प्रसिद्ध आणि शहाण्या विष्णुगुप्ताचा सत्कार असो " या कामंदकीय वृत्ताच्यावरून त्या ग्रंथकाराची कौटिल्य हा पूर्वकालीन ज्ञानाचा संग्राहक व कर्ता मुत्सद्दी होता अशी समजूत व्यक्त होते. कौटिल्यामध्यें येणारे अनेक नवीन शब्द अर्थशास्त्रांतर्गत विविध शास्त्रीय शाखांमध्यें विवेचिले आहेत. [ हर्टेल डब्ल्यू झेडकेएम २५,१९१०,४१६ इ. याकोबी एसबीए १९११, ९५४ इ. शार्पेंटियर डब्ल्यूझेडकेएम २८,१९१४,२११ इ. ] विंटरनिझच्या मतें निरनिराळ्या शास्त्रांवरचे स्वतंत्र ग्रंथ त्या काळीं असून अर्थशास्त्राच्या संपादकानें ते काहीं थोडा फरक करून आपल्या ग्रंथांत अंतर्भूत केले, असें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसेल. या म्हणण्याचें प्रत्यंतर म्हणजे तेच तेच विषय पुष्कळ अध्यायांतून आलेले नेहमीं आढळतात. शिवाय वरील विधान गृहीत धरल्यास अर्थशास्त्राच्या उदयापूर्वी केवळ शासनशास्त्रांतच नव्हे, तर विविध कला व्यापार व व्यवहार यांच्या शाखांतहि बरेच दिवसांपासून वाङ्मयीन चळवळ चालू होती, असें निदर्शनास येईल. आपला हा ग्रंथ इ. स. पू. ४ थ्या शतकांतला आहे असें म्हणणें, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे काहींसें अशक्य कोटींतल्यासारखें विंटरनिझला वाटतें.

कौटिलीयाचा काळ निश्चित करण्यास त्यांत प्राचीन अर्थशास्त्र वाङ्मयाखेरीज दुसरा कोणता वाङ्मयीन वर्ग ठाऊक असल्याबद्दल उल्लेख आहेत हें पाहिलें पाहिजे. वेद आणि वेदांगाखेरीज वर्णनपर व उपदेशपर महाकाव्य-वाङ्मय माहीत असावेंसें दिसतें. महाभारत व रामायण यांतील मुख्य कथानकें तर पूर्वीपासून माहीत होतींच; पण या दोन महाकाव्यांत न आढळणाऱ्या ज्या काहीं कथा आहेत, त्या प्राचीन वैदिक व बौद्धवाङ्मयांतून उद्धृत केल्या असाव्यात. तथापि येथून तेथून ब्राह्मणी कथांचे उल्लेख केलेले दिसतात. कौटिलीयांत कोठेंहि त्या काळीं एकादें काव्य किंवा नाटक अस्तित्वांत असल्याचा पुरावा दाखला मिळत नाहीं.

तंत्राख्यायिक, दशकुमारचरित आणि वात्स्यायनाचें "न्यायभाष्य " यांत कौटिलीय अर्थशास्त्र हा सुप्रसिद्ध चंद्रगुप्ताच्या मंत्र्यानें केलेला असा ग्रंथ असल्याचें मानलें आहे. कौटिलीयाचें याज्ञवल्क्य आणि नारद यांच्या धर्मशास्त्राशीं साम्य दाखविलेलें साम्य, त्याचप्रमाणें कौटिलीयांत किंवा त्यांत उल्लेखिलेल्या एखाद्या कलाविषयक ग्रंथांत किमयेचें आढळणारें ज्ञान आपण लक्षांत घेतल्यास विंटरनिझच्या मतें असें म्हणावें लागेल कीं, हें अर्थशास्त्र प्राचीन आहे तरी इ. स. ३ ऱ्या शतकाहून प्राचीनतर नाहीं. जर न्यायभाष्य आणि तंत्राख्यायिक इ. स. ४ थ्या शतकांत टाकिलीं ( व हेंच अधिक संभवनीय आहे ) तर कौटिलीय त्याच्या जरा अलीकडे येईल. जैन संप्रदायाच्या नंदीसूत्र आणि अनुयोगद्वार यांतील ब्राह्मणग्रंथांच्या यादींत " कोडिल्लयम " असा जो नामनिर्देश आहे, त्यायोगें विंटरनिझच्या दृष्टीनें जास्त काहीं सिद्ध होत नाहीं. याकोबी [ झेडडीएमजी ७४,२५४ ] इ शार्पेंटर ( उत्तराध्यायन प्रत प्रस्ता. पा. २ इ.) यांपैकीं कोणीहि ही यादी खिस्तापूर्वीची असल्याचें सिद्ध करीत नाहींत.

जैन संप्रदायाचा कांहीं भाग नंदाच्या काळचा असला तरी स्वतंत्र लेखांचा काळ देवर्द्धि (इ स ४ थें शतक) याच्या मागें जाईल इतका पुरावा आपणापाशीं नाहीं. कालिदासाला अर्थशास्त्र माहीत असणें शक्य आहे; पण एखाद्या लेखकानें (एच एन्-शहा- " कौटिलीय अँड कालिदास, जर्नल ऑफ दि मिथिक सोसायटी, बंगलोर पु १०,११ ) कौटिल्य व कालिदास यांच्यात साम्य आहे इतकेंच नव्हे तर दोघेहि एकच आहेत असें सिद्ध करूं लागावें हें विलक्षण आहे!

जरी इ स. पू. ४ थ्या शतकांतील खात्रीनें असणारा ग्रंथ आपल्यापाशीं आहे ही आपली आशा आता खोटी ठरली, तरी जितका जुना म्हणून तो सिद्ध होतो तितक्या जुन्या काळचा ग्रंथ आपल्या संग्रहीं असणें कांहीं कमी समाधानाचें नाहीं असें विंटरनिझ मत देतो.

कौटिलीय अर्थशास्त्राच्या अंतरंगावरून असें खात्रीपूर्वक वाटतें कीं त्याच्या कर्त्याची धार्मिक व प्रापंचिक दृष्टि निःसंशय ब्राह्मणी असून त्यानें आदर्शभूत मानलेल्या राज्यात ब्राह्मणाचें कार्यक्षेत्र बरेंच व्यापक दिलें आहे. राजा आपलें कर्तव्य बजावीत असतांना त्याच्याभोंवतीं उपाध्ये व धार्मिक माणसें नेहमीं असत. व दरबारी अधिकारी म्हणून त्यांना प्राप्ति असेच; पण राजाचा अधिकार निश्चित करण्याची किंवा सरकारी खजीना पुनः समृद्ध करण्याची आपत्ति येते, त्या प्रसंगीं लोकांच्या धार्मिक भावना कितीहि दुखविण्याम हें ब्राह्मणी वर्चस्व आड येत नसे ही गोष्ट लक्षात ठेवण्याजोगी आहे. या प्रसंगीं मॅकिॲव्हेलीला कौटिल्या प्रमाणें आपल्या हेतूच्या सिद्ध्यर्थ कोणतीहि गोष्ट फार वाईट अशी वाटत नसे तथापि त्याचा स्वभाव एरव्हीं कट्टा धार्मिक असाच असे. हें साम्य सोडून दिल्यास कौटिल्याला " भारताचा मॅकिॲव्हेली " हें नेहमीं लावलें जाणारें विशेषण केवळ फार अल्पांशानें खरें म्हणता येईल. जोसेफ कोलहर कौटिल्याला "हाब्जचा भारतीय प्राग्भावी" असें जें म्हणतो त्यात तर अगदींच थोडें सत्य आहे "बुक ऑफ दि प्रिन्स " या पुस्तकाप्रमाणें अर्थशास्त्रातहि राजसत्ताक राज्याखेरीज इतर कोणत्याहि प्रकारच्या राज्याची कल्पना आढळत नाहीं आणि राज्यरक्षणाच्या दृष्टीनें त्याकडे पाहिल्यास हे दोन्हीहि ग्रंथ व्यावहारिक म्हणता येतील. तथापि या दोहोंत एक मोठा फरक आहे. तो हा कीं, मॅकिॲव्हेली हा प्रामुख्यानें इतिहासकार म्हणून वावरत असून तो आपले सिद्धांत इतिहासज्ञानावरून निरूपित करितो; पण ही गोष्ट आपल्या "भारतीय मॅकिॲव्हेली " च्या बाबतींत लागू नाहीं, कारण तो मुख्यता सिद्धांती असून, " राज्याच्या संरक्षणासाठीं कोणतीं साधनें उपयोगी आहेत व कोणतीं नाहींत ? असेंच फक्त तो विचारतो. कांहीं अध्याय ( उदा. अधिकाऱ्यांचे पगार, नगररचना व व्यवस्था इ. ) वाचून आपली अशी कल्पना होते कीं मस्तुस्थितीवरून कल्पोन आपले सिद्धांत बसविले असते



पाहिजेत व म्हणून या अध्यायांचा, कदाचित् सबंध ग्रंथाचा, कर्ता कोणी लहान सहान अधिकारी असून राजाच्या पदरचा कोणी श्रेष्ठ मन्त्री असावा, असेंच शक्य वाटूं लागतें.

१९०९ मध्यें अर्थशास्त्राची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर कीथ यानें, अर्थशास्त्रकर्ता विष्णुगुप्त व कामसूत्रकर्ता वात्स्यायन हे एकच होत असें प्रतिपादन केलें. त्यानें या विधानास हेमचंद्राच्या अभिधानचिंतामणींतील व यादवप्रकाशप्रणीत वैजयंतींतील अनुक्रमें वात्स्यायनो मल्लनागः कौटिल्यश्चणकात्मजः । व वात्स्यानस्तु कौटिल्यो विष्णुगुप्तो वराणकः । या श्लोकाचा आधार दिला आहे. तसेंच भोजराजप्रणीत नाममालिकेमध्यें वात्स्यायन शब्दाच्या ऐवजीं कात्यायन शब्द आहेः कात्यायनस्तु कौटिल्यो विष्णुगुप्तो वराणकः । हा कात्यायन शब्द प्रत्यक्ष भोजानेंच घातला किंवा लेखकप्रमादानें पडला आहे व वात्स्यायन व कात्यायन व कौटिल्य हे सर्व एकच काय असे प्रश्न उत्पन्न होतात. जर भोजानेंच कात्यायन शब्द बरोबर घातला असेल तर वात्स्यायन व कौटिल्य भिन्न होत हें उघड होतें, परंतु जर वात्स्यायन पाठ बरोबर असेल, तर कौटिल्य हा नंदसमकालिक होता इत्यादि विष्णुपुराणादिकांत आढळणारीं वाक्यें निरर्थक ठरतील 'मौर्यचन्द्रगुप्तार्थे चाणक्योऽर्थशास्त्रं विरचयामास ' या दंडीच्या वाक्यावरून चाणक्याचा काल ख्रि. पू. चवथें शतक दर्शविला जातो. ' कर्तर्या कुन्तलश्शातकर्णिश्शातवाहनो महादेवीं मलयवतीं जघान ' या कामसूत्रांतील सूत्रावरून वात्स्यायनाचा काल ख्रि. श. १३० ते २०९ या सुमारास येतो. वात्स्यायन न्यायसूत्रभाष्यात अर्थशास्त्रांतील वाक्याचें अनुवादन करूनहि अर्थशास्त्र आपण रचलें असें कोठें म्हणत नाहीं. कामसूत्रामध्येंहि अर्थशास्त्रांतील वाक्यासारखीं वाक्यें पुष्कळ आढळतात. यशोधरानें कामसूत्रभाष्यात वात्स्यायनाचें मल्लनाग असें अपरनाम दिलें आहे; परंतु कौटिल्य वगैरे नामनिर्देश कोठेंच केला नाहीं; पण उलट ' कौटिल्येन अर्थशास्त्रे उक्तम् ' इत्यादि अर्थशास्त्र हें कौटिल्याचें आहे असें दाखविणारे उल्लेख अनेक ठिकाणीं केले आहेत व कांहीं वाक्यें अर्थशास्त्रातील उद्धृत केलीं आहेत. कौटिल्य पाणिनिव्याकरणानुगामी नाहीं; परंतु वात्स्यायन आहे यावरून तो उत्तरकालीन असावा. बृहज्जातकावरील व्याख्येंत ' विष्णुगुप्तेनापि चाणक्यापरनाम्ना ' असा उल्लेख आहे; परंतु ' विष्णुगुप्तचाणक्यावाहतुः—कस्यांहोति ' यावरून विष्णुगुप्त व चाणक्य हे दोन भिन्न होते असें सूचित होतें; परंतु ज्योतिर्विद् विष्णुगुप्त हा अर्थशास्त्रकार विष्णुगुप्ताहून भिन्न होता, हें बृहत्संहितेवरूनहि ( २०४ ) उघड होतें. नन्दिसूत्रकारालाहि कौटिलीय अर्थशास्त्र माहीत होतें. विष्णुगुप्ताच्या नीतिकथा कौटिल्याच्या पूर्वीपासून ख्रि. पू. पांचव्या किंवा सहाव्या शतकापासून प्रचारात होत्या व तो विष्णुगुप्त कौटिल्याहून निराळा होता, हे कौटिल्यानें त्या गोष्टींचा निर्देश करणारीं ' दीर्घ तृण '

'शीतशाटी' इत्यादि पदें वापरलीं आहेत, यावरून स्पष्ट होतें. तसेंच चाणक्यसूत्रें म्हणून ग्रंथाच्या शेवटीं सूत्रें चाणक्याचीं नसून त्याचा अर्थशास्त्राशीं कांहींहि संबंध नाहीं. [ शामशास्त्री दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना ]

कामंदकि किंवा कामंदक याचा "नीतिसार" [ राजेंद्रलाल मित्रांनीं बिब्लि. इं. मध्यें (१८४९-१८८४). गणपतिशास्त्री यांनीं शंकराचार्यभाष्यासह ट्रि.टी.एस्.एस्. १४ मध्यें (१९१२) हें प्रसिद्ध केलें. भाषांतर इंग्रजींत मन्मथनाथ दत्त यांनीं (वेल्थ ऑफ इंडिया, कलकत्ता. १८९६) व इटालियनमध्यें फॉर्मिची (जी.एस.ए.१ पु. १२-१७) यांनीं केलेलें आहे. ७ व्या सर्गाचें भाषांतर (इं. अँ. ५ १८७६, ११६, इ.) तालिब उल-इल्म यांनीं केलें आहे.] हा ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्रानंतरचा इतकेंच नव्हे तर जरा तो निराळ्या स्वरूपाचा आहे. हा संबंध पद्यमय असून, एखादें उपदेशपर काव्य व हस्तपुस्तक यांच्या मधलें कांहींतरी एक लिखाण, असें याला म्हणावें लागेल. कौटिलीयांतल्या प्रमाणें शास्त्राचा कोरडा स्वर यांत काढला नसून, याचा कांहीं भाग महाभारतादि महाकाव्यांत कोठेंकोठें आढळणाऱ्या ज्ञणज्ञणीत नीतिबोधाच्या स्वरूपाचा निःसंशय वाटतो. काव्यवाङ्मयाप्रमाणें याचे सर्ग (त्याबरोबरच प्रकरणें) पाडले आहेत व भाष्यकाराच्या मतें याचें स्वरूप एखाद्या महाकाव्याप्रमाणें आहे. [याकोबी एस्.बी. ए, १९१२, ८३६, पहा]. याच्या प्रास्ताविक श्लोकांत कर्ता विष्णुगुप्त याची, 'ज्यानें नंदांना रसातळास पोंचविलें, आपल्या कारस्थानाचा जोरावर चंद्रगुप्ताकरितां जग जिंकलें आणि अर्थशास्त्राच्या महोदधींतून नीतिशास्त्रामृत उध्दृत केलें' अशा शब्दांत मोठी प्रशंसा करून, आपण या आचार्याच्या शिकवणीला अनुसरून राजशास्त्रांत पारंगत असणाऱ्यांचीं वचनें संक्षिप्तरूपानें आतां मांडणार आहोंत असें आश्वासन देतो. दुसऱ्या एक ठिकाणी तो कौटिल्याला "गुरु" या शब्दानें संबोधितो पण या ठिकाणीं गुरु याचा अर्थ नेहमीं प्रमाणें "शिक्षक" असा नसून, ज्याचा ग्रंथ आपल्याला पुष्कळ अंशीं उपयोगी पडला असा मोठा "पंडित" या अर्थानें गौरवपर वापरला आहे. कारण, चंद्रगुप्ताचा मंत्रि व कामंदकीचें "नीतिसार" यामध्येंच केवळ नव्हे तर कौटिल्याचें म्हणून समजलें जाणारें "अर्थशास्त्र" आणि कामंदकीचें "नीतिसार" यांच्या कर्त्यांमध्येंहि बहुधा अनेक शतकांचा काल लोटला असला पाहिजे. तंत्राख्यायिकांत कौटिलीयाचा आधार घेतला आहे तर पंचतंत्रांतून नीतिसाराचा उल्लेख सांपडतो. [ हर्टेल झेड्.डी एम.जी. ६९, २९३, इ. ] हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. भवभूतीनें "मालतीमाधव" नाटकांत प्रेमाच्या व्यवहारांतली स्त्री-मुत्सद्दी व परिव्राजिका कामंदकी नावानें जी योजली ती मुद्दाम कामंदकीच्या या ग्रंथाची लोकांना आठवण देण्याकरितांच होय; कारण त्याच्या वेळीं हा ग्रंथ फार सुप्रसिद्ध तरी असला पाहिजे किंवा त्याचा कर्ता भवभूतीचा समकालीन असून त्याचा गौरव करण्याची नाटककाराची इच्छा असावी. वामन (सुमारें इ. स. ८००) ज्या एका श्लोकाचा [ काव्यालंकारवृत्ती ४, १, २. शिवाय पांडुरंग वा. काणे इं. अँ. पु. ४०, १९११, २३६ आणि जॉली झेड.डी.एम. जी. ३४८ इ. पाहा.] उतारा घेतो त्यात कामंदकि नीति" याचा उल्लेख आहे. ज्याअर्थी दंडीला अद्याप "नीतिसार" माहीत नव्हतें [दशकुमारचरिताच्या आरंभीं कामंदकीचा जो उल्लेख आहे त्यावरून कांहीं सिद्ध होत नाहीं; कारण तो उतारा मागाहून जोडलेल्या पूर्वपीठिकेंतील आहे. दंडी कौटिल्याला मान्य असणाऱ्या नीतिशास्त्रावर इतकें सविस्तर विवेचन करितो (दशकु. ८ वा उछ्वास) व शुक्र, विशालाक्ष इ. अर्थशास्त्रकाराचीं नावें घेतो पण कामंदकाचें नांवहि घेत नाहीं ही वस्तुस्थिति काय दर्शविते? दंडीला कामंदकि मुळींच माहीत नव्हता असें होत नाहीं का? त्या अर्थी आपणाला मोठ्या कसोशीनें या ग्रंथाची उत्पत्ति इ. स. ७०० आणि ७५० यामध्यें टाकिता येईल. बलिद्वीपातील कविवाङ्मयात "कामंदकि नीति" नावाचा एक ग्रंथ आहे (एस् आर् फ्रेडरिक, इंडि. स्ट.२. १३३, १४५. जे-आर्-ए-एस १८७६, १८८. ज्ञानकोश १. २१२.) तो हें विधान खोडू शकत नाहीं कारण जरी फा-हिआनला जावामध्यें इ. स. ४१३ त ब्राह्मण आढळले, तथापि कविवाङ्मयाचा सुवर्णकाळ इ. स. १० व्या शतकांत पडतो.) ई. कुहनचें "दक्षिण व पूर्व आसमंतातील प्रदेशांत आर्यभारताचें वर्चस्व" या नावाचें पुस्तक पहा (म्युनिच १९०३, पान १९)]. कालिदासाला कामंदकीचा हा ग्रंथ परिचित होता हें मुजुमदाराचें म्हणणें (इं. अँ. ४६ १९१७ पा. २२०), रघुवंश ४. ३५ आणि नीतिसार १०. ३५ याचीं तुलना करूनहि खरें धरता येत नाहीं.

नीतिसारातील विषय कौटिलीयांतील विषयांशीं कांहींसे जमतात. कौटिलीयांत बरींच मोठमोठीं प्रकरणें आहेत; उदा. राज्यव्यवहारासंबंधीं २, ३ रें व ४ थें; औपनिषदिक (१४ वें); आणि साधनावर शेवटचें. नीतिसारांत वरील प्रकरणाशीं जुळतें असें कांहीं नाहीं. शिवाय नीतिसारांत विशेष फरकहि दृष्टीस पडतात; व त्यावरून असें दिसतें कीं कौटिलीय अर्थशास्त्राव्यतिरिक्त इतर ग्रंथाचा कर्त्यानें उपयोग केला असला पाहिजे.

पहिल्या व दुसऱ्या सर्गांत इंद्रियनिग्रह व राजाला महत्त्वाचीं अशीं शास्त्रें कौटि. १. ६ आणि १. १ यांना जुळतीं दिलेलीं आहेत. पण "आन्वीक्षिकी" हें कामंदकीनें आत्मविज्ञानांत उल्लेखिलें आहे. [नीतिसार २. ७,. दहलमन-महाकाव्य व कायदेग्रंथ या दृष्टीनें महाभारताचा विचार पा. २२६ इ. याशीं तुलना करा.] तिसऱ्या सर्गांत चांगला राजा कसा असावा हें दर्शविणारें चुटके, धर्मशास्त्र व धम्मपद यांत आहेत तसे आढळतात. ४ था सर्ग राज्याचीं सात अंगें (कौटि. ६ यांतील प्रकृतीप्रमाणें) याचें विवरण देतो. राजसेवेसंबंधींचा पांचवा सर्ग (कौ. ५. ४, प्रमाणें) एकीकडे दरबारांतलोकांना कसें वागावें या विषयीं उपदेश व दुस-

रीकडे राजानें त्यांच्यांशीं कसें वर्तन ठेवावें याविषयीं नियम सांगतो या ठिकाणीं ग्रंथकर्ता, सरकारी खजिन्याच्या स्थितीकडे राजाचें लक्ष व आपल्या प्रजेच्या बाबतींत त्याची वागणूक या मुद्यावरहि बोलतो. (५. ८१–८३) हे श्लोक मननीय आहेत: पांच प्रकारचें संकट प्रजेवर ओढवणें शक्य असतें: प्रथम, अधिकाऱ्यांपासून, नंतर चोरांपासून व शत्रूंपासून, राजाच्या मर्जीतल्या माणसाकडून आणि शेवटीं राजाच्या लोभविकारामुळें. हें पांच प्रकारचें संकट राजानें दूर केल्यावर तो आपल्या आयुष्यांतील ध्येयांच्या सिद्धयर्थ कालांतरानें चांगलें फल भोगील. ज्याप्रमाणें गाय, तिची योग्यकाळीं निगा राखल्यास, आपलें दूध देते, आणि ज्याप्रमाणें वेल, पाणी घातल्यास, आपलीं फुलें पुढें करिते, त्याप्रमाणेंच प्रजेला नागवण्यापूर्वी तिला प्रथम सुरक्षित राहूं द्या.

राज्यद्रोह्यांना योग्य शिक्षा करणें व त्यांना निरुपद्रवी करून सोडणें यांबद्दलचा सहावा सर्ग कौटिलीयाच्या पांचव्या अधिकरणाशीं जुळतो: सातवा सर्ग ज्यांत राजसंरक्षणाचे नियम सांगितले आहेत, तो कौटि. १. १७ आणि २१. या वर हुकूम आहे. ८–११ सर्गांत (कौटि ६ ७ अधिकरणा प्रमाणें) बाह्यराजकारणाचा ऊहापोह केला आहे; व त्यांत निकटवर्ती शत्रु मित्रमंडळाचें वर्गीकरण व भेद काढ्याकूट करण्याप्रमाणें अत्यंत सूक्ष्म दाखविले आहेत. १२ व्या सर्गांत (कौटि. १ १५ प्रमाणें) मंत्रिमंडळें, १३ व्या सर्गांत (कौटि. १. १६ प्रमाणें) राजाचे वकील व परिशिष्टांत (कौटि १.११–१२ प्रमाणें) हेर यांसंबंधीं विवेचन आहे. हेर हा "राजाचा इतस्ततः भटकणारा डोळा" आहे सूक्ष्म काळी-प्रमाणें तो हेरामार्फत शत्रूंचीं कृत्यें अवलोकितो; "कारण डोळ्यांप्रमाणें ज्याचे हेर आहेत तो राजा निजलेला असतांनाहि जागा असतो" (१३. २८ इ) सर्ग १४ व १५ हे कौटि० ८ च्या अधिकरणाप्रमाणें राज्यांतील "वाईट गोष्टी" सांगतात. शेवटले सर्ग (१६–२०) लष्करी कारभाराविषयीं आहेत कामंदकि हा आपल्या गुरु (कौटिल्या) प्रमाणें जास्त बलिष्ठ शत्रूला जिंकण्याच्या युक्तिप्रयुक्तींवर विशेष मदार ठेवितो. उदा. तो म्हणतो (१९, ७१) "दृढ संकल्पानें अधर्मयुद्धांत त्याला शत्रूचा नाश केला पाहिजे; कारण कपटानें शत्रूला ठार करण्यानें त्याचा धार्मिक गुण कमी होत नाहीं. द्रोणपुत्रानें आपल्या चांगल्या परजलेल्या तरवारीनें निर्भयपणें निजलेल्या पांडवसैन्याचा रात्रीच्या वेळीं वध केला नाहीं कां?"

दहाव्या शतकापावेतों देखील काश्मीरांत कौटिलीय अर्थशास्त्राचें अध्ययन चालू होतें; हें सोमदेवसूरीच्या 'नीतिवाक्यामृत' [हें लिखाण थोड्या भाष्यासह ग्रंथरत्नमालेंत (मुंबई १८८७–१८८८) प्रसिद्ध झालें आहे. जॉलीचा रिपोर्ट झेड्‌डीएमजी ६९, ३६९ इ. यांत भागांत वऑरिया नीतिवाक्यामृतांतील अनेक उतारे देतो.] ग्रंथावरून दिसून येईल. सोमदेवसूरि हा जैन लेखक 'यशस्तिलकाचा' कर्ता म्हणून प्रसिद्ध आहे. [यशस्तिलक प्रस्तावनेंत स्वतःला "यशोधरमहाराजचरित" म्हणवितें व नीतिवाक्यामृताच्या पूर्वभागांत ग्रंथकार आपणाला यशोधरमहाराजचरित शास्त्राचा कर्ता म्हणवितो. तेव्हां हा त्याचा थार्थाचा ग्रंथ आहे] हें "नीतिवाक्यामृत" पुष्कळसें कौटिल्यावरून घेतलें असून पुष्कळ वेळां त्याच्यांशीं शब्दशः जुळतें; कधीं कधीं सोमदेव कौटिलियाचा अनुवाद करितो, तेव्हां हें कौटिलीयावर सोमदेवाचें भाष्य म्हणतां येईल तथापि हा ग्रंथ अगदीं भिन्न स्वरूपाचा आहे. कौटिलीय अर्थशास्त्रासारखा राजकारण व अर्थविनियम यांसंबंधींचा लहानसा व्यवहारोपयोगी हा ग्रंथ नसून राजांना उत्तम सूचना करणारा एक शैक्षणिक ग्रंथ म्हणतां येईल. सोमदेवाच्या नीतीच्या कल्पनेंत सद्वर्तन व मुत्सद्देगिरी हीं येतात व यामुळेंच हा ग्रंथ प्रारंभीं आचारशास्त्राच्या एखाद्या हस्तपुस्तकाप्रमाणें वाटतो व पुढें पुष्कळ प्रकरणांतून नीतीची छटा सरसहा आढळते ज्या ठिकाणीं नीतिवाक्यामृतांत कौटिलीयांतल्या प्रमाणेंच प्रकरणांच्या सारख्याच नांवासह एकच विषय आलेले आहेत तेथें सुद्धां राजाच्या वर्तनासंबंधीं सामान्य नियम देण्याकडे सोमदेवाचा कल दिसून येतो, तर इकडे कौटिल्य राजकारणांतल्या वहिवाटीचें बरोबर विस्तारानें वर्णन देतो. ज्या गोष्टी कौटिल्याला महत्वाच्या वाटतात त्यांकडे सोमदेव फारसें लक्ष देत नाहीं; उदाहरणार्थ, नीतिवाक्यामृतांत तटबंदी, खजीना व सैन्य यासंबंधीं प्रकरणें आहेत तरी कौटिलीयांतल्याप्रमाणें सर्व माहिती त्यांत मिळणार नाहीं. कलाव्यवहारात सुद्धां काहीं बाबतींत सोमदेव व कौटिल्य यांच्यांत भेद दिसून येतो. असें, न्यायाच्या बाबतींत धर्मशास्त्रांना अनुसरून पण कौटिलीयाच्या मताविरुद्ध तो दैवी निकालाची संपादणी करितो. वस्तुतः सोमदेव जैन आहे तरी ब्राह्मणी कायदे व विचार यांच्याशीं पूर्ण समरस आहे. विशेषतः जातिभेदाचा तो कट्टा अभिमानी आहे. कांहीं थोड्याच स्थळीं त्याचा जैनपंथ वर डोकें काढतांना दृष्टीस पडतो.

ग्रंथाची भाषा व रचना पाहतां नीतिवाक्यामृत हें कौटिलीय व नीतिसार यांहून निराळें दिसतें. हा ग्रंथ सर्वच गद्यांत व बहुतांशीं छोट्या पण अर्थपूर्ण वाक्यांत लिहिलेला आहे. तथापि या धाटणीचें सूत्रपद्धतीशीं साम्य मुळींच नाहीं. भाषा साधी व स्पष्ट आहे. म्हणी किंवा म्हणीच्या स्वरूपाचीं वाक्यें रचण्यांत सोमदेवाची आवड व्यक्त होते. ग्रंथाचें स्वरूप व अंतरंग उघडकीला आणण्यास कांहीं थोडे उतारे बस्स होतील. "जो आपल्या विश्वासू माणसाच्या बाबतींत इंद्राप्रमाणें, शत्रूंच्या बाबतींत यमाप्रमाणें वर्तन ठेवितो तोच राजा होय. कारण राजाचें कर्तव्य दुष्टांना दंड व सज्जनांचें रक्षण करण्याचें आहे, डोक्याचें मुंडण

किंवा केंसाचीं झुलपें ठेवण्याचें नव्हे " (पा. ९) " ज्यानें ज्ञानार्जन केलें नाहीं तो डोळे असून आधळा होय कारण अज्ञान्यापेक्षा जास्त खराब गुरु सापडणार नाहीं. मद्र राजा असण्यापेक्षा जग राजावाचून असलेलें पुरवलें " " प्रपंच साधण्याकरिता लोकायत हेंच सर्वोत्कृष्ट साधन आहे. कारण जो राजा लोकायतात पूर्ण अभ्यस्त आहे तो राज्यातले काटे उपटून काढण्याचा प्रयत्न करीत असतो जे केवळ संन्यासी असतात त्याचे वर्तन दोषापासून मुळींच अलिप्त नसतें ज्याला केवळ दयाच येते त्याला स्वत च्या ताब्यातील गोष्टीहि सभाळवणार नाहींत कारण आत्म्याच्या शांतीकरताच ज्याची सर्व धडपड आहे अशा मनुष्याचा कोण तिरस्कार करणार नाहीं? दुसऱ्याच्या बाबतींत आत्म्याची शांति राखणें हें संन्याशाला भूषणावह आहे, राजाला नाहीं ज्याला क्रोध व त्याचप्रमाणें स्नेह दाखविता येत नाहीं त्याचा धिक्कार असो! जो शत्रूशीं मोठ्या शौर्यानें लढत नाहीं तो जिवंत असूनहि मेलेला आहे "

धर्मशास्त्रग्रंथ व कौटिलीय यांप्रमाणेंच सोमदेव हा प्रत्येक जात व प्रत्येक जीवितावस्था याना स्वधर्म आवश्यक आहे असें प्रतिपादतो तरी कौटिल्यापेक्षा जरा जास्त शूद्राच्या धर्मावर जोर देतो, व सत्शूद्राची भावना बाळगतो हें विशेष आहे. पा. १४:– " दोषरहित आचरण, पावित्र्य, परिश्रम, आणि शारीरिक स्वच्छता हीं शुद्रानाहि देव, ब्राह्मण व संन्यासी यांच्या सेवेला योग्य बनवितात. धर्मबुद्धि, सत्यप्रीति, परद्रव्याचा अभिलाष न धरणें इंद्रिय निग्रह, वर्णाश्रम धर्मविरुद्ध लग्न न करणें, अगम्य मानलेल्या स्त्रियाशीं व्यभिचार न करणें, हें सर्व जातींचें सारखेंच कर्तव्य आहे. सूर्यदर्शनाप्रमाणें हें सर्वांना साधारण असेंच कर्तव्य आहे."

ज्या राष्ट्रात राजा नेहेमींच पैसे उभे करीत असतो त्या ठिकाणीं दु.ख अखंड राहातें. जर महासागरच मुळीं तहानेलेला आहे तर जगात पाणी कसें राहील ?

ज्याला आपल्या धन्यासाठीं राबावयाचें असतें अशा मंत्र्या संबंधीं आपणास पुढीलप्रमाणें वाक्यें आढळतात "धन्याची आज्ञा झाली कीं, कोंकरूंसुद्धा सिंह बनतें " कामगिरी करण्याची वेळ येऊन ठेपली असता मंत्र्याचा सल्ला घ्यावयास जाऊं नये. कारण घराला आग लागून गेल्यावर विहीर खणण्याचा काय उपयोग ?" सेवक निवडण्याच्या कामीं राजानें दक्षता बाळगली पाहिजे. " बुद्धि, चातुर्य किंवा पैसा खर्चण्याच्या किंवा लढाईच्या वेळीं जे मित्र असतात तेच खरीं उपयोगी माणसें होत. कारण मेजवानीच्या प्रसंगीं कोणकोणाचा मित्र होणार नाहीं? पुढील शहाणपणाचे शब्द सध्याच्या काळाकरिताच जणु काय लिहिलेले आहेत:—"तरवार हाच ज्याचा धंदा आहे त्यांना सल्लागार मंडळाचा धंदा माहीत असता कामा नये, म्हणजे सेनानी हे मंत्री नसावेत."

राजाच्या नित्य धर्मासंबंधींच्या प्रकरणात सभ्यता, नैतिक आचरण, धार्मिक मत, आहार व आरोग्य यावर बरेचसे नियम आहेत. खाण्यात नियमितपणा ठेवावा म्हणून विशेष जोरानें प्रतिपादलें आहे, कारण " जो नियमिताहारी तोच अधिक खातो. " यातील थोड्या जैन विचांपैकीं पुढील एक आहे. " सजीव प्राण्याच्या हत्येशीं ज्याचा संबंध पोंचतो असा कोणताहि खेळ त्यानें चालवूं नये "

जरी कौटिल्याच्या अर्थशास्त्राचा या ग्रंथात इतका उपयोग केला आहे तरी त्या ग्रंथाचा कोठेंहि उल्लेख नाहीं तथापि चाणक्याचा ज्यानें ' नंदाला मारण्यासाठीं एका हुशार दूता ' ची दुष्कर्माची योजना केली त्या मनुष्याचा उल्लेख आढळतो ( पा. ५२ ) " मित्रा " संबधींच्या प्रकरणात. ( पा ८६ इ. ), मनुष्य प्राण्यापेक्षा जनावरें मैत्रीला फार चांगलीं, असें सांगितलें आहे या विधानाला पुरावा म्हणून, भारतीय व जागतिक वाङ्मयांत सुप्रसिद्ध असणारें, कृतज्ञ जनावरें व कृतघ्न माणूस या संबंधीं उपाख्यान दिलें आहे:

" एके वेळीं एक माकड, एक साप, एक सिंह व एक अक्षशालिक एका अरण्यातील झाकलेल्या विहिरींत पडले. काकायन नावाच्या प्रवाशानें त्याना बाहेर काढलें. पण काकायनाला या अक्षशालिकाच्या मार्फतच मोठ्या शहरात मृत्यु आला "

दुसरा एक विशेष लक्षात घेण्यासारखा उल्लेख वर आहे. " जेव्हा न्यायमूर्ति व सल्लागार हे चुकीचा निकाल देतात तेव्हा खटला कसा जिंकावा? अनेक लोकानीं बोकड्याचा कुत्रा केला नाहीं ? हा संदर्भ पंचतंत्रातील ( तंत्राख्यायिक ३.५.) सर्व प्रसिद्ध असणाऱ्या गोष्टीचा आहे, एक ब्राह्मण यज्ञाकरिता बोकड नेत असतो काहीं मंडळींनीं त्याला तो बोकड नसून कुत्रा आहे असें भासविण्याचा उद्योग केला, शेवटीं ब्राह्मणास तें खरें वाटून त्यानें तो बोकड टाकून दिला तेव्हा या लबाडानीं तो मटकवला! शेवटीं जाता जाता भवभूतीच्या मालतीमाधवाचा यात केलेला गमतीदार उल्लेख पाहू. या युद्धात बहुधा शस्त्रास्त्रापेक्षा बुद्धिचातुर्य विशेष महत्त्वाचें असतें हें दाखविण्याकरिता सोमदेव म्हणतो ( पा. १२१ ). आपण असें ऐकतों कीं, माधवाच्या बापानें लावून सुद्धा कामंदकीची मदत घेऊन माधवाकरिता मालती मिळविली"

" लघु अर्हन्नीतिशास्त्र [ अमदाबादेस १९०६ त हा ग्रंथ टीकेसहित प्रसिद्ध झाला हर्टेल, तंत्राख्यायिक, भाषांतर १ १५७, १५९ पहा] जैनाकरिता राजकरणाचें छोटेंसें पुस्तक, आपणाला उपलब्ध आहे, तें विख्यात् असलेल्या हेमचंद्रानें लिहिलेलें आहे हेमचद्र जैनसाधु असून व्याकरण व शास्त्र याच्या क्षेत्रातून त्याची गाठ पडते. " बृहद्—अर्हन्नीतिशास्त्र " या मोठ्या प्राकृत ग्रंथातील हा एक भाग आहे. बृहद्—अर्हन्नीतिशास्त्र हेमचंद्रानें राजा

कुमारपाल याच्या इच्छेनुसार रचिला होता. पण तो सध्यां आपणाला उपलब्ध नाहीं. लघुअर्हन्नीतिशास्त्र श्लोकबद्ध असून त्यांत मधून मधून गद्य टीकादि आढळते. ग्रंथाचा बहुतेक भाग धर्मशास्त्रें विशेषतः मनुस्मृति यांच्या आधारें बनविलेल्या दिवाणी व फौजदारी कायद्यासंबंधीचा आहे.

राजाचे गुणधर्म, त्याच्या आचरणाविषयीं नियम, सप्त प्रकृति, राजकारणाचे सहा प्रकार, मंत्री सेनापती व इतर अधिकारी योकरितां नियम यांसारखे अर्थशास्त्रांतील नेहमीचे विषय एका लहानशा प्रकरणांत आटपले आहेत. दुसऱ्या प्रकरणाच्या आरंभीं नीतीचे तीन वर्ग पाडले आहेत. युद्ध, दंड व न्यायकारभार. युद्धावरील अध्यायात मात्र कोठें कोठें कर्त्याचा जैनभाव व्यक्त होतो. त्या ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, शत्रूला दूर सारण्याचे इतर सर्व उपाय थकल्याखेरीज युद्धाला पुढें होऊं नये. कारण, " लढाईंत जय हा अनिश्चित असतो पण मानवी जीविताचा नाश निश्चितच असतो. तेव्हां जर दुसरा कांहीं उपाय असेल तर राजानें लढाईचा प्रसंग आणूं नये. " [ २. १, १९. तसेंच पंचतंत्र ३, ३१४ आणि ४, १३ पाहा ] तथापि युद्ध करावें असें ठरल्यानंतर, युद्धांत जितकी कमी हानि होईल व तें जितक्या त्वराई युद्धानें तडीस नेतां येईल तितकें करण्याकडे लक्ष द्यावें " गुप्त किंवा विषारी अशा अति निर्घृण शस्त्रांनीं, किंवा अग्नींत टाकून तप्त केलेल्या शस्त्रांनीं किंवा दगड ढेकळांनीं त्यानें लढूं नये. एखादा यति, किंवा ब्राह्मण, किंवा शस्त्रें खालीं ठेवलेला भ्याड किंवा मृत्यूच्या दारांत बसलेला किंवा दुर्दैवानें पछाडलेला मनुष्य, किंवा एखादा षंढ, नग्न, शरणागत, अयोद्धा, सुप्त, रोगी, संरक्षणाची याचना करणारा, दांतीं तृण धरणारा, बाल, दीक्षार्थी, किंवा अतिथी यांनां त्यानें मारूं नये. " [ २ १, २७; ५९, ६१ इ. धर्मशास्त्रांतून अशाच तऱ्हेचे नियम सांपडतील ( आपस्तंब २. १०, ११; बौधायन १. १८, ११. गौतम १०. १८; मनु ७ ९०. पुढें; याज्ञवल्क्य १. ३२३, ३२५ ), तसेंच महाभारतांत ( १२. ९८४९ ) ].

दंडनीतीवरील अध्याय ( ३२ ) जैनस्थानांतील ( यांत दंडाचे सात प्रकार सांगितले आहेत, ) एका वचनापासून सुरू झालेला आहे. सर्वांत मोठें प्रकरण ( ३ रें ) न्यायव्यवहारासंबंधीं आहे. यांत मनुस्मृतींतल्याप्रमाणें न्यायाचीं १८ साधनें निरनिराळीं दाखविलीं आहेत. चौथ्या प्रकरणांत प्रायश्चित्तें असून, धर्मशास्त्रांतल्याप्रमाणेंच प्रायश्चित्ताचे ब्राह्मणी प्रकार उपदेशिले आहेत. फरक इतकाच कीं, प्रायश्चित्त म्हणून जिनोपासना सांगितली आहे. प्राचीन हिंदुस्थानांत राज्याची उभारणी नेहमीं ब्राह्मणी पायावर केलेली असे हें या भागावरून स्पष्टपणें निश्चित होतें. राज्यावर आपली छाप बसविण्याच्या वेळीं जैनांनीं ही गोष्ट ध्यानांत घेतली होती. या कारणामुळेंच हेमचंद्र जातिभेद पूर्णपणें मान्य करितो व कोणी किरात किंवा दुसरे हीन जातीचे लोक यांच्या घरीं जेवला तर त्याला प्रायश्चित्त सांगतो ( ४. ८. )

शुक्र किंवा उशनस् याची म्हणून समजली जाणारी, " शुक्रनीति " व महाभारत कथन करणारा वैशंपायन याच्या नांवावर पडलेली " नीतिप्रकाशिका " हे दोन ग्रंथ खरें बोलावयाचें म्हणजे अगदीं अर्वाचीन आहेत. यांचा प्रथम प्रकाशक गस्टाव्ह ऑप्पर्ट यानें, प्राचीन भारतीयांनी तोफा, बंदुका व दारू याची आधीपासूनच माहिती होती असें या लिखाणांवरून मार्गें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला होता. [ मद्रास जर्नल ऑफ लिटरेचर् अँड सायन्स पु. २. १८७९ व पु. ४ १८८१. शिवाय वर्जेस्. इं. अँ. पु. १२, १८८३ पा. ५० पाहा. ] शुक्रनीतीच्या ऑप्पर्टच्या प्रतीखेरीज ( मद्रास १८८२ ), एक जीवानंद विद्यासागरची [ कलकत्ता १८८२ (१ ली आवृत्ति) १७९० (२ री आवृत्ति) ] व बंगाली, मराठी, हिंदी भाषांतरासहित दुसऱ्या अनेक हिंदुस्थानांत प्रसिद्ध झालेल्या प्रती आहेत. बी. के. सरकारचीहि एक प्रत आहे ( न्यूयार्क, १९१५ ). बी. के. सरकारकृत " दि पॉझिटिव्ह बॅकग्राउंड ऑफ हिंदु सोशिऑलॉजी " ( १, २ अलहाबाद १९१४ व १९२१ ) यांची रचना शुक्रनीतीवरच केलेली आहे. शुक्रनीतींत प्राचीन अर्थशास्त्राचे अवशेष पाहाणें हें एक संशोधनकार्य आहे. नीतिप्रकाशिका ( ऑप्पर्ट प्रत, मद्रास १८८२ ) यांत युद्धकला प्रामुख्यानें आली आहे. भोजराजाचा " युक्तिकल्पतरू " आतां प्रसिद्ध झाला असून [ कलकत्ता ओरिएंटल सीरिज नं. १.-पंडित ईश्वरचंद्र शास्त्री १९१७.] त्यांत नीतियुक्ति, वास्तुयुक्ति, आसनयुक्ति, छत्र–ध्वज चामरयुक्ति, अलंकारयुक्ति, शस्त्रास्त्रयुक्ति, यात्रा–युक्ति, अश्व गज–वृष–मृगयुक्ति, व यानयुक्ति यासारखे उपयुक्त विषय आहेत. धर्मनिबंधाचा कर्ता चंडेश्वर यानेंहि एक " नीतिरत्नाकर " या नावाचें नीतिशास्त्र रचिलें आहे; त्यांत सबंध व्यवहाराचें क्षेत्र, लष्करी कारभार, मुलकी व्यवस्था वगैरेंचें विवेचन केलें आहे. [ हरप्रसाद रिपोर्ट १ पा. १२; आफ्रेस्ट, १७७. ] अर्थशास्त्रात विशिष्ट विषयावरील सर्व प्रकारचीं पुस्तकें येतात; उदा., अश्वपरीक्षा, गजपरीक्षा युद्धशास्त्र, वास्तुसौंदर्यशास्त्र, रत्नपरीक्षा, इ. विषयावरील ग्रंथ. प्रस्थानभेदांत मधुसूदनानें अर्थशास्त्राखालीं नीतिशास्त्र, अश्वशास्त्र शिल्पशास्त्र, सूपकारशास्त्र व चतुःषष्टि कलाशास्त्र हीं घातलीं आहेत. सूपशास्त्रात आहारासंबंधी विवेचन असल्यानें तें वैद्यकांतहि पडतें. ऋषि विश्वामित्राच्या चार ग्रंथात मधुसूदनाच्या मतें विवेचिलेला धनुर्वेद शस्त्रास्त्रें, युद्धाचें स्वरूप व योध्दयाचे गुणधर्म, एवढेंच नव्हे तर गुप्त अस्त्रें, मंत्रतंत्र, राज्याभिषेक आणि शकुन हे विषय देतो. धनुर्वेद या नावाखालीं असणारीं हस्तलिखितें सदाशिव, विक्रमादित्य व शार्ङ्गदत्त यांचीं म्हणून समजलीं जातात. [ बुहलर, रिपोर्ट,

कला धरिली आहे. बृहत्संहितेंत वराहमिहिराची या शास्त्रांत चांगली गति दिसून येते. बुद्धभट्टाचा " रत्नपरीक्षा," नारायण पंडिताचा " नवरत्नपरीक्षा व इतर उपलब्ध असलेले ग्रंथ कोणत्या काळचे आहेत, हें सांगता येत नाही. एल. फिनो यानें या सर्वांचे मूळ ग्रंथ भाषांतर व चर्चा ही सारी प्रसिद्ध केलीं आहेत (पॅरिस १८९६ ). हे ग्रंथ रत्नाचीं वर्णनें देऊनच रहात नाहींत, तर त्यांच्या उत्पत्तिकथा, रंग, तीं जेथें सांपडतात तीं स्थळें व त्यांच्या खरेखोटेपणाच्या खुणा सांगून शिवाय प्रत्येक रत्नाचें वजन, किंमत वगैरे देतात.

कलावाङ्मयांत चौर्यकला येते. मृच्छकटिक व महाभारत यांतून अशीं विधानें आहेत, इतकेंच नव्हे तर त्यावर एक ( हस्तलिखित ) ग्रंथ आपणाला आढळतो, त्याचें नांव " षण्मुखकल्प ". षण्मुख = कार्तिकेय हा चोरांचा देव समजला जातो. कौटिलीय अर्थशास्त्राच्या शेवटल्या प्रकरणांत असें राजकारणांत मंत्रतंत्र, भाद् केलेलीं पेयें यांचा समावेश होतो असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें षण्मुखकल्पाच्या मतेंहि हीं साधनें चौर्यकलेंत महत्त्वाचीं आहेत. [ हरप्रसाद, रिपोर्ट १, पा. ८ पाहा. ]

मराठेशाहींतील अर्थशास्त्रविषयक वाङ्मय.— मराठेशाहींत या विषयावर फारसें वाङ्मय उत्पन्न झालेलें दिसत नाहीं. नाहीं म्हणायास इ. स. १७१६ सालीं करवीरच्या संभाजी महाराजांनीं ' चिरंजीव राजश्री राजकुमार राजकार्यी सुशिक्षित व्हावे व परकड देशोदेशीं देशाधिकारी व पारपत्यगार यांनीं नीतीनें वर्तोन राज्यसंरक्षण करावें' यास्तव जें आज्ञापत्र काढून ' यथाशास्त्र राज्यनीति ' उपदेशिली तें विविधज्ञानविस्तार मासिकांत इ. स. १८९०-९१ सालीं प्रसिद्ध झालें आहे; व सवाई माधवरावासाठीं तयार करविलेलें तसेंच दुसरें एक चोपडें ताई साठे यांच्या दप्तरांतलें राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेलें उपलब्ध आहे. तथापि महालनिहाय जमाराचें कसा ठेवावा, त्याची कोणत्या प्रकारची असावी इत्यादि माहिती देणारे ओवीबद्ध, तसेंच गादीच्या रूपात असलेलें मेस्तकस्वरूपी वाङ्मय उपलब्ध असून तें जरी आज फारसी पेंद्यांतहि आढळतें तरी तें मूळ हेमाद्रीपासून चालत आलें आहे, असें सतराव्या शतकांतील एका ओवीबद्ध मेस्तकाच्या आवृत्तीवरून व्यक्त होतें. शिवाय मराठेशाहीच्या आर्थिक स्थितीच्या अभ्यासकास उपयोगी पडेल, असें बरेंचसें वाङ्मय सातारकर महाराज व पेशवे यांच्या रोजनिशींतील निवडक उताऱ्याचे जे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, त्यांत व इतरत्र पहावयास मिळतें, परंतु एक तर हें वाङ्मय मराठेशाहीच्या आर्थिक स्थितीचें सर्वांगपूर्ण चित्र रंगविण्यास अद्याप अपुरेंच आहे व दुसरें आहे त्याचाहि सांगोपांग अभ्यास करण्याचा पाव शतकापूर्वी कै महादेव गोविंद रानड्यांनी एक प्रयत्न केला त्यानंतर म्हणण्यासारखा कोणी प्रयत्न केलेला नाहीं.

अर्थशास्त्र संबंधीं कल्पना.—मराठेशाहींतील अर्थशास्त्रविषयक वाङ्मयाची उणीव संभाजीचें आज्ञापत्र या लहानशा चोपड्यानें थोडी तरी भरून काढता येण्यासारखी आहे. याच्याच साहाय्यानें अर्थशास्त्रीय व शासनशास्त्रीय कित्येक प्रश्नासंबंधीं मराठेशाहींतील मुत्सद्यांचें काय मत होतें याचा खुलासा होऊं शकतो. मराठेशाहींतील मुत्सद्यांची अर्थशास्त्रविषयीं काय कल्पना होती, हें सांगणें कठिण आहे. शासनसंस्थेची दौलत वाढविणें हें तत्कालीन इतर राज्याधिपतींप्रमाणें मराठ्यांचेंहि ध्येय उघड उघड दिसत होतें. संभाजीच्या आज्ञापत्रांत स्पष्टच म्हटलें आहे कीं, आयव्यय विचार पाहून जेणेंकरून दिवसेंदिवस राज्यांत खजीना होय तें करावें. मात्र त्याचें कारण असें दिलें आहे कीं, पडले प्रसंगीं खजीना असल्यानें सर्व संकटांचा परिहार केला जातो. तेव्हां प्रश्न एवढाच उरतो कीं, लोकांची उन्नति करून त्यांच्या नफ्यांतून कर घेण्याची मराठी मुत्सद्यांची प्रवृत्ति होती किंवा लोकांकडून शक्य तितका पैसा पिळून काढून स्वतःची भर करण्याकडे त्यांचा कल होता ? आपल्या प्रजेची उन्नति व्हावी अशीहि मराठी मुत्सद्यांची मनांतून तरी इच्छा असलीच पाहिजे कारण एखाद्या भागांत स्थायिक झाल्यावर त्या भागाचें उत्पन्न कोणत्याहि शासनसंस्थेला प्रजेच्या उन्नतीशिवाय कायमचें वाढवितां येणें शक्य नाहीं ही मूलभूत गोष्ट मराठी मुत्सद्यांच्या सहज लक्षांत येण्यासारखी होती, तथापि एवढें मात्र खरें कीं, कोणत्याहि कारणानें का होईना, मराठ्यांच्या हातून आपल्या प्रजेची उन्नति करण्याचे प्रयत्न व्हावे तसे झाले नाहींत.

शासनसंस्थेची वैश्य वृत्ति.—मराठी मुत्सद्यांच्या शासनविषयक दुसऱ्याहि कित्येक कल्पना या संभाजीच्या आज्ञापत्रांत प्रतिबिंबित झालेल्या आहेत. राजकर्त्यांनीं स्वतः धंदे करण्याच्या भानगडींत पडूं नये. हें तत्त्व मराठेशाहींत मुत्सद्यांसहि अवगत होतें असें दिसतें. संभाजीच्या आज्ञापत्रांत सांगितलें आहे कीं, राज्यकर्त्यानें, ' सकळ शिल्पाचे हुन्नर सकळहि अवश्यमेव अवगत करून ठेवावे, परंतु हे श्रमावर धंदे स्वांगें करीत न जावे' पण कारण काय तर यामुळें एखादा शरीरोपद्रव जाहल्यानें राजकार्यास अंतर पडतें ! वस्तुतः कर ऐन जिनस घेण्याच्या चालीमुळें मराठेशाहींत धान्य, कापडचोपड वगैरेंची सरकारी दुकानें राजरोसपणें चालविलेलीं दृष्टीस पडतात, हिऱ्यांच्या खाणी तर स्वतः सरकारच चालवीत होतें व घोडनदी, तुंगभद्रा यासारख्या मोठ्या नद्यांवर भाड्याच्या नावाहि सरकारकडून चालविल्या जात असलेल्या दृष्टीस पडतात.

सरंजामी पद्धत.—सैन्याच्या बाबतींत मराठ्यांना सर्वस्वी घातुक अशा सरंजामी पद्धतीचा स्वीकार करावा लागला; परंतु तिचे दोष मराठेशाहींतील मुत्सद्यास अवगत नव्हते असें नाहीं. या दोषाचें अंशतः परिमार्जन करण्या-

पा. ३६ हरप्रसाद, रिपोर्ट १ पा ९ ] शालिहोत्रऋषि अश्व शास्त्राचा उत्पादक असल्यानें या शास्त्राला अश्वशास्त्राखेराज शालिहोत्रशास्त्र असेंहि नाव आहे यात घोड्याच्या रोगा संबधीं माहिती असल्यानें याला अश्वचिकित्सा, अश्ववैद्यक किंवा अश्वायुर्वेद असेंहि म्हणतात. पण जयदत्ताचें "अश्ववैद्यक" व नकुलाचें "अश्वचिकित्सा" यासारख्या पुस्तकातून घोड्याना बरे करण्याची विद्या असून शिवाय त्यांचें संगोपन व शिक्षण यासबधीं विचार आढळतात. हे दोन्ही ग्रंथ उमेशचद्र गुप्त यानीं प्रसिद्ध केले आहेत, (बिब्लि इं १८८७) भोजराजाचा म्हणून एक "शालिहोत्र" ग्रथ आहे त्यातील १३८ श्लोकातून घोड्याची शुश्रुषा, याचे रोग यासारखी माहिती आहे [जॉली—म्यूनिच (१९१२)पा ६८ पाहा ] शारडधर पद्धतींत या ग्रथातील श्लोक उद्धृत केले आहेत (आफ्रेक्ट झेड्डीएमजी २७ पा ३०, ४३, ९२ पाहा. ) "पशुवैद्यक" या अर्थानें शालिहोत्रशास्त्राचा उपयोगहि कधीं कधीं केला जातो व त्याचे अश्वशास्त्र व गजशास्त्र असे दोन भाग पाडण्यांत येतात याचप्रमाणें गजशास्त्र, यात पालकाप्य ऋषीला प्रमाण भूत मानतात हें शास्त्र देखील पशुरोगनिवारणासबंधीं आहे असें बहुधा समजण्यात येतें पण यावरील श्रेष्ठ ग्रथातून हत्तींविषयीं सर्वसाधारण माहिती सविस्तर सापडते हस्त्यायुर्वेद [ए एन एस. एस नं. २६ मध्यें प्रसिद्ध झालेलें शिवाय जॉला मेडिसिन (ग्रुंड्रिस) पा. १४ पाहा ] नावाचा एक मोठा भारदस्त ग्रथ पुराणाच्या घाटणीप्रमाणें चपा नगरीचा राजा रोमपाद व मुनि पालकाप्य यामधील सवाद॰ रूपानें लिहिला आहे नीलकंठाच्या "मातगलीला" [टी एम एस. नं १० १९१० मध्यें प्रसिद्ध झालें ] या श्लोकबद्ध ग्रथात गजशास्त्र थोडक्यात वर्णिलें आहे. या ग्रथाचा काल अनिश्चित आहे. याच्या बारा लहान अध्या- यांतून हत्तीं व त्यांच्या शास्त्राचा उत्पादक पालकाप्य याची काल्पनिक उत्पत्ति, हत्तींचें आयुष्य, म्हातारपण व त्याचे चागले गुण, हत्तींना धरणें व शिकविणें इ विषय आलेले आहेत

शि ल्प शा स्त्र —म्हणजे साधारणपणें चित्रकलेची विद्या असा अर्थ जरी आहे तरा विशेषत॰ "वास्तुविद्या" या अर्थानें हा शब्द योजतात "शिल्पशास्त्र" व "वास्तुविद्या" या नावांचीं निरनिराळीं पुस्तकें आहेत पण त्यांचे कर्ते मात्र माहीत नाहींत [ गोल्डस्टकर-लिटररी रिमेन्स ",१,१९१ इ पाहा हा रामराजाच्या "ऑन दि आर्किटेक्चर ऑफ दि हिंदुज" लंडन १८३४ या ग्रंथातून उतारे घेतो "वास्तु- विद्या" हा शिल्पकलेवरील छदोबद्ध ग्रंथ टी एस एस न ३० १९१३ मध्ये प्रसिद्ध झाला आहे इ अँ. पु ५ १८७६ २३० यामध्यें बे एफ. कर्न शिल्पशास्त्रावरील सस्कृत भाषातरित तामिळ ग्रंथाविषयीं उल्लेख करितो ] "मानसार" नांवाचा शिल्पशास्त्रावर एक प्रमुख ग्रथ आहे, त्याचे ५८ अध्याय असून त्यांत मोजणी मापें, घरादेवळाची योजना, ग्राम व नगररचना, देवमूर्तिकर्म इ विषय आहेत.

या ठिकाणीं सगीतशास्त्राचा उल्लेख करणें अवश्य आहे मागें या शास्त्राचा नाट्यशास्त्राशीं संबंध जोडीत हें खरें आहे भारतीय-नाट्यशास्त्राच्या २८-३४ या अध्यायातून सगीताचा उहापोह केलेला आहे [आर सायमन झेड् डी एम जी ५, १९०२, १२९ गोल्डस्टकर, "लिटररी रिमेन्स "१,१८८ इ बर्नेल,तजावर, पा ५९ इ : एग्लिंग इडिया ऑफिस कॅट २, पा ३१५ इ ] तरी पुढील काळात निवळ संगीतशास्त्रावरील ग्रथ आपणाला आढळतात त्यात स्वर व त्यांचे प्रमाण, राग, गायनकला, वाद्य, नृत्य व नकला, नगारखाना, जलसे, सगीतशिक्षक, नर्तिका, गायक, इ यांना लागणारे गुण इत्यादि विषयावर प्रकरणें आहेत "सगीतरत्नाकर [चतुर कल्लिनाथाच्या टीकेसह एएन एस एस न ३५ मध्यें प्रसिद्ध झालेलें ] हा काश्मीरकडील सोठलाचा पुत्र निशक सारंगदेव यांचा ग्रथ भारतीय नाट्यशास्त्राच्या बऱ्याच मागाहूनचा असला तरी प्राचीनच आहे ग्रथाचा काल निश्चित करता येत नाहीं, पण याचा भाष्यकार कल्लिनाथ इ स. १४५० च्या सुमारास होऊन गेला हें आपणास माहीत आहे यानंतरचा म्हणजे ज्यात कल्लिनाथाचा निर्देश केला आहे, असा ग्रथ "सगीतदर्पण" [सायमन झेडडीएमजी ५६, १९०२,१२९ इ पहा. ] होय, याचा कर्ता लक्ष्मीधराचा पुत्र दामोदर असून त्यानें सगीतरत्नाकराचा नुसता उपयोग केला, इतकेंच नव्हे तर काहीं काहीं भाग त्यातून शब्दशः घतला ज्या ठिकाणीं त्याचा रत्नाकराशीं विरोध आला त्या ठिकाणीं त्यानें बहुश याहून जुने ग्रथ उपयोजिले म्हणूनच त्याच्या ग्रथाला महत्त्व आहे काहीं दुसरे स्वतत्र रागावर ग्रथ आहेत उदा सोमनाथाचा रागविबोध (१६०९) याच्या पाचव्या प्रकरणात सतारी वाजविण्याचे राग दिलेले आहेत एकंदर ५० निरनिराळ्या रागांचीं पदें यांत आहेत [सायमनचा एसबीए १९०३ पा. ४४७ इ पाहा ] विल्यम जोन्सनें आपल्या "ऑन म्यूझिकल मोड्स ऑफ दि हिंदुज" पु ३ या पुस्तकात याचा उपयोग केलेला असून त्याच्या मतें हा ग्रथ फार प्राचीन असावा पुरुषोत्तममिश्राचा "सगीतनारायण" व जगज्ज्योतिर्मल्लानें सगीतभास्कर नांवाची टीका ज्यावर रचिली तो "सगीतचद्र" नावाचा संगीत कलाकोश हे मागाहूनच्या ग्रथांतच समाविष्ट होतात.

रत्नशास्त्र किंवा रत्नपरीक्षा हें भारतांतील एक जुनें शास्त्र आहे दिव्यावदानांत व्यापाऱ्यांचीं मुलें अगोदरच हें शास्त्र शिकतात कामसूत्रांतील ६४ कलेंत रत्नपरीक्षा ही एक

कला धरिली आहे. बृहत्संहितेंत वराहमिहिराची या शास्त्रांत चांगली गति दिसून येते. बुद्धभट्टाचा " रत्नपरीक्षा," नारायण पंडिताचा " नवरत्नपरीक्षा व इतर उपलब्ध असलेले ग्रंथ कोणत्या काळचे आहेत, हें सांगता येत नाहीं. एल. फिनो यानें या सर्वांचे मूळ ग्रंथ भाषांतर व चर्चा ही सारीं प्रसिद्ध केलीं आहेत (पॅरिस १८९६ ). हे ग्रंथ रत्नांचीं वर्णनें देऊनच रहात नाहींत, तर त्यांच्या उत्पत्ति*कथा, रंग, तीं जेथें सापडतात तीं स्थळें व त्यांच्या खरेखोटे*पणाच्या गुणा सांगून शिवाय प्रत्येक रत्नाचें वजन, किंमत वगैरे देतात.

कलावाङ्मयांत चौर्यकला येते. मृच्छकटिक व महाभारत यांतून अशीं विधानें आहेत, इतकेंच नव्हे *तर त्यावर* एक ( हस्तलिखित ) *ग्रंथ आपणाला* आढळतो; त्याचें नाव " षण्मुखकल्प ". षण्मुख = कार्तिकेय हा चोरांचा देव समजला जातो. कौटिलीय अर्थशास्त्राच्या शेवटल्या प्रकरणात असें राजकारणात मंत्रतंत्र, जादू केलेली पेयें यांचा समावेश होतो असें म्हटलें आहे. *त्याचप्रमाणें षण्मुखकल्पाच्या मतेंहि हीं साधनें चौर्यकलेंत* महत्त्वाचीं आहेत. [ हरप्रसाद, रिपोर्ट १, पा. ८ पाहा. ]

म रा ठे शा हीं ती ल अ र्थ शा स्त्र वि ष य क वा ङ्म य.— मराठेशाहींत या विषयावर फारसें वाङ्मय उत्पन्न झालेलें दिसत नाहीं. नाहीं म्हणायास इ. स. १७१६ सालीं करवीरच्या संभाजी महाराजांनीं ' चिरंजीव राजश्री राजकुमार राज कार्यीं सुशिक्षित व्हावे व वरकड देशोदेशीं देशाधिकारी व *पारपत्यगार यानी नीतीनें वर्तोन राज्यसंरक्षण करावें' यास्तव* जें आज्ञापत्र काढून ' यथाशास्त्र राज्यनीति ' उपदेशिली तें विविधज्ञानविस्तार मासिकांत इ. स. १८९०–९१ सालीं प्रसिद्ध झालें आहे; व सवाई माधवरावासाठीं तयार करविलेलें तसेंच दुसरें एक चोपडें ताई साठे याच्या दप्तरातलें राजवाडे यानीं प्रसिद्ध केलेलें उपलब्ध आहे. तथापि *महालानिहाय* जमाखर्च कसा ठेवावा, त्यांतीं कोणत्या प्रकारचीं असावी इत्यादि माहिती देणारे ओवीबद्ध, तसेंच गादीच्या रूपात असलेलें मेस्तकस्वरूपी वाङ्मय उपलब्ध असून तें जरी आज फारसी पेहेरावांतहि आढळतें तरी तें मूळ हेमाद्रीपासून चालत आलें आहे, असें सतराव्या शतकातील एका ओवीबद्ध मेस्तकाच्या आवृत्तीवरून व्यक्त होतें. शिवाय *मराठेशाहीच्या आर्थिक स्थितीच्या अभ्यासकास उपयोगी* पडेल, असें बरेंचसें वाङ्मय सातारकर महाराज व पेशवे याच्या रोजनिशींतील निवडक उताऱ्याचे जे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, त्यात व इतरत्र पहावयास मिळतें; परंतु एक तर हें वाङ्मय मराठेशाहीच्या आर्थिक स्थितीचें सर्वांगपूर्ण चित्र रंगविण्यास अद्याप अपुरेंच आहे व दुसरें आहे त्याचाहि सांगोपांग अभ्यास करण्याचा पाव शतकापूर्वीं कै. *महादेव गोविंद रानड्यांनीं एक प्रयत्न केला त्यानंतर म्हण*ण्यासारखा कोणी प्रयत्न केलेला नाहीं.

*अ र्थ शा स्त्र सं बं धीं क ल्प ना.*—मराठेशाहींतील अर्थशास्त्रविषयक वाङ्मयाची उणीव संभाजीचें आज्ञापत्र या लहानशा चोपड्यानें थोडी तरी भरून काढता येण्यासारखी आहे. याच्याच साहाय्यानें अर्थशास्त्रीय व शासनशास्त्रीय कित्येक प्रश्नासंबंधीं मराठेशाहींतील मुत्सद्याचें काय मत होतें याचा खुलासा होऊं शकतो. मराठेशाहींतील 'मुत्सद्याची अर्थशास्त्रविषयीं काय कल्पना होती, हें सांगणें कठिण आहे. शासनसंस्थेची दौलत वाढविणें हें तत्कालीन इतर राज्याधिपतींप्रमाणें मराठ्यांचेंहि ध्येय उघड उघड दिसत होतें. संभाजीच्या आज्ञापत्रात स्पष्ट म्हटलें आहे कीं, आयव्यय विचार पाहून जेणेंकरून दिवसेंदिवस राज्यात खजीना होय तें करावें. मात्र त्याचें कारण असें दिलें आहे कीं, पडले प्रसंगीं खजीना असल्यानें सर्व संकटाचा परिहार केला जातो. तेव्हा प्रश्न एवढाच उरतो कीं, लोकाची उन्नति करून त्याच्या नफ्यातून कर घेण्याची मराठी मुत्सद्याची प्रवृत्ति होती किंवा लोकाकडून शक्य तितका पैसा पिळून काढून स्वतःची भर करण्याकडे त्याचा कल होता ? आपल्या प्रजेची *उन्नति व्हावी अशीहि मराठी मुत्सद्यानीं मनातून तरी इच्छा* असलीच पाहिजे. कारण एखाद्या भागात स्थायिक झाल्यावर त्या भागाचें उत्पन्न कोणत्याहि शासनसंस्थेला प्रजेच्या उन्नतीशिवाय कायमचें वाढविता येणें शक्य नाहीं ही मूलभूत गोष्ट मराठी मुत्सद्याच्या सहज लक्षात येण्यासारखी होती; तथापि एवढें मात्र खरें कीं, कोणत्याहि कारणानें का होईना, मराठ्याच्या हातून आपल्या प्रजेची उन्नति करण्याचे प्रयत्न *व्हावे तसे झाले नाहींत.*

शा स न सं स्था चीं वै श्य वृ त्ति.—मराठी मुत्सद्याच्या शासनविषयक दुसऱ्याहि कित्येक कल्पना या संभाजीच्या आज्ञापत्रात प्रतिबिंबित झालेल्या आहेत. राजकर्त्यांनीं स्वतः धंदे करण्याच्या भानगडींत पडूं नये. हें तत्त्व *मराठेशाहींत* मुत्सद्यासहि अवगत होतें असें दिसतें. *संभाजीच्या* आज्ञापत्रात सांगितलें आहे कीं, राज्यकर्त्यानें, ' सकळ शिल्पाचे हुन्नर सकळहि अवश्यमेव अवगत करून ठेवावे; परंतु हे श्रमावर धंदे स्वागें करीत न जावे' पण कारण काय तर यामुळें एखादा शरीरोपद्रव जाहल्यानें राजकार्यास अंतर पडतें ) वस्तुतः कर ऐन जिन्नस घेण्याच्या चालीमुळें मराठेशाहींत धान्य, कापडचोपड वगैरेंची *सरकारी दुकानें गवरोसपणें* चालविलेलीं दृष्टीस पडतात, हिऱ्यांच्या खाणी तर स्वतः सरकारच चालवीत होतें व घोडनदी, तुंगभद्रा यासारख्या *मोठ्या नद्यांवर* आख्याच्या नावाहि सरकारकडून चालविल्या जात असलेल्या दृष्टीस पडतात.

स रं जा मी प द्ध त.—सैन्याच्या बाबतींत मराठ्यानां सर्वस्वीं घातुक अशा सरंजामी पद्धतीचा स्वीकार करावा लागला; परंतु तिचे दोष मराठेशाहींतील मुत्सद्यास अवगत नव्हते असें नाहीं. या दोषाचें अंशतः परिमार्जन करण्या-

शिष्ट राहिलें इतकेंच नव्हे तर नवीन मुलूख पादाक्रांत करण्याच्या कामीं देखील या किल्ल्यांचे महत्त्व वाटत होतें. संभाजीचें आज्ञापत्र म्हणतें कीं ज्या देशात गडकोट नसतील त्या देशात आपल्या राज्याच्या सरहद्दीपासून पुढें जबरदस्तीनें नूतन स्थळें बांधीत बांधीत तो देश आक्रमावा, त्या स्थळाच्या आश्रयीं सैना ठेवून पुढील देश स्वशासनें वश करावा असें करीत करीत राज्य वाढवावें गडकोटाचा आश्रय नसता फौजेच्यानें परमुलुखीं टिकाव धरून राहवत नाहीं.

समुद्रावरील व्यापार—मागें उल्लेखिलेल्या पत्रात मालेट यानें मराठ्याच्या व्यापारविषयक आकुंचित धोरणाची जी तक्रार केली आहे ती विशेषतः मलबार किनाऱ्यावरील बंदराना अनुलक्षून आहे तो म्हणतो माझी खात्री आहे कीं, जर मराठ्याच्या अंगीं सामर्थ्य असतें तर त्यानीं जमिनीवरच्याप्रमाणें समुद्रावरहि लुटालूट करण्यास कमी केलें नसतें. त्याना एवढेंसुद्धा कळत नाहीं कीं, बंदरामध्यें जहाजाची चागली वर्दळ असली तर किनाऱ्यावरील प्रदेशांतील लोकसंख्या वाढून फायदे होतात तें जरी बाजूस ठेविलें तरी नुसत्या जकातीपासूनच लुटालुटीपेक्षा कित्ती तरी अधिक उत्पन्न मिळविता येईल. मालेटनें ज्या भागातील बंदरासंबंधानें ही तक्रार केली आहे त्याच भागात करवीरकराचें राज्य होतें, व तेथील राज्यकर्त्यांचें एतद्विषयक धोरण आज्ञापत्रातील आरमारसंबंधी प्रकरणात जें व्यक्त झालें आहे त्यावरून या गोष्टी मराठी मुत्सद्यास कळत होत्या किंवा नव्हत्या हें स्पष्ट दिसून येईल आरमारास तनखा मुलखातून नेमून द्यावा, पैदास्तीवरील नेमणुकीमुळें सावकारास उपद्रव होऊन सावकारी बुडेल, बंदरें राहिलीं पाहिजेत, प्रायोजनिक वस्तु परस्थळींतून आणावी तेव्हा येते, या वाक्यावरून जलमार्गानें होणाऱ्या व्यापाराचें संरक्षण करणें मराठी मुत्सद्यास आवश्यक वाटत होतें हें दिसून येतें. 'सावकारीमुळें जकातीचेंच हासील होईल' हें ते पूर्णपणें जाणून होते. ही साहुकारी वाढविण्याकरिता काय उपाय योजिले पाहिजेत त्याचेंहि दिग्दर्शन या आज्ञापत्रात केलेलें आहे. "गलिमाचे मुलखाखेरीज विदेशींचे गैरकौली असे सावकाराचीं तरांडीं येता जाता असलीं तरी तीं परभारें जाऊं न द्यावीं, नयें भयें हाताखालीं घालून त्याचे दसोडीस हात न लाविता दिकसा करून बंदरात घेऊन यावें, लाकडें पाणी घेतील तें घेऊं द्यावें, नारळाची शाळी आदि करून जो त्यास विसम पाहिजे असेल तो त्यास विकत अनुकूल करून द्यावा. या विरहित आणखी खरेदी व फोक्त आत्मसंतोष करितील तो अल्पस्वल्प जकात घेऊन सुखरूप करून द्यावा' येणेंप्रमाणें चुचकारून, गोंजारून, परकी जहाजें आपल्या बंदरात आणूं इच्छिणाऱ्या मराठी मुत्सद्यानीं सामर्थ्य असतें तर व्यापारी जहाजें लुटून खजीना भरला असता हें संभवनीय दिसत नाहीं. उलटपक्षीं असें म्हणता येईल कीं, मराठ्यास टोपीकरास पूर्णपणें दाबात ठेवण्याचें आपल्या अंगी सामर्थ्य नाहीं ही जाणीव होती म्हणूनच ते आपलीं बंदरें राजरोसपणें एकूण एक व्यापारी जहाजास खुलीं ठेवण्यास निचकत होते नाहीं तर त्यानीं आपल्या बंदरांत खुला व्यापार ठेवून जकातीचें उत्पन्न खात्रीनें वाढवून घेतलें असतें

पेशवाईतील कर्ज—राष्ट्राच्या प्रगतीस चालना देणारा शासनसंस्थाशीं संबद्ध असा अर्थशास्त्रविषयक महत्त्वाचा प्रश्न म्हटला म्हणजे राष्ट्रीय कर्जाचा होय ज्याला राष्ट्रीय कर्ज नाहीं असें आज एकहि सुधारलेलें राष्ट्र आढळून येणार नाहीं. परंतु मराठेशाहींत राष्ट्रीय कर्जाची कल्पना आपणास केवळ अभावरूपानेंच दृग्गोचर होते शिवाजीपासून शाहूच्या कारकीर्दीच्या पूर्वार्धापर्यंत मराठ्यांचें राष्ट्र सामान्यतः निर्मितीच्या अवस्थेंतच मोडलें जात असल्यामुळें त्या वेळीं राष्ट्रीय कर्जाचा प्रश्न शक्यच नव्हता मराठेशाहीस स्थिरता स्थूलमानानें बाळाजी विश्वनाथाच्या कारकीर्दीच्या अखेरी अखेरीस आली असें म्हणता येईल, व म्हणून त्या नंतरच्या काळातच मराठेशाहीच्या शासनसंस्थेच्या सूत्रधाराना आपल्या प्रजेपासून कर्ज मागण्याइतका आत्मविश्वास उत्पन्न झालेला आपल्या दृष्टीस पडतो तथापि मराठेशाहींतील मुत्सद्यानां आपल्या उत्तर हिंदुस्थानातील मोहिमासाठीं कर्ज उभें करणें किती जड जात होतें हें महशूरच आहे पहिल्या बाजीरावासारखा कर्तृत्ववाली पुढारीहि या गोष्टीस अपवाद नव्हता. सरकारला कर्ज उभारण्यास अशी अडचण पडण्याचें कारण राष्ट्रीय कर्जाच्या मुळाशीं असलेली राष्ट्रीय पतीची कल्पना मराठेशाहींत मुळीं अस्तित्वातच नव्हती मराठेशाहींतील मुत्सद्याना सावकारापासून कर्ज काढण्याचे अनेक वेळा प्रसंग पडले, व त्या त्या वेळीं त्यानीं रडतखडत कसें तरी कामापुरतें कर्ज मिळविलेंहि. परंतु हें कर्ज त्याना राष्ट्रीय पतीवर मिळत नसून वैयक्तिक पतीवर मिळत होतें, व ही वैयक्तिक पतहि किती होती याबद्दल या कर्जावरील जबर व्याज पाहिलें म्हणजे व खुद्द पेशव्याच्या दारींहि सावकार धरणें धरून बसल्याचीं उदाहरणें आपल्या नजरेस पडतात ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे शंका येऊं लागते. शाहूच्या रोजनिशींत असा उल्लेख आहे कीं, शिद्यावरील स्वारीस बाजीराव गेला तेव्हां स्वारीखर्चास काढलेल्या रकमेवर दरमहा दर शेंकडा तीन रुपये प्रमाणें व्याज ठरवून शिवाय मुदतींत पैसे परत न आल्यास वसूलीकरिता कमाविसी कबूल केली होती! पहिल्या बाजीरावास या सावकाराच्या त्रासामुळें आपला जीवदेखील कसा नकोसा झाला होता हें त्यानें ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेल्या पत्रावरून चागलें दृग्गोचर होतें इ. स १७४० व १७६० याच्या दरम्यान बाळाजी बाजीरावानें उभारलेल्या कर्जाची एकूण बेरीज दीड कोटीच्या जवळजवळ होती. या कर्जावर त्याला दरसाल दरशेंकडा सरासरी १२ पासून १८ टक्केपर्यंत व्याज सरकारच्या खजिन्यातून भरावें लागत होतें तथापि त्याच्याहि कारकीर्दींत काहीं काहीं रकमावर दरमहा दरशेंकडा २॥

करिताच हुजुरातीची आवश्यकता भासूं लागली. संभाजीचें आज्ञापत्र म्हणतें: "ज्याचे पदरीं हुजरात बळकट नाहीं, ते सत्ता पराधीन. त्याच्यानें कोणा एका कार्याचा स्वतः अंगीज करवत नाहीं. त्यामुळें केवळ सेवकाधीन होऊन रहावें. ते म्हणतील तें उगेंच ऐकावें न ऐकावें तर कार्यभागी लोक व सरदार यामुळें कार्यांत मनःपूर्वक प्रवर्तत नाहींत, तेणेंकरून कार्यनाश होतो."

प्र धा न प द.—मराठेशाहींत प्रधान हा राजाशिवाय इतर कोणास जबाबदार असल्याची कल्पना अस्तित्वात असणें शक्यच नाहीं प्रधानाचें राजाशीं काय नातें असतें, याचें वर्णन उपर्युक्त आज्ञापत्रात थोडक्या पण मार्मिक शब्दांत दिलें आहे तें म्हणतें: 'प्रधान म्हणजे राजमदजनित अन्यायसागराची मर्यादा. प्रधान म्हणजे हस्तीचें अंकुश.'

व्या पा र वा ढी स उ त्ते ज न.—राज्यांतील व्यापार वाढला म्हणजे राज्य श्रीमंत होतें, ही साधी गोष्ट मराठेशाहींतील मुत्सद्दी पूर्णपणें जाणून होते शिवाय पडले संकटप्रसंगीं राज्यांतील या साहुकारापासून पाहिजे तें कर्जवाम मिळे हा त्याना दुसरा मोठा फायदा होता. यासाठीं संभाजीचें आज्ञापत्र म्हणतें कीं, पेठापेठात दुकान वखारा घालून हत्ती, घोडे, जरमिना, जरवाब, पशमी आदिकरून वस्त्रजात रत्नें शस्त्रें आदिकरून अवशेष वस्तुजात याचा उदीम चालवावा व परमुलखीं जे साहुकार असतील त्यांचीं समाधानें करून आणावे. इतकेंच नव्हे तर दर्यावर्दी साहुकार यासहि बंदरोबंदरीं कौल पाठवून आमदरफ्ती करावी असें सांगितलें आहे. व्यापारवृद्धीसंबंधानें मराठी मुत्सद्यांचें धोरण अशा प्रकारचें असतांनी इंग्रजांना मराठी राज्यांत आपला व्यापार वाढवितां आला नाहीं, याचें कारण पुष्कळ अंशीं इंग्रज वगैरे लोकाविषयीं मराठी मुत्सद्यांची साशंकवृत्ति हें होय संभाजीच्या आज्ञापत्रांत असें स्पष्ट सांगितलें आहे कीं 'साहुकारामध्यें फिरंगी व इंग्रज व वलंदेज व फरासिस व डिंगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करितात, परंतु ते परकड सावकारांसारखे नव्हेत. टोपीकरांस या प्रांतीं प्रवेश कराना, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावी हा पूर्णाभिमान तदनुरूप स्थळोस्थळीं कृतकार्यहि झाले आहेत त्यास ही हट्टीजात हातास आलें स्थळ मेल्यानेंहि सोडावयाचे नव्हेत यांची आमदरफ्ती आले गेले इतकीच असों द्यावी." इंग्रज वगैरे यूरोपीय व्यापाऱ्यांशीं कसें वागावयाचें, त्याविषयीं मराठी मुत्सद्यांचें धोरण या आज्ञापत्रात चांगलें आलेखित झालें आहे. 'कदाचित वखारीस जागा देणें झालियाही तिचे मोबारी समुद्रतीरीं न द्यावी... ... जागा द्यावी तरी लोक खाडी नाव दोन नावें राजापुरासारखी असेल तेथें फरातीसास जागा दिला होता त्या न्यायें दोन चार नामांकित थोर शहरें असतील त्यामध्यें जागा द्यावा. तो असा की नीच जागा शहराचे अथारीं शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारा घालाव्या त्यासहि इमारतीचें घर बांधों देऊं नये." इ. स. १७८८ सालीं गव्हर्नर जनरलास लिहिलेल्या पत्रात सर चार्लस मालेट हा मराठ्यांचें धोरण व्यापारवाढीस प्रतिकूल आहे अशी जी तक्रार करताना दिसतो त्याचें कारण मराठी मुत्सद्द्यांची उपर्युक्त साशंकवृत्तीच होय. या साशंकवृत्तीची जाणीव स्वतः मालेट यासहि नव्हती असें नाहीं. उपर्युक्त पत्र लिहिण्याच्या वेळीं पुणें येथें बऱ्याच नवीन इमारती बांधल्या जात असल्यामुळें इंग्रजाना पुण्यात आपला माल खपविण्यास ही चांगली संधी होती तथापि तो खपविण्यासाठीं कांहीं विशेष उपाय अंमलात आणण्याचा प्रयत्न केल्यास मराठ्यांची मत्सरबुद्धी जागृत होण्याचा संभव आहे म्हणून तसें कांहीं तूर्त करूं नये अशी स्वतः मालेटनेंच प्रस्तुत पत्रात आपल्या वरिष्ठास शिफारस केलेली आहे

व त न दा रां शीं वा ग ण्या चें धो र ण.—सरंजामदाराप्रमाणेंच देशमुख देशकुलकर्णी, पाटील आदिकरून वतनदाराचा प्रश्नहि मराठेशाहींतील मुत्सद्द्यास मोठा बिकट वाटत होता असें दिसतें राजाशीं राजनिष्ठेनें वतावें ही त्याची बुद्ध नव्हती हें ते जाणून होते. जब जब नूतन सपादावें व बळकट झालें म्हणजे एकाचे घ्यावें, दावे दरवडे करावे हा त्याचा सहज स्वभाव; परचक्र आलें म्हणजे वतनाच्या आशेनें हे अगोदर सलूख करितात ही गोष्ट त्याना उघड उघड दिसत होती. तथापि त्यांचीं वतनें बुडविलीं असतीं तर तोहि परम अन्याय झाला असता म्हणून आहे तें वतन चालवून प्रजेवर त्याची सत्ता असूं यावी हेंच धोरण मराठी मुत्सद्द्यास स्वीकारणें प्राप्त झालें.

इ ना में दे ण्या सं बं धीं धो र ण.—कोणी कांहीं नाव घेण्यासारखें राजकार्य केलें असता त्यास वृत्ति करून देण्याची चाल पेशवाईंत बरीच रूढ झाली होती. हा उदारपणा म्हणा किंवा अदूरदर्शीपणा म्हणा वाढ खुंटलेल्या करवीरच्या राज्यातील मुत्सद्द्यास अर्थातच खपण्यासारखा नव्हता. अगोदरच करून दिल्या गेलेल्या वृत्तींचा अपहार करण्याची क्षुद्रबुद्धि धरूं नये ही गोष्ट त्यास मान्य होती; पण सेवकलोकीं सेवा उदंड केली तरी त्यास द्रव्य, अश्व, गज, वस्त्रभूषणादि द्यावीं, योग्य पाहोन थोर सेवा सांगावी, परंतु नूतन वृत्ति करून देऊं नये असें त्याचें मत होतें. का कीं दिवाणमहसुलांत वृत्ति करून दिली तर तितका महसूल वंशपरंपरेनें न्यून होतो, शिवाय त्याचे वंशजांनीं त्या मागें हराम खोरीची नजर धरली तरी त्योंत्र त्याच वृत्तीचें बल होणार.

कि ल्ल्या च्या म ह त्त्वा ची क ल्प ना —लढण्याच्या कामीं तोफखान्याचा उपयोग होऊं लागल्यापासून गडकोटांचें महत्त्व कांहींच राहिलें नाहीं. तथापि गडकोट म्हणजे राज्याचें मूळ वाटत होते. कारण मराठ्यांनी ही गोष्ट स्वानुभवानें पक्की चुकली होती कीं, औरंगजेबाची दक्षिणेंत स्वारी झाली तेव्हा राज्यात किल्ले होते म्हणूनच राज्य अव-

शिष्ट राहिलें इतकेंच नव्हे तर नवीन मुलूख पादाक्रांत करण्याच्या कामीं देखील या किल्ल्यांचें महत्त्व वाटत होतें. संभाजीचें आज्ञापत्र म्हणतें कीं ज्या देशांत गडकोट नसतील त्या देशांत आपल्या राज्याच्या सरहद्दीपासून पुढें जबरदस्तीनें नूतन स्थळें बांधीत बांधीत तो देश आक्रमावा, त्या स्थळांच्या आश्रयीं सेना ठेवून पुढील देश स्वशासनें वश करावा. असें करीत करीत राज्य वाढवावें. गडकोटाचा आश्रय नसतां फौजेच्यानें परमुलुखीं टिकाव धरून राहवत नाहीं.

समुद्रावरील व्यापार.—मागें उल्लेखिलेल्या पत्रांत मालेट यानें मराठ्यांच्या व्यापारविषयक आकुंचित धोरणाची जी तक्रार केली आहे ती विशेषतः मलबार किनाऱ्यावरील बंदरांना अनुलक्षून आहे. तो म्हणतो माझी खात्री आहे कीं, जर मराठ्यांच्या अंगीं सामर्थ्य असतें तर त्यांनीं जमिनीवरच्याप्रमाणें समुद्रावरहि लुटालूट करण्यास कमी केलें नसतें. त्यांना एवढेंसुद्धां कळत नाहीं कीं, बंदरामध्यें जहाजांची चांगली वर्दळ असली तर किनाऱ्यावरील प्रदेशांतील लोकसंख्या वाढून फायदे होतात ते जरी बाजूस ठेविले तरी नुसत्या जकातीपासूनच लुटालुटीपेक्षां किती तरी अधिक उत्पन्न मिळवितां येईल. मालेटनें ज्या भागांतील बंदरांसंबंधानें ही तक्रार केली आहे त्याच भागांत करवीरकराचें राज्य होतें, व तेथील राज्यकर्त्यांचें एतद्विषयक धोरण आज्ञापत्रांतील आरमारसंबंधीं प्रकरणांत जें व्यक्त झालें आहे त्यावरून या गोष्टी मराठी मुत्सद्द्यास कळत होत्या किंवा नव्हत्या हें स्पष्ट दिसून येईल. आरमारास तनखा मुलखातून नेमून द्यावा, पैदास्तीवरील नेमणुकीमुळें सावकारास उपद्रव होऊन सावकारी बुडेल, बंदरें राहिलीं पाहिजेत, प्रायो अनेक वस्तु परस्थळींतून आणावी तेव्हां येते, या वाक्यावरून जलमार्गानें होणाऱ्या व्यापाराचें संरक्षण करणें मराठी मुत्सद्द्यास आवश्यक वाटत होतें हें दिसून येतें. 'सावकारीमुळें जकातीचेंच हांशील होईल' हें ते पूर्णपणें जाणून होते. ही साहुकारी वाढविण्याकरितां काय उपाय योजिले पाहिजेत त्याचेंहि दिग्दर्शन या आज्ञापत्रांत केलेलें आहे. "गलिमाचे मुलखाखेरीज विदेशींचे गैरकौली असे सावकारांचीं तरांडीं येतां जातां असलीं तरी तीं परभारें जाऊं न द्यावीं; नयें भयें हाताखालीं घालून त्याचे दसोडीस हात न लावितां दिकसा करून बंदरांत घेऊन यावें, लाकडें पाणी घेतील तें घेऊं द्यावें; नारळाची शाळी आदि करून जो त्यास विश्राम पाहिजे असेल तो त्यास विकत अनुकूल करून द्यावा. या विरहित आणखी खरेदी व फोफ आत्मसंतोष करितील तो अल्पस्वल्प जकात घेऊन सुखरूप करून द्यावा' येणेंप्रमाणें चुचकारून, गोंजारून, परकी जहाजें आपल्या बंदरांत आणूं इच्छिणाऱ्या मराठी मुत्सद्द्यांनीं सामर्थ्य असतें तर व्यापारी जहाजें लुटून खजीना भरला असता हें संभवनीय दिसत नाहीं. उलटपक्षीं असें म्हणतां येईल कीं, मराठ्यास टोपीकरास पूर्णपणें दाबांत ठेवण्याचें आपल्या अंगी सामर्थ्य नाहीं ही जाणीव होती म्हणूनच ते आपली बंदरें राजरोसपणें एकूण एक व्यापारी जहाजास खुलीं ठेवण्यास विचकत होते नाहीं तर त्यांनीं आपल्या बंदरांत खुला व्यापार ठेवून जकातीचें उत्पन्न रात्रंदिन वाढवून घेतलें असतें.

पेशवाईंतील कर्ज.—राष्ट्राच्या प्रगतीस चालना देणारा शासनसंस्थाशीं संबद्ध असा अर्थशास्त्रविषयक महत्त्वाचा प्रश्न म्हटला म्हणजे राष्ट्रीय कर्जाचा होय. ज्याला राष्ट्रीय कर्ज नाहीं असें आज एकहि सुधारलेलें राष्ट्र आढळून येणार नाहीं. परंतु मराठेशाहींत राष्ट्रीय कर्जाची कल्पना आपणास केवळ अभावरूपानेंच दृग्गोचर होते. शिवाजीपासून शाहूच्या कारकीर्दीच्या पूर्वार्धापर्यंत मराठ्यांचें राष्ट्र सामान्यतः निर्मितीच्या अवस्थेंतच मोडलें जात असल्यामुळें त्या वेळीं राष्ट्रीय कर्जाचा प्रश्न शक्यच नव्हता. मराठेशाहीस स्थिरता स्थूलमानानें बाळाजी विश्वनाथाच्या कारकीर्दीच्या अखेरीं अखेरीस आली असें म्हणतां येईल, व म्हणून त्या नंतरच्या काळांतच मराठेशाहीच्या शासनसंस्थेच्या सूत्रधारास आपल्या प्रजेपासून कर्ज मागण्याइतका आत्मविश्वास उत्पन्न झालेला आपल्या दृष्टीस पडतो. तथापि मराठेशाहींतील मुत्सद्द्यांना आपल्या उत्तर हिंदुस्थानांतील मोहिमासाठीं कर्ज उभें करणें किती जड जात होतें हें महशूरच आहे. पहिल्या बाजीरावासारखा कर्तृत्ववान् पुढारीहि या गोष्टीस अपवाद नव्हता. सरकारला कर्ज उभारण्यास अशी अडचण पडण्याचें कारण राष्ट्रीय कर्जाच्या मुळाशीं असलेली राष्ट्रीय पतीची कल्पना मराठेशाहींत मुळीं अस्तित्वातच नव्हती. मराठेशाहींतील मुत्सद्द्यांना सावकारापासून कर्ज काढण्याचे अनेक वेळा प्रसंग पडले, व त्या त्या वेळीं त्यांनीं रडतखडत कसें तरी कामापुरतें कर्ज मिळविलेंहि. परंतु हें कर्ज त्यांना राष्ट्रीय पतीवर मिळत नसून वैयक्तिक पतीवर मिळत होतें, व ही वैयक्तिक पतहि किती होती याबद्दल या कर्जावरील जबर व्याज पाहिलें म्हणजे व खुद्द पेशव्याच्या दारींहि सावकार धरणें धरून बसल्याचीं उदाहरणें आपल्या नजरेस पडतात ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे शंका येऊं लागते. शाहूच्या रोजनिशींत असा उल्लेख आहे कीं, शिद्यावरील स्वारीस बाजीराव गेला तेव्हां स्वारीसखर्चास काढलेल्या रकमेवर दरमहा दर शेंकडा तीन रुपये प्रमाणें व्याज ठरवून शिवाय मुदतींत पैसे परत न आल्यास वसूलीकरितां क्षमाविशी कबूल केली होती! पहिल्या बाजीरावास या सावकाराच्या त्रासामुळें आपला जीवदेखील कसा नकोसा झाला होता हें त्यानें ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेल्या पत्रावरून चांगलें दृग्गोचर होतें. इ. स. १७४० व १७६० यांच्या दरम्यान बाळाजी बाजीरावानें उभारलेल्या कर्जाची एकूण बेरीज दीड कोटीच्या जवळजवळ होती. या कर्जावर त्याला दरसाल दरशेंकडा सरासरी १२ पासून १८ टक्केपर्यंत व्याज सरकारच्या खजिन्यांतून भरावें लागत होतें. तथापि त्याच्याहि कारकीर्दीत कांहीं कांहीं रकमांवर दरमहा दरशेंकडा २॥

ठक्केपर्यंत व्याज दिल्याचीं उदाहरणें आढळतातच. ही पानिपतच्या महायुद्धापूर्वीची गोष्ट झाली. पानिपतास मराठशाहीस जबरदस्त धक्का बसला, व त्यानंतर शिवाय राज्यात भाऊबंदकीचाहि उद्भव झाला. अशा स्थितींत मराठशाहींतील मुत्सद्यांना लोकांत आपली पत राखणें साहजिकच जड गेलें असलें पाहिजे. तथापि मराठेशाहीची शासनसंस्था पूर्वीपेक्षा आता बरीच स्थिरावली असल्यामुळे थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीत व्याजाचा दर सरोस एकोत्र्या इतका उतरलेला आढळून येतो. थोरल्या माधवरावास मृत्युसमयीं जें थोरलें कर्ज होतें म्हणून म्हणतात तें अवघें चोवीस लाख रुपयेच होतें. त्या वेळचें मराठशाहीचें उत्पन्न व विस्तार याशीं तुलना करता हें कर्ज म्हणजे फारसें भारी होतें असें नाहीं तथापि तत्कालीन मुत्सद्यांच्या व सावकारांच्या दृष्टीनें तो बोजा एकंदरींत व्यक्तिविषयकच असल्यामुळे थोरल्या माधवरावास या कर्जाचा फार धाक वाटला व तो मृत्युशय्येवर पडला तेव्हां त्याच्या कारभाऱ्यास तें कर्ज फेडण्याची जबाबदारी स्वतःवर घेऊन आपल्या धन्यास त्यांतून मोकळे करावें लागलें. नानाफडणविसानें आपल्या कारकीर्दीत कांहीं थोडक्या लक्षांहून जास्त कर्ज काढण्याची पाळीच येऊं दिली नाहीं, व दुसऱ्या बाजीरावास तर कर्जविषे कांहीं नसून उलट त्याची खाजगी संपत्तीच पुष्कळशी वाटलेली होती.

राष्ट्रीय कर्जाच्या कल्पनेच्या अभावीं मराठेशाहीचें झालेलें नुकसान.—पेशव्याच्या कर्जाची वरील हकीकत वाचली म्हणजे राष्ट्रीय कर्जाची कल्पना अस्तित्वात नसल्यामुळें मराठेशाहीच्या प्रगतीस किती अडथळा आला याची सहज कल्पना करतां येईल. पहिल्या बाजीरावापासून तों तहत दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीच्या आरंभापर्यंत सरकार कर्ज उभारीत होतें तें केवळ अधिकारारूढ मुत्सद्याच्या पतीवर असून ही पत बहुतांशीं ' कर्जाच्या मोबदल्यात आपणास मामलत करावयास मिळेल या आशे वरच आधारलेली होती. एका शासनाधिपतीस दिलेल्या कर्जाची फेड त्याच्या पुढील शासनाधिपतीकडून बिनघोर केली जाईल व म्हणून सरकार हेंच आपले पैसे गुंतविण्याचें फायदेशीर ठिकाण आहे असा जर सरकारविषयीं पेशव्यांना लोकांत विश्वास उत्पन्न करतां आला असता, तर त्यांना आपल्या मोहिमांकरिताच नव्हे तर इतरहि स्थानिक सुधारणासाठीं लोकांपासून सुलभपणें व बऱ्याच कमी व्याजानें पैसे ओढतां आले असते. अशा प्रकारचा विश्वास म्हणजेच राष्ट्रीय पत अस्तित्वात नसल्यामुळें मराठशाहीचें किती नुकसान झालें तें पहा. (१) कर्ज उभारण्यास अडचण पडून पैशाच्या अभावीं कित्येक मसलती विघडल्या, व कित्येक हातींहि घेतां आल्या नाहींत. (२) उभारलेल्या कर्जांवर फाजील व्याज द्यावें लागून सरकारी तिजोरीच बरेंच नुकसान झालें (३) सरकारास द्रव्याची आवश्यकता असून तें भारी व्याज देण्यास तयार असताहि राष्ट्राचा पैसा निरुपयोगी पडून राहिला. (४) कर्जांमुळें मिंधे झालेल्या मुत्सद्यास नायकारास मामलती देणें भाग पडत असल्यामुळें सावकारांनीं आपल्या मामलतीवर असतांना कांहीं गैरवर्तणूक केली तरी तिकडे त्यांना कानाडोळा करणें प्राप्त होतें राष्ट्रीय कर्जाच्या कल्पनेचा जन्मच मुळीं त्यानंतरचा आहे असेंहि म्हणता येत नाहीं. इ. स. १६८८ च्या राज्यक्रांतीच्या पूर्वी, म्हणजे थोरल्या माधवरावच्या काळाच्या सुमारें एक शतक अगोदर, इंग्लंडचें राष्ट्रीय कर्ज थोरल्या माधवरावाच्या कर्जाच्या जवळजवळ अडीच पट असून त्या राज्यक्रांतिनंतर तर तें सोळा कोट रुपयांच्या आसपास जाऊन पोहोंचलें इंग्लंड जें कर्ज काढीत होतें तें अंतर्गत सुधारसाठीं काढीत होतें अशांतलाहि भाग नाहीं. मराठ्यांप्रमाणें इंग्लंडलाहि कर्ज काढावें लागलें तें बहुतेक सर्वस्वी परराष्ट्रीय युद्धासाठींच काढावें लागलें; व निदान १६८८ पूर्वी तरी इंग्लंडला राज्यक्रांतीची भीति पेशवाईंत जितकी होती त्याहून कमी नव्हती. तें कांहींहि असलें तरी एवढें मात्र उघड आहे कीं, इंग्लंडला जी झपाट्यानें आपली प्रगति घडवून आणता आली तिचें कारण बहुतांशीं त्या राष्ट्रानें आरंभापासूनच आपली पत वाढवून हातीं घेतलेल्या कार्यासाठीं थोडक्या व्याजावर बाहेरून पैसा खेंचणें सुलभ करून ठेविलें हें होय. उलट पक्षीं मराठेशाहींतील मुत्सद्यांचें ध्येय संभाजीच्या आज्ञापत्रांत व्यक्त झाल्याप्रमाणें संकटकालाची तरतूद करून ठेवण्यासाठीं खजिन्याची भरती करणें हें होतें त्या काळीं फ्रान्स, जर्मनी यासारख्या यूरोपीय राष्ट्रांचेंहि कांहीं अशीं असेंच धोरण होतें. परंतु त्यांनाहि हें धोरण पुढें बदलावें लागलें; व आतां तर सर्वच देशांत राष्ट्रास जरूर नसलेला पैसा कराच्या रूपानें प्रजेपासून गोळा करून सरकारी तिजोरींत डांबून ठेवण्यापेक्षा, आपत्प्रसंगीं राष्ट्रीय कर्जाच्या मिषानें प्रजेची शिल्लक गुंतवून प्रजेला तिच्यापासून कराच्या रूपानें घेतलेला पैसा व्याजाच्या रूपानें अंशतः परत देणेंच अधिक श्रेयस्कर आहे हें तत्त्व सर्वमान्य झालें आहे. अठराव्या शतकांत हिंदुस्थानच्या संपत्तीचा ओघ ज्या वेळीं चारहि दिशांनीं पुण्यात येऊन पडत होता त्या वेळीं जर मराठशाहींतील मुत्सद्यास राष्ट्रीय कर्जाच्या तत्त्वाचा आपली शासनसंस्था हाकण्याच्या कामीं उपयोग करून घेता आला असता तर महाराष्ट्राच्या इतिहासानें आहे त्याहून वेगळेंच स्वरूप धारण केलें असतें हें सांगावयास मोठ्या अर्थशास्त्राची जरूर नाहीं.

*आता आपण अर्थशास्त्राच्या यूरोपीय विकासाकडे लक्ष देऊं*

ग्रीक व रोमन अर्थशास्त्र.—यूरोपीयांच्या आर्थिक कल्पनांचा इतिहास पाहावयाचा म्हणजे प्रथम ग्रीकांकडे व नंतर रोमन लोकांकडे वळलें पाहिजे ग्रीकांच्या अर्थशास्त्रीय विचारांचें विवेचन फारसें विस्तृत होणार नाहीं. आरिस्टाटलच्या

पॉलिटिक्स या ग्रंथांत त्याचे अर्थशास्त्रीय विचार आढळतात. त्यांत देखील द्रव्य हें साध्य धरलें नसून समाजाचा चांगली स्थिति हें साध्य धरलें आहे; आणि द्रव्योत्पादन हें एक समाजाचें किंवा राज्याचें खातें म्हणून त्याचा विचार केला आहे समाजघटनेस कारण गरजांच्या विविधतामुळें होणारा अन्योन्याश्रय असें दिलें नाहीं तर मनुष्यमात्रामध्यें इतरांच्या सहवासाची इच्छा हें कारण दिलें आहे. आरिस्टाटलच्या अर्थविषयक कल्पना व्यापक होण्यास कांहीं अडचणी होत्या. जेथें गुलामगिरी सामान्य होती आणि अरिस्टाटलसारख्या तत्ववेत्त्यासहि ती स्वाभाविक संस्था वाटत होती; त्या समाजांत स्वतंत्र मनुष्याच्या गरजांमुळे समाजात जो अन्योन्याश्रय उत्पन्न होतो तो होत नाहीं, आणि आर्थिक हेतूचें जें सर्वव्यापकत्व अर्वाचीन समाजात दिसून येतें तें दिसून येत नाहीं आणि त्यामुळें अर्थशास्त्रीय कल्पनाहि फारशा विकसित होणें शक्य नव्हते. तथापि खाजगी मालमत्तेचें आणि वैयक्तिक कुटुंबसंस्थेचें महत्व आरिस्टाटल पूर्णपणें जाणत होता आणि याच्याविरुद्ध ज्या कल्पना त्याचा गुरु प्लेटो यानें व्यक्त केल्या होत्या त्या कल्पनांस अरिस्टाटलनें जोराचा विरोध केला आहे. त्यानें संस्थानाची लोकसंख्या नियमित रहावी इत्यादि विचार प्रगट केले आहेत. त्याचे उत्पादनविषयक विचार मात्र बरेच असमंजस आहेत. शेतकीसारख्या क्रियास तो उत्पादक समजतो पण ज्या क्रियांनीं वस्तूंचें केवळ स्वरूप पालटतें त्या क्रियास तो उत्पादक समजत नाहीं.

रोमन ग्रंथकारांनीं अर्थशास्त्रीय विचार फारसे प्रगट केले नाहींत, तथापि त्यांच्या अर्थविषयक योग्यायोग्यतेच्या कल्पना त्यांच्या कायदेसंग्रहातून आढळतात. उदाहरणार्थ त्यांत व्याज आकारण्यासंबंधानें कठोरता दृष्टीस पडते. रोमन लोकांचें वाङ्मय मोठें आहे, पण त्यात अर्थशास्त्रीय विवेचन फारसें नसल्यामुळें या शास्त्राच्या विकासात त्या राष्ट्राला स्थान नाहीं.

**म ध्य यु गी न अ र्थ शा स्त्र.**—अर्थशास्त्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें मध्ययुग म्हणजे ४००—१३०० इसवी हा काल होय. या युगातहि आर्थिक विचाराची प्रगति फारशी झाली नाहीं. फयूडल उर्फ संयुक्तसामंतपद्धति ही आर्थिक विकासास फारशी अनुकूल नव्हती आणि रोमन कॅथॉलिक संप्रदायाच्या योगानें बरीचशी मालमत्ता चर्चनें म्हणजे संप्रदायाच्या शासनसंस्थेनें उपटली. या कारणानीं आर्थिक आयुष्यक्रम एका नियमित कक्षेत फिरत होता. पण पुढें मध्ययुगाच्या उत्तर भागांत आर्थिक इतिहासाचें स्वरूप पालटूं लागलें क्रूसेड नामक युद्धामुळें अनेक राष्ट्रांचा एकमेकाशीं संपर्क आला, अनेक सरदार धुळीस मिळाले आणि त्यांची मालमत्ता सावकारी करणाऱ्या वर्गाच्या तावडीत जाऊं लागली तसेच निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें व्यापार सुरू झाला. अनेक राष्ट्रांतून पोपला दक्षणा जावयाची असे त्यामुळें पैसे पाठविण्याचा धंदा करणारा वर्ग वाढला. या वेळेस इंग्लंडमध्यें लॅंबर्ड लोक आले आणि त्यांनी आपल्या धंद्याच्या जागेत ज्या पैशाच्या क्रिया सुरु केल्या त्याची परंपरा इंग्लंडात अव्याहत चालू आहे व, लंडनमधील रोकड बाजाराच्या रस्त्याला लॉंबर्ड स्ट्रीट असें नाव मिळालें आहे.

मध्ययुगाच्या शेवटाला गुलामगिरी बंद होऊन सर्फ नांवाच्या अर्ध्यामुर्ध्या गुलाम, अर्ध्यामुर्ध्या स्वतंत्र मजूराच्या स्वरूपाच्या अशा वर्गाचें अस्तित्व उत्पन्न झालें. त्याचा पुढे अनेक धंदे करणाऱ्या लोकांमध्यें विकास झाला. अनेक ठिकाणीं शहरें स्थापन झालीं. त्या शहरांमध्यें अधिक स्वातंत्र्य उपभोगणारे आणि अन्योन्याश्रयी असे वर्ग दिसू लागले. या काळात बौद्धिक चळवळी फारशा झाल्या नाहींत बरीचशी विद्वत्ता ख्रिस्ती मताचें लोकांस पटेल असें विवरण करण्यात खर्च झाली. टामस अक्वायनसनें आरिस्टाटलचीं मतें लोकास या काळात समजावून देण्यासाठीं एक ग्रंथ लिहिला.

चौदाव्या व पंधराव्या शतकांत यूरोपच्या आर्थिक आयुष्यक्रमात बरेच फेरफार होत होते. संयुक्तसामंत राज्यपद्धति उर्फ सरंजामी पद्धति मोडली जाऊन राजास जितकें स्वातंत्र्य प्राप्त झालें तितकें सामंताच्या भाराकालीं दडपत असलेल्या प्रजेसहि मिळूं लागलें, आणि नगराची वृद्धि होत चालली, आणि जे धंदे शहरातच वाढावयाचे त्याच्या वाढीला सुरवात झाली. एवढेंच नव्हे तर जेव्हा राजसत्ता सामंतसत्तेबरोबर भांडत होती तेव्हा या स्वतंत्र शहरांची आणि तींतील उद्यमी व श्रमजीवी वर्गाच्या साहाय्याची अपेक्षा राजे व सामंत हे आळीपाळीनें करीत त्यामुळें नगरात होत असलेल्या आर्थिक क्रियांचें व त्या क्रिया करणाराचें राजकीय महत्वहि वाढू लागलें. शासनसंस्था जसजशा अधिकाधिक बळकट होऊं लागल्या आणि पगारी सैन्यें ठेवण्यात येऊं लागलीं तसतसें उद्योगधंद्याचें स्थैर्य वाढलें आणि त्याबरोबर सैन्याच्या सुधारणेकडेहि अधिकाधिक लक्ष पुरविण्यास सुरवात झाली. आणि कार्ययोजक आणि काम करणारे यातील आर्थिक अंतरहि वाढू लागलें. मुद्रणकला या काळात चांगलीच प्रचलित झाली असल्यामुळें, उद्योगधंद्याची वाढ व मानसिक उन्नति याचा अन्योन्याश्रय स्थापन होण्यास सुरवात झाली. होकायंत्र प्रचारात येऊं लागलें, आणि दर्यावर्दीपणाचें काम अधिकाधिक सुलभ होत गेलें. व्यापारी क्रियांची जशी वाढ होत गेली तशी हुंड्या वगैरे पत्रांवर अवलंबून असणाऱ्या देवघेवीचा पैशाऐवजी उपयोग होण्यास सुरवात झाली एवढेंच नव्हे तर सार्वजनिक संस्थांचीहि पत निश्चित होत गेली. या क्रिया फ्लारेन्स, व्हेनिस, जिनोआ, या ठिकाणीं हालंड व इंग्लड याचें महत्व स्थापन होण्यापूर्वीच झाल्या होत्या. या काळात नवीन प्रकारची परिस्थिति जरी उत्पन्न होत होती तरी तीपासून बौद्धिक चळवळ एकदम सुरु झाली नाहीं. सेंट टामस अक्वायनसच्या ग्रंथांतील समाजशासनविषयक कल्प-

नाच लोकांत प्रचलित होत्या व या काळात जर कांहीं व्यावहारिक विषयावर विचार झाला असेल तर तो पैशाच्या स्वरूपावर होय आणि या विषयावर मात्र एक अगदीं अर्वाचीन काळास शोभेल असा ग्रंथ निर्माण झाला. या ग्रंथाचें कर्तृत्व निकोले ऑरेस्मे याच्याकडे आहे. हा ग्रंथकार १३८२ मध्यें मरण पावला. हा फ्रान्सचा राजा पाचवा चार्लस् याचा शिक्षक असून तो पुढें लिस्यूक्सचा बिशप झाला या ग्रंथकाराची जर्मन अर्थशास्त्रज्ञ रोशेर यानें फार तारीफ केली आहे. चौदाव्या व पंधराव्या शतकात अर्थशास्त्रविषयक महत्त्वाचा ग्रंथ या खेरीज दुसरा नाहीं. याग्रंथाची पुनरावृत्ति वूलौस्की यानें १८६४ मध्यें प्रसिद्ध केली

सो ळा वें श त क —पंधराव्या शतकाच्या अंतीं अमेरिकेचा, व हिंदुस्थानास जाण्याच्या जलमार्गाचा शोध लागल्यामुळें राजकीय इतिहासामध्ये जसा निराळा काळ उत्पन्न झाला तसाच तो आर्थिक इतिहासामध्येंहि झाला, आणि व्यापारविषयक आणि उद्यमविषयक उत्कर्षाचें आश्रयस्थान मध्य व दाक्षिण्यूरोप न राहतां पाश्चिमयूरोप बनलें. आणि या नवीन शोधामुळें जे आर्थिक व सामाजिक फरक झाले त्यामुळें आर्थिक विचारांसहि निराळेंच वळण मिळालें पाश्चिमयूरोपांत व्यापार आणि उद्योग यांची वाढ करण्याकडे मुत्सद्यांचें लक्ष लागलें, आणि राजनीति तद्विषयक बनली आणि लढायांचा या धारणाशीं निकट संबंध लक्षात येऊं लागला.

सोळाव्या शतकाच्या प्रारंभापासून ज्या राज्यसंपत्तिवृद्धिविषयक कल्पना मुत्सद्याच्या डोक्यांत होत्या आणि ज्या कल्पनामुळें राज्यांची व्यवहारनीति ठरत असे त्यास अर्थशास्त्रकार 'मर्कंटाइल सिस्टिम " म्हणतात. मर्कंटाइल सिस्टिम ऊर्फ " वाणवटी अर्थशास्त्र " म्हणजे काय आणि त्यामध्यें कोणत्या कल्पना येतात, आणि त्या कल्पनाप्रमाणें जीं कार्यें राष्ट्रांनीं केलीं, तीं तात्पुरते संपत्तिवृद्धिविषयक किंवा राजकारणाचे उपाय म्हणून केलीं, कीं, त्याच्या मूळाशीं कांहीं अर्थशास्त्रविषयक चुकीच्या कल्पना होत्या याविषयीं मतभेद आहे आणि त्याविषयीं वाद अजून संपला नाहीं. श्मोल्लर सारखे लोक मर्कंटाईल विचाराचें समर्थन करतात आणि त्यास अमेरिकन अनुयायींहि सांपडतात. दहाबारा वर्षांपूर्वी प्रो. स्माल ( शिकागो युनिव्हर्सिटी) यांनीं कॅमेरालिस्टवर जें पांडित्यपूर्ण पुस्तक प्रसिद्ध केलें त्यात हा वाद उकरून काढला आहे आणि आडाम स्मिथ यासारख्या मर्कंटाईलकल्पनाविरुद्ध लिहिणारास चावा घेण्याचा प्रयत्न केला आहे. वाणवटी अर्थशास्त्रामध्यें जीं मतें व्यक्त होतात त्यांचें साधारणपणें मांडणी येणेंप्रमाणें करण्यात येते. ( १ ) पैसा आणि संपत्ति हीं ते एकच समजत. ( २ ) व्यापाराचा उद्देश असा असावा कीं, जेणेंकरून आपल्या देशात सोन्यारुप्यासारख्या मौल्यवान धातु ओढल्या जातील. यासाठीं निर्गत जास्त करावी आणि आयात कमी असावी. " व्यापारी देवघेवीची शिल्लक " म्हणजे 'ब्यालेन्स आफ ट्रेड " इतर राष्ट्रांविरुद्ध निघावी व आपल्यातर्फेनें निघावी. आपली निर्यात जास्त व्हावी म्हणून सरकारनें सर्व प्रकारच्या युक्त्या योजाव्यात, त्यांत परक्या मालावर बहिष्कार किंवा जबरदस्त जकातहि असावी, निर्गतीस मदत करावी, वगैरे कल्पना पुढें आल्या. अर्वाचीन अर्थशास्त्राची द्वितीय अवस्था जर वाणवटी अर्थशास्त्र (पद्य) होय तर उद्योगाची व देवघेवीची स्वतंत्रता ही त्याची तृतीयावस्था होय 'निसर्गसिद्ध स्वातंत्र्य' हें तत्त्व जोरानें पुढें आलेल्या अवस्थेत ( १ ) यंत्राची अत्युच्च परिणति ( २ ) व यांत्रिक उत्पादन हीं दोन सारभूत अंगें होतीं. या अवस्थेंत भांडवलवाले व मजूर यामधील विरोध तीव्र झाला तथापि यंत्राच्या साहाय्यानें अतिशय कष्टाचीं कामें सुलभ झाल्यामुळें मनुष्याची उच्च दर्जाच्या कामांकडे योजना होऊं लागली व त्यामुळें मनुष्याची आध्यात्मिक योग्यता वाढली.

मध्ययुगात युद्ध हें प्रधान अंग, व उद्योगधंदा हें त्याला पोषक अर्थात् गौण अंग समजलें जात असे. उद्योगधंद्यांस उत्तेजन देण्यात राजांचा मुख्य उद्देश द्रव्यबल वाढवून युद्धास पात्रता उत्पन्न करण्याचा असे. परंतु यांत्रिक युगांत हें पारडें फिरलें व व्यापारास प्राधान्य येऊन सैन्य व मुत्सद्दीपणा हीं दोनही व्यापारास मदत करूं लागलीं. अठराव्या शतकातील लढाया या वसाहती स्थापणें व त्यांच्याशीं व्यापार वाढविणें या दोन उद्देशानीं प्रेरित झालेल्या होत्या व त्यामुळें राष्ट्रांतील कलह वृद्धिंगत झाले; तथापि आधुनिक समाजाचें ध्येय उद्यम व आर्थिक उत्पादन हें आहे हें यामुळें निश्चित झालें याचा राजकीय परिणाम इंग्लंड व फ्रान्समध्यें असा झाला कीं. व्यापारामुळें होणारी समाजक्रांति ही राजसत्तेस अनिष्ट वाटल्यामुळें ती बंद करण्याकरिता बौद्धिक दुर्बलता स्वीकारून नवीन कल्पनाचा नाश करण्याकडे तेथील सरकाराचें लक्ष वेधलें तथापि ही क्रांति यामुळें बंद होऊं शकली नाहीं. पूर्वीची समाजसरणी बदलून नवीन उत्पन्न करण्याचा फ्रान्समधील सर्व वर्गानीं निश्चय केला. परंतु नवीन रचना कशी असावी हें कोणासहि निश्चित सांगता येत नसल्यामुळें फ्रान्समधील क्रांति बरीच घातक स्वरूपाची झाली. व्हॉल्टेर व रुसो यांसहि नवीन काय पाहिजे याची स्पष्ट कल्पना नव्हती. त्याच्याचप्रमाणें 'फिजिओक्रॅट्स' या आर्थिक संप्रदायाची स्थिति होती. या संप्रदायाचा थोडासा इतिहास आता देऊं.

इंग्लंडातील नवीन प्रागतिक विचारांचा प्रतिध्वनि अठराव्या शतकाच्या प्रारंभीं फ्रान्समध्यें होऊं लागला. शेतकऱ्यांचें दारिद्र्य, सरकारी जमाखर्चाचें अस्थिरत्व व करांचा बोजा हीं सर्व दुःखें 'मर्कंटाईल पॉलिसी' मुळें उत्पन्न झालीं आहेत असा बुद्धिमान लोकाचा समज झाला. या लोकांत ब्वागिलबेर् व्होबान्, मॉन्तेसक्यू, हे प्रधान होते. याचा भावार्थ असा होता कीं, सोनें व रुपें ही ख

संपत्ति नसून शेतकीनें व व्यापारानें उत्पन्न झालेल्या वस्तू ही खरी संपत्ति आहे. सरकारी नियंत्रणानें उत्पादनास फायदा होण्याऐवजी नुकसान होतें.

शेतकी हा उत्पादनाचा मुख्य मार्ग आहे. आयात व निर्यात मालावर जकात असणें अनिष्ट आहे सर्व राष्ट्रांत खुला व्यापार असणें श्रेयस्कर आहे समाजाच्या सुस्थितीस राजकीय कायद्यापेक्षां नैसर्गिक कायद्याची जास्त जोड पाहिजे अशा रीतीचे त्याचे विचार होते फिजिओक्रॅटिक संप्रदायाचे मुख्य केन्हे ( १६९४—१७७४ ) व गुरने ( १७१२—१७५९ ) हे होते यांनीं तत्पूर्वकालीन विचारांना संबद्ध करून त्या विचारांची एक पद्धति बनविली समाजांतील प्रचलित व्यवस्था या सर्व कृत्रिम असून त्यांच्यातील सर्व दोष या कृत्रिमत्वामुळें उत्पन्न झाले आहेत अशी यांची मुख्य कल्पना आहे. जगांत ' नैसर्गिक कायदा ' आहे तदनुसार सर्व समाजरचना असावी. तशी नसल्यास अनेक आपत्ति उत्पन्न होतील या उपपत्तीचा विशेष कटाक्ष प्रचलित आर्थिक संस्थावर होता. या संप्रदायाचीं आर्थिक प्रमेयें पुढें लिहिल्याप्रमाणें होतीं. ज्या श्रमापासून धान्य व इतर कच्चा माल तयार होतो तेच ' उत्पादक ' होत. या श्रमांनीं त्यांत लागणाऱ्या खर्चापेक्षा जास्त माल तयार होतो. कारखाने हे उत्पादक नव्हत, कारण त्यांत श्रमाच्या खर्चापेक्षां जास्त माल उत्पन्न होत नाहीं. व्यापारामुळें देशाच्या संपत्तींत भर पडत नाहीं, फक्त संपत्ति एका हातांतून दुसऱ्या हातांत जाते शेतकीच्या संपत्तींतून इतर सर्व धंद्यांतील लोकांची व्यवस्था लागते. वकील, शिपाई, वैद्य, वाणी हे सर्व अनुत्पादक आहेत सर्व करांपेक्षां शेतकीवरील कर हाच जास्त न्याय्य व सोईचा आहे. या सर्व सिद्धांतांचा तत्कालिक परिणाम विध्वंसक होता. 'मर्कंटाईल पॉलिसी 'च्या नियंत्रणाविरुद्ध या सर्वांचा आक्षेप असे. सरकारनें अमुक वस्तु उत्पन्न कराव्या, अमक्या दरानें विकाव्या इत्यादि तऱ्हेचे नियम करणें समाजाच्या हितास विघातक आहे. वस्तुतः सरकारी नियंत्रणापासून पुष्कळ फायदे होते परंतु या संप्रदायाचें त्याऱ्याकडे लक्ष गेलें नाहीं सुधारकाच्या पद्धतीप्रमाणें त्यांनीं पूर्वकालीन संस्थांच्या दोषाची अतिशयोक्ति केली. या संप्रदायाचें मुख्य ध्येय व्यक्तिस्वातंत्र्य होतें असें म्हटल्यास हरकत नाहीं त्याचप्रमाणें देशांतील राजकीय कायदे नैसर्गिक कायद्याच्या बरहुकूम असले पाहिजेत असेंहि त्यांचे मत होतें.

या संप्रदायाचा फ्रान्समधील सामान्य लोकांवर विशेष परिणाम झाला नाहीं; परंतु राज्यक्रांतीनंतर ' कॉन्स्टिट्युअंट असेंब्ली 'वर त्याचा बराच पगडा होता. परंतु कांहीं काळानंतर तो संप्रदाय नामशेष झाला इटलीमध्यें अठराव्या शतकांत पुढील अर्थशास्त्रज्ञ प्रमुख होते.—बँडीनी, जिनोव्हेसी, बिकॅरिया, व्हेरी, कार्ली, व्हास्को, ऑरटीस. स्पेनमध्यें उस्टारिझ हा ' मर्कंटाईल पॉलिसी'चा भक्त होता व रॅडरिग्यू हा फिजिओक्रॅटिक संप्रदायाचा अनुयायी होता. जर्मनीमध्यें ' मर्कंटाईल ' पद्धतीचें बरेंच प्राबल्य होतें. परंतु कांहीं कालानन्तर फ्रेडरीक यानें व नंतर श्लेटवीन् (१७३१-१८०२) व इमोल्ड्स ( १७६४—१८३१ ) यांनीं फिजिओक्रॅटिक मताचा प्रादुर्भाव केला हॉलंडमध्यें अठराव्या शतकांत आर्थिक बाङ्मयांत विशेष प्रगति झाली नाहीं. इंग्लंडांत आर्थिक शोधांच्या बाबतींत अठराव्या शतकाच्या प्रारंभीं औदासीन्य होतें १७३५मध्यें प्रथम बर्कले या तत्त्ववेत्त्यानें नवीन विचारांना चालन दिलें त्यानंतर ह्यूम यानें आपल्या निबंधावलींत अर्थशास्त्रावरील कांहीं विषयांवर अगदीं आधुनिक तऱ्हेचीं मतें प्रतिपादन केलीं पैशाला दिलेलें फाजील महत्त्व कमी करून वस्तु याच खरी संपत्ति होत हें त्यानें दाखविलें भिन्न देशांत व्यापार असणें हें सर्वांच्या हिताचें आहे असें त्याचें मत होतें, व त्यामुळें व्यापारास प्रतिबंधक अशा जकाती बसविणें हें त्याच्या मतानें अनिष्ट आहे ह्यूमनें ऐतिहासिक दृष्टि आर्थिक वादामध्यें आणिली, व प्रत्येक विधानाच्या पुष्टीकरितां इतिहासांतील घडलेल्या गोष्टींचें प्रमाण देण्याचा उपक्रम केला ह्यूमचा ॲडॅम स्मिथच्या मनावर पुष्कळ परिणाम झाला व त्याच्या पद्धतीचीं उत्तम अंगें त्यानें उचललीं. ॲडॅम स्मिथच्या पूर्वीच्या अर्थशास्त्रज्ञांत जोशिआ टकर ह्याची गणना केली पाहिजे यानें खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचा जोरानें पुरस्कार केला सर जेम्स स्टुअर्ट हाहि अत्युत्तम ग्रंथकार असून त्यानें आपल्या पुस्तकांत ' मर्कंटाईल ' पद्धतीचें जुन्या दृष्टीप्रमाणें समर्थन केलें आहे. विशेषतः मूल्याची उपपत्ति व प्रजावृद्धि या विषयावरील त्याचें विवेचन फारच अप्रतिम आहे तथापि लवकरच ॲडॅम स्मिथचा प्रसिद्ध ग्रंथ बाहेर पडल्यामुळें हा ग्रंथकार मागें पडला ॲडॅम स्मिथ हा अर्थशास्त्राचा जनक आहे असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे परंतु हें वस्तुस्थितीच्या विरुद्ध आहे सामाजिक संपत्ति हा विषयच असा आहे कीं, अनादिकालापासून अनेक ग्रंथकारांनीं त्यावर आपले विचार प्रगट केले आहेत स्मिथच्या वेळीं हें शास्त्र बऱ्याच वरच्या पायरीला गेलें होतें टर्गोसारख्या ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत बरेंच पद्धतशीर विवेचन केलें होतें परंतु पूर्वीच्या मंथाच्या आधारावरच त्यानें नवीन इमारत अशा तऱ्हेची रचली कीं तिच्यांत डौलदारपणा येऊन ती अनेक वर्षें टिकली दुसरे कांहीं लोक फिजिओक्रॅट व स्मिथियन असे भिन्न संप्रदाय मानतात परंतु हें चुकीचें आहे. कारण,या दोहोंमध्यें वैषम्यापेक्षा साम्यच अधिक आहे.पूर्वीच्या यूरोपांतील राजसत्तेनें जीं नियंत्रणें व्यापारावर घातलीं तीं दोघांच्याहि मतानें त्याज्य आहेत, व असें असण्याचीं दोघांनीं दिलेलीं कारणेंहि एकाच आधारावर रचलेलीं आहेत. स्मिथची टीका जास्त धारवाईची व जास्त पूर्ण आहे, व उत्पादक व अनुत्पादक श्रमावरचीं फिजिओक्रॅट पंथाचीं चुकीचीं विधानें त्यानें दुरुस्त केलीं, परंतु त्या पंथांतील सर्व उत्तम सिद्धांत त्यानें आपल्या ग्रंथांत ग्रथित करून ठेविले, व मध्ययुगांतील संस्थांवर टीका करून त्यांचा नाश

करण्याचें कार्य त्या पंथापेक्षां जास्त परिणामकारक रीतीनें केलें. स्मिथच्या वेळेस अर्थशास्त्र व इतर शास्त्रें यांचें पृथक्करण झालेलें नव्हतें त्यामुळें हा विषय नीतिशास्त्राबरोबर स्कॉच विश्वविद्यालयात शिकवीत असत. ह्यांच्या समाजशास्त्राचें दिग्दर्शन स्मिथनें आपल्या नीतिशास्त्रावरील पुस्तकात केलें होतें. परंतु समाजशास्त्र लिहिण्याचा त्याचा विचार शेवटास गेला नाहीं. स्मिथनें आपल्या 'वेल्थ ऑफ नेशन' या ग्रंथात अनुगमन व निगमन या दोहोंपैकीं कोणती पद्धति स्वीकारली याविषयीं बराच वाद आहे. काहींच्या मतें त्याची पद्धति अनुगमनात्मक होती व काहींच्या मतें ती निगमनात्मक होती. बकलच्या मतानें ती निगमनात्मक होती. हें मत बहुतांशीं बरोबर आहे स्मिथच्या ग्रंथात अनुभवानें सिद्ध झालेल्या घडलेल्या गोष्टींच्या आधारानें निगमनाप्रमाणें अनुमानें क्रमानें काढलेलीं आहेत याशिवाय घडलेल्या गोष्टींच्या ऐवजीं कांहीं ठराविक गृहीतप्रमेयापासून निगमनपद्धतीनें अनुमानें काढलेलीं आहेत यापैकीं एक गृहितप्रमेय असें आहेः सृष्टीमध्यें प्रत्येक व्यक्तीच्या ठायीं स्वतःचें हितसंरक्षण करण्याची बुद्धि दिलेली आहे. व सृष्टीची रचनाच अशी आहे कीं या व्यक्तींच्या बुद्धीमुळें समाजाचेंहि कल्याण होतें. ही व्यक्तीच्या व समाजाच्या अविरोधाची कल्पना स्मिथच्या बहुतेक सिद्धांताच्या मुळाशीं दिसून येते. परंतु ऐतिहासिक शोधाची दृष्टी स्मिथची तीव्र असल्यामुळ त्याच्या अनुयायांनीं निगमनात्मक पद्धतीचा जसा अतिरेक केला तसा त्यानें केला नाहीं. नैसर्गिक कायद्याच्या उपपत्तीवर त्याचा विश्वास होता तथापि मॉन्तेसक्यूच्या पुस्तकातील अनुगमनात्मक (इंडक्टिव्ह) पद्धतीचा त्याच्यावर परिणाम झालेला होता. अशा रीतीनें दोनही पद्धतींचें मिश्रण स्मिथच्या ग्रंथात दिसून येतें. वस्तुतः स्मिथनें समाजशास्त्राचे नियम मुळींच शोधून काढले नाहींत. परंतु समाजातील व्यवहारास नियम आहेत हें त्यानें दर्शविलें समाजातील प्रत्येक अवस्था त्या वेळच्या परिस्थितीस धरून असते व ऐतिहासिक कारणानीं ती बद्ध व मर्यादित असते. काहींचे मत असें आहे कीं, स्मिथचा ग्रंथ हा अगदीं विस्कळित आहे व त्यात मोठ्या ग्रंथात अवश्यक असणारी संगति नाहीं परंतु हें मात्र अग्राह्य आहे. जरी या ग्रंथात आधुनिक ग्रंथाप्रमाणें निरनिराळ्या भागाचें व प्रकरणांचें व्यवस्थित आविष्करण नाहीं तरी विचाराचें व तत्त्वाचें ऐक्य या ग्रंथात सर्वत्र दिसून येतें व त्यात विशेष विसंगतताहि दिसून येत नाहीं स्मिथचीं मतें आता क्रमानें देऊं. एकंदर राष्ट्राचे श्रम हा सर्व अवश्यक संपत्तीचा मुख्य उगम आहे हा त्याचा पहिला सिद्धान्त आहे. या सिद्धान्तावरून त्याचें फिजिओक्रॅट्सपासून भिन्नत्व व्यक्त होतें. श्रमविभागापासून श्रमाची उत्पादनशक्ति अतिशय वाढते श्रमविभागाच्या सत्त्वाचें स्मिथनें इतकें अप्रतिम वर्णन दिलेलें आहे कीं, आधुनिक सर्व ग्रंथकार त्याचा अनुवाद करितात. श्रमविभागाचें मूळ एक वस्तूच्या ऐवजीं दुसरीचा विनिमय करण्याची मनुष्याची इच्छा हें आहे. श्रमविभाग हा भांडवलाच्या वृद्धीवर अवलंबून आहे. श्रमविभागानंतर क्रमानेंच विनिमय सामान्याची जरूर भासते व पैसा अस्तित्वात येतो. पैशापासुन मूल्याची कल्पना उद्भूत होते. मूल्याचें मुख्य कारण श्रम हें आहे श्रमाच्या दोन संख्या नेहमीं एकाच किंमतीच्या असतात. परंतु व्यवहारात पैशामध्यें मूल्याची गणना दर्शवितात अनेक शतकेंपर्यंत एकच किंमत असल्यामुळें सोनें व रुपें ह्या धातू या कामाकरितां सर्वांत उत्कृष्ट ठरल्या आहेत. परंतु भिन्न कामांमधील तुलनेकरितां श्रम हेच जास्त चांगलें मापन आहे. श्रमाचे बक्षीस मजुरी हें आहे. भांडवल एकाजवळ पुष्कळ जमून तें त्यानें दुसऱ्यांना मजूर म्हणून उत्पादनाच्या कामीं लावण्याकरितां खर्च केलें म्हणजे 'नफा' उत्पन्न होतो. जमीन ही मालकीची झाल्याबरोबर 'खंड' सुरू होतो. प्रत्येक सुधारलेल्या समाजात सर्व वस्तूंच्या मूल्यात हीं तीन अंगें म्हणजे जमिनीचा खंड, नफा, व मजुरी असतात. खंड, नफा व मजुरी ह्या प्रत्येकाचे दर त्या त्या काळीं ठरलेले असतात व त्या सर्वांची बेरीज केली म्हणजे वस्तूच्या मूल्याची नैसर्गिक इयत्ता ठरते. बाजारातील किंमत या इयत्तेच्या किंचित् वर किंवा खालीं असते. परंतु ती विशेष दूर जाऊं शकणार नाहीं. कांहीं वस्तूंच्या उत्पादनात एकाच व्यक्तीच्या हातात सर्व उत्पादन असल्यास नैसर्गिक मूल्यापेक्षा अतिशय किंमत होऊं शकते, मजूर व भांडवलवाले यांच्या दरम्यान कलह होऊन मजुरीचा दर ठरला जातो, अनेक धंद्यामध्यें नफा एका पातळीवर येण्याची प्रवृत्ती असते व ही प्रवृत्ति स्पर्धेमुळें जास्त व्यवस्थित होते. भांडवल कमी असल्यास नफ्याचा दर जास्त असतो व पुष्कळ असल्यास कमी असतो.

जमिनींत झालेल्या मालाची किंमत सामान्य नियमाप्रमाणें ठरल्यानंतर, नफा व मजुरी देऊन जी बाकी राहील ती खंड या रूपानें जमीनदारास मिळते. खंड, मजुरी व नफा हे तीन आदा मिळविण्याचे मार्ग आहेत. समाजातील मुख्य वर्ग या तीन प्राप्तींच्या कोणत्यातरी एक अथवा अधिक मार्गांनीं श्रीमंत होतात. जमीनदाराचें हित व समाजाचे हित यांचें तादात्म्य असतें. मजुराचेंहि कल्याण समाजाच्या प्रगतींत असतें. परंतु भांडवलवाल्याचे हित समाजाच्या हिताच्या विरुद्ध असतें. भांडवल हें निश्चल व चल अशा दोन प्रकारचें असतें. राष्ट्रातील एकंदर उत्पादनातून निश्चल भांडवल व पैसा वजा केला म्हणजे निखालस राष्ट्राची प्राप्ति राहते. सुधारलेल्या देशांत एकंदर राष्ट्राच्या प्राप्तीपैकीं अधिक भाग भांडवलाकरिता ठेवला जातो. पैसे साचवणें हें राष्ट्रहिताच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. उधळे लोक समाजांत असल्यास

राष्ट्राच्या उत्पादनास मंदगति येते. उत्पादक मजूर वाढविणें किंवा त्यांची उत्पादन शक्ति वाढविणें हे दोन राष्ट्र संपन्न करण्याचे मार्ग आहेत. दोनांहि मार्गांत जास्त भांडवल लागतें. भांडवल देशांत जसें जास्त होईल तसा व्याजाचा दर कमी होत जातो. यूरोपांत व्याजाचा दर कमी झाला तो सोनें व रुपें विपुल झाल्यामुळें नसून भांडवल वाढल्यामुळें झाला. जमीन व खाणी यामध्यें अधिक उत्पादक मजूर लावता येतात. तितकेंच भांडवल कारखान्यांत घातल्यास कमी उत्पादकमजूर लागतात. त्याहि पेक्षा घाऊक व्यापारात कमी व सर्वांत किरकोळ व्यापारात कमी उत्पादक मजूर लागतात. वर लिहिलेल्या नैसर्गिक क्रमानेंच राष्ट्रानें जावें हें चांगलं नाहींतर हानि होईल. एकंदरींत शेतकीला विशेष प्राधान्य दिलें पाहिजे. स्मिथच्या ग्रंथाच्या तिसऱ्या पुस्तकांत ऐतिहासिक शोधाचें उत्तम उदाहरण सांपडतें. यूरोपांत आर्थिक बाबतींत क्रमानें कशी प्रगति झाली व कोणत्या अवस्थांतून उद्योगधंद्यांचें क्रमण झालें याचा त्यानें मनोरंजक इतिहास दिला आहे. परंतु येथेंहि 'नैसर्गिक कायद्याच्या' गृहीत प्रमेयाचा त्याच्यावर किती पगडा बसला होता हें व्यक्त होतें. कारण, त्यानें दिलेली आनुपूर्वी हीच नैसर्गिक आहे व त्याहून इतर सर्व कृत्रिम अर्थात विघातक आहेत असें तो मानतो. चौथ्या पुस्तकांत स्मिथनें 'मर्कंटाईल' पद्धतीचें सविस्तर खंडन केलें आहे. स्मिथला इंग्लंडांत खुला व्यापार प्रस्थापित होईल अशी मुळींच आशा नव्हती. परंतु त्याच्याच ग्रंथाच्या चालनानें ही गोष्ट लवकरच घडून आली. कांहीं बाबतींत मात्र खुल्या व्यापाराच्या तत्त्वास अपवाद त्यानें कबूल केले. या बाबी म्हणजे स्वतःचीं जहाजें बांधणें, लढाईची सामुग्री व राष्ट्रास अत्यावश्यक असे धंदे. पांचव्या पुस्तकांत स्मिथनें राष्ट्राची जमा व खर्च व करग्रहणाचीं तत्त्वें याचा विचार केला आहे. सार्वजनिक हिताच्या संस्था सरकारनें चालविणें श्रेयस्कर आहे. शिक्षण, सैन्य, न्याय पद्धति या गोष्टींत स्वातंत्र्याचें तत्त्व लागू करणें बरोबर नाहीं; येथें नियंत्रण असणेंच जास्त सयुक्तिक आहे. स्मिथच्या मतें फिजिओक्रॅटिक पद्धति ही बहुतांशीं परिपूर्ण आहे. सरकारी नियंत्रण हें होईल तितकें कमी असावें व बहुतेक संस्था लोकांनीं आपल्या वर्तनगारीनें चालवाव्या. परंतु शेतकी हेंच फायदे राष्ट्राच्या उद्योगाचें सर्वस्व आहे हें त्या पद्धतीचें तत्त्व स्मिथनें खोडून टाकलें. करग्रहणाचीं स्मिथचीं तत्त्वें अद्यापिहि सर्वमान्य आहेत. परंतु कर हे सरकारनें केलेल्या कामाची फी किंवा मजुरी आहे हें स्मिथचें तत्त्व मात्र आधुनिक अर्थशास्त्राच्या दृष्टीनें बरोबर असलें तरी व्यक्तीनें सरकारकडून तीस झालेल्या सेवेच्या प्रमाणानें कर द्यावा हें तत्त्व मात्र अगदीं चुकीचें आहे. कां कीं, सरकारचें अस्तित्वच अशाकरितां आहे कीं, जीं कार्यें केवळ देवघेवीच्या तत्त्वानें होणार नाहींत तीं कार्यें व्हावीं यासाठीं सरकारसारख्या संस्थेची जरूरी आहे. एकंदरीनें पाहतां स्मिथचें कार्य टीकात्मक व विध्वंसक होतें असें म्हटलें पाहिजे. आधुनिक औद्योगिक प्रगतीला मदत करण्यास तत्कालीन सरकारेंहि अपात्र आहेत हें त्याचें ठाम मत होतें. स्मिथचा मोठेपणा यांत आहे कीं, विध्वंसक कार्याच्या युगांतहि त्यानें विधायक व पद्धतशीर अशी नवीन सिद्धान्तरचना करून पद्धतशीर अर्थशास्त्राची घटना केली. पूर्वीच्या संस्थेचे दोष विशद करून शिवाय आर्थिक कल्पनांचें पृथक्करण त्यानें केलें. नवीन सूचना, नवीन विचार व व्यावहारिक चातुर्य ह्या सर्वांनीं त्याच्या ग्रंथास विचारक्रांति घडवून आणण्याचें श्रेय दिलें आहे. स्मिथच्या ग्रंथांत निगमन पद्धतीचे जे दोष गर्भरूपानें होते ते रिकार्डो, जेम्स, मिल इत्यादिकांच्या ग्रंथांत परिस्फुट झाले. फिल्डब्रँडच्या मतानें या स्मिथ संप्रदायाचे पुढील दोष होते. (१) व्यक्तिस्वातंत्र्याची व व्यक्तीच्या महत्त्वाची अतिशयोक्ति. मनुष्यस्वभावांत स्वार्थाशिवाय दुसरी मनोवृत्ति नाहीं असें मानणें. (२) प्रत्येक व्यक्तीस आपलें हित समजतें व एकंदर जगांत सर्व गोष्टींचें पर्यवसान चांगलें होतें हा विश्वास. (३) संपत्तीची विनिमयात्मक व कोती कल्पना. (४) समाजसत्ता ही सर्वस्वी दुष्ट आहे ही कल्पना. (५) आर्थिक आयुष्यांत ध्येय व नैतिक कल्पना यांचा पूर्ण अभाव मानणें. (६) एकांगीपणा व संस्कृतीच्या भिन्न अवस्थांकडे दुर्लक्ष्य. हे दोष स्मिथच्या अनुयायांत जास्त प्रमाणांत दिसून येतात. परंतु या सर्वांचें बीज स्मिथच्या ग्रंथांत होतें हें कबूल केलें पाहिजे. स्मिथच्या पश्चात बेंथमनें व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्व अर्थशास्त्राशिवाय इतर सर्व ठिकाणींहि लाविलें. स्मिथच्या कांहीं मुद्यावर बेंथम व लॉरडेल यांनीं टीका केली. परंतु ती विशेष महत्त्वाची नाहीं. यांत्रिक युगाचे दोष आमच्याप्रमाणें स्मिथच्या निदर्शनास न आल्यामुळें स्वातंत्र्य व नियंत्रणाभाव यांनीं किती नुकसान होतें याची त्यास कल्पना झाली नाहीं. यांत्रिक युगांतील दोषांमुळें समाजसत्तावाद अस्तित्वांत आला व प्रजावृद्धीच्या प्रश्नाकडे लोकांचें लक्ष्य ओढलें गेलें. हा प्रश्न प्रथम माल्थस या अर्थशास्त्रज्ञानें पुढें आणिला. गॉडविन व कॉनडॉरसे यांनीं समाजांतील सर्व दुःखें विभजनाच्या विषमतेमुळें उत्पन्न होतात असें प्रतिपादिलें होतें. संपत्ति विपुल आहे परंतु तिची वाटणी बरोबर होत नाहीं असा यांचा समज होता. माल्थसनें याविरुद्ध प्रमाणें आणून असें दाखविलें कीं, समाजसंस्था कितीहि उत्तम असल्या व संपत्ति कितीहि असली तरी प्रजावृद्धीमुळें लवकरच दारिद्र्य येऊन जीवनकलह तीव्र होईल. १७६१ त वॉलेसनें या कल्पनेचा उपक्रम एका ग्रंथांत केला होता. भविष्यकाळीं मनुष्यजाति अतिशय पूर्णतेला जाईल व जिकडे तिकडे आनंदीआनंद होऊन जाईल अशा रीतीची कॉनडॉरसेची कल्पना होती, माल्थसनें आपल्या ज्ञानांत कोणती भर

टाकली व प्रत्यक्ष आचरणांत आणण्यासारख्या कोणत्या कल्पना त्यानें दाखविल्या हें निश्चित सांगणें कठिण आहे. *मालथसला असें वाटलें कीं, प्रजेची वृद्धि व निर्वाहाच्या साधनाची वृद्धि यामधील संबंध आपण प्रथम दाखविला. पण हें खरें नाहीं. त्यापूर्वी पुष्कळ ग्रंथकारांनीं हा संबंध दाखविला होता.* मालथसचा मुख्य सिद्धांत असा होता कीं, प्रजा ही *भूमितिश्रेढीनें वाढते व अन्न हें गणितश्रेढीनें वाढतें.* परंतु हा सिद्धान्त चुकीचा आहे. प्रजावृद्धि होण्यापूर्वी लढाया रोग व दारिद्र्य यानीं ती निरुद्ध होईल किंवा दारिद्र्याच्या भीतीमुळें लोक कुटुंबाच्या वृद्धीस आपल्या आचरणानें आळा घालतील या कारणानें 'वाढते' या शब्दाच्या ऐवजी 'वाढण्याची प्रवृत्ति असते' असे शब्द घालणें जरूर आहे. *परंतु असें केल्यानें मूळ सिद्धांत संदिग्ध व विस्कळित होतो यांत संशय नाहीं.*

त्याचप्रमाणें मालथसच्या ग्रंथातील ऐतिहासिक शोध विशेष महत्त्वाचा नाहीं. कारण या अवडंबराशिवाय मालथसचा मूलसिद्धांत पुष्कळांनीं पूर्वींच जाहीर केलेला होता. प्रजावृद्धीच्या प्रश्नास दुसऱ्या एका सिद्धांतामुळें जास्त महत्त्व येतें. तो सिद्धांत म्हणजे जमिनीच्या उत्पन्नाचें उत्तरोत्तर होणारें कमी प्रमाण हा होय. प्रजा जास्त वाढल्यास जास्त अन्न *लागतें व हें उत्पन्न करणें उत्तरोत्तर कष्टसाध्य होतें. याच कारणास्तव मिलनेंहि या प्रश्नास विशेष महत्त्व दिलें;* परंतु *प्रजावृद्धीपासून होणाऱ्या आपत्तीची अतिशयोक्ति करणें* योग्य नाहीं. एखाद्या शक्तीपासून एखादें कार्य होतें म्हणून तें कार्य निश्चयानें होईल, असें यंत्रशास्त्रांत सांगतां येत नाहीं त्याचप्रमाणें प्रजावृद्धि प्रतिबंधकाच्या अभावीं एखादें कार्य करील म्हणून हे प्रतिबंधक अस्तित्वांत नाहींत, असें मानणें शास्त्रविरुद्ध आहे. प्रत्येक समाजांत व्यक्तिशः मनुष्य आपल्यास जास्त अपत्यें झाल्यास आपली स्थिति हीन होईल, या कल्पनेनें प्रजेचें नियंत्रण करीत असतो. मालथसच्या मतानें हें नियंत्रण फक्त विवाहाची मर्यादा ठोकविणें एवढेंच आहे. विवाहित असून ब्रह्मचर्य पालन करण्याची कल्पना ही नंतर मिलनें सुचविली. *अतिशय उशीरां विवाह करण्याचा उपदेश गरीब लोकांस करणें योग्य नाहीं.* कारण पुष्कळ प्राप्ति मिळाल्याशिवाय विवाह करावयाचा नाहीं असें ठरविल्यास बऱ्याच लोकांचें वृद्धपणा येईपर्यंत विवाहच होणार नाहींत, हें मालथस व त्याचे अनुयायी विसरतात. शिवाय विवाहित स्थितीपासून होणारें सौख्य शांति व इतर नैतिक फायदे लक्षांत घेतल्यास मालथसचा उपदेश अव्यवहार्य आहे असें म्हणणें प्राप्त आहे. मूळ सिद्धांतापासून मालथसनें अशीं अनुमानें काढलीं कीं. कोणत्याहि सरकारनें प्रजावृद्धीस उत्तेजन देऊं नये व गरीब लोकांकरितां सरकारी खर्चानें अनाथगृहें काढूं नयेत; परंतु हीं दोनहि विधानें चुकीचीं आहेत. कांहीं अवस्थांमध्यें प्रजा जास्त होणें हें समाजास हितकारक असतें. त्याप्रमाणें गरीबांची कांहीं तरी व्यवस्था लावणें हें अत्यावश्यक आहे. मालथसचें तत्त्व पूर्णपणें अमलांत आणिल्यास गरीबांचीं मुलें आपल्यादेखत अभावाचून मृत्युमुखीं पडूं दिलीं पाहिजेत; परंतु कोणताहि धर्म असें करण्यास अनुज्ञा देणार नाहीं. असें असल्यामुळें तत्त्वतः व न्यायदृष्टीनें मालथसचे उपसिद्धांत बरोबर असले तरी धर्माच्या ध्येयाविरुद्ध आहेत. *मालथसचा उपदेश श्रीमंत लोकांस पटण्यासारखा आहे.* कारण त्यामुळें गरीब लोकांस मदत करण्याची त्यांच्यावरची जबाबदारी नाहींशी होते. डार्विनचें तत्त्व प्रसिद्ध झाल्यापासून मालथसची कीर्ति जास्त वाढली कारण त्या तत्त्वांतील 'जीवनकलह' हें अंग मालथसनें डार्विनच्या अगोदर प्रतिपादिलें होतें. प्रजावृद्धीसंबंधांत डार्विनचें मत मालथसच्या विरुद्ध होतें. कारण तीपासून होणारा कलह हा जगाच्या *प्रगतीस आवश्यक आहे, असें डार्विनचें मत होतें. आधुनिक काळीं मालथसच्या शिकवणीचा कांहीं लोकांनीं विपर्यास* करून ज्यांना ज्यांना जीवनकलहांत जीवंत राहण्याची शक्ति नाहीं, त्यांनीं खुशाल नष्ट व्हावें असें प्रतिपादिलें आहे. परंतु दया व विचारशक्ति या दोन तत्त्वांनीं जीवनकलहाचा निष्ठुरपणा कमी होतो व मनुष्यसमाजांत नुसतें युद्ध हें तत्त्व लावून चालणार नाहीं, हें त्यांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. *डेव्हिड रिकार्डो हा स्मिथचा अनुयायी होता;* परंतु स्मिथनें प्रत्येक उपपत्तीच्या समर्थनार्थ इतिहासांतील पुरावा देण्याचा उपक्रम केला होता तो यानें सोडून दिला. ठराविक गृहीत *प्रमेयापासून भूमितीच्या पद्धतीनें एकामागून एक अशीं अनुमानें काढण्यास त्यानें सुरवात केली.* क्वचित् उदाहरणें दिल्यास तींहि काल्पनिक असत. त्यामुळें प्रथमदर्शनीं त्याचे सिद्धांत निश्चित व अर्थपूर्ण असें वाटतात; परंतु स्मिथच्या ग्रंथांत प्रत्यक्ष जगाशीं आपला संबंध आहे, असें वाचकास वाटतें, तसें रिकार्डोचा ग्रंथ वाचतांना वाटत नाहीं. दुसरा एक दोष त्याच्या ग्रंथांत सापडतो व तो शब्दाचे अर्थ वारंवार बदलणें हा होय. शास्त्रपद्धतीच्या दृष्टीनें हा दोष फारच घातक आहे. विशेषतः रिकार्डो यानें 'विभजना'च्या प्रश्नाचा जास्त विचार केला आहे. त्याचे कांहीं सिद्धांत येणेंप्रमाणें आहेत. *प्रत्येक वस्तूची किंमत, तिचा पुरवठा वाढेल तितका होणें शक्य असल्यास तिच्या उत्पादनास* लागणाऱ्या श्रमावर अवलंबून असते; परंतु यांत भांडवलाचा उल्लेख नसल्यामुळें अतिशय उच्च दर्जा प्राप्त झालेल्या औद्योगिक समाजांत हा सिद्धांत अपुरा पडतो. भांडवल हा एक श्रमाचाच प्रकार आहे; अशी त्याची कल्पना आहे परंतु ती भ्रामक आहे. या घोटाळ्यामुळें कांहीं काळानंतर 'सोशिॲलिझम्' मधील अनेक भ्रामक सिद्धांत उद्भवले. *वस्तुतः उत्पादनाच्या श्रमाचा पुरवठ्यावर परिणाम होऊन नंतर किंमतीवर होतो; प्रत्यक्ष रीतीनें होत नाहीं. रिकार्डोनें जमिनीच्या खंडाचें अर्थशास्त्रीय स्पष्टीकरण* उर्फ रिकार्डोचा

'खंडावरचा सिद्धांत' हा त्याचा स्वतःचा नसून त्याच्या पूर्वी अँडरसन व मालथस यांनीं त्याचा स्पष्ट उल्लेख केला होता. जमिनींत जें एकंदर उत्पन्न होतें त्याची किंमत, व तें पैदा करण्याचा जो सर्व खर्च होतो, त्या या दोन रकमांतील फरक हा खंड होय. एकंदर देशांत जें धान्य किंवा इतर शेतीचा माल तयार होतो, त्याची दरमणी किंमत, सगळ्यात जास्त खर्चानें उत्पन्न होणारा जो त्या धान्याचा भाग असेल, त्याच्या उत्पादनाच्या खर्चाइतकी असते व त्यामुळें कमी खर्चानें उत्पन्न होणाऱ्या धान्यावर त्या प्रमाणानें खर्च जाऊन शिल्लक राहते या शिलकीच्या इतकाच प्रत्येक जमिनीचा खंड असला पाहिजे. या रिकार्डोच्या सिद्धांताप्रमाणें खंड मुळींच न देणारी एक जमीन कल्पावी लागते. खंड जरी जमीनदारानें माफ केला तरीहि धान्याच्या किंमतीवर कांहीं परिणाम होणार नाहीं कारण खंडामुळें धान्याची किंमत निश्चित होत नसून धान्याच्या किंमतीवरून खंड निश्चित होतो. ही खंडाची उपपत्ति अंशतः स्मिथच्या ग्रंथात दृग्गोचर होते असें दिसतें. तथापि स्मिथच्या व ह्यूमच्या दरम्यान झालेल्या पत्रव्यवहारावरून असें म्हणावें लागतें कीं, स्मिथला अँडरसनची उपपत्ति संमत नव्हती. रिकार्डोनें भिन्न जमिनींची नैसर्गिक शक्ति भिन्न असल्यामुळें खंडात फरक होतो असें मानलें; परंतु रेल्वेपासून जवळ किंवा दूर असणें इत्यादि जमिनीच्या स्थानभिन्नत्वामुळें होणाऱ्या फायद्यापासूनहि खंडात फरक होईल हें त्याच्या लक्षात आलें नाहीं. रिकार्डोच्या 'खंड' शब्दानें खरोखरी जो खंड ठरलेला असतो, तो ध्वनित होत नाहीं; परंतु काल्पनिक खंड ध्वनित होतो. प्रत्यक्ष दिलेल्या खंडात खंड व नफा असे दोन अवयव असतात. हे अवयव भिन्न दाखविणें हें पुष्कळ वेळां कठिण असतें, परंतु रिकार्डोचें मत असें होतें कीं, भांडवल खर्चून जमिनीचा मगदूर नेहमींचा वाढला म्हणजे नफा व खरा खंड हीं एकजीव होऊन दोनहि मिळून त्यास खंडाचेंच स्वरूप प्राप्त होतें शेतकीमध्यें निसर्गाची मनुष्यास मदत होते व कारखान्यात होत नाहीं, ही स्मिथची कल्पना रिकार्डोस संमत नव्हती. जमिनीचा खंड येतो तो निसर्गाच्या मदतीमुळें नव्हे, तर धान्याच्या किंमतीमुळें येतो व ही किंमत अशी असते कीं, मागणी व पुरवठा याची या किंमतीच्या बिंदूच्या ठिकाणी समता असते. जमिनीच्या मशागतींत सुधारणा केल्यानें उत्पन्नाच्या मानानें खंड कमी होऊं शकेल, परंतु लोकसंख्या वाढल्यास खंडानें मागणारे वाढून खंड नेहमींच वाढत जाईल रिकार्डोनें मजुरी व नफा याविषयींची आपली उपपत्तीहि जमिनीच्या खंडाच्या उपपत्तीवर आश्रयभूत अशी रचली होती. धान्याची किंमत वाढल्यामुळें मजुरी वाढेल व मजुरी व नफा हीं व्यस्त प्रमाणांत असल्यामुळें नफा कमी होईल. भांडवलवाले व मजूर यामध्यें अशा तऱ्हेचा विरोध नेहमींच राहील व दोघांचें नफानुकसान कांहीं झालें तरी जमीनदाराचा नेहमींचा खंड वाढून फायदा होईल. कारखान्यात सुधारणा झाल्यास फायदेशीर होऊन नफा अधिक होईल; परंतु एकंदरीनें नफ्याचा दर कमी होत जाईल. मजुरी ही मजुरास अगदीं आवश्यक वस्तू विकत घेण्यापुरतीच नेहमीं राहील. कारण मजुरी वाढल्यास पुनः लोकसंख्या वाढून पूर्वोक्त स्थिति येईल. एवंच रिकार्डोच्या उपपत्तींत मजुराची स्थिति सुधारण्याची कांहीं एक आशा नाहीं. मजुराची रहाणी उच्च दर्जाची केल्यास त्या रहाणीप्रमाणें थोडीशी मजुरी वाढेल एवढें तो कबूल करतो, परंतु हें कसें करावें हें त्यानें सुचविलेलें नाहीं, मजुरीच्या या सिद्धांताचा फायदा घेऊन समाजसत्तावादी लोकांनीं आपली भव्य इमारत या पोकळ पायावर पुढें रचिली व क्रांति केल्याशिवाय मजुराची स्थिति सुधारणार नाहीं असें ठरविलें. एकंदरीनें पहाता रिकार्डोची जमिनीच्या खंडाची उपपत्ती व त्यावरील इतर अनुमानें हीं कांहीं गृहीतप्रमेयें मान्य केलीं तरच खरीं आहेत, अन्यथा नाहीं असें म्हणणें भाग पडतें. काल्पनिक अशा "आर्थिक मनुष्याच्या" आधारावर त्याच्या सर्व इमारतीचा विस्तार केलेला आहे. त्यामुळें पुरातन आचार, संघशक्ति इत्यादि गोष्टींकडे त्याचें लक्ष मुळींच गेलें नाहीं. त्याचप्रमाणें थोड्याशा फायद्याकरितां मजूर व कारखानदार हे आपला धंदा बदलतील इतकी 'स्पर्धा' पूर्णतेस गेली आहे, असें त्याच्या सिद्धांतांत मानावें लागतें. या त्याच्या दोषामुळें इंग्लंडातील पुढील सर्व अर्थशास्त्रावरील वाङ्मयात एक प्रकारचा काल्पनिकपणा शिरला व तो आजमितीसहि कमी झालेला नाहीं. रिकार्डोच्या जमिनीच्या खंडावरील विवेचनांत परदेशगमन हें मुळींच हिशोबात धरलेलें नाहीं, त्यामुळें देशातील जमिनीवरच सर्वांचा निर्वाह आहे, अशा कल्पनेवर त्याचे सिद्धांत बसविलेले होते त्याचप्रमाणें परदेशातून हजारों खंडी धान्य आणता येतें, याचीहि त्यास कल्पना नव्हती. प्रो. निकलसन या अर्थशास्त्रज्ञानें याच कारणाकरितां रिकार्डोची जमिनीच्या खंडाची उपपत्ति 'निरुपयोगी व तात्त्विक' आहे असें स्पष्ट मत दिलें आहे. इतर देशांशीं व्यापार करण्यापासूनचे फायदे रिकार्डोनें चांगल्या रीतीनें दाखविले आहेत. आपल्या देशात ठराविक श्रम व भांडवल याच्या मदतीनें जितक्या वस्तु पैदा होतात, त्यापेक्षां जास्त वस्तु परदेशाशीं व्यापार करून मिळतात. रिकार्डोनें असें सिद्ध केलें कीं, दोनहि वस्तु आपल्या देशात स्वस्त होत असल्या तरीहि ज्या वस्तूमध्यें आपल्या देशास तुलनेनें अधिक फायदा होतो ती वस्तु आपण उत्पन्न करून कमी फायदा होतो ती वस्तु दुसऱ्या देशातून आणणें हें एकंदर देशास हितकारक होतें. हाच सिद्धांत पुढें मिल व बॅस्टेबल यांनीं जास्त विस्तारानें विशद केला. एकंदर देशाच्या संपत्तिविषयीं रिकार्डोचें असें मत आहे कीं, देशाच्या एकंदर उत्पन्नातून मजुरीचा खर्च वजा जाता जी निव्वळ बाकी राहून ती जास्त महत्त्वाची आहे. ही बाकी म्हणजे अर्थात

जमिनीचा एकंदर खंड व एकंदर नफा याची बेरीज. ह्या संपत्तीचा उपभोग घेण्यास देशात कमी किंवा अधिक मनुष्यें असली तरी सारखेंच. समाजशास्त्राच्या अभ्यासास रिकार्डोची बुद्धि अनुकूल नव्हती असें म्हणावें लागतें. अनुमान करण्यात त्याचें कौशिल्य स्तुति करण्यासारखें, परंतु मनुष्यस्वभावाविषयीं त्याचें ज्ञान फार थोडें होते व सामाजिक सहानुभूतीचा याच्या ठिकाणीं अभाव होता. समाजातील कार्यकारणसंबंध फार क्लिष्ट असतात, हें त्याच्या मनावर ठसलेलें नव्हतें, त्यामुळें थोड्याशा आधारावर व्यापक सिद्धांत करण्याचें साहस त्याच्या हातून झालें. त्याचप्रमाणें वस्तुस्थितीविषयीं यथार्थ ज्ञान करून घेण्याचा त्यानें प्रयत्न केला नाहीं. बँकिंग, चलन इत्यादि प्रश्नांत त्याचीं मतें मान्य असल्यामुळें त्याच्या इतर सिद्धांताविषयीं काहीं लोकांत आदर उत्पन्न झाला, त्यामुळें त्याच्या योग्यतेपेक्षा अधिक मान त्यास काहीं कालपर्यंत मिळाला; परंतु स्मिथशीं तुलना करतांना तो अगदीं कमी दर्जाचा समाजशास्त्रज्ञ होता असें निःसंशय म्हणता येईल. माल्थसचेंहि त्याच्याविषयीं फार प्रतिकूल मत होतें. रिकार्डोच्या अनुषंगानें पुढील अर्थशास्त्राची पद्धति भ्रष्ट झाली. वस्तुस्थितीकडे लक्ष न देता निगमनपद्धतीनें एकामागून एक अनुमानें काढण्याचा त्याच्या अनुयायांनीं अव्याहत क्रम चालविला. स्मिथ व रिकार्डोनंतर अनेक लहान ग्रंथकारांनीं त्यांचे सिद्धांत व्यवस्थित करून, त्यांच्या लागू पडणाऱ्या मर्यादा ठरवून व्यवहारांतील अनेक प्रश्न सोडविण्याकरितां त्यांचा उपयोग केला. अशा ग्रंथकारांत जेम्स मिल, मॅककुलॉक, सीनियर, कर्नल टॉरन्स बेंथेम, थॉर्नटन, चॅमर्स, व्हेटले, रिचर्ड जोन्स हे प्रमुख होते. यांपैकीं जोन्स यानें रिकार्डोच्या पद्धतीवर सांगोपांग व पद्धतशीर टीका केली आहे विशेषतः जमिनीच्या खंडाची उपपत्ति प्रत्यक्ष व्यवहारांतील खंडास लागू पडत नाहीं हें त्यानें दाखविलें. जोन्सची अनुमानपद्धति अनुगमनात्मक म्हणजे प्रत्यक्षसंकलनात्मक होती नुसत्या तत्त्वापेक्षा प्रत्यक्ष व्यवहारांतील दृश्याकडे जास्त लक्ष दिलें पाहिजे नाहीं तर सिद्धांत निवळ तात्त्विक व पोकळ राहातात असें त्यानें जोरानें प्रतिपादन केलें. इंग्लंडांतील संस्था व परिस्थिति यांचें उदाहरण घेऊन त्याचप्रमाणें सर्व जगांत व सर्व काळीं समाजाच्या कोणत्याहि अवस्थेंत ते सिद्धांत लागू पडतील असें मानणें हें शास्त्राच्या प्रगतीस विघातक आहे असें त्याचें मत होतें. जर्मनींतील ऐतिहासिक पद्धतीच्या पुरस्कर्त्यांचीं पुष्कळशीं मतें जोन्सच्या ग्रंथांत सांपडतात. त्यामुळें त्याची योग्यता फार मोठी आहे. त्याच्या मताचें क्लिफ लेस्ले याच्या मताशीं पुष्कळ साम्य आहे त्यामुळें या दोघास इंग्लंडांतील 'ऐतिहासिक पद्धती' चे पुरस्कर्ते असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं.

जोन्स व लेस्ले याच्या आक्षेपावर कांहीं लोकांचें असें उत्तर आहे कीं, हल्लीं इंग्लंड व फ्रान्स या देशांत जी औद्योगिक परिस्थिति आहे ती हल्लीं अपवादक असली तरी कालांतरानें सार्वत्रिक होईल. परंतु हें खरें मानलें तरीहि प्रचलित निरनिराळ्या संस्था व परिस्थिति या सर्वांना रिकार्डोचे सिद्धांत लावणें हें अप्रयोजक व निष्फळ आहे. रिकार्डोनंतरच्या या वादविवादामुळें पुष्कळ लोकांस असें वाटलें कीं, अर्थशास्त्राचे सिद्धांत हे निश्चित नसून घोटाळ्याचे आहेत. कांहीं लोकांचें तर असें मत झालें कीं हें शास्त्रच नव्हे. परंतु मिलनें सर्व सिद्धांतांस सुव्यवस्थित स्वरूप दिल्यामुळें व पुष्कळ वादांचें स्पष्टीकरण केल्यामुळें ही कल्पना हळके हळके नष्ट झाली. इंग्लंडांतील इतर अर्थशास्त्रज्ञांपेक्षा मिलनेंच आधुनिक काळीं अर्थशास्त्राची प्रसिद्धि करण्यास जास्त मदत केली हें निर्विवाद आहे. त्याचा मुख्य ग्रंथ विस्तृत, पद्धतशीर व भाषेच्या दृष्टीनेंहि फार मोहक असा आहे. १८४० पासून जवळ जवळ त्या शतकाच्या शेवटपर्यंत त्याच्या ग्रंथाचेंच परिशीलन जास्त लोकांनीं केलेलें आहे. प्रथम १८४४ मध्यें त्यानें कांहीं निबंध प्रसिद्ध केले, त्यांतील मुख्य सिद्धांत येणेंप्रमाणें होते-देशादेशांतील व्यापारांत निर्यात वस्तु आयात वस्तु यांचें परिमाण एकच होईल अशा रीतीनें त्यांची किंमत निश्चित होते. परदेशांतील मालावरील जकात माफ करतांना त्या देशानें इंग्लंडशीं खुला व्यापार प्रस्थापित करावा अशी अट घालावी. कांहीं कालपर्यंत आवश्यक वस्तूंपेक्षा फाजील वस्तूंचें उत्पादन होऊं शकतें, परंतु सर्व कालपर्यंत असें होणें शक्य नाहीं. नफा व मजुरी हीं एकमेकांशीं व्यस्त प्रमाणांत असतात. याशिवाय या निबंधांत त्यानें अर्थशास्त्रांत कोणती तार्किक पद्धति अनुकूल आहे याचें, आणि उत्पादक व अनुत्पादक श्रम या महत्त्वाच्या प्रश्नाचें विवेचन केलें आहे. १८४८त मिलनें आपला मुख्य ग्रंथ प्रसिद्ध केला. स्मिथचा ग्रंथ नवीन शोधामुळें प्राचीन झाल्यामुळें नवीन अधिकारयुक्त ग्रंथाची उणीव दूर करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. परंतु ही पूर्ण झाली नाहीं. वस्तुतः स्मिथ, रिकार्डो व माल्थस यांच्या सिद्धांताच्या पुढें तो विशेष गेला नाहीं. बहुतेक ठिकाणीं रिकार्डोचें त्यानें समर्थनच केलें, परंतु रिकार्डोमध्यें समाजविषयक सहानुभूतीचा जो अभाव होता तो मिलच्या ठिकाणीं नव्हता. बहुतेक सामाजिक प्रश्नांसंबंधानें त्याच्या भावना उदात्त असत. त्यामुळें बेंथॅमच्या कोत्या कल्पनास त्यानें थारा दिला नाहीं. ही त्याची वृत्ति कॉन्ट याच्या ग्रंथांशीं त्याचा परिचय झाल्यामुळें अधिक दृढ झाली. परंतु त्याचा बेंथॅम व जेम्स मिल यांच्याशीं पूर्ववयांत निकट संबंध असल्यामुळें त्याच्या कल्पनाचें नकळत त्याच्या विचारांवर प्रतिबिंब पडत असे. हा दोष शेवटपर्यंत नाहींसा झाला नाहीं, व त्यामुळें त्याच्या ग्रंथांत ऐतिहासिक पद्धति व निगमनपद्धति यांचें मिश्रण कायमचें राहिलें. मिलच्या मतानें त्याच्या ग्रंथाचें विशिष्टत्व उत्पादनाचे नियम व

विभजनाचे म्हणजे वांटणीचे नियम यांतील भेद दाखविणें हें होय. यांपैकीं उत्पादनाचे नियम हे आधिभौतिक नियमाप्रमाणें अचल असतात, व विभजनाचे नियम हे मनुष्यप्रयत्नावर अवलंबून असल्यामुळें चल असतात. यामुळें विभजनाच्या विषमतेमुळें उत्पन्न झालेल्या दारिद्र्यादिक दोषांचे संस्थांमध्यें बदल करून, व समाजघटनेची सुधारणा करून, निराकरण करतां येतें. या विचाराचा परिपाक होतां होतां अखेरीस मिलचीं मतें समाजसत्तावादाच्या मताप्रमाणें व्यक्तिस्वातंत्र्यास प्रतिकूल अशीं झालीं. ही विचारक्रांति त्यानें आपल्या आत्मचरित्रांत सुंदर रीतीनें कथन केली आहे. आधुनिक समाजरचना ही तात्पुरती असून तिचें पर्यवसान न्यायाच्या तत्त्वावर संपत्तीची सारखी वांटणी करण्यांत होईल, असें त्यास शेवटीं वाटूं लागलें. जमीन व उत्पादनांचीं साधनें हीं सर्व समाजाच्या मालकीचीं असावीं, असें स्पष्ट मत त्यानें अर्थशास्त्रीय ग्रंथाच्या तिसऱ्या आवृत्तींत नमूद केलें आहे. तथापि ही गोष्ट लवकर साध्य होईल असें त्यास वाटत नव्हतें, कांहीं काळपर्यंत खासगी मालमत्तेची संस्था व व्यक्तिस्वातंत्र्य हींच अवश्यक आहेत. कुळाच्याच मालकीची जमीन झाल्यास जमिनीवर फायदा होईल हें त्याच्या प्रसिद्ध मतांपैकीं एक मत होतें त्याचप्रमाणें सहकारी संस्थांचा तो पुरस्कार करीत असे. परंतु या संस्थामध्यें स्पर्धेचें तत्त्व अजीबात नाहींसें झालेलें नाहीं. मजुरांची स्थिति प्रजानियंत्रण झाल्याशिवाय चांगली होणार नाहीं. असें मिलचें मत होतें. मजुरास आपल्या दारिद्र्याच्या सबबीवर श्रीमंत लोकांच्याविरुद्ध चळवळ करून समाजांत कलह माजविण्यास मिलनें उद्युक्त केलें. श्रीमंत लोकांजवळ संपत्ति आहे, पण तीबरोबर त्यांची जबाबदारी आहे व आपली शक्ति खालच्या वर्गांच्या हिताकरितां उपयोगांत आणणें हें त्याचें कर्तव्य आहे हें मिलच्या ध्यानात आलें नाहीं. एकंदरीत, व्यावहारिक दृष्टीचा त्याच्या ठिकाणीं अभाव होता, व तात्त्विक विवेचनाच्या भरांत प्रचलित समाजातील दोषांची तो अतिशयोक्ति करीत असे. समाजशास्त्रांत व अर्थशास्त्रांत निगमनपद्धतीचा अथवा प्रत्यक्षसंकलनमूलक अनुगमनपद्धतीचा अवलंब करावा हें शेवटपर्यंत त्यानें निश्चित केलें नाहीं. त्याचप्रमाणें अर्थशास्त्र हें स्वतंत्र आहे किंवा समाजशास्त्राचाच एक भाग आहे हेंहि शेवटपर्यंत त्यानें निश्चित ठरविलें नाहीं केन्र्सनें अर्थशास्त्राच्या तार्किक पद्धतीवर एक स्वतंत्र पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्यानें निगमनपद्धतीचाच अवलंब केला आहे. अनुगमनपद्धति ही अर्थशास्त्रांत अयोग्य आहे असें त्यानें स्पष्ट म्हटलें आहे. केन्र्सच्या मतें अर्थशास्त्रांतील सिद्धांत हे काल्पनिक असून प्रत्यक्ष जगाशीं त्यांचा कांहीं एक संबंध नाहीं, मिल व केन्र्स या दोघांच्या मतांचा असा परिणाम झाला कीं रिकार्डोचे सिद्धांत हे प्रत्यक्ष खरोखरीच्या मनुष्यांविषयीं नसून काल्पनिक अशा "आर्थिक मनुष्यां' विषयीं आहेत हे सर्वांस स्पष्टपणें कळून चुकलें. शिवाय मिलचें असें स्पष्ट मत होतें कीं अर्थशास्त्राचें काम फक्त सिद्धांत सांगण्याचें असून विधिनिषेधात्मक उपदेश करण्याचें त्याचें काम नाहीं. अर्थशास्त्र हें निवळ शास्त्र आहे. कला नाहीं. अर्थात नीतिशास्त्राचा व अर्थशास्त्राचा बिलकूल संबंध नाहीं. त्यामुळें अमुक झालें असतां अमुक होईल असें सांगण्या पलिकडे त्याचा मुळींच अधिकार नाहीं. "अर्थशास्त्राचीं मुख्य तत्वें" ह्या ग्रंथांत केर्न्सनें पूर्वीच्या सिद्धांतांस:मर्यादित करून निराळें स्वरूप दिलें. एकाच देशामध्यें स्पर्धा ही पूर्ण नसून मजुरांमध्येंहि असे भिन्न वर्ग आहेत कीं ज्यामध्यें स्पर्धा मुळींच असूं शकत नाहीं. हें एक महत्वाचें तत्त्व त्यानें निदर्शनास आणिलें. सार्वराष्ट्रीय व्यापारांत उत्पादनाच्या खर्चावर वस्तूंची किंमत अवलंबून असत नाहीं असें दाखवून त्यानें रिकार्डोची उपपत्ति मर्यादित केली व मागणी आणि पुरवठा हींच किंमतीचीं निर्णायक असतात असें दाखविलें. मागणी व पुरवठा यासंबंधानें त्यानें असें स्पष्टीकरण केलें कीं, मागणीचा अर्थ प्रचलित मागणी व पुरवठा याचा प्रचलित पुरवठा असाच घेतला पाहिजे. भावी पुरवठा वाढल्यास किंमत बदलूं शकेल प्रत्येक देशांत एक मजुरीचा असा आकडा असतो कीं, त्याचें आणि एकंदर भांडवलाच्या आंकड्याचें एका ठराविक प्रमाणें असतें अशा तऱ्हेची मिलची एक कल्पना होती.–हिला 'मजुरीच्या निधी' ची उपपत्ति असें त्यानें नांव दिलें होतें तिचें केर्न्सनें समर्थन केलें. मजुरांची स्थिति नुसती उत्पादनाची प्रगति होऊन सुधारणार नाहीं कारण त्या प्रगतीचा त्याच्या मजुरीवर कांहींच परिणाम होणार नाहीं. म्हणून सहकारितेच्या तत्वावर भांडवलवाल्यांना काढून टाकून भांडवलाचा नफा मजूरांत सामील केल्याशिवाय गति नाहीं असें त्याचें मत होतें सार्वराष्ट्रीय व्यापारांत आयात व निर्यात माल यांची बरोबरी होते असें मिलच्या उपपत्तींत शब्द होते ते बदलू त्यानें 'एकंदर कर्ज' हे शब्द घातले, कारण मालाशिवाय खंडणी, बँकिंग कमिशन, कर्जरोखे इत्यादिकांचा अशा व्यापारातील वस्तूंच्या किंमतीवर परिणाम होतो. खुल्या व्यापाराचें समर्थन करण्याकरितां केर्न्सनें संरक्षकपद्धतीच्या प्रचलित सर्व आक्षेपांचें खंडन केलें. परंतु हें खंडन विशेष समाधानकारक नव्हतें. केर्न्स हा सांप्रदायिक इंग्रजी अर्थशास्त्र्यांपैकीं शेवटचा होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु हीं सांप्रदायिक मतें टिकतील ही केर्न्सची आशा व्यर्थ होती.

फ्रान्समध्यें बहुतांशीं इंग्रजी संप्रदायाचाच पुरस्कार ग्रंथकारांनीं केला. स्मिथच्या ग्रंथाचें विशदीकरण करण्याचें काम जे. बी. से. यानें केलें. त्याचें पुस्तक स्मिथच्या ग्रंथापेक्षां जास्त पद्धतशीर व विशद होतें परंतु स्मिथच्या ग्रंथांतील ऐतिहासिक पुराव्याचा त्यानें विशेष उपयोग केला

नाहीं. एकंदरीनें पहातां सेच्या ग्रंथात नवीन असें कांहीं नव्हतें, परंतु प्रचलित सिद्धांत मनोरंजक रीतीनें लोकप्रिय करण्यात त्याचें कौशल्य अप्रतिम होतें. सिसमाँडी हा सांप्रदायिक मताच्या विरुद्ध होता. प्रचलित अर्थशास्त्रांत सहानुभूतीचा पूर्ण अभाव होता व श्रीमंत जमीनदार व भांडवलवाले यांस त्यांतील सिद्धांत अनुकूल होते असें त्याचें मत होतें, समाजसत्तावादाविषयीं त्याचें अनुकूल मत होतें परंतु *नवीन समाजघटना करण्याविषयीं त्याचें मन* साशंक होतें सरकारचें नियंत्रण पुष्कळ बाबतींत फायदेशीर *असतें*, व फिजिओक्रॅट-पंथाचें ' पूर्ण स्वातंत्र्य ' हें हितकारक नाहीं असें त्यास दिसून आलें. त्यामुळें 'सरकार' ही शक्ति फक्त शांतता राखण्याकरितां नसून समाजांतील सर्व वर्गांस समाजांतील प्रगतीचे फायदे प्राप्त करून देण्याकरितां आहे असें त्यानें प्रतिपादन केलें. यांत्रिक युगाचा तो द्वेष करीत असे परंतु यांत्रिक युगांत नैतिक भावनांचा प्रवेश कसा करावा हें त्यास सांगतां आलें नाहीं. जमिनीवरील कुळाच्याच मालकीची जमीन असावी असें मिलप्रमाणेंच त्याचें मत होतें. व यापासून प्रजानियंत्रणास मदत होईल अशी त्याची कल्पना होती. *यानंतर चार्लस डुनोयर यानें अर्थशास्त्राचा समाज*-शास्त्रांत अंतर्भाव करून त्याला ऐतिहासिक स्वरूप देण्याचा *प्रयत्न केला. प्रगतीचे नियम अथवा कायदे त्यानें* स्थापित केले आर्थिक उत्पादनावर मानववंश, व संस्कृति यांचा व इतर *बाह्य परिस्थितीचा काय परिणाम होतो, याचें* त्यानें वर्णन केलें. मानवी वस्तुविनिमयाच्या मुख्य उद्देश एकमेकांची सेवा व उपयुक्त कामें करणें हा आहे; सर्व मूल्याचा उगम मनुष्यांच्या प्रयत्नांत आहे; सृष्टि ही मनुष्य प्रयत्नास बिनमोबदला मदत करिते; जमिनीचा खंड हा एक व्याजाचा प्रकार आहे. हे बास्तियाचे सिद्धांत डुनोयरच्या ग्रंथांत सांपडतात. सरकारी नियंत्रण हें नेहमी त्रासदायक व प्रजेच्या स्वातंत्र्यास विरोध आणणारें आहे असें त्याचें मत होतें.

अमेरिकेंत पहिला महत्वाचा अर्थशास्त्रज्ञ कॅरे होता. त्याच्यापूर्वी बेंजामिन, फ्रँकलिन व अलेक्झँडर हॅमिलटन यांनीं कांहीं लहान पुस्तकें व अहवाल इत्यादिकांत आपले विचार नमूद केले होते पण ते विचार करण्याजोगे नव्हते. *जान रेमंड हा एक महत्वाचा व* स्वतंत्र विचारांचा ग्रंथकार कॅरेच्या अगोदर होऊन गेला. *कॅरे स्मिथचा विरोधी होता; मालथसचा प्रजावृद्धीची* उपपत्ति त्यास संमत नव्हती. जमिनींचे उत्पन्न हळूं हळूं कमी *होतें, हें तत्व सर्व समाजांतील अवस्थांत लागू पडत नाहीं.* असें त्याचें मत होतें. विनिमयमूल्यापासून संपत्ति उत्पन्न होते हें खरें नाहीं. संपत्ति ही उपयोग व *सुख यांवर* अवलंबून असते. विनिमयमूल्य समाजाच्या प्रगतींत कमी होतें परंतु खरी संपत्ति वाढत जाते. *वस्तूची किंमत तिच्या* प्रथम उत्पादनास जो खर्च पडला त्यावर अवलंबून नसून नवीन उत्पादनाच्या खर्चावर अवलंबून आहे. रिकार्डोच्या मतानें जमीन ही निसर्गाची देणगी असल्यामुळें तिचा मनुष्याच्या श्रमाशीं कांहीं एक संबंध नाहीं. परंतु कॅरेच्या मतानें जमीन ही निसर्गाची देणगी असली तरी हल्लींची *जमीन ही मनुष्याच्या अकटोविकट प्रयत्नांनीं मशागतीस* लायक झालेली आहे. त्यामुळें जमिनीवर पहिल्यानें मेहनत *करणाऱ्याचा तिच्यावर पूर्ण हक्क असतो व तो न्याय्य आहे.* या हक्कामुळें खंड घेणें हें अन्यायाचें नाहीं. कॅरेच्या मतानें रिकार्डोची जमिनीच्या खंडाची उपपत्ति काल्पनिक आहे व इतिहासाच्या विरुद्ध आहे प्रथम उत्तम जमीन लागवडीस येत नसून प्रथम कनिष्ठ व नंतर मध्यम व नंतर उत्तम अशा क्रमानें जमिनींची लागवड होत जमीनदार व मजूर यांचे हितसंबंध ऐक्याचे आहेत. जमिनींतून जें आपण काढतों तें तिच्यांत परत घातलें पाहिजे म्हणून स्वदेशांतील धान्य परदेशीं पाठविणें घातक आहे. याकरितां संरक्षक जकातीची पद्धति आवश्यक आहे. नवीन वसाहतींस खुला व्यापार अनिष्ट आहे. कॅरेच्या विचारावर लिस्टच्या ग्रंथाचा पुष्कळ परिणाम झाला होता.

यानंतर पुन्हा फ्रान्सकडे वळलें पाहिजे— कॉब्डेनच्या *खुल्या व्यापाराच्या* तत्वाचा बास्तिया यानें जोरानें पुरस्कार केला. याचा मुख्य ग्रंथ १८५० मध्यें प्रसिद्ध झाला व त्याचें नांव ' अर्थशास्त्रांतील एकतानता ' असें होतें. बास्तियाच्या ग्रंथाचें आद्यतत्व आशावाद हें होतें. एकंदर *सृष्टीची रचना अशी आहे कीं, सर्व गोष्टींचा परिणाम चांगला होऊन सर्व भावनांचें सुखांत* पर्यवसान होतें प्रत्येक मनुष्य *स्वार्थी असला तरी सर्वांच्या* क्रियांपासून परार्थ निष्पन्न होतो. *मूल्य* हें वस्तूंत नसून "*मनुष्यांच्या एकमेकांस केलेल्या उपयुक्त कामाचें तें प्रमाण आहे*" ही नवीन उपपत्ति त्यानें काढली. *समाजाच्या प्रगतीमुळें व्यक्तीच्या मालमत्तेचा भाग कमी होऊन* सामाजिक संपत्तीचा अधिक होतो. जमिनीच्या खंडाविषयीं त्याची उपपत्ति *कॅरेच्या उपपत्तीप्रमाणें होती. या उपपत्तींत* असा दोष आहे कीं, जरी जमीन हल्लींच्या स्थितीला आणण्यास श्रम पडलेले असले *तरी जमिनीचा सर्व खंड हा* व्याजाच्या स्वरूपाचा आहे असें नाहीं. त्याचा कांहीं अंश *तरी नैसर्गिक जमिनीच्या गुणाबद्दल* आहे असें मानलेंच पाहिजे. एकंदर बास्तियाची प्रवृत्ति प्रचलित संस्थांचें समर्थन करण्याकडे होती. *निसर्गाचे हक्क व सृष्टींतील अंतिम हेतू अशा तऱ्हेच्या कल्पना* त्याच्या सिद्धांतांच्या मुळाशीं असल्यामुळें तत्वज्ञानाच्या दृष्टीनें त्याची पद्धति सदोष होती. समाजांत अनेक कलह व घोटाळे होत असतां एकतानतेचें स्तोम माजविणें, व आशावादाचा ध्वनि काढणें हें अप्रयोजक आहे. नियंत्रणाभाव व व स्वातंत्र्य यापासून फायदे झाले आहेत; परंतु तोटेही झाले आहेत. समाजांत स्थितिस्थापकता आहे हें निर्विवाद आहे परंतु सर्व गोष्टींत स्थिरता येईल व

शांति उत्पन्न होईल असें मानणें म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होय.

कूर्नो हा गणितज्ञ व अर्थशास्त्रज्ञ होता. त्यानें अर्थशास्त्राचे सिद्धांत प्रस्थापित करण्याकडे गणिताचा उपयोग प्रथमत केला. गणिताच्या पद्धतींत असा दोष आहे कीं, प्रत्येक प्रश्नाच्या घटकांपैकीं पुष्कळसे वगळावे लागतात, यामुळें त्याचे सिद्धांत विशेष महत्वाचे नाहींत, व जे आहेत त्यांचें सत्यत्व संशयग्रस्त आहे. पुढें पुढें त्यानें ही पद्धति सोडून दिली. या पद्धतींत प्रथम जीं गृहीतप्रमेयें मानलीं जातात तीं लोकांना ग्राह्य व अत्यंतिक अशीं वाटण्याचा संभव असतो. शिवाय या पद्धतींत ज्या गोष्टींपासून अनुमानें काढावयाचीं त्या सर्व विचारांत घेऊन फार्म्युला म्हणजे संक्षिप्तसूत्र बनविण्याची जबाबदारी ग्रंथकारावर असते. तत्त्वतः ही पद्धति फलदायी नाहीं कारण सुखदुःख, उपयुक्तता, किंमत इत्यादिकांचें 'युनिट' म्हणजे मूलमान ठरविणें अशक्य आहे. गणिताचा अर्थशास्त्राला एवढाच फायदा आहे कीं, आपलीं गृहीतकृत्यें मूलसिद्धांत हे घोटाळ्याचें व सांदिग्ध नाहींत अशाबद्दल गणितज्ञ खबरदारी घेतो व स्पष्ट अर्थ ज्यास नाहीं अशीं तत्त्वें व सिद्धांत तो बाजूला टाकून देतो.

इटलींतील अठराव्या शतकांतील अतिशय प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ गिओजा हा होता. मोठ्या प्रमाणावर व्यापार करणें व यांत्रिक उत्पादन यांची तो स्तुति करतो. व्यापारावर नियंत्रण असावें व राजसत्तेचें अधिक बाबतींत नियमन व मार्गदर्शकत्व असावें असें त्याचें मत आहे. धार्मिक सत्तेचा पगडा व इतर मध्ययुगांतील संस्था यांच्या तो विरुद्ध होता. दुसऱ्या कांहीं ग्रंथकारांचीं नांवें पुढें दिलीं आहेत :—रोमॅनोसी, सिॲलोजा, सिॲरिओ, बोकॅर्डो, फेरेरा, बिॲंकिनी.

स्पेनमध्यें ऑर्टीझनें स्मिथच्या ग्रंथाचें भाषांतर केलें. याशिवाय जोव्हेलेनॉस यानें एक ग्रंथ लिहिला आहे.

जर्मनीमध्यें प्रथम स्मिथच्या ग्रंथाकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. फ्रेडरिक दि ग्रेट याला त्या ग्रंथाची माहिती नव्हती. एकोणसाव्या शतकाच्या प्रारंभीं स्टाईन या मुत्सद्यावर स्मिथचें वजन पडलें व त्याच्या अंमलांत सर्व मुत्सद्दी स्मिथला मान देऊं लागले. स्मिथच्या ग्रंथाचें विशदीकरण क्रॉस, सारटोरियस, ल्यूडर, ड्रफलॅंड, लॉझ्, याकोब, यांनीं केलें. सोडन यानें स्मिथच्या ग्रंथावर कडक टीका केली. राऊ याच्या ग्रंथांत पूर्वीचा अर्थशास्त्राचा इतिहास असून शिवाय आंकडे दिले आहेत. निबानियस यानें राष्ट्रीय जमाखर्चावर एक लहान पुस्तक लिहिलें. हर्मन याचा ग्रंथ रिकार्डोच्या पद्धतीचा आहे. थ्यूनन याच्या ग्रंथांत शेतकीचें सांगोपांग वर्णन आहे. यांत अनेक सूचना व विचारास चालन देणारे असे सिद्धांत आहेत. रशियामध्यें स्टॉर्क व पॉसोशकॉफ हे प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ होते. यांपैकीं स्टॉर्क यानें इंग्रजी व फ्रेंच ग्रंथांचा अनुवाद केला आहे व रशियांतील सर्फडम या अर्धगुलामगिरीच्या पद्धतीचा विशेष विचार केला आहे. इंग्लंडनें स्मिथच्या ग्रंथाचा पुष्कळ प्रसार केला. स्मिथच्या ग्रंथाच्या विरुद्ध ज्यांनीं शंका घेतली व नवीन पद्धतीचा ज्यांनीं उपक्रम केला असे ग्रंथकार मुलर, व फ्रेडरिक लिस्ट हे होत. मुलर हा बर्कप्रमाणें पुराणमतवादी होता. मध्ययुगांतील संस्थांविषयीं त्याच्या मनांत आदर असे व समकालीन उदारमताविषयीं तो तिरस्कार व्यक्त करीत असे. मुलर म्हणतो, स्मिथचा उपपत्ति अगदीं यांत्रिक, आध्यात्मिक विचारांनीं शून्य अशी होती व समाजांतील प्रत्येक व्यक्ति हा स्वतंत्र परमाणु आहे व त्या सर्वांचें मिश्रण म्हणजे समाज अशी स्मिथची कल्पना होती. खाजगी मालमत्ता व खाजगी हित संबंध यांचाच तिच्यांत विचार केला जातो. समाज म्हणून निराळी, विशिष्ट, नैतिक बलानें युक्त अशी एक शक्ति आहे, ही त्यास कल्पना नव्हती. स्मिथ यानें आधिभौतिक भांडवलाचा विचार केला पण भाषा, संस्कृति, नैतिक भावना, मुत्सद्दीपणा इत्यादि आध्यात्मिक भांडवलाकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं. सरकार हें नेहमींच दुष्ट असतें असें नाहीं. समाजाचीं उच्च ध्येयें प्राप्त करून घेण्यास सरकार हेंच मुख्य साधन असतें. स्मिथची विचारपद्धति इंग्लंड देशास अनुकूल आहे परंतु इतर यूरोपास ती घातक आहे. नुसती संपत्ति वाढून उपयोग नाहीं तर राष्ट्रीय ऐक्य, नैतिक उन्नति हीं सुद्धां साध्य केलीं पाहिजेत. इत्यादि सर्व मतांत अर्थशास्त्रज्ञाच्या ऐतिहासिक संप्रदायाचें पूर्वस्वरूप सूचित झालें आहे.

मुलरचा लिस्टच्या मतावर पुष्कळ परिणाम झाला. त्याचा विशेष कटाक्ष सार्वराष्ट्रीयत्वाच्या भावनेविरुद्ध होता. राष्ट्रास तो जास्त प्राधान्य देत असे, व प्रत्येक राष्ट्रानें आपापलें हित पहावें असें त्याचें मत असे. वैयक्तिक हित पाहिल्यानें समाजाचें हित कधींहि साध्य होणार नाहीं. समाजाची उन्नति झाल्याशिवाय व्यक्तीस सुख, संस्कृति, नीति इत्यादिकांचा गंधहि राहणार नाहीं. शेतकी, कारखाने व व्यापार हीं तीनहि एकदम वाढविलीं पाहिजेत. नुसती शेतीकरून देश अडाणी व उत्साहरहित व साहसविहीन असा होतो. समाजास सर्व अवस्थांमधून क्रमानें नेण्याचें काम राजसत्तेचें आहे. प्रथम प्रत्येक राष्ट्रानें खुला व्यापार स्वीकारून परदेशांतून माल येऊं द्यावा. हळू हळू स्वतः कारखाने काढण्याची तयारी होतांच संरक्षक जकातींची पद्धति स्वीकारून कारखाने पूर्णतेस न्यावे. हें झाल्यानंतर पुन्हा खुल्या व्यापाराचें तत्त्व अमलांत आणण्यास हरकत नाहीं. इंग्लंडसारख्या देशानें अशा रीतीनेंच आपली उन्नति करून नंतर खुला व्यापार स्वीकारला आहे. म्हणून जर्मनी, युनायटेड स्टेटस् अशा देशास खुला व्यापार अनुकूल होणार नाहीं. कांहीं काळ संरक्षक पद्धतीनें नुकसान झालें तरी उत्पादनशक्ति वाढल्यामुळें तें भरून येतें. या लिस्टच्या मतांनीं जर्मनींत क्रांति घडून आली व त्याच्या मताचा मुत्सद्यांच्या धोरणावरहि परिणाम झाला. इंग्रजी अर्थशास्त्र जर्मनीस बिलकुल लागू नाहीं हा लिस्टचा एकंदर रोख होता. राष्ट्राच्या

अवस्थेवर व परिस्थितीवर त्याचें अर्थशास्त्र अवलंबून असतें व एकच सिद्धांत जगांतील सर्व देशांत लावतां येणार नाहीं हें लिस्टनें शिकविलें. हिंदुस्थानच्या दृष्टीनें लिस्टचीं मतें फारच महत्त्वाचीं आहेत असें गेल्या पिढींत रानडे, गोखले सांगत होते. त्याच्या मतें त्याच्यावेळेस जर्मनीची जी स्थिति होती तशीच धरहुबूम हल्लीं हिंदुस्थानची आहे.

आतापर्यंत उल्लेख केलेल्या कांहीं ग्रंथकारांनीं स्मिथच्या सिद्धांतांत फेरबदल करण्याचा प्रयत्न केला व त्याच्या मान्यतेच्या मर्यादा दाखविल्या तरीहि बहुतेक सर्व ग्रंथकार स्मिथसंप्रदायापैकीं होते असें म्हणतां येईल कोहींच्या ग्रंथांत ऐतिहासिक संप्रदायाचीं कांहीं मतें दृग्गोचर होतात, परंतु अगदीं नवा संप्रदाय काढ ण्याचें यापैकीं कोणाच्याही मनांत आलें नाहीं. हें काम ऐतिहासिक संप्रदायानें केलें व त्याचें परीक्षण आतां आपणांस केलें पाहिजे.

ऐ ति हा सि क पं थ.—अठराव्या शतकांत जो विचार क्रम प्रचलित होता त्याचा परिणाम असा झाला कीं, सरकारी ढवळाढवळीपासून आर्थिक आयुष्यक्रम बराचसा मुक्त झाला. तथापि हें तत्त्वज्ञान संवर्धनाचें नसून केवळ निर्यत्र णाभावाचें होतें. अर्थशास्त्राच्या अभ्यासांत यावेळेस क्रांति झाली त्याचीं कारणें अनेक देतां येतील (१) सोशिआलाजीसारखें शास्त्र पाहिजे अशी कल्पना उत्पन्न झाली. (२) आर्थिक प्रश्नांच्या विचारांत आंकडेशास्त्र शिरूं लागलें आणि तात्त्विक विचाराची तपासणी अनुभवानें करण्याचें साहित्य उत्पन्न झालें, आणि जी प्रवृत्ती आनुमानिक अर्थशास्त्र सांगे त्या प्रवृत्तीचें मोजमाप करण्याची संधि मिळाली ( आंकडेशास्त्र पहा ). १८३९ सालीं सोशिआलजी शब्द कोंटनें वापरला तर रायल स्टॅटिसटिकल सोसायटीची स्थापना त्या सालांतच झाली आणि त्या संस्थेचा उद्देश केवळ आंकडेशास्त्राचा नव्हता तर व्यापक समाजशास्त्राचा होता. जर्मनीमध्यें अनुमानाला प्रत्यक्षाची जोड देऊन आनुमानिक अर्थशास्त्रीय नियमाच्या मर्यादा नियमित करण्याचा प्रयत्न झाला. त्याचे प्रवर्तक रोशेर हिल्डब्रांड व क्नीस हे होते. या प्रत्येकाचें कार्य देण्याचें येथें प्रयोजन नाहीं प्रवृत्ति दर्शनार्थ विवेचन केल्यास पुरें होईल.

१८३९ च्या सुमारास कोंटनें सोशिआलजी (समाजशास्त्र) हा शब्द निर्माण केला आणि आपली विचारमालिकाहि प्रगट केली. त्याच्या विचारांतील प्रधान अंगें येणेंप्रमाणें:— इतर मानवी आयुष्याचीं विविध अंगें लक्षांत घेतली असतां सर्व समाजाचें एकच शास्त्र आहे आणि अर्थशास्त्र हें विवेचनीय भाग म्हणजे केवळ समाजाची स्थिति नाहीं तर केवळ भाग आहे असें दिसून येईल. समाजाच्या समाजाची गति हाहि एक महत्त्वाचा विवेचनीय भाग आहे. यामुळें विशिष्ट कालीन स्थिति पाहून अंतिमसत्य ज्ञेय नाहीं तर वारंवार बदलत जाणाऱ्या समाजाविषयीं उपलब्ध सत्य विशिष्टकालीन आणि विशिष्ट परिस्थितीनें अंकित आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे सामाजिक प्रश्नामध्यें अर्थात ऐतिहासिक रीति प्रामुख्यानें वापरली पाहिजे. आणि गरजा, किंवा सुखें यांचें अर्थशास्त्रीय विवेचन करतांना नैतिक आध्यात्मिक, भावनांकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं वैयक्तिक स्वातंत्र्य हेंच केवळ आयुष्यध्येय नाहीं तर सामाजिक कर्तव्याचें ध्येय लोकापुढें पाहिजे. समाजाची आर्थिक कारणामुळें गति अशी होत चालली आहे कीं, दिवसानुदिवस लोकपक्षाचीं जीं महत्त्वाचीं ध्येयें आहेत तीं साध्य होतील आणि जीं साध्य व्हावयाचीं तीं क्रांतीमुळें न होतां विकासस्वरूपी हळूहळू होत जाणाऱ्या फरकामुळें होतील. कोंटची एकंदर पॉझिटिव्ह फिलासफी किंवा ज्यास तो "समाजशास्त्र" म्हणून म्हणत होता तें शास्त्र किंवा त्याच्या शास्त्रविषयक कल्पना येथें देण्यास अवकाश नाहीं. (समाजशास्त्र" व 'कोंट' पहा ) पण येथें एवढेंच सांगितलें पाहिजे कीं, सामाजिक व्यापक विचाराचा परिणाम अर्थशास्त्रावर बराच झाला परंतु कोंटच्या विचारांनीं अर्थशास्त्रास एकदम निराळी दिशा लागली नाहीं. ही दिशा लावण्याचें श्रेय जर्मन "ऐतिहासिकसंप्रदायी" अर्थशास्त्रज्ञास आहे.

अर्थशास्त्रीय ऐतिहासिक पंथाचा जर्मनींत उद्भव झाला तो कोंटप्रमाणें समाजशास्त्रीय पद्धतीसाठीं व्यापक तत्त्वज्ञान शोधतां शोधतां झाला नाहीं तर कायद्याच्या अभ्यासांत जी ऐतिहासिक पद्धति साव्हिनी वगैरे अभ्यासकांनीं सुरू केली त्या पद्धतीचा प्रवेश अर्थशास्त्रांत होऊन झाला. अर्थशास्त्रांत या पद्धतीचे आद्यप्रवर्तक म्हणून तिघे ग्रंथकार गणले जातात ते.रोशेर, हिल्डब्राँट व नाईस (क्नाईस किनस) हे होत. समाजहितावह सर्वकालव्यापक नियम शोधण्यांत अर्थ नाहीं. समाजाच्या गरजा वारंवार बदलतात आणि जें कायदेतत्त्व एका काळीं योग्य असेल ते पुढील काळाला जुळावयाचें नाहीं. त्याप्रमाणेंच अर्थशास्त्रीय उपाय एका काळाला लागू पडतील ते दुसऱ्या काळाला लागू पडणार नाहींत. इत्यादि तत्त्वें त्यांनीं पुढें मांडलीं. रोशेरनें (१८१७–१८९४) आपला अर्थशास्त्रीय ऐतिहासिक पद्धतीवर ग्रंथ १८४३ सालीं प्रसिद्ध केला, त्यानें त्यांत प्रस्तावनेंत आपलीं तत्त्वें दिलीं तीं सामान्यतः येणेंप्रमाणें ऐतिहासिक पद्धति म्हणजे केवळ कालानुक्रमानें वृत्तकथन नाहीं.तर कांहीं गोष्टींची जाणीव त्यांत आली पाहिजे.त्या गोष्टी येणें प्रमाणें:—ऐतिहासिक अर्थशास्त्र, म्हणजे कोणतेंहि राष्ट्र आर्थिक बाबतींत काय विचार करीत आहे, काय प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करीत आहे आणि त्यानीं काय संपादिलें आहे याचा तपशील होय; शिवाय राष्ट्र म्हणजे केवळ आजचे लोक नाहींत तेव्हां विशिष्ट कालांत येणाऱ्या आर्थिक गोष्टींच अभ्यासून कार्य पुरें व्हावयाचें नाहीं. आर्थिक गोष्टी पाहून त्या चांगल्या किंवा दुष्ट आहेत असा तडकाफडकी निर्णय देणें शहाणपणाचें होणार नाहीं, कांहीं सर्वस्वी

वागल्या किंवा सर्वस्वी वाईट अशा कोणत्याच नाहीत. त्या संस्थांचें अवलोकन इतर परिस्थितीशीं सापेक्षतेनें करावयास पाहिजे. इ. स. १८४८ साली हिलेब्रांट (१८१२–१८७८) चें अर्थशास्त्रावरील पुस्तक बाहेर पडलें या पुस्तकांत स्मिथ, मुल्लर, लिस्ट इ. पूर्वकालीन अर्थशास्त्रवेत्त्यांच्या पुस्तकांचें परीक्षण चांगल्या तऱ्हेनें केलें आहे. या पुस्तकांत अर्थशास्त्रीय नियमांचें विवेचन करणें हें शास्त्रध्येय ठेवलें नसून ज्या रीतीनीं राष्ट्रें आर्थिक प्रगति संपादितात त्या नियमांचें संशोधन करणें हें शास्त्रध्येय ठेवलें आहे. हिलेब्राटनें ऐतिहासिक अर्थशास्त्रास आदर्शभूत म्हणून ऐतिहासिक कायदेशास्त्र घेतलें नाहीं तर भाषाशास्त्र घेतलें ही गोष्टहि विशेष लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

इ. स. १८५३ मध्यें कार्ल नाईस (१८२१–१८९८) याचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. या ग्रंथामध्यें ऐतिहासिक पद्धति अत्यंत व्यापकपणें विवेचिलेली आहे. प्रत्येक कालांतील अर्थशास्त्रीय स्थिति आणि त्या कालांतील अर्थशास्त्रीय विचार हीं दोन्हींहि पूर्वकालीन वृत्तपरंपरेची आणि विचारपरंपरेची परिणतस्वरूपी होय आणि या दोन्हींचा एकंदर सामाजिक परिस्थितीशीं अवयवअवयवीसंबंध आहे. एकंदर संस्कृतीमध्यें उच्चोच्चतादर्शक पायऱ्या असतात आणि प्रत्येक कालच्या आर्थिक परिस्थितीच्या त्या कालच्या एकंदर सांस्कृतिक परिस्थितीशीं निकट संबंध असल्यानें दोहोंचाहि अभ्यास साहचर्यानें झाला पाहिजे इत्यादि गोष्टी त्यानें पुढें मांडल्या. आणि आम्हीं जीं उराशीं बाळगलेलीं अर्थशास्त्रीय सत्यें आपण समजतों तीं केवळ विशिष्ट परिस्थितीचीं आणि सांस्कृतिक पायरीचीं दर्शक आहेत. अंतिम सत्यें नव्हत.

या ऐतिहासिक पद्धतीचे अर्थनीतील पुढील महत्त्वाचे अनुयायी म्हटले म्हणजे लुयोब्रेटानो, आडोल्फ हेल्ड, अरविन नास, गस्टाव्ह श्मोलर, एच रोसलेर, आलबेरट शफेल, हान्स व्हान शील, गस्टाव्ह स्कोनबर्ग आणि आडोल्फ वाग्नर हे होत. यांच्याविषयीं येथें अधिक मजकूर देत नाहीं.

अमेरिकेंतील अर्वाचीन अर्थशास्त्रज्ञाच्या अर्वाचीन ग्रंथाविषयीं येथें माहिती न देतां त्यांचें विवेचन विशिष्ट प्रश्नाचा उहापोह करतेवेळेस देऊं आणि आता येथें भारतीय अर्थशास्त्राकडेस लक्ष देऊं.

हिंदी अर्थशास्त्र.—(उपोद्घात) अॅडम स्मिथनें आपला 'वेल्थ ऑफ नेशन्स' हा अर्थशास्त्रावरील ग्रंथ लिहिला त्यावेळीं इंग्लंड व यूरोपांतील दुसरे कित्येक देश 'राष्ट्र' या पदवीस पोहोंचलेले होते. शिवाय इंग्लंडांत तर लोकनियंत्रित राज्यपद्धति आधींच चांगली व्यवस्थित सुरू झालेली होती, आणि राज्य म्हणजे राजे लोकांची केवळ खाजगी मालमत्ता ही कल्पना बहुतेक नष्ट झाली होती. सत्ता लोकांनीं आपल्या हातांत घेतली होती, आणि तिचा लोकांचें सामुच्चयिक हित साधण्याकडे कसा उपयोग करून घ्यावयाचा या प्रश्नाचा विचार चालू होता. अर्थशास्त्रीय विचारांत मोठी क्रान्ति घडवून देणारा जो अॅडम स्मिथ यानें तत्पूर्वीच्या थॉमस मुन वगैरे कित्येक अर्थशास्त्रावरील लेखकांच्या, राष्ट्राला सापेक्षिक दृष्ट्या हितावह काय, यासंबंधाच्या कांहीं चुकीच्या कल्पना खोडून काढल्या. इंग्लंडसारख्या एखाद्या विशिष्ट राष्ट्राला हितावह गोष्टी कोणत्या हें ठरवीत असतां अर्थशास्त्रांतर्गत कित्येक सर्व सामान्य गोष्टींचा उहापोह त्यानें आपल्या ग्रंथांत केला, व अप्रत्यक्षपणें अर्थशास्त्रांतील कित्येक सिद्धांताचा पाया घातला. या पायावर पुढें अर्थशास्त्राची इमारत उठविणारे इंग्लंडमधील अर्थशास्त्री यांनीं सदरहू शास्त्रविषयाचा अधिक अभ्यास करून अर्थशास्त्रांतील प्रश्नावरच्या अनेक प्रमेयप्रतिज्ञा ठरवून टाकल्या व त्याच जगांतील प्रत्येक देशास लागू होण्यासारख्या आहेत अशी आपली समजूत करून घेतली. परंतु केवळ इंग्लंडच्या तत्कालीन विशिष्ट परिस्थितीला धरून अर्थशास्त्राचे सिद्धांत ठरविणें म्हणजे सर्वव्यापक अर्थशास्त्राची इमारत आकुंचित पायावर उभारणें आहे, ती पुढें मागें ढासळण्याचा संभव आहे ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली नाहीं. इंग्लंडमधील सामाजिक परिस्थिति विषयक ज्या गोष्टी गृहीत धरल्या त्या पुढील प्रमाणें:—देश व राष्ट्र म्हणजे कल्पना एकच, त्यावर सत्ता चालविणारी अशी तद्देशीय एक संस्था, देशांतील सर्व समाज एक भाषा बोलणारा, सर्व समाजाचा सांस्कृतिक दर्जा सारखाच, शिवाय देशांत मांडलीक किंवा संस्थानिकांचा अभाव, व तसेंच अर्थशास्त्राला विघातक अशा तत्त्वज्ञानविषयक किंवा पारमार्थिक कल्पनांचा पूर्ण अभाव, आणि अनियंत्रित राजसत्ता मोडून लोकनियंत्रित राज्यव्यवस्था स्थापण्याकरितां करावे लागणारे सर्व झगडे आधींच होऊन गेलेले अशी विशिष्ट सामाजिक व राजकीय परिस्थिति गृहित धरून लिहिलेलें अर्थशास्त्र एक किंवा अनेक बाबतींत भिन्न असलेल्या दुसऱ्या कोणत्याहि देशास कसें लागू व उपयोगी पडणार? उदाहरणार्थ जर्मनीच घ्या. जर्मनी त्या वेळीं एक राष्ट्र बनलेला नव्हता, त्यांत अनेक संस्थानें व लोकसत्ताक नगरराज्येंहि होतीं. अशांना हितावह असे अर्थशास्त्राचे सिद्धांत जर्मन पंडितांनीं पुढें मांडले. ते अर्थात् इंग्रज पंडितांनीं जागतिक म्हणून ठरविलेल्या सिद्धांतांहून निराळे होते; पण त्यांत अत्यंत जरूर अशी खरी राष्ट्रीय दृष्टी होती त्यातूनच वैयक्तिक किंवा राष्ट्रीय अर्थशास्त्राचा उगम झाला. या जर्मन अर्थशास्त्राचा विशेष असा होता कीं, अर्थशास्त्राचे प्रश्न राजकीय व सामाजिक प्रश्नांशीं अत्यंत निगडित आहेत ही गोष्ट जर्मन पंडितांनीं ओळखली होती.

स्वतंत्र हिंदी अर्थशास्त्राची अवश्यकता.—हिंदी अर्थशास्त्रासंबंधानें जेव्हां आपण विचार करूं लागतों तेव्हां इंग्लिश व हिंदी समाजाची स्थिति अत्यंत भिन्न आहे. हीच गोष्ट आपण प्रामुख्यानें लक्षांत ठेवून इंग्रज पंडितांनीं

ठरविलेले अर्थशास्त्राचे पुष्कळ सिद्धान्त हिंदुस्थानास सांप्रत तरी पुष्कळंसे लागू नाहींत असें धरून चाललें पाहिजे. आपल्या हिंदुस्थानाची आर्थिक उन्नति करण्याचे मार्गांत राजकीय व सामाजिक अशा फारच अडचणी आहेत. आणि त्या नीट लक्षात घेतल्याशिवाय आर्थिक उन्नतीबद्दल केलेली धडपड अरण्यरुदनवत् निष्फळच होणार. म्हणून प्रथम हिंदुस्थानातील सामाजिक, राजकीय व भावनात्मक परिस्थितीचा आधीं नीट विचार झाला पाहिजे, व त्याचा आर्थिक स्थितीवर होणारा परिणाम नीट ओळखला पाहिजे. ब्रिटिश व इतर पाश्चात्य विद्वानांनी ठरविलेले सिद्धांत आयते उचलून ते तंतोतंत इकडे लागू करून हिंदुस्थानची आर्थिक उन्नति करण्याच्या प्रयत्नास यश येणें तर शक्य नाहींच, पण उलट पाश्चात्याच्या अर्थशास्त्रीय सिद्धांतातील फोलपणा मात्र सहज दिसून येईल. फार कशाला, आजपर्यंत शंभर दीडशें वर्षांच्या ब्रिटिश अमदानींत पुष्कळ ब्रिटिश अर्थशास्त्र शिकलेल्या विद्वानांनीं अर्थशास्त्रीय विषयाचें शिक्षण दिलें पण अद्याप हिंदुस्थानची आर्थिक स्थिति फारशी सुधारली नाहीं. सामाजिक व राजकीय व्यंगाकडे दुर्लक्ष झालें. परदेशी भांडवल रेल्वे वगैरे सुधारणाहि आल्या पण लोकांची आर्थिक स्थिति फारशी सुधारली नाहीं. हिंदुस्थानात वारंवार पडणाऱ्या नुसत्या दुष्काळास बळी पडणाऱ्या लाखो लोकांकडे पाहिलें म्हणजे तेवढ्यानेंहि या सरकारी पंडिताच्या बुद्धीची योग्य कल्पना होते. आणि म्हणूनच आपल्या देशाची प्रत्यक्ष स्थिति आपण स्वतःच अवलोकन करून आपले स्वतंत्र हिंदी अर्थशास्त्र निर्माण करणें आपणास जरूर आहे. असें येथील हिंदी रक्ताच्या अर्थशास्त्रज्ञास वाटूं लागून तदनुसार प्रयत्नहि होऊं लागले आहेत. व या विषयावर डॉ. केतकर यांनीं स्वतंत्र विचाराचा 'इंडियन एकानामिक्स' नावाचा एक ग्रंथ लिहून नवीन दिशेनें विचार करण्यास सुरवात केली त्या ग्रंथाचा आशय पुढें दिला आहे.

हिंदी अर्थशास्त्र तयार करण्याकरतां प्रथम हिंदी समाजाची, त्याच्या बौद्धिक परंपरेची, सांस्कृतिक इतिहासाची, वाङ्मयाची तसेंच प्रस्तुतच्या राजकीय परिस्थितीची लेखकांना चांगली माहिती पाहिजे. शिवाय त्यांनी सुचविलेल्या प्रकारांनीं सामाजिक व आर्थिक स्थिति सुधारण्याची लोकांमध्यें प्रबल इच्छा पाहिजे; आणि त्या सुधारणा प्रत्यक्ष अमलांत येण्याकरतां राज्यसूत्रें हातीं असलेल्या मुत्सद्यांस मार्ग दाखविणारें अर्थशास्त्रांतील तज्ज्ञांचें सल्लागारमंडळ पाहिजे. वरील गोष्टींचा अभाव हें आजपर्यंत हिंदुस्थानची आर्थिक उन्नति न होण्याचें एक कारण, पण त्याहूनहि बलवत्तर कारण म्हणजे हिंदी बौद्धिक परंपरा नष्ट करून येथें पाश्चात्य संस्कृति प्रस्थापित करण्याची मनीषा हें होय. पण आतां तो काळ पालटला आहे, आणि खरें हिंदी अर्थशास्त्र जन्मास येऊन हिंदुस्थानची आर्थिक उन्नति लवकरच होईल, अशी चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत.

'हिंदी अर्थशास्त्र' म्हणजे काय?—अर्थशास्त्र हा विषय सामान्य अर्थानें हिंदुस्थानातील लोकांस नवीन आहे, असें नाहीं. नफातोटा यासंबंधाच्या शास्त्रास संस्कृतांत 'वार्ता' असें नाव आहे. शिवाय राज्यातील जमाखर्च व इतर संपत्तिविषयक गोष्टींचा विचार ज्या शास्त्रात येतो असें 'अर्थशास्त्र' हि हिंदुस्थानात रूढ आहे. पण 'राष्ट्र' या पदवीस पोहोंचलेल्या सर्व हिंदी समाजाचें अर्थशास्त्र अशा अर्थानें मात्र हें शास्त्र हिंदुस्थानात आजपर्यंत निर्माण झालेलें नाहीं. सांप्रत हिंदुस्थानच्या एकराष्ट्रीकरणाचा प्रयत्न चालू असल्यामुळें त्याबरोबरच नवें 'हिंदी अर्थशास्त्र' निर्माण होणेंहि जरूर आहे, हें उघड आहे.

'हिंदी अर्थशास्त्र' म्हणजे हिंदु लोकांची सामाजिक, राजकीय, भावनात्मक वगैरे परिस्थिति लक्षांत घेऊन प्रतिपादिलेलें अर्थशास्त्र. असल्या अर्थशास्त्राचें प्रतिपादन करतांना प्रथम हिंदुस्थान देशाची भौगोलिक स्थिति विचारांत घेतली पाहिजे. पण केवळ नैसर्गिक स्थितीला फाजील महत्त्व देता कामा नये. उदाहरणार्थ, बक्लसारख्या कांहीं लेखकांनीं, सर्व भारतीय संस्कृति ही केवळ हिंदुस्थानच्या भौगोलिक स्थितीचा परिणाम आहे, असें म्हटलें आहे. असें म्हणण्यांत थोडें तथ्य आहे पण सर्वस्वीं नाहीं. शिवाय नैसर्गिक कारणांस फाजील महत्त्व दिल्यानें असा घातक परिणाम होतो कीं, सामान्य जनांना आपली स्थिति सर्वस्वीं निसर्ग-(दैव) निर्मित आहे, व ती सुधारण्याचे मानवी प्रयत्न अर्थात निरर्थक होत असें वाटूं लागतें करता सर्वांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, देशातील जनतेच्या विशिष्ट आर्थिक परिस्थितीला भौगोलिक कारणाप्रमाणें सामाजिक, राजकीय वगैरे कारणेंहि वळण लावीत असतात, म्हणून अशा सर्व प्रकारच्या कारणांची एकत्र मीमांसा होणें जरूर आहे. त्याबरोबरच एकेवेळीं जगांतील देशांत सर्वांत पुढें असलेला हा हिंदुस्थान आज पाश्चात्य देशांच्या मागें कां पडला या प्रश्नाचाहि विचार झाला पाहिजे. व शेवटीं हिंदुस्थानची आर्थिक उन्नति होण्याकरितां जे उपाय योजणें जरूर आहे, त्याचाहि उहापोह झाला पाहिजे. तात्पर्य, प्रत्येक विषयाला तात्त्विक व व्यावहारिक अशीं दोन अंगें असतात, असा भेद मान्य केल्यास 'हिंदी अर्थशास्त्राला' अर्थशास्त्राचें व्यावहारिक अंग असें म्हणतां येईल.

येथें ब्रिटिश साम्राज्य स्थापन होण्यापूर्वी गारो, गोंड, संताळ वगैरे समुच्चयाचें जातिविशिष्ट अर्थशास्त्र प्रचलित होतें असें म्हणतां येईल. शिवाय येथें असलेली अनेक लहान राज्यें किंवा संस्थानें यांचें आर्थिक हित पाहणारें अर्थशास्त्रहि चालू असावयाचेंच. मराठेशाहीचे अर्थशास्त्र उदाहरणार्थ मागेंच विवेचिलें आहे पण ती सर्व स्थिति बदलून आतां

सर्व राष्ट्राचें असें एक 'हिंदी अर्थशास्त्र' निर्माण करण्याची वेळ आली आहे.

सा मा जि क प रि स्थि ति व आ र्थि क प रि स्थि ति.— हिंदु समाजव्यवस्था व तिचा आर्थिक स्थितीवर होणारा परिणाम या गोष्टींचा अभ्यास अत्यंत महत्वाचा व मनोरंजक आहे. या विषयाचें विवेचन करावें तितकें थोडेंच होणार आहे. येथें त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करावयाचें आहे. हिंदुसमाजातील विशेष लक्षात घेण्यासारखा प्रकार म्हणजे जातिभेद हा होय. हिंदुस्थानातील एकंदर लोकसंख्येपैकीं दोन तृतीयांश हिंदु आहेत; पण ते सुमारें तीन हजार निरनिराळ्या जातींमध्यें विभागले गेले आहेत; आणि शिवाय या मुख्य जातींच्या पोटजातींहि अनेक आहेत. या जातींमध्यें परस्पर विवाहसंबंध होत नसल्यामुळें त्या स्वतंत्र टोळ्याप्रमाणें एकमेकांपासून निराळ्या अलग राहत आलेल्या आहेत. यापैकीं काहींच्या रीतिरिवाजात स्थलकालमानाप्रमाणे फेरफार झाले आहेत, तर काहींत आज शेंकडों वर्षांत यत्किंचितहि फरक झालेला नाहीं. शिवाय पुष्कळशा जातींचे धंदे ठरलेले असून त्याना धंदेवाईक जातींचें स्वरूप प्राप्त झालेलें आहे. शिवाय या जातींत स्पृश्यास्पृश्यतेच्या विशिष्ट कल्पना पसरलेल्या आहेत. यामुळें प्रत्येक जातीची राहणी निरनिराळी झालेली असून, हा उच्च, हा नीच या भावना सर्वत्र प्रबल होऊन बसल्या आहेत.

जा ति भे द व अ स्पृ श्य ता या चे आ र्थि क प रि णा म.— जातिभेदामुळें हिंदुसमाजात पडलेली फूट व स्पृश्यास्पृश्यतेच्या कल्पना यांचा हिंदुस्थानच्या आर्थिक स्थितीवर भयंकर परिणाम झालेला आहे. जातीजातींमध्यें विवाहसंबंध होत नाहींत, इतकेंच नव्हे तर आपसात अन्नोदकव्यवहार किंवा साध्या बसण्याउठण्याचाहि फारसा संबंध येत नाहीं. याचे तीन मोठे परिणाम होतात, ते असे कीं, (१) सर्व समाजाच्या राहणीला समान स्वरूप येत नाहीं; (२) हलक्या जातींची रहाणी सुधारून ती उच्च होऊं शकत नाहीं; आणि (३) पदार्थांची निपज करताना श्रमविभागाच्या तत्त्वानुसार जरूर असणारें सहकार्य निरनिराळ्या जातींत होऊं शकत नाहीं. निरनिराळ्या जातींची व वर्णांची राहणी निरनिराळी असल्यामुळें त्यांच्या गरजा निरनिराळ्या असतात. त्यामुळें प्रत्येक जातीच्या लहान लोकसंख्येच्या मानानें पदार्थांची निपज अर्थात् थोडक्या प्रमाणात करावी लागते. उदाहरणार्थ, प्रत्येक जातीचा पोशाख निरनिराळ्या तऱ्हेचा असल्यामुळें प्रत्येकीचा शिंपी निराळा असतो. हिंदूंचा पोशाख निराळा, मुसुलमानांचा निराळा; इतकेंच नव्हे तर, गुजराथ्यांचा निराळा, दक्षिण्यांचा निराळा; यामुळें एकाच मुंबई शहरांत निरनिराळ्या समाजांचे स्वतंत्र शिंपी आहेत. तसेंच गुजराथी व दक्षिणी यांच्या रुचिभिन्नत्वामुळें दोघांकरतां खाण्याचे पदार्थ बनविणारे स्वयंपाकीहि निरनिराळे लागतात. खाण्याचे पदार्थ भिन्न असतात. इतकेंच नव्हे तर, पदार्थ एकच असला तरी तो तयार करण्याच्या पद्धती भिन्न असतात, म्हणूनहि भिन्न आचारी लागतात. यामुळें सार्वपुरवणाऱ्या धंद्यास लहानपणा व वैशिष्ट्य हीं उत्पन्न होतात.

याप्रमाणें एकाच समाजात भिन्नभिन्न वर्ग व त्यांच्या भिन्नभिन्न गरजा यामुळें एकंदर समाजाची आर्थिक उन्नति होण्याच्या मार्गांत भयंकर अडचणी येतात. समाजाची राहणी उच्च उच्च होत जाऊन पदार्थांची निपज मोठ्या प्रमाणावर होणें व प्रत्येक धंद्यात कामाची वाटणी होऊन प्रत्येक अंगात प्राविण्य संपादन करणें, या गोष्टी जातिभेदामुळें फूट पडून विस्कळित झालेल्या हिंदुसमाजात मुळींच संभवत नाहींत. स्थानिक गरजा भागविण्यापुरती पदार्थांची अल्प प्रमाणात निपज करणें हाच नियम सर्वत्र दृष्टीस पडतो. हा नियमहि पूर्वींच्या काळीं जगापासून अलग असलेल्या हिंदुस्थानाला मोठासा घातक झाला नाहीं. पण अलीकडे सर्व परिस्थिति बदलून जगातील अनेक, पदार्थांची निपज मोठ्या प्रमाणावर करणाऱ्या व धंद्याच्या प्रत्येक अंगात अत्यंत वाकबगार बनलेल्या राष्ट्रांच्या व्यापारी स्पर्धेत हिंदुस्थान देश सांपडला आहे. या नूतन परिस्थितीला तोंड देण्यास समर्थ होण्याकरिता हिंदी समाजाची सामाजिक व आर्थिक पुनर्घटना करणें जरूर आहे. या पुनर्घटनेचें स्वरूप नीट लक्षात येण्याकरितां हिंदूंच्या सामाजिक व्यवस्थेंत असलेल्या काहीं व्यंगाची येथें अधिक फोड करूं.

कोणत्याहि पदार्थांची निपज मोठ्या प्रमाणात किंवा कोणताहि व्यापार मोठ्या प्रमाणावर हातीं घेण्याकरिता बुद्धि, शारीरिक श्रम व भांडवल हीं तिन्हीं एकत्र होणें जरूर असतें. पण हाच योग जमून येणें प्रस्तुत हिंदु समाजस्थितींत कसें कठीण असतें तें पहा. वरील तीन साधनें पृथक्पणें भिन्न जातींच्या हातीं आहेत, म्हणजे महाराष्ट्रीय ब्राह्मणाजवळ बुद्धि, तर मारवाड्याजवळ भांडवल तर शूद्रांजवळ शारीरबल; आणि हिंदु समाजरचनाच अशी आहे कीं, या तीन वर्णांचा परस्परांशीं फारसा संबंध येऊं शकत नाहीं. आजहि पाश्चात्य शिक्षण मिळविलेला वर्ग भांडवलवाल्याहून अगदीं भिन्न आहे. उदाहरणार्थ, आज एखादा महाराष्ट्री किंवा बंगाली सुशिक्षित ब्राह्मण एखाद्या श्रीमंत मारवाड्याकडे जाऊन काहीं एखादा मोठा उद्योगधंदा काढण्याची योजना त्याला सांगूं लागला तर त्यावर त्या मारवाडी भांडवलवाल्याचा विश्वास बसणार नाहीं; पण तोच एखादा शिकलेला मारवाडी आपल्या जातभाईकडे भांडवल मागण्यास गेल्यास त्यांचें परस्परसहकार्य होऊं शकेल. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, आमच्या गुजराथी वनिया किंवा मारवाडी समाजापैकी परदेशात जाऊन उच्च शिक्षण मिळविणारे इसम फार नाहींत. यामुळें बुद्धि व भांडवल यांचें सहकार्य दुरापास्त झालें आहे.

वरील तीन साधनें एकत्र येण्यास दुसरी अडचण म्हणजे स्पृश्य, अस्पृश्य या कल्पनाची. उदाहरणार्थ, कातडीं कमावून त्याचे जिन्नस करण्याचा धंदा आमच्यातील अस्पृश्य मानलेल्या चांभार जातींकडे आहे. पण या वर्गाजवळ बुद्धि नाहीं व भांडवलहि नाहीं. पूर्वी लहान प्रमाणात धंदे करण्यानें फारसें बिघडत नव्हतें; पण आता परदेशी मालाबरोबर टक्कर देण्याकरिता मोठ्या प्रमाणात, मोठें भांडवल व त्या धंद्यातलें चांगलें शिक्षण मिळवून धंदा करण्यावाचून गत्यंतर नाहीं. पण चांभार, ब्राह्मण व मारवाडी यांचें सहकार्य होण्यास जातिभेद व अस्पृश्यता आडवी येते. त्यामुळें हा धंदा आता मुसुलमान किंवा पारशी या समाजाच्या किंवा अगदीं परकी लोकाच्या हातीं जाऊं पहात आहे.

तिसरा धंदा हॉटेलें व खाणावळी हा घ्या. हिंदु लोकामध्यें ब्राह्मणाखेरीज इतर जातींच्या हातचे पदार्थ दुसऱ्या जातींचे लोक खात नसल्यामुळें ब्राह्मणाव्यतिरिक्त इतर जातींच्या हातीं हा धंदा फारसा जाणें शक्य नाहीं; किंवा प्रत्येक जातींचीं निरनिराळीं हॉटेलें व खाणावळी निघाल्या पाहिजेत, म्हणजे तात्पर्य हें कीं, हाहि धंदा मोठ्या प्रमाणावर चालूं शकत नाहीं. शिवाय जातीजातींचे व प्रांतोप्रांतीचे खाण्यापिण्याचे पदार्थ वेगवेगळे असल्यामुळेंहि मोठ्या प्रमाणावरील धंद्यास अडचण येते. यामुळें भारीभारी जकाती किंवा कर बसवूनहि जो घातक परिणाम होऊं शकत नाहीं तो वरील कारणामुळें होत असतो.

आता व्ययाच्या दृष्टीनें पाहिलें तर हिंदुस्थानांतील बहुतेक लोकांची राहणी इतर सुधारलेल्या देशाच्या मानानें फार हलक्या दर्जाची आहे. अमेरिकेंतल साधा मजूर सुद्धा आपल्या देशांतील मध्यम स्थितींतल्या माणसापेक्षा चांगलें अन्न खातो व अधिक कपडे वापरतो. लोकांमध्यें पोशाख, राहणी व घरांतील सामानसुमान व सुखसोयी वगैरे बाबतींत स्पर्धा व अनुकरण चालूं असतें. यूरोप व अमेरिकेंत मोठमोठीं व उत्तम बाईंडिंगचीं पुस्तकें खरेदी करण्यामध्यें सुद्धा चढाओढ दृष्टीस पडते. संस्कृतीच्या व रसिकतेच्या दृष्टीनें स्वतःस इतरांनीं मागासलेले म्हणूं नये, एवढ्याच केवळ हेतूनें मोठमोठे ग्रंथ खरेदी करून घरात सुशोभित सायब्ररी ठेवणारे लोक तिकडे पुष्कळ असतात. आपल्या देशात उच्च राहणीचे व वरील विचारसरणीचे लोक नाहींत, असें नाहीं. पण मुख्य अडचण अशी आहे कीं, अशा लोकांचा वर्ग अल्पसंख्यांक असून त्याच्यामध्यें स्पर्धा व अनुकरण करण्याची बुद्धि जागृत होण्याकरितां इतरांचे त्या वर्गाशी दळणवळण व संबंध जितका व्हावयास पाहिजे तितका जातिभेद व अस्पृश्यता या दोन भयंकर अडचणींमुळें येऊं शकत नाहीं. वरील प्रकारची चढाओढ विशेषत. पारशांच्या घरीं बायकामुलांच्या आण्यायेण्यानें वाढत असते. पण आमच्या हिंदु समाजात बायकांमध्यें तर घोषाच्या ओवळ्याच्या व शिवाशिवीच्या कल्पना फारच पसरलेल्या! त्यामुळें घरगुती राहणी वरील प्रकारच्या चढाओढीनें सुधारण्याची शक्यता आजपर्यंत तरी मुळींच नव्हती.

रे ल्वे र च नें ती ल दो ष.—हिंदु संस्कृतीचें केंद्र असें एक मध्यवर्ती शहर हिंदुस्थानात नाहीं, याचें कारण हल्लींची आगगाडीच्या रस्त्याची योजनाच चुकीची आहे. हल्लींचे रस्ते हिंदुस्थानातल्या कोणत्याहि एका शहराला येऊन मिळत नसून ते निरनिराळ्या बंदराकडे जाणारे आहेत या योजनेचा मुख्य उद्देश हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांचा लंडनशीं संबंध जोडणें हा आहे हें कोणाच्याहि सहज लक्षात येण्यासारखें आहे. याकरिता या रस्त्याची पुन्हा नीट मांडणी करून सब प्रांताच्या परस्पर दळणवळणाची व एका मध्यवर्ती शहराशीं सर्वांचा संबंध येईल अशी सोय करणें जरूर आहे. या योगानें सर्व प्रांतांत समान पद्धतीची राहणी चालू होण्यास चांगली मदत होईल. अद्याप हिंदुस्थानात अशा अनेक जाती आहेत कीं, त्यात सुधारणेनें बिलकुल प्रवेश केलेला नाहीं, व त्या अगदीं मागसलेल्या स्थितींत व सुधारलेल्या समाजापासून अलग राहत आहेत. रेल्वेचा फैलाव पुष्कळ झाल्यानें त्यांच्या सुधारणेस मदत होण्यासारखी आहे. तसेंच निरनिराळ्या प्रांतांतील राहणी उच्च असली तरी ती भिन्न भिन्न आहे. त्याऐवजी एक प्रकारची राहणी सर्वत्र पसरण्यास, नवी राजधानी दिल्ली या शहराशीं सर्व प्रांताचा रेल्वेसंबंध वाढत गेल्यानें बरीच मदत होण्यासारखी आहे.

वि वा ह प द्ध ती चे आ र्थि क प रि णा म.— हिंदुस्थानची आर्थिक सुधारणा होण्याच्या मार्गांत आणखी एक अडचण आहे ती पडदापद्धती व प्रचलित विवाहपद्धति यांची. निरनिराळ्या प्रांतांतील स्त्रीपुरुषप्रमाणाविषयींचे आंकडे पाहिल्यास असें दिसून येतें कीं, कांहीं प्रांतांत स्त्रियांची संख्या अधिक, तर इतरांत पुरुषांची अधिक. कांहीं जातींत विधवांची व वृद्ध-तरुणी जोडप्यांची संख्या पुष्कळ तर दुसऱ्या कांहीं बळकट, तरुण पण अविवाहित पुरुषांची अशी संख्या अधिक. अशा प्रकारची स्थिति लोकसंख्येच्या वाढीला हितावह नाहीं. तसेंच विवाहसंबंध जुळवून आणण्यात आईबाप व इतर नातलग यांचें अंग जितकें अधिक व प्रत्यक्ष वरवधूंचा संबंध जितका कमी तितक्या मानानें त्या समाजाच्या गरजा कमीच राहावयाच्या. उलट जेथें प्रौढविवाहाची चाल प्रचलित आहे तेथें उच्च दर्जाची राहणी प्रचारांत येण्यास फार मदत होते. याचें कारण उघडच आहे. ज्या समाजात विवाहसंबंध जुळविण्यांत स्वतः तरुणतरुणी भाग घेतात, तेथें उभयपक्षीं पोशाख व नीटनेटकेपणा याबद्दल फारच काळजी घेतली जाते. स्त्रीजनाला संतुष्ट करण्याकरतां पुरुषवर्ग बरावसा खर्च करण्यास उत्सुक असतो. चांगलीचांगली पुस्तकें व चित्रें खरेदी करून ती वधूला समर्पण करावीं लागतात. उलटपक्षीं पुरुषांच्या आवडीच्या होण्याकरतां स्त्रियांनाहि स्वतःमध्यें अधिकाधिक गुण आणावे

लागतात. यामुळें शिक्षण वाढून सुधारणा होते, राहणी उच्च दर्जाची होत जाते. व त्याबरोबर पुरुष व स्त्री दोन्ही वर्गांची अर्थोत्पादक शक्ति वाढणें जरूरीचें होतें

स्त्रीपुरुषमिश्रव्यवहार व पडदापद्धतीचे परिणाम—तसेंच समाजांत स्त्रीपुरुषाचा मिश्र व्यवहार चालू असण्यानेंहि समाजाच्या आर्थिक उन्नतीस फार मदत होते उदाहरणार्थ, उपहारगृहांत स्त्रीपुरुषांनीं बरोबर खाण्याची पद्धत असल्यास, रस्त्यावरील उघड्या जागेंतल्या अस्ताव्यस्त गृहात लोक केव्हांहि शिरणार नाहींत, बरोबर असलेल्या स्त्रीस बसण्यास योग्य अशा व्यवस्थित उपहारगृहांतच पुरुष जाईल. पुण्यामुंबईतल्या व लंडनमधल्या हॉटेलांची तुलना केल्यास वरील विवेचनांतलें मर्म लक्षांत येईल इतकेंच नव्हे तर समाजात स्त्रिया सार्वजनिकपणें वावरूं लागल्यानें समाजाच्या चालीरीतींना चांगलें, शिष्टसंमत असें वळण आपोआप लागतें पुरुषाच्या वागणुकींतील अश्लील, बीभत्स प्रकार बंद होतात, निदान त्यांना पुष्कळ आळा पडतो परंतु अशा प्रकारच्या स्त्रीपुरुषमिश्र व्यवहाराला पडदापद्धतीची व प्रचलित विवाहपद्धतीची मोठी अडचण आहे. शिवाय ज्या प्रांतांत पडदापद्धति आहे तेथील स्त्रियांनां इतर प्रांतांतील स्त्रियांप्रमाणें साध्या, सोप्या धंद्यांतहि भाग घ्यावयास सांपडत नाहीं. त्यामुळें पुण्यामुंबईतल्याप्रमाणें कलकत्ता वगैरे उत्तरहिंदुस्थानातल्या शहरांत स्त्रियांच्या ऐवजीं पुरुषाचा भरणा अधिक दृष्टीस पडतो. कलकत्त्यास लोकसंख्येंत १०० पुरुषास ३२ स्त्रिया असें प्रमाण पडतें.आणि एकंदर हिंदुस्थानांतील शहरांत घरगुती कामासारखे सामान्यतः सोपे धंदेहि पुरुषांनीं करण्याचीच पद्धति असल्यामुळें सर्व शहरांत पुरुषांचें प्रमाण स्त्रियांपेक्षा बरेंच अधिक असतें. उलटपक्षीं इंग्लंडांतील शहरांत पुरुषांपेक्षा स्त्रियांची संख्या बरीच अधिक असलेली आढळते.

शिवाय हिंदुस्थानांतील शहरांत उद्योगधंद्याकरता जाणारे तरुण लोक विवाहित असूनहि मुंबईकलकत्तादि शहरांत बिन्हाडानें राहण्याच्या इमारती इतक्या महाग व गैरसोयीच्या असतात कीं, त्यांत सहकुटुंब जाऊन राहणें त्यांना परवडत नाहीं. न्यूयॉर्क, लंडन, पॅरिस येथील गरीबगुरीबाच्या राहण्याच्या सोयी इकडच्या मानानें स्वर्गतुल्य आहेत. येथील शहरांतल्या उपरिनिर्दिष्ट पुरुषसंख्याधिक्यामुळें नैतिक दृष्ट्या परिणाम भयंकर होतात एकट्या कलकत्त्यांत वेश्यांची संख्या पन्नास ते शंभर हजारांपर्यंत आहे. शिवाय पानपट्टी, विडी, सिगारेट वगैरे विकणाऱ्या स्त्रियाहि अप्रसिद्ध शरीरविक्रयाचा धंदा करीत असतातच. तात्पर्य, ह्मसला पडदापद्धतीमुळें लहान सोपे धंदे करण्यासहि स्त्रियांस अडचण, हलकी व राहणी, व व्यसनांत पैशाची उधळपट्टी वगैरे तोटे होत आहेत. जातिभेदामुळें मोठ्या प्रमाणावर पदार्थांची निपज होण्यास अडथळा येतो; हलक्या जातींतल्या श्रीमंत लोकांची राहणी उच्च होऊं शकत नाहीं, व त्यामुळें दारूबाजीसारख्या व्यसनांत त्यांची द्रव्यहानि व शरीरहानि होते. शिवाय जातींचे धंदे ठरलेले असल्यामुळें परजातीच्या माणसास धंदेशिक्षण मिळूं शकत नाहीं. धंद्यामध्यें आपआपल्या जातीच्या इसमांसच मदत करण्याची प्रवृत्ति असते येणेंप्रमाणें हिंदुसमाजाच्या विशिष्ट सामाजिक बाबींचा येथील आर्थिक स्थितीवर फार घातक परिणाम होत असल्यामुळें सदरहू बाबी लक्षांत घेऊनच आर्थिक उन्नतीचे उपाय सुचविले पाहिजेत.

हिंदी अर्थशास्त्र व हिंदी मन.—मनाच्या प्रेरणेप्रमाणें व्यक्तीच्या हातून कृत्यें होत असतात. त्याचप्रमाणें समाजाच्या भावनाप्रमाणें देशातील लोकांच्या हातून कृत्यें होत असतात म्हणून लोकांचे विचार, भावना, इंद्रियवासना व बौद्धिक परंपरा या सर्वांचा समाजाच्या आर्थिक स्थितीवर फार परिणाम होत असतो. स्वतंत्र देशांत म्हणजे जेथें राज्यकर्ते व प्रजाजन एकाच भावनेचे व परंपरेचे असतात तेथें सदरहू विवेचनाची विशेष आवश्यकता नसते परंतु परतंत्र असलेल्या हिंदुस्थानांत परक्या परंपरेच्या व संस्कृतीच्या लोकांच्या हातीं राज्यकारभार असल्यामुळें व त्याचें आर्थिक उन्नतीचे आजपर्यंतचे प्रयत्न निष्फळ झाल्याचें सिद्ध झालें असल्यामुळें समाजाच्या आर्थिक स्थितीवर लोकांतील ज्या भावनांचे व परंपरेचे परिणाम होत आहेत त्याचें हिंदी अर्थशास्त्रांत विवेचन करणें अत्यंत जरूर आहे.

आर्थिक उन्नतीस विघातक अशा भावनांचें वर्गीकरण.—जगांतील सर्व मानवजातींच्या सामान्य मनःस्थितीच्या बाबतींत साम्य असलें तरी देशकालपरत्वें विशिष्ट समाजात विशिष्ट भावना उत्पन्न होत असतात. यापैकीं कांहीं सामाजिक व राजकीय परिस्थितीमुळें आणि कांहीं बौद्धिक परंपरेमुळें उत्पन्न होतात आपल्या हिंदुसमाजात जातिभेद असल्यामुळें व चातुर्वर्ण्यव्यवस्थेचें ध्येय असल्यामुळें उद्योगधंद्यासंबधानें लोकांना जें शिक्षण मिळत आलेलें आहे त्यामुळें त्या त्या वर्णांच्या व जातींच्या मनांत विशिष्ट भावना दृढमूल होऊन बसल्या आहेत एकेकाळच्या तत्त्ववेत्त्यांनीं समाजधारणासुधारणेला अत्यंत योग्य व आवश्यक वाटून स्तुति केलेल्या चातुर्वर्ण्यविषयक ज्या भावना उत्पन्न झाल्या त्या अद्याप ती चातुर्वर्ण्यावस्था बहुतेक विस्कळित झालेली असली तरी, लोकांच्या मनांतून नाहींशा झालेल्या नाहींत म्हणून जेव्हां समाजव्यवस्थेला नवें व निराळें स्वरूप द्यावयाचें असेल तेव्हां प्रथम या जुन्या भावनांचा व नैतिक कल्पनांचा आणि नव्या कल्पनांचा खटका उडणारच. आर्थिक परिस्थितीशीं संलग्न असलेल्या जुन्या भावनांचें वर्गीकरण पुढील प्रमाणें करतां येईल —

(१) ज्या भावनांमुळें निवृत्ति, संन्यास, उर्फ कर्मत्यागाची बुद्धि उत्पन्न होते व बळावते त्या भावना

( २ ) ज्या भावनामुळें नैष्कर्म्यबुद्धीचें समर्थन होत नसलें तरी अर्थोत्पादनेतर क्रिया करण्याकडे लोकांची प्रवृत्ति होते त्या भावना.

( ३ ) ज्या भावना सामाजिक व आर्थिक व्यवस्थेला धरून असल्या तरी नव्या सामाजिक व आर्थिक ध्येयांना पोषक नाहींत त्या.

( ४ ) नव्या ध्येयांना उत्तेजक नाहींत आणि विरोध-कांहि नाहींत पण ज्या सांप्रतच्या अर्थोत्पादन व व्यय यांच्या मार्गांना विशिष्ट स्वरूप देत आहेत त्या भावना,

( ५ ) आणि प्रत्यक्ष भावनाव्यतिरिक्त ज्या गोष्टी अशा आहेत कीं, त्याची योग्य दिशेनें सुधारणा केल्यास त्या नूतन आर्थिक ध्येयांना परिपोषक होतील त्या गोष्टी

आतां वरील कलमाचा क्रमश विचार करूं

हिं दूं ती ल दै व वा दा चे प रि णा म.—आज समाजामध्यें ऐहिक व आर्थिक उन्नतीसंबधानें शैथिल्य उत्पन्न करणाऱ्या ज्या भावना व कल्पना हिंदु समाजाच्या हाडी मासीं खिळलेल्या आहेत त्या कोणत्याहि विचारी हिंदु माणसाच्या लक्षात आल्यावाचून राहणार नाहींत; इतकेंच नव्हे तर असा विचारी माणूसहि स्वतः एकदां वरील शैथिल्य स्थिति अनुभवलेलाच असतो स्वत ची ऐहिक स्थिति सुधारण्याकडे दुर्लक्ष्य करण्याची बुद्धि उत्पन्न करणारी अनेक कारणें आहेत. त्यापैकीं कांहीं दैववादामुळें व कांहीं कलियुग व कल्पांत यांच्या कल्पनांमुळें उत्पन्न झालेलीं आहेत. या अनंत कालातील अनंत, अतर्क्य व मानवशक्तीच्या आटोक्याबाहेरच्या अशा अवाढव्य घडामोडी या विश्वात चालत असलेल्या पाहून मनुष्याच्या मनांत एक प्रकाची निराशा उत्पन्न होत असते, व सर्व मानवी प्रयत्न व्यर्थ आहेत असें वाटूं लागतें, सर्व गोष्टी नैसर्गिक किंवा परमेश्वरी नियमाच्या आधीन आहेत अशी त्याची ठाम समजूत होऊन बसते, आणि समाज किंवा जग सुधारण्याचे सर्व प्रयत्न तो सोडून देतो. अशा प्रकारचा दैव वाद हिंदु समाजांत फार पसरलेला आहे. याचा परिणाम हिंदूच्या आर्थिक स्थितीवर किती होत असतो याची कल्पना यूरोपीय लोकास येणार नाहीं. वरील प्रकारच्या दैववादी इसमास, तुझें तुझ्या समाजासंबंधानें कर्तव्य काय, असें विचारल्यास, 'कांहीं नाहीं,' असें तो उत्तर देणार। शेवटीं सर्व सचेतन व अचेतन विश्व, ब्रह्मात विलीन होणार आहे व म्हणून स्वत.हि शक्य तितक्या लवकर मोक्ष गांठणें, हें तो आपलें कर्तव्य समजत असतो. हिंदुसमाजात पसरलेली ही बुद्धि नष्ट करणें हें काम फार कठीण आहे, आणि त्या संबंधानें प्रयत्न झालेले आहेत. कित्येक म्हणतात, मोक्ष मिळवावयाचा तरी त्याला दोन मार्ग आहेत, एक प्रवृत्तिपर ( कर्मयोग ) व दुसरा निवृत्तिपर ( संन्यास ) भगवद्गीतेचा उद्देश मनुष्यांना प्रवृत्तिपर विशेष कर्मयोगी बनविण्याचा आहे. मोक्षावर दृढ विश्वास असणाऱ्या लोकाना कार्यप्रवृत्त करण्यास वरील भगवद्गीतेचा उपदेश चांगला आहे यांत शंका नाहीं. पण तेवढ्यानें भागत नाहीं. कारण अलीकडे असाहि एक वर्ग आपल्या समाजात उत्पन्न झालेला आहे कीं, त्याचा मोक्षावर विश्वास नाहीं, पण जो दैववादी आहे अशा वर्गास कार्यप्रवृत्त करण्यास त्याच्यापुढें एकादें मोठें राजकीय व सामाजिक ध्येय ठेविलें पाहिजे, व तें ध्येय उपदेशिणारे समाजशास्त्रवेत्ते निर्माण होणें जरूर आहे.

समाजाची आर्थिक स्थिति सुधारल्यास त्याची नीतिमत्ताहि सुधारते. दारिद्र्यग्रस्त मनुष्य व समाज दुर्गुणी व दुर्वर्तनी असतो. उलट सुस्थितीतल्या समाजात लवकरच चांगले आचार विचार सुरू होतात. संपन्न व विपन्न स्थितींतल्या दोन समाजांतील नीतिमत्तेची तुलना करून दाखविल्यास पक्का दैववादी विद्वानहि कार्यप्रवृत्त होण्याचा फार संभव आहे

क लि यु गा ची क ल्प ना व ति चे प रि णा म.—हिंदु लोकास निराशावादी व कार्यनिवृत्त करणारी दुसरी गोष्ट म्हणजे कलियुगाची कल्पना. आमच्यातील जुन्या लोकांची अशी कल्पना आहे की, आजकाल हिंदुसमाजात ज्या वाईट गोष्टी दिसून येतात त्या सर्व कलियुगाचे परिणाम आहेत भविष्यपुराण नामक ग्रंथात पूर्वीच्या पंडितांनीं असें भविष्य लिहून ठेविलें आहे कीं, चालू असलेल्या कलियुगात अनीति, व अनर्थोत्पत्ति वाढतच जाणार व अखेर कलियुगातीं सर्व जग बुडणार। अर्थात् हिंदु समाजातील प्रस्तुतचीं व्यंगें व दु खें ईश्वरसंकेतानेंच उत्पन्न केलेलीं आहेत। तर तीं नाहींशीं करणें शक्य नाहीं. अशा प्रकारच्या कल्पना नाहींशा करण हें समाजसुधारकाचें कर्तव्य आहे, अर्थशास्त्रज्ञांचें नव्हे.

स्व र्ग-मो क्ष प्रा प्ती ची क ल्प ना व ति चे प रि णा म.—स्वर्गप्राप्ति किंवा जन्ममरणमुक्ति अशा प्रकारच्या पारमार्थिक ध्येयामुळें हिंदुसमाज सर्वस्वी कार्यनिवृत्त बनलेला नसला तरी त्यातील बराचसा सुशिक्षित वर्ग स्वर्गमोक्षदायक वृत्ताचरण, तीर्थयात्रा, तपाचरण वगैरेंवर विश्वास ठेवणारा या कल्पनाचा आहे अर्थशास्त्राच्या दृष्टीनें घातक परिणामच होत असतो. हे लोक कार्यनिवृत्त नसले तरी ऐहिक स्थिती सुधारण्याकडे किंवा अर्थोत्पादक करण्याकडे याचें फारसें लक्ष नसतें. स्वर्ग किंवा मोक्ष मिळविण्याची कल्पना बलवत्तर झाल्यामुळें पुष्कळ चांगले बुद्धिमान व सुविचारी लोकहि देशाची आर्थिक उन्नति करण्याच्या कामी पूर्ण निरुपयोगी असे होऊन बसले आहेत. याच लोकांनीं आपल्या पुढें एखादें राजकीय किंवा सामाजिक ध्येय ठेवल्यास त्यांचा देशसुधारणेच्या कामीं उत्तम उपयोग होण्यासारखा आहे. केवळ अर्थोत्पादन व अर्थसंचय असलें प्रत्यक्ष आर्थिक ध्येय त्यांच्यापुढें नसलें तरीहि चालेल, त्यांनीं समाजसुधारणेचा आस्थापूर्वक कोणताहि

उद्योग केला तरी तो अप्रत्यक्षपणें समाजाच्या आर्थिक उन्नतीस पोषकच होणार आहे. लोकांच्या गरजामध्ये मानसिक गरजांचें प्रमाण मोठें आहे. कलावृद्धि व ज्ञानवृद्धि म्हणजे मानसिक गरजांची प्रगति होय. या गरजांच्या प्रगतीमध्यें काहीं अनिष्ट अंश आहे काय हें मधून मधून पाहिलें पाहिजे. हिंदूंच्या सौंदर्याविषयींच्या असलेल्या जुन्या कल्पना इंग्रज वगैरे परकी लोकांहून थोड्याशा निराळ्या होत्या. अलीकडे चित्रकला, संगीत, वाद्यें वगैरे बाबतींत परकीयांच्या परिचयामुळें आपल्या आवडीनावडी बदलत आहेत. आपल्याच जुन्या गोष्टींत सुधारणा करणें निराळें, व केवळ परकीयांच्या गोष्टी ग्रहण करणें निराळें. उदाहरणार्थ, तबला, तंबोरा, सतार वगैरे हिंदी वाद्यांतच सुधारणा करणें, व उलट पियानो वगैरे परकीय वाद्यें प्रचारांत आणणें यांत आर्थिक दृष्ट्या अत्यंत मोठा फरक आहे. हिंदी वाद्यांऐवजीं परकी वाद्यें पसंत लागल्यास आपला कारागीर वर्ग नष्ट होऊन परदेशच्या धंदेवाल्यास आश्रय मिळणार. म्हणून कलांचे बाबतींत परकीयांची अभिरुचि हिंदूंनीं स्वीकारल्यास आर्थिक हानि होणारी आहे. तथापि, हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपल्या कारागिरांच्या नालायकीमुळें त्यांचा आश्रय जाईल म्हणून मागासलेल्या वस्तूंचाच स्वीकार समाजानें चालू ठेवणें समाजाच्या हिताचें नाहीं. कारण तशानें नव्या गरजा पुरविणारा वर्ग तयार व्हावयाचा काल दूर जातो. परक्या वाङ्मयाची गोडी लागल्यानें देशी रा[...]गिरीवर अनिष्ट परिणाम तितका होत नाहीं, कारण परदेशी पुस्तकें परकी भाषा जाणणारे लोकच फक्त विकत घेणार, सर्वजनसमाज घेणार नाहीं. वाङ्मयाचे बाबतींत सुद्धां स्वभाषा व स्वकीय वाङ्मय यांचा अभिमान नष्ट होतां कामा नये, उलट परकीय वाङ्मयाच्या अभ्यासानें स्वतःच्या वाङ्मयांत भर पडली पाहिजे. या दृष्टीनें पाहतां इंग्रजी भाषेच्या अभ्यासानें आपला फायदाच झालेला आहे असें दिसून येईल. ब्रिटिश अमलाखालीं हिंदुस्थानांत जो शिक्षणप्रसार झालेला आहे त्यामुळें आपला सर्व जगाशीं बौद्धिक संबंध जोडला जाऊन आपली समाजाविषयींची कल्पना विस्तृत झालेली आहे. शिवाय मराठी वगैरे हिंदुस्थानांतील सर्व वाङ्मयांत विचार व कल्पना फार वाढल्या असून पूर्वीपेक्षां इतिहास, काव्य, नाटकें, कादंबऱ्या तसेंच प्रत्यक्ष नाट्यप्रयोग वगैरे वाङ्मयामध्यें सर्व अंगांत आपली आवड वाढत आहे. खुद्द जुन्या संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास सुद्धां अधिक जोरांत सुरू झालेला आहे. देशाभिमानाची कल्पना जागृत झाल्यामुळें तिला उत्तेजक असें गद्य व पद्य ग्रंथ निर्माण होत आहेत.

शि क्ष ण व वा ङ्म या भि रु ची चा प रि णा म.— लोकांत शिक्षण व वाङ्मयाभिरुचि वाढल्यानें सामाजिक व आर्थिक परिणाम कसे होतात ते पहा. शिक्षणानें लोकांची बुद्धि तीव्र होऊन अर्थोत्पादन व व्यय दोन्ही वाढत जातात. त्यांची राहणी उच्च होत जाते. पुस्तकें व वर्तमानपत्रें यांचा सुशिक्षित मनुष्य ग्राहक बनतो, त्यामुळें त्यांची निष्पत्ति व विक्री या धंद्यांची फार वाढ होते, इतकेंच नव्हेतर हरएक प्रकारच्या जाहिराती वाचण्यांत आल्यामुळें मनुष्य खेडेगावांत राहत असला तरी नव्यानव्या जिनसा तो खरेदी करतो. जर्मनींत व अमेरिकेंत सुशिक्षित शेतकरी स्वतः उत्पन्न केलेले पदार्थ दलाल वगैरे मध्यस्थावांचून पोस्टानें शहरांतील गिऱ्हाइकांकडे पाठवीत असतात. शिवाय सुशिक्षित मनुष्य पावत्या, खतें वगैरे बाबतींत फसला जाण्याचा संभव नसतो. सुशिक्षित शेतकऱ्याची व्यवहारांत पतहि अधिक असते. शिक्षणाचा परिणाम स्वभावावर व नैतिक आचरणावर होऊन मनुष्याचा भित्रेपणा व संशयीवृत्ति कमी होत जाते. व या नैतिक फरकाचा एकंदर समाजाच्या सामाजिक व राजकीय व्यवहारावर फार परिणाम होतो. त्यापैकीं विशेषतः राजकीय परिणामाकडे आतां वळूं.

हिंदी राजकीय स्थितीसंबंधाची अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिंदुस्थानचें पारतंत्र्य होय. नव्या झालेल्या राजकीय सुधारणांनीं सुद्धां स्वतःच्या देशाचें भवितव्य ठरविण्याची खरी सत्ता हिंदी लोकांच्या हातांत फारशी आलेली नाहीं. प्रजेच्या इच्छा व आकांक्षा समजून घेतां याव्या म्हणून इंग्रज राज्यकर्त्यांनीं हिंदी लोकांत इंग्रजी भाषा जाणणारा असा एक वर्ग तयार करून आपल्या हाताशीं घेतला, पण या वर्गाचें वजन अधिकारी वर्गावर फारसें पडलें नाहीं, व खरी लोकमतानुवर्ती राज्यपद्धति अद्यापहि स्थापन झाली नाहीं. राजकीय परावलंबनाचा आर्थिक स्थितीवर अत्यंत मोठा परिणाम होत आहे. तथापि असा परकी सरकारनेंहि आर्थिक व राजकीय स्थिति सुधारण्यासंबंधाची मागणी प्रत्येक वेळीं फेंटाळूनच लावली असें मात्र नाहीं. उलट आपल्या हातीं सत्ता आल्यास आपण काय सुधारणा करणार, याबद्दल नक्की कार्यक्रम हिंदी पुढाऱ्याजवळ फारसा तयार नसे. आज प्रांतिक व वरिष्ठ कायदेकौंसिलांतील सभासदांजवळ सुद्धां देशसुधारणेच्या योजना असाव्या तितक्या तयार नाहींत. शिवाय आज इंग्रज अधिकारीवर्ग स्वतःचें हित साधण्याकरतां हिंदुस्थानचें हित दुर्लक्षिण्यास जसा तयार असतो तसा हिंदी अधिकारी वर्ग सुद्धां स्वार्थाकरतां लोकांच्या हितावर पाणी सोडण्यास मागेंपुढें पाहीलसें वाटत नाहीं. आणि दारूची बंदी करण्यास सरकारी उत्पन्न कमी होईल या भीतिमुळें, सांप्रतचे हिंदी दिवाणसुद्धां विरुद्ध जाण्याचा संभव आहे. तात्पर्य, आजपर्यंतच्या देशांतील दुःस्थितीचें खापर सर्वस्वी इंग्रज सरकारच्या माथ्यावर फोडणें वाजवी होणार नाहीं, किंवा दारूचें व्यसन वगैरे युक्त्यांनीं हिंदुस्थानचा नाश करण्यांत इंग्रज अधिकारी वर्गाला आनंद आहे, असें मानणें चुकीचें आहे.

उलटपक्षीं, हें खरें आहे कीं, ब्रिटिश वसाहतींना संपूर्ण स्वराज्याचे हक्क देऊन हिंदुस्थानला मात्र कायम परतंत्रच ठेवावयाचें, असें मुद्दाचें धोरण ब्रिटिश मुत्सद्यांनीं बरेंच काल ठेविलें होतें. हिंदुस्थानचें एक राष्ट्र बनून तें इंग्लंडला मदत करण्याइतकें समर्थ होऊं शकेल, हें त्यांना शक्य वाटत नसे; व म्हणून हिंदी लोकांत एकी उत्पन्न करून त्यांची उन्नति करण्याचा मनापासून प्रयत्न ते करीत नसत. *शिवाय हिंदी राष्ट्र एक व प्रबल झाल्यास तें ब्रिटिश अम्मल* तत्काल झुगारून देईल अशीहि भीति त्यास वाटे. तथापि आतां वरील सर्व धोरण पालटून हिंदुस्थानला स्वराज्य देण्याचें व *त्याला ब्रिटिश साम्राज्यव्यवस्थेंत* एक समान हक्काचा भागीदार बनविण्याचें धोरण जाहिरपणें स्वीकारण्यांत आलें आहे.

हें राजकीय धोरणासंबंधानें उभयपक्षी विवेचन करण्याचें कारण हेंच कीं, परकी ब्रिटिश अंमलाचे गुणदोष यथार्थ लक्षात यावे व सरकाराबद्दल *विनाकारण* अविश्वास किंवा गैरसमज राहूं नये. आता ब्रिटिश अंमलाचे आर्थिक दृष्ट्या नफे तोटे काय आहेत ते क्रमानें पाहूं.

ब्रिटिश अंमलापासून झालेला पहिला फायदा म्हणजे शांतता हा होय. गेल्या शंभर वर्षांत देशांतील सर्व लोकांस जो शांततेचा लाभ झाला आहे तसा पूर्वी कित्येक शतकांत कधींच झाला नव्हता. त्यामुळें प्रस्तुत सरकारची पतहि फार वाढलेली आहे. खुद्द मराठ्यांचें स्वराज्य होतें तेव्हांहि *सरकारी कर्जावर व्याजाचा दर बराच मोठा* म्हणजे शेकडा १४ ते १८ रुपयेपर्यंत असे; फार क्वचित १९।२० रुपये असे. हल्लीं देशात शांतता व सुव्यवस्था असल्यामुळें परदेशातले धनिक लोकहि हिंदुस्थानात आपलें भांडवल गुंतविण्यास कचरत नाहींत. उदाहरणार्थ, येथील बहुतेक रेल्वे कंपन्या परकीयांच्या भांडवलानेंच चालल्या आहेत. त्यामुळें या देशाचा मोठा तोटाहि होत आहे, त्याचा विचार पुढें करूं.

आता *ब्रिटिश अंमलामुळें* होणाऱ्या तोट्याचा विचार करूं. या तोट्यांची वर्गवारी पुढीलप्रमाणें करतां येईल.

(१) हिंदुस्थानचा बराच पैसा इंग्लंडमध्यें खर्च होत असतो.

(२) ब्रिटिश सरकार हें परकी सरकार असल्यामुळें या देशांतील कोणत्याहि सामाजिक सुधारणा करण्याचें काम हातीं घेत नाहीं व सामाजिक स्थितीचा आर्थिक स्थितीवर *परिणाम होत असल्याकारणानें सामाजिक सुधारणाच्या बाबतींतील सरकारच्या तटस्थवृत्तीमुळें* देशाचा तोटाच होत आहे.

(३) ब्रिटिश सरकारचें *राज्य* चालू झाल्यावर जें राजकीय धोरण स्वीकारण्यांत आलें, तदनुसार आर्थिक धोरण ठरविलें गेलें व तें देशाच्या *खऱ्या हितास* विघातक झालें आहे.

(४) इंग्रजी भाषा वगैरे अनेक इंग्रजांच्या गोष्टी आपणांवर लादल्या गेल्यामुळें अनेक तोटे होत आहेत.

हिंदुस्थानचा पैसा इंग्लंडात खर्च होतो *त्याचा* तपशील येणेंप्रमाणें देता येईल. (१) इंडिया कौन्सिलच्या सभासदाचा व इंडियाआफीसच्या लोकांना पगार,(२)विलायतेंत हिंदुस्थान सरकारनें काढलेल्या कर्जावरील व्याज, हें सर्वच सुधारणे-*साठीं काढलेल्या रकमेवर नाहीं तर हिंदुस्थान जिंकण्याच्या खर्चावर,आणि साम्राज्याच्या फायद्यासाठीं हिंदुस्थानला युद्धांच* खर्च आले तेहि त्यात आहेत. (३) हिंदुस्थानसरकारकरतां सरकारी ऑफिसांना वगैरे लागणारे जिन्नस स्टेट सेक्रेटरी *विलायतेंतून खरेदी करून पाठवितो त्याची किंमत*(४) विलायतेंत रजेवर असलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांचा पगार व(५)नोकरीची मुदत संपून इंग्लंडमध्यें परत गेलेल्या इंग्रज मुलकी व लष्करी अधिकाऱ्याच्या पेन्शनांकरतां खर्च होणारी रक्कम यांचा समावेश होतो. हा खर्च सुमारें २४ कोट रुपये आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे सिव्हिल सर्विसच्या किंवा बॅरिस्टरांच्या परिक्षेकरिता इंग्लंडात राहणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांकरतां *इंग्लंडांत होणारा खर्च, या खर्चाकरतां हिंदुस्थानचे* दरसाल सुमारें तीस लाख रुपये विलायतेंत जात असतात. शिवाय ब्रिटिश साम्राज्य सरकारचा देश म्हणून इंग्लंडला फार महत्त्व असल्यामुळें अनेक हिंदी संस्थानिक इंग्लंडांत जाऊन बराच काल राहतात. त्यांचा तेथें होणारा खर्च हिंदुस्थानांतील पैशानेंच चालत असतो व ही रक्कम फार *मोठी आहे. "हिंदकी कमाई लंडनमे गमाई"* हें वाक्य सर्वांस परिचित आहेच. शिवाय इंग्लंडमध्यें राहिल्यानें *तिकडचे पदार्थ वापरण्याची त्यांना सवय* लागते व अशा *रीतीनें जरूरीच्या व चैनीच्या अनेक विलायती जिनसा* विकत घेण्याकरतां हे संस्थानिक विलायतेंत पैसा धाडीत असतात. इतकेंच काय पण या संस्थानिकांचे बंगले, राजवाडे बांधण्यास सुद्धां विलायतेंतील इंजिनियर लागतात. या *प्रमाणें* संस्थानिकांच्या मार्फत हिंदुस्थानांतला पुष्कळ पैसा विलायतेंत जात आहे.

तिसरी गोष्ट वरिष्ट साम्राज्याचें कोर्ट उर्फ प्रीव्ही कौन्सिल. हें *विलायतेंत असून तेथें हिंदी लोकांना अपीलें करावीं* लागत असल्यामुळें *या कोर्टांतील दाव्याकरतां म्हणून व* इंग्लंडांतील बॅरिस्टर व सॉलिसिटर यांच्या फीच्या म्हणून पक्षकारांमार्फत हिंदुस्थानचा कितीतरी पैसा दरसाल विलायतेंत जातो. हा सर्व पैसा ब्रिटिशांचा म्हणजे परकीयांचा अंमल येथें असल्यामुळें विलायतेंत जात आहे, म्हणजे हल्लींच्या राजकीय स्थितीचा ह्या आर्थिक स्थितीवर फार *मोठा परिणाम होत आहे.*

*ब्रिटिश राज्यकर्ते परकी म्हणून* सामाजिक बाबतींत हात घालूं इच्छित नाहीत व दुसऱ्या पक्षीं *हिंदी लोकांच्या* हातांत सामाजिक सुधारणा करण्याचा अधिकार नाहीं. *ब्रिटिश सर*-कारला स्वतःच्या वजनानें सामाजिक बाबींसंबंधानें कायदे

करण्यास लावील असा वजनदार हिंदी पुढाऱ्याचा वर्ग नव्या कौन्सिलांमुळें निर्माण झालेला आहे व तो कायदे करून कांहीं सामाजिक सुधारणा घडवून आणील, परंतु सर्व सामाजिक सुधारणा कायद्यानें होऊं शकत नाहींत सर्व राष्ट्रांत अनुकरण परिणामकारीहि होतें. पण त्याकरितां समाजात मान असलेला असा वर्ग लागत असतो. हिंदी-संस्थानिक हा अशा तऱ्हेचा एक वर्ग असून तो सामाजिक सुधारणेला उपयोगी पडण्यासारखा आहे. परको राज्यकर्त्यांना असलें वजन हिंदी समाजांत मिळणें शक्य नाहीं. बंगाल्यांत आज दीडशें वर्षे ब्रिटिश अम्मल चालू आहे; तरीहि तिकडे पडदापद्धति पूर्ववत् कायम आहे.पण ब्रिटिशांऐवजी जर तेथें मराठ्यांच्या अम्मल असता तर त्यांच्या सहवासानें बंगाली लोकांच्या चालीरीतींत खात्रीनें पुष्कळ फरक पडला असता.

विशिष्ट राजकीय धोरणामुळें आर्थिक परिणाम कसे होत असतात तें पाहूं. रेल्वेचें उदाहरण घेतल्यास त्याची सर्व मांडणी हिंदुस्थानांतील प्रमुख बंदरांचा म्हणजे मुंबई, मद्रास, कलकत्ता, कराची, रंगून यांचा लंडनशीं संबंध जोडण्याच्या दृष्टीनें केलेली आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. हें राजकीय धोरण हिंदुस्थानाला विघातक झालेलें असल्यामुळें तें सोडून देण्याचें सरकारनें आतां कबूलहि केलें आहे. तथापि पूर्वीच्या धोरणाचे तोटे अद्याप सोसावे लागत आहेत. निरनिराळ्या प्रांताच्या व्यापारी दळणवळणास रेल्वे उपयोगी पडत नाहींत. यामुळें एका प्रांतांतील माल दुसऱ्या प्रांतात नेणें दुरापास्त होतें. उलट इंग्लंडांतून माल मागविणेंच सोयीचें पडतें, त्यामुळें परदेशी माल फार येत आहे. रेल्वेनें दळणवळण वाढल्यास प्रांताप्रांतामध्यें मालाची निपज करण्याच्या बाबतींत चढाओढ सुरू होऊन औद्योगिक उन्नतीस मदत होईल पण तें आज शक्य नाहीं शिवाय निरनिराळ्या प्रांतांतील लोकांच्या आवडनिवडींत व सामाजिक चालीरीतींत सारखेपणा उत्पन्न होऊन हिंदुस्थानच्या एकराष्ट्रीकरणास मदत होईल.

हिंदुस्थान हा जित देश आहे व केवळ इंग्लंडच्या फायद्याकरितां आहे, हें धोरण आजपर्यंत चालत आलें होतें त्यामुळें हिंदुस्थानची खरी सुधारणा करण्याकडे ब्रिटिश मुत्सद्द्यांचें लक्ष नव्हतें. हिंदुस्थान यावच्चंद्रदिवाकरौ इंग्लंडच्या पारतंत्र्यांत रहावा हीच प्रत्येक इंग्रजाची इच्छा असल्यामुळें त्याकरितांच प्रत्येक इंग्रज अधिकाऱ्याची धडपड.प्रांताप्रांतांतील दळणवळण वाढण्यास सोइस्कर अशा धोरणानें रेल्वे बांधल्या गेल्यास हिंदुस्थानास ब्रिटिशसत्तेविरुद्ध बंड करणें सोपें होईल,ही मनांत भीति, व हिंदी लोकांच्या राजनिष्ठेबद्दल सतत साशंक वृत्ति या गोष्टी इंग्रज अधिकारी तोंडानें कबूल न करोत, पण मुक्त्याच जिंकलेला अवाढव्य हिंदुस्थानबद्दल वरील प्रकारची भीति इंग्रजांना वाटणें साहजिक आहे. ही भीति नाहींशी होण्याकरितां ब्रिटिश राज्यपद्धति व पाश्चात्य सुधारणा याबद्दल हिंदी लोकांत प्रेमादर उत्पन्न व्हावा अशी त्यांनीं खटपट केली. पण या उपायानें हिंदुस्थान व ब्रिटिश साम्राज्य यांचा संबंध दृढ होऊन चिरकाल नांदेल ही गोष्ट कोणाला फारशी पटलेली दिसत नाहीं. हा प्रश्न जितक्या सविस्तर रीतीनें लोकांपुढें मांडावयास पाहिजे तितका मांडला गेला नाहीं. वास्तविक पाहतां हा संबंध कायम टिकणें जरूर आहे व हितावहहि आहे, ही गोष्ट अनेक कारणें दाखवून सिद्ध करतां येण्यासारखी आहे

इंग्रजी वाङ्मयांत सोशलिझम विरुद्ध इंडिव्हिज्युअलिझम असा वैरुद्ध्यन्यास मांडलेला सांपडतो तर त्या दोन्ही संप्रदायांचें तात्विक स्वरूप काय याचें विवेचन, आणि सोशिलिझम हिंदुस्थानाला कितपत ग्राह्य आहे याचा विचार डॉ. केतकर यांनीं एका प्रकरणांत केला आहे.

अर्थशास्त्राचीं तत्त्वें ठरविण्याच्या दोन परस्पर विरुद्ध दृष्टी आहेत. एक दृष्टि अशी कीं, समाज हाच इष्टवर्ग समजून विचार करावयाचा. उलटपक्षीं, व्यक्ति हाच इष्टवर्ग समजून विचार करणें, ही दुसरी दृष्टि. राजकीय अर्थशास्त्र (पोलीटिकल इकानामि) हा व्यापक अर्थशास्त्राचा एक भाग असून त्यांत केवळ समाजाला सामुच्चयिक दृष्ट्या हितकारक अशा गोष्टींचा विचार प्राधान्यानें केलेला असतो. समाजसत्ताकपद्धति (सोशीॲलिझम) म्हणजेच समाजहितवादी अर्थशास्त्र (कम्यूनल इकानॉमिक्स) असा अर्थ नव्हे. उलटपक्षीं, समाजसत्ताकपद्धतीच्या व्यवस्थेंत व्यक्तिशः प्रत्येक इसमाला अत्यंत फायदा मिळवून देतां येईल असें धरलेलें असतें. समाजहितवादी अर्थशास्त्राला, व्यक्तीला कार्यस्वातंत्र्य असावें व व्यक्तीस्वातंत्र्यावर सरकारनें शक्य तितकें कमी नियंत्रण घालावें, हें तत्व मान्य आहेच. व्यक्तीचा फायदा होत असेल तर समाजाचा घात करण्यास हरकत नाहीं, असें व्यक्तित्ववादीहि म्हणत नाहीं. तात्पर्य समाजहितवादी अर्थशास्त्रात समाजाच्या हिताला प्राधान्य दिलेलें असतें, आणि व्यक्तिहितवादी अर्थशास्त्रात व्यक्तीच्या हिताला प्राधान्य दिलेलें असतें, इतकेंच.

समाजसत्तावादांत एखाद्या विशिष्ट राज्याचें चिरस्थायित्व लक्षांत घेत नाहींत, किंवा अमुक एक धर्माचा अनुयायी किंवा अमुक एक राष्ट्राचा प्रजाजन या दृष्टीनें व्यक्तीचें कर्तव्य ठरविलें जात नाहीं, तर अर्थोत्पादन करणारा व उपभोग घेणारा या दृष्टीनें व्यक्तीचा विचार करण्यांत येतो कोणत्या एका व्यक्तीला कोणत्याहि दुसऱ्या व्यक्तीइतका वस्तूंचा उपभोग घेण्याचा हक्क आहे असें समाजसत्तावादी म्हणतो. समाजसत्ताकपद्धतींत व्यक्तीला हल्लींपेक्षां फार अधिक स्वातंत्र्य मिळेल, असें समाजसत्तावाद्यांचें म्हणणें आहे व त्यांत तथ्यहि बरेंच आहे. व्यक्तीला शासनसंस्थेची जरूरी नाहीं, असें समाजसत्तावादी म्हणत नाहींत पण व्यक्तीचें सर्वांत अधिक हित साधून देतां येईल अशी शासनसंस्थेची रचना नाहीं आणि ती आपणास घडवून आणावयाची आहे एवढेंच त्यांचें म्हणणें आहे. म्हणून समाजसत्तावाद

व्यक्तित्ववाद हे परस्परविरोधी आहेत असें म्हणता येत नाहीं. त्या दोहोंतील संबंध पुढें दिल्याप्रमाणें आहे. व्यक्तित्ववादाचें म्हणणें असें की, व्यक्तिमात्राच्या बौद्धिक शक्तींना व मानसिक भावनांना स्वतंत्र कार्यक्षेत्र भरपूर असावें. हें कार्यक्षेत्र समाजसत्ताकपद्धतींतच सर्वांत अधिक मिळेल असें समाजसत्तावाद्याचें म्हणणें आहे. उलटपक्षीं व्यक्तिमात्रांतील स्पर्धेला पूर्ण मोकळीक दिल्यानें तें साधेल, अशी व्यक्तित्ववाद्याची समजुत आहे. म्हणून व्यक्तित्ववाद्याच्या दृष्टीनें चालू समाजरचनेंत मुळींच फरक करावयास नको आहे. उलट समाजसत्तावाद्याचें ध्येय साधण्याकरता समाजरचनेंत फार महत्वाचे फेरफार केलेच पाहिजेत. उदाहरणार्थ, सर्व संपत्ति सर्वांना सारखी उपभोग घेता यावी म्हणून समाजसत्ताक करणें जरूर आहे. ही एकच गोष्ट करावयाची म्हटली तर समाजव्यवस्थेंत भयंकर फरक होणार. उदाहरणार्थ, समाजसत्ताकपद्धतींत हल्लींचीं विवाहबंधनें फार शिथिल होतील. संपत्तीचा उपभोग सर्वांना सारखा घ्यावयाचा म्हटल्यास बेकायदा संततीच्या वारसाहक्कास बाध असतां कामा नये, म्हणजे विवाहाच्या व विवाहबाह्य संततीस वारसा सारखाच राहणार. असें झाल्यास विवाहबाह्य संततीवर घेतला जाणारा नैतिक आक्षेप त्या मानानें कमजोर होणार, म्हणजे वैवाहिक संबंध जोडण्याची आवश्यकता कमी होणार. शिवाय प्रत्येक स्त्री द्रव्यार्जन करण्यास समर्थ झाल्यानें व तिला समाजाचा आधार असल्यानें ती पुरुषावर अवलंबून राहण्याचें कारण उरणार नाहीं, व त्यामुळेंहि वैवाहिक बंधनें शिथिल होणार.

समाजसत्तापद्धति अमलांत राहण्यास ती सर्व जगभर स्थापन झाली पाहिजे. तरच ती टिकाऊ होईल. कारण एका देशांत ती पद्धति चालू झाली तरी त्याचा स्पर्धा संबंध व्यापार, उद्योगधंदे वगैरे कारणांनीं इतर समाजाशीं येणार व त्यामुळें एकट्याच देशाला त्या पद्धतीचा अवलंब करणें अशक्य होईल. स्पर्धेंत जें समाजस्वरूप जय देईल तेंच देशांत टिकेल.

समाजसत्ताकपद्धति व व्यक्तिस्वातंत्र्यपद्धति यांत राजकीय दृष्ट्या भेद नसून मुख्यतः संपत्तीच्या वांटणीसंबंधाचा दोहोंत फरक आहे. अर्थात् समाजसत्तापद्धति व्यक्तिस्वातंत्र्याला विघातक नसून उलट ती त्याची पुरस्कर्ती आहे; व त्या मानानें ती समाजहितवादी अर्थशास्त्राचें उच्चाटन करणारी आहे.

अशा या समाजसत्ताकपद्धतीसंबंधानें कोणतें धोरण हिंदवासीयांस हितावह होईल त्याचा आतां विचार करूं हा विचार दोन प्रकारें करतां येईल. समाजसत्तावाद्यांनीं सुचविलेल्या गोष्टींपैकीं कांहीं उपयोगी पडणाऱ्या तेवढ्याच गोष्टी हिंदुस्थानांत सुरू कराव्या असें म्हटल्यास तें इष्ट आहे व शक्यहि आहे. उदाहरणार्थ, रेल्वे, पोस्टखातें वगैरे सार्वजनिक हितसंबंधाच्या गोष्टींवर सरकारची मालकी राहणें ही गोष्ट हिंदुस्थानासहि फायद्याचीच आहे. अशा तऱ्हेच्या कुष्कळ गोष्टी समाजसत्तावाद्यापासून घेण्यासारख्या आहेत. परंतु समाजसत्तावाद्याचें प्रत्येक तत्त्व इष्टानिष्टतेचा विचार न करता हिंदुस्थाननें स्वीकारणें मात्र धोक्याचें आहे. समाजसत्ताकपद्धति सर्वस्वीं आपल्या देशांत सुरू करण्याचा विचार वेडगळपणाचा व घातक होईल. खुद्द यूरोपांतील किंवा अमेरिकेंतील पुढारलेल्या देशांत सुद्धां समाजसत्तापद्धति पूर्णपणें चालू होण्याचा काल अद्याप फारच दूर आहे. मग हिंदुस्थानासंबंधानें विचार त्याहूनहि नंतरचा. समाजसत्तावाद्याचें ध्येय पूर्णपणें अमलांत येण्यास, सर्व जग मिळून एकच देश इतकी बंधुभावाची व्यापक भावना मनुष्यजातींत उत्पन्न झाली पाहिजे. व्यापारविषयक स्थानिक म्हणजे देशादेशांतील स्पर्धा लयास गेली पाहिजे. विशिष्ट समाज, विशिष्ट देश व तत्संबंधींचा अभिमान व उच्चत्वाकांक्षा वगैरे भावना लोकांत जागृत आहेत तोंपर्यंत समाजसत्तावाद्याचीं तत्वें आपआपल्या फायद्यापुरतींच देश किंवा राष्ट्रें स्वीकारणार हें उघड आहे.

शिवाय समाजसत्तावाद्याचीं बरींचशीं तत्वें मजूर वर्गाच्याच फायद्याचीं आहेत. हा मजुर वर्ग तर हिंदुस्थानांत अद्याप फारच अज्ञानी व मागासलेला आहे. येथें सुशिक्षित अशा धनिक लोकांची सुद्धां एकजुट अद्याप झालेली नाहीं. मग मजुर वर्ग सज्ञान होऊन त्याची एकी होण्याचा काल फारच दूर आहे. या मार्गांत भाषा, धर्म, जातिभेद वगैरे अनेक मोठाल्या अडचणी आहेत. आणखी गोष्ट अशी कीं, हल्लीं हिंदुस्थानांत उद्योगधंद्याची वाढ झपाट्यानें पाहिजे आहे. अशा वेळीं मजूरवर्गाची सुधारणा जितकी उद्योगधंद्याच्या वाढीनें होईल तितकी वाटणी करता भांडत बसल्यानें होणार नाहीं. शहराबाहेर खेड्यांत पाहिलें तर अद्याप उद्योगधंदे लहान प्रमाणावरच चालू असल्यामुळें मजुर व भांडवलवाले असा भेद उत्पन्न झालेलाच नाहीं. या अनेक कारणांस्तव उत्पादनविषयक समाजसत्ताकपद्धतीचा प्रश्न हिंदुस्थानला फार दूरचा आहे. शिवाय समाजसत्ताकपद्धतींत सरकारच्या हातांत अधिकाधिक सत्ता जात असते, आणि हिंदुस्थानांत अद्याप बहुतेक सत्ता परकीय सरकारच्या हातीं असल्यामुळें समाजसत्तावादाप्रमाणें कांहीं कांहीं गोष्टी कर ण्याला सांगणें म्हणजे जनतेनें कोंवत परक्या लोकांच्या तावडींत अधिकाधिक देणें होईल. म्हणजे लोकांच्या दुःखांत भर घालण्यासारखेंच आहे. म्हणून प्रथम संपूर्ण स्वायत्तता मिळविणें, हेंच अर्थशास्त्रीय कर्तव्य आहे.

• भारतीय अर्थशास्त्राच्या भवितव्याविषयीं विचार करूं लागलों म्हणजे अनेक प्रश्नाकडे लक्ष द्यावें लागतें. भारतीय आर्थिक स्वायत्तता राजकीय दृष्टीनें जरी प्राप्त झाली तरी सध्यांच्या मागासलेल्या आर्थिक स्थितीमुळें तरी स्वायत्तता बराच काळपर्यंत प्राप्त होणार नाहीं व यापुढें भावी कार्यक्रम आपणास काय आहे याचा थोडक्यांत विचार केला पाहिजे.

देशांतील भांडवल एकदम वाढत नसतें. हा देश असा आहे कीं, येथें अर्थोत्पादनास नैसर्गिक साधनें पुष्कळ आहेत, तथापि त्या साधनांची प्राप्ति करून घेण्यास भांडवल व उच्च प्रकारचे मजूर या गोष्टी देशात पाहिजेत पण त्या एकदम उत्पन्न कशा होणार? इंग्लंडसारख्या देशाचें भांडवल इकडे ओढल्याखेरीज आपल्या आर्थिक आयुष्याची वाढ होणार नाहीं. परदेशाचें भांडवल येथें ओढलें जाण्यास येथील लोकांच्या व्यावहारिक कर्तृत्वाविषयीं इतका विश्वास वाढला पाहिजे कीं परदेशी भांडवलास इकडे येण्यात धोका नाहीं, मुद्दल अगदीं सुरक्षित राहील आणि परक्या मनुष्यास (त्याच्या देशातल्या ऐवजीं) येथें पैसा पेरला तर अधिक प्राप्ति होईल असें वाटेल. देशात राज्यतंत्र स्वायत्त झालें तर त्याचा जगातील रोकड बाजारावर काय परिणाम होईल याचा विचार आपणास करावाच लागेल.

भांडवलाकरता मागणी करणारा कारखानदार आपल्या व्यवहाराच्या अंतर्व्यवस्थेंत हात न घालणारा सावकार पहातो, त्याप्रमाणें राज्यतंत्रहि बाहेरची रकम ओढताना ज्याच्या योगानें स्वातंत्र्यनाश होणार नाहीं याबद्दल खटपटत राहणार, हें उघड आहे. पण उलटपक्षीं सावकार असें पहाणार कीं जर आपली रकम वसूल करता आली नाहीं तर ज्या उत्पादनसाधनाला रकम द्यावयाची त्या साधनावर आपणास अधिकार उत्पन्न व्हावा. या मनोवृत्तीमुळें देणेदार राष्ट्राचें स्वातंत्र्य जाण्यास परकीय भांडवल कारण झालें आहे. सावकाराला धंदा करावयास नको असतो पण त्याचा धंदा करणाऱ्यावर विश्वास पटावा लागतो. तर येथील सरकार लोकसत्तानुवर्ती जरी झालें तरी त्याची सावकारास खात्री वाटावी इतकें तें व्यवस्थित रीतीनें राज्य करीत असलें पाहिजे.

येथें इंग्लंडमधील भांडवल जितक्या लौकर येईल तितक्या लौकर इतर ठिकाणचें येणार नाहीं. आपणं तर परकी भांडवलाशिवाय चालणार नाहीं. आणि इंग्लंडमध्यें जर राष्ट्रीय अर्थशास्त्राऐवजीं साम्राज्यीय अर्थशास्त्राचा विकास होऊं लागला तरच तें इकडे येणार, त्यामुळें इंग्लंडचें जें साम्राज्यीय अर्थशास्त्र असेल त्याचा विचार करणें आपणास प्राप्त होतें. त्याच्या साम्राज्यीय अर्थशास्त्रात हिंदुस्थानच्या हितास विरोधी अशा ज्या बाबी असतील त्या आपणास नीट तपासून आपलें हित इंग्लंडच्या रोकडबाजारात मांडलें पाहिजे, आणि हिंदुस्थान व साम्राज्य याचे आर्थिक संबंध उभयतांसहि हितावह कसे होत जातील हें पहावें लागेल. यासाठीं हिंदुस्थानातील आर्थिक आयुष्यावर परिणाम घडवूं इच्छिणारे जे वर्ग पुढप उत्पन्न होतील, त्याचें कार्यक्षेत्र मुंबई व कलकत्ता हीं न राहता लंडन व लिव्हरपूल हीं होतील.

हिंदुस्थानामध्यें सर्व प्रकारचा माल व्हावा आणि तो मुबलक व्हावा, आणि जुन्या अत्यंत महाग अशा उत्पादनपद्धती बंद होऊन अर्वाचीन पद्धतीनें उत्पादन व्हावें,हें ध्येय साधण्यास येथील उद्योगधंद्याची पद्धतशीर मोजणी उर्फ सेन्सस झाली पाहिजे. देशात आज यांत्रिक शक्ति किती आहे आणि गरजा काय आहेत आणि त्या गरजांचें उत्पादन होण्यास देशांतील यांत्रिक शक्ति किती वाढवावी लागेल इत्यादि गोष्टींसंबंधानें पद्धतशीर योजना येथील सरकारपाशीं तयार पाहिजेत. आणि तें आर्थिक ध्येय साध्य करून घेण्यासाठीं इंग्लंडातील यंत्राच्या कारखानदाराना विश्वासात घेतलें पाहिजे. इंग्लंडसारख्या देशातील कारागिराशीं स्पर्धेचा आणि सहकार्याचा संबंध आल्याशिवाय येथील कारागिरी सुधारणार नाहीं, यासाठीं तेथील कारागिरानीं इकडे येणें व इकडच्या कारागिरानीं तिकडे जाणें हें सुलभ झालें पाहिजे. आज परदेशगमन हें केवळ धनिकतांसच शक्य आहे; गरीबास नाहीं. उत्पादनात गुंतलेल्या लोकांच्या परदेशगमनाशिवाय देशाच्या मजूरवर्गाची खरी सुधारणा होणार नाहीं, संरक्षक व्यापारपद्धतीचा हेतु गचाळपणें काम करणाऱ्यास उत्तेजन देण्याचा कधींहि नसावा. असो.

भा र ती य अ र्थ शा स्त्रा व री ल ग्रं थ.—याविषयीं माहिती येथें अत्यंत त्रोटकपणानें देतों. प्रो. काळे, डॉ. केतकर, बानर्जी, प्रो. शहा इत्यादिकांची पुस्तकें उपयुक्त आहेत. प्रो. काळे यांनीं आपल्या ग्रंथात अनेक विषयासंबंधानें जें वाङ्मय दिलें आहे त्यातील मुख्य ग्रंथ येणेंप्रमाणें.

ना. गोखले, ग. व्यं. जोशी यांची भाषणें. रिपोर्ट ऑन दि ॲडमिनिस्ट्रेशन ऑफ दि बॉंबे प्रेसिडेन्सी. ॲन्स्टन—एलेमेंट्स ऑफ इंडियन टॅक्सेशन. बेडन पॉवेल—लँड रेव्हेन्यू इन ब्रिटिश इंडिया. दत्त—लेटर्स ऑन लँड रेव्हेन्यू इन इंडिया. प्रो. काळे—इंडियन ॲडमिनिस्ट्रेशन, इंडियन एकॉनॉमिक्स व इंडियाज वार फॉयनन्स. लव्हडे—हिस्टरी ॲंड एकॉनॉमिक्स ऑफ इंडियन फायनॅन्स. गव्हर्नमेंट ऑफ इंडियाज रेझोल्यूशन ऑन लँड रेव्हेन्यू पॉलिसी. फॅमिन कमिशनचे रिपोर्ट. इरिगेशन कमिशनचे अहवाल—ऐचिसन आणि इस्लिंग्टन कमिशन ऑन पब्लिक सर्व्हिसेस व वेल्बी कमिशन याचे रिपोर्ट. डीकिन—इरिगेटेड इंडिया. गव्हर्नमेंट ऑफ इंडिया रेझोल्यूशन ऑन एज्युकेशन, सॅनिटरी पॉलिसी, लोकलसेल्फ गव्हर्नमेंट.

[ या लेखातील "मराठ्यांचें अर्थशास्त्र" हा भाग रा. स. बा. देशपांडे (उपसंपादक ज्ञानकोश) यांनीं लिहिला आहे आणि यूरोपीय अर्थशास्त्राच्या अर्वाचीन इतिहासांतील ऐतिहासिक संप्रदायापूर्वीचा भाग प्रा. वा. ना. गाडगीळ यांनीं लिहिला आहे. ]

**अर्देविल** (आर्दाबिल)—हें इराणच्या वायव्य भागातील अझरबैजन नावाच्या प्रांतातलि एका अर्देविल नावाच्याच जिल्ह्याचें ठिकाण आहे. तें उत्तर अक्षांश ३८° ४' आणि पूर्व रेखांश ४८° २१' यावर असून त्याची उंची ४५०० फूट आहे. या शहराची लोकसंख्या सुमारें १०००० असून तेथें पोस्ट व तार आफिसें आहेत. इराण व रशिया

या दोन देशांमध्यें चालणाऱ्या व्यापाराच्या वाहतुकीच्या मार्गावरील एक मोठें ठाणें या नात्यानेंहि या शहराला फार महत्त्व आहे. या शहराभोंवती एक मातीची पक्की भिंत असून तिला बुरूज आहेत. जवळच पूर्वेच्या बाजूला पाव मैलावर एक दगडमातीनें बांधलेला किल्ला आहे, व त्याची तटबंदी यूरोपीय पद्धतीची आहे. शहरामध्ये शेख सफीउद्दिन व त्याचा वंशज पहिला शहा इस्मायल ( १५०२–२४ ) सफवी घराण्याचा संस्थापक यांची थडगीं व स्मारकें आहेत. मध्ययुगांत या शहरीं पुष्कळ यूरोपीय व चिनी व्यापारी राहात. कारण ताब्रिझ, ट्रेबिझोंड, काळासमुद्र, या मार्गानें, तसेंच कॉकेशसपर्वत व व्होल्गानदी या मार्गानें आशियाचा यूरोपबरोबर व्यापार चालत असे. १६ व्या शतकांत इराणवर सफवी घराण्याचा अम्मल सुरू झाल्यापासून या शहरांतील शेख सफीच्या कबरीच्या दर्शनार्थ पुष्कळ यात्रेकरू येऊं लागले. या स्मारकस्थानाला एक कॉलेज व एक उत्तम ग्रंथालय जोडलेलें असून त्यांत पुष्कळ दुर्मिळ व बहुमोल हस्तलेख होते. पण ते हस्तलेख १८२८ मध्यें रशियनांनीं नेऊन लेनिनग्राड ( सेंट पीटर्सबर्ग ) येथील लायब्ररींत ठेविले. एका मशिदींत तीन शतकें जमीनीवर अंथरलेला एक मोठा गालीचा एका प्रवाशानें १८९० च्या सुमारास १०० पौंडास विकत घेतला व तोच पुढें साउथ केनसिंगटन म्यूझियमकरितां पुष्कळ हजार पौंड देऊन घेण्यांत आला. हा सुंदर गालीचा ३४ फूट लांब, व १७ फूट ६ इंच रुंद आहे.

**अर्देसर** (१ ला)–याचीं अर्तशिर, अर्तक्षत्र, अर्तक्षत्रसीर अशीं नामांतरें आहेत. ससॅनियन घराण्याचा संस्थापक पहिला अरदशिर ( इ. स. २२६–२४८ ) हा पर्सेपोलिसच्या आसपास असणाऱ्या खीर ( चीर ) चा राजा जो पापाक त्याचा पुत्र होय. इराण आणि त्या शेजारचीं राज्यें हस्तगत केल्यावर अरदशिरनें पार्थियन राजाधिराज जो अर्तबान त्याला ठार मारिलें व पुढें दोन वर्षांनीं टेसिफोन राजधानी जिंकून घेतली. प्रथमपासून अरदशिरनें आपलें राजकीय धोरण मज्द–यज्ञ–संप्रदाय पुनः उर्जितावस्थेस आणण्याकडे ठेविलें होतें. त्या काळीं हेलेन संप्रदाय अतिशय प्रबळ झाला होता तरी मज्दयज्ञ पंथाचें वजन लोकांवर होतेंच. अशा रीतीनें मगपुरुषपंथी भिक्षुक वर्गाचा म्हणजे मगी लोकांचा त्याला मोठा पाठिंबा मिळून पार्थियन राजांनीं हातीं घेतलेलें काम त्यानें पुढें चालू केलें. त्याचा राष्ट्रीय धर्मावर ओढा असल्याकारणानें त्यानें जुनी आचारपरंपरा कायम राखिली. उदाहरणार्थ त्याचा आजा सासान हा इस्तख्र (पर्सेपोलिस) मधील अनाहित देवीच्या देवळाविषयीं पूज्यबुद्धि बाळगीत असे, तीच बुद्धि अरदशिरच्या ठायीं होती. मगोपुरोहितवर्ग त्याला प्रिय असून तो स्वतः गूढविधि आचरीत असे. अलेक्झांडरच्या काळ व त्याच्या पुढली शतकें यांमध्यें जे अवेस्ता ग्रंथ नष्ट झाले होते, ते अरदशिरनें पुनः जमविले व त्याचा मुख्य उपाध्याय तन्सर यानें मूळाबरहुकूम त्याची पूर्ण रचना केली (दिनकर्ड ३). अरदशिरच्या पुढील राजाच्या कारकीर्दीपर्यंत ( पहिला शापूर इ. स. २४१ ते २७२ ) हें अवेस्ता संहितीकरण पुरें झालें नव्हतें. यासंबंधीं "अर्दाविराफ नामक" ग्रंथाच्या परशियन भाषांतराच्या प्रस्तावनेंत दुसरी अशी कथा आहे की, अरदशिरनें सर्व पुरोहितांना आपल्या राजधानीला बोलावून त्यांच्या स्मरणावरून अवेस्ता ग्रंथ आणि झेंद टीका एकत्र केल्या. मसूदाप्रमाणें पाहतां इन्साद ( यस्न ) नावाचा अध्याय तोंडपाठ म्हणण्याची चाल अरदशिरपासून पडलेली दिसते. तेव्हां डार्मेस्टेटर ( झेंद अवेस्ता ३, पान ३२) प्रमाणें आपल्यालाहि असें म्हणतां येईल की, अरदशिर आणि त्याचा हेरबद यांनीं समाजप्रार्थनापद्धतीला वळण लाविलें. धर्माच्या उद्धारार्थ अरदशिरनें ज्या दोन मुख्य गोष्टी केल्या त्यांपैकीं एक धर्मग्रंथ, पुराणें, कायदे आणि तत्त्वें यांचा संग्रह व दुसरी सत्यधर्म व सत्यउपासना यांना राजानें दिलेला पाठिंबा या होत. या दोन गोष्टींचा उल्लेख तन्सरनें तबरिस्तानचा राजा गुश्नस्प याला लिहिलेल्या पत्रांत केला आहे. राज्य आणि धर्म या दोन सत्तांच्या परस्परसाहाय्याचा जो अरदशिरनें सिद्धांत काढिला त्यामुळें त्याचें राजकीय व धार्मिक उत्थापन चिरंजीव झालेलें आहे. मसूदीनें त्याचा मुलगा जो शापूर याला अरदशिरचें तत्त्व म्हणून जें उपदेशिलें आहे तें असें: धर्म आणि राज्य या दोन बहिणी असून एकीवांचून दुसरीचें चालावयाचें नाहीं. कारण धर्म हें राज्याचें अधिष्ठान असून राज्य हें धर्माचें रक्षक आहे ( एरिए. )

**अर्धनारीश्वर**–ही भारतीयमूर्तिशास्त्रांतील एक कल्पना आहे. या प्रकारची मूर्तिकल्पना ग्रीस, रोम, वगैरेच्या प्राचीन किंवा अर्वाचीन जगांत दिसत नाहीं. शंकरपार्वतीच्या एकपट रूपाला अर्धनारीश्वर असें नांव आहे. अर्धा भाग महादेवाचा व बाकीचा अर्धा उमेचा, म्हणजे अर्धा पुरुषाचा व अर्धा स्त्रीचा असे दोन बेमालूम सांधलेले भाग अर्धनारीश्वर या नावानें ओळखण्यांत येतात. शैव धर्माचें प्राबल्य असणाऱ्या दक्षिणेंत या प्रतिमा इतर प्रांतांपेक्षां जास्त दिसतात.

मत्स्यपुराणांत ( अध्याय २६० ) अर्धनारीश्वराचें स्वरूप वर्णिलें आहे. उजव्या बाजूस मस्तकावर जटाभार व कपाळी चंद्रकोर, डाव्या बाजूस भांग व कुंकुमतिलक, उजव्या कानांत वासुकीचें कुंडल तर डाव्या कानांत बाळ्या–बुगड्या, उजव्या हातांत नरकपाल, त्रिशूळ वगैरे तर डाव्यांत आरसा किंवा कमळ, उजव्या हाताला सर्पभूषणें तर डाव्याला रत्नालंकार, उमेचा शंकराचा पाय कमळावर टेकलेला असावा व डाव्या स्त्रीभेच्या पायांत नूपुरें वगैरे पाहून अळित्यानें रंगविलेला व उजव्यापेक्षां थोडा वर टेकलेला असा असावा.

शिवशक्ति किंवा स्त्रीपुरुषतत्त्व यांचा संयोग जगाला आधारभूत असल्यामुळें या संयोगाची प्रतिमा अर्धनारीश्वर

रूपांत कल्पिलें आहे. अर्धनारीश्वराच्या मूर्ती बऱ्याच ठिकाणीं संशोधिल्या गेल्या आहेत.

*बंगालमधील मूर्ती.*—बंगालमधील सेन राजे कट्टे शिवभक्त असल्यानें त्या प्रांतीं बऱ्याच शिवमूर्ती आढळल्यास त्यांत नवल नाहीं. आतापर्यंत बंगाल्यांत अर्धनारीश्वराच्या दोन तीन मूर्ती संशोधिल्या गेल्या आहेत

राजशाही येथील वरेंद्र संग्रहालयात दोन मूर्ती ठेवलेल्या आहेत. या दोन मूर्तींपैकी एक दक्षिणार्ध शिवरूप व वामार्ध उमारूप अशा प्रकारची असून मुकुट, तृतीयनेत्र, मुख, वक्षस्थळ व इतर अवयव त्याचप्रमाणें पुरुषार्धातील उजव्या बाजूचे सर्व अलंकार व वस्त्रे डाव्याबाजूकडील वरील गोष्टींहून अगदीं भिन्न असल्याप्रमाणें दिसत आहेत. दुर्दैवानें ही मूर्ति भंगलेल्या स्थितींत सापडली. हिचा उजवा हात अर्धवट असून डावा हात अजीबात मोडलेला; त्याचप्रमाणें गुडघ्याचा खालचा भाग नाहीं. इतकें असूनहि या मूर्तीकडे पाहिल्यावर कारागिराच्या कसबाची प्रशंसा केल्याखेरीज राहवत नाहीं (मॉडर्न रिव्ह्यूच्या आक्टोबर १९२० च्या अंकात हिचें चित्र दिलें आहे). डाक्का जिल्ह्यात पुरपारा येथेंहि एक मूर्ती सापडली. दुसरी जी मूर्ति आहे ती अगदींच मोडकी असून ती गयेंतील अक्षय्यवटाहून आणली आहे.

आणखी एक निराळ्याच स्वरूपाची अर्धनारीश्वराची मूर्ति डाक्का जिल्ह्यातील रामपल येथें नुकती सापडली आहे हिचा खालचा भाग शिवलिंगाकृति असून लिंगांतून कमरेपावेतों वर निघालेली उमेची प्रतिमा वरील भागीं दिसते. देवीला चार हात असून वरच्या उजव्या हातांत माला व डाव्या हातात पोथी आहे. खालचे दोन हात विशाल उरोभागाखालीं एकावर एक ध्यानमुद्राकार ठेविले आहेत. देवी योगनिद्रेत असल्याप्रमाणें भासते ही अर्धनारीश्वराची कल्पना नवीनच असून या मूर्तीला अर्धनारीश्वर म्हणावें कीं नाहीं याबद्दल शंकाच आहे. डाक्का म्यूझियमचे क्यूरेटर नलिनकंठ भट्टशाली यांनीं हिचें नाव अर्धनारीश्वर ठेविलें आहे (मॉ. रि. २८. ४)

नागार्जुनी डोंगरातील लेण्यात मौखरी राजा अनंतवर्मा याचा ज्या मूर्तीच्या स्थापनेसंबंधाचा लेख (कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकारम् नं. ४९. प्लेट ३१ अ) आहे, ती मूर्ति अर्धनारीश्वराची असावी.

अर्धनारीश्वराच्या मूर्तीचा प्रथम उल्लेख इ. स. तिसऱ्या शतकांत पॉर्फिरीनें केलेला आहे ही मूर्ति उत्तरहिंदुस्थानातील एका गुंफेंत त्याला सापडली (गांगोली–साउथ इंडियन ब्राँझेस)

राजतरंगिणीकार कल्हण यानें अर्धनारीश्वरस्तोत्र लिहिलें आहे.

अर्धनारीश्वर या देवतेची अशीच एक फार मोठी मूर्ति एलेफंटाकेव्ह (हत्तीगुंफा) मध्यें आहे मूर्तीला चार हात आहेत. ही मूर्ति सोळा फूट नऊ इंच उंच असून पुरुषी अर्धभाग या बाजूला कललेला आहे, व चार हातांपैकीं एक हात शेजारीं असलेल्या नंदीवर ठेवून उभी आहे. या मूर्तीच्या डोक्यावर मुकुट असून उजव्या बाजूला चंद्रकोर आहे. डाव्या बाजूनें केस खालीं सुटलेले आहेत. उजव्या कानात एक वलय व डाव्या कानांत वरच्या बाजूला एक रत्न असून कानाच्या पाळींत मोठें वलय आहे कमरेला पट्टा आहे. पुरुषी अर्धभागाकडील हातात व मनगटात कडीं आहेत आणि स्त्री अर्धभागाच्या हातात रत्नखचित कंकणें आहेत हातांची मागील जोडी शाबूत असून त्यांपैकीं उजव्या हातात सर्प व डाव्या हातात धातूचा आरसा आहे. या मूर्तीचा पुढील डावा हात भंगला आहे. बाकी सर्व मूर्ति व शेजारचा नंदी बऱ्या स्थितींत आहे (ठाणें गॅझीटियर ६७–६९)

**अर्धमागधी**, एक प्राकृत भाषा.—जैनसूत्रें ज्या भाषेंत लिहिलेली आहेत, त्या भाषेला अर्धमागधी असें नाव आहे. हिलाच भारतीय वैय्याकरण आर्षभाषा म्हणत. शौरसेनी व मागधी भाषाप्रदेशाच्या मध्यें अर्धमागधी भाषाप्रदेश होता म्हणजे हल्लींचा अयोध्या प्रांत व त्याच्या दक्षिणेकडील प्रदेश यात अर्धमागधी प्रचारात होती

पाली ज्याप्रमाणें हीनयान बौद्धसंप्रदायाशीं निगडित झाली त्याप्रमाणें श्वेतांबर संप्रदायाचा अर्धमागधीशीं संबंध उत्पन्न झाला. श्वेतांबर जैन लोकाचे धार्मिक ग्रंथ अर्धमागधी भाषेंत लिहिले आहेत, त्याबद्दलची सविस्तर माहिती वेबरनें (इं. स्टू १६. २११–४७९; १७ १–९० यामध्यें) दिलेली आहे. अर्धमागधी ग्रंथज्ञानामध्यें वेबरनें बर्लिनमधील रॉयल लायब्ररीमधील संस्कृत व प्राकृत भाषेंतील हस्तलेखाचा जो कॅटलॉग आहे, त्यांत जे मौल्यवान् उतारे दिलेले आहेत, त्यामुळें फार चांगली भर पडली आहे व तेथें त्या कॅटलॉगातच हिंदुस्थानात व यूरोपात मिळून आतापर्यंत ज्या कांहीं त्या ग्रंथाच्या आवृत्ती निघाल्या आहेत, त्यांचीहि नामनिर्देश दिलेली आहे. व्याकरणप्रवर्तनेच्या कामीं आतापर्यंत जेवढें म्हणून वाङ्मय प्रसिद्ध झालेलें आहे, त्या सर्वांचा उपयोग करून घेतलेला आहे. दुर्दैवानें अद्यापपर्यंत त्या ग्रंथाच्या चिकित्सात्मक दृष्टीनें तयार केलेल्या अशा आवृत्ती मुळींच निघालेल्या नाहींत कांहीं जे मूळ ग्रंथ नुसते प्रसिद्ध झालेले आहेत, ते व्याकरणविषयक दृष्टीनें अगदीं कुचकामाचे आहेत. त्यातल्या त्यात भाषाशास्त्राच्या दृष्टीनें गद्य भाषेसंबंधानें अत्यंत महत्वाचा ग्रंथ म्हणजे प्रथम अंग आयारंगसुत्त हा होय. यांतील भाषा सर्वांत अगदी जुनी अशी आहे नंतर दुसरें अंग सूयगडंगसुत्त हे विशेष विचारांत घेण्यासारखें आहे यांतील पहिले खंड बहुतेक पद्यात्मक असून आयारंगसुत्त ज्याप्रमाणें भाषेच्या दृष्टीनें उपयुक्त त्याप्रमाणें हे खंड पद्यात्मक भाषेच्या दृष्टीनें तितकेंच उपयुक्त आहे. चवथें अंग समवायांग, हें संख्यावाचक शब्दांची

माहिती होण्यास उपयोगी आहे. सहावें नायाधम्मकहाओ, सातवें उवासगदसाओ. अकरावें विवागसुय आणि पाचवें विवाहपन्नत्ती यांतील निरनिराळे भाग. यामध्यें सारख्या कथाच सांगितलेल्या असून इतरापेक्षा या अंगाचा विभक्तिविचार व क्रियापदविचार या व्याकरणाच्या भागावर प्रकाश पडण्यास त्याचा अधिक उपयोग होण्यासारखा आहे. त्याप्रमाणें ओववाइयसुत्त आणि निरयावलियाओ आणि छेदसूत्रामध्यें कप्पसुय याचा पहिला भाग या उपांगाचाहि त्याच दृष्टीनें उपयोग होण्यासारखा आहे. मूलसूत्रामध्यें महत्त्वाच्या दृष्टीनें अत्यंत श्रेष्ठ म्हणजे उत्तरज्झयणसुत्त हें होय. हें बहुतेक सर्व पद्यात लिहिलेलें आहे व त्यात जुनीं व चमत्कारिक अशीं शब्दांचीं रूपें पुष्कळ उपयुक्त आलेलीं आहेत. याशिवाय महत्त्वाचें असें दसवेयालियसुत्त हें आहे; परंतु यातील भाषा बऱ्याच ठिकाणीं अपभ्रष्ट झालेली दिसते. तेच तेच शब्द व अलंकार पुनः अनेक वेळा आलेले दिसतात. तथापि एवढ्या ग्रंथावरूनच अर्धमागधी भाषेबद्दल स्पष्ट व बरोबर कल्पना होण्यासारखी आहे व त्यावरून अर्धमागधी हीच बरीच महत्त्वाची भाषा असें दिसतें. कारण ती परंपरागत उत्तम चालत आलेली आणि इतर सर्व प्राकृत भाषापेक्षां ती अधिक सपन्न दिसते. अर्धमागधीची अगदीं प्रथम माहिती-फार अपुरी व पुष्कळ ठिकाणीं चुकीची अशी स्टीव्हेन्सन यानें कल्पसूत्र, (पा. १३१ पासून पुढें) याच्याद्वारें दिली. पुढें थाणखी थोडी अधिक माहिती होफरनें दिली (३.३६४ पासून पुढें) व त्यावरोबरच होफरनें यश्रुति, अर्धस्वर व 'कं'चा 'ग' असा होणारा फरक या महत्त्वाच्या विशेष गोष्टींपैकीं थोड्या गोष्टी चांगल्या तऱ्हेनें इतराच्या नजरेस आणून दिल्या. या बाबतींत अगदीं मूलभूत प्राथमिक माहिती देणारा ग्रंथ म्हटला म्हणजे वेबरचा (यूबेरैन फ्रॅगमेंट डर भगवती भाग १,२ (बर्लिन १८६६-१८६७)= बर्लिन १८६५ मधील के. ओ. एल. अकॅडमी डर विस्सेंश्चेफ्टनचे निबंध पा. ३६७-४४४; १८६६ पा १५५-३५२). या निबंधांत जैन हस्तलिखितांतील लिहिण्याच्या विलक्षण पद्धतीसंबंधानें वेबरनेंच प्रथम चर्चा केलेली आहे. शिवाय त्याच निबंधांत कांहीं अक्षरांचें ध्वनिशास्त्रदृष्ट्या महत्त्व ठरविण्याचा (कित्येक ठिकाणी चुकीचा) प्रयत्न केला आहे व तसेंच त्या भाषेच्या व्याकरणाची सामान्य रूपरेषा दिलेली आहे, ती मात्र अद्यापपर्यंतहि उपयुक्त होण्यासारखी आहे. शिवाय भाषेतील उदाहरणेंहि दिलेली आहेत. येथें हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, भगवती म्हणजेच वर सांगितलेलें पांचवें अंग होय, आणि त्याचें धर्मग्रंथातील नाव विवाहपन्नत्ति असें आहे व त्याच नावानें त्या व्याकरणांत त्यातील उतारे दिलेले आहेत आणि भगवती हें नांव येथें वेबरच्या निबंधाचा उद्देश आलेला आहे, तेथेंच फक्त योजिलें आहे. ६. मुल्लरच्या "जैनप्राकृत भाषेच्या व्याकरणाविषयी माहिती" (बर्लिन १८७६) या ग्रंथावरून वेबरनें दिलेल्या माहितीपेक्षा अधिक माहिती मिळत नाहीं, मात्र त्यांत उच्चाराच्या नियमासंबंधानें कांहीं अधिक चांगली माहिती दिलेली आहे. याकोबीनें आयारं० भा ८-१४ यांत व्याकरणाविषयीं त्रोटक माहिती देऊन पालीभाषेशीं तुलना केली आहे. सध्या इंदूर येथें अर्धमागधी कोश छापण्याचें काम श्वेतांबर स्थानकवासी जैन कॉन्फरन्सतर्फे चालू आहे. [शिवाय 'प्राकृत' पहा].

आ र्ष भा षा व अ र्ध मा ग धी.—महाराष्ट्री भाषेशीं ज्या दुसऱ्या दोन भाषांचा अत्यंत निकट संबंध नेहमीं लावण्यात येतो; त्या भाषा म्हणजे जैन लोकांच्या बोलण्यात असलेल्या व याकोबीनें ज्यांना जैनमहाराष्ट्री व जैनप्राकृत अशीं निरनिराळीं नांवें दिलेलीं आहेत या होत. त्यापैकीं जैनमहाराष्ट्री भाषा म्हणजे जी भाषा भाष्यकार व कवी यांनीं वापरलेली आहे; ती आणि जैनप्राकृत म्हणजे जैनलोकाच्या धर्मशास्त्राच्या जुन्या सूत्रग्रंथातून वापरलेली भाषा होय. जैनप्राकृत हें भाषेला दिलेलें नाव जरी इ. मुल्लरनेंहि मान्य केलें आहे, तरी ही नावाची योजना अत्यंत अप्रयोजक आहे. शिवाय ही जैन प्राकृतभाषा म्हणजे जुनी किंवा प्राचीन महाराष्ट्री भाषा होय, हें म्हणणेंहि चुकीचें आहे. हिंदु व्याकरणकारांनीं या जुन्या जैनसूत्राच्या भाषेला आर्षम् म्ह. "ऋषींची भाषा" असें बहुतकरून नाव दिलेलें आढळतें. हेमचंद्र असें स्पष्ट म्हणतो (१. ३) कीं, माझ्या व्याकरणांत दिलेल्या नियमांना आर्ष भाषेंत पुष्कळ अपवाद आहेत, आणि (२, १७४) पूर्वी जे नियम दिलेले आहेत ते आर्ष भाषेला लागू नाहींत; उलट त्यांत काय वाटेल तें करण्याला परवानगी आहे. त्रिविक्रम यानेंहि आपल्या व्याकरणग्रंथातून आर्ष व देश्य या दोन्ही भाषा वगळल्या आहेत, आणि त्याचें कारण (रूढत्वात्) असें कीं, त्या भाषांचा उगम अगदीं स्वतंत्र निराळा आहे. म्हणजे संस्कृतपासून न निघालेल्या आणि बहुतेक स्वतःचे नियम असलेल्या त्या भाषा आहेत (स्वतंत्रत्वाच भूयसा). दंडीच्या काव्यादर्शात (१. ३३) प्रेमचंद्र तर्कवागीशानें दिलेल्या उताऱ्यात दोन प्रकारच्या स्वतंत्र प्राकृत भाषा सांगितलेल्या असून त्यापैकीं एक आर्ष भाषेतून निघालेली आहे व दुसरी आर्ष भाषेसारखी आहे (आर्षोत्थं आर्षतुल्यं च द्विविधं प्राकृतं विदुः). नमिसाधु, रुद्रट काव्यालंकारामध्यें (२. १२) म्हणतो कीं, प्राकृत हें नाव पडण्याचें कारण असें कीं, प्राकृत भाषेचा मूळ पाया उर्फ प्रकृति म्हणजे सर्व लोकांची रोजची बोलण्याची साधी भाषा होय; तिला व्याकरणाचे नियम वगैरे कांहीं लागू नसतात. व याप्रमाणें तिची उपपत्ति असल्यामुळें किंवा लोकाच्या बोलण्यांतीलच ही भाषा असल्यामुळे तिला प्राकृत असें नांव पडलें; उलट कोणी म्हणतात प्राकृत म्हणजे प्राक्+कृतं, म्हणजे "जुन्या काळी झालेली (पूर्वे);" कारण असें म्हणतात कीं, आर्ष धर्मशास्त्र-

ग्रंथातील जी प्राकृतभाषा म्हणजेच अर्धमागधी ती देवांची भाषा आहे (भारिमवयणे सिद्ध देवाण अद्धमागहा वाणा) तेव्हां प्राकृत भाषा म्हणजे जी पायकामुलांना वगैरे सहज समजते ती भाषा, आणि तीच इतर सर्व भाषांचा मूळ पाया आहे पावसाच्या पाण्याप्रमाणें ती मूळ सर्व एकच प्रकारची होती, पण पुढें देशाभिमत्वामुळें आणि व्याकरणविषयक शुद्धा शुद्धासंबंधीच्या नियमामुळें तिच्यांत भिन्नत्व उत्पन्न होऊन व विभाग पडून तिच्यापासून संस्कृत व रुद्रट (२ १२) मध्यें सांगितलेल्या इतर भाषा उत्पन्न झाल्या याप्रमाणें येथें प्राकृत भाषेलाच संस्कृत भाषेची मूळ जननी असें म्हटलें आहे याचें कारण येवढेंच दिसतें कीं, ज्याप्रमाणें बौद्ध लोक म्हणतात कीं, मागधी ही मूळची मुख्य भाषा असून तिच्यातूनच इतर सर्व भाषा निघाल्या, त्याप्रमाणेंच जैन पंडितांना वाटतें कीं, अर्धमागधी पासून म्हणजे व्याकरणकार जिला आर्ष भाषा म्हणतात तिच्यापासून सर्व भाषा निघाल्या, कारण जैनधर्मसंस्थापक जो महावीर त्यानें या भाषेच्याद्वारें आपलें धर्मोपदेशाचें काम केलें असें म्हणतात कारण समवायगसुत्त (९८) मध्यें असें म्हटलें आहे, " गुरुनें धर्मनियम अर्धमागधी भाषेंत सांगितले आहेत आणि ही अर्धमागधी भाषा जेव्हां बोलण्यांत वापरूं लागले तेव्हां ती थोडी फार बदलून सर्वप्राण्यांची बोलण्याची भाषा बनली, व तिच्या द्वारेंच प्रत्येकाला मोक्ष, सुख व आनंद मिळतो, व तीच आर्य व अनार्य, द्विपाद व चतुष्पाद, गृहपशू व वनपशू पक्षी व सर्प यांची भाषा आहे" वाग्भट अलंकारतिलक ( १ १ ) मध्यें म्हणतो, " आम्ही येथें फक्त भाषेचा ( ( वाक् ) विचार करणार आहों, ती भाषा म्हणजे फक्त अर्धमागधी तिच्यापासून फरक होऊन इतर सर्व भाषा निघाल्या तीच सर्वश्रेष्ठ व सर्वगामी भाषा आहे " पण्णवणा सुत्त ( ५९ पासून पुढें ) यामध्यें लोकांचे एकंदर नऊ वर्ग सांगितलेले असून त्यांतला सहावा वर्ग भाषा रिया म्हणजे "भाषानुसार झालेले आर्य लोक" यांच्या संबंधानें अशी व्याख्या केली आहे, " भाषानुसार आर्य लोक म्हणजे काय ? भाषानुसार झालेले आर्य लोक म्हणजे जे लोक अर्धमागधी भाषा बोलतात व ब्राह्मी लिपी वापरतात ते लोक ' महावीरानें आपल्या जैन धर्माचा उपदेश अर्धमागधी भाषेच्या द्वारें केला, या म्हणण्याला आधार म्हणून वर समवायग सुत्तामधून एक उतारा दिलेला आहेच, व शिवाय ओववाइयसुत्त ( प्यारा ६ ) यामध्येंहि तसाच उल्लेख आहे

ह्यालाच उद्देशून अभयदेवानें उवासगदसाओ (पा ४६) मध्यें व मलयगिरीनें सूरियपन्नत्ति [ वेबरच्या भगवती २, २४५ ) मध्यें लिहिलें आहे शिवाय हेमचंद्र, ( अभिधान चिंतामणि ) ५९ सटीक, पहा हेमचंद्र ४, २८७ ] मधील आलेल्या उताऱ्यांत असें म्हटलें आहे कीं, जुनी सुत्तें अर्धमागधी भाषेंत केलेलीं आहेत आता यासंबंधानें हेमचंद्र असें म्हणतो कीं, जुन्या लोकांत जरी अशी परंपरा असली तरी अर्धमागधी भाषेचे बहुतेक नियम अगदीं स्वतंत्र आहेत मागधी भाषेसंबंधानें जे नियम आहेत ते अर्धमागधीला लागू पडत नाहींत त्यानें दुसरें, उदाहरण दिलें आहे तें 'स तारिसे दु ससहे यिंदिए' असें होय ( दसवेयालियसुत्त ६३३. १९, ) हेंच मागधीभाषेंत ' शे तालिश दु शशहे यिंदिदिशे" असें होइल

सारांश आर्ष आणि अर्धमागधी या अगदीं एक असून परंपरागत मत असें कीं जुन्या जैनसुत्तांची भाषा अर्धमागधी आहे, आणि शिवाय हेमचंद्रानें दिलेल्या दसवेयालियसुत्तातल्या उताऱ्यावरून असें सिद्ध होतें कीं, अर्धमागधीभाषा ग्रंथांतून आहे इतकेंच नव्हे तर पद्यग्रंथांतहि तीच आहे तथापि गद्य ग्रंथांतील भाषा व पद्यग्रंथांतील भाषा यांच्यामध्यें सारखेपणा पुष्कळ असला तरी फरकहि बराच आहे मागधी भाषेंतील विशिष्ट प्रकारांपैकीं एक प्रकार असा आहे कीं, र चा ल होतो, स चा श होतो आणि अकारांत पुल्लिंगी प्रथमाविभक्तीच्या एकवचनीं ओ बद्दल ए होतो उदा रामो याचें लामे असें रूप होतें

संस्कृत व अर्धमागधी यांचीं विभक्तींचीं व वर्तमानकाळचीं रूपें कशीं होतात ते पुढील रूपावरून दिसेल

| | संस्कृत | | अर्धमागधी | |
|---|---|---|---|---|
| विभक्ति | ए व | अ व | ए व | अ व |
| प्रथमा | पुत्र | पुत्रा | पुत्ते<br>पुत्तो | पुत्ता |
| द्वितीया | पुत्रम् | पुत्रान | पुत्तम् | पुत्ते, पुत्ता |
| तृतीया | पुत्रेण | पुत्रै | पुत्तेण | पत्तेहिं |
| चतुर्थी | पुत्राय | पुत्रेभ्य. | पुत्ताए<br>पुत्तस्स | पुत्ताण |
| पंचमी | पुत्रात | पुत्रेभ्य | पुत्ताओ<br>पुत्ता | पुत्तहिंतो |
| षष्ठी | पुत्रस्य | पुत्राणाम् | पुत्तस्स | पुत्ताण |
| सप्तमी | पुत्रे<br>पुत्रस्मिन | पुत्रेषु | पुत्ते<br>पुत्तस्मि | पुत्तेसु |

| | संस्कृत | | अर्धमागधी | |
|---|---|---|---|---|
| पुरुष | ए. व. | अ व | ए. व | अ व |
| प्रथम पु | पृच्छामि | पृच्छाम | पुच्छामि | पुच्छामो |
| द्वि पु | पृच्छसि | पृच्छथ | पुच्छासि | पुच्छह |
| तृ पु | पृच्छति | पृच्छन्ति | पुच्छइ | पुच्छन्ति |

अर्धमागधी भाषेंत र व श कायम राहातात परंतु प्रथमेचें रूप ए होतें आणि अभयदेव यानें (समवा. पा ९८ व उवास पा १६ मध्य ) या भाषेला, अर्धमागधी असें नाव पडण्याच्या कारणाचा या गोष्टीशीं संबंध लावला आहे हिटव्हनसननें पूर्वीच म्हटलें आहे आणि वेबरनें तर सविस्तर सिद्ध केलें

आहे कीं, अर्धमागधी व मागधी ग्रंथ्यामधील संबंध इतका फारसा निकट नाहीं.

*शिवाय जर मागधीभाषेचे अवशेष आणखी बरेच उपलब्ध* असते व त्यांचें वर्णनतर अधिक चांगल्या रीतीनें करण्यात येतें तर हे परस्परांतील संबंधांविषयीचे मुद्दे अधिक दाखविता आले असते यात शंका नाहीं. आतां यांत सदृशासदृशीं आलेलीं साम्यें बरींच आढळतील. उदाहरणार्थ अर्धमागधी उसिण = संस्कृत उष्ण याचें साम्य मागधी कोशिण = कोष्ण याच्याशीं आहे, शिवाय हीहि मोठी लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे कीं मागधी व *अर्धमागधी या दोन्ही भाषात संस्कृतमधील पष्ठीच्या एक*वचनाचें रूप जें तव तें उपयोगात आणले आहे; पण हें इतर भाषामध्यें कोठेंहि आढळत नाहीं.

कवितामध्यें अर्धमागधी भाषेंत प्रथमेच्या एकवचनी रूपाना ए च्या ऐवजीं *ओच पुष्कळ वेळा लागतो; ग्रंथातून* दोन्हीं प्रकारचीं रूपें अनेक वेळा शेजारीशेजारीं आलेलीं आढळतात. उदाहरणार्थ आयारंग पा. ४१ —१ अभिवायमीणे, परंतु २ हयपुव्वो, ३ लुसियपुव्वो; पा. ४५ १९. नाओ, परंतु पा.२० से महावीरे, पुन्हां पा. २२ अलद्धपुव्वा य गामो; पा.४६,–३ दुःखसेह, अपडिन्ने, ४ सूरो, ५ संवुडे, ६ पडिसेवमाणो, ७ अचले, १४ अपुट्ठे, १५ पुट्ठो. अपुट्ठे. असल्या उदाहरणात वर्णांतर करतांना चुकहि होत असते व ती छापणारानीं दुरुस्त करण्यासारखीहि असते. कलकत्याच्या एका प्रतींत ४५, २२-गामे ४६, ६-पडिसेवमाणे असें आहे, इतर ठिकाणीं ओ हि आहे. परंतु खरोखर *या सर्व ठिकाणीं*–ए अशीं दुरुस्ती करावयास पाहिजे. *परंतु इतर पद्यग्रंथांमध्यें प्रथमेचें रूप मुख्यें ओ असेंच आहे.* उदा० आयारं. पान १२७ पासून पुढें मउडच्या एवजीं, ( पा. १२८, ३ ) मउडो असें लिहावयास पाहिजे. असेंच *पद्यमय सर्व लेखात आलेलें आहे;* उ० *सूयगडंग* सुत्तात, उत्तरज्झयण सुत्तात, दसवेयालियसुत्तात इत्यादि.

प द्य भा षा.–हींत ध्वनी व रूपें यांच्या उपपत्तींत गद्यमय भाषेपेक्षा बरेच महत्त्वाचे फरक दिसून येतात. आणि *त्याचें महाराष्ट्रीशीं व जैन महाराष्ट्रीशीं फार साम्य आहे,* परंतु त्या दोन्ही सर्वस्वी सारख्या मात्र नाहींत.उदा० संस्कृतातला म्लेच्छ शब्द अर्धमागधींतील गद्यग्रंथात मिलक्खू असा आहे, परंतु पद्यामध्यें सुद्धा महाराष्ट्री, जैनमहाराष्ट्री यांतल्याप्रमाणें मेच्छ असा शब्द आहे. *अर्धमागधींतील* पद्यात, महाराष्ट्री व जैनमहाराष्ट्रीप्रमाणें कृ याचें कुणई असें रूप येतें; आणि नेहमीं नाहीं तरी पुष्कळ वेळा अर्धमाग*धींत, महाराष्ट्रींत व जैनमहाराष्ट्रींत असलेलें,*–तूण मधील–उण सारखें रूप फक्त पद्यामध्येंच येतें. संधिनियम, विभक्ति व शब्दसंग्रह या तिन्ही बाबतींत पद्यमय ग्रंथ गद्यग्रंथाहून स्पष्टपणें निराळे असलेले दिसतात. दसव, उत्तर. व सूयग. यांतच फक्त पाहिलें तरी व्याकरणासंबंधाच्या कितीतरी गोष्टी विशेष स्पष्टपणें व्यक्त होतील. क्रमदीश्वरानें केलेलें विवेचन ( ५ ९८ ) पद्यमय भाषेला बहुतेक अंशीं लागू आहे; तो म्हणतो त्याप्रमाणें ती भाषा महाराष्ट्री व मागधी यांचें मिश्रण आहे. तिला ' महाराष्ट्रीमिश्र अर्धमागधी ' असें नांव बरें पडेल. तेव्हा जैन लोकांतील ही तिसरी स्वतंत्र भाषा म्हणून मानण्यास हरकत नाहीं. पण तसें निःसंशय *विधान करता येत नाहीं. पाली भाषेमध्येंहि पद्यग्रंथांत गद्य*ग्रंथांतल्याहून अगदीं निराळीं अशीं जुनीं व चमत्कारिक रूपें येतात; परंतु तेवढ्यावरून त्या दोन स्वतंत्र भाषा असल्याचें ठरत नाहीं. आणि ज्याअर्थी त्या पद्यांतल्या भाषेचें गद्य*ग्रंथातील भाषेशीं मुख्य मुख्य बाबतींत निःसंशय साम्य* आहे, त्याअर्थी त्या दोन्ही गद्यपद्यांतल्या भाषाना अर्धमागधी हें परंपरागत चालत आलेलें नांव पिशेलनें दिलेलें आहे. भारतीय नाट्यशास्त्रात ( १७, ४८ ) मागधी, *आवंती*, प्राच्य, शूरसेनी, *बाल्हीका व दाक्षिणात्य या भाषा*बरोबरच अर्धमागधी ही सातवी भाषा म्हणून दिलेली आहे; ( १७, ५०,) तसेंच साहित्यदर्पण ( पा. १७३, ३) यांत म्हटलें आहे कीं, नाटकात चाकर, राजपुत्र, शेटसावकार व *व्यापारी याच्या तोंडीं अर्धमागधी भाषा घालावी* ( चेटानां राजपुत्राणां श्रेष्ठीना चार्धमागधी ). आज उपलब्ध असलेल्या नाटकात हा नियम पाळलेला दिसत नाहीं. नाटकांमध्यें जेथें जेथें जैन लोक येतात तेथें तेथें त्याच्या तोंडीं अर्धमागधी *भाषा असेल असें साहजिक वाटतें.* लासेननें ( इं. आ. पा. ४१० पासून पुढें, ) प्रबोधचंद्रोदय व मुद्राराक्षस या नाटकावरून अर्धमागधी भाषेंतल्या विशेष गोष्टी पुढें मांडण्याचा प्रयत्न केला आहे; आणि धूर्तांपैकीं जो न्हावी त्याची भाषा *अर्धमागधी आहे असें तो म्हणतो.* *मुद्राराक्षस नाटकांत* ( पा. १७४-१७८, १८३-१८७, १९० १९४ या ठिकाणीं ) एक भिक्षा मागणारा भिक्षु ( क्षपणक) जीवसिद्धि म्हणून जो आहे त्याच्याबद्दल ढुंढिराज नावाच्या टीकाकारानें पा.४० वर असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, "क्षपणिको जैनाकृतिः."अर्धमागधी भाषेंतल्याप्रमाणेंच त्याच्या तोंडच्या भाषेंतहि प्रथमेच्या एकवचनात शेवटीं ए येतो. उ० कुविदे, भदन्ते (१७८. ४ ), त्याचप्रमाणें नपुंसकलिंगी रूपात, उ० अदक्खिणे, नक्खत्ते ( दुसरा पाठ ' इख ' १७६, १, २ ); शिवाय दुसरा फरक म्हणजे 'क'चा 'ग' होतो, उदा० ' शावगाणम् ' ( १७५. १; १८५. १; १९०. १०); सप्तमीच्या एकवचनांत ' शावगा ' (१७५ ३; १७७. २; १८३. ५ वगैरे ), शिवाय या ठिकाणीं शेवटचा दीर्घ उच्चारहि पाहण्यासारखा आहे; प्रथमेच्या एकवचनीं 'शावगे (१७८. २; १९३. १; याप्रमाणे वाचावयाचें ), आणि हगे, = अहकः शिवाय ही भाषाहि मागधी आहे, कारण हेमचंद्रानें (४, ३०२) तींतून मागधी भाषेचीं उदाहरणें म्हणून दिलेलीं आहेत. प्रबोधचंद्रोदय नाटकात ( पा. ४६-६४ ) एक क्षपणक आलेला असून त्याला दिगंबर असें नांव दिलेलें आहे. त्याच्या तोंडची

भाषाहि मागधी आहे असें रामदासानें म्हटलें आहे तें बरोबर आहे. आणि रामदास असेंहि म्हणतो की, ही मागधी भाषा भिक्षु, क्षपणक, राक्षस व अन्तर्गृहातील चाकरलोक बोलतात. दुसरा एक दिगंबर लटकमेलकामध्यें ( पा. १२-१५; २५-२८) आलेला आहे व त्याच्या तोंडीं मागधी भाषाच आहे. तथापि दिगंबरलोक जेथें जेथें येतात, जेथें त्याच्या तोंडची भाषा श्वेतांबरलोकांच्या भाषेहून पुष्कळ निराळी असते, आणि एका ध्वनिशास्त्राच्या नियमाच्या बाबतींत मागधी भाषेशीं तिचें साम्य आहे; या गोष्टीकडे दुर्लक्ष करता कामा नये. नाटकग्रंथांत अर्धमागधी भाषेचा कोठेंहि मागमूस लागत नाहीं

**अर्धशिशी**—( सं. अर्धशीर्ष; इं. हेमिक्रेनिया. ) हें एक प्रकारच्या नियमित वेळीं व नियमित अवकाशानें उद्भवणारें डोकें दुखणें होय; याच्या अगोदर बहुधा कांहींतरी सूचक लक्षणें होतात. विशेषतः हें एकाच बाजूचें असतें; पुष्कळदा ह्यापासून मळमळ व वांती हीं लक्षणें उद्भवतात.

का र णें.—अप्रत्यक्ष कारणें आनुवंशिक ओध, पंडुरोग, अशक्तता, वातप्रकृति हीं होत. प्रत्यक्ष कारणें दुःख, चिंता शारीरिक श्रम, जागरण, मैथुनातिरेक, कोंडलेल्या अशुद्ध हवेंत राहणें व अव्यवस्थित अन्नपानसेवन हीं होत

ल क्ष णें.—आरंभीं ज्ञानेंद्रियासंबंधीं कांहीं सूचक लक्षणें होतात. विचटुना ही त्या रोगाची पहिली पायरीच होय. हीं लक्षणें बराच काळ असतात; नंतर प्रत्यक्ष डोकें दुखूं लागतें व तज्जन्य लक्षणें होऊं लागतात. दृष्टींत कांहींना कांहीं चमत्कारिक फेरफार झाल्यासारखें वाटणें, अंगावर कांटा येणें, हातपाय गार पडणें यापैकीं एखादें अगर सर्वच लक्षणें प्रथम होऊन मन अगदीं गळून जातें; रोगी अस्वस्थ होतो; नंतर डोक्यांत घाव घातल्याप्रमाणें अथवा टोंच. त्याप्रमाणें थोड्या वेदना होऊं लागून डोकें दुखण्याच्या अवस्थेस आरंभ होतो.

केव्हा आखावर एका बिंदूच्या ठिकाणीं प्रथम जणूं काय सामर्थ्यानें कोणी भोंक पाडतें आहे व हळू हळू तो सामता मोठा होत जात आहे अशा प्रकारचा भास होतो. त्या बिंदूपासून वेदना हळू हळू पसरत जातात व रोगी त्या बिंदूवर बोट ठेवितो आणि त्या दाबानें त्यास बरें वाटतें. नेत्रगोल ठणकतात. बोटाचा दाब त्यास सहन होत नाहीं. क्वचित वांती झाल्यास डोकें दुखणें मुळींच बंदहि पडतें, तरी रोग्याचा मेंदू थकलेला असतो.

डोकें दुखण्याचा एकच प्रकार नसतो. त्याचा जोर व कालावधि हेहि अनियमित असतात. कोणाची एकच बाजू तर कोणाचें एकच ठिकाण फार दुखतें. केव्हां एकाच बिंदूपासून वेदना पसरतात तर केव्हा प्रथमची सूचक लक्षणें होऊनच थांबतात, व दृष्टि साफ होऊन पुढें कांहींच त्रास होत नाहीं. कांहीं रोग्यांना शरीराच्या इतर भागांतहि वेदना होऊं लागते; केव्हां ही वेदना एका हातात, जिभेच्या अर्ध्या भागात, अथवा डोळ्याच्या एका भागात उद्भवते. केव्हा केव्हा ऐकणें, बोलणें व स्मरणशक्ति यांतहि कमतरता येते.

बारा वर्षांच्या वयापासून पंचवीस वर्षांच्या वयापर्यंतच्या अवधींतच अर्धशिशीस सुरवात होण्याचा फार संभव असतो. तसेंच पुरुषापेक्षा स्त्रियांना हा विकार विशेष होतो. पन्नाससाठाच्या पुढें अर्धशिशी बहुधा उठत नाहीं.

आ ती ल फे र फा र.—पचनेंद्रियांत अथवा यकृतांत फेरबदल झाल्यामुळेंच अर्धशिशी उत्पन्न होते हें मत सांप्रत फारसें प्रचलित नाहीं. वातवह नाडींत उद्भवणाऱ्या वेदनेची ( न्यूऱ्यालजिया ) या विकाराशीं साम्यता असली तरी अर्धशिशींत मेंदूंतील ज्ञानेंद्रियांच्या केंद्रांत बराच अधिक अदलाबदल होते, तीपासून डोक्याचा बराच अधिक भागहि व्यापला जातो, व तीमध्यें पुष्कळदा वांती होणें हीं लक्षणें असतात. अर्धशिशीचा अंमल एकदा झाल्यावर पुन्हा तो होईपर्यंत मध्यें पुष्कळ आठवडे किंवा महिने सुद्धां जातात, व पुन्हा अंमल होतो तो पूर्वीच्याच क्रमानें होतो हा विकार उद्भवण्याचें कारण मुख्यतः सहानुभूतिक तंतूमध्येंच असावें असें दिसतें. मेंदूचा अंमल सहानुभूतिक तंतूंवर नीट चालेनासा झाला तर कांहीं ठिकाणच्या सहानुभूतिक तंतूंची क्रिया अनियंत्रित चालून रक्तवाहिन्यांचा संकोच होतो व त्यामुळेंच ज्ञानेंद्रियासंबधींचीं सूचक लक्षणें होतात. पुढें रक्तवाहिन्यांचा पुन्हा विकास झाल्यामुळें डोक्यांत रक्ताधिक्य होऊन डोकें दुखण्यास सुरवात होते एकंदरींत ह्या गोष्टीचा उलगडा अद्याप व्हावा तसा झाला नाहीं असेंच म्हणावें लागतें.

चि कि त्सा.—ही व्याधि नूतन असेल तर साफ बरी करता येते व कायम जडलेली असेल तर कमी त्रासदायक करता येते. चिकित्सेचे प्रकार तीन (१) पाळ्यामधील अवकाशांतील चिकित्सा.—हिचें कारण शोधून काढून दूर करून नंतर शरिरप्रकृति व मेंदू सुधारण्याची खटपट करावी. या कामीं कडू वनस्पति, चिराता, लिंब, जनशन, कॅलंबा, क्वाशिया यांचा व लोह, कुचला अथवा त्याचा अर्क ( स्ट्रिकनिया ) व माशाचें तेल यांचा उपयोग चांगला होतो. प्रथम कोठा साफ होण्याकरितां थोडा भांगेचा अंश घालून कडू वनस्पति व पाचक आणि वायुहारक औषधें-ओवा, सुंठ बडीशेप, दालचिनी इत्यादि-ह्यांचें मिश्रण कांहीं दिवस द्यावें. रात्रीं थोडा त्रिफळा द्यावा पण कडक जुलाब देऊं नये. कोठा शुद्ध झाल्यावर लोहाचा सौम्य कल्प द्यावा. तो देणें इष्ट नसेल तर कुचल्याचा अर्क कडू वनस्पतींच्या काढ्यांत दिल्यास चांगला उपयोग होतो भूतोन्मादाची विकृति असल्यास स्त्रियांना कुचल्याचा अर्क मानवत नाहीं. अशा स्थितींत ब्रोमाईड ऑफ पोट्याशियमचा विशेष उपयोग होतो. मेंदूचा थकवा असल्यास माशाचें तेल व मलावरोध असल्यास सौम्य रेचक द्यावें. त्या स्थितींत सोमलाचा व कोयनेलचाहि चांगला उपयोग होतो. अशक्त

असताना त्यांनीं वारा तास विश्रांति घ्यावी. अर्धशिशी उठण्याच्या पूर्वी तास दोन तास न्याहारी करावी, किंवा गरम दूध घ्यावें. सार्धे व हलकें अन्न मुबलक खावें. डोके तपासून योग्य भिंगाचा चष्मा लावावा म्हणजे पुन्हा कधींहि डोकें दुखत नाहीं ( २ ) सूचक स्थितींत उपचारः-डोळ्यापुढें काजवे येऊं लागताच रोग्यानें डोकें सखल करून पडून रहावें; दृष्टीच्या क्षेत्रात ज्या बाजूस काजवे दिसत असतील तिच्या विरुद्ध बाजूच्या कुशीवर निजावें. काहीं उत्तेजक पेय-मद्य, चहा, अगर गरम दूध-प्यावें. शहारे येऊं लागल्यास अगर अंग गार पडल्यास अंथरुणाजवळ शेगडी ठेवावी व बाटलीनें शेकावें; स्वस्थ पडून रहावें, उदासीनता, क्षोभ, तळमळ इत्यादि लक्षणें झाल्यास मेंदूला उत्तेजन देणारीं औषधें-व्हेलेरियन, हिंग, स्पिरीट ऑफ क्लोरोफार्म, इथर ह्यापैकीं एखादें दिल्यास पुष्कळदा डोकें दुखण्याचें तात्काळ बंद पडतें. ह्या स्थितींत मद्याचा उपयोग करूं नये. ( ३ )डोकें दुखत असताना उपचारः—अंधार केलेल्या खोलींत रोग्यानें स्वस्थ पडून रहावें. गडबड किंवा आवाज होऊं देऊं नये. वांती न होईल अशी खटपट करणें बरें असा नेहमीचा अनुभव आहे. ह्यासाठीं सोडावाटरमध्यें बर्फ मिसळून द्यावा. थंड चहा, पाण्यातून सोडा, चुन्याची निवळी किंवा नारळाचें पाणी द्यावें. हातपाय गार पडल्यास शक्यतर गुडघ्यापर्यंत पाय गरम पाण्यात सोडावे. मळमळ राहताच तवकील, आरारोट किंवा तांदुळाची कांजी एक पेलाभर घेतल्यास मेंदूतील रुधिराभिसरण व्यवस्थित चालून डोकें दुखावयाचें राहण्यास पुष्कळ मदत होते.

डोकें दुखत असताना तें राहाण्यासाठीं पोटाश ब्रोमाईड, नवसागर ( आमोनिया क्लोराइड ), भांग ( इंडियन हेंप ), इत्यादि अनेक औषधें देण्याचा प्रचार आहे. ह्यापासून उपयोगहि बराच होतो. पण अॅन्टीपायरीन व अॅन्टी फेब्रीन ह्यापासून डोकें हटकून राहतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याचा अंमल शरीरावर कसा होतो हें जरी आम्हांस सांगता येत नाहीं, तथापि त्यापासून विशेषतः ह्या जातीचें डोकें दुखणें हटकून राहतें असा अनुभव आहे. डोकें दुखण्याच्या समयाच्या अगोदर ८-१० ग्रेन अॅन्टीपायरीन किंवा ३-५ ग्रेन अॅन्टी फेब्रीन पाण्याच्या घोटाबरोबर पोटात घेऊन वर काहीं स्निग्ध अन्न खावें म्हणजे बहुतकरून डोकें उठतच नाहीं. उठल्यास पुन्हा एकदोन वेळा त्याच औषधाचा तास दोन तासाच्या अंतरानें उपयोग करावा. क्वचित् प्रसंगीं न थोसल्यास वरच्याच्या अर्धे प्रमाण तासातासाच्या अंतरानें द्यावें. अॅन्टीपायरीन बरोबर कोयनेल, पोटाश ब्रोमाइड इत्यादि औषधांचाहि उपयोग करण्याचा काहींचा संप्रदाय आहे. मेंथॉल, व वेलदोड्याचें तेलहि ह्या विकारावर पोटांत देतात.

*बा ह्यो प चा र.*—डोक्यास उष्णता किंवा थंडी लावावी मानेच्या मागच्या भागावर राईचें पोटीस ठेवावें, डोकें घट्ट आवळावें, आखावरील धमन्या दाबाव्या, उजेड अगदीं बंद करावा. सुंठ, मेंथॉल, दालचिनीचें तेल, वेलदोड्याचें तेल लावावें. डोकें दुखण्याचा भर असताना रेचकाचा सहसा उपयोग करूं नये. [ अर्धशिशी ( सारांश ) भि. वि. पु. १५,पृ. ९९-१०७ ].

**अर्धांगवायु**, *ल क्ष णें*:— अर्धांगवायु अथवा पक्षाघात म्हणजे डाव्या अथवा उजव्या बाजूचें अर्धे अंग लटकें पडणें, एक हात व त्याच बाजूचा एक पाय लटका पडणें. मेंदूत फाजील रक्तसंचय होऊन विकृत धमन्यांपैकीं एखादुसरी धमनी फुटून त्यामुळें रोगी एकदम बेशुद्ध पडतो व काहीं वेळानें शुद्धीवर आल्यावर एका बाजूच्या हाताची व पायाची चलनशक्ति नष्ट झाल्याचें आढळतें. कित्येक रोगी बेशुद्ध न होता हळू हळू त्याचा एक हात व पाय जड पडत जाऊन शेवटीं लुला पडतो. अगर कित्येकजण झोपेंतून जागे होतात तों अर्धांगाचा झटका आलेला त्यास आढळतो. याशिवाय एकच हात अगर फक्त एकच पाय किंवा एका बाजूचा हात आणि त्याच्या उलट बाजूचा पाय हेहि पण या रोगात लुले पडल्याचे प्रकार आढळतात लटका पडलेला हात अगर पाय मृत मनुष्याच्या हातपायाप्रमाणे ताठ व जड होतो. रोग्यास तो हलविता अगर उचलता येत नाहीं. त्याचें स्पर्शज्ञान प्रथम कमी अथवा नष्ट होऊन काहीं दिवसानंतर पुनःयेतें.अगर कधीं,तें अर्ध्या भागातून पूर्णपणें नाहींसें होतें, आणि मग जीभ, नाक, कान आणि डोळे हीं ज्ञानेंद्रियेंहि कार्यहीन होतात. त्यास हात लाविला असता दुसऱ्या बाजूच्या अंगापेक्षा हात पाय अंमळ गार लागतात. कधीं कधीं चेहरा जसाचा तसाच रहातो; परंतु बहुतकरून चेहऱ्याचा उजव्या अगर डाव्या बाजूकडील मासल भाग वर ताणल्यासारखा अगर ओढल्यासारखा दिसतो. चेहऱ्याची जी बाजू लटकी पडलेली असते त्या बाजूचा गाल सैल व गोळ्यासारखा दिसतो. दोन्ही ओठांमधील कोपरा खालीं लोंबल्यासारखा दिसून त्यातून लाळ गळते. व याचें कारण त्या बाजूचे ओंठ रोग्यास नेहमींप्रमाणें मिटून धरिता येत नाहींत. शीळ घालावयास अगर गाल फुगविण्यास सांगितलें असता रोग्यास तसें करता येत नाहीं व जीभ दाखविण्यास सांगितलें असता ती वाकडी झालेली व जी चेहऱ्याची बाजु लुली आहे तिकडे वळलेली नजरेस पडते डोळ्याची विकृत बाजूची पापणी सदा अर्धवट उघडी रहाते. कारण ती त्यास मिटता येत नाहीं व नेत्रातून पाणी गळत असतें.अगर याच्या उलट असें होतें कीं, रोगी पापणी जी एकदा मिटून धरितो ती त्यास उघडताच येत नाहीं. आतील बाहुली विस्तृत झालेली दिसल्यास मेंदूतून निघणाऱ्या तिसऱ्या मज्जातंतूस इजा पोंचली आहे असे समजावें व पापिणी सदा उघडी रहाणें म्हणजे सातव्या मज्जातंतूची विकृति होय. जेव्हा उजव्या

बाजूचें अर्धांग लुलें पडतें तेव्हांच बहुतकरून तोंड वाकडें होतें व त्या विकृतीस अर्दितवायु म्हणतात

पक्षाघात झाल्यावर रोग्याची वाचा, अक्कल, हुशारी, आणि स्मरणशक्ति यातहि कांहींसा फरक झाल्याचें दिसून येतें. बोलण्यास तीन साधनांची जरूरी असते. मेंदूच्या आत विचार उत्पन्न होतो, नंतर कंठातून स्वर निघतो, व त्याचा मुखामध्यें शब्द होऊन उच्चार निघतो. मेंदूचा डावा अर्धभाग बिघडून जर पक्षाघात झाला असेल तर उजव्या बाजूचा हात व पाय लुला पडतो, व रोग्याचा शब्दोच्चार नीट होत नाहीं. यासच ' अॅफेसिआ '(वाचाभग) म्हणतात. रोगी अडखळत बोलतो व कधीं कधीं त्याचें बोलणें दुसऱ्यास समजत नाहीं. यात पुष्कळ प्रकारचीं बोलण्यात व्यंगें होऊं शकतात ( ' वाचाभंग ' पाहा ) रोग्याची स्मरणशक्ति मंद होते व त्याची हिंमतहि नाहींशी होते सहज बोलताना त्याच्या डोळ्यातून पाणी येतें त्याचा स्वभाव चिडखोर बनत जातो व त्याची प्रकृति बिघडते.

पक्षाघातातून रोगी बरा होतो अगर कांहीं दिवसानीं मरण पावतो. कधीं कधीं कित्येक महिने अगर वर्षें त्यास पराधीन स्थितींत खितपत पडून मग मरण येतें. रोगी बरा होणें असेल तर कदाचित थोड्या दिवसात अथवा आठवड्यात त्याचे प्रथम चेहरा, नंतर पाय व शेवटीं हात या क्रमानें हे अवयव पुन्हां सुधारतात. कोणाच्या हातापायांत थोडेसें व्यंग आणि कमकुवतपणा कायमचा राहून जातो. पक्षाघात बरा न होण्याचें चिन्ह म्हणजे लुल्या पडलेल्या स्नायूंचें संकोचन सुरू होतें. हाताचीं बोटें वळून तीं थोट्यासारखीं वांकडीं होतात, व कोंपर वाकडें राहतें. रोगी लंगडत व पाय फरपटत चालतो. पुष्कळ दिवसानीं बोटें, हात आणि पाय आपोआप मधून मधून थरारल्यासारखे हलतात अगर उडतात. कोणाचें तोंड व डोळे एका बाजूसच फिरतात. अर्धांगाचा झटका येताना मेंदूचा जो अर्धभाग विकृत झालेला असतो, त्या बाजूकडे डोळ्याची नजर फिरते. लटका पडलेला पाय रोग्यास आपल्या इच्छाशक्तीनें हलविता येत नाहीं पण जर त्याच्या पायाच्या तळव्यास किंचित दाबून धरलें तर पाय वराहून दाब सोडीपर्यंत एकसारखा कंपित होतो.

का र णें.—मेंदूंतील विकृत धमनी लहान असो अगर मोठी असो; अतिरक्तसंचयामुळें ती फुटते व त्यामुळें ते नाजूक मज्जातंतू दुखावतात व तारायंत्राची तार तोडल्याप्रमाणें त्यांतून स्नायूंवर हुकमत चालविणारे संदेश इच्छाशक्तीनेंहि पुढें जात नाहींत, व हात, पाय निर्जीव असे दिसतात. या तऱ्हेचा पक्षाघात एकदम होतो. मेंदू शुद्ध रक्ताचे अभावीं नरम झाल्यामुळें, किंवा त्यांत एखादा 'विद्रधि' झाल्यानें, अथवा त्यावर एखाद्या नवीन उत्पन्न झालेल्या गाठीचा दाब पडून, किंवा उपदंशानें मेंदूंतील मज्जाद्रव्य विकृत होऊन जो पक्षाघात होतो, तो हळू हळू होतो. याशिवाय मूत्रपिंडाचे व वायूचे रोग यामुळेंहि हा रोग होतो. उतारवयात हा रोग विशेष करून होण्याचें कारण हें आहे कीं, त्या वयात मेंदूचें शुद्ध रक्ताच्यायोगें पोषण बरोबर न झाल्यामुळें त्याचा तो विशिष्ट भाग नरम होऊं लागतो व धमन्या कमजोर होऊन फुटतात. अगर या धमन्यांतील रक्त थिजतें व त्यामुळें त्यांतील प्रवाह बंद पडून मेंदूचा तो भाग नरम पडतो, व पक्षघात होतो मेंदूचा डावा अर्धा भाग येणेंप्रमाणें बिघडला असता उजव्या बाजूचें अर्धांग व मेंदूचा उजवा अर्धभाग विकृत झाला असता डाव्या बाजूचें अर्धांग लुलें पडतें यास थोडे अपवाद आहेत त्याचा विस्तार येथें करणें शक्य नाहीं (विद्रधि पहा).

उ पा य.—( १ ) विकार नवीन असल्यास ' शिरःशोणित मूर्च्छा ' ( अपॉप्लेक्सी ) या सदरांत वर्णन केल्याप्रमाणें रोग्याची शुश्रूषा ठेवावी. विकार दोड दोन महिन्यापेक्षा जुनाट होत चालल्यास स्नायू आकुंचन होऊन हातपाय अगर साधे आखडून जाऊं नयेत म्हणून त्यांतील शक्ति परत आली नसली तरी दुसऱ्या माणसानें ते दिवसातून एक दोन वेळा उचलून हलवीत असावें पायमोज्यात वाळू भरून तसली लाबोडी पिशवी रोग्याच्या लुल्या हाताशीं अगर पायाशीं अंगाला चिटकून ठेवावी म्हणजे हातपाय वांकड्या तिकड्या स्थितींत आखडणार नाहींत औषधोपचार डॉक्टर, वैद्य याचे सल्ल्यानें व्हावा टरपेंटाईन, अमोनिया अगर मोहरी यापासून केलेलीं तेलें चोळून लुल्या हाताची शक्ति वाढविता येते. विजेची पेटीहि लावून थोडा उपयोग होतो. नियमितपणानें लुल्या अगास इच्छाशक्तीनें सामर्थ्य आणण्याचा प्रयत्न न कंटाळता करीत जावा म्हणजे उपयोग होतो. हलकें अन्न खावें पण तें पौष्टिकहि असावें मासाहार, मद्य व मैथुन हीं वर्ज्य असावीत मानसिक श्रम, रोग्यास चीड येण्यासारख्या गोष्टी या टाळीत जाव्या मलशुद्धि होण्याकडे विशेष लक्ष पुरवावें व झोंप नीट लागत नसल्यास झोंपेचीं सौम्य औषधें द्यावीं हातपायादि अर्धांगात शक्ति न येतां त्यांत काठिण्य येत चाललें तर विजेची पेटी लावूं नये. पूर्वी उपदंश झालेला असल्यास तत्संबंधीं औषधयोजना केल्यास अर्धांग बरें होतें.

आ यु र्वे द की य नि दा न.—अतिशय काळजी करण्यानें, अति शीत आहारविहार केल्यानें, ओकारी व रेचक याचीं औषधें अति प्रमाणात घेतल्यानें, रक्तस्राव झाल्यानें, धातुक्षयानें तसेंच इतर वातवर्धक कारणानीं शरीरातील वायु अर्ध्या शरीरांत म्हणजे एका बाजूच हात, पाय, मांड्या, बरगड्या, कंबर यामध्यें कुपित होऊन त्याच बाजूच्या शिरा व स्नायु यांस शुष्क करितो त्यामुळें सर्व सांध्यांचीं बंधनें शिथिल होतात. हातपाय इत्यादि जवळ लाव होण्यास भास पडतो व तें अंगहि कांहींसें चेतनारहित होतें ( स्पर्श कमी कळतो ) या रोगास अर्धांगवायु किंवा पक्षाघात म्हणतात.

केवळ-वायु दुष्ट होऊन झालेला अर्धांगवायु अतिशय कष्टसाध्य आहे. कफ किंवा पित्त यांचा संबंध असलेला अर्धांगवायु कष्टसाध्य आहे व धातुक्षयाच्या परिणामानें झालेला अर्धांगवायु असाध्य समजावा.

अर्धांगवायु झालेलें अंग जड, थंड व सुजलेलें असेल, तर कफाचा संबंध आहे असें समजावें व दाह, संताप आणि बेशुद्धी हीं लक्षणें असता पित्ताचा संबंध आहे असें समजावें.

चिकित्सा—अर्धांगवायूमध्यें शिरा व स्नायु यांचें वातानें शोषण होत असतें, म्हणून या विकारात तेलें अगर डुक्कर वगैरे प्राण्यांची चरबी इत्यादि तैलाचें विकृत भागाला मर्दन करणें व शेंकणें हीं आवश्यक आहेत. याकरिता नारायण तेल विषगर्भतेल, राम्नादिकतेल, विजयभैरवतेल इत्यादि तेलें फार उपयोगी आहेत.

शेंकण्याकरिता दोषानुरोधानें स्निग्ध किंवा रुक्ष पदार्थांचा उपयोग करावा. निर्गुंडी, करंज इत्यादि वातघ्न वृक्षांचीं पानें तापवून त्यानींहि शेकावें. जरूरीप्रमाणें अवगाहस्वेद (ऊन पाण्यात बसणें) हि करावा.

बाह्योपचारात शिरोबस्ती ही प्रधानचिकित्सा सुश्रुतकारानीं सांगितली आहे. ती अशी डोक्याच्या भोंवतालीं बारा आंगळे उंचीचा चामड्याचा पट्टा गुंडाळावा. तो बाहेरून केसाचे दोरीनें घट्ट बांधावा. डोकें व वेष्टण यामधील सांधा उडदाचे पिठानें भरून काढावा. नंतर वातघ्न तेल डोक्यावर ओतावें. तें केस बुडेपर्यंत ओतावें व दहा हजार अंक मोजून होईपर्यंत तसेंच ठेवावें. नंतर काढून घ्यावें. अणुतेलाचें नस्यहि उपयोगात आणावें.

अंतरोपचारा (पोटात घेण्याचीं औषधें) मध्यें प्रथम स्नेह व स्वेदविधि करून मृदु रेचक द्यावें. एरंडेल, बाहव्याचा मगज, हिरडा हीं मृदु रेचकें आहेत. स्निग्ध पदार्थांचा (तेल, चरबी) बस्ती (अनुवासन) द्यावा. ही शोधनचिकित्सा केल्यावर दोषानुरोधानें शमनचिकित्सा करावी. रास्नादि काढा, दशमूळाचा काढा, सहचरादि काढा इत्यादि काढे व योगराज गुग्गुळ, षडशीति गुग्गुळ आणि त्रयोदशांग गुग्गुळ तसेंच समीरपन्नग, वातविध्वंस, हेमगर्भ इत्यादि रस यांचा उपयोग करावा.

बिब्बा, रास्ना व लसुण यांचा रसायन विधीप्रमाणें उपयोग करावा. या विकारात मानसिक श्रम, जागरण, थंड पाणी पिणें, वेगविधारण, रुक्ष अन्न खाणें, मैथुन, घोड्यावर बसून जाणें इत्यादि वायुवर्धक गोष्टी करूं नयेत.

ज्याचें शरीर फार कृश झालें नाहीं व दूषितभाग विचेतन झाला नाहीं, अशा अर्धांगवायूच्या रोग्याला तीनचार महिने उपचार केला असता रोग बरा होतो.

**अर्नेज**—(मुंबई इलाखा), अमदाबाद जिल्हा धोलका तालुक्यांतील हें खेडें, धोलका शहराच्या नैर्ऋत्येस सुमारे पंधरा मैलावर आहे. सध्या हें गांव खेडेगांवापेक्षा फार मोठें व महत्त्वाचें नाहीं, तथापि एके काळीं, राधनपुर, वढ्डी, पाटण, अहमदाबाद आणि खेडा या ठिकाणाहून धोलेरा व काठेवाड प्रांताकडे होणारी व्यापारी वाहतुक या गांवावरूनच होत असे. या गावचें संबंध उत्पन्न भूतभवानी देवस्थानाकडे खर्च होतें. जमाबंदीची सर्व व्यवस्था सरकारनें नेमलेल्या पंचाकडून होते. या उत्पन्नातून एक सदावर्त चालविलें जातें. भरवाड गुराखी यात्रेकरूंना गोंवऱ्या पुरवितात हें त्यांचें कर्तव्य आहे असें समजलें जातें (मुं. ग. पु.४ १८७९).

**अर्बथनॉट जॉन**.—हा इंग्रजी वैद्य व ग्रंथकार १६६७ च्या एप्रिल महिन्याच्या २९ व्या तारखेस जन्मला. १६९१ सालीं बाप मरण पावल्यावर, जॉन अर्बथनॉट लंडन शहरीं जाऊन, गणित विषय शिकवून आपली उपजीविका करूं लागला. १६९२ सालीं, क्रिश्चन ह्युजेनच्या डच ग्रंथाच्या लॅटिन भाषांतराच्या आधारें यानें संभवनियम (लॉज ऑफ चॅन्स) हें पुस्तक लिहिलें. त्याच सालीं त्यानें ऑक्सफर्ड विश्वविद्यालयात प्रवेश करून १६९६ सालीं सेन्टड्रूज विश्वविद्यालयाची एम्. डी. ची पदवी घेतली. १६९७ सालीं "वुडवर्डच्या प्रलयावरील ग्रंथाची परीक्षा" (ॲन एक्झॅमिनेशन ऑफ डॉ. वुडवर्ड्स आकाउंट ऑफ दि डेल्यूज) या पुस्तकात, यानें डॉ. वुडवर्ड च्या मताचें चांगलें खंडन केलें व १७०१ मध्यें "गणित विषयाची उपयुक्तता" (एसे ऑन दि युसफूलनेस ऑफ मॅथेमॅटिकल लर्निंग) या विषयावर निबंध लिहिला. तो १७०४ सालीं "रॉयल सोसायटी" या संस्थेचा सभासद झाला. १७०५ सालीं ॲन राणीचा खास वैद्य नेमला जाऊन, १७१० मध्यें रॉयल कॉलेज ऑफ फिजिसिअन्स या सभेचा सभासद निवडला गेला. त्याची समयसूचकता व दांडगें वाचन यामुळें तो टोरीपक्षाचा आधारस्तंभ होऊन बसला होता. जोनाथन स्विफ्ट, आलेक्झॅंडर पोप आणि लॉर्ड चेस्टरफील्ड हे त्याचे जिवलग मित्र असून त्यावर त्यानें अनंत उपकार केले. आपल्या ग्रंथकर्तृत्वगौरवाचें ह्याला कधीं कौतुक न वाटता तो आपल्या अगाध कल्पनाशक्तीनें मित्रांचें मनोरंजन करीत असे. यानें १७१२ मध्यें कायद्यावर एक औपरोधिक लेख लिहिला (लॉ इस ए बॉटमलेस पिट). त्यानें "जान बुल"चें जें चित्र रेखाटलें आहे तें आजसुद्धां मनोरंजन केल्याशिवाय राहाणार नाहीं. हे औपरोधिक लेख स्विफ्ट लिहीतो असा एकदा समज होता, परंतु ते अरबथनॉटनेंच लिहिले असें पोपनें लिहून ठेविलें आहे. राजनीतींतील असत्यभाषणाच्या कलेवरील ग्रंथ (ए ट्रीटाइज ऑन दि आर्ट ऑफ पोलिटिकल लाइंग) या नावाचा दुसरा औपरोधिक लेख यानें लिहिला होता. ॲन राणीच्या मरणानंतर अरबथनॉटचें दरबारातील वर्चस्व बरेंच कमी झालें. १७२७ मध्यें त्यानें "रॉयल सोसायटी ऑफ फिजिसिअन्स" या संस्थेपुढें एक व्याख्यान दिलें. १७३१ सालीं अरबथनॉटचा

कनिष्ठ मुलगा मरण पावल्यामुळें त्याला जो धक्का पोंचला त्यामुळें त्याची प्रकृति खालावली, आणि १७४५ मध्यें लंडन शहरीं हा मरण पावला. प्राचीन नाणीं वजनें व मापें यांचें कोष्टक (टेबल ऑफ एन्शंट कॉइन्स वेट्स ॲंड मेझर्स), लग्नानंतरचे तीन ताप (थ्री अवर्स आफ्टर मॅरेज) अशीं उपयुक्त व विनोदात्मक पुस्तकें अरबथनॉटनें लिहून ठेविलीं आहेत. याची वृत्ति सभ्य व स्वभाव मनमिळाऊ होता. याच्याबद्दल स्विफ्टला फार आदर वाटे. यानें स्विफ्टचीच लेखनशैली उचलून तिची इतकी हुबेहुब नक्कल केली कीं त्याचे लेख स्विफ्टचेच समजले जात. तथापि याच्या लेखांत स्विफ्टची तडफ नसे. [म वाङ्मय जॉर्ज एटकेन दी लाईफ ॲंड वर्कस ऑफ जॉन अर्बथनॉट (१८८१) बायोग्रॉफिकल डिक्शनरी ऑफ इंग्लिश लिटरेचर-एव्हरिमन लायब्ररी. ए. बि.]

**अर्य**—या वैदिक शब्दाचे श्रेष्ठ, स्वामी, शत्रू, मालक, वैश्य, नागरिक, गमन करणारा असे अनेक अर्थ आहेत. ऋग्वेदांत हा शब्द कोठें कोठें कोणकोणत्या अर्थानें आला याचें सविस्तर पृथक्करण 'बुद्धपूर्व जग' (ज्ञानकोश प्रस्तावनाखंड विभाग ३ रा) याच्या ३ र्‍या प्रकरणांत केलेलेंच आहे. ) वाजसनेयी संहितेंत आर्य या अर्थी पुष्कळ ठिकाणीं हा शब्द दिसतो. पुढील वाङ्मयांत वैश्य हा याचा अर्थ रूढ झाला असला तरी, प्रथम हा अर्थ स्पष्ट नाहीं.

**अर्यंकावू**—(मद्रास इलाखा.) त्रावणकोरसंस्थानांत या नावाचें एक गाव, मार्ग व देवस्थान, शेनकोट्टातालुक्यामध्यें आहे. उ. अ. ८° ५९' व पू. रे. ७७° ९' त्रिवेंद्रमपासून ५४ मैलावर व तिनेवेल्ली पासून सुमारें ५० मैलावर, एका वर्तुलाकार दरीमध्यें हें गाव वसलेलें आहे. लोकसंख्या सुमारें १००० चहाकाफीच्या लागवडीमुळे या गावाला बरेंच महत्त्व आलें आहे. या ठिकाणीं शास्त्याचें एक मोठें जुनें देऊळ आहे. हें देऊळ परशुरामानें बांधिलें असें सांगतात. येथील वनशोभा पहाण्यासारखी आहे. (इं. गॅ. ६-१९०८)

**अर्यमा**—एक वैदिक देवता. आदित्य नावाच्या देवतासमूहांत अर्यमन् देवता येते. ऋग्वेदांत याचा उल्लेख सुमारें १०० वेळा, बहुतेक मित्रावरुणाबरोबर आलेला आहे. अवेस्तांतहि ही देवता सांपडते. 'अर्यम्ण पथाः' हा ब्राह्मणवाङ्मयांतून आढळणारा शब्द कांहीं पंडिताच्या मतें 'आकाशगंगा' तर कांहींच्या मतें 'ग्रहण' या अर्थी आहे. विशेष विवेचनासाठीं ज्ञानकोश वि. ? "वेदविद्या" यामधील दैवतेतिहास" पहा.

**अर्बं (अर्बिअम)**—सं. प. भा. १६५-१६६. दुर्मिळ मृत्तिकाधातूंपैकीं ही एक धातु आहे. दुर्मिळ मृत्तिकाधातु ज्या खनिज द्रव्यांत सांपडतें, असें पाहिलें खनिज द्रव्य जें गादोलिन यानें इ. स. १७९४ सालीं शोधून काढलें व शोधकाच्या नांवावरून त्या खनिज द्रव्याला "गादोलिनाइत" असें नाव पडलें. इ. स. १७९७ सालीं एकबर्ग यानें असें सिद्ध केलं कीं गादोलिनाइत या खनिजांत अन्य दुर्मिळ मृत्तिका धातु आहे. हिला 'यित्रिया' हें नाव देण्यांत आलें. वास्तविक 'यित्रिया' हें अनेक भिन्न वस्तुंचें मिश्रण आहे. याचें पृथक्करण करण्यांत येऊन त्यांतून "टर्बिआ" नावाचा एक पदार्थ निघाला. या टर्बिआचें पृथक्करण सॉरट, क्लीव्ह, लेकाकद, बॉयोद्रान वगैरेंनीं केलें व त्यांतून अर्बिआ, होल्मिया, थुलिया, आणि डिस्प्रोसिया वगैरे पदार्थ काढण्यांत आले, तथापि या चारापैकीं एखादा तरी मूलद्रव्य आहे किंवा नाहीं ही शंकाच आहे. दुर्मिळ मृत्तिकाधातु "गादोलिनाइत" "समर्स्काइत," "फेर्ग्युसोनाइत" "युक्झेनाइत" आणि "सेराइत" नांवाच्या खनिजद्रव्यांतून आढळते. खनिजांतून या निराळ्या करण्याकरतां त्यांचें कार्बित (आक्झलेट्स्) ांत रूपांतर करावें लागतें. या कार्बिताचें उष्णन केलें म्हणजे यांचें प्राणिदांत रूपांतर होतें. या प्राणिदाचें नंतर द्विगंधकितांत रूपांतर करून आंशिक स्फटिकीकरणाची दोन चार वेळा क्रिया करावी लागते, किंवा अम्न अथवा दुसरा एखादा अनाम्ल अल्क घेऊन त्यानें आंशिक निपात करावा लागतो. म्हणजे अर्ब ही धातु शुद्ध स्थितींत असंयुक्त होते. अर्ब धातूचे क्षार गुलाबी रंगाचे असून प्राणिदहि तसाच असतो. हा प्राणिद अम्लांत फार सावकाश विद्रुत होतो. उष्णच्या योगानें याचें सोक्षिकरण होत नाहीं. हा रसभावी (इन्फ्युझिबल) नाहीं. याचे क्षार अपशोषित विच्छिन्न किरण देतात.

**अर्हत्**—वेदोत्तरकालीं ब्राह्मणवर्गाशीं आध्यात्मिक उच्चतेमार्फत सामाजिक उच्चतेसाठीं स्पर्धा उत्पन्न करणारे लोक स्वतःस अर्हत् म्हणून घेऊं लागले. अर्हत् हें अग्निविशेषण म्हणून वेदांत (ऋ. १०,१.) येऊन हा शब्द अगोदरच सोंवळा झाला होता. त्यामुळें ब्राह्मणस्पर्धीवर्गानें हें विशेषण घेतलें आणि खरे ब्राह्मण अर्हत् हेच होत अशा प्रकारची मीमांसा सुरू झाली. जैन व बौद्ध या दोन्हा संप्रदायांनीं अर्हत् शब्दाचा उपयोग केला आहे. तथापि या शब्दाचें महत्त्व दोन्ही संप्रदायांत फार दिवस टिकलें नाहीं. बौद्धमतानुसार निर्वाणाची शेवटची पायरी दाखविणारा पाली भाषेंतील 'अर्हत्' शब्द अगदीं आरंभींच्या बौद्ध धर्मग्रंथांत आढळतो, व त्यांत तो दोन अर्थांनीं वापरलेला दिसतो, एक बौद्धधर्मी अर्हत्, व दुसरा इतर संप्रदायांतील अर्हत्. इतर संप्रदायांत त्याचा अर्थ, त्या संप्रदायांतील मताप्रमाणें धार्मिक माणसाला योग्य अशी जी उच्च ध्येयात्मक अवस्था त्या अवस्थेप्रत पोंहोंचलेला मनुष्य असा आहे. या अर्थानें हा शब्द बुद्धपूर्व वाङ्मयांत आढळत नाहीं, पण आरंभींच्या बौद्धधर्मी लोकांनीं त्या शब्दाचा जो उपयोग केला आहे त्यावरून तो बौद्धधर्म स्थापन होण्यापूर्वी उत्तर हिंदुस्थानांत जे उपासनासंप्रदाय स्थापन होत

होते त्या संप्रदायांनीं त्या शब्दाचा उपयोग केलेला असला पाहिजे, असे स्पष्ट दिसतें. पण बौद्ध ग्रंथांतच या शब्दाचा उपयोग विशेष केलेला आढळतो. त्याचा बौद्ध सांप्रदायिक अर्थ, ज्यानें अष्टांगिक मार्ग पूर्ण आक्रमण करून त्यापासून प्राप्त होणारें फल उपभोगिलें आहे असा मनुष्य (मग्गफलत्था) असा आहे. अशा माणसानें अष्टांगिक मार्गापैकीं प्रत्येक अंगांत म्हणजे (१) सम्यक् दृष्टि (२) सम्यक् संकल्प (३) सम्यक् वाक्, (४) सम्यक् कर्मान्त, (५) सम्यक् आजीव (६) सम्यक् व्यायाम (७) सम्यक् स्मृति व (८) सम्यक् समाधि यांत परिपूर्णता मिळविलेली असते ( संयुत्त ४. ५१ पुग्गल, ७३ ). त्यानें इंद्रियभोगेच्छा, पुनर्जन्म व अज्ञान हीं तीन आसवें जिंकलेलीं असतात. अर्हन् हा दुष्ट मनोविकारापासून फार दूर असतो ( मज्झिम, १ २८०. ) पहिल्या पांच शिष्यांना जेव्हां सचेतन प्राण्यामध्यें वास करणाऱ्या पांच शारीरिक व मानसिक गुणसमूहामध्यें अनात्मता दिसली तेव्हांच ते अर्हत् पदाप्रत पावले ( विनय. १. १४) बुद्धाचा पुत्र राहुल यानें आसवावर विजय मिळविला म्हणून तो अर्हत् झाला व त्याला पुनर्जन्म येणार नाहीं ( थेर गाथा, २९६, ) प्रत्येक अर्हताला संबोधि प्राप्त झालेलें असतें. या संबोधीचे सात भाग असतात ते.–स्मृति, धर्मविजय, बल, प्रीति, शांति, एकाग्रता व समाधि हे होत.

बुद्धाच्या हयातींतच अर्हत पदाप्रत पोंचलेले पुरुष व स्त्रिया होत्या व अर्हत् पुरुषांनीं लिहिलेलीं २६४ सूक्तें आणि अर्हत् स्त्रियांनीं लिहिलेलीं ७३ सूक्तें इतक्या सूक्तांचा संग्रह हल्लीं अस्तित्वांत आहे. अशा अर्हतांपैकीं पंधरा जणांना तीन विद्या ( ज्ञानाचे प्रकार ) प्राप्त झाल्या होत्या, त्या म्हणजे स्वतःच्या व इतर माणसांच्या पूर्व जन्माचें ज्ञान आणि इतर माणसांच्या विचाराचें ज्ञान. संसारी माणसानांहि अर्हत् होतां येत असे. बुद्धाच्या हयातींतच अर्हत् पद पावलेल्या अशा इसमांची यादी अंगुत्तर, १. ४५१ मध्यें दिली आहे. जो बुद्ध बनला तो अर्हत् असे. अगदीं आरंभींच्या लेखांत ज्या सात बुद्धांची माहिती आहे त्यांपैकीं प्रत्येकाचें जें वर्णन आहे त्यांत हा शब्द येतो. बऱ्याचशा संवादांत अर्हताच्या मानसिक व नैतिक गुणाचें व त्या स्थितींत येणाऱ्या अनुभवाचें वर्णन आहे. दीघ निकायांतील पहिल्या संवादांत अष्टांगमार्गापैकीं पहिल्या अंगाची, दुसऱ्या संवादांत धार्मिक रीतीनें आयुष्यक्रम चालविण्यापासून होणाऱ्या फायद्यांचा व तिसऱ्या संवादांत सामाजिक दर्जाची चर्चा असून अर्हत्पद हा सर्वांत उच्च दर्जा असल्याचें सांगितलें आहे. चवथ्यांत अर्हत् हाच खरा ब्राह्मण असें असून पांचव्या संवादांत यज्ञाबद्दल वादविवाद असून त्यांत अर्हत्पदप्राप्ति हाच सर्वोच्च यज्ञ असें म्हटलें आहे. याप्रमाणें तेरा संवादांपैकीं दहांमध्यें अर्हताबद्दलच विवेचन आहे. यांपैकीं बुद्धाच्या शेवटच्या संवादाचा गोषवारा पुढीलप्रमाणें आहे: " भिक्षूहो, मला जीं सत्यें ज्ञात झालीं तीं मीं तुम्हांस सांगितलीं आहेत. तीं सत्यें तुम्हांला अवगत झालीं म्हणजे तीं तुम्ही आचरा, त्यांच्यावर विचार करा, आणि सर्व लोकांच्या कल्याणाकरितां व सुखाकरितां हा शुद्ध धर्म चिरकाल टिकावा म्हणून त्या सत्याचा प्रसार करा....हीं सत्यें कोणतीं ? तीं सत्यें हीं: चतुः स्मृत्युपस्थान, चतुःसम्यक्प्रधान, चतुःऋद्धिपाद, पंच अभिज्ञा, पंच इंद्रिय, पंचबल, सप्तबोधि व अष्टांगमार्ग

विनयपिटक, २. २४० मध्यें ह्या सात समुदायांना धम्म विनयाचीं रत्नें म्हटले आहे. हीं सर्व मिळून सदतीस गुण असून व तेच अर्हतपदाप्रत पोहोंचलेल्या माणसाच्या अन्तर्ज्ञानाचे भाग होत

अर्हत् याचा अर्थ वाढत चालला व त्याबरोबर तशा माणसाबद्दल पूज्य भावहि वाढत गेला. जुन्या ग्रंथांत अशी एक चाल सांगितली आहे कीं, एखाद्या भिक्षूला स्वतः अर्हत् बनलों आहों असें वाटे तेव्हां तो त्याप्रमाणें जाहीर करी. मज्झिमनिकायांतील ११२ व्या संवादांत अशा नव्या अर्हत्पदेच्छु भिक्षूला जे सहा प्रश्न विचारीत असत ते दिले आहेत. त्या प्रश्नांना त्यानें बरोबर उत्तरें दिलीं, तर त्याचा अर्हत् पदावरील हक्क मान्य करण्यांत येत असे. पुढें भाष्यकाराच्या काळांत ही चाल नामशेष झाली होती. त्या भाष्यकाराच्या काळांत कोणी अर्हत् झाल्याबद्दलचा नामनिर्देश नाहीं. तसेंच खिस्तोत्तर तिसऱ्या शतकानंतर कोणी अर्हत् झाल्याचे उल्लेख कोठेंहि आढळत नाहींत. अर्हत् पदाबद्दलच्या कल्पना इतक्या उच्चतर बनल्या कीं, तें पद प्राप्त करून घेण्यास प्राचीन काळांतील थोर पुरुषच लायक होते. अलीकडील काळांत तसा पुरुष असणें शक्य नाहीं, असा समज प्रचलित झाला.

संस्कृत भाषेंतील अर्हत् शब्दाचा इतिहास वरच्याहून अगदीं विरुद्ध आहे. बौद्धधर्मप्रस्थापनेनंतर कांहीं शतकांनीं जे बौद्धधर्मी विद्वान संस्कृतमध्यें ग्रंथ लिहूं लागले त्यांपैकीं कांहींनींच त्याचा प्रथम उपयोग केला व तो उपयोग बौद्ध धर्मांत अर्हत् पदाऐवजीं बोधिसत्त्व हे अंतिम ध्येय साध्य करावयाचें असतें अशी कल्पना पुढें मांडणारांनीं केली. या काळांतील वाङ्मयांत अर्हत्पद ही उन्नतीची परा कोटी असें मानण्याचें बंद पडलें होतें, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष बुद्धाच्या मुखांतून निघालेल्या उपदेशांत अर्हत्वाबद्दलचा विषयहि नाहीं. ललितविस्तर किंवा महावस्तु या ग्रंथांत हा शब्द कोठेंच सांपडत नाहीं, फक्त बुद्धाचें किंवा त्याच्या आरंभींच्या शिष्याचें एक विशेषण या अर्थानें तो आलेला आहे. दिव्यावदान ( गोष्टींचा संग्रह ) या ग्रंथांत बुद्धकालीन व्यक्तींच्या गोष्टी आहेत, त्यांत अर्हत् शब्द जुन्या अर्थानेंच वापरलेला आहे, व तोच अर्थ अशोकाचा भाऊ वीताशोक याच्या गोष्टींत आहे.

सद्धर्मपुंडरीक या ग्रंथांत अर्हत् हा शब्द पंधरावीस वेळा आला आहे, पण अर्हत् ही स्थिति बुद्धापेक्षा कमी दर्जाची असें त्यांत स्पष्ट म्हटलें आहे.

[सं द र्भ ग्रं थ —ऱ्हीस डेव्हिड्स-डायालॉग्स ऑफ बुद्ध. आपटे-बौद्धपर्व कर्न-मॅन्युअल ऑफ बुद्धिझम्. बौद्ध धर्मग्रंथ ( त्रिपिटक ). ए. रि. ए. मधील ( 'अर्हत' हा लेख ). ]

**अर्न्हेनिअस. स्वान्टे आगस्ट**—हा एक स्वीडिश पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता आणि रसायनशास्त्रज्ञ तारीख १९ फेब्रुआरी १८५९ रोजीं वाँसविज्क येथें जन्मला सन १८७६ ते १८८१ सालापर्यंत उप्साला येथें आणि १८८१ते १८८४ सालापर्यंत स्टॉकहोम येथें त्यानें अभ्यास केला सन १८८६ ते१८८८ हीं दोन सालें त्यानें प्रवासांत घालवून रिगा येथील विविधकला शाळा आणि वुइर्झबर्ग, ग्राझा, अॅम्स्टरडॅम आणि लाइप्झिग येथील विश्वविद्यालयें त्यानें अवलोकन केलीं. पुढें कांहीं काळानें तो स्टॉकहोम येथें प्रोफेसर झाला. विद्युद्विश्लेषणाचा सिद्धान्त ( थिअरी ऑफ इलेक्ट्रोलिटिक डिसोसिएशन ) परिणत अवस्थेस आणला म्हणून त्याची ख्याति झाली आहे सन १८८३ सालीं त्यानें या विषयावर एक लेख लिहून तो स्टॉकहोमच्या शास्त्रीय ॲकॅडेमीस सादर केला विद्युद्विश्लेषणाखेरीज त्यानें जीवनशास्त्रासंबंधानें एक सिद्धांत मांडला; त्याचें असें म्हणणें होतें कीं, अत्यंत सूक्ष्म बीजकणास गति आहे, हीं बीजें दशदिशेनें सर्व विश्वांत गमन करितात; यांतील बहुतेक सारीं तेजस्वी ताऱ्याच्या दाहक उष्णतेनें जळून जातात परंतु कांहीं बीजें योग्य परिस्थिति असलेल्या खस्थ गोलकावर जातात आणि तेथें त्यांची वाढ होते.

**अलक**—( १ ) हा एक अलंकारशास्त्रज्ञ होऊन गेला. रत्नाकाराच्या हरविजय नावाच्या ग्रंथावर विषमपदोद्योत नांवाची अलकानें टीका लिहिली आहे. तो राजानक श्र्यानक याचा मुलगा होता मम्मटाचा अपूर्ण राहिलेला ' काव्यप्रकाश ' अलकानें पूर्ण केला ' अलकारसर्वस्वा 'वर अलकानें टीका लिहिली आहे.

(२)एक प्राचीन अज्ञात शहर. अलकचा प्रभु (अलक-नाथ) • म्हणून बृहत्संहितेंत ( ११,५८) उल्लेख आला आहे याचे कर्न आपल्या भाषांतरात अलका असें स्त्रीलिंगीरूप देतो तथापि हें रूप छंदाला जुळत नाहीं. प्रसिद्ध झालेल्या मूळ प्रथात इक्ष्वाकु-रलकनाथौ, " इक्ष्वाकु व रलकचा प्रभू ", रलकच्या ऐवजीं कुकुल व रुलक असे कित्येक पाठ आहेत. परंतु आपल्या भाषांतरांतील टीपेंत, कर्न इक्ष्वाकुर्+अलकनाथौ हाच पाठ पसंत करतो, टीकेचा हाच पाठ आहे व ' अलकानगरी तन्–नाथो राजा ' या टीकेचा या पाठाला आधार आहे दुसरी परिचित अलका म्हणजे कुबेराची नगरी होय' अलकचें नाव इतरत्र मुळींच आढळत नाहीं. ( ' अलका. पहा. )

**अलकनंदा**—( अलकनंदा-युवती ), ब्रिटिश गढवाल इलाख्यांतील एक नदी. ही गंगेला मिळते हिला बऱ्याच नद्या मिळत असल्याकारणानें हिच्या मार्गांत बरेच संगम आहेत; तेथें स्नानासाठीं यात्रा भरतात, उदाहरणार्थ–मंदाकिनी हिला जेथें मिळते तें नंदप्रयाग, पिंडर जेथें मिळते तें कर्णप्रयाग, मंदाकिनी मिळते तें रुद्रप्रयाग व भागीरथी ज्या ठिकाणीं मिळते तें देवप्रयाग यापुढें हिच्या प्रवाहाला गंगा असें नाव आहे आकार व स्थान यामध्यें अलकनंदा जरी भागीरथीपेक्षां श्रेष्ठ आहे तरी भागीरथीलाच गंगेचा- उगम समजतात. हिचें प्राचीन प्राथिक नाव अजून टिकलें आहे. हिचें प्राथिक स्वरूप असें सांगतां येईल कीं, ही भगवत्पदीच्या चार प्रवाहांतील, आपण रहातों या दिशेकडील प्रवाह ( भाग पंचम अ. १७ गद्य ९ ) होय. कुबेराची हिमाचलावरील जी अलकानगरी, तिच्या बाह्यप्रदेशीं हाच प्रवाह आहे. अलकनंदेस महानदी असेंहि म्हटलें आहे. ( भार० वन० अ० १४२ ) गंगानदीलाहि हच नांव ( भाग ४ ६; ११. २९ )आहे (प्रा. को )

**अलका**—पौराणिक शहर व सरोवर हीं कुबेराची कैलासपर्वतावरील नगरी सर्व सुखानीं परिपूर्ण अशी आहे ' ययाति हा पुरूपासून तारुण्य घेतल्यावर उत्तरस्थ मेरुपर्वतावरील अलका नामक कुबेरनगरींत विषयसुख घेत राहिला असा भारतांत उल्लेख आहे ( म भारत १. ८५ ) पुरूरवा उर्वशीसह याच नगरींत होता ; विष्णु पु ४ ६ ) भूतेशगिरीवर हें नगर आहे असें भागवतात ( ४ ६ ) सांगितलें आहे संस्कृत काव्यातून या नगराचा मोठ्या गौरवानें उल्लेख केलेला असतो 'विभाति यस्या ललितालकायां मनोहरा वैश्रवणस्य लक्ष्मी. ( भामाविलास २. १०. ) असें जगन्नाथपंडिताचें वर्णन आहे.

**अ लं का र**—( साहित्यशास्त्र पहा )

**अलंकार**—अलंकाराचा प्रधान हेतु शरीरमंडणाचा होय. आपलें शरीर चांगलें शोभिवंत दिसावें ही इच्छा सर्व मनुष्यप्राण्यांत स्वभावतः वास करिते पुरुषापेक्षा स्त्रियांमध्यें ही इच्छा प्रबळ असल्याकारणानें त्यांना दागिन्याचा फार हव्यास सर्व काळीं सर्व राष्ट्रांत दृष्टीस पडतो. दागिने म्हटले म्हणजे बहुधा ते स्त्रियाचेच असावयाचे या दागिन्यांत पुष्कळसा पैसा गुंतून पडला असल्यानें देशी व्यापाराला पाहिजे तितका पैसा मिळत नाहीं अशी हल्ली ऐकूं येणारी ओरड अगदींच खोटी नव्हे. साधारणपणें शिलकी पैसा दागिने करण्यात खर्च होतो विशेषतः जेथें बँका नसतात किंवा पैसा सुरक्षित ठेवणें कठिण असतें अशा ठिकाणीं शिलक पैसा दागिन्यात अडकवून ठेवतात. याला गरीब लोक अपवाद नाहींत श्रीमंती दागिने थोडे पण मौल्यवान् आणि सुबक; तर गरीबाचे दागिने पाटीभर व हलक्या धातूचे असतात. आपल्याकडील मराठ्याच्या बायका किती तरी चांदीचे दागिने घालतात. गोंड वगैरे लोक तर पितळेचे लठ्ठ दागिने घालतात मारवाडी दनांगी तर सुप्रसिद्धच आहेत आज सुशिक्षित स्त्रीपुरुषात व राजेरजवाड्यात दागिन्याची हौस कमी होत चालली आहे. नाहीं तर हिंदी संस्थानिक म्हटला म्हणजे नखशिखांत

अलंकारांनीं मढविलेला असावयाचा. त्याची नकल पाश्चात्य रंगभूमीवर व चित्रपटावर करण्यात येत असते.

अलंकारामध्यें देशकालानुसार पुष्कळ वैचित्र्य दृष्टीस पडतें तेव्हां त्याच्या सर्व तऱ्हांचें वर्णन येथें करणें शक्य नाहीं; म्हणून थोडक्यांत प्राचीन व अर्वाचीन अलंकारांची पौरस्त्य व पाश्चात्य लोकांतील माहिती या लेखात खालीं दिली आहे.

वे द का ली न अ लं का र.—वेदकालातले अलंकारार्थी शब्द 'बुद्धपूर्व जग' या विभागांत (पा ४१०-१२) सविस्तर विवेचिले आहेतच ऋक्संहितेंत मरुत हे विशेषत अलंकारप्रिय दिसतात (१ ६४; ८ २०; १० ७८ सूक्तें पहा) 'ते सुंदर आभरणांनीं आपलें शरीर शोभवितात. आणि शोभा येण्यासाठीं वक्षस्थळावर हार घालतात. रुक्म शब्द हारासाठीं व अंज हा शब्द सामान्य अलंकारासाठीं योजलेला दिसतो बायकापुरुषांच्या व घोड्यांच्या दागिन्याचेंहि सहज उल्लेख केलेले आढळतात (ऋ. ८ ४६, ३३; ८. ५४, ११; ८ ६७, २) 'मना' हा शब्द (८ ६७, २) जर अलंकारार्थी असेल तर तो कोणत्या अलंकारासाठीं आहे हें सांगता येत नाहीं कदाचित हें एक सोन्याचें असुरी नाणें असावें. सध्या 'दर्दीचा मणी' असा भाविक लोकांच्या परिचयाचा आहे. त्याचप्रमाणें प्राचीन काळीं मणी हें आपत्ति, दोष वगैरे निवारण्यासाठीं गळ्यात घालीत (बुद्धपूर्व जग पा. ४११ पाहा) यज्ञप्रसंगींहि दागीने लागत हें वेदविद्या भागांतील यजुर्वेद प्रकरणावरून (पा १२३) दिसून येईल वाजपेय यज्ञामध्यें सर्व ऋत्विजांनीं सोन्याच्या कंठ्या घालाव्या व होत्यानें ज्या कंठांत सोन्याचीं 'वज्र' नामक रत्नें मढविलेलीं १०० कमल पुष्पें आहेत अशी कंठी धारण करावी असें सांगितलें आहे. (आ श्रौ. सू उ. षटक ३. ९), इतर यज्ञांतून होते, उद्गाते वगैरेंना विशिष्ट अलंकार देण्याविषयीं सुचविलेलें असतें (बौ. श्रौ. सू. १८, १८; लाट्या श्रौ सू ८ १०; आ. श्रौ. सू, उ. ३, ४.)

प्राचीन दागिन्याचे अवशेष बौद्ध स्तूपांत सांपडले आहेत (जे. आर ए. एस., १९०८) तसेंच प्राचीन मूर्तिशिल्पांत अलंकाराचे प्रकार पाहावयास मिळतात. भरहूतस्तूपावरील शिरिमा देवतेचा रत्नखचित कमरपट्टा, तसेंच इतर मूर्तींच्या कानांतील कुंडलें व हार हीं सर्व प्राचीन अलंकाराची कल्पना आणून देतात.

वे दो त्त र का ली न.—पूर्वींच्या काळीं कित्येक अलंकार स्त्री व पुरुष या दोघांच्याहि अंगावर दिसत. भारतीयांची अलंकारांची हौस ग्रीक इतिहासकारांनीं वर्णिलेली आहे. प्राचीन काळची सुवर्ण, मोती व रत्नें यांची हिंदुस्थानांतील समृद्धि लक्षात घेता हिंदुस्तानांतील लोकास अनेक अलंकार घालण्याची जी हौस वाटत असे त्याविषयीं आश्चर्य करावयास नको साधारण प्रतीचे लोक सोनें व चांदी याचे दागिने वापरीत. इतकेंच नव्हे तर सोन्याचे दागिने गाई, घोडे व हत्ती यानाहि शृंगारण्यात वापरीत. एका ग्रीक इतिहासकारानें असें स्पष्टपणें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानच्या लोकांनीं सर्व जगाच्या अभिरुचीस बिघडविलें असून लोकास निरर्थक मोत्योंकरितां अतिशय किंमती देण्यास लाविलें आहे? भरतमुनींच्या नाट्यशास्त्रावरून असें दिसतें कीं, (१) आवेध्य, (२) बंधनीय, (३) क्षेप्य, आणि (४) आरोप्य, असे अलंकाराचे चार प्रकार असत पहिल्याचें उदाहरण कुंडल, दुसऱ्याचें कटिसूत्र व अंगद, तिसऱ्याचें नूपुर, व चवथ्याचें स्वर्णहार.

चूडामणि व मुकुट हीं शिरोभूषणें होतीं; कुंडल हें कर्णाभरण होतें. मुक्तावलि (मोत्याचा कंठा), हर्षक व सूत्र हीं कंठाभरणें होतीं: पटिका व अंगुलिमुद्रा हीं बोटांत धारण करीत. केयूर व अंगद हीं हाताच्या कोपऱ्याच्या वरच्या भागाचीं भूषणें होतीं; त्रिसर व हार हीं गळ्यातली व स्तनमंडलावरचीं आभरणें होतीं; व तरल आणि सूत्रक हीं कटि भूषवीत असत. हे अलंकार स्त्रियांप्रमाणें पुरुषहि धारण करीत.

देवता व राजस्त्रिया यांच्या कित्येक आभरणांची नावें —शिखापाश, शिखाजाल, खंडपत्र, चूडामणि, मकरिका, मुक्ताजाल, गवाक्षि, कुंडल, खड्गपत्र, वेणीगुच्छ, दारव, ललाटतिलक, भ्रूर, कर्णिका, कर्णवलय, आपेक्षुक रत्नखचित दंतपत्र, कर्णपूर, पत्रलेखा इ या अलंकारांच्या आकृति कशा असत, व कोठें कोणता अलंकार घालीत, इत्यादि माहिती संपूर्णत्वानें मिळत नाहीं. तथापि प्राचीन काळच्या ज्या मूर्ति लेण्यातून वगैरे पाहाण्यास मिळतात, त्यावरून कित्येक अलंकाराच्या आकृतींची कल्पना करता येते; पण त्यांची नावें त्यावरून कळत नाहींत यासाठीं व्याकरणाचें साह्य घेऊन काहीं अलंकाराविषयींची माहिती पुढे दिली आहे.

पानांच्या आकाराचें तें असावें असें दिसतें. झाडाच्या लहान लहान पानाच्या समूहाचा देठ हा केंद्र समजून निरनिराळ्या दिशांना त्यांचीं अग्रें होतील अशा रीतीनें त्या अलंकाराची सुंदर रचना केलेली असे. महाराष्ट्रीय स्त्रियांच्या केशाभरणांतहि केतकी ( केवडा )च्या पत्रसमूहाची अशीच रचना केलेली दिसते. राजेलोक डोक्यावर रत्नखचित मुकुट धारण करीत. अर्जुनाच्या किरीटाचें वर्णन कर्णपर्वांत आलें आहे. राजस्त्रियांना मुकुट नसून, पट्ट किंवा एक अरुंद सोन्याची पट्टी रत्नांनीं भूषित केलेली ती कपाळावर बांधीत म्हणूनच मुख्य राणीस पट्टराणी किंवा पट्टमहिषी म्हणत.

कर्णाभरणें.—अमरसिंहाच्या मतें याचे कुंडल व कर्णिका असे दोन प्रकार असत. कर्णिकेलाच तालपत्र असेंहि दुसरें नाव होतें. हा अलंकार कानाच्या वरल्या भागीं घालीत. व कुंडल खालच्या भागांत घालीत. हीं कुंडलें राजाच्या बाबतींत हिऱ्यांचीं असून त्यांचा आकार वाटोळा असावा असें महाभारतावरून दिसतें ( वैद्य–महाभारत उपसंहार पा. २६०. ) बायकांचीं कुंडलें पुरुषांच्या कुंडलाहून निराळीं असत. हेमचंद्र म्हणतो कीं, कुंडलाच्याच जागीं तालपत्र व हा अलंकार घालीत, व कानाच्या मागच्या बाजूस उत्क्षिप्तिका, वर्णेंदु व बालिका हे अलंकार असत.

प्राचीनकाळीं हल्लींच्या सारखे दोन्ही कानांत सारखे अलंकार न घालतां एकाच कानांत एखादा अलंकार घालण्याचाहि प्रघात होता, असें दिसतें. बाणाच्या कादंबरींतलें चांडालकन्यकेचें वर्णन पहा ( एककर्णा मुक्तदंतपत्रप्रभाधवलितकपोलमंडलाम् ). अशा रीतीनें एका कानांत तांटक, तर दुसऱ्यांत कुंडल, किंवा दुसरा एखादा अलंकार आपापल्या आवडीप्रमाणें घालीत. वासवदत्ता नाटिकेंत तांटकाचा विशेष उल्लेख आला आहे.

" रक्षाभूषणनिमित्तं बालस्य कर्णौ विध्यते " ( सूत्रस्थान १६ वा अध्याय. ) म्हणजे शरीररक्षणासाठीं औषधी मुळी वगैरे धारण करण्यासाठीं कानाला भोकें पाडतात असें सुश्रुतांत वाक्य आहे त्यावरून प्रथम अशा विशिष्ट कार्यासाठीं कानास भोकें पाडण्याची चाल पडली, व मागून त्याचा उपयोग अलंकार धारण करण्याकडे होऊं लागला असावा असा रा. बा. गो आपटे तर्क करतात.

बाणभट्टानें दिलेल्या दधीचिवर्णनांत त्रिकंटक नावाच्या एका अलंकाराचें नाव आलेलें आहे, व कदंबाच्या कळ्याप्रमाणें स्थूल अशीं मोत्यें व त्यांच्या मध्यें मरकतमण्याचा लोलक मिळून हा अलंकार होतो असें त्याचें वर्णन दिलें आहे.

भागवताच्या दशम स्कंधांत गोपींचें वर्णन करतांना 'चपलोलकुंडला' असा शब्द आला आहे त्यावरून हल्लीं मुलांच्या कानांतल्या डुलांप्रमाणें कुंडलाचा उपयोग त्या वेळीं करीत असत असें दिसतें. प्राचीन देवमूर्तींच्या कानांत कुंडलें दिसतात. त्यांचा आकार गोल असतो, व त्यांच्यावर सुंदर कारागिरीचें काम केलेलें असतें. या कुंडलांत नाना प्रकारचीं सुंदर रत्नें बसवीत असले पाहिजेत. शिशुपालवधकाव्यांत कृष्णाच्या कुंडलाचें वर्णन आहे. त्यांत रत्नाचा उल्लेख आहे. रामायणांत लंकेंतल्या स्त्रियांच्या वर्णनांत कुंडलांत हिरे बसविलेले होते असें म्हटलें आहे. महाभारतांत दमयंतीस्वयंवरासाठीं आलेल्या राजांच्या कानांत मणिकुंडलें होतीं असें तेथील वर्णनावरून दिसतें. त्याच ग्रंथांतल्या ऋष्यशृंगाच्या कथेंत त्याच्याकडे आलेल्या वेश्येचें जें वर्णन केलें आहे त्यांत म्हटलें आहे कीं, तिचे कान चक्रवाक पक्ष्याप्रमाणें विचित्र अशा कुंडलांनीं झाकलेले होते.

कंठभूषणें.—कंठी वगैरे अलंकारांना ग्रैवेयक असें नाव होतें. किंचित् लंबमान अशा कंठभरणाला ललन्तिक म्हणत. ही सोन्याची असल्यास तिला प्रालंबिका व मोत्यांची असल्यास उरसूत्रिका म्हणत. हल्लीं लहान मुलांच्या गळ्यांत हांसळी घालतात. आईबाप आपापल्या शक्तीप्रमाणें ही सोन्याची किंवा चांदीची करतात. ही हांसळी घालण्याची चाल आधुनिक नाहीं, पुरातन काळापासून आलेली आहे. फरक इतकाच कीं, हल्लीं ही लहान मुलांच्याच गळ्यांत घालतात, पूर्वीं मोठ्या मनुष्यांच्याहि गळ्यांत असे.

हल्लीं स्त्रिया व पुरुष गळ्यांत सोन्याच्या, प्रवाळाच्या तुलसीकाष्ठाच्या किंवा रुद्राक्षाच्या माळा घालतात. पूर्वीं माळा मस्तकावर धारण करीत असें दिसतें. 'माल्यं मालास्रजौ मूर्ध्नि' असा उल्लेख अमरकोशांत आहे. मेदिनीकोशावरून दिसतें कीं, या पुष्पमाला असत. पण वैदिक ग्रंथांत सुवर्णमालाचा उल्लेख सांपडतो. ताण्ड्यमहाब्राह्मणांत यज्ञकर्त्यानें ऋत्विजांना देण्यांत येणाऱ्या अलंकाराचें वर्णन करतांना उद्गात्याला सुवर्णमाला द्यावी असें सांगितलें आहे. व होत्याला रुक्म नावाचा सुवर्णालंकार देत. गोभिलसूत्रांत स्रग्धारण ( माला धारण करणें ) विहित सांगितलें आहे. यावरून गोभिलाच्या वेळीं पुष्पमाला शिरावर व स्नातोऽलंकृत्य इत्यादि वचनावरून स्वर्णमाला कंठांत धारण करीत असें दिसतें. याकाळीं मालाधारणाचा उद्देश केवळ शोभा हा होता. पण पुढें वैष्णवांनीं त्याला धर्माचें स्वरूप देऊन तुळशीच्या काष्ठाची माला धारण करण्याचा प्रघात पाडला, हें विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे.

वैदिक युगांत वक्षःस्थलावर धारण करण्याचा निष्क नांवाचा एक अलंकार होता. याचा आकार कसा होता, तें कळत नाहीं. अमरसिंह त्याला उरोभूषण म्हणतो. मेदिनीकोशांतहि तसेंच आहे. ह्या दोन्ही कोशकारांनीं या अलंकाराला माला म्हटलेलें आहे पण छांदोग्योपनिषदांत त्याला हार म्हटलेलें आहे ( ' तमुह परःप्रत्युवाचाह हारे त्वाशूद्र' इ. ) वैदिक ग्रंथांत सृंका नावाचा आणखी एक हारासारखाच अलंकार आढळतो धर्मराज यमानें प्रसन्न होऊन नचिकेत्यास अशा प्रकारचा एक अलंकार दिल्याविषयीचा उपनिषदांत उल्लेख आहे.

प्राचीन संस्कृतसाहित्यांत हाराविषयींचे उल्लेख फार आहेत हे हार मोत्यांचेच असत. म्हणून त्यांना ' मुक्तावलि' म्हणत हाराच्या सराला यष्टिलता म्हणत. हाराच्या सरांच्या संख्येवरून त्याला निरनिराळीं नांवें होतीं: जसें,शंभरपदरी हाराला देवच्छंदक, बत्तीस पदरी हाराला गुच्छ, चोवीस पदर असल्यास गुत्सार्ध, चौतीस पदर असले तर त्यास गोस्तन, वीस पदरी हाराला माणवक व एकच पदर असला तर त्यास एकावली म्हणत. पदर एकच पण त्यांत सात आठशें मोत्यें असलीं तर त्याला नक्षत्रमाला असें नांव देण्यांत येई. ( अमरकोशावरची भानुजी दीक्षिताची टीका पहा. )

अर्वाचीन साहित्यांत देवंदक नावाच्या हाराला शतेश्वरी म्हटलेलें आढळतें. इंद्रच्छंद नावाचा एक हार असे. हा देवाच्या गळ्यांत असे. याला एकहजार आठ पदर असत. विजयच्छंद हाराला त्याच्या निम्मे पदर असत. इंद्रच्छंद हाराचें प्रमाण चार हात लांब व विजयच्छंदाचें त्याच्या अर्धे म्हणजे दोन हात लांब सांगितलें आहे. एकशें आठ किंवा एक्याशी पदर असून दोन हात लांब असा हार असेल, तर त्याला देवच्छंद असें नांव असे. चौसष्ट पदरी मोत्याच्या हाराला अर्धहार व चवऱ्याण्णव पदरी हाराला रश्मिकलाप अशा संज्ञा असत. आठपदरी हाराला मंदर, पाच पदर असल्यास हारफलक, सत्तावीस पदरी व एक हात लांबीच्या हाराला नक्षत्रमाला व एक हात लांबीच्या व सोन्याचे मणि व मोत्यें यांनीं युक्त अशा हाराला मणिसोपान अशीं नांवें होतीं. मणिसोपान हाराच्या मध्यभागीं जर सोन्याचा एक मोठा मणि असेल तर त्याला चाटुकार अशी संज्ञा असे. एकावलि हाराच्या मध्यभागीं असा मणि असला तर त्याला यष्टि असें नांव देण्यांत येई.

विक्रमोर्वशीय नाटकांत उर्वशीच्या एकावली हाराला वैजयंतिका म्हटलें आहे. भागवतांत श्रीकृष्णाच्या गळ्यांतल्या हाराला वैजयंति माला म्हटलेलें आढळतें ( दशमस्कंध ) उर्वशीची वैजयंतिक व श्रीकृष्णाची वैजयंती या दोन्ही एकाच प्रकारच्या होत्या, कीं निरनिराळ्या प्रकारच्या तें सांगतां येत नाहीं.

अं गु री य.—अंगुरीय, अंगुलीय, अंगुलीयक व ऊर्मिका हीं नांवें एकाच अलंकाराचीं आहेत. या अलंकारावर नांवाचीं अक्षरें किंवा कांहीं चिन्ह असे. सध्यां या अलंकाराला मोहोर म्हणतात. नंदअमात्य राक्षस याची अंगुलिमुद्रा दुसऱ्याच्या हातांत गेल्यामुळें त्याचे सगळे बेत फसले ही मुद्राराक्षस नाटकांतली कथा सुप्रसिद्ध आहे. दुष्यंतानें शाकुंतलेला दिलेली अंगुलीमुद्रा ( अंगठी ) शकुंतलेच्या दुःखाला कशी कारण झाली तें शाकुंतल नाटकांत दाखविलें आहे. विरहवेळा या अंगठींत विलापहारक असा खडा बसवीत असें मालविकाग्निमित्र नाटकावरून दिसतें. ('अंगठी' पहा.)

क टि भू ष ण.—स्त्रियांचें कटिभूषण व पुरुषांचें कटिभूषण यांना निरनिराळीं नांवें होतीं. स्त्रीकटिभूषणाचीं मेखला, कांची, सप्तकी, रशना व सारसन अशीं नांवें कोशकार देतात. कटिभूषणाला एकच पदर असला तर कांची, आठ असल्यास मेखला, सोळा असल्यास रशना, व पंचवीस असल्यास कलाप अशा संज्ञा असत. (भानुजी दीक्षिताची टीका पहा ). पुरुषांच्या कटिभूषणाला शृंखला म्हणत. अमरसिंहानें सारसन हें नांव स्त्रियांच्या कटिभूषणाच्या यादींत जरी घातलें आहे तरी तें पुरुषांचेंहि कटिभूषण असावें असें दिसतें. कारण शिशुपालवधकाव्यांत श्रीकृष्णानें कमरेला सारसन हें भूषण घातलें असल्याचें त्यांत वर्णन आहे. कादंबरींत मेखलाभरणांत झुण् झुण् शब्द करणाऱ्या रत्नमालेचाहि समावेश केलेला आहे. सुबंधु कवीच्या वासवदत्ता नाटिकेंतहि रशनेंत (कमरपट्ट्यांत) रत्नमाला असे, अशा विषयीं उल्लेख आहे. कालिदासानें रघुवंशांत म्हटलें आहे:—

> अर्धाचिता सत्वरमुत्थितायाः
> पदे पदे दुर्निमिते गलन्ती।
> कस्याश्चिदासीद्रशना तदानीं
> मङ्गुष्ठमूलार्पितसूत्रशेषा ॥

यावरून सोन्याच्या तारेंत मणि ओंवून हा अलंकार करीत असें दिसतें. जुन्या मूर्तींच्या कमरेलाहि अशाच प्रकारचा सूत्रमणिसंयुक्त हा अलंकार दिसतो. सध्यांहि मुलांच्या कमरेला घालण्यांत येणाऱ्या सोन्यारुप्याच्या करदोट्यांत सोन्यारुप्याचीं घुंगरें दृष्टीस पडतात. वरील वर्णनावरून हें भूषण तारेचें असून रेशीम व दोरीसारखा लवचिक असावासें दिसतें. याचा उपयोग केवळ शोभेकरितां (वस्त्र सांभाळण्याकरितां नव्हे) असावा.

पा दा भ र णें.—यांना पादांगद, तुलाकोटि, मंजीर, नूपुर, हंस, पादकटक, वगैरे कित्येक नांवें होतीं. हीं निरनिराळीं नांवें एकाच अलंकाराचीं होतीं कीं निरनिराळ्या प्रकारच्या अलंकारांचीं होतीं तें सांगतां येत नाहीं. या नांवांपैकीं नूपुर हें नांव विशेष प्रचारांत होतें असें दिसतें. संस्कृत साहित्यांत त्याचा उल्लेख वारंवार येतो. पण हा अलंकार कशाचा करीत तें मात्र कळत नाहीं. बाणभट्टाच्या कादंबरींत चांडालकन्येच्या पायांतल्या नूपुरांत मणी ( रत्नें ) बसविलेले असावेत एवढें आढळतें. मणिमंजीर या मध्यमपदलोपी सामासिक शब्दावरूनहि तोच अर्थ निघतो. तथापि या अलंकाराची आकृति कशा प्रकारची असे याबद्दलचा उल्लेख कोठें आढळत नाहीं. हंसक या शब्दावरून त्या अलंकाराचा आकार हंसासारखा असेल असा तर्क करतां येतो. पण तो तर्कच, सिद्धांत नव्हे. कारण, हंसासारखा नाद करण्याच्या गुणावरूनहि त्याला तें नांव मिळालें असल्याचा संभव आहे. कादंबरींत नूपुरांच्या शब्दानें हंसाचें मन आकर्षिलें गेलें असा एक उल्लेख आहे. यावरून दुसऱ्या तर्काला बळकटी येते.




(१-१३) युरोपीय मध्ययुगीन भूषणे. (१४) मुंडायल ईजिअन कालांतील. (१५-१६) प्राचीन इजिप्शिअन जडावाच्या कामाचा नमुना. (१७) प्राचीन इजिप्शिअन राणीचें आपल्या कडील केतकासारखें शिरोभूषण. (१८-२१) कर्ण भूषणें-ईजिअन कालांतील. एफेसस व हिसार्लिक येथें सांपडलेलीं. (२२) ग्रीके ताईत-मंत्र लिहिलेला कागद ठेवावयाचा. — अलंकार (प्र. अ











(१-२) अर्वाचीन अलंकार-ठुशी व साज. (३) भारतीय मध्ययुगीन मेखला-भर्हुत स्तूप. ..., भारतीय ताईत.(५) प्राचीन भारतीय कर्ण भूषण. (७-८) प्राचीन भारतीय कंठभूषणें

१२ प्र.अ. ४८६ पहा.

बा हु भू ष णें.—केयूर व अंगद हे अलंकार बाहूच्या ऊर्ध्वभागीं घालण्याचे होते. म्हणजे सध्यां जेथें बाजूबंद घालतात किंवा अनंत बांधतात तेथें (दंडाला) हे अलंकार घालीत. कादंबरींत शूद्रक राजानें जें वर्णन आहे त्यांत शूद्रकानें दंडाला केयूर घातल्याचें सांगितलें आहे. केयूरावर कवीनें सर्पांची उत्प्रेक्षा केली आहे. यावरून ते गोलाकार असावेत असें दिसतें.

मणगटांत धारण करण्याच्या अलंकाराना आवापक, पारिहार्य, कटक व वलय अशीं चार नावें असल्याचें आढळतें मेघदूत काव्यांत शापग्रस्त विरही यक्षाच्या कृशतेमुळें त्याच्या हातातलें स्वर्णवलय गळून पडल्यामुळें त्याचें मणगट रिक्त झालें होतें असें म्हटलें आहे ( कनकवलयभ्रंशरिक्तप्रकोष्ठः ) दुष्यंताच्या विरहावस्थेंत कनकवलय कोंपरापर्यंत खाली येत असे असें कालिदासानें वर्णिलें आहे (कनकवलयं स्रस्तं स्रस्तं मया प्रतिसार्यते). शिशुपालवधकाव्यांत श्रीकृष्णाच्या वर्णनांत त्याचें वलय पद्मरागमणिखचित होतें असें म्हटलें आहे बाणभट्टाच्या कादंबरींत चांडालकन्येचें वलय रत्नखचित होतें असा उल्लेख आहे.

वलयाच्या खालीं कंकण घालीत. याला सामान्यतः 'करभूषण' अशी संज्ञा असे ('कंकणं करभूषणं' अमर-मनुष्यवर्ग) मध्ययुगांतल्या संस्कृतसाहित्यांत कंकणाचा उल्लेख वारंवार येतो. भवभूतीनें जानकीच्या हातात कंकणच घातलें आहे. सीतापरिणयप्रसंगीं श्रीरामचंद्र कंकणमोचनार्थ अंतःपुरांत गेले असून कवीनें तत्कालीन रीतीचा परिचय करून दिला आहे. पण या प्रसंगींचें कंकण सोन्याचें होतें किंवा हल्लीं प्रमाणें सुताचें असे तें यावरून कळत नाहीं. मेदिनीकोशांत कंकण शब्दाचे करभूषण, मंडन व सूत्र हे तिन्ही अर्थ दिले आहेत.

अलीकडच्या काळातल्या साहित्यांत चुड्याचा ( बांगड्यांचा ) उल्लेख पुष्कळ ठिकाणीं येतो. बंगालच्या प्राचीन कवींच्या काव्यांतले चुडे शंखाचे केलेले असून त्यांना काढण्याघालण्याच्या सोयीसाठीं खीळ असल्याचाहि उल्लेख सांपडतो अद्याप बंगाल प्रदेशीं शंखाच्या बांगड्या वापरण्यांत येत आहेत. जुन्या मराठी वाङ्मयांत शंखाच्या बांगड्यांचा किंवा खीळदार बांगड्यांचा उल्लेख पाहण्यांत नाहीं. तथापि महाराष्ट्रांतील जुनी बांगडी उत्तर हिंदुस्थानांतील अनेक जातींच्या बांगड्यांप्रमाणें कांशाची असावी. बांगड्यांचा धंदा करणाऱ्या वर्गास कासार असें मराठींत म्हणतात. आणि हाच शब्द तांबट जातीला लावण्यांत येतो. त्यावरून अशी एक कल्पना उद्भवते कीं पूर्वी तांबटाची जात कांशाची भांडीं व बांगड्या करीत असावी, आणि त्यामुळें कांस्यकार उर्फ कासार हा शब्द बांगडीच्या व भांड्यांच्या या दोन्ही धंद्यांतील लोकांस चिकटला असावा

ना सि का भू ष ण.—संस्कृत कवींनीं आपादमस्तक शरीराच्या निरनिराळ्या अवयवांवरील अलंकारांचें वर्णन केलें आहे. पण ओंठ नाकांतल्या अलंकाराचा कोठेंहि उल्लेख नाहीं. यावरून नाकांत अलंकार घालण्याची चाल पूर्वीच्या काळीं नसावी असें रा. आपटे यांना वाटतें. ( वि. विस्तार पु. ४६, २ )

नाकांत नथ, रवंग, किंवा लोलक वगैरे अलंकार घालण्याची चाल निःसंशय अलीकडची आहे, व ती मुसुलमानाच्या अमदानींतून आलेली असावी असें दिसतें. अरब स्त्रिया नाकांत नथवजा वेटोळें घालतात. मुसुलमान जातींच्या स्त्रियांत, व जेथें मुसुलमानांच्या अमलाचा प्रभाव विशेष होता त्या उत्तर हिंदुस्तानांत, सोन्याच्या तारेचें मोठें वेटोळें नथ म्हणून घालण्याचा प्रघात पुष्कळ जातींत आढळतो. नथ घालण्याचा प्रघात दक्षिणेंत मद्रास वगैरे प्रांतीं फारसा नाहीं, व जो थोडा क्वचित आढळतो, तो शेजारच्या महाराष्ट्रीय बंधूच्या अनुकरणानें आलेला असण्याचा संभव आहे.

दा गि न्यां चे सां प्र त चे प्र का र.— शिल्लक राहिलेल्या पैशाचे दागदागिने करण्याची पद्धति सर्व हिंदु जातींत फार प्रचलित आहे. तिला ब्रिटिश अमदानींत अलीकडे बँकांमुळें जरासा आळा पडत चालला आहे हिंदुस्थानांतील जातिभेदानुसार दागिन्याच्या पद्धती व प्रकार अनेक आहेत, कनिष्ठ जातीचे लोक सांपत्तिक स्थितीनुरूप चांदीचेच दागिने विशेष घालतात वरिष्ठ जातींत ऐपतीच्या मानानें सोन्याचे, मोत्यांचे, जडावाचे वगैरे उच्च प्रतीचे दागिने घालतात, महाराष्ट्रांतील निरनिराळ्या समाजांतील लोकांचे अलंकार पुढें देत आहों

हिंदु स्त्रियांचे अलंकार. डोक्यावरील —चंद्रकोर, गुलाबाचें फूल, नाग, गजरा, बिंदी, बिजवरा, केतक, राखडी, मूद, फिरकीचें फूल, अमफूल. कानातील —बुगड्या बाळ्या, कुडीं, झुबे, काप. नाकातील.—नथ, मोरणी. गळ्यातील:—मंगळसूत्र, वज्रटीक, एकदाणी, दुशी, चंद्रहार, पुतळ्यांची माळ, कंठा, मोहनमाळ, पेट्या. हातातील:—पाटल्या, गोठ, तोडे, जवे, कांकणें, बांगड्या, वाकी. पायातील.—तोडे, तोरड्या, जोडवीं, गेंद, मासोळ्या वाळे.

मुसुलमान स्त्रियांचे दागिने. —लातशान, चांदतारा, मोर, टिका, पातपाळीया, करणफुल, झुमका, बुगडी, बिजली—की बाळी, मुरकी, दुर, नथ, बुलाक, कांत, बेसर, दानिया, तुलसीपातीया, कंठी, चंपाकळी, माळ, अश्रफीकहार, चीनमाळा, चंदनहार, बाजुबंद, जहांगिरी, कंगण, पोंहोंची, चुडी, अंगठी, तोडे, कडचार, मकोडा, कामर्ता, पैंजण, कांबळा, बिचवा.

मुसुलमानी दागिन्यांचीं बरीच नांवें हिंदु दागिन्यांशीं सदृश आहेत. त्याचीं कारणें दोन दिसतात. एक तर बरेचसे मुसुलमान मूळ हिंदु असल्यामुळें हिंदूंचेच अलंकार त्या समाजांत शिरले. शिवाय या दागिन्यांच्या बाबतींत परकी असल मुसुलमानांनीं हिंदूंतील बहुविध अलंकारांचें अनुकरण केलें असावें.

पा र शी दा गि ने.—पारशी स्त्रियांचे दागिने हिंदूंप्रमाणें विविध प्रकारचे नसतात. ते सोन्याचे तसेच हिऱ्याचे, व मोत्याचे असल्यामुळें फार किंमतीचे असतात. कान, हात व गळा या तीन ठिकाणींच पारशी स्त्रिया दागिने घालतात, व ते बहुधा हिऱ्यामोत्याचे असतात. सोन्याच्या दागिन्यांपेक्षा हिऱ्यामोत्यांकडे भर अधिक आहे. गळ्यात मोत्याचे दागिने, व हातात हिरेजडित बांगड्या घालतात. श्रीमंत स्त्रीच्या अंगावर सुमारें तीन ते दहा हजारापर्यंत किंमतीचे अलंकार असतात.

हिंदु दागिन्याच्या उत्पत्तीसंबंधानें सौंदर्य व द्रव्यसंचयेच्छा या दोन हेतूंशिवाय एक निराळाच हेतु इंग्रज लेखकानीं सुचविलेला आहे. ( बॉबे गॅझिटियर–पुणें भाग १ ला परिशिष्ट डी. ). त्याचें म्हणणें असें कीं, केंसातील दागिने हे मूळ भूताखेताना पळवून लावणाऱ्या जिनसाचे असत. दागिन्याचीं नावें सूर्य, चंद्र, नाग, कूर्म वगैरे संरक्षक देवता, किंवा पवित्र मानलेले तृण, फल, पत्र, पुष्प वगैरेचीं असतात. तसेंच पवित्र मानलेल्या प्राण्याचे दात व इतर कित्येक शरीरभाग अंगावर धारण करण्याची चाल आढळते. दागिने घालण्याला शरीराचें भाग, जेथून भुतें माणसाच्या अंगात शिरतात अशी कल्पना आहे तेच म्हणजे डोकें, कान, नाक, गळा, वगैरे निवडलेले आहेत. हातापायाच्या बोटांमधूनहि भुतें शरीराच्या आतबाहेर जातात अशी समजूत असल्यामुळें तेथेंहि कांहीं जिन्नस घालावयाचे असतात. पवित्र मानलेल्या तुळशीच्या झाडाच्या काष्ठाची माळ घालण्याच्या पूर्वपद्धतीपासून तुळशीपट्टी किंवा हलींची डुर्झी; दर्भ व दूर्वा यांचीं पवित्रकें याच्या पासून सोन्याचीं पवित्रकें, आंगठ्या वगैरे; कोकणात भाताच्या लोंब्या किंवा धुगडी घालण्याच्या पद्धतीपासून हल्लींची कानातील बुगडी, वगैरे प्रकारच्या दागिन्यासंबंधाच्या उपपत्त्या सुचविण्यात आल्या आहेत. तसेंच कांहीं कांहीं जातींच्या रत्नामध्यें भुताना पळवून लावण्याचें सामर्थ्य असतें अशी समजूत हिंदुस्थानात आहे; व तशीच इंग्लंडात सतराव्या शतकापर्यंत सार्वत्रिक होती व अद्यापहि कांहीं अंशीं आहे. 'बिशप्स् सायफर' व 'बेबीज कोरल' यांच्या अंगीं भुताची बाधा टाळण्याचा गुण असतो असें आजहि कित्येक लोक मानतात. नवग्रहांना प्रिय अशीं नऊ प्रकारचीं रत्नें मानलेलीं आहेत, व विशिष्ट ग्रहाची पीडा टाळण्याकरिता त्याला प्रिय अशा रत्नाचा दागिना विशेषतः अंगठी घालण्याची चाल प्रचारात दिसते.

पा श्चा त्य अ लं का र.—कालानुक्रमें पाहता पश्चिमेकडील ईजिप्त देशाची संस्कृति सर्वांत जुनी होय. पण ती हल्लीं मृत असल्यामुळें जुन्या गडग्यांत वगैरे जे अलंकार सांपडतात त्यांवरून प्राचीन ईजिप्शियन अलंकारांची कल्पना केली पाहिजे. दाहशूर येथें १८९४–९५ मध्यें जे. डी. मार्गन याला ईजिप्तमधील १२ व्या राजघराण्यांतील ( ख्रि. पू. २४०० ) राण्यांचे अलंकार सांपडले आहेत. तसेंच इतरांना इतरत्र सांपडले आहेत. त्यात सोन्याचे रत्नजडित अलंकार व सोन्याचा मुलामा दिलेले अलंकार आहेत. त्यात आंगठ्या, सांखळ्या, करभूषणें, मुकुट, वगैरे प्रकार आढळतात. असुरी लोकांचेहि प्राचीन काळांतील करभूषणें, कंठभूषणें, कर्णभूषणें, वगैरे अलंकार सांपडले आहेत. क्रीट बेटात सांपडलेल्या प्राचीन मौल्यवान् वस्तूंत एक ब्राँझची लहान तरवार सांपडली असून ती सोन्याच्या पत्र्यानें मढविलेली आहे, व तीवर सिंह व रानटी बोकड यांचीं चित्रें आहेत. प्राचीन ग्रीक संस्कृतींतले मौल्यवान् जिन्नस ख्रि. पू. ७ व्या ६ व्या शतकापासूनचे सांपडतात. ग्रीक, एट्रस्कन व रोमन या तीन जातींच्या लोकांतील अलंकारात फार साम्य आहे. प्राचीन ग्रीक अलंकार फारच नाजुक व सुंदर असत. त्यांचे नमुने ब्रिटिश म्यूझियममध्यें आहेत. एट्रस्कन लोकांच्या प्राचीन अलंकारावर रवे पाडण्याचें काम ( मॅन्युलेशन ) फार सुबक केलेलें असतें. व तें कसें करीत असत याबद्दल बरेच दिवस कोडें होतें; पण तसलें काम करणारे कारागीर अम्रूझी प्रांतात ( दक्षिण इटाली ) आढळले व त्यांच्या मार्फत त्या कलेचा प्रसार नेपल्स व इतर ठिकाणीं झाला. रोमन लोकात मोठाले मौल्यवान् खडे बसविलेले दागिने करण्याची पद्धति विशेष प्रचारात आली. रोमनसाम्राज्य नष्ट होऊन रानटी लोकांची सत्ता यूरोपवर बसली. त्यावेळीं नवी ट्यूटानिक पद्धति वाढ पावली. तिचे नमुने १८३७ मध्यें सांपडले ते बुखारेस्ट म्यूझियममध्यें आहेत. या पद्धतीला मेरोव्हिंजियन असेंहि नाव आहे. या पद्धतीचे दागिने स्पेन ते सायबीरियापर्यंतच्या सर्व देशात आढळतात. याच्याच तोडीची केल्टिक पद्धति विशेषतः ब्रिटिश बेटात वृद्धिंगत झाली. आयर्लंडात या जुन्या पद्धतीचे सोन्याचे दागिने ख्रि. पू. पहिल्या शतकाच्या सुमाराचे सांपडले असून ते ब्रिटिश म्यूझियममध्यें आहेत. जुन्या पद्धतींत उत्क्रांति होत जाऊन सोळाव्या शतकात इटालियन रिपब्लिकन संस्थानात ही कला अगदीं शिखरास पोहोंचली. मुलाम्याचें काम, जडावाचें काम, नक्षी काम, माणसाचीं व जनावराचीं चित्रें नकसण्याचें काम, वगैरे सर्व बाबतींत त्या काळात झालेल्या उत्कृष्ट कामाची वरचढ तर राहोच पण बरोबरीहि हल्लींच्या काळात फारशी होत नाहीं. व्हिक्टोरिया व आलबर्ट म्यूझियममध्यें सर्व यूरोपातील पुरातन काळापासूनच्या सर्व पद्धतींचे अलंकार संग्रहित केलेले पाहावयास सांपडतात. १८५१ मध्यें लंडन येथें भरलेल्या प्रदर्शनात प्राच्य विशेषतः हिंदुस्थानातील दागिने मांडले होते, तेव्हांपासून भारतीय पद्धतीशीं विशेष परिचय होऊन यूरोपीयानीं त्याची फार स्तुति केली आहे. अलीकडे १८९५ च्या सुमारास यूरोपीय कलेमध्यें रेने लालीक यानें मोठी क्रांति घडवून आणली आहे. त्यानें सोनारकाम, नक्षीकाम, मुलाम्याचें काम व जडावाचें काम या चारहि कलांचें एकीकरण करून अलंकार करण्याची नवी पद्धति अमलात आणली. रत्नाच्या बाबतींतील उच्चनीचपणाच्या

म्हणजे "गारगोटीपेक्षा हिरा उच्च" वगैरे परपरागत समजुतींस फाटा देऊन त्यानें हिरा, पाच (एमेरल्ड), माणीक (रुबी), नील (सॅफायर) वगैरे उच्च रत्नाना पार्श्वभागीं (बॅकग्राऊंड) बसवून अकीक (तांबडा दगड-कार्नेलियन), गोमेद (ॲगेट), मालाकाइट (हिरव्या रगाचा व रेशमासारखी तकाकी असलेला दगड), पोंवळी (कोरल), राहूचा खडा (जॅस्पर = याशेफ), वगैरे साध्या जातींच्या खड्याना कधींकधीं प्रमुख जागीं बसविण्याचा उपक्रम केला. क्षीरस्फटिक (ओपल = शिरधातु) हा तर त्याचा विशेष आवडीचा दगड होय, आणि रेनेनें पुरस्कार केल्यामुळें त्याला मॅच रत्नमडित दागिन्यात मोठा मान मिळू लागला आहे रेनेच्या पद्धतीचे अलकार रोजच्या वापराला गैर-सोयीचे व फार विक्षिप्तपणाचे असतात असे आक्षेप येऊं लागले आहेत शिवाय खड्याचा बहुमोलपणा हा गुण लक्षात न घेणें ही गोष्टहि जवाहिरी कलेच्या दृष्टीनें आक्षेपार्ह आहे

तथापि रेनेनें फ्रान्समध्यें उपक्रमिलेली क्रातिकारक पद्धति इग्लड, बेल्जम, जर्मनी, आस्ट्रिया, स्विझर्लंड, रशिया, युनैटेड स्टेटस, वगैरे देशात हळूहळू पसरली आहे मात्र अलीकडील कारागिराच्या कलेच्या दृष्टीनें अत्यंत उत्कृष्ट अशा जिनसात, वापरावयाच्या दृष्टीनें आवश्यक असा जो टिकाऊपणाचा गुण तो मुळींच नसणें हा मोठा दोष सर्व देशात कायम आहे त्यामुळें असले अगदीं उत्कृष्टोत्कृष्ट जिन्नस अगावर घातल्यापेक्षां पेटींत राहिल्यानें अधिक सुदर दिसतात

आधुनिक दागीने —आज युरोपात जे दागीने दिसतात ते अगदीं नवीन नसून, त्यातील बरेचसे प्राचीन ग्रीक व रोमन अवशेषात पाहावयास सापडतात हिरे, पाचू किंवा इतर रत्नाची केलेली टाय पिन्, घड्याळाची साखळी, अगठी व ख्रिस्ती भिक्षुकाचे धार्मिक अलंकार याखेरीज दुसरे अलकार पुरुषवर्ग वापरीत नाहीं साधारणत असें म्हणता येईल कीं पौरस्त्यापेक्षा पाश्चात्य लोक दागीने कमी वापरतात २० व्या शतकात तर मागल्या शतकापेक्षा फार कमी दागीने घालण्याची साधारण लोकाची प्रवृत्ति होत चालली आहे, व सुबकपणा आणि सुंदर घाटणी या गोष्टींकडेच दागीनें घेताना विशेष लक्ष देण्यांत येतें

धार्मिक दागीने —हस्तीदंती किंवा लाकडी मण्याची माळ, तसेंच 'क्रूसिफिक्स' (क्रूसावर लाविलेली ख्रिस्त प्रतिमा) अडकविलेली माळ, ही गळ्यात घालण्याची आवड सर्व रोमन कॅथॉलिक देशातून दिसून येते सोन्याक्प्याचा क्रूस तर सर्व ख्रिस्ती मुलुखात मान्य झालेला दिसतो, व ज्याना माळ किंवा क्रूसिफिक्स यात मूर्तिपूजेचा गध आहे असें वाटतें ते सुद्धां बेधडक क्रूस वापरतात

तोडगे —जरी पुष्कळसे दागीने पूर्वी भाविकपणें तोडगे म्हणून वापरले जात तरी सध्या त्यांतील ज्ञद प्रभावाची कल्पना बहुतेक नष्ट झाली असून केवळ शरीरभूषणाकरिता ते वापरले जातात असे दागीने म्हणजे नाल, चारपानी क्लोव्हर, काळ मांजर, स्वस्तिक वगैरे यूरोपियन युद्धापासून जर्मनींतील समाइटविरुद्ध असलेल्या पक्षातील लोक मगलदायक म्हणून स्वस्तिक चिन्ह वापरतात हें विलक्षण वाटतें श्रद्धा, आशा व अनुकपा हीं दर्शविण्याचें चिन्ह म्हणून क्रूस, नांगर व हृदय याचा एक आकृति बनवून ती पुष्कळ लोक धारण करितात काहीं नाणींहि तोडगे म्हणून गळ्यांत घालतात.

बिरुदें व पदकें —ग्रेट ब्रिटनमध्यें शाळा व कालेजें याची विशिष्ट 'ब्रूचेस्' व टाय पिन्स असतात, व तीं मुख्यत्वें करून विद्यार्थ्यांत सख्याविषयक भावना उद्दीपित करण्याकरिता, व तसेंच शोभेकरिता म्हणूनहि असतात सैन्य आरमार व शाळा यातून बक्षिसादाखल पदकें देण्यात येतात, पूर्वकाळाप्रमाणें आताहि राष्ट्रीय प्रसग साजरे करण्याकरिता अशीं पदकें तयार करितात

स्मरणचिन्हें —दोन अगदीं लहान फोटो आत असणारें सान्याचें लाकेट (ताईत) हा एक मध्या आवडता दागिनाच होऊन बसला आहे तो दिसेल असा वापरीत नसून कपड्याच्या आत असतो युद्धकालीन स्मरणचिन्हें, हीं ब्रूचसारख्या अडकविता येणाऱ्या लष्करी गुंड्या किंवा सोन्यानें मढविलेली बदुकीची गोळी, या तऱ्हेच्या रूपात अलकारीभूत झालेलीं दिसतात

लग्नाची आगठी सर्व विवाहित स्त्रिया व काहीं थोड पुरुष वापरतात ती साधी सोन्याची केलेली असते वाङ्निश्चयाची अगठी बहुधा सोन्याची असून लग्नाच्या अगठीपेक्षा पातळ असते. कधीं कधीं तींत खडेहि बसतात वायका आखुड बाह्याचे कपडे वापरावयास लागल्यापासून वागड्या पुष्कळ प्रचारात आल्या हिरे, मोती, पाचू, निलमणी लाल हीं अतिमौल्यवान् रत्नें म्हणून गणलीं जातात खऱ्या अबरमणींच्या माळाकडेहि लोकाचें लक्ष जाऊं लागलें आहे परवापर्यंत सुरेख नक्षीदार चादीचे पट्टे व ज्याना चांदीनें मढविलेल्या हस्तीदंती पेट्या चादीच्या पेन्सिली वगैरे अडकविल्या आहेत अशा साखळ्या रूढ होत्या. हल्लीं बायकांना पैशाच्या पिशवीला चादी सोन्याच्या साखळ्या, छत्रीकाठीला सोन्याच्या मुठी, टोपीला फात आणि मनगटावर घड्याळ या गोष्टी आवडू लागल्या आहेत सायकाळचीं वस्त्रें-जीं किंबेकदां रत्नविभूषितहि असतात-खुलून दिसण्यासाठीं व नक्षत्राप्रमाणें काहीं विशिष्ट गोष्टींची छपा पसरावी म्हणून बायका केसांत हिऱ्यामाण्याचे दागीने घालतात.

सदभग्रथ —वैद्य—महाभारत उपसहार वा गो आपटे—पूर्वीच्या काळचे अलकार (वि विस्तार पु ४६, २) ए त्रि ज्युएलरी, बॅंबे गॅ, कुमारस्वामी—आर्टस् ॲड क्रॅफ्टस ऑफ इंडिया इ ]

अलंकार—काश्मीरच्या जयसिंह (११२९—८०) राजाचा दिवाण हा जातीचा ब्राह्मण होता याच्या बापाचें

नांव विश्वावर्त. याचा भाऊ जो प्रख्यात मंखकवि यानें केलेला श्रीकंठचरित्र नांवाचा संस्कृत ग्रंथ, कसा उतरला आहे हें पाहण्यासाठीं भावाच्या मागण्यावरून यानें पंडितांची सभा केली त्या वेळेस ३० पंडित जमले होते. त्यांची नांवें येणेंप्रमाणें :—अनंदकवि नैयायिक, आनंदकवि दुसरा, कल्याणकवि, गर्गकवि, गोविंदकवि, जनकराज वैदिक व वैयाकरणी, जल्हण, त्रिदकमीमांसक, तेजकंठ, त्रैलोक्यकवि मीमांसक, दामोदर, नंदन, नागकवि, पद्मराज कवि, प्रगट भट्ट मदनसखावा सुबंधु योगराज, रम्यदेव, रुय्यक, लक्ष्मीदेव लोष्ठकवि, वागीश्वर, श्रीकंठ, श्रीगर्भ, श्रीगुण, श्रीवत्स, शंभु व सुहल ही माहिती अर्वाचीन कोशकार बुल्हर शोधावरून देतात.

**अलख बुलाखी**—हा कवि जातीचा साठोदरा गुजराथी ब्राह्मण अमदाबाद येथें रहात असे. हा शंकरमतानुयायी होता. याची मान्यता लोकांत चांगला असल्यामुळें लोक याच्या पादुकांची पूजा करितात. यानें गुजराथी भाषेंत पदें वगैरे कविता पुष्कळ केलेली आहे व हा शालिवाहन १७६० मध्यें होता अशा विषयीं चांगला पुरावा आहे ( म स अ कोश )

**अलखनामी**—यास अलखगीर किंवा अलखिया अशींहि नांवें आहेत अलखनामी हा शब्द अलक्ष्यनामन् या शब्दावरून व अलखगीर हा शब्द संस्कृत अलक्ष्यगिरि या शब्दावरून निघाला असावा. हें दसनामी शैवपंथांतील गोसाव्यांच्या जातीचें नांव आहे. अलखिया हें हिंदुस्थानी अलख शब्दापासून बनलेलें नांव असून त्याचा अर्थ अलखाचा अनुयायी असा आहे.

उत्तर हिंदुस्थानातील अनेक शैव वैराग्यांना हीं नांवें योजतात अलखिया हें नांव सर्वांना लावितात, पण दसनामी पंथातील पुरी वर्गाच्या एका पोटवर्गांतील लोकांनाच फक्त अलखनामी म्हणतात व गीरवर्गांतल्यांना अलखगीर या नांवानें संबोधितात हे वैरागी 'अलख' असें ओरडतात. म्हणून या सर्वांना ' अलखको जगानेवाले ' (अलक्ष्याला जागे करणारे) अशा शब्दांनीं साधारणपणें ओळखण्यांत येतें. शैवसंप्रदायाच्या इतर पंथांतील लोकसुद्धा आपणास अलखिया म्हणवितात, पण खरे अलखिया आपली एक अगदीं निराळी जात मानून, गोरखपंथ्याप्रमाणें कान फाडणें वगैरे कांहीं जातिविशिष्ट चाली पाळीत नाहींत.

परमेश्वर अगोचर आहे ( अलखियांच्या शब्दांत " अलक्ष्य " आहे ) या मुख्य कल्पनेवर सर्व अलखियांचीं धार्मिक मतें उभारलेलीं असून, त्यांतील बहुतेक एकमेकांशीं जुळतात विकानेरचा अलखगीरपंथ एका चांभारानें स्थापन केला असें सांगतात (गॅझेटीयर आफ विकानेर, मेजर पौलेट कृत, १८७९). त्याच्या अनुयायांनीं त्याला लाल-गीर अशी पदवी दिली होती. त्यानें मूर्तिपूजेचा इनकार करून, केवळ अलक्ष्याला भजण्याविषयीं आपल्या अनुयायांना उपदेश केला. त्याची सर्व उपासना अलखनामस्मरणांत साठविलेली असे, दानधर्माकडे प्रवृत्ति असे. हे हिंसा करणें व मांसाचा अन्नाच्या कामीं उपयोग करणें निषिद्ध मानतात. माधुकरी धारण करतात. परलोक किंवा मरणोत्तर अवस्था मुळींच मानीत नाहींत. शरीराबरोबर सर्व नाश पावतें व शेवटीं शरीरहि महाभूतांत विरून जातें असें यांचें मत होतें. आपल्या शिष्याच्या नजरेपुढें त्यानें जें अनिमेय ठेविलें होतें, त्याची प्राप्ति या जन्मींच पावित्र्य, स्थिर समाधि व शांति याचा लाभ घडून येण्यानें होतें असें तो मानीत असे. मृत्यूनंतरच्या जीविताचा अभाव असल्यानें स्वर्ग आणि नरक किंवा सुख आणि दुःख मनुष्याच्याच ठिकाणीं व याच आयुष्यांत असतात असें तो मानीत असे.

अलखियाचा पोशाख विचित्र असतो. अंगांत एक लांब घोंगडासारखा पायघोळ अंगरखा व डोक्यावर एक वाटोळी किंवा उंच निमुळती टोपी असते. ते भिक्षेकरी असतात तरी उघड भिक्षा मागत नाहींत. ते एखाद्याच्या दाराशीं जाऊन " अलख कहो, अलख—को लखो " असें ठराविक आवाजांत ओरडतात. जर त्यावेळीं भिक्षा वाढली तर घेतात, नाहींतर एकदम निघून जातात. हा एक शांत निरुपद्रवी भिक्षेकऱ्यांचा वर्ग आहे असें समजण्यांत येतें.

लालगीरचा काल सांपडत नाहीं व त्याचप्रमाणें या संप्रदायाला मूलभूत असणारा विशिष्ट सिद्धान्त केव्हां उगम पावला हेंहि माहीत नाहीं. परमेश्वर विचाराग्राह्य, निर्गुण व अतर्क्य आहे, हा सिद्धान्त सर्व मतांतून दृष्टीस पडतो; पण भक्तिमार्गाच्या प्रसारामुळें गेल्या हजार वर्षांत या सिद्धान्ताला चांगलें मूर्त स्वरूप दिलें गेलें आहे. शिवाय भक्तिमार्गानें याला एका कल्पनेची जोड दिली ती ही कीं, परमेश्वराला मनुष्याचा कमकुवतपणा व दोष याविषयीं दया येऊन तो दृश्य स्वरूपांत प्रगट झाला आहे, तेव्हां सगुणदेवतेची आपण उपासना केली पाहिजे. भक्तिमार्गाचा श्रेष्ठ पुढारी म्हणजे तुलसादास ( १५२३—१६२३ ). यानें परमेश्वराची ज्ञानातीतता पुष्कळ वर्णिली असून, या मनोवाक्कमगोचर अशा परमेश्वराला आळविण्याचा व मोक्ष मिळविण्याचा एकच मार्ग आहे असें वारंवार सांगितलें आहे. तो मार्ग म्हणजे रामस्वरूपांत परमेश्वरानें घेतलेल्या पुरुषावताराची उपासना करणें होय, अलखियांचीं मतें या विरुद्ध आहे. ते मूर्त देवतेला मानीत नसून, अद्वैतवेदान्ताचाच जणूं काय पुरस्कार करितात असें वाटतें. शंकराचार्यांना गुरु समजणारे शैव " गीर " हें उपपद लावीत असत्यानें, या संबंधांत ' लाल-गीर ' अलख—गीर यांतील " गीर " हा शब्द अत्यंत महत्त्वाचा आहे. यावर कदाचित् जैन मताचा पगडा बसला असेल; कारण राजपुतान्यांत पुष्कळसे जैन आहेत. बौद्धमतांशीं तर लालगीरचीं तत्त्वें जास्त जुळतात, पण तो धर्म हिंदुस्थानांत ज्या वेळीं भरभराटींत होता त्यावेळीं लालगीर जिवंत होता असें म्हणण्याला

आपणापाशीं कांहीं पुरावा नाहीं तुलसीदासाच्या नावानें प्रसिद्ध असणाऱ्या एका छोट्या पद्यांत जो अलखियाचा उल्लेख आहे तोच पहिला असावा असें वाटतें. एका अलखियाशीं त्याचा जेव्हां वादविवाद झाला त्यावेळीं तुलसीदासानें असें प्रतिपादन केलें कीं, अलखाला पाहण्याचा जो एकच मार्ग तो म्हणजे त्याला रामस्वरूपातून पाहणें हा होय.

अलखियांशीं सदृश असणारा एक अर्वाचीन पंथ मुकुंददास नावाच्या एका साधूनें १८५० च्या सुमारास ओरिसांत स्थापन केला. मुकुंददासाला त्याचे अनुयायी अलखाचा अवतार समजत पण स्वतः मुकुंददास आपल्याला या अलखाशीं विशेष संबंध असणारा एक असें मानीत असे, व त्याच्या मतें अलख निराकार सर्वव्यापी व चिद्रूप असा होता. इतर बाबतींत त्याचीं मतें उत्तरहिंदुस्थानांतील अलखियांसारखीं असत. १८७५ त मुकुंददास वारल्यावर त्याच्या पंथाला ओहटी लागली. तथापि अद्याप ओरिसाच्या पश्चिमेस संबलपुर जिल्ह्यांत याचें अस्तित्व दृष्टीस पडतें. [ 'गोसावी' दसनामा पाहा ]

[ संदर्भ ग्रंथ—कूक—दि ट्राईब्स अँड कास्ट्स ऑफ दि नॉर्थ वेस्टर्न प्राव्हिन्सेस अँड औध ( १८९६ ) एच् एच् विल्सन—एसेज ऑन दि रिलिजन ऑफ दि हिंदुज इ.अॅ. पु. २२ ( नोट्स ऑन तुलसीदास ) प्रोसीडिंग्ज ऑफ दि बेंगॉल एशियाटिक सोसायटी, १८८२ ग्रीयरसनचा एरिए मधील 'अलखनामी' लेख ]

**अलगरकोविल**—(मद्रास इलाखा ) मदुरा जिल्ह्याच्या मेलूर तालुक्यांतील एक देवस्थान उ. अ. १०° ५' व पू. रे. ७८° १४'. हें देवस्थान मदुरा शहराचा ईशान्येस १२ मैलांवर आहे. देवालय फार प्राचीन असून कल्लार व इतर चोरी करणाऱ्या जातींची या देवावर फार भक्ति आहे. चोरी करून आणलेल्या मालापैकीं कांहीं भाग ते या देवास अर्पण करतात. देवळासभोंवतीं एक मोठी भिंत आहे. आदि महिन्याच्या अमावास्येस येथें मोठी जत्रा भरते, त्या वेळीं हजारों यात्रेकरू येथें जमतात. देवळाचा बराच भाग मोडकळीस येत चालला आहे. येथून तीन मैलांवर अलगर डोंगरावर एका झऱ्यावर एक इमारत बांधली आहे. त्या झऱ्याच्या पाण्याच्या अंगीं सर्व पापांचा संहार करण्याची शक्ति आहे, असा तेथील लोकांचा समज आहे ( इं. गॅ. ५–१९०८ )

**अलताई पर्वत**—याचें मोंगोलियन नांव अलतइन–उला ( सुवर्णगिरी ) आशिया खंडांत हें नांव निरनिराळ्या अर्थी वापरतात. पश्चिम सैबेरिया व मोंगोलिया या देशांतला हा पर्वतप्रदेश स्वित्झर्लंडाप्रमाणें असून त्याचें क्षेत्र मात्र बरेंच विस्तृत आहे.

" सायलुघेम अथवा कोलिव्हन अलताई पर्वत " हा या प्रदेशाचा जणुं काय कणा असून उत्तर अ. ५१° ६० व पूर्व रे. ९८° यांच्या दरम्यान असलेल्या ( सायन ) पश्चिम टोंकाकडे उत्तर अ. ४९° व पूर्व रे. ८६° अशा या भागापासून ईशान्येस हा पर्वत पसरलेला आहे. शिखरांची उंची ९–१० हजार फूटपर्यंत आहे. ६७०० फुटावरचा भाग बहुतक बर्फाच्छादित असतो. पर्वतावर थोडे घाट आहेत. दक्षिणेकडील उलन–दबन घाट व उत्तरेकडील चपचन–दबन घाट हे दोन नमूद करण्यासारखे आहेत. या भागांत कांहीं सरोवरें आहेत, त्यांपैकीं उबसा–नोर, किरगिझ–नोर, दुर्गा–नोर, कोबदो–नोर वगैरे महत्त्वाचीं आहेत.

खास अलताई पर्वत—याला " एकटाघ " 'मंगोली अलताई' असेंहि म्हणतात. हा दोन जाडींनीं समांतर रेषेंत असणाऱ्या डोंगरओळींनीं झालेला असून त्या ओळी ९९° अंशापर्यंत पसरलेल्या आहेत. ९४° अंशापासून पर्वताचे निरनिराळ्या दिशेस पसरणारे अस फाटे आहेत. यांना विवक्षित स्थानिक नांवेंहि देण्यांत आलेलीं आहेत. यांवर 'किरगिझ नावाच्या भटक्या रानटी लोकांची वस्ती आहे.

सायलुगम पर्वताच्या वायव्येकडील भागांत अति उंच असें एक दुशिंगी शिखर ( उंची १४८९० व १४५६० फूट ) आहे. येथून बऱ्याच बर्फवाहिनी नद्या उगम पावतात. पर्वतभाग असंख्य दऱ्यांनीं व कड्यांनीं भरलेला आहे. बऱ्याच खोऱ्यांतून लोकवस्ती आढळते. मुख्यत 'यूया' 'युलमा' "भुक्मा" वगैरे खोऱ्यांत वस्ती बरीच आहे. दुसऱ्या कांहीं दरीखोऱ्यांत उदाहरणार्थ, यशकाऊस, चलाइमन, चलचा वगैरेंत भ्रमणवृत्ति करणारे टेलेनघीट अथवा टेलुत नांवाचे रानटी लोक वस्ती करून आहेत. लगतच टेलटस्कोय नावाचें एक सरोवर आहे. याची लांबी ४८ मैल, रुंदी ३ मैल व एकंदर क्षेत्रफळ ८७ चौ. मैल असून हें १७०० फूट उंचीवर आहे. सुपीक खोऱ्यांतून रशियनांची वस्ती दिवसेंदिवस वाढत आहे. इ. स. १९०८ सालीं ना बायस्क नर्नौल, कझनेटस्क या खोऱ्यांत एकंदर लोकवस्ती८,००,००० वर आढळून आली. या लोकांचा मुख्य व्यवसाय शेतकी" व हा आहे. याशिवाय या पर्वतावर रुपें, तांबें, शिसें वगैरेंच्या खाणी असल्यामुळें बरेच लोक खोदकाम वगैरे करतात. अलताई प्रदेशाची राजधानी अगर मुख्य ठिकाण बर्नौल हें असून येथील व्यापारहि बराच आहे. याशिवाय दुसरें मोठें व्यापारी शहर बिस्क हें आहे. खाणीमुळें कोलीव्हन, मेनोगोर्स्क, रिडर व सैलारस्क वगैरे गावेंहि प्रसिद्धीस आलीं आहेत.

**अलनम्यो**–(ब्रह्मदेश )थयेम्टयो जिल्ह्यांतील म्येद विभागाचें मुख्य ठाणें इरावती नदीच्या पूर्वतीरावर वसलेलें आहे उ. अ. १९°२२' व पू. रे. ९५°१३' इ. स. १९०१ मधील लोकवस्ती १०२७ इ. स. १८५४ सालीं बर्मा किंवा म्येड याच्या दक्षिणेस मेजर अॅलननें जी सरहद्दीची रेषा आखली होती त्याच रेषेवर हें गांव वसलें आहे. ब्रह्मदेश खालसा होईपर्यंत हें सरहद्दीवरील गाव असल्यामुळें फार महत्त्वाचें होतें. हल्लीं येथें कापसाचा व्यापार मोठा आहे व

तेलापासून साबण करण्याचा कारखाना येथें आहे. ( इं. गॅ. ५–१९०८ ).

**अलंप्रभु**—याला आल्लमप्रभु व प्रभुलिंग असेंहि म्हणतात. हा आराध्य जातीय तैलंग ब्राह्मण होता, अशी समजूत आहे. पण हा पुरुष ऐतिहासिक आहे याविषयींच खात्री नाहीं. लिंगाइत धर्माचा संस्थापक जो बसव त्याच्याहि अगोदरचा हा पुरुष होता, असें वीरशैव समजतात 'प्रभुलिंग लीले'म्हणून जो कानडी भाषेंत चामरस कवीनें षट्पदीवृत्तांत रचलेला ग्रंथ आहे त्यात याचें वर्णन आढळतें या काव्यांत प्रभुलिंगास गणपतीचा अवतार मानिलें आहे व प्रत्यक्ष पार्वतीनें याची परीक्षा पाहण्याकरितां आपल्या अंशानें एक वनवासी राजकन्या उत्पन्न केल्याची कथा दिली आहे. हा अत्यंत पवित्र वर्तणुकीचा, शांत, पुष्कळ प्रवास केलेला व जागोजाग अनेक चमत्कार दाखविल्यामुळें लोकांत प्रख्यातीस आलेला असा होता. कोल्हापूर संस्थानांतील अळतें गांवीं जें अलंप्रभूचें देवालय आहे, तें याचें नसून अवरंगजेबाच्या स्मरणार्थ देवीला हें नाव दिलें आहे( कोल्हापूर गॅ. पहा ) याची साम्प्रदायिक कथा देणें म्हणजे प्रभुलिंगलीलेचा गोषवारा देणें होय. प्रभुलिंगलीला पहा.

**अलफॅान्सो**—हें नाव अनेक पोर्तुगीझ व स्पॅनिश राजाचें होतें.

पो र्तु गी ज रा जे, पहिलाअलफान्सो (१०९४–११८५) हा फार शूर व स्वतंत्र बाण्याचा असे. त्यानें लिऑनचें मांडलिकत्व झुगारून दिलें व मूरलोकांचा पराभव करून त्याचा प्रदेश जिंकला पुढें लिऑनच्या राजानें त्याचा पराभव केला व गॅलिशिया घेऊन त्याला बंधमुक्त केलें पोर्तुगीज लोक याला अद्यापहि साधु व स्वराज्यसंस्थापक म्हणून भजतात

२ रा ( ११८५–१२२३ ) यानें धर्माधिकाऱ्याची सत्ता संपुष्टांत आणण्याचा प्रयत्न केला. आपल्या राज्याचे कायदे बदलून नवे केले.

३ रा (१२१०–१२७९)यानें मूरलोकांशी युद्ध सुरू ठेविलें. याच्या अमदानींत अलसेगार्व्ह पोर्तुगालला जोडण्यात आला.

४ था ( १२९०–१३५७ ) याच्या मुलानें जें बंड केलें त्या च कारण अलफान्सोनें त्याच्या बायकोचा (सुनेचा) खून करविला हें होय

५ वा ( १४३२–१४८१ ) आफ्रिकेंतील मूरलोकांच्या प्रदेशावर चाल केल्यामुळें " दि आफ्रिकन " हें उपपद याला मिळालें यानें कॅस्टाईल व लिऑन याचा स्वामी होण्याची महत्त्वाकांक्षा धरली. शेवटीं उदास होऊन राज्य त्याग केला व सिंत्राच्या मठांत जाऊन राहिला.

६ वा ( १६४३–१६७५ ) याच्या ' दुर्वर्तनामुळें याच्या बायकोनें व भावानें यास इ स. ( १६६७ ) मध्यें पदच्युत केलें.

स्पॅ नि श रा जे—स्पेन देशांत ७३९ पासून १०२८ पर्यंत अलफान्सो या नांवाचे सहा राजे झाले. याच्या कारकीर्दीची विशेष माहिती उपलब्ध नाहीं त्याची शकावली अशीः—

पहिला अलफॅान्सो ७३९–७५७. दुसराः—७८९–८४२. तिसराः—८६६–९१४. चवथाः—९२४–९३१. पाचवाः—९९९–१०२८. सहावा अलफान्सो ( १०६५–११०९ ):—हा फराच प्रसिद्ध असून. अनेक कवींनी याला आपला काव्यनायक बनाविलें आहे. स्पेनमध्यें यानें भिन्न संस्कृतीचा प्रवेश करविला अरब लोकांना चांगलें वागविलें व ख्रिस्ती व मुसुलमान संप्रदाय एकत्र आणिले.

७ वा.(११२६–११५७)हा ११३५ त गादीवर बसला. यानें आपल्या देशात एकी करण्याचा प्रयत्न केला. हा ख्रिस्ती धर्माचा पुरस्कर्ता असून आपल्या राज्यांतील मुसुलमानांचाहि चाहता होता.

८ वा. कॅस्टाईलचा राजा (११५८–१२१४)—यानें ख्रिश्चन राजे व परराष्ट्रीय धर्मयोद्धे याचा अध्वर्यु होऊन अल्मोहेड लोकांचा ( १२१२ ) पराभव केला. यानेंच स्पेन देशांतील पहिलें विद्यापीठ स्थापन केलें.

९ वा. लिऑनचा राजा ( १२३०–१२८८ ) आपल्या जवळच्या नात्यांत दोनदा लग्नसंबंध केल्यामुळें पोपनें याच्यावर बहिष्कार घातला.

१० वा. (१२५२–१२८४) यानें ज्योतिष शास्त्रास उत्तेजन दिलें. राजा या दृष्टीनें कायदेकानू करण्यांत यानें बरेंच कौशल्य दाखविलें. यानें फ्युरो रिअल व सायेट पार्टीडास या नावाचे कायद्याचे दोन ग्रंथ लिहिले. यापैकीं दुसरा अपुरा राहिला होता.

११ वा. (१३१२–१३५०—यानें आपल्या क्रूर वर्तनाचा कित्ता आपला मुलगा पीटर दि क्रुएल ( क्रूर पीटर ) याला घालून दिला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

१२ वा ( १८५७–१८८५ ):—हा दुसऱ्या एसाबेलेचा मुलगा. १८६८ ची राज्यक्रांति झाल्यावर हा आपल्या आईबापाबरोबर पॅरिसला गेला तेथून त्याला व्हिएन्ना येथें शिकण्याकरिता पाठविलें. पुढें १८७० त याच्या आईनें आपला राज्यावरील हक्क सोडला. तेव्हां हा गादीवर बसला. यानें १८७४ त " स्पेनची राजसत्ता माझ्यात एकवटली आहे " असें जाहीर केलें. १८७६ त यानें कार्लीस्ट पक्षाचा पाडाव केला. १८७८ मध्यें त्यानें मराया डी लॅस मर्सेडेस इच्याशीं लग्न केलें. पुढें ही मेल्यावर (१८७९) ऑस्ट्रियाची राजकन्या मराया ख्रिश्चानिया इच्याशीं विवाह लावला.

१३ वा. [१८८६] हा बाराव्या अलफॉन्सोचा मुलगा होता. १९०२ मध्ये यानें राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं. १९०६ मध्यें यानें इंग्लंडच्या ७ व्या एडवर्डची पुतणी व्हिक्टोरिया एजिनायज्युशिआएना मराया ख्रिश्चानिया इच्याशीं लग्न झालें

अरेगॉनमध्येंहि पाच अलफान्सो नावाचे राजे होऊन गेले. पैकीं पहिला ( ११०४–११३४ ) स्पेनच्या सहाव्या

अलफान्सोचा आवडे असून फार शूर व धार्मिक होता त्याची बायको एक कुरयाच होती. या घराण्यातला पांचवा अलफॉन्सो ( १४१६-१४५८ ) फार मोठ्या योग्यतेचा व विद्वद्वर्य असा होता. १५ व्या शतकातील यूरोपातील पुनरुज्जीवनाचें कार्य यानें काहींसें आपल्या अंगावर घेतलें होतें ( ए. ब्रि. )

**अलबा लॉंगा.**— इटलीमधील लॅटिअम प्रांतातील जुनें शहर. हें "अलबानस् लाकस" या सरोवराच्या पश्चिम किनाऱ्यावर असून रोमच्या आग्नेयदिशेस १२ मैलांवर आहे. आसकानिअस यानें हें शहर वसविलें असून तें लॅटिन शहरामध्यें सर्वांत जुनें शहर होतें अशी दंतकथा आहे. टलस हॉस्टिलिअस यानें हें शहर उध्वस्त केल्यानंर लॅटिन शहराचें धूरीणत्व रोमला प्राप्त झालें. अलबानस मॉन्स व अलबानस् लाकस यामध्यें हें शहर वसलेलें असावें असें काहींचें मत आहे परंतु लिव्ही व सिसेरो याच्या वर्णनावरून पहाता, हें शहर "अलबानस् लाकस याच्या पश्चिमेस सध्याच्या " कॅसल गाडाल्फो " याच्या जागेवर असावें असें स्पष्ट दिसतें. सध्या या शहराचा अवशेष फक्त स्मशानभूमी असून तीमध्यें असलेली थडगीं ज्वालामुखींतून निघालेल्या रसानें आच्छादलेलीं आहेत. डोमिटिअन नावाचा राजा या शहराजवळच्या सरोवराच्या काठीं रहात असे " कॅसल गॅंडोल्फो" मधील सध्याच्या "व्हिला बारबिरिनीच्या" ठिकाणीं जुनीं राजमंदिरें व उपवनगृहें होता. या उपवनगृहांचे काहीं अवशेष अद्याप तेथें आहेत. या शहरीं रोमच्या पलटणीतील लोकांच्या काहीं थडग्यांत मॅक्झेंटिअस यानीं नाणीं सापडलेलीं आहेत. या शहरांत ज्वालामुखींतील रसापासून झालेले दगड इमारतीच्या कामीं उपयोगांत आणितात. ( ए. ब्रि. )

**अलबुकर्क अलफॉन्सो डी( १४५३ – १५१५ )**— याचा जन्म इ स. १४५३ त लिस्बनजवळ अलेक्झांड्रिया शहरीं झाला. त्याचा बाप गोन्झाल्व्हो हा पोर्तुगालच्या राजघराण्यातील एक अनौरस वंशज असून पोर्तुगालच्या दरबारीं तो बहुमानाच्या जागेवर काम करीत होता. अलबुकर्कचें सर्व शिक्षण पाचव्या अलफान्सो राजाच्याच दरबारीं झालें होतें, व त्या राजाच्या मरणानंतर त्यानें काहीं दिवस आफ्रिकेंत काम केलेलें दिसतें. तेथून परत आल्यावर त्यास दुसऱ्या जॉनच्या मुख्य एक्वरी( अश्वाधिकारी )चें काम मिळालें १५०३ मध्यें तो पूर्वेकडे पहिल्या प्रथम पर्यटनास निघाला, व केप ऑफ गुड होपला वळसा घालून हिंदुस्थानांत आला. येथें कोचीनच्या राजास गादीवर बसविण्याच्या कामीं मदत करून कोचीन येथें पोर्तुगीजांचा किल्ला बांधण्याची त्यानें राजापासून परवानगी मिळविली अशा रीतीनें पोर्तुगालच्या पूर्वेकडील साम्राज्याचा पाया घातला गेला. १५०४ मध्यें तो स्वदेशीं परत आला ( जुलै ). तेथें त्याचें एमॅन्युएल राजानें चांगलें स्वागत केलें, व आपल्या १६ जहाजाच्या आरमारापैकीं पाच जहाजें त्याच्या ताब्यांत दिलीं. हा जहाजांचा तांडा मग १५०६ त टिस्टनड कुन्हा याच्या आधिपत्याखालीं हिंदुस्थानाकडे यावयास निघाला मार्गांत आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील अरब लोकांच्या शहरावर हल्ले चढवून जय मिळविल्यानंतर अलबुकर्क कुन्हापासून वेगळा होऊन इराणच्या आखातातील ऑर्मझ्झ बेटावर चाल करून गेला. हें बेट त्या काळीं पूर्वेकडील देशांतील व्यापाराचें एक मुख्य केन्द्र समजलें जात होतें २५ सप्टेंबर १५०७, रोजीं तो ऑर्मझ्झ येथें आला व त्यानंतर लवकरच त्यानें तें बेट हस्तगत करून घेतलें. तथापि त्याला तें फार दिवस आपल्या ताब्यांत ठेवता आलें नाहीं. इ. स. १५०८ च्या अखेरीस तो आणखी तीन जहाजें घेऊन मलबार किनाऱ्यावर आला, व तेथील सुभेदार फ्रान्सिस्को डी आलमिडा याच्या जागीं राजाकडून आपली नेमणूक झाली असल्याचें त्यानें जाहीर केलें. परंतु अलबुकर्कच्या हातीं अधिकारसूत्रें न देता फ्रान्सिस्कोनें त्यास पकडून तुरुंगांत टाकलें. येथून त्याची तीन महिन्यानीं पोर्तुगालच्या सेनापतीनें मोठ्या आरमारासह येऊन सुटका केली १५०९ च्या नोव्हेंबर महिन्यांत म्हणजे अरबी समुद्रातल्या मोहिमेहून हिंदुस्थानांत आल्यावर जवळ जवळ एक वर्षानें अलबुकर्क सुभेदारीच्या कामावर रुजू झाला. अलबुकर्कच्या हातीं अधिकारसूत्रें येतांच आपल्या नेहमींच्या तडफेस अनुसरून १५१० च्या जानेवारी महिन्यांत त्यानें कालिकतवर हल्ला चढविला. ह्या हल्ल्यांत त्यास अपयश येऊन एक जबर जखम झाली असताहि त्यानें त्यानंतर लवकरच गोवें शहरास वेढा घालून विजापुरच्या राजापासून तें हस्तगत केलें. परंतु तें शहर ताब्यांत ठेवण्यास पुरेसें सैन्य जवळ नसल्यामुळें आगस्ट महिन्यांत तो तें सोडून गेला; व पुढें नोव्हेंबर महिन्यांत सैन्य घेऊन येऊन त्यानें तें शहर पुन्हा हस्तगत केलें. यानंतर तो मलाक्कावर स्वारी करून गेला. तेथें निकराची लढाई होऊन तें ठिकाण त्यानें काबीज केलें या शहराचा बंदोबस्त करून तेथें पोर्तुगीजांची सत्ता कायम करण्याकरितां अलबुकर्क जवळ जवळ एक वर्ष त्या ठिकाणीं राहिला. १५१२ त तो मलाक्काहून पुन्हा मलबार किनाऱ्याकडे यावयास निघाला. परंतु वाटेंत एक मोठें तुफान झालें, व या तुफानांतून अलबुकर्क जरी कसा बसा जीव बचावून पार पडला तरी त्यानें आपल्या बरोबर मलाक्काहून जी अपार संपत्ति आणली होती, ती सर्व जहाज फुटून समुद्रार्पण झाली. याच वर्षाच्या सप्टेंबर महिन्यांत तो गोवें येथे आला व इदालखान यानें उभारलेलें बंड मोडून त्यानें त्या शहराचा इतका चांगला बंदोबस्त केला कीं, यापुढें गोवें हें पोर्तुगीज लोकांचें एक भरभराटीचें शहर होऊन बसलें यानंतर पोर्तुगाल सरकारच्या हुकुमावरून अलबुकर्कनें तांबड्या समुद्रावरील स्वारीचें काम हातीं घेतलें. तांबड्या समुद्रांतील दळणवळण सर्वस्वी पोर्तुगीज लोकांच्या हातीं रहावें असा ही स्वारी करण्यांत पोर्तुगीज सरकारच

हेतु होता. या हुकमावरहुकूम अलबुकर्कनें १५१३ त एडनला वेढा घातला, परंतु तो निष्फळ होऊन त्यास मागें परतावें लागलें. असें म्हणतात कीं, इजिप्तची सत्ता नष्ट करण्याकरितां नाइल नदीचा प्रवाह तांबड्या समुद्राकडे फिरवून सर्व इजिप्त-देश ओसाड करण्याचा अलबुकर्कचा बेत होता. त्याचप्रमाणें पॅलेस्टाइन परत मिळविण्याकरितां मोहीम कोणीकडून व कशी करावी याचीहि त्यानें रूपरेषा आखली होती. १५१५त त्यानें ऑर्मझ शहरावर दुसऱ्यादा हल्ला केला हीच त्याची शेवटची मोहीम होती. या प्रसंगीं ऑर्मझ येथील लोक कांहीं प्रतिकार न करताच अलबुकर्कच्या स्वाधीन झाले. हें बेट १६२२ पर्यंत पोर्तुगीजांच्या ताब्यांत राहिलें. अलबुकर्कचे अखेरचे दिवस अतिशय काळजींत व संकटांत गेले. पोर्तुगालच्या दरबारीं त्याचे कित्येक वैरी असून ते त्याच्याविरुद्ध राजाचें मन कलुषित करण्याची एकहि संधि वायां जाऊं देत नसत. स्वतः अलबुकर्कच्या अदूरदर्शी व अरेरावी वर्तनामुळें त्याच्या वैऱ्यास आपला कावा साधण्यास कित्येक वेळां मदतच झाली. ऑर्मझहून परत येत असतांना गोवें बंदराच्या तोंडाशीं यूरोपहून आलेलें जें एक जहाज त्याच्या दृष्टीस पडलें त्यातच त्याला काढून त्याच्या जागीं त्याचा खाजगी वैरी सुआरेज याची नेमणूक झाल्याच्या हुकुमाचे कागद होते. हें वर्तमान कळताच त्याच्या मनास इतका धक्का बसला की तो समुद्रावरच १६ डिसेंबर १५१५ रोजीं मरण पावला. मरणापूर्वी त्यानें आपल्या राजाच्या नांवानें एक पत्र लिहून त्यांत आपल्या कामगिरीचें सविस्तर वर्णन केलें, व तिचा मोबदला स्वतः स मिळाला नाहीं तरी आपल्या मागून आपल्या मुलास तरी मिळावा अशी इच्छा दर्शविली.

हिंदुस्थानांतील मुलूख काबीज करण्यांत पोर्तुगीजांचा व्यापार हाच एक केवळ मुख्य उद्देश असल्यामुळें ते किनाऱ्यापासून दूर असलेला प्रदेश पादाक्रान्त करण्याच्या भानगडींत पडले नाहींत. परंतु अलबुकर्कचें धोरण इतकें संकुचित नव्हतें. आशिया खंडांत पोर्तुगीज साम्राज्याचा भक्कम पाया घालावा अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. अलबुकर्कच्या हातून ,गोंव्याच्या वेढ्यांत हातीं लागलेल्या कैद्यांचे हाल हाल करणें, तांबड्या समुद्रांतील निराश्रित कोळ्यांचे नाक कान कापणें,रैसअहमद याचा खून करण्याची मसलत करणें वगैरे कांहीं आक्षेपार्ह कृत्यें झालीं होतीं, तरी त्याच्या कारकीर्दींत हिंदु लोकांस धर्मांतरासंबंधीं मुळींच त्रास झाला नाहीं आसपासच्या हिंदी संस्थानिकांशींहि त्याचें गोडीगुलाबीचेंच वर्तन होतें. त्यानें आपल्या सुस्वभावानें इतकी लोकप्रियता संपादन केली कीं, पुढील सुभेदाराच्या कारकीर्दींत हिंदी लोकांचा छळ होऊं लागला तेव्हां ते भाविकपणानें त्याच्या कबरीस नवस करण्यास जात असत, आपल्या प्रजेस न्याय मिळावा म्हणून अलबुकर्कनें गोंव, चौल व वसई येथें फौजदार नेमले होते व हेच सर्व दिवाणी व फौजदारी खटल्यांचा निकाल लावीत. व्यापार हा सर्वस्वीं सरकारनेंच आपल्या हातीं ठेवला असल्यामुळें अलबुकर्कनें प्रत्येक बंदरांत जकातीचीं नाकीं बसविलीं. हिंदुस्थानांतील जी सतीची चाल इंग्रज १८२९ पर्यंत बंद करूं शकले नाहींत ती यानें आपल्या मुलुखांत १६ व्या शतकाच्या आरंभासच बंद केली होती. तथापि त्यानें ग्रामपंचायती वगैरे खेडेगावांतील उपयुक्त संस्था पूर्वीप्रमाणें जशाच्या तशाच राहूं दिल्या. पोर्तुगालसारख्या थोड्या लोकवस्तीच्या राज्यांत यूरोपियन लोकांच्या मदतीवर नुसतीं बंदरें देखील कबजांत ठेवणें शक्य नव्हतें यासाठीं अलबुकर्कनें एतद्देशीय स्त्रियास ख्रिस्ती धर्म देऊन त्यांच्याशीं विवाह लावण्यास आपल्या लोकांस उत्तेजन दिलें, व अशा रीतीनें ज्यांच्यावर विश्वास टाकून राज्यकारभार करतां येईल अशी एक मिश्र रक्ताची नवीन जात निर्माण केली. अलबुकर्कच्या मृत्यूनंतर पोर्तुगालच्या राजाची त्याच्या राजनिष्ठेबद्दल खात्री पटली व अलबुकर्कचा दासीपुत्र आफोन्सो याजवर बहुमानाचा वर्षाव करून त्यानें अलबुकर्कशीं घडलेल्या कृतघ्नपणाच्या वर्तनानें लागलेला डाग धुवून टाकण्याचा प्रयत्न केला. अलबुकर्कच्या पुत्रानें 'कॉमेंटरिऑस डो ग्राडे आफोन्सो डी अलबुकर्क' या नांवाखालीं आपल्या बापाच्या कागदपत्रांचा निवडक भाग प्रसिद्ध केलेला आहे. [ ब्रिटानिका; अलबुकर्क, रूलर्स ऑफ इंडिया सीरिज; इ. ]

अलंबुष—( . )बकासुराचा बंधु दुर्योधनपक्षीय राक्षस. (भार उद्योग. १६७) हा भारतीय युद्धांत घटोत्कचाच्या हातून मृत्यू पावला (भार. द्रोण अ. १०९.)

(२) जटासुराचा पुत्र, हा दुर्योधनपक्षाकडून पित्यास मामानें मारल्याचें वैर स्मरून, युद्ध करीत असतां, रात्रीं घटोत्कचानेंच यास मारिलें (भार. द्रोण. अ. १७४).

(३)—दुर्योधनपक्षीय राजा, यास सात्यकीनें मारिलें (भार. द्रोण. अ. १४०)

वरील प्रत्येकाच्या वधाचें वर्णन करण्याकरितां द्रोणपर्वांतील एक एक अध्याय दिला आहे.

अलमगीर डोंगर—(बंगाल इलाखा)कटक जिल्ह्याच्या जयपूर विभागांतील एका डोंगराचें शिखर. उत्तर अक्षांश २०° ३९' व पू. रेखांश ८६° १४.'या डोंगरावर सन १७१९ सालीं बांधलेली तख्त–इ–सुलेमानची मशीद प्रसिद्ध आहे (इं. गॅ. ५–१९०८).

अलमपूर—( मुंबई इलाखा ) काठेवाडांतील एक छोटें संस्थान. १८८१ मध्यें येथें ५९८ लोकवस्ती होती. चमार्डी ठाण्याच्या हद्दींत हें खंडणी देणारें स्वतंत्र संस्थान आहे. येथील मालिक गोहिल असून भावनगर कुळांतले समजले जातात. अलमपूर गांव चमार्डीच्या वायव्येस १४ मैलावर व घेलो नदीच्या दक्षिणेस २ मैलावर आहे. (इं. गॅ. ५;)

(२) मध्य हिंदुस्थान. बुंदेलखंड एजन्सींतील इंद्र संस्थानचा एक परगणा. यांत अलमपूर हें २६° २' उत्तर अ. आणि ७८°५०' पूर्व रे. यांवर असून एकंदर क्षेत्र ३७ चौरस मैल आहे.अलमपूर गांवीं होळकरशाहीचा संस्थापक मल्हारराव होळकर अकस्मात मृत्यू पावला. तेव्हां त्याच्या छत्रीच्या खर्चाकरता आसपासच्या छोट्या छोट्या संस्थानिकांकडून २७ खेडीं घेतलीं, व यांचें उत्पन्न या कार्याकडे लावलें. प्रथम प्रथम त्या संस्थानिकांनीं छत्री बांधण्यांत बरींच विघ्नें आणली. तथापि शिंदे सरकारच्या साह्यानें हें काम अखेरीस पूर्ण झालें. लोकसंख्या (१९०१) सुमारें १६७११. अलमपुरास मल्हारनगर असेंहि नांव पडलें. या परगण्याचा कारभार थेट इंदूरहून चालतो. उत्पन्न ५१००० रुपये आहे. (इं गॅ. ५-१९०८)

(३)—(हैद्राबाद संस्थान) रायपूर जिल्ह्याच्या आग्नेयी कडील तालुका. लोकसंख्या (१९०८) सुमारें ३०,२२२ क्षेत्रफळ १८४ चौरस मैल. एकंदर खेडीं ४३ पैकी एक जहागीर. मुख्य ठिकाण—अलमपूर. हा तालुका व महबूबनगर जिल्हा यांमध्यें कृष्णा नदी वहाते. उत्पन्न १.२ लाख. (इं. गॅ. ५-१९०८)

अलमेल—(मुंबई इलाखा) विजापूर जिल्हा. सिंदगीच्या उत्तरेस बारा मैलांवर एक जुनें खेडें आहे. लोकसंख्या (१८८१). ३१३३. हें जुनें जिल्ह्याचें ठिकाण होतें. हें खेडें कल्चुरी विज्जल राजानें वसविलें आहे. खेड्यांतील शाळेजवळ दगडाच्या एका बाजूला देवनागरी व दुसऱ्या तीन बाजूंला कानडी शिलालेख आहेत. हे सर्व शके १००७ चे आहेत. गांवांत रामलिंगाचें एक देऊळ पडक्या स्थितींत आहे. गावाबाहेर हनुमंताचें एक देऊळ आहे. रामाजी नरहर बिनीवाले या मराठा सरदारानें बांधलेलें ईश्वराचें एक देऊळ आहे (१७८०). शेषगिरिराव देशपांडे यांनीं एक रामाचें देऊळ बांधलेलें आहे. याला बाजीराव पेशव्यांनीं जमीन दिली आहे. दरवर्षी चैत्रांत येथें मेळा भरत असतो. गावांत दुसरींहि बरींच देवळें आहेत. येथील बावडीजवळ एक जुना किल्ला आहे. रामलिंगाच्या देवळाची १५५७-१५८० मध्यें, विजापूरच्या पहिल्या अली आदिलशाहाच्या कारकीर्दींत संगित भाई नावाच्या सुभेदारानें मशीद केली. १७९० च्या रिपोर्टावरून अलमेल हें विजापूर सरकारचें तालुक्याचें ठाणें असल्याचें दिसून येतें. त्यावेळीं त्याचें उत्पन्न १५७०८० रुपये असे. [वेरिंग-मराठाज, २४२, मुं. गॅ.]

अलमोद्—हो जमीनदारी दुर्लगाबाद जिल्ह्यांत असून हिच्यांत २९ गांवें आहेत. हीं सर्व गांवें महादेव पहाडाच्या आसपास आहेत. महादेवमंदिराचा जमीनदार हा एक भोप्या आहे. यात्रेकरूंमवळून कर घेऊं नये म्हणून सरकार याला ३०० रुपये सालीना देत असतें, पण जमीनदारी निमित्त सरकार यांतून ४० रुपये सालाचे काटतें. (म. प्रां. गॅ. १८७०).

अलमोरा, जिल्हा.—(संयुक्त प्रांत) कुमाउन भागाचा ईशान्येकडील जिल्हा. २८° ५९' ते ३०° ४९' उ. अ. व ७९° २' ते ८१° ३१' पू. रे. क्षेत्रफळ ५४१९ चौरस मैल. उत्तरेस तिबेट; पूर्वेस काळी नदी व पलीकडे नेपाळ; दक्षिणेस नैनिताल जिल्हा; वायव्येस गढवाल जिल्हा. या जिल्ह्यांतील काहीं थोडा भाग खेरीज करून बाकी बहुतेक सर्व प्रदेश हिमालय पर्वतात आहे. या पर्वताच्या ओळी अगदीं निरनिराळ्या व स्पष्ट दिसतात; व त्या आग्नेयीकडून वायव्येकडे पसरल्या आहेत व मध्यभागीं नेहमीं हिमानें आच्छादणारीं शिखरें आहेत. पश्चिमेकडे त्रिशूळ पर्वत असून त्याची सरासरी उंची २२३०० ते २३४०० फूट आहे. या पर्वताचा काहीं भाग गढवाल जिल्ह्यात आहे. त्रिशूळ पर्वताच्या आग्नेयीस नंदादेवी शिखर २५६६१ फूट उंच आहे; व 'नंदाकोट' २२५३८ फूट आहे. याच्या पूर्वेस नेहेमीं हिमाच्छादित असणारे पांच चोळी डोंगर आहेत. त्यात दोन शिखरें, आहेत. त्यांची उंची अनुक्रमें २२६७३ आणि २१११४ फूट आहे. सरासरी १८००० फूट उंचीची एक पर्वताची ओळ तिबेट व हिंदुस्थान याच्यामध्यें असून तेथून उत्तरेकडे सिंधु व सतलज, व दक्षिणेकडे काली नदी या उगम पावल्या आहेत. या जिल्ह्यातील मुख्य नदी काली ही असून तिला येऊन मिळणाऱ्या नद्यात गौरीगंगा, धवलगंगा या हिमप्रवाहांपासून निघतात, सरयू आणि रामगंगा यांचा उगम हिमरेषेखालीं आहे व गोमती, लहुवती आणि लढिया या हिमालय पर्वताच्या बाहेरील ओळीतून उगम पावतात. या जिल्ह्यांत नदीकाठचा प्रदेश सोडून दिला तर ३००० फूट वर चढून गेल्यावर साधारणपणें सपाट प्रदेश मिळत नाहीं.

भूस्तरशास्त्रदृष्ट्या पाहिल्यास त्यात पुष्कळ प्रकारचे खडक आहेत. या जिल्ह्यात पुष्कळ प्रकारच्या वनस्पती सापडतात. येथें उष्ण, समशीतोष्ण व शीत प्रदेशातील वनस्पती पर्वताच्या निरनिराळ्या उंचीवर दृष्टीस पडतात. उन्हाळ्यात वनस्पती फुलल्या कीं तेथें अप्रतिम शोभा दिसते.

येथें रानटी जनावरें विपुल व नानाप्रकारचीं आहेत. हत्ती, वाघ, अस्वल, रानडुकरें, रानकुत्रे, हरणें वगैरे.

हिमालय पर्वताच्या बाहेरील ओळींवर पाऊस सुमारें ८० इंचपर्यंत पडतो. पण थोडें उत्तरेकडे गेलें कीं, पावसाचें प्रमाण कमी होतें. हिमरेषेजवळ किती बर्फ व पाऊस पडतो हें मोजून ठेवण्याची व्यवस्था नाहीं, पण जिल्ह्याच्या मध्यभागापेक्षा तेथें पाऊस व बर्फ जास्त पडतो यांत संशय नाहीं.

इतिहास.—महाभारतांत या पर्वतासमधील पुष्कळ ठिकाणांचें वर्णन आलें आहे. सातव्या शतकांत आलेल्या चिनी प्रवाशानें येथें ब्रह्मपुर गांवाचें राज्य असून तेथील लोक राकट व अशिक्षित आहेत असें वर्णन करून

आहे या राज्यासभोंवती हिमाच्छादित डोंगर असून त्यावर एका स्त्रीचा अंमल त्यावेळीं होता. पूर्वी येथें कत्यूरी नावाच्या घराण्यातील राजे राज्य करीत होते; त्यानंतर चंद राजानीं येथे राज्य केलें चंद राजापैकी पहिला राजा सोमचंद हा दहाव्या शतकात अलाहाबाद जवळील झूसी येथून आला व चंदराजानीं काली कुमाउन मध्यें चपावत येथें आपलें राज्य प्रस्थापित केलें होतें. इ. स. १५६३ साली आसपासचीं सर्व राज्यें या चंद राजाचीं माडलिक झाल्यावर राजा कल्याण चंद यानें आपली राजधानी अलमोरा येथें नेली. याचा मुलगा रुद्रचंद हा अकबराचा समकालीन असून तो इ स. १५८७ साली अकबर बादशहास मुजरा करण्याकरिता लाहोर येथें आला होता. मुसुलमान राजाना डोंगरी राज्याचें स्वामित्व पूर्णपणें कधीच मिळालें नाहीं परंतु इ स १७४४ सालीं अली अहमदखान रोहिला यानें कुमाउनवर स्वारी करुन अलमोरा देखील काबीज केलें होतें, ते तेथें जरी फार थोडा वेळ राहिले तरी त्यानीं तेवढ्यात तेथील देवळाची फार नासाडी केली. लवकरच त्या रोहिल्यानें पाठविलेले सरदार तेथील हवेला केटाळले व तीन लाख रुपयाची लाच घेऊन त्यानीं आपला पाय तेथून मागे घेतला. परंतु अली महमदखानास ही गोष्ट न आवडून त्यानें इ. स. १७४५ च्या आरंभीं पुन्हा कुमाउनवर स्वारी केली. परंतु बारखेडी अवळील पर्वताच्या खिंडींत त्याचा पराभव झाला नंतर मुसुलमानानीं पुन्हा त्या प्रातावर कधीं स्वारी केली नाहीं. दिल्ली येथील पातशहानीं कुमाउनवर प्रत्यक्ष अशी सत्ता कधीं सागितली नाहीं. तथापि या भागातील राजास पर्वताच्या पायथ्यावरील राज्य कायम राखण्याकरिता बादशहाचें नामधारी माडलिकत्व कबूल करावें लागत असे. पुढें कुमाउनमध्यें आपसातच तंटे झाले व लवकरच त्या राजानीं आपला पर्वताच्या पायथ्याखालील प्रदेश गमावला व भावर नांवाचा प्रदेश फक्त त्याच्या ताब्यात राहिला.

अठराव्या शतकांत हलीं जेथें नेपाळचें राज्य आहे त्या भागावर पृथ्वीनारायण हा गुरखा जातीचा राजा राज्य करीत होता. त्याच्या वंशजानीं इ. स. १७९० मध्यें कुमाउनवर स्वारी केली तेव्हां चंद राजा पळून गेला व गुरख्यानीं त्या भागावर चोवीस वर्षे राज्य केलें. त्या अवधींत त्यानीं फार जुलुम केला. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं गुरखे सपाट प्रदेशावरील ब्रिटिश मुलखात फार त्रास देऊं लागले चंद राजाचा कायदेशीर वारस कोणी शिल्लक नसल्यामुळें ब्रिटिशानीं हा भाग गुरख्यापासून जिंकून घेण्याचें ठरविलें या बेतास पूर्वीच्या चंद राजाचा प्रधान हरकदेव याची पूर्ण संमति होती. इ स. १८१५ सालीं अलमोरा ब्रिटिशानीं काबीज केलें. व त्यानंतर झालेल्या तहात कुमाउन आणि गढवाल ब्रिटिशाकडे आले

बागेश्वर येथें कत्यूरी राजाच्या वेळचा एक शिलालेख आहे. पण त्यावर तारीख नाहीं. चंपावत येथें चंद राजाच्या वेळच्या पुष्कळ वस्तु आहेत. येथें निरनिराळ्या देवळात पुष्कळ ताम्रपट अद्याप जतन करून टेविले आहेत. या जिल्ह्यात २ गावें व ४९२८ खेडीं आहेत लोकसंख्या दिवसें दिवस वाढत आहे. १९२१ सालीं लोकसंख्या ५३०३३८ होती हिवाळ्यात लोक खालीं उतरतात परंतु उन्हाळ्यांत ते पुन्हा वर राहण्यास जातात या जिल्ह्यांत चंपावत व अलमोरा अशा दोन तहशिली आहेत. येथें हिंदू जवळ जवळ शेकडा ९९ आहेत कुमाउनी पहाडी भाषा येथें बोलतात.

जमीनलागवड उंचीवर व जागेच्या स्थितीवर अवलंबून आहे सुमारें ३००० ते ५००० फूट उंचीपर्यंतच्या प्रदेशावर काहीं म्हणण्यासारखी लागवड होते. इ. स १९०३-४ सालीं एकंदर ४६३ चौरस मैलात लागवड झाली होती मुख्य पिकें भात, गहू, मका वगैरे. चहाची लागवड सुमारें २१०० एकर जमिनींत होते. गुराची अवलाद लहानच आहे घोडे चागल्या जातीचे नसतात मेंढरें, बकरीं सर्व भागात पाळतात व त्याच्यापासून लोकर व लोंकर मिळते. येथील गुराची अवलाद सुधारण्याचे प्रयत्न केले. परंतु त्यांत विशेषसें यश आलें नाहीं

येथें ताब्याच्या खाणी आहेत. त्या खाणींचा उपयोग करून घेण्याची परवानगी एका पाश्चात्य कंपनीस देण्यांत आली आहे. ग्रफाइट, लोखंड, शिसें, व गंधक यांच्या खाणी या जिल्ह्यात आहेत. या जिल्ह्याचा व्यापार एकसारखा वाढत आहे या जिल्ह्यांत रेल्वे नाहीं दुष्काळ येथें फारसा जाणवत नाहीं. जिल्ह्याचा अधिकारी डेप्युटी कमिशनर असतो व नॉन रेग्युलेशन खालीं या जिल्ह्याचा कारभार चालतो. गुरख्याकडून ज्यावेळीं हा जिल्हा ब्रिटिशाकडे आला त्यावेळीं जमीन महसूल७०,०००रुपये होता. इ स.१९०३-४ सालीं तोच वसूल २.३ लाख रुपये होता. अलमोरा येथेंच फक्त म्युनसिपालिटी आहे.

तहशील—संयुक्त प्रांत, अलमोरा जिल्हा. हींत परगणे जोहार, दानपुर, चौगरखा, गंगोली, बारामंडल, फलदाकोट आणि पाली पच्चौन हे आहेत.

ही २९° २६' ते ३०° ४९' उत्तर अक्षांश व ७९° २ ते ८०° ३०' पूर्व रेखांश यामध्यें आहे क्षेत्रफळ ३१६४ चौरस मैल लोकसंख्या -( सन १९०१ ) ३४३८७०. या तहशिलींत दोन गांवें व ३४६६ खेडीं आहेत सन १९०३-४ सालीं जमीनमहसूल रुपये १६५००० व इतर कर १२००० रुपये होता.

ही तहशील हिमालय पर्वतात वसलेली असून हिमाच्छादित शिखरापलीकडे तिबेटच्या सरहद्दीपर्यंत जाऊन भिडली आहे सन १९०३-४ सालीं लागवडीखालील क्षेत्र२९४ चौ. मैल होतें ( इं गॅ ५ )

गाव—संयुक्त प्रात हें अलमोरा जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण. उ अ २९° ३६'व पू. रे ७९° ४०' लोकसंख्या सन १९०१ सालीं ८५९६ होती. रोहिलखंड-कुमाउन

या रेल्वेच्या काथगोदम स्टेशनापासून अलमोरा गाव ३७ मैलावर आहे. पाऊस सरासरी ४२ इंच पडतो.

सोळाव्या शतकापासून अलमोरा ही चंद राजाची राजधानी होती इ स १७४४ साली रोहिले लोकांनी या प्रांतावर स्वारी करून अलमोरा सर केलें होतें; परंतु ते लवकरच परत गेले अलमोराजवळच सितोळी येथें ब्रिटिशांचे व गुरख्यांची लढाई झाली व इ स. १८१५ मध्यें हा जिल्हा इंग्लिशांकडे आला. येथें म्युनिसिपालिटी इ स. १८६४ पासून आहे येथें गुरखा फौज असते.येथें व्यापार बराच चालतो. येथून बाहेर जाणारा माल आणि आयात माल धान्य, कापड, साखर आणि मीठ हा होय येथें बागाहि पुष्कळ आहेत. जिल्ह्याचे अधिकारी येथें राहतात गावात निरनिराळ्या शिक्षणसंस्था व ५-६ इस्पितळें आहेत. (इं गॅ. ५-१९०८ अर्नोल्डचें इंडियन गाईड १९२०)

अलयपूर—(बंगाल इलाखा.) खुलना जिल्ह्यातील अथारबांकी व भैरव या दोन नद्यांच्या संगमावर वसलेलें एक खेडें उ. अ. २२° ५०' व पू रे. ८९°३९' लोकसंख्या सुमारें (१९०१साली) बारार्शे

येथें स्थानिक व्यापार थोडा असून कुंभारकाम मोठ्या प्रमाणावर होतें (इं गॅ. ५-१९०८).

अलवये—(मद्रास इलाखा) त्रावणकोर संस्थान हें अलेनगड तालुक्याचें मुख्य ठिकाण असून कोचीन-शोरणूर रेल्वेचें स्टेशन आहे. उत्तर. अ. १०° ७' व ७६° २२' पूर्व रेखांश यांवर हा गाव अलवये (पेरियर) नदी काठावर असून याच नदीकाठीं शंकराचार्यांचा जन्म झाला.

१९११ साली येथील ३८६९ वस्तीपैकीं १९९३ हिंदु, ७९४ मुसलमान व १०८० ख्रिश्चन होते. पूर्वी पोर्तुगीज लोक येथें विहाराकरता येत असत. येथें नदीच्या पात्रात शिवाचें देऊळ असून शिवरात्रीस मोठी जत्रा भरते येथें उन्हाळ्यात यूरोपियन व हिंदी श्रीमंत लोक येऊन राहतात गावात ब्राह्मणाकरिता छत्र आहे.त्रावणकोरच्या महाराजाचा व रेसिडेंटचा या ठिकाणीं बंगला आहे विद्यार्थी पानें, नारळ, भात हे मुख्य जिन्नस येथें होतात. एक भांड्याचा कारखानाहि आहे (इं गॅ. ५-१९०८; अर्नोल्डची डिरेक्टरी, मेन्सस रिपोर्टस् १९११).

अलवा—(मुंबई) रेवाकांठामधील छोटें संस्थान. साखेड. मेहवान्या चोहाण संघातील ही ११ गांवांची जहागीर असून हिच्या उत्तरेला व दक्षिणेला विरपूर आणि पातलावडी,पूर्वेला गायकवाडी गावें आणि पातलावडी आणि पश्चिमेस देवलिया आहे. क्षेत्रफळ पाच चौरस मैल व उत्पन्न सुमारें ५५०० रुपये आहे (इ स १८८०) लोकवस्तीपैकीं बहुतेक भिल्ल आहेत, मुख्य पीक ज्वारी, तांदूळ व तीळ यांचें आहे. १८७८ त येथील ठाकूरच्या मृत्युमुळें अलवा प्रत्यक्षपणें पोलिटिकल एजंटच्या ताब्यात आलें (इंडियन गॅ ५ १९०८).

अलवार संस्थान—अलवार हें राजपुतान्याच्या पूर्व भागातील एक देशी संस्था असून याचें क्षेत्रफळ सुमारें ३१४१ चौरस मैल आहे. हें उत्तर अक्षांश २७° ३' ते २८°१३' व पूर्व रेखांश ७६°७' ते ७७°१३' याच्या दरम्यान आहे

सीमा—याच्या उत्तरेस पंजाबमधील गुरगाव जिल्हा,जयपूरपैकीं कोटकासीम व नाभापैकीं बावल हे आहेत वायव्येस पतियाळा संस्थानातील नरनाळ हें आहे पश्चिमेस व दक्षिणेस जयपूर संस्थान आहे याचा आकार बरोबर एखाद्या चतुष्कोनाकृतीसारखा असून उत्तर व दक्षिण याची सर्वांत मोठी लांबी सुमारें ८० मैल आहे व दक्षिणोत्तर रुंदी जास्तींत जास्त ६० मैल आहे या संस्थानात विशेष नजरेस येणारी गोष्ट म्हणजे येथील खडकाळ, चढणीचे व बहुतेक एकमेकास समांतर असलेले डोंगर होत तरी पण ह्या संस्थानचा उत्तरेकडील व तसाच पूर्वेचा भाग मोकळा व सपाट आहे.यातील मुख्य डोंगर अरवली पर्वताचा एक फाटा हा असून तो या संस्थानच्या बरोबर मधून दक्षिणोत्तर अलवार शहराजवळून जयपूर सीमेला जाऊन भिडला आहे. त्याची लांबी सुमारें ५६ मैल आहे पश्चिमेकडे तर या डोंगरामुळें एक स्वाभाविक व सामान्यत अगम्य असा तटच झाला आहे या संस्थानामधील मुख्य नदी म्हणजे साबी. दुसरी मोठी नदी म्हटली म्हणजे बान्हा किंवा लासवारी अलवार व भरतपूर या दोन संस्थानांमध्यें या नदीच्या पाण्याबद्दल नेहमीं तंटे उपस्थित होतात ह्या नदीच्या पाण्यावर दोन्ही संस्थानचा सारखी मालकी आहे थोड्या वर्षांपूर्वी अलवार संस्थानच्या फायद्याचा असा ह्या प्रकरणाचा निकाल लागला आहे

दिल्लीच्या आसमंतात व अलवार संस्थानात जो स्फटिकासारखा दगड (क्वार्टझ) सापडतो त्यास अलवारवरूनच नाव पडलें आहे यांचा रंग करडा असून यावर सुंदर रवे दिसतात. याखेरीज शिस्ट व स्लेट जातीचा दगडहि येथें सापडतो व तो खालच्या थरांत असतो. दरीबा वगैरे कांहीं भागात तांबें सापडतें, पण गाझी जिल्ह्यात शिसेंहि आढळतें

हरीण व सपाट प्रदेशात सापडणाऱ्या लहान शिकारी प्राण्याशिवाय डोंगराळ प्रदेशात वाघ, तरस, सांबर व बहुतेक सर्व ठिकाणीं चित्ता आढळून येतो. रानडुकर व लांडगा यांचीहि भेट कधीं कधीं होते

बहुतेक ठिकाणीं हवा कोरडी व निरोगी आहे उत्तरेकडील भागातील प्रदेश उघडा व जमीन भुसभुशीत असल्यामुळे हवा उन्हाळ्यात डोंगराळ प्रदेशापेक्षा जास्त थंड असते.

एकंदर संस्थानात पावसाचें सरासरी मान २२ इंच असते व त्यातील सुमारें ⅘ पाऊस जुलै ऑगस्ट व सप्टेंबर महिन्यात पडतो पश्चिम प्रदेशापेक्षां पूर्वेकडील प्रदेशात पाऊस जास्त असतो.

रजपुतात ( कच्छवाह ) म्हणून एक जात आहे. जयपूरचे महाराज याच जातीचे आहेत. त्यातून निघालेल्या नरूक या पोटजातीच्या लालावत शाखेपैकीं हें अलवारचें घराणें आहे. चवदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत अंबर येथें उदयकरण नावाचा राजा राज्य करीत होता त्याचा वडील मुलगा जो बारसिंग तो अलवार घराण्याचा मूळ पुरुष मानला जातो बारसिंग आपल्या बापाशीं भांडून राज्यावरचा हक्क सोडून जयपूर संस्थानात नोकरीस राहिला. तेथें त्यानें व त्याच्या वंशजांनीं सुमारें ३०० वर्षे नोकरी केली कल्याणसिंगला कामगिरीबद्दल जयसिंगाकडून माचेरीची जहागीर मिळाली. चार पाच पिढ्यानंतर प्रतापसिंह यानें अलवार संस्थान मिळविलें वयाच्या सतराव्या वर्षी जयपूर संस्थानात सैन्यांत नोकरी धरून उनियारा येथील उपद्वी नरूक लोकांना ताब्यात आणून त्यानें मराठ्यांनीं रणथंबोरच्या किल्ल्याला वेढा दिला असता तरवार गाजवून नाव लौकिक मिळविला; परंतु लवकरच त्याला लोकांच्या द्वेषामुळें जयपूर सोडून जावें लागलें मग तो सुरजमल जाट व त्याच्या मरणानंतर त्याचा मुलगा जव्हारसिंग योच्या नोकरीस भरतपूर संस्थानात राहिला. जव्हारसिंगाचा जयपूरच्या राज्यातून ससैन्य पुष्कराला जाण्याचा बेत त्याला पसंत पडला नाहीं व तो परत आपल्या जुन्या मालकाकडे गेला. अशी वदंता आहे कीं, प्रतापसिंहामुळें जव्हारसिंगाच्या सैन्याची परत येतांना फार खराबी झाली. ह्या वेळेस त्यानें राजगड किल्ला बांधून पुढें येणाऱ्या बालराजाच्या वेळीं पुष्कळ प्रांत मिळविला. दुसऱ्या शाहअलमला मदत केल्याबद्दल त्याला माचेरीची सनद मिळाली. पुढें अलवारच्या सैन्याला पगार मिळत नसल्यामुळें व एकंदर जाटाच्या झालेल्या नुकसानीमुळें त्याचा धीर खचून तो किल्ला जाटानें प्रतापसिंहाच्या ताब्यात दिला तेव्हांपासून त्याचे नरूका जातीचे लोक त्याला राजा मानूं लागले. त्याच्या मागून बखतावरसिंग गादीवर आला. त्यानें आपला मुलूख आणखी वाढविला. मराठ्यांशीं झालेल्या लढायांत तो इंग्रजांच्या बाजूनें लासवारीच्या लढाईंत हजर होता बखतावरच्या मरणानंतर १८१५त गादीबद्दल तंटा सुरू झाला. बखतावरच्या मनात आपला पुतण्या बनिसिंग यास दत्तक घेऊन त्याला गादीचा मालक करावा असें होतें परंतु दत्तविधान होण्यापूर्वीच तो वारला. दुसरा वारस राखीपुत्र बलवंतसिंह हा होता इंग्रजांनीं अशी युक्ती काढली की बनिसिंगानें राजाही पदवी धारण करावी पण सर्व अधिकार बलवंतसिंगाच्या हातात असावा पण ही व्यवस्था कधींच अमलात आली नाहीं. इ. स १८२४ मध्यें बनिसिंगानें अधिकारसूत्रें आपल्या हातांत घेतली व आपल्या भावाला तुरुंगात टाकलें, व त्याचा साह्यकर्ता अहमदबक्ष याचा जीव घेण्याचा प्रयत्न केला. इंग्रजांनीं मध्यें पडून बनिसिंगाला बलवंतसिंगाला अर्धा मुलूख व अर्धी दौलत वंशपरंपरा देण्यास लावलें. — बनीसिंगाकडे परत आलें. यानें आपल्या राज्यात पुष्कळ सुधारणा घडवून आणली. येथेंदशाही मोडून शांतता स्थापन केली जमिनीचा वसूल पैशात घेण्याचें सुरु केलें. इ स. १८५७ च्या बंडात त्यानें इंग्लिशांना चांगली मदत करून आपली राजनिष्ठा चांगली प्रत्ययास आणली बनिसिंगाच्या मागून त्याचा मुलगा शिवदानसिंग लहान असल्यामुळें मुसुलमानी प्रधानाच्या तंत्रानें वागूं लागला तेव्हा रजपुतांनीं १८५८ मध्यें बंड केलें. तेव्हा सुव्यवस्था ठेवून इ. स. १८६३ मध्यें त्याला गादीवर बसविलें.

परंतु त्याच्या कित्येक कार्यांनीं राज्यात घडाळी सुरू झाली तेव्हा इंग्लिशाना पुन्हा कारभारांत हात घालावा लागला. शिवदानसिंगाच्या हातून कारभार काढून घेऊन एक व्यवस्थापक मंडळ नेमण्यांत आलें. शिवदानसिंग इ स १८७४ मध्यें औरस किंवा दत्तक वारस मागें न ठेवता मरण पावला. तेव्हां सर्व राज्य इंग्लिशाच्या हातात गेलें पण त्यांनीं राजघराण्याच्या दुसऱ्या शाखेंतून गादीला मालक निवडण्याचा अधिकार नरूक लोकांना दिला व त्या प्रमाणें त्यांनीं ठाण्याच्या ठाकूर मंगलसिंगला पसंत केलें व सरकारनें त्याला अलवारचा राजा मान्य केलें. हा इ. स. १८९२ मध्यें मरण पावला त्याच्या मागून त्याचा एकुलता एक मुलगा जयसिंग यास इ. स. १९०३ मध्यें तो वयात आल्यावर अधिकार देण्यात आला. अलवारच्या राजाना १५ तोफांच्या सलामीचा मान आहे

या संस्थानात एकंदर खेडीं व शहरें मिळून १७६२ आहेत व लोकसंख्या इ स १९२१ मध्यें ७,०१,१५४ होती.

संस्थानचे १२ तहशिली व १ जाहगीर मिळून तेरा भाग आहेत व त्यात ७ मोठीं शहरें असून तेथें म्युनिसिपालिट्या आहेत. त्यात मुख्य अलवार व राजगड या होत. इ. स. १९०१ मध्यें हिंदूंची संख्या शेकडा ७४ पेक्षा जास्त म्हणजे ६,१८३५८ असून त्यातील बहुतेक वैष्णव पंथाचे होते. मुसुलमानांची संख्या २०४९४७ म्हणजे शेकडा २४ होती. बहुतेक लोक सुनीपंथाचे होते. जैनांची संख्या ४९१९होती १९११ साली दर दहा हजारी ७४३० हिंदु २५१५ मुसलमान व ५१ जैन होते येथील मुख्य भाषा हिंदी व मेवाटी आहेत

मेउलोकांची संख्या जास्त म्हणजे शेकडा १३ अथवा एकंदर ११३००० आहे. हे मुसुलमानी धर्माचे असून त्याचा मुख्य धंदा शेतकी आहे. ह्यांच्या बायकांची ह्याना शेतकीच्या कामात फार मदत होते. त्याच्यात पडदा मानीत नाहींत. दुसरे लोक म्हणजे चामार हे शेतकी, कातडीं कमावणें, व दुसरी मोलमजुरीचीं कामें करणारे आहेत. ब्राह्मण लोक गौड सारस्वत किंवा कनोज वर्गातील आहेत मिनाजातीचे दोन वर्ग आहेत एक जमीनदार व दुसरा चौकीदार. या दुसऱ्या वर्गांतील लोक पूर्वी लुटारू असून

आतां ते चांगल्या मार्गाला लागले आहेत, तरी त्यांचे पूर्वीचे गुण कधीं कधीं उचल खातातच. तसेच जाट, राजपुत, गुजर व महाजन वस्ती पुष्कळ आहे.

जमीन तीन प्रकारची आहे (१) चिकनाट, (२) मटियार व(३) भुर. या ठिकाणीं मुख्यत्वेंकरून बाजरी, जवार, हरबरा, कापूस, गहूं, मका, तीळ कमीजास्त प्रमाणात होतो. त्याचप्रमाणें कांहीं थोड्या जागीं तमाखु, ऊंस, नीळ, भात व अफू होते. अलवारची जनावरें विशेष चांगलीं नसतात. मेंढ्या व बकरीं यांची निपज पुष्कळ होते.

इ. स. १९०३–४ सालीं एकंदर २१२ चौरस मैल जमीन लागवडीस आली. तींतील शेकडा १५ मैलच पाटाच्या पाण्यावर केली होती. एकंदर विहिरींची संख्या खालसा मुलखात १५००० असून १७१ बंधारे आहेत. पिकें मोटेच्या पाण्यावर करतात.

सुमारें ३६७ चौरस मैल जमीन जंगल आहे व ती संयुक्तप्रांत सरकारनें नेमलेल्या एका अमलदाराच्या व्यवस्थेखालीं आहे. झाडाच्या उत्पत्तीच्या दृष्टीनें ह्याचे चार भाग केलेले आहेत. डोंगर माथा व उतरणी हा एक भाग होय. ह्यांत सालर व बांबूची लहान जात विशेष आढळून येते तसेंच उम, धामण, गोल वगैरे झाडेंहि दृष्टीस पडतात. दुसरा भाग म्हणजे डोंगरपायथ्यापर्यंत. तिसरा भाग सपाट प्रदेश; ह्यात धाक व खैर हीं झाडें आढळतात. व चवथ्या भागांत जामुन, करमाल, बेहडा वगैरे रुंद पानाची व छाया देणारी झाडें आहेत. येथें बांबूचें उत्पन्न विशेष आहे. संस्थानाच्या उपयोगाकरिता सुमारें २०००० बांबू लागतात बाकीच्या पासून दरवर्षी जवळ जवळ रु. २००० मिळकत होते. शिवाय गवताचें उत्पन्नहि दांडगें आहे संस्थानची भरती झाली म्हणजे रयतेचीं गुरें चरण्याला मोकळीक असते. येथील डोंगरामध्यें तांबें, लोखंड व शिसें पुष्कळ सांपडण्याजोगें आहे पण खाणी कोणी चालवीत नाहींत. तसाच उत्तम संगमरवरी दगड येथें मिळतो व तो मूर्ति करण्यास लागणाऱ्या, हिंदुस्थानात सापडणाऱ्या दगडापेक्षा कोणत्याहि तऱ्हेनें कमी दर्जाचा नसतो.

येथें तयार होणाऱ्या मालात विणलेल्या कापडास प्राधान्य आहे. शिवाय येथें कागद तयार होतो. जमिनींतून काढलेल्या क्षारापासून हलक्या दर्जाची कांच होते, तिचा उपयोग बांगड्या व कुप्या करण्याकडे होतो. दगडाचें कोरींव काम करणारे लोकहि आहेत. ते दगडाच्या मूर्ती, पेले, जाळीचे पडदे वगैरे करतात. येथें एक निळीचा कारखाना आहे.

येथून बाहेर जाणारा माल म्हटला म्हणजे कापूस, गळिताचीं धान्यें, बाजरी, तूप, गावठी कापड, डोक्याचे रुमाल व जोडे हे होत, व बाहेरून आंत येणारा माल साखर, मीठ, गहूं, चणा, लोखंड व स्वयंपाकाची भांडीं हे आहेत. मालाची सर्व नेआण रजपुताना–माळवा रेल्वेनें होते.

ह्या संस्थानांत २८ टपाल ऑफिसें आहेत. रेल्वेस्टेशनच्या तार ऑफीसाशिवाय राजधानीच्या शहरीं ब्रिटिश तार ऑफीस आहे.

ह्या भागात दुष्काळ फारसे पडत नाहींत. इ. स. १८६० मध्यें दुष्काळ पडला होता, त्यावेळेस धारण ८ शेरांची होती. त्यानंतर इ. स. १८६८–६९ हें वर्ष दुष्काळाचेंच होतें त्या वर्षी चाऱ्याच्या टंचाईमुळें पुष्कळ गुरें मेलीं व अशा तऱ्हेनें मनुष्यांच्यापेक्षा गुरानाच तो दुष्काळ जास्त जाचला. त्यानंतर इ. स. १८७७ मध्यें अगदींच पाऊस न पडल्यामुळें दुष्काळ पडला. त्यावेळेस दुष्काळपीडित लोकांच्याकरता संस्थाननें कामें सुरू केलीं होतीं. तसेंच शेतकऱ्याना आउतांचीं जनावरें व विहिरींची डागडुजी करण्याकरितां ३ लक्ष रुपये देण्यात आले.

इ. स. १९०३ सालीं राज्यसूत्रें महाराजाच्या हातात गेल्यापासून, तीन मंत्री व इतर खात्यातील मुख्य माणसाच्या सल्ल्यानें राज्यकारभार चालत आहे. जमीन वसुलाकरिता राज्याचे दोन भाग केले आहेत व त्यावर एकेक डेप्युटि कलेक्टर नेमला आहे राज्यांत एकंदर १८ तहशिली असून प्रत्येकीवर एक एक तहशीलदार नेमला आहे.

येथील न्यायकचेरींत खालसा मुलुखात चालणारा कायदाच अनुसरला जातो. तहशील, फौजदारी, प्रांत व सेशन्स कचेरी अशा एकावर एक वरचढ कचेऱ्या आहेत.

संस्थानचें उत्पन्न जवळजवळ ३२ लाख आहे व खर्चहि तितकाच आहे उत्पन्नाच्या मुख्य बाबी जमीनमहसूल, ब्रिटिश तिजोरींत ठेवलेल्या ठेवींचें व्याज, मीठ काढण्यास दिलेल्या परवान्यापासून होणारें व जंगलचें उत्पन्न ह्या आहेत. खर्चाच्या बाबीः—सैन्यखर्च ८ लाख. सरकारी नोकराचे पगार ४.३;; सरकारी हत्ती घोडे वगैरेकडे २ ८ रु.

पैशाच्या दृष्टीनें संस्थानची भरभराट असून ब्रिटिश प्रामिसरी नोटात ४५ लाख रुपये आहेत. जमीनधाऱ्याच्या पद्धती चार प्रकारच्या आहेत त्या अशाः—(१)खालसा म्हणजे जमीनदार परस्पर सरकारला सारा देतो. (२)इस्तिम्रारी, ह्या सर्व रजपुताच्या ताब्यात असून त्याचा सारा एकदाच ठरविलेला आहे. (३)जहागीर, ह्या जमिनी उपभोगण्याबद्दल पागा ठेवून सरकारच्या सैन्यात जावें लागतें ह्याचाच एक भेद बारदारी हा आहे. (४) मुआफी आपल्याकडील वतनाप्रमाणें आहेत. जमिनीवर जोपर्यंत जमीनदार शेतसारा देतो तोंपर्यंत त्याची मालकी समजली जाते. व तशा प्रकारचे कायदे तिकडे आहेत. पंजाबच्या दक्षिण भागातील व येथील पद्धत एकाच प्रकारची आहे. इ. स. १८३८ पर्यंत सारा जिनसाच्या रूपानें देता येत असे. सध्या पैसेच द्यावे लागतात.

संस्थानचे ६०० घोडेस्वार व १००० पायदळ एवढें सैन्य असून तात्पुरतें तयार होणारें सैन्य ६८ घोडेस्वार,५५१पायदळ व११३ गोलंदाज आहेत तोफांची संख्या २७२ आहे. इ. स. १९००–०१ मध्यें चीन देशाशीं झालेल्या युद्धांत येथील पायदळानें चांगली कामगिरी केली.

पोलीसचा भरणा ९४२ असून त्याच्या प्रीत्यर्थ खर्च १.१ लक्ष होतो. राजधानीच्या ठिकाणीं एक तुरुंग आहे.

राजपुतान्यातील संस्थानामध्यें अलवारचा नंबर १२वा लागतो. लिहितावाचता येणाऱ्या लोकांचें प्रमाण शेंकडा २.७ आहे. येथील शाळांची संख्या१०३ असून त्यांत ५५०७ मुलें व मुली इ. स १९०४ सालीं शिकत होत्या शिक्षणाप्रीत्यर्थ ६५००० रु. खर्च होतात ह्या संस्थानांत १२ इस्पितळें आहेत. इ स १८७० च्या सुमारास देवी काढण्याचा उपक्रम करण्यात आला व बहुतेक लोक आपखुषीनें देवी टोंचून घेतात ( इं गॅ. ऑफ इंडिया पु ५ )

श ह र –अलवार संस्थानची राजधानी. दिल्लीच्या नैर्ऋत्येस ९८ मैलावर राजपुताना–माळवा रेल्वेचें हें स्टेशन आहे २७° ३४' उत्तर अक्षांश व७६° ३६' पूर्व रेखांश एक्कयाखेरीज गावांत जाण्यास कोणतेंच वाहन नाहीं पण स्टेटकौन्सिलच्या सेक्रेटरीस लिहिलें असता संस्थानी वाहनें व इतर सर्व सोयी मिळतात यांचें पूर्वीचें नांव अलपूर ( 'मजबुत शहर ') असें होतें असें कोणी म्हणतात. कोणी अरबलपुर किंवा अरवली शहर ( अरवली पर्वतापासून निघालेलें नांव ) हें नांव असावें असें म्हणतात. जनरल कनिंगह्याम असें म्हणतो कीं ' सालवा ' जातीच्या नांवापासून सालवापुरा–सालवार–हलवार व नंतर अलवार असें नांव पडलें असावें. लोकसंख्या ( १९२१ सालीं ) ४४७६० होती.

प्रेक्षणीय इमारती—एकोणीसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत महाराव राजा बाख्तिसिंग यानें बांधलेला राजवाडा व महाराव राजा बखतावर सिंग यांची छत्री या होत. तरंग सुलतानच्या स्मरणार्थ इ. स. १३९२ सालीं बांधलेलें जुनें थडगें असून येथील काहीं जुन्या मशीदीवर शिलालेख आहेत. रेल्वे स्टेशनजवळ फतेजंग याचें थडगें आहे. परंतु इ. स. १५४७ मधील नागरी लिपींत लिहिलेल्या त्यावरील शिलालेखावरून ही इमारत पूर्वी हिंदूची असावी हें स्पष्ट होतें.

येथें म्युनिसिपालिटी इ. स. १८७१–८२ पासून आहे तिचें सालीना उत्पन्न ६०००० रुपये व खर्च ५३००० रुपये आहे. शहराच्या नैर्ऋत्येस सुमारें ६ मैलावर सिलिसेर नांवाचा तलाव इ स. १८४४ मध्यें महाराव राजा बाख्तिसिंग यानें बांधलेला आहे. यांतील पाणी दोन कालवे खणून शहरांत आणलें असून त्याचा उपयोग सरकारी व खाजगी बागांना पाणी पुरविण्याकडे होतो. गांवांत लेडी डफरिन हास्पिटल, अलवार हायस्कूल व मिशनरी संस्था आहेत. कापड विणणें व पगड्या रंगविणें हे दोन मुख्य धंदे दिसतात. मिठापासून कांच तयार करून त्याच्या बांगड्या व बाटल्या तयार करण्यांत येतात. दगडी नक्षीकामहि येथें होतें. निर्गत माल म्हणजे सूत, तेलाचें बीं पगड्या व जोडे; व आयात मालांत साखर, तांदूळ, मीठ, धाली, लोखंड वगैरे जिन्नस येतात. अलवार स्टेट वर्कशाप व एक बर्फाची फॅक्टरी असे दोन कारखाने येथें आहेत. ( इं. गॅ ५–१९०८; अर्नोल्ड डिरेक्टरी )

**अलसानी पेद्दना.**—हा तेलगू कवि नंदवडीक नियोगी ब्राह्मण होता. याच्या बापाचें नांव चोकन्ना. याचा जन्म बेलारी प्रांतांतील दुपाड तालुक्यांतील दोरनाला नामक खेड्यामध्यें झाला यानें लहानपणीं संस्कृत आणि तेलगू भाषेचा अभ्यास करून त्या दोन्हीं भाषांचें उत्कृष्ट ज्ञान संपादन केलें, आणि लवकरच या दोन्ही भाषांत तो काव्यें करूं लागला पुढें थोडक्याच काळांत हा कृष्णदेवरायलु याचा बाप जो नरसिंह रायलु त्याच्या दरबारामध्यें कवि या नात्यानें राहिला नरसिंह रायलु याच्या मरणानंतर कृष्णदेव रायलु हा गादीवर बसला तेव्हां त्यानें ह्या कवीस आपल्या दरबारांतील " अष्ट दिग्गजा "पैकीं एक नेमिलें. पेद्दना याचें तेलगू काव्य त्यांतील माधुर्यामुळें फार लोकप्रिय झालें.

" स्वारोचिषमनुचरित्र " हें काव्य त्यानें मोठ्या श्रमानें रचिलें. या काव्याच्या प्रस्तावनेंत कृष्णदेवरायानें मुसलमानांवर जो जय मिळविला, त्यासंबंधीं रायाच्या पराक्रमाचें वर्णन आहे मनुचरित्राखेरीज पेद्दनाचा रामस्त व राजम् नामक रामाच्या स्तुतीनें भरलेला एक ग्रंथ आहे, असें मि. कावेल्ली व्यंकट रामस्वामी यांनीं आपल्या दक्षिणेंतील कविचरित्रामध्यें म्हटलें आहे. परंतु त्या संबंधी दुसरा कोठेंहि उल्लेख आढळत नाहीं सदर कावेल्ली व्यंकटरामस्वामी " अद्वैतसिद्धांतम् " नांवाचा तत्वज्ञानविषयक ग्रंथहि पेद्दनानेंच लिहिला असें म्हणतात. पेद्दनानें हरिकथासार काव्य लिहिल्याबद्दलहि ते लिहितात व त्यासंबंधीं पेद्दनाचा छंद शास्त्रावरील जो " रंगरा छंद " ग्रंथ आहे, त्यांत उल्लेख सापडतो. याप्रमाणें एकंदर पेद्दनाचे ग्रंथ आहेत. पेद्दनाचीं काव्यें अति मधुर असल्यामुळें तीं सर्वांस आवडतात. एके दिवशीं पेद्दनानें आपला आश्रयदाता जो महापराक्रमी कृष्णदेव रायलु याच्या विनंतीवरून एक श्लोक म्हणून दाखविला त्यामध्यें त्यानें आपलें संस्कृत आणि तेलगू भाषेचें अप्रतिम ज्ञान दाखवून दरबारांतील सर्व कविमंडळीस थक्क करून सोडिलें संस्कृतांतील काव्याच्या भाषांतराखेरीज त्या काल, पावेतों कोणी स्वतंत्र असें काव्य लिहिलें नव्हतें व त्यावेळेस पद्दना यानेंच स्वतंत्र असें काव्य " स्वारोचिषमनुचरित्र " हें लिहिलें. त्यामुळें त्याला सर्व विद्वानांनीं व स्वतः कृष्णदेव रायलूनें आंध्रकवितापितामहलु हीं पदवी दिली. मनुचरित्राचें रंगाधिरोहण झाल्यानंतर कवीस पालखींत बसवून गांवांत मिरविलें, त्यावेळीं प्रथमतः पालखी उचलताना राजानें स्वतः खांदा दिला असें म्हणतात. एकदा सभेंत यानें राजाच्या सांगण्यावरून बत्तीस चरणाची कविता कशी असावी या विषयावर एक उत्पलमालिका एकदम रचिली. या उत्पलमालिकेंत अशी खुबी आहे कीं तिच्या बत्तीस चरणांपैकीं प्रत्येक चरणाचें प्रथमाक्षर व द्वितीयाक्षर एकच आहे. शिवाय अर्धी मालिका केवळ संस्कृतप्रमाणें व अर्धी

केवळ तेलगूप्रमाणें दिसतें. यावर खूष होऊन रायानें त्याच्या पायांत आपल्या हातानें सोन्याचा तोडा अडकविला.

पेद्दना यानेंच प्रथमतः मुसुलमानी शब्द तेलगू भाषेंत मिसळण्याचा प्रयत्न केला व त्याचेंच अनुकरण त्याच्या मागून झालेल्या त्याच्या व्यवसायबंधूंनी केलें कृष्णदेवराय हा शके १४४६ मध्यें मरण पावला, त्यावेळेस त्याच्या संबंधानें पेद्दनानें जे दुःखोद्गार काव्यरूपानें काढिले ते अप्रतिम होत त्यामध्यें कवीनें करुणरसाची कमाल केली आहे पेद्दनानें रायाचे जे सहस्रावधि गुणानुवाद गाइले ते त्याजवर केवळ रायानें केलेल्या अपरिमित उपकाराबद्दल नसून कृष्णरायानें तेलगू वाङ्मयावर, तेलगू कविमंडळावर आणि तेलगु देशावर जे अपरिमित उपकार केले त्याबद्दल आहेत.

कृष्णदेवरायाच्या मागून त्याचा जावई रामराजा गादीवर बसला त्याची या कवीविषयीं मोठी पूज्यबुद्धि होती. हा कवि आपल्या मर्जीस येईल तेव्हांच कविता म्हणत असे राजाच्या सांगण्यावरून तो कधींहि म्हणत नसे. त्याला त्या वेळेस एखाद्या मांडलिक राजाप्रमाणें लेखीत असत. देवरायानें याला पुष्कळ अग्रहार दिला होता पैकीं कोकाट गांव हें मुख्य होय. हा जन्मतः जरी स्मार्त होता, तरी अद्वैतमतवादी होता हा कवि आपला आश्रयदाता मरण पावल्यानंतर फार दिवस पावेतों जगला नाहीं. लवकरच इ. स. १५३५ सालामध्यें आपली जन्मभूमी जी दोरनाला तेथें हा मरण पावला. ह्या कवीचीं काव्यें जेथें म्हणून तेलगू भाषा बोलतात व जाणतात त्या सर्व ठिकाणीं आढळतात अलमानी पेद्दना यास तो जिवंत असतांना जितका मान मिळाला तितका दुसऱ्या कोणत्याहि तेलगू कवीस अजून पावेतों मिळाला नाहीं [ तेलगू वाङ्मय—श सा. परशाकृत ]

**अलसिअम**—अर्वाचीन पॅलो हें इटली मधील इट्रुरिया प्रांतातील जुनें शहर आहे हें व्हाया ऑरिलिया नदीवर असून आगगाडीच्या रस्त्यानें रोमच्या पश्चिमेस २९ मैलावर आहे. इट्रुरिया प्रांतातील हें सर्वांत जुन्या शहरापैकीं एक आहे. रोमन वसाहती झाल्यावर ख्रि. पू. २४७ वर्षे पर्यंत ऐतिहासिकदृष्ट्या या शहराला महत्त्व आलें नव्हतें. या शहरांत मोठमोठ्या श्रीमान गृहस्थाचे बंगले व उद्यानगृहें होती वाळवंटाच्या किनाऱ्यावर अजूनहि या उद्यानगृहाचें अवशेष पुष्कळ आहेत. या उद्यानगृहांपैकीं एक ४००×२५० यार्ड आकाराचें आहे या शहरात मध्ययुगांत बांधलेला दुर्ग ऑडेसकल्ची घराण्याचा आहे पालो नजीक "लाडिसपोली" नांवाचें जलविहारस्थान ऑडेसकल्ची घराण्यातल्या राजपुत्रानें बांधिलें आहे (ए ब्रि )

**अलाउद्दीन खिलजी** ( १२९६–१३१६ )—दिल्लीच्या खिलजी घराण्याचा संस्थापक जलालुद्दीन याचा हा पुतण्या याच्या बापाचें नांव शहाबुद्दीन मसाउद जलालुद्दीन गादीवर आल्यापासून त्यानें यास व याच्या भावास आपल्याजवळ बाळगिलें होतें. अलाउद्दिनानें मोंगलास हटविलें म्हणून त्यास त्याच्या चुलत्यानें गंगा व यमुना या नद्यामधील अंतर्वेदीतील कोरा प्रांताचा सुभेदार नेमिलें. इ स. १२९२ त अलाउद्दिनानें माळव्याच्या स्वारीत भिलसा वगैरे कित्येक ठिकाणच्या हिंदुलोकांस जिंकिलें म्हणून जलालुद्दिनानें त्यास आणखी अयोध्येचा सुभा सांगितला माळव्यांत अलाउद्दिनानें पुष्कळ किल्ले व लूट मिळविल्यामुळें त्यास मोठी फौज बाळगितां आली

**देवगिरीची मोहीम**—भिलसा येथें असतांना अलाउद्दिनास दक्षिणेंतील देवगिरी नामक धनाढ्य शहराची खबर कळून त्याच्या तोंडास पाणी सुटलें आपला खरा बेत चुलत्यास किंवा दुसऱ्या कोणासहि न कळवितां तो आठहजार स्वार घेऊन १२९३ त कोराहून निघाला, आणि बुंदेलखंडाच्या जंगलातून दक्षिणेकडे गेला. सहा महिनेपर्यंत त्याचा मागमूस पाठीमागें कोणासहि कळला नाहीं दिल्लीचा सुलतान जलालुद्दीन याचा मी पुतण्या असून चुलत्यावरोबर भांडून नोकरी पतकरण्याकरितां मी तेलंगणाच्या राजाकडे राजमहेंद्रीस चाललों आहे असें तो रस्त्यानें सांगत असे.

अलाउद्दीन नर्मदापार होऊन एकाएकीं देवगडच्या तटाखालीं उतरला त्या वेळीं तेथील राजा रामदेवराव याची फौज दुसरीकडे गेली होती शिवाय आयत्या वेळीं किल्ल्यांत धान्याच्या ऐवजीं मिठाचीं पोतीं भरलीं गेलीं असल्याचें रामदेवरावास आढळून आलें तेव्हां त्यानें घाबरून जाऊन एकदम पुष्कळ द्रव्य देऊन अलाउद्दिनाशीं तह केला अलाउद्दीन परत जाणार तोंच रामदेवरावाचा पुत्र शंकरदेव मोठी फौज जमवून बाहेरून आला व त्यानें वडिलाच्या तहास न जुमानतां अलाउद्दिनाशीं लढाई दिली या लढाईत मुसलमानाचा समूळ नाश होण्याची वेळ आली होती. पण इतक्यांत किल्ल्याच्या रक्षणार्थ ठेवलेला रामदेवरावाचा सरदार शंकरदेवाच्या मदतीस येत असतां, त्याच्या लोकांच्या पायांनीं उडालेली धूळ पाहून, अलाउद्दिनाच्या मदतीस दिल्लीहून लवकरच मागून मोठी फौज येत आहे असें तो म्हणत होता ती हीच अशी समजूत होऊन हिंदु लोक रणांगण सोडून सैरावैरा पळूं लागले व अलाउद्दिनास जय मिळाला. अलाउद्दिन किल्ल्याकडे गेला तेव्हां तेथें त्यास धान्याऐवजीं किल्ल्यांत मिठाचीं पोतीं भरलीं गेलीं असल्याचें कळलें. तेव्हां रामदेवरावास दुसरा कांहीं उपाय न राहून अपरंपार द्रव्याशिवाय आणखी एलिचपूर व आसपासचे प्रांत अलाउद्दिनास देऊन आपला बचाव करून घ्यावा लागला.

**चुलत्याचा खून**—अशा प्रकारें विजय मिळवून अलाउद्दीन कोरा येथें परत आला आपल्या पुतण्यास भेटण्यासाठीं बादशहा थोड्या फौजेनिशीं कुरा येथें गेला. पुढें अलाउद्दिनाची व त्याची भेट झाली, तींत तो प्रेमानें आपल्या पुतण्याच्या गालावरून हात फिरवीत असतां अलाउद्दिनाच्या

मारेकऱ्यांनीं त्याचा खून केला १७ रमझान ( हि. स. ६९५ = जुलै १२९६)

राज्यारोहण.—जलालुद्दिन मरण पावल्याची बातमी समजतांच त्याच्या राणीनें आपल्या धाकट्या अल्पवयी मुलास तख्तावर बसवून त्याच्या तर्फेनें राज्य चालविलें परंतु अलाउद्दीन कूच करून राजधानीकडे गेला व देवगडच्या लुटींत मिळालेल्या पैशाच्या साहाय्यानें जे सरदार व फौजेतले अंमलदार काकूं करीत होते त्यांस वश करून त्यानें छपन्नहजार स्वार व साठ हजार पायदळ एवढी फौज जमा केली. अलाउद्दीन येत आहे हें ऐकताच राणी मुलास घेऊन मुलतानास पळून गेली. यामुळें १२९६ च्या आक्टोबर महिन्यांत (जिल्हेज ६९५) अलाउद्दिनास दिल्लीचें तख्त बिनहरकत प्राप्त झालें. लोकांची मनें संतुष्ट करण्याकरितां अलाउद्दिनानें मोठमोठे समारंभ करून लोकांस मेजवान्या दिल्या. लहानथोरास इनामें व बक्षिसें दिलीं व फौजेस सहा महिन्याचा पगार एकदम आगाऊ दिला. नंतर आलफखान नामक आपल्या एका दूधभावाकडून अलाउद्दिनानें मुलतानाहून दोघा राजपुत्रांस धरून आणून त्याचे डोळे काढून त्यास हंसीच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें.

राज्यावर येताच अलाउद्दिनानें लाचखाऊ अंमलदारांची पुरी खोड मोडली. ज्यास त्यानें पैसे भरून वश केलें होतें त्यास त्यांच्या कृतघ्नतेबद्दल चांगलें शासन करून चुलत्याच्या वधाच्या घातकी कृत्यांत ज्यांनीं त्यास स्वतःस साहाय्य केलें होतें त्यांची त्यानें अत्यंत दुर्दशा केली. ज्यांनीं अलाउद्दिनाच्या लांचास न जुमानतां जलालुद्दिनास सोडलें नव्हतें असे तीनच अंमलदार होते त्यांना अलाउद्दिनानें कांहीं एक त्रास दिला नाहीं.

मोंगलांची पहिली स्वारी.—अलाउद्दिनाच्या कारकीर्दीच्या प्रथमार्धांत मोंगलांच्या टोळधाडी एकसारख्या हिंदुस्थानांत येत होत्या. इ. स. १२९६ मध्यें मध्यतुर्कस्तानचा बादशहा चेंगीसखानाचा वंशज अमीर दाऊद यानें एक लाख लोकांनिशीं सिंध व पंजाब प्रांतावर स्वारी केली. तेव्हां अलाउद्दिनाचा सरदार आलफखान यानें लाहोरनजीक त्यांचा मोड करून ज्यांची बायकामुलें हातीं सांपडलीं त्यांचा शिरच्छेद केला.

गुजराथचा पाडावः—( इ. स. १२९७ ) अलाउद्दिनानें गादीवर बसल्यानंतर आलफखान व वजीर नुसरतखान यांस गुजराथ प्रांत जिंकण्यास पाठविलें. गुजराथेंत अन्हिलवाडा येथें राजा कर्णराय राज्य करीत होता. मुसलमान फौज आल्याबरोबर तो पळून देवगडास राजा रामदेव याजकडे आश्रय मागण्यासाठीं गेला. मागें त्याचें राज्य व बायकामुलें मुसलमानांनीं काबीज केलीं. खंबायत प्रांत त्यावेळीं व्यापारामुळें धनवान होता तो नुसरतखानानें येऊन लुटला. शिवाय या स्वारींत मुसलमानांनीं सोमनाथाचें देवालय पुनरपि लुटलें व तेथील मूर्ति फोडून तिचे तुकडे दिल्लीस नेऊन मशिदीच्या पायांस लाविले. आलफखान व नुसरतखान परत जात असतां त्यांचें लष्करांत नोकर असलेल्या मोंगल लोकांशीं कडाक्याचें भांडण होऊन मोंगलांनीं आलफखानाच्या पुतण्यास आलफखान म्हणून ठार मारलें. दिल्लीस पोंचल्यावर बादशहानें बंडखोर मोंगल लोकांची एकजात कत्तल केली. कर्णरायाची लावण्यवती स्त्री कमलादेवी मुसलमानांनीं पकडून दिल्लीस नेली होती तिला बादशहानें आपली पट्टराणी केली आणि तिजवर त्याची फार मर्जी बसली.

मोंगलांची दुसरी स्वारी—दाऊदची स्वारी होऊन दोन वर्षें होतात न होतात तोंच इ. स. १२९८ च्या सुमारास दाऊदचा मुलगा कुतलघखान यानें दोन लक्ष मोंगल स्वार घेऊन हिंदुस्थानांत प्रवेश केला व दिल्लीनजीक येऊन यमुनेच्या कांठीं तळ देऊन राहिला. मोंगलांच्या त्रासास भिऊन बाहेरचे सर्व रयतलोक दिल्ली शहरांत घुसले. त्यांनीं दिल्लीचे रस्ते गच्च भरून गेले व बाहेरून दाणावैरण येण्याचें बंद झाल्यामुळे धान्याची अत्यंत महर्गता झाली. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं अलाउद्दीन दरबारच्या लोकांची सल्ला नसतां नशीबावर हवाला ठेवून आपली तीन लाख फौज घेऊन मोंगलांवर गेला. जाफरखान व आलफखान या आपल्या दोघा सरदारांस दोन बाजूंस ठेवून अलाउद्दीन हा आपला वजीर नुसरतखान यासह मध्यभागीं लढाईस उभा राहिला. सुरवातीसच जाफरखानानें निकराचा हल्ला करून मोंगलांस मागें हटविलें व त्याचा पाठलाग करीत तो एकटाच दूरपर्यंत गेला. हें पाहून सुलतानानें आलफखानास त्याच्या मदतीस जाण्याचा हुकूम केला. या दोघा सरदारांत मत्सरभाव असल्यानें आलफखान जाफरखानाच्या मदतीस गेला नाहीं. त्यामुळें मोंगलांस जाफरखानाच्या लोकांस वेढून त्यांची कत्तल करण्यास चांगलेंच फावलें. तथापि अलाउद्दिनाची बाकीची फौज तयारीत होती. तिच्यापुढें मोंगलांचें कांहीं न चालल्यामुळें ते जीव घेऊन हिंदुस्थान सोडून पळून गेले.

रतनभोरचा पाडावः—इ. स. १२९८ मध्यें अलाउद्दिनानें जयपूरच्या हद्दींत रतनभोर नांवाचा किल्ला आहे तो घेण्यास आलफखान व नुसरतखान यास पाठविलें. तेथील राजा हंबीरदेव यानें मुसलमानास मागें हटविलें, तेव्हां अलाउद्दिन यानें स्वतः जाऊन किल्ल्यास वेढा घातला. हंबीरदेवाचा प्रधान विश्वासघात करून अलाउद्दिनास मिळाल्यामुळें रजपुतांचा घात होऊन राजासुद्धां सर्व लोक मुसलमानांच्या तरवारीस बळी पडले व अलाउद्दिनास किल्ला मिळाला. विश्वासघातकी प्रधानास अलाउद्दिनानें आपल्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें ठार मारिलें. या स्वारींत अलाउद्दिनाचा पुतण्या रुकनखान यानें अलाउद्दिनाचा खून करून राज्य बळकविण्याचा प्रयत्न केला पण अलाउद्दिनाच्या नशिबानें तो फसून रुकनखानास देहांत शासन भोगावें लागलें.

चितोडगडची स्वारी.—इ. स. १३०३ मध्यें अलाउद्दिनानें चितोडच्या राण्याच्या पद्मिनी नांवाच्या सुस्वरूप

श्रीच्या लोभानें चितोडवर स्वारी केली. किल्ल्यास वेढा घालून शहर हस्तगत होईना. तेव्हां अलाउद्दीनानें पद्मिनी कपटानें हस्तगत करून घेण्याचा प्रयत्न केला पण तो साध्य झाला नाहीं. पुढें कांही दिवस निकराचें युद्ध होऊन अलाउद्दीनाचें पुष्कळ नुकसान झालें व शेवटीं दिल्लीवर मोंगलांनी हल्ला केल्याचें समजल्यामुळें त्यास वेढा उठवून परत जावें लागलें. दुसऱ्या वर्षी अलाउद्दीनानें चितोडवर पुन्हां स्वारी करून तें स्वाधीन केलें (३ मोहरम ७०३; = आगस्ट १३०३) व तेथें मुसुलमानी लष्कर जागयास ठेवून व झालोरच्या घराण्यातील मालदेव नामक एका राजास चितोडच्या गादीवर स्थापून अलाउद्दीन दिल्लीस परत आला. पण अलाउद्दीन दिल्लीस परत येऊन कांहीं दिवस झाले नाहींत तोंच हंमीर नामक मेवाडच्या एका शूर राजपुत्रानें मालदेवापासून चितोडचें राज्य परत मिळविलें (इ. स. १३०४). लखमसी, पद्मिनी व हंमीर पहा.

मोंगलांची तिसरी व चौथी स्वारी.—१३०३ सालीं अलाउद्दीन चितोड घेण्यांत गुंतला असतां मोंगल सरदार तुर्घायखान यानें पुनरपि हिंदुस्थानावर स्वारी केली. या प्रसंगीं अलाउद्दीनाची फौज जवळ नसल्यानें दिल्ली शहर मोंगलाच्या अगदीं ताब्यांत जाण्याचा योग आला होता. पण कांहीं दैवी चमत्कार होऊन मोंगलांची गाळण उडून ते मागच्या स्वारीप्रमाणेंच एकाएकीं हिंदुस्थान सोडून निघून गेले असें म्हणतात. मध्यंतरी मध्यआशियांतील मोंगल वगैरे 'नव्या मुसलमानांनीं वसलेल्या मोंगलपुरा नामक दिल्लीच्या भागांत अलाउद्दिनास फितवा झाल्यानें उघडकीस येऊन त्यानें एका दिवसांत तीस चाळीस हजार लोकांची कत्तल करून त्याच्या बायकापोरांस देशोधडीस लाविलें. पुढें सन १३०५ मध्यें ऐबकखान नामक सरदाराच्या हाताखालीं मोंगली फौज पुनरपि हिंदुस्थानांत उतरली व मुलतान उध्वस्त करून ती शिवालीक पहाडावर आली. पण गाजीबेग तुघलक नामक अलाउद्दिनाच्या दिल्लीच्या पश्चिमेस बंदोबस्तास ठेविलेल्या सरदारानें दुसऱ्याच रस्त्यानें त्यांच्या पाठीवर एकदम हल्ला करून पुष्कळांची कत्तल केली. जे कोणी वाळवंटाकडे पळून गेले त्यांचा उन्हाळ्यामुळें तिकडे संहारच झाला. पुष्कळांना पकडून दिल्लीस नेऊन हत्तीच्या पायाखालीं तुडविलें, व त्यांच्या शिरांचा एक मोठा मनोरा मुदाऊन गेटाबाहेर उभारण्यांत आला. पुन्हां एकवार या कारकीर्दीत मोंगलांची अशीच दशा झाल्यामुळें त्यांचा धीर इतका खचला कीं, ते पुष्कळ दिवसपर्यंत हिंदुस्थानांत पाय ठेवण्यास धजले नाहींत.

मलीक काफूरच्या दक्षिणेंतील स्वाऱ्या.—देवगिरीचा रामदेवराव खंडणी पाठवीनासा झाला म्हणून इ. स. १३०६मध्यें अलाउद्दिनानें आपला सरदार मलीक काफूर याच्या हाताखालीं मोठें सैन्य देऊन दक्षिणेंत रवाना केलें, व गुजराथेंतील सरदार आलफखान यास काफूरच्या मदतीस जाण्याचा हुकूम केला, काफूरनें या स्वारींत सर्व महाराष्ट्रांत लुटालूट करून रामदेवराव यास आपल्याबरोबर दिल्लीस आणलें. तेथें अलाउद्दिनानें रामदेवरावाचा चांगला सन्मान केला. त्यास छत्र, राजाधिराज किताब व एक लाख रुपये बक्षीस देऊन प्रतिष्ठेनें स्वदेशीं पाठविलें. पुढें १३०९ मध्यें सुलतानानें काफूर यास आंध्र देशाची राजधानी श्री वारंगळ तिजवर पाठवून तेथील नरपति राजास आपला ताबेदार केलें. १३१० च्या स्वारींत काफूरनें बल्लाळवंशी राजांची राजधानी द्वारसमुद्र ही घेऊन त्याचें राज्य बुडविलें नंतर काफूर थेट दक्षिणेकडे गेला. त्यास कोणी विशेष आडविलें नाहीं. या स्वारींतून अलाउद्दिनाच्या सेनापतींनीं ६१२ हत्ती, वीस हजार घोडे, ९५ हजार मण सोनें व शिवाय जडजवाहिर एवढी संपत्ति दिल्लीस आणली (सेवेल फरगॉटन एंपायर, पृ ४०२) रामदेवरावाच्या मुलाकडून खंडणी वेळेवर न आल्यामुळें इ. स. १३१२ मध्यें काफूरनें दक्षिणेंत शेवटची स्वारी केली व त्यानें रामदेवरावाच्या मुलास ठार मारून देवगड राजधानी घेतली, व महाराष्ट्र पूर्णपणें मुसुलमानांच्या ताब्यांत आणून अपार संपत्ति घेऊन दिल्लीस परत आला.

बंडें व अखेर.—काफूरच्या या शेवटच्या स्वारीनंतर अलाउद्दिनाची सत्ता शिखरास पोंचली. काफूरवर त्याची बहाल मर्जी असे. या कृपेचा दुरुपयोग करून काफूरनें अलाउद्दिनाजवळ आपल्याशिवाय दुसऱ्या कोणाचें चालेनासें केलें. प्रत्यक्ष राणी व मुलगे यांच्याशीं सुद्धां सुलतानाचें वैमनस्य काफूरनें पाडून त्यास अटकेंत ठेविलें. यामुळें उमराव लोक त्रासले, गुजराथेंत बंड झालें; चितोडगड हातचा गेला. दक्षिणेंत रामदेवरायाचा जावई हरपाळदेव यानें मोठा उठावा करून तो मुसुलमान किल्लेदारास हाकून लावून स्वतंत्रपणें राज्य करूं लागला. इकडे अलाउद्दिनाची तब्येत अव्यवस्थित राहण्यानें दिवसानुदिवस बिघडत चालली होती. या बातम्यामुळें त्यास क्रोधाच्या लहरी येऊं लागल्या व दुखणें बळावून थोड्याच दिवसांनीं त्याचा काळ झाला. त्यानें वीस वर्षें राज्य केलें. कोणी म्हणतात काफूरनेंच त्याला विषप्रयोग केला. फेरिस्त्याप्रमाणें अलाउद्दिनाच्या मृत्यूची तारीख ६ सवाल हि. स. ७१६ (१९ डिसेंबर १३१६) ही आहे पण अमीर खुश्रू हा त्याच्या कारकीर्दीतील कवि आपल्या दिवाणाच्या बाकिय-इ-नकिय नामक भागांत ती ६ सवाल हि. स. ७१५ (अजमासें ३० डिसेंबर १३१५) देतो.

राज्यव्यवस्था.—अलाउद्दीन हा स्वभावानें उद्दिष्ट निर्दय व जुलमी होता, तथापि त्याचा राज्यकारभार प्रशंसा करण्यासारखा होता. १३०३ च्या मोंगलाच्या स्वारीपासून धडा घेऊन अलाउद्दिनानें दिल्ली येथें मजबूत किल्ला बांधला. नवीन तोफा ओतून हत्यारें तयार करवून राजधानीच्या बचावाचा चांगला बंदोबस्त केला. अलाउद्दिनाची राजनीति चमत्कारिक होती. हातीं घेतलेल्या कामांत त्यास एकसारखें

यश येत गल्यामुळे तो उर्मट व बेपरवा झाला, व स्वतःच्या इच्छेस येईल तसे कायदे करूं लागला. बराणी म्हणतो की, लग्नकार्ये, सणवार मेजवान्या यांसारख्या प्रसंगी लोक एकत्र जमून मद्यप्राशन वगैरे करून भलभलती चर्चा व मसलती करतात, व त्याच्याजवळ पैसा फार झाल्यानें त्याना बंडाची सामुग्री सहज तयार ठेवता येते म्हणूनच राज्यात फंदफितूर होतात असें अलाउद्दिनानें ठरविलें होतें. म्हणून त्यानें सरकारच्या परवानगी वांचून मेजवान्या, लग्नकार्ये वगैरे कोणी करूं नये किंवा एकत्र जमून दरबार प्रकरणी वादविवाद करूं नये असे कायदे करून गुप्त हेराची नवीन व्यवस्था सुरू केली. त्यानें स्वतः मद्यप्राशन सोडून मद्य व इतर अंमली पदार्थ याची विक्री बंद केली. लोकांस गाव जमिनी, इनाम दिल्या होत्या त्या त्यानें खालसा केल्या. व काहींनो काही सबबीवर त्यानें सर्व लोकास पिळून त्याजपासून पैसा उकळला. शेतकरी लोकानी अमुकच जमीन, गुरें व नोकर ठेवावें असें ठरविलें. सरकारी वसूल त्यानें सक्तीनें सुरू केला, तथापि वसुलाच्या बाबतीत लोकावर जुलूम झाल्यास त्याची चौकशी करण्यास त्यानें योग्य कामगारहि नेमले होते. त्यानें जिनसाचे दर कायमचे ठरवून त्याच दरानी लोकाना माल विकण्यास लाविलें. राज्यातून माल बाहेर नेण्याची त्यानें बंदी केली. तो सरकारी पैसा लोकास कर्जाऊ देई. धर्मसंबंधात अलाउद्दिनानें जुलमी वर्तन केलें नाही; तथापि हिंदूसंबंधी त्याचे कायदे अधिक कडक होते असें दिसतें. अलाउद्दिनाच्या कडक कायद्यानी त्याचा जिकडे तिकडे वचक बसून राज्यास सुरक्षिता आली. असें म्हणतात की याच्या कारकीर्दीत, साम्राज्य फार भरभटीस आलें. जिकडे तिकडे वाडे, मशिदी स्नानगृहें, किल्ले, कबरी, विद्यापीठें, वगैरे बांधकामें यक्षिणीनें कांडी फिरविल्याप्रमाणें थोड्या अवधीत दिसूं लागलीं. याच्या कारकीर्दीत विद्वान् मंडळीहि बरीच पुढें आलेली दिसतात. अलाउद्दिनास स्वतःस आरंभी लिहिता वाचता येत नव्हतें. तथापि त्यास पुढें ही गोष्ट लाछनास्पद वाटून तो लिहिण्या वाचण्यास शिकून हुशार झाला. त्याच्या पदरी झियाउद्दीन बराणी नावाचा इसम होता त्यानें त्याच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिला आहे.

[ संदर्भ ग्रंथः—फेरिस्ता; मुसुलमानी रियासत, बीटची ओरिएंटल बायोग्राफी वगैरे ]

अलाउद्दिनशहा—पहिला (इ. स. १३४७–१३५८) दक्षिणेतील बहामनी राज्याचा संस्थापक जाफरखान उर्फ हसनगंगू याचेंच हें नाव ( हसनगंगू पहा ).

२. दुसरा (इ. स. १४३५–१४५७).—अहमदशहा वली बहामनीचा पुत्र व बहामनी राज्यातील आठवा सुलतान. हा अमदाबाद बेदर येथे इ. स.१४३५ साली फेब्रुवारी महिन्यात (हि. स. ८३८) तख्तावर बसला. विजयानगरच्या राजानें पांच वर्षांपासून खंडणी दिली नसल्यामुळें, त्याजवर आपला भाऊ महंमदखान व वजीर ख्वाजाजहान याच्या हाताखाली फौज पाठवून निकडून त्यानें पुष्कळ संपत्ति मिळविली. पण परत येत असता वाटेंत त्याचा धाकटा भाऊ महंमदखान यानें बंड करून विजयानगरच्या राजाच्या मदतीनें मुदकल, रायपूर, सोलापूर, विजापूर, आणि नळदुर्ग हे परगणे आपल्या ताब्यात घेतले. शहानें आपली सर्व फौज जमविली व बराच पैसा खर्च करून लढाईची जय्यत तयारी करून आपल्या भावाचा वेदरानजीक पराभव केला. तथापि शेवटीं त्यास क्षमा करून शहानें रायचूर परगण्याची त्यास नेमणूक करून दिली. पुढें इ. स. १४३६ त (हि. स ८४० चें १ मोहरम रोजी,) कोंकणपट्टी जिंकण्यासाठीं शहानें दिलावरखानाच्या हाताखाली मोठें सैन्य रवाना केलें. रायरी व सोनखेड येथील राजे लवकरच शरण आले, व दिलावरखानानें सोनखेडच्या राजाची सुंदर कन्या शहाकरिता नजर आणिली. तिच्यावर शहाची,अत्यंत मर्जी बसली आणि तीस त्यानें पेरिचेर (स्वर्गीची रंभा ) असें नांव दिलें. इ स. १४३७( हि. स. ८४१) साली खानदेशचा सुलतान नशीरखान याच्याकडे त्याची मुलगी शहाची पट्टराणी मलिकाजहान हिनें, शहा पेरिचेरेवर मोहित होऊन आपणास विचारीत नाही अशी कागाळी केल्यावरून नशीरखानानें तें निमित्त करून वऱ्हाड प्रांत जिंकण्याचा घाट घातला. त्यानें वऱ्हाड प्रांताच्या कित्येक कामगारास फितूर करून गुजराथच्या राजाचीहि मदत मिळविली. या आणीबाणीच्या प्रसंगीं शहाच्या दरबारातील लोकानी त्यास स्वतः शत्रूशीं लढण्यास जाण्याचा सल्ला दिला. पण शहास आपल्या सरदाराच्या राजनिष्ठेविषयीं संशय असल्यामुळें मलीक–उत्तुजार नामक सरदारास शहानें फौजेसह त्याजवर पाठवून त्याचें व बंडखोराचें पारिपत्य केलें.

विजयनगरचा राजा दुसरा देवराय यास आपला वरचेवर होत असलेला अपमान सहन होईना. कांही तरी युक्तीनें मुसुलमानाचा पाडाव करण्याचा त्याचा विचार होता. त्यानें पुष्कळ मुसुलमान लोक आपल्या नोकरीस ठेविले. त्याच्याकरितां विजयानगर शहरांत एक मशीद बांधिली, व हिंदुराजास मुजरा करणें मुसुलमानास अशास्त्र वाटेल, ही शंका दूर करण्याकरिता आपल्या सिंहासनापुढें एका उंच पीठावर त्यानें कुराणाचें पुस्तक ठेविलें. त्यामुळें स्वतःचा मान राहून मुसुलमान लोक कुराणास मुजरा करितात असा प्रकार बाह्यतः दिसे. अशा उपायांनीं मोठी फौज जमा करून, सन १४४३ ( हि. स. ८४७ ) त तुंगभद्रा उतरून विजयनगरच्या देवरायानें मुदकलचा किल्ला घेतला. रायचूर व बंकापूर या किल्ल्यांना वेढा देण्यास कांहीं सैन्य पाठविलें व आपण स्वतः कृष्णेच्या काठीं छावणी देऊन सैन्याच्या टोळ्या पाठवून सागर—विजापूरपर्यंत मुलूख लुटून उध्वस्त करविला. अलाउद्दीनशहास ही खबर कळताच तो त्याच्या पारिपत्यास निघाला. प्रथमतः शहाचा सरदार मलिक उत्तुजार यानें देवरायाच्या वडील पुत्राशी लढाई देऊन वेढा उठविला.

पुढें सुमारें दोन महिन्याच्या अवकाशात तीन मोठमोठ्या लढाया होऊन त्यापैकीं पहिलींत हिंदूंना व बाकीच्या दोहोंत शहास जय प्राप्त झाला. तेव्हां देवरायानें आपल्या मुलखास उपद्रव देणार नाहीं असें शहाकडून वचन घेऊन पूर्वी ठरलेली खंडणी दरसाल देत जाण्याचें मान्य करून व मागील तुंबलेल्या खंडणीपैकीं कांहीं देऊन शहाशीं तह केला. हा तह अलाउद्दीनशहा जिवंत होता तोंपर्यंत दोनहि पक्षांकडून अक्षरशः पाळण्यांत आला.

या शहानें पुष्कळ धर्मकृत्यें केलीं. बेदर येथें त्यानें भिक्षागृह स्थापन करून, लोकांस औषधपाणी देण्याकरिता हिंदू व मुसुलमान वैद्य ठेविले. तो स्वतः दारू पीत असे तरी इतरास तिची सक्त मनाई केली होती. त्यानें मुलकी व लष्करी खातीं सुधारलीं. तथापि हिंदु लोकांस पुष्कळ जाच होई. ब्राह्मणाशीं शहा बोलत सुद्धा नसे, किंवा त्यांस कामावर नेमीत नसे.

विजयानगरशीं युद्ध झाल्यानंतर शहा पुढें व्यसनासक्त होऊन राज्यकारभाराकडे दुर्लक्ष करूं लागला. या समयास मेमून उल्ला दक्षणी यानें समुद्रकिनाऱ्यावरील सर्व किल्ले ताब्यात घेण्याचा बेत केला, व हा बेत सिद्धीस नेण्याकरिता शहानें मलीक उत्–तुजाराबरोबर त्याची फौज, सात हजार दक्षिणी पायदळ व तीन हजार अरबी घोडे देऊन त्यास रवाना केलें ( इ. स. १४५३, हि. स. ८५८ ). तुजारानें चाकणास आपलें मुख्य ठाणें करून जुन्नरशहराजवळचा किल्ला आपल्या ताब्यात घेतला व तेथून निरनिराळ्या वेळीं त्यानें कोंकणात टोळ्या पाठवून पुष्कळ राजास जिंकलें. तुजारनें नंतर शिरके नांवाच्या एका प्रमुख राजास जिंकिलें. ह्या कोंकणच्या स्वारींत कित्येक भानगडी घडून आल्या, त्यामुळें दरबारच्या मंडळींत तंट्याचें बीज पेरिलें जाऊन त्यायोगें अखेरीस बहामनी राज्याचा अंत झाला. तुजारनें शिरक्यास असा आग्रह केला कीं, 'तूं मुसुलमान हो, नाहीं तर तुझा जीव घेतों' अशा आणीबाणीच्या प्रसंगीं त्या धूर्त सरदारानें मोठ्या नम्रतेनें संकट टाळून स्वतःचा बचाव केला. खेळणा म्हणून एक परगणा कोंकणात आहे. त्यात विशाळगड व त्यातील सर्व जंगली प्रदेशाचा समावेश होत असे. शंकरराय नांवाचा एक हिंदु राजा या खेळणा परगण्यावर राज्य करीत होता. 'शंकरराय हा माझा शत्रु आहे, त्यास प्रथम आपण दोघे मुसुलमान करू व नंतर मी मुसुलमान होईन' असें शिरक्यानें तुजार यास सांगितलें. खेळणा परगण्यात जाणें फार अवघड आहे, अशी हरकत तुजारानें दाखविली; पण तें काम आपण पतकरितों, असें शिरक्यानें कबूल केल्यावर, तुजार त्या गोष्टीस कबूल झाला. तुजार हा मूळचा परदेशी व्यापारी होता. दक्षिणचे सर्व मुसुलमान लोक मूळचे इराणी व तुर्की होते. पण इकडे आल्यादर त्यांची पुष्कळ वृद्धि झाली होती. तसेंच हबशी लोकहि त्याच्या पक्षास होते. परंतु परदेशी लोकांस मोंगल अशी संज्ञा त्यावेळच्या इतिहासकारांनीं दिलेली असून, त्यात बहुतेक सय्यद लोक होते ते व्यापाराच्या उद्देशानें इकडे आले होते. त्यांचे व दक्षिणच्या मुसुलमानाचें वाकडें असे. आजपर्यंत अनेक मोहिमात तुजार याने दक्षिणी व हबशी यांची मदत घेतली नव्हती प्रस्तुत प्रसंगीं खेळण्याच्या अवघड प्रदेशात शिरण्याचें दक्षिणी व हबशी कामगारांनीं नाखूल केलें, आणि ते आपल्या फौजासह तुजारास सोडून मागें राहिले. शिरक्याच्या मसलतीनें तुजार हा अत्यंत अवघड जंगली प्रदेशातून खेळणा प्रदेशाच्या अगदी निबिड अरण्यात शिरला. तेथील हवा अतिशय खराब असल्यामुळें लोकहि पुष्कळ आजारी पडले. अशा स्थितींत शिरक्यानें शंकररायास एकदम येऊन हल्ला करण्याविषयीं खबर दिली. शंकरराय मोठी फौज घेऊन निघाला. व त्यानें एकाएकीं छापा घालून ७००० मुसुलमानांची कत्तल केली तीन तुजारहि मारला गेला कांहीं लोक वाचले ते परत जाऊन दक्षिणी फौजेस मिळाले, आणि तेथून सर्व लोक चाकणच्या किल्ल्यावर गेले.

वरील अपजयामुळें दक्षिणी व परदेशी या दोन पक्षामध्यें जास्तच तंटे माजले परदेशी लोक आपल्या कुचराईबद्दल शहाकडे कागाळ्या नेतील या भीतीनें परदेशी सय्यद लोकांचा संपूर्ण नाश करण्याकरिता, दक्षिणी कामगारांनीं आपणच उलट शहाकडे भलभलत्या हकीकती लिहून पाठविल्या; आणि तो दारूच्या निशेंत असताना त्याजकडून सब परदेशी अंमलदारास पकडण्याचा हुकूम आणिला. हे परदेशी अंमलदार चाकणच्या किल्ल्यात जाऊन राहिले होते तेथें त्यास वेढा देण्यात आला.

शेवटीं उभयतांचें युद्ध होऊन त्यातून कांहीं मोंगल बचावून शहाकडे गेले. तेथें शहास त्यांनी खरी हकीकत कळवून त्याजकडून दक्षिणी लोकाचा सूड घेवविला, ( सन १४५३ ) याच वर्षी शहानें आपल्या गुरूच्या उपदेशावरून दारू न पिण्याची शपथ वाहिली व तो राज्यकारभाराचीं कामें नियमानें पाहूं लागला. आता त्यानें सर्व महत्त्वाच्या कामावरून दक्षिणी लोकास दूर केलें. इ. स १४५५ ( हि स ८५९) मध्यें शहाच्या पायावर एक भयंकर पुळी उठून तो मेल्याची खोटी बातमी मुलखात पसरल्यामुळें बंड उद्भवलें. नवलगुंद व तेलंगण या सुभ्यात या बंडखोरास खानदेशच्या व माळव्याच्या सुलतानाची कुमक होती तरी शहानें तें बंड मोडिलें. बहामनी राज्यातील प्रसिद्ध सरदार ख्वाजाखान महंमद गवान प्रथमतः या शहाच्या लष्करात उदयास आला.

मृत्यु — पायात व्रण होऊन व तो फार चिघळून त्या योगानें इ. स. १४५७ सालीं ( हि स. ८६२ ) २३ मे [ चाद ] ९ हिने व २० दिवस राज्य करून अल्लाउद्दीनशहा मरण पावला. [ किंकेड आणि पारसनीस यांचा मराठ्यांचा इतिहास भाग १ यांत ३ एप्रिल १४५८ ही या शहाच्या मृत्यूची तारीख दिली आहे. ] हा श

नकल्या, न धूर्त असून त्यास विद्येची फार आवड होती. [ फेरिस्ता; वा. प्र. मोडक बहामनी उर्फ ब्राह्मणी राज्याचा इतिहास. ]

*अलायुध*—एक पराक्रमी राक्षस. घटोत्कचाच्या रात्रि-युद्धांत यानें फार मोठा पराक्रम केला व भीमास जर्जर केलें. अखेरीस घटोत्कचानें त्यास मारिलें ( महाभारत, द्रोणपर्व अ. १७६–१७८ )

*अलावन*—( मद्रास इलाखा ) त्रावणकोर संस्थानांत ही एक मीठ तयार करणाराची जात आहे याना आलम किंवा मिठागर यांतून काम करावें लागतें म्हणून उप्पलावण ( उप्पु = मीठ )अशी संज्ञा आहे.

तीन चार शतकापूर्वी सात अलावन कुटुंबें पाण्ड्य देशांतून त्रावणकोर येथें मिठागरांत काम करण्याकरिता आणण्यांत आलीं अशी आख्यायिका आहे तामरकुलम्, पुट्टलम आणि दक्षिण त्रावणकोरमधील इतर कांहीं ठिकाणीं याच्या देशांतराविषयीं कोरीव लेख आहेत असें सांगतात पण ते अद्याप उपलब्ध झाले नाहींत. हे लोक तामिळ भाषा बोलतात व मांस खातात; पण मद्यपान फारसें करीत नाहींत दफनाची चाल फार प्राचीन आहे पण हल्लीं कधीं कधीं मृतांना दहन करितात. गोंदून घेण्याची चाल सार्वत्रिक आहे. याच्या कुलदेवता "सास्त" ( पद्दा ) व भद्रकाली या होत. ही जात फार उद्योगी आहे. दक्षिण हिंदुस्थानात याच्याहून चांगले मीठ मजूर मिळणार नाहींत. १९११ च्या खानेसुमारींत १४०६ अलावन मद्रास इलाख्यांत व ८७० त्रावणकोर संस्थानांत आढळले.

मद्रास सेन्सस रिपोर्ट ( १९०१ ) मध्यें खालील माहिती दिली आहे.

हे मिठागरात काम करणारे लोक मदुरा आणि तिनेवेल्ली येथें फक्त आढळतात. पत्तैयन आणि मूप्पन अशीं त्यांना नांवें आहेत. हिंदु देवालयांत यांना जाऊं देत नाहींत ( थर्स्टन—कास्टस् अँड ट्राइब्स ऑफ सदर्न इंडिया ).

*अलावलपूर*—(पंजाब) जालंदर जिल्ह्या व तहशिलींतील एक गांव. ३१° २६' उ. अ. ७५° ४०' पू रे. लोकसंख्या ( १९०१ ) ४४२२. *सुसी आणि गाबून* या कापडाचा *व्यापार चालतो. म्युनिसिपालिटीची स्थापना १८६७ साली झाली. १९०३–४ मधील उत्पन्न २१०० रु. व खर्च* २३०० रु ( इं. गॅ )

*अलास्का*-त्यास पूर्वी *रशियन अमेरिका म्हणत असत.* अलास्का म्हणजे उत्तर अमेरिकेच्या अगदी वायव्येस असलेला प्रदेश व त्याच्या सभोंवतालचीं बेटें मिळून झालेला मुलूख होय. हा पूर्वी रशियाच्या ताब्यात होता, पण सध्या अमेरिकेच्या संयुक्त संस्थानाच्या अमलाखालीं आहे. अलास्का या नावाखाली पृ. रे. १४१° च्या पश्चिमेचा मुलूख ( १ ) हामामिड बेट बेहरींग समुद्रांतील बेटें व अल्युशियन बेटाची मालिका ( ३ ) अलेक्झाड्रियन बेटें व त्या लगतच्या किनाऱ्याचा पट्टा, हीं तीन येतात.

सी मा.—उ-आर्तिक महासागर प०-आर्तिक महासागर व बेहरींगची सामुद्रधुनी. द. व *नैर्ऋत्य—अलास्काचें आखात* व बेहरींगची सामुद्रधुनी पु –युकाटनचाप्रांत, व ब्रिटिश कोलंबिया मध्यवर्ती अखंड पठार हेंच मुख्य भाग व त्यास छकविलेले नैर्ऋत्य व आग्नेयेकडे जाणारे खंडित व अर्धखंडित हात असें या प्रदेशाचें सामान्य स्वरूप आहे. या तीन भागांस निरनिराळीं नांवें दिलीं आहेत, तीं अशी (१) कान्टिनेंटल अलास्का ( २ ) अल्युशियन अलास्का ( ३ ) पॅनहँडल याचें क्षेत्रफळ ५८६,४००. चौ मै. किनाऱ्याची लांबी २६००० मैल दक्षिणेकडचा किनारा वाकडा असून किनाऱ्यालगतची बाजू सुळयासारखी उभी आहे. या प्रदेशाचा भाग बेहरींगच्या समुद्रांत दूरवर गेलेला आहे. दक्षिणेच्या किनाऱ्यास वालुकामय प्रदेश नाहीं. उत्तरेस व पश्चिमेस जो किनारा आहे तो वाकडा तिकडा नसून त्यास मात्र पुळण आहे. पण येथील समुद्रात कांहीं भागीं उथळ पाणी आहे.

*बे टें.-आग्नेयेकडील मुख्य बेटें-(१) शिकॉगॉफ (२) बारनॉफ (३) अडमिरॅल्टि (४) कुप्रीनॉफ ( ५ ) कुइ ( ६ ) प्रिन्स ऑफ वेल्स ( ७ ) एटोलीन. नैर्ऋत्येस* असलेलीं मुख्य बेटें:-( १ ) कोडियाक ( २ ) अल्युशियन, ( ३ ) सेंट लॉरेन्स वगैरे. शेवटीं सांगितलेलीं दोन बेहरींगच्या समुद्रांत आहेत. *या बेटांपैकी प्रिन्स ऑफ वेल्स व कोडियाक हीं* फार मोठीं आहेत.

दे श वि भा ग.—*पश्चिमेच्या संयुक्त संस्थानांतल्याप्रमाणें* या प्रदेशाच्या भुपृष्ठाच्या रचनेचें अवलोकन करता, चार भाग पडतात, ते असेः—पॅसिफिक पर्वतप्रदेश; मध्यपठारप्रदेश; रॉकी पर्वतप्रदेश व मैदानप्रदेश पॅसिफिक पर्वत हे पश्चिम अमेरिकेंत महासागराच्या किनाऱ्याशीं समांतर दक्षिणोत्तर पसरलेल्या रांगाचे अवशिष्ट भाग होत. या अलास्काच्या किनाऱ्याशी समांतर पसरलेल्या रांगांचा आकार साधारण घोड्याच्या नालासारखा आहे.

जलचर प्राणी.—कॉड मासे, देवमासे, ऑटर, सील, वालरस वगैरे सापडतात. या प्रदेशांत मऊ व दाट लव असलेलीं जनावरें फारच आहेत व कातड्याकरिता त्याची पारध फार केल्यामुळें बऱ्याच जातीचे प्राणी सध्या दुर्मिळ झाले आहेत.

व न स्प ती.—येथें पीत सीडर झाडाचीं दाट अरण्यें युकानच्या भागांत व किनाऱ्यालगतच्या भागीं आहेत. नद्यांच्या काठीं गवताचीं कुरणें आहेत व शैवालिक वनस्पति उन्हाळ्यांत जिकडे तिकडे उगवलेली असते.

ज मी न.—सुपीक आहे पण उन्हाळा थोडा असल्यानें धान्य कमीच पिकविलें जातें.

उ द्यो ग धं दा व व्या पा र.—दाट लव असलेलीं कातडीं व मासे याचा फार मोठा व्यापार चालतो. दक्षिण

अलास्कांत कागदाचा मोठ्या प्रमाणावर धंदा सुरू करण्याचे प्रयत्न झाले आहेत. त्याकरितां टाँगास जंगलाचे १४ विभाग पाडण्यात आले आहेत. १९१८ साली ४४२८००७५ डालरचा माल युनायटेडस्टेट्सहून येथें आला व ७१५९५४१४ डालरचा माल येथून तिकडे गेला.

खनिज संपत्ति—अलास्कांत खाणींचा धंदा हा सर्वांत महत्त्वाचा आहे सोनें व तांबें हे मुख्य खनिज पदार्थ असून शिवाय रुपें, प्लॅटिनम, जस्त, शिसें, अँटिमनी, क्रोमाइट, दगडी कोळसा, पेट्रोलियम. संगमरवरी दगड, ग्रफाईट, सल्फर. गंधक वगैरे अनेक पदार्थांच्या खाणी आहेत मासे पकडण्याचा धंदाहि फार मोठ्या प्रमाणांत चालतो. १९१९ या सालांत ५०२८२००० डॉलर उत्पन्न झालें व याप्रमाणें सालोसाल वाढत्या प्रमाणांत होत आहे.

लोक.—अलास्कांत लोकसंख्येच्या मानानें यूरोपियन वंशाचे लोक अर्ध्यापेक्षा कमी आहेत. १९०० साली येथील लोकसंख्या६३५९२होती. तींपैकीं शेंकडा४८यूरोपियन, मूळचे रहिवाशी शेंकडा ४६व चिनी व जपानी शेंकडा ६ मानववंशशास्त्राच्या मतें या मूळच्या रहिवाशांच्या ४ जाती आहेत (१) एस्किमो (२) हैडास अथवा काइगानी (३) क्लीन-किट (४) तिन्नेह अथवा अथापास्कन अल्युटस् हे लोक पहिल्या जातीचे आहेत. दुसरी जात प्रिन्स ऑफ वेल्स बेटांत राहते तिसऱ्या जातीचे लोक पॅनहँडलमध्यें राहतात चवथी जात अगदीं अंतर्भागांत आढळते. हे सर्व रहिवाशी यूरोपियन लोकांचें अनुकरण करूं लागले आहेत.

नद्या.–कॉटिनेंटल अलास्का हा एक मोठा सपाट पठाराचा प्रदेश आहे. या पठाराची उंची पाच हजार ते तीन हजार फूट आहे व त्यास उत्तरेकडे उतरण आहे. यांतून पश्चिमवाहिनी नद्या गेल्या आहेत व हा प्रदेश सपाट असल्यानें नद्यांची प्रवाहगति फार मंद आहे. या प्रदेशांतून वहात जाणाऱ्या नद्यांपैकीं यूकॉन व कोयुकुक या मुख्य आहेत. यांत यूकॉन ही फार मोठी नदी आहे. तिची लांबी २००० मैल. ही नदी या पठाराच्या अगदीं मध्य भागांतून गेली आहे या नद्यास मिळणाऱ्या दुसऱ्या लहान नद्या पुष्कळ आहेत व त्यांचाहि प्रवाह मंद असल्यामुळें या सर्वांचा दळणवळणाचे कामीं फार उपयोग होतो.

पर्वत:–'रॉकी' या पर्वताच्या रांगा अलास्कांत येऊन पूर्व पश्चिम पसरल्या आहेत,पण यांची उंची फार कमी झाली आहे. यांत एलडीकार पर्वत हे मुख्य आहेत. त्यांची उंची सुमारें ८००० फूट आहे या रांगा समुद्रकिनाऱ्याच्या बाजूला सपाट होत गेल्या आहेत या रांगांचे चार भाग आहेत. पहिला भाग(१)पॅनहँडलच्या किनाऱ्यालगतची रांग- रुंदी १०० मैल व शिखराची उंची ५००० ते ६००० फूट (२) सेंट एलिसची रांग—या रांगेंत रुगाख, कैनाइ, स्कोलाई व नट्झोटिन या पर्वताचा समावेश होतो. (३) अल्युशियन रांग—अल्युशियन बेटें हीं याच रांगेचा अवशेष होत. (४)अलास्कन रेंज ही नट्झोटिन व स्कोलाय पर्वतांमध्यें आहे. अलास्कनच्या व अल्युशियनच्या रांगेंत सुमारें १२ जागृत ज्वालामुखी पर्वत आहेत. दुसरा भागः— हा कानडांतील "रॉकी" पर्वताच्या पूर्वपश्चिम दिशेनें पुढें आलेल्या रांगामुळें तयार झालेला आहे, पण या रांगा येथें सपाट झाल्यानें, त्याची उंची ६००० फूटावर नाहीं. भाग ३ राः–वर सांगितलेल्या पहिल्या दोन डोंगराळ प्रदेशामध्यें असलेलें मध्यवर्ती पठार भाग ४:– पूर्वपश्चिम असलेल्या रॉकी पर्वताच्या रांगा व आर्टिक महासागर यामध्यें असलेला व किनाऱ्याकडे कललेला सपाटीचा प्रदेश.

भूपृष्ठवर्णन.—पॅनहँडल हा प्रदेश फारच प्रेक्षणीय आहे. यांत शेंकडों बेटांचा समुदाय आहे. हीं बेटें म्हणजे समुद्रांत बुडालेल्या पर्वताची शिखरें होत यांची समुद्रसपाटीपासून उंची ३००० ते ५००० फूट आहे. या शिखरावर गर्द झाडी आहे. पण बाजूवर हिमप्रवाहांच्या घर्षणामुळें वनस्पतींचा अभाव असतो. अंतर्भागांतून बरेच जलप्रवाह या भागांतील पर्वत फोडून समुद्रास मिळाले आहेत, या प्रवाहांत समुद्राचें पाणी दूरवर आंत गेलेलें असतें या प्रवाहाच्या बाजूनें कांहीं ठिकाणीं ५००० ते ६००० फूट उंचीचे कडे आहेत. यांची शोभा फार अपूर्व दिसते यांपैकीं पोर्टलंड कनाल व लिनकनाल हे फार प्रसिद्ध आहेत. येथल्यासारखे हिमप्रवाह पॅसिफिक महासागराचे कांठीं दुसरे कोठेंहि नाहींत असल्या शेंकडों प्रवाहांनीं अंतःप्रदेशांतील बर्फाचें पाणी समुद्रास मिळतें. या हिमप्रवाहांपैकीं सर्वांत मोठा "मालास्पीना" हा आहे त्यानें १५०० मैल जागा व्यापिली आहे अल्युशियन बेटें हीं देखील समुद्रांत बुडालेल्या पर्वताचे अवशेष होत. आर्टिक महासागरालगतच्या उतरणीच्या भागाची रुंदी सुमारें ८० मैल आहे. यांतील सर्वांत उंच भागाची उंची २५०० फूट आहे.

हवामान.—या प्रदेशाचे एकंदर चार भाग पडतात, व त्यांत हवामान निरनिराळें आहे. यूकॉनच्या पठाराची हवा पॅनहँडलच्या हवेहून फार निराळी आहे. पॅनहँडलपासून तो कुक प्रवाहाच्या मुखापर्यंतच्या भागांतली हवा समशीतोष्ण आहे. जसजसें पश्चिमेकडे व उत्तरेकडे जावें,तशी हवा फार थंड होत जाते, व हिंवाळा फार कडक असतो व त्याची मुदतहि वाढत जाते. ऐन उन्हाळ्याच्या व हिंवाळ्याच्या हवामानाच्या उष्णतेंत फक्त २५ अंशाचा फरक असतो. डिसेंबरच्या १ तारखेस हिंवाळ्यास सुरवात होते व मेच्या आरंभीं पर्वतशिखराशिवाय बाकी इतर ठिकाणीं बर्फ वितळून गेलेलें असतें. उष्णतामापक यंत्रांतील पारा शून्याखालीं क्वचितच असतोः पण उन्हाळ्यांत तो ७५ अंशावर जात नाहीं. हिंवाळ्यांत व पावसाळ्यांत समुद्रकिनाऱ्याच्या भागांत पाऊस व जिकडे तिकडे धुकें पसरतें. बेहरिंग समुद्र सदासर्वकाळ धुक्यानें व्यापिलेला असतो. अन अलास्का या बेटाला बोटावर मोजण्याइतकेच निरभ्र दिवस असतात. हिंवाळ्यात बर्फ

पडण्यास सुरवात होते. व ऐन हिंवाळ्यांत तें फार दाट पडतें. उन्हाळ्यांत खाणींचे काम चालू शकतें. मे व जून महिन्यांत सूर्य १८ ते २० तास क्षितिजावर असतो, याच ऋतूंत वनस्पती सतेज व टवटवीत दिसतात.

प्रा णी व व न स्प ती—प्राणी-उन्हाळ्यात डासांचे थवेच्या थवे अंतःप्रदेशात येतात. जमिनीवरील प्राणी—अस्वल, क्यारिबो, (हें जनावर हरिणासारखें आहे) करडें, लांडगे इत्यादि.

इ ति हा स—रशियन कॅप्टन व्हिटसबेरींग व चिरीकोव्ह यांनीं १७४१ त हा अज्ञात प्रदेश शोधण्याचें काम हातीं घेतलें. यांच्या मागून दुसरे पुष्कळ प्रवासी येथें गेले. १७८३ सालीं कोडीयाकचा शोध लागला. १७९३–१७९४ सालीं व्हॅंकुव्हर नामक प्रवाशानें दक्षिणेंतील बेटांचा नकाशा तयार केला. पुढें कित्येक वर्षे हें संशोधनाचें काम चालू होतें व अजूनहि आर्टिक महासागराच्या काठचा प्रदेश बराच अज्ञात आहे.

१९१० पासून आजपर्यंत अलास्कांत महत्त्वाच्या गोष्टी झाल्या त्याः( १ ) जमीनींची व नैसर्गिक साधनांची पाहणी ( २ ) जमीनींच्या मालकीसंबंधाच्या धोरणांत फेरबदल. ( ३ ) होमरूलच्या हक्कांची देणगी. ( ४ ) दळणवळणाच्या साधनांची वाढ ( ५ ) उद्योगधंद्यांची वाढ.

मु ख्य श ह रें.—जुनेआउ हें राजधानीचें शहर आहे. अँकरेज, फेअरबँक्स, नोम, स्कागवे, सिट्का वगैरे दुसरींहि कांहीं शहरें अलास्का मध्यें मोठीं म्हणून मानलीं जातात.

अलास्काची लोकसंख्या १९१० मध्यें ६४,३५६ होती ती १९२० मध्यें ५४८९९ भरली; म्हणजे १४.७ कमी झाली. जागतिक युद्ध हें त्याचें एक कारण आहे. आणि युनायटेड स्टेट्समध्यें मजुरीचे दर अधिक असल्यामुळें लोक तिकडे जातात हें दुसरें कारण होय. १९२० मध्यें गोरे लोकांच्या ६२ शाळा आणि इंडियन लोकांच्या ७० शाळा होत्या. शेतकीचें व मायनिंगचें कॉलेज फेअरबँक येथें आहे. १९१० मध्यें अलास्कामध्यें फक्त ३७१ मैल रेल्वे रस्ता होता; त्यांत १९२० पर्यंत ३८३ मैल इतकी अधिक वाढ झाली.

रा ज्य का र भा र—अलास्का हा देश पूर्वी रशियन सरकारच्या ताब्यांत होता. १८६७ सालीं अमेरिकेनें ( म्हणजे संयुक्त संस्थानांनीं ) ७२,००,००० पौंडास हा देश रशियापासून विकत घेतला. १९०६ सालीं या देशास अमेरिकेच्या कॉंग्रेस सभेस प्रतिनिधी पाठविण्याचा अधिकार मिळाला. अमेरिकेच्या अध्यक्षास येथें एक गव्हर्नर नेमण्याचा अधिकार असतो व त्याच्या मदतीकरितां दुसरेहि कामगार त्यास नेमता येतात. गव्हर्नर व त्याचे मदतनीस त्यांच्या हातीं सर्व राज्यव्यवस्था असते. १८९१ सालापासून या देशाकरतां नवीन कायदे पसार करण्यात आले. पण या देशाची राज्यव्यवस्था सुरळीत व सुव्यवस्थितपणें चालत नाहीं कारण अधिकार विभागणी फार झाली आहे व कामगार लोकांत शिस्त नाहीं. त्यामुळें बरीच अंदाधुंदी चालते. निरनिराळ्या खात्यांचे कर्तव्यक्षेत्र नक्की ठरलेलें नाहीं. येथील लोकांची गरिबी व कायमच्या राहिवाशांचा अभाव हीं देखील येथील ढिल्या राज्यकारभाराचीं दोन कारणें आहेत.

रा ज की य ह क्क—वॉशिंग्टन येथील कायदेमंडळांत अलास्काला प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क असावा अशी चळवळ प्रथम सुरू झाली. तिला ४० वर्षांनीं यश येऊन १९०६ मध्यें कॉंग्रेसमध्यें लोकांनीं निवडलेला एक प्रतिनिधि घ्यावा असें ठरलें. होमरूलची म्हणजे स्वराज्याची मागणी सारखी चालू होती. तिला १९१२मध्यें यश येऊन अलास्कांत स्वतंत्र कायदेमंडळ स्थापण्याचा ठराव झाला. सेनेट उर्फ वरिष्ठ सभा व हाउस ऑफ रिप्रेझेंटेटिव्ह उर्फ कनिष्ठ सभा अशा दोन सभा असाव्या, प्रत्येक जिल्ह्यातर्फे सेनेटमध्यें दोनदोन प्रतिनिधी आणि कनिष्ठ सभेंत चारचार प्रतिनिधी असावे, असें ठरलें. प्रतिनिधींची वाटणी लोकसंख्येनुसार न झाल्यामुळें एकंदर अलास्का देशाचें हित उत्तम प्रकारें साध्य होत नाहीं. शिवाय वॉशिंगटनच्या कॉंग्रेसला अलास्काच्या कायदेमंडळाचा कोणताहि ठराव रद्द करण्याचा अधिकार राखून ठेविला आहे. १९१३ पासून देश कायदेमंडळ कायदे करूं लागलें. स्त्रियांना राजकीय हक्क देण्याचा कायदा प्रथमच झाला. खाणी, मजुरांच्या कामाचे तास, शिक्षण, बँकिंग वगैरे उपयुक्त कायदे लवकरच करण्यांत आले. १९१७ मध्यें मद्यपान प्रतिबंधक कायद्यालाहि वॉशिंगटन कॉंग्रेसनें परवानगी दिली.

जमीनी खाजगी मालकीच्या करण्यानच अलास्काचें फार हित आहे अशी प्रथम समजूत होती. परंतु प्रेसिडेंट रूझवेल्टच्या वेळीं ही सर्व समजूत बदलून सरकारी मालकी असल्यानेंच नैसर्गिक साधनांचा उत्तम उपयोग करून घेता येईल असें युनायटेडस्टेट्स सरकारचें मत बनलें. पण त्यामुळें उद्योगधंद्यांची कुचंबणा होऊन लोकांच्या तक्रारी वाढूं लागल्या. पुढें विल्सन प्रेसिडेंट झाल्यावर त्यानें लोकांना जमीनी भाडेपट्टयानें देण्यास सुरवात केली, व कायदे करण्याकरितां सरकारी जंगलांतील लांकूड विकत देण्यासंबंधाचे नियम करण्यांत आले. १९२१ मध्यें यासंबंधानें आणखी नवे कायदे करण्यांत आले आहेत.

अलाहाबाद वि भा ग—संयुक्त प्रांताचा नैऋत्येकडील एक विभाग. २४° ११' ते २६° ५८' उत्तर अक्षांश व ७८° १०' ते ८२° २१' पूर्व रे. उत्तरेस इटावा आणि फरुकाबाद जिल्हे; ईशान्येस गंगानदी; पूर्वेस मिर्झापुर जिल्हा, दक्षिणेस व पश्चिमेस मध्यहिंदुस्थान एजन्सींतील संस्थानें. मुख्य ठिकाण अलाहाबाद शहर हें आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ४७,९५,६६६ आहे. एकंदर क्षेत्रफळ १७२७० चौरस मैल. लोकसंख्येचें दर चौरस मैलीं प्रमाण १९०१ सालीं ३२१ होतें पण हल्लीं तें त्याहूनहि कमी पडतें. इ. स. १९०१ सालीं हिंदु शेकडा ९० व मुसुलमान शेकडा १० होते. या

विभागात ५१ गांवें व १०९५० खेडीं आहेत पैकीं कानपूर, अलाहाबाद, झांशीं, आणि बांदिया हीं मोठीं आहेत. संयुक्त प्रांतांत कानपुर हें सर्वांत मोठें व्यापाराचें ठिकाण आहे. दक्षिणेकडील जिल्ह्यांत महोबाच्या चंदेल राजांनीं बांधलेलीं हिंदु देवळें व किल्ले विपुल आहेत. या विभागांत फरुकाबाद, इटावा, कानपूर, फत्तेपूर व अलाहाबाद हे जिल्हे आहेत.

जि ल्हा.—संयुक्तप्रांत. अलाहाबाद भागाच्या पूर्वेकडील जिल्हा. उ. अ. २४°४७' ते २५ ४७' पू रेखांश ८१° ९' ते ८२° २१' क्षेत्रफळ २८११ चौरस मैल. उत्तरेस अयोध्येपैकीं प्रतापगड जिल्हा; पूर्वेस जोनपूर आणि मिर्झापूर; दक्षिणेस रेवा संस्थान व बांदा जिल्हा, पश्चिमेस फत्तेपूर, गंगानदी जिल्ह्याच्या काहीं भागाच्या उत्तरेस व नंतर मधून वाहात जाते; त्याचप्रमाणें यमुनानदी दक्षिणेस वहात जाऊन पुढें गंगानदीस जिल्ह्याच्या मध्यभागीं मिळते या जिल्ह्याचे तीन अगदीं निरनिराळे भाग करता येतात. ( १ ) गंगा व यमुना यामधील दुआब ( अन्तर्वेदि ), यांत सुपीक जमीन आहे तथापि काहीं ठिकाणीं ओहोळ पडलेले आहेत, तो भाग ओसाड आहे. ( २ ) गंगेपलीकडील प्रदेश हा सुपीक असून यांत पुष्कळ झिलीं ( दलदलीची जमीन ) आहेत; तेथें भाताचें पीक येतें. ( ३ ) यमुनेपलीकडील प्रदेश. हा सर्वांत मोठा भाग असून लहान टेंकड्या येथें फार आहेत. बुंदेलखंडी भागाप्रमाणें हा भाग आहे.

व न स्प ती.—गंगानदीच्या उत्तरेस आंबराया विपुल आहेत. इतर झाडें:—मोह, पिंपळ, पळस, बाभूळ इत्यादि

रा न टी प्रा णी.—रानडुकर, कोल्हे, लांडगे इ

ह वा मा न.—हवा निरोगी असते. यमुनेच्या दक्षिणेस उन्हाळ्यांत उष्णतामान फार असतें. अलाहाबाद येथें सावलीतील उष्णतामान ११३°–११४° पर्यंत चढतें. पावसाची सरासरी ३७ इंच. परंतु यांत फेरबदल नेहमीं होतो. उदाहरणार्थ, स. १८८० सालीं फक्त १७ इंच पाऊस पडला व सन १८९४ सालीं ७६ इंच पडला.

इ ति हा स.—पांडवांनीं आपल्या वनवासापैकीं काहीं दिवस वारणावतास घालविले तोच अलाहाबादच्या सभोंवतालचा प्रदेश असें म्हणतात. राम आणि सीता यांनीं देखील आपला वनवास काहीं दिवस या भागांत केला असें म्हणतात. दक्षिणेकडे असलेलें कोसल हें महाभारत व पुराणें यांत उल्लेखिलेली कौशांबीच होय असा अद्यापि समज आहे.

चवथ्या व पांचव्या शतकांत हा भाग मगधाचे गुप्त राजे यांच्या राज्यांत मोडत होता,व सातव्या शतकांत कनोजचा राजा हर्षवर्धन याच्या राज्यांतील हा भाग होता असें चिनी प्रवाशी प्रसिद्ध ह्युएनत्संग यानें लिहून ठेवलेल्या हकीकतीवरून दिसतें

यानंतर इ स. ११९४ सालापर्यंतचा काहीं एक इतिहास उपलब्ध नाही. या सालीं शहाबुद्दीन घोरीनें स्वारी केली व हा भाग मुसुलमानांनीं जिंकला. त्यावेळेपासून ब्रिटिश अंमल सुरु होईपर्यंत हा भाग मुसुलमानी अमलाखालीं होता. तेराव्या व चौदाव्या शतकांत कडा येथील सुभेदाराच्या हुकमतीखालील हा भाग होता. कडा येथेंच सन १२८६ सालीं मुइझुद्दीन आणि त्याचा बाप यांची इतिहासांतील भेट झाली मुइझुद्दीन हा त्यावेळीं बलबनच्या मागें दिल्लीच्या तक्तावर बसला होता व त्याचा बाप या गोष्टीस विघ्न आणण्याकरता बंगालकडे जात होता. या बापलेकांची भेट कडा येथें झाली व निष्कारण रक्तपात करण्यांत अर्थ नाहीं या सद्हेतूनें प्रेरित होऊन गंगा नदीच्या प्रवाहाच्या मध्यभागीं होड्यामध्यें यांची भेट झाली व दोघांनीं बरोबर दिल्लीस कूच केलें. पुढें तेराव्या शतकाच्या अखेरीस अलाउद्दीनाच्या ताब्यांत हा होता व माणिकपूर आणि कडा यामधील गंगानदीच्या वाळवंटांत अलाउद्दीनानें आपला वयोवृद्ध चुलता सुलतानफेरोजशाहा याचा नीचपणानें खून केला. यापुढें या भागांत फार बंडाळी चालू होती. इ. स. १५२९ च्या सुमारास बाबरानें हा प्रदेश पठाणापासून जिंकला. शहाजादा सेलीम (जहांगीर) हा आपल्या बापाच्या कारकीर्दींत येथील सुभेदार होता. त्यावेळीं तो अलाहाबाद येथें रहात असे. अठराव्या शतकाच्या प्रारंभीं बुंदेल्यांनीं छत्रसालराजाच्या निशाणाखालीं जमून मोगलाची सत्ता उलथून पाडण्यास आरंभ केला होता, आणि त्यावेळीं बुंदेले व मराठे यांनीं हमीरपूर आणि बांदा जिल्हे ज्या भागांत येतात तो भाग लुटला होता. पुढें कधीं हा भाग अयोध्येच्या नबाबाकडे तर कधीं मराठ्यांकडे असे. सन १७६५ सालीं ब्रिटिशांनीं पुन्हा हा प्रदेश दिल्लीचा नामधारी बादशहा शहाअलम यास परत मिळवून दिला. काहीं वर्षें मोंगल बादशहाचा दरबार अलाहाबाद येथेंच भरत असे. परंतु इ. स. १७७१ सालीं शहाअलम पुन्हा दिल्लीस गेला व मराठ्यांच्या तंत्रानें वागूं लागला; म्हणून ब्रिटिशांनीं पूर्वेकडील प्रदेश खालसा करून तो परत अयोध्येच्या नबाबास ५० लाख रुपयास विकला. स. १८०३ पर्यंत शहाअलम हा मराठ्यांच्या ताब्यांत होता त्या सालीं लॉर्ड लेक यानें त्यास मराठ्यांच्या हातुन मोकळें केलें. मध्यंतरी अयोध्येच्या नबाबानें कबूल केलेली खंडणी ब्रिटिशास न दिल्यामुळें अडचणी उपस्थित झाल्या होत्या. पण इ. स. १८०१ सालीं गंगा व यमुना यामधील प्रदेश ब्रिटिशास देण्याचें अयोध्येच्या नबाबानें कबूल केल्यामुळें तो तंटा विकोपास गेला नाहीं यांचवेळीं अलाहाबाद जिल्हा ब्रिटिशाकडे आला. इ. स. १८५७ च्या बंडांत अलाहाबादचे शिपाई बंडांत सामील होऊन त्यांनीं आपल्या अधिकाऱ्यांची कत्तल केली. पुढें लवकरच मदत आल्यावर सर्वत्र शांतता झाली.

या जिल्ह्यांत प्राचीन वस्तू विपुल आहेत. ख्रिस्ती शकापूर्वी तिसऱ्या शतकांत बांधलेल्या अशोकाच्या वेळच्या स्तंभापासून तों मोगलांच्या वेळीं बांधलेल्या भव्य इमारती प्रेक्षणीय आहेत. कोसम, झुसी आणि गऱ्हा येथें गुप्तांच्या वेळचे शिलालेख सांपडले आहेत.

लोकसंख्या (१९२१) १४०४४४५ आहे. एकंदर खेडीं ३४७३ व गांवें १३. या जिल्ह्यात नऊ तहशिली आहेत—अलाहाबाद, सिराथू मंझनपूर, सोरान, फूलपूर, हंडिआ, कर्चना, बार, आणि मेजा.

एकंदर लोकसंख्येपैकीं हिंदु शेकडा ८६, मुसुलमान शेकडा १३; आणि ख्रिश्चन ६८००; पूर्वेकडील व पश्चिमेकडील भागात हिंदी भाषा बोलतात. गंगानदीचे काठच्या प्रदेशात चांगलीं पिकें येतात. पावसाळ्यात येथें पुराचें पाणी असतें. उंसाची लागवड या जिल्ह्यात बरीच होते. झिल नावाच्या जमिनींत भात पिकतें, गळिताचीं धान्यें मोठ्या प्रमाणावर पिकतात. यमुनेच्या आसपासचा कांहीं भाग तालुकदारी पद्धतीवर आहे. मुख्य पिकें—ज्वारी, बाजरी, मातु, गहूं, गळिताचीं धान्यें, अफू, ऊंस, ताग, इत्यादि. गुरांची अवलाद साधारण असून घोड्यांची पैदास कोणी या जिल्ह्यात करीत नाहीत. खनिज पदार्थ—सँडस्टोन, कंकर हे आहेत. या जिल्ह्यात मोठ्या प्रमाणावर असे कांहीं उद्योगधंदे चाललेले नाहींत. ईस्ट इंडियन रेल्वेचा मुख्य रस्ता या जिल्ह्यातून जातो. या जिल्ह्यात अलाहाबाद येथेंच फक्त म्युनिसिपालिटी आहे. तिचें उत्पन्न (१९०३-४) १·७ लाख खर्च १·६लाख रुपये होतो.

**तहशील.**—(संयुक्त प्रांत) अलाहाबाद जिल्ह्यांतील तहशील. उत्तर अ. २५°१७′ ते २५°३५′ व पूर्वरेखांश ८१°२८′ ते८१°५५′.क्षेत्रफळ २९६ चौरस मैल. ह्यांत दोन गांवें व ३०८ खेडी आहेत. लो. सं. (१९०१) ३,३८,८२० जमीनमहसूल ३०७००० रु इतर कर ५१०००. इ स. १९०३-४ सालीं होता. २१० चौ. मैल जमीन लागवडीस, पैकीं ४५ चौरस मैल पाटाच्या पाण्याखालीं होती. विहिरींच्या पाण्यावर सुमारें दोन तृतीयांश जमीन भिजते.

**शहर.**—(संयुक्त प्रांत.) अलाहाबाद जिल्ह्याचें मुख्य शहर. संयुक्त प्रांतांचे सरकार येथेंच असतें. उ. अ. २५° २६′ व पूर्व रे. ८१°५०′.यमुनेच्या वामतीरावर हें शहर वसलें असून जवळच गंगायमुना या नद्यांचा संगम झाला आहे. हें शहर आगगाडीनें कलकत्त्यापासून ५६४ मैल व मुंबईहून ८४४ मैल आहे. लोकसंख्या (१९२१)१५७२२०.

**इतिहास.**—या शहरचें हिंदु नांव प्रयाग असून गंगायमुनांचा संगम झाल्यामुळें हें तीर्थाचें स्थान समजतात. पंजाबच्या नैर्ऋत्य प्रदेशांतील वाळवंटात गुप्त झालेल्या सरस्वती नदीचें याठिकाणी पुन्हा तिचें दर्शन होऊन येथेंच तीन नद्यांचा त्रिवेणीसंगम होतो अशी श्रद्धाळु लोकांची समजूत आहे. प्रयागास मुख्य तीर्थें पुढील होतः—त्रिवेणी, माधव, सोमेश्वर, भारद्वाजेश्वर, वासुकीश्वर, अक्षय्यवट, शेष, प्रयाग, वेणीमाधव, भागीरथी, सरस्वती, यमुना. या क्षेत्रीं सर्वांनी (जीवत्पितृकांनीं देखील) मुंडन करावें अशी रूढी आहे. सौभाग्यवती स्त्रिया वेणीदान करतात दक्षिण हिंदुस्थानांतील (द्राविडी) स्त्रिया तर सर्वच केशभार काढून टाकितात। वपनाला पुराणांर्गत म्हणविणाऱ्या प्रयाग महात्म्याचा आधार आहे या क्षेत्राला तीर्थराज असें म्हणतात. व याचा महिमा पुराणात बराच वर्णिलेला आढळतो.

**पुराण वस्तुः**—ख्रिस्ती शकाच्या पूर्वी तिसऱ्या शतकात उभारलेला एक स्तंभ हल्लीं किल्ल्यात असून त्यावर अशोकाच्या वेळचा लेख कोरलेला आहे. तसेंच चवथ्या शतकांतील समुद्रगुप्ताच्या वैभवाचें वर्णन खोदलेला असा एक स्तंभ आहे. त्याचप्रमाणें जहांगीर बादशहाच्या वेळचा एक स्तंभ आहे. परंतु हा अशोकाच्या वेळचा असावा असें वाटतें कारण त्यावर कौशांबीच्या राजाना उद्देशून मजकूर खोदलेला आहे सातव्या शतकांत या शहरात ब्राह्मणानुयायी लोक फार रहात असून ते ही जागा फार पवित्र मानतात असें चिनी प्रवासी ह्युएनत्संग यानें लिहून ठेविलें आहे. एका देवळासमोर एका जुनाट वृक्षावरून मोक्ष मिळण्याकरतां म्हणून धर्मभोळे लोक उडी घेत असत असें त्यानें वर्णन केलें असून हीच गोष्ट सोळाव्या शतकांतील मुसुलमानी इतिहासकारांनी वर्णन केली आहे. पुढें हा वृक्ष जहांगिरानें पाडून टाकला असें म्हणतात. हल्लीं भूम्यंतर्गत देवळासमोर एका वृक्षाचें खोड यात्रेच्या वेळीं तेथील पुजारी दाखवितात व त्यास 'अक्षय्य वट' असें म्हणतात. फा-हिआन (इ. स. ४१४)या चिनी प्रवाशासहि प्रयाग माहीत होते मुसुलमानी अमलाच्या पूर्वकाळांत कडा सुभ्यामध्यें प्रयाग मोडत असून त्यावेळीं तें महत्त्वाचें मानलें जात नव्हतें पुढें अकबरानें येथील किल्ला बांधला (१५७२) त्यावेळेपासून यास अलाहाबास, इलाहाबास, अशीं नांवें पडलीं व तें सुभ्याचें मुख्य ठिकाण झालें. (अलाहाबाद जिल्हा पहा.) इ. स. १७३९ सालीं मराठे अलाहाबादपर्यंत येऊन भिडले होते. इ स १८०१ सालीं हा भाग ब्रिटिशांकडे आला. इ. स. १८३४ सालीं या प्रांताचें मुख्य ठिकाण आग्रा येथें नेमण्यांत आलें. तथापि बंडानंतर तें पुन्हां अलाहाबाद येथें आणण्यात आलें.

इ. स. १८५७ च्या बंडांत अलाहाबाद येथें ठेवलेलें सैन्य बंडात सामील झाले होतें. जो सांपडेल तो युरोपियन ठार करावयाचा असें चाललें होतें. त्यावेळीं कोणी एका मौलवीनें आपल्या हातीं सत्ता घेऊन मोगल पातशहाच्या नांवानें द्वाही फिरविली. या बंडांत सर्व शहर बंडवाल्यांनीं लुटलें. अशी अंदाधुंदी फक्त सहाच दिवस होती (जून ६ ते जून ११). ब्रिटिशांचें सैन्य आल्यावर पुन्हां स्थिरस्थावर झालें व बंडवाला मौलवी पळून गेला. त्यानंतर शहरांत कांहीं गडबड झाली नाहीं.

प्रयाग यमुना नदीवर वसलेलें असून किल्ला गंगायमुना यांच्या संगमावर आहे. गांवातील इमारती विशेष चांगल्या नसून रस्ते फार अरुंद आहेत बंडानंतर जो दारागंज म्हणून कँप वसविला आहे. तेथील रस्ते रुंद असून कांहीं श्रीमंत व्यापाऱ्यांचें बंगले तिकडे झाले आहेत. किल्ल्यात पुष्कळ फेरबदल झाल्यामुळें पूर्वकालचें काम त्याच स्थितींत पहावयास मिळत नाहीं, म्हणून त्या दृष्टीनें किल्ल्याचें महत्व कमी झालें आहे. किल्ल्याखालीं विस्तृत वाळवंट असून तेथें मोठी यात्रा भरते. सन १८९४ सालीं मुख्य दिवशीं दहा लाख लोक स्नानाकरतां जमले होते असें म्हणतात. दरवर्षी येथें माघ–मेळा भरतो; दरसहा वर्षांनीं अर्धकुंभ मेळा व बारा वर्षांनीं कुंभ–मेळा भरतो. तेव्हा लाखों यात्रेकरून त्रिवेणीसंगमावर स्नानास जमतात. येथील प्रयागवळ इतर क्षेत्रांच्या भिक्षुकाप्रमाणेंच यात्रेकरूंशीं वागतात. प्रयागच्या पश्चिमेस खुश्रु बाग असून त्यात त्याचें, त्याच्या आईचें व बहिणीचें अशीं तीन थडगीं आहेत. हा बाग जहांगिरानें तयार केला होता. या खुश्रूनें अकबर मरण पावल्यावर दिल्लीचें तख्त मिळविण्याचा घाट घातला होता, परंतु त्यास यश आलें नाहीं व कैदेंत पडावें लागलें. सरकारी कचेऱ्या, हायकोर्ट, डिस्ट्रिक्ट कोर्ट, म्यूर सेंट्रल कॉलेज, मेयो मेमोरियल हॉल वगैरे इमारती अलीकडील असून चांगल्या आहेत. यमुनेच्या दक्षिण तीरावर नैनी येथें मुख्य तुरुंग आहे.

इ. स. १८६३ सालीं येथें म्युनसिपालिटी स्थापन झाली. सन १९०३—४ मध्यें उत्पन्न ४.५ लाख व खर्च ४.५ लाख. रुपये होता. अलाहाबादेस पाणी पुरवठा उत्तम आहे. यमुनेचें पाणी १७.२ लाख रुपये खर्चून गावांत आणलें आहे. पाणी फिल्टर केलेले असतें.

व्यापारः—येथें मोठ्या प्रमाणावर असा व्यापार होत नाहीं, पण येथें बाजार मात्र मोठा भरतो. ईस्ट इंडियन रेल्वेचें हें एक मुख्य स्टेशन असून दुसऱ्या छोट्या लाईन्स येथूनच निघत असल्यामुळें त्या टापूंत यास महत्त्व आलें आहे. येथून धान्य व गळिताचीं धान्यें बाहेर जातात. व धान्य, साखर, तूप, व इतर माल या जिल्ह्यात येतो. सरकारी छापखान्यात १९०३ सालीं १०३१ लोक कामावर होते. शिवाय दुसरे लहान मोठे असे ३६ छापखाने त्यावेळीं होते. विटा व कौलें याचे मोठे कारखाने येथें आहेत. दोन साखरेचे, तीन कातडीं कमावण्याचे, दोन साबणाचे एक दारू गाळण्याचा, व एक तेलाचा असे कांहीं कारखाने चालतात.

शिक्षणः—हें शहर संयुक्त प्रांतातील केंद्र आहे. येथें अलाहाबाद विश्वविद्यालय आहे. एक कॉलेज व पुष्कळ हायस्कूल व दुय्यम आणि प्राथमिक शिक्षणाच्या शाळा आहेत. १७। १८ नियतकालिकें येथें प्रसिद्ध होतात. गांवांत निरनिराळ्या हिंदी यूरोपियन संस्था आहेत. हिंदी भाषेचा अभिमान धरणाऱ्या अनेक संस्था पंडित मदन मोहन मालवीय याच्या नेतृत्वाखालीं येथें कार्य करीत आहेत.

तहशील.—( पंजाब. ) भावलपुर संस्थान व निझामत मधील एक तहशील. उ. अ. २९° ४२′ ते २९° १२′ व पू. रे. ७०° ३८′. ते ७१° ५. क्षेत्रफळ १३५५ चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ ) ५७५१७ यात अलाहाबाद गाव ( लोकसंख्या २८६८ ) खानबेला व जानपुर अशीं दोन म्युनसिपालिट्या असलेलीं गावें व ६५ खेडीं आहेत. येथील जमीन अत्यंत सुपीक आहे परंतु प्रदेश फार सखल असल्यामुळें अति रोगट आहे. उत्पन्न ( एकंदर ) सन १९०५–०६ मध्यें २ लाख रुपये होते.

गाव.—( पंजाब ) भावलपुर संस्थानांतील अलाहाबाद तहशिलीचें मुख्य ठिकाण. उ अ २८° ५७ पू रे ७०°५३′ हा गाव भावलपुर गावाच्या नैर्ऋत्येस ५६ मैलावर आहे. लोकवस्ती सन (१९०१) २८६८ हा गाव भावलपुरचा नबाब सादिक अहमदखान ( पहिला) यानें इ स. १६६० सालीं वसविला. येथें तांदुळ व खजूर याचा मोठा व्यापार चालतो. म्यु. पा. चें उत्पन्न ( इ. स १९०३–४ ) ३१०० रुपये ( इं. गॅ. ५–१९–८ ).

**अली आदीलशहा,** पहिला, ( इ स. १५५७–१५८० )—विजापूरच्या आदिलशाही घराण्यातील पांचवा राजा. हा पहिल्या इब्राहिम आदिलशहाचा पुत्र असून त्याच्या मृत्यूनंतर विजापूरच्या गादीवर बसला. याचा लहानपणापासून शियापंथाकडे ओढा असल्यामुळें, स्वतःस विषप्रयोग करण्याच्या कटात याचें अंग असावें अशी शंका येऊन याच्या बापानें यास मिरजेच्या किल्ल्यात अटकेंत ठेवलें होतें. इ. स १५५७ त इब्राहिम आदिलशहा वारल्यावर आसदखानाचा पुत्र किश्वरखान याच्या मदतीनें हा गादीवर आला. सिंहासनारूढ होताच यानें आपल्याविरुद्ध आपल्या भावानीं बंडें करूं नयेत म्हणून तहमासीप व दुसरे दोघे बंधू यास कोणाचे डोळे काढून, कोणाचें नाक कापुन तर कोणाचीं बोटें कापून प्रतिबंधात ठेविले ( मीर इब्राहिम आसदखान ) त्याच्याप्रमाणें त्यानें शिया पंथाचा जाहीरपणें पुरस्कार करून आपल्या आजोबाच्या वेळेप्रमाणें सर्व राज्यात इमामाच्या नावानें खुत्बा वाचण्याविषयीं हुकूम पाठविले.

विजयानगरशीं दोस्ती.— आपल्या वडिलाच्या कारकीर्दीत हुसेन निजामशहानें काबीज केलेले कल्याणी व सोलापूर हे किल्ले आपण केव्हा परत मिळवूं अशी अली आदिलशहास फार उत्कंठा लागली होती. म्हणून त्यानें पहिल्याच वर्षी विजयानगरच्या रामराजाशीं स्नेह करण्याच्या इच्छेनें विजयानगरास आपले वकील रवाना केले व त्याच सुमारास रामराजाचा पुत्र मरण पावल्यामुळें सांत्वनाचें निमित्त करून त्यानें स्वतःहि फक्त १०० स्वारानिशीं विजयानगरास जाऊन रामराजाची भेट घेतली ही भेट मोठ्या थाटाची झाली. या भेटीत रामराजाकडून अलीआदिलशहानें

जरूर पडेल तेव्हां आपल्या शत्रूविरुद्ध कुमक करण्याचें कबूल करून घेतलें.

**रामराजाच्या सहाय्यानें कल्याणी काबीज.**—यानंतर आदिलशहानें हुसेन निजामशहाकडे वकील पाठवून कल्याणी व सोलापूर हे दोनहि किल्ले किंवा निदान त्यापैकीं एक तरी परत करण्याविषयीं मागणें केलें. निजामशहानें अर्थातच ही मागणी धुडकावून लावली. आदिलशहानेंहि असें उत्तर मिळालें तर काय करावयाचें तें अगोदर ठरवून ठेविलें होतेंच. इ. स. १५५८ मध्यें त्यानें रामराजाची कुमक घेऊन निजामशाही मुलुखावर स्वारी केली. व पराण्ड्यापासून जुन्नरापर्यंत व अहमदनगरपासून दौलताबादेपर्यंत सर्व मुलूख उध्वस्त करून टाकला. आपल्या मंत्र्याच्या सल्ल्यानें हुसेन निजामशहा शत्रूशी मैदानात सामना न करता पैठणास गेला, व कांहीं काळानें कल्याणीचा किल्ला आदिलशहास देऊन त्याशीं तह करता झाला. या स्वारींतच विजयानगरच्या हिंदूंची प्रथम मगरूरी दिसूं लागली. असें सांगतात कीं, त्यांनीं मुसलमानी स्त्रियांची विटंबना केली, मशिदी वगैरे पाडल्या, लहान लहान घरांसहि आग लावली व कुराणाची प्रतिष्ठा ठेविली नाहीं; इतकेंच नव्हे तर आदिलशहा व त्याचे लोक यांचाहि त्यांनी अत्यंत अपमान केला.

**निजामशहाचा कल्याणीस वेढा व त्याशीं पुन्हां युद्ध.**—या पराभवाचा वचपा काढण्यासाठीं हुसेन निजामशहानें प्रथम इब्राहिम कुतुबशहास आपली कन्या देऊन त्याची दोस्ती मजबूत केली. नंतर दुसऱ्या वर्षी तो कुतुबशहा व इमाद उल्मुल्क यांचीं सैन्यें घेऊन विजापूरच्या मुलुखावर चालून गेला व नुकताच किल्ला परत केला होता त्यास त्यानें वेढा दिला. आदिलशहानें या स्वारीची हकीकत रामराजास कळवितांच तो ५०,००० स्वार व पुष्कळ पायदळ घेऊन कृष्णातीरीं आदिलशहास येऊन मिळाला, व तेथून त्या दोघांनीं कल्याणीच्या रोखें कूच केलें. या किल्ल्यास निजामशहा व कुतुबशहा यांच्या सैन्याचा वेढा पडला होता. पण आदिलशहाची तयारी जास्त पाहून इब्राहिम कुतुबशहा आपल्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें जोरदार पक्षास येऊन मिळाला. हें पाहून निजामशहाचें धैर्य सुटलें. तो आपलें सामान सरंजाम जागच्या जागीं टाकून अहमदनगरास आला, व शत्रूचें सैन्य तेथेंहि त्याचा पाठलाग करीत आलें. तेव्हां तो किल्ल्यावर फौजसामग्री चढवून स्वतः जुन्नरास गेला. आदिलशहाच्या व त्याच्या दोस्तांच्या फौजांनीं अहमदनगरास वेढा घालून आसपास देश ओसाड पाडण्यास फौजेच्या टोळ्या रवाना केल्या. तथापि किल्ल्यांतील लोक पर्जन्यकाळास आरंभ होईपर्यंत नेटानें टिकाव धरून राहिले. पावसाळ्यास सुरवात होतांच नद्यांस पूर येऊन वेढा घालणाऱ्या सैन्यास दाणावैरणीची टंचाई पडूं लागून त्यांचे हाल होऊं लागले. उलटपक्षीं कुतुबशहा आंतील लोकांशीं दळण-वळण ठेवून त्यास दाणावैरण पोंचवूं लागल्यामुळें ते लवकर शरण येतील असा रंग आदिलशहास दिसेना. मागील स्वारीपेक्षांहि या स्वारींत हिंदूंचें वर्तन अधिक मगरूरीचें असल्यामुळें तो मोहिमेस कंटाळला होता. त्यानें प्रथम रामराजास अहमदनगरचा वेढा उठवून सोलापुरावर चालून जाण्याचा सल्ला दिला. पण तो किल्ला हस्तगत झाल्यावर हिंदूच स्वतः तो बळकावून बसणार नाहींत कशावरून अशी कीश्वरखानानें आदिलशहास दहशत घातल्यावरून आदिलशहानें रामराजाच्या मदतीनें त्यावेळीं नळदुर्ग नावाचा दुसराच एक किल्ला काबीज करून ती मोहीम संपविली.

**मुसलमानी राज्यांचें हिंदूविरुद्ध जूट व विजयानगरचा पाडाव.**—वरील स्वारीस निघण्यापूर्वीं मुसुलमानास विनाकारण उपद्रव दिला जाऊं नये असा आदिलशहानें रामराजाशीं अगोदर करार करून घेतला होता, तरी त्या स्वारींत रामराजाच्या वर्तनात मागच्याहूनहि अधिक स्वैरपण दिसून आला. रामराजानें नळदुर्गाहून स्वदेशीं जातांना मार्गांत आपला दोस्त आदिलशहा याच्या इलाख्यांतील गाव सुद्धां दांडगेपणानें लुटण्यास कमी केलें नव्हतें. शिवाय विजयानगरास जातेवेळीं आपला भाऊ वेंकटाद्रि यास थोड्या फौजेनिशीं मुसुलमानाचे गांव लुटण्यास त्यानें मागें ठेविलें. पुढें कांहीं दिवसांनीं आदिलशहा व कुतुबशहा यांचा मुलुख घेण्याच्या इच्छेनें त्यानें सरहद्दीवर आपली फौज रवाना केली. या समयीं यादगीर व बागलकोट हे दोन महाल देऊन त्यास वाटेस लावणें अदिलशहास प्राप्त झालें. बहामनी राज्यांतील एकजूट नाहींशी झाल्यामुळें रामराजा हा आपणां सर्वांस भारी होऊन आपल्याला तुच्छ लेखूं लागला आहे ही गोष्ट आतां आदिलशहाच्या चांगली ध्यानात आली. म्हणून त्यानें दक्षिणेंतील सर्व मुसुलमानी राजांना एकत्र करून विजयानगरचा पाडाव करण्याचें ठरविलें. प्रथम त्यानें कीश्वरखानामार्फत कुतुबशहापुढें आपलें म्हणणें युक्तीनें मांडून त्याची आपल्या मसलतीस संमति मिळविली; व नंतर कुतुबशहाच्या मध्यस्तीनें अहमदनगरच्या हुसेन निजामशहाशीं बोलणें लाविलें. या वाटाघाटींत हुसेनशहानें आपली कन्या चांदबीबी ही अली आदिलशहास देऊन तिजबरोबर सोलापूरचा किल्ला वरदक्षिणा म्हणून द्यावा, व अली आदिलशहानें आपली बहीण बीबी हादिसुलताना ही हुसेनशहाचा पुत्र मूर्तिजा यास द्यावी, असें ठरून आदिलशाही व निजामशाही राजांची एकी संपादण्यात आली. ठरल्याप्रमाणें विवाह पार पडताच अली आदिलशहा, हुसेन निजामशहा, इब्राहिम कुतुबशहा, व अली बेरीदशहा यांनी रामराजाविरुद्ध स्वारी करण्याची जंगी तयारी चालविली.

युद्ध करण्यास कुरापत काढण्यासाठीं अली आदिलशहानें रामराजाकडे वकील पाठवून यादगीर, मुदगल, रायचूर, बागलकोट हे किल्ले त्याजबद्दल परत मागितले. अगोदर मांडीत

केल्याप्रमाणें रामराजानें वकीलाची पुष्कळ निर्भत्सना करून त्यास दरबारांतून हांकून लाविलें होतें एकत्र झालेल्या मुसुलमानी राजांनीं रामराजाशीं युद्ध करण्यास हें कारण पुढें केलें. इ. स. १५६४ सालीं जमादिलावल महिन्याच्या २० व्या तारखेस चारहि राजांच्या फौजा विजापुरीं जमा होऊन युद्धास निघाल्या. या मुसुलमानी राजांची व विजयानगरच्या सैन्याची तालीकोट नजीक मोठी लढाई होऊन तींत रामराजा मारला जाऊन विजयानगरच्या सैन्याचा पूर्ण मोड झाला (तालीकोटची लढाई पहा). या लढाईनंतर मुसुलमानानीं विजयानगरवर चाल करून जाऊन, तें शहर लुटून तेथील मोठमोठ्या इमारती पाडून व देश जिकडे तिकडे उध्वस्त करून तें वैभवशाली हिंदु साम्राज्य रसातळास नेलें.

हु से न शा हा चा मृ त्यु व नि जा म शा ही व र स्वा री — तालीकोटच्या लढाईनंतर हुसेन निजामशाहा लवकरच मरण पावला (इ. स. १५६५). त्याच्या मागून गादीवर बसलेला त्याचा पुत्र मूर्तिजा हा अल्पवयी असल्यामुळें कर्नाटकांत आपल्या राज्याचा विस्तार करण्यास ही संधि बरी आहे असा विचार करून आदिलशहानें रामराजाचा भाऊ वेंकटाद्रि हा तालीकोटच्या लढाईनंतर पेणकोंड्याचा आश्रय घेऊन राहिला होता त्यावर स्वारी केली. वेंकटाद्रीला हें समजताच त्यानें मूर्तिजा निजामशहाच्या आईकडे कुमक मागितली. आदिलशाहीचा विस्तार निजामशाही राजाना इष्ट नसल्यामुळें मूर्तिजाच्या आईनें आपल्या एका सरदारास फौज देऊन विजापुरावर पाठविलें. यामुळें आदिलशहास मोहिमीचा बेत रहित करून विजापुरास परत यावें लागलें. तेव्हां इष्ट हेतु साध्य झाल्यानें निजामशाही सैन्याहि आदिलशहाच्या सैन्याशीं तुरळक लढाया देऊन आपल्या राज्यांत परत गेलें. पुढील सालीं अहमदनगरकराच्या बोला. वण्यावरून आदिलशहा निजामशहाच्या सैन्याबरोबर जाऊन वऱ्हाडांतील कांहीं प्रांत उध्वस्त करून वरसातीपूर्वी परत आला. याच वर्षी विजापुरासभोंवतालचा दगडी तट पुरा झाला यानंतर निजामशाही राज्यात घोंटाळे माजल्याचें ऐकून इ. स. १५६७ सालीं आदिलशहानें कीश्वरखानास पाठवून त्या राज्यांतील कांहीं प्रांतांत बिनहरकत अंमल बसविला, व हस्तगत केलेल्या मुलुखाच्या सरक्षणार्थ धारूर नावाचा एक नवीन किल्ला तेथें बांधला. पण हा मुलुख व किल्ला आदिलशहास फार काळ लाभला नाहीं. मूर्तिजा निजामशहानें वयांत येताच धारूरवर स्वारी केली व आदिलशहाच्या दरबारांतील सरदाराच्या मत्सरामुळें कीश्वरखान मारला जाऊन व आदिलशाही सैन्याची दुर्दशा होऊन निजामशहास आपला मुलुख विशेष प्रयास न करता परत मिळाला.

गो व्या व री ल स्वा री.—इ. स. १५६८ मध्यें आदिलशहानें पोर्तुगीज लोकांपासून गोवें परत घेण्याकरितां तिकडे स्वारी केली, परंतु त्यास यश न मिळतां मागें फिरावें लागलें तथापि या मोहिमींत रामराजाच्या एका स्वतन्त्र झालेल्या अधिकाऱ्याच्या ताब्यांत असलेला अदवानी नांवाचा आजपर्यंत अजिंक्य मानलेला किल्ला त्याच्या हस्तगत झाल्यामुळें त्याची सर्वत्र वाहवा झाली (अदवानी पहा) यानंतर आदिलशहानें निजामशहाशीं बोलणें लावून, त्याला वऱ्हाडचा मुलुख आपल्या राज्यांत सामील करण्यास मुभा देऊन स्वत:ला विजयानगरच्या मुलुखापैकीं साधेल तेवढा जिंकण्यास रानरोमपणें मोकळें करून घेतलें.

क र्ना ट कां तीं ल मो ही म.—वरील करार झाल्यामुळें आदिलशहास दक्षिणेकडे राज्याचा विस्तार करण्याचा आपला फार दिवसाचा बेत सिद्धीस नेतां आला. इ. स. १५७३ सालीं त्यानें रामराजानें पूर्वी विजापूरपासून घेतलेल्या आणि त्याच्या मरणानंतर वेंकटी येसूराय नांवाच्या विजापूरच्याच एका स्वतंत्र झालेल्या अधिकाऱ्याच्या ताब्यांत असलेल्या तोरगल नामक किल्ल्यावर चाल करून जाऊन सात महिन्यांच्या वेढ्यानंतर तो काबीज केला नंतर तो धारवाडास गेला. हा किल्ला रामराजाच्या भावास थोडी खंडणी देत असलेल्या विजयानगरच्या एका जुन्या कामगाराकडे होता त्यापासून तो आदिलशहाचा कारभारी मुस्तफाखान यानें सहा महिने वेढा देऊन काबीज केला नंतर त्यानें बंकापुराकडे आपला मोर्चा फिरवला. हा किल्ला वेलपाराय नांवाच्या रामराजाच्या मर्जीतील एका सरदाराकडे असून त्यास जेर, चंद्रगुडी व कारूर येथील राजांपासून खंडणी मिळत होती आसपासचे राजेहि याच्या मदतीस आले, व त्यांच्या कर्नाटकी शिपायांनीं आदिलशहाच्या छावणीवर रात्रीच्या वेळीं छापे घालून त्यास जेर करून टाकलें तथापि आदिलशहानें बरगी स्वारांच्या मदतीनें या लोकाचा प्रतिकार करून पधरा महिने वेढ्याचें काम चालवून तो किल्ला हस्तगत केला. बंकापूर हस्तगत झाल्यावर आदिलशहानें ऐषआराम करण्यासाठीं त्या किल्ल्यावर आपलें वास्तव्य करून मुस्तफाखानाकडे सर्व कारभार सोंपविला. यानंतर मुस्तफाखानानें जेरच्या रायाकडून खंडणी घेतली. चंद्रगुंडीस वेढा देऊन १४ महिन्यात तो किल्ला काबीज केला. या वेढ्याच्या प्रसंगींहि चंद्रगुंडीच्या कुमकेस आलेल्या आसपासच्या राजाशीं लढण्याच्या कामीं बरगी सरदाराचा फार उपयोग झाला. चंद्रगुंडी काबीज झाल्यावर आदिलशहा त्या किल्ल्यावर आला व मुस्तफाखानास बंदोबस्त करण्यास मागें ठेऊन आपण स्वतः निघाल्यापासून तीन वर्षांनीं विजापुरीं परत आला.

पुढील सालीं आदिलशहाच्या हुकुमावरून जुन्या विल्लयाच्या जागेवर नवीन किल्ला बांधण्यास सुरुवात होऊन एक वर्षांत तो तयार झाला तो पाहण्यास आदिलशहा कर्नाटकांत आला असतां कारूरच्या ठाकर न भेटीस येऊन त्यास स्वतः खंडणी देण्याचें

धारसिलेरची राणी व इतर राजे यांच्याकडूनहि नी देवविली. कर्नाटकांत नवीन संपादन केलेल्या मुलुखाची व्यवस्था करून आदिलशहानें जमावंदीकडे एका ब्राह्मणास नेमिलें व मुस्तफाखानास सर्व सैन्याचें आधिपत्य देऊन तो विजापुरी परत आला. कांहीं दिवसानंतर मुस्तफाखानाच्या सल्ल्यावरून आदिलशहा पेणकोंडा काबीज करण्यास पुन्हा दाक्षिणेकडे गेला. आदिलशहा येताच वेंकटाद्रि एका सरदाराच्या ताब्यांत किल्ला देऊन चंद्रगुंडीस गेला. इकडे तीन महिन्यांत वेढ्यांतच पेणकोंड्यांतील दाणासामुग्री खलास होऊन आंतील लोक शरण येण्याच्या बेतांत आले, पण वेंकटाद्रीनें विजापूरच्या बरगी लोकांच्या सरदारास २४ लाख रुपये लाच देऊन फितूर केलें, व त्याच्या कडून विजापूरच्या सैन्यास इतका त्रास देवविला कीं आदिलशहा वेढा उठवून बंकापुरावरून विजापुरास परत आला.

बरगी सरदाराचा पुंडावा व त्याचा वध.—पुढील वर्षी म्हणजे इ. स. १५७८ त बरगा सरदारांनीं विजयानगरच्या आसपास आपल्या मुलुखास पुंडावा आरंभिला. आदिलशहानें त्यांच्या बंदोबस्तास आपल्या पदरच्या परदेशी, दक्षिणी व हबशी लोकांस पाठविलें. परंतु सतत एक वर्ष लढूनहि या लोकांस बरगींचा बंदोबस्त करतां आला नाहीं. तेव्हां मुस्तफाखानाच्या सल्ल्यावरून शहानें बरगी सरदारास आश्वासन देऊन आपल्या दरबारीं बोलाविलें व शेवटीं बहुतेकांस विश्वासघातानें ठार केलें.

मृत्यु व स्वभाववर्णन.—अली आदिलशहाचा इ. स. १५८० मध्यें, त्यानें बेदरच्या दरबारांतून बळजबरीनें धरून आणलेल्या एका खोजानें वध केला. त्याची रोझा अली नावाची कबर अद्याप विजापुरीं आहे. आदिलशहा हा विद्वान्, धर्मनिष्ठ, दयावंत, त्यागी व गुणी लोकांचा चाहता होता. त्याची राहणी अगदीं साधी असे. दान देतांना तो शिया, सुनी किंवा हिंदु असा भेदाभेद करीत नसे. यानें आपल्या दातृत्वानें आपल्या बापानें सांठवून ठेविलेलें द्रव्य अल्पकालांतच सर्व करून टाकलें असें म्हणतात. त्याच्या दरबारीं अकबर बादशहाकडून दोन वकील आले होते. जुम्मामशीद, हावशीशहापूर, शहरगा तट, व रस्तोरस्तीं पाणी नेण्याचे नळ हीं कामें याच्या कारकीर्दींत झालीं.

[संदर्भ ग्रंथ.—याच्या कारकीर्दीची हकीकत महंमद कासीम फेरिस्ता, रफीउद्दीन शिराजी, मीर इब्राहिम आसदखान अबू हुसेन इत्यादि कित्येक मुसलमान इतिहासकारांच्या ग्रंथांत आढळते.]

२ रा (इ. स. १६५६ ते १६७२) महंमद आदिलशहाचा पुत्र व शिवाजीचा समकालीन विजापूरचा बादशहा. याचा जन्म इ. स. १६३८ त ली (१६रबिलाखर १०४८) झाला व महंमद आदिलशहा वारल्यावरोबर इ. स. १६५६ नोव्हेंबर महिन्यांत तो सिंहासनाधीश झाला. त्याच्या बापानें यास राजपुत्रास योग्य रीतीनें शिक्षण देऊन लिहिणें, वाचणें, कसरत, तीर, भाला, बरची, तलवार वगैरे वापरण्यास व घोड्यावर बसण्यास चांगलें शिकवून ठेविलें होतें.

औरंगजेबाची स्वारी.—याला गादीवर येऊन थोडे दिवस झाले नाहींत तोंच औरंगजेबानें अली हा महंमदशहाचा खरा पुत्र नसून त्याच्या जनानखान्यांत वाढविलेला कोणी तरी मुलगा आहे व त्याला गादीवर बसविण्यापूर्वी मोंगलबादशहाची परवानगी घ्यावयास हवी होती अशी कांहींतरी सबब काढून तो १८ जानेवारी १६५७ रोजीं औरंगाबादेहून निघून विजापूरच्या मुलुखावर स्वारी करून आला. लाच देऊन विजापूरच्या सैन्यांतील कित्येक लोकांस फोडण्याचें काम त्यानें अगोदरच करून ठेविलें होतें. २ मार्च रोजीं वेढा घालून २७ दिवसांत बेदरचा किल्ला काबीज केला (२५ जमादिलाखर मंगळवार) व नंतर त्यानें कल्याणीच्या किल्ल्यावर चढाई करून (२६ रज्जब) तीन महिन्यांत तोहि सर केला (१ ऑगस्ट). औरंगजेबावर वजीरखान महंमद व अफझलखान या दोघा सरदारांची रवानगी विजापूर दरबारांतून झाली होती. या सरदारांनीं औरंगजेबानें वेढ्याचें काम चालू असतां त्याच्या सैन्याभोंवतीं घिरट्या घालून त्याची रसद मारून नेण्याचा क्रम चालू ठेविला होता. कल्याणीचा वेढा चालू असतां विजापुरी व मोंगल यांच्या दरम्यान तीन नांव घेण्यासारख्या लढाया झाल्या. तारीख १२ एप्रिल रोजीं कल्याणीच्या दक्षिणेस विजापुरी मुलूख उध्वस्त करण्यास निघालेला मोंगल सरदार महाबतखान याजवर विजापुरी सैन्यानें हल्ला केला. तथापि एका ठिकाणीं उभें राहून लढाई देण्याच्या तें भानगडींत पडलें नाहींत. यानंतर कल्याणीच्या ईशान्येस दहा मैलावर पुन्हा एकदां विजापुरी सैन्यानें महाबतखान रसद सैभाळून आणीत असतां त्यास चोहोंबाजूंनीं वेढिलें. या दिवशींच्या लढाईंत मोंगल सैन्यांतील अनेक रजपूत वीर धारातीर्थी पतन पावले. ता. २८ मे रोजीं तिसरी लढाई झाली तींत मीरजुमला व दिल्लीरखान यांच्या मोंगल सैन्यानें विजापुरीचा पराभव करून पुढें पाठलाग करीत जाऊन त्यांची छावणी लुटून काढली. उलटपक्षीं मोंगल सैन्याच्या रिकाम्या असलेल्या मुक्कामानींहि कल्याणीच्या वेढ्याचें काम चाललें असतां नीलाग व निचोली हे दोन किल्ले काबीज केले व ता. २२ जुलै रोजीं बाहेर पडून कुलबुर्गापर्यंत मुलूख लुटून उध्वस्त केला. विजापूरच्या इतिहासांत पुढें दिल्याप्रमाणें आणखी एका लढाईचें वर्णन आहे. एकदां औरंगजेब एका अवघड वाटेनें उतरून येत असतां खान महंमदानें त्यास वेढा घालून त्याचें दाणावैरण बंद केलें. औरंजेब अशा पेंचांत सांपडल्यावर त्यानें खान महंमदास वेढा उठवून वाट देण्याविषयीं विनंति केली. ही विनंति अफझलखानाचें न ऐकतां खान महंमदानें मान्य केली म्हणून अफझलखान रागावून विजापुरकरास गेला. तेथें त्यानें खान महंमदाविरुद्ध बादशहाचे कान भरविल्यामुळें बादशहानें खानमहंमदास परत बोलावून त्यास ठार

केलें ( हि. स. १०६८ इ. स. १६५७ ). ही लढाई खरो-खर झाली असल्यास केव्हां झाली तें कळत नाहीं. एवढें मात्र खरें कीं शहाजहानच्या दरबारीं असलेल्या विजापूर-च्या वकीलानें फारस्यानादि उपायांनीं कल्याणीचा वेढा चालू असतां शहाजहानाकडून औरंगजेबास विजापुरशीं तह करण्याविषयीं पत्रे रवाना केलीं होतीं. तथापि औरंगजेबनें एक महिना विलंब लावून कल्याणीचा किल्ला तर काबीज केलाच. विजापूर व मोंगल याच्या दरम्यान या प्रसंगी जो तह झाला त्या तहान्वयें आदिलशहानें दीड कोट रुपये दंड, बेदर कल्याणी व शिवाय लगतच्या मुलुखासह परांड्याचा किल्ला, निजामशाही कोंकणातील किल्ले व वागी परगणा एवढें द्यावें असें ठरलें. तथापि या तहास मंजुरी देतांना शहाजहानानें दंडापैकीं अर्धाकोट रक्कम आदिलशहास माफ केली.

युद्ध बंद करण्याचा शहाजहानाकडून हुकूम आला अस-ल्याचें कळताच औरंगजेबाच्या हाताखालील सरदारांनीं त्याचें न ऐकतां हळू हळू हिंदुस्थानाकडे कूच करून जाऊं लागले, व शेवटीं औरंगजेबहि शहाजहानाच्या आजाराचें वर्तमान ऐकून दक्षिण सोडून जाण्याच्या तयारीस लागला. हें पाहून विजापूरकरांनीं तहांतल्या अटीप्रमाणें किल्ले व खंडणीची रक्कम मोगलाच्या स्वाधीन करण्याचें तर बाजूस ठेविलें पण उलट मागील युद्धांत गमावलेला मुलूख पुन्हा परत मिळ-विण्याचा प्रयत्न सुरू केला. औरंगजेबाचें मन या वेळीं व्यग्र असल्यामुळें त्यानें परिंडा किल्ला व नवीन मुलूख घ्यावयाचा होता तो उघड पत्र लिहून सोडून दिला व दंडापैकीं आणखी ३० लाख रुपये माफ केले ( सरदेसाई ).

शि वा जी ची पुं डा ई व अ फ ज ल खा ना चा व ध.— अली आदिलशहाचा बाप मृत्यूपूर्वी आजारी पडला तेव्हां विजापुरीं घोंटाळे माजल्यामुळें कोंकणचा सुभेदार मुल्ला अह-मद यास राजधानीस बोलावून घेतलें होतें. ही संधि साधून तिकडे शिवाजीनें आपलें राज्य वाढविण्याचा उपक्रम केला व पुढें बादशहा मरण पावला तेव्हां त्यानें आपला उद्योग जारीनें चालवून राहोरसुद्धा चाळीस किल्ले सामानसरंजामा-सुद्धां कबजांत घेतले. तेव्हां शिवाजीचा बंदोबस्त करण्या-करितां इ. स. १६५९ मध्यें आदिलशहानें अफजलखान नामक आपल्या सरदारास रवाना केलें. या स्वारीविषयीं सविस्तर हकीकत अफजलखान या लेखात दिली आहे. विजापुरच्या इतिहासात या प्रकरणासंबंधीं पुढील हकीकत आढळते. अफजलखानानें आपल्या दहा हजार निवड सैन्या-निशीं येऊन शिवाजीनें बळकविलेल्या मुलुखापैकीं बराचसा परत घेतला.तेव्हां उघड रीतीनें लढाई करून आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून, शिवाजीनें अफजलखानास नम्र-तापूर्वक पत्र लिहून प्रतापगडावर मेजवानीस बोलाविलें व तेथें तो किल्ल्याच्या माचीस आपली फौज ठेवून बारा इस-मानिशीं आला असतां, शिवाजीच्या हलारचंद लोकांनीं त्यावर गर्दी करून त्यास ठार केलें. हें समजतांच आपणांस कोणी आवरणारा राहिला नाहीं असें जाणून त्याची फौज पळून गेली.

प न्हा ळ्या व री ल मो हि म.—अफजलखानाच्या वधाचा सूड उगविण्याकरितां अली आदिलशहानें मोंगलाशीं संगनमत करून शाहिस्तेखानानें उत्तरेकडे व आपण स्वतः दक्षिणेकडे एकदम स्वारी करावी असें ठरविलें. त्यानें शिवाजीवर शिद्दी जोहार नामक आपल्या येद्मान होऊन कर्नूळ बळकावून बसलेल्या एका सरदाराची त्याच्या विनंती-वरून सलाबतखान असा किताब देऊन रवानगी केली ( मे १६६० ) या शिद्दीजोहारानें शिवाजीच्या लोकांची मैदा-नांत एका चकमकींत दाणादाण केली व शिवाजी नायकवाडी लोकांस वश करून पन्हाळा किल्ल्याचा आसरा घेऊन राहिला आहे असें पाहून त्या किल्ल्यास त्यानें वेढा दिला. पण तो पुढें आंतून शिवाजीशीं सलोख्यानें वागूं लागला. तेव्हां आदिलशहानें विजापुराहून स्वतः शिवाजीवर कूच केले ( ५ आगस्ट ) आदिलशहा मिरजेपावेतों आल्याचें वर्तमान शिवाजीस समजताच त्यानें पन्हाळ्यावरून पळ काढला व किल्ला बिनहरकत आदिलशहाच्या ताब्यात आला ( अजमासे २५ आगस्ट ) ही बातमी समजल्यावर बादशहा मिरजेहूनच विजापुरीं परत आला. त्यानें दुसऱ्या सरदाराकडून शिद्दी जोहारास चार हिताच्या गोष्टी सांगि-तल्या, व पुढें कृष्णातीरीं चिमुलकें येथें त्यास भेटीस बोला-वून त्यानें स्वतःहि गोड बोलून त्याची दिलसफाई करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहीं परिणाम झाल्याचें दिसून आलें नाहीं.

क र्ना ट का तील बं डा चा वी मो ड —कारण पुढें तोर-गल येथील आपल्याच एका बंडखोर सरदाराच्या पारिप-त्यास गेला तेव्हां शिद्दी जोहाराकडून या सरदारास दारू गोळ्याची मदत होत असल्याचें बादशहास आढळून आलें. म्हणून तोरगलचा किल्ला सर करण्याचें काम बाजूस ठेऊन बादशहा शिद्दी जोहारावरच चालून गेला. त्याची सैन्या-च्या किल्ल्यानजीक जोहाराच्या सैन्याशीं लढाई होऊन जोहाराचा पराजय झाला. या लढाईत शिद्दी जोहारानें आपल्या जावयाकडून बादशहाशीं लढाई देवविली; पण तींतहि त्यास यश आलें नाहीं यानंतर जोहार बादशहाशीं विरोध करण्यास फार दिवस जगला नाहीं. तो मेल्यावर बादशहानें आपला कारभारी अबदुल महंमद याच्या सल्ल्या-वरून जोहाराच्या मुलास अभय देऊन बापाच्या जागीं कर्नूल किल्ल्यात कायम केलें.

जोहारवरील मोहिमेंतून परत आल्यावर पुढें लवकरच १ साबान हि. स १०७२ ( इ. स. १६६२ ) रोजीं आदिल-शहा मळनेर येथील जमेदार व बेदनूरच्या भद्रपनाईक याच्या पारिपत्यास निघाला व त्यावर खंडणी बसवून तो नऊ महि-न्यांनीं मोहीम आटपून विजापुरीं परत आला.

**शिवाजी विरुद्ध जयसिंहास मदत**—इ. स. १६६२ सालीं अली आदिलशहानें शहाजीमार्फत शिवाजीशीं समेट करून अतःपर कोणीं कोणाच्या वाटेस जाऊं नये असें ठरविलें होतें. पण पुढें औरंगजेबाकडून जयसिंहाची दक्षिणचा सुभेदार म्हणून नेमणूक होऊन इ. स. १६६५ च्या आरंभीं जयसिंहानें शिवाजीवरील मोहीम हातीं घेतला तेव्हां त्यानें शिवाजीच्या ज्या शत्रूंस आपल्याकडे वळवून घेण्याचा प्रयत्न केला त्यांत आदिलशहाहि होता. वस्तुत मोगल तहाच्या अटी पाळल्या नसल्यामुळें औरंगजेबाचा विजापूरकरांवर पूर्वीपासून राग होता. जयसिंहाची सुभेदारीवर नेमणूक झाला तेव्हां शिवाजी व विजापूरकर या दोघांच्याहि मुलुखांत मोहिमा करण्याची त्यास आज्ञा झाली होती, परंतु जयसिंहानें दोघांसहि एकदम डिवचण्याचा अविचार न करतां आदिलशहाशीं बोलणें लावून व बादशहाकडून खंडणी कमी करून देवविण्याची लालूच दाखवून, आपला शिवाजीवरील मोहीम चालू असतांना आदिलशहास दुसऱ्या बाजूनें शिवाजीच्या मुलुखावर स्वारी करण्यास प्रवृत्त केलें. मोंगलास मदत करून शिवाजीस चिरडणें आदिलशहास केव्हांहि इष्ट नव्हतें तथापि मागील तहाच्या अटी मोडल्यामुळें झालेला औरंगजेबाचा रोष करण्यासहि त्याची तयारी नव्हती म्हणून त्यानें जयसिंहाचें म्हणणें मान्य केलें व विजापुराहून खवासखान नावाचा सरदार शिवाजीवर पाठविला. एका अवघड जागीं खवासखान व शिवाजी यांची निकराची लढाई होऊन तींत मराठ्यांनीं विलक्षण पराक्रम केला, पण अखेरीस त्यास रणांगण सोडून पळून जावें लागलें. इतक्यांत जयसिंह येऊन ठेपला व त्यानें शिवाजीच्या पुरंदर किल्ल्यास वेढा घातला. आपला इलाज चालत नाहीं असें पाहून शिवाजीनें जयसिंहाशीं तह केला. या तहांत शिवाजीनें दोन हजार स्वार व सात हजार पायदळ घेऊन जयसिंहास विजापूरकरावरील मोहिमींत मदत करावी असें एक कलम होतें (शिवाजी पहा).

जयसिंहाचा विजापूरकरांवर भरंवसा नसल्यामुळें त्यानें शिवाजीवरील मोहिमींत विजापूरकरांची प्रत्यक्ष अशी कोणतीच मदत आतांपर्यंत घेतली नव्हती व विजापूरकरांनींहि मदत करण्याच्या कामीं मोठीशी उत्सुकता दाखविली नव्हती. म्हणून जयसिंहानें शिवाजीची मदत स्वीकारून त्याच्याशीं स्नेह केला व विजापूरच्या मुलुखावर स्वारी करण्याची तयारी चालविली.

**जयसिंहाची मोहीम**—पुरंदरचा हा तह सन १६६५ च्या जून महिन्याच्या पूर्वार्धांत झाला, तथापि पैशाच्या अभावी १९ नोव्हेंबरपर्यंत जयसिंहास पुरंदराहून हालतां आलें नाहीं. दरम्यान त्यानें आदिलशहाच्या हाताखालील जमीनदारांस व सरदारांस फोडण्याचें काम जारीनें चालू केलें. अशा रीतीनें फोडलेल्या लोकांपैकी महत्त्वाची व्यक्ति म्हणजे विजापूरच्या दरबारातील दुसऱ्या प्रतीचा सरदार मुल्ला महंमद ही होय. मोंगल व विजापूरकर यांच्यामधील देण्याघेण्याच्या वाटाघाटीकरितां वकील म्हणून बोलावून जयसिंहानें मुल्ला महमदास विजापूरकरास संशय येऊं न देतां विजापुरांतून सुरक्षित बाहेर काढलें पण त्याचा कांहीं उपयोग होण्यापूर्वीच तो दिसेंबरांत अहमदनगर येथें मरण पावला. अली आदिलशहाची मोंगलाशीं स्नेह कायम राखण्याची मनापासून इच्छा दिसत होती. तिचा फायदा घेऊन जयसिंहानें आपली तयारी संपेपर्यंत विजापूरकरास आपल्या उद्देशाचा सुगावा लागू दिला नाहीं. जयसिंहाचा खरा हेतु ध्यानांत येताच अली आदिलशहानें युद्धाची झपाट्यानें तयारी चालविली. त्यानें आपल्या हाताखालील मराठे व मुसुलमान सरदारांना आपआपलीं पथकें घेऊन हजर होण्याचा हुकूम केला व विजापूरच्या किल्ल्याची डागडुजी करून तटावर तोफा वगैरे सामुग्री चढविली. त्याचप्रमाणें शत्रूंनीं विजापुरास वेढा दिला तर त्यांना दाणा वैरण किंवा पाणी मिळूं नये म्हणून शहराच्या आसमंतांतील सर्व मुलूख त्यानें त्यानें आपणच अगोदर उध्वस्त करून टाकला व तळीं फोडून व विहिरी बुजवून किंवा निकामी करून आसमंतांत पाण्याची टंचाई करून सोडली.

**विजापूरवर कूच**—जयसिंह पुरंदराहून निघाला तो मार्गांत कोठेंहि प्रतिरोध न होतां मंगळवेढ्यापर्यंत आला. किल्ले काबीज करण्याकरितां शिवाजीच्या लोकांची नेमणूक झाली होती, त्यास विजापूरच्या अधिकाऱ्यांनीं भराभर किल्ले रिकामे करून दिले. ७ दिसेंबर रोजीं फलटण, त्याच्या दुसऱ्या दिवशीं थटोरा व १८ दिसेंबर रोजीं मंगळवेढ्याचा किल्ला हस्तगत झाला. विजापूरकर व मोंगल यांच्या दरम्यान पहिली लढाई ता. २५ दिसेंबर सन १६६५ रोजी मोंगलाकडील दिलेरखान व शिवाजी यांचे लोक व विजापूरकराकडील सर्जाखान, खवासखान, कल्याणचा माधवराव व शिवाजीचा भाऊ व्यंकोजी यांच्यामध्यें झाली. या लढाईत विजापूरकराचा पराभव झाला तरी त्यांच्या कडील जाधवराव नामक सरदार ठार होईपर्यंत मोंगलांच्या सैन्याभोंवतीं घिरट्या घालून त्यास उपद्रव देणें त्यांनीं पुढें चालू ठेविलें होतें. त्यामुळें मोंगलाचें बरेंच नुकसान झालें. वरील लढाईच्या आधल्याच दिवशीं विजापुरी सरदार सर्जाखान यानें मंगळवेढ्यावर चाल करून जाऊन त्याच्या नजीक झालेल्या लढाईंत मोंगल फौजदार सर्फराजखान यास ठार केलें होतें. तथापि किल्ल्यावरील तोफांच्या माऱ्यामुळें त्यास किल्ला हस्तगत करतां आला नाहीं. इकडे जयसिंहाच्या कूचांत ता. २७ डिसेंबर रोजीं जयसिंहाची विजापुरी सैन्याशीं आणखी एक चकमक होऊन ता. २९ रोजी तो विजापुराहून १२ मैलांवर येऊन पोहोंचला. जयसिंहाचा हेतु आदिलशहास तयारी करण्याला वेळ मिळण्यापूर्वीच विजापुरावर अचानक येऊन तें काबीज

करावें असा होता. यासाठीं तो वेढ्यास आवश्यक असणाऱ्या अवजड तोफा पराड्याहून येऊन पोंचण्यापूर्वीच घाईघाईनें निघाला होता. पण येथें येऊन पाहतो तों विजापूरच्या संरक्षणार्थ उत्तम बंदोबस्त झालेला असून आसमंतांतील मुलूख निर्जल व ओसाड करून टाकलेला आहे.

आदिलशहाच्या मदतीस कुतुबशहाकडून सैन्य रवाना झालें आहे अशीहि कुणकुण त्याच्या कानीं आली. तेव्हां अशा स्थितींत शत्रूच्या हद्दींत राहणें अत्यंत धोक्याचें वाटून जयसिंहानें पुन्हां मोंगल सरहद्दीकडे प्रयाण केलें (५ जाने १६६६).

सरहद्दीच्या बाजूस पीछेहाटः— जयसिंह मागें पीछेहाट करूं लागल्यापासून युद्धास निराळा रंग आला. येथपर्यंत जयसिंहाचा बाह्य परिस्थितीवर ताबा होता, परंतु यापुढें तो बाह्य परिस्थितीचा दास बनला. कारण आतां सर्जाखान व शिद्दी मसाऊद या विजापूरच्या दोन सरदारांची जयसिंहाच्या पिछाडीस राहून मोंगलांच्या मुलुखांत स्वाऱ्या करण्याच्या कामीं नेमणूक झाली होती तो आतां माघारा फिरून वजीर अबदुल महंमदाच्या हाताखालीं मुख्य विजापुरी सैन्य जयसिंहाच्या सैन्याभोंवतीं घिरट्या घालीत होतें त्यास येऊन मिळाला. विजापुरी सैन्यास जवळजवळ वेढूनच टाकलेलें होतें. मार्गांत ता. ११ रोजीं जयसिंहाच्या व विजापूरच्या सैन्यात एक लढाई झाली. व लागलीच १२ तारखेच्या सुमारास विजापुरी सरदार सर्जाखान यानें जयसिंहाकडे रसद व दारुगोळा घेऊन येणाऱ्या सरदारावर तुटून पडून त्याचा फन्ना पाडला. सर्वांत ता. २२ रोजीं लोहारी येथें झालेली लढाई अत्यंत हातघाईची होती. शिवाय दोन्ही सैन्यांत लहानसहान चकमकी झडत होत्या त्या निराळ्याच. अशा रीतीनें लढतलढत ता. २७ रोजीं जयसिंह पराड्याच्या दक्षिणेस १६ मैलावर सुलतान येथें आला. एका महिन्यांत शत्रूशीं पाच मोठ्या लढाया दिल्यामुळें त्यानें या ठिकाणीं विश्रांतीसाठीं २४ दिवस मुक्काम केला.

शिवाजी व नेताजीः—वर सांगितल्याप्रमाणें विजापूरवरील स्वारींत अनपेक्षित रीतीनें अपयश येताच मोंगल सैन्यांत तंटे सुरू झाले. जयसिंहाच्या विरुद्ध पक्षांतील दिलेरखान वगैरे मंडळी या अपयशाचें खापर शिवाजीच्या ढिलाईवर फोडून त्यास कैद करण्याचा आग्रह करूं लागली, तेव्हां शिवाजीस अपाय होण्याची भीति पडून जयसिंहानें शिवाजीस त्याच्याच विनंतीवरून पन्हाळ्यावर स्वारी करण्यास पाठविलें. शिवाजी भीमेच्या तीरावरून जयसिंहाच्या छावणींतून निघाला तो पाच दिवसांत पन्हाळ्यास दाखल होऊन त्यानें रात्रीच्या वेळीं किल्ल्यावर हल्ला केला. पण किल्ल्यांतील लोक बेसावध नव्हते. त्यांनीं मराठ्यांशीं शौर्यानें लढून सकाळपर्यंत त्यांचे १००० लोक ठार व जखमी केले. तेव्हां आपल्या सैन्याची ही दुर्दशा सकाळीं शिवाजीच्या ध्यानांत येतांच तो लढाई बंद करून हटण्यास आला. पुढें त्याच्या सैन्यानें त्या भागांत शत्रूचा मुलूख उध्वस्त करण्याचें काम चालू ठेविलें व त्यामुळें विजापूरकरांना आपल्या सैन्यापैकीं दहा हजार लोक दक्षिणेकडे पाठवावे लागले. तथापि ता. २० जानेवारीच्या सुमारास विजापूरकरांनीं शिवाजीच्या घोडदळावरील मुख्य अधिकारी नेताजी यास चार लक्ष होन लाच देऊन फोडलें व त्यामुळें तो उलट मोंगलांच्याच मुलुखांत स्वाऱ्या करूं लागला.

भीमामांजेरा प्रदेशांतील स्वारीः—तथापि जानेवारी महिन्यांत मोंगलांवर कोसळलेली मोठी आपत्ति म्हणजे गोवळकोंड्याच्या सुलतानाकडून ता. ३१ जानेवारी रोजीं विजापुरास सैन्याची कुमक येऊन पोहोंचली ही होय. जयसिंह सुलतानपुरास विश्रांति घेत असतां या सैन्यानें विजापूर सैन्यास मिळून त्या सर्वांनीं मोंगलांच्या मुलुखास उपद्रव देण्यास अतोनात सुरवात केली होती. यामुळें जयसिंहास त्याच्या बंदोबस्तासाठीं पूर्वेस कल्याणी-बेदरच्या नवीन जिंकलेल्या मुलुखाकडे कूच करणें भाग पडलें. युद्धाच्या तिसऱ्या अवस्थेस सुरवात झाली. या पुढील साडे तीन महिन्यांत जयसिंह पूर्वेस मांजेरा नदी पश्चिमेस भीमा नदी, उत्तरेस धारूर व दक्षिणेस तुळजापूर यांनीं होणाऱ्या लहानशा चतुष्कोनात भटकत होता. त्या अवधींत त्याच्या विजापूरकराशीं चार घनघोर लढाया झाल्या. त्या सर्वांत विजापूरकरांचाच पराभव झाला तरी त्याच्या सैन्याचा नायनाट त्यास करतां न आल्यामुळें ते नेहमींप्रमाणें त्याच्या सैन्याभोंवतीं घिरट्या घालून त्याची रसद मारून व पुष्कळ सैनिकांचा फन्ना पाडून त्यास उपद्रव देत राहिले. सरते शेवटीं अशा शत्रूशीं अशासततें वागल्याशिवाय आपला टिकाव लागणार नाहीं अशी जयसिंहाची खात्री झाली म्हणून आपल्या जवळचें सर्व अवजड सामान धारूर येथें टाकून चपळ स्वारांचीं पथकें बरोबर घेऊन ता. १६ मे रोजीं तो मांजेरातीवरून दक्षिणेकडे निघाला. तो सीना उतरून कसाबसा भीमाकांठापर्यंत आला पण त्याचे लोक लाव मजलांनीं व उपासमारीनें इतके थकून गेले होते कीं यापुढें मोहीम चालू ठेवणें त्यास अशक्य झालें. इतक्यांत औरंगजेबाचाहि जयसिंहास मोहीम बंद करून औरंगाबादेस येण्याविषयीं हुकूम आल्यामुळें तो परत फिरला व अशा रीतीनें पाण्यासारखा पैसा खर्च करून अखेरीस कवडीचाहि फायदा न होतां जूनच्या आरंभास ही मोहीम समाप्त झाली. मंगळवेढें, फलटण वगैरे किल्ले मोंगल सरहद्दीपासून दूर व म्हणून राखण्यास कठिण असल्यामुळें मोंगलांनीं ते आपण होऊनच खालीं करून दिले.

अखेरचीं वर्षे—वर वर्णन केलेल्या जयसिंहाच्या मोहिमी नंतर अली आदिलशहानें राज्यकारभाराकडे दुर्लक्ष करून ऐषआरामांत काळ घालविण्यास सुरवात केली. तथापि त्याच्या कर्तृत्ववान वजीर अबदुल महंमद यानें अली आदिलशहाच्या मृत्यूपर्यंत शहाणपणानें राज्यशकट चालविला. अली आदिलशहा हा तारीख २४ नोव्हेंबर सन १६७२

(१३शाबान हि. स. १०८३ ) रोजीं पक्षाघाताच्या विकारानें मरण पावला. त्यानें स्वतःच्या कारकीर्दींत शिकस्त करून विजापूरचें संरक्षण केलें व दरबारांतील तंटे विकोपास जाऊं दिले नाहींत. तो विषयी होता तरी नियमितपणानें वागून त्यानें प्रजापालनाच्या कामीं चांगलें लक्ष पुरविलें. तो स्वतः कवि असून विद्वानांस चांगला आश्रय देई त्याच्या पदरीं अनेक फारशी कवी होते. त्याच्या दरबारीं पुष्कळ वैमनस्यें होतीं पण तो जिवंत असताना तीं उघडकीस आलीं नाहीत. धर्माजी पंडित वगैरे कित्येक हुषार दक्षणी गृहस्थ त्याच्या जवळ होते. त्यानें हसनी महाल ( अज इ स. १६५७ ) आरसे महाल ( इ. स. १६६१ ) वगैरे इमारती बांधल्या व विजापूरची शहापेठ वसविली. ( इ. स. १६६२ ).

[ संदर्भ ग्रंथः—आदिलशाही पत्रां. सरकारच्या औरंगजेब पुस्तकातील ( भाग १ व ४ ) मोंगल दरबारच्या अस्सल कागद पत्रांवरून लिहिलेल्या माहितीनें या सुलतानाच्या कारकीर्दीवर चांगला प्रकाश पडतो ].

अलीखेर—( हैदराबाद संस्थान ) बेदर जिल्ह्यातील विनोलीच्या पैगा तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. १७°५१' पू. रे. ७७° १७'. लोकवस्ती ( स. १९०१ सालीं).५७४० व ( स. १९११ ),५२९२

अलीगंज, त ह शी ल—(संयुक्तप्रांत,) इटा जिल्ह्यातील पूर्वेकडील तहशील. हींत अझमनगर, बर्ना, पतियाळी आणि निधपुर हे परगणे आहेत क्षेत्रफळ ५२९ चौरस मैल. उ.अ. २७° १९' ते २७° ५४'. पू. रे. ७८° ५२' ते ७९° १७' लोकसंख्या ( १९११ ) २२६३०१. हींत ५ शहरें व ४०८ खेडीं आहेत. पैकीं अलीगंज हें तहशिलीचें ठिकाण आहे. इ. १९०३–४सालीं जमीन उत्पन्न२११०००रु.इतर रु.३८००० रु. नव्या पाहणींत जमीनीचें उत्पन्न २२९००० रु. झालें आहे. उत्तरेस गंगा नदी व दक्षिणेस काली नदी आहे. येथें पाऊस फार पडत असल्यामुळे जमिनीचें फार नुकसान होतें. १८९८–९९ सालीं लागवडीखालीं एकंदर क्षेत्र २८७ चौरस मैल होतें, त्यापैकीं पाण्याखालीं ८५ चौ. मैल होतें. दक्षिण गंगा ( लोअर गँजेस ) कालव्याची फत्तेपूर शाखा या तहशिलींतून जाते. विहिरीच्या पाण्यावर एकंदर दोनतृतीयांश जमीन भिजते.

गा व.—(संयुक्त प्रांत.)वरील तहशिलीचें मुख्य ठिकाण. उत्तर. अ. २७° २९' व पूर्व. रेखांश. ७९° ११'. लोकसंख्या ( १९११ ) ६४२२. इटा गावाच्या पूर्वेस ३४ मैलावर हा गाव आहे. फरूकाबादच्या नबाबाच्या तैनातींतील एका रोमानें हा गाव वसविला. हा नबाब येथेंच रोहिल्यांशी चाललेल्या लढाईंत सन १७४८ सालीं मरण पावला. त्याचें थडगें येथेंच आहे. बहुतेक दुकानें मातीचीं बांधलेलीं आहेत. येथून धान्य व कापूस जमा करून ९ मैलांवरच्या ढाणादर्यागंज स्टेशनवर परगोवीं धाडण्याकरितो चडविण्यांत येतो. ( इं. गॅ. ५–१९०८ ).

अलीगड, जि ल्हा.—(राजपुताना.) टोंक संस्थानांतील एक परगणा. उत्तर अ. २५° ३६' ते २६° २' व पू. रे.७५° ३'ते ७६° २०'. क्षेत्रफळ १५७ चौरस मैल. उत्तरेस, पश्चिमेस आणि पूर्वेस जयपूर; दक्षिणेस व नैऋत्येस बुंदी; आग्नेयीस कोटा. बहुतेक प्रदेश सपाट असून फक्त आग्नेयीकडील कोंपरा थोडा डोंगराळ आहे. लोकसंख्या ( १९११ ) १६२८८ एकंदर खेडीं ८५; शहर एकसुद्धा नाहीं. येथें राहणाऱ्या मुख्य जाती—मिना, चांभार, गुजर, माळी, महाजन. येथील पूर्वीचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. इ. स. १६८८ ते १७४८ पर्यंत हा भाग बुंदीचे हाडा रजपूत याजकडे होता. पुढें अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत होळकर किंवा जयपूरचे संस्थानिक यांपैकीं कोणा एकाकडे असे. इ. स. १८१८ सालीं महिदपूर येथें होळकरांचा इंग्लिशानीं मोड केल्यावर हा भाग इंग्लिशानीं खालसा केला.परंतु पुढें सन१८१९सालीं पुन्हा हा प्रदेश पेंढारी नबाब अमीरखान यास बहाल करण्यात आला. यातील अर्धा अधिक भाग जहागीर असून खालसा प्रदेशाचें क्षेत्रफळ ६७ चौरस मैल आहे. ज्वारी, गहूं, तीळ हीं येथील मुख्य पिकें आहेत. जमीन साधारण बरी आहे. एकंदर उत्पन्न ३६००० रुपये आहे.

गा व.—(राजपुताना) हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण टोंक शहराच्या आग्नेयीस ३४ मैलावर आहे. उ. अ. २५°५८' आणि पू. रे. ७६°५' लोकवस्ती ( इ. स. १९०१ ) २५८४ हा गाव इ. स. १६४४ सालीं कोणी वसंतराय यानें वसविला असून राठोड रजपुत रामसिंग याच्या नावावरून या गावास रामपुरा असें नाव होतें. पुढें पहिला नबाब अमीरखान यानें तें नाव बदलून अलीगड असें ठेविलें. पावसाळ्यात येथील हवा बिघडते. गावाभोंवतीं एक तट आहे.

अलीगड जि ल्हा.—संयुक्त प्रांत. आग्रा विभागातील जिल्हा. उ. अ. २७° २९' ते २८° ११' आणि पू. रे. ७७° २९' ते ७८° ३८'. क्षेत्रफळ १९८६ चौरस मैल,

सीमाः—उत्तरेस बुलंदशहर जिल्हा; पूर्वेस आणि दक्षिणेस इटा; पश्चिमेस आणि दक्षिणेस मथुरा. गंगा व यमुना यांच्या आसपासच्या तीरावरील सखल प्रदेशास ' खादर ' असें नाव आहे. गंगा खादर सुपीक आहे परंतु यमुना खादरवर खुरटें जंगल आहे. इतर जमीन सुपीक आहे. या जिल्ह्यातून तीन नद्या वहातात. कालीनदी, नीमनदी, खोइआनदी. जमीन मळईची असून कांहीं ठिकाणीं कंकरमिश्रित देखील आढळते. क्षार असल्यामुळें ओसाड पडलेली जमीनदेखील या जिल्ह्यात पुष्कळ सांपडते. या जिल्ह्यांत जंगल सांपडण्यासारखें नाहीं. मुख्य झाडें—बाभुळ, निंब, आंबा, पळस. रानटी पशु—रानडुकरें, काळवीट इत्यादि. दुआब प्रमाणेंच सामान्यतः येथील हवा असते. पावसाची सरासरी २६ इंच.

इ ति हा स —अलीगडचा किल्ला व स्टेशन हा कोइल नामक अति प्राचीन शहराचा एक भाग आहे. पूर्वीं चंद्र वंशांतील कोणा कोशारव नांवाच्या क्षत्रिय राजानें हें शहर

वसविलें व त्यास स्वतःचें नांव दिलें. पुढें 'बलरामानें कोल नांवाच्या राक्षसाचा येथें वध करून या शहरास कोईल असें नांव दिलें असा याचा प्राचीन दंतकथात्मक इतिहास आहे.

मुसुलमानांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर सुरू होण्यापूर्वी हा भाग डोर रजपुतांच्या ताब्यात असून बाराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत बरनचा राजा येथील कारभार पहात असे. इ. स. ११९४ सालीं कुतुबुद्दीन यानें दिल्लीहून कोईलवर स्वारी केली व हा भाग जिंकला. पुढें मुसुलमान सुभेदार सर्व कारभार पहात. चौदाव्या शतकांत तैमूरच्या स्वारींत या भागाचें नुकसान फार झालें. पुढें इ. स. १५२६ सालीं बाबरनें कचकअली नावाचा सुभेदार तेथें नेमला होता. 'त्यावेळच्या पुष्कळ मशिदी अद्यापि अस्तित्वांत आहेत. अवरंगजेब मरण पावल्यावर या प्रदेशावर मराठे व जाट यांच्या वारंवार स्वाऱ्या होऊं लागल्या. इ. स. १७५७ सालीं सुरजमल जाटानें हें शहर हस्तगत केलें. कारण मथुरा आणि आग्रा ते दिल्ली आणि रोहिलखंड या रस्त्याच्या नाक्यावरील हें ठिकाण असल्यामुळें लष्करी दृष्ट्या यास फार महत्व होतें.' पण लवकरच (१७५९) येथून जाटांची उचलबांगडी अफगाणांनीं केली. या पुढील वीस वर्षे येथें हिंदु व मुसुलमान यांच्या एकसारख्या लढाया होत होत्या. इ.स. १७८४ सालीं हा भाग शिंद्यांनीं जिंकला. तो जवळ जवळ सन १८०३ पर्यंत मराठ्यांकडे होता यासंबंधीं मराठ्यांच्या इतिहासांत पुढील दाखला मिळतो. १७०६ मार्गशीर्ष शु ११ चें गोविंदराव पुरुषोत्तमानें नानास धाडिलेलें पत्र—पाटिलबावांनीं अशफशहायखानाचा पुत्र हुसेनुद्दौला बहादुर यास सरदारी देऊं करून अलिगडास पैका व वर्खे आणावयास मागसें पाठविलें (रा. खं. १२. ४४, ३३). अलीगडचें पूर्वीचें नांव रामगड असून नजीबखान रोहिल्यानें तें बदललें असाहि उल्लेख गोविंदरावाच्या १७०७ अधिक चैत्र वद्य ५ च्या पत्रांत आढळतो:- "नजीबखानानें ज्या रामगडचें अलीकडे आलिगड म्हणोन नाव ठेविलें आहे, तेथें जाऊन किल्ला कांहीं खालीं करून पादशाही अंमल बसवावा असा राणेखान व रायाजी पंत याचा विचार आहे. (राजवाडे खंड. १२. ५०, ३६)." त्यावेळीं अलीगडच्या किल्ल्यास फार महत्त्व होतें व तेथेंच डी ब्वानें हा कवाईती लष्कर तयार करीत असे. इ. स. १८०२ सालीं शिंदे, नागपूरचे भोंसले व होळकर हे ब्रिटिश व निजाम यांच्याविरुद्ध असतांना चाललेल्या लढाईत हा किल्ला शिंद्यांच्या ताब्यांत असून तेथील व्यवस्था फ्रेंच सेनापति पेरन पहात होता. इ. स. १८०३ सालीं ब्रिटिशांनीं हा किल्ला सर केला. त्यामुळें आसपासचा सर्व प्रदेश ब्रिटिशाकडे आला. ब्रिटिशांच्या हातीं हा भाग आल्यावर लगेच त्याची योग्य व्यवस्था लावण्यास प्रारंभ झाला. लवकरच होळकरांशीं लढाई सुरू झाली व होळकरांच्या चिथावणीनें येथ बंड झालें. परंतु त्याचा तात्काळ बंदोबस्त करण्यांत आला. सन १८१६ पर्यंत लहान लहान दंगे तेथें होतच होते. पण पुढें १८५७ च्या बंडापर्यंत सर्व स्थिरस्थावर होतें इ स. १८५७ च्या बंडाचा परिणाम तेथें झाला होता, व हा भाग बंडवाल्यांच्या ताब्यांत गेला होता. त्यावेळीं लोकांवर बंडवाल्यांनीं फार जुलूम केला. त्यामुळें ब्रिटिश परत या बाजूला आल्यावर तावडतोब या भागांतील लोक त्यांना मिळाले. व बंडवाल्यांनीं पळ काढला.

बौद्ध व हिंदु कालातील प्राचीन अवशेष येथें जागोजागीं सांपडतात.

येथील लो सं. (१९२१) १०६१७४५. या जिल्ह्यांत एकंदर २३ गांवें व १७५३ खेडीं आहेत इ. स. १८७६–७७ सालीं येथें मोठा दुष्काळ पडला होता या जिल्ह्यांत कालवे असल्यामुळें हा जिल्हा इ स. १८९६—९७ च्या दुष्काळांतून वांचला या जिल्ह्यात सहा तहशिली आहेत. त्या अत्रौली अलीगड, इग्लास, हाथ्रस, खैर, सिकंद्राव या होत.

या जिल्ह्यात क्षार आलेली ओसाड जमीन पुष्कळ आहे. ती पुन्हा लागवडीस आणण्याचे प्रयोग चालू असून त्यास थोडें फार यशहि येत आहे. मुख्य पिकें—गहूं, सातु, ज्वारी, हरबरा, मका, बाजरी, अरहर, कापूस. दिवसेंदिवस गव्हाच्या लागवडीचें क्षेत्र वाढत आहे. घोड्यांची पैदास बरीच होते. अपर गँजेस कनाल (उत्तर गंगेचा कालवा) या जिल्ह्यातून जातो. या खालीं इ स १९०३–०४ सालीं २२९ चौरस मैल जमीन भिजली जात होती विहिरीच्या पाण्यानें सुमारें ५१५ चौरस मैल जमीन भिजली जात होती.

खनिज पदार्थ.—कंकर, रस्त्यावरील खडी याचा इमारतीकरतां उपयोगी होतो. सिकंद्राव तहशिलींत क्षारापासून सोरा व कांच तयार करतात.

व्यापार व उद्योग धंदे.—सुती गालिचे येथें तयार होतात. इ. स. १९०४ सालापासून निळीचा व्यापार अगदींच बसला. त्यापूर्वी येथें निळीचे ७५ कारखाने असून ४५०० लोक काम करीत असत. येथून धान्य व कापूस बाहेर जातो. या जिल्ह्याचा व्यापार कानपूर, मुंबई व कलकत्ता या शहरांशीं फार आहे. येथें रेल्वेच्या सोयी चांगल्या व इतर रस्तेहि चांगले आहेत.

पूर्वी येथें दुष्काळ फार पडले. इ. स १८३७ व १८७३–७४ चे दुष्काळ अति भयंकर होते कालवे झाल्यापासून आतां दुष्काळाचें प्रमाण कमी झालें आहे.

कलेक्टर, डेप्युटी कलेक्टर, तहशिलदार वगैरे अधिकारी कारभार पाहतात.

इ. स. १८२४ सालापासून या जिल्ह्याच्या सार्वतांत कांहीं फरक झाला नाहीं. जमीन महसूल २४ ५ लाख रुपये आहे. या जिल्ह्यांत चार म्युनिसिपालिट्या आहेत.

तहशील.—( संयुक्त प्रांत. ) कोईल, अलीगड जिल्ह्यांतील उत्तरेकडील तहशील. उ. अ. २७° ४९' ते २८°८' व पू. रे. ७७°५५' ते ७८°१७'. क्षेत्रफळ ३५८ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) २५७३४१. परगणे तीन आहेत ते—कोईल, मोर्थल, घरोली. हे होत. तीन गांवें व ३४२ खेडीं या तहशिलींत आहेत. तहशिलीच्या पूर्वेस काळी नदी असून ही तहशील फार सुपीक आहे. १९०३-०४ सालीं जमीनमहसूल, ४५७००० रुपये व इतर कर ७६००० रुपये. २४६ चौरस मैल जमीन लागवडीखालीं होती, पैकीं १६७ चौरस मैल बागाइति होती.

शहर.—( संयुक्त प्रांत. ) अलीगड जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण. उ. अ. २७° ५२' व पू रे. ७८°४' औध-रोहिलखंड रेल्वे व ई.ट इंडियन रेल्वे यांचें हे जंक्शन आहे. शहराचें जुनें नांव कोईल अथवा कोल असून हें अलीगड रेल्वेच्या पूर्वेस वसलें आहे. लोकसंख्या ( १९११ ) ६४,८२५.

इतिहास.—( 'अलीगड जिल्हा' पहा. ) येथील किल्ल्यास महमदगड असें नांव सोळाव्या शतकांत होतें. सन १७१७ च्या सुमारास साबितखान नामक सुभेदारानें साबितगड हें नांव या किल्ल्यास दिलें. पुढें १७५७ सालीं जाटांनीं त्यांचें नांव रामगड असें ठेविलें. पुढें नजफखान याच्या हातांत हा किल्ला पडल्यावर त्यानें अलीगड असें नांव दिलें. इ. स. १८५७ च्या बंडांत येथील सैन्य सामील झालें होतें. त्या वेळीं शहर लुटलें गेलें होतें. सुलतान नासिरुद्दीन यास मिळालेल्या विजयाप्रीत्यर्थ सन १२५३ सालीं बांधलेला स्तंभ सन १८६२ सालीं पाडण्यात आला.

म्युनिसिपालिटीची स्थापना सन १८६५ सालीं झाली. सन १९०३-०४ सालीं उत्पन्न ९५००० व खर्च एक लाख होता.

येथून धान्य, नीळ व कापूस बाहेर रवाना होतो. काहीं किरकोळ मार्दी व वाळलेलें मांस येथून ब्रह्मदेशाला जातें. बरेचसे जिनिंगचे व कुलुपें करण्याचे कारखाने चालतात.

येथें दोन इस्पितळें, तीन चार हायस्कुलें व दुसऱ्या काहीं शिक्षणसंस्था आहेत. मुसुलमानांचें एक विद्यापीठ आहे येथें पुष्कळ दूरदूरचे विद्यार्थी शिक्षण घेण्यास येतात. ब्रह्मदेश, सोमालीलँड, इराण, बलुचिस्तान, अरेबिया, युगांडा, मारिशस, केप कॉलनी वगैरे ठिकाणचे विद्यार्थी येथें येतात, 'अलीगड इन्स्टिट्यूट गॅझेट' व हिंदी 'अभ्युदय' पत्र येथें छापलें जातें,

युनिव्हर्सिटी.—सर सय्यद अहमद यांच्या मनांत पुष्कळ दिवसांपासून मुसुलमान समाजाला उच्च शिक्षण सुलभ रीतीनें घेता यावें याकरितां काहीं स्वतंत्र व्यवस्था करण्याचें होतें. १८७६ सालीं अलीगड येथें एक इंग्रजी शाळा स्थापिली गेली, तीन वर्षांनंतर तिचें कॉलेजांत रूपांतर झालें,या कॉलेजाचेंच अध्यापन व निवास यांशीं युक्त असें विश्वविद्यालय (रेसिडेन्शियल) करावें, अशी चळवळ येथ्या शत काच्या शेवटीं शेवटीं सुरू झाली. १९११ मध्यें मुस्लिम युनिव्हर्सिटी असोसिएशनची स्थापना होऊन जोराची खटपट करण्यात आली. १९२० सालीं अलीगड युनिव्हर्सिटी ॲक्ट होऊन युनिव्हर्सिटी अस्तित्वांत आली. ही युनिव्हर्सिटी प्रांतिक सरकारच्या ताब्यांत नसून गव्हर्नर जनरलच्या देखरेखीखालीं चालते. अलाहाबादच्या हायकोर्टानें वकिलीकरितां या विद्यापीठाच्या पदवीधरांना मान्यता दिली आहे

अलीगड, तहशील.—( संयुक्त प्रांत ), फरुकाबाद जिल्ह्याच्या ईशान्येकडील तहशील. उ. अ. २७° १४' ते २७° ४०' व पू. रे. ७०° ३२' ते ७९° ४५'. क्षेत्रफळ. १८१ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ८२७४९. एकंदर खेडीं १०३ परगणे—अमृतपूर, परमनगर, खाखटमाव. सन १९०३-४ सालीं जमिनीचें उत्पन्न. ११८००० व इतर कर १९००० रुपये होता, लागवडीखालीं क्षेत्र १११ चौरस मैल होतें. पावसाळ्यांत फार पूर येतो.

अलीपूर, पोटविभाग.(१)(बंगाल),—चोवीस परगणे जिल्ह्यांतील एक महाल. उ. अ. २२° ८' ते २२° ३८' व पू. रे. ८८° ७' ते ८८°२९. क्षेत्रफळ ११६४ चौरस मैल. यापैकीं ४५० चौरस मैल सुंदरबनांत आहे. लोकसंख्या सुमारें पावणेसात लक्ष. या अलीपूरच्या आकड्यांत कलकत्ता शहराच्या आसमंतातल्या वस्तीचे आकडे नाहींत. अलीपूर हें विभागाचें मुख्य ठिकाण. साउथ सुबर्बस, टॉलीगंज, राजपूर, बारुइपूर, जयनगर आणि बजबज अशीं सहा शहरें या विभागांत आहेत.

पोटविभाग (२),(—बंगाल) राजशाही विभागांतील जलपैगुरी जिल्ह्याच्या पूर्वेकडील महाल. उ.अ. २६°१४' ते २६° ५१'. पू. रे. ८९°३' ते ८९° ५३'. क्षेत्रफळ ११४२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११) २०२७०१. एकंदर खेडीं १८० व शहर एक.

भूतान संस्थानांतून हा भाग ब्रिटिशांकडे आला व चहाची लागवड सुरू झाल्यापासून येथील वस्ती झपाट्यानें वाढत आहे.

गांव.—( बंगाल ), चोवीस—परगणा जिल्ह्याचें मुख्य ठाणें. उ. अ. २२° ३२' व पू रे, ८८° २१'. अलीपूर हें कलकत्त्याच्या दक्षिणेकडील भाग असून कलकत्ता म्युनिसिपालिटींत मोडतें. गव्हर्नर याचा बंगला येथेंच आहे. काळ्या सैन्याची तुकडी व जिल्ह्याच्या सर्व कचेऱ्या आहेत. कुचबिहारच्या महाराजाचा बंगला येथेंच आहे. हा पूर्वी नानासाहेबानीं बांधला व तो सत्तावन सालचें बंड अयशस्वी झाल्यामुळें इंग्रजांच्या ताब्यांत आला व पुढें तो कुचबिहारकरांस विकला. येथील तुरुंगांत १८३० कैद्यांची सोय आहे. कैद्यांकडून निरनिराळें काम करून घेतलें जातें. व त्यापासून सरकारास नफाहि होतो. १९०८ सालीं इंग्रज सरकार

विरुद्ध बंड उभारण्याचा एक मोठा कट येथें उघडकीस येऊन अन्याव भद्रलोक तरुणांना शिक्षा झाल्या

अलीपूर, त ह शि ल—( हिंगणघाट ) वर्धा जिल्हा वर्ध्याच्या आग्नेयीस १६ मैल व सोनेगाव स्टेशनपासून ५॥ मैलावर हा गांव आहे

वाली नांवाच्या मुसुलमान फकीरानें हा गांव वसविला याचें थडगें येथें असून जवळच एक चांगल्या पाण्याची विहीर आहे हा गांव हल्लीं नागपूरचे चिटणीस यांच्याकडे आहे गावात एक तळें असून त्याची दुरुस्ती सन १९००च्या दुष्काळात केली आहे सार्वजनिक वर्गणीनें चालविलेलें एक महादेवाचें देवालय, मुसुल्मानाची एक मशीद, आणि गढी आहे आठवड्याचा बाजार दर मगळवारीं भरतो येथें कोष्टी लोकाची वस्ती बरीच असून ते ओबडधोबड कापड विण तात पोष्ट, पोलीसकचेरी व शाळा येथें आहेत (वर्धा गॅ., म प्रा गॅ )

खे डें —(बगाल) अलीपूर पोटविभागाचें मुख्य ठिकाण उ अ २६° २९' व पू रे ८९° ३२' हें गाव ५७१ वस्तीचें असून कालजानी नदीच्या उत्तर तीरावर आहे कुचबिहार स्टट रेल्वेवरील हें व्यापाराचें ठिकाण आहे येथें फेब्रुवारी महिन्यात वार्षिक जत्रा भरते

अलीपूर, त ह शी ल -(पजाब ) मुझफरगड जिल्ह्यांतील दक्षिणेकडील तहशील उ अ २८°५६' आणि २९°४६' व पू रे ७०° ३१' आणि ७१° ९' क्षेत्रफळ ९२५ चौ मैल पश्चिमेस सिंधु नद, पूर्वेस चिनाब नदी या नद्यांचा तहशी लीच्या दक्षिणटोंकांवर सगम होतो प्रदेश सखल असल्या- मुळें उन्हाळ्यात नद्यांना पूर आला असता बराच दक्षिण भाग पाण्याखालीं असतो लोकसख्या १९११ सालीं १४६१३५ होती एकदर उत्पन्न २ ७ लाख रुपये आहे यांत एक शहर व १७७ खेडीं आहेत

गां व —(पजाब) मुझफरगड जिल्ह्याच्या अलीपूर तहशि लीचें मुख्य ठिकाण मुझफरगड गांवाच्या दक्षिणेस ५१ मैला वर आहे उ. अ २९°२३' व पू रे ७०°५५' लोकवस्ती १९११ सालीं ३३१२ होती सितपूर येथील नहर राजापैकीं अलीखानानें हें गाव वसविलें असें म्हणतात म्युनसिपालिटीची स्थापना सन १८७३ त तिचें १९०३–४ चें उत्पन्न ६३००, खर्च ६३०० येथून गूळ व नीळ सिंध व खोरासान येथें जाते येथें बाहेर पाठविण्याकरतां तपकीर तयार करतात ( इ गॅ )

अलीपुरा—( मध्यहिंदुस्थान ) बुंदेलखड एजन्सींतील एक लहानसें सनदी संस्थान क्षेत्रफळ ७३ चौरस मैल हा गांव उत्तर अक्षांश २५°१०' व पू रेखांश ७९°२९' यांवर जी आय पी रेल्वेच्या झांशी माणिकपुर शाखेच्या हरमालपुर स्टेशनपासून ९ मैलावर आहे येथें महा- गिरदाराचा वाडा आहे

उत्तरेस, दक्षिणेस व पूर्वेस सयुक्त प्रांताचा हमीरपूर जिल्हा व पश्चिमेस गरोळी जहागीर सस्थानिक रजपूत असून तो अग्निकुलापैकीं परिहार वशाचा आहे असा समज आहे. इ स १७०८ सालीं कोणा गराब दासानें पन्नाच्या सस्था- निकाचा नोकरी धरली त्याचा नातू अचलसिंग यास सन १७५७ सालीं पन्नाचा राजा हिंदुपत याजकडून हा भाग मिळाला ज्यावेळीं बाजीराव पेशव्याच्या अलिबहादरानें बुंदेलखड घेतलें त्या वेळीं त्यानें प्रतापसिंगास त्याच्या जहागिरीवर कायम केलें सन १८०८ सालीं ब्रिटिश सरकारनें देखील त्याचा हक्क शाबीत धरून त्यास सनद दिली प्रतापसिंगास चार मुल होता सन १८३५ सालीं वडील मुलाकडे सर्व कार- भार आल्यावर त्यानें जहागिरीचे चार वांटे केले, यामुळें बखेड उत्पन्न झाले या वांटणीची खबर ब्रिटिश सरकारास न दिल्यामुळें ब्रिटिश सरकारनें ही वांटणी रद्द केली. सन १८५७ सालीं हें घराणें ब्रिटिशाशीं राजनिष्ठ असल्यामुळें ५००० रुपयाचा खिलात यास मिळाली दत्तक घेण्याची सनद सन १८६२ सालीं मिळाली छत्रपति सिंग हा १८७१ साली मालक झाला हा दत्तकपुत्र आहे इ स १८७७ मध्यें यास रावबहादुर, १८८७ मध्यें सी एस आय आणि सन १९०३ मध्यें राजा हे किताब मिळाले या जहागिर- दारास राव हा वंशपरंपरेचा किताब आहे १९११ सालीं लोकसख्या १६१४६ होती त्यापैकीं १५१०३ हिंदु होते एकदर खेडीं २७

लागवडीखालीं १८ चौरस मैल जमीन जगल १० चौरस मैल व लागवडीलायक १५ चौ मैल जमीन होती जहागि- रदार सर्व कारभार पहातो फांशी, काळेपाणी इत्यादि जबर शिक्षा देण्यालायक मोठे खटले पोलिटिकल एजट चालवितो. जहागीरदारास तो अधिकार नाहीं एकदर उत्पन्न ३०००० रुपये ( इं गॅ ५–१९०८ )

अलीबहादर—हा बाजीरावाचा पुत्र समशेर बहादर यास त्याची बायको मेहरबाई हिच्या पोटीं झालेला मुलगा याचच कृष्णसिंग असेंहि नाव होतें याचा जन्म १७५८ त झाला असें रियासतकार म्हणतात, पण भारत–इतिहास– सशोधक–मडळाच्या अष्टम सेमेलनप्रसगीं 'मस्तानीची वस्तवानी' म्हणून जो निबध वाचण्यांत आला त्यात याचा जन्म १७६० सालीं समशेर बहादर निजामावरील मोहीम- वर जात असता झाला असें म्हटलें आहे तो बापा पेक्षाहि शूर व पराक्रमी निघाला महादजी शिंदे उत्तर हिंदुस्थानात प्रबल झाला तेव्हा त्यास शह देण्याकरिता नाना फडणिसानें स १७८८ सालीं महादजीस मदत करण्याच्या मिषानें अलीबहादरास फौज देऊन तिकडे पाठविलें त्यानें तेथें (बुंदेलखडात) पराक्रम करून पाऊणकोटीचा मुलख काबीज केला त्या वेळचीं त्याचीं पत्रें स १७८८ पासून १७९० चीं इतिहाससग्रहात छापिलीं आहेत (मराठी रियासत, मध्यविभाग पृ ४३७–३८ ) गुलाम कादरच्या छळापासून बादशहाची सुटका करण्याकरिता इ स १७८८ सालीं राणेखान दिल्लीस गेला तेव्हां अलीबहादर

हा त्याजबरोबर होता ( ग्रांटडफ ) त्याच वर्षी हिंमतबहादूर नावाच्या गोसावी लष्करी अधिकाऱ्यास शिंद्याचे शिपाई कैद करून नेत असता तो पळून अलीबहादराकडे आला तेव्हा यानें त्यास आश्रय दिला व महादजीनें त्याला आपल्या स्वाधीन करण्याविषयीं यास म्हटलें असता, *नाना फडणिसाकडून तसा हुकूम आल्याशिवाय मला हिंमतबहादरास तुमच्या हातीं देता येत नाहीं* अशी कांहीं तरी सबब सांगून यानें त्याचा बचाव केला; व नाना फडणिसाकडून हिंमतबहादरासंबंधीं कांहीं पत्र येऊन पोंचण्यापूर्वीच यानें हिंमतबहादरास गुप्तपणें सोडूनहि दिलें. ( किंकेड, पृ ३४) सन १७९२ सालीं हिंमतबहादरानें अलीबहादराच्या मनात बुंदेलखंड काबीज करण्याची गोष्ट भरविल्यावरून त्या दोघांनीं मिळून तें काम हातीं घेतलें. बऱ्याच प्रयासाअंतीं त्यांनीं एकदाचें त्या प्रांतीं आपलें ठाणें दिलें परंतु त्यांना शेजारच्या राजाशीं लढण्याचें व जिंकलेल्या मुलुखातील बंडें मोडण्याचेंच काम कित्येक दिवसपर्यंत अव्याहत करावें लागलें ( किंकेड पृ. ७५ ) अलीबहादरानें बुंदेलखंडात मिळविलेल्या मुलुखापैकीं कांहीं तर पूर्वीपासूनच पेशव्याचा होता व कांहीं यानें नवीन मिळविला होता नवीन मिळविलेल्या मुलुखास हा स्वतःची जहागीर म्हणवीत असून पेशव्याची सार्वभौम सत्ता त्याला मान्य होती [ किंकेड पृ. २३५-३६ ]. नाना फडणिसाच्या परवानगीनें त्यानें सागरच्या ईशान्येस बांदा येथें आपलें वास्तव्य केलें, आणि पुण्याहून लोक नेऊन तेथें अठरा कारखाने स्थापिले. गोरे नावाचा एक इसम त्यानें तेथें आपल्या दिवाणगिरीवर नेमला होता त्याच्या घराण्याचे वंशज हल्लीं बांदा येथें आहेत अशा रीतीनें बांद्याची जहागीर नाना फडणिसाच्या वेळेस स. १७८८ त उत्पन्न झाली. कलिंजर किल्ला घेत असता अलीबहादर स. १८०२ सालीं मारला गेला. त्याची स्त्री बादशहा बेगम लहानपणींच वारली. तिच्याशिवाय दुलज बेगम व बख्शी बेगम अशा आणखी दोन बायका त्यानें केल्या होत्या. त्यांपैकीं दुलजबेगमचा मुलगा समशेरबहादर व बख्शीबेगमचा झुल्फिकारअली [ मराठी रियासत, मध्यविभाग. पृ. ४३७-३८.] याशिवाय रहिमतबिबी नावाची अलीबहादरची एक रक्षा होती. ( भा. व. पु. २, मस्तानीचा वंश)

**अलीबाग तालुका.**-(मुंबई इलाखा )कुलाबा जिल्ह्याच्या वायव्येकडील तालुका. उ. अ. १८° २९' आणि १८°३९'व पू. रे. ७२° ५१' आणि ७३° ५'. क्षेत्रफळ १९३ चौरस मैल. या तालुक्यात २ गावें व १७७ खेडीं आहेत. मुख्य ठिकाण अलीबाग. लोकसंख्या ( १९११ सालीं) ८०८६२ जमीन महसूल उत्पन्न १९०३-४ सालीं २.५२ लाख व इतर कर १७००० रुपये होतो.

या तालुक्यात खारी जमीन पुष्कळ असून येथें उष्णतामान इतर तालुक्यातील भागाच्या मानानें बरेंच असतें.

गांव.—( मुंबई इलाखा; ) हें कुलाबा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून समुद्रकांठीं मुंबईच्या दक्षिणेस एकोणीस मैलावर आहे. उ. अ. १८° व ३९' पू. रे. ७२°५३'. लोकसंख्या ( १९२१ ) ५२५३.

इतिहास.—१७व्या शतकांत अली नावाच्या श्रीमान मुसलमानानें येथें पुष्कळ विहिरी व बागा तयार केल्या त्यांपैकीं कांहीं अद्यापि अस्तित्वात आहेत. त्याचें नाव या गांवास मिळालें आहे सतराव्या शतकाच्या अखेरीस या बागेच्या जागीं आंग्र्यांनीं गाव वसवून तें आपलें मुख्य ठाणें बनविलें. त्यामुळें आंग्र्याच्या भरभराटीच्या वेळीं या गावाला विशेष महत्त्व होतें. पुढें १८४० पासून अलीबाग हें कुलाबा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बनलें. अलीबागच्या वायव्येस हिराकोट नावाचो किल्लेवजा मोठी इमारत आहे, ती कान्होजी आंग्रे यानें १७२० मध्यें बांधली असें म्हणतात. अलीबागचा किल्ला किनाऱ्यापासून सुमारें एक फर्लांग आत समुद्रात आहे. हा पूर्वी मराठ्यांचे सरदार आंग्रे यांच्याकडे होता. किल्ल्याच्या नैर्ऋत्येस दोन मैलावर एक अदमासें साठ फूट उंचीचा दगडी मनोरा गलबतांना इशारत देण्याकरता उभारलेला आहे. त्याठिकाणीं असलेली उथळ खडकाळ जागा समुद्रास भरती आली असताना दिसत नाहीं. याठिकाणीं पुष्कळ गलबतें दगावलीं आहेत. दीड मैलावर एक तलाव तयार करून तेथून पाणी आणलें आहे. पूर्वेस सागरगड किल्ला व कनकेश्वर हें उंच डोंगरावरचें देवस्थान आहे. दक्षिणेस चौल गावाकडील टेकड्यात अनेक बौद्ध लेणीं आहेत. येथील नारळीच्या व कलमी आंब्याच्या बागा प्रसिद्ध आहेत. येथें व्यापार बराच चालतो. येथील म्युनिसिपालिटीची स्थापना सन १८६४ त झाली. तिचें उत्पन्न ( १९०३-०४ )-११००० रु मुंबई वेधशाळेची लोहचुंबक शाखा येथें आणली आहे येथें जिल्ह्याच्या, तालुक्याच्या कचेऱ्या, हायस्कूल वगैरे आहेत. मे महिन्यात येथील सर्वांत अधिक उष्णतामान ९५ २ डिग्रीपर्यंत चढतें, व हिवाळ्यात ८० ० पर्यंत उतरतें. समुद्रकांठीं अगदीं मोकळ्या हवेंत हा गाव असल्यामुळें येथील हवापाणी जिल्ह्यातील इतर सर्व ठिकाणापेक्षा अधिक चांगलें आहे. गोड्या पाण्याकरिता दी रायल अलिबाग वॉटर वर्क्स या नावाचा नदीस धरण बांधून तलाव केला आहे. या कामाकरिता भाऊसाहेब (धुंडिराज विनायक )बिवलकर यांनीं २०००० रुपयाची देणगी दिली होती.

किल्ला.—हा अलीबागचा (कुलाबा) किल्ला, शिवाजीच्या किल्ल्यांपैकीं एक होता, पण त्याला महत्त्व आंग्र्यांच्या वेळीं विशेष आलें त्याची दक्षिणोत्तर लांबी सुमारें ९०० फूट व पूर्व पश्चिम रुंदी ३५० फूट आहे. आत गणपतीचें देऊळ, पद्मावतीची समाधि, तळघर व विहीर आहे. शिवाय आंग्र्यांचा पांच मजली थोरला वाडा होता तो हल्लीं पडला आहे. चैत्रात येथें जत्रा भरते.

**अली मसजीद**—(वायव्येकडील प्रांत)खायबर खिंडींतील खेड्याचें व किल्ल्याचें नांव. जमरूड आणि लंडीकोटल यांच्या दरम्यान अली मसजीद हें ठाणें आहे. याच्या सभोंवतालचा प्रदेश आफ्रिडी लोकांनीं व्यापला आहे. हा किल्ला या भागांतील इतर किल्ल्यांप्रमाणें लहानसाच आहे.

**अली–राजपुर, संस्थान**—(मध्य हिंदुस्थान.) भोपावर एजन्सींतील एक संस्थान. उ. अ. २२ ° ०' ते २२° ३४' व पू. रे. ७४° १८' ते ७४° ३४'. क्षेत्रफळ ८३६ चौरस मैल. अली हें किल्ल्याचें नांव, व राजपुर हें राजधानीचें नांव हीं दोन्हीं मिळून या संस्थानास वरील नाव मिळालें आहे. उत्तरेस मुंबई इलाख्यांतील पंचमहाल जिल्हा; दक्षिणेस नर्मदा नदी; पश्चिमेस रेवाकांठा एजन्सी व पूर्वेस भोपावर एजन्सींतील कांहीं ठाकुरातीं. प्रदेश डोंगराळ असून जंगल विपुल आहे. उन्हाळा व हिंवाळा हे दोन्ही ऋतू कडक असून पाऊस सरासरी ३५ इंच पडतो.

पूर्वीचा इतिहास विश्वसनीय नाहीं. जोधपूरच्या घराण्यांतील कोणी उदेदेव अथवा आनंददेव हा या संस्थानचा मूळ पुरुष असून इ. स. १४३७ सालीं अली येथें यानें किल्ला बांधला असें म्हणतात. तथापि जोधपूर राजघराणें हा संबंध मानीत नाहींत. आनंददेवाचे नातू गुगलदेव आणि केसरदेव हे होते. पैकीं गुगलदेव यास अली–राजपुर व केसरदेव यास जोबट संस्थान मिळालें. इ. स. १८१८ सालीं राणा प्रतापसिंहाच्या तर्फे मुझाफर मकराणी हा कारभार पहात होता. प्रतापसिंहाचा काल झाल्यावर त्याच्या मुलातर्फे जसवतसिंग हाच कारभार पहात असे. पुढें धार संस्थान व हें संस्थान यांमध्यें कांहीं लढा उपस्थित झाला. पण इ. स. १८२१ सालीं ब्रिटिश सरकार, धार संस्थान व हें संस्थान यांची आपसांत तडजोड होऊन तो तंटा मिटला. जसवतसिंग सन १८६२ सालीं मरण पावला त्यानें मृत्युपत्रांत संस्थानाची आपल्या दोन मुलांमध्यें वांटणी व्हावी असें लिहून ठेवलें. पण ब्रिटिश सरकारनें तें मृत्युपत्र बाजूस सारून वडील मुलगा गंगदेव यास गादीवर बसविलें. पण इ. स. १८७१ सालीं त्याच्या नालायकीमुळें त्यास पदच्युत करून त्याचा धाकटा भाऊ रूपदेव यास गादी दिली. हा सन १८८१ सालीं मरण पावला. यास संतान नव्हतें, तेव्हां सोंडवा ठाकुर वंशांतील विजयसिंग यास ही गादी दिली. यावेळीं फुलमालच्या जितसिंग ठाकुरानें भिल्लांनां चिथवून बंड करण्याचा घाट घातला होता. पण तें तावडतोब मोडून टाकण्यांत आलें. इ. स. १८९० मध्यें विजयसिंग मृत्यु पावल्यावर त्याचा चुलतभाऊ प्रतापसिंग यास गादी मिळाली. याचें इंदोर येथील डेली कॉलेजमध्यें शिक्षण झालें असून त्यास राणा हा किताब आहे व ९ तोफांच्या सलामीचा मान आहे.

येथील लोकसंख्या १९२१ त ८९३६४होती. गेल्या वीस वर्षांत लोकसंख्या जवळ जवळ दुप्पट झालेली दिसते. (पृ. १७४ पहा) पृष्ठ ३९८–१०७. जमीन चांगली नसून भिल्ल व भिलाल यांची वस्ती फार असल्यामुळें उत्पन्न येत नाहीं. हे लोक स्वतःच्या गरजेपेक्षां जास्त विकविण्याच्या भानगडींत पडत नाहींत. आगगाड्या, रस्ते वगैरे सोयी नसल्यामुळें व्यापार फारसा नाहीं.

संस्थानचे पांच परगणे आहेत :—भाम्रा, राठ, नानपुर, छकताल आणि चांदपुर. प्रत्येक परगणा कमाविसदार याच्या हाताखालीं असतो या संस्थानिकास पहिल्या वर्गाच्या मॅजिस्ट्रेटचे अधिकार आहेत. ब्रिटिश कायदाच येथें चालतो.

अगदीं अलिकडे वसूल धान्यामध्यें होत असे. हल्लीं साधारण एक लाख रुपये उत्पन्न आहे. संस्थानास ८६०० रुपये खंडणी दिली जाते.

**गांव.**—अली–राजपुर हें संस्थानांतील मुख्य गांव आहे. उ. अ. २२° ११' आणि पू. रे ७४°२२' समुद्रसपाटीपासून उंची ९७०० फूट. लोकसंख्या ( १९०१ ) ३९५४ मुझाफर मकराणी यानें ही राजधानी केली. ( इं. गॅ. ).

**अलीवर्दीखान.**—याचा बाप मिर्झा महंमद हा तुर्कोमन असून, तो प्रथम राजपुत्रअझमशहा याचा नोकर होता; पण पुढें तो वारल्यावर १७०७ मध्यें मिर्झा दिल्लीहून कटकला गेला. तेथें मुर्शिदकुलीखानाचा जावई सुजाउद्दीन (सुजाखान) याच्या आश्रयाला राहिला. सुजाउद्दिनानें मिर्झाचा पुत्र महंमदअल्ली याला राजमहालाचा फौजदार केलें व बादशहाकडून मनसबी व अलीवर्दीखान ( अल्ला वीर्दी खान ) ही पदवी व मागाहून महाबतजंग ही दुसरी पदवी मिळवून दिली. येणेंप्रमाणें अलीवर्दीखान हा आरंभीं बंगालचा नवाब सुजाउद्दीनखान, याच्या पदरीं एक लहानसा नोकर होता, पण पुढें चढत चढत त्यानें व त्याचा वडील भाऊ हाजी महंमद यानें नबाबाच्या राज्यकारभारांतहि आपला शिरकाव करून घेतला. पुढें नबाबानें अलीवर्दीखानास बहार प्रांताची व्यवस्था सांगितली. तेथें अलीवर्दीखानानें डोईजड राजांची पुरी खोड मोडली. शिवाय पाटणा व मोंगीर यांच्या दरम्यान चकवार नावाचे शूर हिंदू लोक रहात होते त्यांच्याशीं लढून अलीवर्दीखानानें पुष्कळ नवीन कर बसविले व अनेक कपटें करून त्यांचा निःपात केला. मध्यंतरीं पुष्कळदां त्याच्या अफगाण फौजेनें शिरजोरपणा दाखविला असतां त्यानें त्या सर्वांचाहि कपटानें मोड केला. इकडे दरबारांत लाच वगैरे भरून त्याची सुजाउद्दिनाच्या विरुद्ध खटपट चालूच होती. शेवटीं १७३९ त दिल्लीहून परभारें अलीवर्दीखानाची नेमणूक बहार प्रांतावर स्वतंत्रपणें झाली याच सुमारास सुजाउद्दीन एकाएकीं मरण पावला; त्यास त्याच्या दरबारीं असलेला अलीवर्दीखानाचा वडील भाऊ हाजी महंमद यानें ठार मारलें असें म्हणतात. नबाबाचा पुत्र व वारस सर्फराजखान हा असून तो ढाका येथें राहत असे व नबाबाचा जावई मुर्शिदकुलीखान हा ओरिसाचा नायब सुभेदार होता. सुजाउद्दीन मरण पावल्यावर

त्याचा पुत्र सर्फराजखान याची त्याच्या जागीं नेमणूक झाली. पण तो सर्वांशीं उद्दामपणानें वागू लागल्यानें त्याच्या विरुद्ध जिकडे तिकडे गुप्त बेत सुरू झाले. ही संधि साधून अलीवर्दीखानानें बंड करून सर्फराजखानास एका लढाईत ठार केलें ( हि. स. ११५३ = इ. स. १७०४ ) शिवाय त्यानें मुर्शिदकुलीखानावरहि हल्ला करून त्यास ओरिसांतून हाकून लाविलें त्यावेळीं मुर्शिदकुलीखानाचा मीरहबीब नावाचा एक अरबी मनुष्य दिवाण होता त्यानें अलीवर्दीखानाकडे येऊन त्याच्या पदरीं चाकरी धरली सर्फराजखानाची जी कांहीं मालमत्ता व जडजवाहिर अलीवर्दीखानाच्या हातीं लागलें, त्यापैकीं कांहीं भाग मोंगल दरबारांतील अमीरउमरावास देऊन, अलीवर्दीखानानें बंगाल प्रांताची नबाबी पटकावली. इ. स. १७४० च्या सुमारास बंगाल, बहार व ओरिसा या तीनहि प्रांतावर अलीवर्दीखानाची सत्ता प्रस्थापित झाली होती.

अलीवर्दीखानाचीं पहिलीं अकरा वर्षें मराठ्यांच्या बंगालवर स्वाऱ्या होत होत्या त्यांच्याशीं लढण्यांत खर्च झालीं. त्यानें आपल्या पुतण्याचा व मुलीचा मुलगा सिराजउद्दौला ( सुराज उद्दौला ) याजकडे कटक प्रांताची सुभेदारी दिली होती. सिराजउद्दौल्याच्या जुलमी वर्तनामुळें इ. स १७४२ मध्यें त्या प्रांतीं बंड उपस्थित झालें ( ग्रांटडफ. ) यावेळीं सिराज उद्दौल्याचें वय निरनिराळ्या ग्रंथकाराप्रमाणें कमीत कमी चार वर्षांचें व जास्तींत जास्त पंधरा वर्षांचें निघतें ). तें मोडण्याच्या कामांत अलीवर्दीखान गुंतला असतां रघूजी भोंसल्याचा दिवाण भास्करपंत यानें सुमारें १२००० फौजेनिशीं बहार प्रांतांत स्वारी करून लुटालूट करण्यास आरंभ केला कटक प्रांतांतील बंड मोडून अलीवर्दीखान मुर्शिदाबादेस येत असतां त्याला मराठ्यांच्या स्वारीची ही बातमी समजली. तो चार हजार फौज व चार हजार पायदळ घेऊन मराठ्यांचा प्रतिकार करण्यासाठीं आला, परंतु मराठ्यांनीं त्याच्या सैन्याची इतकी दुर्दशा केली कीं, तो कटवा येथें परत आला तेव्हां, त्याजजवळ पुरते ३००० लोकहि राहिले नसतील अगदीं पहिल्याच हल्ल्यांत त्याचा सरदार मीरहबीब हा मराठ्यांच्या हातीं सांपडला. याच्या मदतीनें पुढें त्यांनीं मुर्शिदाबाद येथील धनाढ्य सावकार जगतशेट अलमचंद यांची पेढी लुटून सुमारें अडीचकोट रुपये आणले, व हुगळी शहर व कटव्यापासून मिदनापुरच्या आसमंतांतील भागापर्यंत सर्व स्थळें हस्तगत करून घेतलीं. यावेळीं अलीवर्दीखानानें मोंगल बादशहा व बाळाजीबाजीराव यांची मदत मागितली. त्यानें याच वेळीं बाळाजीकडे कांहीं पैसाहि पाठविला होता; परंतु दर्याखेच्या नबाबाच्या लबाडीमुळें तो मार्गांतच लुटला गेला. तथापि अलीवर्दीखान सर्वस्वीं दुसऱ्याच्याच मदतीवर अवलंबून राहिला नाहीं. त्यानें एके रात्रीं हुगळी व अदजी या नद्या नावांचे पूल बांधून ओलांडून तो कटवा येथील मराठ्यांच्या छावणीवर अचानक चालून आला, व भास्करपंताचा पाठलाग करून त्यास आपल्या मुलुखांतून हाकून लाविलें. तथापि अदजी नदी ओलांडून जात असतां कांहीं अपघात होऊन त्याचे १५०० लोक त्या नदींत बुडून मरण पावले. दुसऱ्या वर्षी रघूजी भोंसले जातीनें बंगाल प्रांतीं स्वारीस आला परंतु या वेळीं मोंगल बादशहाच्या निमंत्रणावरून बाळाजी बाजीराव अलीवर्दीखानाच्या मदतीस आला, व बादशहानें ठरवून दिलेली रक्कम देण्याचें अलीवर्दीखानापासून वचन घेऊन त्यानें रघूजीस बंगाल प्रांतांतून घालवून दिलें ( १७४३ ) [ रघूजी भोंसले पहा ]

इ. स १७४४ चा पावसाळा संपल्यानंतर रघूजी भोंसल्याचा दिवाण भास्करपंत यानें २०,००० फौज बरोबर घेऊन ओरिसाच्या मार्गें बंगाल प्रांतांत स्वारी केली. तेव्हां अलीवर्दीखानानें सलूख करण्याच्या मिषानें भोंसल्याच्या मुख्य मुख्य सरदारास आपल्याकडे मेजवानीस बोलावून त्या सर्वांचा विश्वासघातानें खून केला यानंतर रघूजीची फौज, रघूजी गायकवाड नावाचा मागें छावणींत, राहिलेला एकटाच सरदार, आल्या वाटेनें वऱ्हाडांत परत घेऊन गेला.

त्याच वर्षी म्हणजे इ. स. १७४४ तच अलीवर्दीखानाच्या चाकरींत असलेल्या अफगाण लोकांनीं बंड केलें, व अलीवर्दीखान त्याचें बंड मोडण्यांत गुंतला आहे अशी संधि साधून रघूजी भोंसल्यानेंहि ओरिसांत स्वारी केली त्यानें प्रथम आपल्या लोकांचें बंड मोडलें व नंतर तो रघूजीकडे वळला दरम्यान रघूजीनें कित्येक जिल्हे हस्तगत करून घेतले होते. परंतु याच सुमारास स्वन.च्या राज्यांतील बंडें मोडण्यास रघूजीस स्वदेशीं जाणें भाग पडल्यामुळें, या मोहिमेचें काम तूर्त कांहीं दिवस बंद पडलें.

सरतेशेवटीं मराठ्यांच्या या स्वाऱ्यांपासून आपली मुक्तता करून घेण्याकरितां इ. स. १७५१ मध्यें अलीवर्दीखानानें उत्तरेस बालासोरपर्यंत कटकप्रांत भोंसल्याच्या स्वाधीन केला, आणि बंगाल व बहार या दोन प्रांतांच्या चौथाईबद्दल त्यानें दरसाल बारा लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें.

अलिवर्दीखानाच्या वयास या वेळीं सत्तर वर्षें उलटून गेलीं असून म्हातारपणांतील मनोदौर्बल्य त्याच्यामध्यें दिसूं लागलें होतें मिर्झा महमूद उर्फ सिराजउद्दौला म्हणून त्याचा सर्वांत धाकट्या मुलीचा मुलगा होता त्याचे या अखेर अखेरच्या दिवसांत त्यानें फाजील लाड चालविले. इ. स. १७५० साली सिराजउद्दौल्यानें आपल्या आज्याविरुद्ध बंड करण्याचें धाडस केलें पण अलीवर्दीखानानें त्याचा कांहीं राग मानला नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यानें सिराजउद्दौल्यास आपला वारस म्हणून नेमून त्याचा राज्यकारभारांत हातहि लावूं दिला. अलीवर्दीखानानें राजकारणांत कितीहि दुष्कृत्यें केलीं असलीं तरी त्याचें खाजगी आचरण अत्यंत नीतिशुद्ध

होतें व त्याचा राज्यकारभारहि समकालीन राज्यकर्त्यांशीं तुलना करतां पुष्कळ व्यवस्थित होता.

येणेंप्रमाणें अलीवर्दीखान यानें बंगाल, बहार व ओडिसा या तीन प्रांतावर १६ वर्षे सत्ता चालविल्यावर तो शनिवार ता. १० एप्रिल सन १७५६ ( रज्जब हि. स. ११६९ ) रोजीं मरण पावला. या वेळीं चाद्रवर्षाप्रमाणें त्यास ८० वें वर्ष होतें, व कांहीं दिवस अगोदरपासून तो काम करण्यास असमर्थ झाला होता. त्याच्या प्रेताचें मुर्शिदाबाद येथ खुषबाग उद्यानांत त्याच्या आईच्या प्रेताजवळ दफन करण्यांत आलें. त्याच्यामागून सिराजउद्दौला अधिकारारूढ झाला.

[ संदर्भग्रंथः—यॉंगटनचा इतिहास; स्टुअर्ट हिस्टरी ऑफ बेंगाल, लंडन, १८१३; ग्राटडफ, हिस्टरी ऑफ दि मराठाज; मुसुलमानी व ब्रिटिश रियासत ]

**अलीवाल**—( पंजाब ) लुधिआना जिल्ह्याच्या जगरान ( जगावन ) तहशिलींतील एक खेडें. उ अ. ३०°५६' आणि पू. रे. ७५° ३८'. लोकसंख्या ( १९११ ) ७२४५४. पाऊस सरासरी २५ इंच पडतो. जानेवारी २८ सन १८४६ रोजीं शीख व इंग्लिश यांची येथें लढाई झाली. या ठिकाणीं शीखानीं अप्रतिम शौर्य दाखविलें. परंतु अखेरीस त्यांचा पराजय झाला. त्या लढाईचें स्मारक म्हणून येथें एक स्तंभ उभारलेला आहे.

**अलुतीबलुती**—अलुतेदार व बलुतेदार या गाव-कामगारांना मिळणाऱ्या वतनी हक्कास अलुतीबलुती ही नांवें आहेत बलुतेदार हा अलुतेदारापेक्षां वरिष्ठ दर्जाचा कामगार असतो. बलुतेदारांत प्रायः पाटील व कुलकर्णी या सरकारी नोकरांचा समावेश होत नाहीं; पण कांहीं भागांत पाटील, कुलकर्णी वगैरे वंशपरंपरागत वतनदार गावकाम-गारांचीहि बलुतेदारांत गणना होते. सामान्यतः पाटील, कुलकर्णी व सरकारी कामगार सोडून शिवाय गावांत बारा बलुतेदार असतात. या बलुतेदारांचे त्यांच्या हक्काच्या मानानें तीन वर्ग करण्यांत आले. त्यांपैकीं लोहार, सुतार, महार व मांग यांना पहिली किंवा थोरली कास उर्फ वळ हें नांव असून सुतार, लोहार, व मांग यास चार पाचुंद्याचा ( दांसपेंढ्याचा ) व मांग यास आठ पाचुंद्यांचा हक्क असतो; कुंभार, चांभार, परीट व न्हावी ही दुसरी उर्फ मधली कास असून तिच्या-तील प्रत्येकास तीन पाचुंद्याचा हक्क असतो, आणि भट, मुलाणी, गुरव व कोळी ही तिसरी किंवा धाकटी कास असून तिच्यापैकीं प्रत्येकास दोन पाचुंद्याचा हक्क असतो, अशी १८५७ सालीं छापलेल्या मोलस्वर्थ व कँडी यांच्या कोशांत माहिती दिली आहे. यांशिवाय प्रत्येक गांवांत बारा अलुतेदार असून त्यांत तेली, तांबोळी, साळी, माळी, जंगम, कळवन्त, डवऱ्या, ठाकर, घडशी, तराळ, सोनार, व चौगुला या बारा हक्कदारांचा समावेश होतो. अलु-तेदारांपैकीं प्रत्येकास किती धान्य द्यावयाचें तें ठरलेलें नाहीं. वर जीं बलुतेदारांचीं नांवें दिलीं आहेत त्याहून भिन्न नांवेंहि कांहीं ठिकाणीं आढळून येतात. उदाहरणार्थ, पाटील, कुल-कर्णी, चौधरी, पोतदार, देशपांड्या, न्हावी, परीट, गुरव, सुतार, कुंभार, वेसकर व जोशी यांची कांहीं ठिकाणीं बलुते-दारांत गणना होते; तर दुसऱ्या कांहीं ठिकाणीं सुतार, लोहार, चांभार, व कुंभार ही थोरली कास; न्हावी, परीट, कोळी व गुरव ही मधली कास व भट, मुलाणा, सोनार व मांग ही धाकटी कास मानण्यांत येते. कोंकणांतलीं बलु-तेदारांचीं नांवें याहूनहि निरनिराळींच आहेत. यासंबंधीं अगोदरच निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे हक्क ठरलेले होते व त्यांत पुढें कालपरत्वें, स्थलपरत्वें, व अज्ञानानें आणखी बदल होत गेला. १८५७ सालच्या सुमारास इंदापूर परग-ण्यांतील बलुतेदार पुढें दिल्याप्रमाणें होते. सुतार, लोहार, चांभार व महार ही पहिली कास, परीट, कुंभार, न्हावी, व मांग ही दुसरी कास आणि सोनार, मुलाणा, गुरव, जोशी, कोळी व रामोशी ही तिसरी कास. तथापि तेथील कोणत्याहि गांवांत त्या काळींसुद्धां हे चौदाच्या चौदा बलुते-दार आढळून येत नव्हते किंवा मागें कधीं असल्याबद्दल पुरावा मिळत नव्हता. पंढरपूरभागांत महार, सुतार, लोहार व चांभार ही पहिली वळ; परीट, कुंभार, न्हावी व मांग ही दुसरी वळ; आणि कुळकर्णी जोशी, गुरव व पोतदार ही तिसरी वळ असा बलुतेदारांचा अनुक्रम होता. ग्राटड-फनें सुतार, लोहार, चांभार, मांग, कुंभार, न्हावी, परीट, गुरव, जोशी, भाट व मुलाणा अशीं बलुतेदारांचीं व सोनार, जंगम, शिंपी, कोळी, तराळ किंवा वेसकर, माळी, डवऱ्या गोसावी, घडशी, रामोशी, तेली, तांबोळी व गोंधळी अशीं अलुतेदारांचीं नांवें दिलीं आहेत. दक्षिण हिंदुस्थानातल्या उत्तरेकडच्या भागांतील विदेक गांवांत मोलस्वर्थच्या वेळीं महाराला पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या अशा तीनहि वळींचें बलुतें मिळत होतें; म्हणजे महाराशिवाय तेथें फक्त नऊच बलुतेदार असत. अलुतेदारांचीं वर जरी बारा नांवें दिलीं आहेत तरी मोलस्वर्थच्या काळींसुद्धां त्याला सोनार, मांग, शिंपी, भट, गोंधळी, कोरगु, कोतवाल व तराळ याहून जास्त अलुतेदार कोठें आढळले नाहींत. शिवाय अलुतेदार व बलुतेदार यांच्या नांवासंबंधींहि त्यास बराच घोटाळा दिसून आला. एका गांवांतील अलुतेदार तो दुसऱ्या गांवांतला बलुतेदार व तेथील अलुतेदार तो या गांवांतला बलुतेदार अशी उलटापालट असल्याचीं उदाहरणहि त्यास कित्येक ठिकाणीं आढळून आलीं.

**अलुबुखार**, नांवें.— झाड, अलुचा; फळ = अलु खारा, अलुबुखार, अलेच, मोतियाबदाम, ओलची, जरदाळु, झुनी, अलपोगादा,—चेहम इत्यादि.

वस्तुक्षेत्र वर्णन.—साधारण १० हात उंचीचें हें झाड असून पश्चिम हिमालयांत गढवालपासून काश्मीरपर्यंतच्या प्रदेशांत ५ ते ७ हजार फूट उंचीवर यांची लागवड करतात.

पर्शिआ, अरबस्तान व ग्रीस या देशात हीं फळें पिकतात. फळाचा आकार दीर्घवर्तुळाकार असून एका बाजूस फुगीर असतो. त्याचा रंग बाहेरून तांबूस काळसर असतो. व आंतील गर पिवळा असतो.

उत्पन्न — या झाडापासून ज्याचा विशेषसा उपयोग नाहीं असा एक पिवळ्या रंगाचा डिंक निघतो तो साधारण बाभळीच्या गोंदासारखा दिसतो बियापासून काढलेल्या तेलाचा उपयोग जाळण्याकडे करतात. हेंच यूरोप मधील 'प्रम तेल' होय पिकलेलीं फळें लोक मोठ्या आवडीनें खातात 'बोखारा प्रम' जातीचीं सुकलेलीं फळें अफगाणिस्तानातून मोठ्या प्रमाणात बाहेर जातात व त्याचा खाण्याकडे उपयोग होतो चटणींत सुद्धा हीं फळें घालतात हिंदुस्थानच्या मैदानात अस्सल अलुबुखार फळाची लागवड फार थोड्या प्रमाणात होत असून तीं डोंगरातील फळापेक्षा हलक्या दर्जाची असतात याचें लाकूड काम करण्यास गुळगुळीत असून, काश्मीरमध्यें कागदाच्या राध्याच्या पेट्या करण्यासाठीं या लाकडाचा साचा करितात. [बेंथाम—जर्नल ऑफ हॉर्टि सोसायटी १८५५ ९, १६२. स्मिथीज-अग्रि लेज. १८९४, ८९, ८६. वुड्रो–इडि. गार्ड. १९०३, ३०६ फर्मिंजर—इंडि गार्ड. १९०३, २५५-६. वाट—दि कमर्शिअल प्राडक्टस ऑफ इंडिया. पदे—वनौ पधि गु १]

**अलेक्झांडर झार, पहिला** (१७७७–१८२५) हा रशियाच्या बादशहाचा बाप ग्रँडड्यूक पॉल पेट्रोव्हिच व आई वर्टेंबर्गच्या फ्रेडरिक यूजेनची मुलगी मेरी फेडोरोव्हना ही होय. याच्या विचित्र स्वभावामुळें याची कारकीर्द इतिहासांत महत्त्वाची व मनोरंजक झाली आहे. त्याच्या लहानपणाच्या परिस्थितीचा व शिक्षणाचा त्याच्यावर परस्परविरोधी असा विलक्षण परिणाम झाला होता त्याच्या एका शिक्षकानें त्याला रूसोच्या तत्वाचा उपदेश केला होता पुढें एका लष्करी गव्हर्नरनें त्याला रशियातील अनियंत्रित झारशाहीचे धडे शिकविले होते, त्याच्या वडिलांनी त्याच्यात लष्करी बाण्याबद्दल आवड उत्पन्न केली होती याप्रमाणें राजकारणातील परस्परविरुद्ध तत्वाच्या उपदेशामुळें त्याच्या राजकीय धोरणात असत चंचलता आली याबद्दलच नेपोलियन त्याला 'अस्थिरवृत्तीचा बायझन्टाइन' म्हणे, मॅटरनिक तर त्याला वेडाच म्हणत असे. पुढें पुढें त्याचें मन उदास झालें होतें व कोणत्या वेळीं एकदम मन भडकून त्याच्या हातून काय भयंकर कृत्य होईल याचा नेमच राहिला नव्हता १८०१ मध्यें आपल्या बापाचा खून करून तो राज्यावर आला तव्हां प्रथम त्याची बुद्धि सरळ होती व आपल्या राजकीय आकांक्षा फलद्रुप करण्याच्या कामास तो नेटानें लागला आपल्या बापाचे जुने मंत्री त्यानें कायम ठेवले होते; पण आपल्या तरुण मित्राचें एक अनरुप मंडळ स्थापून देशांतील सुधारणेच्या नम्या योजना त्यानें तयार केल्या त्या सर्व इंग्लंडच्या वळणावर होत्या .पण रशियातील लोकस्थिति तितकी तयार नसल्यामुळें प्रत्यक्ष कृतींत त्या सुधारणा फारशा उतरू शकेनात गुलामगिरीची पद्धत चालू असल्यामुळें बहुतेक लोक रानटी स्थितींतच होते. अशीं निराशा झाल्यामुळें आरंभींचीं शुभ चिन्हें सर्व फुकट जाऊन कारकीर्दीच्या अखेरीस रशियन लोकाची स्थिति अधिकच शोचनीय झाली त्याला कारण लोकापेक्षा झारच अधिक होय प्रजास्वातंत्र्याच्या त्याच्या कल्पनाच चुकीच्या होत्या खरोखर पाहता, आपण मोठे उदार व लोककल्याण वादी म्हणून मिरविण्यांतच फक्त त्याला आनंद वाटे, पण स्वत च्या हातातील अधिकार गमविण्याची त्याची बिलकुल इच्छा नव्हती. अनियन्त्रित राजशाही व खरीखुरी लोकशाही या दोन सुऱ्या एका म्यानात कधींच राहूं शकत नाहीत याची त्याला बरोबर कल्पना न झाल्यामुळें त्याची दिशाभूल झालेली होती देशातील कायद्याना कोडाचें स्वरूप देण्याचा त्यानें उपक्रम केला पण अखेरपर्यंत तें काम अर्धवटच पडलें. जाणूनबुजून नसलें तरी त्याचें प्रत्यक्ष आचरण पूर्ण अरेरावीचें होतें, बुद्धिमान व कर्तृत्ववान माणसाच्या हातींहि स्वतन्त्र अधिकार देण्याची इच्छा नव्हती, लोकावर विश्वास नव्हता, याकरता आपल्या सुधारणाचे प्रत्यक्ष प्रयोग त्यानें दूरदूरच्या पोलंड, फिनलंड, बाल्टिक प्रांत वगैरे ठिकाणीं करून पाहिले. खुद्द रशियात त्यानें नवें मन्त्रिमंडळ निर्माण केलें, सेनेटला खरेखरे अधिकार दिले, परंतु अखेर हे नामदारलोक झारचे व त्याच्या दोस्ताचे हुकूम बजावणारे हस्तक बनले. शिक्षणप्रसारार्थ स्थापलेल्या नव्या युनिव्हर्सिटयातील स्वातंत्र्याची सुव्यवस्था व जुनें शुद्ध वळण या नावाखालीं गळचेपी करण्यांत आली व लष्करी वसाहती करून शेतकऱ्यावर जुलूम करण्यात आला. आर्चबिशप, बिशप, प्रीस्ट या सर्वांना झारनें आपलीं मतें प्रसृत करण्यास भाग पाडलें.

अंतस्थ राज्यकारभाराप्रमाणें यूरोपीय राजकारणातीहि पुढाकार घेण्याची झारला महत्त्वाकांक्षा होती, परंतु क्षेत्रांत आपल्या अरेरावी इच्छेस फारसा वाव नाहीं असा त्याला कटु अनुभव आला. राज्यावर आल्याबरोबर त्यानें पॉलचें (आपल्या बापाचें) धोरण पार बदलून इंग्लंडशी तह केला ऑस्ट्रियाबरोबर बोलणें सुरू केलें व प्रशियाच्या तरुण फ्रेडरिक विल्यम राजाची व विशेषत. त्याच्या सुंदर राणीची मैत्री संपादण्याकरतां प्रशियाशीं तह केला. फ्रान्समधील रिपब्लिक व नेपोलियनबद्दल त्याचा मत प्रथम फार अनुकूल होता परंतु पुढें लाहार्पनें पॅरिसची समक्ष स्थिती पाहून लिहिलेल्या पुस्तकाच्या वाचनानें व प्रत्यक्ष पॅरिसमध्यें घुनादि घडणाऱ्या गोष्टीमुळें त्याचें मन पार बदललें आणि 'यूरोपवर जुलूम करणाऱ्या व जगाची शांतता नष्ट करणाऱ्या' नेपोलियनबरोबर त्यानें युद्ध सुरू केलें. त्याकरितां यूरोपीय राष्ट्रांचा एक संघ बनविण्याची कल्पना त्यानें पुढें मांडली. कोणत्याहि राष्ट्रानें ह्या संघापुढें आपल्या

तक्रारी मोडल्याशिवाय युद्ध सुरू करूं नये, केल्यास सर्वांनी मिळून त्याचें पारिपत्य करावें, वगैरे नियम त्यानें सुचविले. तिकडे नेपोलियननें या कल्पनातरंगांत वाहणाऱ्या झारला आपल्या मैत्रीच्या जाळ्यांत अडकविण्याचे प्रयत्न चालविले होते. त्यानें व्हिएन्ना घेतल्यावर व ऑस्टर्लिट्झच्या विजयानंतर पुन्हां पुन्हां झार बरोबर मैत्रीचें बोलणें चालविलेंच होतें. 'फ्रान्स व रशिया यांचा तंटा होण्याचें भूगोलदृष्ट्या कारणच नाहीं; तर दोघांनीं मिळून सर्व जगावर सत्ता गाजवावी', अशा गोडगोड कल्पना तो झारपुढें मांडीत होता. नंतर जेनाची लढाई जिंकल्यावर पोल लोकांनां, तुर्कांनां व पर्शियनांनां त्यानें झारविरुद्ध चिथवलें; प्रत्यक्ष रशियांत झारच्या भावाचा पक्ष नेपोलियनला अनुकूल होऊन तहाकरतां ओरड करूं लागला. तरीहि झारनें नेपोलियनशीं युद्ध पुकारलें; पण त्यांत प्रथमच फ्रीडलंडमध्यें रशियन सैन्याची नेपोलियननें दाणादाण उडवून दिली. तेव्हां झारला तह करणें भाग पडून दोघे बादशहा टिलसिटला एकत्र जमले; तेथें प्रत्यक्ष भेटींत नेपोलियनच्या अलौकिक बुद्धिमत्तेमुळें व उदारपणाच्या गुलाबी गप्पांनीच झार इतका दिपून गेला कीं, तो नेपोलियनच्या पूर्ण कह्यांत गेला. मग जग जिंकण्याच्या व पूर्वेकडील सर्व देशांचा बादशहा होण्याच्या लांबलांब गप्पा होऊन शेवटीं दोघांचा तह झाला. नेपोलियननें मोठ्या सढळ हातानें झारला फिनलंड व डॅन्युब नदीच्या कांठचा प्रदेश देऊन टाकला.

परंतु हें सख्य फार वेळ टिकलें नाहीं. नेपोलियननें प्रशिया अधिकाधिक गिळंकृत करण्याचें धोरण चालविलें, तें झारला पटेना. तथापि नेपोलियननें झारला आदरभावानें वागविण्याचें धोरण चालूच ठेविलें होतें. १८०८ आक्टोबर मध्यें पुन्हां दोघांच्या भेटी झाल्या व करार ठरले. पण लवकरच नेपोलियनचा डाव झारच्या लक्षांत आला. जग जिंकण्याच्या बातांवर झुलवून मध्य यूरोपांत आपला पाय भद्र रोंवण्याचा नेपोलियनचा इरादा त्यानें ओळखला; व तदनुसार आपलें धोरणहि बदललें. नेपोलियनला मदत करण्याचें त्यानें साफ नाकारलें. नेपोलियनलाहि झारबद्दल संशय होताच, व त्या बाबतींत खात्री करून घेण्याकरतां नेपोलियननें झारच्या सर्वांत धाकट्या बहिणीकरतां अगदीं अकल्पितपणें मागणी घातली. झारनें कांहीं दिवसांनीं बहिणीचें बालवय व झारमातेचा विरोध या दोन सबबींवर मोठ्या आदरयुक्त भाषेंत नकार कळविला. तेव्हांपासून दोघांमधील स्नेहभाव भराभर ओसरत चालला. पुढें 'कॉंटिनेंटल सिस्टिमनें' रशियाच्या व्यापारास मोठा धोका बसू लागला, तेव्हां झारनें उघड शत्रुत्व स्वीकारलें. १८१२ मध्यें नेपोलियननें रशियावर जंगी स्वारी केली, मास्कोहि घेतलें, तरी झार तह करीना. तेव्हां निराश होऊन परत येतांना रशियन सैन्यानें त्याच्या सैन्याचा फार नाश केला. या एकंदर प्रकरणाचा झारवर परिणाम असा झाला कीं शेवटीं तो म्हणूं लागला कीं, "नेपोलियनशीं आतां मैत्री शक्य नाहीं." एक तो नाहींतर मी, दोघांनीं एकत्र नांदणें मात्र शक्य नाहीं. अखेर १८१५ मध्यें नेपोलियनचा पूर्ण मोड झाला तेव्हां झारला 'निर्वैरमुर्वीतलं' असें झालें.

परंतु याच सुमारास झारच्या मनःस्थितींत मोठें परिवर्तन होऊन त्याची वृत्ति गूढ व धार्मिक बनत चालली. ऐहिक गोष्टींबद्दलचा त्याचा दृष्टिकोन बदलून यूरोपमध्यें शांतता प्रस्थापित करण्याचें कामाकरतां देवानें आपली योजना केली आहे असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें. इव्हँजेलिस्ट पंथांतील बॅरोनेस डी क्रुडनेर हिच्या नादीं लागून तिच्याजवळ पूर्ण विश्वासानें तो आपल्या अत्यंत गुह्य गोष्टी सांगूं लागला; व ईश्वरी प्रेरणेनें जगाच्या उद्धाराकरतां मी झटत आहे, असें तो प्रतिपादन करूं लागला. टिलसिटच्या तहाची ज्यांना आठवण होती अशा मेटर्निकसारख्या लोकांना स्वार्थनिरपेक्षतेचें हें झारचें केवळ ढोंग आहे असें वाटलें. १८०८ मध्यें अखिल जग जिंकून त्यावर बादशाही गाजविण्याच्या गोष्टी व १८१३ मध्यें जगदुद्धाराच्या गोष्टी, अशा दोन [illegible] विरुद्ध गोष्टी बोलणाऱ्या झारवर कोणाचा कसा विश्वास बसावा? शिवाय पुढें व्हिएन्नाच्या कॉंग्रेसमध्यें त्याच्या वर्तनावरून इतरांचा संशय दुणावला आणि कॅसलरीनें त्याची त्याबद्दल चांगली कानउघाडणी केली. तथापि झारच्या मनांत कपट नव्हतें असें आज खास म्हणतां येतें. त्यानें स्थापन केलेल्या 'होली अलायन्स'लाहि कित्येकांनीं नांवें ठेविलीं आहेत तें योग्य नाहीं. त्यांत अलेक्झांडरचा हेतु खरोखर उदात्त व स्तुत्य होता. त्याच्या त्या धर्मनिष्ठ उदारतेमुळें यूरोपला खरोखर फायदा झाला. फ्रान्सचे तुकडे पाडूं न देतां तेथें राजा व प्रजा दोघांच्या हिताची राज्यव्यवस्था सुरू करण्याचें श्रेय त्याच्याकडेच आहे. स्वित्सर्लंडमध्यें शांतता राखण्याचें, जर्मनीचा ऑस्ट्रियापासून बचाव करून तेथें स्वतंत्र राज्यकारभार सुरू करण्याचें व पोलंडला राष्ट्रीय स्वातंत्र्य देण्याचें पवित्र कामहि झारनेंच केलेलें आहे.

१८१८ नंतर पुन्हां झारचीं मतें बदलूं लागलीं. खुद्द रशियांतील क्रान्तिकारकांच्या गुप्त कटामुळें त्याला अपाय पोहोंचूं लागला, तेव्हां त्याच्या उदात्त विचारांना धक्का बसला. पुढें नेपल्स, पीडमॉंट येथेंहि लोकांनीं बंडें उभारलीं; तेव्हां स्वातंत्र्य व राजकीय हक्क यांचें लोकांनीं नुसतें खूळ माजविलें आहे, तें राजांनीं नाहींसें करून टाकलें पाहिजे असें प्रतिपादन करणाऱ्या मेटर्निचच्या तो पूर्ण कह्यांत गेला व १८२० च्या नवंबरमध्यें त्यानें ट्रोपो प्रोटोकोलवर सही करून, कोणत्याहि देशाच्या अंतःकारभारांत इतर राष्ट्रांना पडण्याचा हक्क आहे, हें तत्त्व मान्य केलें. पुढें ग्रीकांनीं तुर्कांविरुद्ध स्वातंत्र्यप्राप्तीकरितां बंड केलें, तेव्हां तुर्कांना यूरोपांतून हांकून देण्याचें वेडहि पुन्हां त्याच्या मनांत शिरलें. परंतु लवकरच १८२५ डिसेंबर १ रोजीं तो मरण पावला.

व राज्यकारभाराच्या भयंकर जुवाखालून तो सुटला. पण त्यावेळी रशियाची स्थिति अत्यंत वाईट होती, गुप्त हेर व पोलीस यांचा सुळसुळाट, लष्करात असंतोष, पोलंडात बंड, तुर्कांशीं बेबनाव, व रशियांत सर्वत्र गुलामगिरी ! ! खाजगी आचरणांत त्याच्या अंगचे गुण दिसत मनमिळाऊ स्वभाव, मोहक वाणी, साधी वागणूक वगैरे गुणांनीं युक्त असून तो कलाकौशल्याचा आश्रयदाता होता.

अलेक्झांडर दि ग्रेट (उर्फ शिकंदर खि. पू. ३५६-३२३) बा ल प ण.—हा मॅसिडोनचा राजा दुसरा फिलिफ व एपिरोटची राजकन्या ऑलिंपियस हिचा मुलगा होय. त्याच्या बापाची व्यवहारचातुर्याबद्दल ख्याती आहे; पण त्याची आई मात्र अर्ध-सुसंस्कृत, चेटकी, तामसी स्वभावाची होती व ती मनोराज्यांत नेहमीं गर्क असे. अलेक्झांडरच्या लहानपणीं त्याच्या बापाच्या दरबारांत युद्धाविषयीं व राज्यकारस्थानाविषयीं अत्यंत महत्त्वाच्या उलाढाली चालू होत्या. ग्रीक संस्थानांचें आधिपत्य मॅसिडोनकडे घेऊन महान पराक्रम करून दाखविण्याच्या गोष्टींनीं वातावरण भरून गेलें होतें. एकंदर हेलेनिक संस्कृतीचा प्रत्यक्ष पुतळा जो ॲरिस्टॉटल त्याला अलेक्झांडरच्या १४ व्या वर्षी त्याचा शिक्षक नेमण्यांत आलें. तथापि तत्वज्ञानापेक्षा होमरच्या कल्पनांचा ॲरिस्टॉटलवर अधिक परिणाम झालेला असून त्याचें त्याच्या समग्र चरित्रावरून दिसून येतें. शिवाय अलेक्झांडरचें शिक्षण केवळ पुस्तकी नव्हतें. फिलिफच्या दरबारांत येणाऱ्या ग्रीक व पौरस्त्य वकिलांच्या सहवासानें जगांतील प्रत्यक्ष परिस्थितीचीहि त्याला ओळख होत गेली. एकदा बापाच्या गैरहजेरींत डोंगरी लोकांच्या टोळ्यांचीं बंडें त्यानें मोडलीं होतीं. नंतर लवकरच कौटुंबिक कलह उत्पन्न झाले. फिलिफनें पहिली बायको सोडून देऊन क्लिओपाट्रा नांवाच्या दुसऱ्या स्त्रीशीं विवाह केला. तेव्हां अलेक्झांडर आपल्या आईबरोबर बापाचें घर सोडून निघून गेला. पुढें अलेक्झांडरला सावत्र भाऊ झाला व त्याला राज्य मिळविण्याच्या मार्गांत अडचण उत्पन्न झाली. इतक्यांत खि. पू. ३३६ मध्यें फिलिफ मारला गेला. अलेक्झांडरवर त्याबद्दल संशय घेण्यांत आला होता. तथापि त्याच्या एकंदर चरित्रावरून असलें नीच कृत्य त्याच्या हातून घडलें असेल, असें म्हणवत नाहीं.

रा ज्या रो ह ण व त्या चें स्व स्था प न.—लष्कराच्या अनुकूलतेनें अलेक्झांडर राज्यावर आला. त्यानें आपला सावत्र भाऊ व चुलत भाऊ यांना मारून टाकविलें, व आपल्या बापानें आरंभिलेलें काम शेवटास नेण्याच्या तो उद्योगास लागला. हेलेन लोकांनीं त्याला आपला पुढारी म्हणून मान्य केलें. प्रथम भोंवतालच्या डोंगरी लोकांच्या टोळ्यांनीं केलेलीं बंडें त्यानें मोडलीं. नंतर पश्चिमेस दान्यूब नदीकडील प्रदेश त्यानें स्वारी करून जिंकून घेतला. इतक्यांत थीबी लोकांनीं बंड केलें पण तेंहि त्यानें अचानक हल्ला करून मोडलें व त्याची राजधानी जमीनदोस्त करून टाकिली. तेव्हां सर्व ग्रीसवर त्याचा दरारा बसून अथेनियनांसुद्धां सर्व ग्रीक लोकांनीं त्याला आशियांतील इराण वगैरे देशांवर स्वारी करण्याच्या कामीं मदत करण्याचें कबूल केलें.

इ रा ण स चा पा डा व.—खि. पू. ३३४ मध्यें मॅसिडोनियन, इलिरियन, थ्रेसियन व इतर ग्रीक संस्थानांतील लोक यांच्या सुमारें ४०,००० सैन्यासह अलेक्झांडर आशियाच्या स्वारीवर निघाला. प्रथम तो ट्रॉयला गेला, तेथें त्यानें होमरच्या काव्यांतील मृतवीरांचा यथाविधि सन्मान केला; व नंतर पुढें निघाला. अलेक्झांडरला तोंड देण्याकरितां इराणच्या राजानेंहि आशियामायनरमध्यें सैन्य पाठविलें होतें. हें सैन्य अलेक्झांडरच्या सैन्यापेक्षा संख्येनें थोडें अधिक होतें असें म्हणतात. ग्रॅनिकसच्या तीरावर दोन्ही सैन्यांची गांठ पडली. दोन्ही पक्षांतील घोडेस्वारांचें सायंकाळपर्यंत युद्ध चाललें. सायंकाळच्या सुमारास अवशिष्ट इराणी सैन्यानें पळ काढिला व अशा रीतीनें सर्व आशियामायनरमधील रस्ते अलेक्झांडरच्या ताब्यांत आले. त्यानें तेथील ग्रीक शहरांना स्वतंत्र केलें; व बाकीच्या प्रांतांत आपले सुभेदार नेमून आपल्या नांवानें राज्यकारभार सुरू केला. हा भाग काबीज करण्यास अलेक्झांडरला मुळींच प्रयास पडले नाहींत. कारण येथील ग्रीक शहरांचा ओढा मुळीं त्याच्याकडेच असून जेथें शिबंदी ठेवून शहराचें रक्षण केलेलें होतें तेथेंहि त्या शिबंदींत भाडोत्री ग्रीक शिपायांचाच विशेषतः भरणा होता. पुढल्या वर्षी त्यानें उत्तर फ्रिजियांतील गॉर्डियमचें राज्य जिंकून घेतलें. येथें तो असतांना प्राचीन फ्रिजिअन राजा गार्डिअस याच्या रथावरील 'गॉर्डियन नॉट' यानें तोडल्याबद्दलची दंतकथा प्रसिद्ध आहे.

येथपर्यंत हेलेस्पाटमध्यें आणलेल्या आपल्या आरमाराच्या मार्फत त्यानें स्वदेशाशीं दळणवळण चालू ठेविलें होतें, पण आतां तें आरमार त्यानें परत पाठविलें. त्याचा फायदा घेऊन इराणच्या आरमारानें ग्रीसवर हल्ला करण्याचा घाट घातला. तें संकट टाळण्याकरितां अलेक्झांडर सिरियाचा किनारा जिंकून घेण्याच्या उद्योगास लागला. इतक्यांत सिरियामध्यें दरायस बादशहा मोठ्या सैन्यानिशीं लढाई देण्यास स्वतः आला. तेव्हां इसस येथें दोन सैन्यांमध्यें मोठें युद्ध झालें. ( खि. पू. ३३३ ) त्यांत दरायसचा पराभव होऊन त्याचें सैन्य इराणाकडे धूम पळत सुटलें. दरायसचा जनाना अलेक्झांडरच्या हातीं सांपडला; पण अलेक्झांडरनें त्या वेळीं मोठें औदाक्षिण्य दाखविलें. दरायस अर्धेराज्य देऊन तह करण्यास तयार झाला, पण अलेक्झांडरनें सर्व साम्राज्य मागितलें. पुढें फिनिशिया घेण्याकरितां टायरला सात महिने वेढा घालून तें त्यानें घेतलें. नंतर गाझा घेऊन तो इजिप्तमध्यें शिरला, तेव्हां इराणच्या अंमलाखालून

आपणांस स्वतंत्र करणारा, म्हणून ईजिप्शियन लोकांनीं त्याचा सत्कारच केला. ख्रि पू ३३२-३१ चा हिंवाळा अलेक्झांडरनें इजिप्तमध्यें काढला.

तेथें त्यानें सुप्रसिद्ध अलेक्झांड्रिया शहर वसाविलें. यांप्रमाणें भूमध्यसमुद्राचा सर्व पूर्व किनारा जिंकून त्यानें नंतर खुद्द इराणाकडे मोर्चा वळविला. ख्रि. पू. ३३१ सालीं सप्टेंबरच्या २० तारखेस अलेक्झांडरनें तैग्रीस नदी ओलांडली. तो मेसापोटेमियांतून पुढें आल्यावर गॉगमीलनजीक दरायसनें त्याशीं पुन्हां अंगी लढाई दिली. पण तींतहि पराभव पावून दरायस मीडियांत पळून गेला. या लढाईस गॉगमीलची लढाई किंवा लढाईच्या ठिकाणापासून ६० मैल असलेल्या आरबेला गांवावरून आरबेलाची लढाई असें नाव पडलें आहे. नंतर अलेक्झांडरनें इराणच्या साम्राज्यांतील अत्यंत संपन्न असा बाबिलोनिया हा प्रांत घेतला. पुढें त्यानें खुद्द इराणमध्यें शिरून राजधानीचें पर्सेपोलिस शहर लुटलें व तेथील राजवाडा जाळून टाकिला. क्सर्क्सीसनें पूर्वी ग्रीक देवालयें जाळिलीं होतीं त्याचा हा त्यानें सूड उगविला असें म्हणतात. पुढें यानंतर दरायस उत्तरेकडे पळ काढूं लागला त्याचा पाठलाग सुरू होऊन ही बादशहाची बादशहाकडून शिकारच सुरू झाली. सरते शेवटीं एके दिवशीं दरायस अलेक्झांडरच्या दृष्टिपथांत आला. यावेळीं दरायसबरोबर त्याचा चुलत भाऊ बेसस व कांहीं थोडकेसे सरदार याशिवाय कोणी राहिले नव्हते. अलेक्झांडरनें पाठोपाठ येऊन आतां दरायसला कैद करणार इतक्यांत दरायसच्या बरोबरच्या मंडळींनींच त्याला ठार मारलें व त्याचें प्रेत अलेक्झांडरच्या ताब्यांत दिलें. ((ख्रि पू. ३३० चा उन्हाळा.) [बुद्धोत्तर जग पृ. ६४ व पुढील पानें पहा.]

हिंदुस्थानांतील मोहीम.-नंतर कास्पियनकाठचा सर्व डोंगराळ प्रदेश जिंकून अलेक्झांडर कंदाहारकाबूलला गेला. आतां बहुतेक तो मॉसिडोनियन रीतिरिवाज टाकून पौरस्त्य अरेरावी राजाप्रमाणें वागूं लागला होता. तो दरबारांत पार्शिअन पोशाखानेंच येत असे. यामुळें बऱ्याच दिवसांपासून त्याच्या पदरच्या मॅसिडोनी लोकांचीं मनें त्याच्याविषयीं कलुषित होत चाललीं होतीं. शेवटीं सीस्तानमध्यें प्रॉफथेशिया येथें घोडदळाचा कमांडर फिलोटास याला व इतर कित्येकांस राजाचा जीव घेण्याचा गुप्तकट केल्याच्या आरोपावरून फांशी देण्याची पाळी आली. ख्रि. पू. ३२८ च्या वसंत ऋतूंत त्यानें हिंदुकुश ओलांडून बॅक्ट्रियाचा सर्व प्रदेश जिंकून घेतला. याच सुमारास त्याच्या सैन्यांत पुष्कळांना गुप्तकटाच्या आरोपावरून ठार मारण्यांत आलें, व याच प्रदेशांत असतां ऑक्सिआर्टीझची मुलगी रोक्झाना त्याच्या हातीं पडली, तिच्याबरोबर त्यानें विवाह लावला. तेथून हिंदुस्थानांत शिरत असतां काबुली पठाणांनीं त्याला हलीं इंग्रजांना होतो याच प्रकारचा अतिशय त्रास दिला.

या वेळीं अलेक्झांडरनें निसा नांवाचा पवित्र डोंगर व डायोनायससच्या खुणा शोधून काढल्या असें म्हणतात. पुढें सिंधुनदीवर पूल बांधण्यांत येऊन अलेक्झांडरनें ससैन्य पंजाबांत अटकेच्यावर सोळा मैलांवर छावणी दिली. या प्रदेशावर तीन राज्यें होतीं: एक आंभीचें झेलमनदीवर, याची राजधानी तक्षशीला; दुसरें पोरस राजाचें राज्य चिनाबनदीकांठीं होतें; व तिसरें काश्मीरच्या बाजूस अभिसाराचें राज्य होतें (राजतरंगिणी ग्रंथ पहा). तक्षशिलेचा राजा व पोरस यांचें शत्रुत्व होतें, म्हणून पोरसच्या विरुद्ध आंभी आपणास मदत करतील अशी अलेक्झांडरची खात्री होती. तिसरे अभिसार लोक तटस्थच राहिले. शेवटीं चिनाबनदीवर समोरासमोर दोन्हीं सैन्यें आलीं. पोरसचें सैन्य मोठें असून त्यांत २०० हत्ती होते. पाऊस जोराचा पडला होता. अशा स्थितींत अलेक्झांडरनें ही आशियांतील चवथी व शेवटची लढाई दिली. तींत मॅसिडोनियन सैन्याचें युद्धसामर्थ्य सर्वांत अधिक कसास लागलें, पण शेवटीं अलेक्झांडरचाच जय झाला. पोरस राजा जखमी होऊन अलेक्झांडरच्या हातीं लागला. अलेक्झांडरनें त्याच्याशीं स्नेह करून पुढील मोहिमेंत त्याची मदत घेतली. यानंतर रावी व बिआस नद्यांपर्यंत शत्रूंचा मोड करीत तो गेला. पण पुढें त्याच्या सैन्यानें जाण्याचें नाकारिलें. तेव्हां अलेक्झांडरचा मोठा हिरमोड झाला. गंगाकांठचा व पुढील रमणीय प्रदेश जिंकून घ्यावा असें त्याच्या मनांत फार होतें, तीन दिवस त्याचा सैन्याशीं वादविवाद होऊन अखेर हार खाऊन त्याला आपल्या सैन्याच्या इच्छेनुसार मागें परतावें लागलें. त्यानें जातांना सिंधुनदीच्या पूर्वेकडील प्रदेश पोरस वगैरे राजांना परत दिला व पश्चिमेकडील मुलुखावर सर्वत्र आपले मॅसिडोनियन सुभेदार नेमले. नंतर सिंधूच्या मुखापर्यंत जाण्याकरितां तो निघाला. वाटेंत मल्लीनगर लागलें, पुढें मुसिकेनस, ऑक्सिकेनस व संबू या लोकांनीं एकत्र होऊन मॅसिडोनियन सैन्याचा प्रतिकार केला. या राष्ट्रकार्याला मूळ उठावणी ब्राह्मणांनीं दिली होती. तथापि शेवटीं अलेक्झांडरच्या पराक्रमी सैन्यापुढें त्यांना नमावें लागलें

स्वदेशाकडे कूच व मृत्यु.—नंतर सिंधूच्या मुखापासून इराणच्या आखातापर्यंतचा जलमार्ग शोधण्याकरितां त्यानें एक आरमारी ताफा रवाना करून स्वतः तो ससैन्य बलुचिस्तानामधून परत येण्यास निघाला. रासमलन, पासनीपर्यंत तो आला; तेथें कडक उन्हाळ्यानें त्याच्या सैन्याचे फार हाल झाले. पुढें गेड्रोशिआहून तो कार्मेनियांत गेला. तेथें त्याचे आरमारी लोक व क्राटेरॉसच्या हाताखालील सैन्य त्यास येऊन मिळालें. या जिंकलेल्या प्रांतांत त्यानें नेमलेल्या सुभेदारांनीं त्याच्या गैरहजेरींत अमोघ

पूर्वी हें शहर एक ल्हानसें बेट असून यास फेरोस म्हणत असत. हें बेट एका अरुंद धाग्यानें किनाऱ्यास जोडलें गेलें होतें. सेप्रोच्या अमदानींत म्हणजे ख्रिस्त पूर्व पहिल्या शतकाच्या उत्तरार्धांत येथें १४ इमारती होत्या त्या येणेंप्रमाणें: (१) राजवाडा, (२) नाटकगृह, याचा मोझरनें एके वेळीं किल्ल्या सारखा उपयोग केला होता; (३) जलदेवतेचें देवालय, हें वरील नाटकगृहासमोर होतें; (४) अँटनीनें बांधलेली टिमोनियम नावाची इमारत, (५)सोमारियम; (६) शिलेखाना, (७) देवघेवीचा चौक; (८) गोदी; (९) अखाडा (१०) पॅलेस्ट्रा; (११) शनीचें देवालय; (१२) चंद्राचें देवालय; (१३) पदार्थसंग्रहालय व (१४) सेरापियम नावाचें देवालय. फॅरोस बेटावर ४०० फूट उंचाचें दीपगृह होतें याची जगातील ७ आश्चर्यांमध्यें गणना होतें, येथें ३०००० नागरिक असून पुष्कळ गुलामहि होते.

इतिहास—हें शहर ख्रिस्ती शकापूर्वी ३३२ व्या वर्षी प्रसिद्ध अलेक्झांडर बादशहानें वसविलें त्यापूर्वींहि या बंदराची कीर्ति सर्वत्र होती खि पू २००० वर्षांपासून दाक्षिण हिंदुस्थान व इजिप्त यामध्यें जो व्यापार चाले, त्याला हें ठिकाण अतिशय सोयीचें व महत्त्वाचें होतें अलेक्झाड्रीयाच्या टालेमी राजाच्या उत्तेजनापासून ज्योतिःशास्त्राच्या इतिहासात नवीन काल सुरू झाला. येथें एक भव्य वेधशाळा बांधण्यात आली (दीक्षित–भारतीय ज्योतिःशास्त्र पा ३४९–५०) अलेक्झाड्रियाचे ग्रीक लोक सुप्रसिद्ध आहेतच. पुढें व्यापाराच्या योगानें एकाच शतकात याची इतकी प्रगति झाली की हें रोम शहराची बरोबरी करूं लागलें ८० साली हें रोमन लोकांच्या ताब्यांत आलें ४७ व्या वर्षी सीझर यानें क्लिओपाट्राच्या सहवासात येथें कांहीं दिवस घालविले इ. स. २१५ मध्ये कॅरेकला बादशहानें या शहरास भेट दिली. याच बादशहानें अलेक्झांड्रिया येथें जी लोकांची कत्तल केली त्यामुळें हिंदुस्थानचा या बंदराशी चालणारा मोठा व्यापार प्रत्यक्षपणें थांबला असें सांगण्यांत येते (जे.आर.ए.एस. १९०७ पा. ९५४) पुढें १७९८ साली फ्रान्सराज्यक्रांतीच्या वेळेस नेपोलियन यानें या शहरावर स्वारी करून तें काबीज केलें, १८०१ पर्यंत हें फ्रान्सच्या ताब्यांत होतें. पुढें १८०१ साली येथें इंग्रज व फ्रेंचांचें तुमुल युद्ध होऊन इंग्रजांनी हें सर केलें.

पुढें ऑटोमन अमदानींत इजिप्त मध्यें फार बेबंदशाही माजल्यामुळें हें शहर लयास जाऊन यांत अवघी ४००० लोक वस्ती राहिली. परंतु महंमदअली यानें यास पुन्हा उर्जितदशेस आणिलें इस्माईलपाशानें येथें म्युनिसिपालिटीची स्थापना केली. १८८२ सालीं हें शहर व इजिप्त देश इंग्रज सरकारच्या ताब्यांत आले. या शहरांत खोदलें असता पुष्कळ इमारती व इतर जुन्या वस्तु सांपडतात.

*अर्वाचीन अलेक्झांड्रिया.*—हें मॅरिओटिस सरोवर व भूमध्यसमुद्र यांच्यामध्यें असलेल्या जमीनीच्या तुकड्यावर वसलें आहे. याच्या पश्चिमेस व पूर्वेस अनुक्रमें रास एटटिन व केटबे हीं भूशिरें आहेत. जकातीचें नाकें व मोठमोठ्या वखारी या शहराच्या पश्चिम भागांत असून इतर मुख्य इमारती पूर्व व आग्नेय भागांत आहेत. पश्चिमबंदरावरील उतरण्याच्या ठिकाणाहून महंमदअलीच्या राजवाड्याकडे एक मोठा रस्ता जातो. येथील "ग्रँड स्क्वेअर" नांवाचा भव्य चौक पंचकोनी असून याच्या सभोंवार झाडें लाविलीं आहेत, व याच्या मध्यभागीं एका राजपुत्राचा घोड्यावर बसलेला पुतळा आहे या चौकाच्या समोर इटालियन पद्धतीच्या सुंदर इमारती आहेत. यांतील मुख्य म्हटल्या म्हणजे न्यायकचेरी, ऑटोमनपेढी, इंग्रजी देवालय, आब्बास हिल्मी नाटकगृह वगैरे होत. शहराच्या पूर्वभागात झिझिनिया नावाचे नाटकगृह आहे येथेंच म्युनिसिपालटीची इमारत असून एक पदार्थसंग्रहालयहि आहे. यात प्राचीन ग्रीक, रोमन, इजिप्शियन वस्तूंचा संग्रह केला आहे. याशिवाय येथें रोमनकॅथोलीक पंथाचें प्रार्थनामंदिर, मशीद व खेदीव घराण्यातील पुरुषाची थडगीं आहेत. शहराचा उत्तर भाग एतद्देशीय लोकांनी व्यापिला आहे.

या शहराच्या पूर्वबंदरावरील समुद्र खडकाळ असून उथळ आहे सर्व शहरभर आगगाड्यांचें व तारांचें जाळें पसरलेलें आहे हें शहर इजिप्त देशातील व्यापाराचें केंद्रस्थान असल्यामुळें येथें इंग्रजी व इतर व्यापारी संघाची मुख्य ठाणीं आहेत. इजिप्त देशांतील आयात निर्गतमालापैकी शेंकडा ९० मालाचा व्यापार या बंदरांतून होतो. मुख्य निर्गत माल म्हटला म्हणजे कापूस होय, व आयात मालात सर्व तऱ्हेचें कापड, यंत्रें, इमारती, लांकूड व कोळसा हे जिन्नस येतात. १९२० साली येथें ५,६८,४०,००० पौंडाचा व्यापार झाला. या शहराची लोकसंख्या १९१७ साली ४,४४,६१७ होती. येथील परकीय लोकांमध्यें ग्रीक, इटालियन, सीरियन, आर्मेनियन वगैरे लोक असून इतर पौरस्त्य व पाश्चात्य लोकहि येथें आढळतात. येथें अरबी शिवाय ग्रीक, फ्रेंच, इटालियन व इंग्रजी याहि भाषा प्रचारांत आहेत.

मुजुमदाराच्या 'यूरोपचा प्रवास' (१९१५) या ग्रंथाप्रमाणें पुढील माहिती आढळते:—या प्रदेशात बैलाऐवजी रेडे अगर उंट नांगरास जोडतात. शेतांतून तिघांचें पीक दिसतें. चारचाकी मालदारी गाड्या गुजराथेंतील गाड्यांच्या आकाराच्या पण १२–१४ फूट लांब असून त्यांस एक घोडा जोडलेला असतो. खेचरांचे सटारेहि दिसले. यांची चाकें ७–७॥ फूट व्यासाची असतात. या शहरांतील नवी वस्ती चांगली आहे. कॉफीगृहें भपकेदार आहेत. रॅमले वस्ती गांवापासून दूर असून येथें श्रीमंत लोक राहतात. येथील सर्व बंगले समुद्रकाठीं असून प्रत्येकाच्या सभोंवार उत्तम बागा असतात येथील कॉफीगृहांतून यूरोपियन तऱ्हेचे म्हैरापटाचे खेळ होत असतात. आंत जाण्यास तिकिट पडत नाहीं तरी तेथें कांहीं फराळाचें सामान विकत घेतलेंच

पाहिजे असा रिवाज आहे. खेळ पाहण्याची फी फराळावर चढवितात. या कॅफेवजा-थिएटरमध्यें निशाणमारी कसरत, सिनेमा, गाणें, वगैरे एकामागून एक खेळ होतात. येथें "पॉम्पेचा पिलर" (स्तंभ) प्रेक्षणीय आहे. हा स्तंभ लालसर दगडाचा केलेला असून एकसंधी आहे. त्याची उंची सुमारें ७० फूट आहे. एका उंचवट्यावरील ओट्यावर हा उभा केलेला असून त्याच्या भोंवताली तारेचें कुंपण घातलें आहे. आत जाणारास फी ठेविली आहे.

अलेक्झांड्रिया ट्रोआस—(एस्की स्तंबूल) हें ट्रोआसमधील एक प्राचीन ग्रीक शहर होतें. हें पश्चिम किनाऱ्यावर असून टेनेडॉसच्या जरा दक्षिणेस होतें. अँटिगोनसनें हें शहर सुमारें इ. स. ३१० या वर्षी वसविलें व त्यास त्यानें अँटिगोनिया ट्रोआस असें नाव दिलें. पुढच्या शतकात लिसिमॅकसनें अलेक्झांडरच्या स्मरणार्थ याला अलेक्झांड्रियाट्रोआस असें नाव दिलें. रोमनसत्तेच्या वेळेस आशियामायनरच्या वायव्यकिनाऱ्यावरील मुख्य बंदर म्हणून ह्या शहराची फार भरभराट असे. सेंट पॉल यूरोपला ह्याच बंदरांतून प्रथम गेला. प्राचीन इमारतींचे अवशेष अजून येथें दृष्टीस पडतात. ट्राजननें बांधलेला पाण्याचा नहर अजून देखील दृष्टीस पडतो. (ए. ब्रि.)

अलेप्पे किंवा अलपुलइ—(मद्रास) त्रावणकोर संस्थानांतील मुख्य बंदर उ. अ. ९° ३०' व पू. रे. ७६° २०'. तिनेवेल्ली–क्विलान रेल्वेचें स्टेशन जें क्विलान त्याच्या उत्तरेस हें ४९ मैलावर व कोचीनपासून ३५ मैलावर आहे. लोकवस्ती (१९११) २५६६५. पाऊस सरासरी ११५ इंच पडतो. डच लोकांच्या पोरकड नावाच्या बंदराशीं त्रावणकोर संस्थानच्या उत्तरेकडचा व्यापार होत असे त्यामुळें संस्थानचें नुकसान होऊं लागलें. त्यामुळें महाराजा रामवर्मानें हें बंदर अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात वसविलें. तत्पूर्वी येथें वाळवंट होतें. हल्लीं येथें चांगला व्यापार चालत आहे. दरवर्षी सुमारें २८०५८५ टनेजचें नौकानयन (शिपिंग) या बंदरीं होतें. एक दीपगृह व गोदामांत माल नेण्याकरितां ट्राम्वे आहे. धन्याचशा तेलाच्या गिरण्या येथें चालतात. काथ्याच्या हातऱ्याहि पुष्कळ तयार होतात. येथून मुख्यतः खोबरें, नारळ, काथ्या, वेलदोडे, आलें व मिरीं हे जिन्नस बाहेर रवाना होतात. तांदूळ, मुंबईचें मीठ, तंबाकू, धातू व कांहीं किरकोळ माल बाहेरून बंदरात येतो.

डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, मुनसफ, आणि पहिल्या व दुसऱ्या वर्गाचे मॅजिस्ट्रेट यांच्या कचेऱ्या आहेत. 'बँक ऑफ मद्रास' नावाची एक पेढी आहे.

अलेप्पो—(१) आशिया–तुर्कस्थानची एक विलायत. हींत उत्तर सिरिया व वायव्य मेसापोटेमिया हा प्रांत येतो अलेप्पो, मराश व उर्फा असे तीन संजक या विलायतेंत आहेत. याचा अर्धा भाग डोंगराळ आहे. अलेक्झाड्रेटा हें एकच महत्त्वाचें बंदर आहे. निर्यात सरासरी १० लाख स्टर्लिंगवर व आयात याच्या दुप्पट किंमतीची होईल. येथील स्थायिक लोकवस्ती दहा लाख सुद्धां नसेल, पण आग्नेयभागांत बरीचशी तात्पुरती वस्ती दृष्टीस पडते. लोकसंख्येपैकीं दें ख्रिस्ती व बरेचसे मुसुलमान आहेत. या विलायतेंत ७१० मुस्लीम, २५० ख्रिस्ती व ३१० ज्यू शाळा आहेत.

(२)–विलायतची राजधानी. कुवैक दरींतील एका पठारावर हें शहर वसलें आहे. लोकसंख्या सुमारें २,५०,०००.

नवीन शहर कुवैक नदीच्या दोन्ही तीरावर वढलेलें असून, जुनाभाग ३ मैल परिघ असलेल्या सेरासन पद्धतीच्या कोटात वसला आहे. येथें दोन महत्त्वाच्या मशीदी आहेत. पहिली उमावी अथवा झकारिया व दुसरी कदुन होय. येथील हवा थंड असून कोरडी व निरोगी आहे, येथें चेहऱ्यावर व हातावर एक तऱ्हेचे फोड उठतात. त्याचे चट्टे कायम राहतात. त्याना अलेप्पोवटन असें नाव आहे. हें युरोपिअन वकीलाचें राहण्याचें एक महत्त्वाचें ठिकाण आहे. हें शहर उत्तरसीरिया प्रांतातील व्यापाराचें केंद्र असून येथें रेशमी कापसाचें व लोकरीचें कापड, सतरंज्या, गालीचे, चामड्याच्या वस्तु वगैरे तयार होतात. सभोंवतालच्या जमीनींत द्विदल धान्यें, पिस्ते व इतर फळें पिकतात. तुर्क लोक याला धर्माचें व सत्तेचें केन्द्र समजतात. रायक येथें या शहराचा बैरुट–दमास्कस रेल्वेशीं संबंध जोडला आहे.

इतिहास व अवशेष भाग.—हें शहर एका सुपीक मैदानात असलेल्या आठ टेंकड्यावर, समुद्रसपाटीपासून १४०० फूट उंचीवर वसलेलें आहे. याला बेरोया हें मॅसिडोनियन नाव सेल्युकस निकेटर यानें दिलें. याच नावाखालीं याचा सेल्युसिड युद्धांत उल्लेख केलेला सापडतो. अस्मोनियन लोकांशीं युद्ध उकरून काढणारा मेनेलास याचा वध लिसीयसनें ख्रिस्तीशकापूर्वी १६४ वर्षी येथेंच केला. अँटीओकस ग्रीपसचा खून करणारा जो हेरा क्लिआन याचा जन्म येथेंच झाला व त्यानें येथ इ. स. पूर्वी ९६ व्या वर्षी स्वतंत्र राज्यस्थापना केली.

चालीबॉन या नावानें टॉलेमीनें या शहराचा उल्लेख केला असून तें चालीबोनिटीस या नावाच्या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें असें तो म्हणतो. परंतु अरबाच्या हातात जाईपर्यंत तें बेरो या नावानेंच प्रसिद्ध होतें. जुलिअनच्या पूर्वेकडील स्वारींत (इ. स. ३६३) व इराणी लोकांच्या स्वारींत (इ. स. ५४०) तें याच नावानें उल्लेखिलेलें आढळतें. हें दुसऱ्या खुश्रूनें इ. स. ६११ सालीं घेतलें. इ. स. ६३८ सालीं सारासनलोकांनीं काबीज केल्यानंतर या शहराला पुन्हां हलेप नाव प्राप्त झालें. भूकंपानें या शहराचें बरेंच नुकसान झालें. तरी व्यापार व भरभराट या दृष्टीनें शहराचें महत्त्व केव्हांच कमी झालें नाहीं. हें शहर पूर्व खलीफाच्या अधिकारात असे. मध्यंतरीं बिझान्टीयमचा

बादशहा जॉन झिमीसीसनें कांहीं दिवस आपला अंमल बसविला होता. नंतर १०९० पासून ११६७ पर्यंत सेलजुकांनीं आपला अंमल यावर स्थापला. अलाउद्दीनानें ११८३ सालीं अलेप्पो घेऊन धर्मयुद्धांत महत्त्वाचें ठाणें म्हणून तें फार मजबूत केलें होतें. तातरलोकांनी १२६० सालीं हें शहर घेतलें; नंतर मामेलूकांच्या हातीं गेलें. सरतेशेवटीं १५१७ सालीं तुर्क लोकांनी हें काबीज केलें त्याच्या अमलाखालीं अलेप्पोचा व्यापार सुधारला. ब्रिटिश टर्की कंपनीनें पहिल्या जेम्सच्या कारकीर्दीत एक वखार येथें स्थापिली केप मार्गानें हिंदुस्थानाशीं दळणवळण ठेवणारा जलमार्ग शोधून काढल्यामुळें येथील व्यापारास फार धक्का बसला. सुवेझचा कालवा तयार झाल्यापासून तर येथील व्यापार फारच बसला. त्या पूर्वींच या शहराचा ऱ्हास होण्यास सुरवात झाली होती १८ व्या शतकाच्या शेवटीं व १९ व्या शतकाच्या प्रथमभागात या ठिकाणीं जानिझरी व शेरीफ या पक्षांत भांडण चालू असे व कित्येक प्रसंगीं तें विकोपास जाऊन बराच रक्तपात होत असे. धरणीकंपानें व पटकीनेंहि या शहराचें बरेंच नुकसान झालें. केरोचा महमदअली यानें सीरिया प्रांत जिंकून घेतला. खिती लोकांची कत्तल १८५० व १८६२ सालीं झाली. एकंदरीत अबदुल मजीदच्या प्रधानांनीं सीरियांत ओटोमन सत्ता स्थापन केल्या. पासून अलेप्पोचा व्यापार भरभराटीस आला आहे.

अल्क अथवा अल्कली—अल्क पदार्थांचे विशिष्ट गुणधर्म म्हटले म्हणजे ते पाण्यात विरघळतात, अम्लाचें निर्गुणीकरण करतात, सेंद्रिय पदार्थांस जाळतात व लिटमस सारख्या वानस्पतिक रंगास पालटवून टाकतात. या लेखांत हिंदुस्थानात जीं सापडतात व ज्यांचा या देशांतील शेतीवर परिणाम होतो अशाच कांहीं थोड्याशा अल्कद्रव्यांचा सामान्यतः विचार करावयाचा आहे.

१ अम्न ( अमोनिया ) व तज्जन्य क्षार—हें अल्कली द्रव्य यूरोप व अमेरिका येथें वायुद्रव्य, " ( गॅसलिकर ) " अस्थिद्रव " ( बोनलिकर ) व ज्वालामुखी पर्वतांवरील क्षार यांपासून तयार होतें, पण हिंदुस्थानात हे पदार्थ पुरेसे सापडणें कठिण असल्यामुळें हें द्रव्य इकडे तयार करीत नाहीत.

अमोनियापासून तयार केलेले पदार्थ.—( अ ) ( अम्लद्रव लिकर अमोनिया ) या " मद्यार्कयुक्त अमोनिया " चा औषधाकरितां व राळ आणि इतर वनस्पतिजन्य पदार्थ द्रवून सारांनी व अमोनियायुक्त टिंक्चरें करण्याकरितां उपयोग करतात. उदाहरणार्थ, आस्याचा अर्क. ( आ ) नवसागर म्हणजे अमोनियाचें हरिद यापासून अमोनियाचे दुसरे क्षार तयार करतात कल्हई लावण्यास व विद्युदुत्पादक घटांत हें पाल्याकरितां उपयोगी पडतें. ( इ ) गंधकित ( सल्फेट ) याचा शेताकरितां उपयोग करतात. ( ई ) कर्बित, ( कार्बोनेट ), गंधकिद ( सल्फाइट ), स्फुरित ( फॉस्फेट ) व स्तंभिद ( ब्रोमाइड ) हीं सर्व द्रव्यें कला व उद्योगधंदे यांत अत्यंत उपयोगी पडतात. हिंदुस्थानांत हीं द्रव्यें परदेशांतून येतात.

२ क्षार अथवा अशुद्ध पालाश कर्बित.—दाहक पालाश ( कॉस्टिक पोटॅश ) मुख्यत्वें करून यापासूनच काढतात. अशुद्ध कर्बिताला इंग्रजीत पोटॅशेस अथवा पर्लॲश म्हणतात. इतर नावें—बंगाली-सर्जिका, हिंदुस्थानी जोनखार किंवा इक्क-चार, संस्कृत-यवक्षार. याशिवाय दुसरीं नावें आहेत तीं—क्षार-का-नमक—क्षारीचें-मीठ, मारा वप्पु, मलुवप्पु, सुदिदेवप्पु, कारम वगैरे.

यूरोपमध्यें हा माल तयार करण्याकरितां लागणारा कच्चा माल पर्लॲश किंवा काष्ठभस्म ( वुडॲश ) असून हे पदार्थ अमेरिका, कानडा व रशिया या देशांतून आणीत असत. अधिक शास्त्रीय पण कमी वाया जाणाऱ्या पदार्थांचा उपयोग होऊं लागल्यामुळें पर्लॲशची पैदास कमी होऊं लागली आहे.

क्षार तयार करण्याची क्रिया—दाहक पालाश सामान्यतः कर्बितापासून काढतात. कर्बित ज्या द्रव्यापासून तयार करतात तीं द्रव्यें येणेंप्रमाणेः—

(१) वनस्पतीची राख (२) जमीन, (३) पालाशगंधकित (४) मेंढीची घर्मयुक्त लोकर व (५) बीटच्या मुळाचे पालाश क्षारशेष.

रॉक्सबर्गच्या मतें हिंदुस्थानांतील सर्व जंगलांचा पालाश करण्याकरितां उपयोग करण्यासारखा आहे. पाऊस कमी असल्यामुळें व उष्णता अतिशय असल्यामुळें हा धंदा चांगल्या प्रकारें चालवितां येईल असें तो म्हणतो. काष्ठभस्म ( पर्लॲश ) तयार करण्याकरितां हिंदी जंगल आजपर्यंत कधींच जाळण्यांत आलें नाहीं. मोठ्या झाडापेक्षा झुडपांत व त्यांतहि कोंवळ्या झुडपांत हें द्रव्य अधिक असतें.

पाइन झाडाच्या १००० भागांत ४५ भाग, ओक झाडांत .७५. द्राक्षाच्या वेलींत ५. ५०, साध्या गवतांत ५.८, फर्नमध्यें ४.२५ ते ६.२६ पर्यंत हा क्षार ( पोटॅश ) असतो. हिंदी धान्याच्या गवतापासून तो १७.५ गव्हाच्या गवतापासून ( कणसें लागण्यापूर्वी )' ४७ व कडूदवणा ( वर्मवुड ) या झाडापासून ७३ भाग निघतो. यावरून या वनस्पती काष्ठभस्माकरितां अत्यन्त उपयोगी आहेत असें दिसून येतें. अलीकडे बीटरूट ( चुकंदर ) पासून साखर काढण्याचा धंदा वाढला असल्यामुळें पालाशकर्बित हें आनुषंगिक (बाय प्रॉडक्ट) दाखल तयार करण्यास हरकत नाहीं.

क्षारोत्पादक वनस्पती.—काष्ठभस्म तयार करण्याकरितां पुढील वनस्पतींचा उपयोग करण्यांत येतो. आघाडा ( ॲचिरान्थेस अस्पेरा ), आडुळसा ( अधतोदा वासिका ), सालवीण किंवा शालपर्णी ( अरस्योनिया स्कोर्लेरिस ), काटेमाठ ( ॲमेरॅन्टस स्पिनोसस ), बाबू स्पि., ताड ( बोरॅसस फ्लॅबेलिफर ), पळस ( ब्युटी फ्रॉन्डोसा ), ( सीसेल्पिनिया बॉन्डुसेला ), मांदार किंवा रुई ( कॅलोट्रोपिस जायगॅन्टी ),

वाहवा किंवा गिरमाळा ( कॅसिया फिश्चुला ), देवदार, पांगारा ( इरिथ्रिना इंडिका), निवडुंग युफोर्बिया नेरिफोलिया, शेर अथवा थोर युफोर्बिया तिरुकाली, शिवण (गमेलिना आरबोरी), पांढरा कुडा ( होलॅन्हेना ॲन्टिडिसेंटरिका ), जव (हॉर्डियम व्हल्गेर),नीळ किंवा गुळी (इंडिगो फेरा टिंक्टोरिया), दोडका लुफा इजिप्टिआका ), केळ (मुसा सॅपिएन्टम), कण्हेर नेरियम ओडोरम, पेनिसेटम टॉयफोयाडियम, चित्रक ( प्लंबॅगो झेलॅनिका), करंज(पोंगॅमिया ग्लॅब्रा), शाल किंवा शालपर्णी (शोरीरोबस्टा ), स्टिरिओस्पेर्मम सुआव्हेओलेन्स, लोध्र किंवा हुरा ( सिम्प्लोकॉस रेसमोसा ) बेहेडा ( टर्मिनालिया बेलेरिका ), व्हॅलॅरिस हेनी आणि काशी किंवा निर्गुडी (व्हिटेक्स निगंडो).

वरील झाडापासून काढलेल्या अशुद्ध भस्मापासूनच हिंदुस्थानात पालाश काढून त्याचा कला, शास्त्रीय प्रयोग व औषधें याजकडे उपयोग करतात.

उपयोगः—साबण, काच, रंग, वगैरे कामाकरिता याचा उपयोग होतो. यूरोपमध्यें कांहीं प्रकारचे साबण करण्याकरिता दाहक पालाशाची मागणी असते. त्याचप्रमाणें पालाशकाच ( पोटॅश ग्लास ) करण्याकरिता व लालतुर्की (टर्की रेड ) व आर्नोटो किंवा ऑरेंज हे रंग देताना याचा कोणत्या तरी स्वरूपात उपयोग होतो.गढवालमध्यें यात खळ देण्यापूर्वी सणाचे तंतु उकळतात. हिंदुस्थानात अशुद्ध पालाशकर्बिताचा उपयोग कल्पनातीत होतो.चांगल्या वनस्पतींची निवड व काष्ठभस्म तयार करण्याच्या पद्धतींत सुधारणा या दोन गोष्टी अत्यन्त महत्त्वाच्या आहेत. हिंदुस्थानातील डोंगराळ प्रदेशाचा बराचसा भाग कडू दवणा ( वर्म वुड ) उर्फ आर्टेमिसिआ या जातीच्या झाडानीं व्यापलेला असून या झाडाच्या राखेचा रताळलीकडे दुसरा कोणताच उपयोग करीत नाहीत. यांत पालाशाच्या कर्बिताचें प्रमाण बरेंच असल्यामुळें नवीन धंदा म्हणून यापासून काष्ठभस्म काढण्यास समशीतोष्ण प्रदेशातील लोकास उत्तेजन देण्यास कोणतीच हरकत नाहीं; मुंबईकडे विशेषतः जेथें पाऊस बराच पडतो अशा प्रदेशात निराळीच पद्धति अस्तित्वात आहे. या भागात लाकूड, झाडाच्या फांद्या व शेण जमिनींत पुरतात व त्यावर मातीचा पातळ थर करून तें पेटवून देतात. या पद्धतीमुळें मातींत राख मिसळली जाते व राखेंत अशुद्ध पालाशकर्बितच जास्त असतो. पोटॅशचा म्हणजे अशुद्ध पालाशकर्बिताचा खताकडे उपयोग प्रसिद्धच आहे. उत्तम प्रकारचें भात प्रथम भाजलेल्या जमिनींत पेरून रोप उगवल्यावर दुसरीकडे लावावें लागतें.

३ पालाशनत्रित—यास इंग्रजींत पोटॅशियम नायट्रेट अथवा साल्टपेटर म्हणतात. ( सोरा पहा. )

४ सिंधु व त्याचे संयुक्त पदार्थ, सिंधुकर्बित.—सिंधु यास इंग्रजींत सोडियम म्हणतात. वास्तविकपणें पहातां धातूच्या फक्त प्राणिदास ( ऑक्साइडला )च सोडा असें नाव आहे, पण उत्प्राणिद ( हायड्रॉक्साईड ) व कर्बित यांनाहि सोडाच म्हणण्याचा प्रघात पडला आहे. कर्बित हें द्रव्य नुसतें व्यापारीदृष्ट्याच महत्त्वाचें नसून त्यापासून दुसरे अनेक प्रकारचे सिंधुक्षार तयार करतात.

सिंधूच्या क्षारात सिंधुकर्बित हा महत्त्वाचा क्षार आहे. हा निसर्गतः विपुल सांपडतो. हा सामान्यतः सर्वांत मुबलक व शेतकीदृष्ट्या जमिनींतील सिंधुक्षारापैकीं सर्वांत अधिक हानिकारक आहे.

सज्जीमाती ( रेह किंवा रेज ), या पदार्थापासून हें द्रव्य वेगळें काढून व्यापाराकरिता शुद्ध करता येतें. यापासून एक प्रकारचा अशुद्धक्षार तयार होतो व त्याचा उपयोग विशिष्ट प्रकारचीं अर्कें करण्याकरिता किंवा काच, साबण व इतर व्यापाराच्या वस्तूंकडे करता येतो. वऱ्हाडातील लोणारच्या सरोवराप्रमाणेंच इतर सरोवरातील खाऱ्या पाण्यापासून शुद्ध सिंधुकर्बित हें द्रव्य काढता येईल.

कृतिः—पूर्वी यूरोपमध्यें केल्प व बॅरिला या सागरज वनस्पतीपासून सिंधुकर्बित हें द्रव्य काढीत असत; या वनस्पतीच्या राखेपासून चांगल्या प्रकारचा सोडा निघतो. स्पेन बरोबर झालेल्या युद्धामुळें ज्यावेळीं बॅरिला वनस्पतीचा नियमितपणें पुरवठा होईना, त्यावेळीं फ्रेंच लोकाना हें द्रव्य तयार करण्याचे नवीन मार्ग शोधून काढणें भाग पडल्यामुळेंच कृत्रिम सोडा तयार करण्याची लेब्लांकची कृति निघाली. त्यानें साध्या मिठापासून सिंधुकर्बित करण्याचा सनदी हक्क ( पेटन्ट ) १७९२ सालीं मिळविला. या शोधामुळें यूरोपमधील रासायनिक उद्योगधंद्यात क्रान्ति घडून आली.

या समुद्रातील वनस्पतींच्या राखेचा आजकाल सोड्यापेक्षा काष्ठभस्म ( पोटॅश ) काढण्याकरिता जास्त उपयोग करतात; व केल्प हें सामान्यतः वरील अल्काच्या ऐवजीं अद (आयोडिन ) तयार करण्याचें द्रव्य म्हणून प्रसिद्ध आहे. सिसिलींतील महाग गंधकाऐवजीं माक्षिक ( पायराइट ) या गंधकिदापासून गंधकाम्ल काढूं लागले, तव्हा सोडा करण्याचा धंदा आर्थिक दृष्ट्या अधिक फायदेशीर होऊं लागला. हिंदुस्थानात विपुल सांपडणाऱ्या ताम्रमाक्षिक ( कॉपर पायराइट ) या गंधकिदापासूनहि तांबें व गंधकाम्ल काढण्याचा कारखाना सुरू केल्यास पुष्कळ फायदा होण्याचा संभव आहे.

चांगल्या प्रकारच्या काचेकरिता व दुसऱ्या कांहीं किरकोळ कामाकरिता शुद्ध सोडा ( कर्बित )लागतो.

या करिता राख ऊन पाण्यात पुन्हा विरघळवावी, व खालीं बसूं द्यावी, मग तें मिश्रण उकळूं द्यावें व पुन्हा भट्टीवर ठेवावें म्हणजे शुद्ध कर्बित तयार होतें. सोड्याचे स्फटिक हे विशिष्ट कृतीनें केलेले असून त्यात दहा भाग पाणी संयुक्त स्थितींत असते.

सिंधुकर्बिताचे उपयोगः—पदार्थ साफ करणें, कपडे धुणें, रंग काढणें वगैरे कामाकरिता अजूनहि करण्यांत येतात. सिंधुकर्बितापासून सिंधुद्विकर्बित व दाहकसिंधु हीं दोन द्रव्यें तयार करतात.

५रेह् अथवा सज्जी मट्टी (सज्जा माती):-हिंदुस्थानातील बहुतेक सर्व प्रांतात सज्जी मातींना खार फुटून जमिनीच्या पृष्ठावर येतो त्यांत सज्जी (सिंधुकर्बित) खारी (सिंधु गंधकित) मीठ (सिंधु हरिद), यांचें मिश्रण असतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. बहुतेक प्रदेशात विशेषें करून सज्जी ( कर्बित )व इतर प्रदेशात खारी ( गंधकित ) आढळते; गंधकित हें पुष्कळ वेळा पालाशनत्रित ( पोटॅशियम नाइट्रेट ) किंवा खटनत्रित ( कॅलशियम नायट्रेट ) बरोबरहि संलग्न झालेलें असतें. विद्राव्य अल्कद्रव्ययुक्त अशा जमिनीस उसर, भाडी, रेहाल, रहार, रेह, कलाट ( काह्र ) अशीं नावें आहेत. ज्याप्रमाणें खारी या नावानें ज्या जमिनीत गंधकित असतें अशा जमिनीचा बोध होतो त्याप्रमाणे हीं नावें क्वचित् प्रसंगीं साधें मीठ असलेल्या जमिनीस लावतात. उसर जमिनीवर केलेल्या प्रयोगावरून गंधकित असतें असें आढळून आलें. व्होएलक्रचें मत असें कीं, रेह जमिनींत मुख्यतः अशुद्ध सिंधु कर्बित व गंधकित, साधें मीठ, व खट ( कॅलशियम ) आणि मग ( मॅग्नेशियम ) याचे क्षार आढळतात.

सिंधु व पालाश याच्या नत्रिताचें अस्तित्व पुष्कळ वेळां अपायकारक मानण्याऐवजी फायदेशीरच मानतात. कांहीं जमिनींत खार इतका आढळतो कीं त्यामुळें पुष्कळ जमीन पडीत पडते कांहीं ठिकाणीं खार जमिनीवर येऊन जमीन पांढरी दिसते परंतु इतर ठिकाणीं तो वर दिसत नाहीं; तरी जमिनीचा सुपीकपणा कमी करण्यास तो पुरेसा असतो. कपडे छाटण्याच्या खाण्यामातीला ( फुलर्स अर्थ ) चुकीनें सज्जी माती असें म्हणतात; परंतु तींत सोडा मुळींच नसतो.

उसरची उत्पत्तिः—जमिनीवर खार कसे उत्पन्न होतात यासंबंधी निरनिराळीं मतें आहेत. जमिनीवरील खाराचा पहिला उल्लेख स्लीमननें केला आहे. त्याचें मत आधुनिक मताहून फारसें भिन्न नाहीं. रॉईल यानें यासंबंधी कांहीं उल्लेख केला नाहीं ही आश्चर्याची गोष्ट आहे. यमुनातटीच्या पश्चिम कालव्याच्या बाजूच्या जमिनींत खार उत्पन्न होऊन ती शेतीला निरुपयोगी झाल्यामुळें खार कसा तयार होतो व कालव्यांशीं त्याचा कांहीं संबंध आहे कीं काय हें पाहाण्या करिता १८७६ सालीं एक कमिशन बसलें होतें. त्या कमिशनच्या रिपोर्टांत पुढील माहिती आढळते—: वनस्पतीची वाढ व नांगरटीमुळें जमिनींतील द्रव्याचें विघटन होऊन क्षार तयार होतात. सिकितांवर ( सिलिकेट ) उष्णता, हवा, पाणी व कर्बाम्ल यांचें कार्य होऊन त्यांचें पृथक्करण होतें व पुनर्रचना होतांना अल्कयुक्त क्षार बनतात. जमीन सुपीक करीत असतांना किंवा तिची सुपीकता टिकवीत असतांना इतर द्रव्यांची वाढ होत जाते तेव्हां सिंधु कर्बित हें द्रव्य नाश पावतें. चुना असतांना ही गोष्ट विशेषें करून दिसून येते. बहुतेक सर्व सुपीक जमिनींत कर्बिताचें शेकडा प्रमाण कमी सांपडतें. चांगल्या जमिनींत द्रवणशील सिंधुक्षाराचें प्रमाण शेकडा १. पेक्षां क्वचितच जास्त असतें. व ह्या पैकीं निम्में कर्बित असतें. धान्याचें पीक शेंकडा.१ सिंधुकर्बित असणाऱ्या जमिनींत येऊं शकतें. याचें प्रमाण जर शेंकडा. २ असलें तर पिकाचा नाश जरी झाला नाहीं तरी तें द्रव्य अपायकारक होतें. कांहीं खाऱ्या वनस्पतींस मात्र हें अपाय कारक होत नाहीं कित्येक वेळां जमिनीच्या पृष्ठभागावरील थरांत शेंकडा २ ते ६ किंवा याहून जास्त क्षार असतो. पावसाच्या किंवा पाटाच्या पाण्यानें हीं पाण्यांत विरघळणारीं अल्कें खालील जमिनींत जातात. व त्यापैकीं कांहीं भाग एखाद्या वेळीं रहातो. जेथें पाणी खालीं जाणें कठिण असतें तेथें पृष्ठभाग नुसता धुवून निघाला तरी त्यापासून तात्पुरता फायदा होतो. यासाठीं चर किंवा खळगे खोदून ठेवतात; पृष्ठभागावरील पाण्यात हीं अल्कें विरघळतात व पाण्याबरोबर तीं या खळग्यात येऊन पडतात. यामुळें उंच जमिनींत अल्क कमी प्रमाणांत राहतें. जमिनींतून पाणी खालीं जात नसल्यास केव्हां केव्हां मोठें नुकसान होण्याचा संभव आहे उदाहरणार्थ, ( १ ) मधूनमधून येणारे उष्ण वारे, ( २ ) जमीनीवर झाडें वगैरे आच्छादनाचा अभाव असणें, व ( ३ ) नांगरण्याची दोषी पद्धति, उदा. जोराचा पाऊस पडत असतांना वरवर नांगरणें यास ( अ ) जमिनीतील मूळ द्रव्याचें रासायनिक गुणधर्म, ( आ ) जमीनीची नैसर्गिक स्थिति ( उदाहरणार्थ पुष्कळ माती–विपुल वाळू किंवा चुना वगैरे ) व ( इ ) जमीन तयार होत असतांना व नंतर अगणित काळांत पाण्याच्या झालेल्या परिणामामुळें ( अ ) व ( आ ) ची आकस्मित अनियमितपणें झालेली वाटणी या तीन गोष्टींची मदत होऊन रेहचे धातुक थर बनतात.

अभिसरण व केशाकर्षण यामुळें होणारी क्रियाः— पहिल्याप्रथम क्षार जमिनींत पसरतात व नंतर केशाकर्षण होऊन ते पृष्ठभागावर येतात. पाणी बाहेर काढून देण्याची नीट व्यवस्था नसणें व पृष्ठभागावरील ओलावा लवकरच वाळणें यामुळें ही क्रिया होण्यास संधि मिळते.

खत व नांगरटीः—डॉ. ब्राउन यानें रेह जमिनींत खत म्हणून चुन्याच्या क्षाराचा उपयोग करण्याच्या बाबतींत शोध लावला. ज्यावेळीं अपायकारक गंधकितें व कर्बितें चुन्याच्या कोणत्याहि विरघळणाऱ्या क्षारांत मिसळतात ( उदाहरणार्थ चुन्याचें नत्रित ) त्यावेळीं पृथक्करण होऊन चुन्याचें कर्बित व गंधकित होत असतांना सिंधुनत्रित तयार होतें. चुन्याचें कर्बित पाण्यात विरघळत नाहीं व तें वनस्पतींस अपायकारकहि नाहीं. सोड्याचें व चुन्याचें नत्रित ( सिंधु व खटनत्रित ) यापासून वनस्पतींस नत्राचा पुरवठा करण्याच्या कामीं ते फायदेशीर होतात सिंधु नत्रितामुळें क्षाराचें पृथक्करण होऊन खटगंधकित द्रवांतून अम्ल घेतें व त्यावेळीं नत्र तयार होतो. सिंधुकर्बित सेंद्रिय द्रव्याचा या द्रव्याशीं संयोग होऊन खटनत्रित तयार होतें. डॉ. ब्राउन यानें रईच्या ( कॉलोट्रॉपिस जायगॅन्टी ) झाडाच्या

शेतांतील खत व हिरवें खत म्हणून उपयोग करतां येतो असा शोध लावला; कारण यांतील नत्राचा चुन्याशीं ( हा चुना काळ्या जमिनींत असतो )संयोग होऊन सिंधुकर्बित हा निरुपद्रवी पदार्थ बनतो. सेन्टर यास खटनत्रितासंबंधींचें ब्राउनचें म्हणणें मान्य आहे. उसर जमिनींतील सिंधुकर्बित हें द्रव्य निरुपद्रवी करण्यास खटगंधकित ( जिप्सम ) उपयोगी पडतें अशी पुढें लवकरच प्रसिद्धि झाली. रेह जमिनींत जर सिंधुगंधकित असलें तर खटगंधकितापासून फायदा होण्याच्या ऐवजीं तोटाच होण्याचा अधिक संभव आहे. निरनिराळ्या वनस्पतींची कुंड्यांत लागवड करून त्यावर अनेक प्रयोग करून लेदर यानें इतर कोणत्याहि सिंधुक्षारापेक्षा सिंधुकर्बित वनस्पतींस अधिक अपायकारक आहे असें सिद्ध केलें. वनस्पतींवर अपायकारक रासायनिक परिणाम करणाऱ्या सिंधुकर्बित या द्रव्याचे गुणधर्म दाखविणारा प्रयोग त्याच्या शोधांत अत्यन्त बोधप्रद आहे. कित्येक प्रकारची माती पाण्याबरोबर गाळतां येत नाहीं. फडक्यातून थोडेसें गढूळ पाणी खालीं पडतें पण लवकरच या फडक्यावर मातीचा थर बसतो व नंतर पाणी गळेनासें होतें. ज्या मातींत सिंधुकर्बित विशेषेंकरून असतें त्या मातीचा असा गुणधर्म दिसून येतो. यावर उपाय म्हणून प्रयोग करून पाहिले तेव्हां असें दिसून आलें कीं, पांढऱ्या अल्काचें काळ्या अल्कांत रूपान्तर करणें व मातींतील न गाळण्याचा दोष काढून टाकणें, या दोन गुणांमुळें 'उसर' जमीन लागवडीस योग्य करण्याकरितां रासायनिक खत म्हणून कुलनार(जिप्सम) द्रव्याची प्रसिद्धि झाली आहे. हवेच्या व मातीच्या परिस्थितीमुळें जर रेहमध्यें सिंधुकर्बित असलें तर त्यामुळें ज्यांतून पाणी गळणार नाहीं असा मातीचा थर अवश्य तयार होईल. या जलरक्षक थराची दृष्टिगोचर होण्याइतकी वाढ झाली नसली तरी तो जर पृष्ठभागावर असला तर लवकरच क्षाराचा कठिण थर दिसून येईल, रासायनिक घटनेप्रमाणेंच जमिनीच्या स्वाभाविक स्थितींतहि बदल होणें अत्यन्त अवश्य आहे.

यावरून असें दिसून येतें कीं, या कांहीं विरघळणाऱ्या खट ( चुन्याच्या ) क्षारांचे जमिनीवर रासायनिक प्रयोग केल्याशिवाय किंवा झाडें लावण्याकरितां खोल खड्डा खणून त्यांत दुसरी माती भरली असल्याशिवाय, या अच्छिद्र थराच्या खालून पाणी बाहेर घालविण्याची अपेक्षा करणें व्यर्थ आहे.

झाड चांगलीं लागल्यास त्याच्याजवळ इतर वनस्पतींची चांगली लागवड होते, असें जें म्हणतात, याचें असें कारण समजावें कीं, झाडाकरितां खोदलेल्या खड्ड्याचा, पृष्ठभागावरील विरघळणारे क्षार वाहून नेणाऱ्या पाण्यास मार्ग म्हणून उपयोग होत असावा.

कर्बिताचा दुष्परिणाम नाहींसा करण्यास त्याच्या निर्गुणीकरणास आवश्यक असलेलें ठराविक वजनाचें कुलनार ( =जिप्सम=खटगंधकित ) सगळेंच्या सगळें खत म्हणून घालण्याची जरूर नाहीं. कारण एक तर पाण्याशिवाय कुलनार निरुपयोगी असतें व जेथें कर्बित नसेल तेथें तें अनवश्यकच असतें. त्याचा फायदा जमिनींतून पाणी पाझरूं लावणाऱ्या त्याच्या क्रियेमुळें होतो. जमिनीच्या खालच्या भागांतून स्वाभाविकपणें पाणी वाहून जात नसल्यास कुलनाराचा खत म्हणून उपयोग करून फारच खर्च सोसण्यापूर्वी तें वाहून जाईल, अशी अगोदर तरतूद करून ठेवली पाहिजे. कुलनार घातलेल्या जमिनींत खाऱ्या वनस्पती ( सा ल्टवोर्ट ) किंवा जीं झाडें तेथें लागणें अशक्य होतें असल्या वनस्पतींची लागवड करावी. अशा वनस्पतींची वाढ झाल्यास जमिनींतून अपायकारक क्षार काढून लावण्याची तजवीज झाली आहे असें समजावें व महाग कुलनार अधिक घालण्याच्या भानगडींत पडूं नये.

अमेरिकेंतील अनुभव.—या बाबतींत अमेरिकेंत अनेक प्रयोग होऊन त्यानांहि हिंदुस्थानांतील तज्ज्ञांच्या प्रमाणेंच अनुभव आला आहे; पण या दोन्ही देशांतील अनुभवांत इतकाच फरक आहे कीं, अमेरिकेंतील तज्ज्ञ हेच सरकारी अधिकारी असून त्यांना अल्कामुळें निरुपयोगी झालेल्या जमिनी लागवडीखालीं कशा आणतां येतील हें पहावयाचें होतें. त्याचे प्रयोग निव्वळ तत्त्वशोधनार्थ असून प्रयोगापासून मिळालेल्या शहाणपणाचा लागलाच व्यवहारांत उपयोग करण्यांत आला. याचा असा परिणाम झाला कीं ओसाड पडलेली बहुतेक जमीन खारामुळें तेथें लागवडी खालीं आणण्यांत आली.

खारी जमीन सुधारणाऱ्या वनस्पती.—येथें खारी जमीन लागवडीखालीं आणण्याकरितां कांहीं प्रकारच्या वनस्पतींचा उपयोग करतां येण्यासारखा आहे. जी खारी जमीन इतर वनस्पतींस अपायकारक होते तिजमध्येंच कित्येक झाडें वाढतात, इतकेंच नव्हे तर फोफावतात; खाऱ्या वनस्पती या यापैकींच होत. साधें पीक किंवा मोठीं झाड जमिनीवर लावण्यापूर्वी खाऱ्या वनस्पतींनीं जमिनीचें उन्हापासून रक्षण करतां येईल व अशा झाडाची तात्पुरती लागवड करून विषारी खारहि काढून लावतां येईल.

कित्येक वर्षे, दरसाल पावसाळ्याच्या अखेरीपासून सर्व उन्हाळ्यांत जर खाऱ्या जमिनींत गुरें चरूं दिलीं नाहींत, तर ह्या जमिनीवर पावसाळ्यांत उगवणारी वनस्पति वाचूं शकेल. इतर प्रकारची वनस्पति किंवा झाडें देखील या संरक्षित प्रदेशांत उगवतील व कांहीं वर्षांत या जमिनीवर खार येणार नाहीं. अशा प्रकारचे प्रयोग झाले असून त्यांत यशहि मिळालें आहे. या संरक्षित जमिनीवर पहिल्याप्रथम खार-उसर ( स्पोरोबोलस ॲरॅबिकम ) नांवाचें गवत उगवलें. याच्या नांवावरून ही गवताची जात क्षारप्रिय असावी हें

दिसतेंच आहे. भुरभुरोइ गवतहि पावसाळ्यांत येथ उगवतें उन्हाच्या उष्णतेपासून जरी हें जमिनीचें रक्षण करीत नसलें तरी याचा गुरांना खाण्याकरिता बराच उपयोग होतो. जमीन अर्धवट सुधारली म्हणजे डाब ( एरॅग्रोस्टिस सायनोंसुरॉइडेस ), दुब ( सायनों डॉन डॅक्टिलॉन ), बट ( डायप्लेक्ने फुस्का ), जानेवा ( अँड्रॉपोगॉन ॲनुलॅटस ) व इतर दुसऱ्या जाती उगवूं लागतात. गुरांना चाऱ्याची अत्यंत अवश्यकता असल्यामुळें जमीन लागवडीस योग्य करीत असताना पहिल्या प्रथम कोणत्या गवताचा उपयोग करावा हें कळणें अत्यंत जरूर आहे हिंदुस्थानात खाऱ्या वनस्पतींसबंधीं कळकळीनें शोध झाला नाहीं ही खेदाची गोष्ट आहे कारण इतर कोणत्याहि गवतांपेक्षा जमीन सुधारण्याच्या कामीं ही वनस्पति उपयोगी पडण्यासारखी आहे आस्ट्रेलियन खारें झुडूप येथें स्थायिक करण्याच्या प्रयत्नासंबंधीं काहीं तुरळक उदाहरणें सापडतात; पण खुद्द हिंदुस्थानातच इतर ठिकाणांपेक्षा विपुल व अनेक प्रकारच्या स्थानिक खाऱ्या वनस्पती आहेत इकडे आमचे शेतकी खात्याचे अधिकारी लक्ष देत नाहींत.

अशुद्ध सिंधुकर्बिताच्या ( ' वरिला ' ) उत्पत्ती करिता पंजाबमध्यें यापैकीं कांहींची व्यवस्थेशीरपणें लागवड करण्यात आली आहे, पण ' उसर ' जमीन लागवडीखालीं आणण्याकरिता म्हणून त्यापैकीं एकाचाहि उपयोग करण्यात आलेला दिसत नाहीं. ज्या जमिनींत अतिशय खार असतो अशा जमिनीवर उगवणाऱ्या खाऱ्या वनस्पती व मामूल जमिनींहून यत्किंचितहि अधिक खार असला तरी न उगवणाऱ्या वनस्पती याच्या दरम्यान किती तरी वनस्पती असूं शकतील या वनस्पतींवर काळजीपूर्वक प्रयोग करून कोणत्या वनस्पतींना खार सर्वांत जास्त लागतो व त्याहून कमी कोणत्या वनस्पतींना हें सर्व ठरविलें गेलें पाहिजे, व त्यावरून खारी जमीन सुधारण्याकरिता कोणत्या वनस्पतींची कशा अनुक्रमानें लागवड करीत जावयाचें हें निश्चित करून सारखा खार लागणाऱ्या वनस्पतींपैकीं फक्त उपयुक्त वनस्पतींचीच लागवड झाली पाहिजे प्रयोगावाचून केवळ एकाच जातीच्या वनस्पतींस सारखा खार लागत असेल असा तर्क करतां येत नाहीं उदाहरणार्थ बाभूळ ( ॲकेशिया-अरेबिका ), पळस ( ब्युटिआ फ्रॉंडोसा ), शिसू ( डॅल्बर्जिया सिसू ). वगैरे झाडें उपयुक्त असल्याबद्दल प्रसिद्ध आहेत, पण हीं झाडें ज्या जातींचीं आहेत त्या जातींच्या झाडास इतर कोणत्याहि जातीच्या झाडापेक्षा खारांची नावड अधिक आहे. हीं झाडें खारी जमीन सुधारण्यास उपयोगी असतील पण ज्या झाडांतून आपणांस निवड करतां येते त्यात उत्तम आहेत काय? त्याचप्रमाणें हीं जर सोईस्कर व उपयुक्त असतील तर त्यांची लागवड केव्हां करावी व त्याच्या अगोदर, बरोबर व मागाहून कोणतीं झाडें लावावीं हे हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें अत्यन्त महत्त्वाचे असे प्रश्न आहेत, पण त्यांची समाधानकारक उत्तरें देता येत नाहींत जमीन लागवडीखालीं आणताना किंवा जंगलाची पुन्हा लागवड करताना हिंदी प्रयत्नांचा सर्वांत मोठा दोष असा दिसून येतो कीं उत्पन्न थोडें आलेलें पुरवलें परंतु पीक लवकर हातीं यावें अशी दृष्टि असते.

सोड्याचे औद्योगिकदृष्ट्या उपयोग.—सर्व हिंदुस्थानात सोडायुक्त माती धुवून कमीजास्त प्रमाणात शुद्ध कर्बित तयार करतात. दक्षिण हिंदुस्थानात (सालेम, म्हैसूर वगैरे) हा धंदा बऱ्याच मोठ्या प्रमाणात सुरू होता व याच्या वाढीसंबंधीं बरीच आशा होती खाऱ्या जमिनींपासून सज्जी किंवा रासी सिंधुकर्बिताच्या दोन जाती तयार करण्याकरिता बिहार, संयुक्तप्रांत व इतर ठिकाणीं परवाने देण्यात येत असता सरकारी वसुलास धक्का बसू नये म्हणून परवाने देण्यात येत असत कारण सोरा काढण्याच्या व शुद्ध करण्याच्या कारखान्यात साधें मीठ पुष्कळ निघतें वन्हाडमधील लोणारच्या सरोवरातून शुद्ध सिंधुकर्बित काढतात. सरोवराच्या काहीं भागात बुड्या मारल्या म्हणजे मिश्रक्षाराचे खडे सापडतात, पण सरोवराचें पाणी सुकविलें असता क्षाराचे जे प्रकार मागें राहतात त्यात सिंधुकर्बित मुख्य असतो या प्रकारास निरनिराळीं स्थानिक नावें आहेत दोन संहत पृष्ठभागात छुयाच्या आकाराचें स्फटिक असतात त्यास डळा म्हणतात. 'कुप्पल' हा पातळ 'डळा' असून तो लाल रंगाचा असतो. पापडी किंवा पाप्री हा पांढऱ्या रंगाचा खारा फेस असतो जमिनीच्या खारापासून किंवा खाऱ्या तळ्यातील पाण्यापासून गंधकाम्लाचा उपयोग करून काढलेल्या मिश्रित क्षारापासून (यात जास्त भाग गंधकाचाच असतो ) साल्टकेक म्हणजे सिंधुगंधकित तयार करता येतें व चुन्याबरोबर व कोळशाबरोबर भट्टींत घालून त्याचें सोडाभस्म ( सोडा ॲश ) तयार होतें संयुक्त प्रान्तातील आग्रा येथें रेह जमिनीच्या खाराचा काच किंवा काचेचे मणी तयार करण्याच्या कामीं उपयोग करता येतो किंवा नाहीं यासंबंधीं १८८० साली प्रयत्न करण्यात आला. वेनीस येथून या कामाकरिता उपकरणेंहि आणण्यात आलीं. त्यावेळीं अरबाचा काचकामांत उपयोग करण्याच्या बाबतींत खालील अनुभव आलाः—

( अ ) अल्कामधील अशुद्ध द्रव्यामुळें चांगल्या प्रकारची पांढरी काच करण्यास अडथळा येतो, ( आ ) करितां शुद्ध अल्क काढण्याकरितां रासायनिक कारखाने काढणें अवश्य आहे,( इ ) चांगले मणी तयार करता येतात, पण ते परदेशांतून येणाऱ्या मण्यापेक्षा स्वस्त पडतील किंवा नाहीं या संबंधीं संशय आहे. मोठ्या प्रमाणांवर धंदे निघाल्यास व उत्तम देखरेख असल्यास काचेच्या धंद्याची सुधारणा होणें शक्य आहे जेथें जेथें सोड्याचा थर आढळतो तेथें तेथें काचेचा विपेषतः काचेच्या बांगड्या करण्याचा देशी कारखाना कमीअधिक प्रमाणात आढळतोच, एतद्देशीय

लोक रेह व सज्जी यांचा अनेक प्रकारें उपयोग करतात. लाख व कमेला विरघळविण्याकरिता, रेशमी व कापसाच्या कपड्यास रंग देण्याकरिता व कुसुंबाच्या फुलापासून कुसुंबी रंग काढण्याकरिता याचा उपयोग करतात. रेशमी, सुती व लोंकरी कपडा धुण्याकरिताहि याचा उपयोग केला जातो. फरुकाबाद येथें तागापासून देशी कागद तयार करण्याकरिताहि याचा उपयोग होतो या दोन्ही क्षाराचा देशी साबण करण्याकरिता उपयोग होतो. साखर करण्याकरिता उसाचा रस उकळतांना त्यांतील सेंद्रिय अम्लाचें निर्गुणीकरण करण्यासाठीं थोडा रेह शिंपडतात. तंबाखूत भेसळ म्हणून वजन वाढविण्याकरिता त्यांत रेह मिसळतात. शिवाय आर्यवैद्यकांत हे क्षार पाचक मानले आहेत. हिंदुस्थानांतील कुलालकलेंत सुधारणा कशी करता येईल याबद्दल जरी संशोधन झालें आहे तरी मृत्पात्रें घडविण्याच्या कामीं सिंधुकार्बितयुक्त मातीचा उपयोग करण्याकडे अजून पुरेसें लक्ष गेलें नाहीं सुमारें ७५ वर्षांपूर्वी बंगालमधील कालनाग खारी, साबन मिटी, रोटसमाती, मौलमेन व सिंगापूर माती यासंबंधीं बरीच चौकशी व प्रयोग झाले; व त्याचप्रमाणें मातीच्या भांड्यावर जिल्हई बसविण्याच्या बाबतीतहि प्रयोग करण्यांत आले होते

६ का ळें मी ठ —स्थानिक बाजारांत यास थोडेंस महत्त्व आहे उत्तर हिंदुस्थानात भिवानि व हिस्सर येथें हें तयार करतात.

आवळा व हिरडा यांबरोबर साधें मीठ व सज्जी वितळण्यासारखे दिसेपर्यंत भाजतात. अशा तऱ्हेनें तयार केलेल्या पदार्थाचा औषधाकरितां उपयोग होतो डॉ वार्थ याच्या मताप्रमाणें सिंधुगंधकित हें याचें अवश्यक घटक द्रव्य आहे. साधें मीठ, सिंधुगंधकित, सिंधुकर्बित व सेंद्रिय द्रव्यांच्या ऐवजीं साखर या पदार्थांचें मिश्रण वितळून त्यानें नमुने तयार केले. अनार्द्र सिंधुगंधकिताचें प्रमाण शेंकडा १ पासून ३ पर्यंत जसें वाढत जातें तसे औषधी दृष्ट्या अधिक गुणकारक क्षार तयार होऊन त्यांचा रंग गुलाबीपासून बदलत बदलत हिंगुळी होत गेला. शेंकडा १५ गंधकितापासून जांभळ्या रंगाचा क्षार तयार झाला. या सर्व गंधकयुक्त उत्पन्नाचा अपानवायूसारखा वास येतो. व देशी क्षार सारखेच याचे रासायनिक धर्म असतात. एतद्देशीय लोक याच्या भट्टींत जीं जंगलांतील फळें घालतात त्याचा विशेष कांहींच उपयोग नसतो; कारण तीं भाजलीं जात असतांना त्यांचें शुद्ध कर्बांत रूपांतर होतें व त्याच्या गंधकितास प्राण वायुहीन करून त्याचें गंधकिद बनविण्याकडे उपयोग होतो. हेंच या रीतीनें तयार केलेल्या काळ्या मिठांतील मुख्य द्रव्य असतें.

७ फु ली—हा सिंधुकर्बिताचा प्रकार आहे. या द्रव्याची लेह येथें, लडाखमधील चंगठण, रुपशु व नुब्रा येथून आयात होते. येथें चहा कडक करण्याकरिता याचा बराच उपयोग करतात. काश्मीर, कुलु व दक्षिण हिंदुस्थान इकडे हें पाठविलें जातें. भोतिये लोक कपडे धुण्याकरिता व लोंकरीस रंग देण्याकरितां याचा उपयोग करतात साधारणपणें ५० ते १२० टन या मालाची आयात असून त्याची सरासरी किंमत ( १५ वर्षांपूर्वी ) ६१० रुपये मण होती.

८ स ज्जी खा र ( बॅरिला )—हा अशुद्ध सिंधुकर्बित होय. यावर स्वतंत्रच लेख दिला जाईल

९ टा क ण खा र —यास इंग्रजींत बोरॅक्स अथवा सोडियम बाय-बोरेट म्हणतात व याची घटनादर्शक संज्ञा सिंधुद्विटंकित ( सोडियम बायबोरेट ) आहे. यावरहि पुढें स्वतंत्र लेख येईल

१० दा ह क सिंधु —कॉस्टिक सोडा. आजकाल या द्रव्याचा पुरवठा परदेशातून होतो एका कागदाच्या गिरणींत हें द्रव्य ' रेह ' पासून तयार करण्याचा प्रयत्न करण्यात आला होता असें कळतें तो प्रयत्न कितपत यशस्वी झाला, त्यासंबंधीं माहिती नाहीं.

विजेनें साध्या मिठाचे दाहकसिंधु व हरवायु यांत पृथक्करण होतें, असा शोध लागल्यापासून यूरोपमध्यें व अमेरिकेंत या बाबतींत फारच उत्साह उत्पन्न झाला आहे अशा रीतीनें साध्या मिठाचें पृथक्करण झाल्यामुळें हें अल्पद्रव्य साबणाच्या व कागदाच्या कारखानदारांच्या दाराशीं थोडक्या किंमतींत येऊन पडणें शक्य झालें. कारण मिठाचा ( सिंधु हरिदाचा ) हवा तितका पुरवठा होऊं शकतो हिंदुस्थानच्या दृष्टीनें या शोधाचा असा फायदा आहे कीं, या पद्धतींत गंधकाम्ल मुळींच लागत नाहीं. गंधकाम्लाशिवाय लेब्लँकच्या सोडा-भस्म करण्याच्या पद्धतींत साधें मीठ किंवा रेह याचा उपयोग होऊं शकत नाहीं यामुळें हा शोध लागण्यापूर्वी रासायनिक उद्योगधंद्यांत हिंदुस्थानला पुढें येण्याची मुळींच आशा नव्हती

११ सिं धु ह रि द किं वा मी ठ —स्वतंत्र लेख पहा

१२ सिं धु गं ध कि त.—हा क्षार इंग्रजींमध्यें ग्लॉबर्स सॉल्ट नांवानें प्रसिद्ध असून हिंदुस्थानात खारि किंवा खारिनमक या नांवानें ओळखला जातो हा रेहचा घटक क्षार आहे सिंधुकर्बित तयार करण्याकरिता याचा उपयोग होतो लेब्लँकच्या सोडा तयार करण्याच्या पद्धतींत ह्याची उत्पत्ति ही पहिली पायरी आहे. अर्थात ज्या ठिकाणीं वरील थरात हा क्षार सांपडतो त्या ठिकाणीं गंधकाम्लाच्या खर्चाशिवाय लेब्लँकपद्धतींतील पहिल्या पायरीपर्यंत पोंचल्यासारखें होतें.

हिंदुस्थानात हा क्षार उन्हांतील बाष्पीभवनाच्या किंवा कृत्रिम उष्णतेच्या साहाय्यानें अशुद्ध सोरा तयार करतात तशाच पद्धतीनें रेह मातीपासून काढतात.

या दोहोंत मातीच्या गुणधर्मांत मात्र फरक असतो बाकी गाळणी, बाष्पपात्रें ( बॉइलर्स ) थाळे वगैरे सर्वांचें स्वरूप सारखेंच असतें. क्षारयुक्त पाण्याची वाफ करून क्षार

वेगळा करण्याकरितां बाष्पपात्रें व चुन्याचे थाळे या दोहों चाहि उपयोग करण्यांत येतो बाष्पपात्राचा उपयोग बहारमध्यें व चुन्याचा थाळ्याचा संयुक्त प्रांतात करतात कारण बहारेपक्षा संयुक्त प्रांतांत कोरड्या व उष्ण हवेवर अधिक बिनधोकपणें अवलंबून राहतां येतें

औद्योगिक कामाकरितां उपयोग—पाटणा खारीचा (बहारच्या खारीस पाटणा खारी म्हणतात ) कच्चीं कातडीं खारविण्याकरितां व गुराचें रेचक म्हणून उपयोग करतात. तींत सिंधुहरिद ( साधें मीठ ) फारच थोडें असतें पूर्वेकडील प्रदेशातील पाणी उन्हांत आटवून काढलेल्या खारीचाहि गुरांना रेचक म्हणून उपयोग करतात पण तींत शेंकडा २० ते ३० ( किंवा केव्हां केव्हां अधिक ) साधें मीठ असतें सिंधुहरिदापेक्षा म्हणजे साध्या मिठापेक्षा सिंधुगंधकित हें कच्चं कातडें खारविण्याकरितां अधिक उपयुक्त आहे कारण साध्या मिठांत हवेतील पाणी शोषून कातडी नरम करण्याचा दोष आहे यामुळें बिहारमधील खारीची ( चमडा खारीची ) संयुक्त प्रांतांतील खारीपेक्षांहि अधिक मागणी असते दत्त यांच्या मताप्रमाणें उत्तरकालीन संस्कृत ग्रंथकारांनीं 'क्षारि लवणें' हा शब्द तिच्यासाठींच वापरलेला आहे हिंदुस्थानांत तयार होणारा क्षार अशुद्ध असतो

वरील माहितीवरून असें दिसून येईल कीं एकंदरीत हिंदुस्थानांत अल्कली तयार करण्याचे अथवा शुद्ध करण्याचे आधुनिक शास्त्रीय पद्धतींनें चालविलेले कारखाने मुळींच नाहींत, व थोडेबहुत कारखाने आहेत ते आधुनिक पद्धतीच्या मानानें एक शतक मागें आहेत व त्यांत सोरा वगैरे पदार्थ तयार होतात

संकुचित अर्थी अल्क या नांवानें वर आलेल्या आम्र (अॅमोनिअम ), पालाश (पोटॅशिअम ), सिंधु ( सोडिअम ), व माव ( लिथिअम ) यांच्या उज्जिताचा बोध होतो, पण विस्तृत अर्थी अल्कमृत्तिका म्हणजे भार( बेरियम ), खट ( कॅल्शम ), स्रात ( स्ट्रॉन्शिअम ), यांच्या उज्जिताचाहि त्यांतच समावेश होतो ( अल्कमृत्तिका पहा ) त्याचप्रमाणें कित्येक वनस्पती जाळल्या असतां त्यांची राखहि अल्कधर्मी असते. अॅकोनिटाइन, मॉर्फाइन, क्विनाइन वगैरे अल्कोदांना 'वानस्पत्य अल्क' म्हणतात अल्कलींचे मुख्य गुण असे आहेत कीं ते पाण्यांत विरघळतात, अम्लांचे निर्गुणीकरण करतात, सेंद्रिय पदार्थांना जाळतात व लिटमससारख्या वनस्पतीपासून तयार केलेले रंग बदलतात [ पॅट, क. ग्रॉ. ]

अल्कमृत्तिका ( अल्कलाइन अर्थ )—अल्कमृत्तिका धातु ज्यास म्हणतात त्या धातू (१) विदुर ( बेरिलियम ), ( २ ) मग्न ( मॅग्नेशियम ), ( ३ ) खट (कॅल्शियम ), ( ४ ) स्रात ( स्ट्रॉन्शियम ) आणि ( ५ ) भार ( बेरियम ) हीं मूलद्रव्यें आहेत प्राचीन रसायनशास्त्र हे मृत्तिका या शब्दाचा उपयोग पाण्यांत अविद्राव्य असून तीव्र उष्णतेनें अविकृत राहणाऱ्या अधातु पदार्थांचा बोध होण्याकरितां करीत असत आणि यांपैकीं कांहीं पदार्थ-उदाहरणार्थ कळीचुना-हे पुष्कळ अंशीं अल्कधर्मी असल्याचें आढळून आल्यानें यास "अल्कमृत्तिका" असें म्हणूं लागले इ. स. १८०७ पर्यंत अल्कमृत्तिका मूलद्रव्यें आहेत असें समजत असत, परंतु सर हंफ्रे डेव्हि यानें अल्कमृत्तिका हीं मूलद्रव्यें नसून अनेक प्रकारच्या धातूंचे प्राणिद ( ऑक्साइड्स ) आहेत असें सिद्ध केलें या वर्गांत येणारे धातू सृष्टीमध्यें असंयुक्त स्थितींत कधींहि सापडत नाहींत, परंतु मुख्यत्वें करून कर्बित ( कारबोनेटस ) आणि गंधकित मू प्र, या सारणीचे असतात. मू प्र या सारणीदर्शक घटकाचे प्राणिद पाण्यांत विद्राव्य असतात हे द्रव्य बलवत् अल्क प्रतिक्रिया देणारे असतात आणि हवेच्या संसर्गांत ते कर्बद्विप्राणिद ( कार्बन डाय ऑक्साइड ) शोषण करून घेतात ते अनाम्ल ( बेसिक ) धर्मी असून अम्लामध्यें सहज विद्रुत होतात व तज्जातीय क्षार होतात या मूलद्रव्याचा परमाणुभारांक जसजसा अधिक वाढत जातो तसतसे त्यांचे गंधकित हे पाण्यात कमी कमी अविद्राव्य होत जातात असें आढळून आलें आहे.

रासायनिक धर्मांचा विचार करितां कांहीं रासायनिक धर्मांत विदुर म्हणजे बेरिलियम हें मूलद्रव्य अगदीं निराळें समजावें लागतें व कांहीं रासायनिक धर्मांत ते स्फट ( अल्युमिनियम)या धातूशीं साम्य पावतें विदुर आणि मग्न या धातू निर्जल हवेंत अविकृत व कायम राहतात. परंतु खट, स्रात आणि भार या धातूंचे हवेच्या संसर्गांत त्वरित प्राणिदीकरण होतें.

या वर्गातील सर्व धातूंचे क्षार हे बहुधा चांगले स्फटिक रूप धारण करणारे असतात. यांचे हरिद ( क्लोराइड्स ) आणि नत्रित ( नायट्रेट्स ) हे पाण्यात सहज विद्राव्य असतात, परंतु कर्बित स्फुरित ( फॉस्फेट्स ) आणि गंधकित ( सल्फेटस ) हे पाण्यात ईषद्विद्राव्य किंवा अविद्राव्य असतात. हिंदुस्थानांतील महत्वाच्या अल्कमृत्तिकाच्या धंद्याच्या स्थितीचें ज्ञान आवश्यक असल्यामुळें तद्विषयक माहिती पुढें देत आहों.—

भार ( बेरिअम )या धातूचें प्राणिद अत्यंत दाहक विषारी व अल्कधर्मी असून त्यावर पाण्याची क्रिया केली असतां उज्जित ( हायड्रेट ) बनतें भारकर्बित या द्रव्याची हिंदुस्थानांत थोड्या प्रमाणावर आयात होते. हें अत्यंत विषारी आहे युरोपमध्यें कांहीं प्रकारच्या मातीच्या व कांचेच्या भांड्यांचें हें एक घटक द्रव्य असतें यापासून कांहीं मोहक रंग तयार करतात फ्रान्समध्यें 'बीटरूट'ची साखर शुद्ध करण्याकरितां चुन्याऐवजी याचा उपयोग करतात

भारनत्रितः—कर्बिताचें नत्राम्लानें पृथक्करण करून हें द्रव्य तयार करतात आतषबाजींत हिरव्या रंगासाठीं या

उपयोग करतात. 'वॅरिटायटिन' या रंगातहि हेंच द्रव्य मुख्य असतें. आजकाल कित्येक उत्स्फोटकें (एक्स्प्लोझिव) तयार करण्याच्या कामींहि सोऱ्याच्या ऐवजीं भारनत्रिताचा उपयोग करूं लागले आहेत.

भा र गं ध कि त:—भाराच्या क्षारामध्यें हें अतिशय महत्वाचें आहे. हें भूगर्भिक शिरात सापडतें. कर्नूळ जिल्ह्यांत (मद्रास) तें शेंचमण्याच्या (क्वार्टझच्या) शिरात वरच्या शिशाबरोबर सापडतें, व अलगयम (सालेम जिल्हा) जवळ काचमण्याबरोबर हें बऱ्याच मोठ्या प्रमाणात आढळून येतें. त्याचप्रमाणें मध्यप्रांतांत जबलपूर भागांत व रेवा संस्थानात भारगंधकित ताम्याबरोबर सापडतें. रजपुतान्यात, अजमीर भागात तारागड येथील शिशाच्या खाणींत हें आढळतें असें म्हणतात. पंजाबमध्यें सिमला जिल्ह्यात सुबाथु येथेंहि हें शिशाबरोबर आढळलें आहे. हिंदुस्थानात या अल्कमृत्तिकेचे कारखाने नाहींत तरी भारगंधकित येथील बाजारात विकत मिळतें व तें सफेता (व्हाईटलेड = शिशाचें कर्बित) म्हणून किंवा सफेत्यात भेसळीच्या रूपानें बऱ्याच मोठ्या प्रमाणात विकलें जातें असें दिसतें. आर्फिडी मेणकापड तयार करण्याच्या कामीं याचा हिंदुस्थानात फार मोठ्या प्रमाणात उपयोग होतो. शिवाय कागद तयार करण्याच्या कामीं व आतषबाजीच्या काहीं प्रकारात भारनत्रिताऐवजीं स्वस्त पदार्थ म्हणून हा उपयोगात आणतात.

स ट व त्या पे क्षा र.—यासंबंधीं माहिती चुना या लेखांत आहे.

स्त्रां त (स्ट्रॉन्शिअम)—स्त्रात प्राणिद हें प्राणिद स्थितींत निसर्गतः सापडत नाहीं. पण कर्बित किंवा गंधकित भाजून तें तयार करता येतें. स्त्रांतगंधकित हें हिंदुस्थानास दोन ठिकाणीं सापडतें-सिंधमधील किरथार येथील चुनखडींत व मिठाच्या डोंगरांतील सुरडाच्या तावदानांत. यूरोपमधील साखर शुद्ध करण्याच्या कामीं चुन्याच्या ऐवजीं या कर्बिताचा उपयोग करीत असत. परंतु हिंदुस्थानांत ही धातु परदेशातून आलेल्या नत्रिताच्या रूपातच विशेषेंकरून परिचित असून आतषबाजींतील लाल रंगाच्या ज्वाळा करण्याकरिता तिचा उपयोग करतात [वॅट. क. प्रॉ. ए. त्रि]

अल्कहल (अल्कोहॉल्स) संज्ञा:—अल्कोहॉल म्हणजे मद्यार्क. हा शब्द अरबी भाषेतील "अल = तो आणि कोहल = सुरम्यास लावण्याची पूड, या दोन शब्दापासून झाला आहे. पुष्कळ शतकेंपर्यंत आल्कोहॉल हा शब्द अगदीं बारीक पूड या अर्थी वापरला जात असे. पॅरॅसेल्सस आणि लिबॅव्हिअस यांनीं या शब्दाचा उपयोग कोणतीहि बारीक पूड या अर्थी केला असून 'लिबॅव्हिअस' यानें "अंज" (ॲन्टिमनी) पासून तयार केलेला "आल्कोहॉल" असें स्पष्ट म्हटलें आहे. तरी पॅरासेल्सस यानें "आल्कोहोल" शब्दाचा उपयोग बाष्पभावी (उडून जाणारा—व्होलटाईल) पदार्थ या अर्थीहि या लेखात केला आहे. या "बाष्पभावी" पदार्थांचा अर्थबोध करणारीं दुसरीं नावें प्राचीन रसायनशास्त्रास माहीत होतीं जसें.—"एलिक्झिर ऑफ लाइफ" (अमृत) हा शब्द यूरोपात १३-१४ व्या शतकांत या अर्थी प्रचारात होता. आर्नोल्डस व्हिलॅनोव्हॅनस यानें प्रथम पातन विधीनें (डिस्टिलेशनने) तयार केलेल्या दारूला हा शब्द वापरला. हल्लीं सेंद्रिय रसायनशास्त्रात आल्कोहॉल हा शब्द वर्गवाचक म्हणून वापरला जातो. परंतु व्यवहारात तो त्या वर्गातील इथिल अल्कोहॉल म्हणून जें द्रव्य त्यासाठींच योजितात. आम्ही मराठींत अल्कोहॉलसदृश अल्कहल ही संज्ञा केवळ वर्गवाचकच ठेविली असून त्या वर्गातील इथिल अल्कोहॉल या द्रव्यासाठीं मद्यार्क हा साधा शब्द पसंत केला आहे. अल्कहल या मराठी शब्दाची व्युत्पत्ति पुढें दिल्या प्रमाणें लावता येते.—

"अल्क" हा धर्म असून "हल" म्हणजे मद्य या पासून अल्कहला शब्द करून त्या वरून "अल्कहलें" हा शब्द अल्कधर्म असणारीं मद्यें या अर्थी वर्गवाचक होतो.

सा मा न्य स्व रू प —'अल्कहल' या शब्दानें पुष्कळ सेंद्रिय पदार्थांचा बोध होतो. या सर्व पदार्थांत बाह्यस्वरूपात साम्य पाहिलें तर क्वचितच असतें परंतु त्या सर्व पदार्थांत एक साधर्म्य आहे. हे सर्व पदार्थ "उत्कर्ब" (हायड्रोकार्बन) याच्या घटनेतील एक किंवा अधिक "उज्ज" चे परमाणू निःसार्य होऊन त्याऐवजीं "उत्प्राणिल" "प्रउ" ह्या संघाचे तितकेच अणू येऊन झालेले आहेत; यामुळें त्यांची घटना सारखीच आहे. या अल्कहलाची तुलना धातूंच्या उत्प्राणिदाशीं करता येईल. उत्प्राणिदाप्रमाणें अल्कहलात एक किंवा अधिक उत्प्राणिल संघ आहेत म्हणून ते तत्तुल्य आहेत असें नव्हे तर अल्कहल अम्लाशीं संयुक्त होऊन धातूंच्या उत्प्राणिदाप्रमाणें क्षार बनतात व पाणीहि तयार होतें. हें साम्य खालीं दिलेलीं दोन समीकरणें पाहिलीं असता तावडतोब ध्यानात येईलः—

इथिल अल्कहल + गंधकाम्ल = इथिलगंधकित + पाणी

$$\text{क}_{२}\text{उ}_{५}\text{प्रउ} + \text{उ}_{२}\text{गप्र}_{४} = \text{क}_{२}\text{उ}_{५}\text{गप्र}_{४} + \text{उ}_{२}\text{प्र}$$

सिंधु उत्प्राणिद + गंधकाम्ल = सिंधुगंधकित + पाणी

$$\text{धुप्रउ} + \text{उ}_{२}\text{गप्र}_{४} = \text{धुउगप्र}_{४} + \text{उ}_{२}\text{प्र}$$

धातु द्विमूल्य (डाय व्हॅलंट) असला म्हणजे त्याच्या उत्प्राणिदात दोन उत्प्राणिल संघ (प्रउ) असतात, धातु त्रिमूल्य असला म्हणजे तज्जन्य उत्प्राणिदात तीन उत्प्राणिल संघ असतात. त्याचप्रमाणें उत्कर्ष मूलक जर द्विमूल्य किंवा त्रिमूल्य असला तर त्यापासून तयार होणाऱ्या अल्कहलांत दोन किंवा तीन उत्प्राणिल संघ (प्रउ) अनुक्रमें असतात उदाहरणार्थ $\text{क}_{२}\text{उ}_{४}(\text{प्रउ})_{२}$ आणि $\text{क}_{३}\text{उ}_{५}(\text{प्रउ}_{३})$

व र्गी क र ण.—अल्कहलाचें वर्गीकरण आपणास दोन रीतींनीं करता येण्यासारखें आहे. एक, अल्कहलातील उत्प्राणिल संघाच्या संख्येवरून, किंवा दुसरें उत्प्राणिल संघ

ज्या कर्ब परमाणूशीं संलग्न असतो त्याच्याशीं जोडलेल्या दुसऱ्या संघाच्या स्वरूपावरून. प्रकार पहिलाः—अल्कहलात उत्प्राणिल संघाची जितकी संख्या असेल त्या संख्येप्रमाणें त्यास एकोज्जिक (मोनोहायड्रिक) द्विउज्जक,(ग्लायकोलस) त्रिउज्जर(ग्लिसरोल्स) इ. अल्कहल म्हणतात किंवा कांहीं ग्रंथकाराच्या मताप्रमाणें त्यास अनुक्रमें एकाणुक ( मोनो अटॉमिक ) द्व्यणुक, त्र्यणुक अल्कहल असेंहि म्हणतात

प्रकार दुसरा —वर्गीकरणाच्या दुसऱ्या तत्वाप्रमाणें, प्राथमिक, द्वितीयक व तृतीयक असे तीन परस्परभिन्न प्रकारचे अल्कहल निष्पन्न होतात पाराफिन श्रेणींतील पहिल्या चार उत्कर्षांना व त्यापासून बनणाऱ्या अल्कहलांच्या घटनादर्शक सारण्यांचें काळजीपूर्वक अवलोकन केलें असता या वर्गीकरणाचा अर्थ स्पष्ट होईल या उत्कर्षांच्या घटनादर्शक सारण्या येणेंप्रमाणेः—



प्रत्येक उत्कर्षांत कउ$_{२}$ हा संघ अधिक असतो व दुसऱ्या उत्कर्षापासून प्रत्येक उत्कर्षाच्या टोंकाच्या कर्ब परमाणूस तीन उज्ज परमाणू व मधल्या कर्ब परमाणूस दोन उज्ज परमाणू जोडलेले असतात एवढें लक्षांत ठेवलें असता या चार सारण्या थोडक्यात पुढें दिल्याप्रमाणें लिहितां येतील. कउ$_{४}$; कउ$_{३}$. कउ$_{३}$. कउ$_{३}$ कउ$_{२}$ कउ$_{३}$; आणि कउ$_{३}$कउ. कउ$_{२}$कउ$_{३}$ यांमध्यें टोंकाच्या कर्ब परमाणूस चिकटलेल्या उज्ज परमाणूच्या जागीं ( म्हणजे दुसऱ्या उत्कर्षापासून कउ$_{३}$ या संघात ) प्रउ हें मूलक घातलें असता कउ प्रउ ( मिथिलअल्कहल ) कउ$_{३}$ कउ$_{२}$ प्रउ ( इथिल-अल्कहल ) वगैरे प्राथमिक अल्कहल बनतात. पहिल्या दोन उत्कर्षांत मध्यगत कर्ब परमाणूच नसल्यामुळें त्यापासून दुसऱ्या कोणत्याहि प्रकारचा अल्कहल बनण्यास जागा नाहीं; परंतु तिसऱ्या उत्कर्षांतील टोंकाच्या मध्यगत कर्बपरमाणूस चिकटलेल्या उज्ज परमाणूच्या जागीं प्रउ मूलक घालू अनुक्रमें कउ$_{३}$ कउ$_{२}$ कउ$_{२}$ प्रउ हा प्राथमिक प्रोपिलअल्कहल व कउ$_{३}$ कउ ( प्रउ ) कउ$_{३}$ हा द्वितीयक प्रोपिल अल्कहल बनतो. चवथ्या उत्कर्षापासूनहि तिसऱ्याप्रमाणेंच प्राथमिक व द्वितीयक असे दोन अल्कहल बनतात. पण त्याचें कउ$_{३}$(कउ$_{३}$)



ही घटनादर्शक सारणी असलेलें आणखी एक समावयविक रूप आहे. या पदार्थापासून, कउ$_{3}$ संघातील उज्ज परमाणूच्या जागीं प्रउ मूलक घालून प्राथमिक अल्कहल बनतो; पण कउ संघातील उज्जपरमाणूच्या जागीं प्रउ मूलक घातला असता तृतीयक अल्कहक प्राप्त होतो. यावरून कउ प्रउ हा द्वितीयक अल्कहालाच्या व क.प्रउ हा तृतीयक अल्कहलाच्या घटनादर्शक सारणीतील लाक्षणिक संघ आहे हें उघड होतें.

ती न प्र का र च्या अ ल्क ह ला च्या रा सा य नि क ध र्मां तील भे द —या तीन जातींच्या अल्कहलाचें प्राणवायूशीं जें भिन्न रासायनिक वर्तन घडतें त्यावरून या तिघांना परस्परापासुन तत्काळ ओळखता येतें. जर अल्कहलास हवेंत जोरानें उष्ण केलें किंवा पुष्कळ प्राणवायूच्या सान्निध्यात जाळलें तर त्यापासून कर्बाम्ल व पाणी हे पदार्थ बनतात. परंतु अल्कहलाचें प्राणिलीकरण मर्यादित केलें किंवा क्रमानें वाढवीत गेलें तर अल्कहलाच्या जातींप्रमाणें भिन्नभिन्न परिणाम घडतात. प्राथमिक अल्कहलावर प्राणिलीकरण करणाऱ्या रासायनिक पदार्थांतील प्राणवायूचें कार्य होऊन प्रथम प्रायोज्जिदें ( आल्डिहाइड्स ) आणि नंतर अम्लें किंवा कधीं कधीं ईथरचे क्षार बनतात. व त्यात कर्बाचे मूळच्या इतकेच परमाणु असतात. द्वितीयक अल्कहलाचें प्राणिलीकरण झाल्यानें प्रथम प्रायोज्जिदें न बनता कितनें बनतात आणि त्यात कर्बाचे मूळच्या इतकेच परमाणू असतात. या कितनाचें आणखी प्राणिलीकरण झालें म्हणजे एक किंवा अधिक अम्लें बनतात व त्यात कर्बाचे मूळच्याहून कमी परमाणू असतात. तृतीयक अल्कहलाचें प्राणिलीकरण झाल्यानें मूळच्या इतके कर्बाचे परमाणू असलेली प्रायोज्जिदें. कितनें किंवा अम्लें बनत नाहीत. जोरानें प्राणिलीकरण झाल्यास याचें पृथग्भवन होऊन कधीं कितनें व कधीं अम्लें बनतात. परंतु यात कर्बाचे परमाणू कमी असतात. ( प्रायोज्जिदें व कितनें पहा )

हे तीन अल्कहल परस्परापासून ओळखण्याची एक रीति म्हटली म्हणजे तृतीयक अल्कहल २१८° श. ( नपथालीनच्या उत्क्वथनांक) पर्यंत तापविला असतां त्याचें पृथक्करण होतें; ३६०° श. ( अन्थ्रासीनच्या उत्क्वथनांक ) पर्यंत उष्णमान द्वितीयक अल्कहलाचें पृथक्करण करण्यास पुरेसें होतें; पण प्राथमिक अल्कहलावर उष्णतेचा कांहींच परिणाम होत नाहीं.

अल्कहल तयार करण्याच्या साधारण री ती.— (१) क्षारगाचा ( अल्किलचा ) एक परमाणु असलेल्या उत्कर्षाच्या संयुक्त पदार्थांपासून त्यांतील क्षारगाच्या जागीं उत्प्राणिल ( उप्र ) नेऊन अल्कहल करतां येतात. क्षारज संयुक्त पदार्थांस-मुख्यत्वें अदिदांस-( आयोडाइडांस ) नुसत्या पाण्याबरोबर १००°श पर्यंत उष्ण करून किंवा त्यावर रुप्याचें आर्द्र प्राणिद याचें ( याची उत्प्राणिदाप्रमाणें क्रिया होते ) कार्य करून अगर त्यास शिशाचें प्राणिद व पाणी याबरोबर कढवून ही अदलाबदल करता येते.

क$_{२}$उ$_{५}$द + उ$_{२}$प्र = क$_{२}$उ$_{५}$उप्र + उद

क$_{२}$उ$_{५}$द + रउप्र = क$_{२}$उ$_{५}$.उप्र + रद

क्षारज संयुक्त पदार्थांस पालाश किंवा सिंधुदार्वित (ॲसिटेट) बरोबर उष्ण करून त्याचें रूपांतर दार्वम्ल ईस्टर ( सेंद्रिय अम्ल व अल्कहल याचा संयुक्त पदार्थ ) मध्यें करावें आणि नंतर त्यास पालाश उत्प्राणिदाबरोबर कढवून अल्कहल करणें सोयीचें असतें.

इथिलस्तंभिद पालाशदार्वित इथिलदार्विक ईस्टरपालास्तं.

क$_{२}$उ$_{५}$स्त + क$_{२}$उ$_{३}$प्र पाप्र = क$_{२}$उ$_{५}$.प्र.क$_{२}$उ$_{३}$प्र + पास्त

क$_{२}$उ$_{५}$.प्र.क$_{२}$उ$_{३}$प्र + पाउप्र = क$_{२}$उ$_{५}$.उप्र + क$_{२}$उ$_{३}$प्र.पाप्र

( २ ) गंधकाम्लाच्या अम्ल ईस्टरांस पाण्याबरोबर कढवून त्याचें पृथक्करण केलें म्हणजे अल्कहल व गंधकाम्ल बनतात.

क$_{२}$उ$_{५}$.उगप्र$_{४}$ + उ$_{२}$प्र = क$_{२}$उ$_{५}$.उप्र+उ$_{२}$गप्र$_{४}$

( ३ ) प्रायोजिदें व कितनें यावर उपजत उज्जाचें कार्य केल्यानें पहिल्यापासून प्राथमिक अल्कहल व दुसऱ्यापासून द्वितीयक अल्कहल बनतात. सिंधुपारद मिश्रण व जलमिश्रित गंधकाम्ल किंवा दार्वम्ल यापासून उज्ज उत्पन्न करावा. परंतु लोहाचा बारीक चुरा व दार्वम्ल किंवा जस्ताचा चुरा व ग्लेशियल दार्वम्ल घेणें फार चांगलें. यांत प्रथम दार्विक ईस्टरें बनतात.

प्रोपिल प्रायोजिद उज्ज प्राथमिक प्रोपिल अल्कहल

कउ$_{३}$ कउ$_{२}$.कउप्र + उ$_{२}$ = कउ$_{३}$ कउ$_{२}$.कउ$_{२}$.उप्र

कितन द्वि. प्रो. अल्कहल

कउ$_{३}$, कउ$_{३}$ > कप्र + उ$_{२}$ = कउ$_{३}$, कउ$_{३}$ > कउ. उप्र

( ४ ) जस्ताचा मिथिद ( मिथाइड ) किंवा इथिद (इथाइड ) ( २ अणू ) यास बर्फानें शीत करून त्यांत अम्ल हरिद ( १ अणु ) थेंब थेंब मिळवून तें मिश्रण तसेंच शीत अवस्थेंत त्यास स्फटिकरूप येईपर्यंत कांहीं तास ठेविलें आणि नंतर त्यास साधारण उष्णमानावर दोन तीन दिवस ठेवून त्याचें बर्फासारख्या थंडपाण्यानें पृथग्भवन केलें म्हणजे तृतीयक अल्कहल बनतो. पाणी याहून लवकर मिळविल्यास कितन बनतें. एकंदर रसायनकार्य तीन पायऱ्यांनीं घडतें. प्रथम जस्ताच्या संयुक्त पदार्थांच्या एक अणूचें कार्य घडतें.

[१] कउ$_{३}$क < (प्र, ह) + ज(कउ$_{३}$)$_{२}$ = कउ$_{३}$.क. { कउ$_{३}$, प्र.ज.कउ$_{३}$, ह. }

वरील क्रियेनें जो संयुक्त पदार्थ बनतो त्यावर जस्ताच्या संयुक्त पदार्थाच्या दुसऱ्या अणूचें कार्य घडून एक स्फटिकरूप पदार्थ बनतो. परंतु याचें लागलेंच पाण्यानें पृथग्भवन होऊन असिटोन उत्पन्न होतो. तथापि बराच वेळ तसेंच राहिल्यास पुढील रासायनि क्रिया घडतेः—

[२] कउ$_{३}$. क { कउ$_{३}$, प्र.ज.कउ$_{३}$, ह. } + ज ( कउ$_{३}$ )$_{२}$

कउ$_{३}$क { कउ$_{३}$, प्र. ज.कउ$_{३}$, कउ$_{३}$ } + ज. { ह, कउ$_{३}$ }

आता पाण्याचें कार्य होऊं दिल्यास पहिल्या पदार्थापासुन तृतीयक अल्कहल बनतोः—

कउ$_{३}$.क { कउ$_{३}$, प्र. ज. कउ$_{३}$, कउ$_{३}$ } + उ$_{२}$प्र = कउ$_{३}$.क { कउ$_{३}$, उप्र+जप्र+कउ$_{४}$, कउ$_{३}$ }

सा मा न्य ध र्म.—अल्कहल वर्गाचा सर्वसाधारण धर्म म्हटला म्हणजे ते उदासीन संयुक्त पदार्थ आहेत. तथापि त्यात थोडासा अनाम्ल ( बेसिक ) धर्म असतो. त्याचें अनाम्लाशीं साम्य आहे ते हें कीं त्याचें अनाम्लाप्रमाणेंच अम्लाशीं संयोग पावून क्षारात रूपांतर होतें व पाणी बनतें. पण उदासीनत्वाच्या बाबतींत त्याचें पाण्याशींहि साम्य आहे. पाण्याप्रमाणेंच त्यांच्यावरहि सिंधु व पालाश या धातूंची क्रिया होतें व उत्प्राणिल संघातील उज्जाच्या जागीं धातूचा परमाणु येऊन अल्कहलितें (अल्कोहॉलेटस) म्हणून क्षार बनतात इतकेंच नव्हे तर पाण्याप्रमाणेंच हेहि कांहीं क्षारांचे घटकद्रव्य म्हणून असतात. त्याचें प्राणिलीकरण ( ऑक्सिडेशन ) सहज होऊन त्यातील उज्ज असंयुक्त होतो व या असंयुक्त झालेल्या उज्जाच्या जागीं प्राणाचा सममूल्य संख्या कधीं कधीं निविष्ट होते किंवा कधीं कधीं होत नाहीं. अशा प्राणिलीकरणापासून जे पदार्थ तयार होतात ते प्रायोजिदें (ऑल्डिहाइड) किंवा कितनें किंवा अम्लें इत्यादि प्राणिलीकरण्याच्या स्वरूपाप्रमाणें असतात.

अल्कहलाच्या भौतिक धर्मांत अणुगुरुत्वाप्रमाणें चढता क्रम असतो. यांचे कढण्याचे बिंदू (उत्क्वथनांक) अणुगुरुत्वाप्रमाणें वाढतात. प्रत्येक कउ$_{२}$ वाढीला हा बिंदु सुमारें १० शनीं नियमानें वाढतो. तीच सरल सारणी ( इंपिरिकल फॉर्म्युला) म्ह० तितकेंच कर्बादि परमाणू असलेल्या प्राथमिक, द्वितीयक व तृतीयक अल्कहलांपैकीं प्राथमिकाचा सर्वांत जास्त व तृतीयकांचा सर्वांत कमी ( उत्क्वथनांक ) असतो, व ही गोष्ट जितकी समप्रमाणता जास्त वाढते तितका हा अंक कमी होतो. या नियमास धरूनच आहे.

**अल्कानेट**—अल्कानेट या नावाची वनस्पति आहे. ही दक्षिण फ्रान्समध्यें व लिव्हांटच्या किनाऱ्यावर होते. ही वनस्पति बोरॅजिनासि वर्गांतली असून तिची बरीच नावें आहेत तीं येणें प्रमाणें:—अल्काना किंवा अंचुसा टिंक्टोरिया, हीं वनस्पतिशास्त्रांतील नावें आहेत; लौकिक नावें ऑरचानेट, डायर्स बुग्लास, स्पॅनिश बुग्लास, किंवा लँग्वेडॉकचा बुग्लास अशीं पाश्चात्य नावें आहेत. या वनस्पतीच्या मुळांत एक उत्तम लाल रंग असतो. या रंगाचा उपयोग निरनिराळे द्रव ( अर्क ), तेलें, मद्यें, कुंकुमें ( रोगणें ) यांत करितात; मेण, पोमेटम, सुगंधीद्रव्यें व महोगनीसारख्या लाकडी सामानाला लावण्याचीं तेलें यांत विशेषतः अल्कानेट रंगासाठीं वापरतात. अल्कानेट हा शब्द स्पॅनिश अल्काना या शब्दाचें लघ्वार्थ वाचक रूप आहे. आबी अल–हेन्ना, = हेना. असा व्युत्पत्तिदर्शक शब्द असून इजिप्शियन प्रिव्हेट किंवा लॉसोनिया इटर्रामिस असें याम्हणतात. कॉन्स्टँटिनोपल येथील अल्कानेटचा रंग टिकाऊ नसला तरी जास्त खुलून दिसतो [ ए ब्रि. लुई–मटेरिआ मेडिका मॅक्कुलॉक्–डिक्शनरी ऑफ कामर्स ]

**अल्कांतारा**—हें ब्राझिलचें लहानसें बंदर मॅरानहाव संस्थानांत, साव मारकॉसच्या उपसागराच्या पश्चिम तीरावर मॅरानहाव शहरापासून जलमार्गानें सोळा मैल आहे. येथें चांगलें बंदर आहे, येथें उत्तम कापूस व तांदूळ पिकतात व बंदरांतून बाहेर रवाना होतात.

**अल्कोदें**—रसायन शास्त्रांत अल्कोद ( अल्कलॉइड ) ही संज्ञा प्रथम कोणत्याहि सेन्द्रिय अनाम्लाला लावण्यांत येत असे. हीं सेंद्रिय अनाम्लें ( बेसेस ) नत्रजन्य ( नायट्रोजिनस ) असून अम्लांशीं संयुक्त होऊन क्षाररूप होतात. परंतु सांप्रत अल्कोद या शब्दाचा अर्थ यापेक्षां मर्यादित करण्यांत आला आहे. हल्लीं अल्कोद शब्दानें वनस्पतिजन्य अनाम्लाचा बोध होऊन त्यांच्या अंगीं कांहीं तरी अद्भुत विषारी धर्म असल्याचा बोध होतो. हीं अनाम्लें बहुतकरून व मुख्यत्वेंकरून द्विदल वनस्पती( डायकॉटि लेडनूस) मध्येंच आढळतात. हीं अनाम्लें या वनस्पतींत प्रायः रेवसाम्ल ( मॅलिक ॲसिड ), जंबीराम्ल ( सायट्रिक–ॲसिड ) द्राक्षाम्ल ( टार्टरिक ॲसिड ) अथवा अशाच प्रकारच्या वानस्पत्य अम्लांशीं संयुक्त झालेलीं असतात यांचें निष्कासन ( एक्स्ट्रॅक्शन ) करण्याकरितां इष्ट वनस्पतीचा भाग पातळ अम्लानें शोषण करून जें गळण येतें त्या गळणांतून ( फिल्ट्रेट ) अनाम्लांचा निपात, पालाश, सिधु, सोडा किंवा ब्रह्म यांच्या प्रांगिदानें करतात. या रीतीनें अनाम्ल–अल्कोदांचें मिश्रण तयार होतें. या मिश्रणांतून अल्कोदें पृथक् करण्याकरितां वारंवार आंशिक ( फ्रॅक्शनल ) स्फटिकीकरण करावें लागतें किंवा त्यांतील दुसऱ्या कांहीं धर्मांचा फायदा घेऊन तीं पृथक् करावीं लागतात.

अल्कोदाची घटना फार बिकट असल्यानें त्याचें रासायनिक वर्गीकरण करणें अवघड आहे. त्यातून पुष्कळ अल्कोदांची घटना अद्याप अज्ञात आहे.

प्रत्येक अल्कोदाचे जरी निरनिराळे धर्म आहेत तरी त्यांत सर्वसाधारण असे कांहीं धर्म आढळून येतात; दृग्शास्त्रदृष्ट्या ( ऑप्टिकली ) अल्कोदें हीं कार्यकारक ( ॲक्टिव्ह ) असतात व बहुतकरून तीं द्रवस्थितींत ( सोल्युशन ) वामावर्ती ( लेव्होरोटेटरी ) असतात. बलकिद किंवा बलकिन ( प्रोटीड्स व प्रोटीन्स ) पदार्थांशीं संयुक्त होऊन ज्या क्रियाकारकांच ( रीएजंटस् ) अविद्राव्य निपात होतात त्या बहुतेक क्रियाकारकांशीं हीं अल्कोदें संयुक्त होऊन अविद्राव्य निपातरूप पावतात. जसें:—तनाम्ल ( टॅनिक ॲसिड ), स्फुर मोलदाम्ल ( भुजगमाम्ल ) आणि पालाश सूत ( पारद ) अदिद इ. अल्कोदाचा अदद्रवानें सुद्धां अस्फटिक ( अमॉर्फस ) रूप पिंगट निपात होतो. सर्व अल्कोदांस अल्कधर्म असतो व बहुतेक सर्वांची रुचि कडू ( बिटर ) असते. तसेंच सर्व अल्कोदें विषारी धर्माचीं असतात. एक दोन अल्कोदें ( तमाखिन = निकोटिन व कोनाइन ) रसरूप ( लिक्विडस ) आहेत परंतु बाकी बहुतेक स्फटिकरूप व घनरूप असतात. हीं पाण्यांत अविद्राव्य असतात परंतु बहुतेक सेंद्रिय द्रावकांत विद्रुत होतात जसें:– इथिल अल्कहल ( एथिल आल्कोहल ), अमिल अल्कहल, इथ्र ( ईथर ), हरपुत्तिक ( क्लोरोफॉर्म ) इत्यादि. अल्कोदांचे मुख्यत्वें हरिद आणि नत्रित हे क्षार पाण्यांत अतिविद्राव्य असतात. या द्रवांतील अल्कोदाचा निपात अल्कच्या योगानें होतो. अल्कोदांचे शातिन हरिद ( शातिनम क्लोराइड ) हे क्षार पीतवर्णी स्फटिकरूप आणि अविद्राव्य पदार्थ असतात. बहुतेक अल्कोदें त्रिअनाम्लक (टरशीअरी बेसेस) असून ती उत्कर्विल अदिदांशीं ( आल्किल आयोडाइड्स ) संयुक्त होऊन जोड संयुक्त पदार्थ (ॲडिटिव्ह कॉंपाउन्डस) होतात. साधारणतः अल्कोदें वनस्पतींमध्यें वर सांगितलेल्या अम्लांशिवाय प्रत्येक अल्कोद हें एका विशिष्ट अम्लाशीं संयुक्त असतें जसें:—सिंकोनाच्या सालींतील अल्कोदें ही कुनीनाम्लाशीं ( क्विनिक ॲसिड ) संयुक्त असतात, वत्सनाभांत ( अकोनाइट ) अल्कोदें वत्सनाभाम्ला ( ॲकॉनिटिक ॲसिड )शीं संयुक्त असतात. वनस्पतींत अल्कोदांचे क्षार हे नेहमीं बलकिदें ( प्रोटीड्स ), तनाम्ल ( टॅनिक ॲसिड ) राळ ( रेसिन्स ) सुगंधी तेलें आणि दुसरे वनस्पतिजन्य पदार्थ यांच्या साहचर्यांत असतात. यामुळें अल्कोदांचे निष्कासन करतेवेळीं याचा विचार करावा लागतो.

प्रत्येक अल्कोदाचें निष्कासन करण्याची एक विशिष्ट रीत असते. औषधीकामांत लागणाऱ्या अल्कोदाचें प्रमाण मूळ द्रव्यांत किती आहे, तें फार काळजीपूर्वक व मान्य अशा रीतीनें ठरविलें असतें. तरी अल्कोदें ५,८१५,९२, इ.चे

सामान्य स्वरूप खालीं दिलेल्या संक्षिप्त वर्णनावरून ध्यानीं येईल

अल्कोदांचें निष्कासन करण्याची सर्वसाधारण रीत — अल्कोदयुक्त द्रव्य चांगलें बारीक वाटून तें पाण्यांत भिजत ठेवावें यामुळें अल्कोदाचे क्षार पाण्यात विद्रुत होतात. या जलद्रवात अल्क किंवा विरवलेला चुना घालून अल्कोदाचा निपात करावा अल्कोद जर कोनाइन अल्कोदाप्रमाणें बाष्पभावा ( व्हालटाईल ) असेल तर तें बाष्पोद्रेक पद्धतीनें ( स्टीमडिस्टिलेशन ) पातन करून निराळें करावें अल्कोद बाष्पभावी नसल्यास त्याचें निष्कासन इथ्र ( ईथर ) हरपुतिक, अमिल, अल्कहल इत्यादि सारख्या बाष्पभावी ( व्हालटाइल ) द्रावकानें करावें किंवा आलेला अल्कोद निपात गाळून घ्यावा बाष्पभावी द्रावकाचा उपयोग केला असल्यास त्याचें पातन करून तो निराळा करावा किंवा त्यात सौम्य अम्ल घालून हलवावें म्हणजे क्षार रूपानें अल्कोद त्यांत विद्रुत होतें अल्कोदाच्या निपातावरहि याप्रमाणें अम्लाची क्रिया करावी नंतर या अल्कोदक्षाराचें स्फटिकीकरण करावें वनस्पतींमध्ये एकच अल्कोद फार क्वचित् असतें, बहुतकरून अनेक अल्कोदें एकाच वनस्पतींत असतात आणि रासायनिक धर्मांत त्यांचें साम्य असल्यानें हीं निरनिराळीं करणें फार कठिण असतें तरी प्रत्येक अल्कोद पृथक् व शुद्ध स्थितींत काढण्याची अत्युपयोगी रीत दिली आहे यायोगें प्रयोग करणाराची बरीच अडचण दूर होईल

( १ ) बाष्पभावी ( व्हालटाईल ) अल्कोदाचें बाष्पोद्रेकानें पातन केलें म्हणजे तीं पातांत ( डिस्टिलेटमध्यें ) येतात हें बाष्पोद्रेकपातन उज्ज ( हायड्रोजन ) वातावरणात करावें आलेल्या पाताचें निर्गुणीकरण ( न्यूट्रलायझेशन ) काष्टाम्लानें ( ऑक्सालिक ॲसिड ) करावें व त्यास सावकाश जलतापावर बाष्पभावना ( इव्हॅपोरेट ) द्यावा. नंतर हें काष्टित, अल्कहलात विद्रुत करून गाळून घ्यावें व गळणास ( फिल्ट्रेट ) पुन बाष्पभावना द्यावी शेष पाण्यात विद्रुत करून त्यात सिंधु उज्झिताचा द्रव घालून हलवून त्याचें इथ्रानें (ईथर) निष्कासन करावें व इथ्राय द्रवास बाष्पभावना देऊन तो उडवून टाकावा म्हणजे शुद्ध अल्कोद येतें

( २ ) जीं अल्कोदें बाष्पभावी नाहींत म्हणजे बाष्पोद्रेकानें ( स्टीम डिस्टिलेशन ) ज्याचें पातन होत नाहीं, तीं शुद्ध स्थितींत पृथक् करण्याची रीत — या अल्कोदाचे तीन वर्ग आहेत, ते ( अ ) या अबाष्पभावी अल्कोदाच्या क्षारद्रवात सिंधु उज्झितानें निपात ( प्रेसिपिटेट ) येतो, परंतु तो निपात सिंधुउज्झिताच्या अतिरेकां( एक्सेस )त विद्रुत होतो—या वर्गांतील अफिनिन (मॉरफाइन ) आणि कोकिन ( कोकाइन ) हीं अल्कोदें आहेत ( आ ) अबाष्पभावी अल्कोदाच्या द्रवात सिंधु उज्झितानें निपात येतो, परंतु तो क्रियाकारका (रीएजंट)च्या अतिरेकात विद्रुत होत नाहीं. सिंधुउज्झिताशिवाय सिंधु द्विकर्बितान अम्ल द्रवात सुद्धां सांका येतो या वर्गांतील ( १ ) कुनिन ( क्विनाइन ) सिंकुनिन ( सिंकोनाइन ) आणि नरकुतिन ( नारकोटाईन )हीं अल्कोदें आहेत ( इ ) अबाष्पभावी अल्कोदांच्या द्रवात सिंधुउज्झितानें निपात येतो, तो त्याच्या अतिरेकात विद्रुत होत नाहीं, परंतु अम्ल द्रवात सिंधु द्विकर्बितानें निपात येत नाहीं या वर्गांतील ( १ ) कुचलिन ( स्ट्रिक्नाइन ), (२)उपकुचलिन ( ब्रुसाइन ) आणि ( ३ ) धत्तुरिन ( ॲट्रोपाईन ) हीं अल्कोदें आहेत

( ३ ) अफेनिन व कोकिन हीं पृथक् करण्याकरितां त्याच्या क्षाराचा अम्लद्रव अम्र( अमोनिया )च्या योगानें किंचित अल्क करावा त्यास पाषाण इथ्रास (पेट्रोलियम ईथर) घालून हलवावें म्हणजे त्यात कोकिन विद्रुत होतें, परंतु अफेनिन विद्रुत होत नाहीं पाषाण इथ्रास बाष्पभावना ( जलतापावर ) दिली म्हणजे कोकिन शुद्ध स्थितींत निघतें

( ४ ) कुनिन सिंकुनिन व नरकुतिन याच्या मिश्रणातून तीं निराळीं करण्याकरिता त्यांच्या अम्लद्रवात हरपुतिक ( क्लोरोफॉर्म ) घालावा म्हणजे त्यांत नरकुतिन विद्रुत होऊन हरपुतिकाचा निराळा थर वर येईल व कुनिन व सिंकुनिन अम्लद्रवात विद्रुत राहतील. हरपुतिकाचा थर काढून तो जलतापावर बाष्पभावना देऊन उडवावा म्हणजे नरकुतिनची शुभ्र पांढरी भुकटी निघते

हरपुतिकाच्या खालील अम्लद्रवात अम्रद्रव घालून अल्क करावा व त्यात शेंकडा १–२ प्रमाणात अल्कहल मिश्र केलेला इथ्र घालून हलवावा या इथ्रात कुनिन विद्रुत होईल, तो बाष्पभावनेनें उडविला म्हणजे कुनिन निघून येईल द्रवात निपात झालेलें सिंकुनिन गाळून धुवून निराळें करावें

( ५ ) कुचलिन, उपकुचलिन आणि धत्तुरिन पृथक करण्याकरिता या अल्कोदाचा निपात निर्जल अल्कहलानें निष्कासित करावा म्हणजे त्यात उपकुचलिन आणि धत्तुरिन विद्रुत होतील या कामीं अल्कहल निर्मल असून थंड असावा. यात कुचलिन अविद्राव्य असल्यानें तें गाळून निराळें करावें उपकुचलिन आणि धत्तुरिन निराळें करण्याकरिता त्याच्या अल्कद्रवाचें निष्कासन पाषाणइथ्रानें करावें म्हणजे त्यांत उपकुचलिन विद्रुत होतें, पण धत्तुरिन विद्रुत होत नाहीं पाषाणइथ्राचा थर निराळा करून तो बाष्पभावनेनें उडविला म्हणजे उपकुचलिन निघून येईल या पाषाण इथ्राच्या थराखालील द्रवात धत्तुरिन असल्यास त्यात इथ्र ( ईथर ) घालून मिश्रण हलवावें म्हणजे धत्तुरिन इथ्रात विद्रुत होईल हा इथ्रद्रव बाष्पभावनेनें जलतापावर उडविला म्हणजे धत्तुरिन निघून येतें

कुचलिन, उपकुचलिन हीं दोन नेहमीं एकत्र असतात या दोनच अल्कोदाचें मिश्रण असल्यास त्याचें पूर्ण शुष्क व निर्जल मिश्रण चिनीमातीच्या बशींत घेऊन ( पोर्सेलेनडिश ) त्यावर हरचा ( क्लोरिन ) संयुक्त जलद्रव घालावा म्हणजे

त्यात उपकुचलिन विद्रुत होऊन द्रव्य रक्तवर्ण होईल आणि कुचलिन अविकृत स्थितींत राहील.

अल्कोदाचा उपयोग अनेक तऱ्हेच्या औषधांत होतो. हा औषधीशास्त्राचा भाग असल्यानें व प्रत्येक अल्कोदाचे औषधीय गुणधर्म भिन्न असल्यामुळें त्यांचें विवेचन येथें केलें नाहीं.

[पिक्टल-दि व्हिजिटेबल अल्कलॉइड्स (न्यूयॉर्क १९०४). ॲलॅन-कमर्शियल ॲनॅलिसिस. ए. नि मॅक्कुलॉक—डिक्शनरी ऑफ कॉमर्स, थोर्प-हिस्टरी ऑफ केमिस्ट्री, मिलर-केमिस्ट्री पु. १-२, मोडक-रसायनशास्त्र ].

**अल्जीरिया**—(आफ्रिका)आफ्रिकेच्या उत्तरेस असलेली एक फ्रेंच वसाहत.

सी मा.—उत्तरेस भूमध्यसमुद्र; पश्चिमेस मोरोक्को; दक्षिणेस साहारा; व पूर्वेस टयुनिसिया. पूर्वपश्चिम लांबी ६५० मैल व उत्तरद. रुंदी३२०-३८०मैल क्षेत्रफळ१८४४७४मैल. याचे राजकीयदृष्टया तीन विभाग केलेले आहेत. (१) पश्चिमेस, ओरान (२) पूर्वेस, कान्स्टन्टाईन व (३) मध्यें अल्जीरिया.

भू पृ ष्ठ व र्ण न, किनारा.—अल्जीरियाचा किनारा रुक्ष व रांगट आहे. पश्चिमेच्या अर्ध्याभागीं किनाऱ्यावर टेंकड्यांचा एक तटच बनलेला आहे. व जेथें जेथें अंतःप्रवाहांनीं यात खिंडारें पाडलीं आहेत, तेथें तेथें सपाट वाळवंट असतें. डेलेस व फिलिपव्हिल या दोन गावामधल्य किनाऱ्यावर जणूं काय समुद्रांतूनच पर्वत निघाले आहेत, असें वाटतें. फिलिपव्हिलच्या पूर्वेस हे पर्वत किनाऱ्यावर नसून अंतःप्रदेशात हटलेले दिसतात. फक्त बोना व ऱ्हार्कोले या दोन बंदरामध्यें समुद्रकांठचा भाग सरल व वालुकामय आहे. बाकीच्या ठिकाणीं तटासारखे डोंगर आहेत. या किनाऱ्यावर अल्जीरिया नावाचा उपसागर असून बरींच आखातें आहेत. त्यापैकीं मुख्य पश्चिमेकडून पूर्वेकडे (१) ओरान, (२) आरझू, (३) बोजी, (४) स्टोरा, (५) बोना हीं होत. किनारा इतका जरी मोठा व लांबीचा आहे तरी म्हणण्यासारखीं चांगलीं बंदरें फार थोडीं आहेत. फार प्राचीन काळापासून येथें चांचे लोक रहात असत. उन्हाळ्यात पूर्वेकडच्या वाऱ्याबरोबर दाट धुकें येऊन तें किनाऱ्यावर पसरलेलें असतें व हिवाळ्यात उत्तरेकडचे वारे या किनाऱ्यावर जोरानें आदळतात.

किनाऱ्याच्या दक्षिणेकडच्या प्रदेशाचे स्वाभाविकदृष्ट्या तीन विभाग होतात. किनाऱ्यालगतचा व त्याच्याशी समांतर असलेला डोंगराळ प्रदेश. यात प्रवाहांनीं फार खोल खोदिलेले भाग दिसतात व कित्येक ठिकाणीं सुपीक सरल भागहि आहेत. या डोंगराळ प्रदेशास अरबी भाषेत 'टेल' असें नांव आहे. याच्या पलीकडे साधारण ३००० फूट उंचीचें पठार आहे. हें सपाट आहे व कित्येक ठिकाणीं त्यात खाऱ्या पाण्याचीं सरोवरें आहेत. यापलीकडे व याच्या दक्षिणेस मोठा अटलस नावाचा पर्वत व या पर्वताच्या पलीकडे साहाराच्यें वाळवंटाचा प्रदेश आहे.

व र्ण न.—अल्जीरियाचें थोडक्यांत वर्णन करावयाचें म्हणजे किनाऱ्यापलीकडे त्याच्याशीं समांतर असलेला डोंगराळ प्रदेश; यात छोट्या अटलस पर्वताच्या रांगा आहेत. या रांगांच्या पलीकडे एक उंच पठार; व त्याच्या दक्षिणेस महान ॲटलस हा पर्वत म्हणजे साहाराची उत्तरेची अर्थात अल्जीरियाच्या बाजूची सीमा होय

प र्व त.—या देशांत अटलस पर्वताच्या रांगा पसरल्या आहेत, असें वर सांगितलेंच आहे. या रांगांचे दोन विभाग केलेले आहेत. मोठा ॲटलस हा साहाराच्या उत्तर सीमेवर आहे; यांचें शेलिया हें सर्वांत उंच शिखर ७६११ फूट उंच आहे छोट्या ॲटलसच्या रांगा पूर्व-पश्चिम दिशेनें किनाऱ्याशीं समांतर पसरल्या आहेत या रांगांची उंची ३७०० ते ५५०० फूट आहे.

न द्या —अल्जीरियाच्या प्रदेशात पुष्कळ नद्या आहेत पण त्यांच्या प्रवाहाची लांबी फार थोडी आहे. त्यांचा उगम किनाऱ्यालगतच्या पर्वतांत होऊन त्यांचा प्रवाह खडकांतून गेला आहे पावसाळ्यात या नद्यामुळें दळणवळणास बराच अडथळा होतो. शेलीफ ही मुख्य नदी आहे, तिचा उगम मोठ्या ॲटलसमध्यें होऊन ती लहान अटलसच्या रांगेतून वहात जाऊन भूमध्यसमुद्रास मिळते.

स रो व रें.—अल्जीरियांत खाऱ्या पाण्याचीं सरोवरें व दलदलीच्या जागा फार आहेत. उत्तरेस किनाऱ्यालगत असलेलीं—फेझरा बान जवळ, सेवखा व एलमेल्हा-आरनच्या दक्षिणेस पठारात—पश्चिमेस पश्चिम शार, दक्षिणेस, शाट-एल जेरिड; व शाट मेलरिर. ऊन पाण्याचे झरेहि येथें पुष्कळ आहेत. त्यात औषधी चुन्याचा क्षार असतो गुयेलमाजवळ सर्वांत आश्चर्यकारक असा झरा आहे. यास दोन बाजूंनीं पाणी येतें व ज्या ठिकाणीं ह्या प्रवाहांचा संगम होतो, तेथें राक्षसी शंकू, पाण्यातील चुना साचून तयार झालेले आहेत. या सरोवरातील पाणी नेहमीं उकळत असतें. या शंकूविषयीं फार मनोरंजक दंतकथा प्रसिद्ध आहे. एका अरबानें आपली बहीण फार सुंदर होती म्हणून तिच्याशींच त्यानें लग्न लाविलें. लग्न चालले असतां, ईश्वरी कोपामुळें जमिनींतून आधणाचें पाणी येऊन याच्या अंगावर पडलें व तो अरब व त्याची बहीण यांचें दगडांत रूपांतर झालें.

ह वा मा न.—एकंदरींत येथील हवा उष्ण आहे. निरनिराळ्या भागीं उष्णतामान, देशमानाप्रमाणें बदलत जातें. किनाऱ्यावरच्या भागाची हवा सौम्य असते. जानेवारी महिन्यांत थंडी फार असते. पठारांत व उंच डोंगराळ मुलुखांत हिवाळा फार कडक असतो. डिसेंबरपासून मार्चपर्यंत फार पाऊस पडतो. जुलै, ऑगस्ट व सप्टेंबर महिन्यांत उन्हाळा फार असतो. मे ते सप्टेंबरपर्यंत मधून

मधून सिरोक्को नावाचे उष्ण वारे वाहतात इर्वेत जिकडे तिकडे वाळू पसरलेली असते दलदलीचा भाग सोडून एकंदरीत येथला हवा निरोगी आहे, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं दलदलीचा भाग बुजवून पाणी काढण्याचें काम सुरू आहे

प्रा णी —या प्रदेशामध्यें असलेले प्राणी (१) हिंस्र-तरस, रानडुक्कर, कोल्हे (सिंह पूर्वी होते पण आता आढळत नाहींत), (२) पाळीव—मेंढ्या, उंट, घोडे, खेचरें, (३) इतर—माकडें व तांबूस हरिणें, (४) पक्षी—गिधाड, क्रोंच गरुड, शहामृग, घुबड, इ पक्षी आहेत, साप, विंचु कासव हेंहि बरेच आढळतात, टोळाचा उपद्रवहि आहे

व न स्प ती —दक्षिण यूरोपातील बहुतेक झाडें येथ आहेत, उदा० ओक, पाईन फर, एल्म, कॅश, अ लिव्ह व बुचाचीं झाडें फळफळावळ—अंजीर, द्राक्षें, नारळ इ

लो क —१९११ च्या खानेसुमारीवरून पाहाता एकंदर लोकसंख्या ५४९२५६९ असून त्यापैकीं ५६८५७२ फ्रेंच १३४४७५ स्पॅनियर्ड व ३६६६१ इटालियन होते ही संख्या पौरस्त्य, पाश्चिमात्य व आफ्रिकन लोक मिळून झालेली आहे पाश्चिमात्य लोकात फ्रेंच, स्पॅनिश, इटालियन ज्यू व थोड बहुत इंग्रज व जर्मन, याचा समावेश होतो. उल्लेख्या सदराखालीं (१) वर्बर, (२) मूर—हे दुसऱ्या जातींच्या मिश्रणानें झाले आहेत, (३) अरब. (४) गुलाम म्हणून आणिलेले निग्रो, (५) माझेबाईट—ही एक बर्बर लोकांचीच पोटजात आहे व (६) तावरग—ही देखाल बर्बर लोकांची पोटजात आहे, हे येतात पूर्वी तुर्क लोक पुष्कळ होते, पण त्यांना फ्रेंच सरकारनें परत स्वदेशीं पाठविलें

ल ग्न री त—या प्रांतातील लोकात एखाद्या मनुष्याचा लग्न करण्याचा विचार झाला म्हणजे तो आपली आवडती कुमारिका रहात असेल तेथें आपलीं गुरें हाकीत नेतो तीं मुलीच्या आईबापानीं पाहिलीं म्हणजे ते व ती कुमारिका त्या पुरुषास लग्न करण्याबद्दल आपली खुषी दर्शवितात. नंतर जातींतील सर्व स्त्रियास जवणावळ देण्यात येते भोजनोत्तर वधू वराच्या घोड्यावर बसून त्याच्या घरीं जाते. घराच्या दरवाज्यापाशीं ती उतरतांच तिला एक काठी देतात, ती ती जमिनींत रोंविते व एक गाणें म्हणते त्यांतील आशय असा कीं, ज्याप्रमाणें ही काठी जमिनीत पक्की बसली आहे, त्याप्रमाणें मी माझ्या नवऱ्याला पक्की बांधली गेलें आहे बळाचा उपयोग केल्यावाचून ही जशी भुईंतून बाहेर निघणार नाहीं, तशीच मीहि मरण आल्या-शिवाय नवऱ्याच्या ताब्यातून सुटणार नाहीं, अथवा त्याच्या माझ्या प्रीतींत अंतर पडणार नाहीं नंतर नवऱ्यानें सांगितलेली कोणतीहि गोष्ट करण्यास मी तयार आहे, असें दाखविण्याकरिताच कीं काय ती वधू नवऱ्याचीं गुरें पाण्यावर घेऊन जाते, व त्यास पाणी पाजून आणिल्यावर घरात प्रवेश करिते मग उभयता खाण्यापिण्यात व आनंदांत कालक्रमणा करितात सदरहू लोकात लग्नाचा ठराव मित्रांच्या मध्यस्तीनें होतो लग्न ठरलें म्हणजे वराकडून वधूकडे नजराणे पाठविण्यात येतात, व तिच्या नातलगाना मेजवान्या दिल्या जातात वर सांगितल्याप्रमाणें लग्नकृत्य आटो-पल्यावर त्या सर्वांस वरपक्षाकडून आणखी एक जेवणावळ देण्याची चाल आहे ती जेवणावळ झाली, म्हणजे समारंभ संपला (अलोनी—"लग्नविधि व सोहाळे")

मु ख्य श ह रें व बं द र —राजधानी व मुख्य बंदर अल्जीरिया हेंच होय. याशिवाय ओरान व कॉन्स्टंटाईन हीं त्या त्या राजकीय विभागाचीं मुख्य शहरें आहेत याशिवाय मुख्य बंदर—बोना, मॉस्टागॅनम, फिलिपव्हिल, शेरशेल वगैरे.

मोरोक्कोच्या सीमेजवळ नेमुर्स बंदर आहे याच्या पूर्वीच्या नांवाचा, जामा—एल-गाझौर गावाच्या लोकाचें वसतिस्थान असा अर्थ होतो. आरजूच्या पूर्वेस टेनेज नावाचें एक गाव आहे या गावीं रोमन लोकाची एक वसाहत होती त्याचप्रमाणें जिजेली येथेंहि रोमन वसाहत होती

सेटिफ ही पूर्वी एक रोमन वसाहत होती पण सध्या हें एक पेठचें ठिकाण आहे रोमन लोकाच्या वेळचे अवशेष अजून येथें सापडतात बाटना हें लष्करी ठाणें आहे

पु रा ण व स्तु सं शो ध न —अल्जीरियात प्रास्तर संस्कृतिकाळचे अवशेष फार सापडतात कोलिया, हलेमकेंच, व मशेराका हीं गावें असल्या अवशेषाकरता प्रसिद्ध आहेत कुबरूमिया, हें इजिप्तचा प्रसिद्ध राणी क्लिओपॅट्रा व ॲन्टनी याची मुलगी क्लिओपॅट्रा सेलीनी, हिचें थडगें आहे ही जागा कोलिया येथें आहे अशाच प्रकारचें थडगें कॉन्स्टंटाइन शहराजवळ आहे. असलीं थडगीं दुसऱ्या काहीं ठिकाणींहि आहेत.

शे ती —फार प्राचीन काळापासून या देशाची सुपीक जमीनीविषयीं फार प्रसिद्धि आहे दोनतृतीयांशाहून अधिक लोकाचा धंदा निव्वळ शेतीचा आहे फ्रेंच सरकारचा अमल सुरू झाल्यापासून नलिकाकूप प्रचारात आले व त्यायोगानें बरीच जमीन नवीन लागवडीस आली आहे

गहू, जव व ओट हीं मुख्य पिकें आहेत. निरनिराळ्या प्रकारची फळफळावळ व भाजीपाला येथें तयार होतो मद्याचा व्यापार चालतो, पण हा मोठ्या प्रमाणावर नाहीं कापूस व तंबाखूचें उत्पन्न वाढतें असून १९१८ मध्यें २४००० टन तंबाखू पिकली पठारी प्रदेशात अल्फाचें पीक पुष्कळ होतें. ग्रेटब्रिटनमध्यें कागद करण्यासाठीं तें पाठविलें जातें

ख नि ज प दा र्थ —अल्जीरियांत व विशेषत कान्स्टं-टाईन भागात खनिज संपत्ति विपुल आहे लोखंड, शिसें, तांबें व जस्त हे धातू सापडतात फास्फेट खाराच्या खाणी सेटीफ, गुलेमा व ऐनबेडा गावीं आहेत दगडी कोळशाच्या खाणीहि आढळल्या आहेत

व्या पा र.—सर्व व्यापार फ्रेंच गलबतांतून चालतो निर्यात—मेंढया, बैल, घोडे, लोंकर, कातडीं, फळफळावळ, गवत, तेलें, धान्यें, मद्य, लाकूड, तंबाखू वगैरे आयात—साखर, काफी, यांत्रिक सामान कापड, चिनी मातीचीं भांडीं वगैरे १९२० सालीं २५३५०००००० फ्रँक किंमतीचा आयात व १४४२०००००० फ्रँकची निर्यात झाली

आ ग गा ड्या व ता रा यं त्रें.—अल्जीरियांत सुमार सव्वादोन हजार मैल आगगाडीचा रस्ता केला आहे साहाराचा भाग सोडून जिकडे तिकडे तारायंत्र सुरू केलें आहे

रा ज्य का र भा र.–हा गव्हर्नर–जनरलच्या हातीं असून तो अल्जर्स येथें रहातो मात्र न्याय धर्मोपासना, शिक्षण, तिजिना व जकाती इतकीं खातीं शुद्ध फ्रेंच प्रधानमंडळाच्या सत्तेखालीं आहेत गव्हर्नरच्या मदतीला सरकारी कौन्सिल आहे सन १९०० पासून अल्जीरियाला बजेटच्या बाबतींत बरीच स्वायत्तता मिळाली आहे एक वसाहतवाल्यांचें, एक स्थानिक करभऱ्यांचें ( टॅक्स पेयर्स ) व तिसरें देश्य मुसुलमानांचें अशा तीन प्रतिनिधी मंडळापुढें गव्हर्नर–जनरल बजेट मांडतो व तें त्यांनीं पास केल्यावर फ्रेंच पार्लमेंटकडे पाठवितो १९२२ सालचें बजेट ५९५०००००० पौंडाचें होतें या देशाच्या उत्तर भागांत एक मुलकी व एक लष्करी अशा दोन राज्यकारभारपद्धती आहेत मुलकी पद्धतीच्या क्षेत्रांत फ्रान्समधल्या सारखी व्यवस्था आहे या क्षेत्राचे ओरान, आल्जर्स व कॉन्स्टन्टाईन असे तीन भाग आहेत त्यांत प्रीफेक्ट, जनरल कौन्सिलें, व सबप्रीफेक्ट यांच्या हातीं फ्रान्समधल्याप्रमाणेंच अधिकार आहे या प्रत्येक भागाला दोन डेप्युटी व एक सीनेटर निवडून फ्रेंच पार्लमेंटांत पाठविण्याचा अधिकार आहे

गेल्या महायुद्धांत फ्रान्सला मदत केल्यामुळें देश्य लोकांना फ्रेंच सरकारनें अधिक राजकीय हक्क दिले आहेत देश्य मुसुलमानांना कायदेमंडळांत प्रतिनिधी पाठविण्याचे हक्क फ्रेंच नागरिकांच्या बरोबरीनें १९१९ च्या कायद्यानें देण्यांत आले त्याच कायद्यानें महायुद्धांत सैन्य किंवा आरमारांत नोकरी केलेल्या व जमीनदार, शेतकरी किंवा परवानेदार व्यापारी असलेल्या व फ्रेंच भाषा लिहितां वाचतां येत असलेल्या इसमांना किंवा फ्रेंच सरकारकडून सन्मानदर्शक चिन्ह मिळालेल्या देश्य इसमांना फ्रेंच नागरिकत्वाचा हक्क अर्पण करण्यांत आला शिवाय पॅरिसमध्यें सल्लामसलत देणारी अल्जीरियन कमिटी स्थापून त्यांत देश्य लोकांना सभासद करण्याचें फ्रेंच सरकारानें ठरविलें आहे.

ल ष्क र.—लष्करी व्यवस्थेच्या क्षेत्राचे तीन भाग असून प्रत्येकावर एकेक जनरल हा अधिकारी आहे ते गव्हर्नर जनरलच्या हुकमतीखालीं असतात, या भागांतील स्थानिक कारभार, कांहीं ठिकाणीं लोकनियुक्त म्युनिसिपालिट्या, कांहीं ठिकाणीं सरकारनियुक्त म्युनिसिपालिट्या, इत्यादि दोन तीन प्रकारच्या स्थानिक संस्थामार्फत चालतो

अल्जीरियांतील देश्य लोक युद्धप्रिय व स्वसंस्कृतियुक्त असल्यामुळें तेथें वसाहती करण्याचें काम अवघड गेलें प्रथम सखल प्रांतांत व नंतर उच्च डोंगरसपाटीच्या प्रदेशांत वसाहती झाल्या इटालियन व स्पॅनियर्ड लोक वसाहत करकरण्यास बरेच आले मोफत जमिनी व इतर सवलती देण्याचें ठरविल्यामुळें दक्षिण फ्रान्समधूनहि बरेच लोक वसाहती करण्यास आले

ज मी न.—मुसुलमान लोकांत मोठमोठ्या कुटुंबाची समाईक जमीन असते कांहीं जमीन सरकारानें खालसा करून फ्रेंच लोकांस शेती करण्यास सवलतीनें विकत दिली आहे. फ्रेंच लोकांची शक्य तितकी जास्त वस्ती वाढविण्याची खटपट सुरू आहे

न्या य.—येथें दोन प्रकारच्या न्यायपद्धती अस्तित्वांत आहेत, एक स्थानिक व दुसरी फ्रेंच मुख्य वरिष्ठ कोर्ट अल्जीरियांत आहे मुसुलमान लोकांचे खटले त्यांच्या कायद्यानुसार काजी चालवितात अपीलें मात्र फ्रेंच कोर्टांकडे असतात

शि क्ष ण.—शिक्षणाच्या देखील दोन पद्धती सुरू कराव्या लागल्या, एक मुसुलमानांकरितां व दुसरी युरोपियन लोकांकरितां मुसुलमान लोक पाश्चात्य शिक्षणाचा तिरस्कार करतात त्यांचें शिक्षण व्यवहारोपयोगी नसून धार्मिक शिक्षणावर बरीच भर असते. स्थानिक शिक्षणक्रमांत सुधारणा करण्यासाठीं फ्रेंच सरकारानें बरेच प्रयत्न केले

१९१७ सालीं या प्रांतांत १ विश्वविद्यालय, १६ दुय्यम शिक्षण संस्था व १३०५ प्राथमिक शाळा होत्या पुरुष शिक्षकांकरितां दोन व स्त्रीशिक्षकांकरितां तीन अशा पांच शिक्षकशाळा होत्या

इ ति हा स.—स्वाभाविक दृष्ट्या अल्जीरिया, मोरोक्को व ट्युनिशिया या तीन प्रदेशांचें जर निरीक्षण केलें तर असें आढळून येईल कीं, हे तीन प्रदेश मिळून खरोखर एकच देश होतो पर दिसलेले विभाग फक्त राजकीय सोयीकरतां केले आहेत या देशाच्या इतिहासाकडे जर लक्ष दिलें, तर आपणास असें दिसून येईल की भूमध्यसमुद्रावर जीं राजकीय तुफानें झालीं त्यांचा आघात या देशावर झाला, ज्या ज्या राष्ट्रांनीं भूमध्यसमुद्रावर व त्या लगतच्या देशावर सत्ता गाजविण्याचा प्रयत्न केला, त्या प्रत्येकानें हा देश जिंकण्याचा शक्य तितका शिकस्त केली.

फिनिशियन, रोमन, व्हँण्डाल,अरब, तुर्क व फ्रेंचलोकांनीं येथें वसाहती केल्या सरतेशेवटीं फ्रेंच लोकांनीं हा देश जिंकून आपल्या राज्यास जोडिला सोळाव्या शतकांत स्पेन व तुर्कस्तान हीं दोन राष्ट्रें प्रबळ होतीं व त्या दोघांमध्यें अल्जीरिया व त्या लगतचे प्रदेश आपल्या ताब्यांत

आणण्याच्या झगड्यास सुरुवात झाली. त्यावेळच्या झगड्याचें पर्यवसान १५४१ सालीं, स्पेन लोकांच्या मोठ्या आरमाराचा तुफानात नाश होऊन झालें. आणि पुढें स्पॅनिश लोक जवळ जवळ गप्प बसले, आणि देशाचें स्वामित्व तुर्कांकडे गेलें

तुर्कांनी या देशाचे तीन भाग केले व त्या प्रत्येकावर एक कामगार नेमिला व या सर्वांवर एक मुख्य अधिकारी नेमित असत या पुढें दर तीन वर्षांकरिता एक मोठा अधिकारी (पाशा) पाठविण्याची चाल पडली. खरी सत्ता येथील लष्करी लोकाच्याकडे होती या लोकास अथवा वर्गास झाने-सरीज असें म्हणत असत.

१८ व्या शतकापासून लष्करीवर्ग देशाचा मुख्य शास्ता निवडून नेमीत असे. पुढें लवकरच या लष्करी लोकांनीं आपलें म्हणजे देशाचें स्वातंत्र्य जाहीर केलें.

किनाऱ्यावरच्या राहणाऱ्या लोकाचा धंदा चाचेपणाचा होता व त्याचा उपद्रव व्यापारास फार होत असे. या लोकाचें पारिपत्य करण्यासाठीं वेगवेगळ्या राष्ट्रांनीं लढाऊ जहाजें पाठवून या लोकाना वेळोवेळीं शिक्षा केल्या

१८१८ सालीं इंग्रजानीं लढाऊ गलबतें पाठविलीं. १८१९ सालीं फ्रान्स व इंग्लंड या दोन राष्ट्रांनीं चाचेपणास आळा घालण्याकरता एक स्वारी केली पण तिचा परिणाम तात्पुरता झाला. १८२० सालीं एका चमत्कारिक कारणानें फ्रेंच लोकास हा देश जिंकण्यासाठीं प्रयत्न करणें भाग पडलें. अल्जीरियातील ब्राकी व बुशनाक या दोन यहुदी व्यापाऱ्यांनीं फ्रेंच सरकारास धान्य पुरविण्याचा करार केला, व पुढें काहीं कारणानें फ्रेंच परराष्ट्रीय वकिलाच्या थोबाडीत हुसेनडेनें मारिली. हुसेनडे हा लष्करी वर्गाचा नायक (मुख्य) होता. हा अपमान म्हणजे आपल्या राष्ट्राचा अपमान झाला असें फ्रेंच लोकांस वाटून त्यांनीं मार्शल बोरमाँट यास हुसेनडेचें पारिपत्य करण्यास पाठविलें. त्यानें हुसेनाचा पूर्ण पराभव करून या लष्करी वर्गातील बहुतेकांची तुर्कस्तानात परत रवानगी केली व किनाऱ्यावरचीं काहीं बंदरें आपल्या ताब्यात घेतलीं

फ्रेंच सरकारनें इंग्रज सरकारशीं काहीं तह केले असल्यानें त्यास एकदम अल्जीरिया जिंकण्याचें धाडस करता येईना. त्यांनीं एक गव्हर्नर या देशातील फ्रेंच वसाहतीचें रक्षण करण्यासाठीं नेमिला १८३० ते १८३७ पर्यंत फ्रेंचाचें धोरण फक्त आपल्या ठाण्याचा बचाव करण्याचें होतें

अबदुल कादरचें बंड.— याच वेळीं अबदुल कादर नावाचा एक प्रख्यात पुरुष या देशात होऊन गेला धार्मिक वृत्तीबद्दल त्याची सर्वत्र ख्याति होती त्यानें आपल्या देशात एकी करुन राज्यव्यवस्था सुरळीत चालू केली त्याचें व फ्रेंच लोकांचें भांडण होऊन फ्रेंचाना तह करावा लागला या तहामुळे फ्रेंचांच्या ताब्यात फक्त सहापैकीं चार गावें व त्यांच्या सभोंतालचा भाग येवढाच कायतो मुलुख राहिला पुढें अबदुल कादरनें फ्रेंचास अजिबात हाकलून देण्यासाठीं प्रयत्न चालविले हें फ्रेंच सरकारास समजताच पुन्हा युद्ध सुरू झालें. या युद्धांत फ्रेंच सेनापति बुगो यानें ओरान प्रांतात स्वारी करून अबदुल कादरचीं सर्व प्रकारच्या सामुग्रीचीं कोठारें दारूनें उडवून दिलीं मोरोक्कोच्या सुलतानानें या वेळीं अबदुल कादर यास मदत केली, तेव्हा त्याचें पारिपत्य करण्याकरता १८४४ सालीं बुगोनें टांजिअरवर भडिमार करून सुलतानाचा 'इसली' येथें पराभव केला. फ्रेंच मोरोक्कोंत गुंतलें आहेत असें पाहून, अबदुल कादरनें पुन्हा आपल्या सैन्याची जुळवाजुळव करून सीदी ब्राहीम येथें फ्रेंचाचा पराभव केला, पण फ्रेंचाचें वाढतें सामर्थ्य पाहून व दुसरीकडून मदतीची आशा नाहींशी होताच तो १८४७ सालीं डिसेंबर महिन्यांत फ्रेंच सेनापतीच्या स्वाधीन झाला.

यानंतर निरनिराळ्या टोळ्यांचा पाडाव करण्याचें व लहानसहान बंडें मोडण्याचें काम बरेच दिवस चालू होतें. १८५१ सालीं बुमागला याचें बंड मोडलें. इतकें झालें तरी अल्जीरिया पूर्णपणें फ्रेंचाच्या ताब्यात गेला नव्हता, केबिलियाचा डोंगराळ प्रदेश जिंकावयाचा उरला होता. मुसलमान लोकाना चिथावून बंडें उभारण्याचें काम चालू टेवलें होतें, मोठमोठीं घराणीं अजून फ्रेंचापासून तुटून रहात होतीं, त्यांचीं मनें आकर्षून, त्याना फ्रेंचाचे खरे आधारस्तंभ करण्याचें काम तसेंच राहिलें होतें.

ए रँडन हा सेनापति, गव्हर्नर असताना १८५२ च्या सुमारास दक्षिणेंत एक दोन ठिकाणीं बंडें झालीं. या बंडाचा मोड वालिद शिदी शेख या घराण्याच्या मदतीनें झाला, रँडननें कॉबिलिया जिंकण्याचा निश्चय केला व तो त्या उद्योगास लागला. या डोंगराळ प्रदेशात तुर्कांचीं किंवा रोमन लोकाची देखील डाळ शिजली नाहीं पण या शूर पुरुषानें दोन महिन्यातच तो प्रदेश सर केला पुढें वालिद सिदीशेख या घराण्यातील एका पक्षाचें फ्रेंचाशीं वाकडें आलें. त्या पक्षाचा पुढारी सी-स्लीमन यानें बंड केलें, तें १८६४—१८७१ पर्यंत टिकलें. ह्याचा मोड १८७१ सालीं झाला. या बंडाचें वास्तविक कारण पाहूं गेलें तर फ्रान्स देशात त्या वेळीं जी राजकीय अव्यवस्थताव बंदाळी माजली होती व त्यामुळें फ्रेंच सरकारची इभ्रत कमी झाली होती हें होय

१८७० सालीं फ्रान्स देशात प्रजासत्ताक, राज्य पुन्हा तिसऱ्यादा स्थापन झालें, त्यावेळेपासून फ्रेंच सरकारनें आपल्या लोकास अल्जीरियात वसाहती करून राहण्यासाठीं सवलती देण्यास सुरवात केली. या देशाच्या राज्य कारभाराची ज्याबदारी फ्रेंच मंत्र्यावर टाकिली, ही राज्यव्यवस्था तेथील लोकास पसंत नव्हती, म्हणून १८९२ सालीं अल्जीरियांत गव्हर्नर जनरल नेमण्यात आला व अल्जीरियाचा जमाखर्च फ्रान्स देशाच्या जमाखर्चापासून वेगळा काढण्यात आला.

'मोठ्या अटलसच्या पलीकडे साहाराच्या प्रदेशात अजून जी काहीं ठाणीं होतीं तीं फ्रेंचांच्या ताब्यात यावयाचीं होतीं १८८२ त मझाब ठाणें सर केलें, १८८३ त चालिद सिदी शेख घराण्याच्या मोठ्या पातीनें फ्रेंचाशी सख्य केलें, पुढें सात वर्षांनी गुरारा, तुआट, टिटिकेट ही साहारांतील ठाणीं फ्रेंचानीं घेतली. या वेळेपासून अल्जीरियात शांतता राखून लोकात व्यापार व शिक्षण याचा प्रसार करून त्याची सुधारणा करण्यास फ्रेंचानीं आरंभ केला.

[संदर्भग्रंथ—फ्रान्सचे वार्षिक रिपोर्ट अल्जीरियासंबंधीं सामान्य माहितीचे वार्षिक रिपोर्ट फॉरिन ऑफिस रिपोर्टस ॲन्युअल सीरीज, लंडन कीन–आफ्रिका पु १ प्लेफेअर –बिब्लिओग्रफी ऑफ अल्जीरिया, लंडन १८८८ स्टॅन्फर्ड –अबाउट अल्जीरिया स्टॉट–दि रियल अल्जीरिया ए. ब्रि स्टेटसमन्स ईयर बुक वार्षिक ]

**अल्जीर्स**—अल्जीरियाचें राजधानीचें व सर्वात मोठें शहर. येथें गव्हर्नर–जनरलाचें निवासस्थान, अपील कोर्ट व आर्चबिशप यांचें पीठ आहे भूमध्यसमुद्राच्या उपसागराच्या पश्चिम बाजूस ३६° ४७' पू.रे व ३ ४' उ अ याच्या दरम्यान हें वसलें आहे. समुद्रावरून या शहराचा देखावा फारच रम्य दिसतो घराभोंवतीं हिरव्या गार वृक्षांनी गर्दी केल्यामुळें शहर लतामंडपातच वसलें आहे कीं काय असा भास होतो. आधुनिक फ्रेंच शहर, व प्राचीन शहर असे या शहराचे दोन भाग आहेत.

जुन्या व नवीन शहरांत फारच तफावत आहे जुन्या शहरांतील रस्ते अरुंद, व बैलगाडीच्याहि प्रवासास अयोग्य आहेत. त्याचप्रमाणें घरांची व दुकानांची अवस्था आहे.

गव्हर्नरजनरल आणि आर्चबिशप यांचे प्रासाद, 'ग्रँड' व 'न्यू' मशीदी आणि सरकारी कचेऱ्या ह्या अल्जीर्समधील पाहण्यासारख्या सार्वजनिक इमारती होत त्याचप्रमाणें 'होली ट्रिनिटी' नावाचें प्रार्थनामंदिर हेंहि पाहण्यासारखें आहे. मंदिराच्या आंतील भागास रंगी बेरंगी संगमरवरी दगडानीं शोभा आलेली आहे. या दगडावर इंग्रजी रेसिडेंटाविषयींचे लेख व इतर ऐतिहासिक माहिती आहे. कागद तयार करण्याचे कामीं गवताचा काय उपयोग होतो हें जगास प्रथम सांगणाऱ्या एडवर्ड लॉईड नामक गृहस्थाचा एका शिलेवर उल्लेख आहे.

अल्जीर्स बंदर हें सर्व प्रकारच्या वाऱ्यापासून सुरक्षित आहे हें भूमध्यसमुद्रांतील कोळसा घेण्याचें मुख्य बंदर आहे. १५४४ साली येथें दीपगृह बांधण्यात आलें अल्जीर्स व मारसेलीमध्यें आगबोटीनें दळणवळण होतें फ्रान्सच्या टार्पेडो स्टेशनामध्यें अल्जीर्स हें एक आहे

अल्जीर्स येथें एक विश्वविद्यालय असून त्यास कायदा, वैद्यक, शास्त्र व वाङ्मय इत्यादि विषयांच्या शाखा जोडलेल्या आहेत. पदार्थसंग्रहालयांत अत्यन्त प्राचीन अशीं खोदकामें ठेविलीं आहेत येथें एक आर्टस्कोर्ट आहे १९१२ मध्यें अल्जीर्सची लोकसंख्या १७२३९७ होती. यूरोपीयन लोक व मुसुलमान असे रहिवाशाचे दोन भाग होतात. यूरोपीयनांत, फ्रेंच, स्पॅनिअर्ड, इटालियन, माल्टीज, ब्रिटिश व जर्मन लोक यांचा समावेश होतो. मुसुलमानात मूर, अरब, बर्बर, व थोडेसे तुर्क हे लोक येतात यूरोपीयनांपैकीं बहुतेक रोमनकॅथोलिक आहेत.

इतिहास—अल्जीर्समधील सध्याच्या समुद्रकांठच्या भागावर रोमन कालीं आयकोसिअम नावाचें एक लहानसें शहर होतें आयकोसिअमच्या बिशपाचा ५ व्या शतकांतील लेखात उल्लेख आलेला आहे सध्याचें शहर इ स ९३४ त 'झैरिद–सहाजा' वंशाचा संस्थापक बुलुक्किन, त्यानें स्थापन केलें. ११४८ त हा वंश नष्ट झाला व त्याच्याहि पूर्वी अल्जीर्स या वंशाच्या हातून गेलें होतें ११५९ साली आल्मोहेदानीं तें काबीज केलें व १३ व्या शतकात तें ट्लेंकनच्या सुलतानच्या अंमलाखाली आलें हा अंमल जवळजवळ नाममात्रच होता. मूर लोकांची स्पेनमधून हकालपट्टी झाल्यावर ते अल्जीर्समध्यें येऊन राहिले त्यांनीं ओरान व आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील इतर शहरांस त्रास दिला तेव्हा स्पेननें पेनॉनची तटबंदी करण्यास सुरवात केली. बंदरासमोरील बेट स्पेननें १३०२ मध्येंच काबीज केलें होतें, व हें बेटच पुढें पेनॉन म्हणून प्रसिद्धीस आलें तेव्हा अल्जीर्सच्या अमीरानें, बारबारोसा बंधूंना, स्पॅनिअर्डसना घालवून देण्याकरिता पाचारण केलें अमीराच्या कमकुवतपणाचा फायदा घेऊन या बंधुद्वयांपैकीं एकानें अमीराचा खून करविला व गादी बळकाविली. या राज्यापहारकाचें नांव 'अरोज' असें होतें याच्यानंतर खैरदिन हा गादीवर आला व त्यानें १५३० त पेनॉनमधूनहि स्पॅनिअर्ड लोकाना घालवून दिलें. या वेळेपासून अल्जीर्स हें बारबरी येथील चाच्यांचें मुख्य ठिकाण झालें. १५४१ त पांचव्या चार्लस बादशहानें हें शहर काबीज करण्याचा प्रयत्न केला पण तो फसला १८१६ साली ब्रिटिश जहाजाच्या काफिल्यानें अल्जीर्सवर तोफा डागल्या. तरीहि चाचेगिरी १८३० सालापर्यंत चालू होती. त्या वर्षाच्या जुलैच्या ४ थ्या तारखेस फ्रेंच सैन्यानें शहरावर हल्ला करून तें काबीज केलें.

**अल्डरशॉट**—(इंग्लंड) हॅंपशायरच्या बेसिंग्स्टोक पार्लमेंटरी विभागातला एक जिल्हा. हा लंडनच्या नैर्ऋत्येस ३४ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९२१) २८७५६. इ. स. १८५३ त आल्डरशॉट कँप लॉर्ड हार्डिंगकडून स्थापिला गेला. नॉर्थ कँपला हल्लीं मार्लबरोलाइन्स व साउथ कँपला स्टॅनहोपलाइन्स असें म्हणतात. रॉयल एंजिनीअर्स व आर्मीसर्व्हिस कोअकरिता येथें बराकी आहेत. पांच पायदळाच्या बराकी व रॉयल आर्मी मेडिकल कोअकरितांहि कांहीं बराकी आहेत. येथें आजारी माणसाकरितां दवाखाने स्थापन केलेले आहेत

येथील गटारें अगदीं अर्वाचीन पद्धतीचीं आहेत. येथें पाण्याचा कांहीं पुरवठा आल्डरशॉट वॉटर कंपनी करते.

फौजेंतील शिपायासाठीं केलेल्या इमारतीशिवाय किल्ल्यांतील शिपायांना उपयुक्त अशा इमारतीदेखील येथें आहेत. येथें लष्करी शिक्षणाच्या वेगवेगळ्या शाखांचें शिक्षण देण्याकरितां पुष्कळ शाळा आहेत "अल्डरशॉट आर्मी कोर"चें हें मुख्य स्थान आहे. ( ए. ब्रि. )

अल्निक.—(इंग्लंड.) नॉर्दंबरलँडच्या बर्विक् ( अर्थात् टॉड ) पार्लमेंटरी विभागातलें एक बाजारी शहर व परगण्याचें ठिकाण हें नॉर्थ-ईस्टर्न रेल्वेच्या एका शाखेवर लंडनपासून ३०९ मैलावर आहे. जिल्ह्याची लोकसंख्या (१९०१) ६७१६ आहे. येथें एक किल्ला आहे व तो पर्सीच्या ताब्यात १३०९ पासुन आहे. एक दरवाजा, एक १२ व्या शतकांतली सुंदर नॉर्मन् कमान ( आर्च ), किल्ल्यामधील एक प्राचीन कूप, हे महत्त्वाचे प्राचीन भाग आहेत. हल्लीं किल्ल्यात पुष्कळच बदल केला आहे. इटालीचे व अन्य देशचे कारागीर यांचीं कामें व ब्रिटिश, रोमन आणि इजिप्शिअन पुराणवस्तु यांचे सुंदर नमुने किल्ल्यात आहेत. सुंदर उद्यानात ( पार्क ) विल्यम दि लायन ऑफ स्कॉट लंड यांचें एक स्मारक आहे. याच उद्यानात दोन स्मारकमनोरे व एक ब्रिटिश दगडी खोली आहे. कोटाचे अवशेष अजून दृष्टोत्पत्तीस येतात. सेंट मायकेलचें देवालय जुनें आहे. अर्वाचीन सेंटपॉलचें देवालय प्रेक्षणीय आहे. ऍने शिवाय उद्यानात आणखी अवशेष सापडतात. येथें सेंट लीओनार्डचा दवाखाना होता. ह्यल्टनबरी किल्ल्याचे अवशेष जवळच दिसून येतात.

दारू गाळणें, तंबाखू व तपकीर तयार करणें, मासे धरण्याच्या दोऱ्या तयार करणें, धान्य व दळणें, हे मुख्य धंदे आहेत. वास्तविक अल्निक हें एका डिस्ट्रिक्ट बोर्डाच्या क्षेत्रात येते. परंतु चिरवहिवाटीनें तें म्युनिसिपालिटी असणारें एक शहर झालेलें आहे. ह्या शहराच्या फ्रीमेनचें एक संयुक्त मंडळ ( बॉडी कार्पोरेट् ) असनें परंतु शहराच्या कारभारात त्या मंडळाला कांहीं सत्ता नाहीं. ह्या मंडळाला १८८२ च्या कायद्यान्वयें ५०० पौंडाहुन जास्त रकम मान द्यावी लागते. तिचा उपयोग कार्पोरेशनच्या शाळा ( कार्पोरेशन स्कूलस् ) चालविण्याकडे करितात.

मूळ अल्निक हें गिल्बर्ट टायसनच्या मालकीचें होतें. नंतर त्याचा मुलगा मेल्यामुळें राजानें त्याच्या मुलीसह तें आयव्हो डि व्हेसीला दिलें आयव्होचा एक वंशज विल्यम् डि व्हेसी हा १२९७ मृत्यु पावला. त्याला संतान नव्हतें. म्हणून ही जहागीर डरहॅमच्या बिशपला मिळाली. त्यान १३०९ त ती सर हेन्री पर्सीला विकली. त्याच्या वंशात ती अद्यापि चालत आहे. किल्ला सुमारें ११४० त युस्टेस फिट्झ जॉन यानें बांधला असें म्हणतात. वेगवेगळ्या प्रसंगीं मिळालेल्या सनदांनी बाजार व जत्राची परवानगी या शहराला मिळालेली आहे. कातडें कमावणें आणि कापड विणणें हे पूर्वी मुख्य धंदे होते. अल्निकनें पार्लमेंटात कधींहि प्रतिनिधी पाठविले नाहींत ( ए. ब्रि. ).

अल्पाका—दक्षिण अमेरिकेंतील खूर असणारा एक उंटासारखा प्राणी. अल्पाकाचे मोठाले कळप तेथें पाळण्यात येतात व समुद्रसपाटीपासून १४००० ते १६००० उंचीवर असणाऱ्या अँडीज पर्वतावरच्या कुरणांतून सर्व वर्षभर चरतांना ते दिसतात. ओझ्याचे प्राणी म्हणून ते गणले जात नसून, त्याच्या लोकरीमुळेंच त्यांना महत्व देण्यात येतें. अमेरिकन इंडियन लोक अल्पाका लोकरीचीं ब्लँकिटें व झगे करितात. लोकरीचा रंग साधारणपणें काळसर पिंगट किंवा काळा असून ती बरीच लांब म्हणजे जमीनीला लागण्याइतपत सुद्धा असते उंचीमध्यें अल्पाका हे लामा प्राण्यापेक्षा बरेच कमी असतात, तथापि त्याच्या सारखीच यांना थुंकण्याची वाईट संवय असते.

कापडाच्या धंद्यात 'अल्पाक' हें नाव दोन निरनिराळ्या वस्तूंना दिलें जातें. मुख्यत. पेरू देशांतील अल्पाका प्राण्याच्या केसांना किंवा लोकरीला हा शब्द लावितात. तथापि सरसकट एक प्रकारच्या विणीला हें नाव लावितात; मग तें विणलेलें कापड अल्पाका लोकरीचें असो वा नसो. कधीं कधीं बाजारातलें अल्पाक कापड मोहेर, आयर्लंड किंवा बारीक इंग्लिश लोकरीचेंहि असतें. सामान्य गिऱ्हाइकाला अल्पाका प्राण्याच्या लोकरीपासून केलेलें अल्पाक कापड व मोहेर वगैरे अन्य लोकरीपासून केलेलें नकली अल्पाक याच्यातील फरक कळत नाहीं.

लामा, अल्पाका, ग्वानाको आणि विकूना या चार दक्षिण अमेरिकेंतील अंगावर लोकर असणाऱ्या प्राण्यांपैकीं अल्पाका आणि लामा हे दोन कायते माणसाळलेले प्राणी आहेत. अल्पाका व विकूना हे लोकरीकरितां फार महत्वाचे असे प्राणी गणले जातात. अल्पाका प्राण्याला लोकर पुष्कळ व उत्तम अशी येते तर, विकूनाची लोकर बारीक व मऊ असते. १९ व्या शतकाच्या आरंभीं अल्पाका लोकरीचा धागा सुमारें १२ इंच असे ही तीन वर्षांची वाढ असे. पण आज एकदोन वर्षांची वाढ देखील याच्या निम्याहून अधिक असते. हुशार अमेरिकन धायका अल्पाका लोकरीचें वर्गीकरण रंग आणि गुण यावरून करितात युनायटेड किंगडममध्यें येणारी अल्पाका बहुधा काळी आणि पिंगट रंगाची असते. पांढरा, करडा अशा प्रकारचे रंगहि बनविण्यात येतात. अल्पाका लोकर केसासारखी तुळतुळीत असते. पण तिच्या मऊपणामुळें व सुरेखपणामुळें तिचें लांब सूत काढण्याला फार सोपें जातें.

अल्पाका लोकरीचें कापड तयार करण्यास सुरवात कशी झाली, याचा इतिहास फार मनोरंजक आहे युरोपमध्यें व्यापारी माल म्हणून अल्पाकाचा प्रवेश होण्यापूर्वी पुष्कळ शतकें पेरूंतील इंडियन लोक याचे निरनिराळ्या प्रकारचें कापड तयार करीत. स्पेनमध्यें प्रथम हिची आयात झाली, असावी;

नंतर तेथून फ्रान्स आणि जर्मनी या देशांतून तिचा धागा नेण्यात आला. १८०८ च्या सुमारास प्रथमच इंग्लंडमध्यें अल्पाकचें सूत काढण्यात आलें; पण पुढें पुष्कळ वर्षेंपावेतों हिची विशेष प्रगति झाली नाहीं; याचें कारण काम करण्याला अवघड असा हा माल आहे अशी लोकांची समजूत झाली. १८३०मध्यें हॅलिफॅक्सजवळ राहणाऱ्या बेंजामिन आउट्रम नावाच्या माणसानें पुन्हां हिचें सूत काढण्याची खटपट केली पण ती पुन्हां अयशस्वी ठरली. १८३६च्या सुमारास ब्रॅडफर्ड बाजारांत सुताची उभी वीण जेव्हां प्रचारांत आली तेव्हांपासूनच अल्पाकाचें कापड होण्यास खरी सुरवात झाली. सुताची उभी वीण व मोहेर किंवा अल्पाक यांची आडवी वीण यांच्या योगानें कापड बनविण्याची पद्धत कोठून प्रचारात आली हें सांगता यावयाचें नाहीं. पण हीच पद्धत टायटस सॉल्ट नावाच्या तरुण ब्रॅडफर्डे व्यापाऱ्याला अल्पाकाचा उत्तम रीतीनें उपयोग करण्याला फारच उपयोगी पडली. अजूनहि ब्रॅडफर्डहून अल्पाक सूत व कापड मोठ्या प्रमाणात निर्गत होतें.

सर टायटस साल्ट व इतर ब्रॅडफर्डचे व्यापारी यांनीं अल्पाकचें निरनिराळ्या प्रकारचें कापड तयार करण्यात जे यश संपादन केलें, त्यामुळें अल्पाक लोकरीची मागणी बरीच वाढली, पण इंडियन लोकांना ती पुरविता येणें अगदीं अशक्य झालें. कारण अल्पाक प्राण्याची तेवढी निपज वाढविणें कठिण होतें. इंग्लंड व इतर यूरोपियन देशात अल्पाका बकरी तयार करण्याच्या बऱ्याच खटपटी झाल्या पण त्यात यश आलें नाहीं. अल्पाका आणि लामा प्राण्याच्या संयोगापासून तयार करण्यांत आलेला 'हुॲरिझो' नांवाचा माल लिव्हरपूरच्या बाजारात ठेवलेला असतो. अल्पाका आणि विकूना यांचे संयोग यशस्वी झाले नाहींत.

अल्यनी—प्राचीन राष्ट्र याची वस्ती अल्बेनियात होती. अल्बेनिया हें पूर्व कॉकेशस मधील एका जिल्ह्याचें प्राचीन नांव असून स्ट्रेबोच्या म्हणण्यावरून (११.४, १-८) सायरस (कुरु) नदीची थडी व आधुनिक शिर्वन एवढ्या भागाचा समावेश त्यांत होत असे. अल्यनी लोक वास्तविक सध्यांच्या दघिस्तानच्या आसपास असावेत (हि गो. ६. १९) ते इटाली मधील आल्बा येथून आलेल्या लोकांचे वंशज म्हणत, अशी दंतकथा हॅलिकार्नेससच्या डायोनिसिअस यानें दिली आहे. स्ट्रेबोच्या आधारावरून असें समजतें की, अल्बनी हे सूर्योपासक व विशेषतः चंद्रोपासक होते. पूर्वी त्यांच्यांत लहान लहान २६ राज्यें होतीं, तरी स्ट्रेबोच्या वेळेस एकच राजा राज्य करीत होता. रोमन लोकांना यांची माहिती होती, कारण पाँपे, मोठा मिथ्रिडेटीस (इ. स. पू. ६५) याचा पाठलाग करीत होता, त्यावेळेस अल्बनी लोकांनी त्याला मदत केली. पाँपेनें त्यांना आपले नावापुरते मांडलिक बनविलें. तरी त्यांचें स्वातंत्र्य नष्ट झालें नाहीं. हॅड्रियनच्या वेळेस अल्यनी लोकांनीं हा प्रदेश जिंकला (मॉमसेन—प्राव्हिन्सेस ऑफ दि रोमन एंपायर इं. भाषांतर, १८८६) नंतर तो सस्सानिद अंमलाखालीं गेला. अल्बनी लोकांना खाझर लोकांनीं आर्मेनियात हाकून दिलें. त्यानंतर हूण, व्हरागियन आणि मोंगल यांच्या एकामागून एक स्वाऱ्या या प्रदेशावर झाल्या. (ए. ब्रि.).

अल्बिरूनी—अबू रैहान महंमद (९७३-१०४८). हा सुमारें ९७३ सालीं ख्वारिझम प्रांतामध्यें बिरुन शहरामध्यें जन्मला. हा प्रख्यात गणितशास्त्रज्ञ, ज्योतिषी, इतिहासकार आणि तर्कपंडित होता. संस्कृत भाषेमध्यें प्रावीण्य मिळविणारा हा एकटाच मुसलमान पंडित होय. त्यानें अध्यात्मशास्त्र व वस्तुतत्त्वशास्त्र यांचाहि अभ्यास केला होता. पण मुख्यतः गूढविद्या जाणणारा या दृष्टीनें त्याची फार कीर्ति झाली. या संबंधींची एक गोष्ट नेहमीं सांगण्यात येते ती अशीः—एके दिवशीं सुलतान महमूद दरबारात बसला असताना त्यानें अल्बिरूनीला 'आज आपण दरबारातून कशा रीतीनें बाहेर जाऊं याचें वर्णन अगोदरच लिहून ठेवण्यास सांगितलें. त्याप्रमाणें बिरूनीनें लिहून ठेवल्यावर सुलतानानें पुष्कळ दरवाजांपैकीं कोणत्यातरी दरवाजानें जाण्याऐवजीं भिंतीमध्यें भोंक पाडून आपला जाण्याचा रस्ता केला. त्यानंतर अल्बिरूनीनें लिहिलेला कागद पहाताच त्यात अशाच प्रकारचें बरोबर वर्णन दिलेलें आढळून आलें. सुलतानाला हा कोणी चेटक्या आहे असें वाटून त्याला तावडतोब खिडकींतून खालीं फेंकण्याचा हुकूम केला. पण अल्बिरूनीला हें अगोदरच माहीत असल्याकारणानें त्यानें अगोदरच तयारी करून ठेविली होती व यामुळें त्याला कांहींहि इजा झाली नाहीं. नंतर राजानें त्याला आपल्या समोर बोलावून आणून अशा प्रकारची शिक्षा तुला भोगावी लागणार हें तुला अगोदरच माहीत होतें काय असें त्याला विचारलें. अल्बिरूनीनें त्याला होय म्हणून उत्तर देऊन त्या दिवशींचें लिहिलेलें भविष्य दाखविलें. त्यानें चाळीस वर्षेपर्यंत पुष्कळ देशांतून प्रवास केला. सुलतान महमूद गझनीच्या स्वारीबरोबर तो हिंदुस्थानामध्यें आला. त्यानें इ. स. १०३० च्या सुमारास हिंदुस्थान संबंधींचा 'तारीख अल् हिंद' अगर 'हिंदुस्थान संबंधींची हकीकत' नावाचा ग्रंथ लिहिला. अबुल फझलनें ऐनी अकबरीत या ग्रंथाचा बराच आधार घेतला आहे. या ग्रंथामध्यें राजकीय इतिहासाचें सांगोपांग आणि सुसंबद्ध वर्णन जरी नसलें तरी त्यावेळच्या हिंदूंच्या चालीरीती, धर्म व वाङ्मय समजण्याला त्याचा फार उपयोग होतो. या ग्रंथामध्यें त्यानें १८ पुराणांचीं नांवें दिलेलीं आहेत. मत्स्य, आदित्य व वायु हीं तीन पुराणें पाहिल्याचेंहि लिहिलें आहे. तसेंच विष्णुपुराणामध्यें दिलेलीं अठरा पुराणांचीं भिन्न नांवेंहि दिलेलीं आहेत. यावरून विष्णुपुराण हें १०३५ सालीं [illegible]

मत खोटें ठरून १०३० च्या पूर्वीच अठरा पुराणें अस्तित्वांत होतीं असें सिद्ध होतें. त्याला भगद्गीतेंतील तत्त्वज्ञान फार आवडे. त्यानें पुष्कळ ग्रीक ग्रंथांचीं भाषांतरें केलीं. टोलेमीच्या ऑल्मागेस्टचें त्यानें अरबी भाषेंत संक्षिप्त भाषांतर केलें. दुसरा एक महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे कानूनें मसूदी हा होय. हा ग्रंथ त्यानें सुलतान महमूदचा मुलगा मसूद याला अर्पण केला होता व त्याबद्दल त्याला हत्तींच्या भारेभार रुपये मिळाले असें म्हणतात. ज्योतिःशास्त्रावर त्याचा फार भर होता. त्यानें ज्योतिषग्रंथाचें रथानें अरबीभाषेंत भाषांतर केलें आहे. हा १०४८ सालीं मरण पावला. ज्योतिष, गणित, कालगणना, भौगोलिक भौतिक पदार्थविज्ञान, रसायन आणि खनिशास्त्र हे त्याचे आवडते अभ्यासविषय होते.

ता री ख हिं द.—या हिंदुस्थानावरील ग्रंथाचीं एकंदर ८० प्रकरणें आहेत. पहिल्या प्रकरणांत हिंदुलोकांविषयीं माहिती मिळविण्यास कशा अडचणी येतात त्याचें वर्णन; प्रकरण २–११ हिंदुधर्म व तत्त्वज्ञान; १२—१७ वेद, पुराणें, व्याकरण, छंदःशास्त्र वगैरे वाङ्मय व हिंदु चालीरीती; प्रकरणें १८—३१ भूगोल व ज्योतिष. ४३—७९ या प्रकरणांतून हिंदूंचे सणवार, उत्सव चालीरीती वगैरे मोठी महत्त्वाची माहिती प्रथित केली असून, शेवटचें प्रकरण फलज्योतिषासंबंधीं आहे. या ग्रंथातली बरीचशी माहिती ऐकिव असल्यानें ती चुकीची असण्याचा मोठा संभव आहे. तथापि अल्बिरूनीकालीन हिंदुस्थान कसा होता हें त्यावरून चांगलें कळण्यासारखें आहे. हा ग्रंथ १८८३ मध्यें सी. ई. साचो यांनीं लंडन येथें प्रसिद्ध केला व पुढील सालीं त्याचें दोन भागांत इंग्रजी भाषांतरहि निघालें.

[संदर्भग्रंथ—स्मिथ-अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. बीलचा कोश. ए. मि. इलियट हिस्टरी ऑफ इंडिया. चित्रमयजगत् पु. १४ अं. १.]

अल्बेनिया—एक बाल्कन प्रजासत्ताक राष्ट्र. हा प्रदेश बाल्कनद्वीपकल्पाच्या समुद्रकांठचा प्रदेश असून तो मॉंटेनिग्रोच्या दक्षिण सरहद्दीपासून ग्रीसच्या उत्तर सरहद्दीपर्यंत पसरला आहे. यूरोप खंडांतील अतिशय अज्ञात प्रदेश म्हणजे हाच म्हणता येईल. येथील भयंकर, डोंगराळ प्रदेश कायद्यास न जुमानणारे लोक, त्यांची भाषा व विशिष्ट सामाजिक बंधनें व येथची बेबंदशाही यामुळें परकीय प्रवाशास येथें राहणें फार धोक्याचें आहे. बर्लिन तहान्वयें मॉंटेनिग्रो प्रांत वाढला व अल्बेनियाची उत्तर सरहद्द लहान झाली. डुलसिग्नो जिल्हा मॉंटेनिग्रोनें घेऊन त्याच्या ऐवजीं प्लाव्हा व ग्युसिन्ये हे जिल्हे तुर्कस्तानला दिले. ईशान्य अल्बेनियाचा भाग कोसोव्हो या तुर्की विलायतमध्यें येत असे. उत्तरेकडील डोंगराळ भाग स्कोड्रा ( स्कुटारी ) मध्यें होता. मध्य अल्बेनियाचा पूर्वेकडील भाग मोनॅस्टिर विलायतमध्यें होता दक्षिणेकडील जिल्हे इआनियामध्यें मोडत.

स्वा भा वि क व र्ण न.—अल्बेनियाचा विशेषतः उत्तर भाग बराच डोंगराळ आहे. पूर्वेस शार पर्वताची रांग असून तिलाच लागून दक्षिणेस ग्रॅमास व पिंडस ह्या दोन ओळी आहेत. यांचें उंच शिखर लिऊबोत्रन हे आग्नेय यूरोपांत सर्वांत उंच ( ८८५८ फूट ) असें शिखर आहे वरील पर्वताच्या रांगेमुळें उत्तर, मध्य व दक्षिण असे अल्बेनियाचे तीन विभाग पडतात. श्कुंब नदीमुळें उत्तर व मध्यविभाग वेगळे होतात व व्हिओसा नदी मध्य व दक्षिण विभागाच्या मर्यादेवरून वहाते. उत्तर अल्बेनियांत प्रोक्लेटिआ म्हणजे 'शापित पर्वत' ही मुख्य रांग आहे. दक्षिण अल्बेनियांत हिमेरा अथवा खिमरा ह्या मुख्य ओळी आहेत. येथील नद्या बहुधा पूर्वेकडून पश्चिमेकडे वाहत जातात. बॉयना व आर्ता ह्या नद्यांच्याच मुखाशीं मात्र बोटी चालतात. येथील मुख्य नदी बॉयना ही स्कुटारी सरोवरांत उगम पावली असून तिला मोराचा, ड्रिन वगैरे नद्या मिळतात व ती ॲड्रिॲटिक आखातास मिळते. स्कुटारी व ऑचरिडा हीं दोन सरोवरें यूरोपांत सुंदर गणलीं जातात. याशिवाय आयानिना हें दुसरें सुंदर सरोवर आहे

ह वा.—डोंगराळ प्रदेशांतील हवा निरोगी असून खोऱ्यांत तापाची सांथ नेहमीं असते. येथें हिंवाळा फार थोडा असतो, परंतु थंडी अतिशय असते समुद्रकिनाऱ्यावर वसंतऋतूंत बोरा अथवा उत्तरेकडील भयंकर वारा वहात असतो

ख नि ज सं प त्ति—अल्बेनियांतील डोंगरांत बरेच खनिज पदार्थ आहेत असें म्हणतात; परंतु त्यांचा शोध अद्यापि कोणी लाविला नाहीं येथें लोखंड व कोळसा पुष्कळ असावा पूर्वी येथें सोनें व रुपें काढीत असत. सेलिनिटझा येथें खनिज डांबर सांपडत असून रोमन काळीं तो फार काढीत असत सध्या जुन्या पद्धतीनें येथून डांबर काढतात येथें मोठालीं जंगलें आहेत यांत विशेषतः ओक व बीच यांचीं अरण्यें आहेत. सुमाक झाडें मिरडाईट भागात फार होतात येथें फळझाडें बरीच होतात साधारणप्रतीचें मद्य देखील तयार करतात. दक्षिण अल्बेनियांत तंबाखू फार होते येथील उपजीविकेचें मुख्य साधन म्हणजे शेतकी व गुरें पाळणें हेंच होय शेतकीची जुनी पद्धति, दळणवळणाच्या साधनाचा अभाव व पुरामुळें होणारें नुकसान, इतक्या अडचणी असतांना देखील डॅलमेशियन किनारा व बेटें यांना येथूनच धान्याचा पुरवठा होतो. मुख्य धान्यें मका असून जव, राय, ओट व इतर धान्याची बरीच निर्गत होते उत्तरेकडील डोंगरी लोकांची संपत्ति म्हटली म्हणजे मेंढ्या, बकरीं ही होय. कातडीं व लोंकर यांची येथून निर्गत होते. येथील नद्यांत व सरोवरांत मासे सांपडतात.

व्या पा र व उ द्यो ग धं दे.—इ. स. १८९८ त येथील निर्गत ४८०,००० पौंडांची होती. त्यात शेतकीचें उत्पन्न गुरेंढोरें, कातडीं, लोंकर, बीज, अंडीं, कोंबडी, बदकें, ऑलिव्ह

तेल, व्हॅलोनिया, ओक, सुमाक झाडाची पानें, इमारती लांकूड, रेशीम, तंबाखु, खारवलेले मासे वगैरे पदार्थांचा समावेश होतो. १८९८ त आयात मालाची किंमत १,३६०,००० पौंड होती. येथील व्यापार पूर्वी व्हेनेशियन लोकांच्या हातीं होता. नंतर तो आस्ट्रिया हंगेरीच्या ताब्यांत गेला. इटलीखेरीज इतर कोणत्याहि देशाशीं याचा व्यापार फार महत्त्वाचा नाहीं. आस्ट्रियांतील स्वस्त माल येथील लोकांस पसंत पडतो. ट्रिस्ट हें व्यापाराचें मुख्य बंदर असून आस्ट्रियन लॉईड कंपनीच्या आगबोटींनी समुद्रावरील व्यापार चालतो. किनाऱ्यावरील मात्र तुर्की व ग्रीक बोटींनी होतो. रेल्वे सुरू झाल्यामुळे अलीकडे सालोनिका बंदरीं बराच व्यापार सुरू झाला. दळणवळणाच्या साधनांच्या अभावामुळें व्यापार मागमला आहे. या देशांत रेल्वे नाहींत व चांगले रस्तेहि नाहींत. पूलहि वाहतुकीस सुरक्षित असे नाहींत. येथील देशी उद्योगधंदे महत्त्वाचे नाहींत व जे आहेत ते देखील मुद्दत चालले आहेत.

लो क सं ख्या.— अल्बेनियाची लोकसंख्या सुमारें १० लाख आहे. यांत बिस्थावर अल्बेनियन लोक असून कांहीं थोडे लोक स्लाव्ह ( सर्व व बल्गेरियन ) आहेत. मान्क्ट शायगॉस व पिंडस म्हणजे मध्ययुगातला 'ग्रेट वॅलाचिया' या पर्वतांत व्हलाच अथवा झिनजार लोक राहतात. आग्नेय भागांत तुर्क, एपिरोट मध्यें ग्रीक भाषा बोलणारे लोक व आयनिना, प्रेव्हेसा व अगदीं दक्षिणेकडचा भाग यांत खरे ग्रीक ( लोकसंख्या अजमासें १ लक्ष ) राहतात.

मु ख्य श ह रें.— यांत स्कुटारी, प्रिसेरेन, आयनिना, मॅनेस्त्री, इस्पा, प्रिस्टिना, दुराझो ही मुख्य शहरें आहेत.

अल्बेनियन हे आग्नेय युरोपांतील एका प्राचीन महावंशाचे लोक असून बाल्कन द्वीपकल्पात कधीं आले याचा पुरावा, इतिहास अथवा दंतकथांतून सांपडत नाहीं. इलिरियन, मॅसिडोनियन, व एपिरोटस यांच्याप्रमाणें हे येथे आलेल्या अतिप्राचीन आर्यांचे वंशज असावे. हानच्या मतें इलिरियन व एपिरोट लोक हे अनुक्रमें घेग व टोस्क यांचे पूर्वज असावे. या लोकांत ग्रीक स्लॅव्हानिक नावें बरीच अस्तित्वांत असून स्लाव्ह लोक तर येथें आढळत नाहींतच, यावरून असें वाटतें कीं, गर्लीयन व अस्मीरियन लोक मध्ययुगात या प्रांतांत बरेच आले असावे परंतु पुढतर त्यांचा ठावठिकाणा नाहींसा झाला असावा अथवा ते मूळ लोकांत मिसळून गेले असावे. यांनीं स्वतःच्या डोंगराळ प्रदेशांत परकीयांची बिलकूल डाळ शिजूं दिली नाहीं, म्हणून मॉंटेनिग्रियन या लोकांप्रमाणें यांची माहिती फारशी मागें राहिली नसावी. याप्रमाणें या लोकांनीं आपले गुणधर्म, भाषा, चालरीति व दंतकथा कायम टिकविल्या आहेत. सुमारें सारेपासून ६ शतकें दूर असलेले ग्रीस व इटलीमधील अल्बेनियन हे भोंवतालच्या लोकांत अद्यापि देखील मिसळले नाहींत.

अल्बेनियन, म्हणजे टोस्क व घेग, हे स्वतःला स्कुपेटर म्हणतात व देशाला स्कुपेनिया अथवा स्कुपेरिया म्हणतात. मॉंटेनिग्रोच्या सरहद्दीवरील पेरेनेपासून मित्रो व्हिदझापर्यंत व सर्व्हियन सरहद्दीवरील प्रन्यापर्यंत जर रेषा काढली व तेथून उस्कुव, मिलिप, मोनॅस्टिर, फ्लोरिना, केस्टोरिया, आयनिना व पर्गापर्यंत रेषा नेली तर साधारणतः या रेषेंत अल्बेनियन लोकांच्या व त्यांच्या प्रदेशाचा समावेश होईल. टोस्क लोकांच्या टोळ्यांनीं १४ व्या शतकांत ग्रीसमध्यें वसाहत केली. त्यांचे सध्याचे वंशज ग्रीसमधील अल्बेनियन लोक आहेत. मध्यां त्यांची ग्रीक सैन्यांतील उत्तम शिपाई म्हणून प्रसिद्धि आहे. त्यांनीं स्वातंत्र्ययुद्धांत ( १८२१-१८२९ ) फारच चांगली कामगिरी बजावली. त्यांपैकीं बरेच लोक अद्यापि आपलीच भाषा बोलतात. इटली व सिसिली मधील अल्बेनियन देखील टोस्कलोकांचे वंशज असून अद्यापि बरेच लोक टोस्कपासून निघालेली एक उपभाषा बोलतात. घेग व टोस्क हेच खरे अल्बेनियन वंशांतील आहेत. लिआप व शाम अथवा चाम ही टोस्क लोकांचीच एक शाखा आहे. घेग स्वतःला घेग म्हणवीत नसून तें एक टोपणनाव आहे असें ते मानतात. तसेंच टोस्क हें नाव व्हायव्होसा नदीच्या उत्तरेकडील भागांत राहणाऱ्या बऱ्याच लोकांना लावतात.

स्व भा व व र्ण न.— बाल्कन द्वीपकल्पांत राहणाऱ्या इतर लोकांवर परकीय लोकांच्या सहवासानें जसा परिणाम झाला तसा अल्बेनियन लोकांवर झाला नाहीं. त्यांनीं आपली भाषा, चालरीती व प्राचीन संस्था कायम टेवून इतर लोकांपासून स्वतःचें वैशिष्ट्य कायम ठाविलें. भयंकर, बेकायदेशीर, अंधविश्वास, अज्ञानी वगैरे घेग लोकांत असे कांहीं गुण आहेत कां, ते पूर्व युरोपांत क्वचितच दृष्टीस पडतात. तथापि ते साधे, शूर, विश्वासू व इमानी असून उत्तम तऱ्हेचे सैनिक व चाकर म्हणून त्यांची प्रसिद्धि आहे. बरेच वर्षांपासून तुर्की सुलतानाच्या शरीरसंरक्षकपथकांत यांची भरती होत आहे. टोस्क लोकांप्रमाणें यांची देखील परकाय वकीलातींत व कान्सलच्या मार्फत सैनांमीतील लोकांत भरती करण्यात आली. ग्रीक, स्लाव यांच्या सहवासानें टोस्क लोकांच्या स्वभावांत बराच फरक पडला आहे. घेग लोक लढाई, चोऱ्या व गुरें राखणें हे धंदे करतात परंतु टोस्क व्यापारधंदा व शेतकी करतात. घेग हा कडक, गंभीर, व मानी दिसतो परंतु टोस्क आनंदी बोलका व मनमिळाऊ असतो. या दोन्ही लोकांतील नैसर्गिक वैर आतां पूर्वी इतकें जाज्वल्य नसलें तरी अगदींच नाहींसें झालें नाहीं. मरणान्त युद्ध देण्याची चाल पूर्वापार चालत आलेली आहे. युद्ध घेणें हें पवित्र कार्य समजलें जातें. एका मनुष्यवधामुळें बरेच वध होऊन कांहीं घराण्यांत अथवा टोळ्यांत एक तऱ्हेचें युद्धच चालतें. यामुळें पुष्कळदां पुरुष मनुष्य कोंडलेला अथवा घरांत बरीच वर्षें लपून राहतो. अशा प्रकारच्या वैरानें कांहीं भागांत शेकडा ७५ पर्यंत

मृत्यु होतात. कधीं कधीं तात्पुरता अथवा कायमचा 'बेसा' (अभिवचन) म्हणजे संधि एखाद्याच्या मध्यस्थीनें अथवा उपाध्यायाकडून होतो सुलतान देखील असा संधि जाहिर करतो. संधि झाला तर मोठाले समारंभ होतात. येथें अतिथिसत्काराचे निर्बंध फार कडक असल्यामुळें अतिथीस इजा झाल्यास नुकसानी भरून देतात. एखाद्या रहिवाशाचा बेसा असल्याशिवाय प्रवासी लोकांना येथें जाणें धोक्याचें आहे. परंतु तो असला तर त्याची व्यवस्था फार चांगली होते. कांहीं जिल्ह्यांत खुनाबद्दल १२०० पिआस्टर्स म्हणजे सुमारें १४० रु. दंड दिला तर संधि होतो कित्येक ठिकाणीं हा दंड २००० पिआस्टर्स आहे.

स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं परंतु त्यांना फार मानानें वागवितात. आपण मिळविण्यासाठीं पुष्कळदा त्यांची योजना करतात. कांहीं देखील इजा न होतां स्त्रिया शत्रूच्या प्रदेशांतून जाऊं शकतात. पुरुषांबरोबर स्त्रिया युद्धक्षेत्रावर जातात आणि तेथें जखमी झालेल्यांची शुश्रुषा व मृतांना नेणें वगैरे कामें करतात वराकडून हुंडा मिळत नाहीं परंतु मुलीला कांहीं किंमत देऊन विकत घ्यावें लागतें. लहानपणीं वाङ्‌निश्चय होतो व त्या वेळेस कांहीं इसार द्यावा लागतो. टोस्क लोकांचा पोशाख घेग लोकांहून निराळा असतो. ते ग्रीक लोकांप्रमाणें चुणीचा पांढरा घागरा घालतात. उत्तरेकडे बहुधा दोन्ही जाती बंदुका व तरवारी नेहमीं बाळगतात. मिरदाईट व मेंट जातीच्या लोकांचा देखील पोशाख फार विचित्र असतो.

जा ति प द्ध ति — उत्तर अल्बेनियांत समाजघटनेची प्राचीन पद्धतीच अद्याप दिसून येते घेग लोकांनीं बरीच वर्षें तुर्कांच्या अमलांचा प्रतिकार करून स्वसत्ता राखिली हे लोक कर देत नाहींत, त्यांना लष्करी नोकरी सक्तीची नसून, ते तुर्की कायदा मानीत नाहींत. जे थोडे तुर्की अंमलदार असत त्यांची सत्ता देखील केवळ नावाचीच असे. तुर्क सरकारला फक्त ते युद्धाच्या वेळेस सैन्याची तुकडी पुरवीत. पूर्वापार चाल किंवा कनुन-इ-लेक्स डुकेगिनिन नांवाचा अलिखित मुलकी व फौजदारी कायदा हाच काय तो हे लोक समजतात.

वरील कायदा लेक्स-डुका-जिनी नांवाच्या गृहस्थानें १३ व्या अथवा १४ व्या शतकांत तयार केला असें म्हणतात. या जातींत पुष्कळशीं कुळें असतात, त्यांच्या राजाला बरियाक्टर म्हणतात. प्रत्येक कुळांत कांहीं वयातीत लोकांचें कौन्सिल असतें. राजा व कौन्सिलर यांचे हक्क वंशपरंपरेनें चालतात कुळाचे लहान विभाग पाडून त्यां प्रत्येकावर जोबर अथवा त्या ठिकाणचा मोठा मनुष्य हा मुख्य असतो. हे जोबर कायदा बजावणें, कर गोळा करणें, शिक्षा सुनावणें वगैरे गोष्टींवर देखरेख करतात. याचा संबंध स्कुटारी येथील प्रत्येक जातीच्या प्रतिनिधींशीं येतो; व हे प्रतिनिधी डोंगरी लोक व तुर्की सरकार यांच्या मध्यें दळणवळण ठेवीतात. चालीरीती व संस्था यांना धरून वर्तनें केलेले फायदे हे प्रतिनिधी आपल्या लोकांस कळवितात उत्तर अल्बेनियांत अथवा घेगेरियांत सात मुख्य जाती आहेत. त्या येणें प्रमाणें:—

(१) मिरडाईटः—संख्या सुमारें १७०००. राजकीय व स्वातंत्र्यदृष्ट्या हे लोक फार महत्त्वाचे आहेत. हे रोमन कॅथोलिक असून डेरा. ई जॉन मरकुट (जॉन मार्कोज घराणें) या घराण्यांत राजवंश चालतो. तुर्क सरकारनें येथील प्रेंक राजास पळवून नेऊन ॲनाटोलियांत कैद करून ठेविलें व त्याच घराण्यांतील दुसऱ्या एकास गादीवर बसविलें. परंतु तो राजा मिरडाईटांस मान्य नसल्यानें जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली. कोणत्याहि मुसुलमानास या भागांत मनाई असे.

(२) मिष्कोद्रक संघ अथवा अलसियामेंधे —यांत बऱ्याच जातींचा समावेश होत असून स्कुटारीच्या ईशान्येस हे राहतात. हे लोक राजधानीच्या जवळ असल्यानें तुर्की सत्ता मानीत व वार्षिक कर देत. यांचे मुख्य अधिकारी कर गोळा करीत. जिबल नांवाच्या संघाचें सरकारी कौन्सिल स्कुटारी मध्यें असून त्याचा अध्यक्ष एक मुसलमान (अधिकारी) असे

(३) डुकजिनः—हे वरील प्रदेश व जॅकोव्हा यांच्या मध्यें राहतात हे मिष्कोद्रकापेक्षा जास्त स्वतंत्र व जंगली आहेत. यांनीं आजपर्यंत कधींहि कर दिला नाहीं.

(४) पुकासंघ—हे लोक ड्रिन नदीच्या दक्षिणेस असतात तुर्की 'कैमाकम' याचा अधिकार नावाला मात्र असे

(५) मालसियाजॅकोव्हेस —यांच्यांत दोन कॅथोलिक व तीन मुसुलमानी जाती आहेत जॅकोव्हा येथें यांचा सरकारी प्रतिनिधि राहतो यांना कर द्यावा लागत नाहीं.

(६) व (७) मालसिया लेझा.—ह्या जाती फार गरीब असून कर देत नाहींत यांच्यांतील मालसिया कच्छू ही जात लुटारूचा धंदा करिते. या डोंगरी लोकांखेरीज मालसिया व मेंट जातींत चार श्रीमंत घराण्यांची सत्ता वंशपरंपरेनें चालते अलीपाशाच्या वेळेपासून दक्षिण अल्बेनियांत तुर्की सत्ता चांगली बळावली होती

प र मा र्थ सं प्र दा य.—दोन पंचमांशांपेक्षा जास्त लोक मुसुलमानी धर्माचे आहेत. १६ व १७ व्या शतकांत हे लोक मुसुलमान बनले असावे अल्बेनियन मुसुलमानांत अद्यापि कांहीं ख्रिस्ती चालीरीति व संस्कार आहेत. स्कुटारी विलायतमध्यें शेकडा ५५ लोक या धर्माचे आहेत मध्य अल्बेनियांत बहुतेक लोक मुसुलमान आहेत. दक्षिणअल्बेनियांत ख्रिस्ती धर्माचे ६ लक्ष लोक आहेत पुन्हा मालसिया, जॅकोव्हा व मालसियाकच्छू या जातींत कॅथोलिक व मुसुलमान या दोन्ही धर्मांचे लोक आहेत मिरडाईट व मेंट हे लोक अनुक्रमें कॅथोलिक व मुसुलमान धर्माचे आहेत

*शिक्षण*—येथें बहुतेक लोक अशिक्षित आहेत. कांहीं राजकीय कारणामुळें अल्बेनियन भाषेंत शिक्षण देण्याची तुर्की सरकारनें मनाई केली होती. कांहीं मोठ्या गांवात कांहीं प्राथमिक व दुय्यम सरकारी शाळा आहेत. येथ्यांतील मशिदींत कुराण शिकवितात परंतु लिहिणें वाचणें शिकवीत नाहीत. श्रीमंत मुसुलमान घराण्यातील मुलें कान्स्टँटिनोपल व व्हिएन्ना येथें शिक्षणास जातात. स्कुटारी येथें जेसुईट लोकांचें एक विद्यालय व शाळा आहे. फ्रान्सीसिकन लोकांच्या कांहीं प्राथमिक शाळा आहेत. यांत इटालियन भाषा बोलतात. दक्षिण अल्बेनियांतील मोठ्या गावांत ग्रीक प्राथमिक शाळा आहेत. कोरिट्झा येथें १८९१ सालापासून एक मुलींची शाळा उत्तम चालली आहे.

*भाषा*—या द्वीपकल्पांतील मूळ भाषा ग्रेसोइलिरियन भाषासमूहांतली आहे. ती आर्यन वंशाची आहे हें म्हणणें बहुतेकांना मान्य आहे. या भाषेचीं मूळरूपें व त्यांतील फरक हे समजण्यास कांहींच मार्ग नाहीं. या भाषेंत ग्रीक लॅटिन, इटालियन, तुर्की व स्लाव्ह शब्द येतात. लॅटिन व ग्रीक भाषेशीं तुलना करून पाहिली तर ही भाषा मूळ आर्य-भाषेपासून निघाली असावी. वाङमयाचा जास्त फैलाव न झाल्यामुळें ह्या भाषेच्या एकमेकांशीं अगदीं विसदृश अशा उपभाषा झाल्या आहेत. घेग व टोस्क लोकांच्या भाषा परस्परास मोठ्या कष्टानें कळतात. घेग लोक लॅटिन लिपि व टोस्क लोक ग्रीक लिपि उपयोगांत आणतात. गेल्या दोन शतकांतील वाङ्मय म्हणजे भाषांतर व पारमार्थिक पुस्तकें होय. गिरॉलॅमो डी रदा हा प्रसिद्ध कवि, व भाषाशास्त्रज्ञ असून यानें प्रचलित दंतकथांचा संग्रह केला.

*प्राचीन अवशेष*—अल्बेनियांत बरेच प्राचीन अवशेष असून त्यांचें संशोधन अद्यापि झालें नाहीं. इंदनला कांहीं भव्य इमारतींचे अवशेष दृष्टीस पडले. एकंदरीत असें दिसून येतें कीं, येथें रोमन संस्कृतीचाच अंमल जास्त पगडा बसला होता. प्रसिद्ध डायरॅचियमचा फारच थोडा मागमूस लागतो. डोडोना येथील अवशेष महत्वाचे आहेत. मध्यकालीन स्केंडनबर्गच्या किल्ल्याचे–म्हणजे क्रोइआ येथील–अवशेष प्रेक्षणीय आहेत.

*मध्ययुगींतील इतिहास*—रोमन साम्राज्याचे तुकडे पडल्यानंतर अल्बेनियन लोकांचा देश बायझन्टाइन साम्राज्यास जोडला गेला. ४ थ्या व ५ व्या शतकांत गॉथ लोकांनीं हा देश अगदीं उध्वस्त करून टाकला. इ. स ५३५ त जस्टिनियननें हा देश पुन्हां काबीज केला. बल्गेरियन लोकांनीं ८६१ त दक्षिणेकडचा भाग जिंकून घेतला. झार सायमननें (८९३–९२७) सर्व्हियन लोकांचा पराभव करून डुराझोशिवाय सर्व प्रदेश आपल्या अंमलाखालीं आणला. सायमनच्यानंतर शिशमननें आपलें घराणें स्थापिलें. शिशमनचा मुलगा सॅम्युएल यानें डुराझो घेऊन सर्व द्वीपकल्पावर सत्ता बसविली परंतु १०१४ त दुसऱ्या बेसिलनें त्याचा पराभव केला. १०८१ त नॉर्मन लोकांची सत्ता येथें स्थापन झाली त्यांच्यानंतर पुन्हां बायझन्टाइन सत्तेचा उत्कर्ष झाला. धर्मयोध्यांनीं कॉन्स्टँटिनोपल घेतल्यावर एपायरस येथें मायकेल कॉमननेसच्या नांवाचें घराणें स्थापन झालें. १३१८ पासून १३५८ पर्यंत ऑरसिनी घराण्यानें राज्य केलें मध्यंतरीं १२७१ पासून १३७८ पर्यंत मध्य अल्बेनियांत सिसिलीयन राजघराणें स्थापन होऊन त्याच्या राज्यास 'अल्बेनियाचें राज्य' म्हणत. ११८० च्या सुमारास वरच्या अल्बेनियांत सर्व्हियन सत्ता स्थापन झाली. त्याचा मोठा राजा स्टीफन डुशन (१३३१–५८) याच्या अंमलाखालीं सर्व अल्बेनिया होता.

*अल्बेनियन सत्तेचा काळ*—डुशनच्या मृत्यूनंतर सर्व्हियन साम्राज्याचे तुकडे पडून अल्बेनियांत लहान लहान देश राज्यें उदयास आलीं. वरच्या अल्बेनियांत बालशी घराण्याची सत्ता होती. उत्तरेकडील भागांत म्हणजे अल्बेनियाच्या राज्यावर प्रथम थोपिया घराणें व नंतर कॅस्ट्रिओटा घराणें राज्य करूं लागलें. याच घराण्यांत स्कँडरबर्ग झाला १४ व्या शतकाअखेरीस उत्तरेकडील डोंगराळ प्रदेशांतून अल्बेनियन लोक दक्षिणेकडे वसाहत करूं लागले. त्याच शतकाच्या अखेरीस टोस्क लोकांच्या वसाहती मोरिआ, ॲटिका व बिओशिआ येथें स्थापन झाल्या. १४ व्या शतकाच्या अखेरीस व्हेनेशिअन लोकांनीं स्कुटारी वगैरे ठिकाणीं व इतर अल्बेनियांत आपली सत्ता स्थापन केली.

*तुर्की सत्तेचा काळ*—इ. स. १४३१ त आयानिना घेऊन तुर्कांनीं अल्बेनियांत प्रवेश केला. याचवेळीं या देशाच्या इतिहासांत अगदीं पहिल्यांदा संस्थानिक राजे प्रसिद्ध जॉर्ज कॅस्ट्रिओटा याच्या अधिपत्याखालीं गोळा झाले. त्यांनीं १४४४ ते १४६६ पर्यंत तुर्की सत्तेचा प्रतिकार केला. नंतर व्हेनेशियन लोकांनीं तुर्कांबरोबर बरेच सामने दिले.परंतु १५७१ त ॲंटिव्हेरी व डलसिग्नो हे दोन प्रांत तुर्कांच्या हातांत पडून व्हेनेशियन सत्तेचा नायनाट झाला. बऱ्याच लोकांनीं मुसुलमानी धर्माचा स्वीकार केला तरी देखील सुलतानची सत्ता केव्हांहि चांगली बसली नाहीं. नेहमीं तुर्क व अल्बेनियन लोक यांत लढा चालू असे. १७ व्या शतकाच्या अखेरीस तुर्की सत्तेस उतरती कळा लागल्यामुळें या भागांत बराच धुमाकूळ माजला. १७६० मध्यें स्कुटारीचा पाशा महंमद बुशत यानें वरच्या अल्बेनियांत स्वतंत्र राज्य स्थापिलें. त्याचप्रमाणें दक्षिण अल्बेनियांत टेपेलेनचा अलीपाशा यानें आपली सत्ता स्थापिली. परंतु १८२२ त तुर्की फौजेनें याचा पराभव केला. नंतर लवकरच स्कुटारी येथील राजसत्ताहि संपुष्टांत आली.

आपल्या सुधारणांना अल्बेनियन लोकांनीं विरोध केल्यामुळें दुसऱ्या महंमदानें सर्व देश उध्वस्त केला नंतर बर्लिनच्या तहापर्यंत (१३ जुलै १८७८)कोणतीहि राजकीय

पडामोड झाली नाहीं. यावेळीं आपला देश ऑस्ट्रिया-हंगेरी सर्व्हिया व माँटेनिग्रो यांना देऊं नये म्हणून बरीच चळवळ होऊन प्रिझरेन येथें अल्बेनियन-संघ स्थापन झाला. याला तुर्की सरकारची आतून फूस होती. या संघाचे प्रयत्न यशस्वी होऊन प्लाव्हा व गुसिने हे दोन जिल्हे अल्बेनियास परत मिळाले व माँटेनिग्रोला डलसिग्नो जिल्हा त्याच्याऐवजीं देण्यात आला. नंतर लगेच तुर्कांना देखील अल्बेनियन लोकांनीं आपलें स्वातंत्र्य-तेज दाखविलें, परंतु दरविशपाशानें अल्बेनियन लोकांचा डलसिग्नो येथें पराभव करून संघ मोडला. ग्रीसला मिळालेल्या देशाविरुद्ध चळवळ करण्यासाठीं दक्षिणेकडे असाच संघ स्थापण्यात आला. १९०३ सालीं वायव्य अल्बेनियात बंड झालें, परंतु तुर्कांनीं तें लगेच मोडलें. वरील चळवळींना राष्ट्रीय स्वरूप अगदींच नव्हतें. परकीय देशांत राहणाऱ्या अल्बेनियन लोकांनीं राष्ट्रीय भावना सर्वत्र पसरविण्याची खटपट सुरू केली असून ब्रूसेल्स, बुखारेस्ट व अथेन्स येथें संस्थाहि स्थापन केल्या आहेत. स्थानिक अगर जातीचे हक्क राखण्याखेरीज इतर बाबतींत अल्बेनियन लोकांचें ध्येय व तदर्थ प्रयत्न हे एकच आहेत याची जाणीव नसावी असें दिसतें. शिक्षणाचा चांगला फैलाव झाल्याखेरीज देशासंबंधीं कल्पनांचा फैलाव होणार नाहीं. १९०८पर्यंत तरी या तऱ्हेनें काहींच प्रगति झाली नव्हती.

१९०८ पर्यंत अल्बेनियाच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं आपलें धोरण पुढीलप्रमाणें ठेविलें होतें. (१) अल्बेनियन लोकांमध्यें स्वतंत्र राष्ट्रीय भावना जागृत होईपर्यंत आटोमन साम्राज्य कायम ठेवणें व (२) मध्यंतरीं अल्बेनियापुरती स्वायत्तता संपादन करणें या फेबियन धोरणाच्या पुरस्कर्त्यांपैकीं फेरिद-पाशा व इस्मायल केमल हे प्रमुख होत; परंतु यांना पुढें उद्भवलेल्या गोष्टींवर नियंत्रण घालतां आलें नाहीं. १९०८ मध्यें तरुण तुर्कांनीं राज्यक्रांति घडवून आणली. त्यांत अल्बेनियातील डोंगर भागांतील राजे सामील झाले व कान्स्टांटिनोपलचा सुलतान पदच्युत केला गेला. या राज्यक्रांतीचा अल्बेनियन लोकांनीं सत्कारच केला, कारण त्यायोगें स्वतःस स्वायत्त कारभाराचा हक्क व स्वभाषेंतून शिक्षण देण्याची सवलत मिळण्याची त्यांना आशा होती. १८७९-८६ या सालांत अशाच संधीचा फायदा घेऊन स्वभाषेचें शिक्षण व वाङ्मय यांना त्यांनीं चांगलें उत्तेजन दिलें होतें, पण या बाबतींत तरुण तुर्कांनीं त्यांची निराशा केली व यूनियन अँड प्रोग्रेस कमिटीनें पुनः तुर्कस्तानांतील अंकित लोकजातींमध्यें ऑटोमनी संस्कृतीचा प्रसार करण्याचें कार्य हातीं घेऊन नुकत्याच उघडलेल्या अल्बेनियन भाषेच्या शाळा बंद केल्या, अल्बेनियन वृत्तपत्रांना परदेश गाठण्यास भाग पाडलें व त्या लोकांची राष्ट्रीय चळवळ बंद पाडली. तुर्की लिपी वापरून अल्बेनियन भाषा शिकविण्याची परवानगी देण्यांत आली व तशीं क्रमिक पुस्तकें तयार करविलीं, पण तीं अल्बेनियन लोकांनीं सार्वजनिक स्थळीं राशीराशीं जाळून टाकलीं.

**१९११-१२ चें बंड.**—तरुण तुर्कपक्षानें डोंगरी जातींवर नवे कर बसविल्यामुळें त्या जातीच्या लोकांनीं बंड केलें व तें तुर्कांनीं निष्ठुर उपाय योजून मोडलें व तेथील लोकांना निःशस्त्र केलें. कित्येक गावच्यागाव उध्वस्त केले इतकेंच नव्हे तर बंडखोराच्या पुढाऱ्यांना फार चीड आणण्यासारखी फटक्यांची शिक्षा दिली. मुसुलमान लोक या उपायांनीं दडपले गेले; पण १९११ मध्यें मालसिया व माथे जातीच्या रोमन कॅथॉलिक लोकांनीं बंड केलें. त्यांना माँटेनिग्रिअन लोकांनीं उत्तेजन दिलें. बंड मोडण्याकरितां टोरगुट शेव्हकेट पाशा मोठ्या सैन्यानिशीं आला; पण त्यालाच हार खावी लागली. शिवाय माँटेनिग्रोविरुद्ध मोहीम करूं नये म्हणून रशियानें तुर्कांना तंबी दिली. यामुळें बंडखोरांचा वरचष्मा होऊन त्यांनीं आपलीं गाऱ्हाणीं व मागण्या एका जाहीरनाम्यानें पुढें मांडल्या. त्यांत अल्बेनियाला राष्ट्र म्हणून मान्यता आणि शाळांत व स्थानिक कारभारांत अल्बेनियन भाषेला परवानगी या मागण्या मुख्य होत्या.

*बाल्कन युद्ध-१९१२-१३.*—तुर्कांनीं स्कुटारीच्या आर्चबिशपला येनकेनप्रकारेण वश करून घेऊन मध्यस्थ नेमण्याचा प्रयत्न केला; त्यानें ती गोष्ट साफ नाकारली, त्यामुळें पुढल्या वर्षी तुर्कस्तान इटालीबरोबरच्या युद्धांत गुंतला असतां हें बंड अधिकच जोरावलें. तुर्कांनाहि दुसरा उपाय न राहिल्यामुळें त्यांनीं माघार घेतली आणि अल्बेनियन लोकांच्या मागण्या कबूल केल्या. अल्बेनियाच्या राष्ट्रास मान्यता ही यांपैकीं विशेष गोष्ट होय.

या अल्बेनियनांच्या जयामुळेंच उत्तेजन मिळून बाल्कन-लीगनें तुर्कस्तानबरोबर १९१२ मध्यें युद्ध पुकारलें. या युद्धांत अल्बेनियानें काय धोरण ठेवावें हें ठरविण्यास पुरेसा अवसर न मिळाल्यामुळें अल्बेनियांतील कांहीं लोक माँटेनेग्रिन लोकांना तर कांहीं तुर्कांना मिळाले व बाकीचे तटस्थ राहिले. पण यामुळें सर्व्हियन व माँटेनेग्रिन लोकांनीं अल्बेनियावर हल्ला केला. उलटपक्षीं तुर्कांतर्फे इस्मायेल केमल अल्बेनियनांच्या मदतीला आला. त्यानें अल्बेनियाच्या सर्व भागांतील प्रमुख सरदारांची सभा भरवून अल्बेनियाचें स्वातंत्र्य व तटस्थवृत्ति जाहिरनामा काढून प्रसिद्ध केली. याला आस्ट्रो-हंगेरीची व इटालीची संमति होती; पण रशियाचा विरोध होता त्यामुळें युद्धाचा वणवा यूरोपभर पसरणार अशी भीति उत्पन्न झाली. तेव्हां मध्यस्थी करण्यास इंग्लंडच मध्यस्थ या नात्यानें काहिंसें योग्य होतें व त्याप्रमाणें सर एडवर्ड (नंतर लॉर्ड) ग्रे यांच्या खटपटीनें लंडन येथें परराष्ट्र वकिलांची परिषद भरून तडजोड झाली व अल्बेनियाची स्वायत्तता मान्य करण्यांत आली आणि सरहद्दी ग्रेट पावर्सनीं (मोठ्या राष्ट्रांनीं) ठरवाव्या असें ठरलें. नंतर कमिशन नेमून या हद्दी कायम करण्यांत आल्या.

बी ह च्या वि रु य म ची का र की र्द.—अल्बेनिया हें स्वतंत्र राष्ट्र असल्याचें मान्य करण्यात आलें व तेथें एक परकी राजा आणून गादीवर बसवावा असें ठरलें शिवाय अल्बेनियाच्या राज्यकारभारावर देखरेख ठेवण्याकरिता दहा वर्षांच्या मुदतीचें एक कमिशन नेमण्यात आलें. त्यात ग्रेट पॉवर्सतर्फे एकेक व अल्बेनियातर्फे एक असे प्रतिनिधी नेमण्याचें ठरलें

प्रमुख राष्ट्रांच्या ( ग्रेटपावर्स ) आपसातील चुरशीमुळें अल्बेनियाकरिता राजा निवडण्याचें काम अवघड गेलें पण अखेर वीडच्या विल्यमची निवड कायम करण्यात आली १९१४ जानेवारीत सार्वराष्ट्रीय कमिशननें राज्यकारभार आपल्या हातीं घेतला, व मार्चमध्यें विल्यम राज्यारूढ झाला. तथापि राज्यात अंतस्थ बखेडा मोठाच माजला होता. तुर्कस्तान, ग्रीस, इटाली व आस्ट्रिया यांची गुप्त ढवळाढवळ चालू होती. विल्यम राजावरहि सर्व प्रजा अनुरक्त नव्हती, कारण थोडक्या वेळात लोकप्रीति संपादण्यासारखे विशेष गुण त्याच्या अंगीं नव्हते. विल्यमनें इसद पाशा यास युद्ध मंत्री नेमलें होतें पण तोच इटालियनांच्या मदतीनें गुप्त कारस्थानें करीत होता त्यामुळें राजपक्षाचे लोक इसदविरुद्ध गुप्त कट करीत होते. अखेर मे महिन्यात इसदच्या घराला बंडखोरांनीं वेढा दिला. त्यावर मारा करण्यास विल्यमनें परवानगी दिली. त्यामुळें चिडून सर्व राष्ट्रच बंडात सामील झालें. अखेर सप्टेंबरमध्यें तो देश सोडून गेला.

जा ग ति क यु द्ध.—या सुमारास यूरोपात मोठें युद्ध सुरू झालें, यामुळें इतर राष्ट्रांचें अल्बेनियाकडे फारसें लक्ष नव्हतें. त्यामुळें अल्बेनियाचे पुन्हा तुकडे पडून निरनिराळ्या राज्यसत्ता प्रस्थापित झाल्या. मध्यभागात इसदपाशानें आपली सत्ता स्थापिली. दक्षिणभाग प्रथम ग्रीकांच्या व १९१५ पासून इटालियनांच्या हातीं गेला. स्कुटारीचा भाग सर्ब लोकांनीं स्वसत्तेखालीं घेतला, व बाकीच्या भागात निरनिराळे स्थानिक राज्यकर्ते राज्य करूं लागले इसदपाशाचा बेत अल्बेनियाचे तीन तुकडे करून ग्रीस, सर्ब व स्वतः एकेक भाग घेऊन इटालीची आधिसत्ता मान्य करण्याचा होता. लंडनच्या करारानें अल्बेनियावरील इटालीची साम्राज्यसत्ता मान्यहि केली व त्यामुळेंच पुढें १९१८ च्या तहपरिषदेंत अल्बेनियाचा प्रश्न सोडविण्यास मोठ्या अडचणी उत्पन्न झाल्या. १९१७ मध्यें इटालीनें अल्बेनियाचें इटालीच्या संरक्षणसत्तेखालीं स्वातंत्र्य जाहिर केलें होतें. त्यामुळें १९२१ मध्यें दोस्त राष्ट्रांनी स्कुटारी येथें इटालीचें सैन्य राहूं दिलें. पण देशाची विभागणी करण्याच्या सूचनेला प्रेसिडेंट विल्सननें हरकत केली दरम्यानच्या अल्बेनियात सर्व राष्ट्रावर सत्ता चालविणारें एकच रिपब्लिक स्थापण्याचा प्रयत्न सुरू झाला, व इटालियन सैन्याला देशाबाहेर हाकून देण्याकरिता त्याजबरोबर चामनाहि सुरू झाला. १९२०च्या फेब्रुवारीमध्यें सुलेमान बेडेल्हिना याच्या अध्यक्षतेखालीं रिपब्लिक सुरू झालें अल्बेनियन सैन्याला इटालीविरुद्ध जयहि मिळत गेला, व इटालींत गिओलिटीचा पक्ष अधिकारारूढ झाल्यावर इटालीनें अल्बेनियाचें पूर्ण स्वातंत्र्य मान्य करून स्वतःचें सैन्य काढून नेण्याचें कबूल केलें. १९२१ च्या जानेवारीत पूर्वी विभागणी करू इच्छिणाऱ्या राष्ट्रांचीहि संमति मिळून अल्बेनियाला राष्ट्रसंघाचें सभासदत्व, प्राप्त झालें.

[ सं द र्भ ग्रं थ.—डरहाम—दि स्ट्रगल फॉर स्कुटारी; पीकॉक—अल्बेनिया; पीयर्स-टर्की अँड इट्स पीपल. ए. ब्रि. स्टेटसमेन्स ईयर बुक. लीके—ट्रॅव्हेल्स इन् नार्दर्न ग्रीस. टोझर—रिसेर्चेस इन दि हायलंड्स ऑफ टर्की. ]

**अलबेरोनि गिथुलिओ**, ( १६६४–१७५२ ) एक स्पॅनिशइटालियन मुत्सद्दी व कार्डिनल याचा बाप माळी होता हा पहिल्यानें पायसेंझा येथील ख्रिस्ती देवालयात छडीदाराचें ( व्हर्जर ) काम करीत असे पुढें यानें बार्नि या बिशपची मर्जी संपादून धर्मोपासकाची जागा पटकाविली यानंतर तो आपल्या आश्रयदात्याच्या मुलाबरोबर रोम शहराला गेला. स्पेनच्या गादीच्या वारसाहक्काबद्दल झालेल्या युद्धात यानें इटालींतील फ्रेंच सेनापतीची कामगिरी बजाविली व या योगें याचें राजकारणपटुत्व लोकांच्या निदर्शनास आलें. १७७१ त हा फ्रेंच सेनापति व्हेंडोम याचा चिटणीस होऊन त्याच्याबरोबर स्पेनमध्यें गेला. यानंतर दोनवर्षांनी याला काउंट (सरदार) करून पाचव्या फिलिपच्या दरबारात पार्माचा प्रतिनिधि म्हणून नेमण्यात आलें. पुढें स्पेनच्या बादशहाचें पार्माच्या एलिझाबेथ फर्नेस इच्याशीं लग्न झाल्यावर हा तिच्या वतीनें बऱ्याच योग्यतेस चढला. हा अनुक्रमें राजाच्या सल्लागार मंडळाचा सभासद, मालागाच्या धर्मगुरूच्या जागावरून चढत जाऊन १७१५ त मुख्य प्रधान व कार्डिनल झाला. स्पेन देशातील अंतस्थजकातीचीं ठाणीं उठवून त्याचें सांपत्तिक पुनरुज्जीवन करणें, इंडीज बेटांतील व्यापारावरील निर्बंध काढून टाकून तेथें खुला व्यापार सुरू करणें, आरमाराची पुनर्घटना करणें, या सुधारणा करून जो द्रव्यसंचय होईल त्याचा विनियोग पाचव्या फिलिपच्या इटाली व फ्रान्स भागांतील आकांक्षा पूर्ण करण्यात करावा असे याचे बेत होते. परंतु याचा वरील बेत राजाच्या व राणीच्या उतावळेपणानें सिद्धीस न जातां उलटें स्पेन देशावर संकट ओढवलें व याकरितां १७१९ मध्यें याला हद्दपार व्हावें लागलें. यानंतर हा इटालींत जाऊन राहिला. तेथें याचें १३ व्या इनोसेंट पोपच्या निवडणुकीत अंग होतें. १७३० त ७व्या क्लेमेंट पोपनें याला आपला राव्हेनाचा प्रतिनिधि नेमलें १७४० मध्यें हा पायसेंझा येथें जाऊन राहिला. तेथें याला ७ व्या क्लेमंटनें महारोग्यांच्या दवाखान्याचा व्यवस्थापक नेमलें होतें. पण पुढें यानें हा दवाखाना मोडून तेथें ७० गरीब विद्यार्थ्यांची सोय होईल

असें उपाध्येपणा शिकविण्याकरिता एक विद्यापीठ स्थापन केलें. हा १९ जून १७५२ रोजी मरण पावला यानें आपल्या मृत्युपश्चात आपण काढलेल्या संस्थेस सहा लक्ष डुकॅटची देणगी दिल्याचें लिहून ठेवलें होतें

[ ए. ब्रि. अल्बेरोनीचें १७१९ पर्यंतचें चरित्र त्याच साली हेग येथें जीनरूसेट डिमीसीनें प्रसिद्ध केलें. पिआसेंझा येथील अल्बेरोनीनें स्थापिलेल्या कॉलेजात शिकलेल्या स्टीफॅनो बर्सानी नावाच्या एका धर्मोपदेशकानें १८६१ मध्यें याचें आयुष्य स्वतः रेखाटलें. अल्बेरोनीचीं पत्रेंहि १८९२ साली प्रसिद्ध झाली आहेत ]

**अल्युमिनियम**—(स्फट; स्फ २७॰) रासायनिक धातुरूप मूलद्रव्य. ही धातु शुद्ध स्वरूपात असंयुक्त अशी कधींच सांपडत नाहीं. तर मुख्यतः सिकित (सिलिकेट) रूपानें इतर पदार्थांशीं संयुक्त अशा स्थितींत सर्वत्र आढळून येते. अल्युमेन ( तुरटी ) या लॅटिन शब्दावरून अल्युमिनियम हें नांव साधलेलें आहे; व त्यास अनुसरून स्फटिकी ( तुरटी ) या शब्दापासून साधलेला स्फट हा शब्द अल्युमिनियम साठीं मराठींत योजितात. इ. स.१८२७ त गॉटिंजन येथें एफ. व्होलर यानें पहिल्यानें ही धातु स्वतंत्र स्वरूपात तयार केली.

**अ शो धि त धा तु**—स्फटाचे नैसर्गिक मुख्य संयुक्त पदार्थ चार आहेत. प्राणिद (ऑक्साईडें), उत्प्राणिद(हायड्रॉक्साइड), सिकित व प्लविद. प्राणिदात कुरुंद ( $स्फ_2\ प्र_3$) हा मुख्य असून तो दक्षिण हिंदुस्थानात व युनायटेडस्टेटस मध्यें पुष्कळ प्रमाणावर सापडतो. त्यात स्फटाचें प्रमाण बरेंच मोठें आहे ( शें ५२.९ ) तरी धातु काढण्याकडे याचा उपयोग करीत नाहींत; याचें कारण त्याची भुकटी करणें फार जड जातें,एवढेंच नव्हे तर कुरुंद हा फार कठिण असल्यामुळें त्याचा हत्यारांना धार लावण्याकरिता फार उपयोग होतो व यामुळें त्याला चांगली किंमत येते. क्रायोलाइट (स्फ $प्ल_3$,५घुप्ल)हाहि स्वाभाविक स्थितींत सापडणारा संयुक्त पदार्थ आहे. हा स्फट व सिंधु याचा द्विप्लविद [डबल फ्ल्युओराइड ] असून तो फक्त ग्रीनलंडच्या पश्चिम किनाऱ्यावर सांपडतो. तेथून हा पदार्थ आणण्यास कठिण असल्यामुळें याच्या ऐवजीं दुसरे क्षार उपयोगांत येऊं लागले. हल्लीं हेरोल्ट–हॉल यानीं शोधून काढलेल्या रितींत क्रायोलाइटची द्रावक म्हणून जरूर असल्यास तें कृत्रिम रीतीनें तयार करितात. सर्व प्रकारची माती नांवाला मात्र स्फट सिकिताची बनलेली असते केओलाइन किंवा चिनी माती ( $स्फ_2प्र_3$. २ $सिप्र_2$.$२उ_2प्र$)चे थर सर्व जगभर सापडतात. व त्यांत अजल ( अनहायड्रस ) स्थितीत शें. २४.४ धातु सापडते, पण सामान्य मातींत त्या ऐवजीं राट, मग्न व अल्क असून वाळूचें प्रमाण कधीं कधीं शें ७० पर्यंत असतें कोणत्याहि खनिज सिकितापासून शुद्ध स्फट भस्म ( अल्युमिना ) काढण्याची युक्ती अद्याप सांपडली नसल्यामुळें स्फट तयार करण्याकरितां केओलिनचाहि उपयोग होत नाहीं. बॉक्साइट ( $स्फ_2प्र_3$,$२उ_2प्र$ ) हें स्फटाचें सजल प्राणिद आहे. हें पुष्कळ ठिकाणीं सापडतें, परंतु याचे मुख्य थर फ्रान्सच्या दक्षिणेस, आयर्लंडच्या उत्तरेस व उत्तरअमेरिकेंत अलबामा जॉर्जिया, व आरकानसस येथें आहेत.

**वि द्यु द्वि श्ले ष णा नें स्फ ट क र ण्या ची कृ ति.**—विद्युच्छक्तीनें स्फट तयार होऊं लागण्यापूर्वी त्या धातूचें हरिद ( क्लोराइड ) व क्रायोलाइट या दोन पदार्थांपासून ती धातु तयार केली जात असे. हल्लींच्या पद्धतींचें पेटंट १८८६ व १८८७ या वर्षी अमेरिकेंत सी. एम् हॉल यानें व इंग्लंड आणि फ्रान्स या देशात पी. टी. एल. हेरोल्ट यानें घेतलें. हेरोल्टचा विद्युद्घट लोखंडी किंवा पोलादी चौरस पेटी सारखा असून त्याच्या आतून कोळशाची पट्टी ठासून बसविलेली असते. तळाला ओतीव लोखंडाचा पत्रा असून तो विद्युज्जनकाच्या ऋणध्रुवाला लावलेला असतो; [परंतु तो खरा ऋणध्रुव नसून भाड्याच्या तळाशीं पूर्वी तयार झालेल्या धातूचा वितळलेला थर हें कार्य करतो] धनध्रुव कोळशाच्या जाड पट्याचा केलेला असून तो वरून आंत सोडण्याची व्यवस्था केलेली असते. विद्युद्घटांत क्रायोलाइट घालून विद्युत्प्रवाह सुरू करितात. व तें वितळल्यानंतर काम चालू असेपर्यंत वरचेवर स्फटभस्मा[ ॲल्युमिना ]ची भुकटी टाकीत जातात प्रवाहाचा जोर दर घटामागें ३ तें ५ व्होल्ट असून तो १० किंवा १२ घटाच्या मालिकेंतून जातो. विद्युत्प्रवाहाचें काम दोन प्रकारचें असतें. (१) स्फटप्राणिदाच्या रासायनिक आकर्षणाला प्रतिरोध करणें,(२) विद्युद्विश्लेषणाचा प्रतिबंध दूर करणें व त्या धरोबर त्याचें उष्णमान वाढविणें शक्तीचा कांहीं भाग या दुसऱ्या कामाकडे खर्च झाल्यामुळें, फक्त उरलेल्या शक्तीचा रासायनिक कामाकडे उपयोग होतो व क्रायोलाइट मधील स्फटप्लविदाचें विघटण करण्याकरितां ४ व्होल्टची जरूर असल्यामुळें भाड्यामध्यें स्फटभस्माचें परिमाण भरपूर असल्याम प्लविदावर कांहींच परिणाम होत नाहीं यामुळें एक वेळा क्रायोलाइट भर ल्यानंतर तें वरचेवर भरण्याची जरूर नसते,व त्यांतील सिंधु व इतर परक्या पदार्थांचा संसर्ग स्फटाला लागत नाहीं,व फक्त स्फटभस्मच काळजीपूर्वक शुद्ध करून घेतलें म्हणजे काम होतें. या सर्व क्रियेंत स्फटभस्मा ($स्फ_2प्र_3$)चें विघटन होऊन ऋणध्रुवाजवळ स्फट जमतें आणि प्राणिदाचा धनध्रुवाशीं संयोग होऊन कर्बकप्राणिद तयार होतो. त्याचा जाळून कर्बद्विप्राणिद करण्यात येतो. तत्वतः ५८ भार स्फट उत्पन्न होताना ३६, भार कर्बाचें प्राणिदीकरण व्हावें पण वस्तुतः ज्या प्रमाणात धातूचा थर बसतो त्याच प्रमाणात धनध्रुवाचा क्षय होतो. स्फट ही धातु फार हलकी असल्यामुळें ज्यामध्यें ती लवकर बुडेल असें योग्य द्रावक निवडण्याचें काम फार कुशलतेनें करावें लागतें. त्याकरितां वितळलेल्या धातूचें विशिष्ट गुरुत्व २.५४ व स्फटभस्मानें

संपृक्त (सॅचुरेटेड) अशा वितळलेल्या क्रायोलाइटचें विशिष्ट गुरुत्व २·३५ असल्यामुळे त्याचाच उपयोग करण्यांत येतो.

*गु ण ध र्म.*—स्फट ही कथलासारखी पांढरी धातु आहे अशुद्ध असल्यास किंवा हवेंत फार वेळ राहिल्यास तिजवर किंचित आमळी छटा येते. ओतीव धातूचें विशिष्टगुरुत्व २.६ व पत्र्याचें २.७ असतें. स्फट ६२६° शला वितळतें. सर्व धातूंत घनवर्धनीयतेमध्यें याचा तिसरा व *ओढून तार काढण्याच्या गुणात म्हणजे तन्यतेत* (डक्टिलिटि) ६ वा नंबर लागत असून त्याचा ·००००२५ इंच जाडीचा पत्रा व ·००४ इंच जाडीची तार निघते. अगदीं शुद्ध असतां तें कथलापेक्षांहि कठिण असून ठोकल्यानें त्याचा कठिणपणा वाढतो. ह्या धातूंत चुंबकीय गुण नाहींत. घनतेंत याचा अल्क धातूंच्या खालोखाल नंबर लागत असल्यामुळें हें अनुकूल परिस्थितींत प्राण व हरवायूंशीं फार जलद संयोग पावतें. याचा लांबीचा प्रसरण गुणक दर १° श. ला ·००००२२२ (रिचर्ड्स) आहे. ० व १०० च्या दरम्यान त्याची सरासरी विशिष्ट उष्णता ०·२२७ व घनीभूत होण्याच्या वेळची अनुद्भूत उष्णता ( लेटंट हीट ऑफ फ्यूजन ) १०० कॅलरी आहे. सारख्या वजनाचें तांबें व स्फट घेतलें असतां, याची विद्युद्वाहक शक्ति तांब्याच्या दुप्पट व दोन्ही धातू सारख्या *आकारमानाच्या घेतल्या असतां* सुमारें $\frac{2}{3}$ पट आहे. दुसऱ्या धातू बरोबर घेऊन त्याशीं तुलना करितां ताण ( टेन्शन ) सहन करण्यांत ओतीव पोलाद व स्फट ब्रॅंझ या दोनच धातू स्फटपेक्षां वरचढ आहेत. हवेंत किंवा पावसांत ठेविली असतां ही धातु कांहींशीं गंजते, पण हें गंजण्याचें प्रमाण लोखंड, तांबें किंवा पितळ या धातूंपेक्षां फारच कमी असतें.( बाजारांत मिळणाऱ्या विद्युद्विश्लेषणप्राप्त स्फटामध्यें शें. ०.४८ सिक ( सिलिकन ) व ० ४६ लोह असतें. ह्या धातूवर ऊन किंवा थंड पाण्याचा कांहींच परिणाम होत नाहीं. गंधकयुक्त उज्ज्वापासून त्याला कांहीं अपाय होत नसल्यामुळें धुकट हवेंत किंवा अशुद्ध-धुराचें दिव असलेल्या ठिकाणीं या धातूचे जिन्नस काळवंडत नाहींत निरिंद्रिय अम्लांपैकीं उदहराम्लाखेरीज इतर कोणत्याहि अम्लाची त्यावर म्हणण्यासारखी प्रतिक्रिया होत नाहीं. शिरक्यासारखीं सेंद्रिय अम्लें, मीठ, अशाचे घटक पदार्थ, किंवा अन्न चांगलें रहावें व नासूं नये म्हणून उपयोगांत आणलें जाणारे पदार्थ या बरोबर ही धातु रासायनिक रीत्या स्वच्छ मोठ्यांत बराच वेळ उकळली असतां फारच प्रमाणांत द्रवते. पण सामान्य व्यवहारांत स्फटाचीं भांडीं स्वयंपाकाकरितां उपयोगांत आणल्यास त्याचा म्हणण्यासारखा अंश अन्नाबरोबर जात नाहीं; व गेलाच तरी स्फटाचें क्षार तांबें किंवा शिसें यांच्याप्रमाणें विषारी नसल्यामुळें शरीरप्रकृतीवर त्यांपासून वाईट परिणाम फारच अल्प होतो.

स्फट धातूचा उच्च धनवैद्युत (इलेक्ट्रोपॉझिटिव्ह) धर्म फार महत्त्वाचा आहे उष्णमान बरेंच वाढविलें असतां ही धातु, बहुतेक सर्व धातूंच्या प्राणिदांचें विघटन करिते, म्हणून तिचा धातुकर्मविद्येंत (मेटॅलर्जींत) अतिशय उपयोग होतो लोखंड, पोलाद किंवा, पितळ ओततांना, ह्याच्या अत्यंत थोड्या मिश्रणानें (शेंकडा ६.००५) सर्व प्राणिदें निघून जातात व वितळलेली धातु चांगली पातळ होऊन पुन्हा घट्ट होतांना तींत छिद्रें रहात नाहींत. उलट पक्षीं, ह्याच्या धनवैद्युत धर्मामुळें, त्याचा उपयोग करितांना फार काळजी घ्यावी लागते. ओलाव्यांत, खाऱ्या पाण्यांत किंवा एखाद्या क्षयकारि ( कोरोसिव्ह ) पदार्थांत दुसऱ्या धातुबरोबर ही धातु ठेवल्यास, किंवा दुसऱ्या एखाद्या ऋण धातुबरोबर तिचें मिश्रण केलें असतां जोरदार चलद्विद्युद्विषयक क्रिया सुरू होऊन तें लवकर झिजतें, याकरितां मीठ वगैरे पदार्थ स्फटाच्या भांड्यांत ठेवूं नयेत. लोखंडाच्या किंवा तांब्याच्या खिळ्यांनीं रिबिट केलेल्या स्फटाच्या बोटी खराब होतात याचें कारण हेंच होय. त्याचप्रमाणें लोखंड, तांबें वगैरे धातूंप्रमाणें याला डाक बसत नाहीं. पण बहुतेक ठिकाणीं, दोन तुकडे जोडण्याकरितां दुसरीं साधनें उपलब्ध असल्यामुळें हा दोष विशेष महत्त्वाचा आहे असें मानण्याचें कारण नाहीं.

स्फटापासून पुष्कळ मिश्र धातू बनतात. त्यापैकीं *ज्यामध्यें इतर धातूंचें प्रमाण शेंकडा फक्त १ किंवा २ असतें* त्या स्फटाप्रमाणेंच हलक्या पण त्यापेक्षां पुष्कळच जास्त *कठिण व मजबूत असतात* पण दुसऱ्या धातूंचें प्रमाण शें. १० ते १९ असल्यास, मिश्र धातूंचे गुण सामान्यपणें त्याच्यासारखेंच पण थोडे सुधारलेले दृष्टीस पडतात. जडमिश्र धातूंत स्फटभास्र (तांबें शें. ९० ते ९७.५ स्फट शें. १० ते २.५) ही मुख्य असून स्फटाचें प्रमाण वाढेल त्याप्रमाणें तिची ताण सहन करण्याची शक्ति ( दर चौ. इंचास २० ते ४१ टनपर्यंत ) वाढते; व हवेनें किंवा खाऱ्या पाण्यानें ती खराब होत नाहीं किंवा झिजत नाहीं. तांब्र मिश्रित हलक्या धातूंत हें प्रमाण अगदीं उलट असतें; व त्याच्या अंगीं चलद्विद्युद्विषयक क्रियेला प्रतिरोध करण्याची शक्ति नसल्यामुळें, त्याचा फारसा उपयोगहि नसतो.

*उ प यो ग.*—*स्फटाचे उपयोग इतके आहेत कीं, ते सर्व येथें देणें शक्य नाहीं* याचा सर्वांत मोठा उपयोग लोखंड व पोलाद शुद्ध करण्याकडे होतो त्याचीं स्वयंपाकाकरितां भांडीं करण्याकडे सामान्य लोकांची अतिशय प्रवृत्ति आहे. पण एकदां खराब झाल्यानंतर तांब्यापितळेच्या भांड्यांप्रमाणें स्फटाचीं भांडीं सहज चकचकीत करतां येत नाहींत.

किंवा मातीप्रमाणें किंवा ओतीव लोखंडाप्रमाणें तें ठिसूळ नाहीं.

शिशाची किंवा दिलेल्या व तांब्या किंवा टिन कल्हईच्या ताब्यांच्या भांड्याप्रमाणें तें विषारी नाहीं; त्याला कांच बसविण्याची (एनॅमल करण्याची) जरूर नसते; टिनच्या सर्वंग भांड्याप्रमाणें त्याला गंज चढत नाहीं किंवा तें झिजत नाहीं; व दुसऱ्या पदार्थांच्या मानानें तें फारच हलकें असतें. उद्योगधंद्याच्या सर्व बाबतींत, व विशेषतः जेथें नेण्याआणण्याच्या सोयीसाठीं हलकेपणाला महत्त्व आहे अशा सर्व कामाकरितां उ० टॉर्पेडो बोटींतील इंजिनाच्या पायाकरितां, जहाजावर लाकडाच्या ऐवजीं आतल्या कामाकरितां, जहाजावर नेण्याच्या संपूर्ण बोटी करण्याकरितां, व मोटारचे भाग, हलवायाच्या कढया यासाठीं आणि रासायनिक कामाकरितां तांबें व पितळ यांच्या ऐवजीं याचाच उपयोग होऊं लागला आहे. आरमारी व लष्करी ख्यात्यांत वजन कमी करण्याकरतां, शिपायांना देण्याच्या सरंजामाकरितां, वगैरे त्या ठिकाणीं ही धातू वापरतात. सोलेन हॉफेन दगडाच्या ऐवजीं एक प्रकारच्या शिळाछापाकरितां याचा उपयोग होतो. तांब्याची महागाई वाढत चालल्यामुळें स्फटाचे विद्युद्वाहक प्रचारांत येऊं लागले आहेत. तांब्याच्या ०·१०० इंच जाडीच्या तारेतून जेवढा विजेचा प्रवाह जातो तेवढा प्रवाह नेण्याकरितां स्फटाची ०.१२६ इंच जाडीची तार लागते, पण तांब्याच्या मैलभर लांब तारेचें वजन १६२ पौंड व तेवढ्याच लांबीच्या स्फटाच्या तारेचें वजन फक्त ७९ पौंडच असतें. दोघांचा ताण सहन करण्याची शक्ति सारखीच आहे असें धरून चालल्यास, स्फट वापरल्यानें विद्युद्वाहकाचें वजन शें. ५२ कमी व पैलूदी शें. ६० जास्त होण्याचा संभव आहे आणि जाडी शें. २६ नीं जास्त होते. अलीकडील काळांत विद्युद्यंत्रांतील गुंडाळणी [वाइंडिंग] करण्याकरितां स्फटाच्या अनाच्छादित [उघड्या] पट्टीचा उपयोग करण्याचा प्रयत्न झालेला आहे. दोन पट्ट्यांच्या दरम्यान असलेलें ह्या धातूचें प्राणिद विद्युद्रोधकाचें काम करितें. स्फटाची किंमत तांब्याच्या दुपटीपेक्षां कमी असल्यास स्फट विद्युद्वाहक तेवढ्याच लांबीच्या तांब्याच्या विद्युद्वाहकापेक्षां स्वस्त पडतो, पण विद्युद्रोधकाची जरूर असेल तर, जाडी कमी असल्यामुळें, तांब्याचा तार वापरणें फायदेशीर असतें. पुष्कळ ठिकाणीं, जड कामावर व टेलिग्राफी आणि टेलिफोनी या कामाकरितां स्फटाचा उपयोग फार समाधानकारक रीतीनें केला जात असून जोड देण्याच्या कामांत प्रथम येत असलेल्या अडचणीहि अनुभवानंतर दूर झाल्या आहेत.

शेवटीं या धातूसंबंधीं दोन महत्त्वाचे मुद्दे सांगणें जरूर आहे. ह्या धातूचा सार्वत्रिक उपयोग होण्याचें मुख्य कारण म्हणजे तिचा हलकेपणा होय, तरी किंमत सांगतांना मात्र त्यासंबंधानें घोटाळा होण्याचा संभव आहे. कोणत्याहि धातूची आर्थिक किंमत तिच्या वजनावर अवलंबून असते, व औद्योगिक किंमत, बहुतेक ठिकाणीं आकारमानावर ठरविली जाते. इंजिनचा पाया (बेड प्लेट) जाड असेल तर तो १० हंड्रेडवेट वजनाच्या ऐवजीं ३० हंड्रेडवेट असण्यापासून कांहींच फायदा नाहीं, त्याचें वजन केवळ भारभूत होय. तांबें स्फटाच्या तिप्पट जड असल्यामुळें जेव्हां जेव्हां स्फटाची किंमत तांब्याच्या तिपटीपेक्षा कमी असेल तेव्हां अल्युमिनियम वापरणेंच स्वस्त पडतें. विद्युद्विलेपनप्राप्त स्फटाचा शोध एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकांतच लागलेला असल्यामुळें त्याच्या उपयोगासंबंधीं पूर्ण ज्ञान अद्याप झालेलें नसून, दिवसें दिवस ज्यास्त ज्यास्त कामाकडे त्याचा उपयोग होऊं लागला आहे.

स्फटाचे संयुक्त पदार्थ.—स्फटभस्म.–(ॲल्युमिना) किंवा स्फटप्राणिद (स्फ$_2$प्र$_3$) हा संयुक्त पदार्थ खनिज कुरुंदाच्या रूपानें आढळतो. तो फार कठिण असून त्यावर दुसरे पदार्थ घासले असतां ते झिजतात. रत्नें, इंद्रनीलमणि, पुष्पराग (टोपॅझ, पीतस्फटिक), नीलमणी व पाच हे त्याचेच स्फटिकमय प्रकार असून त्यांना निरनिराळ्या धातूंच्या प्राणिदाच्या योगानें रंग आलेले असतात. स्फटाचें उत्प्राणिद तापविलें असतां स्फटभस्म (अल्युमिना) हा पदार्थ पांढऱ्या भुकटीच्या रूपांत मिळतो. ही भुकटी आळली असतां घट्ट व कुरुंदासारखी कठिण होते. विद्युत् ज्योतीनें किंवा प्राणोज्जज्योतीनें ती वितळते, व थंड झाल्यानंतर बहुतेक वर दिलेल्या खनिज पदार्थांप्रमाणेंच स्फटिकाकार बनते. स्फटाचें द्रविद (फ्लुओराइड) टंकत्रिप्राणिदा (बोरॉन ट्रायॉक्साइड) बरोबर तापविल्यानें, स्फटाचें स्फुरित (फॉस्फेट) सिंधुगंधकिताबरोबर वितळविल्यानें; दाबाखालीं असलेल्या उदहराम्लवायूंत मंद तांबडा रंग येईपर्यंत स्फटभस्म तापविल्यानें; व शिशाच्या प्राणिदाबरोबर झगझगीत तांबडा रंग येईपर्यंत स्फटभस्म तापविल्यानेंहि स्फटिकाकार स्फटभस्म मिळतें. या प्रतिक्रिया फार महत्त्वाच्या आहेत कारण या अल्युमिनापासूनच पुढें कृत्रिम माणिक, किंवा इंद्रनीलमणि तयार करितां येतो.

स्फट उज्जित (अल्युमिनियम हायड्रेटस)—स्फट प्राणिदाचे उज्जमय कित्येक पदार्थ माहीत झालेले आहेत. त्यांपैकीं गिब्साइट [स्फ(प्रउ)$_3$], डायास्पोर [स्फ प्र (प्रउ)] व बॉक्साइट [स्फ$_2$प्र(प्रउ)$_4$] हे खनिज पदार्थांत सांपडतात. स्फटक्षाराच्या थंड द्रावणामध्यें अमोनिया घातल्यास स्फट उज्जित हा पदार्थ धुक्यासारख्या पांढऱ्या सांक्याच्या स्वरूपांत मिळतो. हा स्फट हरिदांत विरत नाहीं पण पालाश किंवा सिंधु उत्प्राणिदांत (हायड्रॉक्साइडमध्यें) विरतो. याचा रंग देण्याच्या कामांत फार उपयोग होतो.

स्फटाचे क्षार.—त्रिप्राणिदा (स्फ$_2$प्र$_3$) पासून होणारे क्षार स्फटिकाकारांत व इतर बाबतींत क्रुम (क्रोमिअम) व लोहिक (फेरिक) लोखंड यांच्या तत्सम क्षारांसारखेच असतात

स्फट हरिद (स्फह$_3$) हें स्फटाच्या राखास कोरड्या हराऱ्या प्रवाहात तापविलें असतां ऊर्ध्वपातन होऊन बाहेर पडतें स्फटहरिद हें पांढरें स्फटिकाकार घनद्रव्य असून त्याच्या वितळणाच्या बिंदूच्या किंचित् खालींच त्याची वाफ होऊं लागते संयोगाकरणाचा कारक म्हणून याचें सेंद्रियरसायन-शास्त्रांत फार महत्त्व आहे स्फटमग्रविंत (स्फ$_2$(मग्र)$_4$) हें ज्वालामुखी पर्वतासमिध किंवा स्फटाच्या दगडात सापडतें

स्फट सिकितें (सिलिकेटस), खनिज पदार्थांत विस्तृत प्रमाणावर विरारलेलीं असून तीं साधे दगड, रत्नें, पीत स्फटिक, वैडूर्य (बेरिल) चुनडी (गार्नेट) वगैरेंत सापडतात वैडूर्य व समुद्रपार रंग, हे पदार्थ स्फटसिकितें व सिधु सिकितें यांचे बनलेले असतात सर्व प्रकारच्या मातींत स्फट सिक्तिच असल्यामुळें, चिनी मातीच्या व इतर मातीच्या भाड्याच्या कारखान्यात त्याचें महत्त्व फार आहे स्फट दार्वित (ॲसिटेट) याचा रंगविण्याच्या व जलनिरोधी करण्याच्या कामीं उपयोग होतो.

अल्युमिनमग्राह्स—हा मिश्रधातु बहुतेक सोन्यासारखा दिसतो, परंतु त्याहून जास्त कठिण व हलका असतो नऊ भाग ताब्यात एक भाग स्फट धातु मिसळून हा मिश्रधातु तयार करितात लहान घड्याळाच्या डब्या, सांखळ्या व कांहीं अलंकार यापासून करितात मद आरक्तोष्ण मानापर्यंत उष्ण करून, नंतर थंड पाण्यात बुडवून याला पाणी देतात *अल्युमिनियम पहा*

अलूर—(मद्रास) नेलोर जिल्हा नेलोर तालुक्यातील एक गांव उ अ १४° ११' व पू रे. ८०° ३' लोकसंख्या (१९११) ८३२२ मोठ्या हिलीच्या उत्पन्नाचा हा गाव आहे इस्कपल्ली नांवाचा मिठाचा कारखाना येथून पाच मैलांवर आहे येथें डेप्युटी तहशिलदाराचें मुख्य ठाणें असतें

ॲलसेस्टर—(इंग्लंड) वारिकशायरच्या स्ट्रॅटफर्डऑन-ॲव्हन या पार्लमेंटरी विभागांत हीं एक बाजारी पेठ आहे. ग्रेट वेस्टर्न रेल्वेनें हे वॉरिकपासून १६ मैलांवर आहे लोकसंख्या (१९०१) २३०३ ॲव्हनची उत्तरेकडील उपनदी जी ॲरो ती व अल्नी नांवाचा एक लहान प्रवाह ह्यांच्या संगमाजवळ असलेल्या अरण्यमय टेकड्यांमध्ये हें वसलेलें आहे येथे सेंट निकोलसचें देवालय आहे येथें कित्येक स्मारक चिन्हांमध्यें हर्टफोर्डच्या दुसऱ्या मार्क्वेसला अर्पण करणाऱ्या शैल्प्रीच्या कामाचा उत्तम नमुना आहे येथें एक नगरभवन व एक मोफत प्राथमिक शाळा आहे. सुया तयार करणें, हत्यारें व मासकली बनविणें व दारू गाळणें हे मुख्य धंदे येथें आहेत

प्राचीन काळीं हें एक लहान रोमन ब्रिटिश ठाणें होतें. तिसऱ्या हेनरीच्या काळीं या 'मॅनॉर'चा कांहीं भाग गर वाल्टर बोचेंपनें विकत घेतला त्यानें बाजार व जिरीरांच्या प्रसंगीं मरवावयाच्या जत्रा स्थापिल्या व नंतर हेनरीच्या कारकीर्दीत हा मॅनॉर कन्यावशातील ग्रेव्हिलांकडे गेला इ स ११४० त येथें ॲव्हल्सेंच्या राल्फ बॉटेलेर यानें एक बेनीडिक्ट पथाचा मठ स्थापन केला त्याला ' चर्च ऑफ अवर लेडी ऑफ दि आइल '' हें नाव मिळालें पण पुढे १५३६ त इतर लहान घराबरोबर हाहि मठ पाडण्यात आला इ. स १८३० मध्यें येथें सुया तयार करण्याचा धंदा बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चालू होता (ए ब्रि)

अल्ह—महोबा (बुंदेलखंड) येथील राजपुत्र अल्ह व उदल हे बुंदेलखंडातील प्रसिद्ध वीर असून *त्यांच्या उत्पत्तीचा थोडक्यात वृत्तांत पुढील प्रमाणें आहे —*

चंदेलराजा परमार यानें सर्व हिंदुस्थान जिंकिलें, त्यानें जिंकिलेल्या शहरांपैकीं महोबा हें पहिलें होय तेथील राजा बाम देव याला तीन मुली होत्या, पैकीं सर्वांत मोठी मल्दे हिजशीं परमारनें स्वतः विवाह केला दुसऱ्या मुलींची *नांवें दिवला व तिलका अशीं होतीं एके दिवशीं राजा* कजरीच्या अरण्यात शिकारीकरता गेला असता, आई बापानीं टाकलेलीं दोन मुलें त्याला आढळलीं. त्या मुलांना आपल्या हत्तीवर घेऊन तो महोबा येथें आपल्या राजधानीस परत आला आपल्या बायकोच्या विनंतीवरून त्यानें *त्या दोघांना दत्तक घेतलें व त्यांपैकीं दसराजाचा (यश* राजाचा) दिवलाबरोबर व वत्सराजाचा तिलकाबरोबर विवाह लावून दिला त्या दोघांनाही मुलें झाली दसराजाला दिवलापासून अल्ह व उदल असे दोन मुलगे झाले

*अल्ह हा मुसलमानांचा कर्दनकाळ होता त्याच्यावर कालीमातेचा वरदहस्त असे असें सांगतात अद्यापहि लष्करी बराकींतून हिंदी शिपायी ढोलक्याच्या तालावर अल्हगीत* म्हणतांना दिसतात.

नैनागडच्या राजा इंदरमन याची बहीण सोनवती हिला अल्हानें मागणी घातली होती इंदरमनच्या मनांत आपल्या बहिणीनें मुळींच लग्न करू नये असें असल्यामुळें तिला मागणी घालणाऱ्या कित्येक लोकांना त्यानें कैदेंत ठेविलें होतें परंतु उदलनें आपल्या भावाच्या वतीनें इंदरमनाशीं पुष्कळ लढाया करून त्याला ठार मारिलें व शेवट अल्ह आणि सोनवती यांचा विवाह झाला

अल्हखंड नांवाच्या अल्हाच्या विवाहगीतांत उदलनें इंदरमन बरोबर केलेल्या लढाइचें सविस्तर वर्णन दिलेलें आहे अल्हखंडाच्या अनेक आवृत्ती मुंबईस प्रसिद्ध झाल्या आहेत हें काव्य भोजपुरी भाषेत लिहिलेलें असून त्याचें इंग्रजीत भाषांतर झालेलें आहे (इ. अँ. पु १४. बीलचा कोश)

चंदाच्या पृथ्वीराज रासा यांत अल्ह याच्या विषयीं कांहीं निराळी माहिती आहे ती अल्हखंडाशीं किंचित विरोधक आहे. व त्यास पूरक किंचित आहे हें लक्षांत घेतलें नाहीं पृथ्वीराजरासांतील माहिती मराठींतील लोकांहितवादीच्या

पृथ्वीराज चव्हाण या पुस्तकात समाविष्ट केली आहे ती अशी.—महोबाचा राजा परमाल याच्या पदरी अल्ह व उदल हे दोन मोठे पराक्रमी सरदार होते त्यांच्या बद्दल राजाचा मह कांही दरबारी लोकांच्या चहाड्यामुळें वाईट बनला होता. पृथ्वीराज चव्हाणाचे कांही सैनिक महोबाच्या राजोद्यानात शिरून धुडाई करू लागले तेव्हा राजाज्ञेनें उदल यानें त्याचा तावडतोब नाश केला तथापि परमाल याला संतोप न वाटून त्यानें अल्ह व उदल याना हद्दपार केलेंव, ते कनौजचा राजा जयचंद याच्या दरबारी मोठ्या मान्यतेनें राहिले असता, इकडे पृथ्वीराजानें आपल्या लोकांची महोबाच्या राजानें दुर्दशा केली म्हणून, चंदेल प्रांतावर स्वारी केली त्या वेळीं युवराज ब्रह्मजित यान महोबादरबारच्या सरदारास मोठें स्फुरण आणलें व पृथ्वीराजास तोंड दिलें, पण पराभव टळला नाहीं. तेव्हा राणीच्या सल्ल्यावरून परमाल राजानें अल्ह व उदल याना मोठ्या सत्कारानें बोलावणें धाडिलें. तेहि मागचा अपमान विसरून महोबाला आले; व परमाल घाबरून कलंजर किल्ल्यात लपून बसला असताहि या दोघा बंधूंनी मोठ्या निकराचें युद्ध केलें उदल अलोट शौर्य गाजवून धारातीर्थी पडला. पण अल्ह हा गोरखनाथाच्या वरामुळें अमर असल्यानें त्याच्यापुढें पृथ्वीराजाचा टिकाव लागेना. त्यानें मोहनास्त्र सोडून राजाचें सर्व सैन्य निद्रावश केलें. तेव्हा चंदबारदानें कालिकेला प्रसन्न करून घेतलें व शिरगण आततायी याला अल्ह याच्या बरोबर झुंजावयास लाविलें. पुढें गोरखनाथ स्वतः प्रकट होऊन, त्यांनी अल्हाला शस्त्र खाली ठेवून आपल्या बरोबर चलण्यास सांगितलें. अल्हनें गुर्वाज्ञा मान्य केली, तेव्हा युद्ध थांबलें, अशी कथा 'पृथ्वीराज रासा' या ग्रंथात आढळते उत्तर हिंदुस्थानात या अल्ह–उदल लढाईचें पुस्तक सर्वत्र वाचिलें जातें व प्रत्येक शहरी व स्टेशनावर विकत मिळतें लोकहितवादी–पृथ्वीराज चव्हाण ]

**अल्हाजन**—अरबी गणितज्ञ आणि शास्त्रज्ञ. हा अकराव्या शतकांत होऊन गेला. याचा जन्म बसरा शहरात व मृत्यु कायरो शहरीं १०३८ साली झाला. टालेमीच्या अलमाजेस्ट नावाच्या ग्रंथाचें ज्यानें भाषांतर केलें त्याहून हा अल्हाजन भिन्न आहे. यानें एकदा अशी बढाई मारली की, "नाइल नदीच्या पुरापासून बचाव करून पाण्याचा पुरवठा नियमित रीतीनें करून देणारें यंत्र तयार करिता येण्यासारखें आहे" ही वार्ता ऐकून त्या वेळेचा खलीफ हकीम यानें त्याला बोलावून नेलें. परंतु तेथे गेल्यावर हें कार्य होण्यासारखें नाहीं असें पाहून व खलिफाचा रोष होऊं नये म्हणून त्यानें वेडाचें सोंग घेतलें व हा सोंगाची नेपादणी त्यानें हाकीमाच्या मृत्यू ( १०२१ ) पर्यंत चालविलें. टालेमीच्या कालानंतर प्रथमच यानें दृकशास्त्रा ( ऑप्टिक्स ) मध्यें शोध लाविले सूर्यचंद्रादिक खस्थ पदार्थ क्षितिजाजवळ असताना मोठे कां दिसतात याचें कारण त्यानें प्रथमत सांगितलें नेत्रांतून कांही किरण निघून पदार्थावर पडतात व नंतर आपणास दिसतें अशी जी प्राचीन शास्त्रज्ञाची समजूत होती ती चूक आहे व त्याऐवजी पदार्थातून किरण निघून ते नेत्रात जातात असें त्यानें दाखवून दिलें. प्रकाशाच्या वक्रीभवनासंबंधानें यान लेख लिहिले आहेत. हवेंतून प्रकाशकिरण जात असताना त्याचें वक्रीभवन होतें व त्या योगानें संधिप्रकाश उत्पन्न होतो असें त्यानें सिद्ध करून दाखविलें अंतर्वक्र आरशासंबंधानें त्यानें विवेचन केलें आहे. दृकशास्त्रावरील त्याच्या ग्रंथाचें लॅटिनमध्यें भाषांतर विटेलो यानें सन १२७० साली केलें. मध्ययुगात या ग्रंथाची पुष्कळच प्रशंसा केली जात असे यानें भूमितीवर बरेंचसें लिहिलें आहे असें दिसतें. हें लिखाण १८३४ साली सेडिलॉटनें पॅरिसच्या बिब्लिओथेक नॅशनेलमध्यें छापलें दुसऱ्या निरनिराळ्या विषयावरील याचे ग्रंथ ऑक्सफोर्ड व लंडन येथील ग्रंथालयात ठेविलेले आहेत ( ए ब्रि )

**अर्वाचितगड**—हा तटबंदी किल्ला रोहें ( जिल्हा कुलाबा) गावापासून तीन मैलावर कुंडलिका नदीच्या उत्तरतीराच्या बाजूला आहे. तो ९७७ फूट उंचीवर असून त्याची तटबंदी ६०० यार्ड लांब व ८०० ते १००० फूट उंचीवर आहे. किल्ल्यावर जाण्यास एक रोह्याच्या बाजूनें व एक मेढें या गावच्या बाजूनें अशा दोन पायवाटा आहेत. बाटोळे बुरूज चांगले दगड बसवून बांधले असून दक्षिणेकडील एका बुरुजाच्या भिंतींत शके १७१८ (इ स १७९६) मधील एक शिलालेख आहे त्यांतील मराठी मजकुरास आरंभ "श्रीगणेशायनम. श्रीजयदेव शके १७१८ नलनाम संवत्सरे चैत्र शुद्ध प्रतिपदा" अशा प्रकारें आहे उत्तरेकडील बुरुजापासून सुमारें ५० यार्डावर सहा फूट लांबीची तोफ आहे व तिच्या पलीकडे थोड्या अंतरावर आणखी दोन तोफा आहेत. किल्ल्यावर कांही पडक्या इमारती आहेत, त्यात सदर ही इमारत मोठी व चांगली असावी असें वाटतें पूर्वेकडील तटाच्या दरवाज्याजवळ असलेल्या सदर कचेरीच्या इमारतीचें फक्त जोतें शिल्लक आहे. या इमारतीच्या दक्षिणेस अंतर्दुर्ग उर्फ बालेकिल्ला आहे, त्याची दक्षिणोत्तर लांबी ३०० यार्ड व पूर्वपश्चिम रुंदी १०० यार्ड आहे बालेकिल्ल्याचा तट चांगला जाड असून प्रत्येक कोपऱ्यावर बहुकोनी बुरूज आहे. शिवाय मध्यंतरी बाटोळे लहान लहान बुरूज आहेत उत्तरेकडील तटाला दोन दरवाजे व दक्षिणेकडील तटाला एक दरवाजा आहे. बालेकिल्ल्यावर एक मोठें पाण्याचें टाकें असून त्याला एका बाजूनें आंत उतरण्यास पायऱ्या आहेत त्याच्या शेजारी दक्षिणेच्या बाजूस सात लहान टाकीं आहेत. येथें बापूजी हवलदाराची समाधि आहे. तिला सरकारकडून ३२ रुपयांची नेमणूक आहे समाधीसमोर

झाला आहे, तिच्या पायथ्याशीं बापूराव पाशिलकराचा पुतळा खोदलेला आहे यालेण्याच्या नैर्ऋत्य कोपऱ्याला एक महादेवाचें देऊळ असून त्यात गणपति, पार्वती व विष्णु यांच्याहि सुंदर खोदलेल्या मूर्ती आहेत

अवचितगड, हा सुरगड, पालीचा किल्ला व भोराईचा किल्ला यांच्याबरोबरच कर्नल प्रॉथरच्या सैन्यानें १८१८ फेब्रुवारींत जिंकून घेतला. हा किल्ला मूळ शिवाजीनें शेख महंमद नावाच्या कारागिराकडून बांधविला होता असें म्हणतात [ संदर्भ ग्रंथ—कुलाबा गॅझिटियर ]

**अवचितसुत काशी** (सुमारें इ सन १६६२ )—एक महाराष्ट्र कवि या कवीचें आडनाव सोळंखी; गोत्र अत्रि, जात चंद्रवंशी क्षत्रिय होती. याचा बाप अवचितराव हा भारम गावचा देशमुख होता त्यानें स्वतंत्र मुलुखगिरी करण्याचा उद्योग आरंभिला तेव्हां अवरंगजेबानें त्याला दोघा मुलांसहित धरून दिल्लीस नेलें तेथें अवचितरावाचा अंत झाला त्याचे दोन मुलगे त्र्यंबक व काशी (चरित्र नायक) यांची पुढें लवकरच मुक्तता झाली अवचितराव मोठे सात्त्विक व हरिभक्तिपरायण होते. त्यांनी मुलानांहि तसाच उपदेश केला होता. अवचितसुताचें अल्पचरित्र त्याच्याच श्लोकबद्ध द्रौपदीस्वयंवराच्या शेवटच्या अध्यायात दिलें आहे.

या कवीचे द्रौपदी स्वयंवरावर दोन मोठाले ग्रंथ असून त्यापैकीं एक श्लोकबद्ध व दुसरा ओवीबद्ध आहे. पहिल्याचे अध्याय १४, व दुसऱ्याचे २९ आहेत हे दोन्ही ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेले आहेत काशी कवि महानुभावपंथी असल्यानें त्या पंथात त्याचें विशेष महत्त्व दिसतें द्रौपदी स्वयंवर हा ग्रंथ शके १६१८ पौष वद्य १० गुरुवार या दिवशीं पूर्ण झाला. या ग्रंथाशिवाय कांहीं पदें काशी कवीचीं शेवटीं "काशी" अशा नांवावरून ओळखिना येतात. त्यापैकीं "हरिची भगिनी म्हणे सुभद्रा" हें पद प्रसिद्ध आहे.

या महाराष्ट्र संतकवीची वाणी प्रासादिक व रसाळ आहे. अलंकार तर बहारीचे आहेत. ओवीबद्ध द्रौपदी स्वयंवरांतील कित्येक प्रसंग इतके हुबेहुब वर्णिले आहेत कीं ते वाचतांना खरोखरच ते प्रकार समोर चालले आहेत कीं काय असा भास होतो. या कवीची मराठी भाषेवर फार भक्ति होतीसें दिसतात.

मराठी द्विज देशभाषा मराठी।
मराठी कुळी जन्मवाणी मराठी।
गुरुग्रंथही वाचिले ज्या मराठी।
कावी क्षमा न्यून ती पूर्ण दृष्टि॥

द्रौपदीस्वयंवर १४ १०

ला त्याच्या वेळच्या महाराष्ट्रात बरीच मान्यता [ भागवतकर–महाराष्ट्र – –कविचरित्र.– ]

**अवतंसक**—एक बौद्ध सूत्रग्रंथ याचीं दोन चिनी भाषांतरें उपलब्ध आहेत; एक पांचव्या शतकांत बुद्धभद्रानें केलेलें, व दुसरें शिक्षानंदाचें या दोन्ही भाषांतरांत दिलेलीं ठिकाणें एकमेकांशीं जुळतात; पण शिक्षानंदाच्या भाषांतरात ज्या ठिकाणीं 'चौ ले' हें नाव आलें आहे, त्याऐवजीं बुद्धभद्राच्या ग्रंथात 'पिएन- थि' असा शब्द आहे. चौले हें देशनाम म्हणून, व पिएन थि हें सरहद्दीवरील जंगली लोकांकरिता म्हणून योजिलें आहे. महासन्निपातसूत्र ( याचें 'तासि–किंग नावाचें चिनी भाषांतर नरेंद्रयशसनें इसवी सन ५८९ ६१८ यामधील काळात केलें आहे ) यामधील सूर्यगर्भसूत्रात बुद्धाच्या प्रवासस्थळांची जी यादी आहे, ती अवतंसकसूत्रातील यादीशीं बहुतेक जुळते; पण ज्या ठिकाणीं अवतंसकात चौले हें नाव येतें त्या ठिकाणीं सूर्यगर्भात 'यू–त–इएं' (खोतान) असें नाव सापडतें. तेव्हां चौले, पिएन–थि व यू-तइए हीं तीन्हीं नावें एकाच देशाचीं कीं काय असा प्रश्न उद्भवतो. बारकाईनें पहातां या तीहींमधील क्षेत्रस्थान 'निऊ-थोउ–त–थोउ' ( गोशीर्ष ) हेंच आहे, म्हणून एकच प्रांताला हीं तिन्हीं नावें दिलीं असावींत असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

अवतंसकसूत्र प्रथम नागार्जुनानें नागदेशात संशोधिलें असें म्हणतात याचा एक चिनी प्रकाशक प्रस्तावनेंत, रराग-लुग-गु ( नागकोगुन ) येथील बुद्धभिक्षूस तें नागराजमंदिरात सापडलें असून, त्यात ४८ प्रकरणें होतीं, असें लिहितो. शिक्षानंद, या सूत्रात फक्त ३९ प्रकरणें तो देतो ( जे. आर. ए. एस. १६ पृ ३२६; वासिलग्यू—बुद्धिस्मस, जर्मन भाषांतर पा. १२८ पहा ). तारानाथाच्या मतें मूळ १००० प्रकरणें होतीं (तारानाथ पा. ९८) परंतु मातृष्ट ( अश्वघोष ) व असंग यांच्या दरम्यानच्या धामधुमीच्या काळात हें सूत्र ३८ प्रकरणावर आलें. बुद्धभद्राच्या भाषांतरात ३४ प्रकरणें असून ६० पोट प्रकरणें आहेत. वर सांगितल्याप्रमाणें शिक्षानंदी भाषांतरात ३९ प्रकरणें आहेत; व पोट प्रकरणें ८० आहेत.

आता याचा काळ कोणता तें पाहूं. नागार्जुनानें हें संशोधिलें असें धरल्यास प्रथम नागार्जुनाचा काळ ठरविला पाहिजे. नागार्जुन शातवाहनाचा समकालीन होता कारण त्यानें शातवाहनास पत्र पाठविल्याचें प्रसिद्ध आहे. अशा प्रकारें सर्व बाजूंनीं विचार करिता असें दिसून येतें कीं, हें सूत्र खिस्तशकारंभी लिहिलें असावें. ललितविस्तर या ग्रंथात याविषयीं आलेल्या उल्लेखाचा व यातील खरोष्ट्री लिपीचा विचार करिता बराच काळ नक्की करावा लागेल. (लेव्ही–इं ॲं. १९०६ )

**अवतार, उपपत्ति**.—दैवी अगर अतिमानुष व्यक्ती मनुष्याचें अगर इतर प्राण्याचें रूप धारण करून पृथ्वीवर वास करण्यास येतात त्या कार्याला अवतार अशी संज्ञा

आहे. अर्थातच अवतार हा शब्द आत्म्याची देहांतरप्राप्ति ( ट्रॅन्समायग्रेशन ), देवतेचा किंवा भुताचा मानवदेहांत संचार ( पझेशन ) व ईश्वरसंभव (इमॅनेशन) यांपासून भिन्न आहे अवतार व पुनर्जन्म यांमधील फरक हा आहे कीं, पुनर्जन्म हा देवतेच्या बाबतींत नसून आत्म्याच्या बाबतींत लागू पडतो. जीवात्माच एका शरीरापासून दुसऱ्या शरीरांत वास करण्याला जातो. संचारामध्यें व अवतारांत हा फरक आहे कीं संचारामध्यें देवता ही तात्पुरती मनुष्यदेहांत वास करते. ईश्वरसंभवामध्यें, व अवतारामध्यें ही भिन्नता आहे कीं, पहिला ईशापासून फक्त उत्पत्ति दाखवितो त्यांत प्रत्यक्ष देवतेचा जन्मभर वास विषयीभूत देहामध्यें असत नाहीं. तसेंच अवतार या शब्दामध्यें वाटेल त्या वेळेस वाटेल तें रूप धारण करण्याच्या शक्यतेचा अंतर्भाव होत असल्यानें अवतारी पुरुषामध्यें आणि देवताविभूती व मांत्रिक यांच्यामध्यें सामर्थ्याच्या बाबतींत भेद आहे.

प्राचीन लोकांमध्यें अवताराची कल्पना वर सांगितलेल्या तात्त्विक अर्थाप्रमाणें आढळून येत नाहीं. प्राचीन लोक ज्या मानवाची अगर प्राण्याची पूजा करीत त्या मानवाना अगर प्राण्याना ते दैवी समजत अगर प्रत्यक्ष देवता समजत. पण देवतांचे अवतार असे मानीत नसत. जेथें देवतांचे अवतार म्हणून कांहीं मानवाची व प्राण्यांची पूजा केलेली दृष्टीस पडते तेथील लोकांच्या मनोभावनेसंबंधीं तपास केला तर आपल्याला असें आढळून येतें कीं ते लोक या मानवाना प्रत्यक्ष सजीव देवतच म्हणून समजतात. ( मेकर—लेक्चर्स ऑन दि अर्ली हिस्टरी ऑफ किंगशिप) पुढें पुढें अशा प्रकारचे पुण्यवान प्राणी परमेश्वराचे अवतार म्हणून मानले जाऊं लागले. उदाहरणार्थ अवलोकितेश्वर हा दलाई लामामध्यें अवतरित होतो प्राण्यांमध्यें मृत मनुष्याची विशिष्ट व अद्भुत शक्ति वास करीत असते म्हणून त्याची पूजा आवश्यक आहे अशी जी प्राचीनांची कल्पना तींत अवतार कल्पना अंधुक रीतीनें प्रत्ययास येते. त्याचप्रमाणें वृद्ध मनुष्यें व वैद्य यांच्या अंगीं अमानुष शक्ति असते व ते अद्भुत जादूगार असतात व प्रत्यक्ष देवच आहेत अशी जी कल्पना आहे त्या कल्पनेंतहि वरील समजूतच दृग्गोचर होते अर्थात यांच्या ठिकाणीं जें ईश्वरत्व आरोपिलें जातें तें कायमचें नसून तात्पुरतें असतें. मेक्सिकन लोकांमध्यें जो मानवदेव मानीत त्याचें देवत्व व्यक्त करण्याकरतां दहा कैद्यांपैकीं एक सुंदर युवा निवडून काढीत. त्यास ते टेसकॅटालिपोकाचा अवतार मानीत. या प्राचीन समजुतीच्या पुढील विचाराची पायरी पाहिली तर देवतांची प्रत्यक्ष आकृति दिसावी या इच्छेमुळें मनुष्यानाच देव समजण्याची वृत्ति वाढावत गेलेली दिसते.

पश्चिमेकडील लोकांत अवतारकल्पनेचा खरा आरंभ इजिप्तमध्यें झाला. नंतर ग्रीकांमध्यें ही कल्पना प्रसृत होऊन ख्रिस्ती सम्प्रदायांत त्या कल्पनेचें आत्यंतिक पर्यवसान झालें, व इस्लाममध्यें त्या कल्पनेला अनेक रूपें प्राप्त झालीं. तशाच प्रकारची वाढ हिंदूंच्या अवतारकल्पनेंतहि दृष्टीस पडते; व ती प्रथमतः भगवद्गीतेमध्यें दृष्टीस पडते. या हिंदूंच्या अवतारकल्पनेची मुसुलमानपंथावर व इमामच्या शिया पंथावर छाप पडलेली आढळून येते.

सर्वच शिया लोक अवतारतत्त्व मानीत नाहींत हें खरें तथापि खलिफाचा वारसा अलीच्या वंशजास ईश्वरी कायद्याप्रमाणें व रक्तसंबधानें पोहोंचतो आणि सुनीपंथी लोकांप्रमाणें लोकनियुक्त खलीफाकडे पोहोंचत नाहीं हें जें शिया पंथाच्या लोकांचें तत्त्व आहे त्याचें अवतार कल्पनेशीं साम्य आढळून येतें इमामासंबंधाचा सिद्धांतहि पुष्कळ आधारावर अवलंबून आहे या इमामाचा ईश्वरदत्त वारसा, त्याच्या, धर्मगुरूपासूनच्या उत्पत्तीमुळें, त्याच्या अतिमानुष कृत्यामुळें व दैवी तेजामुळें शाबीत केला जातो. आदामपासून पुढें झालेल्या विभूतिमालिकेमध्यें जें तेज परंपरेनें उत्पन्न झालें होतें, जें तेज महंमदाच्या आणि अलीच्या आज्याच्या जघेंतून शिरलें, कांहिं त्यांतील भाग अबदल्लाला, त्याच्या मुलाला ( महंमदाला ), नातीला म्हणजे फातिमेला व अबुतालीब व त्याचा मुलगा अली यांना मिळालें व अली फातिमा दंपत्यापासून त्यांच्या मुलाला ( करबेलाच्या धर्मगुरूला) मिळालें तें दैवी तेज महंमदाच्या वंशजाना शेवटपर्यंत मिळत राहून प्रलयकालीन शेवटच्या इमामापर्यंत ( मेहदी) चालू राहील अशी या इमामाची श्रद्धा आहे.

सुनी लोकांमध्यें देखील नूरमहंमद म्हणजे महंमदाच्या दैवी तेजाविषयींचा एक सिद्धांत आहे. त्या तेजापासून सर्व धर्मगुरु उत्पन्न झाले हें तेज सार्वकालिक असून दैवी परंपरा चालविण्याच्या ठिकाणीं संभवतें व तें तेज महंमदाच्या पूर्वजाच्या ठिकाणीं वास करीत होतें, पण शिया पंथाच्या लोकांनीं त्या तेजाचें अतिशय तेजःपुंज वलय अलीला मिळालें असें म्हटलें आहे. सृष्टीच्या आरंभापूर्वी १४००० वर्षें महंमद व अलीचें मिश्र तेज परमेश्वरासमोर चमकलें व नंतर महंमदाच्या आजाच्या कंधातून प्रविष्ट झालें हें इमामाचा हक्क शाबीत करणारें तेज अवेस्तामधील व्हरेनाहशीं जुळतें व त्याचा पारशी कल्पनेशीं कदाचित ऐतिहासिक संबंधाहि असावासें वाटतें गोल्डझिहरला हा संबंध मान्य नाहीं. पण महंमदाचें पूर्वास्तित्व व सनातन तेज यांमधील संबंध जोरानें प्रतिपादन करून ज्यू लोकांचे विचारांची छटा यामध्यें दृष्टीस पडते असें तो म्हणतो. तरी पण इराणमधील शियापंथाच्या लोकांमध्यें ईश्वरदत्तवारसाचें तत्त्व मूळ इस्लामधर्मांत नसताना आलें ही गोष्टहि लक्षांत ठेविली पाहिजे.

प्रत्येक नवीन इमामामध्यें हें दैवी तेज परंपरेनें वास करतें याचा संबंध शहरस्तानी पुनर्जन्माच्या सिद्धांताशीं लावतो. अवेस्तामध्यें पुनर्जन्मसिद्धांत आढळून येत नाहीं. प्रत्येक

युगाचा निरनिराळा इमाम असतो. त्याला धावयाचा मान हा श्रद्धेच्या पाच स्तम्भाबरोबरच सहावा स्तंभ म्हणून मानला गेला आहे—या कल्पनेवर निःसंशय तऱ्हेनें अनि नवप्लेटोपंथाच्या विश्वव्यापी शक्तीच्या युगायुगांतील प्रमाणाच्या सिद्धांताची व तसेंच प्रत्येक युगाला विष्णु आपला नवीन अवतार धारण करतो या हिंदुधर्माच्या सिद्धांताची छाप बसलेली आढळून येते. शेवटच्या इमामासंबंधींचें जें वर्णन आहे त्यांत ज्यूधर्माची छटा दृष्टीस पडते. सकीना हें इमामाला लागणारे विशेषण श्केनाह या ज्यू शब्दावरून आलें असावें असें दिसतें.

घुलात संप्रदायास दैवी तेजाचें तत्त्व मान्य होतें एवढेंच नव्हे तर त्यांनी अवतारकल्पनेचाहि स्वीकार केला होता व निदान अलीला तें ईश्वर हें उपपद लावीत. सामान्य शिया पंथीयांनीं हें अवताराचें तत्त्व (हुलुल) अंगिकारिलें नाहीं. शहरास्तानीनें घुलीय लोकांप्रमाणेंच हुलुलीय लोकांचीहि ख्रिश्चन धर्मीयांबरोबर तुलना केलेली आहे. या अवतारतत्त्वावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांनीं महंमदापेक्षा देखील अलीला अधिक मान दिला; व अशा रीतीनें आर्यन विचाराच्या धर्तीवर ईश्वरासंबंधाची कल्पना त्यांनीं बसविली इराणांतील इस्लाम धर्मामध्यें ईश्वर आणि मनुष्य यांचा निकट संबंध मानला होता. शर्फाचें देवतेशीं ९ व्या शतकापासून जें ऐक्य मानण्यांत आलें त्याचा व अवतारकल्पनेचा तत्त्वतः कांहींहि संबंध नाहीं. सूफीपंथाच्या तत्त्वज्ञानामध्यें अभिनव प्लेटो पंथाच्या व हिंदु धर्माच्या परमात्मैक्यासंबंधीच्या कल्पना बऱ्याच घुसल्या होत्या हें अलबिरूनीनें सिद्ध केलें आहे. अशा प्रकारचे सर्वव्यापित्वाचे विचार हे अतिशयोक्ती पूर्ण होत जाऊन अवतारतत्त्व फारच व्यापक होतें व त्याला अनिश्चितता प्राप्त होते असें गोल्डझिहर म्हणतो. त्याच्या मतें वाटेल त्या धर्मगुरूला अवतार म्हणणें यामुळें त्या शब्दाचें स्वारस्य जातें.

ख्रिस्ती धर्माचें हें एक विशेष तत्त्व आहे कीं, त्यामध्यें देवाचा एकच अवतार मानण्यांत आला आहे. हिंदुस्थानामध्यें त्याच्या अगदीं उलट स्थिति आढळून येते. सर्वांत प्राचीन असा कृष्णावतार असून त्यानंतर असंख्य अवतारांपर्यंत मजल गेलेली आहे व त्यामुळें बुद्ध, वगैरे सर्वच धर्मगुरूंना अवतार मानण्यांत येतें. प्रत्येक धर्मगुरु हा अवतार मानण्यांत येतो व युगें हि असंख्य मानलीं गेल्यामुळें प्रत्येक युगाचा एक अवतार धरला तरी असंख्य अवतार होतात. महायान पंथाच्या कांहीं शाखांमध्यें प्रत्येक भौतिक बुद्धागणिक मनोमय बुद्ध असतो अशी कल्पना प्रसृत होऊन तिचें पर्यवसान, खरा एकच बुद्ध देव असून त्याचे हे सर्व प्रभव आहेत यांत झालें. शोपेनहार व इतर कांहीं विद्वानांचें मत असें आहे कीं अनेक बुद्धांची कल्पना ख्रिस्त्यांच्या एकावताराच्या कल्पनेपेक्षां बुद्धिवादास अधिक धरून आहे.

शिया पंथानें व त्याच्या शाखांनीं मध्यम मार्ग पत्करिला. त्यांच्यामध्यें इमामाच्या संख्येसंबंधानें एकवाक्यता नाहीं. इराणी राष्ट्रधर्म खात्याप्रमाणें अवघे १२ च इमाम असून शेवटचा इमाम महंमद अबुल कासिम हा महदी म्हणून शेवटच्या युगांत अवतरेल; मध्ययुगांत सात इमाम मानण्याची बऱ्याच ठिकाणीं चाल होती. त्याच्या मतें आदाम, नोहा, अब्राहाम, मोझेस, जीसस, महंमद आणि महंमद महदी असे सात नाटिक (अवतार) होते. ज्याअर्थी बायबल प्रमाणें इस्लामी धर्म हा मानवी इतिहासाला अंत हा आहेच असें मानतो त्याअर्थी त्याच्या अवताराची संख्या ही मर्यादित असणें स्वाभाविकच आहे.

अवतार कल्पनेसंबंधीं निरनिराळ्या धर्मीयांच्या कल्पना पुढें दिल्या आहेत.

हिंदु—पुराणांत व तत्सदृश इतर ग्रंथांत प्रतिपादन केलेलें अवतारतत्त्व हें मध्ययुगीन व अर्वाचीन हिंदुधर्माचें एक प्रमुख तत्त्व आहे. विशेषतः वैष्णवधर्मीय लोकांमध्यें हें अधिक प्रचलित आहे. बहुतेक सर्व वैष्णव विष्णूच्या स्वरूपापेक्षां त्याचे जे शेवटचे अवतार राम व कृष्ण त्यांचेंच पूजन करतात. याच्या उलट शिव हा त्याच्या मूळच्या व इतर स्वरूपांत—ज्यांना तात्त्विक दृष्ट्या अवतार म्हणतां येत नाहीं—पूजिला जातो. वास्तव हिंदुस्थानांतील अवतारतत्त्वाचें स्वरूप लक्षांत येण्यास व त्यावरील अनेक मतांचा गुंतागुंतीचा इतिहास समजण्यास या विष्णूच्या अवतारांचें नीट पर्यालोचन केलें पाहिजे.

विष्णूच्या अवताराच्या तत्त्वविवेचनासाठीं जी गृहीत गोष्ट धरावी लागते ती ही कीं, विष्णु उर्फ नारायण हा परमेश्वर असून सकल विश्वाचा निर्माता व शास्ता आहे. ज्या वेळेला त्याच्या सत्तेला न जुमानतां दुर्जन जगताला त्रास देतात त्यावेळीं तो जगताचें रक्षण करण्याकरितां पृथ्वीवर अवतार घेतो. ह्यासंबंधीं भगवद्गीतेंत असें म्हटलें आहे कीं:—

" ॥ यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥
परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम्
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

यावरून असें दिसतें कीं, प्रथमतः विष्णूचे अनंत अवतार आहेत अशी कल्पना होती. पण पुढें ही अवतारांची संख्या मर्यादित करण्याकडे आणि शिवाय अवतारी पुरुषाचा व परमेश्वराचा स्पष्ट तऱ्हेनें संबंध दर्शविण्याकडे तत्त्वज्ञान्यांची प्रवृत्ति होऊं लागली. हें आपल्याला हरिवंश पर्वामध्यें ४१ व्या अध्यायांत विष्णूच्या अवतार वर्णनाच्या प्रसंगावरून पूर्ण दिसून येतें. ४१ व्या अध्यायांतील १७-२० श्लोकांत असें म्हटलेलें आहे.

॥ हन्त ते कथयिष्यामि विष्णोर्दिव्यां कथां शृणु ॥
यदायदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत
धर्मसंस्थापनार्थाय तदा संभवति प्रभुः ॥ १७ ॥
तस्य चैका महाराज मूर्तिर्भवति सत्तमा।

नित्यं द्विविधा या रामस्तत्रचरति दुश्चरम् ॥ १८ ॥
द्वितीयाचास्य शयने निद्रायोग मुपाययौ।
प्रजा संहारसर्गार्थे किमध्यात्मविचिंतकम् ॥ १९ ॥
सुप्त्वा युगसहस्रं स प्रादुर्भवति कार्यतः।
पूर्णे युगसहस्रे तु देवदेवो जगत्पतिः ॥ २० ॥

नंतर त्याचे कांही अवतार कथन केले आहेत, व ज्यामध्यें दहावा अवतार कल्कीचा मानला आहे, त्यामध्यें विष्णूचे दहाच अवतार मानले गेले असावेत असें उघड दिसतें. या ठिकाणी अवतार हा शब्द न वापरतां प्रादुर्भाव हा शब्द वापरण्यांत आला आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. सर्वांना परिचित असे विष्णूचे अवतार म्हणजे ( १ ) मत्स्य, ( २ ) कूर्म, ( ३ ) वराह, ( ४ ) नरसिंह, ( ५ ) वामन, ( ६ ) परशुराम, ( ७ ) राम, ( ८ ) कृष्ण, ( ९ ) बौद्ध, व ( १० ) कल्कि हे होत.

विष्णूच्या अवताराचें जर पर्यालोचन केलें, तर आपल्याला असें आढळून येईल की, ह्या अवताराचे निरनिराळे वर्ग पडूं शकतील. प्रथम वामनावताराची गोष्ट घ्या. विष्णूनें आपल्या तीन पावलांनीं त्रैलोक्य व्यापून टाकिलें हा जो ऋग्वेदांतील उल्लेख आहे, त्यावरून ही कथा रचिलेली दिसते. यांचा और्णवाभ व यास्क यांचा अर्थ भिन्न आहे. कूर्म व वराह या अवतारांत केलेली कृत्यें मूलतः प्रजापतीचीं असून तीं विष्णूवर लादलेलीं दिसतात ( शतपथब्राह्मण ७. ५,१,५; १४ १, २·११ ) तैत्तिरीय संहिता ६.२,४२; तैत्तिरीय आरण्यक १.१३; ) प्रजापति हा विशिष्ट कार्याकरितां अशा प्रकारचे अवतार घेत असल्याचें वर्णन आढळून येतें. प्रजापतीनें वराह अगर कूर्म अवतार घेतला याचें कारण त्याच्या पूजकांपैकीं कांहीं वर्ग पशुपूजकांचा असावा, असें दिसतें; पण ज्या वेळेस नारायण हा परमेश्वर व जगताचा स्रष्टा असें मानण्यांत येऊं लागलें, त्या वेळीं ब्राह्मणकालीन स्रष्टा मानला गेलेल्या प्रजापतीच्या जागीं नारायण येऊन प्रजापतीच्या कृत्यांचा अध्यारोप नारायणावर करण्यांत आला. या प्रकारच्या अवतारामध्येंच मत्स्यावताराचीहि गणना करतां येईल. नारसिंहाचा अवतार हा स्वतंत्र वर्गांत पडेल अगर वामनावताराच्या वर्गांतहि जाऊं शकेल. नारसिंहाची कथा तैत्तिरीय आरण्यकांत एकदा आलेली दिसते.

उरलेले जे तीन अवतार म्हणजे राम, कृष्ण व परशुराम यामध्यें एक विशेष दृष्टीस पडतो तो हा कीं, याचा वास्तविक पाहतां विष्णूशीं मूळांत कांहींहि संबंध नव्हता. महाभारतामध्यें परशुरामाविषयीं जी गोष्ट आलेली आहे, तींत त्याचा विष्णूच्या अवताराशीं कांहींहि संबंध नाहीं; पण रामायणामध्यें जी परशुरामाची गोष्ट आहे, तीमध्यें परशुरामाजवळ विष्णूचें धनुष्य असून त्यानें रामाचा पराभव करण्याचा प्रयत्न केला; पण रामानें तें धनुष्य वाकवून परशुरामाचा तेजोभंग केला असें म्हटलेलें आहे. वास्तविक पहातां दोघेहि जर एकाच विष्णूचे अवतार आहेत, तर एका अवतारानें दुसऱ्या अवताराचा पराभव करणें म्हणजे स्वतःचा स्वतः-कडूनच पराभव करून घेण्यासारखें आहे, पण परशुरामाचा देखील विष्णूशीं व्यवहारामध्यें संबंध आणला जात असावा, हें यावरून उघड होतें.

आतापर्यंत आपण ज्या ज्या अवतारांचा विचार केला, ते ते अवतार म्हणजे मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह आणि वामन हे होत. हे लोकांच्या नेहमींच्या प्रचारांतील नव्हते; पण राम व कृष्ण या दोन अवतारांच्या बाबतींत मात्र तशी गोष्ट नाहीं. हिंदुधर्मामध्यें यांना फार महत्त्व आहे. यांचे उपासक हिंदुधर्मीयांमध्यें अतिशय आहेत. तेव्हां यांच्यासंबंधीं अधिक विचार करणें जरूर आहे. त्रेतायुगाच्या शेवटीं रामाचा अवतार झाला व द्वापारयुगाच्या शेवटीं कृष्णाचा जन्म झाला, असा सर्व हिंदूंचा समज आहे. याचें कारण रामायणामध्यें कृष्णाचा उल्लेख आलेला नाहीं, पण महाभारतामध्यें कृष्ण हा प्रमुख व्यक्ति असली तरी रामोपाख्यान स्वतंत्र दिलें आहे हे होय.

राम हा अवतार मागाहून बनविला गेला आहे असें दिसून येतें. कारण मूळ रामायणामध्यें कवीनें रामाला मनुष्यच म्हटलें असावें, पण त्यानंतर रामायणामध्ये जी भर पडली तीमध्यें मात्र राम हा पूर्णावतार होता, असें मानण्यांत आलें आहे. यावरून मूळ रामायणामध्यें भर पडण्याच्या वेळेला रामाला अवतार मानीत असत हें उघड आहे. त्या वेळेपूर्वी राम हा केवळ काव्याचा नायक होता; पण रामायणामुळें तो लोकांच्या अतिशय परिचयाचा झाला, आणि ज्यामध्यें कवीनें त्याला सर्व मानवांत अग्रगण्य, स्वकर्तव्योन्मुख मुलगा, प्रेमळ प्रियकर, सद्गुणांचें माहेरघर, नीतीचा पुतळा, अशा रीतीनें रंगविलें आहे त्या अर्थी तो लोकांचा फारच आवडता झाला व लोक त्याला फारच मानूं लागले. रामाला अवतारी मानण्याचें आणखी एक दुसरें कारण आहे. रामानें जीं साहसें केलेलीं आहेत, तीं मानवाच्या शक्तीबाहेरचीं आहेत. त्यानें वानराशीं आपली मैत्री जमविली व शंभर योजनें समुद्र ओलांडून वानराच्या साहाय्यानें रावणासारख्या बलाढ्य राक्षसाला मारलें. अर्थातच या अलौकिक कृत्याचें लोकांना फार आश्चर्य वाटलें व त्यांनीं त्याला अवतार मानण्यास सुरवात केली.

ह्या कल्पनेच्या दोन बाजू आहेत. एक लौकिक व मानसिक अगर अध्यात्मिक. अध्यात्मिक ही बाजू म्हणजे, विश्वोत्पत्ति वगैरे विचारावर रचलेली असून लौकिक ही दैत्यांच्या संहारावर उभारलेली आढळून येते. विष्णु हा सर्व दैत्यांचा संहार करणारा असल्यामुळें तशाच प्रकारचा जो कोणी पराक्रम करील त्याचा व विष्णूचा संबंध जोडला जातो. निरनिराळ्या देशांतील पौराणिक कथांमध्यें अशा प्रकारचा संबंध मोठ्या चमत्कारिक रीतीनें दाखविला जातो. हा अमक्या कुमारिकेला किंवा स्त्रीला अमक्या देवापासून झाला, अशा प्रकारची ते कल्पना करतात; पण अवताराच्या बाबतींत हिंदू-

मध्यें अशा प्रकारची अश्लील कल्पना आढळून येत नाहीं. रामाच्या अवतारासंबधानें खालील प्रकारची गोष्ट आढळून येते. 'देवांनीं रावणाच्या जुलमी कृत्याबद्दल विष्णूजवळ तक्रार केली' देवाकडून तू अवध्य आहेस, असा रावणास वर मिळाला असल्याकारणानें विष्णूनें मनुष्याचें रूप धारण करण्याचें कबूल केलें व दशरथाच्या राण्यांच्या पोटीं येण्याचें ठरविलें. दशरथानें ज्या वेळीं पुत्रप्राप्तीकरितां यज्ञ प्रारंभिला त्या वेळीं विष्णु स्वतः यज्ञरूपानें प्रगट होऊन त्यानें दशरथाला आपल्या बायकांना वाटून देण्यासाठीं दिव्य पायस दिलें. या नंतर कौसल्या, सुमित्रा व कैकेयी, यांना राम, लक्ष्मण, भरत, व शत्रुघ्न असे चार पुत्र झाले. या चारांपैकीं रामाच्या ठिकाणीं विष्णूचा अधिक तेजांश दिसून येतात. कदाचित् राम हाच मूळ खरा अवतार असून मागून इतर तिघांनाहि अंशावतार म्हटलें असण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणें सीता ही मागाहून लक्ष्मीचा अवतार मानली गेली असावी. हा तात्त्विक विचाराचा परिणाम दिसतो. रामभक्तांस कवीच कारण असे वल्हणाहि म्हणतो.

मानवी कथानायकापासून तो विष्णूचा अवतार मानला जाण्याइतकी रामाला जी स्थिति प्राप्त झाली, तीवरून एवढी गोष्ट सिद्ध होते कीं, ही अवतारकल्पना त्याच्या अगोदर पूर्णपणें अस्तित्वांत होती व तिचा उपयोग कवीनें रामाच्या बाबतींत करून घेतला. रामाच्या अगोदर कृष्णाला अवतारपद प्राप्त झालें असावें असें दिसतें. कृष्णाची देव या भावनेनें जी प्रसिद्धि झाली तीपासून हें अवतारतत्त्व निघालेलें दिसतें व त्यानंतर बऱ्याच शतकांनीं रामाचेंहि अवतारित्व लोकप्रसिद्ध झालें. अर्थातच अवतारतत्त्व हें ज्याअर्थी हिंदु लोकांचें महत्त्वाचें तत्त्व होऊन बसलेलें आहे, त्याअर्थी ज्यामुळें हें अवतारतत्त्व उदयास आलें त्या कृष्णाच्या चरित्राकडे लक्ष पुरविलें पाहिजे.

महाभारतामध्यें, हरिवंशामध्यें व पुराणामध्यें कृष्ण हा विष्णु होता असें स्पष्ट म्हटलेलें आहे. हल्लींच्या महाभारताची रचना होण्यापूर्वींच्या वाङ्मयांतहि कृष्णाविषयीं थोडा फार उल्लेख येत असे. त्या उल्लेखाकडे पहाणें अत्यंत जरूरीचें व मनोरंजकहि आहे. या उल्लेखांकडे पहातांना एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे ती ही कीं, महाभारतानंतरच्या वाङ्मयांत वासुदेव व कृष्ण हे एकच मानले जात, तशी तत्पूर्व वाङ्मयांत स्थिति नसून वासुदेव व कृष्ण या भिन्न व्यक्ती होत्या. तैत्तिरीय आरण्यकामध्यें ( १० १,६ ) वासुदेवाचा नारायण व विष्णु यांच्यासह उल्लेख आलेला आहे. यानंतर 'वासुदेवार्जुनाभ्याम्' या पाणिनीच्या सूत्रांत वासुदेवाचा उल्लेख असून वासुदेव हा देवकोटींतील आहे, असें पाणिनीचें मत स्पष्ट दिसतें. कृष्णाचें नांव प्रथमतः छांदोग्योपनिषदांत आलेलें असून त्यांत देवकीपुत्र कृष्णाला घोरांगिरसानें मंत्रोपदेश केला, असें म्हटलेलें आहे. या ठिकाणीं कृष्णाला मनुष्यच मानलेलें आहे. पण पुढें नारायणाथर्वशिरस् व आत्मबोध या उपनिषदांमध्यें कृष्णाचा व मधुसूदन ( विष्णु ) चा एकत्र उल्लेख आलेला आहे व त्याच्या पाठीमागें 'ब्रह्मण्य' हें विशेषण आहे. ब्रह्मण्य याचा अर्थ कसाहि घेतला तरी या ठिकाणीं कृष्ण हा विष्णूच्या बरोबरीनें मानिला आहे हें उघड दिसतें. सारांश वर दिलेल्या उल्लेखावरून असें अनुमान निघतें कीं, वेदकालाच्या अखेरीस वासुदेव हा विष्णु व नारायण यांच्या बरोबरीनें मानला जात होता, देवकीपुत्र कृष्ण हा ज्ञानी यति मानला जात होता; हे दोघेहि निराळे होते पण पुढें हे दोघेहि एकच मानले जाऊन त्यांना अवतारस्वरूप प्राप्त झालें.

वासुदेव याचा अर्थ वसुदेववंशोत्पन्न असा सर्व भारतीय ग्रंथकारांनीं केलेला आहे. परंतु बलदेव हा वसुदेववंशोत्पन्न असूनहि त्याला वासुदेव असें म्हणण्यात येत नाहीं. वासुदेव याचें वसुभद्र असें दुसरेंहि नांव आढळतें. वसुभद्र हें वासुभद्राचेंच जुनें नांव असावें असें वाटतें. आणि हें जर खरें असेल तर वासुदेव नांवापासून त्याचा बाप वसुदेव नांवाचा एक राजा होता असें म्हणण्याची रीत पडली असेल. याला एक पुरावा म्हणजे फार प्राचीन वाङ्मयांत कृष्णाच्या बापाचें नांव आढळत नसून देवकीपुत्र असें त्याचें वर्णन येतें. यांहि पुढें जाऊन कृष्णाच्या चरित्राचें जर बारकाईनें परीक्षण करूं लागलों तर आपल्याला असें आढळून येतें कीं, त्याच्यामध्यें दैवी व मानवी गुणांचा मिलाफ झालेला आहे. त्याच्या चरित्राचे दोन भाग पडतात. त्याचें बालचरित्र गोपगोपींच्या बरोबर निगडित झालेलें आहे. दुसऱ्या भागांत वृष्णींचा राजा या नात्यानें व पांडवांचा कैवारी या नात्यानें त्याचे पराक्रम आलेले आहेत. त्यानें बाळपणीं व तारुण्यांत दैत्यसंहारासारखीं अनेक अद्भुत कृत्यें केलीं. बलदेव हा देखील अवतार मानला जात असे. कदाचित कृष्ण व बलदेव हे पूर्वी दोन देव असून त्यांचा या ठिकाणीं मुद्दाम संबंध आणिला असावा. कंसवधापर्यंत या दोघांचेंहि एकत्र वर्णन येतें. पण पुढें मात्र त्याचें निरनिराळें वर्णन येतें. कृष्ण हा यादवांचा राजा होतो; व त्याचें अनेक प्रसंगीं रक्षण करतो. तो द्वारका नांवाची नगरी स्थापन करितो; पांडवांशीं स्नेह करून जरासंधाचा वध करतो; तो शिशुपालाला ठार मारितो. पुढें यादवांमध्यें दुफळी झालेली व त्यांचा नाश झालेला तो स्वतः आपल्या डोळ्यांनीं पहातो. जरस नांवाच्या एका व्याधानें त्याला चुकून काळवीट समजून बाण मारला व तो त्याच्या पायांत रुतून पुढें त्यामुळें तो मरला. कृष्णासंबंधीं अतिशय वाङ्मय निर्माण झालें आहे. हरिवंशामध्यें, पुराणामध्यें व इतर ग्रंथांमध्यें कृष्णाचें यश गाईलें गेलें आहे व अशा रीतीनें आबालवृद्धांना त्याचें चरित्र माहीत आहे.

महाभारतामध्यें, हरिवंशामध्यें व पुराणामध्यें प्रत्येक वेळीं त्याला परमात्मा म्हणण्यांत आलें आहे; पण एवंदरीत त्याच्या चरित्रांतील जीं बारकाव्याचीं दिसतें तीं रामाप्रमाणें केवळ दुष्ट नसून

जन्माला येतो. अर्जुन हा इंद्राचा मुलगा असून नराचा अवतार मानिला गेला आहे.

हें अवतारांचें तत्त्व लोकांनां फार परिचयाचें झालेलें आहे व पुष्कळ ठिकाणीं त्याचा उपयोगहि करण्यांत आला आहे. एखाद्या साधूला त्याच्या ह्यातींत मान मिळत असला तर त्याला कोणत्या तरी देवाचा अगर ऋषीचा अवतार मानीत असत. संस्कृत आणि प्राकृत कथामध्यें ही गोष्ट वारंवार नजरेस येते. कथेंतील नायिका अगर नायक यक्षांचे, अगर अप्सरांचे अवतार मानले जातात, यांना कांहीं कारणामुळें देवाचा शाप मिळालेला असतो व कांहीं काळानंतर स्वतःचें रूप धारण करतां येतें. फार काय पण एखाद्या सुंदर पुरुषाला कामाचा अवतार एखाद्या सुंदर मुलीला रतीचा अवतार असें म्हणण्यांत येतें. यावरून हिंदु लोकांमध्यें ही अवताराची कल्पना किती हाडीमासीं खिळून गेलेली आहे हेंहि दिसून येतें.

बौद्ध.—बौद्धांमध्यें विशेषत: महायान पंथांत आपणास अवताराची कल्पना बरीच परिणत स्थितींत आढळते. बोधिसत्त्व हे बुद्धाचे अवतार होऊन गेले व बुद्ध हा निर्वाणास गेला तरी त्याला पुन्हां अवतार घेण्याचें सामर्थ्य आहे असें त्यांचें मत होतें. अशोकाचा पुत्र कुनाल यालाहि बुद्धाचा अवतार मानीत (क्षेमेंद्र–अवदानकल्पलता दिव्यावदान ३) व पुढें बुद्ध हा मैत्रेयाचा अवतार घेऊन येणार आहे अशी कल्पना आहे. बोधिसत्त्वाच्या अवताराची पूर्ण हकीकत देण्यास अवकाश नसल्यामुळें त्यामधील महत्त्वाच्या तेवढ्याच गोष्टी नमूद केल्या म्हणजे काम भागण्यासारखें आहे.

अभिधर्म नावाच्या संस्कृत ग्रंथाच्या मतें बोधिसत्त्वाच्या अवतारांमध्यें व इतर मनुष्याच्या जन्मामध्यें तत्त्वतः कांहींच अंतर नाहीं.

'सर्व योनींमध्यें उत्तम योनि कोणती? औपपादुक योनि श्रेष्ठ आहे. कारण ती रेत, रक्त इत्यादि पदार्थांपासून अलिप्त आहे. तर मग बोधिसत्त्वानें आपल्या शेवटच्या जन्मात जरायु योनीच कां निवडली? याचें उत्तर असें कीं, त्याच्या मनाला पाहिजे तेथें त्याला जन्म घेतां येतो. त्यानें या योनीमध्यें जन्म घेतला याचें कारण त्यांत त्यानें अनेक फायदे पाहिले ते फायदे खालीलप्रमाणें—पहिला फायदा हा कीं, शाक्यकुळाचा स्वतःच्या जन्मानें घनिष्ठ संबंध जोडतां आला. दुसरा फायदा म्हणजे, चक्रवर्तीच्या कुळांतील या नात्यानें लोक त्याला फार मानूं लागले. तिसरा फायदा म्हणजे, मनुष्यकुळांत जन्म घेऊन मोक्ष मिळवून दाखविल्यामुळें लोकांच्या मनांतहि तशाच प्रकारची श्रद्धा व आकांक्षा उत्पन्न करितां आली. जर त्याला कुलशील नसतें तर हा मायिक आहे, कीं पिशाच्च आहे, अशा प्रकारचे उद्गार लोकांनीं काढले असते. दुसऱ्या तऱ्हेनेंहि याचें विवेचन करतां येईल. पार्थिवशरीरविहीन प्राणी मेल्यावर त्याचें कांहींहि शिल्लक रहात नाहीं. पण बोधिसत्त्वाला आपल्या निर्वाणानंतरहि हजारों लोकांना स्वर्गप्राप्ति मिळावी म्हणून मागें कांहीं अवशेष ठेवावयाचा होते, आणि म्हणून तो जरायुयोनींत जन्मला. पण हें विवेचन सर्व बुद्धानुयायांना पटत नाहीं कारण बुद्ध हा अद्भुत सामर्थ्ययुक्त असल्यानें अखेरीस कांहीं अवशेषहि निर्माण करूं शकला असता असें ते मानतात.

तिबेटांतील.—तिबेटमध्यें ही अवताराची कल्पना अत्यंत विकास पावलेली आढळून येते. या कल्पनेचा उपयोग बौद्ध सम्प्रदायाप्रमाणें 'मनुष्यास कर्माप्रमाणें फल प्राप्त होतें' हें नीतितत्त्व विशद करण्यासाठींच केवळ नव्हे तर महालामाच्या शरीरांत देवतांचें चिरंतन वास्तव्य असतें ही गोष्ट प्रस्थापित करण्याकडेहि होतो.

अवतारकल्पनेचा लामापदाचें श्रेष्ठत्व वाढविण्याकडे उपयोग करण्याची क्लृप्ति प्रथम गेलुगपा या पीतशिरोभूषित पंथाचा प्रवर्तक त्सोनखप याच्या उत्तराधिकारी गेदुन डुप नावाच्या पहिल्या दलाई लामानें काढली. बाह्यत: बौद्ध तत्त्वाचा आश्रय घेऊन आपल्या प्रतिस्पर्ध्यांचा पाडाव करण्यासाठीं व आपला सम्प्रदाय अविच्छिन्न तऱ्हेनें चालावा म्हणून त्यानें वरील युक्ति योजिली. अविच्छिन्न परंपरेनें निरनिराळ्या रूपाखालीं एकाच व्यक्तीचें चिरंतन आधिपत्य त्यांत गृहीत धरलें आहे. अर्थातच हें तत्त्व बुद्धधर्मांतील पुनर्जन्माच्या तत्त्वाहून भिन्न आहे. या तत्त्वाप्रमाणें मृत लामा हा नेहमीं मूल म्हणून त्याच देशांत व विशेषतः मठाच्या आसपास जन्मास येतो. हें लहान मूल दैवी उपायांनीं शोधून काढून त्याला आचार्यपदावर आरूढ करावयाचें ही पद्धत आहे.

प्रथमतः ही पद्धत ल्हासा येथील दलाई लामाच्या बाबतींतच आढळून येत असे, पण १६६२ सालच्या सुमारास त्या वेळच्या दलाईलामानें ही पद्धत तशीलपोच्या नूतन स्थापित महालामा संस्थेच्या बाबतींतहि लागू केली व हल्लीं तर हा पद्धत तिबेट, चीन, मंगोलिया इत्यादि देशांतील सर्व विहारांमध्यें अवलंबिली जाते. या पद्धतीमुळें निरनिराळ्या कारस्थानांना वाव मिळतो. तिबेटावर सत्ता चालविणारें चिनी सरकार दलाईलामाचा 'नूतन अवतार' व तात्पुरता राजा आपल्या कब्जांत ठेवण्यासाठीं शक्य ती खबरदारी घेतें. सन १७९३ मध्यें चीननें हा राजा व लामा निवडण्यासाठीं 'अस्थिपात्रप्रसाद' म्हणून पद्धत काढली. या पद्धतीप्रमाणें या जागेसाठीं उभ्या राहिलेल्या उमेदवारांच्या चिठ्या एक सोनेरी अस्थिपात्रांत घालून पुष्कळ मंत्र व प्रार्थना करून नंतर त्यांतील प्रथम उचलल्या नांवाची चिठ्ठी हाताला येईल त्याची निवडणूक केली जात असे. अशा प्रकारें निवडणूक करावयाचा हुकूम ल्हासाच्या महादेवालयाच्या दरवाजाजवळ जे चिनी सम्राटाचें आज्ञापत्र १८०८ मध्यें दगडावर कोरलेलें आहे त्यांत आढळून येतो.

'ल्हासाचा दलाईलामा हा अवलोकितेश्वराचा अंशावतारी आहे व 'ओम् मणि' या मंत्राचा विषय आहे' अशा प्रकारची आख्यायिका प्रथमतः लो संग गॅम्सो (१६१५-१६८२) नांवाच्या ल्हासाच्या पहिल्या भिक्षु राजानें पसरली. तो स्वतः आपल्याला परमेश्वराचा अवतार व राजा असें म्हणवीत असे. याबद्दलचा पुरावा १७व्या शतकाच्या मध्यांत हयात असणाऱ्या ग्रुबर नावाच्या एका जेसुईट पाद्याच्या पत्रावरून मिळतो. त्यांत या दलाई लामाला 'जे आपल्याला पुजीत नाहींत, अशांनां मारणारा बाप अगर सैतान' असें विशेषण दिलेलें आहे.

चि नी लो क —चिनी लोकाचा पहिला राजा शागति याला जरी सदाचाराचा व सद्गुणांचा आदर्श मानण्यांत येतें, तरी त्याच्या ठिकाणीं देवत्वाचा अध्यारोप केलेला आढळून येत नाहीं. यावरून चिनी लोकांत आपल्याप्रमाणें अवतारांची कल्पना प्रादुर्भूत झाली नाहीं असें दिसतें.

झ र थु ष्ट्र—या संप्रदायांत इतरांप्रमाणें अवतारकल्पना आढळत नाहीं. झरथुष्ट्राला अहुरमझ्दाचा अवतार समजणें रास्त नाहीं, असें मझ्दानुयायाचें म्हणणें आहे ( आर. इ. दस्तुर—ए टू झरथोस्ट्री गाइड मुं. १९१३ पृष्ठ १८२ ). तथापि राजा हा पवित्र असून त्याच्या ठिकाणीं दैवी शक्ति वास करते, अशी त्यांची कल्पना होती. मृतात्म्यांना व देवांना पूजाई करणारे; सूर्य, चंद्र, तारे यांस सामर्थ्य देणारें व आर्यांना सामर्थ्य व धन प्राप्त करून देणारें असें. व्हरेनाह हें अद्भुत तेज असून कवि घराण्यांतील राजे या तेजानें युक्त होते. झरथुष्ट्राच्या ठिकाणीं हें तेज अतिशय असून पुढें अर्दशीर या राजामध्यें व ससन घराण्यांतील राजांमध्यें हें तेज परंपरेनें वास करीत होतें, अशी त्यांच्यामध्यें कल्पना आहे.

इ जि प्शि य न.—इजिप्तमधील लोकांतहि देवता मूर्तीमध्यें किंवा प्राण्यांमध्यें वास करतात अशी कल्पना होती व एकाच देवतेचें एकाच वेळीं भिन्न भिन्न प्राण्यांत अस्तित्व असूं शकतें, असेंहि ते मानीत व त्यांच्यांत अनेक प्राण्यांची पूजा प्रचलित होती.

राजामध्यें ईश्वरी अंश असतो, अशाबद्दल त्यांची कल्पना पुढील प्रमाणें होती. राजा हा ईश्वरी अंश अगर ईश्वराप्रमाणेंच मानला जातो तो कांहीं एखाद्या देवतेचा अवतार नसून मानवी मातेपासूनच जन्मास आलेला असतो, तथापि त्याला देवांशीं बरोबरीच्या दर्जानें व्यवहार करतां येतो. मरण समयीं मात्र त्याच्या पाशांचा व गुणांचा नाश होतो. प्राचीन काळची अशी कल्पना होती कीं, तो आपल्याहून म्हाताऱ्या देवांनां खात असे व त्यांचे गुण मिळवीत असे व जवळ जवळ ईश्वर बनत असे; पण उत्तरकालीन वाङ्मयांत तशा प्रकारचा सविस्तर उल्लेख येत नाहीं.

फॅरोचें ईश्वरत्व परमेश्वरानें त्याला स्वतः निर्माण केल्यामुळें उत्पन्न झालें. ज्या वेळीं एखाद्या देवतेला पृथ्वीवर पाठविण्याचा देव निश्चय करीत, तेव्हां रा अगर अॅमॉन रा हा राज्य करीत असलेल्या राजाचें रूप धारण करून राणीबरोबर शयन करीत असे. आपलें दैवी स्वरूप तो तिला दाखवीत असे.तो आपली प्रीति तिच्या अंतःकरणांत ओतीत असे व अशा रीतीनें तो नवीन राजपुत्राला उत्पन्न करीत असे व त्याला कोणतें नांव. द्यावयाचें हेंहि निश्चित करीत असे. अशा रीतीनें दैवी तेज त्या राणीच्या ठायीं ओतल्यानंतर ख्नूफीम नांवाच्या देवाला त्या अपत्याचीं निरनिराळीं अंगें उत्पन्न करावयाची आज्ञा करीत असे. अशा रीतीनें या देवानें त्या अपत्याचों व 'रा' चीं अंगें निर्माण केल्यानंतर त्यामध्यें एक देवता चैतन्य ओतीत असे आणि शेवटीं देवतांच्या साहाय्यानें व समक्ष तें अपत्य जन्माला येत असे.

राजा अगर फॅरोचें ईश्वरत्वच तेवढें देवाकडून निर्माण करण्यांत येत असे. याचें कारण असें कीं, इजिप्शियन लोकाच्या मतें राजा हा फक्त दैवी शक्तीपुरताच परमेश्वराचा अवतार होता अशा प्रकारची कल्पना रा व इसिस याच्यासंबंधाच्या गोष्टीमध्यें दिसून येते इसिस हा सूर्य देवतेची थुंकी मातीत मिसळून त्याचा एक साप तयार करतो. अशाच प्रकारची दुसरी गोष्ट म्हणजे इसिस हा 'सेट' वर ताबा मिळविण्यासाठीं व सेटच्या बीजाचा अंश मिळविण्यासाठीं खटपट करतो ही होय.

नवीन ईश्वरी अपत्य उत्पन्न करण्यासाठीं त्या वेळीं राज्य करणाऱ्या राजाचाच वेष धारण करण्याचें कारण असें कीं, इतर प्रसंगीं राजांशीं दळणवळण करतांना ईश्वर हा त्याच्याच सारखें रूप धारण करीत असे. यावरून हें उघड होतें कीं, ईश्वर राजामध्यें प्रत्यक्ष अवतरला नाहीं. या देवतेच्या राजसदृश आकृतीला एक स्वतंत्र नाव असे व तेंच नाव राजालाहि लागू पडत असे जर एखाद्या धनिक मनुष्यानें एखादें देऊळ बांधलें तर तो राजाप्रमाणेंच देवताजनक म्हणून मानला जात असे. उदाहरणार्थ दुसऱ्या रॅमेसिसच्या कारकीर्दींत रॅमेसीसच्या म्हाची पूजा करण्यांत येत नसून मेम्नाच्या सहाची पूजा करण्यात येत असे.

खऱ्या अवताप्रमाणेंच खोट्या अवतारालाहि इजिप्तमध्यें महत्व दिलें जात असे. मांत्रिक मनुष्य हा आपल्याला एक प्रकारचा देवत्वाचा मान घेऊन स्वतःच्या विरुद्ध शक्तींचा मोठ्या अभिमानानें पाडाव करण्याची धमकी घालीत असे. त्याची स्वतःची भावना आपण स्वतः देव आहों अशी जरी नसली तथापि लोकावर छाप पडेल अशासाठीं तरी तो तसा बहाणा करीत असे. कधीं कधीं तर आपल्या शरीरावर एखाद्या विशिष्ट देवतेचें चित्र काढीत असे. अशाच कारणावरून नेफथीस व इसिस या देवतांचीं नावें प्रमुख शोक करणाऱ्या स्त्रियांच्या अंगावर कोरली जात. या स्त्रिया शोकगीतें गात असून आपल्या मंत्रांमुळें मृताला पुनर्जन्म घ्यावयास लावीत. प्राचीनकाळीं

आपण देवता आहों असें पूर्णपणें भासविण्याकरता देवतेच्या वेषाप्रमाणेंच वेष घेत असत किंवा नाहीं हें सांगता येत नाहीं पण ग्रीक संस्कृतिविध्वंसकालीं इसिसच्या वर्णनासंबंधीच्या वाङ्मयावरून तशी चाल होती व ती प्राचीन काळीं असावी असें अनुमान काढता येतें

तसेंच मृतांना आणि देवांना इतर देवांचे आकारहि धारण करता येत असत उदाहरणार्थ इसिस यानें पवित्र गाईचा व होरसनें ऑपिसच्या बैलाचा वेष ऑपिस शहरात सुरक्षित पणानें जाण्यासाठीं म्हणून धारण केला होता या बाबतींत पवित्र गाईमध्यें व ऑपिसच्या बैलामध्यें देव अवतरला असा अर्थ नसून तशाच सारखा आकार त्यांनीं धारण केला असा अर्थ होय. अशाच दृष्टीनें बटऊनें बैलाचा वेष घेतलेल्या गोष्टीचा अर्थ घ्यावयाचा आहे या तसेंच बटऊच्या गोष्टीवरून दैवी प्राण्याला वाटेल तितके अवतार धारण करता येत असत हें स्पष्ट दिसून येतें उदाहरणार्थ बटऊनें धारण केलेल्या बैलाचा वेष,बैल मारला गेल्यावर बदलून त्या बैलाच्या रक्तापासून दोन झाडें तयार केलीं, व त्यामधून निघून पुढें त्यानें एका स्त्रीचा वेष घेतला. पुढें या स्त्रीला गर्भ राहिला, व जो मुलगा झाला तोच बटऊचा शेवटचा अवतार होय.

पुष्कळशा बाबतींत ज्या देवतेचा एखादा अवतार व्हावयाचा असतो त्या देवतेच्या शक्तीचा एक अंश देखील त्या नवीन अवतारवेषांत घातलेला पुरेसा होत असे. इजिप्शियन लोकांना सर्व प्रकारच्या अवतारांना मूर्त स्वरूप देण्याची हौस होती; व मृतांना व देवतांना आपलें शौर्य व प्रभाव गाजविण्यास मूर्त रूपच धारण करावें लागत असे

से मि टि क.—सेमिटिक लोकांमध्येंहि अवताराची कल्पना दृग्गोचर होते. जुन्या करारातील काहीं उताऱ्यावरून जो विचार दृष्टीस पडतो तो हा कीं, ईश्वर हा मनुष्याचें रूप धारण करतो व वाटेल तेव्हा टाकून देतो अब्राहामच्या तंबूमध्यें येणारा मनुष्य, गिडीयानला दिसणारा मनुष्य, मॅनोहाच्या पत्नीला व यहोशवाला दिसणारा मनुष्य हे ईश्वरानें ( देवदूतानें ) धारण केलेलें रूप होय.

ईश्वर मनुष्यामध्यें अवतरणें शक्य आहे अशी कल्पना झाल्यामुळें दोन निरनिराळ्या कल्पनांचा उदय झाला त्या कल्पना ईश्वरापासून मनुष्याची उत्पत्ति आणि काहीं मनुष्यांना देवस्वरूप येणें या होत. या दोन कल्पनांपैकीं पहिली अधिक प्राचीन आहे. 'उत्पत्ति' मध्यें असें सांगितलें आहे कीं ईश्वरानें मनुष्याच्या नाकामध्यें जीवांचा अवयव असा श्वास सोडला व मनुष्य हा जिवंत प्राणी झाला. एका बाबिलोनियांतील आख्यायिकेवरून असें दिसतें कीं त्यानें डोक्यामध्यें आपलें रक्त मिसळलें व मनुष्याला निर्माण केलें. 'उत्पत्ती' मध्यें असें म्हटलें आहे कीं, देवकोटींतील प्राण्यांनीं मानवी स्त्रियांशीं लग्न करून जी मुलें होत असत तीं मोठें वीर व विभूती होतात यावरून थोर मनुष्याच्या मध्ये दैवी अंश असतो या तत्त्वाची जाणीव येथें दिसून येते अतिशय ज्ञानी असा बाबिलोनियातील अॅडपा नांवाचा मनुष्य हा इआ देवाचा मुलगा होता.

थोर माणसें हीं ईश्वरापासून निर्माण झालेलीं असतात ही कल्पना प्राचीन सेमिटिक जगामध्यें सार्वत्रिक होती; व ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून ती कमी कमी होत चालली होतीच. फिलो जुडियस असें म्हणतो कीं मोझेसला झिपोरा ही अमानुषरीतीनें गर्भस्थ राहिलीसें दिसतें एसाक हा देवनिर्मित होता, सॅम्युएल हा दैवी बीजाचा होता, तामरची तीच गोष्ट होती; फिलोच्या मनात मानवी बापाला अजीबात धुडकावून लावावयाचें होतें असें दिसत नाहीं कदाचित दैवी बीज मानव पतीच्याकडून त्याच्या बायकोला मिळतें असेंहि त्याला वाटत असे असें दिसतें.

सर्व जात ही देवनिर्मित आहे ही कल्पनाहि वरील कल्पनेइतकीच प्राचीन आहे उदाहरणार्थ मेओबाइटस हीं केमोशचीं लेकरें होत असें म्हटलेलें आहे मूर्तिपूजक सेमिटिक लोक हे ईश्वराची प्रजा होत अशा अर्थानें जेरेमिया त्यांना संबोधितो. व्हर्जिल हा टायरियन लोक बेल देवतेपासून निर्माण झाले असें म्हणतो ओरॅबियनलोकांचेंहि तसेंच मत होतें असें दिसतें. सर्व जातच्या जात ही ईश्वरापासून उत्पन्न झालेली आहे अशा प्रकारची वरील कल्पना अवतार कल्पनेशीं कमी जुळती झालेली दिसते.

यापेक्षाहि अवतार कल्पनेशीं अधिक जवळची अशी कल्पना म्हणजे राजाला ईश्वर मानणें ही होय. तरी पण बाबिलोनियामध्यें ही कल्पना सर्वत्र प्रचलित होती असें नाहीं पुष्कळ बाबिलोनियन राजांना आपण देवाहून भिन्न आहों अशा प्रकारची भावना होती. गिशाचा राजा उरबुद्द हा त्याच्या ह्यातींतच देव मानला जात असे. शरगानिशरी याच्या पाठीमागें देवाची पदवी लावण्यात येत असे व नरमसिन हा स्वतःच देवत्वाचें खूण म्हणून शिंग लाविलेलें आपलें चित्र काढून घेत असे. नरमसिन याला 'आक्कडचा देव' असें म्हटलेलें आढळतें. स्वतःला देव म्हणवून घेण्यात याचा काय हेतु असावा हे कळत नाही. निप्पूरचें देऊळ ताब्यात असल्यामुळें हे स्वतःला देव म्हणवून घेत असत अशी काहींची कल्पना आहे. पण देऊळ ताब्यांत असून सुद्धां काहीं राजांनीं आपल्याला देव म्हणवून घेतलेलें नाहीं. कांहीं लोकांचें असें मत आहे कीं, या राजानें सर्व जग पादाक्रांत केलें म्हणून त्याला देवाचें स्वरूप दिलें गेलें तर काहींची इजिप्तच्या विचाराची छाप हे यांचें कारण मानण्याची प्रवृत्ति दिसते

दोन तीन शतकानंतर अगदेच्या राजानें अनुकरण डुंगी, बरसिन, आणि गिमिलसिन या उर घराण्यांतील राजांनीं केलें. या उर घराण्याचा आद्यसंस्थापक उर एङ्गर हा काहीं देव मानला जात नसे, पण डुंगीनें उरचा प्रांत काबीज केल्यामुळें त्याच्या पाठीमागें तो देववाचक नांव वापरूं लागला.

त्यानें एक मेजवानी करून त्या प्रसंगीं आपल्याला देव म्हणून पदवी धारण केली, व पंचांगामध्यें नवी सुधारणा करून आपल्या नावाचा एक महिना केला. उरच्या राजाच्या कारकीर्दीमध्यें गुडिआ आणि उरलम यांना हवि देण्यात येत असे पण ते मेल्यावरच त्यांना देव समजण्यात येऊं लागलें. याशिवाय बाबिलोनच्या राजाच्या देवत्वाबद्दल स्पष्ट पुरावा सापडत नाहीं. इसिन घराण्याचा इश्मिडगान हा आपल्याला देव मानून घेत असल्यामुळें इरेचच्या इस्टर देवतेचा तो प्रियकर झाला. राजाचें देवत्व कशामुळें उद्भवलें असेल तें असो पण त्याना मनुष्यरूपातील देव मानणें म्हणजे ते अवतारी होते असेंच म्हणण्यासारखें आहे. आणि बाबिलोनियन विचारपद्धतीला हें तत्व विसंगत असल्यामुळें तर त्याचें महत्व विशेष आहे.

ग्री क.—ग्रीक लोकांत अवताराची कल्पना आर्यांच्या प्रमाणें नव्हती. त्यांच्या पुराणकथांतून देव मनुष्यरूपानें पृथ्वीवर जन्मल्याचीं उदाहरणें आढळत नाहींत. पण तात्पुरतें विशेष प्रयोजनासाठीं मानवाचें अगर इतर प्राण्याचें रूप घेतल्याच्या व प्रजोत्पत्ति केल्याच्या कथा अनेक आढळतात.

खि स्ती.—खिस्ती शकाचीं एकदोन शतकें जाईपर्यंत या प्रश्नाचा तात्विक विचार कोणी केला असल्याचें दिसत नाहीं; व त्यानंतर सुरू झालेले विचार खिस्तपूर्व धार्मिक कल्पनांच्या वळणावर गेलेले होते. ईश्वर जडदेहधारी नसतो, त्याला जन्म, मृत्यु, फाशी, वगैरे गोष्टी सोसाव्या लागतात, या समजुती जुन्या ज्यू धर्माला मान्य नव्हत्या. ईश्वराचा व खिस्ताचा संबंध काय, खिस्ताला देवाचा अवतार म्हणावें कीं नाहीं, हा प्रश्न मोठा वादग्रस्त होऊन बसला होता. कोणी खिस्ताला ईश्वराचा अवतार म्हणत; कोणी केवळ मनुष्य म्हणत आणि सामान्य जनसमाज असल्या अवघड तात्विक प्रश्नांत लक्षच घालीत नसे. पुढें खिस्त हा ईश्वराचा पुत्र आहे व जगाचा सत्ताधीश आहे अशी भाषा प्रचलित झाली. सूर्य फार तेजस्वी आहे, आणि सूर्यादिकांस उत्पन्न करणारा जो ईश्वर तो फारच तेजस्वी असला पाहिजे. तें डोळे दिपवून टाकणारें तेज ज्या आवरणाखालीं पृथ्वीवर प्रादुर्भूत होतें त्यालाच ईश्वराचा अवतार म्हणावें अशी अवताराची व्याख्या तयार झाली. तथापि खिस्त हा मनुष्यहि आहे आणि देवाचा अवतारहि आहे, या दोन विधानांचा परस्पर मेळ कसा घालावा याबद्दल अनेक शतकें विचार व वाद चालू राहिला. असल्या तात्विक वादांत न पडतां खिस्ताच्या उपदेशांतील चांगल्या गोष्टींचा प्रसार करीत रहावें, असें म्हणणारे लोकच पुष्कळ असत. इतकेंच नव्हे तर असले प्रश्न उपस्थित करणें म्हणजे खिस्ती धर्मश्रद्धेचा उपमर्द करणें होय असेंहि म्हणणारे कांहीं लोक आढळतात यासबधानें आधुनिक विचार डेकार्टे या तत्त्ववेत्यापासून सुरू झाले, व अलीकडील शास्त्रीय शोधामुळे आत्मा, ईश्वर, वगैरेंच्या अस्तित्वाबद्दलच संदेहवादी, अज्ञेयवादी, वगैरे पंथ पुढें आल्यामुळें अवतारासंबंधीचा प्रश्न अधिकच अवघड होऊन बसला आहे.

मु सु ल मा नी —मुसुलमान लोकांमध्यें अवतारांबद्दलची कल्पना कशी वाढत गेली याचा इतिहास मनोरंजक आहे. ही कल्पना इस्लामी धर्माच्या पर्शियन भागांत म्हणजे शिया पंथामध्यें दृष्टीस पडते. या श्रद्धेच्या अगर विश्वासाच्या प्रकारामध्यें बराच मतभेद आहे तथापि एकंदरींत तिची सामान्य रूपरेषा स्पष्ट आहे. महंमदाच्या मनांत ज्याला आपल्या मागूनचा खलीफ म्हणून नेमावयाचें होतें त्या अलीला मदीनाच्या पुढाऱ्यांनीं पदच्युत केलें व अबू, बक्र उमर आणि उथ्मान यांना खलीफ नेमलें आणि पुढें ६६० मध्यें अली हा ठार मारला गेला, इत्यादि गोष्टींमुळें ही अवताराची कल्पना प्रादुर्भुत झाली. अलीचा ज्येष्ठ पुत्र अलहसन हा ६६९ मध्यें विषप्रयोगामुळें मेला आणि अलहुसेन नावाचा त्याचा कनिष्ठ बंधु ६८० मध्यें करबेलाच्या लढाईमध्यें मेला. याचा परिणाम असा झाला कीं इराणमधील अलीचे अनुयायी अलीला व त्याच्या मुलांना देवाचा अवतार मानू लागले. शियापंथी लोक अलीच्या रूपानें देवच या पृथ्वीवर अवतरला आहे असें मानतात. नुसैरी नावाचा एक प्रसिद्ध पंथ अलीला त्रिमूर्तितील मुख्य असें समजतो.

शिया लोकांचें सर्वसामान्य मत असें आहे कीं, अली व त्याचे दोन मुलगे हे इमाम म्हणजे ईशनियुक्त पुढारी आहेत व त्याच्याप्रमाणच ह्यांच्या मागूनहि दुसरे इमाम झाले. कांहीं पंथाच्या मतें हे इमाम म्हणजे दैवी चमत्काराचे नुक्त (बिंदु) होत. कांही शियालोकांच्या मतें इमामांची संख्या सात आहे तर कांहींच्या मतें त्यांची संख्या १२ आहे. शेवटचा इमाम हा मेला नसून आपला पूर्णावतार व्यक्त करण्याची वेळ पहात तो गुप्त जागीं बसला आहे अशा प्रकारची उभयपक्षाची समजूत आहे. शियापंथी लोकांच्या निरनिराळ्या पंथांनीं निरनिराळे अवतार मानलेले आढळतात.

सात इमाम मानणाऱ्या लोकांमध्यें 'ॲसॅसिन' नांवाचा एक पंथ उदयास येऊन त्याची शाखा 'धर्मयुद्ध' कालांत सीरिया मध्यें स्थापन झाली. पुष्कळ वर्षें लोकांना भयभीत करणारा राशीद अद दिन सिनान हा केवळ इमामच नव्हे तर देवतेचा अवतार मानला गेला इस्माइल लोकांमधील पुष्कळांनीं त्याला अवतार मानलें परंतु त्याच्या लंगडेपणाबद्दल कांहींनीं त्याला तसें मानिलें नाहीं. बारा इमाम मानणाऱ्या लोकांमध्यें मागील शतकामध्यें बाबीस व बहाइ असे पंथ निर्माण झाले २३ मे सन १८४४ मध्यें शिराझ येथील व्यापारी मिरझाअली महंमद यानें आपल्याला बाब म्हणजे गुप्त असलेल्या इमामाचा दूत म्हणवून घेतलें थोड्या दिवसांनीं याच्याहि पुढें जाऊन त्यानें आपल्याला देवतेचा अवतार मानून घेतलें या कामांत जरी पुष्कळ अनुयायी

त्यास मिळाले तरी त्यापैकी पुष्कळांना याबद्दल देहदंडहि भोगावा लागला. मिरझाअली याला स्वतःलाच सन १८५० जुलै ९ रोजीं ताब्रिझ येथें देहदंड द्यावा लागला. मिरझाअलीच्या अनुयायांपैकीं बहाउल्लाह नावाच्या एका अनुयायानें आपण बॉबनें भविष्य वर्तविल्याप्रमाणें ईश्वराचे अवतार असून बाब हा जॉन बॅप्टिस्टाप्रमाणें आहे असें १८६६-६७त जाहीर केलें. या कृत्यामुळे दोन तट उत्पन्न होऊन त्यापैकीं बाहाई नावाच्या पंथानें बहाउल्लाहाला परमेश्वराचा अवतार म्हणून मानिलें.

शिया तत्त्वाचा आणखी एक मजेदार परिणाम असा घडून आला कीं, इजिप्तमध्यें ९६७ सालीं फतिमिद घराणें स्थापन झालें. या घराण्यातील खलीफ हकीमच्या कारकीर्दीत ( ९९६-१०२१ ) दरझी नांवाचा एक इस्मायली पंथाचा मनुष्य इजिप्तमध्यें आला व त्यानें इस्मायली पंथाचीं तत्त्वें जाहीर रीतीनें सांगण्यास सुरवात केली. इजिप्तमधील लोकांनीं जरी त्याची फजीती केली तरी फतिमिद घराण्यानें त्याला आश्रय दिला. हळूहळू त्यानें 'अदामचा आत्मा अलीच्या ठायीं वास करीत असून पुढें तो फतिमिद घराण्यामध्यें शिरला आहे व यास्तव हकीम हा अवतार आहे' अशा प्रकारचा उपदेश करण्यास सुरवात केली हकीम हा एक विक्षिप्त मनुष्य होता. ख्रिश्चन व ज्यू लोकांचा छळ करण्याची तऱ्हा व वैवाहिक अनीति मोडण्याचे त्याचे प्रयत्न विलक्षण प्रकारचे होते. दरझीचें मत त्याला पसंत पडल्यामुळें त्याच्या दरबारांत कांहीं दिवस हें मत वर्चस्व पावत होतें. हकीम हा अद्भुत रीतीनें नाहींसा झाल्यावर दरझी व त्याच्या अनुयायांना तेथून पळावें लागलें व त्यांनीं लेबॅननला जाऊन तेथें नवीन पंथाची स्थापना केली त्या पंथाचें नांव दराशियन अगर ड्रूसेस हें होतें. ड्रूसेस पंथी लोक हकीमाला अवतार मानितात. हकीम जिवंत असतांना दराझी व दुसरा एक हमझा नांवाचा धर्मगुरु यांमध्यें मतभेद उत्पन्न होऊन हमझाचें तत्त्व अधिक मान्य झालें होतें. हाच ड्रूसेस पंथाचा खरा संस्थापक होय, आणि दरझीला नास्तिक समजला जाण्यापर्यंत पाळी आली. सृष्टीच्या आरंभीं परमेश्वरानें विश्वव्यापी मन उत्पन्न करून त्याच्या करवीं सृष्टि निर्माण केली आणि ईश्वरानें ज्या वेळीं हकीमाचा वेष धारण केला त्यावेळीं हें विश्वव्यापि मन हमझाच्या रूपांत अवतीर्ण झालें असें ड्रूसेसच्या पंथाचें मत होतें.

[संदर्भ वाङ्मय—मेसार-लेक्चर्स ऑन दि अर्ली हिस्टरी ऑफ दि किंगिडाप. लंडन १९०५. के. टी. ह्यूग-डाय नयरिट एक्सपीडिशन, लिपझिग १९१२. निकलसन-दुर्न्स० ऑफ दि थर्ड ईटर० कॉमिश फॉरा दि हिस्टरी ऑफ रिलिजन्स ऑक्सफर्ड १९०८. बार्थ-रिलिजन्स ऑफ इंडिया, लंडन १८९१

हिंदु-भगवद्गीता,योगसूत्र,हरिवंशपर्व,ऋग्वेद शत ब्रा ते. ऐ. ब्रा छांदो. उप. रामायण महाभारतादिपुराणे. आदारकर-रिपोर्ट ऑन दि सर्च फॉर संस्कृत मॅनास्क्रिप्टस, १८८३-८४. मूर-ओरि. संस्कृत टेक्स्ट्स ४.—विष्णु-पुराण

बौद्ध.—त्रिपिटक० वासिलीफ-बुद्धिस्मस० ए. रि. ए — कॉस्मॉगॉनी हा लेख० अभिधर्मकोशव्याख्या-फ्रेंच भाषांतर० ललितविस्तर० ओल्डनबर्ग-रिलिजन दि वेद० व्हॅलिस डेव्हिड्स जे. आर ए. एस १८९९० हॉपकिन्स-ग्रेट एपिक, न्यूयॉर्क १९०२.

तिबेटी ल—पेकिंग गॅझीट ३१मार्च १८७७. रॉक हिल-तौंग पाओ १. लेडन १९१० वाडेल-बुद्धिझम ऑफ तिबेट. तिबेटी—इंग्लिश डिक्शनरी.

चिनी ल.—एस.बी.ई. ३. शी किंग.

इजिप्शियन.—बज-फॅसिमिलीज ऑफ इजिप्शियन हिअरॅटिक पपायर इन ब्रिटिश म्यूझियम, लंडन १९१०

बेन्सन आणि गौर्ले—दि टेंपल ऑफ मुट इन् अशेर. बजबुक ऑफ दि डेड; गॉडस ऑफ दि इजिप्शियन्स. वीडेमन—दि एन्शंट इजिप्शियन डॉक्ट्रिन ऑफ दि इम्मॉर्टॅलिटी ऑफ दि सोल.

सेमिटिक.—स्मिथ—रिलि०सेमा० बार्टन—सेमेटिक ऑरिजिन्स. रावर्टसन स्मिथ लेक्चर्स ॲंड एसेज, लंडन १९१२; किनशिप ॲंड मॅरेज. किंग—हिस्टरी ऑफ सुमेर ॲंड अक्कड.

मुसुलमानी.—मोटांबेट—रिलिजन इन दि ईस्ट. ब्लिस—दि रिलिजन्स ऑफ मॉडर्न सिरिया ॲंड पॅलेस्टाइन ए. रि. ए]

अवंति—अर्वाचीन उज्जनी, अयोध्यादि सात मोक्षदायी स्थळांत अवंतीकेचें नांव आहे. ही माळव्यांतील नामांकित नगरी, विक्रमादित्याची राजधानी असून भास्कराचार्यांनीं ही किती अंशावर आहे त्याविषयीं लिहिलेलें आहे. आमचे ज्योतिषी लंकेपासून उत्तर ध्रुवापर्यंत गेलेली याम्योत्तर रेषा या नगरीवरून गेल्याचें समजतात. ( उज्जनी पहा) व तिला आपली याम्योत्तर रेषा मानितात. हल्लींच्या शहरापासून दक्षिणेस एक मैलावर हें शहर पूर्वी होतें असें दिसून येतें. कारण तेथें जमीनींत गाडिलें असता इमारतींचे खाव वगैरे अजून आढळतात. येथें महाकालेश्वर नांवाचें ज्योतिर्लिंग आहे. कालिदासानें अवंती, महाकाल व क्षिप्रा यांचा रघुवंशांत ( सर्ग ६.३२-३५ ) उद्देश केला आहे. असें सांगतात कीं, येथें विक्रमादित्याचा संगमरवरी दगडाचा एक पुतळा स्थापिलेला होता, परंतु तो मुसुलमानांनीं फोडून टाकून नाहींसा केला.

अवंतीच्या स्त्रिया रतकर्मांत अत्यंत निपुण असतात असें बालरामायणांत ( १०.८२ ) म्हटलें आहे. आवंतिकांनी चुंबनादि पूर्व प्रकार आवडत नाहीत, एकदम आलिंगन पसंत असतें ( कामसूत्र २, ५ ).

पांडवांच्या वेळी येथें विंद व अनुविंद असे दोन भाऊ राज्य करीत होते असें महाभारतांत सांगितलें आहे. महाभारतकाली अवंतीराष्ट्र दक्षिणेस नर्मदेच्या किनाऱ्यापर्यंत व पश्चिमेस मही नदीच्या किनाऱ्यापर्यंत पसरलें होतें. अवंतीच्या लोकांना आवंत्य असें म्हणत. अवंतीची राजधानी अवंतिका. बृहत्संहितेंत पुष्कळ ठिकाणीं या शहराचा नामनिर्देश केलेला आहे ( ५. ४०; ९. १७ व १८; ११. ३५ इत्यादि ). पुढील संस्कृत वाङ्मयांत तर अवंतीचा व्यापाराचें पेठ म्हणून नेहमीं उल्लेख येतो. बुद्धधर्माच्या उदयकालीं हिंदुस्थानचे जे मोठे सोळा राजकीय विभाग पडले होते त्यांत अवंति हा एक आहे. त्याची राजधानी उज्जयिनी व राजा चंडप्रद्योत नावाचा होता. नाशिक व अजंठा येथील शिलालेखातून अवंती हें नाव आढळतें. रुद्रदामननें आकरावंति प्रदेश जिंकून घेतला असें जुनागडच्या लेखावरून कळतें ( 'आकर' पहा )

[संदर्भग्रंथ.–हिस्टरी ऑफ दि डेक्कन ( बॉं. गॅ. पु. १ भा. २ ) आर्किऑलॉजिकल सर्व्हे. वेस्टइंडिया पु. ४. इं. अँ. पु. ७. श. कोश. दीक्षित भारतवर्षीय भूवर्णन (प्राचीन ). स्मिथ अर्लीहिस्टरी इ.)

**अवंतिवर्मा**—काश्मीरचा एक राजा. कर्कोटक घराणें जुनें पुराणें होऊन मोडल्यावर काश्मीरच्या सिंहासनावर अवंतिवर्म्यानें आपल्या उत्पल घराण्याची सत्ता प्रस्थापित केली ( ८५५ ). या अवंतिवर्म्याचा आजा उत्पल नावाचा असून कर्कोटक घराण्याच्या ऱ्हासकाली तो त्याचा मंत्री होता,व त्यानें स्वत:च लावलेली गादी बळकाविण्याचा प्रयत्न केला होता. त्याचेंच नांव पुढें त्याच्या घराण्याला मिळालें. अवंतिवर्म्याच्या अंगीं कर्तृत्वशक्ति आणि जागृत सद्सद्विवेकबुद्धि हे गुण उत्कटतेनें वास करीत होते. त्याच्या कडक न्यायीपणाच्या कांहीं कथा राजतरंगिणींत दिल्या आहेत. त्यानें मिळविलेल्या विजयाप्रमाणेंच त्याची जमीनमहसुलाची पद्धत देखील फार यशस्वी झाली. सुय्य नामक कर्तृत्ववान व बुद्धिमान मंत्र्याच्या साहाय्यानें त्यानें आपल्या राज्यांत वितस्ता आणि काश्मीरांतील इतर नद्या यांना बंधारे घालून त्यांपासून अनेक ठिकाणीं कालव्यांचीं कामें करून घेतलीं. त्यामुळें त्या प्रांतांत शेंकडों नवीन गांवें अस्तित्वांत येऊन हजारों एकर पडित जमीन लागवडीखालीं आली. काश्मीरप्रांतांत फार प्राचीन काळापासून चांगल्या सुकाळांत देखील खंडीभर भाताला ( धान्य खारीला ) २०० दिनार पडत असत, पण त्यालाच आतां या नवीन व्यवस्थेमुळें केवळ ३६ दिनार पडूं लागले असें कल्हणानें म्हटलें आहे ( ५. ११६–११७ ).

अवंतिवर्मा फार धार्मिक होता. त्यानें, त्याच्या राणीनें आणि प्रधानांनीं शिवाचीं व विष्णूचीं अनेक मंदिरें बांधिलीं. ऐहिक संपत्तीला तो इतका तुच्छ लेखीत असे व ब्राह्मणाविषयीं त्याचें एवढें औदार्य असे कीं, छत्रचामरेंखेरीज करून त्यानें सर्वस्व ब्राह्मणांना देऊन टाकिलें ( ५ १८ ) तो महावैष्णव असून अहिंसा–प्रतिपादक होता. त्यानें आपल्या राज्यांत सर्वत्र प्राणिहिंसा बंद केली व तेव्हांपासून दहा वर्षे सगळ्या काश्मीर प्रांतांत पूर्वी मेघवाहनाच्या कारकीर्दीप्रमाणेंच कोणा प्राण्याचा जीव घेण्यांत आला नाहीं असें कल्हणानें लिहिलें आहे ( ५. ६४ ); ' हिंवाळ्याच्या दिवसांत कांसवें नदीच्या थंड पाण्यांतून बाहेर येऊन काठावर स्वस्थपणें ऊन खात पडत,(५ ६५) 'अवंतिवर्म्याच्या कारकीर्दींत भट्ट कल्लट आणि दुसरे अनेक सिद्ध पुरुष देशाच्या उद्धारार्थ जन्मास आले ' ( ५,६६ ), अवंतिवर्म्याचें सगळें आयुष्य जसें धर्माचरणांत गेलें तसा त्याचा अंतहि त्याच स्थितींत झाला, म्हणजे भगवद्गीतेचें पारायण चाललें असतां त्यानें देह ठेविला ( ५. १२५ ) अवंतिवर्म्याचें देहावसान लौकिक शक ५९ त आषाढ शुक्ल ३ स झालें. ( ५,१२६ ). यावरून इ. सनाचें ८८४ ( ३९५९–३०७५ ) वर्ष येतें. म्हणजे त्यानें इ. स ८५५ पासून ८८४ पर्यंत २९ वर्षे राज्य केलें.

[ वैद्य–मध्य. भारत १. स्मिथ–अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. बुद्धोत्तरजग. राजतरंगिणी ]

**अवदानें**, अ व दा न वा ङ्म य.—जातकें म्हणजेच अवदानें होत; बोधिसत्त्व हा त्यांचा नायक होय. जातकमालेला बोधिसत्त्वावदानमाला असेंहि म्हणतात; कारण बोधिसत्त्वावदान व जातक हे शब्द समानार्थक आहेत. सूत्रालंकार व जातकमाला हे ग्रंथ अवदान वाङ्मयांतील धर्मग्रंथांशीं बहुतेक अनुरूप आहेत; व अवदानसमुच्चयामध्येंहि कित्येक जातकें आहेत.

सूत्रालंकार व जातकमाला या कथावाङ्मयांतील ग्रंथाप्रमाणेंच अवदानग्रंथाचाहि कांहीं भाग हीनयानपंथी वाङ्मयात्मक व कांहीं महायानपंथी वाङ्मयात्मक आहे. जुने ग्रंथ सर्वांत हीनयानपंथाचे आहेत. पालि जातकांमध्यें व अवदानांमध्येंहि आढळणारी बुद्धाची आराधना जरी या ग्रंथांतहि आढळते, तरी महायानी पौराणिक कथा व मर्यादातिक्रम यांच्यापासून ते ग्रंथ अगदीं अलिप्त आहेत; परंतु लहान लहान अवदानग्रंथ पूर्णपणें महायानी पंथाचे आहेत.

'अवदान' या शब्दावरून धार्मिक किंवा नैतिक अचाट कृत्य व अचाटकृत्याचा इतिहास, असा अर्थबोध होतो. आत्मयज्ञ करणें याला अशा प्रकारचें अचाट कृत्य असें म्हणतात. परंतु धूप, पुष्प, विलेपन, सुवर्ण व रत्नें यांचें दान करणें, किंवा पवित्र स्थानीं स्तूप, चैत्य वगैरे उभारणें यालाहि अचाट कृत्य असें म्हणतात. " दुष्कर्माचा परीणाम वाईटच व्हावयाचा " हें सामान्यतः दर्शविण्यासाठीं या गोष्टी लिहिलेल्या आहेत. परंतु त्यांत कर्माचाहि संबंध असून एका जन्मांतील कृत्यांचा भूत किंवा भविष्य जन्मांतील कृत्यांशीं कसा निकट संबंध असतो हें दाखविलें आहे. एका दृष्टीनें त्या केवळ दंतकथा आहेत. परंतु त्या अगदीं खऱ्या

गोष्टी आहेत, व त्या स्वतः बुद्धानें सांगितलेल्या असल्यामुळें बुद्धवचन म्हणून सूत्राप्रमाणें त्या आधारभूत आहेत, असें बौद्ध लोक समजतात.

जातकांप्रमाणें अवदानें हीहि एक प्रकारचा नीतिउपदेश आहे. म्हणून पूर्व वृत्तान्तापासून कोठें व कोणत्या प्रसंगीं बुद्धानें ती गोष्ट निवेदन केली, हें बहुधा उपन्यासामध्यें सांगितलेलें असतें; व सरतेशेवटीं त्या बुद्धाच्या गोष्टींतील सार काढिलेलें असतें. अशाप्रकारें यथामार्ग अवदानांत पूर्वकालीन वृत्तान्तावरून सद्यःकालची गोष्ट व भावार्थ सांगितलेला असतो भूतकालाच्या गोष्टींचा नायक जर बोधिसत्व असेल तर अशा प्रकारच्या अवदानाला 'जातक' असेंहि म्हणतां येईल. कांहीं अवदानें विशिष्ट प्रकारचीं आहेत. त्यांत बुद्ध पूर्ववृत्तान्तावरून गोष्ट सांगत नाहीं, तर भविष्यार्थ सांगतो. या भविष्यकालीन गोष्टींचा भूतकालीन गोष्टींप्रमाणेंच वर्तमानकालच्या कर्मांचें विवरण करण्यास उपयोग होतो दोन्ही प्रकारच्या गोष्टी ज्यांत एकत्र केलेल्या आहेत अशींहि कांहीं अवदानें आहेत, व कर्माचें चांगलें किंवा वाईट फल याच जन्मीं प्राप्त होतें असें सांगणारींहि कांहीं अवदानें आहेत

हीं सर्व प्रकारचीं अवदानें विनयपिटकांत व सूत्रालंकारांत निरनिराळींहि आलेलीं आहेत, परंतु हीं मोठमोठ्या समुच्चयांत बहुधा एकत्र आढळतात. हीं बहुतकरून ज्ञानवृद्धीसाठीं किंवा विद्याविषयक महत्त्वाकांक्षेसाठीं रचलेलीं असावीं.

**अवदानशतक**—अवदानशतक किंवा "शंभर अवदानें" हा ग्रंथ पहिल्या प्रकारचा असून सर्वांत जुना असावा असा अंदाज आहे. ज्या अर्थी तिसऱ्या शतकाच्या पूर्वार्धांत या ग्रंथाचें चिनी भाषेंत भाषांतर झालें होतें व ज्याअर्थी यांत दीनाराचा ( नाण्याचा ) उल्लेख केलेला आहे, त्या अर्थी तो ग्रंथ इ. सनाच्या दुसऱ्या शतकांत झाला असावा असें बव्हंशीं निःसंदिग्धतेनें म्हणतां येईल [ रोमन देनारियसचा दीनार असा उल्लेख करणारे ग्रंथ इ. स. च्या दुसऱ्या शतकापूर्वी झालेले नसावेत. कारण हें नाणें ग्रीसमार्फतच हिंदुस्थानांत आलें असलें पाहिजे ( ऑली-रेपरटॉईड मिदे. बुद्धिस्ट २, ८, पा २३ ).] हा ग्रंथ हीनयान पंथाचा आहे हें कथानकांच्या स्वरूपावरून व सर्वास्तिवादिदर्शक गोष्टींत आलेल्या परिनिर्वाणसूत्रांतील व सर्वास्तिवाद्यांच्या संस्कृत धर्मशास्त्रामधील इतर सूत्रांतील उताऱ्यांवरून पूर्वीच सिद्ध झालें आहे ( स्पेयर १, पा. १६ आणि फेअर. डी एम जी. ५३. १८ ९९, पा १२०. ओल्डनबर्ग, झेड डी. एम जी. ५२, पा ६ ०२ ). या शतकांमध्यें बुद्ध-उपासना हा मुख्य भाग आहे. परंतु बोधिसत्व-संप्रदाय व महायानी तत्त्वज्ञान यांचा या गोष्टींत मागमूसहि नाहीं.

अवदानशतकांत दहा दशकें असून प्रत्येक दशकांत विशिष्ट विषय आलेला आहे. प्रत्येक दहा भागांचा एक वर्ग ( वग्ग ) अशा प्रकारची ही विभागणी पालि ग्रंथांत फार प्रचलित आहे; व म्हणून ती प्राचीन बौद्ध धर्मांतील असावी असें वाटतें. बुद्ध किंवा प्रत्येकबुद्ध होण्यासाठीं काय करावें लागतें हें पहिल्या चार दशकांतील कथानकामध्यें सांगितलेलें आहे वस्तुतः पहिल्या दशकांतील सर्व कथानकें व तिसऱ्या दशकांतील बरींचशीं कथानकें भविष्यकथनाच्या स्वरूपाचीं आहेत. ज्या धार्मिक कृत्याच्या योगानें एखादा मनुष्य ( ब्राम्हण, राजकन्या, कुसीदकपुत्र, श्रीमान् व्यापारी, बागवान्, राजा, नावाडी, लहान मुलगी वगैरे ) बुद्धाची आराधना करितो व कांहीं चमत्कार घडल्यावर पुढच्या युगांत हा मनुष्य बुद्ध किंवा ( तिसऱ्या दशकांत ) प्रत्येकबुद्ध होईल असें किंचित हास्य करून बुद्ध मोठ्यानें सांगतो, त्या धार्मिक कृत्याबद्दलची माहिती एका गोष्टींत सांगितलेली आहे परंतु दुसऱ्या व चौथ्या दशकांतील गोष्टी जातकें आहेत पूर्वीच्या एका जन्मीं बुद्ध स्वतः या कथानकाचा नायक असल्यामुळें या जातकांत सांगितलेलीं धार्मिक, पुण्यशील व अद्भुत कृत्यें घडलीं असें सांगण्यांत येतें पांचवें दशक हें एक प्रकारचें प्रेतवस्तु असून पालींतील पेतवत्थु हें त्याच्याशीं अनुरूप आहे. मौद्गल्यायनासारखा साधु प्रेतकोटीचें निरीक्षण करितो, व एखाद्या ( पुरुष किंवा स्त्री ) प्रेताला होत असलेल्या यातना पाहून तो त्याचें कारण विचारितो; तें त्याला बुद्धाला विचारिण्यास सांगतें; भिक्षा न घालणें, साधूंचा तिरस्कार करणें वगैरे ज्या गोष्टी त्या प्राण्यानें पूर्वजन्मीं केलेल्या असतात त्यांविषयींची हकीकत बुद्ध त्या साधूला सांगतो. सत्कृत्याच्या योगानें स्वर्गांत देव होऊन राहिलेल्या मनुष्यांच्या व प्राण्यांच्या गोष्टी सहाव्या दशकांत सांगितलेल्या आहेत. शेवटच्या चार दशकांत कोणत्या कृत्याच्या योगानें अर्हत् होतां येतें, याविषयींचीं कथानकें आहेत. सातव्या दशकांतील सर्व अर्हत् शाक्यकुळांतील असून आठव्या दशकांतील सर्व अर्हत् स्त्रिया, नवव्यांतील सदाचरणी पुरुष व दहाव्यांतील अर्हत् ज्यांनीं पूर्वी दुष्कर्में करून त्याबद्दल शिक्षा भोगिल्यानंतर धार्मिक कृत्यें करून नंतर अर्हत् पदाला पोंचलेले असे पुरुष आहेत.

या समुच्चयांतील कथानकांचें वर्गीकरण करून एका विवक्षित पद्धतीप्रमाणें हीं रचलेलीं आहेत; एवढेंच नाहीं, तर तीं एकाच धर्तीवरहि लिहिलेलीं आहेत. या एकाच धर्तीवर लिहिण्याचा इतका परिणाम झाला आहे कीं, कांहीं ठिकाणीं भाषासरणी व स्वरूपवर्णनें अगदीं त्याच त्या शब्दांत पुनः पुनः आलेलीं आहेत. प्रत्येक कथानकाचा प्रारंभ असा होतो—

"राजे, मंत्री, धनवान् लोक, नागरिक, व्यापारी संघ, सार्थनायक, देव, नाग, यक्ष, असुर, गरुड, किंनर व महानाग

यांनीं ज्याला पूज्य मानिलें आहे व ज्याची स्तुति केला आहे आणि देव, नाग, यक्ष, असुर, गरुड, किंनर व इमा नाग यांनीं ज्याची आराधना केली आहे, असा प्रसिद्ध पुण्यवान्, गुरु बुद्ध, आपल्या शिष्यगणासह अन्न, वस्त्र, बिछाना, आश्रय खाद्यपदार्थ, औषध वगैरे सर्व आवश्यक गोष्टी भिक्षारूपानें मिळवून अमुक ठिकाणीं गेला व अमुक स्थळीं राहिला."

प्रत्येक कथानकाचा उपसंहार खालील शब्दांनीं झालेला आहे:—

"गुरूनें असें संभाषण केल्यावर परमानंदित अंतःकरणानें भिक्षूंनीं त्या गुरुवचनाची प्रशंसा केली."

एखाद्या गोष्टीचें तात्पर्य काढिल्यानंतर तें पुढीलप्रमाणें नेहमीं व्यक्त केलें आहे:—

"भिक्षू लोकहो, दुष्कर्मांचा परिणामहि अशा प्रकारें वाईटच होतो, अगदीं उत्तम कृत्यापासून उत्तम फलप्राप्ति होते व मिश्र कृत्याचा परिणामहि मिश्र प्रकारचाच होतो, म्हणून तुम्ही भिक्षु लोकानीं दुष्कर्मांचा व मिश्र कर्मांचा त्याग करून सत्कर्म करण्यात संतोष मानला पाहिजे."

त्याचप्रमाणें धार्मिक मनुष्य, श्रीमान् मनुष्य, बलिष्ठ राजा, सुखकारक विवाह, तरुण मनुष्याचें शिक्षण, पूर्वीच्या बुद्धाचें आगमन वगैरे गोष्टींचें वर्णन सर्व ठिकाणीं अगदीं त्याच त्या शब्दांनीं दिलें आहे. कांहीं लहान लहान वाक्यानांच ही गोष्ट लागू आहे असें नाहीं, तर कित्येक छापील पानें भरून जातील, एवढ्या लांब लांब उताऱ्यांचीहि हीच स्थिति आहे. कोणी एक मनुष्य बुद्ध होईल हें भविष्य बुद्धानें हास्यवदनानें सांगितलें, त्यानें ज्या भागात वर्णन केलें आहे, तो भाग लायलचक ठरीव भागांपैकीं आहे. भविष्यकथनाच्या पूर्वी बुद्ध नेहमीं हास्य करीत असे व तो हास्य करीत असतां निळे, पिंवळे व पांढरे किरण त्याच्या मुखापासून निघत असत. यांपैकीं कांहीं किरण खालीं पातालात व कांहीं स्वर्गलोकात जात असत व हजारों लोकांमधून हिंडून येऊन पाठीमागच्या बाजूनें ते किरण पुनः बुद्धाकडे येत व तें भविष्य ज्या प्रकारचें असें, त्याप्रमाणें बुद्धशरीराच्या कोणत्या तरी भागात अन्तर्धान पावत, याचें फार सविस्तरपणें वर्णन केलेलें आहे. सामान्यतः अवदानशतकातील कथानकपद्धतीचे, विस्तृतता व दीर्घसूत्रीपणा हे विशिष्ट गुण आहेत. तथापि सार्वत्रिक व कंटाळवाण्या परंतु बोधप्रद अशा अनेक गोष्टींशिवाय, अवदानशतकामध्यें अनेक महत्त्वाची कथानकें व बौद्धकथात्मक वाङ्मयांतील भागाहून भिन्न असलेल्या व इतर प्रथातून परिचित झालेल्या अशा अनेक गोष्टी आहेत त्या कथासंग्रहाच्या स्वरूपाची कल्पना येण्यासाठीं फक्त थोड्या गोष्टी साराशरूपानें देता येतील

गोष्ट २८ वीः—एका गरीब मुलीनें बुद्धाच्या पायांना चंदनाचें विलेपन केलें, त्यामुळें सर्व शहरभर चंदनाचा सुवास सुटला; या चमत्काराचा त्या मुलीला आनंद वाटून ती बुद्धाच्या पाया पडली व पुढील जन्मीं मीं प्रत्येकबुद्ध व्हावें, अशी तिनें बुद्धाला विनंति केली. गंधमादन या नावाची एके दिवशीं प्रत्येकबुद्ध होईल, असें बुद्धानें हंसून भविष्य केलें

गोष्ट ३४ वीः—ही सर्वस्वाचा त्याग केलेल्या शिबि राजाच्या गोष्टीचें रूपांतर आहे; परंतु फक्त मनुष्यप्राण्यांना संतुष्ट केल्यानें त्याचें समाधान झालें नाहीं. लहान लहान प्राण्यांचेंहि कल्याण करण्याची त्याची इच्छा होती म्हणून त्यानें आपली त्वचा चाकूनें कापिली व आपल्या रक्ताच्या योगानें डसणाऱ्या मक्षिकांनीं तृप्त व्हावें म्हणून तो त्याची वाट पाहूं लागला शक्रानें स्वर्गांतून हें पाहिलें व त्याची परीक्षा घेण्यासाठीं गृध्राचें रूप घेऊन त्याच्यावर झडप घालण्याच्या मिषानें तो शिबीजवळ आला राजानें त्याच्याकडे फक्त दयार्द्रदृष्टीनें पाहिलें व त्यास म्हणाला, "हे मित्रा, माझ्या शरीरातून जें कांहीं तुला पाहिजे असेल तें घे, तें मीं तुला देतों.' नंतर त्या शक्रानें ब्राह्मणाचें स्वरूप घेऊन त्या राजाजवळ त्याचे दोन्ही डोळे मागितले. शिबी म्हणाला, "हे थोर ब्राह्मणा, तुला जें पाहिजे असेल तें घे, मीं तुला अडथळा करणार नाहीं" नंतर शक्रानें आपलें खरें स्वरूप धारण करून शिबीला पूर्ण आत्मप्रबोधन होईल, असें त्याच्या बद्दल भविष्य केलें

गोष्ट ३६ वीः—ही मैत्रकन्यकाची असून मित्तविंदकाच्या पालि जातकाचें हें रूपांतर आहे, पण बोधिसत्व हा नायक असल्यानें त्या गोष्टीला या ठिकाणीं पालि रूपांतराहून अगदीं भिन्न वळण मिळालें आहे त्यानें आपल्या आईचा अपराध केल्यामुळें त्याला नरकवासाची शिक्षा झाली व त्या ठिकाणीं त्याच्या मस्तकासभोंवतीं एक लोखंडाच उत्तप्त चक्र फिरत होतें असें येथें सांगितलेलें आहे; परंतु त्या भयंकर यातना तो भोगीत असतांना अशाच प्रकारचा दुसरा पातकी मनुष्य तेथें येईपर्यंत (६६००० वर्षें) त्याला तें चक्र सहन करावें लागेल असें त्याला सांगण्यात आल्यावर त्याला प्राण्यांची दया येऊन, तशा प्रकारच्या यातना कोणालाहि होऊं नयेत म्हणून, तें चक्र आपल्या मस्तकावर नेहमीं धारण करण्याचें त्यानें ठरविलें. या त्याच्या दयाळूपणाच्या विचारामुळें तें चक्र त्याच्या मस्तकापासून नाहींसें झालें.

गोष्ट ५४ वीः—बुद्धानें दिलेल्या केशावर व काढिलेल्या नखावर, आपल्या राण्यांच्या सूचनेवरून बिंबिसार राजानें आपल्या राण्यांच्या अन्तपुरामध्यें एक स्तूप उभा करविला होता. त्या स्त्रिया या स्तूपाची, धूप, दीप, पुष्पें वगैरे साहित्यांनीं पूजा करीत असत. परंतु अजातशत्रूनें आपल्या पित्याला ठार मारून जेव्हां गादी बळकाविली, तेव्हां कोणीहि स्त्रीनें स्तूपाची पूजा करूं नये, केल्यास मरणाची शिक्षा देण्यात येईल असा त्यानें सक्त हुकूम केला. परंतु अंतःपुरातील स्त्रियांपैकीं श्रीमती नावाच्या स्त्रीनें त्या हुकुमाकडे लक्ष न देतां त्या स्तूपाभोंवतीं एक दीपमाला

लावली. राजानें कोपाविष्ट होऊन तिला ठार मारिलें, मरतां मरतां तिनें बुद्धाचें स्मरण केलें; व तावत्त्रिंश देवांच्या स्वर्गांत तिनें पुनर्जन्म घेतला.

*गोष्ट १०० वी:*—इतर सर्व अवदानांचे नायक बुद्धाचे समकालीन होते, परंतु शेवटच्या गोष्टीचा नायक हा अशोक राजाचा समकालीन होता. बुद्धाच्या प्रयाणाची हकीगत अगोदर देऊन बुद्धकालाशीं ही सांखळी जोडून दिली आहे. परिनिर्वाणसूत्रांतील एका भागांत ही हकीकत असून, ही पालि महापरिनिब्बान सूत्राशीं बरीच जुळते. ४० व्या गोष्टीच्या प्रस्तावनेंत परिनिर्वाणावर दुसरा एक उतारा आहे बुद्धप्रयाणानंतर १०० वर्षांनी अशोक राजा होऊन गेला अशोकाला कुनाल नावाचा एक पुत्र होता, (अशोक पहा) तो इतका सुंदर होता कीं, त्याच्या सारखा त्याच्या तोंडाचा सुंदर पुरुष असणें शक्य नाहीं असें राजाला वाटलें. परंतु याच्याहि पेक्षा एक सुंदर तरुण आहे असें एके दिवशीं गन्धारच्या व्यापाऱ्याकडून त्यानें ऐकिलें आमच्या गांवीं एक सुंदर नावाचा तरुण पुरुष आहे, त्याचें सौंदर्य दोषहीन आहे, इतकेंच नाहीं तर तो ज्या ज्या ठिकाणीं जातो, त्या त्या ठिकाणीं एक कमल तडाग व उपवन उत्पन्न होतें, असें त्यानें सांगितलें. आश्चर्यचकित झालेल्या त्या अशोक राजानें दूत पाठवून या चमत्कारिक गोष्टीबद्दल आपली खात्री करून घेतली. या तरुणाला हें फल कोणत्या कर्मामुळें मिळालें असा राजानें प्रश्न केल्यावर उपगुप्त ( या उपगुप्तानें इतर अवदानामध्यें बुद्धाची भूमिका अंगीकृत केली आहे.) गुरूनें सांगितलें कीं ज्या वेळीं बुद्धाला पूर्ण निर्वाण प्राप्त झालें तेव्हां हा एक सुंदर गरीब शेतकरी होता; महा-काश्यप व त्याचे अनुयायी ५०० भिक्षु बुद्धाच्या अंत्यविधीसाठीं गेले असतां आपल्या गुरूच्या प्रयाणामुळें दुःखित होऊन पुष्कळ वेळ परिभ्रमण केल्यामुळें जेव्हां अगदीं दमून गेले, तेव्हां या सुंदरानें श्रम हरण करणारें असें एक स्नानपान व भोजन तयार केलें. या सत्कृत्याचें फल हल्लीं तो उपभोगीत आहे.

अवदानशतकांतील कित्येक कथानकें इतर अवदान समुच्चयामध्यें व कांहीं पालि अवदानामध्यें आलेलीं आहेत. उदाहरणार्थ, राष्ट्रपालासंबंधीं गोष्ट ( नं. ९० ) कांहींशीं मज्झिम निकायाच्या रट्ठपालसुत्ताशीं व कांहींशीं रट्ठपालअवदानाशीं अनुरूप आहे; अनेक प्रसंगीं फक्त नांवांतच मात्र फरक आढळतो व अवदानांमध्यें बरेच फेरबदल आढळतात.

कर्मशतक या प्राचीन ग्रंथाचें अवदानशतकाशीं बरेंच साम्य आहे; व त्यांत अवदान शतकांतील कित्येक कथानकेंहि आलेलीं आहेत; परंतु दुर्दैवानें त्याचें फक्त तिबेटी भाषांतर शिल्लक आहे. [ असाच दुसरा एक तिबेटी अवदान ग्रंथ आहे; तिबेटी वाङ्मयांत ' डंग्लुन ' या नांवानें तो प्रसिद्ध आहे त्याचें जर्मन भाषांतर श्मिट्ट यानें " ज्ञ व मूर्ख " अशा नांवानें प्रसिद्ध केलें आहे ( सेंट पीटर्सबर्ग १८४३ )]

*दिव्यावदान.*—हा अवदानशतकापेक्षां लहान ग्रंथ आहे; परंतु त्यांत कांहीं फार प्राचीन सूत्रें आहेत ज्याच्या आरंभीं महायान पंथी स्तवन केलें आहे ' परमबुद्ध व बोधिसत्व यांच्या ठिकाणीं पूज्यबुद्धि ठेवा'' महायान पंथाच्या धोरणावर यांत कांहीं माहिती उघडपणें मागाहून घातलेली आहे; ( उदा. ३४ व्या प्रकरणाला ' महायान सूत्रम् ' असें नांव आहे ) परंतु एकंदरींत हा ग्रंथ हीनयान पंथाचा आहे. संस्कृत धर्मशास्त्र व दीर्घागम, उदान, स्थविरगाथा इत्यादि निरनिराळ्या धर्मग्रंथाचा उल्लेख वारंवार केलेला आहे कांहीं कथानकांचा आरंभ व शेवट अगदीं अवदानशतकांतील कथानकाप्रमाणेंच असून या संग्रहांतील विशिष्ट ठरीव शब्दप्रयोग व वर्णनें शब्दशः दिव्यावदानामध्येंहि आलेलीं आहेत. सर्वास्तिवादाच्या विनयपिटकामध्यें बहुधा याचा प्रथमोद्भव झाला असावा अर्धीं अधिक कथानकें विनयपिटकांतूनच घेतलेलीं आहेत परंतु बाकीचीं अश्वघोषाच्या सूत्रालंकारांतील घेतलेलीं आहेत.

वस्तुतः या ग्रंथाची रचना फार घोटाळ्याची व विसंगत आहे. त्यांत वर्गीकरणाचें एकहि तत्त्व दिसून येत नाहीं. भाषा व पद्धति यांचें यत्किंचितहि एकीकरण झालेलें नाहीं. बहुतेक कथा सुंदर, साध्या गद्यात्मक संस्कृतांत लिहिलेल्या आहेत. फक्त मधून मधून गाथा आलेल्या आहेत. परंतु कांहीं थोड्या भागांत चातुर्ययुक्त वृत्तें व मोठमोठे संधि ज्यांत आहेत, अशी उत्कृष्ट काव्यपद्धति दृष्टीस पडते. संग्रहकर्त्यानें इतर ग्रंथांतून शब्दशः कांहीं उतारे घेतले असावे असें यावरून दिसतें. या ग्रंथाचे निरनिराळे घटकावयव निरनिराळ्या कालांतील असावेत, असेंहि अनुमान यावरून काढितां येईल. या संग्रहाचें चिनी भाषेंत इ. सनाच्या तिसऱ्या शतकांत भाषांतर झालें होतें [ दिव्यावदानांतील कांहीं अवदानांचें इ. सनाच्या तिसऱ्या शतकांत चिनींमध्यें भाषांतर झालें होतें. (कावेल व नील. दिव्यावदान पा. ६५५.) या गोष्टीवरून त्या सर्व संग्रहाचेंहि चिनीमध्यें भाषांतर झालेंच असेल, असें म्हणतां येत नाहीं. ] अशी कल्पना केली तर यापूर्वी बहुधा त्याचा उद्गम झाला नसावा असें म्हणतां येईल. अशोकाचे मागून झालेले शुंग घराण्यांतील पुष्यमित्रापर्यंतचे ( सुमारें इ. स. पूर्वी १७८ ) राजे यांचा उल्लेख आलेला आहे. व ज्यावरून इ. सनाच्या दुसऱ्या शतकाचा बोध होतो, अशा दीनार नाण्याचा उल्लेखहि आलेला आहे, इतकेंच नाहीं तर अश्वघोषानंतरहि बराच काल लोटला असला पाहिजे म्हणून हा संग्रह दुसऱ्या शतकांत तयार झाला असें म्हणण्यापेक्षां तिसऱ्या शतकांत तयार झाला असावा असें विद्वानांचें मत आहे.

तथापि दिव्यावदनांतील अतिशय मनोरंजक गोष्टींपैकीं, शार्दूलकर्णावदान नांवाच्या फक्त एकाच गोष्टीचें इ. स २६५ त चिनी भाषेत भाषांतर झालें होतें ही गोष्ट समजून घेणें महत्त्वाचें आहे हें अवदान अनेक प्रकारें स्मरणार्ह असून त्याचा सारांश असा आहे:

" बुद्धगुरु श्रावस्ती येथें रहात असतांना आनंद रोज शहरांत भिक्षापर्यटन करीत असे. एके दिवशीं शहरांतून परत येत असतांना त्याला तहान लागली, इतक्यांत विहिरीनें पाणी आणीत असलेली प्रकृति नांवाची एक चाण्डालकन्या त्याच्या दृष्टीस पडली. तो तिला म्हणाला ' ताई मला थोडें पाणी प्यावयास दे. ' त्यावर प्रकृतीनें उत्तर दिलें ' हे पूज्य आनंद मी चाण्डालकन्या आहे. ' आनन्द म्हणाला, तुझें कुल किंवा जात मी तुला विचारली नाहीं, परंतु जर तुझ्या जवळ पाणी शिल्लक असेल तर थोडें मला प्यावयास दे ' ( सेंट जॉनमधील ४, ७, जीजस व समारिया स्त्रीच्या कथेशीं असलेलें हें साम्य विलक्षण आहे यांत शंका नाहीं; परंतु पुढची सर्व गोष्ट ख्रिस्ती शुभवर्तमानाहून इतकी भिन्न आहे कीं, याचा संबंध तिच्याशीं जोडणें अगदीं अशक्य आहे. ) नंतर त्या मुलीनें त्याला पाणी दिलें व त्या मुलीचें त्या मुनीवर अत्यंत प्रेम जडलें; मला आनंद हा पति मिळाला नाहीं तर मी जीव देईन असें तिनें आपल्या आईला सांगितलें. तिची आई मोठी चेटकी असल्यामुळें तिनें प्रबल वशीकरण मंत्रानें आनंदाला भारून टाकिलें. तो मंत्र यशस्वी रीतीनें पार पडल्यामुळें त्या चाण्डालाच्या घरीं आनंद आला; त्या हर्षित झालेल्या प्रकृतीनें तेथें शय्येची अगोदर तयारी करून ठेविली होती परंतु त्या मोठ्या संकटप्रसंगीं आनंदाला रडूं आलें; व त्यानें बुद्धाची प्रार्थना केली. आपल्या मंत्रासह बुद्ध त्याच्या मदतीला आला. बुद्धाच्या मंत्रांनीं त्या चेटकीचे मंत्र निष्फल झाले. व त्या चाण्डालाच्या घरांतून निघून आनंद परत आपल्या मठांत आला. आपल्या मंत्रापेक्षां गौतमाच्या मंत्राचें सामर्थ्य अधिक आहे असें त्या चेटकीनें आपल्या दुःखी मुलीला समजावून सांगितलें परंतु ती चाण्डालकन्या प्रकृति हिची मदनबाधा नाहींशी झाली नाहीं. ती शहरांत जाऊन आनंद भिक्षापर्यटन करीत असतां रोज त्याच्या मागोमाग जाई. या अडचणीच्या वेळीं आनंदानें मदत करण्याची आपल्या गुरूला पुन्हा विनंति केली. बुद्धानें प्रकृतीला बोलावून आणून आनंदाशीं विवाह लावण्याच्या तिच्या इच्छेला आपली संमति आहे असें त्यानें दर्शविलें, परंतु मोठ्या चातुर्यानें पातिव्रत्याची शपथ घेववून तिला भिक्षुणी होण्यास भाग पाडिलें. तिनें आपलें केशवपन करवून भिक्षुणीचा पोशाख धारण केला, इतकेंच नाहीं तर सत्य चतुष्टयत्वें तिला पूर्णपणें समजलें व बुद्धसंस्कृतीचाहि तिला नीट बोध झाला.

परंतु बुद्धानें एका चाण्डालकन्येला भिक्षुणी दीक्षा दिली असें जेव्हां ब्राह्मण, क्षत्रिय व श्रावस्तीचे नगरवासी यांस कळलें, तेव्हां त्यांना फार राग येऊन त्यांनीं ती गोष्ट प्रसेनजित् राजाला सांगितली त्या गोष्टीबद्दल बोलाचाली करण्यासाठीं तो राजा तावडतोब बुद्धाकडे गेला त्या ठिकाणीं कित्येक ब्राह्मण, क्षत्रिय व श्रावस्तीचे रहिवाशीहि जमले होते. नंतर चाण्डालाधिपति त्रिशंकु, याची गोष्ट बुद्धानें सांगितली. पुष्करसारिन् नांवाच्या गर्विष्ठ ब्राह्मणाच्या मुलीशीं, शार्दूलकर्ण नांवाच्या आपल्या विद्वान पुत्राचें लग्न व्हावें अशी त्रिशंकूची इच्छा होती ब्राह्मणानें तिरस्कारानें त्याला झिडकारून लाविलें तेव्हां एका अत्यंत मनोरंजक संभाषणांत जातिपद्धति, व ब्राह्मणांचा नीतिपर उपदेश यावर त्रिशंकूनें कडक टीका केली निरनिराळ्या प्रकारचे प्राणी व वनस्पती यामध्यें जसा फरक असतो, तसा प्रकारचा फरक जातींमध्यें दाखवितां येत नाहीं असें त्यानें त्याला सांगितलें पुनर्जन्म व कर्म याच्या कल्पनेप्रमाणेंहि जाति असणें शक्य नाहीं; कारण आपापल्या कर्माप्रमाणें प्रत्येकाला पुनर्जन्म मिळतो सरतेशेवटीं, त्रिशंकूच्या विद्वत्तेबद्दल पुष्करसारीची खात्री होऊन त्यानें त्या विवाहाला आपली संमति दिली. परंतु ती ब्राह्मणकन्या दुसरी कोणी नसून पूर्वजन्मीची चाण्डाल कन्या प्रकृति हीच होती. त्यावेळीं बुद्ध स्वत. त्रिशंकू असून शार्दूलकर्ण हा आनंद होता.

अ शो का व दा न —अशोकावदान (दिव्यावदान) चक्र (२६-१९) हेंहि प्राचीन आहे, कारण इ सनाच्या तिसऱ्या शतकांत त्याचें चिनीमध्यें भाषांतर झालें होतें; प्रतापी राजा अशोक हा त्या कथाचक्राचा मध्यबिंदु आहे या गोष्टींत ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची अशी माहिती क्वचितच आहे. तथापि वाङ्मयात्मक दृष्टीनें या गोष्टीचें महत्त्व बरेंच आहे. शिवाय उपगुप्त व मार यांची अद्भुत नाट्यकथाहि या कथाचक्रांत आहे. सैतान मार याला एका बौद्ध भिक्षूकडून धर्मांची दीक्षा देणें ही कल्पनाच फार धाडसी आहे. शंभर वर्षांपूर्वी निर्वाणाप्रत गेलेल्या बुद्धाला प्रत्यक्ष पाहण्याच्या इच्छेनें आपण स्वतः दीक्षा दिलेल्या माराला बुद्धाचा वेश धारण करण्याची उपगुप्त मुनीनें विनंति केली, व मारानें एखाद्या कुशल नटाप्रमाणें हुबेहुब बुद्धाचें रूप इतक्या सुंदर रीतीनें धारण केलें कीं, तो देखावा पाहून तो मुनि प्रार्थनामग्न झाला. ही सर्व गोष्ट तर कल्पनेची फारच मोठी उडी दाखविते. ही सर्व गोष्ट इतकी अभिनयविषयक आहे कीं, सर्व बुद्धचरित या ठिकाणीं फक्त पुनः सांगितलें आहे असेंच एखाद्याला वाटतें. भाषा पद्धति व वृत्तें हीं ठरींव दरबारी काव्याप्रमाणें आहेत म्हणून ह्यूबरनें सिद्ध केलें आहे यावरून दिव्यावदानाच्या संग्रहकर्त्यानें हा सुंदर भाग अश्वघोषाच्या सूत्रालंकारांतून शब्दशः घेतला आहे असें म्हणणें साहजिक आहे.

उपगुप्तानंतरच्या अशोकाचा शिक्षक ज्या मठांत रहात होता त्याला ' नट ' ( नाटकांतील ) आणि ' भट '

( योद्धा ) या भावानी मदत केली म्हणून त्याचें नाव नटभटिका असें पडावें हें मोठें विलक्षण दिसतें. अशोकावदानाला मथुरेच्या नटभटिका मठाचें माहात्म्य वर्णन करणारा ग्रंथ असें जे लेव्हीनें नाव दिलें ( तौंग पाओ, १९०७ पा १२० ) तें चुकीचें म्हणता येणार नाहीं.

दुष्ट सापत्न मातेच्या सूचनेवरून ज्याचे डोळे भोसकले गेले, परंतु इतकी इजा देणाऱ्या ह्या सापत्नमातेबद्दल ज्यानें एक क्षणभरहि आपला राग किंवा द्वेष व्यक्त केला नाहीं त्या अशोकचक्रातील अत्यंत सुंदर परंतु हृदयद्रावक अशा कुनाल नामक अशोकपुत्राच्या गोष्टीचें मूळ कोणतें तें मात्र माहीत नाहीं.

पालित्रिपिटक व दिव्यावदान यामध्यें सामान्य अशा अनेक गोष्टी आहेत महापरिनिर्वाणसूत्रातील एक उतारा सतराव्या प्रकरणात आहे व पूर्णाची गोष्ट परिचित पालि सूत्राशीं अनुरूप आहे. असभ्य व आडदांड अशा श्रोणापरांतकानीं तिरस्कार केला तरी, मारलें तरी, व त्याचा जीव घेण्याची त्याची इच्छा दर्शविली तरी तें सर्व शांतपणें व सौम्यपणें सोसण्याचा निश्चय करून तो पूर्ण प्रचारक म्हणून त्याजकडे गेला. उपाशी मरण्याची वेळ आल्यामुळें आपल्या मुलीला खाऊन टाकण्याच्या बेतात असलेल्या एका बाईचें मांस व रक्त याच्यायोगानें पोषण करण्यासाठीं जिनें आपले स्तन कापून टाकिले त्या रूपवतीच्या अवदानावरून जातकमालेंतील गोष्टींची आठवण होते. बोधिसत्वाचें महायानपंथी ध्येय रूपवतीनें आपल्यापुढें ठेविलें होतें, तसें करण्यात तुझा काय उद्देश होता असें विचारिलें असता ती म्हणालीः—

" मी त्या मुलासाठीं जो आपल्या स्तनाचा त्याग केला तो सार्वभौमत्वासाठीं, उपभोगासाठीं, स्वर्गप्राप्तीसाठीं, इन्द्रपद मिळविण्यासाठीं, राज्यकरणासाठीं, किंवा अगदीं श्रेष्ठ अशा पूर्ण आत्मप्रबोधनाखेरीज इतर कोणत्याहि कारणामुळें केला नाहीं, तर उद्धतास नम्र करण्यासाठीं, जे मुक्त नाहींत त्यांना मुक्त करण्यासाठीं व पाशबद्ध झालेल्यास पूर्ण निर्वाणप्राप्ति करून देण्यासाठीं मी आपल्या स्तनाचा त्याग केला. हें जर खरें असेल तर माझें स्त्रीत्व नष्ट होऊन मला पुरुषत्व प्राप्त होवो, "( तिनें हें वाक्य उच्चारितांच तिचें रूपांतर राजपुत्रामध्ये रूपांतर झालें, तो राजपुत्र पुढें राजा होऊन त्यानें साठ वर्षें राज्य केलें )

जातकमालेप्रमाणेंच अडतीसावें प्रकरण याच काव्य पद्धतींत लिहिलेलें असून त्यात अवदानाचें ढुबेदार रूपांतर आहे. अशा प्रकारच्या भागामुळें दिव्यावदानाला अवदानमालेचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

कल्पद्रुमावदानमाला, रत्नावदानमाला, अशोकावदान माला —हीं अवदानांची पद्यात्मक रूपांतरें असून त्यांपैकीं कांहीं अवदानशतकातून पद्धतशीर रीतीनें घेतलेलीं आहेत व कांहीं इतर ठिकाणचीं आहेत. अवदानशतकातील शेवटच्या कथानकाच्या तर्जुम्यापासून कल्पद्रुमावदानमालेला सुरवात होते, व ज्याप्रमाणें अवदानशतकातील शेवटच्या कथानकातील अशोकाच्या संभाषणात स्थविर उपगुप्ताचा उल्लेख आलेला आहे ( उपगुप्त हें अशोकचा शिक्षक तिस्स मोग्गलीपुत्त याचें दुसरें नाव आहे ) त्याचप्रमाणें अवदानमालेतील सर्व गोष्टी, अशोक व उपगुप्त यामधील संभाषणरूपानें घातलेल्या आहेत अशोकावदानमालेच्या पहिल्या भागात स्वतः अशोकाविषयींच्या कथा असून नंतर उपगुप्तानें अशोकाला केलेला उपदेश गोष्टींच्या रूपानें सांगितलेला आहे हे तिन्ही ग्रंथ वीरकाव्याच्या धाटणींत लिहिलेले आहेत याच एका गोष्टीमुळें अवदानशतकाहून ते भिन्न आहेत असें नाहीं, तर ते निःसंशय महायानपंथाचे असून त्याच्या पद्धतीवरून व भाषेवरून पुराणाची आठवण होते व या विशेष गोष्टींमुळेंहि हे ग्रंथ अवदानशतकाहून भिन्न आहेत. ज्या कालामध्यें साम्प्रदायिक पुराणें अस्तित्वात आलीं त्या कालात ( म्हणजे सुमारें इ. स. ६ वें शतक व नंतर ) हे ग्रंथ झाले असावेत.

द्वा विं श त्य व दा न —अवदानशतकातील बऱ्याचशा गोष्टी ज्यात घेतल्या आहेत असा द्वाविंशत्यवदान हा दुसरा एक ग्रंथ आहे. या ठिकाणींहि उपगुप्त व अशोक याचें संभाषण आलेलें आहे, परंतु याचें संभाषण लवकरच संपून त्याच्या जागीं शाक्यमुनि व मैत्रेय याचें संभाषण सुरू होतें. परंतु या ठिकाणच्या गोष्टी गद्यात्मक असून ( कांहीं पद्यात्मक प्रक्षिप्त भाग आहे ) त्यात दिलेल्या साराशाप्रमाणें त्या गोष्टींची निरनिराळीं प्रकरणें केलेलीं आहेत. ( पुण्यप्रद कर्में, उपदेश–श्रवण, औदार्य वगैरे )

भ द्र क ल्पा व दा न —भद्रकल्पावदान हा चौतीस कथांचा संग्रह असून, त्या कथा उपगुप्तानें अशोकाला सांगितलेल्या आहेत. अवदानमालाप्रमाणें हा समग्र संग्रह पद्यात्मक आहे तथापि याची कल्पना व मजकूर हीं कांहींअंशीं विनयपिटकातील महावग्गाप्रमाणेंच आहेत असें म्हणतात.

व्र ता व दा न मा ला —ज्याप्रमाणें साम्प्रदायिक पुराणामध्यें कांहीं उत्सव किंवा व्रतें यांच्या उपक्रमासाठीं शोधून काढिलेल्या कथासंबंधींची माहिती ज्यात आहे, अशीं मोठमोठीं प्रकरणें व समग्र ग्रंथ ( माहात्म्य )यात आहेत, त्याचप्रमाणें त्या पुराणांमध्यें तशाच प्रकारचे बौद्ध ग्रंथहि आहेत. व्रतावदानमाला हा अशाच प्रकारच्या गोष्टींचा एक समुच्चय असून यातील उपगुप्त व अशोक याच्या संभाषणाचें स्वरूपपूर्वी सांगितलेल्या अवदानसमुच्चयाच्या स्वरूपासारखेंच आहे.

वि चि त्र क र्णि का व दा न —विचित्रकर्णिकावदान नांवाच्या समुच्चयांत भिन्न भिन्न प्रकारचा मजकूर असून यात ३२ कथानकें आहेत, यापैकीं कांहीं कथानकें अवदानशतकातून घेतलेलीं असून बाकीचीं व्रतावदानाच्या नमुन्याचीं आहेत. मणिचूडाप्रमाणेंच कांहीं ठिकाणीं बोधि-

घोवट संस्कृत कोठें ठिकाणीं सुंदर संस्कृत व कोठें कोठें पालि अशा तऱ्हेची या ग्रंथाची भाषाहि विविध प्रकारची आहे.

सु मा ग धा व दा न.—अद्यापपर्यंत हे सर्व ग्रंथ फक्त थोड्याशा हस्तलिखित प्रतींतच अभिगम्य आहेत. तिबेटी व चिनी भाषांतरामुळेंच बाकीचे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. हस्तलिखित प्रतींमध्यें व चिनी व तिबेटी भाषांतरामध्यें फक्त अवदानसंग्रहच कायम ठेविलेले आहेत असें नाहीं, तर अनेक यांचे मोठीं व निरनिराळीं अवदानेंहि कायम ठेविलेलीं आहेत. सुमागधावदान हें वरील गोष्टीचें उदाहरण आहे. अनाथपिण्डद नावाच्या व्यापाऱ्याच्या सुमागधा नांवाच्या मुलीनें जैन भिक्षूंच्या तावडींतून आपल्या पतीची सुटका करून एका अद्भुत चमत्काराच्या योगानें सर्व शहराला बौद्ध धर्मांत घेतलें. पूर्वजन्मीं आपल्या दृढ अद्भुत स्वप्नामुळें प्रसिद्धीस आलेल्या कृकिन् राजाची ती मुलगी होती.

अ व दा न क ल्प ल ता —सरतेशेवटीं काश्मीरी कवि क्षेमेंद्र ( इसवी स. १०४० च्या सुमारास ) याच्या अवदान कल्पलता या विस्तृत अवदान समुच्चयाचाहि उल्लेख येथें केला पाहिजे. विशेषतः तिबेटांत हा ग्रंथ फार पूज्य मानिला जातो. क्षेमेन्द्रानें बहुत ग्रंथ लिहिलेले असून याचीं पद्येंहि विलक्षण प्रकारें कल्पनाप्रचुर आहेत. पुढें कित्येक प्रसंगीं आपल्याला याचा परिचय होईल, कारण यानें आपल्याला कार्यशक्तीनें अति विस्तृत अशीं निरनिराळीं क्षेत्रें व्यापून टाकिलीं आहेत, तथापि बुद्धिसामर्थ्य व रसिकता यापेक्षां आपल्या दृढनिश्चयानेंच तो अधिक प्रसिद्धीस आला. पद्धतशीर काव्याच्या धर्तीवर ज्या कथासमूहांत क्षेमेन्द्रानें बौद्ध अवदानांचें प्रथन केलें आहे त्या मोठ्या कथासमूहांतील गोष्टींतहि बुद्धिसामर्थ्य व रसिकता यापेक्षा बोधप्रदता अधिक आहे. बौद्धलोकांच्या स्वार्थत्यागाच्या प्रवृत्तीची या ठिकाणीं इतक्या धूर्ततेनें पराकाष्ठा केली आहे, कर्मतत्त्व इतक्या चमत्कारिकपणें लाविलें आहे, व एकंदर सारांश इतक्या अतिशयोक्तीनें सांगितला आहे कीं, कित्येक प्रसंगीं इच्छित परिणामाच्या विरुद्ध परिणाम दिसून येतो; या समूहांत १०७गोष्टी असून क्षेमेन्द्रपुत्र, सोमेन्द्र यानें प्रस्तावनेशिवाय १०८ वी 'जीमूतवाहन अवदान'ही गोष्टहि या ग्रंथाला जोडिली आहे. बहुतेक गोष्टी प्राचीन अवदानसंग्रहांत व इतर ठिकाणींहि पूर्वीच आलेल्या आहेत. [ पालि टीकावरून परिचित झालेल्या पद्मावतीच्या ( जिच्या पावलाखालीं कमळें उत्पन्न होत असत ) गोष्टीशीं पद्मावती-अवदानें ( नं. ६८ ) अनुरूप आहेत. व एकशृंग-अवदान ( नं. ६५ ) प्रसिद्ध ऋष्यशृंगकथेशीं अनुरूप आहे महावस्तूंतहि हीं दोन्ही येतात; व महावस्तूच्या धर्तीवर क्षेमेन्द्रानें ऋष्यशृंगकथेची रचना केली हें ल्यूडर्सनें ( एन. जी. जी. डब्ल्यू. १९०१ पा. २६ ) सिद्ध केलें आहे. डमॅन फ्रँक यानें क्षेमेन्द्राच्या अवदानांचें जर्मन भाषेत पद्यात्मक भाषांतर ( लिपझिग १९०१ ) केलें आहे. ] या विषयावरचें अपदान, तिपिटक (बुद्धपूर्वजग प्र. ११.) हे लेख पहा.

[ संदर्भ ग्रंथ.—विंटरनिट्झचा 'भारतीय वाङ्मयाचा इतिहास' दुसरा भाग, पूर्वार्ध, हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा व पांडित्यदर्शक आहे. अवदानवाङ्मयांतील पुढील भाग उपलब्ध आहेत १ अवदान शतक-हें स्पेयरनें प्रसिद्ध केलें असून (सेंट पीटर्सबर्ग १९०२-९), एल्. फीरनें त्याचें फ्रेंच भाषांतर केलें. ( पॅरिस १८९१ ). दिव्यावदान-कावेल आणि नील, केंब्रिज १८८६. यांतील मोठाले उतारे बर्नोफनें आपल्या भारतीय बौद्ध धर्माच्या इतिहासाच्या प्रस्तावनेंत भाषांतरिले आहेत. विचित्रभोधिका बुद्धिका. ओल्डनबर्ग जे. आर. ए. एस्. १८९३ फीर-ला अवदानाज जातकाज जे. ए. १८८४. राजेंद्रलाल मित्र-संस्कृत बुद्धिस्ट लिटरेचर ऑफ नेपाळ, कलकत्ता १८८२ झेड् डी एम. जी. ५२; १८९८ ( ओल्डनबर्गचा लेख ). लेव्ही-तीग पाओ. कर्न मॅन्युअल. ऱ्हीस डेव्हिड्स-जे पी. टी. एस्. १८९६ ओल्डनबर्ग-बुद्ध हार्डी-अशोक. बेंडाल कॅटॅलॉग—ल्युडर्स-एन्. जी. जी. डब्ल्यू १९०१ बुद्धोत्तर जग ( ज्ञानकोश-प्रस्तावनाखंड)]

अवधूत (१) ( ज्ञानेंद्रसरस्वती )हे—सातारा जिल्ह्यांतील विटे गावयेथील कुलकर्णी होते चैतन्य संप्रदायी. यानें पूर्वीचें नाव भैरव, ज्योतिलिंग व यमुनाबाई याचे हे पुत्र, यास यांच्या ग्रंथावरून ज्ञानसागर आडनांव मिळालें; हे तुळश्यास दत्तक दिले गेले होते. याची गुरुपरंपरा—कृष्णचैतन्य—तुळशी—अद्वय—चिद्घन ( हे अद्वयाचे पुत्र व शिष्य), नागेश ( पुत्र व शिष्य ). यांची बहीण निराबाई त्यांचा पुत्र शिवचैतन्य, याचा बंधु ज्योतिलिंग. शिवलिंगाचा दत्तक पुत्र व शिष्य अवधूत ( १७३४ चे पूर्वी ) अशी होती. कुलदैवत क्षेत्रपाल, गोत्र विश्वामित्र, याचे ग्रंथ—ज्ञानसागर ( र. श १७३४ ). व ज्ञानसागरानंद ( र. श. १७५४ ). [ सं. क. का. सू. ]

( २ ) ( निरंजन) याचे मूळ पुरुष जे चित्तोत्पत्ति ते चित्तांतून निघाले, अशी हे आख्यायिका देतात. यांचे पुत्र सिद्धेश्वर, याचे विश्वेश्वर-त्याचे श्रीधर व पुढें श्यामराज. अवधूत हे आपले गुरु गोविंद देतात. स्वतःस अवधूतनिरंजन म्हणवितात. ग्रंथ—कपिलगीता (१६२०,) मूलस्तंभ, अभंग, फटके वगैरे [ सं. क. का. सू ]

( ३ ) एक साधूंचा वर्ग अवधूत, औघूत, अव्धूत अशीहि नामांतरें आहेत' अतीत ' ( पहा ) व अवधूत अगदीं जवळ एकच वर्ग होय. याठिकाणीं अतीतांहून अवधूतांचें भिन्नत्व व कांहीं जास्त माहिती द्यावयाची आहे.

अतीत म्हणजे संसारापासून 'पलीकडे गेलेला' व अवधूत म्हणजे जात गोत वगैरे ' फेंकून दिलेला' पुरुष. अवधूतांत शैव व वैष्णव दोन्हीहि पंथाचे लोक आढळतात.; पण

बहुधा शैवच असतात. तथापि कांहीं ठिकाणीं ( उदा विहार ) वैष्णव अतीतहि आहेत ( रिस्ले—ट्राइब्स अँड कास्ट ऑफ बेंगाल ) हा संप्रदायभेद संस्कृत वाङ्मयांतहि पुष्कळ ठिकाणीं आढळतो.

अवधूतांमध्यें शैव अवधूत अतिशय विरक्त असतात हे जितकीं कमी वस्त्रें वापरतां येतील तितकीं वापरतात व उपल्या भागाना मातीं फासतात व मोठाल्या जटा वाढवितात. मौनव्रत आचरून भिक्षेवर निर्वाह करतात. थंडीच्या दिवसात धुनी लावून वसतात. त्याचें आयुष्य सर्व बाबतींत अति कष्टप्रद असें वाटत कानफाट्या-संप्रदायाचा संस्थापक जो गोरखनाथ त्यास अवधूतहि आपला गुरु मानतात 'गोरखबोध' व 'गोरखनाथकी गोष्ठी' या ग्रंथातून गोरखनाथाला 'अवधूत' हें उपपद लाविलें आहे पुष्कळ अवधूत दत्तास आपलें विशिष्ट उपास्य समजतात

वैष्णवात 'अवधूत' या नावाला विशिष्ट अर्थ आहे, जेव्हां रामानंदानें रामानुजाच्या अनुयायामध्यें मोठी सुधारणा घडवून आणिली व जातिभेद धर्मपंथातून अजीबात नष्ट करण्याचा प्रयत्न केला, तेव्हां त्यानें आपल्या अनुयायांना त्यांनीं निसर्ग व समाज यांचीं बंधनें नवीन संप्रदायात शिरून पार झुगारून दिलीं आहेत, हें दाखविण्याकरिता 'अवधूत' ही संज्ञा योजिली. रामानुजी अवधूत राम आणि मारुति यास फार मानतात. हापकिन्स ( रिलिजन्स आफ इंडिया )च्या मतें, सर्व जातिबंधनापासून मुक्तता दर्शविण्यासाठीं अवधूत हा शब्द वापरला असें निश्चित नाहीं तर रामानुजानें घातलेले कडक नियम झुगारले एवढ्याच गोष्टीचा सूचक हा उपयोग होत असेल. या रामानंदी अवधूताचा धर्म 'रामानंदी' 'भक्तिमार्ग' या लेखातून पहावयास मिळेल.

धर्माच्या नावाखालीं भीक्षा मागणाऱ्या कोणत्याहि भिकाऱ्याला सामान्यपणें अतीत किंवा अवधूत हें नांव योजितात.

[ संदर्भ ग्रंथ—'अतीत' ज्ञानकोश विभाग ६ वा.विल्सन—एसेज ऑन दि रिलिजन ऑफ दि हिंदुज रिस्ले—ट्राइब्स अंड कास्टस ऑफ बेंगाल कूक—दि ट्राइब्स अँड कास्ट्स ऑफ दि नार्थ वेस्टर्न प्राव्हिन्सेस अँड औघ. ए रि.ए.वगैरे].

अवन—लो. सं ( १९११ ) ४,२५,९३१ पंजाबातील एक जात. हे लोक आपणास अगदीं परकी समजतात व हिंदुस्थानातील जातींशीं आपला काहीं संबंध नाहीं असें म्हणतात. अलीचा एक वंशज कुतुबशहा नावाचा होता व त्याचे आपण वंशज आहोंत असें ते सागतात. या जातीच्या उत्पत्तीसंबंधानें काहीं वर्षांपूर्वी मोठा वाद चालला होता. त्या वेळेस सर डेन्झिल इबटसन यांनीं सर्व उपपत्तींचा ऊहापोह केला होता. जनरल कनिंगहॅम—अवन आणि त्याचप्रमाणें जानजुआ हे अनुयायाचे वंशज असून इंडोसिथियन लोकांच्या स्वारीच्या वेळेस मिठाच्या पर्वताच्या उत्तरेस असलेल्या पठारावर रहात होते असें म्हणतात. झेलम येथील जमाबंदीचा अधिकारी थॉमसन् हा असें म्हणतो कीं, अवन ही जाट जात असून डेराइस्माइलखानच्या वायव्येकडून पंजाबात आली. मेजर बँकसुद्धा अवन लोकांची उत्पत्ति जाट लोकांपासून झाली असें म्हणतो कालाबाग येथील अवन सरदाराच्या वंशावळींत मुसुलमान नावापाठीमागें हिंदु नावें पाहून सर डेन्झील इबटसन् यांना आश्चर्य वाटलें. अवन परकी नाहेत, असें सिद्ध करूं पहाणाऱ्यासहि त्याच्या वंशवृक्षात हिंदु नावें सापडलीं ही एक मोठी अडचण वाटली आणि म्हणून त्यांनीं आपली उपपत्ति सिद्ध करण्याकरिता दतकथेचा आधार घेऊन एक काल्पनिक गोष्ट तयार केली. ती अशीः—अवन हे मूळचे कुतुबशहाचे वंशज होते; परंतु कुतुबशहाच्या मृत्युनंतर १०० वर्षांनीं एका योग्यानें त्याना हिंदु करून घेतलें आणि नंतर एका सय्यद अबदुर रहीम यानें त्यास पुनः मुसुलमान केलें; परंतु मुसुलमानाच्या स्वाऱ्याच्या वेळीं कोणत्याहि परकी धर्मातल्या मनुष्यास हिंदु होता येत नव्हतें, ही गोष्ट ते विसरतात. रोझ यानीं अवन ही एक देश्यच जात आहे; अवन हा शुद्ध संस्कृत शब्द असून त्याचा अर्थ रक्षण असा आहे, असें मत दिलें आहे. थॉमसन व बॅंकसाहेबाच्यामतें हे मूळचे जाट आहेत, ही गोष्टहि त्यानीं मान्य केली आहे. कारण अजून सुद्धा जाट लोकात अवन म्हणून एक पोटजात आहे. फार प्राचीन काळापासून ते मिठाच्या पर्वताच्या उत्तरेस असलेल्या मैदानावर स्थायिक झाले असावे व मुसुलमानी स्वाऱ्यास यानीं चागला विरोध केला म्हणून हिंदु लोकाचे संरक्षक याअर्थी याना अवन हें नाव मिळालें असावें,असा रोझ याचा तर्क आहे. मुसुलमानाच्या स्वाऱ्यानंतर सय्यद कुतुबशहानें त्याना मुसुलमान केलें असावें आणि या प्रातात लष्करी सरंजामी पद्धत प्रचलित असल्यामुळें ज्या वेळेस सरदार लोक मुसुलमान झाले त्या वेळेस त्याचे आश्रित लोकहि लवकरच मुसुलमान झाले असावे. नंतर अवन हे आपणास कुतुबशाही म्हणवूं लागले असें ते म्हणतात. भियानवाली जिल्ह्यातील अवंकरी भागातील लोकासंबंधीं अभ्यास केला असता अवन हे जाटवंशीय आहेत हें आपणास नक्की कळून येतें. सम्मल नावाच्या एका खेड्यात एका भाटानें अवन वगैरे पोटजाती रजपूत वंशापासून कशा उत्पन्न झाल्या याचें मोठें बहारीचें वर्णन केलेलें रोझ यास ऐकावयास सापडलें. त्या सर्व भागात हिंदु नावाच्या खुणा सापडतात.उदाहरणार्थ सेपाट प्रदेशाच्या मध्यभागावर असलेल्या एका खेड्याचें नाव मडवन—मध्यवन असें आहे.

पुराणवस्तुसंशोधनशास्त्रदृष्ट्या दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे मिठाच्या पर्वताजवळील अंब नावाचें एक खेडें होय. हें खेडें पूर्वी राजा अमरीकची राजधानी होती. मोडकळीस आलेल्या एका इमारतीच्या बांधकामावरून ती इमारत इ.स. १००० च्या वर्षी बांधली गेली असावी. व त्याच वेळीं तेथें अवनाची वस्ती होती असें अवन लोकातील परंपरागत कथावरून आपणास दिसतें. याशिवाय या जातींत अजून

पुष्कळ हिंदूंच्या चालीरीती आढळून येतात. यांच्या पोटजातींच्या नावाचें तुलनात्मक दृष्टीनें निरीक्षण केलें असतां ही अरबी जात असणें आपणास असंभाव्य वाटतें. त्यांच्या पोटजातींची काही नावें अहिर, भाट, चांद, हरपाळ, पसवल, कलाल, करहत इत्यादि आहेत. म्हणून अथन हे जाट किंवा रजपूत वंशीय आहेत हें म्हणणें सयुक्तिक दिसतें. जाट लोकांमध्यें पुष्कळ रजपूत रक्त आहे. कारण मूळचा रजपूत हा एक सरदाराचा दर्जा दाखविणारा शब्द आहे [ रोझ-ग्लॉसरी; सेन्सस रिपोर्ट ]

अथनी—हें गांव मद्रास इलाख्यांत कोला जिल्ह्यामध्यें, मुल बागल तालुक्यांत आहे. लोक सं.(१९०१) ९४९. हिंदुस्थानांतील दहा क्षेत्रांपैकीं जें अवन्तिका तें हेंच होय असा तिकडील लोक हक्क सांगतात. येथें वाल्मीकि ऋषींचा आश्रम होता व श्रीरामचंद्र लंकेहून परत येतांना येथें उतरले होते अशीहि एक दंतकथा आहे. शिलालेखामध्यें या गावाला "दक्षिणेकडील गया" असें म्हटलेलें आहे. येथें स्मार्त पंथाचे गुरु रहातात व वार्षिक उत्सव होतो [ इं गॅ. ६ ]

अवलंबन.—हें एक बौद्धसूत्र आहे. ब्राह्मणांच्या धंद्यास प्रथम नावें ठेवून पुढें तो धंदा म्हणजे श्राद्धें वगैरे भिक्षुकीचीं कर्में आपल्या ताब्यांत घेण्याकरितां बौद्धांचे जे प्रयत्न झाले त्यांचें फल हें सूत्र होय. अवलंबन या शब्दानें प्रेतयोनींतील मुक्त झालेल्या व अधोमुख अशा आत्म्याची स्थिति दाखविली जाते. पूर्वजांवर त्याच्या वंशजांनीं यज्ञ केला नाहीं तोंपर्यंत त्याची ह्या दुःखद अवस्थेंतून सुटका होत नाहीं. पश्चिम सिन घराण्याच्या काळीं (म्हणजे इ.२६५ इ )प्रसिद्ध भिक्षु धर्मरक्ष यानें चिनी भाषेंत या सूत्राचें भाषांतर केलें आहे. मृताकरितां यज्ञ करण्याची पद्धति हा त्याचा विषय आहे. हें सूत्र किंगसेंग यो-श्यो नामक संग्रहाच्या पांचव्या भागांत दिलें आहे व त्या सूत्राचें तेथें नांव, फो-श्वो-उलम-प्वन-किंग म्हणजे बुद्धानें म्हटलेलें अवलंबन सूत्र, असें आहे.

सू त्र सा रां श.—बुद्ध एकदां श्रावस्ती नगरींत जेतवनामध्यें रहात होता. मोग्गल्लान हा ऋद्धि संपादन करीत होता. त्यानें आपल्या अंतर्ज्ञानशक्तीचा उपयोग करून पाहिलें तेव्हां त्याला अन्नपाण्याशिवाय कृश झालेली आपली माता प्रेतलोकांत आहे असें दिसून आलें. त्यानें तिला भात खाण्यास दिला परंतु त्याचे कोळसे झाले. तेव्हां ती मुक्त होण्याचा उपाय बुद्धास विचारतो, बुद्ध प्रभूनें सांगितलें कीं " ७ व्या महिन्याच्या १५व्या दिवशीं दशदिशांचे आचार्य बोलावून सप्तवंशांतील पूर्वजांच्या मुक्तीकरितां अन्न, पेय व वस्त्र त्या आचार्यांच्या हातानें अर्पण कर, म्हणजे तुझ्या पूर्वजांची दुःखापासून सुटका होऊन एकदम स्वर्गांतील सौख्यस्थितींत ते जन्म पावतील." यज्ञार्पणाच्या वेळीं म्हणण्याचे मंत्रहि बुद्ध प्रभूनें सांगितले. याप्रमाणें मोग्गल्लान यानें केल्यावर त्याची माता दुःखापासून मुक्त झाली. [ इं. अँ. पु. ९. पृ. ८५-८६ ]

अवलोकितेश्वर—ही बौद्ध लोकांची एक दैवतकल्पना आहे. नैयायिक व भाक्त (भक्तिमार्गी) लोक सगुण परमात्म्याला ईश्वर हें विशेषण लावतात. ईश्वर याचा यौगिक अर्थ राजा ( ईश = राज्य करणें ) असा आहे. ईश्वर हें विशेषण बोधिसत्त्वाला विशेषतः महाबोधिसत्त्व महासत्त्वाला अगर दशभूमेश्वराला लावतात.

'अवलोकितेश्वर' या समासाचा अर्थ स्पष्ट समजत नाहीं. त्याच्या अर्थासंबंधानें विद्वानांत सुद्धां मतभेद आढळून येतो. अवलोकितेश्वर याचा अर्थ जें दृश्य आहे त्याचा म्हणजे या जगताचा स्वामी असा होईल. अगर दृष्टीचा ईश्वर तो ईश्वर अथवा व्यक्तईश्वर अगर ज्ञात ईश्वर असाहि अर्थ होईल. अगर जो आपणाला दृश्य आहे तो असा होऊं शकेल तिबेटी ग्रंथकारांनीं व त्यावरील हिंदी टीकाकारांनीं याचा अर्थ सर्व जगाचें निरीक्षण करणारा ईश्वर असाच केला आहे. कांहीं अर्वाचीन पंडितांनीं याचा अर्थ 'उंचावरून खालीं पाहणारा' असा केलेला आहे. पण हा अर्थ समाधानकारक नाहीं; कारण सर्व बोधिसत्त्वाप्रमाणें अवलोकितेश्वर हा 'भगवन्मुखावलोकनपर' म्हणजे बुद्धाकडे पहाणारा व 'करुणास्निग्धावलोकन' म्हणजे करुणादृष्टीनें अवलोकन करणारा आहे. व्याकरणदृष्ट्या अवलोकितेश्वर याचा अर्थ करुणादृष्टीनें पाहणारा परमेश्वर असा होतो. अवलोकित याचा अर्थ सर्व दिशांना सर्व वस्तू पाहणारा व सर्वांना मदत करणारा देव असा आहे. त्याला समंतमुख असेंहि नाव आहे.

अवलोकितेश्वराचें सर्वांत अतिशय महत्त्वाचें असें नांव म्हणजे लोकेश्वर अगर लोकनाथ हें होय. दीर्घकालपर्यंत त्याचें जें स्वरूपवर्णन परंपरागत चालत आलेलें आहे त्या स्वरूपाचें यथार्थ निदर्शक असें हें नाव आहे. वर्तमानकालावर अधिकार चालविणारा, जगताचा भार वहाणारा, अमिताभ बुद्धाचा मुलगा, धर्मकार्याचें सगुणस्वरूप, बुद्धाचा वर्तमानकालीन अवतार, प्रकाशाचा व जीवांचा ईश्वर असें याचें वर्णन बौद्ध ग्रंथांत केलेलें आढळतें.

बौद्ध ग्रंथावरून असें उघड दिसून येतें कीं, अवलोकित हें सूर्याचें एक विशेषण होतें आणि अवलोकिताला मैं पद्मपाणी म्हणून संबोधण्यांत येतें त्याचा देखील अर्थ सुर्यच होतो.

अवलोकितेश्वर याचा अर्थ व्यक्त म्हणजे सगुण अथवा कार्यकर्ता ईश्वर असा घेतल्यास अवलोकितेश्वरासंबंधीची ही कल्पना केव्हां निघाली हें शोधून काढणें अपुऱ्या साधनांमुळें शक्य नाहीं. अवलोकितेश्वराच्या कल्पनेचा उगम केव्हां झाला, याचें मूळ कशांत सांपडतें वगैरेंचा ऐतिहासिकदृष्ट्या विचार करणेंहि फार

अवघड आहे. तथापि अवलोकितेश्वरासंबंधी कल्पनेचा उगम तर्कदृष्ट्या कसकसा होत गेला हें पहाण्यासारखें आहे

महावस्तूमध्यें जरी बोधिसत्त्वाच्या 'भूमी'चें वर्णन आलेलें आहे व जरी त्यात बुद्धक्षेत्राचेंहि विस्तृत वर्णन आहे तरी पण बुद्धाचें पालन करणाऱ्या व सर्व भूतांचें रक्षण करणाऱ्या बोधिसत्त्वमहासत्त्वाचा त्यात उल्लेख नाहीं व अवलोकिताचाहि मागमूस नाहीं. ललितविस्तरामध्यें बुद्धाचा उपदेश श्रवण करणारे जे ३२००० बोधिसत्त्व सांगितलेले आहेत त्यात अनेक शिष्यांबरोबर 'महाकरुणचद्रिन्' याचाहि उल्लेख आला आहे. तिबेटी भाषेंतील भाषांतरामध्यें या ऐवजीं ' महाकरुणसत्त्व ' असा उल्लेख आहे असें वेंडलनें म्हटलें आहे अवलोकितेश्वराला जी अनेक विशेषणें लावण्यात येतात त्यापैकी हें एक आहे एवढ्यावरून, ललितविस्तरामध्यें अवलोकिताचा उल्लेख नाहीं असें जें प्रचलित मत आहे त्याला बाध येऊं शकतो की काय हें ठरविणें कठिण आहे

धर्मसंग्रहग्रंथातील आठ बोधिसत्त्वामध्यें अवलोकिताचा उल्लेख नाहीं, व काहीं ग्रंथ अवलोकिताचा उल्लेख करतात पण अवलोकितास सर्वांत उच्च स्थान देत नाहींत तर बोधिसत्त्वाहून भिन्न आहे अशा भावनात देवव्यक्तींमध्यें त्याचा उल्लेख करून त्याला एक प्रकारचें महत्त्व देतात; उदाहरणार्थ अवलोकित व मंजुघोष ज्याचे अग्रणी आहेत असे बुद्धाचे पुत्र, व अवलोकित, मंजुघोष, क्षितिगर्भ आणि वज्रिन यांचें एकत्र वर्णन आढळतें यांचें विशेष काम म्हणजे दैत्यांशीं युद्ध करणें हें होय.

काहीं महायानी ग्रंथात आपल्याला सर्व बोधिसत्त्वाचा मुख्य व सर्व श्रेष्ठ अशा व्यक्तीचें वर्णन आढळतें ज्याच्या मताप्रमाणें बोधिसत्त्व हेंच त्रिरत्नापैकीं तिसरें रत्न जें संघ तें होय धर्मसंगीतिसारख्या काहीं सूत्रामध्यें अवलोकितेश्वराचें महत्त्व बरेंच वर्णन केलें आहे धर्मसंगीतिमध्यें अवलोकितेश्वर हा महत्त्वपूर्वक दृष्ट झाला आहे. बोधिसत्त्वानें पापाची देखील भीति न बाळगता ज्या कार्यी आपल्याला वाहून घतलें पाहिजे तें मत भूतदया हें असून तें अतिशय कल्याणकारक आहे अशी त्याची स्तुति अवलोकितेश्वर करतो. भूतदया दाखवितांना एखादें पापकर्म करावें लागलें तरी पत्करावें, का कीं, ज्यानें आपल्यावर विश्वास ठेविला आहे त्याचा आशाभंग करण्यापेक्षा पापकर्म करून त्या पापामुळें नरकात यमयातना भोगणें देखील अधिक श्रेयस्कर होईल, असें त्यानें म्हटलें आहे.

अवलोकित हा बोधिसत्त्व महासत्त्व आहे खरा पण तो कांहीं सर्वश्रेष्ठ नाहीं. अवलोकितेश्वराच्या इतिहासांतील ही वरील पायरीच पूर्वीच्या समजुतीमध्यें म्हणजे पद्मपाणी हा सातआठ बोधिसत्त्वांसह बुद्धाच्या भोंवतीं बसलेला आढळतो अशा प्रकारच्या चित्रामध्यें व वर्णनामध्यें व्यक्त झालेली आढळून येते.

मैत्रेय ( भविष्यत्कालीन बुद्ध ) यालाच फक्त हीनयानामध्यें बोधिसत्त्व मानलें आहे व हा अवलोकितेश्वराचा पूर्वगामी असावा असें संस्कृततिबेटी महाव्युत्पत्ति कोशावरून व चिनी कोशावरून दिसून येतें निदान एवढें तर निश्चित दिसतें कीं, बोधिसत्त्वाला जीं, दयाशील, देवी, परमार्थ, अभयंदद वगैरे विशेषणें लावण्यात येतात तीं केवळ अवलोकितेश्वराला लाविलीं जाण्यापूर्वी क्षितिगर्भादिकानाहि लावण्यात येत होतीं. अर्थातच वरील मतें हीं केवळ तर्काधिष्ठित आहेत. कारण, ख्रिस्ती शकाच्या सुमारासच काहीं संप्रदायामध्यें अवलोकिताचें सर्वश्रेष्ठत्व प्रस्थापित झालें होतें

सद्धर्मपुंडरीकामध्यें अवलोकितेश्वराचें प्राधान्य आढळून येत नसलें तरी त्याच्या माहात्म्यवर्णनपर एक सबंध प्रकरण आहे. तो आपल्या बरोबरच्या मंजुश्रीखेरीज इतर अक्षयमति वगैरे बोधिसत्त्वमहासत्त्वापेक्षा फार श्रेष्ठ असून तो ज्याचा त्राता आहे तो हजारों बुद्धापेक्षा अधिक वंद्य आहे. तो आपलें भूतदयेचें व्रत चालविण्याकरिता बुद्ध, बोधिसत्त्व, महेश्वर, कुबेर वज्रपाणि वगैरेंचें रूप धारण करतो अक्षयमति त्याला फुलें नजर करतो व तो तीं शाक्यमुनीला व पूर्व बुद्धाना अर्पण करितो या ग्रंथामध्यें ' सुखाकर ' म्हणून त्याचा लोक दिला असून तेथें तो कधीं बुद्धाच्या उजव्या बाजूस तर कधीं डाव्या बाजूस बसतो असें म्हटलें आहे.

अमितायुर्ध्यानसूत्रामध्यें व सुखावतीमध्यें अमिताभ व अवलोकित याच्या ईश्वरत्वविषयक कल्पना दृष्टीस पडतात भक्तिसंबंधाच्या अतिशयोक्तिपर कल्पना यात आहेतच; त्यामध्यें पूर्वगामी कल्पनावरील दृढ श्रद्धेची छटा या ग्रंथात दिसून आल्याविना रहात नाहीं

अमिताभ अथवा लोकनाथ हा अत्यंत प्राचीन काळीं धर्माकर नावाचा भिक्षु होता त्याला बुद्धत्व प्राप्त होऊन दहा कल्पें होऊन गेलीं, व त्याला गुप्त होण्याला देखील पुष्कळच काळ लागेल तत्वत सर्वच बुद्ध सारखे असून समज्ञानी, व पूर्णावस्थेला पावलेले असतात, पण बुद्ध झाल्यावर यांच्या कार्यामध्येंच काय तो फरक पडतो उदाहरणार्थ, धर्माकरानें असा पण केला होता कीं, मी बुद्ध झाल्यानंतर अतिशय शुभ असें जें बुद्धक्षेत्र करीन, तें क्षेत्र सुखावतीच होय आणि याच कारणास्तव निर्वाणपदाला पोहोंचणारे प्राणी बुद्धक्षेत्रापासून त्याच्याभोंवतीं जमतात जे दोषयुक्त असून त्याचें क्षालन करूं इच्छितात व तशी शक्ति ज्याच्या ठिकाणीं असते असे प्राणी अमिताभाबरोबर आपला वेळ कमलपुष्पामध्यें घालवितात. यांच्याच बरोबर, ज्या बोधिसत्त्वाना बुद्ध व्हावयाचा इच्छा असते, असे बोधिसत्त्व बुद्धाचा उपदेश श्रवण करण्यासाठीं जातात, हेच बोधिसत्त्व पुढें बुद्ध होतसाते आपल्याला शाश्वत स्थान प्राप्त करून घेतात. अवलोकितेश्वर मात्र या युगाच्या शेवटीं हजारावा व शेवटचा बुद्ध होऊन येईल.

बोधिसत्वांमध्यें देखील यांचीही योग्यता फारशी नसते. अमिताभाच्या स्वर्गांमध्यें अवलोकितेश्वर व महास्थामप्राप्त हे बुद्धाइतकेच तेजस्वी व मोठे असतात पण असतात पण त्यातल्या त्यात अवलोकित हा अधिक महत्त्वाचा व उच्च दर्जाचा आहे. कारण सर्व प्राण्यांना सुखावतीमध्यें आणावयाचें त्याचें ध्येय असतें. तो आपल्या तेजोमय शरीरानें सर्व लोकांमध्यें प्रवास करतो, व त्यावेळीं तो अनंत रूपें धारण करतो. अमिताभाप्रमाणें त्याचे अंशावतार असतात. 'सुखावति प्राप्त करून देणारा' असें जें त्यानें कार्य आहे तें तो कधीं विसरत नाहीं.

हे गौरवपर पण विशिष्ट कामनायुक्त ग्रंथ जें अमिताभ व अवलोकित यांच्या संबंधाचें माहात्म्य वर वर्णन केलेलें आहे तें, महायानपंथाच्या सर्वसामान्य मोक्ष मार्गाहून अगदीं भिन्न आहे. हीनयानपंथाच्या मतें बुद्ध हेच स्वतः उपदेशक असतात पण महायान पंथाच्याप्रमाणें बुद्ध हे क्रियात्मक व बोधिसत्व हे तत्प्राप्त्यर्थ असतात. ज्याप्रमाणें मांजरी आपल्या पिलांना आपल्या तोंडामध्यें धरून त्याचा जीव वाचविते त्याप्रमाणें सुखावतीमध्यें अमिताभ व अवलोकित हे आपल्या एकनिष्ठ भक्तांना रक्षक होतात पण जे पापी असतील त्यांना मात्र येथें जागा मिळत नाहीं. अमितायुर्ध्यानामध्यें मात्र या अटी मुळींच नाहींत. जो पापी मनुष्य अमिताचें ध्यान करील त्याचा उद्धार होईल.

चिनी प्रवाशयांनीं ज्यासंबंधीं वर्णन दिलेलें आहे त्या मूर्ती याच काळच्या होत कारण अमितायुर्ध्यानामध्यें देवांचा विशिष्ट स्वभाव दाखविणाऱ्या मूर्तीसंबंधीं उल्लेख आलेले आहेत. आपल्याला अवलोकिताचे भव्य असे पुतळे आढळून येतात. तसेच मैत्रेय, मंजुश्री, तारा आणि क्वचित् महास्थाम याच्या समवेत असलेल्या मूर्तीही दृष्टीस पडतात. या आश्चर्यकारक मूर्ती ईशान्य हिंदुस्थानापासून तों सीलोन पर्यंत आढळून येतात; व प्रथमतः त्याच्या संबंधाचें जें वर्णन आपल्याला आढळून येतें त्याचेंच मूर्तिमंत चित्र आपल्यापुढें आपण पहातों आहों असें आपल्याला वाटतें. अमितायुर्ध्यानसूत्रामध्यें अवलोकितेश्वराच्या शिरावर २५ योजनें उंच असा बुद्ध अमिताभाच्या डाव्या बाजूला बसलेला आहे असे वर्णन आलेलें आहे; व अशाच प्रकारच्या मूर्ती आपल्याला सांपडलेल्या आहेत.

बोधिसत्व, मंजुश्री, अवलोकित व प्रज्ञा यांची पूजा करणें हा जो महायानपंथाचा विशेष आहे, तो चिनी प्रवाशयाच्या ध्यानांत आलेला असावा असें दिसतें. हीनयानपंथाचा ज्या ठिकाणीं प्रसार होता अशा ठिकाणीं देखील मैत्रेयाच्या मूर्तीची पूजा केली जात असे असें ह्युएनत्संगनें म्हटलेलें आहे.

कारण्डव्यूह व शूरंगम यामध्यें अवलोकिताचें विशेषच गौरवपर वर्णन आलेलें आहे पण त्यात सांप्रदायिक गुंतागुंतीचें वर्णन फार झालेलें आहे. यामध्यें प्राचीन सूत्रवाङ्मयापेक्षां पौराणिक छटाच जास्त दिसत उलटपक्षीं मंत्रतंत्रविषयक पुस्तकें व शिल्पशास्त्र यावरून असें दिसून येतें कीं, अवलोकित व इतर देवता या भिन्न नसून तत्वतः एकच आहेत, अशा प्रकारच्या कल्पनावर दिलेल्या अवलोकिताविषयींच्या पुराणान्तर्विषयक कल्पनामुळेंच उत्पन्न झालेल्या आहेत. अवलोकित हा बौद्धांचा शिव असून तो योगी व मांत्रिक होता.

कांहीं कांहीं बाबतींत कारंडव्यूहामध्यें, सद्धर्मपुंडरीकामध्ये व तसेंच अमितायुर्ध्यानामध्यें साम्य दिसून येतें. अवलोकित हा अमिताभापासून धर्माचें ज्ञान प्राप्त करून घेतो. शाक्यमुनींची पुजा करण्यास तो येतो व आपल्या बरोबर पुष्पें व अमिताभाचे आशीर्वाद आणतो. अर्थातच या दृष्टीनें तो बुद्धापेक्षा खालच्या दर्जाचा ठरतो. उलटपक्षीं तो बुद्धापेक्षा व समंतभद्रापेक्षाहि वरिष्ठ दर्जाचा आहे. त्याच्या इतकें प्रतिभान कोणत्याहि बुद्धाच्या ठायीं नसतें. सर्व बुद्ध एकत्र केले तरी त्याच्या इतकी योग्यता होणार नाहीं त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणालाहि मायावपु धारण करता येत नाहीं, बुद्धाला ती वपु दृष्टीस देखील पडत नाहींत आणि त्याच्या शरीराच्या प्रत्येक छिद्रामध्यें हजारों बुद्ध व अगणित महात्मे मावतात; त्याच्या शरीरापासून सामान्य देव उत्पन्न होतात; त्याच्या डोळ्यातून सूर्य चंद्र बाहेर येतात; महेश्वर हा त्याच्या कपाळापासून उत्पन्न होतो; ब्रह्मा त्याच्या खांद्यापासून बाहेर येतो हा उत्पत्तिकर्ता असून जगताचा पालक तोच आहे; त्याच्या बोटापासून नरकाग्नि शमविणाऱ्या व प्रेताना संतृप्त करणाऱ्या नद्या उत्पन्न होतात, तो दैत्यांना धावरवितो व वज्रपाणीस पळावयास लावतो; सर्व मनुष्यावर व प्राण्यावर त्याची सत्ता चालते, यात कांहीं आश्चर्य नाहीं अवलोकित हा महायोगी असून विद्याधिपति व अनेक मंत्रशताकीर्ण आहे त्याला गूढमंत्र माहीत आहेत; पण त्यातल्या त्यात 'सर्वोत्तम ॐ मणिपद्मे हुम्' हा षडक्षरी मंत्र दुसऱ्या कोणत्या बुद्धाला अवगत आहे? कोणालाच नाहीं. कोणाच्या तरी स्वाधीन आहे म्हणावें तर तें बुद्धा नाहीं. फक्त अवलोकितेश्वरालाच ती विद्या अवगत आहे व ती त्याला वाटेल त्यास देता येते. 'वंदित' एवढेंच त्याचें वर्णन पुरेसें आहे. त्याच्यामध्यें, बुद्धधर्म संघ व शरणें हे सर्व एकवटलेले आहेत. जो कोणी त्याच्या शरीरावर ॐ षडक्षरी बीजाक्षरें खोदिल तो वज्रकायशरीरमाक, तथागतयानकोटी व धातुस्तूपवान् होईल.

मूर्तिशिल्पशास्त्र व मंत्रग्रंथ यांवरून असें खात्रीलायक अनुमान काढतां येतें कीं अवलोकितानें देवत्व हें केवळ शाब्दिक नसून त्याचा पुजा व मूर्तिपुजा याच्याशीं संबंध आहे. अवलोकिताचीं तिबेटांतील रूपें हिंदु संस्कृतीची प्रतिकृति आहे फार काय त्यांवर चीनांतील उद्यान वगैरेंची ही छाप बसलेली आढळते. अवलोकितेश्वराच्या यथास्थित वर्णन देणें अशक्य आहे. शिवाय त्याचें

फूशरनें केलेलें आहे. मूर्तिकल्पनेतील कांहीं विशेष गोष्टी तेवढ्या देतों

अवलोकितेश्वर हा अनेकाकृति आहे पण पुष्कळ ठिकाणीं मनुष्याकृतीहि आढळतो त्याच्या डोक्यावर मिन-अमिताभाची मूर्ति असते त्याच्या एका हातात पद्म असतें व दुसऱ्या हातानें तो अनुग्रहाची खूण करतो असें दाखविलें आहे त्याच्या हातातून पडणारें अमृत, प्रेत आपल्या ओठांनीं पीत आहे असें दाखविलें आहे अवलोकिताच्या नेहमीं जवळ असणारे देव म्हणजे, क्रुद्ध अगर शांत असणारी तारा, (कधीं कधीं तिचीं दोन्हीं स्वरूपें)२०,५००००० मंत्राचा पालक असा हयग्रीव व मैत्रेयाचा मित्र सुधन हे होत

शि व स्व रू पी अ व लो कि ते श्व र.—जेव्हा अवलोकिताला चार हात आहेत असें दाखवितात तेव्हां त्याच्या दोन हातांनीं ओंजळ केलेली असते. इतर दोन हातात, पद्म व रुद्राक्ष माला असते तेव्हा अवलोकितेश्वर हा शिव, अमोघपाश, हालाहल, नीलकण्ठ, पद्मनर्तेश्वर इत्यादिकांचीं रूपें धारण करतो तेव्हा तो अनेक हस्त व लोचन धारण करतो, व्याघ्राबर धारण करतो, कमण्डलु हातात घेतो, नाग आपल्या गळ्याभोवतीं गुडाळतो, हाडकाची माळ गळ्यामध्यें घालतो त्याचें व शिवाचें ऐक्य दाखविणाऱ्या ज्या आकृती आहेत त्या खालील प्रमाणें आहेत. (१) सिंहनाद-शाक्यमुनीनें ज्या गंभीर प्रतिज्ञाचा उच्चार केला त्यास सिंहनाद म्हणतात मंजुश्रीची कल्पना अवलोकित कल्पनेशीं मिश्र होऊन जी आकृति तयार करण्यात आली आहे ती अवलोकित कल्पनेप्रमाणें सिंहावर बसलेली असून मंजुश्रीचा ग्रंथ व तलवार हातांत घेतलेली (२) मोराच्या पिसाऱ्यासारखे पसरलेले व प्रत्येकात एक एक नेत्र असलेलो सहस्रकरयुक्त आकृति. (३) एकादशमुख व सहस्रकरयुक्त आकृति या संबंधीची गोष्ट अशी आहे. मनुष्यमात्राचें रक्षण जर माझ्या हातून न होईल तर माझ शीर्ष सहस्रश विदीर्ण होवो असा शंकरानें पण केला होता व त्याच्या करवीं रक्षण न झाल्यामुळें त्याचें शीर्ष सहस्रशः विदीर्ण झालें व अमिताभानें तें पुढें एकत्र केलें )

नेपाळी शिलालेखावरूनहि आपल्याला अवलोकितेश्वराच्या अन्य आकृतीची कल्पना येईल 'योगिराज त्याला मत्स्येंद्र म्हणतात शाक्त त्याला शक्ति म्हणतात, बौद्ध त्याला लोकेश्वर म्हणतात, ब्रह्म आहे असें मानून त्याला सर्व मान देतात. चीनमध्यें अवलोकितेश्वराचा स्त्रीप्रमाणें आकार दाखवितात ती भारतीय कल्पना असावी तशा प्रकारचीच कल्पना अवलोकितेश्वर व शक्ति यांचे वर ऐक्य दाखविण्यात दृग्गोचर होते

तिबेटातील अवतार तत्त्वाविषयीं येथें लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. ('अवतार' पहा) धर्मोपदेशक हे निर्माण असून महाला- अवलोकितेश्वर अवतरित असतो, व अमिताभ हा दुसऱ्या मठाच्या महापंडितामध्यें अवतीर्ण होतो हें मत अर्वाचीन आहे असें वॅडेलचें मत आहे, पण तें बरोबर आहे असें दिसत नाहीं.

[ सं द र्भ ग्रं थ —सुखावतीव्यूह. अमितायुर्ध्यानसूत्र बोधिचर्यावतार. कारंडव्यूह व विल्सन-सिलेक्ट वर्कस १; बुद्ध ट्रॅक्टस् फ्रामनेपाळ ग्रुंडवेल बर्जेस-बुद्ध आर्ट इन इंडिया गॅझेटियर ऑफ सिक्किम १८९३ बर्जेस—आर्कि. सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया नं. ९ व ५ वाडेल—दि इंडियन कल्ट ऑफ अवलोकित शरतचंद्रदास डिक्शनरी ( जे ए. एस. बी २, १८८२ ) बील—दि बुद्धिस्ट पिलग्रिम्स.

**अवसरी बुद्रुक**—(मुंबई) जिल्हा पुणें खेडच्या ईशान्येस १५ मैलावर हा एक लहानसा गाव आहे. लोकवस्ती ( सन १८८१ ) २७७८ सन १८६१ पर्यंत हें पेट्याचें मुख्य ठिकाण होतें त्या वेळची जी पेटा कचेरी होती तेथें हल्लीं शाळा आहे. पश्चिम शिवेवर एक भैरवाचें देऊळ असून तें सुमारें १०० वर्षांपूर्वी शंकरशेट नावाच्या लिंगायत वाण्यानें बांधलें आहे. मंडपाच्या भिंतीवर पुराणातील प्रसंगांचीं चित्रें रंगविलीं आहेत. दर्शनी कमानीवर गणपतीची मूर्ति आहे. देवळासमोर दोन दीपमाळा असून पलीकडे नगारखाना आहे नगारखान्याच्या पायथ्याशीं एक घोड्याची दगडी आकृति आहे. [ पुणें ग्यॅ. पा. १०४, स. १८८५ ]

**अवसर्पिणी**—जैन लोक काळाचे दोन भाग करितात, व त्यास उत्कृष्ट आणि निकृष्ट अशा अभिप्रायानें उत्सर्पिणी व अवसर्पिणी अशीं नावें देतात. यावरून अवसर्पिणी हा निकृष्ट काल असून त्याचे ६ भाग ते कल्पितात. त्यांचीं नांवें —(१) सुसम सुसम, (२) सुसम, (३) सुसम दुःसम (४) दुःसम सुसम ( ५ ) दुःसम आणि (६) दुःसम दुःसम सांप्रत ५ वा कालभाग दुःसम म्हणजे दुःखाचा आहे व त्याचें प्रमाण २१ हजार वर्षांचें आहे, असें त्यांचें मत आहे ( ज्ञा. को.)

**अवा जहागीर**—ही जहागीर संयुक्तप्रांतात आहे. क्षेत्रफळ. २६५ चौ. मै १९०३-४ मध्यें येथील सरकारसारा ३ ३ लक्ष रु. होता

अठराव्या शतकाच्या आरंभीं, चतुर्भुज नावाचा माथव रजपूत मथुरा जिल्ह्यातून येऊन जालेसरच्या सुभेदाराजवळ वैद्य म्हणून राहिला होता. त्याच्या मुलानें सैन्यात कांहीं अधिकार मिळवून आपलें वजन वाढविण्यास सुरवात केली. त्याचा नातू भक्तसिंग यानें भरतपूरच्या राजाच्या पदरीं नोकरी करून पुष्कळ गावें मिळविलीं, व आपल्या पदरीं मेवाती लोकांचें सैन्य ठेविलें मराठ्यांनीं त्याला अवा येथे किल्ला बांधू दिला. १८०३ मध्यें येथील राजानें मराठ्याविरुद्ध इंग्रजांचा सेनापति लेक याला मदत केली. १८५७ सालच्या बंडाच्या वेळीं इंग्रजांनीं त्याला जालेसर परगणा देऊन आपल्या बाजूस वळवून घेतलें व राजानेंहि

त्यांनी बंडवाल्याविरुद्ध चांगली मदत केली. इलंचा राजा बळवंतसिंग याला सी आय. ई. ही पदवी असून तो संयुक्तप्रांताच्या कायदेकौन्सिलचा एक वेळ सभासद होता. आलसर हें या जहागिरींतील मुख्य गाव आहे. राजा बहुधा येथें रहातो. १९०१ मध्यें या गावाची लोकसंख्या २८२१ होती. [इं. ग्यॅ.]

**अविधवा नवमी**—भाद्रपद महिन्यांतील वद्य नवमीला अविधवा नवमी असें म्हणतात. या दिवशीं ज्याचा बाप जिवंत असून आई मृत झाली असेल अशा द्विजानें विधवा न झालेल्या आपल्या आईस उद्देशून श्राद्ध करावयाचें असतें.

**अविनाशीश्वर**—हा वन्दवाडी राम याचा मुलगा होता. यानें शृंगारराजतिलक भाण लिहिलें ( कुप्पुस्वामी नं १२७०८ )

**अव्यन कवि**—या तैलंग कवीचा काल निश्चित नाहीं परंतु संस्कृतांत व तेलंगींत हा चांगला प्रवीण होता. यानें पुरूरवा राजाचें चरित्र संस्कृतांतून तेलंगींत तीन भागांत चांगलें उतरलें आहे ( कवि च० )

**अव्वैयार**—ही नामांकित कवयित्री द्राविड वाङ्मयाच्या अत्यंत प्राचीन काळांत होऊन गेली. हिचें जन्म तामिळ लोकांच्या जातींत झालें ही व हिची सहा भावंडें मिळून सात माणसें ज्ञानी होतीं म्हणून जशी यांची कीर्ति स्वदेशीं होती, तशीच परदेशीं व द्वीपांतरींहि होती असें म्हणतात या सात भावंडांत अव्वैयार आपगा व वालीज आणि मुरग्ग' ह्या चौघी बहिणी आणि तेरू वेल्लुर, अधिकनान आणि कपिलर असे तिघे पुरुष भाऊ होते.

अव्वैयार नीतिशास्त्र, ज्योतिषशास्त्र, वैद्यकशास्त्र, भूगोल व रसायन विद्या, यांत इतकी निष्णात होती कीं, त्या प्रत्येक विषयावर तिनें ग्रंथ लिहिले आहेत अत्तिसुदी, कोनिवेंडन मदुरसी, नादवाली इत्यादि हिचे नीतिशास्त्रावरील ग्रंथ होत त्याचप्रमाणें इतर विषयांवरहि ग्रंथ असून तामिळ देशांतील विद्यालयांत ते सर्व शिकविण्याचा चाल असे. यावरून या स्त्रीची योग्यता केवढी होती हें सहज समजून येतें अव्वैयार ही इतर विद्यांत जशी पारंगत होती, तशीच पचशास्त्र, धातुवाद व कल्पविद्या यांतहि होती. असें सांगतात कीं, कल्पविद्येच्या योगानें ही २४० वर्षें जगली होती.

अव्वैयारचा बाप पिरली या नांवाचा एक तामिळ ब्राह्मण होता व आई अतिशूद्र जातीची होती ब्राह्मणास अतिशूद्र जातीची स्त्री कशी मिळाली व मुलें होण्याचा योग कसा घडून आला तो वृत्तांत ' पिरली ' या शब्दाखालीं दिला आहे अव्वैयार हिचें जन्म झाल्यावर पिरलीनें हिला अरण्यांत सोडून दिलें असतां तिला एका कवीनें पोशिलें व ती बुद्धिमान आहे असें पाहून तिला विद्या शिकविली त्यामुळें ही विद्वान होऊन मोठ्या प्रख्यातीस आली. मरेपर्यंत हिनें लग्न न करितां, आपला काळ ब्रह्मचर्यव्रतानें विद्याभ्यासांत व कविता करण्यांतच घालविला अशी हिची कीर्ति अजून लोक गातात( कवि च )

**ॲव्हबरी**—विल्टशायरच्या डेव्हाइझेस पार्लमेंटविषयक विभागांत मार्लबरोपासून रस्त्यानें ८ मैलावर केनेट नदीवर हें एक खेडें आहे येथें सेंट जेम्सचें एक सुंदर चर्च आहे. येथें कांहीं पूर्वकालीन अवशेष आहेत, तथापि त्यांच्या स्वरूपाविषयीं बराच मतभेद आहे. परंतु ब्राँझकाळाचें हें आहे असें अनुमान करितां येतें. अव्हबरीचें चर्च आणि अव्हबरीचा मॅनार या दोहोंना इतिहास आहे.डूम्सडेच्या मोजणीच्या काळीं ॲव्हबरीचें चर्च रेनबोल्ड नांवाच्या एका धर्माध्यक्षा(प्रीस्ट)च्या ताब्यांत होतें तिसऱ्या हेन्रीनें तें सिरेन्सेस्टरच्या ॲबटला व मंकांना देऊन टाकिलें तें सातव्या हेनरीच्या राज्यापर्यंत त्याच्या ताब्यांत होतें नॉर्मंडींतील सेंटजॉर्ज ऑफ बुचेरव्हिलच्या येना डिक्टाइन मंकांना पहिल्या हेन्रीच्या काळांत ॲव्हबरीचा मॅनार दिला होता तिसऱ्या एडवर्डच्या राज्यांत फ्रान्समध्यें जी लढाई झाली तिच्यामुळें राजानें हा मॅनार परदेशस्थ भिक्षूंच्या नियंत्रणापासून सोडवून आपल्या राज्याला जोडला आणि सर्व हक्क व ताब्यांतल्या वस्तूंसह न्यूकॉलेज ऑक्सफोर्डला अर्पण केला

**ॲव्हरोज (११२६-११९८)**—अरबी वाङ्मय एका नियमित विचारक्षेत्र न रहातां जागतिक संस्कृतीच्या विकासामध्यें महत्वाचें स्थान ज्या पंडिताच्या परिश्रमामुळें पावलें त्यामध्यें ॲव्हरोजचा गणना केली पाहिजे ग्रीक ज्ञान मध्ययुगीन युरोपस याच्या मार्फत मिळालें आणि स्कूलमेनच्या संप्रदायास कारक याचेच ग्रंथ झाले अव्हरोज स्पेनमध्यें कॉर्डोव्हा येथें जन्मला याचें पूर्ण नांव अबुल वलीद महमद इब्न अहमद इब्न महमद इब्न रशीद असें होतें. याचा आजा व बाप दोघेहि काजी होते लहानपणापासूनच हा अभ्यासाचा नादी असल्यानें त्याचें सुरवातीचें आयुष्य वेदान्त, गणित,कायदा, वैद्यक व तत्त्वज्ञान या विषयांचा अभ्यास करण्यांत गेलें. ट्रक्सिलो येथील अबू जफर इब्न याच्या सहाय्यानें त्यानें वैद्यकाचा अभ्यास केला इब्न झुर नांवाच्या एका प्रख्यात वैद्याशीं व इब्न अरबी नांवाच्या प्रख्यात वेदान्त्याशीं त्याचा स्नेहसंबंध होता याचा तत्वज्ञ मित्र इब्न टुफेल हा मोरोक्को येथील अमीर याकुब-यूसफ याचा वजीर असल्यामुळेंच त्यानें ॲव्हरोजला अमीराचा परिचय करून दिला इब्न टुफेल यानेंच ॲव्हरोज याला ॲरिस्टॉटलवर एक टीकाग्रंथ लिहिण्याची सूचना केली ॲव्हरोजला ११६९ सालीं प्रथम सेव्हिलीचा काजी नेमण्यांत आलें व यानंतर पुढें दोन वर्षांनीं कार्डोव्हा येथें नेमण्यांत आलें यापुढील त्याचीं २५ वर्षे सेव्हिल,कार्डोव्हा,मोरोक्को इत्यादि ठिकाणीं

काजीपणा करण्यात गेलीं व या अवधींतच त्यानें आपले ग्रंथ लिहिण्यास आरंभ केला. या अवधींत तो मुख्य काजीहि झाला. यूसफ अमीरानंतर, यूसफ अल मनसूर हा गादीवर बसला. याची ही अॅव्हरोजवर प्रथम मर्जी होती, पण पुढें पुराणमताभिमानी काजींकडून याच्या लेखनावर खूप टीका झाल्यामुळें अॅव्हरोजवर त्याची गैरमर्जी झाली या काजींनीं त्याच्यावर नास्तिकतेचा आळ घातला; व हा ज्यू आहे असें सांगण्यापर्यंतहि त्यांची मजल गेली. याचा परिणाम असा झाला कीं, त्याची चौकशी होऊन त्याला लुसेना येथें हद्दपार करण्यांत आलें. तसेंच अमीरानें वैद्यक, गणित व ज्योतिष याखेरीज त्याचे इतर सर्व तत्वज्ञानविषयक ग्रंथ जाळण्याचा हुकूम केला व अशा रीतीनें अभिनव उदारमतवादी संस्कृतीला आळा घातला. पुढें बऱ्याच वर्षांनीं अॅव्हरोजला परत बोलावण्यात येऊन त्याला पूर्ववत मानमरातब देण्यात आला. पण तो पुढें फार वर्षे जिवंत राहिला नाहीं. हा ११९८ सालीं वारला. याचें थडगें मोरोक्को येथें आहे. याला पुष्कळ मुलगे होते व त्यापैकीं काहीं नावारूपाला आले. याच्या एका मुलानें आपल्या बापाच्या 'बुद्धी'वरील सिद्धांताच्या विवेचनपर एक निबंध लिहिला. अॅव्हरोजच्या स्वभावाविषयीं त्याच्या लेखनांतूनच आपल्याला अनुमान काढावें लागतें. त्याचा बाणेदारपणा व मार्मिक लेखनशैली त्याच्या अंगचा चापुलपणा सिद्ध करते. त्याच्या स्वतःच्या राष्ट्राच्या इतिहासात त्याला फारसा मान नाहीं. त्याचा स्वतःचा असा संप्रदाय नाहीं; त्याच्या मरणापर्यंतच त्याची कीर्ति टिकली. स्पेनमध्यें याच्या मृत्युनंतर एक शतकभर याचीं पुस्तकें अभ्यासिलीं जात होतीं, असें दिसतें.

ग्रं थ:—अॅरिस्टॉटलचा टीकाकार या नात्यानें अॅव्हरोज हा मुख्यतः प्रसिद्ध आहे. या टीकाग्रंथामुळेंच पश्चिमेंत मध्ययुगामध्यें तो प्रसिद्धीस आला. त्यानें स्वतःचें तत्वज्ञान बऱ्याच विद्वानांकडून खंडित झालें आहे पण त्यांतील पद्धतशीर मांडणी, सूक्ष्म पर्यालोचन वगैरे गोष्टींनीं त्याला फार महत्व आलेलें आहे. मुसुलमानी पद्धतीप्रमाणें यानेंहि लघु, मध्यम व बृहत् अशा टीका रचलेल्या आहेत. अॅव्हरोजनें 'पृथक्करण विद्या, पदार्थविज्ञानशास्त्र, तत्वज्ञान' इत्यादिकावर तिन्ही प्रकारच्या टीका लिहिल्या आहेत; पण इतर ग्रंथावर बृहत् टीका लिहिलेल्या नाहींत; प्राण्याच्या इतिहासावर मात्र एकहि टीका नाहीं. या टीकांशिवाय अॅव्हरोजनें 'तहाफत अल तहाफत' नावाचा ग्रंथ पुराणमताभिमानी काजींच्या मतखंडनपर लिहिला. याशिवाय रेनिनच्या मतें अॅव्हरोजनें प्लेटोच्या रिपब्लिकवर टीका, फराबीच्या न्यायग्रंथावरील मत, अॅव्हिसेन्नाच्या मतावरील चर्चा; निकोलसच्या 'मेटाफिजिक्स'वर टीका, 'अर्कादह'वर टीका; व याशिवाय, वैद्यक, ज्योतिष व कायदा यावरील ग्रंथ लिहिले यापैकीं वैद्यकावरचा कुल्लियात नांवाचा एक ग्रंथ मात्र उपलब्ध आहे.

अॅव्हरोजसंबंधीचे पाश्चात्य ग्रंथ वाचले असतां अॅव्हरोजच्या तत्वांचें यथार्थ ज्ञान होत नाहीं. तसेंच पुराणमताभिमानी काजींनीं कुत्सितपणानें याच्या लिहिण्यातून जे नाना प्रकारचे अर्थ काढले आहेत त्यामुळें देखील याचें यथार्थ ज्ञान मिळणें अवघड होतें. याचीं तत्वें काय होतीं हें यथार्थ समजण्यास अरबी भाषेंतील त्याच्या ग्रंथांचेंच अवलोकन केलें पाहिजे. रेनानसारख्या मुद्देसूद, विचारपरिप्लुत व विद्वान लेखकाला देखील त्याचें पूर्ण रीतीनें यथार्थ मत मागता आलें नाहीं, यावरून हें काम किती अवघड आहे हें कळून येतें. अॅव्हरोज हा अॅव्हिसेन्नाप्रमाणेंच अलफलासिफा पंथाचा होता. त्यानें अल घझली यानें केलेल्या अलफराबी व अॅव्हिसेन्नावरील टीकेचें मंडन केलें व अॅव्हिसेन्नाच्या तत्वज्ञानात काहीं फेरफार सुचविले. एवढ्यावरून तो निराळ्या संप्रदायाचा होता हें म्हणणें गैर आहे.

म त :—अॅव्हरोजच्या तत्वज्ञानाकडे दृष्टि फेंकली असता असें दिसतें कीं तें पद्धतशीरपणापेक्षा पृथक्करणाकडे अधिक झुकतें. तो स्वतः आपल्या तत्वांचें रीतभीतच प्रतिपादन करतो; व दुसऱ्या लेखकांचीं मतें तो खोडून टाकण्याच्या प्रयत्नात असतो. त्याचीं मतें खालीलप्रमाणें आहेत.

(१) जगाचें नित्यत्वः—इस्लामी धर्मांत अबुल हुदेल व तमामहसारख्या प्राचीन विद्वानांनीं देखील जगताचें नित्यत्व मानलें होतें. हुदेलच्या मतें जगताला चालन देणें म्हणजेच त्याची उत्पत्ति होय. अॅव्हरोजच्या मतें प्रत्येक क्षणाला नव नव रूप उत्पन्न होणें याचें नाव उत्पत्ति. जग हें नित्य आहे तथापि प्रत्येक क्षणीं होणाऱ्या जगताच्या नवीन उत्पत्तीला कारण अथवा कर्ता आहेच. तो कर्ता म्हणजे परमेश्वर होय. हा मात्र कारणाशिवाय अमर अकर्तृक आहे.

(२) विविधत्वाची उत्पत्तिः—इतर अरबी तत्वज्ञांप्रमाणेंच प्राण्याच्या उत्पत्तीसंबंधाच्या विचारानें अॅव्हरोजचें डोकें व्यापलें होतें. परमेश्वर एक असून त्याच्यापासून अनंत प्राणी कसे उत्पन्न आले असावेत हा प्रश्न त्याच्यापुढें उभा राहिला आणि त्यानें विचारांतीं असें ठरविलें कीं, परमेश्वरापासून एक शक्ति निर्माण झाली व तिजपासून हें विविधस्वरूपी जग निर्माण झालें; या एका शक्तीच्या अधिकारानें हें सर्व जगयंत्र सुरळीत चालतें.

(३) परमेश्वराचें ज्ञानः—'परमेश्वराला फक्त आपलें स्वरूपच जाणता येतें' या सूत्राचा कित्येक तत्वज्ञानी परमेश्वराला खालच्या सृष्टीचें ज्ञान नसतें असा जो अर्थ करीत होता, तो अॅव्हरोजला पसंत नव्हता. त्याच्या मतें परमेश्वराचें ज्ञान खालच्या प्राण्यावर अवलंबून नव्हतें कारण तसें गृहीत धरल्यास परमेश्वर हा सर्वज्ञ होणार नाहीं. ज्याप्रमाणें एकच रंग निरनिराळ्या वस्तूंच्या ठिकाणीं निरनिराळ्या रीतीनें भासमान होतो त्याप्रमाणें परमेश्वर हा उच्च स्थितींतल्या प्राण्यानाच जाणतो असें त्याचें मत होतें.

(४) आत्मा आणि बुद्धिः—यासंबंधींतील ॲव्हरोजची कल्पना ॲव्हिसेनाप्रमाणच होती. फक्त एक मात्र फरक होता; व तो म्हणजे आत्मा व बुद्धि यांतील भेदासंबंधींचा होय. ॲव्हरोज याच्या मतें आत्म्याचें व बुद्धीचें एकत्र होतें. आत्मा अमर आहे असें ॲव्हरोजचें मत नव्हत असें म्हणणें रास्त नव्हे.

(५) पुनरुत्थानः—अल घझाली यानें अलफसाफा पंथ हा पुनरुत्थानवादी नाहीं असा आरोप केला होता तो ॲव्हरोजनें खोडून काढला. प्रत्येक धर्म हा पुनरुत्थानाचें तत्त्व लोकांच्या कल्याणासाठीं व सुखासाठीं शिकवतो असें याचें मत होतें.

(६) सत्य आणि धर्मः—राजकारणामध्यें तो प्लेटोमतानुयायी होता; व त्याला प्लेटोचा 'रिपब्लिक' हा ग्रंथ पूर्णपणें मान्य असून त्याच्यावर तो थोडीहि मतभेदप्रदर्शक टीका करीत नाहीं.

ॲव्हरोजचें वर्चस्व ज्यू तत्त्वज्ञानावर व ख्रिस्ती स्कोलॅस्टिक तत्त्वज्ञानावर पडलेलें आढळतें त्याचे ग्रंथ हिब्रू व लॅटिनमध्यें भाषांतरलेलें आहेत ॲव्हरोज, ॲव्हिसेन्ना इत्यादि अरब तत्त्वज्ञाच्या ग्रंथाचें भाषांतर झाल्यामुळें पाश्चात्य राष्ट्रांना ॲरिस्टॉटलची मुख्यत्वें माहिती झाली असें मानण्यास हरकत नाहीं. ॲरिस्टॉटलच्या बहुतेक ग्रंथाचें भाषांतर अरेबिकपासून लॅटिन, इंग्लिश वगैरे भाषेंत झालें आहे १५।१६ व्या शतकांत ॲव्हरोजच्या तत्त्वज्ञानाचें अतोनात वर्चस्व वाढलें. पण त्याच्याहि पूर्वी आल्बर्ट दी ग्रेट, आक्वायनस, गिरम यांनीं व पुढें ख्रिस्ती पाद्र्यांनीं त्याच्यावर फारच टीका केली निरनिराळ्या धर्मपरिषदामधून त्याच्या तत्त्वज्ञानाची निंदा होऊं लागली. फ्रान्समध्यें १४ व्या शतकांत व उत्तर इटलीमध्यें १६ व्या शतकामध्यें या पंथाचें पुष्कळ वर्चस्व होतें व तें गॅलिलिओच्या काळापर्यंत तसेंच चाललें असें म्हणण्यास हरकत नाहीं. [ संदर्भग्रंथः—फिलॉसॉफी ॲण्ड थिओलॉजी ऑफ ॲव्हरोज. दि हिस्टरी ऑफ फिलॉसॉफी इन् इस्लाम ]

**ॲव्हिग्नॉन**–फ्रान्सच्या आग्नेय भागांतील व्हॉक्लूस विभागाचें मुख्य शहर. हें लिऑँच्या दक्षिणेस १४३ मैलावर लिऑँपासून मार्सेलिसला जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्यावर आहे. लोकसंख्या (१९०६सा.) ३५३५६ होती ऱ्होनच्या डावीकडील तीरावर ऱ्होन व डुरॅन्सच्या संगमापासून कांहीं मैलावर हें शहर वसलें आहे. येथें एक झुलता पूल आहे. येथें पोपचा महाल आहे. येथील काल्व्हेट नांवाच्या पदार्थसंग्रहालयांत भौतिकशास्त्रवेत्ता एफ. काल्व्हेट याचे संग्रह, कांचेचे व इतर प्राचीन अवशेष, तसेंच शिलालेख वगैरे आहेत. ह्या शहरांत जीन आल्थेन नांवाच्या एका इराणी गृहस्थाचा पुतळा आहे. ह्या गृहस्थानें १७६५ मध्यें मंजिष्ठाची लागवड पहिल्याप्रथम केली व आतां त्याचा तेथें व्यापार चालतो. १८७३ मध्यें ह्या शहरांत जॉन स्टुअर्ट मिल मरण पावला. यास येथील स्मशानभूमींत पुरलें आहे.

ॲव्हिग्नॉन हें महाधर्माधिकाऱ्यानें रहाण्याचें ठिकाण असून येथें पहिल्या प्रतीची न्याय कचेरी, व व्यापारी न्यायकचेरी, दलाल मंडळ, वणिक् सभा, फ्रान्सच्या पेढीची शाखा वगैरे संस्था आहेत. हें शहर सुपीक प्रांतांत असल्यामुळें येथील उत्पन्नावर मोठा व्यापार चालतो. येथें पिठाच्या चक्क्या, दारू गाळण्याच्या भट्या, व साबू करण्याचे कारखाने वगैरे आहेत.

ॲव्हिग्नॉन हें प्राचीनकाळीं कव्हेरिसच्या गॉलिक जातीच्या लोकांचें शहर होतें. पुढें रोमन लोकांच्या वेळीं गॉलिआ नार्बोनेन्सिसच्या प्रमुख शहरांपैकीं एक होतें, नंतर बर्गंडीच्या व आर्लेसच्या राज्यांत होतें, व पुढें परंपरेनें प्राव्हेन्स, टयूलोज, व फॉरकॅलीक्विअरच्या काउंटच्या ताब्यांत राहिलें. १२ व्या शतकाच्या शेवटीं हें लोकनियंत्रित झालें. पण १२२६ मध्यें आठव्या लुईनें जिंकलें व १२५१ मध्यें त्यास प्राव्हेन्स व टयुलोजचे काउंट यांजकडे शरण यावें लागलें. १३०९ मध्यें ५ वा क्लेमेन्ट या शहरांत राहूं लागला व पुढें १३७७ पावेतों हें पोपच्या राहण्याचें ठिकाण होतें जरी फ्रान्स राजांनीं मधून मधून बरेच प्रयत्न केले तरी १७९१ पावेतों ह्या शहराचें आधिपत्य पोपकडेच राहिलें. १७९१ मध्यें पोपच्या अनुयायी-वर्गांत व लोकसत्तावादी लोकांच्या भांडणामुळें बराच रक्तपात झाला. १८१५ मध्यें राजसत्तावादी लोकांनीं मार्शल ब्रूनचा खून केला. तिसऱ्या शतकांत स्थापन केलेलें धर्माधिकाऱ्याचें पद हें १४७५ मध्यें महाधर्माधिकाऱ्याचें पद ( आर्चबिशप ) बनविण्यांत आलें.

**ॲव्हिसेन्ना**—( ९८०—१०३७ )—ॲव्हिसेन्ना हें इब्नसिना या अरबी नांवाचें व अव्हेन सिना या हिब्रू नांवाचें लॅटिन भाषेंतील रूप आहे. याचें पूर्ण नांव अबु अलि अल हुसेन इब्न अब्दल्ला इब्न सीना हें होतें. ॲव्हिसेन्ना हा बुखारा येथें जन्मला. याचा बाप करवसुलीच्या कामावर होता. ॲव्हिसेन्ना याचा धाकटा भाऊ जन्मल्यावर ॲव्हिसेन्नाचा बाप बुखारा येथेंच रहाण्यास आला. या वेळीं बुखारा हें शहर फार महत्त्वाचें गणलें जात असे. लहानपणापासूनच ॲव्हिसेन्नाची तरतरीतपणाबद्दल प्रसिद्धि होती; व शिक्षकाच्या हाताखालीं त्यानें उत्तम शिक्षण संपादन केलें. दहा वर्षांचा असतानाच त्यास सर्व कुराण पाठ होतें. तो एका भाजीवाल्याजवळ गणित शिकला. त्याच्या घरीं रहाण्यास आलेल्या नातिलि नांवाच्या एका साधूपाशीं त्यानें युक्लिड, तर्कशास्त्र व अल्माजेस्ट यांचें अध्ययन केलें.

उपचाराचे मार्ग शोधून काढले होते नंतर एक दोन वर्षे-पर्यंत त्यानें उच्च प्रकारच्या तत्त्वज्ञानाचें अध्ययन करण्यांत आपला वेळ खर्च केला या कामात त्याला अतोनात परिश्रम करावे लागले एखादेवेळीं न समजल्यामुळे त्याचें डोकें भणाणून जात असे, व अशा वेळीं तो शांत चित्तानें मशिदीमध्यें जाऊन देवाची प्रार्थना करीत असे. तेव्हा त्याला तो विषय समजत असे रात्रीच्यारात्रीं अभ्यास करण्यांत तो घालवीत असे. त्यानें ॲरिस्टॉटलचें तत्त्वज्ञान वाचण्यासाठीं अतिशय मेहनत केली

त्यानें बुखारा येथील सुलतानाला मोठ्या आजारांतून वाचविल्यामुळें राजवैद्याच्या जागीं त्याची नेमणूक झाली. व त्यामुळें सॅमॅनिड येथील ग्रंथ संग्रहालयाचा फायदा त्याला पूर्णपणें घेता आला. ॲव्हिसेनानें पुढें आपली नोकरी सोडून दिली व एखादा चांगला आश्रयदाता पाहण्यासाठीं तो खोरझंज, निशापूर, अबीवर्द वतुस या ठिकाणीं काहीं दिवस राहून अखेरीस जोरजान येथें आला व तेथें त्याला अल्जुझानी नावाचा एक शिष्य मिळाला या शिष्याची त्याला अखेरपर्यंत मदत झाल्यामुळें त्यानें महत्त्वाचे ग्रंथ लिहिले, व वैद्यकावरील सिद्धांत ग्रंथाला देखील सुरवात केली. तो पुढें राइ येथें रहाण्यास गेला; येथें त्यानें छोटीं छोटीं तीस पुस्तकें लिहिलीं असें म्हणतात. नंतर तो कझवीन व हमदान येथें गेला. हमदान येथें असताना तेथील अमीराला आजारातून बरें केल्यामुळें त्यानें त्याला वजीर नेमिलें पण त्याच्यावर काहीं आळ आल्यामुळें तो एका औषधीविक्याच्या घरीं छपून राहिला. तरी तेथें त्याचें ग्रंथ लेखनाचें काम चालू होतें. परंतु हमदान येथील अमीराला युद्ध लागल्यामुळें त्यानें त्याला धरून आणून कैद केलें. कैदेंत असताना यानें आपलें लेखन सुरू ठेवलेंच होतें. पुढें फकीराच्या वेषात त्यानें आपली सुटका मोठ्या संकटानें करून घेतली व अनेक हाल सोसून तो इस्पाहान येथें आला तेथील अमीराकडून त्याला मान मिळाला. आपल्या आयुष्याचीं शेवटचीं दहाबारा वर्षे त्यानें तेथील अमीराच्या आश्रयाखालींच घालविलीं दररोज रात्रीं तत्त्वज्ञानावर चर्चा करण्यासाठीं तो सभा भरवीत असे. काहीं काहीं वेळा अमीरहि हजर रहात असे. येथें असतांना तो अतिशय चैनहि करीत असे. तो फार रंगेल होता. तो अतिशय दारू पीत असे, व त्याला व्यसनाचाहि फार नाद होता. यामुळें त्याची वयोमर्यादा कमी झाली. तो आपल्या वयाच्या ५८ व्या वर्षी मेला व त्याला हमदान येथें पुरण्यात आलें.

ग्रं थ र च ना —त्यानें जवळ जवळ १०० पुस्तकें लिहिलीं त्यातील अतिशय प्रसिद्ध अशीं 'अशफा' 'इशारात' इत्यादि होत तर्क न्याय वेदांत इत्यादि,निरनिराळ्या विषयांवर एकेक दोन ग्रंथ त्यानें लिहिला. किमयाशास्त्रावरहि त्यानें एक ग्रंथ लिहिला असावा. प्रवासासंबंधीं त्याच्या ग्रंथाचें रकॉटनें भाषांतर केलें. त्यानें लिहिलेल्या ग्रंथाचे विषय खालील प्रमाणें:—'शास्त्राचा उपयोग व फायदा'—२० पुस्तकें; 'निरपराधीपणा व गुन्हेगारी'—२ पुस्तकें, आरोग्य व उपचार'—१० पुस्तकें; 'आरोग्यरक्षणाचीं साधनें'—३ पुस्तकें, 'शरीरशास्त्राचीं तत्त्वें'—१४ पुस्तकें, 'ज्योतिर्निरीक्षण'—१ पुस्तक, 'गणितशास्त्र.' 'सिद्धांत व त्याचे प्रयोग' १ पुस्तक; अरबीभाषा'—१० पुस्तकें, 'शेवटचा निकाल; 'अहंकाराचें मूळ' 'अन्त व अनन्तर' 'पुनरुत्थान संक्षिप्त युक्लिड, इ

सं प्र दा य —ॲव्हिसेना हा अल्फलासिफा नांवाच्या संप्रदायापैकीं होता ग्रीक ग्रंथांचा विशेष अभ्यास करणाऱ्याला हा किताब देण्यात येत असे व याच्या पूर्वी वीस विद्वानांना तरी हा मान मिळाला होता यांच्यापूर्वी अल्किंडी व अल्फराबी हे दोघे प्रख्यात होते अल्किंडी यानें या संप्रदायाला संघटित स्वरूप दिलें होतें हा संप्रदाय नूतन प्लेटो संप्रदायाचें परिणत स्वरूप होय ॲव्हिसेनानें आपल्या पूर्वीच्या ग्रंथकाराची माहिती व्यवस्थित रीतीनें पुढें मांडिली.

ॲव्हिसेनानें लेखनात प्रतिपादिलेल्या मताचें पाच सहा विषयाखालीं विवेचन करता येईल. तर्क, पदार्थविज्ञानशास्त्र, मानसशास्त्र, तत्त्वज्ञानशास्त्र, गूढविद्या; आणि नीतिशास्त्र.

( १ ) तर्कशास्त्र —ॲव्हिसेना यानें तर्कशास्त्राला फार महत्त्वाचे स्थळ दिलें आहे. यानें तर्कशास्त्राचें स्वरूप फार व्यापक मानलेलें आहे. ॲरिस्टॉटलच्या पद्धतीलाच अनुसरून त्यानें तर्काचे ९ निरनिराळे भाग पाडले आहेत. 'इशारात' मध्यें तर्काचें कार्य सांगताना त्यानें असें म्हटलें आहे कीं, 'तर्काचें' कार्य, मनुष्याच्या विचारसरणीला निर्दोषत्व यावें यासाठीं नियम सांगण्याचें आहे.' एखादा सिद्धांत सिद्ध करण्याला प्रथमतः स्वानुभव अवश्य आहे स्वानुभवामुळें वस्तूचें स्वरूप समजून येतें व त्यानंतर अनुमान मांडता येतें असें त्यानें म्हटलें आहे. व्याख्येवरून मनुष्याला वस्तूचें व्यावहारिक स्वरूप मांडता येतें; असें त्याचें मत होतें. ॲव्हिसेनानें व्याख्या व वर्णन यांमधील भेदहि उत्तम रीतीनें मांडला आहे. त्यानें कारणाचे चार प्रकार सांगितले आहेत. उपादान, निमित्त, अंत्य व साधक हे चारहि प्रकार लक्षणात असूं शकतात असें त्यानें दाखविलें आहे.

( २ ) पदार्थविज्ञानशास्त्र.—पदार्थविज्ञानशास्त्राच्या तात्त्विक प्रकरणामध्यें शक्ति, काल, व गति यासंबंधीं विचार ॲव्हिसेना यानें केला आहे. 'जडवस्तु ही "द्रव्य व स्वरूप" या दोन तत्त्वानीं युक्त असते' व तिचा उपयोग तर्क व तत्त्वज्ञान यांच्या व्यवहारांत होतो असें त्यानें म्हटलें आहे. ॲव्हिसेनानें केलेली शक्तिविषयींची कल्पना गतिशास्त्राशीं फार जुळता आहे. त्यातल्या त्यात वस्तूमध्यें असणाऱ्या अंतःशक्तीसंबंधानेंच तो अधिक विवेचन करतो अशाप्रकारची

सर्वसामान्य अंतःशक्ति म्हणजे ' वजन ' होय. ही शक्तीची कल्पना त्यानें मानसशास्त्रात व तत्वज्ञानशास्त्रात व्यापक केली आहे. ' शक्तीमध्यें होणारी वाट वेगामध्यें नाश पावते हा यंत्रशास्त्रातील सिद्धांत याला ठाऊक होता. काल हा गतीमुळें समजतो. वस्तू या कालपरिच्छिन्न आहेत याचें कारण त्याच्या द्रव्यांत काल आहे असें नाहीं तर त्यांना गति आहे व गति ही कालविच्छिन्न आहे हें होय. ॲव्हिसेन्नानें दिक्, व वस्तुस्थान " या विषयींहि विचार केलेला आहे. त्याच्या मतें वस्तूला पोकळी मध्यें शिरतां यावयाचें नाहीं कारण पोकळीमध्यें कोणालाहि शिरतां येत नाहीं. यावरून त्यानें पोकळीच्या अभावाचें अनुमान काढलें आहे.

मानसशास्त्र—ॲव्हिसेन्नानें मानसशास्त्राची फार पद्धतशीर मांडणी केली आहे. प्राणी व त्याच्या इंद्रियशक्ती यांचें त्यानें पद्धतशीर विवेचन केलें आहे. त्याच्या मतें मनाचे तीन प्रकार आहेत. वनस्पतींचें मन, प्राण्याचें मन व मानवी मन वनस्पतींच्या मनाचे तीन गुणधर्म आहेत. पोषकधर्म, विकासधर्म, व उत्पादक धर्म. प्राण्याच्या मनाचे दोन गुणधर्म आहेत. प्रेरकधर्म व इंद्रियग्रहणधर्म. यासंबंधींचे सूक्ष्म विवेचन त्यानें आपल्या ग्रंथात केलें आहे मानवी मनालाच तेवढी ' बुद्धि ' असते. या बुद्धीचे व्यावहारिक व ' अव्यावहारिक ' असे दोन प्रकार आहेत. यासंबंधीं विचार करताना इंद्रियशक्तीसंबंधानें व इंद्रियवमनोसंबधानें जे प्रश्न उद्भवतात त्या संबंधींहि त्यानें विचार केला आहे. त्याप्रमाणेंच त्यानें ' जाति ' संबंधाचा विचारहि केलेला आहे आत्म्याच्या अमूर्ततेबद्दल ॲव्हिसेन्नानें खालीलप्रमाणें कारणें दिलेलीं आहेत ( १ ) आत्म्याला स्वस्वरूपाची जाणीव होते. ( २ ) आत्मिक शक्तीमुळें व्यक्तीपासून अव्यक्त कल्पना निराळ्या ओळखतां येतात. इयत्ता ही शरीरात असूं शकत नाहीं. या आत्म्याच्या अमूर्ततेपासूनच त्याच्या अमरत्वाचें अनुमान आपोआप होतें. आत्म्याचें शरीरामधील जीवित्व हें प्रासंगिक आहे. आत्मा हा शरीराबरोबरच उत्पन्न होतो असें याचें मत होतें; व या समकालीन उत्पत्तीमुळें पुनर्जन्माचा वाद याच्या मतें निघतच नाहीं.

तत्त्वज्ञानः—यातील काहीं भाग जुन्या समजुतीप्रमाणें लिहिला असल्यानें तो थोडासा चमत्कारिक वाटतो. या भागांत श्रेष्ठ चिच्छक्तींची उत्पत्ति कथन केलेली आहे; व ग्रहोत्पत्ति सांगितली आहे ती येणेंप्रमाणें आहे. " सर्वांत प्रथम सत् हें होतें त्यापासून निरनिराळे श्रेष्ठ आत्मे (चिच्छक्ती) उत्पन्न झाले, व त्यांच्या पासून इतर आत्मे उत्पन्न झाले. आत्मे हे शरीरांत चैतन्य उत्पन्न करतात; व आकाशातील जीं शरीरें आत्म्यामुळें चेतना पावतात त्यांना तारका म्हणतात. ॲव्हिसेन्ना हा तारे स्थिर आहेत या जुन्या मताचा होता. ॲव्हिसेन्नानें कार्यकारणभावाचीहि मीमांसा केली आहे. परमात्मा हाच मूळ कारण आहे. त्यापासून अनुक्रमानें इतर आत्मे उत्पन्न होतात. ईश्वर हा स्वतःच तारे उत्पन्न करीत नसून दुसऱ्या शक्तींच्या द्वारें तारे उत्पन्न करतो. कारणातहि जातिकारण व व्यक्तिकारण असे त्यानें भाग पाडले आहेत परमेश्वर हा सच्चिदानंद आहे; तो पूर्ण आहे." एवढा भाग सोडून दिला तर इतर भाग हा ॲव्हिसेन्नानें उत्तम रीतीनें मांडलेला आहे.

गूढविद्याः—धार्मिक दृष्ट्या याचा जो अर्थ आहे त्यादृष्टीनें ॲव्हिसेन्ना हा गूढविद्या शब्द योजतो किंवा नाहीं याबद्दल शंका आहे. परंतु तत्त्वज्ञानाचा एक भाग गूढविद्या ही आहे असें मानण्यात यानें नूतन प्लेटो पंथाचें अनुकरण केलें आहे. परंतु गूढविद्या अशा दृष्टीनें विचार न करता दुसऱ्या बाजूनें या तत्त्वाचा विचार करणें जरूर आहे. ॲव्हिसेन्नाचा आशावाद हा लीबीनटिझप्रमाणें आहे पाप हा परमेश्वराचा धर्म नसून प्रासंगिक आहे पापें तीन प्रकारचीं आहेतः—शारीरिक दुःख, न्यूनत्व आणि असद्धर्माचरण.

नीतिशास्त्रः—ॲव्हिसेन्नानें नीतिशास्त्रावर विशेष विचार केलेला दिसत नाहीं. काहीं काहीं तत्त्वें फार सुंदर आहेत नाहीं असें नाहीं; पण पारमार्थिक गोष्टींतच हा विचार करीत असल्यामुळें यानें या बाजूकडे लक्ष दिलेलें नाहीं. त्यानें शासनशास्त्रावरहि काहीं लिहिलें आहे. बायका, मुलें व नोकर यासंबंधाचेहि त्यानें नियम दिले आहेत. कलेचे यानें तीन प्रकार पाडलेले आहेत; बुद्धिगत, शिक्षणगत व शक्तिगत यांपैकीं प्रत्येकानें एखादी तरी कला शिकावी असें त्यानें म्हटलें आहे. ' चांगली बायको ही नवऱ्याची प्रत्येक बाबतींत मदतगारीण असते उत्तम बायको बुद्धिमान, धार्मिक व प्रेमळ असते. कुटुंबाची व्यवस्था, दर्जा, भय व आस्था यांवर अवलंबून असावी.' असें त्यानें लिहिलेलें आहे.

ॲव्हिसेन्नाच्या सम्प्रदायात विशेष मोठे विद्वान झाले नाहींत. त्याचें तत्वज्ञान अलगझाली याच्यासारख्या मुसलमानांनीं खंडण केलें आहे. यूरोपीय विश्वविद्यालयांत ५ शतकेंपर्यंत वैद्यकीवर याचा ग्रंथ प्रमुख मानला जात असे. हल्लीं त्याच्यावर पुष्कळच टीका होते; व तो विशेष वाचलाहि जात नाहीं.

[एतद्विषयक वाङ्मयः—इब्न अबी उशैबिया—' उयून अल-अनबा ' मुल्लर संपादित, कोनिग्सबर्ग १८८४. कॅरा डि व्हॉक्स—ॲव्हिसेन्ने, पॅरिस १९००. याचाच अव्हिसेन्नावर ए. रि. ए. मध्यें लेख आहे. बोअर—दि हिस्टरी ऑफ फिलॉसॉफी इन इस्लाम, लंडन १९०३.

अव्हिसेन्नाच्या ' शिफा ' या ग्रंथावर जर्मनीत नुकतीच मोठी महत्त्वाची ग्रंथरचना चालू आहे. याचा नजात व वैद्यक सिद्धांतावरचा ग्रंथ १५९३ मध्यें रोम येथें प्रसिद्ध झाला होता. लंडन येथें १८९२ त ' इशारात ' प्रसिद्ध झाला. ए. ब्रि. यीलचा कोश इत्यादि.]

**ॲव्होगड्रो अमेडेव**—या इटालिअन शास्त्रज्ञाचा जन्म तारीख ९ जून १७७६ रोजी ट्युरिन येथें झाला. व त्याच

स्थलीं तारीख ९जुलै१८५८ रोजीं त्याचा मृत्यु झाला ट्युरिन येथील विश्वविद्यालयांत तो कित्येक वर्षे पदार्थविज्ञानाचा प्रोफेसर होता त्यानें विद्युत्, उष्णतेनें प्रवाही द्रव्याचें वर्धन, विशिष्ट उष्णता, केशाकर्षण इत्यादि विषयावर चार भाग असलेला एक ग्रंथ लिहिला आहे परंतु त्यानें पुढें दिलेला सिद्धान्त प्रस्थापित केला म्हणून तो प्रसिद्धीस आला आहे. " समान उष्णता आणि दाब असताना जर सारख्या आकार मानाचे दोन वायू घेतले तर त्या वायूंतील अणूंची संख्या सारखी असते." या सिद्धान्तास अव्होगड्रोचा सिद्धान्त असें नाव दिलें गेलें आहे

**ॲशवर्टन**—डेव्हन्‌शायर नामक ॲशवर्टन पार्लमेंट-विषयक विभागांतील ही एक बाजारी पेठ आहे. हें प्लिमथहून २४ मैलावर ग्रेट वेस्टर्न रेल्वेच्या एका शाखेवर आहे जिल्ह्याची लोकसंख्या ( १९०१ ) २६२८ आहे हें टेंकड्यानीं वेढलेल्या एका खोऱ्यांत आहे. डार्ट येथें सेंट अङ्रूचें देवालय आहे.येथें लोकरीचें सर्ज नावाचें कापड तयार करितात येथें दारु गाळण्याचे, रंग करण्याचे कारखाने व चिरकामाच्या गिरण्या आहेत. पाटीचा दगड व तांबें आणि टिन यांच्या खाणी पूर्वी बऱ्याच होत्या जवळचें सर्जच्या व्यापाराचें ठिकाण न्यूक्फास्टलेचा शहरी जिल्हा होय ह्या दोन शहरामध्यें बक्फास्ट ॲबे आहे.

ॲशवर्टन् हें शहर वहिवाटीच्या हक्कानें पार्लमेंटांत प्रतिनिधी पाठविणाऱ्या शहरांपैकीं एक शहर होतें. येथें कथलाच्या खाणी होत्या पूर्वी येथील कारभार दरवर्षी तेथील सरदारानें भरविलेल्या सभेत निवडलेला एक प्रतिनिधी व एक बेलीफ पहात असत.

डूम्सडेप्रमाणें ॲशवर्टन हें एक्झीटरच्या बिशपच्या ताब्यांत होतें. सन १५५२ त ॲशवर्टनबरो व ॲशवर्टन फॉरेन हे दोन्ही मॅनॉर्स बिशपनें विकले व नंतर ते राजाच्या ताब्यांत गेले काहीं वर्षांनीं याचा अर्धा भाग क्लिन्टन कुटुंबाकडे गेला. यास दोन प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क होता पण १८३२ व १८८५ च्या रिफॉर्म ॲक्टांनीं तो नाहींसा झाला.

येथें गुरुवारी व शनिवारी बाजार भरतो वर्षांतून चार वेळ जत्रा भरतात

**ॲशबोर्न**—डर्बीशायर नामक पश्चिम पार्लमेंटरी विभागांत ही एक बाजारीपेठ आहे हें डर्बीहून १३ मैलावर लंडन आणि नार्थवेस्टर्न व नार्थ स्टॅफोर्डशायर रेल्वेवर आहे. जिल्ह्याची लोकसंख्या (१९०१) ४०३९ आहे. डोव्ह नदीजवळील दोन खोऱ्यांतील उंच पठारावर तें वसलेलें आहे, व येथून डोव्ह खोऱ्याचा अवर्णनीय देखावा जवळच दिसतो सेंट ऑस्वल्डचें प्रार्थनामंदीर क्रूसच्या आकाराचें आहे. या शहराचा कृषिविषयक व्यापार बराच मोठा आहे येथें कॉरसेट तयार करितात जवळील नदी प्रवाहांत मासे विपुल सापडतात ॲशबोर्न हॉलचा प्रिन्स चार्लीशीं संबंध आहे, कारण तो १७४५ सालीं डर्बीवर चढाई करून जाण्यापूर्वी व त्याच्या नंतर तेथें राहिला होता. डॉ जॉन्सन आपला मित्र डॉ टेलर ह्याला भेटण्याला येथें येत असे

**अशांटी**—पश्चिम आफ्रिकेंतील ब्रिटिशांची एक वसाहत याच्या पूर्वेस ( फ्रेंच ) ' आयव्हरीकोस्ट कॉलनी ' उत्तरेस ' नॉरदर्न टेरिटरीज ऑफ दि गोल्ड कोस्ट ' म्हणून प्रसिद्ध असलेलें ब्रिटिश संरक्षित संस्थान, व पूर्वेस व्होल्टा नदी आहे या प्रदेशाचें क्षेत्रफळ २३,०००, चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें ( १९११ ) २८७८१४ आहे

अशांटीचा बहुतेक भाग घनदाट अरण्यानें आच्छादित असा आहे यात काळवीट, वानर, चित्ता, इत्यादि प्राणी सापडतात. येथील नद्यांत मगर फार आहेत. येथील हवा यूरोपियनांच्या प्रकृतीस चांगलीशी मानवत नसली तरी साधारण बरी आहे पाण्याचा पुरवठाहि विपुल आहे. मेच्या अखेरीपासून आक्टोबरपर्यंत पावसाळा असतो.

मुसुलमानांच्या हल्ल्यामुळें नायगर व सेनीगाल नद्यांवरील प्रदेशांतून येथील मूळचे लोक या ठिकाणीं १६ किंवा १७ व्या शतकांत आले असावेत असा अंदाज आहे. राहण्यास सुरक्षित जागा मिळाल्यामुळें त्यांचें शौर्य जास्त उत्तेजित होऊन त्यांचें लौकरच बलवान राष्ट्र बनलें हे लोक शुद्ध निग्रो वळणाचे आहेत व ते मूळचे फाटो वंशातले आहेत असें म्हणतात. अशांटी लोकांच्या पुष्कळ जाती आहेत, प्रत्येक जातीला पूर्वी एक एक राजा असे. पण १८ व्या शतकाच्या सुरवातीपासून सर्व जाती कुमासी येथील राजाला सम्राट मानूं लागल्या. पूर्वी येथील राज्यपद्धति राजसत्ता व लष्करी महाजनसत्ता या दोन सत्तांनीं मिश्रित होती. निरनिराळ्या टोळ्यांतून राजमंत्री निवडले जात व राजाची सत्ता बरीच नियन्त्रित असे. ज्यांना शक्य असेल ते बहुपत्नीत्व आचरीत व जुने ग्रंथकार तर असें सांगतात कीं राजाला ३३३३ बायका कराव्या लागत. राजाच्या मरणानंतर राज्य मुलास न मिळतां त्याच्या भावास अथवा त्याच्या बहिणीच्या मुलास मिळत असे. राजमातेला राज्यांत बराच मोठा अधिकार असे. पण राजपत्न्या ह्या केवळ नामधारी राण्या असत डाहोमिअनाप्रमाणें यांच्यात देखील मृत आप्ताच्या थडग्यावर नरबली अर्पण करण्याची चाल प्रचलित होती.

या प्रदेशांत परदेशांतून व्यापाराकरिता आलेले काहीं मुसुलमान आहेत. काहीं लोक खिस्तानुयायीहि झालेले आहेत. पण भुताखेतांची पूजा करणारेच जास्त.

अशांटी येथील लोक उत्तम कारागीर आहेत. विशेषतः कापड विणण्यांत ते फार कुशल आहेत हे चिनी मातीच्या भांड्यांची कामें व सोन्याचीं कामेंहि करतात. उत्तर भागांत तंबाखु बरीच होत असून पश्चिम भागांत पुष्कळ सोनें सापडतें.

कुमासी आणि सुन्यानी येथें सरकारी व मिशनरी शाळा आहेत पोष्ट व तारायंत्र खातें, कर, वगैरे व्यापाराच्या बाबी

असून १९१७ मध्यें एकंदर उत्पन्न ५२६४४ पौंड होतें. कोको आणि रबराची लागवड या मुख्य शेतकींतील बाबी आहेत. जंगलखातें हें मोठें किफायतशीर आहे. सागवान व तेलाचीं झाडें हीं फार होतात. १९१९ मध्यें सोनें किंमत पौंड ४२१६९६, कोको पौंड १४,२५,१८५, रबर पौं. ६३२, गुरें व बकरीं पौं ७०,०००, कातडीं पौं ७०१२ वगैरे मिळून एकंदर २४,३३,२०५ पौंड किंमतीचा माल निर्गत झाला, आणि यूरोपांतील सुमारें १०,७३,२५७ पौंड किंमतीच्या जिनसांची आयात झाली. त्यांत जनावरांची आयात बरीच वाढली आहे. कारण अशांटी लोकांच्या आहारांत मांसाचें प्रमाण बरेंच वाढलें आहे. १९१८ मध्यें ३८० मैल मोटार सडक तयार होती.

यूरोपियनांची दृष्टि अठराव्या शतकांत प्रथम अशांटीवर वळली. अशांटी राज्याचा खरा संस्थापक ओसाई टुटु होय. यानें कुमासी शहर बांधून व शेजारचें डेनकेराचें राज्य जिंकून राज्यमर्यादा बरीच वाढविली. १८०० मध्यें ओसाई टुटु क्वामिना हा राजा होता. ब्रिटिशांचा व अशांटीचा संबंध प्रथम याच्याच अमदानींत आला. १८०७ मध्यें यानें आनामाबो नजीकच्या किनाऱ्यावरील ब्रिटिशांच्या किल्ल्याला वेढा दिला. तेव्हां इंग्लिशांनीं त्याला त्या किल्ल्याबद्दल व केप कोस्ट येथील किल्ल्याबद्दल कांहीं भाडें देण्याचें कबूल केलें. १८१७ च्या तहांत हीच गोष्ट कायम करण्यांत येऊन किनाऱ्यावरील शहरांतील देश्य लोकांचें संरक्षण ब्रिटिशांनीं करावें असें ठरलें. याच संबंधांत १८१९ त मानगड उपस्थित होऊन अशांटीचा राजा देश्य प्रजेस ब्रिटिशांच्या ताब्यांत देण्यास कबूल होईना. तेव्हां १८२० त फिरून तह होऊन देश्य प्रजेस अशांटीच्या ताब्यांत देण्यांत आलें. पण केप कोस्टचा सुभेदार जे होप स्मिथ हा तह मान्य करीना, व त्याला लंडन येथील सरकारचेंहि पाठबळ मिळालें. १८२१ त लंडन येथील सरकारनें ब्रिटिश ठाण्यांचा ताबा प्रत्यक्षपणें आपल्याकडे घेतला. त्यामुळें ओसाई टुटु क्वामिना याचा क्रोधानल भडकून त्यानें ब्रिटिशांविरुद्ध रणशिंग फुंकलें. १८२४त पहिलाच ब्रिटिश गव्हर्नर सर चार्लस मॅकार्थी याचा पराभव होऊन तो मारला गेला. याच दिवशीं ओसाई टुटु क्वामिनाहि मरण पावला. ओसाई ओकोटो या नव्या राजाचा डोडोवा येथें १८२६ त पराभव होऊन अशांटीची किनाऱ्याजवळील जातींवरची सत्ता डळमळीत झाली व प्रा नदीचे दक्षिणेकडील सर्व जाती ब्रिटिश संरक्षणाखालीं घेण्यांत आल्या. पहिल्या क्वाकु डुआच अमदानींत (इ. स. १८६३) पुन्हां ब्रिटिश व अशांटी यांमध्यें लढाई उपस्थित झाली. त्यांत अशांटीला दोन महत्त्वाचे विजय मिळाल्यामुळें त्यांची मान्यता फारच वाढली. नवीन राजा कोफी कारीकारी यानें तर राज्यावर येतांच आपलें लढाईचें धोरण जाहीर केलें. १८७३–७४ च्या युद्धाचें कारण ब्रिटिशांनीं एलमिनाचा किल्ला डचांपासून आपल्या कबज्यांत घेतला व अशान्टीनें ४ यूरोपियन तुरुंगांत टाकले हें होय. एलमिना येथील लोकांनीं अशांटीचा राजा आपल्या प्रभुप्रमाणें मानी. अर्थातच हें कृत्य त्याला आवडलें नाहीं. अशांटी सैन्यानें प्रा नदी ओलांडून ब्रिटिश मुलुखावर हल्ला केला. परंतु सर गारनट वूल्सले याची कुमासीवर चाल करून जाण्याची तयारी दिसतांच ते मागें पाय घेऊं लागले व व्यवस्थितपणें कुमासी येथें येऊन पोंचले. सर गारनट याच्या सैन्यानेंहि दरकूच दरमजल करीत कुमासींत प्रवेश केला. गारनेटचे मागून कप्तान ग्लाव्हर हाहि येऊन पोंचला. तेव्हां कोफी कारीकारी याला तहाचें निशाण उभारून अपमानास्पद तह करणें भाग पडलें.

लढाईनंतर लवकरच कोफी कारीकारी याला लोकांनीं पदच्युत करून त्याचा भाऊ मेन्सा याला गादीवर बसविलें. हा राजा अतिशय जुलमी निघाल्यामुळें राज्यक्रांति होऊन दुसरा क्वाकु डुआ हा राज्यावर आला पण तो लगेच मरण पावल्यामुळें प्रेंपे याला गादीवर बसविण्यांत आलें. कुमासीला ब्रिटिश रेसिडेंट ठेवण्याचें यानें नाकारल्यामुळें ब्रिटिशांनीं कुमासीवर स्वारी करण्याचें ठरविलें. १८९६ च्या जानेवारीच्या सतराव्या तारखेस ब्रिटिशांनीं कुमासी काबीज केलें व प्रेंपेला हद्दपार करण्यांत आलें. अशांटी मध्यें ब्रिटिश रेसिडेंट ठेवण्यात आला. इ. स. १९०० मध्यें कुमासीच्या सरदारांनीं बंडाचें निशाण उभारलें. कुमासी येथील रेसिडेंटला पळ काढावा लागला. परंतु कर्नल विलाक्स हा वेळेवर कुमक घेऊन आल्यामुळें कुमासीचा बचाव झाला व बंडवाल्यांचा मोड करण्यात आला.

१९०१ च्या सप्टेंबर महिन्याच्या २६ तारखेस अशांटी ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आला. गोल्ड कोस्टचा गव्हर्नर येथील राज्यकारभार पहात असून त्याला चार कमिशनर व तितकेच असिस्टंट कमिशनर यांची मदत असते. न्याय इनसाफाचे वेळीं देश्य कायदे पाळण्याबद्दल हुकूम आहेत.

१९०६ मध्यें अशांटी प्रोटेक्टोरेट व गोल्डकोस्ट हीं क्राऊन कॉलनी यांच्यामधील सरहद्दी, भौगोलिक परिस्थिति व लोकजाती या गोष्टी लक्षांत घेऊन ठरविण्यांत आल्या. राज्यकारभार व्यवस्थेकरितां अशांटीचे मध्य, दक्षिण पश्चिम, व उत्तर असे चार प्रांत पाडून प्रत्येकावर कमिशनर हा मुख्य अधिकारी नेमला. सर्वांवर चीफ कमिशनर हा अधिकारी असून तो अशांटीची राजधानी कुमासी येथें राहतो व तो गोल्डकोस्टच्या गव्हर्नरांच्या नियंत्रणाखालीं असतो. चीफ कमिशनरच्या मदतीला कुमासी चीफांचें कौन्सिल असतें. कुमासी सेकोंडी ही रेल्वेहि झाली आहे. या देशांतील जातींवर त्या त्या जातींतील चीफची सत्ता चालते. हे चीफ त्या त्या जातींतील लोकांनींच निवडलेले असतात. पण ही निवड वंशपरंपरागत राज्यकारभाराचा हक्क असलेल्या सरदारी घराण्यांतूनच करतात. वारसा हक्क स्त्रीयांना मिळण्याची चाल असल्यामुळें गा

मयत झाल्यावर त्याच्यामागून त्याच्या भावाला किंवा भाव. डीच्या मुलाला किंवा बहिणीच्या मुलाला अधिकार मिळतो, खुद्द मयत चीफच्या मुलाला कधींच मिळत नाहीं. मुख्य दिवाणी व फौजदारी दावे चालविण्याकरितां ज्युडिशियल कमिशनर हा न्यायाधीश १९२१ पासून नेमण्यांत आला आहे. पण कोर्टांत वकील वर्ग मुळींच नाहीं त्यामुळें न्याय मिळण्याचें काम फार खर्चाचें होतें, पण कज्जेदलाली फार वाढते, या कारणास्तव चीफांचा वकिलीच्या धंद्याला जोराचा विरोध आहे.

सन १९०० पासून १९१४ चें महायुद्ध सुरू होईपर्यंत अशांटीमध्यें अंतर्गत शांतता नांदून देशाची बरीच सुधारणा झाली. बासेल मिशननें चालविलेल्या शाळांच्या संख्येंत सरकारी शाळांची भर पडून शिक्षणप्रसार होऊं लागला व कोकोची लागवड बरीच वाढली. १९१४ च्या रिपोर्टांत अशांटीचे लोक पूर्ण राजनिष्ठ असल्याचें चीफकमिशनर फुल्लर यांनीं म्हटलें आहे, व महायुद्धकालींहि ती राजनिष्ठा कायम राहिली पण नवीन लष्करी शिक्षणपद्धति न रुचल्यामुळें सैन्यांत मात्र अशांटी लोक फारसे शिरले नाहींत. [ संदर्भ ग्रंथ—ए त्रि. लंडन येथून कलोनियल ऑफिस प्रसिद्ध करीत असलेले अशांटीसंबंधीं रिपोर्ट एलिस—ए हिस्टरी ऑफ दि गोल्ड कोस्ट ऑफ वेस्ट आफ्रिका. ब्रॅकनबरी—नॅरेटिव्ह ऑफ दि अशांटी वार स्टॅन्ले—कुमासी. फ्रीमन—ट्रॅव्हेल्स इन् अशांटी अँड जमन. स्टेट्समन ईयर बुक इ. ]

*अशीरगड*—( मध्यप्रांत, ) नेमाड, जिल्हा. जी आय. पी. रेल्वेवरील चांदणी स्टेशनच्या पश्चिमेस सात मैलांवर, व बऱ्हाणपूरच्या ईशान्येस १२ मैलांवर, आणि खांडव्याच्या नैऋत्येस २९ मैलांवर, व अक्षांश २१° २६' व पू. रेखांश ७६° २०' यांवर सातपुडा डोंगरांतील एका अलग टेकडीवर हा किल्ला आहे. चांदणीपासूनचा रस्ता सर्व जंगलांतून असून टेकडीच्या पायथ्याशीं काहीं शाखाचे मळे आहेत. येथील हवा आरोग्यकारक व सुखकर अशी आहे. अशीरगड हें ( १८२२ ) २००० लोकवस्तीचें गांव टेकडीच्या पश्चिमेस आहे. हा किल्ला सर्व बाजूंनीं ८० ते १२० फूट उंचीच्या एका कड्यावर असून त्यास फक्त दोन वाटा आहेत. किल्ल्यावर सुमारें ६० एकर क्षेत्रफळाची जमीन आहे. याला एकातएक असे तीन तट आहेत. प्रत्येक कोंपऱ्यावर बुरूज असून त्यावर तोफा असत सर्व बाजूंनी कडा एकसारखा उंच असून फक्त दोन ठिकाणीं तुटलेला आहे. मुख्य प्रवेशद्वाराजवळ जावयास पांचच दरवाज्यांतून वाकडें तिकडें जावें लागतें व हे सर्व दरवाजे एकमेकांच्या बाजूस असून खालपासून उंच चढे आहेत. हा किल्ला १८१९ मध्यें ब्रिटिशांनीं जिंकला त्या वेळेस काहीं ठिकाणच्या भिंती पडल्या होत्या. दुसऱ्या तटाचा काहीं भाग मुख्य दरवाज्यासमोर असून दक्षिणेच्या बाजूकडून अर्ध्या तटापर्यंत उत्तरेच्या बाजूकडे पसरला आहे आणि काहीं भाग पूर्वेच्या बाजूचें सातदरवाजा हें द्वार राखण्याकरितां आहे. तिसरा तट मुख्य दरवाजाच्या बाजूस असून त्यामुळें पश्चिमेच्या बाजूस अधिक बळकटी आलेली आहे. यांत पश्चिमेच्या बाजूस मुख्य दरवाजांतून व पूर्वेच्या बाजूस सात दरवाजांतून प्रवेश होतो. यावर जाण्यास अशीर गावांहून एक रस्ता जातो व मुख्य बऱ्हाणपूर रस्ता हा उत्तरेच्या बाजूनें वळणावळणांनीं मुख्य दरवाजाशींच येतो. किल्ल्यांत सहा टांकीं आहेत.

याचा प्रथम उल्लेख महाभारतांत अश्वत्थाम्यासंबंधानें येतो अशी टॉडची समजूत होती. दंतकथावरून खि पू १६०० वर्षापासून येथें क्षत्रिय राजे होते. यानंतर तुंतुरपाल या चौहान राजानें अशिरगड व गोवळकोंडें घेतल्याचा भाटाच्या गीतांत उल्लेख आहे ( टॉडचें राजस्थान ) ' यानंतरचें अशीरगडचे टांक' (रजपूत जात, असा चांदभाटाच्या गीतांत उल्लेख आढळतो. यानंतर हाडा घराण्याचा संस्थापक इष्टपाल यांचेकडे हा किल्ला गेला ( टॉडचें राजस्थान ) याच परतु हमीर आणि गर्भीर हे पृथ्वीराजाचे मांडलिक होते हा किल्ला आसा अहीर यानें बांधला व इ स. १३७० पर्यंत तो त्याच्या ताब्यांत होता असें फेरिस्तानें म्हटलें आहे पण तें संभवनीय दिसत नाहीं. तेराव्या शतकाच्या अखेरीस अल्लाउद्दीन खिलजी यानें हा घेऊन एकाशिवाय सर्व हाडा घराण्याची कत्तल केली. नंतर तो पुन्हा हिंदूंच्या हातांत गेला होता तो चवदाव्या शतकाच्या अखेरीस नासिरखान फरूकि यानें कपटानें घेतला. याच घराण्यांतील पांचवा राजा आदिलखान ( पहिला—१४५७—१५०३ ) यानें तिसरा तट मालइगड बांधला. अकबरानें अकरा महिने वेढा देऊन हा मोठ्या मुष्किलीनें घेतला (१६००) असें इलियट म्हणतो. या वेढ्याबद्दल मुख्य दरवाजाजवळ शिलालेख आहे ( १००९ हि १६०० इसवी ) अवरंगजेबाचे वेळची एक तोफ व एक शिलालेख आहे. निजाम उलमुल्क यानें हा १७२० मध्यें लांच देऊन घेतला (इलियट) मराठ्यांच्या इतिहासांतहि अशीरगड हा उत्तरेच्या मार्गांतील नाक्यावर असल्यामुळें फार महत्त्वाचा होता. हा घेतल्याबद्दलचा प्रथम उल्लेख बाळाजी बाजीराव यानें गोविंद बल्लाळास ता. १४ फेब्रुवारी १७६० रोजीं पाठविलेल्या पत्रांत ' इकडील मोंगल मारल्या दाखल करून पंचेचाळिसाची जागीर, बऱ्हाणपूर, "अशीर" दौलताबाद घेतली" असा आढळतो ( रा. खं. १. १६४. २५४). त्याच सुमारास बापूराव बुंदेले गोविंदपंतास निजामानें अशेरी व दवलताबाद हे दोन किल्ले दिल्याचें लिहितो ( १५ फेब्रु १७६० ) रा खं. १. १६५. २५७ ) व सदाशिवरावभाऊ शाचरायाचें पत्र गोविंदपंतास लिहितो ( १९।२।१७६०. पत्र १६६). तसेंच दिल्लीचा बादशहा शाहुराजास चौथाई घेऊन

बाकी ऐवज किस्तीप्रमाणें द्यावा असें लिहून महालाची यादी देतो. स्थान प्रा जुन्नर तर्फा १३ तालुके दिले आहेत त्यां मध्ये अशेरी अशीरगड एक आहे (रा. खं ८. ७८ १०५.) यानंतर १६९७ फाल्गुन शु॥ ८ च्या पत्रांत "मायीन भंग हरि बल्लाळास सामील झाले असून नगर व अशेरी दोन किल्ले मागतात," हरि बल्लाळ लढाई मारल्याखेरीज देण्याचें कबूल करीत नाहींत इत्यादि बारभाईकडील वर्तमान राघोबाकडून लक्ष्मण अप्पाजी गोसावी यास लिहिलें आहे (रा ख १२१३३ ८४.) एवंच इ. स १७६० मध्यें हा पेशव्याच्या ताब्यांत आला व नंतर अठरा वर्षांनी तो महादजी शिंदास मिळाला (ग्रँटडफ) इ स. १८०३ मध्यें असईच्या लढाईनंतर हा ब्रिटिशांनीं घेतला परंतु तद्दानंतर व तो पुन्हा शिंदास मिळाला. नतर १८१९ मध्यें हा ब्रिटिशांनीं पुन्हा घेतला

यांत शहाजहानच्या वेळची एक मशीद, एक मोठी तोफ व कांहीं शिलालेख आहेत. एक शिलालेख मशीद बांधल्याच्या वेळचा, मोठ्या दारायाजवळ आहे औरंगजेबास हा किल्ला मिळाल्याचा एक (१६६०) व दुसरा नैर्ऋत्येकडील बुरुजावरील मोठ्या तोफेवर आहे. (१६६३) एक लेख आलिशाह फरुकि (१५८९) याचा आहे. बऱ्हाणी पूरांत ओतलेली पंचरस धातूची येथें एक मोठी तोफ होती ती नागपुरांत सरकारगृहांत ठेवली आहे

**अशोक**—(खि पू ३७३–२३२) मौर्य वंशातील तिसरा राजा; चंद्रगुप्त मौर्याचा नातु ज्याच्यासंबंधीं आपणांस आज समकालीन अस्सल लेखावरून माहिती मिळू शकते असा हा हिंदुस्थानच्या इतिहासांतील पहिलाच राजा होय. हे अस्सल लेख म्हणजे अशोकाचे शिलालेख होत. त्याशिवाय बौद्ध वाङ्मय व सीलोन येथील बखरी यामध्यें याच्याविषयीं बरीच हकीगत सांपडते परंतु ग्रीक लोकांनीं याचें नाव सुद्धा उच्चारलेलें दिसत नाहीं किंवा प्राचीन ब्राह्मणवाङ्मयांत याचा कोठें उल्लेखहि आढळत नाहीं यूरोपीय विद्वानांनीं अशोकासंबंधीं शोध ज्या वेळीं चालविले होते त्यावेळीं सीलोन बखरीच त्यांना उपयोगी पडल्या सीलोन येथील पुस्तकाच्या मदतीशिवाय शिलालेखांतील पियदस्सी राजा व इतिहासांतला अशोक या दोनहि एकच व्यक्ती होत्या हा शोध कधींहि लागला नसता, असें ऱ्हीस डेव्हिड्सला वाटत होतें परंतु १९१५ सालीं रायचूरजवळ निजामाच्या राज्यांत मस्की गावीं हुट्टी येथील पुरातन सोन्याच्या खाणीच्या आसमंतातील प्रदेशांत सांपडलेल्या शिलाशासनलेखांत इतरत्र कोठेंहि नसलेलें अशोकाचें नाव आढळून येऊन त्यानें मागील शोधास अगदीं आकस्मिक रीतीनें पुष्टि मिळली आहे जेम्स प्रिन्सेप या विद्वानानें हे शिलालेख वाचून त्यावरून त्यानें हा शोध लाविला, व त्याच्या मदतीनें आतां शिलालेखांचा अर्थ आपणास चांगला लावितां येतो. सीलोन येथील बखरी ऐतिहासिक दृष्ट्या तितक्या निर्दोष नाहींत ही गोष्ट जरी खरी आहे, तथापि त्या टाकून केवळ शिलालेखावर अवलंबून राहून याबद्दल माहिती मिळवावी असें म्हणणेंहि वाजवी नाहीं. कारण शिलालेखांत सुद्धा त्याच्या परीनें दोष आहेतच. तेव्हां उत्तरकालीं लिहिलेल्या हकीकती वाचल्याशिवाय शिलालेखावर योग्य तो प्रकाश पडणें अशक्य आहे असें ऱ्हीस डेव्हिड्स म्हणतो

अशोकाची माहिती सुसंगत तऱ्हेनें दिलेली अशी चार ठिकाणीं सांपडते (१) नेपाळ मधला बौद्ध संस्कृत भाषेंत लिहिलेला, "अशोक अवदान" नावाचा ग्रंथ (२) ब्रह्मदेशांत असलेलें पाली भाषेंतील दीपवंश नांवाचें पुस्तक, (३) विनयावरील टीकेंत बुद्धघोषानें दिलेली हकीकत व (४) सीलोनमधील पालींत असलेलें महावंशाचें पुस्तक.

या हकीकतींची ऐतिहासिक रीतीची तुलना ऱ्हीस डेव्हिड्स या पंडितानें रॉयल एशियाटिक सोसायटीच्या नियतकालिकांत एका ठिकाणीं (१९०१ सालचा अंक पृ. ३९७–४१०) दिली आहे ऐतिहासिक दृष्टीनें तुलना करण्यास या लेखकाच्या काव्यमय प्रयांतूनहि बऱ्याच गोष्टी गोळा करता येतात

**अशोकाचे शिलालेख**—तथापि त्याच्या प्राचीनतमतेमुळें अशोकाचे शिलालेख हेच हिंदुस्थानच्या इतिहासाच्या अभ्यासकास अत्यंत महत्त्वाचे आहेत व्हिन्सेंट ए स्मिथनें या लेखाचें सेनार्ट व एफ डब्ल्यू थॉमस यांच्या मतांशीं शक्य तोंपर्यंत विरोध न होऊं देता पुढें दिल्याप्रमाणें कालानुक्रमानें वर्गीकरण केलें आहे :—

शासन लेख

| | |
|---|---|
| दोन (किंवा तीन) दुय्यम शिलाशासन लेख | ... खि पू २५७ |
| भाब्रू शासनलेख .. . | .. अजमासें याच काळांतील |
| चौदा शिलाशासनलेख ... | खि पू २५७—२५६ |
| कलिंग शासनलेख . ... | ,, २५६ किंवा २५५ |
| सात स्तंभलेख ... .. | ... ,, २४३ व २४२ |
| चार दुय्यम स्तंभलेख ... | ... ,, २४१ व २३२ |

२ किरकोळ अंकित लेख.

| | |
|---|---|
| अशोकाचीं लेण्याचीं दानें ... | खि. पू २५७ व २५० |
| तराईचे स्मरणतिथिविषयक अंकित लेख | ... ,, २४९ |
| दशरथाची लेण्याचा दानें ... | ...,, २३२ ? |

**दुय्यम शिलाशासनलेख**—पहिल्या व महत्त्वाच्या वर्गांत पहिल्या दुय्यम शिलाशासनलेखाचे दोन पाठ वेगवेगळे धरल्यास एकूण ३१ दस्तऐवज आहेत, व दुसऱ्या वर्गांत दशरथाच्या अंकित लेखाचा त्याचें मजकुराच्या व परिस्थितीच्या बाबतींत अशोकाच्या लेखाशीं साम्य असल्यामुळें अंतर्भाव केल्यास एकूण ३५ दस्तऐवज होतात

पहिल्या दुय्यम शिलाशासनलेखांत अशोकाची मतांतरासंबंधीं कबुली आहे. याच्या उत्तर हिंदुस्थानांत तीन प्रती सांपडल्या असून, त्यांपैकीं एक जबलपूर जिल्ह्यांत रूपनाथ येथें (इ. आय. आर वरील स्लीमनाबाद रोड स्टेशनच्या १४ मैल पश्चिमेस), दुसरी शहाबाद ( दक्षिण बहार ) जिल्ह्यांत सहस्राम येथें, व तिसरी राजपुतान्यांतील जयपूर संस्थानांत बैराट येथें कोरविलेली आहे. या प्रतींपेक्षां किंचित निराळ्या अशा तीन प्रती दक्षिण हिंदुस्थानांत म्हैसूर संस्थानाच्या उत्तर भागांतील चित्रदुर्ग जिल्ह्यांत एकमेकांच्या जवळजवळच ब्रह्मगिरि, सिद्धपूर व जतिंग रामेश्वर येथें सांपडल्या आहेत. दुसरा दुय्यम शिलाशासनलेख लहान व पहिल्यास पुरवणीदाखल असून त्याची भाषाशैली इतराहून निराळी आहे. हा लेख दक्षिणच्या सुभेदारीवर असलेल्या राजपुत्रानें सुवर्णगिरि येथें रचून प्रसिद्ध केला असावा, असा अंदाज करण्यांत आला आहे.

भाब्रूचा शासनलेख.—हा पूर्वी राजपुतान्यांतील उपर्युक्त बैराट गांवाजवळ एका बौद्ध मठाच्या आवारांत शिळेवर होता; परंतु सुरक्षित रहावा म्हणून हल्लीं तो कलकत्त्यास नेऊन ठेविलेला आहे. याच विशेष म्हटला म्हणजे यांत प्रियदर्शी राजानें बुद्धाच्या धर्माबद्दल व संप्रदायाबद्दल आपला आदर व्यक्त केला असून त्यानें धर्मग्रंथांतील जीं वचनें उद्धृत केलीं आहेत त्यांपैकीं पांच उपलब्ध बौद्ध सात वाङ्मयांत असल्याचें दाखवून देण्यांत आलें आहे.

चौदा शिलाशासनलेख:—हा अशोकाच्या अंकित लेखांपैकीं अतिशय महत्त्वाचा वर्ग असून त्यांत अशोकानें आपल्या तत्त्वाची व वास्तविक आचाराची सविस्तर हकीकत दिली आहे.

या चौदा शासनलेखांपैकीं पहिला अहिंसेवर, दुसरा अशोकाच्या धार्मिक कृत्यावर, तिसरा अधिकाऱ्यांच्या पंचवार्षिक फिरतीवर, चौथा धर्माचरणावर, पांचवा धर्ममहामात्यावर, सहावा कामाच्या तरतुदीवर, सातवा धार्मिक गुणावर आठवा धर्मयात्रांवर, नववा मंगल समारंभांवर, दहावा यश व कीर्ति यावर, अकरावा धर्मदानावर, बारावा परमतसहिष्णुतेवर व तेरावा धर्मविजयावर असून चौदावा उपसंहारात्मक आहे.

या लेखाच्या प्रती उत्तरेस पेशावरापासून दक्षिणेस म्हैसूरपर्यंत व पश्चिमेस काठेवाडपासून पूर्वेस ओरिसापर्यंत व हिंदुस्थानच्या सर्व भागांत सांपडल्या आहेत, व आणखीहि सांपडण्याचा संभव आहे पाटलीपुत्रापासून हजार मैलाहूनहि अधिक अंतरावर देखील बारावा खेरीज करून हे सर्व शासनलेख एका टेकडीवरील प्रचंड काळवधरी ( ट्रॅप ) शिळेच्या पूर्वपश्चिम भागावर २४ फूट लांब व १० फूट रुंद एवढ्या ऐसपैस जागेंत कोरविलेले आढळतात, परमतसहिष्णुतेवरील बारावा शासनलेख हा थोडक्याच वर्षांपूर्वी मुख्य शिलालेखापासून ५० यार्ड अंतरावर एका स्वतंत्र शिळेवर कोरलेला आढळून आला. हजारा जिल्ह्यांत मान्सेरा ( अबटाबादच्या उत्तरेस सुमारें १५ मैल ) येथें जी प्रत आहे तींतहि बाराव्या शासनलेखास स्वतंत्र स्थान दिलें आहे या शासनलेखाचा सर्वांत उत्तम पाठ डेराडून जिल्ह्यांत खालसी ( सहारानपूरहून चकरता जाणाऱ्या सडकेवर, मसूरीच्या १५ मैल पश्चिमेस )[येथ] १८६० सालीं सांपडला तो आहे. या व अगदीं वायव्य भागांतल्या खेरीज सर्वच शिलालेखांत जिच्यापासून देवनागरी वगैरे हिंदुस्थानांतील लिपी निघाल्या ती डावीकडून उजवीकडे लिहिली जाणारी ब्राह्मी लिपि वापरलेली आहे शहाबाजगढीच्या लेखाची लिपि मात्र याच्याहून भिन्न, इराणांत जन्म पावलेली, उजवीकडून डावीकडे लिहिली जाणारी अशी आहे ठाणें जिल्ह्यांतील सोपारा ( मुंबईच्या उत्तरेस ) येथील व काठेवाडांतील गिरनार येथील शिलालेख हे या शासनलेखाचे पश्चिमेकडील पाठ दर्शवितात सोपारा येथें आठव्या शासनलेखाचे थोडके शब्द असलेला तुकडाच फक्त हातीं लागला आहे गिरनारच्या लेखाचा विशेष म्हणजे अर्वाचीन पंडितांचें लक्ष वेधून घेणारा तोच पहिला असून त्याचें वर्णन कर्नल टॉड यानें १८२२ मध्यें प्रथम केलें आहे. तो गिरनार व इतर टेकड्यांच्या दरम्यान एक प्रचंड वज्रतुंड ( ग्रॅनाइट ) जातीच्या शिळेवर कोरलेला असून ही शिला प्राचीन काळीं सुदर्शन नामक एका मानवनिर्मित तळ्याच्या कांठीं होती. हें तळें अशोकाचा आजा चंद्रगुप्त याच्याच हुकुमावरून बांधलें गेलें असून अशोकाच्या काळीं त्यांत सुधारणा करण्यांत आली होती. याच शिळेच्या दुसऱ्या भागावर एक उत्तरकालीन ( इ. स. ४५५ ) लेख असून त्यांत या तळ्याचें धरण फुटल्याचें नमूद केलें आहे. ओरिसांत धौली येथें व गंजाम जिल्ह्यांत जौगड येथें असलेले शिलालेख या शासनलेखाचे पूर्वेकडील पाठ होत.

कलिंग शासन लेख:—हे दोन असून ते ओरिसांतील धौली ( पुरी जिल्ह्यांतील भुवनेश्वरच्या दक्षिणेस ७ मैल ) येथील व गंजम जिल्ह्यांतील जौगड येथील शिलालेखांतील पाठांत ११ व्या, १२ व्या व १३ व्या शासनलेखाच्या जागीं आले आहेत, त्यांत अशोकानें आपल्या अधिकाऱ्यांस या नवीन जिंकलेल्या प्रदेशांतील रानटी लोकांचा स्वतः वर विश्वास बसवून घेण्याविषयीं व राजा आपले लेकराप्रमाणें पालन करील अशी त्यांची खात्री पटवून देण्याविषयीं आज्ञा केली आहे. यांपैकीं एक वर्षांतून तीनदां, व दुसरा दर महिन्यास ठराविक दिवशीं, लोकांना वाचून दाखवावयाचा होता.

सात स्तंभलेख.—यांत अशोकानें आपल्या मागील कृत्यांचें समालोचन केलें आहे. पहिल्यांत व दुसऱ्यांत त्यानें आपली धर्माच्या ठायीं आसक्ति व्यक्त केली आहे. आत्मपरीक्षण हा तिसऱ्याचा विषय आहे. चौथ्यांत त्यानें आपल्या अधिकाऱ्यांचीं ( राजुकांचीं )कर्तव्यें व अधिकार

नमूद केले आहेत. पाचव्यांत प्राण्यांच्या हिंसेला मर्यादा घालण्याविषयीं नियम आहेत. सहाव्यात ज्यानें त्यानें आपल्या धर्माप्रमाणे वागावें, माझी स्वतःची इच्छा जेणेंकरून मनुष्यमात्राच्या सुखाची अभिवृद्धि होईल तें करावें अशी आहे, असें सांगितलें आहे. सातवा स्तंभलेख सर्वांत मोठा व महत्वाचा असून त्यात अशोकानें *धम्माच्या प्रसारासाठीं काय काय उपाय योजिले त्याचें परीक्षण* केलें आहे. पण यात अशोकानें परदेशीं पाठविलेल्या उपदेशकमंडळाचा उल्लेख कोठें आलेला नाहीं. अशोकाचे एकंदर दहा कोरांवलेले स्तंभ उपलब्ध झाले आहेत; पण *सातवें सातांहि स्तंभलेख,* जो तोपऱ्याहून दिल्लीस आणला त्या दिल्ली–तोपरा स्तंभावरच पूर्ण शाबूत सापडले आहेत. दिल्लीमिरत स्तंभावर १–६ लेख छिन्नविच्छिन्न स्थितींत आहेत. अलाहाबाद स्तंभावर लेख असून शिवाय राणीचा व कौशाम्बीचा लेख आहे, पण ते सर्व *अपूर्ण स्थितींत आहेत.* चंपारण्यांतील लौरिया–अरराज व लौरिया–नंदनगड स्तंभावर पहिले सहा लेख बहुतेक चांगले शाबूत आहेत. चंपारण्यांतील रामपुर्व्याच्या पडलेल्या स्तंभावरहि हेच लेख उत्तम स्थितींत आहेत. सांचीच्या स्तंभावर दुय्यम स्तंभलेखाचे कांहीं कांहीं भाग आहेत. सारनाथच्या लेखांत तेच लेख पण अधिक पूर्णावस्थेंत आहेत. याशिवाय रुम्मिनदेई व निग्लिव येथें दोन स्मरणतिथिविषयक स्तंभ आहेत. अशोकाचे स्तंभ याहूनहि अधिक सापडण्याचा संभव आहे. ह्युएनत्संग यानें १६ स्तंभाचा उल्लेख केला असून आपणास ठाऊक असलेल्या स्तंभापैकीं फक्त दोघांचाच त्याच्या स्तंभाशीं खात्रीपूर्वक मेळ घालता येतो.

दुय्यम स्तंभलेखः—हे चार आहेत. सारनाथच्या शासनलेखांत बौद्धसंप्रदायांतील वाढत्या पंथभेदाचा धिक्कार केलेला आहे. कौशाम्बी व सांची येथील शासनलेखाचाहि विषय तोच आहे. बौद्ध संप्रदाय चिरकाल टिकावा अशी आपली स्वतःची इच्छा त्यात अशोकानें व्यक्त केली आहे. चौथा लेख राणीसंबंधी असून त्यात दुसऱ्या राणीचीं दानें *तिच्याच नांवावर चालावीं अशी आज्ञा आहे.*

स्मरणातिथिलेख.—तराईतील या लेखापैकीं रुम्मिनदेयी स्तंभावरील लेखांत अशोक बुद्धजन्मस्थानाच्या दर्शनास आला त्याबद्दल माहिती असून *निग्लिव स्तंभावरील लेखांत म्हटलें आहे कीं अशोकानें आपल्या राज्याभिषेका*नंतर १४ वर्षांनीं कोनकमन ( बुद्धाचा एक पूर्वीचा अवतार ) बुद्धाच्या स्तूपाचा दुसऱ्यादा जीर्णोद्धार केला, व त्यानंतर सहा वर्षांनीं त्यानें स्वतः दर्शनास येऊन तेथें स्तंभ उभारला. हा स्तूप कोणता याचा अद्याप पत्ता लागलेला नाहीं.

अशोकाचीं व दशरथाचीं लेण्यांचीं दानें.—अशोकाच्या लेण्यांच्या दानासंबंधीं लेख तीन असून त्यांत बराबर डोंगरांतील तीन लेण्याचें आजीविकास यावच्चंद्रदिवाकरौ दान केलें असल्याचें नमूद केलें आहे. नागार्जुनाचा लेख अशोकाचा नसून त्यात अशोकामागून राज्यारूढ झालेल्या दशरथानें आपल्या राज्याभिषेकानंतर लागलीच तीन लेणीं आजीविकांना राहण्यासाठीं दान केल्याचा उल्लेख आहे.

*अशोकाचें चरित्र.*—वरील शिलालेखांतील माहितीस *बौद्ध ग्रंथांतल्या माहितीची जोड देऊन अशोकाचें* चरित्र लिहिता येतें. अशोकानें आपल्या शिलालेखात स्वतःची खाजगी माहिती जवळ जवळ मुळींच दिलेली नसल्यामुळें *तिच्यासाठीं आपणांस* बौद्धग्रंथांतील दंतकथात्मक *माहितीवरच विसंबून रहावें लागतें. या साधनांवरून* अशोकाच्या कारकीर्दीतील ज्या प्रसंगावर प्रकाश पडतो ते थोडक्यात पुढें दिल्याप्रमाणें आहेत. त्याच्या बापाचें नांव *बिंदुसार असून त्याची आई चंपा येथील* कोण्या ब्राह्मणाची कन्या होती असें म्हणतात. बापाच्या हयातींत प्रथम तो तक्षशिलेचा व नंतर उज्जनीचा सुभेदार होता. उज्जनीला असतांना त्यानें वेदिस ( विदिशा ? ) येथील एका वैश्य स्त्रीशीं लग्न *लाविलें असून तिच्यापासून* त्यास ( ज्यांना दुसरे त्याचा बंधु व भगिनी म्हणतात तीं ) महिंद्र व संघमित्रा हीं दोन अपत्यें झालीं असें सर्व सिलोनी ग्रंथ म्हणतात. अशोकानें या आपल्या वैश्य पत्नीस उज्जनी सोडतांना मागेंच ठेविलें होतें. बापाच्या मरणानंतर ख्रि. पू. २७३ ( कांहींच्या मतें २७२ ) मध्यें त्यानें तक्षशिलेच्या सुभेदारीवर असलेल्या आपल्या वडील भावाशीं युद्ध करून बापाची गादी बळकाविली. ख्रि. पू. २६९ सालीं त्याला राज्याभिषेक झाला. ख्रि. पू. २६१ मध्यें त्यानें कलिंग देश काबीज केला. या *युद्धांतील संहाराचा त्याच्या मनावर परिणाम* होऊन त्याचा *बुद्धधम्माकडे कल झाला.* इ. स. २५९ मध्यें त्यानें मृगया करणें सोडून दिलें, व ठिकठिकाणीं उपदेशक मंडळें पाठविलीं. २५७ व २५६ सालीं त्यानें चौदा शिलाशासन लेख व *कलिंगाचा लेख प्रसिद्ध केला, व* धर्ममहामात्र ( त्य ? ) नेमिले. २५४ मध्यें त्यानें कोनागमनचा स्तूप दुसऱ्यांदा वाढविला. २५१ किंवा २५० सालीं महेंद्राचें उपदेशकमंडळ सिलोनला गेलें. २४९ सालीं त्यानें बुद्धसंप्रदायाच्या पवित्र क्षेत्राची यात्रा केली. २४३ सालीं स्तंभलेख प्रसिद्ध केले. २४० व २३२ यांच्या दरम्यान पाटलीपुत्राची धम्मसभा झाली व अशोकानें दुय्यम स्तंभलेख प्रसिद्ध केले आणि २३२सालीं *तो मरण पावून त्याचा एक नातू दशरथ हा पूर्वेकडील* प्रांताचा व बहुधा संप्रति हा पश्चिमेकडील प्रांताचा राजा झाला.

अशोकाला चार राण्या होत्या असें अनुमान काढण्यांत *आलेलें आहे; पण त्याच्या शिलालेखावरून* जें कांहीं नक्की समजतें तें एवढेंच कीं, करुवाकि घराण्यांतली त्याची दुसरी राणी ही त्याची आवडती असून 'तीवर' हा तिचा पुत्र होता. तीवर हा *बापापूर्वींच मरण पावलेला दिसतो.*

अशोकाच्या कारकीर्दीचें सविस्तर विवेचन इतर ठिकाणीं ( बुद्धोत्तर जग, पृ. २४४ ) आलें असल्यामुळें तें येथें

देण्याची आवश्यकता नाहीं. अशोकाच्या इतिहासाचीं अस्सल साधनें जे त्याचे शिलालेख त्यांत त्याच्या कारकीर्दीतील राजकीय गोष्टींपेक्षा त्याच्या धम्मविषयक कल्पनांचीच माहिती जास्त आली आहे तेव्हां या शिलालेखावरून त्याच्या धम्माची शक्य तितकी स्पष्ट कल्पना आपण करून घेतली पाहिजे

**अशोकाचा धम्म.**—अशोकाच्या शिलालेखावरून जर कशासंबंधीं सविस्तर माहिती मिळत असेल तर ती त्याच्या धम्मासंबंधीं होय धम्मशब्दाचा अर्थ, सद्भावनेच्या मनुष्याला करण्यास योग्य असें आचरण; किंवा सामान्य बुद्धीच्या माणसाला जें स्वाभाविक वाटेल असलें आचरण याचे प्रवर्तक भिक्षू लोक होत. त्यानाच लोकहि या बाबतींत गुरुस्थानी मानीत, व धम्म हा शब्द ज्याला आपण आज बौद्ध समजतों, त्याच्या प्रांतासाठी रूढ होता आचारात्मक यज्ञयागादि कर्मे, किंवा, देवतायजनात्मक कर्मे या गोष्टींशी, अर्थात् बुद्धमर्तानुयायाचा मुळींच संबंध नव्हता त्याच्या मतें धम्माच्या पायऱ्या तीनः— उपासक, परिव्राजक व अर्हत्पदाकडे जाऊं इच्छिणारे लोक या तीन तऱ्हेच्या लोकांकरिता तीन प्रकारचा धम्म. पैकीं, उपासकाच्या करिता म्हणून असणारा—उपासकाच्या अधिकाराप्रमाणें त्याना बरा वाटणारा—जो धम्म त्याचाच प्रसार अशोकानें सर्वत्र केला अशोकाचा धम्म याचें ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्व फार आहे, तेव्हा तो येथें समग्र देतों.

*शिलाशासनलेखः*—( १ ) *यज्ञाकरिता प्राणिहिंसा कोणीहि करूं नये.* ( २ ) *मोठमोठ्या ठिकाणीं होणारे जलसे व मेजवान्या यांत हत्या होत असल्यानें हीं करावयाचीं नाहींत.* ( ३ ) आईबापाशीं नम्रतेनें असणें चांगलें,( ४ ) स्नेही मित्र नातलग, ब्राह्मण, व भिक्षु याजबद्दल कृपणबुद्धि नसणें, (५) प्राणिहिंसा न करणें चांगलें. (६) वादविवादामध्यें व खर्चांमध्यें काटकसर होईल तेवढी करणें. (७) आत्मसंयम (८) चित्तशुद्धि. (९)कृतज्ञता. (१०) श्रद्धा ( ७–९)या सर्व गोष्टी ज्याला कांहीं देण्याचें सामर्थ्य नाहीं अशाला सुद्धा शक्य आहेत. व त्या त्यानें आचरणात आणाव्या (११) घरात मनुष्य आजारी असता, लग्नाच्या वेळेस, अपत्य जन्माच्या वेळेस, प्रवासास निघण्याच्या वेळेस, पुष्कळ लोक मंगल गोष्टी म्हणून समारंभ करितात, हे सर्व समारंभ शुष्क होत. खरा धर्म म्हणजे धम्म शब्दानें व्यक्त होणारा जो तोच होय. यामध्यें गुलाम नोकर इत्यादिकाशीं योग्य वर्तन गुरुजनाचा मान ठेवणें, ब्राह्मण व भिक्षु याशीं कृपणता न धरणें, ही सर्व येतात. व हाच धम्म होय. सर्व प्रसंगीं करण्याचा मंगल प्रसंग हाच होय. दानशूरता हा गुण होय असें लोक म्हणतात परंतु दुसऱ्याला धम्म शिकविणें, व शिकण्यांत मदत करणें याशिवाय दुसरी दानशूरता नाहीं. (१२) तितिक्षा, सहिष्णुता. कोणत्याहि पंथांतील मनुष्य असो, तो सामान्य माणूस असो, भिक्षु असो, सर्वांना सारखा मान द्यावा, स्वसंप्रदाय यशाला चढावा म्हणून कोणत्याहि संप्रदायाची निंदा करूं नये. वाणीचा संयम करणें, ही गोष्ट अत्यंत इष्ट होय.(१३.) धम्म चांगला, पण धम्म म्हणजे मनामध्यें मोह बिलकुल न ठेवणें, दुसऱ्याच्या कल्याणाच्या गोष्टी होतील तेवढ्या करणें, दया, उदारता, सत्याचरण व पावित्र्य याचा समावेश धम्मात होतो मनुष्याला स्वतःचीं सत्कृत्यें तेवढीं दिसतात, दुष्कृत्यें तेवढीं दिसत नाहींत तो मी एक अमुक चांगली गोष्ट केली असा उच्चार करून दाखवितो, पण एखादी विशिष्ट वाईट गोष्ट माझ्या हातून झाली असा उद्गार त्याच्या तोंडानें निघत नाहीं. अशा तऱ्हेनें आत्मपरीक्षण करिता येणें ही गोष्ट अत्यंत कठिण आहे याच्या विशिष्ट गोष्टीमुळें आपलें पावित्र्य भ्रष्ट होतें, पशुवृत्ति, निर्दयता, क्रोध व अहंकार या गोष्टी जोरावतात; तेव्हा सदर गोष्टी करूं नयेत ' असें म्हणून प्रत्येकानें स्वतःचें संयमन केलें पाहिजे.

हा धर्म जरी फारसा लोकांच्या आचरणात आलेला नव्हता, तरी ध्येय या नात्यानें सर्वमान्य झाला होता याबद्दल शंका नाहीं कारण सर्वमान्य गोष्टींबद्दल ज्या तऱ्हेची भाषा सामान्यतः वापरण्यात येते तसल्याच तऱ्हेचीं या धम्मासंबंधानें भाषा वापरलेली आहे यात वादविवाद किंवा दुसऱ्याच्या शंका खोडून काढण्याचा प्रयत्न कोठेहि दिसत नाहीं. अशोकानें धम्माचा प्रसार आपल्या साम्राज्याच्या कक्षेंतच केला असें नव्हे. तर खि. पू. २५५ च्या सुमारास कोरविलेल्या तेराव्या शिलालेखात सिरिया, इजिप्त, मॅसिडोनिया, एपायरस आणि सायरीनि ( कायरीनि ) याच्या राज्यात आपण धम्मप्रसार केला असें अशोकानें लिहिलें आहे. याशिवाय दक्षिण हिंदुस्थानात चोल व पाड्य याच्यातहि धम्माचा प्रसार झाला. मोग्गलीचा पुत्र तिस्स यानें, काश्मीर, गन्धार, हिमालय, सिंधुनदीच्या तीरावरील प्रदेश, ब्रह्मदेशाच्या किनाऱ्यावरचा प्रदेश, दक्षिणहिंदुस्थान व सीलोन येथें आपले धर्मप्रचारक पाठविले होते. त्याचीं नावें बखरकारानीं दिलीं आहेत बखरकाराच्या लेखांत यासंबंधीं सर्व नावें जशींच्या तशींच जेथल्या तेथें आलेलीं आढळतात. याचें एकच स्पष्टीकरण देता येणें शक्य आहे; व तें हेंच कीं, बौद्ध धम्माचा प्रसार करणारे लोक खरोखर हिमालयापर्यंत गेले असले पाहिजेत, व त्याच्या हकीकती सीलोनच्या बखरकारापर्यंत अविच्छिन्न परंपरेनें तोंडीं चालत आल्या असल्या पाहिजेत. या बखरींत अशोकानें संप्रदाय प्रसारार्थ मीसवर पाठविलेल्या मोहिमेचें वर्णन नाहीं.

**अशोकाचीं शिल्पकामें.**—ज्याबद्दल आपणास खात्रीलायक माहिती मिळते अशा अशोकविषयक दुसऱ्या गोष्टी म्हणजे अशोककालीन शिल्पकाम व नकशीकाम या होत. अशोकानें बांधलेल्या इमारतींपैकीं कोणतीहि इमारत जमिनीवर शाबूत अशी सापडत नाहीं ही गोष्ट खरी; परंतु

साची येथें जो शिलालेख सांपडला आहे, त्यावरून इतर काहीं विद्वानाप्रमाणें व्हीस डेव्हिड्सचेंहि असें मत होतें कीं, अशोकानें बोधगया येथें पहिलें देऊळ बांधिलें. सांचीचें जुनें नांव चेतियागिरि असें आहे. हें स्थळ अशोक उज्जनीला जाण्यापूर्वीच प्रसिद्धीस आलेलें असावें. या पर्वताच्या माथ्यावर अकरा स्तूप आहेत त्यांपैकीं कांहीं इ. स. १८२२ व कांहीं १८५१ त सांपडले. खणतीच्या दुसऱ्या खेपेस कांहीं लहान लहान स्तूपांत सारीपुत्त व मोग्गलान नांवाचे जे बुद्धाचे प्रमुख शिष्य होते त्यांची रक्षा सांपडली.

यांतील सर्वांत मोठा स्तूप कोणास उद्देशून बांधला गेला हें त्या स्तूपांतील अवशेषाची पेटी न सांपडल्यामुळें कळत नाहीं. तरी पण, अशोकाच्या काळांतील लिपींत लिहिलेले बरेच शिलालेख खांबावर व कटड्यावर सांपडतात. जनरल कनिंगह्यामच्या मतें, या पठारावरील इतर स्तूपांप्रमाणें हा स्तूपहि अशोकाच्या पूर्वीचा, व दरवाजे वगैरे अशोकानंतरचे असें असलें तरी यांतले बौद्ध धर्मावरचे कटडे वगैरे तरी अशोकाच्या वेळचे असले पाहिजेत, दरवाजे सुद्धा अशोकाच्या वेळचे नव्हतील असें नाहीं सांची येथील स्तूपाचा जो अवशेष आपणास उपलब्ध होतो त्याच्यावरून अशोकाच्या काळांतील इमारतीची कल्पना होऊं शकते असें व्हीस डेव्हिड्स म्हणतो आज बहुतेक सर्व स्तूप पडीतच आहेत, यांचें मूळरूप कसें असावें हें समजून घेण्याचाहि चांगलासा प्रयत्न कोणी केलेला दिसत नाहीं.

बोधगया येथें अशोकानें बांधलेल्या देवळांतील मुख्य सिंहासन तेवढें अशोकाच्या वेळचें आज कायम असावें असें वाटतें बाकीचा भाग ब्रिटिश सरकारच्या सुधारणेनें बदललेला आहे, जुन्या इमारती कायम ठेवतांना त्यांत डागडुजीच्या वेळीं फेरफार होणें साहजीक असतें.

अशोकानें बांधलेली इमारत आज जमिनीवर उभी नसली तरी पाटणाच्या दक्षिणेस कुम्रहार गांवाच्या खालीं जे प्राचीन अवशेष सांपडले आहेत त्यांवरून अशोकाच्या राजवाड्याची कांहींशी कल्पना करतां येते एकोणिसाव्या शतकाच्या शेवटल्या दशकाच्या आरंभीं कर्नल वाडेल यानें प्रथम उपयुक्त गांवाच्या हद्दींत अशोकाच्या स्तंभाचे कांहीं तुकडे खणून काढले. तेव्हां प्रश्न असा उद्भवला कीं, हे तुकडे एखाद्या राजवाड्याच्या खांबाचे तर नसतील? भूपृष्ठाखालीं असा एखादा राजवाडा सांपडण्याचा उघडउघड संभव दिसत असतांहि खणतीचें काम मोठ्या प्रमाणावर समाधानकारक रीतीनें करण्यास पुराणवस्तुखात्याजवळ पैसे नसल्यामुळें हा कुतूहलजनक शोध कित्येक दिवस लांबणीवर पडला शेवटीं मुंबईच्या रतन टाटा या पार्शी गृहस्थानें हिंदुस्थानांतील कोणत्याहि प्राचीन शहराच्या जागेची पद्धतशीर खणती करण्यासाठीं काळाची मर्यादा न घालतां सालीना २०,००० रुपयांची देणगी दिली, तेव्हां हें काम हातीं घेतां आलें. खणतीअंतीं खरोखरच असें आढळून आलें कीं, वाडेल यास सांपडलेले तुकडे एकट्या दुकट्या खांबाचे नसून तेथें नाट ओळींनीं उभे केलेले अखंड दगडी व घांसून चकचकीत केलेले कित्येक खांब होते. यांपैकीं कांहींचा पायापाशीं व्यास साडेतीन फूटपर्यंत असून उंची वीस फुट इतकी होती, व ते चुनार येथील वाळूच्या दगडाचे केलेले होते. अर्थात् हे अवशेष अशोकाच्या राजवाड्याच्या एखाद्या मध्य दिवाणखान्याचे असले पाहिजेत हें सिद्ध झालें. हे स्तंभ समांतर ओळींत असून प्रत्येक दोन ओळींत व दोन खांबांत अंतर १५ फूट होतें. इमारतीची रचना पूर्वपश्चिम होती. खणतीच्या पहिल्याच वर्षी आठ आठ स्तंभांच्या दहा ओळींची जागा निश्चित झाली होती, परंतु इमारत याहूनहि विस्तीर्ण असली पाहिजे असें अनुमान करण्यास सबळ पुरावा होता. या इमारतीची तक्तपोशी लाकडाची होती असें दिसून येत असून ती सध्या जमिनीखालीं १७ फूट गेलेली आहे. या तक्तपोशीवर आठदहा फूट जाडीचा मातीचा थर असून त्यावर राखेचा थर आहे. स्तंभाचे तुकडे सांपडतात ते याच वरील थरांत होत प्रत्येक स्तंभाच्या जागेवर मातींतून थेट तक्तपोशीच्या सपाटीपर्यंत गेलेला राखेचा लहानसा वर्तुळाकार खाच सांपडतो डॉ. स्पूनर यानें या गोष्टीचें असें स्पष्टीकरण दिलें आहे कीं, एकेकाळीं केव्हां तरी [त्याच्या मतें कदाचित् गुप्तकाळांत (इ स ३२०–४८०)] ही इमारत पुराखालीं बुडून गेली असावी हा पूर, आठ नऊ फूट गाळाचा थर जमिनीवर बसविण्याइतका दीर्घकालीन असावा हा गाळाचा थर बसत असतांना पुरानें पाया कच्चा होऊन एक स्तंभ उलटून पडलेला दिसतो, परंतु बाकीचे स्तंभ मात्र होते तसेच टिकून राहिले. पूर ओसरून गेल्यावर, वर आलेल्या सपाटीचीच तक्तपोशी करून कोणी तरी ती जागा वापरीत असल्याची चिन्हें दिसतात नंतर पांचव्या शतकाच्या सुमारास आग लागून जो कांहीं वाड्याचा भाग उरला होता तोहि नष्ट झाला. आगीनें इमारतीचें वरचें लाकडी बांधकाम जळून खाक झालें दगडी स्तंभावर साल वृक्षाच्या लाकडाच्या केलेल्या जड तुळ्यांमध्यें स्तंभशीर्ष न ठेवताच घातल्या असून त्या खालच्या स्तंभास कोणत्या तरी धातूच्या ( बहुधा तांब्याच्या ) जाड कांबींनीं मजबूत बसविलेल्या होत्या असें दिसतें. इमारतीस जेव्हां आग लागली तेव्हां तिच्या उष्णतेनें धातूच्या कांबींचें प्रसरण झालें व त्यामुळें दगडी स्तंभांचा वरील भाग विदीर्ण होऊन त्याचे शतशः तुकडे झाले, पण स्तंभांचा मातींत पुरलेला खालचा भाग सुरक्षित राहिला या आगीमुळें मूळच्या मातीच्या थरावर राखेचा थर बसला; व जेव्हां मातीच्या थराखालील लाकडी तक्तपोशी कुजून खालींखालीं जाऊं लागली तेव्हां तिच्या बरोबर दगडी स्तंभहि खालींखालीं जाऊन प्रत्येक स्तंभाबरोबर वरील राखेचा थरहि खालीं जाऊं लागला.

वरील अनुमानें अगदीं स्पष्ट आहेत तथापि पुराणवस्तु संशोधकास घोटाळ्यात पाडणारी गोष्ट म्हणजे स्तंभाच्या दिवाणखान्याच्या दक्षिणेस सांपडलेली साल वृक्षाच्या लाकडाचीं सात पीठें होत. प्रत्येक पीठ ३० फूट लांब, ६ फूट रुंद व साडेचार फूट उंच आहे व तीं सर्व पूर्वपश्चिम, एकमेकापासून निरनिराळ्या अंतरावर पण परस्पराना समांतर अशीं व आश्चर्य करण्याजोग्या शाबूत स्थितींत आहेत हीं पीठें काय होतीं याबद्दल निरनिराळ्या लोकाचे निरनिराळे तर्क आहेत स्थानिक लोकाचा तीं पीठें त्या मौर्य सम्राटाच्या खजीना ठेवण्याच्या पेट्या होत्या असा इतका दृढसमज होता कीं एक पीठ सबंध खोदून ही गोष्ट नाशाबीत करणें अत्यंत जरूर वाटलें त्याप्रमाणें एक पीठ फोडून पाहता तें सर्व भरींव आढळून आलें. डॉ. स्पूनरचा असा तर्क आहे की, यापैकीं प्रत्येक पीठ कदाचित अतिशय जड असलेल्या एक किंवा दोन दगडी स्तंभाचा पाया म्हणून असण्याचा संभव आहे.

वरील संशोधनानें पुराणवस्तुसंशोधकास आज अशोकाच्या राजवाड्याचा नकाशा बनविणें शक्य झालें असून या इमारतीचें पर्सेपोलीसच्या सुप्रसिद्ध शतस्तंभी दिवाणखान्याशीं अतिशय साम्य दिसतें. फार तर काय अवशेषामधील एका तुकड्यावर शिल्पकाराची जी एक विशिष्ट खूण आढळून आली आहे ती पर्सेपोलिसच्या शिल्पकाराच्या तसल्याच खुणेसारखी इतकी दिसते कीं अशोकानें आपला राजवाडा बांधण्यास पर्सेपोलिसचेच शिल्पकार आणले होते कीं काय अशी शंका उपस्थित करण्यात आली आहे.

अ शो क का ली न न क्षी का म —अशोककालीन कलेचा उच्च दर्जा त्या वेळचें जें नक्षीकाम उपलब्ध आहे. त्यावरून चांगला ठरविता येतो. दगडावर काम करणारा कारागीर जणूं काय लाकडावर व हस्तिदंतावर काम करणाऱ्या कारागिराचाच नमुना आपल्यापुढें ठेवून काम करीत होता कीं काय असें दिसतें कदाचित् अशोकाच्या आग्रहावरून लाकडावर काम करणाऱ्यापैकीं काहीं हुशार कारागिरांनींच दगडावर काम करण्याची संवय करून त्याचें नक्षीकाम करून दिलें असण्याचा संभव आहे. व्हिन्सेंट स्मिथच्या मतें अशोककालीन कलेवर इराणी व हेलेनिक कलाचा परिणाम झाला असला तरी तिचा आत्मा हिंदीच राहिला असून हातोटींतहि बदल झालेला नाहीं. एक सारनाथचा सुप्रसिद्ध *स्तंभशीर्ष जरी पाहिला तरी वरील विधानाच्या सत्यतेबद्दल खात्री झाल्याशिवाय राहणार नाहीं असें तो म्हणतो* ग्रीक *कलेचा ज्यानें बारकाईनें अभ्यास केला आहे असा सर जॉन मार्शल सारनाथच्या स्तंभावरील सिंहाची अतिशय तारीफ* करून म्हणतो कीं, *यात दिसून येणारा रेखीवपणा* व काटेसोरपणा कोणत्याहि प्राचीन राष्ट्राच्या कलेंत आढळून येणार नाहीं तत्कालीन पाथरवटाचें कौशल्य अगदीं अप्रतिम दिसतें. स्तंभशीर्ष वगळून चाळीस फूट उंचीचा दाणेदार वाळूच्या दगडाचा अखंड स्तंभ म्हणजे कारागिरीची कमालच म्हटली पाहिजे. दगडास घांसून गुळगुळीत करण्याचें कौशल्य आधुनिक कारागिरासहि साधणें शक्य नाहीं असें म्हणतात बराबर लेणीं अत्यंत कठिण अशा जंबूर (नीस) खडकात कोरविलेलीं असताहि त्याच्या भिंती कांचेसारख्या गुळगुळीत आहेत. तोपऱ्याहून दिल्लीस आणलेल्या फिरोजशहाच्या लाटेची जिल्हई इतकी उत्तम आहे कीं कित्येक प्रेक्षकांना तो धातूचाच स्तंभ वाटला आहे, अशीच सर्वांग परिपूर्णता लाकडी कामातहि होती असें डॉ. स्पूनर कुम्रहार येथें सापडलेल्या पीठावरील कामावरून म्हणतो. ( व्हिन्सेंट स्मिथला हीं पीठें चंद्रगुप्ताच्या काळाइतकीं जुनीं असण्याचा संभव वाटतो. )

[ सं द र्भ ग्रं थः—जे. एम. मॅकफायल–अशोक; स्मिथ, अशोक( रूलर्स ऑफ इंडिया ) दुसरी आवृत्ति १९०९;ऱ्हीस डेव्हिड्स–बुद्धिस्ट इंडिया; स्मिथ–एडिक्ट्स ऑफ अशोक, राइस, एडिक्ट्स ऑफ अशोक इन म्हैसूर;थॉमस,फेथ ऑफ अशोक(जैनिझम),कनिंग ह्याम–इन्स्क्रिप्शन्स ऑफ अशोक (कोर्पस् इन्स्क्रिप्शिओनम् इंडिकारम्,भाग १); वाडेल–डिस्कव्हरी ऑफ दि एक्झॅक्ट साइट ऑफ अशोकाज्क्लासिक कॅपिटल ऑफ पाटलिपुत्र; महाराष्ट्रीय ज्ञानकोश, बुद्धोत्तर जग; मनोरंजन जून १९२३ ( चौदा शिलाशासनलेख, कलिंग लेख व इतर तीन लेख याचें मराठी भाषांतर. ) ]

**अशोक**—हें झाड आंब्याच्या झाडाइतकेंच मोठें असतें. याचें लॅटिन नाव जोनेसिया अशोका असें आहे. याचीं पानें दिसण्यात आंब्याच्या पानापेक्षा थोडीं लांब व कुरळी असून भरदार व शोभिवंत असतात. या झाडाची छाया दाट असून तें सर्वकाळ हिरवेंगार असतें. त्यास लाल रंगाचीं मोठालीं फुलें येतात. हें झाड देवळाच्या आवारात किंवा बगीचात लावतात. अशोक वृक्ष फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. वाल्मीकि रामायणातील सुंदर कांडात ज्या अशोकवनात सीतेस रावणानें ठेविलें होतें त्या वनाचें फार हृदयंगम वर्णन केलें आहे. तसेंच कित्येक संस्कृत नाटकें, चंपू वगैरे ग्रंथात अशोक वृक्षाचीं वर्णनें आहेत. " पादाघातें अशोका तरुण युवतिच्या अंकुरोत्पत्ति झाली." अशा तऱ्हेच्या कल्पना कवी व्यक्त करीत ह्या वृक्षाचे नाना प्रकारचे औषधी उपयोगहि आहेत. विशेषकरून स्त्रीरोगावर अशोकाचा फार उपयोग असे असें वैद्यकग्रंथावरून दिसतें.

**अश्मक**(१)*या देशाचा महाभारतांत* ( भीष्म प. अ. ९) व बृहत्संहितेंत ( १४ २२ वगैरे ) उल्लेख आला आहे. अजंठा येथील शिलालेखांतहि या देशाचा उल्लेख आहे व त्याचा *' अस्सकनोह ' या अलेक्झांडरशी लढणाऱ्या लोकाशीं कर्न* संबंध जोडतो ( आर्कि. सर्व्हे. वेस्ट. इं. ४ पृ. १३१ ).

(२) (सूर्यवंशी) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मित्रसह राजा. ज्यास कल्माषपाद असें पुढें नाम प्राप्त झालें. त्याचा पुत्र. याची उत्पत्तीची कथा अशी आहे कीं, मित्रसहास ब्राह्मणीच्या शापामुळें स्त्रीसमागम करतां येईना आणि राज्यास तर अधिकारी पाहिजे म्हणून त्यानें आपल्या स्त्रीच्या क्षेत्रांत वसिष्ठ ऋषीकडून गर्भस्थापन करविला. तो गर्भ, सात वर्षे झालीं तथापि बाहेर येईना, म्हणून मदयन्तीनें अश्मा ( दगड ) घेऊन त्यानें उदरविदारण करून त्या गर्भास बाहेर काढिलें, तो जो पुत्र जन्मास आला त्यास हें नाव पडलें ( भाग. नवम. अ ९ ). या अश्मकानें मोठा झाल्यावर पौदन्य नांवाची पुरी स्थापिली. यास उत्तर नामक स्त्री असून तिजपासून झालेला मूलक नावाचा पुत्र होता त्यासच पुढें नारीकवच असें नांव पडलें होतें

(३) एक ब्राह्मण याचें जनक राजाशीं सुखदुःखनिवृत्ति कशानें होते, याविषयीं संभाषण झालें होतें ( भारत शांति अ. २८ ).

(४) दुर्योधनपक्षीय राजा. याला अभिमन्यूनें मारिलें होतें. ( भारत द्रोण पर्व अ. ३८ )

अश्मेद्य—(अस्मोदुस)ज्यू लोकांच्या कथापुराणांतून हा दैत्यांचा राजा म्हणून मानला जातो. कधीं कधीं बील झेबब किंवा अपोलिओन यांशीं अस्मोदुसचा संबंध जोडतात. तलमुदमधील सालोमनच्या कथेंत हा प्रामुख्यानें वावरतो. यहुद्यांच्या धर्मशास्त्रांतील टोबियससंबंधीं टॉबिट नावाच्या ग्रंथात ( ३ ८ ) याची अशी कथा आहे कीं, रागेलची सुंदर कन्या सारा हिच्यावर त्याचें अत्यंत प्रेम असून तिचे सात नवरे लग्नाच्या रात्रीच त्यानें एका मागून एक मारले शेवटीं टोबियसनें माशाचें हृदय आणि यकृत याचा धूप घालून या राक्षसाला इजिप्तला पळवून लाविलें. या कथेवरून त्याला वैवाहिक सुखात विघ्न घालणारा म्हणून मानण्यांत येतें. अवेस्तादि इराणी धर्मग्रंथात जो अएश्म राक्षस आला आहे तो हाच असावा अस्मोदुस मधील दुस हा शब्द दएव = देव याचा अपभ्रंश असला पाहिजे; व अएश्म पासून अस्मो हें ज्यू नांव बनणें अशक्य दिसत नाहीं.

झेंद अवेस्तांत जखम करणारा भाला धारण करणारा असें याचें आगमागीं वर्णन आढळतें ( ओर्मझ्द यश्त ३२; स्रोषयश्त-हाधोख्त, १५; फर्वर्दीनयश्त १३.८; अषि यश्त ५; आफ्रताद यश्त २; रम्याद यश्त ४६, ९५ इ. ) हा क्रोधाचा दैत्य असून याचा अहुरमझ्द नाश करितो असें म्हटलें आहे. वैदिक दैवतांत याच्याशीं सदृश अशी कोणती देवता आहे हें सांगता येत नाहीं. अश्मा हा शब्द भाला ( किंवा त्यासारखें आयुध) या अर्थी मात्र आला आहे ( ऋ १ १७२, २ ). तेव्हा देवगणांतील एखाद्या देवाला पर्शूंनी एक प्रमुख दैत्य बनवून त्याचा नाश करण्याचा उपदेश केला असेल. [ ज्यूइश एन्सायक्लोपीडिया, एन्सायक्लोपीडिया बिब्लिका. ए. ब्रि झेंद-अवेस्ता ( सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट ) ऋक्संहिता ]

अश्मा– ब्राह्मणांच्या और्ध्वदेहिक कर्मांत प्रायोगिक पद्धतीप्रमाणें प्रेतदहनानंतर घरीं येतांना श्मशानांतील एक दगड बरोबर आणून त्या दगडावर मृताच्या नातलगांनीं मृताच्या पहिल्या दिवसापासून दहा दिवसपर्यंत दररोज तिलांजलि द्यावयाची असते, त्या दगडास अश्मा असें नांव आहे.या तिलांजलि दानाचा सूत्रांत उल्लेख नाहीं. परंतु प्रेतदहनानंतर मृताच्या सर्व आप्तांनीं प्रथम अश्म्याला स्पर्श करावा व नंतर स्नान करून गृहांत प्रवेश करावा, तसेंच अस्थिसंचयनानंतरहि अश्म्याला स्पर्श करण्याबद्दल लिहिलें आहे,परंतु या अश्म्याचा प्रायोगिक अश्म्याशीं संबंध दिसत नाहीं सूत्रांतील अश्मा प्रेत समजला जात नाहीं प्रयोगग्रंथांतील अश्म्याची कल्पना ही मृताचा आत्मा दहा दिवसपर्यंत कोणत्या तरी वस्तूंत राहिलेला असतो,-या प्राचीन कल्पनेवरून आली असावी

अश्रुपात्रें—कांच किंवा भाजलेली तांबडी माती ( टेरा कोटा ) यांपासून केलेली एक प्रकारची भांडीं ही रोमन व ग्रीक थडग्यांतून सांपडलेली असून मृताकरितां शोक करणारीं माणसें त्यांत आपले अश्रु गाळीत असत असें म्हणतात त्यातून उटणीं ( सुगंधी द्रव्यें ) घालून ठेवलेलीं असत हीं कांहीं थडग्यातून सांपडतात, याचें कारण और्ध्वदेहिक संस्काराच्या वेळीं उटणीं वापरण्यांत येत असत. याचा आकार सुतानें भरलेल्या चातीसारखा किंवा बारिक व उंच मानेच्या आणि चंबूसारख्या शिशाप्रमाणें असतो ( ए. ब्रि )

अश्वगंधा—याला आस्कंद, अजगंध, ढोरगुंज अशींहि नावें आहेत हें झाड खानदेश,नाशिक,वऱ्हाड व घाटावर बहुतेक ठिकाणीं आढळतें यांची उंची सुमारें २ हात असून हें झाड ४।५ वर्षे राहतें याची पानें कोन्ड्याच्या पानासारखीं असून त्यापेक्षां मोठीं असतात खास गुंजेसारखीं लाल फळें येतात. व त्यांत रिंगणीच्या फळाप्रमाणें बी असतें. झाडाच्या मूळास आस्कंद म्हणतात तो फार पौष्टिक असतो

उपयोग—याचें ताजें वाळलेलें फळ औषधी आहे. परंतु सिंध, वायव्य सरहद्दीचे प्रांत, अफगाणिस्तान व बलुचिस्तान येथें दूध घट्ट करण्याकरितां रेनेट म्हणजे वासराच्या जठरांतील पाचक अम्लाच्याऐवजीं याचा उपयोग करतात व हाच त्याचा मुख्य उपयोग होय फळांतील विपाककारी द्रव्य मिठाच्या पाण्यांत ( १०० भाग पाण्यांत ५ भाग मीठ ) लवकर उतरतें व पाण्याचा उपयोग केल्यास दही लवकर दाट होतें आस्कंद ही एक महत्त्वाची औषधी आहे. तिचा उपयोग पुढील कामाकरितां होतो.

वीर्यवृद्धीवर.—आस्कंदाचें चूर्ण, तूप व मध विषम भागानें घेऊन सायंकाळीं खावें व त्यावर दूध प्यावें

गर्भाच्या पुष्टीकरितां —आस्कंदाचा काढा करून प्यावा म्हणजे गर्भाला पुष्टि मिळून मूल सशक्त निपजतें

शरीर निरोगी होण्यास.—आस्कंदाचें चूर्ण १ तोळा व गुळवेलीचें सत्त्व १ मासा मधात घ्यावें. याप्रमाणें आस्कंदाचे निरनिराळे उपयोग आहेत.

**अश्वघोष**—संस्कृत वाङ्मयातील एक मुख्य कवि, कालिदासाचा एक अत्यंत महत्त्वाचा पूर्वकालीन, व महाकाव्य नाट्यकाव्य व रसात्मक काव्य यांचा उत्पादक म्हणून अश्वघोष प्रसिद्ध आहे. परंतु त्याच्या जीवितक्रमाची आपल्याला फारशी माहिती नाहीं. तो कनिष्क ( सुमारें इ. स. १०० ) राजाशीं समकालीन व त्याशीं परिचित असा होता एवढ्या एकाच बाबतींत सर्व परंपराचें मतैक्य आहे. तो महायानी मताचा संस्थापक नसला तरी त्या संप्रदायातील प्रमुख ग्रंथकारात त्याची गणना केली पाहिजे. तो ब्राह्मण कुलोत्पन्न असून बौद्धधर्म स्वीकारण्यापूर्वी त्याला पूर्णपणें ब्राह्मणी शिक्षण मिळालें होतें यात संशय नाहीं. बौद्ध झाल्यानंतर तो प्रथम बहुधा सर्वास्तिवादी होता; परंतु बुद्ध भक्तीवर त्याचा विशेष जोर असे, व अशा प्रकारें त्यानें महायान पंथ तयार केला. साकेत ( अयोध्या ) हें त्याचें बहुधा जन्मस्थान असावें. परंतु काशी व पाटण यांचाहि त्याचें जन्मस्थान म्हणून उल्लेख केलेला आहे.

त्याच्या आईचें नाव सुवर्णाक्षी असें होतें " त्याला सोडवितां आला नसता असा एकहि प्रश्न नव्हता, त्यानें खोडून टाकिला नसता असा एकहि आक्षेप नव्हता; ज्याप्रमाणें मोठा वारा जुनाट वृक्ष मोडून टाकतो त्याप्रमाणें तो आपल्या प्रतिस्पर्ध्याचा पाडाव करीत असे, " असें अश्वघोषाच्या तिबेटी चरित्रकारानें त्याचें वर्णन केलें आहे तो उत्तम गानवेत्ता असून, स्वतः गीतें रचून, स्त्रीपुरुषगायकासह तो प्रवास करीत असे, असेंहि हा तिबेटी चरित्रकार म्हणतो. जीविताच्या निरर्थकतेबद्दलचीं विषादप्रचुर गीतें तो आपल्या गायकगणाबरोबर म्हणत असे. सुस्वरगीताच्या योगानें मोहित होऊन जनसमूह स्तब्धपणें ऐकत असे. अशा प्रकारें अनेक लोकाना त्यानें आपल्या धर्माकडे वळवून घेतलें. इ. स. ६७१ ते ६९५ पर्यंत हिंदुस्थानात प्रवास करीत असलेल्या इत्सिंग नांवाच्या चिनी प्रवाश्यानें असें लिहिलें आहे कीं, पाखंडी लोकांबरोबर झगडून, बौद्धधर्माची प्रगती केल्यामुळेंच देव व माणसें यांच्यापेक्षा विद्वान भिक्षूंना जास्त पूज्य मानिलें आहे. प्राचीन कालातील ( हा प्रवाशी अश्वघोष, देव, नागार्जुन व कुमारलब्ध हे जगाला प्रकाशित करणारे चार सूर्य होते असें म्हणतो.) नागार्जुन, देव व अश्वघोष यांच्यासारख्या व्यक्ती प्रत्येक पिढींत अगदीं थोड्या असतात, असेंहि विधान त्यानें केलें आहे. बौद्धाच्या क्षेत्रामध्यें अश्वघोषाबरोबर निर्माण झालेले पवित्र ग्रंथहि इतर ग्रंथाबरोबरच वाचले जात असत असेंहि इत्सिंगानें म्हटलें आहे. सूत्रालंकार, बुद्धचरित व कांहीं गीतेंहि यानें रचिल्याचें त्या प्रवाशास माहित होतें.

**बुद्धचरित**—बुद्धचरित या विस्तृत ग्रंथात बुद्ध राजवाड्यात रहात होता तेव्हांपासून शाल वृक्षराजीमध्यें त्याचा शेवट झाला तोंपर्यंतच्या त्याच्या जीवितक्रमाची व त्यानें केलेल्या कामगिरीची माहिती आहे असें इत्सिंग म्हणतो " हिंदुस्थानच्या पांची भागात व दक्षिणसागराकडील (म्हणजे मलाया आर्किपेलागो, सुमात्रा, जावा, व शेजारचीं बेटें ) प्रदेशात सर्व ठिकाणीं या पुस्तकाचा प्रसार झाला होता, तो थोड्या शब्दात अनेक विचार व कल्पना प्रकट करितो; यामुळें तें पुस्तक इतकें आल्हादक झालें आहे कीं वाचकांना त्याचा कधींच कंटाळा येत नाहीं ( इत्सिंग पृ. १६५ ). काव्यामध्यें उच्च उच्च तत्वें थोडक्यात सांगितलेलीं असल्यामुळें, तें वाचणें पुण्यप्रद आहे असें समजलें जातें " असेंहि त्या प्रवाशानें लिहिलें आहे चिनी भाषांतरात बुद्धचरिताचा जो आकार आहे, त्याच आकाराचें बुद्धचरित इत्सिंगाला माहित होतें असें त्याच्या लेखनावरून वाटतें चिनी भाषांतरात या चरिताचे अठ्ठावीस सर्ग असून, बुद्धाच्या निर्वाणापर्यंतचें कथानक त्यात दिलेलें आहे. ज्याअर्थी तिबेटी भाषांतरातहि अठ्ठावीसच सर्ग आहेत, त्याअर्थी ज्यात सतरा सर्ग आहेत व ज्याच्या शेवटीं काशी येथें जो अनेकाचा बुद्धधर्मप्रवेश केला आहे त्या संस्कृत ग्रंथात फक्त मूळ सांगाडा शिल्लक राहिलेला आहे या सतरा सर्गापैकीं फक्त पहिले तेरा प्राचीन व शुद्ध असल्यामुळें या ग्रंथास मूळ सांगाडा असेंच म्हणावें लागेल एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं अमृतानंद नावाच्या एका लेखकानें शेवटील भाग जोडला. कारण ( तो स्वत. म्हणतो त्या प्रमाणें ) त्याला एकहि संपूर्ण ( हरप्रसाद शास्त्री यानीं शोधून काढिलेली बुद्धचरिताची हस्तलिखित प्रत चौदाव्या सर्गाच्या मध्यापर्यंतच आहे.) अशी प्रत मिळाली नाहीं.

तथापि, शिल्लक राहिलेल्या या सांगाड्यावरून चिनी प्रवाशानें बुद्धचरिताची एवढी स्तुति कशी केली व ती किती योग्य आहे हें आपल्याला समजून घेता येतें. हा ग्रंथ म्हणजे आपल्यापुढें एका उत्कृष्ट कवीनें लिहिलेलें अगदीं पहिलें बुद्ध काव्य आहे या कवीला आपला गुरु महात्मा बुद्ध याविषयीं अत्यंत प्रेम व आदर वाटत असून बुद्धतत्वाची सत्यता त्याला पूर्णपणें पटली असल्यामुळें त्यानें आपल्या गुरूचें चरित्र व तत्वें उच्च व सुबोदार पण कृत्रिम नव्हे अशा मार्गेत मांडलीं आहेत. बुद्धचरित हें साहित्य शास्त्रीय दृष्ट्या महाकाव्य आहे. यास पाश्चात्य शास्त्रज्ञ एक दरबारी काव्य म्हणतील. हें रामायणाच्याच काव्यपद्धतीवर लिहिलेलें आहे. ज्याप्रमाणें अश्वघोष हा कालिदासाचा पूर्वकालीन होता त्याप्रमाणें वाल्मीकि व त्याच्या लगेच मागून होऊन गेलेले ग्रंथकार हे अश्वघोषाचे पूर्वकालीन होते आपण फार नेमस्तपणानें अलंकारांचा उपयोग केलेला आहे असें या तिन्ही महाकवींचें म्हणणें आहे. भाषा व पद्धति यासंबंधीं अश्वघोष जितका नेमस्त आहे तितकाच तो

बुद्धचरितांतील अद्भुत कथा प्रतिपादन करण्यांत नेमस्त आहे. ललितविस्तरांत ज्या प्रकारच्या अतिशयोक्ती आढळतात तशा प्रकारच्या अतिशयोक्तींपासून तो नेहमीं अलिप्त रहातो. महावस्तु व ललितविस्तर वगैरे ग्रंथांत फार अव्यवस्था आहे तशी बुद्ध चरितांत नसून त्यांतील विषयाची मांडणी नीट विचार करून कवीनें केलेली आहे. आणि जरी प्राचीन धर्मग्रंथांची कवीला पूर्ण माहिती आहे, तरी कांहीं बाबतींत त्यानें थोडेंसें स्वातंत्र्य घेतलेलें आहे. परंपरेमध्यें त्यानें कांहीं बदल केला आहे असें नाहीं; परंतु जुन्या परिचयाच्या गोष्टींना नवें काव्यस्वरूप कसें द्यावयाचें व बौद्धसूत्रांतील प्रसिद्ध तत्वांना मूळचें स्वरूप कसें द्यावयाचें हें त्याला अवगत होतें असें दिसतें. अश्वघोषाच्या अंगीं भिक्षुपणापेक्षा कवित्व अधिक होतें असें निदान बुद्धचरितावरून तरी दिसतें.

तिसऱ्या व चौथ्या सर्गांतील तरुण राजपुत्राच्या पर्यटणाचें वर्णन काव्यदृष्ट्या ललितविस्तराहून कितीतरी भिन्न आहे.

राजपुत्र बाहेर जात आहे हें ऐकतांच शहरांतील स्त्रिया आपापल्या खोल्यांतून घरांच्या छपरावर व खिडकी-पाशीं औत्सुक्यानें आल्या, याचें बहारीचें वर्णन आहे. त्यांच्या पडून जाणाऱ्या कटिमेखलांच्या योगानें अडखळ झाल्यामुळें एकमेकींना ढकलून देऊन, धक्के देऊन आणि अंगठ्या व कटिसूत्रें यांच्या आवाजानें छपरावरील पक्ष्यांना पळवून लावून त्या स्वतः मोठ्या घाईनें धांवत सुटल्या. सुंदर स्त्रियांच्या खिडक्यांबाहेर आलेल्या मुख-कमलांवरून मणूंकाय गृहांच्या भिंती खऱ्या कमलांनीं सुशोभित केल्या होत्या की काय असें दिसत होतें. [ अश्वघोषाच्या (बुद्धचरित ३, १३—२४) या वर्णनाचें रघु-वंशांत ( ७, ५-१२ ) कालिदासानें अनुकरण केलें आहे. हें कॉवेलनें दर्शविलें आहे. (बुद्ध चरित, प्रस्तावना )] देवांनीं पाठविलेल्या वृद्ध मनुष्याच्या भेटीचें वर्णनहि तसेंच सुंदर आहे. मनुष्याच्या राजपुत्रानें विचारिलें, " हे सारथे ज्याचे केंस पांढरे झाले आहेत, डोळे खोल गेलेले आहेत, ज्यानें आपल्या काठीवर सर्व भार टाकला आहे व ज्याचे अवयव कंपित झाले आहेत असा हा इकडे येणारा मनुष्य कोण आहे. ? हा निसर्गधर्म आहे किंवा दैवलीला आहे ? "

नंतर त्या सारथ्यानें उत्तर दिलें - " सौंदर्य हरण करणारें, निःसत्व करून टाकणारें, काळजी उत्पन्न करणारें, सुखें नाहींशीं करणारें, इंद्रियांचा शत्रु व स्मरण शक्ति नष्ट करणारें असें जें वार्धक्य त्याच्या योगानें हा शक्तिहीन झालेला आहे. यानेंहि लहानपणीं आपल्या आईचें स्तनपान केलें आहे; कांहीं कालानें हा चालावयास शिकला; हळू हळू हा मोठा सशक्त असा तरुण झाला, व कालांतरानें याला वार्धक्यानें गांठिलें. "

त्या राजपुत्रानें तीन पर्यटनें केल्यावर वार्धक्य, रोग व मृत्यु यांची त्याला माहिती झाली, त्याला कोठेंहि आनंद वाटेनासा झाला. राजाच्या विनंतीवरून कुलोपाध्यायानें राजपुत्राला मोह पाडण्यासाठीं व त्याची उदासीन वृत्ति नष्ट करण्यासाठीं राजवाड्यांतील स्त्रियांना व मुलींना बोलावून आणून सर्व प्रकारचे शृंगारभाव करण्यास सांगितलें; परंतु त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. राजपुत्रावर त्या मोहाचा यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं. त्या उल्हसित वृत्तींच्या स्त्रियांचें त्याला आश्चर्य वाटून तो म्हणाला (४, ६०)

" आपल्या शेजाऱ्याचा आजार, वार्धक्य व मृत्यु पाहूनहि जो मनुष्य आनंदांत रहातो व जो भीतिग्रस्त होत नाहीं तो मनुष्य फार असमंजस असला पाहिजे असें मला वाटतें. फलपुष्पविरहित असा एखादा वृक्ष जेव्हां पडून जातो किंवा जेव्हां पाडला जातो तेव्हां शेजारच्या वृक्षाला त्या बद्दल कांहींएक वाटत नाहीं. "

महाकाव्यामध्यें शृंगार अवश्य मानला आहे. राज-वाड्यांतून रात्रीं राजपुत्राच्या पलायनाला कारणीभूत झालेल्या स्त्रियांच्या रात्रींच्या रंगमहालाचें वर्णन देऊन कवीनें ज्याप्रमाणें आपलें शृंगारविषयक ज्ञान प्रगट केलें आहे [ ५, ४८-६२ विनयपिटकांत यश याच्या तोंडीं या देखाव्याचें मूळ वर्णन घातलें आहे ( बुद्धोत्तर जग पृ. १९५ पहा ) अश्वघोषाचें अनुकरण करून रामायणांत अशाच प्रकारचीं वर्णनें दिलीं आहेत.)] त्याचप्रमाणें, राज-पुत्राला मोहित करण्यासाठीं सुंदर स्त्रियांनीं ज्या प्रेमलीला दाखविण्याचा प्रयत्न केला, त्या प्रेमलीलांचें वर्णन करून वर सांगितलेल्या आवश्यक गोष्टींची त्यानें पूर्णता केली. परंतु महाकाव्याच्या कवीला नीतिशास्त्रांतील तत्वांचीहि माहिती असणें जरूर आहे. राजपुत्राला त्याच्या विचारापासून परावृत्त करण्यासाठीं अशा प्रकारचीं तत्वें कुलोपाध्याय त्याला म्हणून दाखवीत असे. लढाईंतील ( ८, ६२-८२ ) देखाव्याचें वर्णनहि अशा काव्यांत येत असे. तेराव्या सर्गांत मार व त्याचे लोक यांच्याशीं झालेल्या युद्धाच्या लढाईचें जोरदार वर्णन थोडक्यांत देऊन हीहि अपेक्षा कवीनें पूर्ण केली आहे.

सौं द रा नं द —अश्वघोषाचें सौंदरानन्द हें काव्य हर प्रसाद शास्त्री यांनीं शोधून प्रसिद्ध केलें. हेंहि बुद्धचरिता-संबंधींच आहे; परंतु बुद्धचरित या ग्रंथांत जे प्रसंग व ज्या उपकथा थोडक्यांत वर्णन केल्या आहेत किंवा ज्यांचा मुळींच उल्लेख केलेला नाहीं, अशा गोष्टी विशेषतः विस्तृत पणें या काव्यांत सांगितलेल्या आहेत. पहिल्या सर्गांत कपिलवस्तुस्थापनेची गोष्ट सविस्तरपणें सांगितलेली आहे. बुद्धाचा सावत्र भाऊ जो विरही नन्द ज्याला त्याच्या इच्छे-विरुद्ध बुद्धानें पुढें भिक्षूची दीक्षा दिली हा या काव्याचा मुख्य विषय आहे.

ज्याप्रमाणें नन्दाची सुंदर पत्नी सुन्दरी नाहींशा झालेल्या आपल्या पतीसाठीं शोक करीत आहे त्याचप्रमाणें नन्दहि आपल्या प्रियेकडे परत जाण्याची इच्छा करीत आहे. त्या पंथातील लोकांनीं त्याचें सात्वन करण्याचा प्रयत्न केला परतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं बुद्धाच्या भाषणानेंहि त्याची वृत्ति बदलली नाहीं. नंतर गुरूनें त्याला आपल्या हातात धरून स्वर्गारोहण केलें वाटेंत हिमालयावर एक एकाक्ष वानरस्त्री त्याना आढळली, 'सुंदरी या वानरीपेक्षा अधिक सुंदर आहे काय' असा बुद्धानें प्रश्न केल्यावर, नन्दानें 'होय' असें उत्साहान सांगितलें परंतु लवकरच स्वर्गातील अप्सरा त्याच्या दृष्टीस पडल्या, तेव्हा आपली बायको व वानरी यामध्यें जितका फरक आहे तितकाच अप्सरा व आपली बायको यामध्यें फरक आहे असें नन्दास आढळून आलें त्या वेळेपासून अप्सराविषयीं त्याला उत्कट इच्छा उत्पन्न झाल्यामुळें, पृथ्वीवर परत आल्यावर, स्वर्गात जाण्यासाठीं तो मनापासून तपश्चर्या करूं लागला. नंतर स्वर्गसुखातहि कांहीं अर्थ नाहीं असें आनंदानें त्यास शिकविलें सरतेशेवटीं नंदाची खात्री पटूं लागली व आपल्याला आता अप्सराची इच्छा नाहीं असें कळविण्याकरिता तो बुद्धाकडे गेला. हें ऐकून बुद्धाला फार आनंद झाला व त्यानें ( कित्येक सर्गांमध्यें ) त्याला आपल्या संप्रदायाचें मुख्य स्वरूप शिकविलें नंतर नंद अरण्यात गेला व चार प्रकारच्या ध्यानें लोकास उपदेशून अर्हत् झाला. कृतज्ञतापूर्वक तो बुद्धाकडे गेला व त्यानें त्याची पूजा केली.तुझा हेतु आता सफल झाला आहे तेव्हा मुक्ति म्हणजे काय हें लोकाना समजावून व त्याच्यावर दया करून त्याना [ नंदाच्या धर्मांतराचा महावग्गात पूर्वींच उल्लेख केलेला आहे (१,'१४,) निदान कथेंतहि उल्लेख आलेला आहे. ] उद्धार मार्गाला लाव असें गुरूनें त्याला सांगितलें.

बुद्धचरितामध्यें महायान पंथाचीं निश्चित मतें मुळींच आढळत नाहींत. परंतु सौंदरानंद काव्याच्या उपसंहाराचा महायान पंथाकडे बराच कल दिसतो. नंदाला सिद्धजन बनवून त्यास निर्वाणप्राप्ति करून दिली एवढ्यावरच न थांबता त्याला धर्मप्रसाराच्या कामाला लाविलें ( हीनयानामध्येंहि उपदेशाचें व धर्मांतराचें फार महत्त्व होतें हें अंगुत्तरनिकायातील ४७व्या पानावर दिलेल्या एका सुत्तावरून समजतें.) हें विशेष आहे

सूत्रालंकारः—या अश्वघोषाच्या तिसऱ्या मोठ्या ग्रंथात हीनयानी आख्यानासारखीं अनेक कथानकें आहेत. इ. स. ४०५ च्या सुमारास झालेल्या भाषांतरावरून जें फ्रेंच भाषांतर झालें त्यावरूनच सूत्रालंकाराची आजपर्यंत आपल्याला माहिती होती सूत्रालंकार हा जातकें व अवदानें यासारख्या धार्मिक कथाचा एक समुच्चय आहे. या कथा गद्यात्मक व पद्यात्मक असून या साध्या काव्यपद्धतीवर लिहिलेल्या आहेत. दीर्घायु व शिबि राजा इत्यादि कांहीं गोष्टी पूर्वींच परिचित झालेल्या आहेत; दुसऱ्या कांहीं गोष्टींत महायानी पंथाचें किंवा बुद्धाराधनेचें तत्त्व अधिक प्रमाणात दिसून येतें. यातील सत्तावन्नावी गोष्ट अशाच प्रकारची असून, सर्व कथासमूहातील अतिशय सुंदर गोष्टींपैकीं पुढील एक आहे.

एका मनुष्यानें मठामध्यें येऊन दीक्षा घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. सारिपुत्र नावाच्या शिष्यानें त्याची परीक्षा घेतली, तेव्हा त्यास असें आढळून आलें कीं, एकंदर विश्वयुगातील कोणत्याहि जन्मीं त्यानें यत्किंचितहि सत्कृत्य केलेलें नव्हतें; म्हणून दीक्षा घेण्यास तूं अयोग्य आहेस असें त्यानें त्यास सांगितलें. तेव्हा रडत रडत तो मठातून निघून गेला. ज्याप्रमाणें माता आपल्या मुलावर प्रेम करिते त्याप्रमाणेंच सर्वांवर प्रेम करणारा व ज्याला प्रत्येकास आपल्या पंथाना घेण्याची इच्छा होती असा महात्मा बुद्ध त्याला भेटला त्या झिडकारून लाविलेल्या मनुष्याच्या मस्तकावर हात ठेवून तूं का रडतोस असें बुद्धानें त्याला विचारिलें सारिपुत्रानें माझा त्याग केला असें त्यानें सांगितल्यावर दुरून मेघगर्जनेचा जसा आवाज होतो तशा प्रकारच्या अवाजानें बुद्धानें त्याचें सात्वन केलें व सारिपुत्र हा कांहीं सर्वज्ञ नाहीं असें त्यानें सांगितलें त्या महात्म्यानें स्वतः त्या मनुष्यास पुनः मठात आणून मोक्षप्राप्तीचा हक्क कोणत्या सत्कृत्यानें यानें मिळविला आहे हे सर्व भिक्षूंसमक्ष सांगितलें पूर्वी एका जन्मीं हा दरिद्री असल्यामुळें लाकडें जमविण्यासाठीं अरण्य व टेकड्यामधून हिंडत असता, एक वाघ याच्या अंगावर धावून आला. भीतिग्रस्त होऊन 'बुद्धाचा उत्कर्ष होवो " असें हा मोठ्यानें म्हणाला या शब्दामुळें हा मनुष्य मोक्षाचा वाटेकरी होईल. स्वत. बुद्धानें त्याला भिक्षूची दीक्षा दिल्यावर लवकरच तो अर्हत्, झाला. [ ६८ व्या गोष्टींत खऱ्या महायानी बुद्धभक्तीचें उदाहरण आहे. बुद्धाच्या कृपेनें गौतमीला निर्वाण प्राप्ति झाल्यामुळें तिनें यथाविधि त्याची पूजा केली. मनुष्य व देव हेहि बुद्धाची व बुद्धमातेचीहि पूजा करण्याकरिता लवकर आले. ]

सूत्रालंकारात बुद्धचरिताचा उल्लेख केलेला आहे, यावरून बुद्धचरितानंतर सूत्रालंकार झालें असावें असें अनुमान काढिता येतें. सूत्रालंकाराच्या ( १४ व ३१ ) दोन कथानकात कनिष्क राजाचा संबंध आहे यावरून असें दिसतें कीं, हा ग्रंथ तयार झाला तेव्हा अश्वघोष वृद्ध असून त्या राजाच्या दरबारीं रहात असावा. आतापर्यंत फक्त चिनी भाषांतराचीच आपल्याला माहिती आहे ही फार शोचनीय गोष्ट आहे. फक्त ग्रंथांतर्गत विषयामुळेंच हा ग्रंथ महत्त्वाचा आहे असें नाहीं, ( लेव्ही म्हणतो त्याप्रमाणें, दोन भाषांतरावरून याचें महत्त्व दृग्गोचर होतें ) तर महाभारत व रामायण या दोन आर्षकाव्यातील उल्लेखामुळें, सांख्य व वैशेषिकाच्या तात्त्विक

मतांच्या निरसनामुळें, ब्राह्मण व जैन यांच्या धार्मिक मतांमुळे, व लेखन, कला व चित्रकला इत्यादिकांच्या सर्व उल्लेखामुळेंहि हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. प्राचीन हिंदी वाङ्मय व संस्कृति यांचा इतिहास समजून घेण्याकरितांहि हा ग्रंथ कमी महत्त्वाचा नाहीं.

वज्रसूचि.—दुसरे कांहीं ग्रंथहि अश्वघोषानें केलेले आहेत. परंतु ते खरोखर त्याचे आहेत किंवा नाहींत याबद्दल बऱ्याच सकारण शंका घेण्यासारख्या आहेत ही फार दुःखाची गोष्ट आहे. ही गोष्ट विशेषतः वज्रसूचि ह्या ग्रंथाला लागू पडते. या लहानशा मनोरंजक ग्रंथात ब्राह्मणांच्या जातींच्या कल्पनेचें फार सूक्ष्मपणानें खंडन केलें आहे. ग्रंथकारानें स्वतः ब्राह्मणाची बाजू घेऊन (व हें विशेष परिणामकारक आहे) त्यांच्या ग्रंथांवरून, वेदांतील उताऱ्यांवरून, महाभारत व मनुस्मृति यांतील उताऱ्यांवरून ब्राह्मणांच्या स्वतःच्या महत्त्वासंबंधी कल्पना किती चुकीच्या आहेत हें सिद्ध करण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. एच्. हॉग्सन यांनीं इ. स. १८२९ त त्या ग्रंथाचें भाषांतर, व एल्. विल्किन्सन यांनीं इ. स. १८३९ त जेव्हां हा ग्रंथच प्रसिद्ध केला तेव्हां त्या ग्रंथात सर्व दर्जांच्या लोकांची समता प्रतिपादिलेली पाहून व सुख, दुःख, जीवित सहनशान, एकंदर राहणी, जन्म, मृत्यु, भीति व प्रेम याविषयीं लोकांची समदृष्टि पाहून यूरोपांतील लोकसत्तात्मक भावनेमुळें त्यांना फार कौतुक वाटलें. या ग्रंथकर्त्याविषयीं व ग्रंथकालाविषयीं आपल्याला जर कांहीं नवी माहिती मिळेल तर ब्राह्मणी ग्रंथांतील उताऱ्यामुळेंहि वाङ्मयाच्या इतिहासाला या ग्रंथाचा फार उपयोग होईल. अश्वघोषानें हा ग्रंथ केला हें दर्शविण्यासाठीं वज्रसूचींतील उताऱ्याप्रमाणें मनुस्मृतींतील उतारे देऊन सूत्रालंकारांत (नं. ७७) ब्राह्मणांच्या चालीरीतींची माहिती सांगितलेली आहे. परंतु तिबेटी तंदशुर किंवा इत्सिंग यांनी वज्रसूचीची गणना अश्वघोषाच्या ग्रंथांत केलेली नाहीं. चार वेदांचें ज्यांमध्यें खंडण केलेलें आहे असें म्हणतात व ज्या ग्रंथाचें ९७३ पासून ९८१ पर्यंतच्या कालावधींत चिनी भाषेत भाषांतर झालें तो वज्रसूची ग्रंथ धर्मकीर्तीनें (चिनी फा-चाग हें संस्कृत धर्मकीर्तिचें भाषांतर आहे.) लिहिला असें ब्यूनिओ नँजिओच्या चिनी त्रिपिटक ग्रंथसूचींत सांगितलेलें आहे.

जे इतर ग्रंथ अश्वघोषानें लिहिले, असें चिनी, जपानी व तिबेटी लोक म्हणतात ते खरोखर त्यानें लिहिले किंवा नाहीं हें अगदीं अनिश्चित आहे. महायानश्रद्धोत्पाद या ग्रंथामुळें महायानी-उपदेशक अशी अश्वघोषाची कीर्ति झालेली आहे. या तत्त्वज्ञानविषयक ग्रंथाचा अभ्यास महायानी मतें शिकण्यापूर्वी जपानमधील पाठशाला व मठ यांमध्यें केला जातो. लेव्ही म्हणतो, "बुद्धचरित्रकारानें आपण मोठे अध्यात्मशास्त्रवेत्ते आहोंत, व बौद्ध धर्माचें पुनरुज्जीवन करणारें मत आपण पुनः सुरू करूं असें दर्शविलें आहे." परंतु यांत निश्चित असें कांहींच नाहीं; या ग्रंथांत अश्वघोषानंतरच्या कालांतील मतें असल्यामुळें हा अश्वघोषाचा ग्रंथ असेल हें फारच असंभवनीय दिसतें. परंतु जोंपर्यंत त्या ग्रंथाच्या संस्कृत भाषेची प्रतीच आपल्याला आहे, तोंपर्यंत त्या ग्रंथाचा काल व कर्ता या विषयींचें निश्चितपणें विधान करितां येणें शक्य नाहीं. या ग्रंथाचें प्रथम चिनी भाषेत इ. स. ५५४ व नंतर ७१० त भाषांतर झालें. दुसऱ्या भाषान्तरावरून तैतरो सुझुकी यानें इंग्लिशमध्यें भाषांतर केलें. अश्वघोषानें हा ग्रंथ लिहिला व त्यानेंच महायान पंथ स्थापिला असें सुझुकीचें मत आहे. तथापि असंगाचा विज्ञानवाद व लंकावतारांतील तथागतगर्भ व तथता हीं मतें त्या ग्रंथांत आहेत. प्रो. ताकाकुसु यांच्या मतें अश्वघोषानें हा ग्रंथ लिहिला असणें अगदीं असंभवनीय आहे. चिनी ग्रंथांच्या जुन्या यादींत अश्वघोषाचें ग्रंथकारांत नांव नाहीं असें ताकाकुसूचें म्हणणें आहे.

शतपंचाशतिक.—इत्सिंगच्या मताप्रमाणें शतपंचाशतिकनामस्तोत्र हें मातृचेत नांवाच्या कवीनें लिहिलेलें आहे, परंतु हेंहि अश्वघोषानेंच लिहिलें असें तंदशुरमध्यें म्हटलें आहे. या मातृचेताची स्तुती करावी तेवढी थोडीच आहे असें इत्सिंगास वाटे; मातृचेत हा अश्वघोषाच्याच पंथापैकीं असल्यामुळें त्या दोघांबद्दल घोंटाळा उत्पन्न होतो. तिबेटी इतिहासकार तारानाथ याच्या मताप्रमाणें मातृचेत हें फक्त अश्वघोषाचें दुसरें नांव आहे. महाराजकनिक-लेख या ग्रंथाचा कर्ता मतिचित्र व मातृचेत हे एकच आहेत, असें एक मत आहे पण विंटरनिझ यास असें वाटत नाहीं. या मातृचेताचें दीडशें श्लोकांचें स्तोत्र किंवा भिक्षूंच्या समुदायामध्यें म्हटलें जाणारें चारशें श्लोकांचें स्तोत्र ऐकून फार आल्हाद होतो असें इत्सिंग म्हणतो. या रम्य ग्रंथाचें सौंदर्य दिव्यपुष्पाच्या सौंदर्यासारखें असून यांतील उच्च तत्त्वें पर्वताच्या शिखराशीं स्पर्धा करणारीं आहेत, म्हणून त्याला वाङ्मयाचा उत्पादक समजून हिंदुस्थानांतील सर्व कवी त्याच्या लेखनपद्धतीचें अनुकरण करितात. बोधिसत्त्व असंग व वसुबन्धु यांसारखे लोकदेखील त्याची फार स्तुती करितात. दहा पांच सूत्रें येऊं लागतांच हिंदुस्थानांतील प्रत्येक भिक्षु मातृचेताचीं स्तोत्रें शिकतो. पूर्व जन्मीं तो बुलबुल पक्षी असून त्यानें मधुर गीताच्या योगानें बुद्धाची स्तुती केली होती असें त्या गोष्टींत सांगितलेलें आहे. दीडशें श्लोकांच्या स्तोत्राचें चिनी भाषेत इत्सिंगनें स्वतः भाषांतर केलें आहे परंतु आतां मातृचेताच्या मूळ संस्कृत स्तोत्राचा कांहीं भाग मध्य आशियांत सांपडला आहे; व ज्याचे आपण फार ऋणी आहोंत, त्या टर्फानच्या हस्तलिखित भागावरून डब्ल्यू. सिगेसिंग यानें सुमार दोन तृतीयांश ग्रंथाची उत्तम प्रकारें

पुनर्रचना केली आहे त्या श्लोकात अतिशयोक्ती नसून ते सुबोदार काव्यपद्धतीने लिहिलेले आहेत.

सा रि पु त्र प्र क र ण—हिंदुस्थानामध्ये नाटकाच्या रचनास प्रथमत केव्हा सुरवात झाली हे खात्रीपूर्वक अद्यापि सांगता येत नाही आतापर्यंतच्या माहितीवरून, महायान पंथाचा आचार्य अश्वघोष हा सर्वांत प्राचीन नाटककार असावा असें दिसतें त्याच्या नावावर जी कांहीं नाटकें प्रसिद्ध आहेत ती पाहिली असता त्यामध्यें ज्या कांहीं ठराविक गोष्टी दृष्टीस पडता त्यावरून त्याच्याहि अगोदर कांहीं नाटककार असावेत असें अनुमान निघतें उदाहरणार्थ त्याच्या नाटकातहि जें विदूषकाचें पात्र दृष्टीस पडतें त्यावरून विदूषक हा नाटकांतला आवश्यक भाग म्हणून ठरला गेला असावा आणि तसेंच नाटकाचा प्रकार व घाटणी हाहि बरीच पूर्वी ठरून त्याला रूढीचें स्वरूप आलेलें होतें असें अनुमान काढावें लागतें तरी पण नाट्यकलेचा खराखुरा आरंभ याच्या फार पूर्वी झाला असें कांहीं म्हणता यावयाचें नाहीं कारण याच्या ठरावीक पद्धतीच्या नाटकावरून नाट्यकला ही नुकतीच लोकांमध्यें वावरू लागली होती व अद्यापि तिला स्वतंत्र विकास पावण्याची स्थिति आली नव्हती असें दिसतें

अश्वघोषानें ' सारिपुत्रप्रकरण ' या नावाचें नववी नाटक लिहिलें व त्यामध्यें बुद्धशिष्य सारिपुत्र आणि मौद्गल्यायन याच्या धर्मप्रवेशाबद्दलच्या कथ्यावर मणसणीत टीका केली हें मात्र नि संशय खरें आहे या नाटकाचे फुटकळ हस्तलिखित भाग ' कुशान ' काळचे असून ते तुर्फान येथे सापडले व ल्यूडर्सने प्रसिद्ध केले

[ सं द र्भ ग्रं थ —विंटरनिझ—हिस्टरी ऑफ इंडियन् लिटरेचर पु २ हा जर्मन ग्रंथ फार अमूल्य व पांडित्यदर्शक असा आहे स्टीनकनो—इंडियन ड्रामा ( जर्मन ) जे आर ए एस् ( १९१२–१५ ) मधील लेख. एन्सायक्ला रिलि ॲंड एथिक्स कोशातील आनासाकीचा अश्वघोषावरील निबंध अश्वघोषाचे बुद्धचरितादि ग्रंथ नंजिओ—कॅटलॉग ऑफ दि चायनीज बुद्धिस्ट बुक्स ]

अश्वत्थ—पिंपळ अश्वत्थ शब्दाचा अर्थ घोडेठाण असा होईल याच्या लाकडाची पेलेली अहाणे ऋग्वेदात उल्लेखिलेली दिसतात ( १ १३५, ८, १० ९७, ५ ) व या झाडाचा उल्लेख पुढील वैदिक वाङ्मयात अनेक ठिकाणी आला आहे ( अथर्व. ३ ६, १, ८. ३७, ४इत्यादि ) आणि मंथन करण्यासाठी मंथा अश्वत्थ वृक्षाचा व अरणि शमीची लागे ( अथर्व ६ ११, १, शत ब्रा ११ ५, १, १३ ) या वृक्षाला ' वैबाध ' ( विनाशकारी, बांडगूळ ) असेंहि नाव आहे, कारण दुसऱ्या वृक्षांवर आपली मुळें रुजवून त्यांची पाळेमुळें हा मारून काढतो ( अथर्व ३ ६ ) याची फळें गोड असून पक्षी खातात ( ऋ १ १६४, २०–२२ ) तिसऱ्या स्वर्गांत अश्वत्थ हें देवसदन मानिलें आहे ( अथर्व ५ ४, ३, छा उप ८ ५, ३, कौषी उप. १ ३ ) यावरून अश्वत्थाची महती मंत्रकालातहि स्थापित झाली होती असें दिसत

' अश्वत्थ सर्व वृक्षाणा ' या गीतावचनावरून या वृक्षाचें पौराणिककाळीं काय महत्त्व होतें तें कळतें. चातुर्मास माहात्म (अ २०), कार्तिक माहात्म ( अ ४ ) श्रावण महात्म, व्रतकौमुदी, व्रतराज वगैरे ग्रंथ तून याचें माहात्म वर्णिलें आहे. याची मुंज करितात,याचें तुळशीशीं लग्न लावितात सस्कारविधीतून याच्या समिधा वापरल्या जातात

हा वृक्ष हिंदुस्थानाखेरीज इतर कोणत्याहि देशात आढळत नाही गावात, रानात,अरण्यात अशा सर्व ठिकाणीं हा असतो कोठें कोठें या झाडाचा विस्तार इतका होतो की याच्या छायेंत तीन चारशें माणसें सहज बसू शकतील हा वृक्ष फार वर्षे वाचतो व त्यात अनेक अलौकिक औषधि धर्म असल्यामुळें हिंदु लोकात तो फार पवित्र मानितात यामुळें श्रद्धावान लोक या वृक्षास दगडी पार बांधतात. पिंपळाचें लाकूड सरपणासारखे जाळू नये असा हिंदुलोकात नियम आहे पिंपळास बारीक फळें येतात व या झाडावर लाख फार पैदा होतो लाखेचे उपयोग, व्यापार, पिकविण्याची कृति वगैरे " लाख 'या सदराखाली सापडेल. पिंपळाची छाया थंड निरोगी व श्रमहारक असते या कारणान ही झाडें देवळाजवळ रस्त्याचे दुतर्फा प्रवाशी लोकांच्या सोईसाठी मुद्दाम लावितात

औ ष धी उ प यो ग—वैद्यशास्त्राच्या दृष्टीनें पिंपळ मधुर, शीत, तुरट, योनिरोगहारक, दाह, पित्त, कफ व व्रण याचा नाश करणारा आहे पिंपळाची साल पाण्यात किंवा दह्यात उगाळून लावावी किंवा सालीची राख व चुना लोण्यांत खलून लावावी. अफूवर पिंपळाच्या सालीचा काढा करून द्यावा म्हणजे अफू उतरेल उपदंशाच्या व्रणजे गरमीच्या चट्ट्यावर-पिंपळाच्या वाळलेल्या सालीची राख टाकीत जावी म्हणजे चट्टे कोरडे पडून बरे होतात मुलाची बोबडी वाचा शुद्ध होण्यास पिंपळाची पिकलेली फळें खाण्यास द्यावीत लहान मुलाच्या, अगावर पुटकुळ्या येतात त्यावर पिंपळाची साल व विटकर एकत्र करून लावावी अग्निदग्ध व्रणावर पिंपळाच्या सुक्या सालीचे चूर्ण तुपात कालवून लावावें. धुपणावर-पिंपळाची साल एक तोळा,ताकाच्या निवळींत वाटून साखर घालून द्यावी याप्रमाणें पिंपळाचे अनेक औषधी उपयोग सांगितले आहेत [ सदर्भग्रंथ —वेद, सहिता. ब्राह्मण वगैरे वैदिक इंडेक्स धर्मसिंधु. पदे-वर्गो गुणादर्श मु. गं –व्हॉटनी ]

अश्वपति— हें नामाभिधान अनेक पौराणिक व्यक्तींना असे त्यापैकीं प्रमुख मद्रदेशाचा प्राचीन कांहीं असलेला राजा तो होय सावित्रीचा पिता ( सावित्री पहा )

२ केकय देशाचा राजा, यास, युधाजित नामक पुत्र, व कैकेयी नामक कन्या, अशी दोन अपत्यें होतीं हीच कैकेयी रामचंद्राचा पिता दशरथ त्याची स्त्री (वा रा अयो स १)

या राजाची स्त्री म्हणजे कैकेयीची माता, परम साहसी होती. त्याविषयीं अशी कथा आढळते कीं, या राजास संपूर्ण पक्ष्यांची भाषा समजत असल्यामुळें त्यास एकदा जृंभ पक्ष्याच्या काहीं चमत्कारिक भाषणश्रवणानें हास्य आलें. तेव्हां ती समीप होती म्हणून तिनें यास त्याचें कारण विचारिलें. राजा म्हणाला, हें मी सांगताच मरेन, असें आहे. तेव्हां तें मला पत्करलें असेंहि ती म्हणाली. तें तिचें भाषण ऐकून तिला राजानें घरांतून घालवून दिलें होतें. ( वा. रा. अयो. स. ३५ ).

**अश्वमूत्राम्ल**—( हिप्युरिक ॲसिड )—अश्वमूत्राम्लाची घटना कउ$_2$ ( नउ क$_6$ उ$_5$ कप्र) कप्रप्रउ अशी आहे. यास उदायिल चर्मांम्ल किंवा उदायिल अमिद दार्वाम्ल ( बेंझोयिल ग्लिसाइन किंवा बेंझामिडो असेटिक ॲसिड ) अशीं दुसरींहि नावें आहेत. हें अम्ल वनस्पत्याहारी जनावराच्या मूत्रात असतें.मुख्यत्वें घोडे व गाई यांच्या मूत्रात या अम्लाचें प्रमाण बरेंच असतें म्हणून याच्या मूत्रातून हें अम्ल काढतात. गंधवर्गीतील ( ॲरोमॅटिक ) पदार्थ पोटात गेले म्हणजे हें अम्ल तयार होतें. हें कृत्रिम रीतीनेंहि तयार करतां येतें. इ स. १८५३ मध्यें व्ही. डेसाइमेस यांनीं हें अम्ल प्रथम कृत्रिम रीतीनें तयार केलें.

री त—हें अम्ल काढण्याकरितां गाईचें ताजें गोमूत्र चुन्याच्या पाण्याबरोबर उकळावें. मग गाळून थंड झालें म्हणजे त्यात उदराम्ल ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ) घालावें म्हणजे अश्वमूत्राम्ल सुटें होतें, तें गाळून घ्यावें.

शु द्धी क र ण.—अश्वमूत्राम्ल शुद्ध करण्याकरितां उकळत्या पाण्यात त्याचा द्रव करून त्यात हर ( क्लोरिन ) वायु घालावा. सर्व दुर्गंध गेल्यावर तो द्रव गाळून त्यावर पुनः हरीकरणाची ( क्लोरिनेशन ) क्रिया करावी म्हणजे अश्वमूत्र शुद्ध होतें. हरीकरणात हरवायूचा विषारी परिणाम शरीरावर घडत असल्यानें अश्वमूत्राम्ल मोठ्या प्रमाणावर काढणें अशक्य होतें. शिवाय या रीतीनें हें अम्ल फार महाग पडतें. हें अम्ल इ स. १९२० चे पूर्वी औंध संस्थानांत रा रा. नरसो गणेश वाडदेकर यांनीं सुमारें १५०० रुपयांचें काढून इंग्लंड व अमेरिकेंत पाठविलें या कामीं अश्वमूत्राम्ल शुद्धीकरणार्थ मशारनिल्हे वाडदेकर यांनीं हरीकरणाचा उपयोग न करता आपली नवीन रीत काढली होती. या रीतीनें हरीकरणाचे विषारी परिणाम टळून अश्वमूत्राम्ल स्वस्त व फारच शुद्ध रंगहीन पांढरें शुभ्र होतें. ती रीत अशी:—

अशुद्ध अश्वमूत्राम्ल हवेंत वाळवावें म्हणजे त्यातील भानल जातीचे ( फिनोल ) जे पदार्थ असतात त्यांचें प्राणिदीकरण होऊन ते पाण्यात अविद्राव्य होतात. पूर्ण वाळलें म्हणजे त्या अम्लाचे ३–४ वेळा शुद्ध पाण्यात स्फटिकीकरण करावें नंतर चुन्यानें निर्गुण करून पुनः उदराम्लानें त्याचा निपात करावा. वाष्पजलानें चुन्याची अशुद्धी काढल्यावर त्याचे स्फटिक करावेत. हे स्फटिक अगदीं पांढरे शुभ्र चतुरस्र लांबट व चकचकीत असतात. हे थंड पाण्यात अविद्राव्य असून उकळत्या पाण्यात फार विद्राव्य असतात. याचा रसांक १८७° श असतो. हें अम्ल २४° शवर पृथग्भूत होतें. उष्ण दाहकसिंधूनें याचें पृथक्करण होऊन उदाम्ल व चर्मांम्ल हीं अम्लें पृथग्भूत होतात. अश्वमूत्राम्ल सिंधुस्फुरिता ( सोडियम फास्फेट )च्या द्रवात विद्राव्य असल्यानें गोमूत्र अम्लक्रिया देणारें असतें. अश्वमूत्राम्ल अल्कशीं संयुक्त होऊन त्याचे निर्गुणक्षार बनतात. हे औषधी कामात पोटातील मूत्रविकारावर फार गुणकारक आहेत.

**अश्वमेध**—या नावाचा एक संवत्सरपर्यंत चालणारा एक यज्ञ आहे. याचा उल्लेख विशेषतः तैत्तिरीय संहितेंत येतो. ऋग्वेदात प्रत्यक्ष अश्वमेधाचा जरी उल्लेख नसला तरी अश्वमेधात सोडावयाच्या घोड्याचें वर्णन एका सूक्तात आलें आहे ( १·१३२ ) तैत्तिरीय संहितेंत ( ५ ४,१२ ) अश्वमेधासंबंधीं एक आख्यायिका आली आहे ती अशी:—एकदा प्रजापतीच्या डोळ्यांतील बुबुळ काहीं कारणानें जमिनीवर गळून पडलें व त्यापासून अश्व जातीची उत्पत्ति झाली. पुढें देवांनीं अश्वमेध यज्ञाच्या योगानेंच प्रजापतीचें बुबुळ जाग्यावर बसविलें तेव्हां जो अश्वमेध यज्ञ करतो तो प्रजापतीला संतुष्ट करतो, असें तेथें सांगितलें आहे. शिवाय अश्वमेध यज्ञ केल्यानें ब्रह्महत्या पातकाचा नाश होतो असेंहि तेथेंच सांगितलें आहे.

अश्वमेध यज्ञांतील काहीं विशिष्ट गोष्टींचा उल्लेख ज्ञानकोश विभाग दुसरा ( वेदविद्या ) यामध्यें येऊन गेला आहे. ( प्रकरण ४ पृष्ठ ७८ ).

ऐतरेय ब्राह्मणात (८ २१–२३) सुमारें आठ नऊ राजांनीं अश्वमेध यज्ञ करून पृथ्वी जिंकिल्याचा उल्लेख आला आहे व त्यात भरताच्या अश्वमेधाचें महत्त्व जास्त वर्णिलें आहे. अश्वमेध हा सार्वभौम राजानें करावयाचा असतो, परंतु ऐतरेय ब्राह्मणात सार्वभौम नसलेल्या राजांनींहि अश्वमेध यज्ञ करून पृथ्वी जिंकिल्याचा उल्लेख आहे.

अश्वमेधाचा उल्लेख व प्रयोगविधि यजुर्वेदाच्या सर्वसूत्रांत आला आहे. त्यापैकीं सत्याषाढ सूत्रातील अश्वमेधासंबंधीं काहीं गोष्टी पुढें दिल्या आहेत.

यज्ञ करणारानें चैत्री पौर्णिमेस ‘ सांग्रहणी ’ नामक इष्टि करावयाची. वैशाखी पौर्णिमेस प्रजापति देवतेस उद्देशून पशुयाग करावयाचा. दुसरे दिवशीं ऋत्विजाचें वरण करून अश्वमेधाचा संकल्प करावयाचा व उत्तमलक्षणी असा अश्व अश्वरक्षकांसह सोडावयाचा. त्याच दिवसापासून दररोज एकाळीं, मध्यान्हकालीं व सायंकाळीं सारस्वतीनामक इष्टि करावयाच्या आणि दररोज यजमानाकडून पारिप्लवनामक आख्यान ऐकावयाचें. ( या पारिप्लवाचा उल्लेख ज्ञानकोश भाग तीन पृ. ५१५येथें आला आहे )

असा क्रम एक संवत्सरपर्यंत झाल्यावर व सोडलेला अश्व

परत आल्यावर यजमानानें दीक्षा ग्रहण करावयाची या यज्ञांत सुत्याह म्हणजे सोमयाग करावयाचे दिवस तीन असतात. यज्ञात मारल्या जाणाऱ्या अश्वाबरोबर अनेक देवतांना उद्देशून ग्राम्य व आरण्य पशूंचें उपाकरण केलें जातें. त्यांपैकी ग्राम्य पशु मारले जातात व आरण्य पशूंना सोडून दिलें जातें. सुत्येच्या मध्य दिवशीं म्हणजे दुसऱ्या दिवशीं अश्वाचें उपाकरण केलें जातें. त्यापूर्वीं त्याला उत्तम शृंगारून एका उत्तम भूषित केलेल्या रथास जोडून यज्ञमंडपाभोंवतीं फिरविलें जातें व नंतर त्याला उत्तर वेदीच्या उत्तर बाजूच्या जागेवर ( आस्ताव ) उभें करतात ही जागा त्यानें हुंगली अथवा त्या जागेवर तो फिरला तर तें शुभ समजलें जातें. ( अश्वाचें संज्ञपन, अश्वाशेजारीं यजमानपत्न्याचें उपवेशन, ऋत्विजामधील प्रश्नोत्तरें या गोष्टी ज्ञानकोश विभाग २ पृष्ठ ७८ मध्यें आल्या आहेत. ) इतर पशूंप्रमाणें अश्वाला वपा नसल्यामुळें चंद्रनामक ( त्याच्या शरीरांतील ) मेदाचा वपेच्याऐवजीं याग केला जातो. वपायागानंतर ऋत्विजाकडून यजमानाला अभिषेक केला जातो. याप्रमाणें सूत्रांतील अश्वमेध यज्ञाचा प्रयोग आहे.

पुराणांत जैमिनी कृत अश्वमेध नांवाचा एक ग्रंथ असून त्यांत पंडुपुत्र धर्मराज यानें केलेल्या अश्वमेधाचें वर्णन आहे. त्यांत विधिसंबंधीं गोष्टी पुढीलप्रमाणें आहेत. भारतीय युद्धांत घडलेल्या हिंसारूप पापक्षालनार्थ त्यानें अश्वमेध केला. त्यानें चैत्री पौर्णिमेस दीक्षा ग्रहण करून अश्व सोडला, संवत्सरानें तो अश्व परत आल्यावर त्या अश्वाला व त्याच्या रक्षकांना धर्मराज सामोरा गेला. त्याच्या यज्ञांत व्यास ऋषि अध्वर्यु व बकदाल्भ्य ब्रह्मा होता. त्याचा यज्ञमंडप आठ द्वारांचा होता व त्यांत आठ कुंडें व तीन वेदी होत्या. बकदाल्भ्याच्या अनुज्ञेनें धर्मानें अश्वमेधास जोडून श्येन चिति केला त्याच्या प्रथम प्रस्ताराच्या इष्टका ( विटा ) चारशें होत्या. श्येनाच्या उजव्या पंखासाठीं एकशें चव्वेचाळीस व तितक्याच डाव्या पंखाकरितां इष्टका मांडल्या होत्या; शंभर विटांनीं पुच्छ बनविलें होतें आणि एकवीस विटांनीं मुख ( शीर ) बनविलें होतें. याप्रमाणें दर एकाच्या दुप्पट दुसरा असे पांच थर मांडले होते. अश्वाला यूपास बांधण्यापूर्वीं व्यासाच्या आज्ञेवरून चौसष्ट दंपतींनीं आणिलेल्या उदकानें त्याला मंगल स्नान घातलें. यूपास बांधलेल्या ठिकाणींच भीमानें अश्वास तरवारीनें मारिलें अश्वाला मारिल्यावर त्याच्या शरीरांतुन मांस न निघतां कापूर निघाला व त्याचें द्रव्यानें व्यासानें अग्नींत हवन केलें इत्यादि

वरील विधींत अश्व परत येण्यापूर्वीं दीक्षा ग्रहण करणें; यज्ञमंडपांत आठ अग्निकुंडें व तीन वेदी असणें, चौसष्ट जोडप्यांनीं आणिलेल्या उदकानें अश्वाला मंगल स्नान घालणें; यूपास बांधिलें असतांच अश्वाला तरवारीनें मारणें; अश्व शरीरांतून निघालेल्या ( मांसाऐवजीं ) कापराचें द्रव्यानें हवन करणें इत्यादि गोष्टी श्रौत धर्माशीं विसंगत दिसतात.

जैमिनीय अश्वमेध ग्रंथांत कथेच्या अनुरोधानें पूर्वी दाशरथी रामचंद्रानें केलेल्या अश्वमेधाचा व धर्माश्वमेधाच्या समकालीनच मयूरध्वज नामक राजानें केलेल्या अश्वमेधाचा उल्लेख आला आहे. परंतु त्यांत विधिविषयक अशा विशिष्ट गोष्टींचा उल्लेख आलेला नाहीं.

महाभारतांत आश्वमेधिक पर्वांत धर्मराजानें केलेल्या अश्वमेधांत पुढील विधिविषयक गोष्टींचा उल्लेख येतो. चैत्री पौर्णिमेस संकल्प करून अश्व सोडणें, व त्याचवेळीं दीक्षा ग्रहण करणें. माघी पौर्णिमेस अर्जुन अश्वासह परत येतो. सद, आग्नीध्रीय, पत्नीशाला इत्यादि यज्ञमंडपांतील पोटभाग तयार करणें. यज्ञांतील ‘ स्फ्य ’ नामक उपकरण सुवर्णाचें प्रवर्ग्य व सोमाभिषव ( सोम कुटणें ) याचा उल्लेख, यूपास वस्त्र गुंडाळणें, शोभेसाठीं सुवर्णाचे ( जरूरीपेक्षां ) जास्त यूप पुरणें, अश्वाबरोबर इतर पशूंचें उपाकरण करणें, श्येन चिती करणें, त्यांतील इष्टका ( विटा ) सुवर्णाच्या असणें; मृत अश्वाजवळ राजपत्नीनें शयन करणें, अश्वाची वपा काढून हवन करणें, अश्वमांसाचें सर्व ( १६ ) ऋत्विजांनीं अग्नींत हवन करणें. यांतील बहुतेक गोष्टी सूत्रांतील विधींशीं जुळण्यासारख्या आहेत. सुवर्णाचा स्फ्य; सुवर्णाच्या इष्टका; अश्वमांसाचें सर्व ऋत्विजांनीं हवन करणें. या गोष्टी सूत्रोक्त श्रौत धर्माविरुद्ध आहेत.

वाल्मिकी रामायणांत दशरथ राजानें पुत्र प्राप्तीसाठीं अश्वमेध यज्ञ केल्याचा उल्लेख आहे. ( १.१३ ) त्यांतील विधीविषयक गोष्टी भारतांत उल्लेखिलेल्याप्रमाणेंच असून सूत्रोक्त श्रौत धर्माशीं जुळणाऱ्या कांहीं जास्त गोष्टींचा उल्लेख आहे. उदाहरणार्थ—सुत्या ( सोमाचें हवन ) तीन दिवस करणें:—पहिल्या दिवशीं ज्योतिष्टोम दुसऱ्या दिवशीं उक्थ्य व तिसऱ्या दिवशीं अतिरात्र या क्रतूंचें अनुष्ठान करणें, राजमहिषीचें मृत अश्वासमीप शयन. राजमहिषींचा सूत्रोक्त नांवानें उल्लेख इत्यादि.

धर्माच्या अश्वमेधावरील ग्रंथांत जैमिनीचा अश्वमेध सुप्रसिद्ध व सुरस कथात्मक असा आहे. भाविक हिंदु लोक हें पुराण मोठ्या आवडीनें वाचतात. इतर पुराणांप्रमाणें हें गारुड मंत्रपुराणें न भरतां मनोरंजक उपकथा यांत गोवून तें सामान्य आबालवृद्धांस प्रिय असेंच रचण्यांत आलें आहे. या अश्वमेध पुराणांतील विषय पुढीलप्रमाणें:—

जै मि नी अ श्व मे ध— अध्याय १ ला—गोत्रहत्येचें क्षालन करण्यास उपाय कोणता, असा प्रश्न धर्मराजानें व्यासास केला असतां, त्यांनीं त्यास अश्वमेध करण्यास सां-

मन दिलें, व सर्व शंकांचें निरसन करून क्रतूला योग्य असा अश्व कोठें आहे हेंहि त्यास सांगितलें.

अ ध्या य २-५—कृष्ण भीमाचें धैर्य पाहाण्यासाठीं मुद्दाम अश्वमेध न करण्याविषयीं सल्ला देतो व भीमाची विनोदानें हेटाळणी करतो, तेव्हां भीमहि त्यास विनोदी उत्तर देतो. भीम, वृषकेतु ( कर्णपुत्र ) व मेघवर्ण ( घटोत्कच पुत्र ) हे यज्ञाश्व आणण्याकरितां यौवनाश्वाच्या राज्यांत गेले व तेथें बलाढ्य यौवनाश्व राजाला जिंकून अश्व हरण केला.

अ ध्या य ६-७—यौवनाश्व राजा परिवार व प्रजा यांसहित पांडव व कृष्ण यांच्या दर्शनाकरितां आला. अश्वमेधाच्या समारंभाची तयारी सुरू झाली. धर्मानें व्यासाकडून मरुत्तयज्ञाची माहिती मिळविली.

अ ध्या य ८-९—व्यासाचा धर्मास आचार्यलक्षणाविषयीं उपदेश. नवव्या अध्यायांत कृष्णाच्या भोजनांतील प्रकार सविस्तर वर्णन केले आहेत. त्या वेळच्या भोजनांतील पदार्थ थेट हल्लींप्रमाणें होतेसें दिसतें. सत्यभामा व देवकी या सास्वासुनांत कृष्णाच्या गुणावगुणांविषयीं चाललेला वाद मोठा मनोरंजक वाटतो.

अ ध्या य १०-१२—कृष्णाला यज्ञाला आमंत्रण, त्याचें प्रजापरिवारासहित हस्तिनापुरीं आगमन, त्याचा तेथें सर्व दर्जाच्या लोकांनीं केलेला अपूर्व सत्कार, कृष्णवैरी अनुशाल्वानें हस्तिनापुरांत या पाहुण्यांच्या गडबडींत यज्ञाश्वाचें केलेलें हरण

अ ध्या य १३-१४.—भीमकृष्णासहि जर्जर करून सोडणाऱ्या अनुशाल्वाला जिंकून बाल वृषकेतूनें त्याला कृष्णाच्या पायांवर घातलें, त्या वेळीं त्याची इतक्या वेळ गुप्त असलेली कृष्णभक्ति प्रगट झाली, व तो यौवनाश्वाप्रमाणें पांडवांना मिळाला. विधिपूर्वक घोडा सोडण्यांत आला. अर्जुनाला त्याचा पालक म्हणून सैन्यासह पाठविलें माहिष्मति नगरींत अश्वहरण.

अ ध्या य १५—माहिष्मतीच्या नीलध्वज राजाचा पराभव. त्याच्या स्त्रीनें गंगेला, अर्जुनानें तुला निपुत्रिक केलें ( भीष्म मारून ) असें चिथविल्यावरून तिनें अर्जुनाला दिलेला शाप. त्या शापाचा परिणाम असा होतो कीं पुढें बभ्रुवाहनयुद्धांत अर्जुन गतप्राण होतो.

अ ध्या य १६—एका शिलेला अश्वाचा स्पर्श होऊन तो तिलाच वज्रलेप होऊन राहिला, तेव्हां अर्जुनानें सौभरी ऋषीला कारण व उपाय विचारला त्यानें शिलारूपी चंडीची कथा सांगून शिलामुक्त होण्याचा उपाय सांगितला. त्या योगानें अश्व मुक्त होऊन चंडीचीहि शिलारूपापासून मुक्तता झाली.

अ ध्या य १७-२०.—सुधन्व्याची कथा—सुधन्व्याच्या पित्याच्या राज्यांत एकपत्नीव्रत कडक रीतीनें पाळलें जाई. पितरांचा उद्धार करण्याकरितां स्त्रीला पुत्रप्राप्ति करून देऊन सुधन्व्याला रणांगणात येण्यास वेळ लागला, तेव्हां सत्यव्रत पाळण्यासाठीं हंसध्वजानें त्याला तापलेल्या तेलांत टाकलें, पण त्याला हरिभक्तीनें तारलें. सुधन्व्याच्या एकपत्नीव्रताच्या पुण्याईनें तो कृष्णार्जुनालाहि भारी झाला; पण कृष्णानें आपल्या दैवीशक्तीनें त्याचा वध केला. त्याचा भाऊ सुरथ याचाहि अशाच रीतीनें वध केला.

या कथेंत हा एक मजा वाटते कीं, कृष्णार्जुनाचे शत्रु त्याच्याविषयीं मनात दृढभक्ति बाळगून लढतात. या कथेंत अर्जुनाचा पराक्रम तर मुळींच दिसत नाहीं; कृष्णमध्यस्थीनें केवळ त्याला विजय मिळतो. उलट त्याच्या शत्रूंच्या शौर्याचें कौतुक करावेंसें वाचकास वाटतें.

अ ध्या य २१-२२.—स्त्रीराज्यात अश्वप्रवेश—प्रमिलेशीं युद्ध—ती स्त्री व तशांतून अजिंक्य म्हणून अर्जुनानें तिला वरिलें !—भीषण राक्षसाचा पराजय—बभ्रुवाहनाच्या मणिपुरांत प्रवेश.

अ ध्या य २३-२४—बभ्रुवाहन पितृभक्तीनें अर्जुनापुढें नम्र झाला असतां अर्जुनानें त्याचा अपमान केला, तेव्हां बभ्रुवाहनानें पित्याशीं दारुण युद्ध केलें व पित्याला जर्जर करून सोडिलें

अ ध्या य २५-३६—कु श ल वो पा ख्या न.—रावण वधानंतर रामाचा अयोध्येंत प्रवेश—लोकापवादाकरिता सीतेचा त्याग—वाल्मीकाश्रमीं तिचें गमन—कुशलवजन्म—रामाश्वमेध—लवानें अश्व हरण केला—लवकुशानीं रामसैन्याबरोबर केलेलें घनघोर युद्ध—रामाचा पराभव—सीता व पुत्र यांचा रामानें केलेला स्वीकार

प्रस्तुतवर्णन वाल्मीकिरामायण कथेशीं विसंगत आहे. पण पुढील काळांत ही कथा फार लोकप्रिय झाली आहे.

अ ध्या य ३७-४० —बभ्रुवाहनानें पांडवसैन्याचा नाश करून अर्जुनासहित सर्व योद्ध्यांना मारलें. त्याच्या माता चित्रांगदा व उलूपी यांना भर्तृवधाबद्दल अतिशय शोक होऊन त्या पुत्राला दूषणें देऊं लागल्या बभ्रुवाहनानें नागांबरोबर युद्ध करून मृतसंजीवकमणि अर्जुनादिकांना जिवंत करण्यास आणला; पण त्यापूर्वी अर्जुनाचें शीर एका नागानें पळविलें. कृष्णानें आपली ब्रह्मचर्याची ( ? ) पुण्याई खर्च करून तें शीर आणविलें. याप्रमाणें अर्जुनादि वीर जिवंत झाले व पुनः पूर्ववत् अश्वरक्षणार्थ निघाले.

अ ध्या य ४१-४६—ताम्रध्वजानें अश्वग्रहण करून कृष्णार्जुनांशीं युद्ध केलें, व त्याचा चांगलाच पराभव केला, तेव्हा कृष्णार्जुन गुरुशिष्याच्या वेषानें ताम्रध्वजाचा पिता मयुरध्वज याच्याकडे जाऊन त्यांनीं त्याचें अर्धे शरीर मागितलें व तें मयुरध्वज देऊं लागला, तेव्हां आपलें खरें रूप प्रगट करून त्याच्यावर अनुग्रह केला व अशा रीतीनें घोडा सोडविला.

अ ध्या य ४७-४९—वीरवर्म्यानें यज्ञाश्वाचें हरण केलें—त्याचा जामात यमधर्म, याजबरोबर पांडवांचें युद्ध—यमधर्म वीरवर्म्याचा जामात कसा झाला यासबंधीं कथा, या कथेंतच कोणतें पाप केलें असता कोणता रोग होतो व तो कोणतें

दान केले असतां जातो याचें सविस्तर विवरण आहे—वीर-वर्म्यानें युद्धांत जय मिळविला व अर्जुन पौरुषरहित झालेला पाहून अश्व सोडून दिला व त्याचा सखा बनला.

अ ध्या य ५०-५८—चंद्र हा सो पा ख्या न—चंद्रहासाचा निराश्रितपणा—त्याचें गोकुळच्या वाडांतून सुटका—त्याची विलक्षण हरिभक्ति—त्याचा दिग्विजय—त्याचा पूर्व वैरी धृष्टबुद्धि प्रधान याचा पुनः त्याला मारण्याविषयींचा घाट—मोठ्या चमत्कारिक योगानें चंद्रहास व धृष्टबुद्धिच्या विषया यांचें लागलेलें लग्न—धृष्टबुद्धीचा पुत्र चंद्रहासाला मारण्याचा डाव; पण त्या डावांत त्याचा पुत्र मदन हाच मारला गेला धृष्टबुद्धीचा आत्मवध—चंद्रहास दिव्य करून या पितापुत्रांना उठवितो झाला—चंद्रहासाला राज्यप्राप्ति—शालिग्रामभक्तिमहिमा.

अ ध्या य ५९—चंद्रहासानें श्रीकृष्णभक्तीमुळें पांडवा-बरोबर युद्ध केलें नाहीं त्याचा गौरव करून आपण अश्व रक्षणार्थ बरोबर निघाला.

अ ध्या य ६०-६४—मार्गांत बकदाल्भ्यमुनीची भेट-बयद्रथाच्या नगरीस गमन, व तेथें दुःशीलेचें सांत्वन—वर्षभर पृथ्वीभ्रमण केल्यानंतर हस्तिनापुरीं पुनरागमन—यज्ञाला सुरवात, इष्टकचयन, चितिरचना, जलाभरण, अश्वबंध व त्याच्या शरीराचें हवन, अवभृथस्नान, पुरोडाशभक्षण इत्यादि यज्ञ ग्रहण्यापूर्वी अश्वमेधाची समाप्ति.

अ ध्या य ६५—यज्ञानंतर मुनींना घातलेल्या भोजनाचें वर्णन—कलियुगांत कशा प्रकारची स्थिति असेल याचें वर्णन

अ ध्या य ६६-६८—या अध्यायांत एका दाणे वेंचून उदरनिर्वाह करणाऱ्या धार्मिक कुटुंबाची कथा आहे. दुष्का-ळांत कसेतरी पोटभर सातू मिळाले असतां ते परस्परांत वाटून खाणार इतक्यांत एक अतिथि आला. त्याची एका घासानें क्षुधा शांत होईना, तेव्हां सर्वांनी आपले वाटे आनं-दानें त्यास अर्पण केले यामुळें त्या कुटुंबास दिव्य लोकांची प्राप्ति झाली. शेवटच्या अध्यायांत अश्वमेधफलश्रुति आहे.

म रा ठी अ श्व मे ध ग्रं थ —मराठी भाषेंत अश्वमेध विषयावर कोणकोणते ग्रंथ आहेत ते महाराष्ट्र सारस्वत-कारांनीं दिले आहेत. "नामा पाठकाचा" अश्वमेध" ग्रंथ बराच मोठा असून त्यांत ९५ प्रसंग आहेत. याची भाषा व कला अगदीं साधारण प्रतीची असल्यामुळें हा फारसा प्रचारांत असलेला दिसत नाहीं. हा प्रचारांत नसण्याचें दुसरें कारण श्रीधरानेंहि एक अश्वमेध ग्रंथ रचिला आहे व तो फार रसाळ असल्यानें अश्वमेध म्हणजे सामान्यतः श्रीधराचाच अश्वमेध समजतो

तिसरा अश्वमेध कृष्णदास नांवाच्या एका कवीचा आहे. त्याचा 'दासोपंत-पुस्तक' म्हणा आहे यांतला 'नारायण विठ्ठ' यानें लिहिला आहे. सहावा कल्याणीबनाचा गोविंद विष्णु-दासाचा सातवा व आठवा रामदासी परंपरेंतील भीमस्वामी

व विठ्ठलस्वामी यांचे आहेत. याशिवाय शिवकल्याणाचा एक अश्वमेध आहे असें म्हणतात. वाङ्मय लेखांत दिलें आहे.

**अश्वसेन**—१ कद्रूपुत्र तक्षक नामक नागाचा पुत्र अर्जु-नानें खांडववन अग्नीस दिलें, त्याकाळीं तें वन पेटलें असें पाहून हा, बाळ असल्यामुळें, याची माता यास मुखांत धरून बाहेर निघूं लागली, तें पाहून अर्जुनानें तिला मारलें, पण हा मात्र वाचला तो तें वैर मनांत धरून, अर्जुनाचें कर्णाशीं युद्ध चाललें असतां, हा कर्णाच्या बाणावर अर्जुनास मारण्या करितां गुप्त रूपानें जाऊन बसला होता. परंतु कृष्णानें तें जाणून, अर्जुनाच्या रथाचे अश्व त्या संधीस त्यानीं गुडघे भूमीस टेंकावे, असें खालीं दावल्यामुळें, अर्जु-नाच्या कंठावर यानें पडावयाचें तें चुकून, मुगुटावर पडला, तेणें करून मुगुट तत्काळ भस्म झाला.

—२ सलेस कृष्णापासून झालेला पुत्र हा महारथी होता.

**अश्विन, अश्विनीकुमार**—या अति पुरातन दोन देवता स्वतंत्र आहेत की, एखाद्या सृष्टिव्यापाराचें निदर्शक म्हणून आहेत हें निश्चित नाहीं याच्या वैदिक स्वरूपाचें वर्णन 'वेदविद्या' (ज्ञानकोश प्रस्तावनाखंड विभाग दुसरा पा. ३२०-३२९) ग्रंथांत सविस्तर दिलें आहे याचा उत्तर महाभारत व पुराणें यांतहि येतो

अश्वीनीरूपधारी सूर्यपत्नी संज्ञा, तिचे ठायीं अश्व रूपधर सूर्यापासून झालें म्हणून यास अश्विनीकुमार असें नांव पडलें हे अश्विनीच्या नासिकाद्वारें प्रकटले, म्हणून यास नासत्य असें म्हटलें आहे. हे, प्रस्तुतच्या मन्वंतरांत, सप्तविध देवांतील सहावे देव असून, देवांचे वैद्य आहेत. म्हणून यांस, यज्ञामध्यें बराच कालपर्यंत हविर्भाग नव्हे, परंतु पुढें यांस तो च्यवनमार्गवानें चालू केला.

हे दोघेहि नासत्य, अश्विनौ, दस्रौ अशा जरी साधारण नांवानें प्रसिद्ध आहेत. तरी ज्येष्ठाचें नांव नासत्य, आणि कनिष्ठाचें दस्र, अशी म्हणण्याची वहिवाट आढळते (भार. अनुशा. अ १५० श्लो. १८)

त्यांनीं अर्कपत्र भक्षण केल्यामुळें उपमन्यूस आलेलें अंधत्व त्याची गुरुसेवा व निष्ठा पाहून नष्ट केलें व त्यास ज्ञानप्राप्ति करून दिली (आदि. अ. ३), यासारखें याचें वर्णन महाभारतांत आढळतें.

**अश्विनी** (१)—एका नक्षत्राचें नांव अश्विनीच्या तारका कोणी दोन व कोणी तीन मानतात. या तीन तारका म्हणजे ग्यामा, बीटा व आल्फा एरायटीज या होत. तिहींत दोन ठळकठळक आहेत, त्यांत उत्तरेची तेजस्वी आहे आश्वि-नांत संध्याकाळीं हा पूर्वबिंदूच्या किंचित् उत्तरेस उगवतात; आश्विन महिन्यास आश्विन हें नांव याच नक्षत्रावरून मिळालें असून त्याचें कारण त्या महिन्यांत चंद्र आश्विनी नक्षत्रीं पूर्ण होतो. या नक्षत्राच्या तीन तारा मानिल्या तर त्यांनीं

आकृति घोड्याच्या तोंडासारखी दिसते अश्विनीरूपधारण करणाऱ्या संज्ञा नामक सूर्यपत्नीच्या ठायी अश्वरूपधारी सूर्यापासून दोघे अश्विनीकुमार झाले अशी कथा आहे तिचा संबंध अश्विनी नक्षत्राशी दिसतो. वेदादिकातील अश्विनौ (दोन अश्वीदेव) म्हणून ज्या प्रसिद्ध देवता (वेदविद्या पृ ३२७ पहा) त्या मूळच्या तारारूप होत असें के श बा. दीक्षित म्हणतात बहुधा शुक्र आणि गुरु यास अश्विन हे नाव प्रथम असावें अशी त्याची समजूत होती.

ऋग्वेदात 'अश्विनी' (१ ४६, ८) हा शब्द किंवा इतर संहितात अश्विनी नक्षत्रासाठीं वापरलेला 'अश्वयुज्' (५ ५४ २) हे दोनहि शब्द प्रत्येकी एक एक वेळ आले आहेत. तथापि पहिला देवपरत्वा या अर्थी व दुसरा रथास घोडे जोडणारे या अर्थी योजिलेला आहे तैत्तिरीय संहिता (४ ४, १०), तैत्तिरीय ब्राह्मण (१ ५, १) व अथर्ववेद (१९ १) यात इतर नक्षत्रांबरोबर या नक्षत्राचाहि उल्लेख आहे, पण सवत्र तो अश्वयुजौ या द्योतिषी शब्दानेंच केलेला अहे तो शब्द द्विवचनी आहे यावरून त्या काळीं या नक्षत्राच्या दोन तारकाच मानीत असत हें उघड होतें पारस्कर सूत्रात 'त्रिषु त्रिषु उत्तरादिषु स्वातौ मृगशिरसि रोहिण्याम्' असें वचन असून त्याचा व्याख्या हरदत्तानें उत्तरा, हस्त, चित्रा, उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, उत्तराभाद्रपदा, रेवती, अश्विनी अशा केली आहे सांप्रत चित्रा, श्रवण, धनिष्ठा व अश्विनी ही मुहूर्त मयांत विवाहनक्षत्रात नाहींत. महाभारतांत या नक्षत्राचें नाव अनुशासन पर्वात (अ० ६४ व ८९) सर्व नक्षत्रांबरोबर दोनदा आलें आहे. तेथें त्यासाठीं अश्वयुजौच्या ऐवजीं हल्ली प्रचारात असलला अश्विनी हा शब्द योजिलेला आढळतो

(२) सोमाच्या सत्तावीस स्त्रियातील एक तशीच अक्रूराच्या स्त्रियातील एक [ज्ञा को.]

(३) नकुल सहदेवाची माता (महाभारत, शांतिपर्व).

(४) सूर्याची अश्वरूप झालेली स्त्री व अश्विनाची माता.

**अष्ट उपद्वीप**—जम्बुद्वीपाच्या आसमंतात, क्षार समुद्रामध्यें आठ उपद्वीपें आहेत त्यांची नावें— स्वर्णप्रस्थ, चंद्र शुक्र अ. शुक्र, आवर्तन, रमणक मंदर हरिण, पांचजन्य, सिंहल आणि लंका (भाग पचम अ १९ श्लोक ३०. देवी भा अष्टम अ ११ श्लोक ३० ३२)

**अष्टक** विश्वामित्र ऋषीस, माधवीपासून झालेला पुत्र हा मोठा वेदवेदांगपारग असून यानें एकदां स्वत यज्ञ केला, त्या काळीं याच्या यज्ञास बहुत ऋषी व राजे आले होते पुढें हा यज्ञ समाप्त झाल्यावर आपले तिघे बंधू—प्रतर्दन, वसुमना, आणि शिबि, यासहित रथांत बसून, कोठें जात असता, मार्गांत नारदास पाहिल्यावरून त्यास यानें रथांत घेतलें आणि पुसू लागला कीं, स्वर्गांत गेल्यावर, आम्हां चौघातून आधीं कोण पतन पावेल तें सांगा तेव्हां नारदानें प्रथम तू, नंतर प्रदर्तन, मग वसुमना असे पतन पावाल, शिबि मात्र अढळ राहील असें सांगून त्याची कारणेंहि दिलीं (वनपर्व अ १९८)

आत्मश्लाघेनें स्वर्गांतून पतन पावलेल्या ययाति राजास यान आपलें व आपल्या बंधूचें पुण्य दान करून पुन्हा स्वर्गस्थित केलें (आदिपर्व अ ८६ उद्योग अ १२१) हा अष्टक विश्वामित्र कुलांतील प्रवरप्रवर्तक आणि ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांचा द्रष्टा होता (बुद्धपूर्वजग पृष्ठ ४८८)

**अष्टका**—आश्वलायन गृह्यसूत्रात (अध्याय २ कंडिका ४) याविषयीं पुढील माहिती आढळते —

हेमंत आणि शिशिर ऋतूंतील (मार्गशीर्ष, पौष, माघ व फाल्गुन या महिन्यातील) वद्य अष्टमीस अष्टकाश्राद्ध करावयाचें असतें या चारहि अष्टमी तिथीस चार अष्टका कराव्यात, किंवा यापैकीं एका तिथीला एकाष्टका करावी (बहुधा माघ वद्य अष्टमीस एकाष्टका करण्याची वहिवाट आहे) आधल्या दिवशीं (वद्य सप्तमीस) पितरांना ओदन, कृसर (तिळमिश्रित भात) पायस किंवा चार शरावांत अपूप 'उदीरतामवर उत्पराम' इत्यादि ऋग्वेदांतील (१० १५ १ पासून पुढें) आठ किंवा चाटतील तितक्या ऋचा म्हणून द्यावेत दुसऱ्या दिवशीं पशूच्या द्वारें किंवा स्थालीपाकानें अष्टका कराव्यात निदान बैलाला यव खाऊ घालावे किंवा चार अग्नीकडून कक्ष (वन) जाळावें पण अष्टका कल्याखेरीज राहू नये पशुकल्पाप्रमाणें पशु मारून, व प्रोक्षण आणि उपाकरण वर्ज करून त्याची वपा बाहेर काढावी व सांगितलला मंत्र म्हणून त्याचें हवन करावें नतर स्थालीपाक व अवदान भागाचे हवी (सूत्रात दिलेले मंत्र म्हणून) द्यावत व पुढे ब्राह्मणांना भोजन घालावें

दुसऱ्या दिवशीं अन्वष्टक्यश्राद्ध करावें त्याच मांसाचा एक भाग तयार ठेवावा, दक्षिणेला उतरत्या स्थंडिलावर अग्नि ठेऊन भोंवताली परिस्तरणें घालावीं, व त्याच्या उत्तरेला द्वार करावें नतर अग्नीच्या उत्तरेस मुळासकट दर्भ पसरावे व ते न हालविता त्यावर अपसव्यानें, ओदन, कृसर, पायस दधिमंथ व मधुमंथ हीं हविर्द्रव्यें ठेवावींत हा संस्कार पिंडपितृयज्ञाच्या विधीप्रमाणें करावा. नतर मधुमंथाखेरीज करून सर्व द्रव्यांचें पितरांना उद्देशून हवन करावें वरील पदार्थांखेरीज बायकांना सुरा व व आचाम (पेज) हीं द्यावींत कांहीं जण पिंड दोन किंवा सहा खाचाजवळ (कर्षूपु) ठेवितात कांहीं पूर्वेकडल्यात पितरांनां द्यावेत व पश्चिमकडल्यात बायकांना देतात याप्रमाणें माघवर्षात प्रौष्ठपद (पौर्णिमे) नंतरच्या पंधरवड्यात हा संस्कार सांगितला आहे

आग्रहायणानंतर अष्टका येतात असें पारस्करगृह्यसूत्रांत (कांड ३ कंडिका ३) उल्लेखिलें आहे शांखायन (३, १२), गोभिल (३ १०) यांतून अष्टकाविषयीं वर्णन आढळतें आश्व-

विंचवांना महाराष्ट्रात इंगळ्या म्हणतात. हे प्राणी निशाचर असतात; दिवसा खबदडी, दगड, विळे वगैरेंत पडून राहून भक्ष्य पकडण्यास रात्रीं बाहेर पडतात. माळरानावरील दगड उलथून टाकले म्हणजे त्याखालीं विंचू अगदीं हटकून सांपडतोच असें म्हटल्यास हरकत नाहीं. कोळी, किडे हें यांचें भक्ष्य होय. पुढल्या दंष्ट्राचरणांच्या चिमट्यांनीं आपलें भक्ष्य धरून व नांगीनें दंश करून त्याला मारल्यावर तोंडाशीं धरून त्यांतील रस हे शोषून घेतात. क्वचित् प्रसंगीं मोठे विंचू लहान विंचवांनांहि असे शोषून घेतांना आढळले आहेत. यांच्या पुष्कळ जाती आहेत.

बाह्य लक्षणें:—यांचा आकार साधारणपणें शेवड्यासारखा असतो असें म्हटल्यास चालेल. उदराचा शेवटचा भाग अतिशय अरुंद होऊन जवळजवळ त्याचें शेपूटच होतें या शेपटीच्या शेवटीं नांगी असते. पूर्व उदराला सात व पश्चिम उदराला पाच वलयें असतात; म्हणजे एकंदर उदर बारा वलयाचें झालेलें असतें. गुदद्वार शेपटीच्या शेवटच्या वलयाच्या खालीं उघडतें.

मुख अतिशय लहान असून त्यावर एक ऊर्ध्वोष्ठ (लेब्रम) असतो. मुखाच्या दोन्ही बाजूनें शृंगचिमटे असतात त्याच्या पाठीमागें फार मोठे दंष्ट्राचरणाचे चिमटे झालेले असतात. ते खेंकड्याच्या चिमट्याप्रमाणेंच दिसतात हे चिमटे ज्यांच्या-वर लागलेले असतात त्यानाच दंष्ट्राचरण असें म्हणतात. व याचे सहा भाग असतात. या दंष्ट्राचरणाचे पायथ्याचे भाग एकमेकावर घासून त्यांनीं दंष्ट्रेचें कार्य केलें जातें. यानंतर पायाच्या चार जोड्या लागतात. प्रत्येक पायाचे सात विभाग असून, शेवटीं वाकडी नखी असते. हीं सर्व गात्रें शीर्ष-वक्षाला जोडलेलीं असतात.

पूर्व उदराच्या पहिल्या वलयाच्या अधोवलयार्धा(स्टर्नम्)-वर जननेंद्रियद्वारें असतात. दुसऱ्या वलयाच्या अधो-वलयार्धावर 'कंकतिका' ( पेक्टाईन )असतात. याचा आकार फणीच्या दात्याप्रमाणें असतो. याचें कार्य काय असावें याविषयीं अजून निश्चित असें कांहींच ठरलेलें नाहीं पूर्व उदराला याशिवाय कांहीं गात्रें नसतात. चवथ्या, पाचव्या आणि सहाव्या अधोवलयार्धांवर श्वसनरंध्रें( स्टिग्माटा ) अस-तात शीर्षवक्षाच्या आत व ज्ञानव्यूहाच्या वर एक तरुणास्थी ( कार्टिलॅजिनस )चा तबकडीसारखा सांगाडा असतो. याला अधोवलयार्धांतःप्रसर ( एंडोस्टर्नाइट ) म्हणतात. स्नायूंचा उगम होण्याच्या कामीं याचा उपयोग होतो.

शें व डा, झु र ळ व विं चू या गा त्रां च्या ची तु ल ना:-

| शेंवडा | झुरळ | विंचू |
| --- | --- | --- |
| लघुशृंग ( अँटेन्यूल ) | शृंग ( अँटेना ) | बनलेलें नसतें |
| बृहद्शृंग ( अँटेना ) | बनलेलें असतें | शृंग चिमटा( केलि-सेरी ) |
| दंष्ट्रा ( मॅंडिबल्स ) | दंष्ट्रा | दंष्ट्राचरण (पेडिपॅल्पी) |
| प्रथम पार्श्वोष्ठ (फर्स्ट मॅक्सिली ) | प्रथम पार्श्वोष्ठ | पायांची पहिली जोडी |
| द्वितीय पार्श्वोष्ठ ( सेकंड मॅक्सिली ) | ,, | ,, दुसरी ,, |
| प्रथम ओष्ठपाद (फर्स्ट मॅक्सिली पेडी) | पायांची पहिली जोडी | ,, तिसरी ,, |
| द्वितीय ओष्ठपाद (सेकंड मॅक्सिली पेडी) | " दुसरी " | ,, चौथी " |
| तृतीय " ( थर्ड ) | " तिसरी " | ... |

पचनेंद्रियव्यूह ( फॅरिंक्स )—अरुंद अशा मुखानंतर गल-विवर लागतें. याला पुष्कळ स्नायू जोडलेले असतात. या स्नायूंच्या योगानें हें लागेल तितकें ताणलें जातें. भक्ष्यांतील रस शोषण्याचें कार्य याच्याच योगानें होतें यानंतर अन्न-नलिका लागते. अन्ननलिकेच्या शेवटीं जेथें पचनेंद्रियनलिका रुंदावते, तेथें लालापिंडाच्या नळ्या येऊन मिळतात. या-नंतर 'मध्यांत्र' ( मेसेंटरॉन ) लागतें. ही एक लांब व रुंद नळी असते. हिच्यामध्यें पांच अरुंद नलिकांच्या जोड्या उघडतात व त्या ज्या भागांतून येतात त्याला यकृत असें समजतात. तरी ह्या भागाचा उपयोग यकृताप्रमाणें होतो हें निश्चित नाहीं.

रुधिराभिसरणव्यूहः—हृदयाची एक लांब नळी असून ती पूर्व उदराच्या वरच्या बाजूस हृत्कलेनें आच्छादित असी असते हिच्या आत आडवे पडदे असून त्याच्यायोगानें या नळीचे आठ भाग झालेले असतात या प्रत्येक भागावर छिद्रांची (ऑस्टिआ)एक जोडी असते व त्याच्यातून रक्त आत जातें हृद-याच्या पुढील व मागील बाजूनीं धमन्या जोडलेल्या अस-तात, याना पूर्वधमनी व पश्चिमधमनी असें म्हणतात. या-शिवाय हृदयाच्या प्रत्येक भागातून धमन्यांच्या आडव्या जोड्या जातातच. पूर्व धमनीच्या दोन फांद्या होऊन अन्न-नलिकेच्या दोन्ही बाजूंनीं जाऊन त्या खालीं येतात व ज्ञान-कंदाच्या सांखळीवर मिळून त्यांची एक धमनी होऊन ती मागें दिशा घेत वळते. निरनिराळ्या भागांतून रक्त उदर-तलावरील शिरामार्गांत येऊन तेथून तें फुप्फुस बटव्यामध्यें जातें. याच्यातून तें पुष्कळशा शिरांच्या योगानें हृत्कलाविव-रामध्यें (पेरिकार्डिॲल सिनस) जातें व नंतर छिद्रांतून हृदयांत जातें अशा रीतीनें रुधिराभिसरण सारखें चालत राहतें.

श्वसनेंद्रियव्यूहः—या प्राण्यांत श्वसनेंद्रियें फुप्फुसकोश(पल्म-नरी सॅक्स )अथवा फुप्फुसबटवे यांच्या रूपानें असतात. याच्या बाहेरच्या बाजूवरील श्वसनरंध्रासंबंधीं वर उल्लेख केला आहे. एकाद्या पुस्तकातील पानाप्रमाणें किंवा बटव्याच्या आतील खणाप्रमाणें यांच्यांत पापुद्रे असतात व त्या पापुद्र्यांच्या मध्यंतरीं हवा शिरून रहाते तेव्हां पापुद्र्याच्या आतील अभि-सरण पावणाऱ्या रक्तालाहि हवा लागून रक्ताची व प्राणवायूची देवघेव होते व रक्त शुद्ध होतें.

ज्ञानेंद्रियव्यूहः—ह्याची रचना झुरळ अगर शेवडा याच्याच धरतीवर असते. प्रथम दोन ज्ञानकंदांचा मेंदुवत् गोलक झालेला असून त्यापासून नेत्रांना ज्ञानरज्जू जातात. नंतर अन्ननलिकेच्या दोन्ही बाजूंनी दोन पार्श्व ज्ञानरज्जू निघून खालीं अन्ननलिकावर ज्ञानकंदाला (अन्ननलिकाधो-ज्ञानकंदाला) मिळाल्यावर त्याची एक ज्ञानरज्जुची सांखळी बनते व ती पुढें शरीरांत जाते. या पार्श्वज्ञानरज्जूपासून व अन्ननलिकाज्ञानकंदा (सब-एसोफेजिअल गँग्लिऑन) पासून पहिल्या सहा गात्रांना ज्ञानरज्जू जातात

यांची विशिष्ट ज्ञानेंद्रियें म्हटलीं म्हणजे नेत्र व कंकतिका होत. यांना चार डोळे असतात; दोन बाजूंला व दोन मध्यमार्गी.

जननेंद्रियव्यूहः—नरांत मुष्का (टेस्टीज) च्या दोन उभ्या जोड्या असून त्या आडव्या फाट्यांनीं एकमेकांस जोडलेल्या असतात. याच्या मध्यमार्गी शुक्रस्रोतस (व्हॅसडेफेरन्स) असून त्याच्या शेवटीं शिश्न (पेनिस) असतें. मादीमध्यें अंडकोशाच्या (ओव्हरी) तीन लांब नलिका असून त्याहि आडव्या फाट्यांनी जोडलेल्या असतात. अंडस्रोतसें (ओव्हिडक्ट) पूर्वउदराच्या अधोवलयाधोच्या मध्य तबकडीवर उघडतात. विंचू जरायुज आहेत. अंडी फलद्रुप झाल्यावर विंचवाचीं पोरें अंडस्रोतसांत विकास पावतात व तीं पूर्ण स्वरूपांत बाहेर पडतात.

येणेंप्रमाणें विंचवाविषयीं सामान्य माहिती झाली. या अष्टपाद वर्गाचे आठ गण पाडलेले आहेत. त्यांपैकीं वृश्चिक गणांत विंचु येतो. वर सांगितल्याप्रमाणें कोळी हा याच वर्गातील प्राणी होय. तो कोळी गणांत येतो. त्या गणाचीं लक्षणें खालील प्रमाणें आहेत.

कोळी गण (अरेनिआयडा).—या गणांत सर्व प्रकारचे कोळी येतात. उदरास वलयें नसून तें मृदु असतें, व त्याच्या मध्यें व शीर्षवक्षामध्यें एक करकोचा बनलेला असतो या प्राण्यांचे डंखचिमटे चांगले पूर्णपणें बनलेले नसतात व त्यांना विषपिंड लागलेले असतात. गात्रांची दुसरी जोडी म्हणजे दंष्ट्राचरणाची साधी असते व ही नरांत गर्भधारणा घडवून आणण्यास योग्य अशी झालेली असते. उदराच्या शेवटीं तंतुकर्तकप्रसर (स्पिनेरेट) असतात. यामधून जाळ्याचे तंतु निघतात. डोळे आठ असतात. यांपैकीं तसेच काही दुसरे गण खालीं धरलेले आहेत.

विषकोळी गण (फालेनजिडा)—कित्येकजण या वर्गा-तील प्राण्याना कोळीच समजतात. तथापि हे प्राणी अगदीं निराळे होत. यांच्या शीर्षवक्षाला वलयें नसतात. त्या भागाच्या व उदराच्या मध्यंतरीं करकोचा नसल्यामुळे हा पूर्वभाग व उदर निराळे ओळखूं येत नाहींत. यांचे पाय लांब व नाजूक असतात. उदराला वलयें असतात. तंतुकर्तक-प्रसर नसतात. हे प्राणी निशाचर नसतात. कडक हिवाळ्या- [illegible] हे प्राणी मरतात, तथापि त्यांचीं अंडीं हिवा-ळ्यात टिकतात व त्यांपासून पुढें दुसरे प्राणी तयार होतात. या गणात विषकोळी अथवा "हार्वेस्टमेन" येतात.

गोचीड गण (अॅकारायना किंवा अॅकारायडा)—गोचीड, हे खरजेचे, लोण्यातले वगैरे कीटक या सदराखालीं येतात. यांच्यातील बरेचसे प्राणी परोपजीवी असतात. ते रोगकारक आहेत. यांचे शरीर वलयांकित नसतें मुखाजवळील अवयव चावण्याजोगे अथवा भोंसकून शोषण करण्याजोगे झालेले असतात.

खडगलाङ्गूल गण (झायफोसुरा).—यात लिम्यूलस अथवा भीम कर्कटक (किंगक्रॅब) येतात. यांचा हॅपूट कढईप्रमाणें असते. हे प्राणी पाण्यांत असतात तरी पण किनाऱ्यापासून दूर नसतात. शरीरावर कठिण कवच असतें. उदराचे पूर्व व पश्चिम असे दोन भाग असतात पूर्वभागाला पर्ण जलश्वासेंद्रियाचे झुपके लागलेले असतात. हे अंडीं पाण्यात घालतात व त्यांचीं फलद्रुपता पाण्यातच होते.

*एम. जी. येवलेकर व वि. ना. हाटे*

अष्टप्रधान—शिवपूर्वकालीन इतिहास.—अष्टप्रधान व शिवाजी या दोन शब्दांचें इतकें साहचर्य आहे कीं अष्टप्रधानविशिष्ट राज्यपद्धति म्हणताच शिवकालीन राज्य-पद्धति डोळ्यासमोर उभी रहाते. अष्टप्रधान या अर्थाची शब्दरचना महाभारतांतहि आढळते. शांतिपर्व अध्याय ८५ मध्यें 'अष्टाना मंत्रिणा मध्ये मंत्र राजोपधारयेत्' असें एक वचन आहे, त्यावरून अष्टप्रधान ही संस्था फार जुनी असावी असें रा. ब. चिं. वि. वैद्य महाभारताच्या उपसंहारात म्हणतात; पण हे आठ मंत्री कोणते हे महाभारतांत कोठेंहि सांगितलेलें नाहीं. सभापर्व अध्याय पाच यांत तर एके ठिकाणीं सात 'प्रकृतींचा' उल्लेख आला आहे. येथेंहि त्या सात 'प्रकृती' कोणत्या त्यांचे वर्णन नाहीं; परंतु वैद्यांच्या मतें मुख्य सचिव, सेनापति, पुरोहित, हेर, दुर्गा-ध्यक्ष, ज्योतिषी व वैद्य हे अधिकारी राजाला असलेच पाहि-जेत. कथंदप्रायांतील एका श्लोकांत अठरा अधिकारी सांगितले असून त्यांचीं नावें टीकाकारानें (१) मंत्री अथवा मुख्य प्रधान, (२) पुरोहित, (३) युवराज, (४) सेनापति अथवा चमूपति (५) द्वारपाल अथवा प्रतिहारी, (६) अन्तरवेदाक किंवा अन्तर्गृहाचा अधिकारी, (७) कारागृहाचा अधिकारी, (८) कोशाध्यक्ष, (९) न्यायाधिकारी, (१०) प्रदेष्टा, (११) राजधा-नीचा अधिकारी, (१२) काम नेमून देणारा अधिकारी, (१३) धर्माध्यक्ष, (१४) सभाध्यक्ष अथवा न्यायाधिकारी, (१५) दंडा-ध्यक्ष, (१६) दुर्गाध्यक्ष, (१७) सीमाध्यक्ष, व (१८) अरण्याध्यक्ष, अशी दिली आहेत. दुसऱ्या एके ठिकाणीं १४ च अधि-कारी सांगितले आहेतः—(१) देशाधिकारी, (२) दुर्गाधिकारी, (३) रथाधिपति (४) गजाधिपति, (५) अश्वाधिपति, (६) शूरसैनिक (पदातिमुख्य), (७) अंतःपुराधिपति, (८) अन्नाधिपति, (९) शास्त्राधिपति, (१०) सेनानायक, (११) आयव्ययाधिपति, (१२) धनाधिपति, (१३) गुप्तहेर, (१४) मुख्यकामगार अशीं त्यांचीं नावंहि दिली आहेत (महाभारताचा उपसंहार, पान २९२)

महाभारताप्रमाणें मनुस्मृतींतहि राजानें सात किंवा आठ सचीव नेमून त्याच्या सल्ल्यानें चालावें असें नुसतें मोघमच म्हटलें आहे. (अध्याय ७. श्लोक ५४–५७.) त्यानंतर मुसुलमानी अमदानींतहि, त्यांच्या राज्यपद्धतीचें जें स्वरूप साधारणतः ग्रंथकारांनी दिलें आहे त्यावरून तेव्हां शिवाजीसारखें प्रधानमंडळ नव्हतें असें दिसून येतें. प्रधानमंडळ स्थापन केल्याबरोबर त्याच्या वागणुकीसाठीं कांहीं नियम बांधून राजानें स्वतःच्या अधिकारापैकीं कांहीं विशिष्ट अधिकार पृथक्पणें व एकवटून त्या प्रधानमंडळास द्यावे लागतात. परंतु अशा रीतीनें आपली सत्ता कमी करून आपल्या अनियंत्रित वर्तनावर प्रधानमंडळाच्या जुटीचा दाब बसवून घेण्या इतके उदार राज्यकर्ते मुसुलमानांत झालेले दिसत नाहींत. या सर्व गोष्टींचा विचार करतां शिवाजीनें आपली अष्टप्रधानाची व्यवस्था प्राचीन हिंदु कल्पनांवर बसवून तींत स्वतःच्या अकलेनें व जवळच्या मंडळींच्या सल्ल्यानें कालदेशवर्तमानास जरूर ते फेरफार करून नवीनच केली असावीसें वाटतें.

शि वा जी ची व्य व स्था.—अष्टप्रधानाची नेमणूक शिवाजीनें केव्हां केली हें निश्चित सांगता येत नाहीं. स्वराज्याचा उद्योग आरंभल्यावर जसजशी जरूर भासत गेली तसतसे अधिकार निर्माण केलेले दिसतात. इ. स. १६४० पासून १६४५ च्या दरम्यान मावळांतील राज्यव्यवस्था करतांना कांहीं अधिकारी निर्माण झाले. देशमुखांना अनुकूल करून घेण्यांत जो फार उपयोगी पडला, त्यास डबीर म्हणजे उत्कृष्टभिष्ट हा हुद्दा देण्यांत आला; ज्या हुद्देदारानें देशमुखास दस्त केलें–म्हणजे त्यांना आपल्याशीं बांधून घेतलें–त्यास पेशवाई म्हणजे मुख्य प्रधानकी मिळाली; व ज्या सैन्यानें पुंडांना जमीनदोस्त केलें त्याची व्यवस्था ठेवण्याकरितां एक सबनीस नेमावा लागला. पुढें मुलूख ताब्यांत आल्यामुळें जमाखर्चाचें काम पडूं लागलें. तेव्हां मुजुमदाराची जरूर लागली. अशा रीतीनेंच सुरनीस सरनोबत, चिटणीस, फडनीस, इत्यादि अधिकारी अस्तित्वांत आले. आरंभीं ह्या अधिकाऱ्यांचीं नांवें फारसी होतीं, परंतु कांहीं काळानें आपल्या राज्याचें पूर्ण हिंदी स्वरूप दाखविण्याकरितां शिवाजीनें संस्कृत नांवें प्रचारांत आणलीं. अष्टप्रधानांतील अधिकाऱ्यांचीं फारसी व संस्कृत नांवें, त्यांचीं कर्तव्यें व त्यांचे पगार पुढें दिल्याप्रमाणें होतेः—

| फारसीनांव | संस्कृतनांव. | कर्तव्य. | वार्षिक वेतन |
|---|---|---|---|
| पेशवा. | पंतप्रधान. | मुख्य दिवाणगिरी. | १५००० होन. |
| मुजुमदार | पंत अमात्य. | मुलकी हिशेब. | १२००० होन |
| सुरनीस. | पंतसचिव. | दफ्तराचा सांभाळ | १०००० होन |
| वाकनीस. | मंत्री. | खासगी कारभार. | ,, |
| डबीर. | सुमंत. | परराज्यव्यवहार. | ,, |
| सरनोबत | सेनापति. | फौजेचीव्यवस्था. | ,, |
| ... | न्यायाधीश | न्यायकरणें. | ,, |
| ... | पंडितराव. | शास्त्रार्थ व दानधर्म. | ,, |



वर दिलेल्या प्रधानांपैकीं पंडितराव व न्यायाधीश ह्या प्रधानद्वयाखेरीज बाकीच्यांस लष्करी नोकरींतहि निष्णात असावें लागे. ह्या सर्व प्रधानांस एक एक मुतालिक दिलेला असे प्रधान स्वारीवर गेले म्हणजे त्यांच्या मागें त्याच्या सगळ्या कामाची व्यवस्था ह्या मुतालिकांनीं प्रमुखपणें पहावी असें असे. मुतालिक सरकारांतूनच नेमून दिलेले असत व त्यांच्या धन्यांचे शिक्के मोर्तब त्यांच्या हातीं असत. परंतु एखादें तसेंच महत्त्वाचें काम असलें तर त्याचा निकाल त्यांनीं आपल्या वरिष्ठाच्या अनुमतीवांचून लावूं नये असें असे. प्रत्येक खात्यांत पुन्हां आठ दुय्यम कामगार असत. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—( १ ) कारभारी, हा आपल्या खात्याचा एकंदर कारभार पहात असे ( २ ), मुजुमदार ह्याच्यापाशीं जमाखर्चाचें काम असे,(३)फडणीस, हा मुजुमदाराचा दुय्यम असे; ( ४ ) सबनीस किंवा दफ्तरदार, याजपाशीं दफ्तर ठेवण्याचें काम असे; ( ५ ) चिटणीस ह्याजपाशीं सर्व पत्रव्यवहाराचें काम असे;(६)कारखाननीस,ह्याच्या पाशीं सगळ्या कोठींची व दाण्यागल्ल्याची व्यवस्था पहाण्याचें काम असे; ( ७ ) जामदार, याजकडे नगदी खेरीज करून एकंदर चीजवस्तीचा संग्रह करण्याचें काम असे; आणि ( ८ ) पोतनीस ह्याच्या ताब्यांत सर्व रोकड असे. ह्या सर्व कामदाराच्या हाताखालीं अर्थात् कामाच्या मानानें कमीजास्त कारकून असत. ह्याशिवाय खुद्द खाशांच्या तैनातीस एक चिटणीस, एक फडणीस, एक पारसनीस व एक पोतनीस असे स्वतंत्रच असत.

प्र धा न मं ड ळां त प्र त्ये का चा द र्जा.— अष्टप्रधानांत पेशवा हा मुख्य असून त्याची हुकमत इतर सर्व प्रधानांवर होती. त्याची पायरी राजाच्या खालचीं असून त्याची बसण्याची जागा सिंहासनाच्या नजीक उजव्या बाजूस पहिली असे. मुलकी व लष्करी ह्या दोनहि कामांवर त्याची संपूर्ण देखरेख असून राज्याच्या सर्व घडामोडींची जबाबदारी त्याजवर होती सेनापतीकडे सर्व लष्कराचा ताबा असून त्याची बसण्याची जागा डाव्या बाजूस पहिली होती. अमात्य, सचिव, मंत्री हे पेशव्याच्या खालीं अनुक्रमानें बसत. व सुमंत, पंडितराव व न्यायाधीश हे डाव्या बाजूस सेनापतीच्या खालीं अनुक्रमानें बसत. असें रियासतकारांनीं दिलें आहे. परंतु मल्हाररामरावकृत राजनीतींमध्यें प्रधानाच्या बसण्याचा अनुक्रम निराळा दिला आहे. उजव्या बाजूस मुख्य प्रधान, अमात्य, सचिव व सुमंत यांनीं व डाव्या बाजूस पंडितराव, सेनापति, मंत्री व न्यायाधीश यांनीं बसावें असा ह्या पुस्तकांत दिलेला अनुक्रम आहे.

अष्टप्रधान संस्थेचा राज्याभिषेकविधींत समावेश करून तिला धार्मिक स्वरूप कसें देण्यांत आलें होतें हें शिवाजीच्या राज्याभिषेकासंबंधीं उपलब्ध असलेल्या वर्णनावरून चांगलें

दिसून येतें. ह्या राज्याभिषेकसमयीं सिंहासनाच्या सभों-वार हातांत सुवर्णकलश घेतलेले प्रधान अष्टदिक्स्थानापन्न झाले होते. पूर्वेस मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे हातीं सुवर्णकलश घेऊन उभा राहिलेला होता. दक्षिणेस सेनापति हंबीरराव मोहिते दुग्धपूर्ण रौप्यकलश घेऊन उभा राहिला होता. पश्चिमेस रामचंद्र नीलकंठ पंडित अमात्य दधिदुग्ध पूर्ण ताम्रकलश घेऊन उभा राहिला होता उत्तरेस छांदोगामात्य प्रधान रघुनाथ पंडितराव मधुपूर्ण सुवर्णकलश घेऊन उभा राहिला होता. ह्यांचपाशीं मृन्मय कुंभांत समुद्रजल व महानद्यांचें जल भरून ठेविलें होतें. उपदिशांच्या ठायीं क्रमेंकरून आग्नेयीस अण्णाजी दत्तो पंडित सचिव छत्र घेऊन उभा राहिला होता, नैर्ऋत्यभागीं जनार्दन पंडित सुमंत व्यजन घेऊन उभा राहिला होता, वायव्यभागीं दत्तो त्रिमल मंत्री चामर घेऊन उभा होता व ईशान्यभागीं बाळाजी पंडित न्यायाधीश दुसरें चामर घेऊन उभा राहिला होता "मल्हाररामराव" कृत राजनीतिमध्यें मुख्य प्रधान ब्राह्मण, सेनापति क्षत्रिय व अमात्य वैश्य असावा असा एक नियम सांगितला आहे.

नवीन अधिकाऱ्यांची भर.—निरनिराळ्या कामांची वाटणी होऊन त्यांची जबाबदारी ठरली जावी, व प्रत्येकानें एका कामांत प्रवीणता संपादून तें काम उत्कृष्ट रीतीनें तडीस न्यावें हें तत्त्व साधण्यासाठीं शिवाजीनें हें प्रधानमंडळ अस्तित्वांत आणलें होतें ह्या संस्थेतील दूरदर्शीच्या धोरणा-मुळें स्वसंरक्षण व स्वराज्यसवर्धन हीं दोन कामें महाराष्ट्रीयास करितां आलीं. औरंगजेबाच्या प्रचंड शक्तीशीं झगडा करून विजय संपादण्यास ही संस्था फार उपयोगी पडली. शिवाजीनंतर संभाजीनें अष्टप्रधानांत फिरवाफिरव केली नाहीं. मात्र संभाजीपुढें जावयास छंदोगामात्य कलुशा याशिवाय दुसरा कोणी धजत नसल्यामुळें बहुतेक कामें कलुशाच्याच तंत्रानें चालत राजारामाच्या वेळच्या धाम-धुमीच्या कारकीर्दीत अष्टप्रधानांशिवाय आणखी कर्ती माणसें पुष्कळ निपजल्यामुळें त्यांचा योग्य सन्मान करतांना अष्टप्रधानांत आणखी दोन अधिकाऱ्यांचा समावेश करावा लागला. यांपैकीं एक पतप्रतिनिधि व दुसरा हुकुमतपन्हा. प्रतिनिधीचा अधिकार सर्व प्रधानांवर चालावयाचा असून त्याची नेमणूकहि सर्वांत जास्त म्हणजे १५००० होन होती. हुकुमतपन्हा,हा हुद्दा राजारामानें जिंजीस असतांना महाराष्ट्रांत कुल राज्यव्यवस्था पाहणाऱ्या अधिकाऱ्यास दिला होता. त्याची योग्यता एवढी होती की, त्याजकडून जे हुकूम येतील ते छत्रपतींनींहि मोडावयाचे नव्हते.

नामधारी जहागिरदारांत रूपांतर.—तथापि राजारामाच्या कारकीर्दीत अष्टप्रधानव्यवस्थेंत झालेला महत्त्वाचा फेरफार म्हटला म्हणजे स्वराज्यसंरक्षणाच्या कामीं हुरूप चढावा म्हणून राजारामास इतरांबरोबर अष्टप्रधानांसहि जहागिरींचें आमिष दाखवावें लागलें. याचा परिणाम असा झाला की, पुढें पेशव्यांच्या हातीं सत्ता गेली तेव्हां राज्यकारभाराच्या कामाची वाटणी करण्याच्या उद्देशानें अस्तित्वांत आणलेल्या प्रधानमंडळाचें लहान मोठ्या व कमी अधिक स्वतंत्र अशा मनसबदारांत रूपांतर झालें. शाहूच्या हयातींतच ह्या संस्थेस बरेंचसें औपचारिक स्वरूप आलें होतें व त्याच्या मरणानंतर तर ती अगदींच नामशेष झाली.

अष्टप्रधानांच्या व सरदारांच्या नेमणुका पूर्वी चालत आल्याप्रमाणेंच पुढें चालवाव्या, असें शाहूच्या आज्ञापत्रांत होतें. वास्तविक त्यांचीं आतां नांवें मात्र राहिलीं होतीं. अधिकार सर्व राजवीळ त्याच्या म्हणजे पेशव्यांच्याच हातीं होता. सचिव, प्रतिनिधि, अमात्य व सेनापति हे निर्वीर्य झाले होते;इतर प्रधानास तर त्यापूर्वीच महत्त्व नव्हतें. शिवाय नवीन सरदार उत्पन्न होत होते, तेव्हां पूर्वीची व्यवस्था आहे तशीच पुढें चालविणें शक्य नव्हतें. शाहूच्या आज्ञापत्रांतला हा भाग अशक्य कोटींतला होता, ही गोष्ट त्याच वेळीं पेशव्यांच्या किंवा इतरांच्या लक्षात आली नसेल, हें संभवत नाहीं; परंतु शाहू मुमुर्षु असतां त्याजबद्दलची जास्त वाटाघाट करणें शक्य नव्हतें. शाहूच्या आज्ञेचा अर्थ अरेरावी कारभार करून कोणासहि दुखवूं नये किंवा कोणाचीं उत्पन्नें खालसा करूं नयेत एवढाच घ्यावयाचा होता, व त्याच अर्थानें पेशवेहि हलींची व्यवस्था करीत होते. पूर्वीच्या घराण्यांत आतां कर्ते पुरुष निघत नाहींत एवढ्याच सबबी-वर सरसहा सर्वांस पदभ्रष्ट केल्यास एकदम मोठा गिल्ला होऊन पेशव्यांचीच उचलबांगडी झाली असती. तेव्हां असा प्रसंग येऊं न देतां, पचेल तितकाच फेरफार पेशवे करीत चालले.

[संदर्भग्रंथ—मराठी रियासत; महाभारत उपसंहार; मल्हाररावकृत राजनीति; मनुस्मृति; पारसनीस आणि किंकेड हिस्टरी ऑफ दि मराठाज, भाग १]

**अष्टभावः**—शरीराचे आठ भाव आहेत. हे सत्त्वगुणाचे द्योतक असतात असें मानण्यांत येतें. हे अष्टभाव येणें प्रमाणें:—स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग किंवा वैस्वर्य, वेपथु किंवा कंप, वैवर्ण्य, अश्रुपात व प्रलय.

**अष्टभैरव**—भैरव म्हणजे भयंकर. हें शिवाचें नांव आहे तथापि भैरव ही शिवगणांतील स्वतंत्र देवता धरितात त्याचे आठ प्रकार आहेत, ते सर्व भयंकर स्वरूपाचे आहेत हें सांगावयास नकोच. (१) असितांग,काळ्या अवयवाचा,(२) संहार, नाश,(३) रुरु, कुत्रा, (४) काल; (५) क्रोध,(६)ताम्रचूड,तांबड्या तुऱ्याचा,(७)चंद्रचूड आणि (८) महा. यांतील कांहीं नांवांऐवजीं, कपाल, रुद्र, भीषण, उन्मत्त, कुपति इत्यादि नांवेंहि योजिलेलीं आढळतात. या स्वरूपांत शिव पुष्कळदा कुत्र्यावर आरूढ होऊन फिरतो,

तेव्हां त्याला 'श्वाऽश्व' (कुत्रा आहे घोडा ज्याचा) असें संबोधितात.

**अष्टमंगल**—ही संज्ञा श्रौतस्मार्त धर्मांतील नसून पौराणिक धर्मांतील आहे. अष्टमंगल म्हणजे आठ मंगलदायक वस्तूंचा समुदाय. सिंह, वृषभ, गज, पूर्णोदककुंभ, व्यजन, निशाण, वाद्य व दीप या अष्टमंगल वस्तू राज्याभिषेकाचेवेळीं लागतात. ब्राह्मण, अग्नि, गाय, सुवर्ण, घृत, सूर्य, जल व राजा यांनाहि अष्टमंगल समजतात. (मंगल पहा.)

**अष्टमहारोग**—हा शब्द वाग्भटानें रूढ केला. त्या ग्रंथात वातव्याधि, अश्मरी, कृच्छ (किंवा कुष्ठ), मेह, उदर, भगंदर, अर्श संग्रहणी (किंवा ग्रहणी), या अष्ट महारोगाचा उल्लेख आहे.

**अष्टमहासिद्धि**—अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशित्वा आणि वशित्वा या आठ सिद्धी होत.

**अष्टमर्यादागिरी**—हिमालय हेमकूट, निषध, गंधमादन, नील, श्वेत, शृंगवान, आणि माल्यवान हे आठ महागिरि जंबुद्वीपात नऊ जे भारतादि वर्ष (विभाग) आहेत, ते होण्यास कारण होत यांचा अनेक पुराण ग्रंथात उल्लेख आहे.

**अष्टमांगल्य**—त्रैवर्णिकाचा एक संस्कार. हा संस्कार मुख्य सोळा संस्कारांपैकीं जो गर्भाधान संस्कार, तो जर यथाकालीं झाला नाही तर गर्भिणी स्त्रीच्या आठव्या महिन्यात करावयाची रूढी आहे. हा सूत्रोक्त नाहीं पण याचा उल्लेख संस्कार कौस्तुभ या ग्रंथात केला आहे. याला व्यवहारात आठागुळें असें नाव आहे. हा सूत्रोक्त सोळा संस्कारात धरलेला नाहीं. गर्भाधान संस्कार करावयाचा राहिल्यास गर्भाधान संस्कारानंतर करावयाचे जे पुंसवन व सीमंतोन्नयन त्या दोन संस्कारास जोडून हा संस्कार करितात. यातील सर्व विधि गर्भाधानाप्रमाणेंच (ऋतुशांतीसह) करावयाचा असतो प्रथम गर्भाधानाप्रमाणें सर्व विधि करून नंतर त्याच दिवशीं पुंसवन व सीमंतोन्नयन हे संस्कार करण्यात येतात.

**अष्टमी**.—मुं. इलाखा कुलाबा जिल्हा. रोहा म्युनिसिपल हद्दींत हें गाव आहे. येथें एक सुंदर तळें असून येथें बेने इस्राइल लोक राहतात रायगडास शिवाजीकडे आलेला ऑक्सडन नावाचा इंग्रज वकील या गावाचा एष्मेमी म्हणून उल्लेख करितो (इ स. १६७३ ऑर्म—हिस्टॉरिकल फ्रॅग्मेंट्स, २१५; फ्रायर—न्यू अकाउंट, ७७). १७७१ त चेऊल नदीच्या किनाऱ्यापासून काहीशा अंतरावर असलेलें महत्त्वाचें गाव (उस्तोम) म्हणून फोर्ब्सनें आपल्या ओरिएंटल मेमॉइर्स (१ २११) मध्यें याचा नाम निर्देश केला आहे.

**अष्टयोगिनी**—दुर्गेच्या आठ परिचारिका राक्षसी. त्यांचीं नावें:—मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिद्धा आणि संकटा दुसरा एक पाठ असा:–मार्जनी, कर्पूर-तिलका, मलयगंधिनी, कौमुदिका, भेरुंडा, माताली, नायकी, आणि जया किंवा शुभाचारा सुलक्षणा, सुनंदा हीं नावेंहि कोठें कोठें दृष्टीस पडतात. (योगिनी पहा.)

**अष्टवसु**—वसूंचा वेदात उल्लेख आहे, त्याचें पौराणिक स्वरूप वैदिक स्वरूपापेक्षा निराळें आहे. पौराणिक स्वरूप असें: चालू वैवस्वत मन्वंतरातील धर्मऋषि त्यापासून प्राचेतस दक्षकन्या वसु, तिच्या ठायीं झालेले वसुसंज्ञक आठ देव ते. हे प्रस्तुत सप्तविध देवातील पाचवे देव असून, यांचीं नावे धर, ध्रुव, सोम, अह., अनिल, अनल प्रत्यूष, आणि प्रभास, अशीं आहेत. (भार. आदि अ. ६६) पुराणांतरीं, हींच नावें किंचित्काची असून काहीं वेगळीं आहेत. उदा. भागवतात, द्रोण, प्राण, ध्रुव, अर्क, अग्नि, दोष, वसु व विभावसु हीं आहेत

**अष्टवायन**—याचा दानखंडात उल्लेख आहे हळकुंड, सुपारी, दक्षिणा, खण, सूप, कंकण, धान्य व कांचमणी या आठ वस्तु लग्नात नवरीनें सौभाग्य संपादण्यासाठीं आठ ब्राह्मणास वायन म्हणून द्यावयाच्या असतात

**अष्टविनायक**—श्रीगजानन ह्या देवतेसंबंधानें माहिती देणारीं दोन पुराणें आहेत; एक गणेशपुराण व दुसरें मुद्गलपुराण पण यापैकीं मुद्गलपुराणामध्येंच अष्टविनायकासंबंधानें विशेष माहिती सापडते अष्टविनायकासंबंधानें जो सुप्रसिद्ध श्लोक आहे तो येणेंप्रमाणें.—

स्वस्ति श्रीगणनायकं गजमुखं मोरेश्वरं सिद्धिदं ।
बल्लाळं मुरुडं विनायकमढं चिंतामणिस्थेवरम ॥
लेण्याद्रौ गिरिजात्मकं सुवरदं विघ्नेश्वरमोझरं ।
ग्रामो राजण संस्थितो गणपतिः कुर्यात्सदा मगलम ॥ १ ॥

हा श्लोक मूळ ग्रंथात कोठें आहे तो आढळला नाहीं. वर दिला आहे तो श्लोक संस्कृत व्याकरणदृष्ट्या बराच अशुद्ध दिसतो. अष्ट विनायकासंबंधानें भौगोलिक माहिती वरील श्लोकाधारें पुढीलप्रमाणें आहे

| देवतानाम | स्थान | जिल्हा |
| --- | --- | --- |
| मोरेश्वर गणनाथ | मोरगाव | पुणें (जेजुरी नजीक) |
| बल्लाळेश्वर | मुरुड (पाली) | कुलाबा (खोपवली जवळ) |
| विनायक | मढ | कुलाबा (कर्जत नजीक) |
| चिंतामणि | थेऊर | पुणें (लोणी नजीक) |
| गिरिजात्मक | लेण्याद्रि | पुणें (जुन्नरानजीक) |
| विघ्नेश्वर | ओझर | पुणें (जुन्नरानजीक) |
| गणपति | राजणगाव | पुणें (पुणें नगर सडकेवर) |
| गजमुख | सिद्धटेक | नगर (दौंड नजीक) |

यावरून पाहता एक स्थान नगर जिल्ह्यांत, दोन कुलाबा जिल्ह्यांत, व बाकीचीं पाच पुणें जिल्ह्यात आहेत. देवाल-

यासंबंधाने पाहता पालीचें देऊळ मोठें चिरेबंदी, व भोंवताली फरस विस्तृत असें असून या नमुन्याचीं देवळें थेऊर, मोरगांव वगैरे दोनचार ठिकाणीं आहेत. सर्व ठिकाणीं नाहींत. पालीचें देवालय मोरोबादादा फडणीस यांनीं बांधलें. मोरोबादादा हे पेशवाईतील सुप्रसिद्ध मुत्सद्दी नाना फडणीस याचे समकालीन होते, म्हणजे पालीचें देऊळ सन १७७५ ते १८०० यांच्या दरम्यान बांधलें गेलें आहे. थेऊर व मोरगांव येथील स्थानांबद्दल ' तीर्थयात्राप्रबंध ' नावाच्या ग्रंथांत पुढील माहिती मिळतेः-

"थेऊरः—या गांवीं अष्टविनायकांपैकीं एक स्थान आहे. या स्थळीं मुळामुठानदी आहे. तिच्या तीरीं चिंचवड संस्थानचे आदिपुरुष मोरयादेव यांनीं तप केल्याचें स्थान आहे. येथें श्रीगणपतीचें मंदिर चांगलें आहे. माधवराव बल्लाळ पेशवे यांनीं बदामीचा किल्ला सर केल्यावर या देवापुढें उत्तम लाकडी मंडप बांधला. तो आता बहुत जीर्ण दशेस आला आहे. या ठिकाणींच देवाच्या सन्निध ओरींत माधवराव बल्लाळ हे कैलासवासी झाले! त्याची स्त्री रमाबाई हिनें सहगमन केलें तें स्थान येथें नदीतीरीं आहे. त्यावर चिंतामणराव आप्पा सांगलीकर यांनीं वृंदावन बांधलें आहे " (तीर्थयात्रा प्र. पा. १७९ )

" मोरगांव—येथें गणपतीचें स्थान आहे. गणपतीची मूर्ति मोठी भव्य आहे. परंतु तिचे अवयव स्पष्टपणें दिसण्यांत येत नाहींत. येथील गणपतीस मयूरेश्वर असें म्हणतात. या देवाचे उपासक पुणेप्रांतात पुष्कळ आहेत. देवालयांत तरटीचा वृक्ष आहे, त्यास कल्पवृक्ष म्हणतात. देवाच्या पूजानैवेद्याचा वगैरे बंदोबस्त चिंचवड येथील संस्थानिकाकडून होतो. या क्षेत्रीं मुख्य तीर्थ कमंडलुनदी होय. या नदीस प्राकृतांत कन्हा म्हणतात, व ब्रह्मदेवाच्या कमंडलूपासून या नदीची उत्पत्ति आहे असें म्हणतात. यास्थळीं सर्व जातीचे लोक गणपतीचे उपासक आहेत. ते संकष्टचतुर्थीचें व्रत करतात. या क्षेत्राचा महिमा मुद्गलपुराणांत बराच वर्णिला आहे. भाद्रपद शुद्ध चतुर्थीच्या सुमारें चिंचवड येथील संस्थानिक याक्षेत्रीं येऊन उत्सव करतात. त्यांत ब्राह्मणभोजन पुष्कळ होतें. त्यावेळीं आसपासची यात्रा बहुत जमते. येथें चिंचवडकर संस्थानिकाचा वाडा आहे. " ( तीर्थयात्रा प्र. पा. १८३ )

**अष्टविवाह**—सूत्रग्रंथातून विवाहाचे आठ प्रकार सांगितले आहेत. ते असेः-( १ ) ब्राह्म, ( २ ) गांधर्व, ( ३ ) राक्षस, ( ४ ) दैव, ( ५ ) आर्ष, ( ६ ) प्राजापत्य, ( ७ ) असुर (८) व पैशाच. प्रत्येकाचें थोडक्यांत वर्णन असें ब्राम्ह = सालंकृत कन्यादान; गांधर्व = उभयतांच्या अनुमतीनें; राक्षस = जबरीनें कन्या हरण करून; दैव = विधिपूर्वक कन्यादान करून; आर्ष = गाय बैल घेऊन कन्या- प्राजापत्य = प्रजोत्पादनार्थ कन्यार्पण; असुर = मोल देऊन घेतलेली कन्या करणें; पैशाच = कन्या चोरून आणून जबरीनें विवाह करणें.

याविषयीं धर्मसिंधूंत ( तृतीय परिच्छेद पूर्वार्ध ) व विज्ञानेश्वरांत सविस्तर हकीकत आहे. याशिवाय ' विवाह ' पहा

**अष्टागर**—हें नांव बरेंच अलीकडचें दिसतें. आक्षी, किहीम, चौल, थळ, नागांव, रेवदंडा वगैरे आठ आगर मिळून झालेल्या मुलखास पहिल्यानें अष्टागार हा शब्द लाविला गेला. त्यांत चौल हें सगळ्यांत जुनें असावें ( वि. वि. पुस्तक २२ पृ. १०१ ).

**अष्टांग**—या संज्ञेनें शरीराचे कोणते आठ अवयव दिग्दर्शित होतात यासंबंधीं एकमत नाहीं. दोन हात, छाती, कपाळ, दोनडोळे, मान आणि कंबर; किंवा हात, पाय, गुडघे हे सहा, व छाति आणि कपाळ ( किंवा वाचा आणि मन ) मिळून आठ अंगें धरतात. हात, पाय, गुडघा, छाती, डोकें, वाणी मन, व दृष्टि हीं साष्टांग प्रणामांतील अंगें होत असें पूजा प्रकरणांत प्रयोगकार म्हणतात.

वैद्यकांतील अष्टांगें शल्य, शालाक्य, कायचिकित्सा, भूतविद्या, कौमारभृत्य, अगदतंत्र, रसायनतंत्र व वाजीकरणतंत्र.

स्मृतींतील अष्टांगें:—कायदा, न्यायाधीश, पंच, लेखक, ज्योतिष, सोनें, अग्नि व पाणी,

पूजेचीं अष्टांगें:—पाणी, दूध, तूप, दही, दर्भ, तांदूळ, जव व सर्षप.

मैथुनाचीं अष्टांगें:—स्मरण, कीर्तन, क्रीडा, दर्शन, गुह्यभाषण, चिंतन, निश्चय, व संयोग.

योगांतील अष्टांगें:—यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि.

बुद्धीचीं अष्टांगें:—शुश्रूषा, श्रवण, ग्रहण, धारण, चिंतन, ऊहापोह, अर्थविज्ञान व तत्त्वज्ञान.

**अष्टांगहृदयः**—वाग्भटकृत वैद्यकग्रंथ, ' वाग्भट ' पहा.

**अष्टाधिकार**—जलाधिकारश्च स्थलाधिकारो ग्रामाधिकारः कुलेखनेच । ब्रह्मासनं दंडविधिर्नियोगो पौरोहितं ज्योतिषमष्टमेव ॥ या श्लोकाप्रमाणें जलाधिकार, स्थलाधिकार, ग्रामाधिकार, कुललेखन, ब्रह्मासन, दंडविधिनियोग, पौरोहित्य व ज्योतिष अशीं आठ खातीं खेडेगांवांतून असत. जलाधिकार—प्रवाशांना व सरकारी नोकरांना पाणी पुरविण्याचा अधिकार; स्थलाधिकार—अनेक वस्तींच्या जागा ठरविणें व दाखवून देणें; हा पाटलाचा अधिकार असे. ग्रामाधिकार—लहान गांवांतील व्यापार व सामान्य धंदे यांची देखरेख करणें; कुललेखन, रयतेचा सरकारी हिशेब ठेवणें व सरकारी दप्तर सांभाळणें; हें काम कुळकर्ण्याचें असे ब्रह्मासन-बेलिफाचा अधिकार; दंडविधिनियोग—मॅजिस्ट्रेटचा अधि

कार. पौरोहित्य—ग्रामोपाध्याय किंवा कुलोपाध्यायाचें काम; ज्योतिष—ग्रामज्योतिषाचें काम. वरील श्लोक लौकिक असून खास आधार आढळत नाहीं.

या अधिकारांचींच लोकांत रूढ असलेलीं प्राकृत नांवें म्हणजे '(१) कोळीपणा, (२) पाटिलकी, (३) देशमुखी, महाजनकी (४) कुळकरण, (५) चर्तकी, (६) पौरोहित्य (७) उपाधिक किंवा भटपणा, (८) जोशीपणा.

स्नान, शौच, भोजन, निद्रा इत्यादि शरीराच्या दैनिक विधींनाहि यदेनें हा शब्द योजतात.

अष्टाध्यायी-पाणिनीचा व्याकरण ग्रंथ. 'पाणिनी' पहा.

अष्टान्हिकपर्व—आषाढ, कार्तिक आणि फाल्गुन या तीन महिन्यांत शु० ८ पासून पौर्णिमेपर्यंत आठ दिवस जिनमंदिरांतून नंदीश्वरबिंबाची पूजाअर्चा सुरू असते. नंदीश्वरद्वीपांत चारी दिशेला अकृत्रिम अशीं ५२ जिन चैत्यालयें आहेत. या चैत्यालयांतील ५२ मूर्तींची कल्पना करून प्रत्येक दिशेस १३ मूर्ती बसवून ५२ तीर्थंकरांची एक प्रतिमा तयार केलेली असते. ती बहुतेक जिनचैत्यालयांत असते. या आठ दिवसांत पंचमेरूची स्थापना करून त्यावर नंदीश्वर बिंब (प्रतिमा) ठेवून त्याची पूजा करतात. या पर्वास 'नंदीश्वरपर्व' असेंहि म्हणतात. ['जैन लोकांचा इतिहास' अनंततनयकृत, १९१८ बेळगांव]

अष्टावक्र—हा कहोड ऋषीचा पुत्र. गर्भांत असतांना बापास रात्रभर अध्ययन करण्याबद्दल यानें हिणविलें म्हणून त्याच्या शापानें हा आठ ठिकाणीं वाकडा होऊन राहिला. जनक राजाच्या दरबारीं असलेला वरुणपुत्र बंदी यानें कहोडास वादांत जिंकून उदकांत बुडविलें,हें अष्टावक्रास समजलें. त्यानें बंदीचा पराभव करून कहोडास परत आणलें. कहोडानेंहि याचें शरीर वाकडें होतें तें सरळ करून दिलें. अष्टावक्राची कथा महाभारतांत (वनपर्व अ. १३२–३४मुंबईप्रत) सविस्तर दिली आहे.

अष्टावक्रगीता—अवधूतानुभूति किंवा अध्यात्मशास्त्र हा वेदांतविषयक संस्कृत ग्रंथ असून यावर पूर्णानंदतीर्थ, मामुरानंद, मुकुंद, विश्वेश्वर (अध्यात्मप्रदीप), विज्ञानेश्वर(?) वगैरेंनीं टीका लिहिल्या आहेत. (आफ्रेक्टचा कॅटलॉग) तंजावरच्या 'सरस्वती महाल' नांवाच्या सर्वश्रुत ग्रंथालयांत यावर पुढील प्राकृत टीका आहेत (भा.इ सं मं इतिवृत्त शके १८३५)—शिवरामकृत अष्टावक्रटीका (दप्तर १४ वें); वैद्यनाथकृत अष्टावक्री सूक्ष्म टीका, सिद्धांत चिदंबरी (दप्तर ३३)

अष्टी—(मध्यप्रांत) हें वर्धा जिल्ह्याच्या आर्वी तहशिलींतील एक मोठें गांव आहे. उ.अ.२१°१२' आणि पू रे.७८° ११' येथील लोकसंख्या सुमारें ५०००. हें वर्ध्यापासून ५२ मैल वायव्य दिशेस सातपुडा पहाडाच्या दक्षिण भागाच्या पायथ्याशीं वसलेलें आहे हें पुलगांव स्टेशनापासून ३९ मैल व आर्वीपासून १५ मैल लांब आहे आर्वींहून अष्टीला जातांना तळेगांव लागतें. शहाजाच्या अमदानींत या शहराची भरभराट होती.

जहांगीर बादशहानें अष्टी, आमनेर, पवनार व तळेगांव हे परगणे महमदखान नियाझी यास जहागीर दिले. हा अफगाणी सरदार असून यानें जहांगीर बादशहा व त्याचे पूर्वज यांच्यापाशीं मोठ्या हुद्याची कामगिरी केली. यानेंच अष्टीचें पुनरुज्जीवन करून सभोंवतालचा भाग लागवडीस आणिला. याच्यानंतर अहमदखान नियाझी यानें अंमल चालविला. या दोघांच्या कबरी त्या ठिकाणीं बांधल्या आहेत. महमदखान याची कबर मोंगलाई नमुन्यावर बांधली असून ती फार सुंदर आहे. अहमदखानाची तितकी चांगली नाहीं.

अहमदखान मेल्यानंतर नियाझी लोकांची सत्ता जाऊन मराठ्यांचा अंमल चालू झाला हल्लीं येथें नियाझी लोकांकडे इनामी शेतीशिवाय कांहींच राहिलें नाहीं. या कबरी पुरातन असल्यामुळें हल्लीं म्युनिसिपल कमीटीच्या पैशानें त्यांची डागडुजी करण्यांत आली आहे.

नबाब वाहिदखान हे नियाझी वंशापैकीं असल्यामुळें सरकारानें यांना ऑनररी मॅजिस्ट्रेट केलें आहे. ही मोठ्या व्यापाराची जागा आहे. यांत देशी कापड, धान्य,गूळ, मसाल्याचे पदार्थ व कापूस यांचा व्यापार मोठा आहे.

म्युनिसिपालिटीनें अनेक उपयुक्त कामें केलीं आहेत.त्यांत नदीला बांध बांधून उन्हाळ्यांत पाणी पुरेल अशी तजवीज केली आहे

या ठिकाणीं शाळा असून रविवारीं आठवड्याच्या बाजार भरतो पोलीस ठाणें व लोकलबोर्ड सराई आहे.

येथें सरकी काढण्याचा व कापसाचे गठ्ठे बांधण्याचा असे दोन कारखाने आहेत. (म प्रां गॅ १८७० वर्धा. गॅ.)

अष्टे—(मुंबई इलाखा;) सातारा जिल्हा अष्टें गांव वाळवें तालुक्यांत आ न इस्लामपूरच्या आग्नेयीस १२ मैल व सातार्‍याहून २० मैल आहे लोक सं. (१९०१ सालीं) १२४०९ होती.बहुतेक लोक हिंदूच आहेत. येथें म्युनिसिपालिटी आहे. पूर्वेस कृष्णा नदी वहाते व पश्चिमेस पेठ–मांगली रस्ता आहे. गांवाभोंवती तट असून प्रत्येक दिशेस त्याला एक दरवाजा आहे. गांवांत पोष्ट, कोर्ट, दवाखाना व इंग्रजी–मराठी शाळा आहेत.

कोटांतल्या विहिरीपासून दूर घरें असणार्‍यांस आणि विशेषतः अस्पृश्य लोकांस पाणी आणण्यास त्रास पडतो. उन्हाळ्यांत तर कृष्णेचें पाणी आणावें लागतें. लोक शेतकरी असल्यामुळें गांवांत व्यापार थोडा आहे. येथील जमीन वसूल ३०००० रु आहे. येथून पाव मैलावर बंधारा घातलेलें एक तळें आहे, परंतु त्यांत मातीचे थर जमले असल्यामुळें त्यांत पाणी सांचत नाहीं यांच्या पश्चिमभागांत भैर-

याचें देऊळ आहे. त्याची पूजा गुरव व धनगर लोकांकडेच आहे. धनगर लोकांची काहीं घरें त्याचें पूर्वीचें वैभव दर्शवितात.

सन १९०३ मध्यें येथील म्युनिसिपालिटीचें उत्पन्न ३२०० रुपये होतें. कोल्हापुरात जेव्हां १८५७ सालीं दंगा झाला तेव्हां अष्टयास ७५ घोडदळ ठेविण्यात आलें होतें. ( मुं. गॅ. १९. १८८५ इं गॅ. ६ १९०८ )

( २ )—(मध्य हिंदुस्थान ) भोपाळ संस्थानच्या पश्चिमेकडील जिल्ह्याचें मुख्य ठिकाण १९०१ मधील लो. स ५५३४. हें अकबराच्या वेळीं, माळवासुभ्यातील सारंगपूर सरकारीमध्यें, एका महालाचें मुख्य ठिकाण होतें या गांवा सभोंवती एक तट असून त्यात १७१६ मध्यें दोस्त महंमदानें एक लहानसा किल्ला बांधलेला आहे तट व किल्ला दोन्हीहि सध्या मोडकळीस आलेलीं आहेत. १७४५ त मराठ्यांनीं अष्टें घेतलें, परंतु १८१७ च्या तहानें तें पुन्हा भोपाळकडे देण्यात आलें. १८३७ त, कुदसिया बेगमच्या सैन्यानें नबाब जहांगीर महंमदखानाला या शहरात वेढिलें होतें. येथें १६०२ मध्यें बांधिलेली एक मशीद, अद्याप आहे. मुख्य धंदे विणकाम, रंगकाम व चिटें तयार करणें. येथें अफूचा बराच व्यापार चालतो.

( ३ ) (मुंबई इलाखा) सोलापुर जिल्हा —अष्टे हें गाव माढे यांच्या नैर्ऋत्येस १५ मैलावर आहे. लोकसंख्या १९०१ सालीं ९३६ होती. येथें इ. स १८१८ मध्यें फेब्रुवारीच्या वीस तारखेस जनरल स्मिथ व बापू गोखले यांच्या सैन्याची लढाई झाली व बापू गोखले मारला जाऊन बाजीरावाच्या सैन्याचा पराजय झाला येथें एक तलाव आहे व त्यातून दोन कालवे काढलेले आहेत या तलावाचें बरेचसें काम इ स १८७७ च्या दुष्काळात झालें व सर्वांत जास्त अशीं ११९४५ मनुष्यें एकाच वेळीं कामावर होतीं

**असई**—मोंगलाईंत अजंठ्याच्या आग्नेयीस २० मैल व औरंगाबादच्या ईशान्येस ३४ मैलावर हा गाव असून येथें मेजर जनरल वेलस्ली नंतर ड्यूक ऑफ वेलिंग्टन यानें शिंदे व नागपूरकर भोंसले यांच्या सैन्याचा १८०३ मध्यें पराभव केला.

**असईची लढाई**—शिंदेभोंसल्यांचें १८०३ सालीं इंग्रजांशीं जें युद्ध झालें त्यातील ही एक महत्त्वाची लढाई आहे. १८०० सालीं शिंदे व भोंसले यांचें इंग्रजांशीं युद्ध चाललें असतां सप्टेंबर महिन्याच्या एकविसाव्या तारखेस मराठ्याच्या फौजांचा तळ भोकरधन व जाफराबाद या दोन गांवांच्या दरम्यान पडला असून त्याच्या बरोबर चांगली कवायत शिकवून तयार केलेल्या पायदळाच्या सोळा पलटणी होत्या. त्याच दिवशीं जनरल वेलस्ली व कर्नल स्टीव्हन्सन यांची गांठ बदनापूर गांवीं पडून त्यांनीं असें ठरविलें कीं, आपल्या सैन्याच्या तुकड्यांचा तळ इतकीं परस्परसंनिध पडला आहे तरी आपण निरनिराळ्या मार्गांनीं जाऊन चोविसाव्या तारखेस सकाळीं शत्रूवर हल्ला करावा. याप्रमाणें ठरून ते दोघेहि दुसऱ्या दिवशीं त्या ठिकाणाहून निघाले. स्टीव्हन्सन पश्चिमेकडील मार्गानें गेला व वेलस्ली पूर्वेकडील मार्गानें गेला. तेविसाव्या तारखेस वेलस्ली नौलनी गावापाशीं येऊन पोंचला तो तेथें छावणी देणार तोंच त्याला त्याच्या हेराकडून असें कळलें कीं, मराठ्याच्या फौजा तेथून सहा मैलाच्या आतच कैलना नदीवर तळ देऊन पडल्या आहेत स्टीव्हन्सन अद्याप येऊन पोंचला नव्हता, तरी वेलस्लीनें त्याची वाट न पाहता एकदम मराठ्यांवर हल्ला करण्याचा निश्चय केला त्यानें आपल्या हाताखालील कॅप्टन वार्लो नावाच्या सरदारास बरोबरचें सर्व सामान सुमान नौलनी गावात नेऊन ठेवण्याचा हुकूम केला व त्याच्या संरक्षणार्थ एखादा पलटण ठेवून बाकीच्या सर्व लोकांसह शक्य तितक्या लवकर आपल्या मागोमाग येण्याविषयीं सांगून तो स्वतः काहीं लोक बरोबर घेऊन टेहळणी करिता निघाला तो एका उंच टेकाडावर गेलाच त्याला असें दिसून आलें कीं, मराठ्यांचें सैन्य कैलना नदीच्या पैल तीरावर, जेथें ती नदी जुआनदीस मिळते तेथून जवळच तिच्या काठा काठानें एका लांबच लांब रेषेंत तळ देऊन पडलें आहे तो जरा आणखी जवळ आला, तेव्हां मराठी सैन्याच्या उजव्या बाजूस फक्त फौजच असून पायदळ व तोफा ह्या सर्व डाव्या बाजूस असई गावाजवळ आहेत असें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें मराठ्याच्या तोफा हस्तगत करून त्या बेकाम करण्याचा त्याचा उद्देश असल्यामुळें, तो वळसा घालून मराठा सैन्याच्या डाव्या बगलेपलीकडे कैलना नदी उतरण्याकरिता गेला.

ह्या लढाईंत मराठ्यांचें सैन्य ५०,००० वर असून त्यामध्यें खडें पायदळ साडे दहा हजार व फौज तीस हजारावर होती असें ग्रँटडफ यानें म्हटलें आहे इंग्रजाजवळ मात्र पुरते साडेचार हजारहि लोक नव्हते असें दर्शविण्यात आलें आहे प्रस्तुत युद्धात दक्षिणेंत शिंदे व भोंसले यांचे आणि खास वेलस्ली व स्टीव्हन्सन यांच्या बरोबर किती किती सैन्य होतें या संबधात माट ढकचा अंदाज ' इंग्रजाशी दुसरें युद्ध ' या सदराखालीं आला आहे. त्याशिवाय आण्णासाहेब व चिंतामणराव पटवर्धन, बापू गोखले, निपाणकर, पाटणकर, अमृतराव, पेशवे व म्हैसूरकर यांच्या फौजांनीहि इंग्रजास मदत केली होती असईच्या लढाईच्या प्रसंगींहि पेशवे, व म्हैसूरकर यांच्या फौजा हजर होत्या असें ग्राटडफनेंच पुढें म्हटलें आहे. परंतु त्याच्याबद्दल इंग्रजास जवळ जवळ काहींच मदत झाली नाहीं अशी त्यांची तक्रार आहे व याच कारणामुळें कदाचित् त्यांचा आकडा वर दिलेल्या इंग्रजाच्या सैन्याच्या आकड्यात धरण्यात आला नसावा

नदी ओलांडून आल्यावर वेलस्लीनें आपल्या पायदळाच्या दोन रांगा केल्या, व फौजेची तिसरी रांग करून ती या

दोहोंच्या मागें शिलकी सैन्य म्हणून ठेवली. लढाईस उभें राहिलेल्या ह्या सैन्याची डावी बगल कैलना नदीवर असून उजवी जुआ नदीवर होती. वेलस्लीबरोबर पेशव्यांच्या व म्हैसूरकराच्याहि फौजा आल्या होत्या. त्यांना कैलना नदीच्या पलीकडे कांहीं अंतरावर शिस्तीनें उभें करण्यात आलें होतें. अशा रीतीनें संगमाजवळ दोन नद्यांच्या दरम्यान लढाईसाठीं उभें राहण्यात वेलस्लीचा दुसरा एक फायदा असा होता कीं, त्या योगें शत्रुसैन्याची आघाडी आपोआप आकुंचित केली गेली, कारण इंग्रजाच्या सैन्याचा आपल्या एका बगलेवर हल्ला आलेला पाहताच मराठ्यांनी आपल्या सैन्याच्या दोन रांगा केल्या. त्यापैकी एक रांग शत्रूच्या समोरासमोर उभी होती व दुसरीनें तिच्याशीं काटकोन केला होता. ह्या दोन्हीहि रांगाच्या डाव्या बगला असई नावाच्या चांगली तटबंदी असलेल्या गावाशीं जाऊन भिडल्या होत्या. इंग्रजाचें सैन्य लढाईकरितां शिस्तीनें उभें होतें नोंच मराठ्यांच्या तोफखान्यानें शत्रुपक्षावर जोराचा भडि मार करण्यास आरंभ केला. ह्या वर्षावामुळे इंग्रजाच्या सैन्याची–विशेषतः त्याच्या उजव्या बगलेची–भयंकर नासाडी झाली असें म्हणतात. तोफा ओढणाऱ्या गाड्यांच्या बैलजोड्या ठार होऊन तोफा बेकाम झाल्या. अशा स्थितीतहि वेलस्लीनें आपल्या एका तुकडीस तसाच मराठ्यावर हल्ला करण्याचा हुकूम सोडला. स्वतःजवळ तोफा न राहिल्यामुळें इंग्रजाच्या ह्या सबंच्या सबं रांगेस विपक्षीय तोफांचा मारा सहन करावा लागला. उजव्या बाजूस असलेल्या इंग्रजाच्या ७४ व्या रेजिमेंटांतील बरेच लोक गतप्राण झाल्यामुळें त्याची रांग अगदीं विरळ झाली होती; त्यावर मराठ्याकडील बरीच मोठी फौज चालून आली. तेव्हां मागें असलेल्या ब्रिटिश फौजेस पुढें येण्याविषयीं हुकुम करण्यात आला. त्या बरोबर या फौजेनें कांहीं एतद्देशीय फौजेसह अगदीं ढबघाईस आलेल्या आपल्या पायदळाच्या रांगातून पुढें सरसावून मराठ्यांच्या फौजेवर हल्ला केला व तिची दाणादाण करून त्या मराठ्यांच्या तोफखान्यावर व पायदळावर तुटून पडल्या या प्रसंगी इंग्रजाच्या फौजेनें बजावलेली कामगिरी अवर्णनीय होती. असईच्या लढाईत इंग्रजांना मिळालेल्या विजयाचें श्रेय ह्या फौजेसच दिलें पाहिजे. यानंतर इंग्रजाचे पायदळहि नेटानें पुढें सरकलें. तेव्हां मराठ्यांच्या पहिल्या रांगेनें कच खाऊन ती मागें दुसरींत जाऊन मिळाली. इंग्रजाचें सैन्य सांगिनी उपसून पुढें सरसावलें व त्यांनीं शत्रूच्या सर्व सैन्यास जुआ नदीपार हाकून लावलें. त्यानंतर इंग्रजांच्या फौजेनें ह्या पळणाऱ्या लोकांचा पाठलाग करून त्यांची वाताहात केली. तथापि त्यांच्या कांहीं तुकड्या पुन्हां एकत्र होऊन शिस्तीनें निघून गेल्या. अशाच एक तुकडीचा इंग्रजाची फौज पाठलाग करीत असतां त्या फौजेवरील सेनापति मॅक्सवेल हा मारला गेला. इंग्रजाचें सैन्य शत्रूचा पाठलाग करीत असतां त्यांना रस्त्यांत मृतवत् पडलेले किंवा शरण आल्याप्रमाणें दिसत असलेले कित्येक शत्रुपक्षाचे लोक लागले. इंग्रजांच्या पलटणी पुढें जाताच त्यांनीं उठून त्यांच्यावर गोळीबार करण्यास सुरवात केली. अर्थात इंग्रजांना त्यावेळीं मुख्य सैन्याकडे दुर्लक्ष करून ह्या लोकांचा समाचार घेतां आला नाहीं. मराठ्यांची फौजहि कांहीं वेळपर्यंत इंग्रजांच्या सैन्याभोंवती घिरट्या घालीत होती.




असईच्या लढाईचा नकाशा.

ह्या लढाईत इंग्रजाच्या हातीं मराठ्यांच्या ९८ तोफा लागल्या. जखमी व ठार मिळून त्याचें एक तृतीयांशाच्या वर लोक या लढाईत कामास आले. मराठ्याकडील १२०० लोक ठार झाले होते व कित्येक लोक जखमी होऊन इतस्ततः पडलेले होते. शिंद्याचा कारभारी यादव भास्कर हा या लढाईत ठार झाला, रघूजी भोंसल्यानें लढाईस आरंभ झाल्याबरोबरच समरांगणातून पळ काढला असून शिंद्यानेंहि पुढें लवकरच त्याचें अनुकरण केलें होतें. शिंद्याच्या पायदळातील ब्रिटिश अधिकारी इंग्रजांशी युद्ध सुरू होताच शिंद्याची नोकरी सोडून निघून गेले होते तरी त्यांच्या पलटणीचें ह्या लढाईतील वर्तन त्यांच्या नांवलौकिकास साजेसेंच होतें;

स्टीव्हन्सनला मार्गांत कित्येक अडचणी आल्यामुळें तो २४ तारखेस संध्याकाळीं वेलस्लीच्या सैन्यास येऊन मिळाला. तो दाखल होताच तावडतोब त्याला मराठ्यांच्या पाठलागास पाठविण्यांत आलें [ ग्रांटडफ ].

**असंग**—माध्यमिक पंथामध्यें जितकें नागार्जुनाचें महत्त्व आहे तितकेंच महायान बौद्ध धर्माच्या योगाचार पंथामध्यें असंग उर्फ आर्यासंग याचें महत्त्व आहे. या पंथात विज्ञानवादाचा म्हणजे ज्ञानशक्तिव्यतिरिक्त इतर कशालेंहि अस्तित्व नाहीं या तत्त्वाचा उपदेश आहे. येणेंप्रमाणें शून्यवादाप्रमाणेंच यातहि दृश्य जगाचें सत्यत्व नाकबूल केलेलें आहे, तथापि एका अर्थी ज्ञानशक्ति आणि विचार याच्या संबंधात तरी त्याचें अस्तित्व मान्य केलेलें आहे. सर्व मानसिक व्यापाराचा ज्यांत अन्तर्भाव होतो अशी ज्ञानशक्ति (आलयविज्ञान) ज्याच्यामधून उत्पन्न होते असा जो निर्वाण तोच बोधि, तो एक व सत्य आहे; बुद्धाच्या असंख्य, अनन्त स्वरूपात तो जरी व्यक्त होत असतो तरी तो एकच आहे. परंतु ही बोधिस्थिति योगाचाऱ्यालाच म्हणजे योगाचा अभ्यास करणाऱ्यालाच प्राप्त होते, व तीहि क्रमाक्रमानें प्राप्त होते; बोधिसत्वाच्या मार्गातील दशभूमिका किंवा दहा पायऱ्या चढून गेल्यावर ती बोधिस्थिति प्राप्त होते. योगाचा अभ्यास व गूढवाद हीनयान बौद्धपंथाला अगदीं अपरिचित होता असें नाहीं; आणि त्याचा महायान बौद्धपंथाशीं पद्धतशीर रीतीनें संबंध जोडून देण्याचें काम असंगानें केलें आहे.

च रि त्र.—असंगाच्या चरित्रासंबंधीं माहिती मिळवावयाची झाल्यास आपणास परमार्थ (६ वें शतक), ह्युएन त्संग (७ वें शतक), इत्सिंग (७ वें शतक) आणि तारानाथ (१६ वें शतक) यानीं लिहून ठेवलेल्या बखरी पाहाव्या लागतील. त्या पाहाता खालील माहिती उपलब्ध होते. उत्तर हिंदुस्थानांतील पुरुषपुर येथें कौशिक कुळात त्याचा जन्म झाला. तिघा भावात हाच सर्वांत वडील असून वसुबंधु नावाचा सर्वांत धाकटा भाऊ धार्मिक व वाङ्मयीन चळवळींत असंगाच्या बरोबरीनें असे. वानप्रस्थाश्रमाची ज्या शाखेंत त्याला दीक्षा मिळाली ती महिशासक नावाची बौद्ध संप्रदायातील अतिशय प्राचीन शाखा होती; पण पुढें असंग, हल्लीं जिला असंगाची विज्ञप्ति-मात्रता म्हणतात त्या बौद्ध पंथाकडे वळला. त्याच्या विज्ञप्तिमात्रतावादावर त्याच्या पूर्वधर्माचा बराच पगडा बसलेला अद्यापि आपणाला दिसून येतो.

ह्युएनत्संगच्या मतें त्याच्या चळवळीचें केंद्र अयोध्या नगर होतें. या ठिकाणीं त्यानें बाहेरीतानें लोकास उपदेश केला व ग्रंथ लिहिले, व बहुतकरून येथेंच शरयूच्या तिरीं त्यानें आपला बंधु वसुबंधु यास परमध्येयाकांक्षी महायानपंथाची दीक्षा दिली; परमार्थाच्या मतें पुरुषपुर याचीं ही गोष्ट घडली. तथापि एक गोष्ट स्पष्ट दिसते कीं, असंग व त्याचा भाऊ यांचें अयोध्येच्या दरबारीं वळण असे व ते राजा बालादित्य आणि त्याचा पिता विक्रमादित्य गुप्त याचे समकालीन होते जर हा विक्रमादित्य घराण्यातील दुसरा चंद्रगुप्त असेल तर त्याचा काल इ. स. पाचव्या शतकाचा पूर्वार्ध होईल; पण जर स्कंदगुप्त असेल तर उत्तरार्ध होईल. दुसऱ्या रीतीनेंहि हाच काल येतो. ह्युएनत्संग असें सांगतो कीं, इ. स. ६३३ मध्यें जेव्हां त्यानें आपल्या गुरूला म्हणजे शीलभद्राला पाहिलें तेव्हां तो १०७ वर्षांचा होता. शीलभद्राचा गुरु धर्मपाल असंगाचा अनुयायी होता. याप्रमाणें ५ वें खिरती शतक हा असंगाचा काल ठरविण्यास आपणापाशीं पुरेशीं साधनें आहेत असें कपानी पंडित आनेसाकी छातीठोकपणें म्हणतात [ असंग, एन्सा. रि एथिक्स. १९१० ] लेव्ही वगैरे पंडित असंगाचा काळ याच्यामागें ओढतात.

असंगानें लिहिलेल्या अनेक शास्त्रग्रंथांची ह्युएनत्संगनें यादी दिली आहे. ते सध्या आपणास चिनी भाषांतरातून पहावयास मिळतात. आज एक सुद्धा मूळ प्रत उपलब्ध नसली तरी, त्याच्या परंपरेची सत्यता निःशंक पटण्याजोगी आहे, कारण त्यापैकीं बरेचसे ग्रंथ ह्युएनत्संगनें चीनमध्यें नेले व तो स्वतः असंगाच्या तत्त्वज्ञानाचा पूर्वेकडील श्रेष्ठ पुरस्कर्ता होता. यापैकीं विशेष महत्त्वाचे ग्रंथ खालीं दिले आहेतः—

योगाचार्यभूमि—यात योगसाधनाचें वर्णन असून त्याच्या योगें मनुष्याला एकामागून एक प्राप्त होणाऱ्या अवस्था दिल्या आहे. मैत्रेयप्रकटीकरणाचा हा ग्रंथ आहे. याचा एक भाग (बोधिसत्व भूमि) संस्कृतात उपलब्ध आहे. (२) महायान-संपरिग्रह. असंगाच्या मानसशास्त्राचें यात थोडक्यात दिग्दर्शन केलें आहे. (३) प्रकरण—आर्यवाचा. आसंग पद्धतीचें नैतिक व व्यावहारिक स्वरूप यात दाखविलें आहे.

महायानसूत्रालंकार — हा ग्रंथ भविष्यद्बुद्ध मैत्रेयप्रणीत आहे असें मानतात, पण हा ग्रंथ निःसंशय असंगाचा आहे, असें तत्शोधक एस. लेव्ही यानेंच सिद्ध केलं आहे. वस्तुतः हा सर्व टीकाग्रंथ असंगाचा आहे. असंग स्वतः जरी मोठा श्रेष्ठ कवी नव्हता तरी संस्कृतामध्यें कुशलतेनें लिहिण्याइतकें प्राविण्य त्याच्यामध्यें होतें; व त्याचप्रमाणें श्लोक, आर्या इत्यादि वृत्तामध्यें काव्य करण्याचें सामर्थ्यहि त्याच्यामध्यें होतें. तथापि त्याला कवि म्हणण्यापेक्षा तत्त्ववेत्ता म्हणणेंच निःसंशय अधिक योग्य होय. शेवटच्या दोन प्रकरणात बुद्धाच्या पूर्णत्वाची कीर्ति गाऊन शेवटचें जें सूक्त केलें आहे त्यात सुद्धा बुद्धाच्या सर्वांगी परिपूर्णतेचा उल्लेख करताना कळकळ व पूज्यभाव यापेक्षा पांडित्यच अधिक व्यक्त झालेलें आहे. फक्त नवव्या प्रकरणात बोधि व बुद्धत्व याची कल्पना समजावून सांगत असता असंगानें ज आपलें बुद्धिसर्वस्व खर्च केलें

आहे त्यांत मात्र प्रसंगानुसार भाषेतील रक्षपणा जाऊन त्या ऐवजीं कल्पनाप्रचुर व वर्णनमनोहर भाषेच्या योगानें एकंदर वर्णन प्रौढ व आल्हादकारक झालेलें आहे. उदाहरणार्थ बौद्धलोक निच्या योगानें सर्व जगतावर प्रकाश पाडतात त्या बोधिस्थितीची एका रूपकमालिकेमध्यें तुलना केलेली आहे.

तत्त्वज्ञान—या साधनांवरून आपणांस असंगाची तत्त्वज्ञानपद्धति कळते. ती नागार्जुनाच्या माध्यमिकपंथीशी तुलना केल्यास निःसंशय सत्यात्मक ठरते. जरी तिला "विज्ञप्ति—मात्रता" असें म्हणतात व जरी असंगाच्या मतें बौद्धज्ञान म्हणजे भौतिक जगाच्या आसक्तीपासून मुक्तता, होय. तरी असंगाचें तत्त्वज्ञान प्रत्येक मनुष्याच्या स्वत्वाची व बाह्य विश्वाची सत्यता प्रस्थापित करतें. या बाबतींत त्याची मीमांसा सांख्यसदृश आहे.

असंग मनाला आलय किंवा निदुस असें म्हणतो व त्या ठिकाणीं सर्व बाह्यांतःसृष्टिविषयक गोष्टी गुप्तपणें वास करितात व तेथून आविष्कृत होतात. निदुसपासून अनुक्रमानें मन, बुद्धि आणि पंच विज्ञानें उत्पन्न होतात म्हणून त्याला, अष्टम अशी संज्ञा आहे. प्रत्येक विज्ञानेंद्रिय आलयांत साठविलेल्या बीजामुळें आपल्या बऱ्यावाईट हेतूंचें आविष्करण करितें व अशा रहेनें आविष्कृत झालेलें विश्व सात अप्रधान मनसेंद्रियाच्या साह्यानें अष्टमा ( आलया ) वर प्रतिक्रिया करितें. याप्रमाणें बाह्यसृष्टीचें प्रतिबिंब आलयांत पडतें. म्हणजे विश्वाचा उगम असें निदुस हें एक आधान बनतें. आपल्या स्वतःच्या मनाचें इंद्रियविषयीकरण ( ऑब्जेक्टिफिकेशन ) हें वास्तविक त्या विश्वाचा उगम असणाऱ्या मनापासून स्वतंत्र असणारें एक विश्व आहे, असें मानण्यांत मानवी जीवितांतील माया भरली आहे हें यावरून सिद्ध झालें. या मूलभूत मायेपासून मुक्तता करून घेण्याकरितां आपण आपल्या मनाचा व त्याच्या बाह्यसृष्टिकरणाचा खरा धर्म अभ्यासिला पाहिजे. या धर्मलक्षणाच्या ज्ञानानें ज्ञानबीजाची पूर्ण वाढ होते व त्याचा परिणाम सर्व विश्वाचा आपल्या स्वतःमध्यें अंतर्भाव होण्यांत होतो. तेव्हां खऱ्या ज्ञानाला अनुसरून प्रथम विचाराचा व नंतर बाह्यदृश्यविषयाचा आपल्या अंतरात्म्यांत अंतर्भाव करणें म्हणजेच योगाचार. हा बुद्धपद प्राप्त होण्याला अत्यंत आवश्यक आहे.

ही प्राप्ति होण्याला सातभूमी व बुद्धाच्या तीन काया ( त्रिकाय ) यांतून जावें लागतें; पण यांपैकीं कोणतेंहि तत्त्व नवीन असें नाहीं. त्याच्या वेदांताचें वैशिष्ट्य मन आणि त्यांतील बीजें यांच्या एका सिद्धांताला फार मेहनतीनें व विद्वत्तेनें दिलेल्या सुव्यवस्थितपणांत आहे. या कारणानें त्याच्या तत्त्वांवर उभारलेल्या पंथाला धर्मलक्षण असें नांव पडलें. वास्तविक हा एक धर्म नसून केवळ एक तत्त्वज्ञान आहे व जीं कांहीं धार्मिक लक्षणें यांत आढळतात तीं या पद्धतींशीं फारच विस्कळित रीतीनें जोडली गेलेली दिसतात.

असंगाच्या बौद्धपंथांत गौतम बुद्धावरचा विश्वास कमी झालेला दिसत असून त्याजागीं हळू हळू पुढें येणाऱ्या मैत्रेय नावाच्या बुद्धाची उपासना आली. पुष्कळ दिवसपर्यंत हा संप्रदाय हिंदुस्थान व पूर्वेकडील देश यांतून प्रचलित होता; पण पुढें अभितायूची उपासना लोकप्रिय झाल्यावर (म्हणजे दुसरा बौद्धधर्मपंथ अस्तित्वांत आल्यावर ) त्याचा ऱ्हास झाला व अशा रीतीनें हिंदुस्थान व चीन या देशांतून याचें उच्चाटण झालें. आतां फक्त जपानी बौद्ध लोकांनीं ज्ञानाची एक शाखा म्हणून याला जतन केलें आहे.

असंगानें बौद्धसंप्रदायांत तंत्राचा प्रवेश केला. शैवपंथांतील देववदेवी या बुद्धोपासक ठरवून बौद्धपंथीय देवतांत ठेवून अर्धवट धर्मज्ञान झालेल्या रानटी बौद्धांना रक्तमांसाचा नैवेद्य देवाला दाखविण्यास मुभा ठेविली व सिद्धि, धारणि, मंडल वगैरे जादूटोण्याच्या गोष्टी या धर्मांत घेतल्या. अशा रीतीनें अनेकांना पटेल असा हा धर्म केला; पण त्याचा परिणाम असा झाला कीं, खुद्द असंगाच्या देशांत ( हिंदुस्थानांत ) व नेपाळांत शैवसंप्रदाय प्रबळ होऊन बौद्धसंप्रदाय नामशेष झाला आहे.

[ संदर्भग्रंथ —परमार्थ ( इ. स. ४९९–५६९ ) यानें वसुबंधूचें चरित्र लिहिलें आहे. त्यांत असंगाविषयींहि बरीच माहिती आहे. ताकाकुसु यांनीं परमार्थाचें वसुबंधुचरित्र भाषांतरिलें आहे ( जे. आर. ए. एस. १९०५ ). एन्सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्समध्यें आनेसकी यांनीं असंगावर एक लेख लिहिला आहे. त्यांतील बराचसा भाग वर उद्धृत केला आहे. याशिवाय विंटरनिझ—हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर, पु. २. कर्न—मॅन्युअल ऑफ इंडियन बुद्धिझम्. वाडेल—दि बुद्धिझम ऑफ तिबेट, हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. ]

**असत्प्रतिमा-पेटिका**, उलटी प्रतिमाः— वुइल्यम ह्यूइड वुलॅस्टन नामक गृहस्थानें या पेटिकेचा शोध लाविला. या पेटिकेनें यथादर्शनानुरूप चित्र काढण्यास चांगली मदत होते.

आपण डोळ्याजवळ क्षितिजाशीं ४५° कोन करणारी अशी एक काच धरली व एक डोळा झाकून घेऊन दुसऱ्या डोळ्यानें त्या काचेंतून पाहिलें, तर त्या काचेच्या समोर असलेल्या पदार्थांच्या परावर्तनानें पडलेलें प्रतिबिंब त्या काचेंत दिसूं लागतें. त्याचप्रमाणें काच पारदर्शक असल्यामुळें काचेपलीकडील पदार्थहि दिसतात.

पदार्थांच्या भ्रामक ( व्हर्च्युअल ) प्रतिमा कागदाच्या पृष्ठभागावर पुढें आलेल्या दिसतात; व अशा स्थितींत त्यांची रूपरेषा पेन्सिलीनें सुद्धां काढतां येते. हा असत्प्रतिमा पेटिकेचा अगदीं साधा प्रकार झाला. पण त्या प्रतिमा उलटी ( इनव्हर्टेड ) व विपर्यस्त ( पर्व्हर्टेड ) अशा असतात. त्याचप्रमाणें काचेची परावर्तक शक्ति फार अल्प असल्यामुळें त्या तितक्या स्पष्टहि नसतात. काचेला जर पारा लावला तर

प्रतिमेचा स्पष्टपणा वाढतो. कांचेच्या अर्ध्या भागाला पारा लावून अर्धा तसाच ठेवला तर, त्या कोन्या भागांतून कागद दिसतो व पारा लावलेल्या भागातून पदार्थांची प्रतिमा दिसते. अशा तऱ्हेचे साधन सूक्ष्मदर्शक यंत्राबरोबर वापरतात. आरसा नेत्रकांचेला ( दुर्बिणीतून पहातांना आपल्याकडे कांच असते ती ) लावून सूक्ष्म-दर्शक-यंत्र-नलिका क्षितिजाशीं समांतर ठेवतात.

प्रत्यक्ष प्रतिमा:—एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीच्या सुमारास डॉ. वुलॅस्टननें प्रत्यक्ष व स्पष्ट प्रतिमा देणारी पेटिका शोधून काढली. त्यानें एक चौकोनी समपार्श्व भिंग तयार केलें, त्याचा एक कोन काटकोन केला व दुसरा १३५° अंशाचा केला व बाकी राहिलेले दोन्ही कोन सारखेच म्हणजे साडे सदुसष्ट अंशाचे ठेवले.

अशा कांचेच्या एकाबाजूवर-डोळ्याचें अर्धे बुबुळ समपार्श्व भिंगावर व अर्धे बुबुळ बाहेर ठेविलें म्हणजे अर्ध्या भागातून प्रतिमा दिसते व अर्ध्या डोळ्यानें खाली ठेविलेला कागद पाहतां येतो. अशा तऱ्हेनें आपण डोळा ठेविला तर पहिल्यानें एका पृष्ठभागावर व्युत्क्रान्त प्रतिमा उठते, नंतर या प्रतिमेची प्रतिमा त्याला लागून असलेल्या दुसऱ्या पृष्ठभागावर पुन परिवर्तनानें जशीच्या तशीच उठते. या दुसऱ्या प्रतिमेचीच रूपरेषा कागदावर पुढें आलेली दिसते व अशा तऱ्हेनें तिच्या रूपरेषावरून मूळ पदार्थांची आकृति कागदावर घेतां येते. आकृतीची रूपरेषा पेनसिलीनें गिरवून काढण्याकरतां प्रतिमा शक्य तितकी स्पष्ट कागदावर पडलेली चांगली म्हणून पदार्थ व कांच यांच्यामध्यें सोईस्कर अंतरावर एक बाह्यगोल कांच ठेवतात. कारण प्रतिमा जर कागदावर स्पष्ट पडली नाहीं, तर ती गिरवणाऱ्या पेनसिलीचें टोंक व प्रतिमा एकाच समपातळींत बरोबर दिसत नाहींत व मग तितकें बरोबर गिरवणें शक्य होत नाहीं.

उपयोग.—प्रकाशलेखन विद्येच्या ( फोटोग्राफी ) शोधापूर्वी नकाशे काढणारांना असत्प्रतिमापेटिका हें एक महत्वाचें साधन होतें. ही पेटिका किंमतीनें स्वस्त, आकारानें आटोपशीर, इकडे तिकडे नेण्यास सोईस्कर अशी आहे. त्याचप्रमाणें प्रतिमाचा विपर्यास यांत विशेष होत नसून हिचें क्षेत्रहि बरेंच मोठें असतें. असत्प्रतिमापेटिकेपासून पदार्थांचें अंतर त्याच्या प्रतिमेच्या अंतराच्या दुप्पट असेल तर मूळ पदार्थाच्या निम्यानें प्रतिमेचा आकार होतो. यावरून मूळ चित्रें मोठीं करणें, लहान करणें किंवा त्यांची बरोबर नक्कल करणें ह्या गोष्टी असत्प्रतिमा पेटिकेनें सहज साध्य होतात.

असद.—मिर्झा असद-उल्ला खान किंवा मिर्झा नौशहा याचें कविनाम. याचे पुर्वज समरकंद येथें होते, पण हा आग्रा येथें जन्मला. दिल्लीच्या दरबारी प्रख्यात कवि व फारसी लेखक म्हणून हा प्रसिद्धीस आला. हा उर्दूतहि ग्रंथरचना करी. शेवटचा, मोंगल बादशहा बहादुरशहा यानें असदला नबाब ही पदवी देऊन, दरबारचा काव्यशास्त्राध्यापक नेमिलें. एक फारसी इन्शा अल्लीच्या प्रशस्तिपर एक मसनवी, आणि फारसींमध्यें एक व ऊर्दूमध्यें एक असे दोन दीवाण त्यानें लिहिले आहेत. इ. स. १८५२ मध्यें दिल्ली येथें तो हिंदुस्तानच्या मोंगल बादशहांचा इतिहास लिहिण्यात गुंतला होता. त्या वेळीं त्याचें वय ६० वर्षांचें असावें. गालिब हें त्याचें दुसरें कविनाम होतें. मृत्यु इ. स. १८६९.

असदखान.—याला नबाब, असाफ उद्दौला आणि जुमलत-उल्-मुल्क अशा पदव्या होत्या. हा प्रख्यात तुर्कोमन घराण्यातला असून, याचा बाप इराणच्या शहा अब्बासच्या जुलमामुळें हिंदुस्थानांत पळून आला होता. त्याला जहांगीर बादशहानें मोठ्या योग्यतेस चढवून सम्राज्ञी नूरजहान हिच्या एका नातेवाइकाच्या मुलीशीं त्याचें लग्न लावून दिलें होतें. असदखान (मूळ नांव इब्राहिम) अशा घराण्यांतील मुलगा असून प्रथम पासूनच तो शहाजहानच्या डोळ्यांत भरला होता. बादशहानें आपला वजीर असफखान यांची मुलगी त्याला दिली व दुय्यम बक्षी या कामावर त्याला नेमिलें. या हुद्यावर त्यानें १६७१ पर्यंत काम केलें. या सालीं त्याला ४००० ची मनसब मिळाली व थोड्याच वर्षांनंतर वजीराचा दर्जा त्याला प्राप्त झाला. बहादुरशहाच्या कारकीर्दींत तो वकील मुतलक ( वजीराच्या वरचा दर्जा ) झाला व त्याच्या मुलाला मीरबक्षीपद व झुल्फिकारखान ही पदवी मिळाली. पण फरुखसियर गादीवर आला तेव्हां त्याला बडतर्फ करून त्याची मालमत्ता जप्त करण्यात आली व त्याच्या मुलाला ठार मारण्यात आलें. यापुढें त्यानें अल्प वेतनावर अज्ञातवासांत काळ कंठिला. तथापि त्याचा लौकिक कमी झाला नव्हता; कारण १७१७ मध्यें तो वारला तेव्हां सरकारतर्फेनें मोठ्या मानमरातबीनें त्याला पुरण्यात आलें. ( बीलचा कोश, मुसुलमानी रियासत इ. )

असदपूर.—(वऱ्हाड) तालुका इलिचपुर यांतील एक गांव. घरें ४४२ लोकसंख्या २३५५ हें असेगावच्या जवळच पश्चिमेस चद्रभागा नदीच्या कांठीं आहे. हें शाहपुर, रायपुर, असदपूर आणि वासिनच्या चार वाड्या मिळून झालें आहे. या सर्वांना रंगस्वामि असेंहि नाव आहे. इ. स. १७६३ सालीं निजाम अलिखानानें एका मेहताबखानाला या खेडेगावांतील पुष्कळशी जमीन इनाम दिली होती. इ. स. १८७४ सालीं इनामी कमिशरनें रायपुर आणि शाहपुर येथील जमीन जहागीर आणि असदपुर येथील शेंभर बिघे जमीन इनाम म्हणून ठेवली. इ. स. १८८९ सालीं आपसांत भांडण झाल्यावरून जहागीरदाराकडून जहागीर काढून घेतली व सर्व इनामी जमीन केली. जहागीरींपैकीं एक मुख्य हिस्सेदार असदपुर येथें असतो ( १९११ ) येथें

मराठी शाळा आणि पोस्ट ऑफिस आहे. दर गुरवारीं येथें बाजार भरतो.

येथें एक श्रीनृसिंहाचें देऊळ असून सभामंडप वगैरे उत्तम तन्हेनें बांधिलेला आहे. त्याची व्यवस्था एलिचपुर येथील देशपांडे यांपैकीं एका घराण्याकडे आहे. या घराण्यास हा गांव इनाम आहे. दरसाल वैशाखशुद्धषष्ठीपासून तों वैशाख वद्य ४ पर्यंत उत्सव होतो ( उमरावती गॅ.)

असदितुसि—खोरासान प्रांतातील तुमचा रहिवाशी व गझनीच्या सुलतानमहंमुदाच्या दरबारांतील एक प्रख्यात कवि. सुलतान त्याला नेहमीं इराणचा दंतकथात्मक इतिहास लिहिण्याविषयीं आग्रह करी; पण म्हातारपणाची सबब सांगून तो तें टाळीत असे. त्याचा एक सर्वोत्कृष्ट ग्रंथ नष्ट झाला असें समजण्यांत येतें. शाहानाम्याचा कर्ता जो फिर्दोसि, त्याचा हा गुरु होता. असें सांगतात कीं, गझनींहून जातेवेळीं फिर्दोसीनें अर्धवट राहिलेला शाहानामा पुरा करण्याविषयीं त्याला विनंति केली. त्यावरून असदीनें खलीफ उमर याच्या ताब्यांतला पूर्व इराण, अरबांनीं पादाक्रांत केल्यापासून तों शेवटपर्यंतचा इतिहास चार हजार दोहोरे लिहून पुरा केला. असदीच्या मरणाचा काल माहीत नाहीं. तथापि, वरील कथेवरून असें दिसतें कीं, तो इ. स. १०१० मध्यें जिवंत होता. कारण, त्याच सालीं फिर्दोसीनें गझनी सोडली. असदीच्या इतर ग्रंथांपैकीं सुप्रसिद्ध ग्रंथ म्हणजे रात्र आणि दिवस यांमधील भांडणाचा होय. त्याचें इंग्रजी छंदोबद्ध भाषांतर लुइसा स्टुअर्ट कॉस्टेलो हिनें इ. स. १८४५ त लंडन येथें प्रसिद्ध केलेल्या रोझ गार्डन ऑफ पर्शिया नामक पुस्तकांत आढळतें. (बीलचा कोश)

असनसोल—(१) बंगाल प्रांतांतील वरद्वान जिल्ह्याच्या वायव्येकडील विभाग १९०६ पर्यंत याला राणीगंज विभाग असें नांव होतें. क्षे. फ. ६१८ चौ. मै. लो. सं. ( १९११ ) ३८८५८२. मोठीं गांवें:—असनसोल व राणीगंज. यांत लोखंडाच्या व दगडी कोळशाच्या खाणी सांपडलेल्या आहेत. दामागर येथें पितळेचीं व काशाचीं भांडीं आणि लाखेचे रंग तयार होतात.

( २ ) असनसोल विभागाचें ठिकाण. हें कलकत्त्याहून ईस्ट इंडियन रेल्वेनें १३२ मैल दूर आहे. हें एक महत्त्वाचें रेल्वेस्टेशन व जंक्शन असून कोळशाच्या व्यापाराचें एक प्रमुख केंद्र आहे. त्यामुळें येथील लोकसंख्या झपाट्यानें वाढत आहे. लो. सं. (१९११) २१९१९. येथें दोन इस्पितळें व बऱ्याच शिक्षणसंस्था आहेत. येथें दारू गाळण्याचे दोन व एक लोखंडी कामाचा असे तीन कारखाने चालतात. (इं. गॅ. ६. बर्नार्ड डिरेक्टरी ]

असन्शन—असन्शन ( न्युस्ट्रासेनोरा डिला असन्शन ) हें पॅराग्वेंतील शहर व बंदर असून पॅराग्वे प्रजासत्ताक राज्याच्या राजधानीचें शहर पॅराग्वे नदीच्या डाव्या तीरावर आहे. उ. अ. २५°१६'१४" व पू रे. ५७° ४२'४०" गोन्या वर ब्युनॉस एरीझच्या वरच्याबाजूस ९७० मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ९२००००. या बंदरांतून ब्युनॉस एरीझ व मॉंटे व्हिडियो येथें नियमितपणें बोटी जातात. व व्हिलारिकाशीं हें शहर रेल्वेनें जोडलेलें आहे. हें शहर असन्शन उपसागराच्या तीरावर सखल वालुकामय मैदानावर वसलेलें आहे. व्यवस्थित प्रमाणावर हें जें शहर वसविलेलें आहे त्याचें श्रेय डिक्टेटर फ्रॅन्सिया यास दिलें पाहिजे. मुख्य रस्ते फरसबंदी असून त्यावर विजेचे व ग्यासचे दिवे आहेत. तसेंच ट्रामगाड्या आहेत, व टेलिफोनहि आहेत. हवा उष्ण परंतु निरोगी आहे. सरासरी उष्णतामान ७२ फॅरनहीट आहे. येथें १५४७ पासून बिशपचें ठाणें आहे व धार्मिक इमारती येथें बऱ्याच आहेत. येथें राष्ट्रीय विद्यालय व सार्वजनिक पुस्तकालय आहे. पण शिक्षणांत फारशी प्रगति झाली नाहीं. धाकट्या लोपेझनें बांधण्यास सुरुवात केलेला राजवाडा हीच या शहरांतील मुख्य इमारत आहे व सध्यां येथें एक पेढी आहे. येथें कांहीं व्यापाऱ्यांचीं दुकानें व राहण्याचीं घरेंहि प्रेक्षणीय आहेत. परंतु बरींच घरें निव्वळ मातीच्या विटांचीं व धाब्याचीं आहेत. अव्यवस्थित राज्यकारभार व लोकांचें दारिद्र्य असून सुद्धा १९ व्या शतकाच्या अखेरच्या १० वर्षांत या शहराची बरीच प्रगति झाली आहे. १९१७ सालीं ४६९८२२ टनेजचीं ३७६१ जहाजें असन्शन बंदरांत आलीं व ४७४३४२ टनेजचीं ३७६० जहाजें बाहेर गेलीं. पॅराग्वे सेंट्रल रेल्वे असन्शन पासून एन्कार्नेशनपर्यंत गेली आहे. रेल्वे रस्त्याशेजारून टेलिग्राफ लाईन गेलेली आहे असन्शन येथें बिनतारी तारायंत्र सुरू केलें आहे. याची स्थापना आयोलासनें १५३५ मध्यें केली होती हा प्लाटावरील सर्वांत जुनी कायमची स्पॅनिश वसाहत होय बराच काळापर्यंत स्पॅनिश राज्यकारभाराचें ठाणें याठिकाणीं होतें, व धर्माधिकारी व जेसुइट लोक यामधील भांडणें येथेंच झालीं. १८११ मध्यें स्वातंत्र्य जाहीर झाल्यानंतर हें शहर डॉ. फ्रॅन्सिया व थोरला आणि धाकटा लोपेझ याच्या अनियंत्रित सत्तेखालीं सांपडलें. यामुळें याच्या प्रगतीस बराच अडथळा झाला. १८६९ मध्यें ब्राझिलच्या लोकांनीं हें शहर काबीज करून लुटलें व नंतर येथें कित्येक राज्यक्रांतिकारक बंडें झालीं. १९०५ मधल्या बंडाच्या वेळीं बरेच महिनेपर्यंत या शहराला वेढा पडला होता.

असफ–उद्दौला.–अयोध्येचा नबाब (१७७५–१७९७) ‘ अयोध्या प्रांत ’ हा लेख पहा.

असफखान—(१)नूरजहानचा भाऊ. याचें मूळचें नांव अबुल हसन असून, यत्कादखान, येमीन—उद्दौला इत्यादि अनेक पदव्या याला मिळाल्या होत्या. याचा बाप ग्यासबेग मरण पावल्यावर जहांगीर बादशहानें याला वझीर केलें. याची मुलगी अर्जुमंद बानो बेगम उर्फ मुम्ताझ महल ( जिच्याकरितां ताजमहाल बांधला तीं) ही शहाजहानाला

दिली होती. जहांगीरच्या मागें आपला जावई शहाजहान गादीवर बसावा म्हणून यानें बरीच खटपट केली व नूरजहानशींहि त्या करिता शत्रुत्व केलं हा इ. स १६४२ त लाहोर येथें मरण पावला मरणसमयीं याजवळ अलोट संपत्ति होती म्हणतात मुम्ताझ खेरीज त्याला चार मुलगे होते; त्यांपैकीं शाएस्तेखान हा अवरंगझेबाच्या कारकीर्दीत बराच प्रसिद्धीस आला [ बील; मुसुलमानी रियासत इ ]

(२) हा मिर्झा जाफर या नावानें प्रसिद्ध आहे. हा कझ्वीनचा रहिवासी असून तरुणपणींच हिंदुस्थानात आला (१५७७) याचा एक जवळचा आप्त अकबराच्या पदरीं बक्षीगिरीच्या हुद्यावर होता त्यालाहि असफखान हीच पदवी होती तो वारल्यावर बादशहानें याला असफखान हा किताब देऊन त्याच्याच जागीं नेमिलें (१५८१) हा उत्तम कवि असून अकबरानें 'तारीख अल्फी' रचण्यास नेमलेल्या लेखकांपैकीं हा एक होता मुल्लामहमदाचा खून झाल्यानंतर यानेंच हा ग्रंथ पुरा केला. 'शीरीन–व–खुश्रो' नावाचें काव्य याचेंच आहे. १५९८ त अकबरानें याला मुख्य दिवाणाची जागा दिली व जहांगीरच्या अमदानींत वझारत हा उच्च दर्जा त्याला प्राप्त झाला. असफखान १६१२ मध्यें मरण पावला. आपल्या काव्यातून तो जाफर हें नाव स्वतः बद्दल योजीत असे. [ बील. ]

**असबस्ट**—( असबेस्टॉस ) हें एक तंतुमय खनिज द्रव्य असून त्यावर विस्तवाचा परिणाम होत नसल्यामुळें त्याला अज्वलनशील असें म्हणतात. प्राचीन काळीं यूरोपात याचे हात रुमाल, व प्रेताची राख लाकडाच्या राखेशीं मिसळू नये म्हणून कफन्या करीत.

निरनिराळ्या प्रकारच्या ॲसबेस्टॉसचे तंतू भिन्न प्रकारचे असतात. ते रेशमासारखे असल्यास त्यांना डोंगरी ताग असें म्हणतात. हे तंतू स्वाभाविकपणें बुरणुसासारखें दाबून बसलेले असल्यास त्यांना डोंगरी कातडें, डोंगरीबूच डोंगरी कागद वगैरे नावें देण्यात येतात. हल्लीं सर्व प्रकारच्या ॲसबेस्टॉस मध्यें कानडात सापडणारा ॲसबेस्टॉस औद्योगिक दृष्ट्या फार महत्त्वाचा आहे. तो क्वेबेक प्रांतात, मुख्यत. काळें सरोवर व थेटफोर्ड याजवळ लहान लहान नागमोडी पट्ट्यांच्या रूपात आढळतो खाणींतून खणून काढल्यानंतर दगडाचे हातोड्यानें फोडून तुकडे करितात, वाळवितात, ( बारिक ) चुरा करितात व नंतर चरकातून काढितात. पुढें त्याचे तंतू निरनिराळे केल्यानंतर ते निवडले जातात.

शार्लमान राजाजवळ ॲसबेस्टॉसची एक टेबलावरची चादर होती, ती खराब झाली असतां अग्नींत घालून स्वच्छ करण्यांत येत असे. लाब्राडोरचे एस्कीमो प्राचीन काळापासून त्याच्या दिव्याकरिता वाती करीतात. सांप्रतच्या काळीं औद्योगिक कालांत ॲसबेस्टॉसचा उपयोग पुष्कळ कामाकरितां केला जातो. कितीहि ज्यास्त उष्णतामान केलें तरी यावर कांहीं एक परिणाम होत नाहीं एवढ्या एकाच गोष्टीने नव्हे तर त्याची उष्णतावहनशक्ती (थर्मलकंडक्टिव्हिटी) फार कमी असून अम्लाचाहि त्यावर फारसा परिणाम होत नाहीं यामुळें त्याला महत्त्व आलेलें आहे. याच कारणामुळें तापक ( बॉयलर ) व वाफ नेण्याच्या नळ्याभोंवतीं तो लावितात व क्षयकारी द्रवपदार्थ ( करोझिव्ह लिक्विड्स ) गाळण्याकरितां त्याचा उपयोग करितात. विद्युद्दीपकासारखाहि त्याचा उपयोग होऊं लागला आहे त्याचे धागे, बुरणुस, पत्रे ( बोर्ड ) वगैरे करून त्याचा उपयोग साधे, ग्रंथि ( ग्लँड ), तोट्या वगैरे बसविण्याकरिता केला जातो. अदाह्य बुरणुसाचा उपयोग जमिनीवर अंथरण्याकरितां किंवा घरावर घालण्याकरिता करितात. नाटकाकरिता अदाह्य पडदे व अग्निशामकाच्या ( फायरमनाच्या ) अंगातील कपडे असबेस्टॉसचे करूं लागले आहेत अदाह्य सीमेंट ( शिमीट ), गिलावा व रंग, यामध्यें असबेस्टॉस घातलेला असतो. याशिवायहि पुष्कळ कामाकरिता असबेस्टॉसचा उपयोग होऊं लागला आहे.

उत्तर अमेरिकेंत कागद करण्यासहि याचा उपयोग करितात हा कागद जळला तरी त्यावरचीं अक्षरें वाचता येतात.

कच्च्या स्वरूपात हा पदार्थ बहुतेक सर्वत्र सापडतो पण जगातील कांहीं थोड्याच ठिकाणीं व्यापारास पुरेसा असा ॲसबेस्टास शुद्ध स्वरूपात मिळतो, उदा. टिरॉल, हंगेरी, क्वीन्सलंड, न्यू साउथ वेल्स आणि न्यूझीलंड या देशातून हा मर्यादित प्रमाणात निघतो अमेरिकेंतील संयुक्त संस्थानातहि पुष्कळ ठिकाणीं दिसतो. केप कॉलनींत केप ॲसबेस्टास म्हणून निळ्या तंतूचा पदार्थ आढळतो. पूर्वी इटली व कॉर्सिका येथूनच याचा पुरवठा होई, पण हल्लीं महत्त्वाचा असा पुरवठा कानडातून होतो. १९०७ साली लॉईड जॉर्ज याचा पेटंट ॲक्ट पास झाल्यापासून याच्या व्यापाराला चांगलेंच उत्तेजन मिळालें आहे. शुद्ध ॲसबेस्टास घालून केलेल्या लंडन पोर्टलंड सीमेंटचीं कौलें व फरशा बांधकामात फार उपयुक्त आढळून आल्या कारणानें बाजारात त्यांना फार महत्त्व आलें. गृहसौंदर्याच्या कामीं 'पॅनटाईल' हीं कौलें आग व पाणी यापासून घराचा बचाव करतात, एवढेंच नव्हे तर हवेचाहि त्यावर कांहीं परिणाम होत नाहीं. ॲसबेस्टासच्या हाथन्याहि जिकडे तिकडे शाळा, नाटकगृहें, कारखाने, इस्पितळें, आगगाड्या, आगबोटी यातून उपयोजिल्या जात असून आगीप्रमाणें ओलीपासूनहि त्या बचाव करितात.

हिं दु स्था न—ॲसबेस्टासला मुंबईंत शंखपलित हें नाव आहे. अफगाणिस्तान पंजाब, गऱ्हवाल, भोपवार ( मध्य हिंदुस्थान ), छोटानागपूर व म्हैसूरमध्यें ॲसबेस्टॉस सापडतो

हिंदुस्थानात प्रतिवर्षी ४० ते ४८ रु. किंमतीचा म्हणजे ५१६ हंड्रेडवेट ॲसबेस्टॉस निघतो; अलीकडे अदाह्य द्रव्यांची

गरम जास्त भासूं लागल्यामुळें ॲसबेस्टॉसची मागणी जास्त वाढत आहे व ॲसबेस्टॉस जास्त काढण्याचे प्रयत्न जारीनें सुरू आहेत अलीकडे सेंट्रल इंडिया एजन्सींत सांपडलेल्या असबेस्टॉसचा नमुना विलायतेंतील इंपीरियल इन्स्टिट्यूट मध्यें परीक्षणार्थ पाठविण्यांत आला होता तेथील अभिप्राय असा पडला कीं, येथील असबेस्टॉस ठिसूळ व मऊ असून, त्याचे धागे फार आखूड असतात त्याचा रंगहि हलक्या प्रकारचा असतो तो परदेशीं पाठविणें फायदेशीर होणार नाहीं परंतु त्याचा येथें उपयोग करण्यास हरकत नाहीं

[ संदर्भ ग्रंथ —फिटझ-सर्कल-ॲसबेस्टॉस, ओटावा १९०५ ॲन्युअल रिपोर्टस ऑन मिनेरल रिसोर्सेस, युनाय टेड स्टेटस जिऑ० सर्व्हे० मेरिल-दि नॉनमेटॅलिक मिनेरल्स, न्यूयार्क १९०४ जोन्स-ॲसबस्टॉस ॲंड ॲसबेस्टिक, लंडन १८९७ ए बि वॅट-कमर्शिअल प्रॉडक्टस मोडक-पदार्थ वर्णन, भाग १ ला व्हिटकर्स अलमॅनॅक १९२३ ]

**असमंजा**—(सूर्य वंशी) इक्ष्वाकुकुलोत्पन्न सगर राजास केशिनी भार्येच्या ठायीं झालेला पुत्र हा नगरांतील जनांचीं मुलें, खेळाच्या मिषानें नगराबाहेर नेऊन, सरयू नदींत बुडवी या प्रमाणें बहुत मुलें, बुडल्यामुळें, नगरांत मोठा बभाटा झालेला राजास कळला, त्यावरून त्यानें यास राज्यांतून निघून जाण्याची आज्ञा केली. तेव्हां यानें बुडवि लेलीं मुलें योगसामर्थ्यानें बाहेर काढून आपण अरण्यांत चालता झाला यास, अंशुमान या नामें करून एक प्रख्यात पुत्र होता. ( महाभारत ३, १०७, १८, ५७ ) सगरानंतर हा राज्यपद पावला व अंगच्या पराक्रमावरून पंचजन या नांवानें फार प्रसिद्धीस आला असाहि विशांत उल्लेख आहे

**असरळी**—जिल्हा चांदा तालुका शिरोंचा, गोदावरी नदीच्या वामतीरावर शिरोंचाच्या दक्षिणेस सुमारें १९ मैलांवर हें मोठें खेडें आहे इ स १९०१ सालीं येथें ३१२८ लोकांची वस्ती होती हा गांव बहुतेक शेती आहे येथें दर शुक्रवारीं बाजार भरतो व त्या वेळीं बरेच दूरदू रचे लोक बाजाराला येतात राजू आणि कोमटी लोकांची येथें बरीच वस्ती आहे पोलिस ठाणें, प्राथमिक शिक्षणाची शाळा व पोस्ट हीं येथें आहेत ( चांदा गॅ १९०९)

**असरूर**—(पंजाब) खानघाडोग्रान तालुका हो टाकांची किंवा उत्तर पंजाबची राजधानी होती लाहोर आणि पिंडी भाटीआन यामधील मोठ्या रस्त्याच्या दक्षिणेस २ मैलांवर हें आहे ह्या गांवीं इ स ६३० त ह्युएन्त्संग हा आला होता, व त्या वेळीं ह्याचें नांव सिरकी किंवा टाकी असें होतें, असें कनिंगहॅमचें मत आहे पूर्वीच्या अवशेषांमध्यें सांपडलेल्या १८ इंच लांब, १० इं रुंद व ३ इं जाड एवढ्या मोठ्या विटा व इंडो सिथियन नाणीं यावरून या गांवाचें प्राचीनत्व सिद्ध होतें जुन्या शहराच्या अवशेषभागाचा घेर ३ मैल असून त्याच्या वायव्य भागांत ६०० फूट लांब ४०० फूट रुंद व ५९ फूट उंच असा एक भाग आहे त्या ठिकाणीं २१ फूट व्यासाची एक जुनी व निर्जल विहीर आहे येथें जुना राजवाडा होता असें कनिंगहॅमचें मत आहे ह्या जागेसभोंवतीं लहान लहान टेंकड्यांची एक रांग आहे हा पूर्वीच्या तटाचा अवशेष असावा ह्युएन्त्संगाच्या वेळीं या गांवांत दहा बौद्ध मठ होते, व येथून जवळच २ मैलांवर अशोकानें एक २०० फूट उंचीचा स्तूप बांधिला होता हा स्तूप म्हणजेच हल्लींची सालार टेंकडी होय असें कनिंगहॅमचें मत आहे यास पूर्वी उद किंवा उदनगर म्हणत असें सांगतात मध्यंतरी पुष्कळ शतकें हें ओसाड होतें पुढें अकबराच्या वेळेस उगरशहानें येथें एक मशीद बांधिली

हल्लींचें असरूर गांव फारच लहान असून तेथें फक्त ४५ घरें आहेत ( इंडियन ॲ ६, दीक्षित—भारतवर्षीय भूगणन )

**असहकारिता**—( नॉन-कोऑपरेशन )—हा शब्द अलीकडेसच प्रचलित झाला आहे सरकार व प्रजा किंवा समाजांतील निरनिराळे अवयव यांपैकीं दुर्बल वर्गानें बलिष्टास नमविण्याची राजकीय व सामाजिक नीतिशास्त्रांतील पद्धति या दृष्टीनें असहकारितेचे विचार व चळवळ हीं पुढें आलीं आहेत सहकारिता म्हणजे एकत्र किंवा परस्पराच्या साहाय्यानें कार्य करणें, आणि असहकारिता म्हणजे अशी मदत न करणें मनुष्यप्राणी एकलकोंडा न राहतां अनेक व्यक्तींचा समाज बनवून राहतो, आणि समाजाचें अस्तित्व व कार्य एकमेकांच्या मदतीनें चालतें अन्योन्याश्रय हा समाजव्यवस्थेचा केवळ पाया आहे सरकार म्हणजे समाजावरचें सर्वसाधारण नियंत्रण करणारी शक्ति, ही सरकार व रयत यांच्या अन्योन्याश्रया- मुळेंच उत्पन्न होते आणि या अन्योन्याश्रयाची जाणीव उत्पन्न करून प्रजेनें स्वत्व स्थापन करणें हें असहकारितेच्या चळवळीचें ध्येय आहे अन्योन्याश्रय ओळखून स्वत्वस्थापन करणें ही गोष्ट मात्र नवीन नाहीं रूसो या फ्रेंच तत्ववेत्त्यानें 'सरकार' या संस्थेच्या उत्पत्तीला 'सोशल कॉंट्रॅक्ट' ( सामाजिक करार ) हें आदिकरण सांगून शास्ते व शासित यांच्या सहकार्यावर सरकारचें अस्तित्व अवलंबून असतें असें तत्व लोकांस जाणविलें रूसोनें सांगितलेलें समाज घटनेचें आदिकरण ऐतिहासिक दृष्ट्या जरी चुकीचें असलें तरी राजकारणांत परिणामकारी झालें अर्थात एका पक्षानें सहकार्य न केल्यास दुसऱ्या पक्षाचें चालणार नाहीं कायदे करणें, न्याय देणें व अंमल बजावणी करणें, हीं सरकारचीं जीं तीन कामें त्यांत सरकारशीं असहकारिता करून म्हणजे कायदेमंडळावर बहिष्कार टाकून कर न देऊन, व न्यायकोर्टाची पायरी न चढून सरकारचा राज्य कारभार बंद पाडावा आणि इच्छित राजकीय हक्क प्रत्यक्ष युद्ध न करतां संपादावे, असा असहकारितेच्या चळवळीचा एकंदर उद्देश असतो

असल्या असहकारितेचे प्राचीन इतिहासांत अनेक दाखले सांपडतील. त्यांपैकीं एक सुप्रसिद्ध उदाहरण म्हणजे प्राचीन रोमन इतिहासांतील पॅट्रिशियन व प्लीबियन यांच्या भांडणाचें आहे. प्राचीन रोम येथील समाजाचे दोन भाग असून त्यांपैकीं प्लीबियन लोकांनीं पॅट्रिशियन लोकांपासून राजकीय व सामाजिक हक्क मिळविण्याकरितां पॅट्रिशियन लोकांशीं *असहकारिता केली; तेव्हां पॅट्रिशियन लोकांना तडजोड* करावी लागली. ग्रीकच्या प्राचीन इतिहासांतील 'ऑस्ट्रासिझम" ( राजद्रोही माणसाची दहा वर्षे हद्दपारी ) हा प्रकार निराळा; "एक्स्कम्युनिकेशन" म्हणजे धर्मसत्तेनें पापी माणसावर घातलेला संघबहिष्कार ( किंवा जाति ) बहिष्कार निराळा; 'बायकॉट' *हा प्रकार निराळा आहे.* एकाद्याशीं व्यापार *विषयक किंवा सामाजिक व्यवहारविषयक* संबंध ठेवण्याचें नाकारून त्याला पेंचांत आणणें, याला बॉयकॉट *किंवा बहिष्कार म्हणतात. हद्दपारी व जातिबहिष्कृतता* हे सत्ताधीशानें बंडखोराला करावयाच्या शिक्षेचे प्रकार आहेत बॉयकॉट हा सामुदायिक नापसंति दर्शविण्याचा मार्ग आहे; आणि असहकारिता *हा स्वातंत्र्याकरितां प्रत्यक्ष* युद्ध न करतां स्वतःच्या कृत्यावर ज्या क्रिया अवलंबून असतात त्या ताब्यांत घेऊन राजकर्त्यांस नमविण्याचा मार्ग आहे.

आ धु नि क इ ति हा स.—*बलिष्ठ साम्राज्यसत्तेपासून* पूर्ण स्वातंत्र्य किंवा मर्यादित राजकीय हक्क मिळविण्याचें शस्त्र म्हणून असहकारितेचा उपयोग १९ व्या व २० व्या शतकांत *केलेला विशेष दृष्टीस पडतो* ऑस्ट्रियन साम्राज्य सरकारशीं हंगेरियन लोकांनीं, आणि ब्रिटिश सरकारशीं आयर्लंड, इजिप्त वगैरे देशांनीं असली असहकारिता केली. *पण* सर्व ठिकाणच्या लोकांनीं असहकारितेच्या मार्गांत शस्त्राची मदत घेतली. पण १९२०–२१ मध्यें हिंदुस्थानांत महात्मा गांधींनीं असहकारिता उपदेशिली तिच्यांत अनत्याचारित्व हें प्रधान तत्व होतें, हा हिंदुस्थानच्या व इतर देशाच्या असहकारितेंतील प्रमुख फरक आहे, *आणि* यांतच अधिक प्रागतिकता दिसून येते. महात्मा गांधींनीं राजकीय हक्कांप्रीत्यर्थ उपदेशिलेल्या मार्गांचा इतिहास पाहतां *त्यांत तीन पायऱ्या दिसतात. पहिली निःशस्त्रप्रतिकार* ( पॅसिव्ह रेझिस्टन्स ); दुसरी सविनय कायदेभंग; ( सिव्हिल डिसओबीडियन्स ) आणि तिसरी पायरी असहकारिता. *यांपैकीं* असहकारितेचा कार्यक्रम पुष्कळ *व्यापक असूनहि* असहकारितेला हिंदुस्थानांत अल्प काळांत कल्पनेपेक्षां फार अधिक यश आलें, याचें कारण मनुष्याची काहीं न करणें ही नैसर्गिक प्रवृत्ति हें एक आहेच 'अमकें करा' असें न सांगतां 'अमकें करूं नका' असें *सांगितल्यास तें बहुजनसमाजास* सहज आचरितां येतें. सत्याग्रह, कायदेभंग, याच्यासारखें प्रत्यक्ष कार्य करण्यापेक्षां कौन्सिलबहिष्कारार्थ मत देण्यास न जातां घरीं स्वस्थ बसणें ही असहकारिता करणें सोपें असतें. तथापि अत्यंत दुर्बलासहि शक्य असा कार्यक्रम या षडक्षरी मंत्रानें दर्शविला, त्यामुळें यास अनुयायी पुष्कळ मिळाले आणि केवळ संख्याधिक्यानें हा शब्द महत्व पावला. *आणि परिणाम भारी बनला.*

हिं दु स्था नां ती ल अ स ह का रि ता.—हिंदुस्थानाला १९१९ च्या कायद्यानें ( इंडियन रिफार्म्स ॲक्ट ) दिलेलें स्वराज्याचे हक्क असमाधानकारक आहेत असें सर्व साधारण मत झालें होतें. त्याच सुमारास पंजाबांत इंग्रज अधिकाऱ्यांनीं केलेल्या अत्याचाराबद्दल, व खिलाफतीच्या बाबतींत ब्रिटिश सरकारनें केलेल्या वचन*भंगाबद्दल सरकारशीं असहकारिता करून लोकांच्या मागण्या* सरकारास मान्य करण्यास लावण्याकरितां महात्मा गांधींनीं असहकारितेचें तत्व राष्ट्रापुढें मांडलें असहकारितेच्या कार्यक्रमांत (१) कौंसिलबहिष्कार, (२) कोर्टबहिष्कार, (३) सर*कारी व निमसरकारी शिक्षणसंस्थांवर बहिष्कार,(४)सरकारी* पदव्यांचा त्याग, (५) परदेशी कापडावर बहिष्कार, या गोष्टी सांगितल्या. नंतर (१) शुद्ध खादीची ( हातसुताच्या व हात मागाच्या ) पैदास, (२) अस्पृश्यतानिवारण, (३) टिळक स्वराज्य फंड, (४) *वकिलांनीं वकिली आणि* विद्यार्थ्यांनीं शाळाकालेजें सोडून काँग्रेसच्या कार्याचा खेडोपाडीं प्रचार करणें, (५) हरताळ पाळणें, (६) प्रार्थना व *उपवास करणें, वगैरे प्रत्यक्ष आचरणाच्या उर्फ विधायक* कार्यक्रमाच्या गोष्टी सांगितल्या. या सर्व प्रयत्नास कितपत यश आलें तें प्रसिद्धच आहे. सरकारशीं विरोध येईल तेथें तेथें पूर्ण शांततेनें उर्फ *अनत्याचारीपणानें* प्रतिकार करणें हे गांधींच्या मार्गांतलें आद्यतत्व होतें. १९२१ सालीं प्रथम कौन्सिल बहिष्कार, नंतर कोर्टें व शिक्षणसंस्था यावरील बहिष्कार, *टिळक स्वराज्यफंड (एक कोटी रुपये,) जमविणें नंतर परदेशी कप*ड्याची होळी व खादीप्रसार, या गोष्टी एकामागून एक हातीं घेऊन पुढें राष्ट्रीय स्वयंसेवकमंडळें स्थापण्याच्या कार्यास *सुरवात केली आणि सरकारनें त्यास मनाई* करतांच त्याच बाबतींत कायदेभंगाची मोहीम सुरू केली. स्वयंसेवकांचा कायदेभंग व तुरुंगवास या गोष्टींनीं १९२१च्या ऑक्टोबर नोवेंबर महिन्यांत बहुतेक हिंदुस्थान हलवून सोडला आणि डिसेंबरास अहमदाबाद काँग्रेसनें बार्डोली तहशिलींत संपूर्ण असहकारिता म्हणजे सरकारचा प्रत्येक बाबतींत संबंध तोडून व कर न देण्याचें कबूल करून *त्या तालुक्याचे सर्व व्यवहार तेथल्या लोकांनीं स्वावलंबनानें करावयाचे, असा प्रयोग सुरू* करण्याचें काम खुद्द गांधींनीं हातीं घेतलें. पण आयत्या वेळीं चौरीचुरा येथें *अत्याचार* झाल्यामुळें बार्डोलीचा कार्यक्रम बंद ठेवून पुन्हा खादीप्रचार, अस्पृश्यतानिवारण, हिंदुमुसलमानांची एकी वगैरे विधायक कार्यक्रमावर भर देण्यांत आला. पुढें लवकरच सरकारनें गांधीवर राजद्रोहाचा खटला केला व त्यांना (१९२२) सहा वर्षांची शिक्षा झाली.

या सर्व गोष्टींचें स्वरूप स्पष्ट होण्यास समकालीन राजकारणाच्या व लोकभावनांच्या ठेवणींत असहकारितेची चळवळ मांडली पाहिजे.

१९२० आगस्टच्या पहिल्या तारखेपासून गांधींनी आपली असहकारितेची चळवळ स्वतःच्या जबाबदारीवर सुरू केली. योग असा आला कीं, जुलैमध्यें तिची कल्पना मांडली गेली आणि १ आगस्ट रोजीं लोकमान्य टिळक परलोकवासी झाले. तथापि गांधींच्या नव्या चळवळीबद्दल पुढाऱ्यांत चाटापाट टिळकांच्या हयातींतच सुरू झाली होती. नवा सुधारणाचा कायदा असमाधानकारक असला तरी कौन्सिलांत शिरून प्रतियोगी सहकारिता करावयाची असें टिळकदासप्रभृति सर्व काँग्रेस पुढाऱ्यांनी ठरविलें होतें. पण गांधींनीं नव्या सुधारणांची सदोषता खिलाफतीच्या बाबतींत ब्रिटिश प्रधान लाईड जॉर्ज यांनी १९२० मार्चमध्यें हिंदी मुसुलमान शिष्ट मंडळाची केलेली निराशा, व पंजाबांतील अत्याचारांच्या बाबतींत हंटर कमेटीचा रिपोर्ट, व ब्रिटिश पार्लमेंटचें वर्तन यामुळें झालेली निराशा, या गोष्टी विचारांत घेऊन ही तिन्हीं गाऱ्हाणीं दूर करण्याकरितां कौन्सिलांतील प्रतियोगी–सहकारिते ऐवजी असहकारितेची चळवळ करण्याचें ठरविलें तथापि टिळक ह्यात होते तोंपर्यंत गांधींच्या मार्गानें राष्ट्र जाण्यास तयार होईल असें वाटत नव्हतें. तरीहि गांधींनी १९२० आगष्टपासून असहकारिता पुकारली व त्याच दिवशीं टिळक वारले १९२० सप्टेंबरमध्यें कलकत्याच्या खास काँग्रेसमध्यें थोडक्या बहुमतानें असहकारिता सुरू करण्याचें व त्यांत पुढील गोष्टींचा अंतर्भाव करण्याचें ठरलें.—( १ ) सरकारी पदव्या व केवळ मानाच्या जागा तसेंच स्थानिक संस्थांमधील सरकारनियुक्त जागा सोडणें, ( २ ) सरकारी दरबार व इतर निमसरकारी समारंभ यांत भाग न घेणें, ( ३ ) मुलांना सरकारी व निमसरकारी शाळा व कॉलेजें यामधून हळूहळू काढणें,व राष्ट्रीय शाळा व कॉलेजें प्रांतोप्रांतीं स्थापणें, ( ४ ) ब्रिटिश न्यायकोर्टांवर वकीलांनीं व पक्षकारांनीं बहिष्कार घालून लवादकोर्टामार्फत दाव्याचा निकाल लावून घेणें, ( ५ ) मेसापोटेमियांत नोकरी लष्कर, कारकुन व मजूर या पेशाच्या लोकांनीं न पत्करणें, ( ६ ) नव्या सुधारणाच्या कायद्यानुसार होणाऱ्या निवडणुकींत उमेदवार व मतदार या नात्यानें भाग न घेणें. या प्रमाणें कलकत्ता काँग्रेसनें ठराव केल्यावर गांधी व त्यांचे निकट अनुयायी यांनी देशभर फिरून वरील गोष्टींकडे लोकमत वळविण्याचा उद्योग सुरू केला. पदव्या व वकीली सोडण्यास फार थोडे लोक तयार झाले १९२१ फेब्रुवारीपर्यंत ५००० सरकारी पद वीधारांपैकीं फक्त २१ जणांनीं पदव्या सोडल्या शिक्षण संस्थावर बहिष्कार घालण्याच्या बाबतींत गांधी समक्ष जात तेथें त्यांचे उच्च विचार व स्पष्ट भाषण यांनी विद्यार्थ्यांच्या मनावर अधिक परिणाम होत गेल्यामुळें या बहिष्काराच्या बाबतींत बरेंच अधिक यश आलें. तथापि बनारसच्या हिंदु युनिव्हर्सिटींत पंडित मालवीय यांच्या नेतृत्वाखालीं गांधींना विरोधच झाला उलटपक्षीं खिलाफतीच्या अन्यायामुळें नवचलेल्या मुसुलमानांच्या अलीगडच्या अँग्लो–ओरियंटल कालेजांतून पुष्कळच विद्यार्थी बाहेर पडले. शिवाय सरकारी शिक्षणपद्धतीवर टीका व राष्ट्रीय शिक्षणसंस्थांची मागणी बरींच वर्षें चालू असल्यामुळें या वेळीं नव्या शाळा व कॉलेजें व युनिव्हर्सिट्या स्थापन झाल्या. पुण्याचें टिळक विद्यापीठ, टिळक महाविद्यालय, व पाठशाळा, मुंबईचें राष्ट्रीय मेडिकल कॉलेज, अहमदाबादेस राष्ट्रीय युनिव्हर्सिटी कॉलेज, शाळा, याप्रमाणें अनेक ठिकाणीं नव्या राष्ट्रीय शिक्षणसंस्था निघाल्या

पण १९२० नवंबरमध्यें झालेल्या नव्या कौन्सिलाच्या निवडणुकीवर गांधींच्या उपदेशाचा विशेष महत्त्वाचा परिणाम झाला काँग्रेसपक्षापैकीं कोणीहि नव्या निवडणुकींत उमेदवार उभा राहिला नाहीं त्यामुळें मॉडरेट पक्षाला हें क्षेत्र अगदीं मोकळें मिळून सर्व कौन्सिलाच्या निवडणुकींत या पक्षाचे लोक अनायासें निवडून आले नव्या सुधारणा यशस्वी करण्याबद्दल ते ब्रिटिश सरकारशीं वचनबद्ध झाले होतेच त्याप्रमाण सरकारशीं सहकरिता करण्यास त्यांना पूर्ण संधि मिळाली गांधींच्या या कौन्सिल बहिष्कारानें हिंदुस्थानचा शासनविषयक इतिहास टिळकांच्या प्रतियोगी सहकारितेमुळें बनला असता त्याहून फारच निराळा बनला कौन्सिलच्या जागा निवडणुकींत प्रथम अडवून मग बहिष्कार घालण्यानें काय घडलें असतें तें आयर्लंडच्या किंवा ईजिप्तच्या इतिहासावरून किंवा सांप्रतच्या स्वराज्यपक्षाच्या कामगिरीवरून कळणें योग्य नाहीं. सन १९२० च्या निवडणुकींत मॉडरेट उमेदवार पुढें आल्यामुळें सरकारी दृष्टीनें गांधींचा कौन्सिलबहिष्कार पूर्ण अयशस्वी झाला. कारण एकदर ६३७ जागांपैकी उमेदवार उभा नाहीं अशा जागा अवघ्या सहा निघाल्या मतदानाच्या दृष्टीनें खेड्यांपेक्षां शहरांत यश अधिक आलें. खुद्द मुंबई शहरांत शेंकडा ८॥ तर मद्रास इलाख्यांतील कांहीं मतदारसंघांत शेंकडा ७० मतदारांनीं मतें देण्यांत भाग घेतला प्रांतवारीनें पाहतां पंजाबांत शेंकडा, ३२ ते ३६ संयुक्त प्रांतांत शेंकडा ३३ ते ४० पर्यंत, याप्रमाणें प्रमाणें पडलें

इ. स. १९२० डिसेंबरपर्यंतच्या चळवळीला या प्रकारचें यश आल्यावर त्या महिन्यांत नागपूरला काँग्रेस भरली तेथें गांधींच्या चळवळीचा पुन्हा चर्चा होऊन ती मोठ्या बहुमतानें मान्य झाली मालवीय, जीना, खापर्डे वगैरे कित्येक पुढारी तटस्थ राहिले या बैठकींत काँग्रेसचें 'क्रीड' बदलण्यांत आलें, आणि काँग्रेस ही संस्था निश्चितपणें कौन्सिलाबाहेरील म्हणजे उरलेल्या हक्कासाठीं लोकांनी सर्वांकृत करून सरकारला होईल तितका विरोध करणारी संस्था बनविण्याचें ध्येय असलेल्याची जमात व्हावयास

सुरुवात झाली आणि यामुळें ती विशिष्ट पक्षाची आहे असें कौन्सिलांत जाऊन काम करूं इच्छिणारे लोक म्हणूं लागले.

असहकारितेच्या आरंभापासूनच तिच्या शक्य परिणामांचें भयावह स्वरूप सरकारच्या लक्षांत आलेलें होतें. केवळ शिक्षितांतच राजकीय चळवळ न राहता ती खेड्यापाड्यांत अशिक्षित समाजांत पसरणार, व त्यामुळें अत्याचार, बंडाळी झाल्याशिवाय राहणार नाहीं, असें सरकारचें मत होतें. अशा स्थितींत सरकार या चळवळीबद्दल काय धोरण स्वीकारणार तें जाहीर होणें जरूर होतें व त्याप्रमाणें नव्या असेंब्लीमध्यें व्हाइसरॉय चेम्सफर्ड साहेब यांनीं असें जाहीर केलें कीं, ही चळवळ बेसनदशीर आहे. कारण साम्प्रतचा राज्यकारभार बंद पाडून उलथून पाडणें हा तिचा उद्देश आहे, असें सरकारचें मत आहे; तरी तिच्या पुरस्कर्त्यांविरुद्ध सरकारनें खटले केले नाहींत कारण त्यांनीं असहकारितेबरोबर अनत्याचारित्वाचा उपदेशहि चालविला आहे, मात्र चळवळे लोक मुख्य पुढाऱ्यांच्या उपदेशापुढें जाऊन अत्याचारास भाषणानें किंवा लेखानें उत्तेजन देतील, किंवा लष्कर व पोलिस यांची राजनिष्ठा ढळविण्याचा प्रयत्न करतील त्यांच्यावरच फक्त खटले करावे असें प्रांतिक सरकारास कळविलें आहे. एकंदर हिंदुस्थानांतलें सर्व साधारण लोकमत समजूतदार असल्यामुळें तें या चळवळीला अनुकूल होणार नाहीं असा सरकारला भरंवसा आहे. आणि या भयप्रद चळवळीला ज्या मानानें लोक आळा घालतील त्यावर सरकारचें भावी धोरण अवलंबून राहील ”

असहकारितेची चळवळ थोडक्या वेळांत लोकप्रिय होण्यास गांधींचा चरित्रक्रम बऱ्याच अंशीं कारण आहे गांधी हे कौंट टालस्टायचे शिष्य म्हणून भविष्य काळांत मानले जातीलसें वाटतें असहकारितेचा जो कार्यक्रम गांधींनीं आंखला त्यांत त्यांचा पूर्ण विश्वास व प्रामाणिकपणाच व्यक्त होत असून सर्व राष्ट्राची सामाजिक पुनर्घटना करण्याचाहि हेतु स्पष्ट दिसतो. आधुनिक सुधारणा मानवाचा उदात्त स्वभाव व ध्येयें यांना घातक आहे. पाश्चात्य शिक्षणानें बौद्धिक गुलामगिरी वाढली आहे; डॉक्टर हे लोकांचा अधिक अधःपात करतात; न्यायकोर्टें व वकील मनुष्याची माणुसकी नष्ट करतात, रेल्वेमुळें मनुष्य देवापासून दुरावतो, पार्लमेंट हें भारी किंमतीचें खेळणें आहे. प्रत्येकानें आत्मिक बळ वाढवणें हें त्याचें खरें ध्येय होय. आपले हेतू साध्य करण्या निःशस्त्र प्रतिकार हें साधन फार जोरदार होय हें गांधींचें मत बनलेलें होतें. दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांची गाऱ्हाणीं दूर करण्याकरितां त्यांनीं फार मोठ्या प्रमाणावर निःशस्त्रप्रतिकाराची चळवळ केली हिंदुस्थानांत आल्यावर हें साधन अधिक मोठ्या प्रमाणांत वापरण्याचें त्यांनीं ठरविलें गांधींची कार्यनिष्ठा व स्वार्थत्याग यांचा लोकांवर फार परिणाम झाला. तथापि निःशस्त्रप्रतिकार हें हत्यार हिंदुस्थानासारख्या अनेक भाषा, जाती व धर्म यांनीं भरलेल्या देशांत वापरणें धोक्याचें होय असें मानून कै. गोखले यांनीं गांधींना हिंदुस्थानच्या परिस्थितीचें पूर्ण अवलोकन केल्याशिवाय हा मार्ग न स्वीकारण्याबद्दल वचन घेतलें होतें; पण गोखले लवकरच वारले तथापि महायुद्ध चालू होतें तोंपर्यंत गांधींनीं केवळ सामाजिक गोष्टींत लक्ष घातलें होतें. १९१९ मध्यें रौलेट ॲक्टाला विरोध करण्याकरितां त्यांनीं सत्याग्रह उर्फ निःशस्त्रप्रतिकार जोरानें सुरू केला.

दक्षिण आफ्रिकेंतील कामगिरीमुळें, संन्यस्त राहणी, मुळें, गांधींना पुष्कळ हिंदु लोक महात्मा मानूं लागले होतेच पण असहकारितेच्या चळवळीला यश येण्याकरितां मुसुलमानांनांहि त्यांत ओढणें जरूर होतें. खिलाफतीच्या गाऱ्हाण्यामुळें ती संधि आयती मिळाली १९१९ नवंबरमध्यें दिल्लीस भरलेल्या खिलाफत परिषदेंत गांधींनीं मुसुलमानांना असहकारितेचा उपाय सांगितला आणि महंमद अली व शौकतअली यांचें मन वळवून मुसुलमानांना असहकारितेच्या चळवळींत सामील करून घेतलें. महमदअली व शौकतअली यांना गांधींच्या पंखाखालीं शिरणें फायद्याचें होतें. का कीं, आम्हीं अमूक गोष्टी झाल्या नाहींत तर तरवार उपसूं अशा प्रकारची त्यांनीं मुजोरी बरीच केली होती. अर्थात् तरवार उपसणें शक्य नव्हतें व न उपसण्यास त्यांना कारण पाहिजे होतें व आपण गांधींचे अनुयायी बनलों ही सबब त्यांस फायदेशीर झाली.

खिलाफत, पंजाब व स्वराज्य या तीन गाऱ्हाण्यांची, दाद लावून घेण्याकरितां सरकारशीं असहकारिता करण्याचा, गांधींचा उपाय कलकत्ता व नागपूर दोन्ही ठिकाणच्या कॉंग्रेसनें मान्य केला. तत्संबंधाचा आरंभींचा कार्यक्रम वर दिलाच आहे. कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं टिळक स्वराज्यफंड एक कोटी रुपये जमवून ‘ राष्ट्रीय स्वयंसेवक ’ मंडळें स्थापण्याचें ठरविलें मध्यंतरीं ड्यूक ऑफ कॅनॉट हिंदुस्थानांत येऊन त्यांनीं नवीं कौन्सिलें सुरू केलीं आणि ब्रिटिश लोक व हिंदी लोक यांनीं एकमेकांच्या चुका व गैरसमज याबद्दल क्षमा करून ते विसरून जावे अशी विनंति केली, आणि लॉर्ड चेम्सफर्डच्या जागीं लॉर्ड रेडिंग हिंदुस्थानचे व्हाईसरॉय झाले; परंतु कौन्सिलमार्फत चाललेल्या सरकारी कारभाराकडे न बघता गांधींनीं असहकारितेचा कार्यक्रम जोरानें पुढें चालविला, गांधी व अलीबंधू असहकारितेचा उपदेश करीत प्रांतोप्रांतीं हिंडू लागले. स्वयंसेवकांची पथकें तयार होऊं लागलीं, व कामेंसचे प्रचारक गांवोगांव उपदेश करीत फिरूं लागले. त्यांचा पोलीस व इतर सरकारी अधिकाऱ्यांशीं विरोध येऊं लागला आणि सर्व असहकारितावाद्यांत व सामान्य जनतेंत अनत्याचारित्वाचें तत्व पूर्ण उतरणें शक्य नसल्यामुळें ठिकठिकाणाहून लहान मोठ्या दंग्याच्या बातम्या मधून मधून येऊं लागल्या. १९२१ फेब्रुआरींत व मार्च महिन्यांत मजूरांचे संप पिकेटिंग, वगैरे प्रकरणांत बिहार, नागपूर, आसाम मद्रास, मुंबई वगैरे ठिकाणीं दंगे झाले गांधींनीं अनत्याचारी-

पणाचा व शांतता राखण्याचा उपदेश चालविला आणि एक कोट रुपये टिळक स्वराज्य फंड जमविणें, एक कोट कांग्रेसचे सभासद मिळविणें, व वीस लक्ष चरके ( हातरहाट ) चालू करणें या गोष्टींकडे लोकांचें लक्ष वळविलें

लॉर्ड रेडिंग यांनीं अधिकारारूढ झाल्यावर अनेक पुढाऱ्यांना मुलाखतीस बोलाविलें व त्याप्रमाणें गांधींशींहि मुलाखत झाली. अलीबंधूंच्या भाषणांत अत्याचारास उत्तेजन देणारा उपदेश असतो म्हणून त्यांच्यावर खटले करण्याचें सरकारनें ठरविलें, पण अनत्याचारित्वच पाळणार असें अलीबंधूनीं सरकारला आश्वासन देऊन एक प्रकारें सरकारची माफी ( अॅपॉलजी ) मागितली या कारणास्तव सरकारनें खटला करण्याचा बेत तहकूब केला.

कोर्टबहिष्कार, दारूबंदी व अस्पृश्यतानिवारण या गोष्टींकडे गांधींनीं मार्च, एप्रिल, मे ( १९२० ) मध्यें विशेष भर दिला; आणि पुढें जुलै अखेरपर्यंत अत्यंत खटपट करून एक कोटी रुपये टिळकस्वराज्यफंड जमा केला नंतर सप्टेंबरअखेरपर्यंत परदेशी कापडावरील पूर्ण बहिष्कार घालण्याचें कार्य नेटानें हातीं घेतलें आणि चरके, हातमाग व खादीप्रसार या गोष्टींवर भर दिला. १८२१ आगस्टमध्यें मलबारांत मोपला लोकांनीं मोठें बंड करून ब्रिटिश राज्याऐवजीं इस्लामचें राज्य जाहीर केलें आणि जुलमानें अनेक हिंदूंना बाटवून त्यांचीं देवळें व स्त्रिया भ्रष्ट केल्या असहकारितेच्या चळवळीचा हा अप्रत्यक्ष परिणाम होय, असा सरकारनें दोष दिला. हें बंड सरकारनें लवकरच मोडलें व नंतर युवराजाला हिंदुस्थानांत आणण्याचें ठरविलें. अर्थात गांधींनीं या भेटीच्या समारंभावर पूर्ण बहिष्कार घालण्याचें जाहीर केलें. आक्टोबरमध्यें अलीबंधूंवर कराचीस खटला करून दोन वर्षांची शिक्षा दिली. नवंबरमध्यें गांधींना आनंद व बार्डोली या दोन तालुक्यांत सार्वत्रिक कायदेभंग सुरू करण्याची तयारी करण्याचें कार्य हातीं घेतलें. नवंबर १७ रोजीं मुंबईस युवराज दाखल झाले व त्यांच्या समारंभावर बहिष्कार घालण्याच्या कार्यांत एकदोन दिवस मोठे दंगे झाले. गांधी मुंबईस समक्ष होते. त्यांनीं उपवास सुरू करून लवकरच शांतता केली व निरनिराळ्या समाजांत एकी घडवून आणण्याचें पुढाऱ्यांकडून अभिवचन घेतलें; शिवाय बार्डोलीचा कायदेभंग तहकूब करून सर्वत्र अनत्याचारित्व राखण्याकरितां अधिक नेटानें प्रयत्न चालविले. युवराजाच्या आगमनाच्या दिवशीं मुंबईप्रमाणेंच इतर अनेक शहरीं हरताळ पाळले गेले व स्थान काहीं ठिकाणीं दंगेहि झाले. तेव्हां सरकारनें सभाबंदीचा कायदा कित्येक जिल्ह्यांत लागू केला आणि दारूचीं दुकानें व परदेशी मालाचीं दुकानें यावरील स्वयंसेवकांच्या पिकेटिंग, व इतर चळवळींना क्रिमिनल लॉ अमेंडमेंट अॅक्टनें बंदी केली. उलट गांधींनीं हे कायदे मोडून स्वयंसेवकांनीं तुरुंग भरून काढण्याचा मार्ग स्वीकारला. स्वयंसेवकांच्या या तुरुंगभरतीनें विशेषतः उत्तरहिंदुस्थान बंगालपासून पंजाबपर्यंत हालवून सोडला लाला लजपतराय, नेहरू, दास वगैरे मोठाले पुढारीहि सरकारचा कायदा मोडून तुरुंगांत गेले. सभास्वातंत्र्य व संघस्वातंत्र्य नष्ट केल्याबद्दल सरकारला मॉडरेटपक्षानेंहि दोष देऊन राऊंडटेबल कॉन्फरन्स भरविण्याची सूचना केली; पण स्वयंसेवकांचा कायदेभंग बंद केल्याशिवाय काहीं करतां येणार नाहीं, असें सरकारतर्फे लॉर्ड रेडिंग यांनीं सांगितलें. अलीबंधूसुद्धां सर्व असहकारितावादी कैदी सोडावे व स्वयंसेवकांच्या भरती चालू ठेवण्यास बंदी नसावी, या शर्ती गांधींनीं घातल्या. तेव्हां गांधींवरच कॉन्फरन्स फेटाळण्याची जबाबदारी टाकून सरकारनें मॉडरेटपक्षाला स्वपक्षाकडे वळविलें.

डिसेंबरांत युवराजाची लखनौ, अलाहाबाद, बनारस कलकत्ता वगैरे शहरांना भेट झाली तेथें हरताळ पाळले गेले. त्याच महिन्यांत अहमदाबाद येथें कांग्रेस भरून गांधींना सर्वाधिकारी ( डिक्टेटर ) नेमण्यांत आलें व सार्वत्रिक कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याचें ठरलें व त्याचा प्रयोग प्रथम एकट्या बार्डोली तालुक्यांत खुद्द गांधींच्या देखरेखीखालीं करण्याचें ठरलें. तथापि एक वर्षांत स्वराज्य मिळवून देण्याची गांधींनी प्रतिज्ञा पुरी न झाल्यामुळें गांधींवरील काहींचा विश्वास डळमळूं लागला होता पण बार्डोलीच्या महत्त्वाच्या प्रयोगाकडे सर्वांचें लक्ष लागलें जानेवारींत सर्व राजकीय पक्षाची परिषद मुंबईस सर शंकर नायर यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली पण त्या परिषदेंत मॅंचार्नी सीरिया अगोदर सोडावा तरच आपण राऊंड टेबल कान्फरन्सला तयार होऊं इत्यादि अत्यंत अशक्य अटी मांडल्या, त्यामुळें तीहि कल्पना फलद्रूप झाली नाहीं. १९२२ फेब्रुवारींत गांधींनीं व्हाईसराय साहेबांना निर्वाणीचा खलिता ( अल्टिमेटम ) पाठवून भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य व संघस्वातंत्र्य हे राष्ट्राचे प्राथमिक हक्क परत मिळविण्याकरितां सार्वत्रिक कायदेभंग करावा लागत आहे, आणि सर्व राजकीय कैद्यास बंधमुक्त करून असहकारितेच्या अनत्याचारी चळवळीस बंद करण्याचें बंद केल्यास कायदेभंगाची चळवळ बंद करूं, असें सरकारास कळविलें. पण सरकारनें उत्तर देऊन तें सर्व अमान्य केलें. तेव्हां गांधींनीं बार्डोलीचा कार्यक्रम नेटानें हातीं धरला, व कायदेभंगाला सुरवात करणार इतक्यांत ४ फेब्रुवारी १९२२ रोजीं संयुक्त प्रांतातील चौरीचुरा येथें स्वयंसेवक व इतर लोकांनीं मिळून पोलीस व इतर सरकारी इसम मिळून एकवीस जणास ठार मारलें. ही बातमी येतांच बार्डोलीस कॉंग्रेस वर्किंग कमिटीची तारीख ११ व १२ फेब्रुवारी रोजीं सभा भरवून गांधींनीं तहकूब कायदेभंग केला; आणि ( १ ) एक कोटी कॉंग्रेसचे सभासद मिळविणें, ( २ ) हातखादीचा प्रसार करणें, ( ३ ) राष्ट्रीय शाळा स्थापणें, ( ४ ) अस्पृश्यता दूर करणें, ( ५ ) दारूबंदीचा प्रयत्न करणें, ( ६ ) लवाद

कोर्टें स्थापणें या विधायक कार्यक्रमावर भर देण्याचें ठरविलें. लवकरच दिल्लीस ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें तोच कार्यक्रम पास केला; तथापि गांधींच्या अनुयायांत थोडीच फाटाफूट दिसूं लागली.

गांधींचें लोकांवरील वजन कमी झालें आहे व गांधींच्या अनुयायांची काहींशी निराशा झाली आहे अशी संधि पाहून सरकारनें गांधींना १० मार्च रोजीं पकडून अहमदाबादेस खटला सुरू केला. गांधींनीं अपराध कबूल केला व जज्जानें त्यांना सहा वर्षांची शिक्षा केली. तथापि या वेळीं देशांत कोठेंहि दंगाधोपा झाला नाहीं.

गांधी तुरुंगांत गेल्यावर त्यांची बहिष्कारचर्या, कायदेभंग वगैरे कार्यक्रमाबद्दल कॉंग्रेसकमिटीनें देशभर हिंडून लोकमत अजमावलें. कायदेभंगास देश तयार नाहीं असें कमिटीनें एकमतानें ठरविलें आहे. पण बहिष्काराच्या बाबतींत कमिटीचें दुमत झालें. सन १९२२च्या गया कॉंग्रेसनें कायदेभंगाखेरीज असहकारितेचा बहिष्कारचर्या, वगैरे सर्व कार्यक्रम बहुमतानें कायम ठेविला पण त्यामुळें कौन्सिलवादी स्वराज्यपक्ष स्वतंत्र निघाला व त्यानें कौन्सिलप्रवेशाबद्दल देशभर हिंडून लोकमत तयार केलें व अखेर १९२३ सप्टेंबरांत दिल्लीच्या जादा कॉंग्रेसमध्यें कौन्सिलप्रवेशास विरोध न करण्याचा ठराव पास करून घेतला. तथापि कौन्सिलांत शिरून सरकारशीं अडवणूक म्हणजे तत्वतः असहकारिताच [illegible] करणार, असें कौन्सिलपक्ष म्हणत आहे. त्यानें १९२४ च्या मार्च महिन्यांत मध्यप्रांतांत द्विदल राज्यपद्धति मोडून टाकण्याचें श्रेय घेतलें आहे आणि मध्यवर्ती शासनयंत्राच्या बाबतींत कौन्सिलांत ठराव नापास करून व्हाईसरॉयाच्या सर्टिफिकेशनच्या अधिकारानेंच कार्यक्रम चालविण्यास भाग पाडून तेथेंहि लोकानुवर्ति राज्ययंत्र नसून एकानुवर्तीच आहे. हें सिद्ध केलें. सन १९२४ च्या फेब्रुवारी महिन्यांत गांधींची सुटका झाली; महात्मा गांधींचा कार्यक्रम दोन महिनेपर्यंत निश्चितपणें दृग्गोचर झाला नाहीं.

असहकारितेची चळवळ कितपत यशस्वी झाली याचा विचार करतां असें म्हणतां येईल कीं कोणतेंहि सामाजिक तत्त्व आत्यंतिकपणें समाजांत प्रस्थल कधींच पावत नाहीं. असहकारिता हें समाजध्येय नव्हे. समाजांतील दोष दूर करण्यासाठीं उपाय आहे. समाजांतील अन्योन्याश्रय हा राष्ट्रांतील लाखों लोकांस शिकविणें आणि पटविणें हें त्याचें कार्य आहे ज्या समाजांत अत्यंत अज्ञान व संघीकरणाचें कार्य कठिण करणारीं अनेक व्यंगें आहेत, त्यांत अनेक उपाय योजून पहावयाचे असतात. आणि प्रत्येक उपाय कांहीं तरी परिणाम करून जातो. त्या परिणामाची मोजदाद करणें व्यवहारास जरूर आहे. तसेंच असहकारिता प्रचारांत आणण्यासाठीं जीं कर्में लावून दिलीं गेलीं तीं कितपत प्रचारांत आलीं हेंहि पहावयाचें असतें.

कोर्टांवर बहिष्कार हा मुळींच पाळणें शक्य झालें नाहीं. सरकारी शाळांवर बहिष्काराच्या पुकारामुळें कांहीं विद्यार्थ्यांनीं शाळा सोडल्या व त्यासाठीं नवीन शाळा व विद्यापीठें स्थापन करण्यांत आलीं. त्यांपैकीं कांहीं संस्था बंद पडल्या आहेत. तथापि तो उपाय देखील जवळजवळ निष्फळ झाला; शाळा सोडणारे विद्यार्थी पुन्हां सरकारी शाळेंत परत गेले. खादीप्रसार हा प्रयत्नहि फारसा यशस्वी झाला नाहीं. रुद्तशीर रीतीनें कापूस पुरविण्याचें कामहि व्यापारी फर्मेंट्याकडून झालें नाहीं.

आंध्रानीं खादीची चळवळ इतरांपेक्षा अधिक यशस्वी केली. फंड जमविणें व त्याचा चांगला उपयोग करणें हेंहि झालें नाहीं. शिवाय ज्याअर्थीं असहकारितावादी कोर्टांत जाऊं शकत नव्हते त्याअर्थीं त्या फंडाचे पैसे कोणी दडपून ठेवले तर त्याविरुद्ध उपाय करतां येत नसे व त्यामुळें फंड गुंडास उत्तेजन मिळालें.

येणेंप्रमाणें जरी चोहोंकडून अपयश आलें तरी त्या चळवळीचे फायदे अनेक झाले. सामान्यजनसमूह अधिक निर्भयपणें वावरूं लागला आणि लोकांमध्यें असहकारितेच्या तत्त्वाची पुसट का होईना पण कल्पना बरीच पसरली. निरक्षर जनसमाजामध्यें कांहींहि पसरविणें अत्यंत कठिण असतें, आणि अशा परिस्थितींत सामान्य जनतेंत कीं आत्महिताची, कार्यार्थ द्रव्य खर्च करण्याची, वेळेवर तुरुंग पत्करण्याची निदान सरकारला उघडपणें विरोध करण्याची तयारी झाली त्यामुळें असहकारितेचा उपदेश बराच यशस्वी झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

जो विरोधाचा वणवा सर्व देशभर पसरला त्याचाच कांहीं अंश पुढें स्वराज्यपक्षाच्या कृतींत निराळ्या प्रकारें उतरला. या दृष्टीनें पहातां स्वराज्यपक्षाच्या अडवणुकीच्या पद्धतीचें श्रेयहि असहकारितावादास दिलें पाहिजे.

**असगांव**—(वर्‍हाड.) तालुका जळगांव जिल्हा बुलढाण. जळगांवच्या दक्षिणेस तीन मैलांवर हें २५०८ लोकवस्तीचें एक खेडेगांव आहे. आठवड्याचा बाजार दर मंगळवारीं भरतो. सुमारें ७००० लोक बाजारास येतात. येथें मराठी शाळा, पोस्ट आणि सराई आहे. एक सरकी काढण्याचा कारखाना येथें आहे. (बुलढाणा गॅ. १९०८)

**आसिक**—असिक या राष्ट्राचा बृहत्संहितेंत (१६. ५६) व नाशीक येथील शिलालेखांतील एकांत उल्लेख आला आहे. वासिष्ठीपुत्र पुळुमायी याचें या देशावर राज्य होतें. याचा महाभारतांत उल्लेख नाहीं.

**असिक्नी**—या नदीचा उल्लेख ऋग्वेदांत नदी सूक्तांत (८ २०, ५५; १००. ७५, ५) आला आहे. हिला चंद्रभागा असेंहि नांव होतें. अलेक्झांडरच्या अनुयायांनीं हिला अकेसिनीज असें म्हटलें आहे. ही नदी अलेक्झांडरनें ख्रि. पू. ३२६ मध्यें ओलांडली. त्या वेळीं तिची रुंदी [illegible] १००० यार्ड होती व पाण्याला फार खळखळाट होता.

बशीराबाद किंवा जलालाबाद यापैकीं कोणत्या मार्गी त्यानें ही नदी ओलांडली हें निश्चित नाहीं. या नदीवर अलेक्झांडर पुन्हां येऊन त्यानें एक शहर वसविलें त्यानंतर या नदीच्या प्रवाहांत बराच फरक झाला आहे. सध्या या नदीचें नाव विनाव (पह्रा) म्हणून प्रसिद्ध आहे.

**असिटिलीन**—दारिलिनें म्हणजे अगिटिलीन. कर्ब आणि उज्ज वायु यांचें २४.२ या प्रमाणांत जें वायुरूप द्रव्य बनतें त्यास हें नाव आहे यांचें रासायनिक सूत्र $क_२उ_२$ असें आहे यांचें वि. गु १२ असतें खटकर्बिद (कॅलशिअम कार्बाइड)चा पाण्याशीं संयोग केला असता हा वायु निघतो त्यास फार वाईट घाण येते. कारण त्यांत गंधकयुक्त उज्ज(सलफ्युरेटेड हायड्रोजन) व स्फुरयुक्त उज्ज (फॉस्फरेटेड हायड्रोजन) हे दोन वायू नेहमी असतात. ते काढून टाकले तर असिटिलीन वायूस गोड वास येतो. हवेच्या २१५ पट दाब यावर घातला असता ०° श उष्णमानावर हा द्रवरूप होतो किंवा याम सामान्य हवेच्या दाबानें द्रवरूप करणें झाल्यास उष्णमान ८२° श पर्यंत कमी करावें लागतें. हा वायु ज्वलनीय आहे व तो जळताना फार उजेड पडतो. म्हणून याचा जाळण्याकडे उपयोग करितात परंतु द्रवरूपात याला साठवून ठेवता येत नाहीं, कारण स्फोट होण्याची फार भीति असते म्हणून जाळण्याकरितां हा नेहेमीं तावडतोब तयार करावा लागतो. द्रवरूप असिटिलीन एका लहान नळींतून बाहेर सोडला असता तो एकदम वायुरूप बनतो व बाकीचा द्रवरूप असिटिलीन एकदम घनरूप बनतो. घन असिटिलीन याचा रंग बर्फासारखा पांढरा असतो, असिटिलीन पाण्यात विद्राव्य आहे परंतु मिठाच्या द्रावणात (ब्राइन) विद्राव्य नाहीं म्हणून हा वायु मिठाच्या द्रावणात (ब्राइन) जमा करतात. हा वायु असिटोनमध्यें फार विद्राव्य आहे म्हणून मोठाल्या नळ्यातून असिटोन भरून त्यात असिटिलीन सोडतात व तो नंतर पाहिजे तेव्हा जाळण्याच्या कामास उपयोगी पडतो.

हा वायु फार विषारी आहे असें पूर्वी समजत असत. परंतु आता असें आढळून आलें आहे कीं, हा फारसा विषारी नाहीं.

कर्बाचे धनध्रुव व ऋणध्रुव करून ते उज्ज वायूच्या नळींत धरून त्यातून विद्युत् स्फुलिंग प्रवाह चालू केला असता कर्ब व उज्ज हे संयोग पावून असिटिलीन तयार होतो. व यापासून पुढें कर्ब व उज्ज यांचीं अनेक रासायनिक द्रव्यें तयार करता येतात. उदाहरणार्थ त्यात आणखी उज्ज मिळविला तर इथिलीन वायु होतो; याचा गंधकाम्लाशीं संयोग केला असता इथिल गंधाम्ल तयार होतो. यात पाणी मिळवून त्याचें पृथक्करण केलें असता अलकहल तयार होतो.

असिटिलीनचा हरवायूशीं (क्लोरीन) संक्षेप केला असता तो एकदम पेट घेतात व कर्ब परमाणू शिल्लक राहतात. कर्ब व उज्ज वायू संयोग पावून जेव्हां असिटिलीन तयार होतो तेव्हा त्यास पुष्कळ उष्णता द्यावी लागते म्हणून अशा संयुक्त द्रव्यास उष्णताभक्षक (एंडोथर्मिक) म्हणतात.

असिटिलीनचा दिवेबत्तीकरितां फार उपयोग आहे म्हणून तें स्वल्प मिळावें याकरितां खटकर्बिद (कॅलशिअम कार्बाइड) नांवाचें द्रव्य तयार करितात. यावर पाणी टाकलें असता असिटिलीन वायु निघतो असें:—



$खक_२ + उ_२प्र = ख प्र_१ + क_२उ_२$,

अथवा $खक_२ + २उ_२प्र_२ = ख (उप्र)_२ + क_२उ_२$.

म्हणून खटकर्बिद हें मोठ्या प्रमाणावर तयार करावें लागतें. एक मोठ्या विजेच्या भट्टींत चुना व कर्बयुक्त द्रव्यें घालतात व विद्युत्स्फुलिंग सुरू झालें म्हणजे खटकर्बिद तयार होतें.

खटकर्बिदाचे गुणधर्म.—याचे स्फाटिक पांढरे स्वच्छ असतात. याचे वि गु २२ आहे. याला शुष्क हवेंत ठेवण्यास हरकत नाहीं. परंतु हवेंत थोडासा ओलावा असल्यास लगेच असिटिलीन तयार होऊं लागतो व त्याचा वास सर्वत्र पसरतो. एक पौंड खटकर्बिदापासून ५ घनफूट असिटिलीन निघतो. [ वॅट, क० प्रा० ]

**असिटोन**—दारन अथवा असिटोन $कउ_३ कप्र.कउ_३$ हा कितन वर्गापैकीं सर्वांत खालचा कितन (केटोन) आहे सर्व मनुष्याच्या व विशेषत मधुमेहाच्या रोग्याच्या मूत्रात व रक्तात हा असतो. ऊर्ध्वपातन क्रियेनें लाकूड व साखर यापासून हा काढता येतो खट सिरक्तिताचें [ ख ($कउ_३ कप्र_२$)$_२$ ] ऊर्ध्वपातन करून हा मोठ्या प्रमाणावर तयार करतात. किंवा तो तयार करण्याची दुसरी कृति आहे. एका मोठ्या लोखंडाच्या नळींत प्युमिसचे दगड व भारकर्बित (बेरियम कार्बोनेट) घालतात व ती नळी फिरवितात. ती फिरत असता तींत सिरकाम्ल वायुरूप करून त्याचा प्रवाह चालू करितात, म्हणजे असिटोन तयार होतो. नंतर तो अर्क द्रवीकरण नलिकेंतून घालवितात म्हणजे त्याचें द्रवरूप होतें.

असिटोन हा पातळ, निर्वर्ण द्रव आहे. याचा वास फार गोड येतो. हा पाणी, अल्कहल व इथर यात द्रव पावतो याचा उपयोग हरपुत्तिक (क्लोरोफॉर्म) करण्याकडे होतो. व कृत्रिम नीळ करण्याकरिता याचा उपयोग करितात. याचें पालाशअदिद (पोटॅशियम आयोडाइड) व ग्लिसरीन याशीं मिश्रण करून तें दमा लागलेल्या मनुष्यास हुंगण्यास देतात.

**असींद**—(राजपुताना) उदेपूर संस्थान येथील एक जहागीर व तिचें मुख्य ठिकाण. असींद जहागिरींत ७२ गांवें आहेत. उत्पन्न सुमारें एक लाख असावें. उदेपूरपासून असींद गाव सुमारें ९० मैलावर आहे. लो सं (१९०१) २२३७. असींदचे राऊत सिसोदिया वंशाच्या चोंडावत घराण्यातले आहेत. घराण्याचा मूळ पुरुष, ठाकूर अजितसिंग

याने १८१८ सालच्या ब्रिटिश सरकारबरोबर झालेल्या तहनाम्यावर महाराण्याच्या वतीनें सही केली होती. ( इं. गॅ. ६ )

**असुंदी**—(मुंबई इलाखा) धारवाड जिल्हा. गदगच्या नैर्ऋत्येस तीन मैलावर असलेलें लहानसें खेडें लोकवस्ती (सन १८८१) ८४८. येथें बोम्मप्पानें देऊळ असून त्यात सन १०२५ चा शिलालेख आहे व हनुमंताच्या देवळात सन १०५३ चा शिलालेख आहे ( धारवाड गॅ. )

**असुर**. असुर हा शब्द ऋग्वेदात सुमारें १०५ वेळा आला आहे त्यापैकीं सुमारें ९० ठिकाणीं त्याचा उपयोग चांगल्या अर्थी केलेला आहे, व सुमारें १५ ठिकाणीं त्याचा अर्थ देवाचा शत्रु असा होतो त्याचा यौगिक अर्थ शक्तिमान वीर्यवान असा असून देवांना एक सामान्य विशेषण म्हणून हा लावलेला आढळतो. वेदांत देवाच्या महद् असुरत्वाची स्तुति केली आहे ( ऋ ३ ५५ ). अग्नि, पूषन्, सोम या देवतास हा शब्द जोडण्यात आला आहे. व मित्र, वरुण व इन्द्र यांना हा विशिष्ट अर्थानें लावलेला दिसतो. इन्द्राच्या बाबतींत तो वैयक्तिक बल दाखवितो, तर मित्र व विशेषतः वरुण यांच्या बाबतींत तो नैतिक व शासनबल दाखवितो यावरूनच वरुणाचा अहुरमज्द या देवतेशीं संबंध जोडला गेला असावा. रा. वै. का. राजवाडे यांच्या मतें हें साम्य चुकीचें असून वरुणास इतर देवाप्रमाणेच असुर अथवा असुरपुत्र म्हटलेलें आहे. देवाना दिवस्पुत्रासः, महस्पुत्रासः, असुरस्य-वीराः असेंहि म्हटलें आहे विन्सेंट थील यानें असुरदेवतान्या दिलेल्या यादींत असुर मझास ही एक देवता आहे व तिचा संबंध अहुरमज्द या झरथुष्ट्री देवतेशीं जोडण्यात आला आहे ( ए रि. ए. ९ पृ ५६८ ) व तो असुरमहस् याचा अपभ्रष्ट पाठ असावा असें रा राजवाडे म्हणतात यावरून खाल्डियन, इराणी व भारतीय यांचे पूर्वज एका काळीं एकत्र असून त्यांच्या काहीं सामान्य देवता असाव्या व नंतर त्यांच्यांत फूट पडून विशिष्ट शाखेत विशिष्ट देवतेस प्रामुख्य येऊन इतर देवतास गौणत्व आलें असावें व परस्परांच्या देवतास दूषणें लावण्याची पद्धति सुरू झाली असावी, यामुळे असुर हा शब्द भारतीयामध्यें दैत्यवाचक बनला, व देव हा शब्द इराणी शाखेंत दैत्यवाचक बनला. भारतीयांनीं इन्द्राला असुरघ्न हें विशेषण लावलें तर इराणियांनीं इन्द्राला अंग्रमन्यु बनविलें ऋग्वेदांत आपणास पिप्रु वगैरे असुर आढळतात व त्यास इन्द्रानें मारल्याचें वर्णन आहे (१०. १३८, ३–४). शतपथ ब्राह्मणामध्यें ( १३. ८. २, १) देव आणि असुर हे सपत्न व भ्रातृव्य होते असें म्हटलें आहे. तसेंच असुर हे देवाच्या दृष्टीनें अपभ्रष्ट भाषा बोलत असा शतपथ ब्राह्मणांत उल्लेख आहे (तेऽसुरा हेलयो हलयः इतिकुर्वन्तः पराबभूवुः) पतंजलीनेंहि वरील शब्द उद्धृत केले आहेत शबरस्वामीनेंहि 'पिक' 'नेम' 'तामरस' वगैरे शब्द असुर भाषेंतून आले असें म्हटलें आहे. ईशावास्योपनिषदामध्यें असुर्या देशाचा उल्लेख आहे.

अष्ट विवाहामध्यें असुर विवाहाचा एक प्रकार नमूद आहे तो असुरामध्यें प्रचलित असावा तसेंच आश्वलायन गृह्यसूत्रामध्यें श्राद्धकल्पात उद्देशदिवा पात्रे विवृतं वा यदा भवेत् । तदासुर भवेत् श्राद्धं क्रुद्धैः पितृगणैर्गतैः ॥ असा श्लोक आहे यावरून असुरातहि श्राद्धविधि होता असें राजारामशास्त्री भागवत यांनीं अनुमान काढलें आहे असुर व आर्य हे पूर्वी एकत्र असून त्यांचा परस्परसंबंध होता असें कित्येक सिद्ध झालें आहे याबद्दल तिसऱ्या विभागामध्यें आर्यअसुर संबंध या प्रकरणातहि माहिती दिली आहे

**असुर देशः**—असुर हा शब्द जुन्या करारात असून आसुरियन राष्ट्राच्या सत्तेखालील प्रदेशाचें नाव होतें असुरिया देशाला असुरी बाबिलोनीवाङ्मयात 'मत असुर' असें नाव आहे असुर शहरावरून हें नाव देशास मिळालें असावें हें असुर शहर असुरियाचे दक्षिण टोकास आहे असुरियाचें राज्य म्हणजे असुर शहराच्या वसाहतीचें झालेलें रूपांतर होय

बाबिलोनियातील सेमिटिक लोकांनीं बरेंच वर्षांपूर्वी असुर शहर स्थापिलें असावें शहर व देश यांचें एकच नांव असल्यामुळें असुर शब्दाचा अर्थ लावण्यात फार घोटाळा होतो ह्यांच नावें खमुरब्बीच्या लेखात व असुरी वाङ्मयात आढळतात ( बाबिलोन पहा व विभाग तिसरा असुरी बाबिलोनी संस्कृति हें प्रकारण पहा )

**शहर**— असुर हें असुरियाची जुनी राजधानी होतें. टायग्रिस नदीच्या पश्चिम तीरावरील अलेशेर घाटच्या उंचवट्यावर या शहराचे ठिकाण दाखविण्यात येतें. शहरावरून असुरियाच्या राष्ट्रीय देवतेचें नाव पडलें, कीं देवतेवरून शहराचें नाव पडलें यासंबंधीं बरेंच गूढ आहे साधारण समज असा आहे कीं, शहरावरून देवतेचें नाव पडलें असावें याच असुर देवतेच्या देवळाभोंवतीं शहर वसून त्याची वाढ झाली. हें देऊळ उरपीया नावाच्या धर्माध्यक्षानें बांधिलें असावें. बाबिलोनियाचा मांडलीक म्हणून येथील मुख्य धर्माध्यक्ष शहराचा व देशाचा राज्यकारभार पहात असे बाबिलोनियाच्या सत्तेचा ऱ्हास झाल्यावर यांनीं येथें स्वतंत्र राज्य स्थापिलें व असुर हें राजधानीचें शहर म्हणून प्रसिद्धीस आलें. अनु व हदाद यांचीं मोठीं देवळें व बेल इत्यादि यांचीं लहान देवळें या शहरात होतीं. राज्याची राजधानी म्हणून व मुलकी कामाचें मुख्य ठिकाण यामुळें निनेव्हेचा उदय झाल्यावर देखील धर्माचें केन्द्र म्हणून असुराचें महत्त्व होतेंच. राजाला धर्मकृत्यें करण्याच्या वेळेस या शहरीं येऊन रहावें लागे. असुरियाचा ऱ्हास झाल्यावर देखील असुर शहर अस्तित्वात होतें. या ठिकाणीं मोठमोठ्या

मेला तर तो दुरात्मा होतो, अशी यांची समजूत आहे. मृतांना जाळण्यांत येतें व आठ दिवसपर्यंत त्याच्या नावानें रोजच्या अन्नांतला घास घराबाहेर ठेवण्यांत येतो नंतर आप्तेष्टांना बोलावून जेवण करतात व त्या प्रसंगीं घरीं केलेली तांदुळाची दारू यथेच्छ पितात एवढें केलें असतां सदाम्या पुढें कांहीं त्रास देत नाहीं, पण दुरात्मा मात्र वारंवार छळतो. कोणी आजारी पडल्यास त्याच्या नांवानें बळी दिला जातो. [ अगरिया पाहा. ]

[संदर्भ ग्रंथ—एन्सायक्लो. रिलिजन अँड एथिक्स. सेन्सस ऑफ इंडिया १९०१–१९११ हंटर-स्टॅटिस्टिकल. ऑफ बेंगाल, पु. १७. रिस्ले—दि ट्राइब्स अँड कास्टस ऑफ बेंगाल डाल्टन-एथ्नॉलॉजी ऑफ बेंगाल हहन-ए ग्रामर ऑफ असुर डुम्मा. क्रूक-दि पॉप्युलर रिलिजन अँड फोक लोअर ऑफ नॉर्थ इंडिया. लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया ]

**असुर-बनि-पाल**—हा प्राचीन असुरियाचा विख्यात चक्रवर्ती इ. स. पू. ६६८ मध्यें आपल्या बापाच्या मृत्यूनंतर गादीवर बसला. एसर—हडन राजानें आपले दोन पुत्र असुर-बनि-पाल व समास सुम युकिन यांना अनुक्रमें असुरिया व बाबिलोनिया हे प्रदेश वाटून दिले होते. लहानपणींच असुर-बनि-पालला बाबिलोनियन लोकांतील कला व शास्त्रें यांचें उत्कृष्ट शिक्षण मिळालें होतें व हल्लीं आपणाला असुरियन ग्रंथांतून आढळणारे अनेक प्राचीन बाबिलोनी वाङ्मयाचे अवशेष बनिपालाच्या विद्याव्यासंगाचेंच फळ होय यांत संशय नाहीं ब्रिटिश म्युझियम मधील हजारों मातीच्या लेखांकित विटा याच्याच संग्रहांतून आणलेल्या आहेत इतकें असूनहि तो स्वतंत्र चक्रवर्ती राजा होता हें विशेष आहे आपलें सैन्य व सेनापति यांना राज्यांत व राज्याबाहेर गुंतवून तो घरीं जनान्यातल्या ऐषआरामांत, आपल्या शास्त्रीय अभ्यासांत व ईश्वरोपासनेंत निमग्न राही.

गादीवर बसल्यानंतर त्याचें पहिलें कर्तव्य म्हणजे बापाच्या मृत्यूमुळें थांबलेली इजिप्तवरची मोहीम पुन्हां चालू करणें हें होय. त्यावेळीं इजिप्त तिरहाकच्या ताब्यांत होतें. इ. स. पू. ६६७ त तो वारल्यानंतर त्याच्या मागून आलेला तोडमाने उत्तर इजिप्तमध्यें शिरला. त्या ठिकाणीं असुरियाविरुद्ध बंड चालू होतें तेव्हां मेंफिसवर हल्ला करून तें घेण्यांत आलें व असुरी सैन्याला पार हाकलून लावण्यांत आलें. या अवधींतच टायरमध्येंहि बंड होण्याचा रंग दिसूं लागला. लगेच असुर-बनि-पालानें बंडखोर प्रांतांत नवीन सैन्य धाडिलें व पुन्हां पूर्ववत आपली सत्ता प्रस्थापित केली या मोहिमेंत त्याच्या सैन्यानें थीबीस लुटून तेथील देवालयें उध्वस्त केलीं व तेथील दोन मनोरे निनेव्हेला पाठवून दिले, त्याचप्रमाणें टायरसुद्धां त्याला शरण आलें यावेळीं असुर-बनि पाल सत्तेच्या शिखरावर आरूढ होता अरारटच्या आग्नेयेकडील मना (मिनि) चा प्रांत असुरियन सैन्यानें ओसाड करून टाकला व तेथील राजाला मांडलिक होणें भाग पाडलें. तसाच एलाम प्रांत काबीज करून आपल्या वतीचा एक राजा असुर-बनि-पालानें त्याठिकाणीं नेमिला. सिलिसिया व ताबाल येथील राजांनीं आपल्या मुली असुर-बनिपालाच्या जनान्यांत पाठविल्या. अरारट व लिडिया येथून वकिलाती आल्या. लिडियाच्या जायजेसनें सिमेरियनांविरुद्ध मदत मागितली असतां निनेव्हेकडून ती मिळण्याची आशा दिसेना तेव्हां त्यानें इजिप्तकडे वळून तेथें पगारी सैन्याच्या मदतीनें असुरियनांना इजिप्तच्या बाहेर हाकून लाविलें अशा रीतीनें असुरियाच्या ताब्यांतून इजिप्त कायमचा गेला (इ. स. पू. ६६०) इकडे बाबिलोनियामध्यें अस्वस्थता वाढत होती व शेवटीं समास सुम युकिन येथील राष्ट्रीय पक्षाचा पुढारी झाला व आपल्या भावाविरुद्ध त्यानें लगेच युद्ध पुकारिलें लांच वगैरेनीं एलामाइट लोकांची मदत मिळविली व अरबी लोकहि या बंडांत सामील झाले यावेळीं बनि पालनें आपली पराकाष्ठा केली, सर्व निर्वाणीचे उपाय योजले, पण एलाममध्यें यावेळीं गडबड सुरू झाली म्हणूनच बाबिलोनी व इतर सैन्याचा मोड झाला; नाहींतर कांहीं आशा नव्हती. शत्रुपक्षाकडील एकामागून एक शहर असुरियनांच्या हस्तगत होऊं लागलें व शेवटीं ६४८ त बाबिलोन शरण आलें शत्रूच्या हातीं लागूं नये म्हणून समास-सुम-युकिननें आपल्या स्वतःला जाळून घेतलें उत्तर अरबस्तानावर चाल करून असुरियनांनीं वाळुकारण्यांतील अरब लोकांत दहशत बसवली, व शेवटीं एलाम एकटें राहिलें त्यानें पुन्हां कधीं डोकें वर काढूं नये म्हणून त्याविरुद्ध कडक उपाय योजण्यांत आले

परंतु या लढायामुळें असुरिया दुर्बल झाला मनुष्यबल व सामुग्री नसल्यानें सुमेरियन व सिथियन टोळ्यांनां तोंड देण्याची त्याला ताकद राहिली नाहीं इ. स. पू. ६२६ (?) मध्यें असुरबनिपाल जेव्हां वारला तेव्हां त्याचें साम्राज्य नष्ट होत चाललें होतें व पुढें थोड्याच वर्षांनीं त्याचा शेवटहि झाला

निनेव्हे येथें असुरबनिपालनें पुराणवस्तूंचा मोठा संग्रह करून ठेविला होता. जुन्या बाबिलोनी अंकित विटावरच्या लेखांची नक्कल करण्यास त्यानें अनेक नकलनवीस नेमलेले असत. पण दुर्दैवानें त्याची आवड फलज्योतिष व शकुन यांच्याकडे असल्यानें त्या विषयावरील नकलाच पुष्कळ सांपडतात या संग्रहालयाच्या बांधकामावरून त्यावेळची कला चांगली दृष्टोत्पत्तीस येते

[संदर्भ ग्रंथ—जॉर्ज स्मिथ-हिस्टरी ऑफ असुरबनिपाल (१८७१) एस ए. स्मिथ-असुरबनिपाल (१८८७ १८८९) रॉजर्स-हिस्टरी ऑफ बाबिलोनिया अँड असीरिया अँडरसन—स्टोरी ऑफ एन्शिंट सिव्हिलिझेशन्स ऑफ दि ईस्ट ए मि. ]

**असुरिया**—असुरिया व बॅबिलोनिया हीं तैग्रिस व युफ्रेतिस नद्यांवरील साम्राज्यें ऐतिहासिक व भौगोलिक दृष्ट्या एकच होत. अगदीं प्रथमपासून त्यांचा इतिहास एकच आहे. या दोन्हीं साम्राज्यांचा ऐतिहासिक अन्योन्य संबंध प्राचीन ग्रंथकारांना माहीत असून, आधुनिक शोधांनीं हा संबंध खरा आहे असें सिद्ध केलें आहे. ७ व्या अथवा ८ व्या शतकांचा काळ धरूनसुद्धां असुरिया व बाबिलोनिया हा एकच प्रांत गणला जात असे. उत्पत्ती( जेनि–सिस )च्या दहाव्या भागांत सांगितल्याप्रमाणें बाबिलोनिया हा मातृदेश होता इतकेंच नाहीं तर परमार्थसंप्रदाय व संस्कृति, वाङ्मय व लिपी, कला व शास्त्रें या सर्व गोष्टी असुरियानें आपल्या दक्षिणेकडील भागांतून घेतल्या होत्या. ह्या दोन्ही देशच्या भाषा व जाती सारख्या होत्या. ( बाबिलोनिया व विभाग तिसरा उत्तर भाग प्रकरण ४ पहा).

**असोदा नदी**—आर्वी तहशिलींतील डोंगरांत या नदीचा उगम असून बोरांजवळ ती वर्धा तहशिलींत शिरते. या नदीची लांबी सुमारें ३८ मैल असून कोटाळी जवळ ती वर्धानदीस मिळते. देगांव स्टेशनजवळ या नदीवर रेल्वेचा पूल आहे. ( वर्धा गॅ. १९०६ )

**अस्करी(मिर्झा)**—बाबर शहाचा तिसरा मुलगा हुमायून गादीवर आल्यानंतर सरकार संभल प्रांत अस्करीला जहागीर देण्यांत आला. हुमायूननें गुजराथ जिंकून अस्करीस त्याचा बंदोबस्त करण्यास ठेविलें होतें ( १५३५ ); पण अस्करी मोठा विलासी व चैनी असल्यानें बहादूरशहानें पुन्हां गुजराथ परत घेतला. तेव्हां अस्करी पळून गेला. हुमायून शेरखानाबरोबर झालेल्या लढाईंत पराभव पावून लाहोरास कामरानकडे गेला तेव्हां अस्करीहि त्याच्याबरोबरच होता. कामराननें हुमायुनास आश्रय दिला नाहीं तरी पण अस्करीस कंदाहारचा कारभार सांगितला. पुढें हुमायूननें काबूल कंदाहार प्रांत जिंकून घेतला व अस्करीनें बंड केलें म्हणून त्याला हद्दपार केलें. तो मक्केस जाऊन १५५८ त मरण पावला. अस्करीला एक मुलगी होती. तिचें लग्न मशहदच्या यूसफखानाबरोबर झालें. [ बील्स्चा कोश. मुस. रियासत

**ॲस्कालॉन**—फिलिस्टाइन लोकांच्या पांच मुख्य शहरांपैकीं एक. हें भूमध्यसमुद्रावर गाझाच्या उत्तरेस १२ मैलांवर आहे. याचा असिरी पत्रव्यवहारांत अनेकदां उल्लेख आला आहे. याला मजबूत तटबंदी होती. या ठिकाणीं मत्स्य देवता डरकेटोची पूजा होत असे. हें शहर ज्यूडिआमध्यें इस्माएल लोकांच्या ताब्यांत फारसें नसे; बायबलमध्यें दिलेली सॅमसननें हें शहर उध्वस्त केल्याबद्दलची गोष्ट ज्यूडियामधील ह्याच नांवाच्या दुसऱ्या गांवासंबंधीं असावी. सेनाचेरिबनें इ. स. पूर्वी ७०१ साली ॲस्कालान काबीज केलें. हेराड दि ग्रेट हा येथें जन्मला असून त्यानें येथें पुष्कळ सुधारणा केली. रोमन व यहुदी यांच्या युद्धांत या शहराचें बरेंच नुकसान झालें. ७ व्या शतकांत हें मुसुलमानांच्या हातीं आलें. १०९८ त ख्रिस्ती लोकांना येथें पहिल्या धर्मयुद्धांत मोठा जय मिळाला. तरी सुद्धां खलीफाची सत्ता ११५७ पर्यंत यावर होती. टायबेरियसच्या युद्धांत जय मिळवून सलादीननें ह्या शहराची तटबंदी सुरू केली. परंतु रिचर्डनें सेंटजॉन ही एकर घेतल्याचें ऐकून सलादीननें या शहराच्या भिंती पाडून टाकल्या. इंग्लिश राजांनीं याची सुधारणा केली परंतु लगेच त्यांना तें सोडावें लागलें. तेव्हांपासून ॲस्कालानला उर्जित दशा आली नाहीं. १२७० मध्यें याची उरलेली तटबंदी सुलतान बिबर्स यानें पाडून टाकली. सध्या येथें सुरस्थ पडक्या इमारती आहेत.

**अस्थिमार्दवरोग**—रिकेटस अथवा अस्थिमार्दव या रोगामध्यें मुलाच्या शरीराचें पोषण नीट होत नाहीं हें दर्शविणारीं हाडांत येणारें मार्दव, वक्रता हीं व दुसरीं लक्षणें दिसून येतात; व रोगाचा परिणाम सर्व शरीरावर होतो. या रोगामुळेंच पाठीस पोंक आलेली, अगर पाय वळणें अगर वाकणें इत्यादि शारीरिक व्यंग असलेलीं माणसें पहाण्यांत येतात.

का र णें.—हा मुख्यत्वेंकरून बालकाचा रोग असून तो सहा ते बारा महिने वयाच्या सुमारास उद्भात येऊं लागतो. हा रोग मातबर माणसांपेक्षा गरिबाच्या मुलांना अधिक प्रमाणांत होतो, याचीं कारणें ( १ ) गरिबाच्या रहाणीमुळें त्यांना मुबलक हवा व दूध या दोहोंचा मुलासाठीं चांगलासा पुरवठा करितां येत नाहीं. म्हणजे एक तर आईच्या अंगावरील दुधांत सत्व कमी असल्यामुळें दोष असतो अगर दुसरें वर्ष लागून बराच काळ लोटला तरी तें निःसत्व दूध आया मुलांना पाजीतच असतात. ( २ ) किंवा आईच्या अंगावरील दूध लवकर नाहींसें झाल्यामुळें बाजारांत नाना तऱ्हेचीं देशी विदेशी "मुलांचीं अन्नें" मिळतात त्यांपैकीं पुष्कळांमध्यें पिष्टमय पदार्थ अधिक असून स्निग्ध पौष्टिक व वसामय द्रव्यें अत्यल्प प्रमाणांत असतात. ( ३ ) पुष्कळ आईबापांना मुलांना दोन वर्षें पुरीं होण्याच्या आंत आपल्याबरोबर भात, पोळी, साखर इत्यादि मोठ्या माणसाच्या आहारापैकीं पदार्थ भरवावेसे वाटतात ( ४ ) कोंदट हवेंत पुष्कळ गर्दी करून राहिल्यानें,( ५ )आईच्या गरोदरपणीं बालकास पोषक द्रव्यें नीट न पोंचल्यामुळें,( ६ ) अगर मुलांतच स्वाभाविकपणें स्निग्ध, पौष्टिक व वसामय तत्वें जीं दुधांत असतात तीं पचविण्याची शक्ति कमी असल्यामुळें अशा एक किंवा अनेक कारणसमुच्चयामुळें हा रोग होतो.

ल क्ष णें:— मुलास पाजलेलें दूध नीटपणें पचणें व त्याचा कोठा साफ रहाणें या क्रियांत बिघाड होऊं लागल्याचें प्रथम नजरेस येतें. म्हणजे मूल भूक मंद झाल्यामुळें दूध कमी पिऊं लागतें. वरचेवर वांति होणें किंवा मातट व रोगट वर्णाचे जुलाब होऊं लागतात व मूत्र नंतर रोड झाल्याचें दिसून येतें. पुढें दिलेलीं दिसून येणारीं महत्वाचीं व रोगसूचक

लक्षणें ध्यानात ठेवण्यासारखीं आहेत. मूल झोंपीं गेलें म्हणजे अंगावरील व हातापायांवरील पांघरुणें झोंपेंतच हातापायांनीं काढून टाकून उघडें निजणें, डोकें घामानें ओलेंचिंब होईतों ओपेंत पुष्कळ घाम येणें. व विशेषतः पाय मळमळीत व रडत लागणें याचवेळीं शरीरांतील हाडांमध्यें वेदना होत असल्यामुळें मुलास हलविल अगर कडेवर उचलून घेतल तर त्यास तें अगदीं न आवडून तें किंचाळ्या मारतें. नंतर या रोगामुळें सावकाश झालेला हाडांतील बदल दृष्टोत्पत्तीस येईल इतका स्पष्ट विशेषतः हाताच्या लांब हाडांत नजरेस येतो व म्हणूनच हाताचीं मनगटें, हाडांचीं टोकें मोठीं झाल्यामुळें जाड दिसतात. त्याच कारणामुळें बरगड्या ज्या ठिकाणीं पुढील बाजूस जेथें कूर्चांशीं संयुक्त होतात तेथील त्यांचीं टोंकेंहि जाड व वाटोळीं बनल्यामुळें रोडक्या छातीवर जणूकाय ती रुद्राक्षमालाच दिसते. हाडांतील काठिण्य नष्ट होतें हें लक्षात आलें असलेच न स्नायूंतील शक्तीच्या जोरामुळें व शरीराच्या भारामुळें हाडें पिळवटलीं जाऊन वक्र होतात. अशा मुलाच्या गुडघ्याखालील पायाला बाहेर झुकलेला असा फार बाक येतो व गुडघ्याच्या आतील बाजूचीं टेंकाडें मोठीं होऊन व्यंगत्व प्राप्त होतें. कोणा रोग्याच्या पाठीच्या कण्यास मध्यभागींच वक्रता येऊन पगार उमने, डावें बाजूस ती येऊन पोक आल्यामुळें व्यंगत्व येतें. बरगड्यांच्या स्वाभाविक वक्रतेत बदल होऊन उरोस्थि उचलून पुढें आल्याप्रमाणें दिसतो यामुळें छातींतील पोकळी कमी होऊन तींतील फुप्फुसें, हृदय इत्यादींच्या वाढीस अवरोध होऊन त्यांचे व्यापारहि सुरळीतपणें चालत नाहींत. अस्थिमार्दवामुळें असाच बदल कटिप्रदेशीं होऊन त्याची पोकळी कमी झाल्यामुळें स्त्रियांच्या बाबतींत प्रसूतिसमयीं मोठी अडचण येण्याचा संभव असतो. अशा मुलाचें डोकें शरीराच्या मानानें अमळ मोठेंच दिसतें; कारण त्यांतील भिन्नभिन्न हाडें एकमेकांत संलग्न होऊन डोक्याचा आकार लहान झालेला नसतो. डोक्याच्या मानानें चेहरा अगदीं बारीक व चिरकोळ दिसतो. दंतोद्भव उशीरानें होऊं लागतो व त्यास कीड लागून ते पडूं लागण्यास आरंभहि लवकरच होतो. येणेंप्रमाणें सर्व प्रकृतीवर परिणाम झाल्यामुळें मुलाचें शरीर अति कृश होतें व त्याची वाढ खुंटते.

परिणामः—बहुधा थोडें बहुत व्यंग, व खुरटेपणा अगर दुबळेपणा राहून नंतर रोगाची प्रगति थांबून हाडांत पूर्ववत काठिण्य येतें. व नंतर प्रकृति पूर्ववत् चांगली होते, किंवा रोगाची प्रगति चालू राहून त्या अवकाशांत एखादा सांध्याचा ताप, श्वासनलिका दाह, आकडी, मस्तिष्कजलोदर, अशांपैकीं एखाद्या प्राणघातक रोगास तें मूल बळी पडतें. हा सर्व प्रकार अति थोड्या काळांत घडून येतो. अशा प्रकारचा या रोगाचा एक तीव्र भेद आहे व तो असाध्य आहे.

उपचारः—वरील ज्या कारणामुळें हा रोग होतो असें सांगितलें आहे त्याकडे लक्ष पुरविलें असता ध्यानात येईलच कीं, औषधापेक्षा या रोगामध्यें (१) हवा, अन्न, दूध यासंबंधीं बालकाची व्यवस्था आरोग्यपूर्वक सशास्त्र राखणें, (२) आनुवंशिक, रोगप्रवृत्ति असल्यास मातेची प्रकृति व पोषण या हरएक बाबतींत सुधारणें हे प्रतिबंधक उपाय होत व (३) दुसरें वर्ष लागल्यानंतरहि फार दिवस मूल अंगावर पीत राहिल्यानें मातेची व मुलाची प्रकृति तर बिघडतेच पण जीं लेकरें मागाहून होतात तीं अशीं मूळचींच रोगट होतात. उलटपक्षीं सुदैवेंकरून माता निरोगी व विपुलदुग्धसंपन्न असून मुलास दुसरें वर्ष लागेपर्यंतच जर ती त्यास अंगावर पाजणार असेल तर हा रोग होण्याचा मुळींच संभव नाहीं असें म्हटलें पाहिजे. कारण वैद्यशास्त्रात असाच नेहमीं अनुभव येतो कीं, जीं मुलें वरच्या दुधावर किंवा अन्नावर वाढविलेलीं असतात व आईच्या अंगावरून तोडलेलीं असतात तींच या तऱ्हेनें विशेष रोगग्रस्त असतात. हा रोग झाल्यावर तो बरा होण्यासाठीं ठाम नियम घालून देणें कठिण असल्यामुळें त्याविषयीं सामान्य धोरण कसें असावें हें येथें संक्षेपानें दिलें आहे. मुलास दूध न पचून वांति, ढाळ होत असल्यास त्यास काय पाजतात याची चौकशी करून आईच्या अंगावर दूध मिळण्यासारखें नसल्यास उत्तम ताजें, व निर्मळ दूध मुलास नेहमीं मिळत जाईल व मुलास एक वर्ष पुरें होईपर्यंत त्याशिवाय त्यास दुसरें काहींहि खाऊं न घालतील अशी खबरदारी घेणें हें पहिलें कर्तव्य आहे. मुलास काहीं दिवस हें दूधहि पचत नाहीं असें होणें संभवनीय आहे. त्याची खूण म्हणजे तें न पचता त्या दुधाच्या दह्यासारख्या कवड्या गुठळ्याप्रमाणें मळावाटे पडतात व ढाळ होतात. असें झाल्यास दुधांत साधें पाणी किंवा चुन्याच्या निवळीचें पाणी योग्य प्रमाणात मिश्र करून दिल्यानें दूध पचतें. फारच अपचन झाल्यास काहीं दिवस दूध मुळींच बंद ठेवून त्याच्या ऐवजीं बार्ली अथवा विलायती यव या धान्याचा कढाव अथवा ओट धान्याच्या पिठाची अति पातळ लापशी पाजावी. अलीकडे मुलांचीं अन्नें आयतीं बनविलेलीं मिळतात तीं आपआपल्या परी उत्तम असतात. पण तींच फार देऊन दुध कमी करणें बरें नव्हे. कारण त्यात पिष्टपदार्थांचें प्रमाण मुलास न पचेल इतकें असल्यामुळें त्यांना आलस्याचे अथवा अपचनाचे रोग होतात म्हणून पचनशक्तीप्रमाणें हीं असें द्यावींत व एकंदरींत एक वर्षापुढेंहि दूध हें आहारापैकीं मुख्यपदार्थ समजून त्याशिवाय दंतोद्भवाप्रमाणें इतर पदार्थ भात, पोळी वगैरे फार देण्याची घाई करूं नये. लोह, कोयनेल फॉस्फरस व सर्वांत मुख्य म्हणजे कॉड माशाचें तेल हीं औषधें पौष्टिक व अन्नपाचक असल्यामुळें तीं जरूर द्यावींत. उबदार कपडे, शरीर निर्मळ राखणें, मलमूत्रोत्सर्जनाचे सुरळीत व्यापार चालू ठेवणें व

मुबलक व स्वच्छ हवा या सर्वांचें महत्व औषधाइतकेंच आहे. मुलास नियमितपणाची व नेमस्तपणाची संवय लावावी.

रोगाचें पाऊल झपाट्यानें पुढें पडत आहे, असें वाटल्यास व मूल चालतें असल्यास त्यास चालूं देऊं नये; कारण हाडें वाकतात. तथापि आतां फळ्या पाटया अशीं विशिष्ट यांत्रिक साधनें निघालीं आहेत तीं बांधून मूल चाललें, तर हाडांत वक्रता येत नाहीं व मागाहून मोठेपणीं व्यंग रहात नाहीं. व्यंग राहिल्यास ( पाय, घोटे, पावलें, पाठीचा कणा यांनीं वक्रता) मोठेपणीं त्यावर शस्त्रक्रिया केल्यानें कमी अधिक प्रमाणांत व्यंग नाहींसें होतें.

मु ड दू स.—मातेच्या उदरांत मूल असतांना त्यास हा रोग झाल्यास त्यास फीटल रिकेट्स अथवा मुडदूस असें म्हणतात. विद्वान् डॉक्टर यास स्वतंत्र व भिन्न रोग समजतात. हातापायांचा व शरीरयष्टीचा विलक्षण खुजेपणा व सांधे फार मोठे असणें हीं याचीं मुख्य लक्षणें होत. हा असाध्य व अनिश्चित स्वरूपाचा रोग असल्यामुळें याच्या उपचाराविषयीं येथें विशेष विस्तार केला नाहीं.

**अस्पृश्यता**—भारतीय समाजांत एक असा वर्ग आहे कीं, ज्यास शिवलें म्हणजे विटाळ होतो. समाजांतील अस्पृश्यवर्ग आणि ब्राह्मणवर्ग हे एकदम निराळे वर्ग नसून ब्राह्मण व अस्पृश्य याच्यामधील जी जातीपरंपरा आहे त्यांत एक दुसऱ्याहून कमी पवित्र आणि त्या कमी पवित्राहून दुसरा एक वर्ग अधिक कमी पवित्र अगर अधिक विटाळाचा अशी सोपानपरंपरा समाजांत आढळून येते. जेव्हां समाजांत दोन निरनिराळ्या जाती असतील आणि त्यांत समव्यवहार नसेल तेव्हां त्या जातींत उच्च नीच भाव असावयाचाच. हा एक जागतिक नियम आहे. भारतवर्षांत जें काय अधिक आहे तें हेंच कीं हा उच्चनीच भाव स्पर्शास्पर्शतेच्या व सोंवळें ओंवळेंपणाच्या नियमांत व्यक्त झाला आहे. अशा सामाजिक स्थितीचा आणि हिंदूंतील दैवतें किंवा अद्वैतासारखीं मतें याचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. धर्मशास्त्रीय ग्रंथांत सामाजिक पायऱ्यांस मान्यता दिली आहे आणि सोंवळ्या ओंवळ्याच्या कल्पना त्यांत अधिकाधिक व्यक्त झाल्या आहेत. त्यामुळें स्पृश्यास्पृश्यतेस हिंदुधर्मशास्त्रांत स्थान आहे, एवढेंच नव्हे तर हिंदुधर्म म्हणजे स्पृश्यास्पृश्य विचार होय अशी लोकांची समजूत झाली आहे. भारतीय धर्मशास्त्रीय इतिहासांत स्पृश्यास्पृश्यतेच्या कल्पनांस म्हणजे त्याच्या होत चाललेल्या विकासास एक लांबलचक इतिहास आहे असें आढळून येईल. [ स्पर्शास्पर्शविचार पहा ]. सोंवळ्या ओंवळ्याचे विचार प्रत्येक देशाच्या प्राचीन संस्कृतींत दृग्गोचर होतात. माणसामाणसांतील उच्चनीचता व्यक्त करावयाची त्याची साधनें अर्वाचीन जगांत निराळीं आहेत. राजा हा महत्व देणारी व्यक्ति असल्यामुळें उच्चनीच भाव अन्यरूपानें व्यक्त होतो.

बौद्धांनीं किंवा जैनांनीं अस्पृश्यता कमी केली नाहीं. सिलोनमध्यें रोडे यांची स्थिति महारासारखी होती आणि जपानांत अस्पृश्य वर्ग अजून जिवंत आहे ही गोष्ट प्रसिद्ध आहे जैनांच्यामुळें स्पृश्यास्पृश्यतेच्या कल्पना वाढल्या. यूरोपांत अस्पृश्यता नव्हती असें नाहीं. फ्रान्समध्यें डोकी मारणाराचा म्हणजे फांशी देणाऱ्याचा वर्ग जातिस्वरूप पावला.

समाज सुसंघटित स्थितींत असला म्हणजे असें होतें कीं, व्यक्तीच्या सामाजिक स्थितींत फरक झाला म्हणजे त्या फरकास मान्यता देण्यास समाजांतील नेता ( मग तो धर्माध्यक्ष असो अगर राजा असो ) असतो. हिंदुसमाजाची सुसंघटित स्थिति नसल्यामुळें अस्पृश्यांपैकीं जे मनुष्य निराळ्या आचरणाचे बनतील त्यास मान्यता देण्यास जागा नाहीं. जातिभेद विनाशास (जातिभेद पहा) ज्या अडचणी आहेत त्याच अस्पृश्यतानाशास आहेत. तथापि त्याबरोबर हेंहि सांगितलें पाहिजे कीं, समाजकेंद्र जिवंत असला तरी तो बदललेल्या स्थितीस मान्यता देईल एवढेंच, समाजांतील विशिष्ट वर्गाची सांपत्तिक स्थिति किंवा त्याचें श्रमविभागांतील स्थान हीं बदलूं शकणार नाहीं. सामाजिक स्थिति सुधारली आणि सामाजिक श्रमविभागांत विशिष्ट अस्पृश्य जातीस अधिक व्यापक स्थान मिळालें म्हणजे बदललेल्या परिस्थितीस शास्त्राधार काय तो राजा किंवा धर्माध्यक्ष देऊं शकेल. अस्पृश्यतेचा पूर्ण नाश व्हावयास जें करावयास पाहिजे तें म्हणजे बऱ्याच व्यापक कार्यास प्रवृत्त व्हावयाचें. त्याचें स्वरूप पुढें येईल. प्रथम अस्पृश्यता विनाशनासाठीं अर्वाचीन प्रयत्न व्यक्त करून दाखविण्यासाठीं शिंदे यांचा लेख दिला आहे ( संपादक ).

" अ स्पृ श्य ता नि वा र णा चा आ धु नि क इ ति हा स." उ त्प त्ति.—अस्पृश्यतेचा इतिहास निदान हिंदुस्थानांत तरी आर्यन् लोकाच्या आगमनाइतकाच जुना आहे. चांडाल हा शब्द वैदिक वाङ्मयांत आणि बौद्ध ग्रंथांतून आढळतो. बुद्धाच्या वेळेच्या पूर्वीपासून तरी निदान चांडाल आणि इतर जित राष्ट्रें अस्पृश्य गणलीं जात होतीं असे उल्लेख आढळतात. इराणांतील झरथुष्ट्र पंथी आर्य हिंदुस्थानांतील देवयज्ञी व इतर दैवोपासक आर्यांनाहि अस्पृश्य आणि तिरस्करणीय समजत असत, असें पारश्यांच्या जुन्या व अर्वाचीन ग्रंथांत पुरावे मिळतात. आर्यांचा हिंदुस्थानांत कायमचा जम बसल्यावर त्यांनीं येथील दस्यु उर्फ शूद्र नावाच्या जित राष्ट्रांना आपल्या वस्तीजवळच पण बाहेर राहावयास लावून त्यांच्या व आपल्या संस्कृतींत भेसळ होऊं नये म्हणून त्याना अस्पृश्य ठरविलें. ज्याअर्थी जपानांत इटा, हीना नावाच्या अस्पृश्य जाती अद्यापि आहेत त्याअर्थी अस्पृश्यता ही संस्था आर्यांनीच निर्माण केली नसून तिचा प्रादुर्भाव मोंगल लोकांतहि पूर्वी होता हें सिद्ध होतें. ईटा किंवा ऐटा ही जात फिलीपाईन बेटांतून जपानांत गेली

असावी. अथवण (ब्राह्मण), रथेस्ट्र (राजन्य), वस्ट्रय (वैश्य) आणि हुइटी (शूद्र) असे झरथुष्ट्राच्या वेळीं इराणांत चार भेद होते. वेदात शूद्र हा शब्द आढळत नाहीं; पण महाभारतात अभिर आणि शूद्र ह्याचा उल्लेख असून सिंधू नदीच्या मुखाजवळील भागात त्याची वस्ती असावी असें दिसतें. [ऋग्वेदात पुरुषसूक्तात शूद्र शब्द आला आहे व शुक्ल यजुर्वेदात ८ वेळा या शब्दाचा उल्लेख आला आहे.(५२. ३०,३१ इ) संपादक-ज्ञानकोश] कास्टस ऑफ इंडिया या पुस्तकात सुइलसननें म्हटलें आहे कीं, कंदाहार प्रातात शूद्रोई नावाचें प्राचीन राष्ट्र होतें आणि सिंधू नदीवर शूद्रोस नावाचें शहर होतें (रसेल ह्यांचें कास्टस अँड ट्राइब्स ऑफ सी. पी. हें पुस्तक पहा). इराणातील हुइटी अथवा शूद्रोई आणि फिलीपाइन बेटातील ऐटा ह्या जातींचा संबंध असल्याचें सिद्ध करता आल्यास अस्पृश्यतेच्या उत्पत्तीवर बराच प्रकाश पडण्यासारखा आहे.

आर्यांचा विस्तार उत्तर हिंदुस्थानात होऊन आर्यावर्ताची स्थापना झाल्यावर शूद्र राष्ट्राचा आर्यांच्या वर्णव्यवस्थेंत समावेश होऊन पुढें दुसरीं जीं कोणी जंगली जित राष्ट्रें आर्यांच्या खिदमतीस राहण्यास कबूल झालीं, तीं हळू हळू अस्पृश्य गणलीं जाऊन गावाच्या शिवेबाहेर राहूं लागलीं अशी उपरिनिर्दिष्ट रसेलच्या ग्रंथात उपपत्ति आहे. मनुस्मृतीच्या काळानंतरची अलीकडच्या अस्पृश्य जातींची माहिती चागली मिळण्यासारखी आहे. मनुस्मृतींत ब्राह्मण स्त्री आणि शूद्र पुरुष यामधील प्रतिलोम संततीस चांडाल अशी संज्ञा आहे.

इंग्रजी शिक्षणामुळें हिंदुस्थानात जी आधुनिक सुधारणेची प्रवृत्ति सुरू झाली, तिच्यामुळें वरील अस्पृश्यतेच्या निवारणार्थ केवळ हिंदु लोकाकडून जे प्रयत्न होत आहेत, त्याचा संक्षिप्त इतिहास एवढाच प्रस्तुत विषय आहे.

ह्या विषयाचे दोन मुख्य भाग पडतात ते असे. इ स. १९०६ मध्ये भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळी (डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया) मुंबई येथें स्थापन झाली. हिचा पूर्वकाळ आणि उत्तर काळ असा:—पूर्वकाळीं अनुक्रमे महाराष्ट्र, बंगाल, बडोदें आणि मद्रास प्रांतीं काहीं उदार व्यक्तींनीं थोडेसे प्रयत्न केले; पण त्याच्यात सरयता. संघटना, परस्पर संबंध नसल्यामुळें त्याना यावी तशी दृढता आली नाहीं, पण ही मंडळी मुंबईत स्थापन झाल्यावर सर्व हिंदुस्थानभर हिच्या शाखा झपाट्यानें पसरल्या. त्यांच्यांत कमी अधिक परस्परसंबंध घडल्यामुळें व त्यांच्या द्वारा सर्वत्र लोकमताचा विकास झाल्यामुळें शेवटीं सन १९१८ सालीं कलकत्याच्या कॉंग्रेसनें मडळीचे जनरल सेक्रेटरी रा. शिंदे ह्याच्या पत्रावरून अस्पृश्यतानिवारणाचा ठराव सर्वानुमतें पास केला व पुढें लवकरच महात्मा गांधी ह्यांच्या पुरस्कारामुळें ह्या प्रयत्नाला आतां अखिल राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें. कलकत्याच्या कॉंग्रेसमध्यें मिसेस बेझंट या अध्यक्ष होत्या व त्यांचा ह्या मंडळीशीं बराच परिचय होता म्हणून त्यांनीं आपल्या अनुयायाच्या जोरावरच हा ठराव पास केला.

रा. फु ले या चा प्र य त्न —इंग्रजी विद्येचा उगम एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं तरी प्रथम बंगाल्यांत झाला, आणि तेथें राजा राममोहन राय ह्यांनीं इ स. १८३१ त ब्राह्मसमाजाच्या रूपानें सर्व आद्य प्रगतीची ध्वजा उभारली तरी अस्पृश्यता निवारणाचा अग्र आणि अंतिम मान महाराष्ट्रासच आणि विशेषत: जोतीबा फुले ह्या महात्म्यानेंच मिळविला ह्याचा जन्म पुणें येथें फुलमाळी जातींत झाला सन १८४८ पर्यंत ह्याचे मराठी आणि इंग्रजी बरेंच शिक्षण मिशनरी शाळेंत झालें. रा. लहूजी नावाच्या एका तालीमबाज मांगजातीच्या गृहस्थाच्या आखाड्यात ह्याचें शारीरिक शिक्षण झालें होतें तेव्हांपासून अस्पृश्योद्धाराकडे ह्याचें लक्ष वेधलें होतें. पुढें बंगाल्यात बाबू शशिपाद बानर्जी ह्या गृहस्थानीं स्त्रीशिक्षण, विधवाविवाह अस्पृश्योद्धार वगैरेसंबंधीं सामाजिक प्रगतीचीं जीं कामें चालविलीं तीं त्याच्या पूर्वीच २० वर्षें आधीं महाराष्ट्रात ह्यानीं चालविलीं. "डेक्कन असोसिएशन" नावाची एक प्रागतिक विचारप्रसारक संस्था पुण्यास होती. तिच्या वतीनें सरकारानीं जोतीबास २०० रुपयाची शाल मोठी जाहीर सभा करून सन १८५२ सालीं नजर केली. त्याचें कारण १८४८ सालीं जोतीबानीं मुलींची पहिली शाळा स्थापन केली.आणि १८५२ सालच्या आरंभीं महारमांगाच्या मुलासाठीं पहिली शाळा स्थापन केली. ही शाळा मुंबई इलाख्यातच नव्हे तर अखिल जगात अस्पृश्यासाठीं हिंदु लोकानीं उघडलेली पहिलीच खासगी शाळा होय. सरकारी इन्स्पेक्टर मेजर कँडी साहेबानीं हिची पहिली परीक्षा ता. २१ मार्च १८५२ रोजीं शुक्रवार पेठेंतील शाळेंत घेतली असें त्या दिवशीं प्रसिद्ध झालेल्या ज्ञानप्रकाशाच्या अंकात नमूद झालें आहे. "त्या वेळेस शुद्ध लिहिणें व वाचणें वगैरे गोष्टींत ह्या शाळेंतील मुलानीं विश्राम बागेंतील (वरिष्ठ वर्गाच्या) किती एक विद्यार्थ्यांपेक्षाहि उत्तम परीक्षा दिली असें मेजर साहेबानीं म्हणून दाखविलें; असें ज्ञानप्रकाशानें त्याच अंकात प्रसिद्ध केलें आहे. ता. ५ डिसेंबर १८५२ च्या ज्ञानप्रकाशात शाळेच्या पहिल्या वार्षिक रिपोर्टासंबंधानें संपादकानीं जें स्पष्ट व सविस्तर मत दिलें आहे त्यातील खालील उतारे विशेष लक्षांत घेण्यासारखे आहेत. "एक मुलीची शाळा आपल्या घराजवळ घातली त्या कालावधींत व पुढेंहि त्यास त्याच्या जातीच्या लोकाकडून फार त्रास सोसावा लागला. त्यास शेवटीं तीर्थरूपानीं घरांतून त्याच कारणावरून काढलें. त्यास शेवटीं तीर्थरूपानीं घरांतून त्याच कारणावरून काढलें. आपल्या नीच बंधुजनास अज्ञानसागरांतून काढून ज्ञानामृताचें सेवन करण्याकरितां त्यानीं संकटें भोगिलीं हा त्यांचे त्या जातीवर मोठा उपकार आहे. आम्हीहि त्यांचे आभार मानितो. ब्राह्मण लोकामुळें अतिशूद्रांचें ज्ञानें करून व द्रव्येंकरून बिलकूल बरें होऊं नये, अशी तंव

जातीची इच्छा खरी; परंतु त्यांत ब्राह्मण कायते अग्रेसर असा त्यांचा लिहिण्याचा हेतु कळून येतो. त्याविषयीं पिष्टपेषण करण्याचें कारण नाहीं. प्रायः आम्ही ही गोष्ट खरी समजतो, असें फुलेराव म्हणत असत ज्या ब्राह्मणांनी अशाव कामात द्रव्याची वगैरे मदत केली त्यापेक्षां त्यांची स्तुतीतर इतरांपेक्षा जास्त केली पाहिजे व त्याचें स्मरण सर्वांस राहावें यास्तव त्यांचीं नावें जोतीरावांनी (रिपोर्टांत) अवश्य लिहावीं असें आम्हांस वाटतें." ह्या शाळेंत चांभाराच्या मुलांस जोतीबा स्वतः व त्यांची बायको किती कळकळीनें शिकवीत असत ह्याविषयीं एक पत्र ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालें आहे. त्यांचे तीन मित्र मोरो विठ्ठल वाळवेकर, सखाराम यशवंत परांजपे, सदाशिवराव बल्लाळ गोवंडे ह्यांची जोतीबांना बरीच मदत असे. "महारमांगाच्या शाळांत बरीच गर्दी होत असे. ह्या लोकांस त्यांनी आपल्या राहत्या घराच्या विहिरीवर पाणी भरण्यास परवानगी दिली." (अ. ए. गवंडीकृत फुले यांचें अल्प चरित्र पान ८) ता. ४ सप्टेंबर १८५६ च्या ज्ञानप्रकाशाच्या अंकात खालील मजकूर आहे. "गेल्या शुक्रवारीं येथील अतिशूद्रांच्या शाळांची परीक्षा झाली. मुख्य स्थानीं मिस्तर स्विससाहेब रिविन्यू कमिशनर हे बसले होते, यूरोपीयन, नेटिव्ह बरेच आले होते आरंभीं कमिटीनें रिपोर्ट इंग्रजींत व नंतर मराठींत वाचला व त्यावरून असें समजतें कीं एकंदर शाळा तीन आहेत व त्यामध्यें मुलांची संख्या सुमारें २०० वर आहे. परंतु महारमांग आदिकरून नीच जातींखेरीजकरून इतर मुलें पुष्कळ होतीं. शिक्षक सुमारें ८ आहेत, ह्या शाळांत मुली मुळींच नाहींत. गेल्या दोन वर्षांत मुली असत; परंतु एक शाळा ह्या वर्षी जास्त वाढविली आहे. स्थापन झाल्यापासून दिसत आहे कीं, ह्या शाळांच्या अभ्यासाची धाव पलीकडे जात नाहीं व ह्याचें कारण काय तें कळत नाहीं. कमिटी असें म्हणतें कीं शिक्षक चांगले मिळत नाहींत."

सन १८७५ सप्टेंबर ता. २४ च्या मुंबई सरकारच्या रेव्हिन्यु खात्याच्या नं. ५४२१ च्या ठरावावरून जोतीबांच्या ह्या शाळाविषयीं खालील ठराव—"१८५५-५६ च्या सुमारास महारमांगांच्या मुलांच्या शाळेसाठीं इमारत बांधण्याकरितां सरकारांनीं पुणें येथें एक जागेचा तुकडा दिला असें दिसतें व तसेंच इमारत खर्चासाठीं दक्षिणा फंडातून ५००० रुपये देण्याचें सरकारांनी वचन दिलें. ही रक्कम वसूल करण्यात आली नाही, तरी ह्या जागेवर एक झोंपडी उभारण्यात येऊन तिच्यांत गेल्या वर्षापर्यंत महारांसाठीं एक शाळा भरत होती. आतां शाळा बंद आहे ह्या शाळेच्या मंडळीचे सेक्रेटरी रावबहादूर सदाशिवराव बल्लाळ त्यांच्या ताब्यांत ही जागा आहे. शाळेला लागणाऱ्या जागेखेरीज इतर भाग एका माणसाला लागवडीनें सेक्रेटरी देत आहेत तिचें लावणी उत्पन्न दरमाल ८० ते १०० रुपये येत असतें, रावबहादूर सदाशिव ह्यांच्या मनांत ही जागा व शाळा सरकारास द्यावयाची आहे. ही जागा लोकलफंड कमिटीस द्यावयाची आणि शाळा तिच्या उत्पन्नांतून सदर कमिटीनें पुढें चालवावी. दक्षिणाफंडातून ८०० रुपये ग्रँट देण्यास सरकारास हरकत वाटत नाहीं." मुंबई सरकारच्या विद्याखात्याचा तारीख १३ नोव्हेंबर १८८४ नंबर १९२१ चा ठराव झाला, त्यावरून ही शाळा लोकलफंड कमिटीकडून पुणें म्युनिसिपालिटीकडे येऊन सरकारांतून वेगळी ग्रँट मिळण्याची तजवीज झाली. येणेंप्रमाणें महारमांगासाठीं जोतीबांनी जी प्रथम संस्था काढली तिच्या मिळकतीची हकीकत आहे. भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळीनें जानाच्या पेठेंत पुणें म्युनिसिपालिटीकडून सन १९१४ तारीख १८ माहे जून रोजीं भोकरवाडीजवळील ७ एकर जागा आपल्या प्रशस्त इमारतीकरितां ९९ वर्षांच्या कौलानें घेतली आहे. ती हीच मिळकत होय सरकारकडून म्युनिसिपालिटीला जी शाळा मिळाली ती देखील हल्लीं ह्या मंडळीच्या शाळांतच सामील झाली आहे.

शशीपाद बॅनर्जी यांचे प्रयत्न.—बंगाल्यांत अस्पृश्यतानिवारणाचा प्रथम मान वरील ब्राह्मण गृहस्थाकडे आहे. हे कलकत्त्याजवळील बारानगर गांवीं सन १८४० त कुलीन ब्राह्मण जातींत जन्मले १८६६ साली ब्राह्मधर्मी झाले. तेव्हांपासूनच ते अगदीं खालच्या जातीशीं मिळूनमिसळून जेवूं लागले सन १८६५च्या नोव्हेंबरच्या १ ल्या तारखेस त्यांनीं बारानगर येथील गिरणींतील मजूरवर्गाची एक सभा भरविली. त्यांत ठराव होऊन त्यांच्यासाठीं रात्रीच्या आणि दिवसाच्या शाळा काढल्या. हा अनाचार, टवाळ लोकांस न खपून त्यांनीं त्या उठविल्या, पण ह्यांनीं स्वतःच्या खर्चानें इमारती बांधून त्या कायम केल्या. इकडील चोरामेळ्याप्रमाणें बंगाल्यांतील वर्ताभजापंथी चांडालवर्ग भजनाचा शोकी आहे त्यांना विठ्ठलपारागावीं एक उत्तम सारंगी तयार करण्याचा कारखाना आहे. तेथें बाबूजी जाऊन चांडाळाचें कीर्तन ऐकत सन १८७० च्या आगस्ट महिन्यांत त्यांनीं अशा मजूरवर्गाचा एक क्लब काढिला त्याच्या द्वारा त्यांना वाचनाची गोडी लाविली आणि मद्यपान वगैरे दुष्ट चाली सोडविल्या. वेडींवांकडीं गाणीं सोडून ही मंडळी सात्विक कीर्तनें करूं लागली १८७१ त जेव्हां बाबूजी विलायतेस निघाले तेव्हां ह्या गरीब मजुरांनीं त्यांना अत्यंत कृतज्ञतापूर्वक मानपत्र दिलें. ह्या दीनांच्या सेवेबद्दल बाबूजींचा सत्कार ते विलायतेस गेल्यावर ब्रिस्टल शहरां एका मिशनरी सभेनें त्यांना एक मोठें मानपत्र देऊन केला. परत आल्यावर गरिबांसाठीं एक पैशाचें एक मासिकपत्र काढिलें. त्याच्या दर महिन्यास १५००० प्रती खपूं लागल्या. त्यांत पंडित शिवनाथशास्त्र्यांसारख्यांनी लेख लिहिले व श्रीमंतांची चांगली मदत असे. बारानगर समाचार नावाचें साप्ताहिकहि काढलें

ते चांडालाबरोबर बेर्धात, मेहेतरांच्या मुलांची शुश्रूषा करीत. सरकारानें तुकस्याव उघडलेल्या सेव्हिंग्ज बँकेत त्यांचे पैसे ठेवून त्यांना काटकसर शिकवीत. बारानगर येथें ब्राह्म-समाज स्थापन झाल्यावर ह्या लोकासाठीं बरेंच काम होऊं लागलें. ह्या मजुराच्या संस्थेच्या २३ व्या वार्षिक उत्सवाचें वर्णन १८८९ सालच्या सप्टेंबर महिन्याच्या २० ता. च्या 'इंडियन डेली न्यूज' नांवाच्या इंग्रजी पत्रांत सविस्तर आलें आहे. बक्षीस समारंभात १०० वर मुलास व मजुरांस बक्षिसें दिलीं. बऱ्या मंडळींनीं सहानुभूतीची भाषणें केलीं. यशिवाय बंगाल्यात दुसरे कोणते प्रयत्न झालेले ऐकिवांत नाहींत. हल्लीं जें डिप्रेस्ड मिशनचें गावोगावीं काम चाललें आहे त्याचें मूळ महाराष्ट्रांतील मिशनमध्यें आहे. वरील माहिती सितानाथ तत्त्वभूषण यांनीं निवेदिलेल्या शशिपाद बाबूंच्या चरित्रावरून व इतर साधनावरून मिळविलेली आहे.

श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांचे प्रयत्न – महाराजांनीं आपल्या राज्यात वेळोवेळीं कानाकोपऱ्यात स्वतः जाऊन अस्पृश्य जंगली, गुन्हेगार जातींची स्थिति स्वतः निरखिली. नवसारी जवळ सोनगड म्हणून महाराजांचा एक जंगली मुलूख आहे तेथें ढाणका नांवाची जंगली जात आहे. तेथें महाराज गेले तेव्हा हे सर्व लोक वानराप्रमाणें झाडावर चढून बसले ते कांहीं केल्या खालीं उतरेनात. महाराजानीं ३० वर्षांपूर्वी या लोकांच्या १०० मुलामुलीं-साठीं दोन बोर्डिंगें आणि शेतकीची नमुनेदार शाळा काढलेली मी स्वतः १९०५ सालीं पाहिली तिचा उत्तम परिणाम दिसून आला. तेथील सुपरिंटेंडेंटनें ह्या लोकासाठीं एक प्रार्थनासमाज चालविला होता, तो मी दोनदा पाहिला. त्याच्या द्वारा मुलांस उच्च धर्माचीं तत्त्वें शिकण्याची सोय होती. गुजराथी व इंग्रजी शिकलेले प्रौढ मुलगे व मुली बोर्डिंगांत मी पाहिल्या त्यांच्यांत लग्नें लावून कायमची सुधारणा करण्याची कल्पना महाराजांची घेण्यासारखी दिसली. थक्क झालों.

अस्पृश्यांच्या शिक्षणाचें खातेंच एक निराळें आहे. त्याचे मुख्य अधिकारी पंडित आत्माराम यांनीं पाठविलेल्या रिपोर्टांचा अल्प सारांश खालीं दिला आहेः—

सन १८८३ सालापासून "अस्पृश्यां" करितां निराळ्या मोफत शाळा उघडण्यास सुरवात झाली. १८८४ त ७, व १८९१ त १० शाळा झाल्या व हिंदु शिक्षक मिळणें अशक्य असल्यामुळें मुसलमानावरच काम भागवावें लागे. अधिकाऱ्यांतहि सहानुभूति कमी असल्यामुळें फार अडचणी आल्या.

त्याचसाठीं मुंबईत नि. सा. मंडळी स्थापण्यात आली आणि बडोद्यात सक्तीच्या शिक्षणाचा ठराव पास होऊन शिक्षणाचा प्रसार झपाट्यानें वाढला.

| वर्षे | मुलामुलींच्या मिश्र शाळा | मुलींच्या निराळ्या शाळा | वसति गृह | वसतिगृहांतील विद्यार्थि | एकंदर विद्यार्थि |
|---|---|---|---|---|---|
| १८८४ | ७ | ० | ० | ० | ० |
| १८९१ | १० | ० | ५ | ३९० | ७८४ |
| १८९३ | ० | ० | ० | ० | १२९३ |
| १८९६ | २१ | ० | ० | ० | ० |
| १९०६ | २२ | ० | १ | ५० | १५०० |
| १९१० | २८७ | ५ | २ | ० | १३७०३ |
| १९१५ | ० | ० | ३ | ० | १९७८७ |
| १९२१ | ० | ० | ५ | ० | १७००० |

अंत्यजाच्या धर्मशिक्षणार्थ १९२३ सालीं त्यांच्या पुरोहिताना संस्कृत शिकविण्यासाठीं एक खास संस्कृत पाठशाळा उघडली व तींत प्रत्येकीं ८ रु प्रमाणें २५ गारोड्याना विद्यार्थिवेतनें दिलीं. पेटलादच्या रा. शिवराम नांवाच्या अंत्यज व्यापाऱ्याला धारा सभेचे सभासद नेमिलें. त्यांच्या मृत्यूनंतर मुंबईचे बी. ए. महार गृहस्थ रा. आंबेडकर यांना नेमण्यात आलें. १९११ सालीं शिक्षणखात्यात २००, लष्करांत १९, म्युनिसिपालिटींत १०, पोलिसात ७, सर्व्हे-खात्यात ३ आणि इतर ३ असे एकंदर २४२ अस्पृश्य इसम सरकारी नोकरींत होते. बडोदा कॉलेजात स्कॉलरशिपा ठेविल्या. अंत्यज बोर्डिंगात वैदिक पद्धतीचें संस्कृतांत धर्मशिक्षण देण्यात येतें. मुलांना राजवाड्यात जमवून सर्वांसमक्ष समारंभ करण्यात येतात.

१७ वर्षांच्या एका अंत्यज अनाथ मुलीचें लग्न एका वरिष्ठ स्पृश्य वर्गांतील मुलाशीं १९१९ सालीं करण्यांत आलें. वसतिगृहांतील सर्व मुलींना शिवण आणि गृहोपयोगी सर्व कामें शिकविण्यात येतात. रा. आंबेडकर ह्यांना अमेरिकेंतील कोलंबिया युनिव्हर्सिटींत ४ वर्षे ठेवून पीएच. डी. करविलें आणि एकाला मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें एल. एम्. एस. करविलें. ह्या सर्व सत्कार्यांत लोकांकडून नेहमीं टीका आणि पुष्कळ वेळा उघड विरोध सहन करावा लागला. वसतिगृहांतील प्रौढ विद्यार्थ्यांकडून आतां बडोदे राज्यात आत्मोद्धाराच्या चळवळीला चांगली मदत होऊं लागली आहे. महात्मा गांधींना हल्लींहि विरोध होत आहे. मग नि. सा. मंडळीला पूर्वी गुजराथसारख्या सोंवळ्या प्रांतीं किती विरोध झाला असेल ह्याची कल्पनाच करावी लागणार !

कर्नल ऑल्कॉट,(थिऑसोफिकल सोसायटी मद्रास)— कर्नल ऑल्कॉट थिऑसोफिकल सोसायटीचे अध्यक्ष यांनीं १९०२ सालीं 'पुअर पराय' नांवाची एक लहानशी चोपडी प्रसिद्ध केली. तिच्यांत पान १७—२३ मध्यें खालील हकीकत आहे. अस्पृश्यता निवारणाचा उत्तम उपाय म्हणून मद्रास शहरीं त्यांनीं आपली पहिली शाळा सन १८९४ सालीं एका झोंपडींत काढली. दुसरी १८९८ त व तिसरी १८९९ त उघडली. १९०१ च्या रिपोर्टांत सर्व शाळांतून

मिळून त्या सालच्या २० डिसेंबर रोजीं ३८४ मुलगे व १५० मुली आणि १६ शिक्षक होते ४ इयत्तेपर्यंत तामीळ, हिशेब, व्यावहारिक इंग्रजी हे शिकविण्यात येतें. त्यांच्या धर्मांत मुळींच हात घालण्यांत येत नाहीं शिक्षणापलीकडे विशेष कांहीं करण्याचा सोसायटीचा उद्देश ऐकिवांत नाहीं. १९०३ सालीं मी स्वत. मद्रास शहरीं या सोसायटीच्या चार शाळा पाहिल्या. तेथें किंडरगार्टन पद्धतीचें नमुनेदार शिक्षण मी पाहिलें एक ख्रिस्ति बाई फारच कळकळीनें देखरेखीचें काम सुयत्नें करीत होती ह्या शाळांचें काम अद्यापि चालत आहे

रा. सा. के रं ग रा व मं ग ळू र —मद्रास इलाख्यांत विशेषतः पश्चिम किनाऱ्यावर अस्पृश्यांचे हाल कल्पनेच्याहि पलीकडे आहेत " अस्पृश्यांची गोष्टच नको पण वरिष्ठ जातींच्या व्यक्तीपासून ६०–७० फुटांच्या अंतरांत येण्यास त्यांना अद्यापि मनाई आहे म्हणून त्या प्रांतीं सर्वांच्या मागून ह्या कामीं सुरवात झाली हें लक्षांत आणून मंगळूर ब्राह्म समाजाचे सेक्रेटरी रावसाहेब के रंगराव ह्यांनीं मंगळूर येथें १८९१ सालीं आपली पहिली शाळा काढली ही मोठी स्तुत्य गोष्ट आहे ह्या कामीं त्यांना लोकांचा छळ सोसावा लागला पुढें १० वर्षांत ह्या छळाला न जुमानता बरीच प्रगति करता आली सरकारच्या मदतीनें त्यांना त्या अवधींत ह्या संस्थेसाठीं स्वतःची विस्तीर्ण जागा व इमारत, उद्योगशाळा आणि वसाहती साठीं सुमारें २० एकर शेतकीची जागा इतकी सामुग्री संपादन करता आली मुंबईस रा. शिंदे ह्यांनीं १९०६ सालीं भारतीय नि सा. मंडळी स्थापिली तिला ही संस्था जोडण्यांत आल्यापासून हिची भरभराट होत आहे

ब्रि टि श स र का र आ णि ख्रि स्ती मि श नें — यांनीं अस्पृश्यांची स्थिति सुधारण्याकरितां जें कांहीं केलें आहे तें प्रसिद्ध आहेच त्याचें सविस्तर वर्णन करण्याचें हें स्थळ नव्हे ह्याच्या मार्गांत अडथळा कायतो नोकरशाहीची नवाबी पद्धति आणि धर्मांतराचें वेड एवढाच होता हे अडथळे नसते तर दोघांच्या हातून निदान हिंदुस्थान सरकारच्या एकाच्या हातून हा अस्पृश्यतेचा प्रश्न ह्यापूर्वीच सुटावयाला पाहिजे होता मद्रासकडील ख्रिस्ती मिशनांच्या विशेषत रोमन कॅथोलिक पंथाच्या पद्धतींत तर उघड उघड दोष दिसत आहेत ते हे कीं, जातिभेदाचें निर्मूलन करण्याचें त्यांच्या धर्मांत सांगितलें असूनहि केवळ आपली संख्या वाढावी ह्या हेतूनें त्या लोकांना ख्रिस्ती धर्मांत घेऊन पुन्हा त्यांचा दर्जा खालचाच ठेवला आहे त्यामुळे त्यांना आतां दोन्ही वाटा बंद झाल्या आहेत ह्याचे पुरावे मी स्वत दक्षिण देशीं जागजागीं पाहिले. ख्रिस्ती लोकांत हल्लीं जी राष्ट्रीय चळवळ चालू आहे ती कायम राहिली आणि काँग्रेसची चळवळ शब्दांपलीकडे जाऊन कृतींत उतरली तर लवकरच हे लोक पुन धर्मांतर करून हिंदुधर्मांत येतील असें वाटतें

इंग्रज सरकारनें नुसतें शिक्षण देऊन सरकारी नोकरींत घेण्याच्या बाबतींत त्यांनीं या लोकांवर आजवर जो अक्षम्य अन्याय केला आहे त्याचें निराकरण करतील तरी तावडतोब अस्पृश्यतेला ओहोटी लागेल तथापि अशा बाबतींत परकीय नोकरशाही आणि परधर्मी ब्राह्मणशाही ह्यांनां नावें ठेवण्यापेक्षां सर्व दोष स्वकीयांनींच पत्करावा हेंच योग्य आहे.

वि ठ्ठ ल रा म जी शिं दे —ह्याचा जन्म कर्नाटकांतील जमखिंडी येथें ता २३ एप्रील १८७३ रोजीं झाला ह्याचे पूर्वज सन १२ व्या शतकांत प्रसिद्ध असलेल्या सिंद नावाच्या मांडलीक राजघराण्याचा अवशेष म्हणून विजापूर जिल्ह्यांतील १८ व्या शतकाच्या शेवटीं जें सुरापूर नावाचें संस्थान होतें त्यांतील जहागिरदार होते हे फर्ग्युसन कॉलेजांतून बी ए. ची परीक्षा १८९८ त पास झाले आणि विलायतेहून ऑक्सफर्ड विद्यालयांतील आपला धर्म आणि समाजशास्त्राचा अभ्यास संपवून स्वदेशीं १९०३ सालीं सप्टेंबर महिन्यांत परत आल्यावर "डिप्रेस्डक्लासेस मिशन सोसायटी आफ इंडिया" अथवा भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळाच्या स्थापनेस लागले लौकरच १९०३ च्या आक्टोबर—नवंबर मध्यें ह्यांनीं बडोद्यांतील कामाची प्रगति महाराजांच्या आज्ञेवरून पाहून रिपोर्ट आणि सूचना केल्या पुढें तीन वर्षे मुंबई प्रार्थना समाजाच्या प्रचारकाच्या कामानिमित्त ह्यांनीं सर्व हिंदुस्थानांत प्रवास केला तेव्हा विशेषत. प्रांतोप्रांतींच्या अस्पृश्य, गुन्हेगार आणि जंगली जातींची स्थिति समक्ष पाहिली. १९०५ पासून हिंदुस्थानांतील सेन्सस रिपोर्टांवरून ह्या लोकांच्या संख्येची वगैरे अजमावणी करून लेखांच्या व व्याख्यानांच्या द्वारें आपले अनुभव आणि सूचना ते प्रसिद्ध करू लागले प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष सर नारायणराव चंदावरकर आणि उपाध्यक्ष शेट दामोदरदास सुखडवाला यानी आपल्या वजनाच्या आणि द्रव्याच्या द्वारें साह्य केल्यावर मुंबई येथे तारीख १८ आक्टोबर १९०६ कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या सुमुहूर्तावर सकाळी १० वाजता मंडळीची स्थापना परळ येथें पहिली शाळा उघडून केली पुढें १९०७ पासून १९१२ अखेर काँग्रेसच्या सभा अनुक्रमें सुरत, मद्रास, कलकत्ता, लाहोर, बांकीपूर आणि कराची येथें झाल्या. त्यावेळी अस्पृश्यता निवारणार्थ लोकमत तयार करण्याकरतां त्या त्या सर्व ठिकाणीं रा शिंदे ह्यांनीं त्या विषयीं स्वतंत्र परिषदा भरविल्या आणि शक्य त्या ठिकाणीं स्थानिक मदत घेऊन आपल्या मिशनच्या स्वतंत्र शाखाहि उघडल्या मात्र प्रत्यक्ष कार्य उत्तर हिंदुस्थानांत आर्यसमाजानें व बंगाल्यांत ब्राह्म समाजानें आपल्या अंगावर घेतल्यामुळें संस्थेशी पुढें ह्या कामाचा प्रत्यक्ष संबंध

उरला नाहीं. पण दाक्षिणेंत व पश्चिमेकडे मुंबई इलाख्यातील मूळसंस्था ही कोणत्याहि समाजात आपलें कार्य स्वतंत्र चालवून मुंबईतील मध्यवर्ती कमिटीच्या विद्यमानें ठिकठिकाणीं प्रांतिक शाखा व जिल्ह्याच्या ठिकाणीं तिच्या पोट शाखा उघडण्यात आल्या. १९१२ पर्यंत साधारणपणें घटनेची रूपरेषा आकारण्यात आली. पैशाच्या व स्थानिक मंडळींच्या कळकळीच्या मानानें ठिकठिकाणच्या कामात विषमता राहिली. आणि पुढें तर मद्रास इलाख्यातील ठाणीं मूळसंस्थेपासून स्वतंत्रहि झालीं. हल्लीं ह्या भारतीय मिशनच्या मूळ मध्यवर्ती कमिटीच्या ताब्यात खालील पाच मुख्य शाखा तिच्या देखरेखीं खालीं चालू आहेत. त्याचा प्रत्यक्ष कारभार स्थानिक कमिट्या चालवीत आहेत मुंबईशाखा ( परळ ), महाराष्ट्र ( पुणें, भोकरवाडी ), कर्नाटक शाखा ( हुबळी), मध्यप्रांत वऱ्हाड शाखा ( नागपूर पाचपावली ), तामील शाखा ( बंगलूर कँटोनमेंट) ह्यांचीं कामें व रिपोर्ट वेळोवेळीं प्रसिद्ध होतअसतात. ह्या मिशनच्या कार्याला आतां राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें आहे व ह्याचें व्यवस्थित कार्य सर्व हिंदुस्थानभर चालू झालें आहे. जनरल सेक्रेटरी रा शिंदे ह्यांनी राष्ट्रीय सभेच्या कलकत्ता येथील अधिवेशनाचे अध्यक्ष डॉ बेझंटबाई याना निकडीचें पत्र पाठवून त्यांच्या मान्यतेचा ठराव पास झाल्यावर पुढें नागपूरच्या सभेंत महात्माजींनीं अस्पृश्याचा प्रश्न नॉन कोऑपरेशनच्या मुख्य ठरावात ठेवून दिला. त्यावेळीं सबजेक्टस कमेटींत रा. शिंदे होते त्यांनीं अस्पृश्योद्धाराचा प्रश्न नॉन कोऑपरेशनच्या चळवळीपासून काँग्रेसमध्येंच पण स्वतंत्र ठेवण्याचा प्रयत्न केला. पुढें गोद्रेज नावाच्या उदार पार्शी गृहस्थानें दीड लाख रुपयाची देणगी अस्पृश्यता निवारणाच्या खास कामाकरता कॉंग्रेसला दिली. तिच्या मदतीनें ठिकठिकाणच्या प्रांतिक व जिल्ह्याच्या कमिटींच्या द्वारा प्रयत्न चालू आहेत. विशेषत. चरकें चालविणें व ह्या लोकाचा पाठिंबा राष्ट्रीय सभेस मिळविणें ह्या शिवाय अस्पृश्यता निवारणाच्या प्रत्यक्ष कामाला काय मदत होत आहे हें कळत नाहीं.

का मा ची दि शा —येथवर डिप्रेस्डक्लास मिशनच्या स्थापनेच्या पूर्वींच्या चळवळी आणि डि सी. मिशनची प्रत्यक्ष स्थापना ह्या संबंधीं माहिती सांगितली. पूर्वींच्या कामची मुख्य दिशा शिक्षणाचा प्रसार करून तद्वारां ह्या वर्गाची उन्नति करण्याची सोय येवढीच होती. पण ह्या मिशनची दिशा अथवा उद्देश मुख्यतः अस्पृश्यतेचें निवारण हेंच असून त्याप्रीत्यर्थ ह्या वर्गांत शिक्षणाचा प्रसार, स्वाभाविक आणि वैयक्तिक सुधारणा उदार हिंदु धर्मतत्त्वाचा प्रचार, औद्योगिक उन्नति, राजकीय हक्कांची योग्य जाणीव इत्यादि वेळोवेळीं सुचतील ते सर्व उपाय करून पाहाण्याचा आहे. येणेंप्रमाणें मिशनचा पाया खोल आणि पद्धतशीर घातला गेल्यानें आणि त्याच्या प्रत्यक्ष कार्याचा प्रसार सर्व देशभर संस्थाच्या रूपानें विस्तार झाल्यानें त्याला लवकरच सरकार, परोपकारी मंडळ्या आणि शेवटीं राष्ट्रीय सभेचीहि मान्यता आणि सहकार्य मिळूं लागलें इतकेंच नव्हे तर जुन्या व नव्या विचाराच्या सर्वच लहनथोराची अस्पृश्यतानिवारण हें एक राष्ट्राचें आणि स्वराज्यसंपादण्याचें आद्य व आवश्यक कर्तव्य आहे अशी जाणीव होऊं लागली. ह्या स्थूल दृष्टीनें मिशनच्या कार्याला यश आलें असें म्हणता येईल पण तपशिलात अद्यापि यश येण्याला बरेंच झगडावें लागेल शाळातून, पाणवठ्यावर, हिंदूंच्या देवळातून ह्या निराधार लोकाना मोकळी वाट मिळण्यासाठीं कॉंग्रेस, कौन्सिलें, म्युनिसिपालिट्या, हिंदुसमाज, धर्मपरिषदा आणि एतद्देशीय संस्थानें ह्यानी हल्लीं पेक्षा जास्त आणि कळकळीचे प्रयत्न करावयाला पाहिजे आहेत

मि श न चा वि का स—वरील प्रयत्न व्हावेत म्हणून मिशननेंहि आपल्या कार्याचा प्रसार आणि पद्धति वेळोवेळीं कालानुसार बदललेली आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. इ. स १९१२ सालच्या आक्टोबर महिन्याच्या ता ५ ते ७ रोजीं पुणें येथें सर डॉ. भांडारकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं ह्या मिशननें जी पहिली मोठी अस्पृश्यता निवारण परिषद भरविली तिच्यात मोठमोठे प्रांतिक पुढारीच नव्हते तर डॉ कुर्तकोटीसारखे जुन्या विचाराचे गृहस्थ आणि इचलकरंजी संस्थानाधिपतींसारखे ब्राह्मण रजवाडे ह्यांनींहि सहानुभूतीनें भाग घेतला; सर्व जातींच्या धर्माच्या लोकानीं फंडास मदत केली आणि तरुणानीं तीन दिवस जिवापाड स्वयंसेवा केली. महार, मांग, चांभार, ढोर, भंगी, ब्राम्हण, मद्रासी, ब्राम्हो. ख्रिस्ती, मुसलमान अशा १० समाजाचे मुंबई इलाख्यातून बाहेरच्याहि निरनिराळ्या १७ जिल्ह्यातील ५४ गावातून ३३० डेलिगेट्स् अथवा प्रतिनिधींनी परिषदेंत भाग घेतला. जें मुख्य सहभोजन झालें त्यात सुमारें ३५० ' अस्पृश्य " वर्गाचे आणि ५० निरनिराळे ब्राह्मणादि ' वरिष्ठ " वर्गाचे पाहुणे एकाच पंक्तीस होते. जनरल सेक्रेटरी रा शिंदे ह्यानीं आपल्या मुख्य भाषणात तेव्हां मिशनच्या प्रत्यक्ष देखरेखी खालीं असलेल्या संस्थाचा गोषवारा सांगितला तो परिषदेच्या रिपोर्टांत असा नमूद केला आहेः—मुंबई, महाराष्ट्र, कर्नाटक, गुजराथ, खानदेश, कोंकण, कानडा, मद्रास वगैरे भागातील—" एकंदर १४ ठिकाणीं २३ शाळा, ५५ शिक्षक, २१०० मुलें, ५ वसतिगृहें, इतर १२ संस्था आणि ५ आजन्म वाहून घेतलेले प्रचारक असुन एकंदर वार्षिक खर्च २४४८५ रुपये आहे " ह्याशिवाय बंगाल्यात ब्राह्मसमाजानें चालविलेल्या संस्थाशीं अप्रत्यक्ष संबंध होता तो निराळाच.

ह्यानंतर सुमारें ६ वर्षांनीं म्हणजे ता. २३-२४ मार्च १९१८ रोजीं मुंबई येथें श्री सर सयाजी महाराज गाय-

फवाड यांच्या अध्यक्षत्वाखालीं मिशनची दुसरी म्हणजे *अखिल भारतीय अस्पृश्यतानिवारण परिषद भरली.* त्यावेळीं लो. टिळक, मिसेस बेझंट, महात्मा गांधी, सर *नारायण चंदावरकर, नामदार परांजपे वगैरे मंडळींनीं भाग* घेतला होता. प्रेक्षकसमूह तर रोज सायंकाळ ५ पासून ७ हजारापर्यंत लोटत होता. *मुख्य काम, अस्पृश्यता* प्रत्यक्ष जातीनें मोडूं असा व्यक्तिविषयक प्रतिज्ञेचा एक *राष्ट्रीय जाहीरनामा* काढून त्यावर निरनिराळ्या गांवातील व हिंदु जातींतील ३८० प्रमुख पुढाऱ्यांच्या दस्तुर-खुद्दच्या सह्या मिळविण्यात येऊन जाहीरनामा प्रसिद्ध कर-ण्यांत आला. पण खेदाची गोष्ट ही कीं लो. टिळकांनीं आपल्या कांहीं अनुयायांच्या भिडेला पडून आपली सही देण्याचें नाकारिलें. तथापि ह्या परिषदेंत स्वतः लोक-मान्यांनीं जो ठराव मांडला कीं, राष्ट्रीय सभेनेंच हा प्रश्न आपल्या हातीं घ्यावा त्यामुळें थोडा तरी परिणाम झाला. आणि त्याच वर्षी कलकत्त्यास काँग्रेस भरली असतां मिसेस बेझंट ह्या अध्यक्ष असल्यामुळें रा. शिंदे यांच्या आग्रहा-वरून त्यांना अस्पृश्यता निवारणाचा ठराव काँग्रेसच्या कार्य-क्रमांत घेऊन पास करतां आला. १९२० सालीं नागपूरच्या काँग्रेसमध्यें महात्मागांधींनीं ह्या विषयास सर्वमान्यता देण्याचें श्रेय घेतलें.

अ स्पृ श्य व र्गां तील जा णी व.—ह्याप्रमाणें मिशनच्या परिषदांचा परिणाम घडला तरी प्रत्यक्ष ह्या वर्गांतच जाणीव झाल्याशिवाय कार्यभाग होणार नाहीं। अशी रा. शिंदे यांची खात्री होती. म्हणून राष्ट्रीय सभेचें लक्ष्य अस्पृश्य-वर्गांकडे ओढण्याची अधिक जोराची चळवळ केली ती विशेष ध्यानात घेण्यासारखी आहे. पण ह्या प्रयत्नात रा. शिंदे ह्यांना मुळींच यश न मिळतां उलट अस्पृश्यवर्गांचा जोराचा विरोध सहन करावा लागला. तथापि त्यामुळें अस्पृश्य वर्गांच्या पुढाऱ्यांत कांहीं अंशीं एक प्रकारची जागृति झाली हा एक फायदाच समजावयाचा.

रा ज की य च ळ व ळ.—लखनौच्या काँग्रेसमध्यें हिंदी राज्यसुधारणेची उर्फ स्वराज्यसंपादनाची चळवळ प्रथम हिंदी—मोस्लेम—स्कीम पास होऊन सुरू झाली. तिला हिंदुस्थानांतहि सर्व जातींचा पाठिंबा पाहिजे होता. ह्या योजनेला सर्व ब्राह्मणेतरांचा विशेषतः अस्पृश्य वर्गांचा पाठिंबा मिळवून देण्यासाठीं रा. शिंदे यांनीं जिवापाड मेहनत केली. सन १९१७ च्या नवंबर महिन्यांत पुणें येथें रा. शिंद्यांनी जो मराठा राष्ट्रीय संघ म्हणून स्थापिला त्याचा उद्देश केवळ मराठ्यांतच राष्ट्रीयनिष्ठा उत्पन्न करण्याचा नसून अस्पृश्यादि सर्वच माग-सलेल्या जातींमध्यें स्वराज्याची नवीन उत्कंठा पसरविण्याचा जास्त होता म्हणून गुरुवार तारीख ८ नवंबर १९१७ रोजीं सायंकाळीं रा. शिंदे यांच्या अध्यक्षतेखालीं पुणें येथें शनिवार वाड्यासमोर सी ८००० पुणेकर निरनिराळ्या जातींच्या लोकांची प्रचंड जाहीर सभा भरली होती, तिच्यांत अस्पृश्यवर्गांच्याहि महार, मांग, चांभार, वगैरे जातींच्या दोन दोन प्रतिनिधींनीं लखनौ हिंदी-मॉस्लेमस्कीमला इतरांबरोबर पाठिंबा दिला होता, इतकेंच नव्हे तर त्याच दिवशीं मुंब-ईसहि एक जंगी जाहीर सभा खास अस्पृश्यवर्गांची सर नारा-यणराव चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखालीं रा. शिंदे यांच्या प्रयत्नानें भरण्यात आली. स्वराज्याप्रीत्यर्थ ठराव पास कर-ण्यात आले. पण कदाचित ही चळवळ सरकारास आवड-णारी नसल्यामुळें म्हणा किंवा त्याचवेळीं ब्राह्मण ब्राम्हणेतर ही चळवळ दुसऱ्या बाजूनें सुरू झाल्यामुळें म्हणा पुढील पांच वर्षांत अस्पृश्य वर्गांतील कांहीं पुढाऱ्यांचा प्रत्यक्ष अप्रत्यक्ष विरोध रा. शिंदे यांना सहन करावा लागला; सर्व ब्राम्हणेतर समाजांत अप्रिय व्हावें लागलें. तरी त्यांनीं आपली चिकाटी सोडली नाहीं.

मॉं टे ग्यू चे म्स फ र्ड सु धा र णा.—पुढें लवकरच हिंदी राज्यसुधारणेचा पहिला हप्ता काय द्यावा हें ठरविण्यासाठीं साउथबरो कमिटी हिंदुस्थानांत आली. तिच्या पुढें रा. शिंदे यांची महत्त्वाची साक्ष झाली. तिच्यांत त्यांनीं मुंबई इला-ख्याच्या कायदेकौन्सिलांत अस्पृश्यासाठीं त्यांच्या संख्येच्या मानानें नऊ जागा मागितल्या. तरी शेवटीं एकच मिळाली म्हणून त्यांची निराशा झाली इतराकरितां जातवार प्रतिनि-धींच्या तत्त्वाच्या जरी ते उलट होते तरी अस्पृश्यासाठीं निराळे मतदार संघ घडवून देणें अशक्य नसून त्या कामीं मदत करण्याचेंहि त्यांनीं वरील कमिटीस सांगितलें होतें. त्यावेळीं सरकारनें पत्करलेल्या धोरणाउलट त्यांनीं जोराची टीका केली. मध्यप्रांतांत दोनच जागा आणि मद्रासेंत ह्या वर्गांची प्रचंड संख्या असूनहि पांचच जागा सरकारनें दिल्या म्हणून रा. शिंदे यांनीं बेंगलूर येथील आपल्या जाहीर भाषणांतहि नापसंति दर्शविली.

मि श न म ध्यें अ स्पृ श्यां ची भ र ती.—येणेंप्रमाणें काँग्रेसकडून नाउमेदीचा आणि सरकारकडून जवळजवळ निराशेचा अनुभव येऊं लागल्यामुळें प्रत्यक्ष आपल्या मिश-मध्यें तरी अस्पृश्यांनीं अधिक जोराचा भाग घ्यावा असा रा. शिंद्यांनीं प्रयत्न चालविला. अस्पृश्यांचीं कामें सरकारा-कडून करून घेण्यासाठीं १९२० त स्वतः कौन्सिलांत जाण्याचाहि त्यांनीं प्रयत्न केला. *पण एकीकडे काँग्रेसच्या* असहकार्याचा प्रयत्न तर दुसरीकडून स्वतः अस्पृश्यांचाच *विरोध ह्या कात्रींत राजकीय चळवळींत त्यांना म्हणण्या-*सारखें यश आलें नाहीं. तरी सामाजिक बाबतींत मिशनच्या परिषदांमुळें जें यश आलें तें वर सांगितलें आहे. महायु-द्धाच्या कटकटीचा काल, राजकारणाची गुंतागुंती, भयंकर *महागाई, मिशनच्या स्थानिक शाखांचीं सर्व कामें कर्ज होऊं* न देतां जोमांत ठेवणें वगैरे कामांस वाहून घेऊन काम करणाऱ्या माणसांचा तुटवडा इत्यादि अनेक अडचणी येऊं लागल्या. मदतीपेक्षां मिशन

वर टाकिचाच भडिमार जास्त होऊं लागला. अशा परिस्थितींत पुणें येथील इमारती उभारण्याचें काम उरकावें लागलें १९२१ साली सप्टेंबरच्या ५ व्या तारखेस पुणें भोकरवाडी येथील मुख्य शाळागृहाची कोनशिला म्हैसूरचे युवराज एच्. एच. सर कांतिराव नरसिंहराज वडियार बहादूर ह्यांच्या हस्तें बसविण्यात आली. त्यावेळीं अस्पृश्य वर्गातील पुढाऱ्यांनीं मिशनच्या कारभारात अधिकाधिक भाग घ्यावा अशी रा. शिंद्यांनीं विनंती केली त्या पूर्वीहि मिशनच्या कांहीं शाखांचा कारभार " अस्पृश्य " वर्गाच्या माणसाकडून चालविण्याचा उपक्रम चालू होता. पुढें ठिकठिकाणच्या स्थानिक कमिट्यांतून " अस्पृश्यांचे " लायक सभासद घेण्यात आले. १९२३ सालच्या मार्च अखेरीस रा. शिंद्यांनीं 'ज्ञानप्रकाश' ( ता. २९-३-२३ ) आणि 'केसरीतून' ( ता. ३ एप्रील १९२३ ) आपलें स्पष्ट मत आणि सविस्तर निवेदन जाहीर केलें. त्यात अत:पर सर्वस्वी जबाबदारी 'अस्पृश्य' वर्गानीं आपल्यावरच घ्यावी आणि आपण स्वतः केवळ सामान्य देखरेखीपलीकडे अतर्व्यवस्थेची जबाबदारी आपल्याकडे ठेवणार नाहीं असें म्हटलें आहे.

एतद्देशीय संस्थानिकांची सहानुभूति, म्हैसूर.— डी. सी. मिशन निघण्यापूर्वीपासूनच बडोद्याच्या श्रीमंत गायकवाड महाराजांनी पुढाकार घेऊन ह्या बाबतींत कसें स्तुत्य उदाहरण घालून दिलें हें वर सांगितलें आहे इ. स. १९१२ चे सुमारास:—इंदूरचे सर सवाई तुकोजी महाराज होळकर ह्यांनीं रा. शिंदे ह्यांना मुद्दाम बोलावून नेऊन त्यांनीं केलेल्या पुणें येथील इमारतींच्या योजनेप्रीत्यर्थ वीस हजार २०००० रुपयांची उदार देणगी दिली. संस्थानांतूनहि अस्पृश्य वर्गाच्या शिक्षणासाठीं मदत व इतरहि सवलती बऱ्याच देण्यात येत आहेत. विशेषतः म्हैसूरच्या मुख्य विद्याधिकाऱ्याच्या जागीं मिस्टर रामलिंग रेड्डि हे प्रागतिक, आणि हुषार गृहस्थ असताना ह्या प्रश्नाची बरीच प्रगति झाली. अस्पृश्य वर्गाच्या दोन परिषदा झाल्या. संस्थानाच्या शाळांतून इतर 'स्पृश्य' वर्गाच्या मुलांबरोबरच 'अस्पृश्य' मुलांना बसविण्यात यावें असे कडक हुकूम सुटले. ह्या सुधारणेस श्री शंकराचार्यांकडून विरोध होऊं लागला तरी धोरणात माघार घेण्यात आली नाहीं. म्हैसूर येथें "अस्पृश्यां' साठीं सुमारें ५० विद्यार्थ्यांचें नमुनेदार फुकट वसतिगृह आहे. तेथें उत्तम प्रकारचें औद्योगिक उच्च शिक्षण दिलें जातें. याशिवाय दुय्यम व उच्च शिक्षणासाठीं स्कॉलरशिप्सची चांगली योजना आहे. इतर सुधारणाकरता खटपट " सिव्हिल अँड सोशल प्रोग्रेस असो०" च्या साहाय्यानें चालविण्यांत आली आहे. तिचे अध्यक्ष स्वतः महाराजांचे बंधु हिज हायनेस युवराज सर कांतिराव नरसिंहराज वाडियार बहादूर हे आहेत. शिवाय लोकांनीं आपल्याच बळावर हिंदु डिप्रेस्ड क्लासेस मिशन नांवाची एक निराळी संस्था काढली आहे. तिच्या कित्येक वाड्मय व औद्योगिक शाळा रा. शिंदे यांनीं चांगल्या स्थितींत पाहिल्या. तूर्त याच मंडळीकडे त्यांनीं आपल्या भारतीय नि. सा. मंडळीची बंगळूर येथील शाखा सोंपवून दिली आहे.

त्रावणकोर.—शिक्षणसंबंधीं या संस्थानची फार प्रसिद्धि आहे. पण अस्पृश्यांच्या बाबतींत सबंध मलबार अथवा केरळ देशात फार शोचनीय स्थिति आहे. तथापि कित्येक सार्वजनिक रस्त्यानें फिरण्याची देखील मोकळीक पुलया, चिरुमा, परय्या, नायाडी वगैरे " अस्पृश्य " जातींना नाहीं. पुष्कळ वेळा मुख्य रस्त्यात फिरल्याबद्दल या गरीब जातींना वरिष्ठ हिंदूंकडून मार बसल्याची व कोर्टात खटले झाल्याबद्दलची रा. शिंद्यांनीं स्वतःची ब्रिटिश हद्दींतील मॅजिस्ट्रेटकडून खात्री करून घेतली आहे. आपल्या भारतीय मिशनकडून रा. शिंदे हे दरवर्षी पत्रे पाठवून मोठमोठ्या सस्थानिकाकडून माहिती मागवीत असत. त्याचा परिणाम त्या त्या संस्थानातील शिक्षण खात्यावर १९१४ सालापासून होऊं लागला आहे असें दिसतें. पुढील तीन सालीं त्रावणकोर येथील प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांची खालीलप्रमाणें वाढ झाल्याचें त्या संस्थानच्या रिपोर्टांत नमूद आहे.

| अस्पृश्यवर्गाचें नाव | विद्यार्थ्यांची संख्या सालवार | | | दरवर्षी झालेली वाढ सालवार | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | १९१४ | १९१५ | १९१६ | १९१४ | १९१५ | १९१६ |
| पुलया | २०१७ | ४२५६ | ८४९४ | ८२६ | २२३९ | ४२३८ |
| परया | ० | १८१६ | २६५२ | ० | ७१९ | ८३६ |

तथापि रस्त्यातून फिरण्याच्या हरकतींमुळें वरचेवर दंगे व मारामाऱ्या अलीकडे देखील ऐकिवात येत आहेत. विशेष चमत्कारीक गोष्ट शिक्षणखात्याच्या रिपोर्टावरून दिसते ती अशी कीं, ब्रिटिश राज्यांत ज्याप्रमाणें "अस्पृश्यां" साठीं आणि युरोपीयनासाठीं शिक्षण खात्यामार्फत खास संस्था चालविण्यात येत असलेल्या या खात्याच्या रिपोर्टांतून नमूद झाल्याचे उल्लेख आढळतात व त्याप्रमाणें त्रावणकोर शिक्षणखात्याच्या रिपोर्टांत मलबार ब्राह्मणाकरिता एक खास शिक्षणखातें असल्याचें आढळतें. पण जी प्रगति अस्पृश्यांच्या शिक्षणात वर दाखविल्याप्रमाणें नमूद झालेली दिसते तसा ब्राह्मणासंबंधीं उल्लेख नसून उलट तें खातें नीट न चालल्यामुळें शिक्षणखात्याला १९१६ सालीं मलयाळी ब्राह्मणाची एक खास परिषद भरवावी लागली. आणि पुष्कळशा सवलती एक खास अधिकारी नेमून घाव्या लागल्या इत्यादि उल्लेख त्या वर्षाच्या रिपोर्टाचें पान ५१ वर आढळतो! हें एक गूढच आहे म्हणावयाचें.

निजाम हैदराबाद.—ह्या संस्थानच्या शिक्षण खात्याच्या रिपोर्टांत " अस्पृश्य " ह्या नावाचा उल्लेखच कोठें आढळत नाहीं. पण सन १९११ सालच्या रिपोर्टांत ( पा. १४२ ) वर जी जातवारी दिली आहे त्यांत चक्लन, चामार, मादिग, महार, माल, व मांग, ह्या सहा 'अस्पृश्य' मानलेल्या जातींचा उल्लेख असून त्यांची एकंदर लोकसंख्या

४७११८५ इतकी दिली आहे संस्थान मुसलमानी असल्यानें कदाचित् दरबाराकडून " अस्पृश्यता " मानली जात नसेल तरी कांहीं खात्री सांगवत नाहीं " अस्पृश्य " वर्गांतील जे लोक आपली आर्य किंवा ब्राह्मसमाजात गणना करून घेतात त्यांना लष्करी व मुल्की खात्यात नोकऱ्या मिळण्यास फारशी अडचण पडत नाहीं हें खरें सन १९१५ सालच्या सुमारास रा शिंदे ह्यांनी हैदराबादच्या ब्राह्म समाजास भेट दिली व अस्पृश्यता निवारणासबंधीं त्या शहरांत जाहीर व्याख्यानें दिली - त्यावेळीं तेथील ब्राह्मसमाजांत बहुतेक मूळच्या तलगू 'अस्पृश्य' वर्गाचाच भरणा त्यांना दिसला व त्याचा सामाजिक दर्जा व सांपत्तिक स्थिति बरीचें समाधानकारक दिसली सन १९११ सालच्या रिपोर्टांत जरी अशा ब्राह्म सभासदाची संख्या ३६ च दिली आहे तरी रा शिंदे यांनी आपल्या भेटीच्या वेळीं पुष्कळच जास्त ब्राह्म आणि इतर उच्च दर्जाला पोंचलेल्या लोकांना प्रत्यक्ष पाहिलें

,.को ल्हा पू र.—वरील संस्थानच्या मानानें हें संस्थान जरी विस्तारानें लहान आहे तरी हिंदुपदपादशाही स्थापन करणारे आद्य छत्रपति श्री शिवाजी महाराजाच्या अस्सल क्षत्रिय वंशात जन्मलेले कै श्री शाहू छत्रपति हे सर्व मराठ्यांचे मुख्य पुढारी होते म्हणुन सहानुभूतीचा व प्रत्यक्ष कृतीनें केलेल्या पुरस्काराचा परिणाम महाराष्ट्रभर व विशेषत मराठा जातीवर फार इष्ट घडला तरुणपणीं महाराज जुन्याच विचाराने होते, पण रा शिंद्याचा व त्यांचा बऱ्याच दिवसांचा परिचय असल्यामुळें ह्या विचाराचा जुनेपणा फार दिवस टिकणें शक्य नव्हतें. सन १९०७ सालींच डी. सी मिशनची एक शाखा मिस क्लार्क विद्यार्थी वसतिगृहाच्या रूपानें कोल्हापुरास स्थापन झाली , पुढें महाराजाचा सहानुभूति ह्या मिशनकडे झपाट्यानें वाढत चालली महायुद्धात विलायतेस जाऊन आल्यावर तर त्यांनीं ह्याच विषयाचा ध्यास घेतला. नागपूर, येथील , अखिलभारतीय " अस्पृश्य " परिषदेचे ते अध्यक्ष होते त दिल्ली येथील ह्या परिषदेच्या आधिवेशनात मुद्दाम हजर होते त्यांच्या राज्यातच नव्हे तर त्यांच्या राजवाड्यात अस्पृश्यांना सर्वत्र मुक्तद्वार असे रोजरोस ते ह्याना पक्तीस घेऊन जेवीत सर्व प्रकारच्या सरकारी नोकऱ्यावर व सार्वजनिक स्थळीं अस्पृश्याना मज्जाव न करण्याचें स्वदस्तुरचें फर्मान त्यांनीं स्वत शिंद्यांना मोठ्या अभिमानानें दाखविलें शेवटीं खालील पत्र पाठवून त्यांना कोल्हापुरास बोलाविलें होतें

शिरोळ कँप, तारीख १७-७-२१ ई

रा रा विठ्ठल रामजी शिंदे यासी —

मी कोल्हापुरास असताना आपण एकदां येऊन जावें हल्ली कोल्हापूर म्युनिसिपालिटीचे चेअरमन हे अस्पृश्य जातीचे असून, म्युनिसिपालिटींत एक व्हेटकर नांवाचा क्लार्क तीस रुपये पगारावर अस्पृश्य जातींतील आहे कम्युनल रिप्रेझेंटेशन अस्पृश्यांना व ब्राह्मणेतरांना दिल्यानें ह्या त्यांना चान्स मिळाला आहे सॅनिटेशनच्या पॉइंटवर आजवर ब्राह्मणांकडून अस्पृश्य मानलेल्यांना जो त्रास होत असे तोहि आता नाहीसा झाला आहे तेव्हा ही सर्व परिस्थिति आपण यऊन अवलोकन करून जाल अशी आशा आहे कळावें लोभाची वृद्धि व्हावी ही विनंति ( सही दस्तुर खुद्द शाहू छत्रपति )

स्वत च्या राज्यात छत्रपति शाहू महाराजांनी ५० अस्पृश्य विद्यार्थ्यांचें फुकट वसति आणि भोजनगृह काढलें होतें व केव्हा केव्हा ते स्वत च शिकवीत, असें त्यांनी रा शिंद्यास सांगितलें काहीं ' अस्पृश्य '' सुशिक्षित तरुणांस वकिलाच्या सनदा मिळाल्या होत्या हत्तीवरील मुख्य माहुताचा मान महाराला दिला होता आपल्या राजवाड्यातील खास विहिरींतील पाणी भरण्याची परवानगीहि मागांना दिली होती ह्याप्रकारें शिक्षणविषयक, सामाजिक व राजकीय इत्यादि सर्व सवलती महाराजानीं सढळ हातानें दिल्या होत्या त्यामुळें त्यांच्या संस्थानांत अस्पृश्यतेला धराच आळा बसला आहे.

उ प सं हा र. —येणेंप्रमाणें गेल्या ७० वर्षांत हिंदुस्थानांतील अस्पृश्यतेच्या निवारणार्थ खास हिंदु लोकांकडून कोणते व कसे प्रयत्न झाले ह्यांचा संक्षिप्त गोषवारा देण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या शिवाय परधर्मीय मंडळांनीं व ब्रिटिश सरकारांनी जे स्तुत्य प्रयत्न केले आहेत त्याचें विस्तारभयास्तव वर्णन करता आलें नाहीं किंबहुना तो प्रस्तुत विषयच नसल्यामुळें आम्हास येथें अधिक विस्तार करता येत नाहीं

परधर्मीय प्रयत्नांची दिशा ह्या वर्गास आपल्या कळपात ओढण्याची असणार हें सहाजिकच आहे पण त्या प्रवृत्तीचा जेथें जेथें अतिरेक झाला तेथें तेथें त्याची प्रतिक्रिया बारीक निरखून पहाणारास दिसण्यासारखी आहे ब्रिटिश सरकाराकडून जे प्रयत्न झाले ते मात्र अधिक निरपेक्ष बुद्धीनें झालेले दिसतात तरी पण सरकारच्या अगाध साधनसमुच्चयाच्या अपेक्षेनें पाहता त्याचे प्रयत्न अतिशय कमी आहेत इतकेंच नव्हे तर आळशी साधे सरकारानीं बरेंच वेळा दवडला आहे उदाहरणार्थ

मोठ्यांत मोठ्या यूरोपीयन अधिकाऱ्याच्या कळकळीच्या शिफारशीनें गेला असतांहि ती जागा मिळाली नाहीं; यांत जरी कांहीं आश्चर्य नसलें तरी उलट कौन्सिलातील प्रश्नास ह्या लोकांकडून धर्मच येत नसतात अशा अर्थाचीं जीं उत्तरें मिळतात तींच मात्र आश्चर्यकारक आहेत. सरकारची अशी हृदयंगम करणारी एक बाजू तर दुसरी बाजू जी आज इतक्या उशीरा जागी झाली, तीहि लवकरच हा प्रश्न उशाला ठेवून झोपी जाईल अशीं चिन्हें दिसत आहेत. म्युनिसिपालिट्या पैकीं पुढारी अशी जी पुण्याची म्युनिसिपालिटी तिनें नुकतेंच तिला सार्वजनिक पाटबळ असूनहि " अस्पृश्यास " मोकळें करण्याचें साफ नाकारिलें. त्यात अशिक्षित व हजारों वर्षें चिरडलेले हे जे वर्ग त्याची अशी पुनःपुनः सर्वांकडून निराशा आणि हिरमोड झाल्यामुळें त्यांचा तोल रासला जाणें दिवसेंदिवस अशक्य होऊं लागलें आहे. हिंदु धर्मावरील त्यांची निष्ठा जरी अढळ आहे तरी हिंदी राष्ट्राच्या राजकीय महत्त्वाकांक्षांच्या उलट त्याची कमान साहजिकच स्वेपानें चढत चालली आहे. हें महात्मा गांधीसारख्या मोहोरक्याच्या लक्षांत आलें तरी त्यांच्या अनुयायांच्या लक्षांत येत नाहीं, त्यांत सर्व राष्ट्राला भयंकर धोका पोंचत आहे हें खास।

मोठमोठ्या शहरांतून अस्पृश्यता पुष्कळ कमी झाली आहे यांत शंका नाहीं, तरी पण खेड्यापाड्यांतून विशेषतः रेल्वेपासून लांब प्रदेशांत तिचें रामराज्य अद्यापि चालू आहे. दक्षिण देशांत विशेषतः नैर्ऋत्य किनाऱ्यावर आणि सर्व मलबारांत ती अमानुष रीतीनें पाळण्यांत येत आहे. स्वतंत्र जमीनी वाहणें किंवा इतर धंदे करणें यास किंबहुना सार्वजनिक रस्त्यानें बिनधोक फिरण्याचीहि सक्त मनाई आहे. फार तर काय, एक सर्मंग्रस श्रीमंत जमीनदार रा शिंपापुडें आपल्या मालकीच्या जमीनीवरच्या शेंकडों पिढीजाद गुलाम मुलांना केवळ घोड्याबैलाप्रमाणें दुसऱ्याकडे कामाला लावून त्यांचें वेतन तो बिनदिक्कत आपण हक्कानें घेत होता। जमीनीबरोबर पुष्कळहि जणूं विकली जातात. जुलुमाला कंटाळून कोणी मजूर नव्या मालकाकडून जुन्याकडे पळून गेल्यास नव्याची जुन्या मालकाविरुद्ध फिर्याद कायदे-शीर कोर्टांत चालू शकतें मग गुलामगिरी याहून निराळी ती कोणती.

अंत्यज अथवा पंचम वर्गाच्या कांहीं मुख्य जातींची सर्व हिंदुस्थानांतील एकूण संख्या पुढीलप्रमाणेः—

( शिरगणती साल १९०१— )

| जात | वसतिस्थान | एकूण संख्या. |
| --- | --- | --- |
| चांभार | बहुतेक भाग | १,११,३७,३६२ |
| मोची | " " | १०,०७,८१२ |
| डोंब | बंगाल, आसाम, पंजाब. | ९,७७,०२६ |
| भंगी | मुंबई, संयुक्तप्रांत, राजपुताना. | ९,५६,५८६ |
| धानूक | बगालें पंजाब, ( बडोदे सं. ) | ८,७०,५५७ |
| बागदी | बंगाल, , आसाम | १०,४२,५५० |
| बळई | माळवा, मध्यप्रांत | ५,८४,३३४ |
| चूरा | उत्तर हिंदुस्थान | १३,२९,४१८ |
| नामशूद्र चंडाल | उत्तर हिंदुस्थान, बंगाल | २०,३१,७२५ |
| राजवंशी | " | २४,०८,६५४ |
| महार | मुंबई, वऱ्हाड, मध्यप्रांत | २९,२८,६६६ |
| मांग | " | ५ ७९,३०६ |
| व्हलिया ( महार ) | कर्नाटक मद्रास | ७,७०,८९९ |
| मादिग मांग | " | १२,८१,२५२ |
| पारिया | मद्रास, म्हैसूर | २२,५८,६११ |
| चिक्किया | " | ४,७८,४९६ |
| माल | मद्रास, बंगाल | १८,६३ १०८ |
| इतर सर्व | सर्व भागांतील | २,०१,९९,४७० |
| एकूण | | ५,३२,०६,६३२ |

हिंदुस्थानच्या एकंदर लोकसंख्येशीं अस्पृश्यांचें प्रमाण समजण्यास पुढील आंकड्यांचा उपयोग होईल

| | |
| --- | --- |
| हिंदुस्थानांतील एकंदर लोकसंख्या | २९,४३,६१,०५६ |
| एकूण हिंदु लोकसंख्या … … … | २०,७१,४७,०२६ |
| एकूण अंत्यज लोकसंख्या … … … | ५,३२,०६,६३२ |
| एकूण मुसुलमान लोकसंख्या … … … | ६,२४,५८,०७७ |
| पैकीं हीन मुसुलमान लोकसंख्या… … … | ८९,२८,५६६ |

वरील आंकडे सन १९०१ च्या ईंपीरियल सेन्सस रिपोर्टांतून घेतले होते. त्या नंतरच्या दोन खानेसुमारीच्या रिपोर्टांतून प्रांतवार अस्पृश्यांची गणति दाखविण्याची पद्धत बदलल्यामुळें तुलना करणें कठिण पडलें. तरी एकूण संख्येंत म्हणण्यासारखा फरक पडेल असें वाटत नाहीं. वर मुख्य १८ अस्पृश्य वर्गांचींच नांवें दिली आहेत. त्याशिवाय निरनिराळ्या प्रांतांत खालील व इतर बरींच नांवें आढळ-तात. १९ पुलया, २० चिरमा, २१ नायाडी, २२ ढोर, २३ पल्ल, २४ हारी, २५ कोरी, २६ रहार, २७ सरेरा, २८ मेघवाल, २९ मेघ, ३० घेड, ३१ गंड, इ. इ.

गुन्हेगार जाती—मांग, रामोशी, मांग गारुडी, बेरड वगैरे कित्येक "अस्पृश्य" किंवा "अस्पृश्यवत्" मानलेल्या जातींची गणना सरकारदृष्ट्या गुन्हेगार जातींत होत आहे. ह्या बाबतींत डि सी मिशनच्या पुणें शाखेकडून १९१४ साली जे प्रयत्न झाले त्यांचा अहवाल मिशनच्या त्या वर्षाच्या ८ व्या वार्षिक रिपोर्टांत पान १७–२९ वर नमूद आहे. सातारा जिल्ह्यांत सुमारें एक हजार एकर पडिक जमीन मुंबई सरका-रांनीं देऊं केली होती रा. शिंदे आणि पुणें शाखेचे तेव्हांचे अध्यक्ष डॉ मॅन त्या दोघांनीं सातारा जिल्ह्यांत जमिनीचा एक चांगला भाग निवडून काढण्यासाठीं दौरा केला. रा. शिंद्यांनीं नर त्या उद्देशानें सातारा जिल्ह्यांतील बहुतेक ठिकाणांतून जवळजवळ १००० मैल प्रवास करून गुन्हेगार गणलेल्या मांग लोकांची स्थिति पाहिली व जमिनी तपासल्या.

शेवटीं २०००० रु. खर्चाची एक योजनाहि तयार केली होती. पण महायुद्धामुळें एकटी रक्कम जमा करणें झालें नाहीं व शेवटीं सर्वांनीहि युद्धांत कामगिरी केलेल्या लोकांनां देण्यात येऊं लागल्या म्हणूनहि या महत्त्वाच्या योजनेंत यश आलें नाहीं. पण सरकार मार्फत विजापूर, हुबळी, वगैरे ठिकाणीं गुन्हेगार जातींसाठीं खास वसाहती स्थापण्यांत येत आहेत व त्यामुळें ह्या जातींच्या गुन्हेगारीला आळा पडत चालला आहे. तथापि गुन्हेगारीच्या सबबीवरून अद्यापि कित्येक ठिकाणीं त्या जातींवर जो पोलीसकडून हजेरीचा त्रास लावण्यांत आला आहे त्यासंबंधीं मात्र तक्रारी मिशनकडे येत आहेत. त्यांचा विचार सरकाराकडून लवकर व्हावा पाहिजे [ ले वि. रा. शिंदे ].

वर सांगितलेल्या रा. शिंदे यांच्या चळवळीशिवाय महाराष्ट्रांतील दुसरी चळवळ म्हटली म्हणजे रा. श्रीपाद महादेव माटे यांची होय. यांचाहि प्रयत्न रा. शिंदे यांच्याप्रमाणेंच शैक्षणिक आहे. यांचा प्रयत्न विशेषेंकरून शिक्षकांमध्यें आहे आणि अस्पृश्यांनां समाजांत थोडें अधिक मोकळेपणें वावरूं द्यावें, यासाठीं लोकमत जागृत करण्याचा त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला आहे.

अस्पृश्यतेचा प्रश्न पूर्णपणें सुटण्यासाठीं जे प्रयत्न झाले पाहिजेत ते अनेकविध आहेत. अस्पृश्यांना राजकीय अशी अडचण कांहींच नाहीं. कायद्यानें त्यांची स्थिति इतरांपेक्षां कोणत्याहि तऱ्हेनें कमी नाहीं. त्यांच्या अडचणी सर्व सामाजिक आहेत. आज त्यांनां मतें मिळाली आहेत त्यामुळें त्यांनीं प्रयत्न केला असतां इतर अनेक जातींस त्यांच्याशीं तडजोड करावी लागेल. अस्पृश्यता म्हणजे ब्राह्मणापासून अतिशय दूरपणा. ब्राह्मणापासून मराठ्यास थोडा तरी दूरपणा आहेच आणि अस्पृश्यता नाहींशी झाली म्हणजे मराठे व महार यांची स्थिति जवळ जवळ सारखीच होईल. आणि यामुळें पुष्कळ ठिकाणीं व्यवहारामध्यें महारांच्या विरुद्ध जाणारा वर्ग ब्राह्मणांपेक्षां ब्राह्मणेतरच होईल असें वाटतें. आणि याचा अनुभव पुष्कळ ठिकाणीं आपणास येत आहे. महारांची मिरवणूक आपल्या रस्त्यावरून ब्राह्मणेतरांनीं जाऊं दिली नाहीं पण ब्राह्मणांनीं जाऊं दिली अशा तऱ्हेच्या गोष्टी आपणांस वारंवार दिसून येतात. पुष्कळ ठिकाणीं अस्पृश्यता चळवळीमध्यें पुढारी ब्राह्मण असल्यामुळें ही मराठ्यांना खाली पाडणारी चळवळ आहे अशा तऱ्हेचे आक्षेप येतात.

महारांमध्यें बरीच जागृति झाल्याचें कांहीं ठिकाणीं आढळून दिसून येतें. आणि त्यांपैकीं कित्येकांना "डिप्रेस्ड क्लास मिशन" ही कल्पनाच बरोबर वाटत नाहीं. त्यांना असें वाटतें कीं, अगोदर आम्हांस "डिप्रेस्ड क्लास" म्हणावयाचें आणि तुमच्या सुधारणेकरितां आम्ही परचे लोक येणें असा तोरा मिरवावयाचा, असा हा प्रयत्न आहे. महारांच्या प्रयत्नांत अगोदर ज्या ठिकाणीं जोर दिसून आला तें मध्यप्रांतांतील नागपूर विभागांतील मोहपें हें गांव होय. तेथें "काम करणारी" जी मंडळी आहे त्यांनीं आपणांस महार सुधारक मंडळी असें नांव धारण केलें आहे. मध्यप्रांतांतील महारांचे पुढारी म्हणजे रा. गवई, रा. मटकर व रा. फागु किसन पनसोडे हे होत. गवई यांनीं उमरावतीस बहिष्कृत भारत नांवाचें पत्र काढलें आहे. मुंबई इलाख्यांतील महारांचें "मूकनायक" नांवाचें पत्र प्रसिद्ध होत असे त्या पत्रासंबंधानें रा. घोलप व डॉ. आंबेडकर यामध्यें वाद उपस्थित होऊन तो वाद पुण्याच्या एका वर्तमान पत्रांतून दृग्गोचर होऊं लागला.

**अस्पृश्यवर्ग व राजकारण.**—अस्पृश्यवर्गांची राजकारणांत प्रवृत्ति बरीच विविध दृष्टीस पडते. रा. गवई यांनीं नागपुरास व रा. मलिक यांनीं बंगालांत व दुसऱ्या एका गृहस्थांनीं मद्रास इलाख्यांत देशी लोक जर महत्त्वाच्या जागांवर चढले तर अस्पृश्य वर्गाच्या हितास विरोध करतील अशी सरकारपुढें मांडणी केली आहे, व हिंदुस्थानच्या पूर्ण स्वायत्ततेस या दृष्टीनें विरोधहि केला आहे. परंतु ही प्रवृत्ति सार्वत्रिक कितपत आहे हें सांगता येत नाहीं. अस्पृश्य वर्गास आपल्या बाजूस वळवून घेण्याची खटपट सर्व प्रकारचे पक्ष करीत आहेत. नागपुरास अस्पृश्य वर्गाचे कांहीं पुढारी व राष्ट्रीय पुढारी यांत बराच सलोखा असलाचें दिसून येतें. अस्पृश्यांना आपल्या बाजूस ओढण्याची खटपट पुण्याचा प्रागतिक पक्ष व पुण्याचा ब्राह्मणेतर पक्ष हे दोन्ही करीत आहेत. आणि १९२३च्या डिसेंबर महिन्यात पुण्यास जी अस्पृश्यांची परिषद भरली तिला प्रागतिकांनीं सहानुभूति फारशी न दाखविल्यामुळें ती आयतीच ब्राह्मणेतरांच्या तावडींत सापडली, आणि त्यामुळें प्रागतिकांचा जो तडफडाट झाला तो ज्ञानप्रकाशाच्या ११ जानेवारी १९२४ च्या लेखांत व्यक्त होत आहे. सातारा जिल्ह्यामध्यें सत्य शोधक समाजाच्या चळवळीमुळें ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांमध्यें जी तेढ उत्पन्न झाली, त्यावेळेस ब्राह्मणांनीं महारास हातांशीं धरलें असें दिसून येत आहे. अस्पृश्य वर्गामध्यें निरनिराळ्या जातींत आपआपसांत चुरस आहेच आणि सरकारनें अस्पृश्यांच्या वतीनें कोणाची निवडणूक करावी या विषयी १९२३ सालीं ज्या खटपटी सुरू झाल्या त्यावेळेस अस्पृश्यांचे पुढारीपण महारांचच कां असावें अशा तऱ्हेचे प्रश्न उपस्थित झाले होते.

हें नांव वापरावें यासाठीं होत आहे; आणि कांहीं पत्रांनीं त्या प्रकारचें नांव वापरण्यास सुरवातहि केली आहे.

अस्पृश्यता व संस्कारिक चळवळ—धर्मशास्त्राच्या दृष्टीनें वर्ण चाराहून अधिक नसल्यामुळें शूद्र व अस्पृश्य यामध्यें फरक करितां येत नाहीं तथापि कुणबीमराठ्यांसारख्या वर्गास शूद्राचे संस्कार होत असल्यामुळें अस्पृश्यास त्यापेक्षां कांहीं हलक्या प्रकारचे संस्कार करावे अशी प्रवृत्ति होत आहे कांहीं ठिकाणीं महारांचें पौरोहित्य ब्राह्मण करीत नाहींत तर कांहीं ठिकाणीं करितात. आणि याचा परिणाम असा होतो कीं कांहीं ठिकाणीं ही जाग आपलें महत्त्व स्थापन करण्यास निर्बंध आहे असें पाहून तेथें लिंगाइतांनीं म्हणजे वीरशैवांनीं आपल्या संप्रदायाचा प्रचार केला व अस्पृश्याचे विधी जंगम करूं लागले हिंदूंच्या संस्कारधर्माच्या मांडणीत महारांस स्थान द्यावें असें अनेक हिंदूंस वाटूं लागलें व यांस पुराणोक्त विधी तरी द्यावेत, अशी चळवळ मधून मधून दृष्टीस पडते [संपादकीय].

अस्रा—नांदगांव संस्थानांतील मोठें खेडें. शुरा नदीच्या काठीं असून याचें क्षेत्रफळ १०० एकर आहे. येथें एक प्राथमिक शाळा व विस्तृत आमराई आहे.

अस्वल—हा मांसभक्षक प्राणी बहुतेक सर्व देशांत सांपडणारा असून दोन्ही ध्रुवाजवळील हिम प्रदेशांत राहणाऱ्या पांढऱ्या अस्वलांचीं शरीरें फार लठ्ठ, पण त्या मानानें अवयव फार बारीक, आणि शेंपट्या बहुतेक ओबडधोबड असतात. इंडियन स्लॉथ बेअरखेरीज इतर सर्व जातींच्या अस्वलांना बेचाळीस दात असतात, व पुढचे दात आणि सुळे मांसभक्षक सस्तन प्राण्यासारखे असतात; दाढा शाक वनस्पति चावण्याला योग्य अशा असतात. तात्पर्य दंतरचनेवरून पाहतां अस्वल हा प्राणी सर्वभक्षक आहे असें दिसतें. तथापि बहुतेक अस्वल शाक वनस्पति व मध खाऊनच राहतात. हे पदार्थ पोटभर मिळाले मात्र पाहिजेत. करड्या रंगाचीं अस्वलें बहुतेक मांसाहारी असतात आणि ध्रुवप्रदेशी अस्वलें सर्वच मांसाहारी असतात. अस्वलांच्या पायांना पांच बोटें असतात आणि पंजे फार मोठे व मजबूत असतात. पण ते आकुंचन पावूं शकत नाहींत. त्यामुळें हे पंजे खणण्याच्या किंवा चढण्याच्या कामास जसे उपयोगी पडतात तसे फाडण्याच्या कामीं उपयोगी पडत नाहींत. बहुतेक अस्वलें झाडावर चढतात करड्या रंगाच्या अस्वलांना मात्र मोठेपणीं झाडावर चढतां येत नाहीं. उत्तरेकडील देशांतलीं अस्वलें हिंवाळ्यात गुहांत, झाडांच्या ढोलींत किंवा पडणाऱ्या बर्फांचें आच्छादन करून घेऊन त्यांत स्वस्थ पडून राहतात आणि पुढें वसंत काळ सुरू झाल्यावर बाहेर पडतात. या हिंवाळ्यांतच बहुधा माद्या विणी वितात. त्यांचीं पिलें उपजत केसरहित व डोळे मिटलेलीं असून पांच आठवड्यांनीं ती डोळे उघडून पाहूं लागतात. हिंवाळ्यांत एका ठिकाणीं स्वस्थ पडून राहण्याच्या पूर्वीं अस्वलें फारच लठ्ठ बनतात आणि वाढलेल्या चरबीमुळेंच दोनतीन महिने तीं जीव जगवून राहूं शकतात.

सर्व मांसभक्षक प्राण्यांपैकीं अस्वल सर्वांत अधिक सर्वभक्षक आहे. मुळ्या, फळें, किडे सर्वच सारखे अस्वलाला आवडतात, सर्वांहून मध फारच आवडतो व तो मिळविण्याकरितां तो झाडावर चढतो. पूर्वींचे लोक अस्वलांना अधिक चांगल्या तऱ्हेनें वागवीत असत. त्यांना राहण्याकरितां दगडी घरें तयार करीत. मोठाल्या रानटी कुत्र्यांची अस्वलाशीं झुंज लावून तो खेळ राजेरजवाड्यांना दाखविण्याची वहिवाट असे. असले खेळ करण्याकरितां पॅरिस गार्डन्समध्यें प्राचीन रोमन पद्धतीचीं दोन सभागृहें बांधलीं होतीं. इंग्लंडांत १ ल्या जेम्सच्या कारकीर्दींत असले खेळ करणारांना सरकारकडून १४ वर्षे मुदतीचें लायसन्स देण्यांत येत असे. १६४२ मध्यें ही लायसन्सपद्धति बंद झाली. करड्या रंगाच्या जातीचें अस्वल फारच भयंकर शक्तिमान असतें. हजारहजार पौंड वजनाचे बैल, किंवा गवा तें वाहून नेऊं शकतें. अस्वलांना प्रेत आढळल्यास व त्या वेळीं त्यांना भूक नसल्यास खड्डा खणून त्यांत तें प्रेत पुरून ठेवितात. ही त्यांची प्रवृत्ति फारच चमत्कारिक आहे, व तिचा फायदा शिकारी लोक असा घेतात कीं, अस्वलाशीं अकस्मात् त्यांची गांठ पडल्यास ते जमिनीवर देह टाकून श्वास बंद करून मेल्याचें सोंग घेऊन पडतात व अशा स्थितींत त्यांना पाहून अस्वल त्यांना पुरून ठेवण्याकरितां खड्डा खणून त्यांत टाकतें आणि वर माती लोटून निघून जातें. दुसरी अशी एक चमत्कारिक गोष्ट सांगतात कीं अशा प्रकारें या करड्या जातीच्या अस्वलानें पुरून ठेवलेल्या प्रेताला लांडगे कितीहि भुकेलेले असले तरी स्पर्श करीत नाहींत.

अस्वल हें जनावर पृथ्वीवरील आस्ट्रेलिया खेरीज सर्व भागांत बहुतेक सर्वत्र आढळतें. हिंदुस्थान, मलाया, वगैरे उष्ण देश, ध्रुवाजवळचे थंड प्रदेश व समशीतोष्ण सर्व देश अस्वलाचे निवासस्थान आहेत.

ध्रुवप्रदेशीय उर्फ शुभ्र अस्वलें.—हीं उत्तर व दक्षिण दोन्ही ध्रुवाजवळच्या प्रदेशांत राहतात व इतर अस्वलाच्या जातीहून यांच्यामध्यें ही विशेष गोष्ट असते कीं त्यांच्या पायांच्या तळव्यांवरहि दाट केंस आलेले असतात. अशा योजनेची त्या जातीला फारच आवश्यकता असते, कारण त्यामुळें त्या बर्फमय प्रदेशांत पांढऱ्या अस्वलांना पाय न घसरतां चालतां येतें. शिवाय या जातीचा सर्व रंग पांढराच असल्यामुळें त्या हिमाच्छादित शुभ्र प्रदेशांत या प्राण्याला भक्ष्य पकडतांना लपून छपून संचार करण्यास फार सोयीचें पडतें. हा अस्वल सील जातीचे जलचरप्राणी व मासे खातो व ते पकडण्याकरितां पोहणें व बुड्या मारणें या कामांत तरबेज असतो. कधीं मासांचीं प्रेतें, पक्षी व त्यांचीं अंडीं व गवतादि

खातो. कित्येक जातींची पकडून कोंडून ठेवलेली पांढरी अस्वलें निव्वळ शाकाहारावर पुष्कळ वर्षें जगतात असाहि अनुभव आहे. हा अस्वल फार अवर पोहणारा म्हणजे ४० मैल-पर्यंत पोहत जाऊं शकणारा आहे. हिंवाळ्यात शुभ्र जातीच्या अस्वलिणी सर्व काळ पडून राहतात. अस्वल मात्र मधून-मधून भक्ष्यशोधार्थ बाहेर हिंडतो. आकारमानानें पांढरा अस्वल सर्वांत मोठा म्हणजे सुमारें नऊ फूट लांब व १६०० पौंड वजनाचा असतो.

तपकिरी रंगाचा अस्वल —पूर्वगोलार्धांतील समशीतोष्ण प्रदेशांत स्पेनपासून जपानपर्यंत हा सर्वत्र आढळतो. या जातीच्या अंगावरील केसहि बहुधा तपकिरी असतात. क्वचित काळे किंवा पिवळ्या रंगाचेहि असतात. हा प्राणी एकटाच पण दाट जंगलांत राहतो. त्याचें भक्ष्य फळें, शाकवनस्पति, मध, मासे, व लहानसहान जनावरें असें मिश्र स्वरूपाचें असतें. हिंवाळ्यात ही जातहि पोकळीत किंवा गुहेंत पडून राहते. ही जात मनुष्यावर सहसा हल्ला करीत नाहीं, परंतु पिलांचें किंवा स्वतःचें संरक्षण करण्याकरितां मोठ्या आवेशानें माणसावर चालून जाऊन मागच्या दोन पायांवर उभे राहून माणसाला मिठी मारतें. अस्वलाची झुंज लावणें या गोष्टीचा यूरोपांतील लोकांस फार शोक असे. प्राचीन रोमन लोकांनाहि याची आवड असे. नार्वे, रशिया व सैबेरिया देशांत या जातीचीं अस्वलें फार आहेत. या अस्वलाच्या कातड्याचा वस्त्राप्रमाणें उपयोग करतात. त्याचें मांस व चरबी खाण्याला फार उत्तम व चवदार लागतें. हा अस्वल माणसाळण्यास फार वेळ लागत नाहीं. मागच्या पायांवर उभें राहून संगीताच्या सुरावर त्याला नाचावयासहि शिकवितात. याची लांबी ४ फूट व उंची २॥ फूट असते. या जातींत अटलस पर्वतांतील जात, सीरियन जात, हिमालय पर्वतावरील जात, अलास्कांतील जात वगैरे अनेक पोटजाती आहेत.

करड्या रंगाचा अस्वल — विशेषत अमेरिकेंत हा आढळतो, तथापि अलीकडे युनायटेड स्टेट्समध्यें याची संख्या बरीच कमी झाली आहे. अमेरिकेंतील सर्व सस्तन प्राण्यांपेक्षां अधिक क्रूर व अधिक शक्तिमान असा हा प्राणी असून गवा किंवा दुसरे १००० पौंडपर्यंत वजनाचे प्राणी तो मारून उचलून नेतो. शिवाय फळें व शाकावनस्पति हा खातो. याच्या अंगावरील लोकरीचा उपयोग फारसा होत नाहीं. कारण ती राठ असते. तसेंच या जातीच्या अस्वलाचें मांस खावयास फार वाईट लागतें, इतकें कीं अमेरिकेंतील रेड-इंडियन लोक सुद्धां तें खात नाहींत. तिबेटांतील अस्वलें पुष्कळ अंशीं या जातीसारखींच असतात.

काळ्या रंगाचा अस्वल —हा उत्तर अमेरिकेंत [illegible] आहे व आकारानें तपकिरी रंगाच्या अस्वलासारखा [illegible] याचे केस मऊ व तुकतुकीत असल्यामुळें त्यांना [illegible] किंमत चांगली येते. त्यामुळें १९०१ [illegible] त्याची फार शिकार करण्यांत येत असे. १८०३ या एकच सालांत २५००० अस्वलांचीं कातडीं इंग्लंडांत गेलीं. पण तेव्हांपासून ही संख्या निम्म्यावर आली आहे. हा अस्वल बहुतेक फळांवर उपजीविका करतो.

हिमालयी जातीचा अस्वल काळाच असतो, ही जात इराण ते आसामपर्यंत आढळते, याची लांबी पाच फूट असून तो फळेंमुळें व मेंढ्या बकरीं, हरणें, गुरें वगैरे जनावरें मारून खातो.

मलायी अस्वल —हा काळ्या रंगाचाच असतो, पण त्याच्या छातीवर एक अर्धचंद्राकृति खूण असते. याची लांबी ४॥ फूटपर्यंत असते. याच्या उपजीविकेचें साधन बहुतेक फळें व मध हेंच असतें. हा लवकर माणसाळतो, दक्षिण अमेरिकेंतील ॲण्डीज पर्वतांतील जात मलायी अस्वलासारखीच आहे. पण या जातीचे गाल, घसा व छाती पांढरी असते. स्लॉथ–बेअर ही अस्वलाची जात हिंदुस्थानांतील सर्व डोंगरी भागांत आढळते. याचे ओंठ लांब असून केस लांब व काळे असतात, हिंदुस्थानांतील गारुडी लोक याचेच खेळ करून दाखवितात. ही जात लवकर माणसाळते. हा अस्वल फळें, मध व पांढऱ्या मुंग्या खातो.

प्राचीन अस्वल प्राण्याचे अवशेष प्लिओसीन युगाच्या भूस्तरांत आढळतात. मध्ययूरोप व आशियामधील गुहांतहि बरच अवशेष सांपडले आहेत व त्यावरून हा प्राणी हल्लीं-कडील पांढऱ्या अस्वलापेक्षांहि मोठा असावासें वाटतें, ब्रिटन मध्यें एका जातीच्या अस्वलाचे प्राचीन अवशेष सांपडले आहेत.

अहमद—या नावाचे तीन तुर्की सुलतान होते. त्यांची माहिती पुढीलप्रमाणें.—

पहिला (१५८९–१६१७) हा तिसऱ्या महमदाचा मुलगा असून १६०३ सालीं सुलतान पदावर आरूढ झाला. या नंतर लवकरच हंगेरी व इराण या देशांत युद्धें सुरू होऊन त्याचा शेवट तुर्कस्तानच्या विरुद्ध झाला, व तुर्कस्तानच्या उच्च दर्जाला पहिला मोठा धक्का बसला. गादीवर बसल्या-वेळीं या सुलतानाच्या कर्तृत्वाबद्दल लोकांना जी आशा होती ती फोल ठरली. याच्याच कारकीर्दींत तंबाखूचें व्यसन तुर्कस्तानांत शिरलें असें म्हणतात.

केलें. मोठ्या नातुपानें याला रशियाशीं युद्ध करावें लागलें; पण कोणत्याहि अगोदरच्या किंवा नंतरच्या तुर्की सुलताना-पेक्षा यानें रशियाला जास्त दंगविलें. रशियाला जेव्हां तह करणें भाग पडलें तेव्हां सुलताननें फारशा कडक अटी त्यावर लादल्या नाहींत. ही गोष्ट त्याच्या प्रजेला पटली नाहीं आस्ट्रियाशीं झालेल्या युद्धात मात्र तुर्कस्तानला हार खावी लागली तसेंच इराणी युद्धाचा शेवट चांगला न होऊन जॅनिसेरी या लष्करी वर्गानें अहमदाला १७३० त पदच्युत केलें. कांहीं वर्षांनंतर कैदेंत असतानाच हा वारला.

**अहमद खट्टू ( शेख )**– याचें मूळचें नाव वजीहउद्दीन अहमद [ मग्रिबी ]—नागोरमधील खट्टू या गावीं शेख अहमदाचा जन्म झाला. याचा बाप मलिक इख्तियार--उद्दीन हा दिल्लीचा सुलतान फीरूझ शहा तघलक याच्या दरबारी एक सरदार होता. बापाच्या मृत्यूनंतर अहमदनें सर्व पैसा चैनींत उधळला व पुढें शेख बाबा इस-हाक मग्रिबी याचा शिष्य होऊन मोठा धर्माचरणी बनला. गुजराथेंत हा जाऊन राहिला तेव्हा त्याची फार प्रसिद्धि झाली. सुलतान मुझफर गुजराथी हा त्याच्या शिष्यांपैकीं एक होता. शेख अहमद इ. स. १४४६ त वारला. "मलफूझत–शेख –अहमद मग्रिबी" या नावाचें त्याचें चरित्र मुहम्मद अन्सारीनें लिहिलें.

**अहमदखान बंगष**—फरुखाबादचा नबाब व बुंदेलख्या छत्रसालचा शत्रु जो महंमदखान बंगष त्याचा हा दुसरा मुलगा. अहंमदखानाचा भाऊ काईमजंग वारल्यावर वजीर सफदरजंग यानें जेव्हा इ. स. १७४९ त त्याची दौलत आपल्याकडे ओढली, तेव्हा अहमदखानानें अफगाण सैन्य जमवून वजिराचा प्रतिनिधि राजा नवलराय याचा युद्धात पराभव केला व आपल्या घराण्यातला मुलुख परत मिळविला ( १७५० ). त्यानंतर अहंमदखान १७७१ त मरण पावला. त्याच्या मागून त्याचा मुलगा दिलेर हिम्मतखान गादीचा मालक झाला; शहा अलम बादशहानें दिल्लीहून अलाहाबादेस जातांना त्याला मुझफरजंग ही पदवी दिली. ( बील. )

**अहमदनगर ( जिल्हा ).**— ( मुंबई इलाखा ) मध्य भागांतील एक जिल्हा. उत्तरअक्षांश १८°२०' ते १९°५९' व पूर्व रेखांश ७३° ३७' ते ७५° ४१.' क्षेत्रफळ ६५८६ चौ. मै.

सीमा.— उत्तरेस व वायव्येस नाशिक जिल्हा; ईशान्येस गोदावरी नदी, पूर्वेस निझामचें राज्य, आग्नेयीस व नैर्ऋत्येस सोलापूर व पुणें जिल्हा. पश्चिमेस सह्याद्रि पर्वताचा कांहीं भाग. या पर्वताचे तीन फांटे पूर्वेस या प्रदेशात शिरलेले आहेत व त्यांच्या योगानें प्रवरा व मुळा या नद्यांचीं खोरीं बनलीं आहेत. वायव्य भागांत पर्वतशिखरें बरींच आहेत. त्यांतील कळसुबाईचा डोंगर समुद्रसपाटीपासून ५४२७ फूट उंच आहे. दुसरीं उंच ठिकाणें पट्टा व हरिश्चंद्र गड हे डोंगरी किल्ले होत. पारनेरचें डोंगरपठार सपाटी पासून पाचशें फूट उंच आहे आणि समुद्रसपाटीपासून त्याची उंची ३२४० फूट आहे. प्रवरा व मुळा या दोन नद्यांचा संगम होऊन नंतर १२ मैलांवर त्या गोदावरीस मिळतात. दक्षिण भागांत सिना आणि घोड या नद्या वाहतात. या मुख्य नद्यांशिवाय दुसऱ्या कांहीं लहान नद्या आहेत.

भूवर्णन.—अहमदनगर जिल्ह्याचे भूस्तर कशा प्रकारचे आहेत. याबद्दल बरोबर परीक्षण झालें नाहीं. परंतु मुख्यतः दख्खनच्या काळवथरी मालिकेंतील बेसाल्ट दगडाचे आडवे थर या भागांत आहेत असें ब्लॅन्फर्डनें निरीक्षण करून ठरविलें आहे ( रेकॉर्ड्स ऑफ जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, १८६८).

वनस्पति.—या जिल्ह्यात विशेषतः यांतलि अकोला तालुक्यात पुष्कळ तऱ्हेचीं झाडें दृष्टीस पडतात. कोंकणात होणारीं झाडें घाटात होतात आणि दक्षिणेमध्यें होणारीं झाडें नैकडील टेंकड्या व मैदानात होतात. वड, नान्दुक, बाभुळ, निंब आणि आंबा हीं झाडें रस्त्याच्या बाजूंनीं पुष्कळ आहेत. नाना तऱ्हेचीं रानटी फुलझाडें येथें उगवतात. या प्रदेशांत डाळिंबें व कलिंगडें उत्तम प्रकारचीं व पुष्कळ होतात.

प्राणी.—या भागात वाघ क्वचितच दृष्टीस पडतो. पण चित्ता पुष्कळदा भेटतो. लांडगेहि बरेच आहेत. मैदानांत सांबर पुष्कळ आहेत. तितिरपक्षी लावापक्षी हे बरेच आढळतात. ससे पुष्कळ आहेत.

हवामान.—साधारणपणें हवा निरोगी आहे. नोव्हेंबर ते फेब्रुवारी पर्यंतचे थंडीचे दिवस कोरडे व उत्साहजनक असतात. नंतर उष्ण वारे सुरू होतात. मेच्या दुसऱ्या पंधरवड्यापासून जूनच्या १५ तारखेपर्यंत उष्मा अतिशय त्रासदायक असतो. आक्टोबर अखेरपर्यंत पुन्हां हवा सौम्य होऊन चांगली होते जानेवारीमध्यें उष्णता ४५ अंशावर असते ती मेमध्यें १०६ अंशापर्यंत चढते. पावसाचें सरासरी मान वर्षास २३ इंच असतें. गारांचा वर्षाव पुष्कळ वेळा होतो.

इतिहास.—इ. स. ५५० ते ७५७ पर्यंत हा मुलुख बदामीच्या चालुक्य राजांच्याकडे होता. नंतर तो राष्ट्रकूट राजांच्या हस्तगत होऊन इ.स. ९७३ पर्यंत त्याच्या ताब्यात होता. त्याच्या मागून इ. स. ११५६ पर्यंत कल्याणीचे चालुक्य आले. इ. स. ११८७ पर्यंत कळचुरी व देवगिरीचे यादव यांची सत्ता होती. इ. स १२९४ मध्यें मुसुलमानांनी हा मिळला. तरी पण इ स. १३१८ पर्यंत त्यांची सत्ता नाहींशी झाली नाहीं.

१३४६ साल मोठ्या अंदाधुंदीचें होतें. दिल्लीच्या सुभेदाराच्या हातून सर्व मुलुख बहामनी सुलतानांच्या हातांत गेला. व त्यांनीं दौलताबाद, नंतर गुलबर्गा आणि बेदर आपली राजधानी केली. इ. स. १४९० मध्यें सुभेदारानें

वेंड उभारून आपण स्वतंत्र झाला व त्यानें निजामशाही घराण्याचा पाया घातला. व जयस्थानावर अहमदनगरचें शहर व किल्ला बांधला. सोळाव्या शतकात कोंकणात कल्याणपर्यंत या राज्याचा विस्तार झाला होता. परंतु विजापूरचे बादशहा व दुसऱ्या बाजूस खानदेशमधील फरूकी घराणें यांनी त्याची वाढ खुंटविली. इ. स. १६०० पर्यंतचा या राज्याचा इतिहास म्हणजे आत्मसंरक्षणार्थ व राज्यविस्तारार्थ केलेल्या लढायांची हकीकत होय. ह्या वेळेस मोंगल लोकांनीं तें जिंकलें. मलिकंबरनें पुनः स्वातंत्र्य मिळविलें व तें इ. स. १६३५ मध्यें शहाजहाननें जिंकून घेई तों पर्यंत टिकलें. अवरंगजेबाच्या कारकीर्दीत मराठ्याच्या हल्ल्यास सुरवात झाली व मोंगल सत्ता नष्ट झाल्यावर इ. स. १७५९ मध्यें किल्ला मराठ्याच्या हस्तगत झाला. इ. स. १७९७ मध्यें पेशव्यांनीं तो प्रांत शिंद्यांना दिला व इ. स. १८१७ मध्यें पेशवाई बुडल्यावर तो इंग्लिशांच्या हवाली झाला. गेल्या बोअर युद्धांत येथें बोअर कैदी आणून ठेविले होते.

या प्रांतात डोंगरातील कोरीव देवळें व हेमाडपंती इमारतींचे अवशेष पुष्कळ आहेत. ढोकेश्वराची पारनेर येथील कोरीव देवळें सहाव्या शतकातील असावीं. हरिश्चंद्रगड येथील देऊळ हेमाडपंती कालातील आहे. मुसुलमानी अमदानींतील कांहीं इमारतींचे अवशेष दृग्गोचर होतात. वरील हेमाडपंती देवळें देवगिरीच्या यादवाच्या वेळचीं असावीं. पेडगाव येथील लक्ष्मी नारायणाचें देऊळ सुंदर नकशीकाम करून सुशोभित केलेलें आहे व बाहेरच्या भिंतीवरहि पुष्कळ खोदीव चित्रें आहेत. या प्रांतात प्रसिद्धीस आलेले किल्ले बरेच आहेत. अहमदनगरच्या उत्तरेस डोंगराच टेंकडीवर माजरसुंबा नावाचा किल्ला फार पुरातनकालीं वाल्मिकी ऋषीचें निवासस्थान होता असें सांगतात. अकोल्याच्या पश्चिमेस १८ मैलावर रतनगड नावाचा किल्ला आहे. सिद्धटेक व मिरी येथें महत्वाचीं मंदिरें आहेत.

शहरें व खेडीं मिळून १३४९ आहेत. इ. स १९२१ मध्यें लोकसंख्या ७,३१,५५२ होती.

मुख्य शहरें—अहमदनगर, ( जिल्ह्याचें मुख्य ठिकाण;) संगमनेर, पाथर्डी, वांबोरी व खर्डा शेंकडा ९० लोकांची भाषा मराठी आहे. भिल्ल लोक मराठीपासून झालेली एक भाषा बोलतात. इ स. १९०१ मध्यें शेंकडा९० हिंदू, शें, ५ मुसुलमान, शें २ ख्रिश्चन. १६२५४ जैन होते. परंतु विशेष वस्ती मराठ्याची आहे. हा शेतकरी व कारागीर वर्ग आहे. महार, मांग, चांभार, तसेंच वंजारी, कैकाडी, कोल्हाटी, या लोकांची वस्तीहि बरीच आहे. डोंगरी जातींपैकीं भिल्ल, ठाकूर, आणि कायोडी हे नांवें पेण्याजोगे आहेत. कांहीं वस्ती ब्राह्मण, कोळी, माळी यांची आहे. इंग्रजी राज्यापासून मारवाडी लोकांचा भरणा बराच होऊं लागला आहे.

शेंकडा साठ लोक शेतकीवर उपजीविका करणारे आहेत. उद्योगधंदे व व्यापार करणारे लोक अनुक्रमें शें. १८ व १ आहेत. अमेरिकन मिशन नावाची एक ख्रिस्ती संस्था आहे. इ. स. १९०१ मध्यें एकंदर २०००० ख्रिस्ती लोक होते. या लोकांच्या बऱ्याच शाळा व प्रार्थनामंदिरें आहेत.

शेतकीः—जमीन तीन प्रकारची आहे. काळी, तांबडी वरड व पांढरी. उत्तर व पूर्व भागांत इतर भागापेक्षां जमीन, जास्त सुपीक आहे. शेतकऱ्याजवळ सरासरी एक बैलजोडी असते व बाकीचे बैल उसने मागून आणून वेळ मारून न्यावी लागतें इतका शेतकरी वर्ग निकृष्ट स्थितींत आहे.

बहुतेक जमीन रयतवारी आहे व फक्त शेंकडा १३ या प्रमाणांत जमीन इनाम किंवा जहागीर आहे. इ. स. १९०३–०४ मध्यें ४८७१ एकर जमीन पिकास आली होती. व ९८ एकर जमीनीस बाहेरुन पाणी मिळत होतें; ८५ एकर पडीत होती व ८४९ एकर जंगल होतें

ज्वारी आणि बाजरी हीं खाण्याचीं धान्यें आहेत. येथें पिकणारीं धान्यें व त्यासाठी लागवडीस येणाऱ्या जमीनीच्या चौरस मैलाचे आकडे पुढें दिले आहेत ज्वारी १०६४ बाजरी १५५६, गहूं ३२९, चणे १२३, तूर १०५ मठ १०३, कुळिथ ११५, कापूस २२५, सण ४०, तीळ ५७, जवस ५०. थोडासा ऊंस, तंबाकू आणि भाजीपाला हीहि पिकतात.

सरकारचा अस्सल भिमथडी घोड्याची पैदास करण्याचा प्रयत्न चालू आहे

८४९ चौरस मैल जंगलापैकीं ४५८ चौरस मै. जंगल खात्याच्या ताब्यात आहे. व खात्याचें वार्षिक उत्पन्न सुमारें २५००० रुपये आहे. मैदानात बाभूळ, बोर, निंब, तिरम, करंज, हिवर हीं झाडें होतात टेंकड्यावर सागवान, धावडा व खैर होतात.

जंगलात अंजन, जांभूळ, बेहडा, ऐन, आणि करवंद हीं झाडें असतात

खनिज संपत्ति—चुनखडी सर्व जिल्ह्यात विपुल सांपडते. अहमदनगराजवळ निळा बसाल्ट दगड चांगला तयार होतो. रांगोळीचा दगड, शिवधातु, गोमेद व स्फटिक श्रीगोंदे तालुक्यात आणि व अकीकासारखे दगड नगर शहराजवळच्या डोंगराळ प्रदेशात सांपडतात.

व्यापारधंदे—साड्या, पागोटीं, आणि पितळेचीं व तांब्याचीं भांडीं होतात. पूर्वी कागद व सतरंज्या होत असत. परंतु ते धंदे सध्यां बुडाले आहेत. या भागात कांहीं जिनिंगचे कारखाने आहेत व त्यात कांहीं लोकास काम मिळतें

पूर्वी वंजारी लोकांच्या मार्फत उत्तर हिंदुस्थान व समुद्रकिनारा यांशीं व्यापार चालत असे. परंतु आगगाडी सुरू

झाल्यापासून सर्व व्यापार रेल्वेनें चालतो या भागांतून ग्रेट इंडियन पेनिन्शुला रेल्वे व निझामची हैद्राबाद गोदावरी व्हॅली रेल्वे या गेल्या आहेत

या भागांत अवर्षण पुष्कळदा पडतें नुकताच १९२१ सालीं या जिल्ह्यांत मोठा दुष्काळ पडला होता

या जिल्ह्याचे एकंदर अकरा तालुके केलेले आहेत—ते असे—अहमदनगर, पारनेर, श्रीगोंदें, करजत, जामखेड, शेगांव, नेवासा, राहुरी, कोपरगांव, संगमनेर आणि अकोला कलेक्टरच्या हाताखालीं दोन असिस्टन्ट व एक डेप्युटि कलेक्टर असतो

ब्रिटिश अमलाच्या अगोदर येथें तीन प्रकारच्या जमीन धाऱ्याच्या पद्धती होत्या एक मुंड दुसरी कास आणि तिसरी टिकास हे शब्द द्रविड भाषेंतून आले आहेत. मुंड म्हणजे मोठाल्या जमिनी, या जमिनीवरील सारा एकदाच ठरविण्यांत आलेला होता दुसऱ्या जमीनी आकारानें लहान असत. ही पद्धत राष्ट्रकूट, चालुक्य व यादव राजांच्या वेळेस होती नंतर मलिकंबर ने नवी पद्धत सुरू केली त्यानें योग्य, बेताचा व निश्चित सारा ठरवून शेतकऱ्याचा जमिनींत प्रत्यक्ष हितसंबंध उत्पन्न केला सगळा मालकी हक्क राजाकडे न ठेवता त्यानें जमीन करणाऱ्यास काही हक्क दिले त्यानंतर मराठ्यांनीं आपली पद्धत सुरू केली परंतु मध्यंतरी घोटाळे उत्पन्न होऊन नाना फडणवीसास त्यांत बराच बदल करावा लागला इ. स. १८९० च्या सेटलमेंटप्रमाणें कोरडवाहू जमिनीवर १० आणे, भातखाचर जमिनीवर रु १-१-० आणि बागाईत जमिनीवर रु १-८-० प्रमाणें दर एकरी सारा बसविण्यांत आला

इ. स १९०३-०४ मध्यें जमीन उत्पन्न रु १५४१००० व एकंदर उत्पन्न रु १८९२००० होतें

या जिल्ह्यांत अहमदनगर, भिंगार, संगमनेर, वांबोरी आणि खर्डा या ठिकाणीं म्युनिसिपालिट्या असून एक जिल्हा बोर्ड व ११ तालुका बोर्डें आहेत लोकलबोर्डांचें सालीना सरासरी उत्पन्न दोन लक्षांचें आहे व म्युनिसिपालिटीचें उत्पन्न १॥ लक्ष आहे दरवर्षी ७०००० रुपये रस्ते व इमारती यांसंबंध खर्च होतात

जिल्ह्याला एक पोलीस सुपरिन्टेन्डेन्ट आहे व त्याच्या हाताखालीं दोन इन्स्पेक्टर्स आहेत १९ पोलीस चौक्या आहेत पोलीसांची संख्या ७७२ आहे अहमदनगर येथें मुख्य तुरुंग असून बाहेर अकरा लहान तुरुंग आहेत

इ स १९०१ मध्यें शेंकडा ४ ७ लोक शिक्षित होते इ स १९०३-०४ मध्यें या भागांत ४१२ शाळा होत्या व त्यांत १४८८४ मुलें व मुली शिकत होती

अहमदनगर मधें हॉस्पिटल सोडून ९ दवाखाने आहेत. दरवर्षी १७२१९ रुपये खर्च होतो त्यांतून १००२४ रुपये म्युनिसिपालिटी व डिस्ट्रिक्ट बोर्ड यांकडून मिळतात.

इ स १९०३-०४ मध्यें २३३५४ लोकांना देवी टोंचण्यांत आल्या

ता लु का —अहमदनगर जिल्ह्यांतील एक तालुका उत्तर अक्षांश १८°४७' तें १९°१९' आणि पूर्व रेखांश ७४° १२' त ७५° २' क्षेत्रफळ ६२४ चौ मै यांत अहमदनगर, जिल्ह्याचें मुख्य ठिकाण, (लो. सं ३५७८४) व भिंगार (लो सं. ५७२२) हीं दोन शहरें व ११७ खेडीं आहेत इ स. १९११ मध्यें लोकसंख्या १२९१०९ होती इ. स. १९०३-०४ मध्यें जमिनीच्या साऱ्याचें उत्पन्न १७ लक्ष होतें आणि इतर करांचें उत्पन्न रु ११५०० होतें हा तालुका भीमा व गोदावरी या दोन नद्यांमधील एक डोंगरपठार आहे या भागांत जंगल वगैरे फार थोडें आहे व जमीन हलक्या प्रतीची आहे जरी पाऊस फार बेताचा पडतो तरी हवा निरोगी आहे सरासरी पाऊस २२ इंच पडतो

श ह र —जिल्ह्याचें मुख्य ठिकाण उत्तर अक्षांश १९°५ व पूर्व रेखांश ७४°५५ हें पुणें शहरापासून ७२ मैलांवर दौंड मनमाड रेल्वेवर सिना नदीच्या उत्तर तीरावर वसलेलें आहे याचें क्षेत्रफळ २ चौरस मैलांपेक्षा कांहीं जास्त आहे लोकसंख्या (१९११) ४२९४० इ स १९०१ मध्यें कान्टोनमेन्ट धरून लोकसंख्या ४२०३२ होती त्यापैकीं हिंदु ३१०३०, मुसलमान ५९६८ आणि ख्रिश्चन ३५७२ होते काहीं ब्राह्मण लोक दुकानदार आहेत मुसलमान लोक बहुतेक आळशी व अशिक्षित आहेत त्यांचा धंदा कापड विणणें, कापूस पिंजणें व श्रीमान हिंदु लोकांच्या घरीं नोकरी करणें हा आहे शहर दिसण्यांत साधें आहे शहराभोंवार हुसेन निझामशहानें बांधलेला तट आहे तो हल्लीं बहुतेक पडला आहे

हें शहर इ. स १४९० च्या सुमारास अहमद निझाम शहानें वसविलें (अहमद निझामशहा पहा) व त्यास त्यानें आपलें नांव दिलें हा ब्राह्मणी राजाच्या वेळीं एक सुभेदार होता व तें राज्य मोडल्यावर यानें स्वतंत्र राज्य स्थापिलें याच्यावेळीं उत्तरेस दौलताबाद व खानदेशाचा कांहीं भाग येथपर्यंत राज्याचा विस्तार झाला इ स १५०८ मध्यें त्याच्यामागून त्याचा मुलगा बुर्हाण निझामशहा राज्यारूढ झाला व त्याच्या मरणानंतर इ स १५५३ मध्यें त्याचा मुलगा हुसेन निझामशहा गादीवर आला त्याच्यावेळीं इ स १५६५ मध्यें विजापूर गोवळकोंडा, बेदर अहमदनगरचे राजे एकत्र जमून त्यांनीं विजयनगरच्या रामराजा याशीं तालिकोटचा संग्राम केला त्याच्यापूर्वीं विजापूरकरांनी अहमदनगरवर स्वारी करून पुष्कळ लूट नेली होती त्यांत सध्यां विजापूर येथें असलेली "मुलूख मैदान' तोफहि नेली त्याच्यामागून मुर्तिजा निझामशहा गादीवर आला, पण इ स १५८८ मध्यें त्याच्या मुलानें त्याचा खून करून गादी बळकाविली मिरान स्वतः लवकरच मारला गेला व त्याचा पुतण्या माळू

इस्माइल निझामशहा तख्तावर आला पण त्याच्या बापानें त्याला पदच्युत करून तो बुऱ्हाण निझामशहा (दुसरा) या नावानें राज्यारूढ झाला ता इ स १५९४ साली मेला नतर इब्राहिम निझामशहा हा गादीवर आला पण थोड्याच दिवसात विजापुरकराशीं झालेल्या युद्धात तो मरण पावला तेव्हां त्याच्या अल्पवयी मुलाच्या नावानें चादबिबीनें राज्य चालविलें. इ स १५९६ पासून १६३५ पर्यंत मोंगलानीं अहमदनगरचें राज्य बुडविण्याचा प्रयत्न केला व शेवटीं शहाजहाननें तें राज्य आपल्या राज्यास जोडिलें ( निझामशाही पहा ) इ स १७५९ मध्यें तें पेशव्याच्या हातात गलें

मराठ्याशीं अहमदनगरचा सबध बरेच वेळा आला असल्यामुळें त्याच्या पत्रव्यवहारात अहमदनगरसबधीं बातम्या अनेक वेळा आढळतात उदाहरणार्थ शिवाजीनें राघोपतबरोबर बादशहाकडे जुन्नर व अहमदनगर येथील देशमुखीविषयीं पत्र पाठविलें होतें त्याला उत्तर ' आम्ही हुजूर गेल्यानंतर हा मजकूर घडोन येईल " असें बादशहा देतो ३० नोव्हेंबर १६४९ ( रा ख ८४,३ )

हा किल्ला काहीं दिवस अमात्याकडे असावा असें दिसतें. रामचद्र पडित अमात्य याच्या सरजामयादींत नगरहवेलीचा उल्लेख आहे १७३१ ( रा. ख ८ १२२, १४८ )

अहमदनगरशीं सबध प्रामुख्यानें बाळाजी बाजीरावाच्या कारकीर्दींत आला नबाब सलाबत जगाचें अहमदनगरास युद्धाचें बरेच साहित्य होतें अशी ७ सप्टेंबर १७५१ च्या पत्राच्या शेवटीं बातमी आहे. ( रा ख १, ४, १८ ) निझाम केदल पाथर्डीहून अहमदनगरास जाणार आहेत असें रघुनाथ गणेश पेशव्यास ता १३ नोव्हेंबर १७५१ रोजीं लिहितो ( रा ख १ १३, ३७ )

शहानवाजखानानें अहमदनगरचा किल्ला पेशव्यास पाहिजे असें पाहून गुप्तपणें नजर केला पण " परवान जागिरीचे जाल्यानतर " ही गोष्ट उघड करावी त्यापूर्वी माहसरा न करावा असें कृष्णाजी त्रिबक पेशव्यास लिहितो २७ जून १७५७ [ रा ख १ ६८, १२२ टीप— पेशव्याच्या दरबारीं असलेला निजामाचा वकील कविजग यानें उदगीरच्या लढाई या अगोदर हा किल्ला उघडपणें पेशव्याना दिला]

उदगीरच्या स्वारीच्या धामधुमींतहि नगर हें महत्वाचें ठाणें होतें तें ' नगरच्या किल्ल्याभोंवतीं चौक्या बसवून रसद बद केल्याचें ' वर्तमान दत्ताजी शिंदे ता २२ आगष्ट १७५७ रोजीं पेशव्यास लिहितो( रा ख १ ७३,१४२ )

निजामानें नगर पेशव्यास द्यावें यासबधीं जीवनराव खासगीवाल्यानें लिहिलेल्या पत्राचा कृष्णाजी त्रिबक केवळ उल्लेख करितो २५ सप्टेंबर १७५७ ( रा ख १ ८०,१५२)

अखेर पेशव्यानीं येथील किल्ला घेतला तें वर्तमान २१ डिसेंबर १७५९ च्या पत्रात गोविंदपत बुंदेले लिहितो कीं ' कार्तिक वद्य ५ श्रीमंत स्वामींनीं अहमदनगरचा किल्ला घेतला (रा ख १ १४७,२३४ )[ कविजगानें १० आक्टोबर १७५९ रोजीं किल्ला पेशव्याच्या हातीं दिला ]

१२ जानेवारी १७६० रोजीं सदाशिवराव भाऊ गोविंद पंतास लिहितात कीं, निजाम अल्ली कराराप्रमाणें दहा लाखाची जागीर व नगर व परांडा असे दोन किल्ले सरकारात देईना तेव्हां फौज जमा करून नगरचा किल्ला घेतला —( रा ख १ १५४,२४३, १६६,२५८ )

नानासाहेब आमदानगराहून कूच करून पट्टदुरास गेले असें बाबूराव गोविंदपताना कळवितो १६ मार्च १७६० ( रा ख १ १६८,२६६ )

राघोबादादा व थोरले माधवराव यांच्यामधील कलह चालला असता या किल्ल्याच्या आसपास सैन्याच्या हालचाली चालू होत्या 'दादासाहेबांचें कूच नगराहून होऊन चारोळ्यास मु॥ आले ' असा मजकूर १६८४ कार्तिक वद्य ४ च्या पत्रीं आहे ( रा ख १० ६, ३ )

माधवराव बल्लाळ पेशवे महादजी नारायण गोसावी यास लिहितात कीं, " त लुके अमदानगर येथील सालमजकुरींचा बेहेडा झाला आहे —तरी .. .कागद बेहेड्याचे उपयोगी पाठवून द्यावे १६९३ आश्विन वा॥ ( रा ख १० ७६,४१)

नरसिंगराव धायगुडे चारशें राउतानिशीं नगरास दाखल झाल्याचा उल्लेख आहे १६९६ चैत्र वद्य ८ ( रा ख १० १२४,७९ )

दादासाहेब नगरावरून टोंकास गेल्याचें लिहिलें आहे १६९६ अधिक वैशाख शु॥ १ ( रा. ख १० १३०, ८२)

निझामानें हा किल्ला घेण्याची खटपट चालविलेलीहि दिसून येते

जावितजग हरि बल्लाळाजवळ पूर्वीं कबूल केल्याप्रमाणें नगर व असेरी हे दोन किल्ले मागतात पण हरि बल्लाळ त्यानें एखादा लढाई मारल्याशिवाय देण्याचें नाकारतात असा मजकूर १६९७ फाल्गुन शु॥ ८ च्या पत्रात आहे ( रा ख २ १३३,६८४ )

पुढें या किल्ल्याचा उपयोग राजकीय कैदी ठेवण्याकडे केला जात असे मोरोबादादास नगरच्या किल्ल्यात ठेविलें पत्र १७०० अश्विन शु॥१ ( रा ख १० १९४,१३४ )

किल्ले नगरची असामी दूर करून दुसरीकडे सांगितली आहे २ नोव्हेंबर १७८१ ( रा ख. १० २६९,१९५ ) वरील प्रमाणेंच १७०१ वै शु २ ( रा ख २० २९९,२२३ )

हा किल्ला पुढें दौलतराव शिंद्यास पेशव्यानीं दिला त्या सबधीं दौलतराव शिंद्यानें सरकारात लिहून लाविलेली पुढील पत्रात दिसते नगरचा किल्ला व दौलताबादचा किल्ला, महाल सरजामी मुदामतपासोन आहेत त्यामुळे दोन्ही किल्ले द्याव ' १७१८ ( रा ख १० ४६०,३६९ )

या बाबतींतच नगराहून बक्षी व बाळाबा तात्यास आणावयास श्रीमतानीं सांगितलें पत्र १७२१ ( रा ख १० ४९१३,८६ )

दौलतराव शिंदे स्वतः नगरास गेल्याचाहि उल्लेख एका पत्रात आहे. १७२२ पौष वद्य १० ( रा.खं.१०.५१५,४०२. )

" आज वर्तमान ऐकिलें कीं, किल्ले नगर शिंद्यानीं सरकारात श्रीमंतास दिल्हे. काम काज किल्ल्याचें सरकारातून रा. यशवंतराव सुभेदार याजकडे सांगितलें म्हणोन, आज तिसरे प्रहरापासून वदंता आहे," असें परशराम भट धर्माधिकारी नानास लिहितो. १७२२ माघ वद्य १ ( रा. खं. १०.५१८,४०४ ).

पेशवाईच्या अखेरीच्या धामधुमींतहि नगरच्या किल्ल्यानें भाग घेतला होता 'डाल–टन वेंपू पलटण अहमदनगर' याचा मुक्काम कायगांवीं झाल्या वेळचा प्रकार वर्णिला आहे. १७२३ भाद्रपद वद्य ५( रा. खं. १०.५४०,४१९.)

'पुण्याकडील सखाराम घाटग्या नगरास दो चौ दिवशीं येतील. पुण्यास नाकेबंदी श्रीमंताची बसली' असें बापू गोखले लक्ष्मीनारायण दीक्षितास लिहितो. १७२४ वैशाख वद्य ९ ( रा. खं. १०.५६६,४३२ )

पेशव्यानीं अहमदनगर १७९७ मध्यें दौलतराव शिंद्यास दिलें. तें इ. स. १८१८ मध्यें पेशवाईचा अंत झाल्यावर इंग्लिशाच्याकडे आलें

शहराच्या पूर्वेस अर्धा मैल अंतरावर अहमदनगरचा किल्ला आहे. हा वर्तुलाकार असून त्याचा परिघ १॥ मैल आहे व त्याच्या सभोंवार एक रुंद व खोल खंदक आहे. हा किल्ला इ. स. १५५९ मध्यें हुसेन निझामशहानें एका पूर्वीच्या मातीच्या किल्ल्याच्या ठिकाणीं बांधला. गावांत पुष्कळ उत्तम मशिदी आहेत. त्यांचा सध्या सरकारी कचेर्‍या व अधिकार्‍यांचे राहण्याचे बंगले म्हणून उपयोग केला जातो. शहराच्या पूर्वेस ६ मैलांवर चांदबिबीचा महाल म्हणून एक इमारत आहे. दगडी मशीद, फरिबाग, अहमद निझामशहाची कबर आणि अलमगीरचा दर्गा हीं दुसरीं कांहीं प्रेक्षणीय स्थळें आहेत.

अमेरिकन मराठी मिशनचा बराच मोठा व्यापार या ठिकाणीं दृष्टीस पडतो महाराष्ट्रीय ख्रिस्ती येथें पांच सहा हजार आहेत.

इ स. १८५४ मध्यें या शहरास म्युनिसिपालिटी मिळाली. इ. स. १९०१ मध्यें सरासरी उत्पन्न १ लक्षाचें होतें.

अहमदनगर हें मुख्य लष्करी ठिकाण आहे. येथें गेल्या महायुद्धाच्या वेळीं जर्मन कैदी ठेवले होते.

मुख्य उद्योगधंदे:—लुगडीं विणणें व तांबें पितळेचीं भांडीं करणें. मिशनच्या एका कारखान्यांत उत्तम सतरंज्या तयार होतात. एक कापसाचा, एक कातड्याचा व एक निळीचा असे तीन व्यापारी कारखाने आहेत.

दोन इस्पितळें, पाच दवाखाने, दोन औद्योगिक शाळा, दोन वाचनालयें व इतर शिक्षणसंस्था आहेत.

**अहमदनगर गांव** —( काठेवाड ) मुंबई इलाख्यांतील महिकांठा एजन्सीमधील इडर संस्थानची राजधानी. उत्तर अक्षांश २३°३४' व पूर्व रेखांश ७२°१' हें अहमदाबाद प्रांतीज रेल्वेवर हाथमती नदीच्या उत्तर तीरावर आहे इ. स. १९०१ मध्यें लोकसंख्या ३२०० होती. ह्या गावासभोंवार एक दगडी कोट आहे, तो गुजराथचा सुलतान पहिला अहमद यानें इ. स १४२६ मध्यें बांधला. जेव्हां सध्याच्या राजघराण्यानें इ. स. १७२८ मध्यें इडर घेतलें, त्यावेळीं अहमदनगर त्याच्या हातांत आलें. इ. स. १७९१ मध्यें महाराजा शिवसिंगच्या मरणानंतर त्याचा दुसरा मुलगा संग्रामसिंग यानें अहमदनगर आणि सभोंवारचा प्रदेश घेतला व तो स्वतंत्र राजा झाला. त्याच्यामागून त्याचा मुलगा करणसिंग गादीवर आला. तो इ. स. १८३५ मध्यें मरण पावला. त्यावेळीं त्याच्या राण्या सती जाण्यास निघाल्या असतां इंग्लिशांचा वकील मि. अर्स्किन यानें त्यास प्रतिबंध केला. इंग्लिश वकील कांहीं ऐकत नाहीं असें पाहून राजकुमारानीं भिल्ल वगैरे लोक जमा करून रात्रीं तें प्रेत जाळलें तेव्हां राण्या सती गेल्या. भिल्ल लोक पळून गेले; पण लवकरच त्यास शरण यावें लागलें. तेव्हां कांहीं करारमदार होऊन तख्तसिंग गादीवर बसला. लवकरच जोधपूरच्या गादीचा वारसा त्याकडे आला. तेव्हां अहमदनगर व सभोंवतालचा प्रदेश आपल्याचकडे ठेवावा असा त्याचा इरादा होता; पण इ. स. १८४४ मध्यें असें ठरलें कीं, अहमदनगर पुनः इडरला सामील करण्यांत यावें. भद्र नांवाच्या राजवाड्याचे अवशेष व एक कारंजा एवढींच पूर्वकालीन स्मृतिचिन्हें आहेत.

या शहरांत एक इस्पितळ आहे, त्यांत दरसाल ७००० रोग्यांना औषधोपचार होतो व शहरास म्युनिसिपालिटी आहे. तिचें उत्पन्न इ स.१९०३–४ मध्यें १७५५ होतें व खर्च १४०१ रुपये होता. येथील दगडाला बरीच मागणी असते. येथील तरवारी, चाकू वगैरे हत्यारें प्रसिद्ध आहेत. (इं. गॅ.५–१९०८; मुं. गॅ. ५ ).

**अहमद निझामशहा** ( १४८९–१५०८ )—निझाम शाहीचा संस्थापक. हा ब्राह्मणकुलोत्पन्न होता. विजयानगरास तिमाप्पा बहिरु (बहिरव ?) नामक एक ब्राह्मण होता त्याचा हा नातू. महंमूदशहा बहामनी (१४८२–१५१८ ) च्या वेळचा दक्षिणी तटाचा पुढारी मलीक नाईब निजामुल्मुल्क बहिरी हा त्या तिमाप्पाचा मुलगा होय. अहमदशहा बहामनीच्या फौजेनें विजयानगरच्या राजाबरोबर लढाई करून त्या मुलास कैद करून आणिलें. पुढें तो मुसुलमान झाला. या निजामुल्मुल्क बहिरीचा मुलगा महंमद यानें अहमदनगरच्या निझामशाहीची स्थापना केली. स्वतंत्र होण्यापूर्वी त्यानें कित्येक किल्ले घेतले. त्यांतच शिवनेरी किल्ला होता; त्यात त्याला पुष्कळ धन सांपडलें नंतर त्यानें चंदनवंदन, लोहगड तोरणा वगैरे दक्षिणेचे बहुतेक किल्ले काबीज केले; आणि राजापुरापर्यंत कोंकणप्रांत जिंकला. तो जुन्नरास रहात असे. त्यानें आपल्या मुलुखाची व्यवस्था फारच उत्तम ठेवली होती

की, त्याच्या राज्यांत एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत काठीला सोनें बांधून लोकांनीं खुशाल फिरावें अशी आख्यायिका होती. अहमद निझामशहा यांच्या हुकुमाशिवाय राज्यांत पान देखील हालत नसे. बहामनी शहानें त्यावर स्वारी केली, तींत त्या शहाचाच पराभव झाला. त्याचा शिरजोरपणा कमी करण्यासाठीं शहानें पुष्कळ उपाय केले, पण त्यास यश आलें नाहीं. अखेरीस अहमद हा निजामशहा या नांवानें स्वतंत्रतेनें राज्य करूं लागला. दौलताबाद व जुन्नर यांच्या दरम्यान विकट म्हणून खेडें होतें, तें त्यास मोक्याचें वाटल्यावरून तेथें अहमदनगर नांवाचें शहर त्यानें वसविलें (सन १४९०) ह्या वेळेस मराठे लोक दक्षिणेंत पुढें पुढें करूं लागले होते. अहमद निझामशहानें दौलताबादचा किल्ला वेढा घालून घेतला. पुढें अनेक पराक्रम करून हा सुलतान सन १५०८ सालीं निवर्तला. अहमदशहाचे अंगचे सद्गुण वर्णन करण्यास आपण असमर्थ आहों, असें फेरिस्ता म्हणतो. त्यानें एकामागून एक पाडिलें, द्वंद्वयुद्ध करून तंट्याचा निकाल करण्याची चाल त्यानेंच दक्षिणेंत पाडिली. राजाचें अनुकरण करून सर्व लहान थोर लोकांत खेड्यापाड्यांतून सुद्धां ह्या खेळाची अभिरुचि वाढून, जिकडे तिकडे तलवारीचा पट्टा व बोथाटी खेळण्याचे आखाडे स्थापन झाले [सु रियासत. बोल स्मिथ मोडक—दक्षिणेंतील मुसुलमानांचा इतिहास ]

**अहमदपूर** (शरकिया) त ह शा ल—(पंजाब) भावलपूर व निझामत यांत असलेली एक तहशील. ही पचनद व सतलज नद्यांच्या दक्षिण व पश्चिम बाजूस आहे. उत्तर अक्षांश २७°४२' तें २९°२६' व पूर्व रेखांश ७०°५४' ते ७१°३२'. क्षेत्रफळ २१०७ चौरस मैल. इ स १९११ मध्यें लोकसंख्या ११०३३४ होती. यांत अहमदपूर (तहशिलीचें मुख्य ठिकाण) आणि बाकीचीं १०१ खेडीं आहेत. यांत हक्रा नांवाचा सखल प्रदेश आहे. या प्रदेशावरून पूर्वी सतलजचा प्रवाह वहात होता असें म्हणतात. या तहशिलीचें उत्पन्न इ स १९०५-६ मध्यें २ ? लक्ष होतें.

श ह र (पूर्व)—अहमदपूर तहशिलीचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश २९°८' पूर्व रेखांश ७१°१६. हें शहर नॉर्थ-वेस्टर्न-रेल्वेवर भावलपूरच्या नैर्ऋत्येस २० मैलावर आहे. इ स १९११ मध्यें लोकसंख्या ४७२ होती.

हें इ. स १७४८ मध्यें वसवलें गेलें व इ स. १७८२ मध्यें भावलपूरचा नवाब दुसरा भावलखान यास त्याच्या सासऱ्याकडून मिळालें.

या शहरांत एक इयत्ता ४ इयत्तेपर्यंत शाळा व एक दवाखाना आहे. येथें "सोडा कार्बोनेट" चा व्यापार मोठा चालतो. तसेंच जोडे व मातीचीं भांडीं बाहेर मोठ्या प्रमाणावर पाठविलीं जातात. शहराला म्युनिसिपालिटी असून तिचें उत्पन्न इ स १९०३-४ मध्यें १२१०० रुपये होतें व तें सर्व जकातीपासून झालेलें होतें.

**अहमदपूर** (लम्मा) त ह शी ल—भावलपूर संस्थानांतील खानपूर निझामतींतील एक तहशील. ही उत्तर अक्षांश २७°१३' ते २८°४० आणि पूर्व रेखांश ६९°३१ ते ७०°२०' मध्यें सिंधुनदाच्या पश्चिम तीरावर आहे. इ स १९११ मध्यें लोकसंख्या ७११७३ होती. हींत पश्चिम अहमदपूर शहर आणि ६३ खेडीं यांचा अंतर्भाव होतो.

सिंधुनदाच्या सपाट प्रदेशांतील या तहशिलीचा भाग सुपीक आणि रेताड आहे. दक्षिण भागांत दाट अरण्य आहे. इ स. १९०५-६ मध्यें जमिनीचा सारा व इतर कर यांचें उत्पन्न ११ लाख रुपये होतें.

श ह र (पश्चिम)—(पंजाब) भावलपूर संस्थानांतील अहमदपूर लम्मा तहशिलीचें मुख्य ठिकाण. उ अ २८ १८ आणि पू रे ७०°७ हें सादिकाबाद शहराच्या वायव्येस ४ मैलांवर नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर आहे. इ स १९१० मध्यें लोकसंख्या ४२२३ दाऊदपुत्र जातीच्या अहमदखान नांवाच्या एका मनुष्यानें हें वसवलें. येथें एक अरबी शिक्षणाची शाळा व पुष्कळ महत्त्वाच्या मुसुलमानी इमारती आहेत. येथें म्युनिसिपालिटीची व्यवस्था असून इ स १९०३-०४ मध्यें तिचें उत्पन्न ४३०० होतें तें सर्व जकातीचें होतें. हें शहर आंब्याच्या बागामुळें प्रसिद्ध आहे.

शा ह र (पंजाब) झांग जिल्ह्याच्या शोरकोट तहशिलींतील एक शहर चिनाबच्या पश्चिमेस उ अ. ३०°४१' व पू रे ७१° ४७' इ स १९०१ मध्यें लोकसंख्या ३९१६. गत कालामध्यें या शहराचा भावलपुरशीं पुष्कळ व्यापार चालत असे. पण सध्या तो नाहींसा होत चालला आहे. येथें एक शाळा व दवाखाना आहे. येथें 'नोटिफाइड एरिया कमेटी' आहे.

**अहमदशाहा**—(१४११-१४४३) गुजराथचा सुलतान अहमदशहा आपल्या वयाच्या एकविसाव्या वर्षी गुजराथच्या राज्यावर बसला. फिरोजखान नांवाच्या त्याच्या चुलतभावानें आरंभींच आपल्यास राज्य मिळण्याविषयीं मोठें बंड केलें. उभयतांचें युद्ध होऊन फिरोजखानाचा पराभव झाला. त्या स्वारीहून पट्टणास परत येत असतां रस्त्यावर एक नवीन शहर वसवून त्यास त्यानें आपलें नांव दिलें (सन १४१२) तें अहमदाबाद या नांवानें अद्यापि प्रसिद्ध आहे. पट्टण येथून आपलें तख्त उठवून अहमदशहानें तें अहमदाबादेस आणिलें. तेव्हांपासून अहमदाबाद शहर गुजराथची राजधानी झालें. हें शहर ज्याच्या मसलतीनें वसलें त्याचें नांव शेख महमद गंजबक्ष असें होतें. अहमदशहा पराक्रमी होता. त्यानें माळवा, सौराष्ट्र वगैरे सभोंवारच्या प्रांतांवर आपली खंडणी बसविली व हिंदु धर्माचा पाडाव करण्याकरितां विशेष मेहनत घेऊन त्या कामीं त्यानें आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे.

गुजराथ देश मूळचा निव्वळ हिंदूंचा होता. त्या पूर्वीच्या राज्यकर्त्यांस त्या धर्माचा उच्छेद करण्यास सवड मिळाली नाहीं. अहमदशहानें १४१४ त ताजुल्मुल्क नामक एक मोठा धर्माभिमानी गृहस्थ मुसुलमानी धर्मप्रसाराच्या स्वतंत्र खात्यावर मुख्य नेमून त्यास हिंदूंच्या देवालयाचा व मूर्तींचा दरोबस्त नाश करण्याची सक्त ताकीद दिली. ताजुल्मुल्कानें हे हुकूम मोठ्या बहादुरीनें अंमलात आणिले. देवस्थानाप्रमाणें राज्येंहि खालसा करण्याचा सपाटा कमी नव्हता. अनेक लहान लहान जमीनदारास व गिरासिये लोकांस त्यानें आपल्या अमलाखालीं आणिलें. सन १४२० पासून बरीच वर्षें स्वस्थ बसून अहमदानें विश्रांति घेतली. कारकीर्दीच्या अखेरीस महाराष्ट्रांतील बहामनी सुलतानाबरोबर उत्तर कोंकण प्रांतीं त्याचे युद्धप्रसंग झाले त्यांत बहुधा अहमदशहासच जयप्राप्ति झाली. सन १४४३ त जुलईच्या ४ थ्या तारखेस अहमदशहा अहमदाबाद येथें मरण पावला. असें सरदेसाई लिहितात पण स्मिथ अहमदशहाच्या मृत्यूचा सन १४४१ हा देतो.

अहमदशहा हा मोठा न्यायी होता अशी त्याची कीर्ति आहे. त्यानें रजपुतांशीं शरीरसंबंध केले त्याच्या पश्चात् त्याचा पुत्र महंमदशहा गुजराथच्या तख्तावर बसला. [मु रियासत. बील स्मिथ—इंडिया]

**अहमदशहा**—( १७४८–१७५४ ) दिल्लीचा एक मोंगलबादशहा. याचें संबंध नांव मुजाहिदुद्दीन महंमद अबुन नश्र अहमदशहा बहादुर असें होतें. बादशहा महंमदशहा याचा हा पुत्र. याच्या आईचें नांव उधम बाई असें होतें. याचा जन्म दिल्लीच्या किल्ल्यात १७२५ मध्यें झाला. व राज्याभिषेक पानिपत येथें १७४८ त झाला. राज्यारोहण करण्यापूर्वी थोडेच दिवस यानें अहमदशहा अब्दालीचा सर हिंद येथें चांगलाच पराभव केला होता. याच्या प्रमुख सरदारात अधिकारासंबंधीं तंटे उपस्थित झाले अब्दाली पुन्हा १७५१ मध्यें पंजाबात आला असता अहमदशहानें त्याला लाहोर व मुलतान हे परगणे देऊन वाटेस लाविलें. मराठ्यांच्या स्वाऱ्या बादशाही मुलखात होतच होत्या गाजीउद्दीन नावाच्या सरदारास वजीरी पाहिजे होती. तेव्हां त्यानें मराठ्यांचें साहाय्य घेऊन बादशहाला कैद केलें; व त्याचे डोळे काढिले. त्यानंतरहि तो २१ वर्षें जगला; व दुखण्यानें १७७५ त मरण पावला. दिल्ली येथील मर्यम मकानीमध्यें कदम शरीफच्या मशिदीसमोर अहमदला पुरण्यात आलें. याला कैद झाल्यावर जहांदरशहाचा मुलगा दुसरा अलमगीर गादीवर बसला. [बील. मुसुलमानी रियासत.]

**अहमदशहा अब्दाली**—सन १७२४ मध्यें अहमदखानाचा जन्म सद्दोसाई जातीमध्यें झाला. हाच पुढें अहमदशहा अबदाली या नावानें प्रसिद्ध झाला. याच्या बापाचें नांव सम्मानखान. हा अबदाली टोळीचा वंशपरंपरेनें मुख्य होता. लहान असताना अहमदशहा गिलझाईस या शत्रु टोळीच्या हातीं सांपडला. त्या लोकांनीं अहमदाला कंदाहार येथें कैदेंत टाकिलें. तेथून नादिरशहानें त्याची १७३८ त सुटका केली, व एका घोडदळाचा मुख्य केलें. नादिरशहाच्या खुनानंतर म्हणजे सन १७४७ मध्यें अहमदशहा स्वतंत्र झाला व त्यानें नादिरशहाची तीस लक्ष रुपयांची ठेव आणि कंदाहार काबिज केलें व आपल्या अबदाली टोळीचें नांव बदलून दुराणी असें ठेविलें. पुढें सन १७४८ मध्यें त्यानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली. यावेळीं अहमदशहा सरहिंदपर्यंत आला होता परंतु सरहिंद येथें त्याची व दिल्लीच्या फौजेची गांठ पडून दिल्लीचा युवराज अहमद याकडून त्याचा पराजय झाला यानंतर सन १७४८ च्याच हिंवाळ्यात दुसरी स्वारी केली. यानंतर सन १७५२ सालीं त्यानें तिसरी स्वारी केली हींत व पुढें सन १७६१ सालीं केलेल्या स्वारींत पुष्कळच साम्य आहे. यावेळीं अबदालीचा मुक्काम रावी नदीच्या पलीकडील तीरावर असून लाहोरचा सुभा मीरमन्नूहा अलीकडे होता. पुढें लवकरच दोन्ही सैन्यें समोरासमोर येऊन त्यांची लढाई झाली. तींत मीरमन्नु मागें सरला व लाहोरचा आश्रय करिता झाला अबदालीनें त्याची रसद बंद केली.- तेव्हा मीरमन्नूच्या फौजेची उपासमार सुरू झाली. शेवटीं तारीख १२ एप्रिल १७५२ रोजीं मीरमन्नूनें आपल्या सैन्यासह अबदालीवर चाल केली; व त्याचा भयंकर संग्राम झाला. लढाई ऐन रंगात आली व मीरमन्नूचा जय होईल असें अबदालीसहि वाटूं लागलें. इतक्यात मीरमन्नूचा सेनापति कौरामल हा हत्तीवर बसून लढत असतां त्याच्या हत्तीचा एक पाय खळग्यात गेला व तें जनावर एकदम खालीं बसलें इतक्यात एकानें कौरामलाचें डोकें कापून नेलें. सेनापतीची ही अवस्था होताच सैन्यात एकदम हाहाकार उडाला व जो तो जीव बचावासाठीं पळूं लागला, व याप्रमाणें मीरमन्नूचा पराजय झाला. या स्वारींत मीरमन्नूला ज्याप्रमाणें त्यानें लाहोरास कोंडून त्याच्या फौजेची उपासमार केली त्याचप्रमाणें पानपतच्या स्वारींत भाऊसाहेबाच्या सैन्याची त्यानें अन्नान्नदशा केली. हें युद्ध रावी नदीच्याजवळ झालें, तर पानपतची लढाई यमुना नदीच्या तीरावर झाली. या लढाईत हत्तीवर बसलेला कौरामल मारल्यामुळें अहमदशहास जय मिळाला, तर पानपतच्या युद्धात विश्वासराव पडल्यानें मराठ्यांचा पराजय झाला. येथपर्यंतच्या हकीकतीनें साम्य आहे. पण पुढें मीरमन्नु अहमदशहास शरण गेला व मानी भाऊसाहेबानें समरांगणास शिर वाहिलें असो. यानंतर इ. स. १७५५–५६ मध्यें अहमदशहानें चौथी स्वारी केली. यावेळीं मोंगल बादशहाचा वजीर मीर शहाबुद्दीन यानें मुलतान व काबूल प्रांत परत घेऊन तेथें आपला सुभेदार नेमल्याचें अबदालीस कळल्यानें त्यानें हिंदुस्थानात स्वारी केली व हे प्रांत पुन्हा हस्तगत केले (१७५५)

यानंतर त्यानें दिल्ली व मथुरा हीं शहरें लुटलीं. तेथील लोकांची कत्तल करून स्त्रिया भ्रष्ट केल्या. पुढें तो आग्र्यास आला, पण येथें त्याच्या छावणींत सांथीचा उद्भव झाल्यामुळें त्यास परत फिरावें लागलें. इ. स. १७५६ च्या आरंभीं अहमदशहा काबूल शहरीं जाऊन पोंचला. दिल्लीहून निघण्यापूर्वी त्यानें आपला मुलगा तिमूरशहा याकडे लाहोर मुलतान आदिकरून सर्व पंजाब प्रांताच्या सुभेदारीचें काम सांगून त्यास तिकडे रवाना केलें होतें.

इ. स. १७५८ त राघोबा दादानें अहमदशहा अबदालीच्या सरहिंदच्या सुभेदाराचा पूर्ण पराजय करून लाहोर व मुलतान या प्रांतावर अदीनाबेग यास आपल्या वतीनें सुभेदार नेमल्यामुळें, ते प्रांत परत घेण्याकरितां अहमदशहानें हिंदुस्थानात पाचव्यानें स्वारी केली [ १७५९ अखेर किंवा १७६० च्या आरंभी ], येथें ठेवलेल्या मराठ्यांच्या फौजेस पिटाळून लावून तो यमुना नदी ओलांडून अलीकडे आला. नजीबउद्दौला रोहिल्यानें त्याला हिंदुस्थानात स्वारी करण्याकरिता आमंत्रण केलेंच होतें व दुसऱ्या अलमगीर बादशहाचाहि त्याच्याशीं कांहीं पत्रव्यवहार झाला होता असें म्हणतात. अहमदशहा येताच नजीब उद्दौला त्यास जाऊन मिळाला, व नंतर सुजाउद्दौल्यासहि त्यानें आपल्याकडे वळवून घेतलें. उत्तर हिंदुस्थानातील इतर मुसुलमान सरदारहि पुढें त्यास येऊन मिळाले. या सर्वांच्या मदतीनें पानिपतच्या युद्धात त्यानें मराठ्यांचा पराजय केला. [ १७६०—१७६१ पानिपतचें युद्ध, पहा ] यानंतर त्यानें दिल्लीचें तख्त शहाअलम बादशहास देऊन सुजाउद्दौला यास त्याचा वजीर केलें, व नजीब उद्दौल्यास त्याच्या अमीर उल्—उमराच्या हुद्यावर पुन्हा अधिष्ठित करून तो स्वदेशी परत गेला ( १७६१ ). अहमदशहाची या वेळीं संबंध हिंदुस्थान जिंकण्याची मोठी महत्त्वाकांक्षा होती पण त्याच्या सैन्यानें अलेक्झांडरच्या सैन्याप्रमाणें झाला मागें ओढलें.

सन १७६२ मध्यें त्यानें सहाव्यानें हिंदुस्थानावर स्वारी केली. पुढें सन १७६४ मध्यें सातवी व सन १७६७ मध्यें आठवी या प्रमाणें त्यानें एकंदर आठ स्वाऱ्या हिंदुस्थानवर केल्या. नासुराच्या विकारानें अहमदशहा सन १७७३ च्या जून मध्यें मरण पावला असें लतीफनें पंजाबच्या इतिहासांत लिहिलें आहे. रा. सरदेसाई मराठी रियासत मध्यविभाग ३ यात अब्दाली १९ आक्टोबर १७७२ रोजीं काळपुळीच्या विकारानें चमन नजीक वारला असें लिहितात.

अहमदशहा शिस्तीचा पूर्ण भोक्ता असून न्यायी असे. प्रजेस संतुष्ट ठेवण्याकडे त्याचें नेहेमीं लक्ष असे. तसेंच तो विद्वानाचा चहाता व स्वतः सुशिक्षित असून तैमुर, नादिरशहा वगैरे मनस्वी क्रूर असलेल्या राजाप्रमाणें तो कांहीं वेळां वागला असला तरी त्यांच्यापेक्षा पुष्कळ पटीनें श्रेष्ठ होता यांत संशय नाहीं. युद्धकलेंत तो फार निष्णात असे. [ सुलतान महमदखान बारकझईचें 'तारीख सुलतानी' चें भाषांतर. ग्रँटडफचा मराठ्यांचा इतिहास. व्हिन्सेंट स्मिथ—इंडिया. ए वि साहविचार-वर्ष १ अंक १. सरदेसाई—मराठी रियासत, मध्यविभाग ३. वि. विस्तार वर्ष ५४ अं. ९ *या मधील पुस्तक परीक्षणासह सीलचा कोश* इ ]

**अहमदशहा वली,** ( सन १४२२–१४३५ )—एक बहामनी राजा. आपला भाऊ सुलतान फिरोझ यास पदच्युत करून हा गादीवर आला. अहमदशहा हा विद्वान व साधु लोकास फार मान देत असे, म्हणून त्यास वली (साधु) हें नांव मिळालें. सय्यद महंमद गिसू दुराज या साधूच्या घराण्यास त्यानें मोठमोठीं इनामें करून दिलीं. मागील शहाच्या प्रधानास त्याच्या पहिल्या जागेवर कायम केलें आणि फौजेची शिस्त सुधारली. तसेंच पुतण्या हसन यास फौजेंत असामी व राहण्यास स्वतंत्र वाडा दिला. येणेंप्रमाणें अनेक सत्कृत्यानीं या शहानें रयतेची प्रीति संपादन केली. नेहमींप्रमाणें विजयानगर व केरळ येथील राजानीं शहाबरोबर युद्ध आरंभिलें. सन १४२३ सालीं दक्षिणेंत मोठा दुष्काळ पडला. सन १४२४ सालीं वारंगळच्या राजावर अहमदशहानें स्वारी केली आणि राजास ठार मारून, बहुतेक सव प्रांत जिंकिला. तसेंच त्यानें अनेक हिंदु लोकास ठार मारिलें, आणि बायका पोरास बाटवून मुसुलमान केलें. ह्या स्वारींत शहास एक हिऱ्याची खाण सापडली. सर्व मुलखात हिंदु लोकाचीं असलेलीं देवळें पाडून तेथें त्यानें मशिदी बांधविल्या, आणि त्याच्या खर्चास उत्पन्नें बांधून दिलीं. वऱ्हाड प्रांतांतील गाविलगड व नरनाळा हे दोन जुने किल्ले शहानें दुरुस्त केले. सन १४२६ सालीं माळव्याच्या सुलतानाशीं लढाई करून, त्याचा अहमदशहानें पराभव केला. नंतर बेदरनजीक शहा शिकारीस गेला असता, तेथें एक नवीन शहर वसवावें असें मनात येऊन, त्यानें अहमदाबादबेदर नावाचें शहर वसविलें. बेदर हीं पूर्वी हिंदु राजाची राजधानी होती. बेदरास अहमदशहानें खडकावर एक किल्ला बांधिला, तो अत्यंत बळकट म्हणून नावाजलेला होता. हें नवीन शहर त्यानें आपली राजधानी केली. नंतर कित्येक दिवसपर्यंत कोंकणपट्टी व गुजराथ ह्या प्रांतात शहाच्या स्वाऱ्या चालू होत्या. मेसापोटेमिया प्रांतात कर्बेला म्हणून १४ सय्यदाचें ठिकाण आहे. त्या ठिकाणच्या सय्यदास शहानें अनेक दानधर्म केले. त्यानें इराण वगैरे देशांतून पुष्कळ साधूंस इकडे आणविलें. सन १४३५ त अहमदशहा मरण पावला याची कबर अहमदशहाबेदर येथें बांधली. [ मुसुलमानी रियासत, स्मिथ—इंडिया, बील वगैरे ]

**अहमदाबाद—,** जिल्हा (मुंबई इलाखा) उत्तर भागातील एक जिल्हा. उ अ. २१° २६' ते २३° ३१' व पू रे. ७१° १९' ते ७३° २७'. क्षेत्रफळ ३८१६ चौरस मैल.

सीमा—पश्चिम व दक्षिण दिशेस काठेवाड द्वीपकल्प, उत्तरेस बडोदें संस्थानचा उत्तर भाग; ईशान्येस महिकांठा

एजन्सी, पूर्वेस बालासिनोर संस्थान व खेडा जिल्हा आणि पश्चिमेस खंबायतचें आखात व संस्थान.

स्वरूप—या प्रांताच्या एकंदर रचनेवरून असें दिसतें कीं, येथें फार पुरातन काळीं नव्हे तर बरेच अलीकडे समुद्र होता. खंबायतचें आखात व कच्छचें रण यांच्यामधील मुलूख अजून भरतीच्या वेळीं पाण्यानें व्याप्त होतो. अगदीं दक्षिणेस आणि उत्तर सीमेच्या जवळ थोडेसे दगडी पहाड आहेत बाकी एकंदर प्रदेश सपाट मैदान असून पूर्व व उत्तर दिशाकडे चढ आहे.

या प्रदेशाचें मुख्य अंग म्हणजे साबरमती नदी. ही ईशान्येस अरवली डोंगराच्या एका टोकास उगम पावून नैर्ऋत्येस वाहात जाऊन खंबायतच्या आखातास मिळते. खारी, मेश्वा, आणि माझाम या नद्या हीस मिळतात. याशिवाय पूर्वेस वाहात जाणाऱ्या नद्या—भोगाव, भादर, उटावली, निलकी, पिंजरीया, आणि अंधिया. खारी नदीचा एक १६ मैल लांबीचा कालवा काढून त्यानें ३००० एकर जमिनीस पाणी पुरविलें आहे. नाल या नांवाचें एक मोठें सरोवर अहमदाबाद शहरापासून ३७मैलांवर विरमगाव तालुक्यात आहे. त्याचें क्षेत्रफळ ४९ चौरस मैल आहे. धोलेरा, गोघा, व बवलिआरी या तीन महत्त्वाच्या खाड्या आहेत.

या जिल्ह्यातील जमीन बहुतेक मळईची बनलेली आहे पण मळई खोलपर्यंत नाहीं. त्या खालील थर बहुधा त्रिस्तर ( टर्शिअरी ) व सितोपल ( क्रेटेसिअस ) कालांतील असावेत. दक्षिणेकडच्या माळवधरी दगड धंधुका तालुक्यासारख्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतो. एकंदरींत सर्व प्रदेश रुक्ष असून झाडी फार थोडी आहे.

मुख्य झाडें—आंबा, मोह, लिंब, हलका सागवान, बाबू तसेंच खैर, बाभूळ, पिंपळ व बोर्डि हीं झाडें मोडास डोंगरावर होतात. याचा उपयोग खाण्याकडे, औषधीकडे, व रंग व कातडीं कमविण्याकडे होतो. खैर, व बाभूळ याचा डिंक लोक खातात. पिंपळ व बोर्डि या झाडापासून लाख तयार होते. मोहाचीं फळें धान्याबरोबर उकडतात. डोरी झाडाचीं पानें हीं भिल्ल लोकांचें आवडतें अन्न आहे. त्याच्या बियापासून निघणाऱ्या तेलाचा साबण बनतो.

जंगलांतील वाघ बहुतेक नाहींसे झाले आहेत. मोडासमध्यें चित्ते आहेत व लांडगे, नालसरोवरच्या काठीं असतात. रानटी कुत्रे पुष्कळ आहेत. मासेहि विपुल मिळतात.

उष्णतामान किमान ४७° अंशावर येतें व कमाल म्हणजे ११५° पर्यंत चढतें.

पावसाचें सरासरी मान २९ इंच असतें. प्रदेश सखल व सपाट; व नद्यांचे प्रवाह वाकडे तिकडे असल्यामुळें पुरामुळें पुष्कळ नुकसान पोहोंचतें.

इतिहास—( इ. स. ७४६–१२९८ ) अनहिलवाड राजांच्या कारकीर्दींत येथील जमिनींत पहिल्यानें नांगरून पीक घेण्यास सुरवात झाली हे राजे जरी बलवान व संपत्तिवान् होते तरी त्यांच्या काळीं तसेंच गुजराथच्या मुसुलमानी राजांच्या काळीं पुष्कळ प्रदेश भिल्ल नायकांच्या ताब्यात होते.

जेव्हां अकबरानें गुजराथ आपल्या राज्यास जोडिली तेव्हां या भिल्ल नायकांनीं त्याचें मांडलिकत्व कबूल केलें. मुसलमानी राज्याच्या वेळीं अहमदाबाद सरकार हें गुजराथ सुभ्याचें राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण होतें. सध्याचा अहमदाबाद जिल्हा हा पूर्वीच्या "सरकार" एवढाच आहे. इ. स. १७५३ मध्यें मराठ्यांनीं हा प्रांत जिंकून घेतला. त्यांनीं मध्य प्रदेशांत राज्यव्यवस्था केली पण बाजूचे संस्थानिक जोपर्यंत नियमानें वागून खंडणी देण्यास तयार होते तोपर्यंत त्यांना त्रास पोहचला नाहीं इ. स. १८०३ मध्यें इंग्रजांना हा प्रांत मिळाल्यावर त्यांनीं पूर्वीचे संस्थानिक तसेच ठेवले फक्त खंडणीची रक्कम पुष्कळ वाढविली.

भावनगरच्या राजानीं धोलेरा भागात आपणाकरितां मुलूख मिळविण्याची खटपट केली. धोलेरा संस्थानानें मुंबई सरकारनें आपणास, आपल्या संरक्षणाखालीं घेऊन जुलुमापासून बचाव करावा अशी विनंती केली. इ. स. १८०२ मध्यें गायकवाडाच्या ( पेशव्याचा मुखत्यार ) संमतीनें तें संस्थान इंग्लिशानीं आपल्या संरक्षणाखालीं घेतलें. इ. स. १८०३ मध्यें धोलेरा हें तैनातफौजेच्या खर्चाकरितां इंग्लिशाच्या ताब्यात देण्यात आलें.

इ. स. १८०५ पासून ही ठिकाणें खेडा कलेक्टराच्या अमलाखालीं आलीं. इ. स. १८१८ मध्यें पेशवाई मोडल्यावर अहमदाबाद निराळा जिल्हा करण्यांत आला.

या भागांत कलेच्या दृष्टीनें उत्तम हिंदु व मुसलमानी इमारती, अहमदाबाद शहर व उपांत भाग जो सरखेज व बाटवा, तेथें पुष्कळ आहेत. धंधुका तालुक्यांतील भीमनाथ गांवीं एक शंकराचें देवालय आहे. त्याचा संबंध पांडवांशीं पोहचवितात. अदालज मुक्कामीं अहमदाबाद शहराच्या उत्तरेस १२ मैलांवर एक उत्तम पायऱ्यांची विहिर आहे.

लोकवस्ती—इ. स. १८५७ मध्यें या जिल्ह्यातील लोकसंख्या अजमासें ६५०२२३ होती. इ. स. १८९१ मध्यें ९२१५०७ होती पण १८९१ ते १९०१ या दहा वर्षांत दुष्काळ व महामारीच्या उपद्रवानें पुष्कळ लोक नाहींसे झाल्यामुळें त्या वर्षी लो. सं. ७९५९६७ होती यांतील ९०७४५ लोक साक्षर होते; हिंदुलोक शेंकडा ८४ व मुसलमान लोक शेंकडा ११ व ख्रिश्चन लोक ३४५० होते १९२१ सालीं लोकसंख्या ८९०९११ भरली. म्हणजे १९११ सालातल्या पेक्षां शेंकडा ७ ६ नीं वाढली. प्रांताची भाषा गुजराथी आहे.

मुख्य शहरें—अहमदाबाद, विरमगाव, धोलका धंधुका, प्रांतिज, धोलेरा, मोडास, व सानंद हीं होत. व्यापारी वर्गाचें ( बनिया ) महत्त्व विशेष आहे. श्रावक अथवा जैन

व्यापारी ब्राह्मणानुयायी व्यापाऱ्यापेक्षां जास्त सधन आहेत. जरी अहमदाबाद हें मुंबई इलाख्यांत पहिल्या प्रतीचें कारागिरीचें ठिकाण आहे तरी पुष्कळ लोक शेतकीवर उपजीविका करतात. शेतकरी वर्गांत कुणबी, रजपूत, कोळी, बोहरी व दुसरे मुसुलमान लोक येतात मुलींचीं लग्नें अतिशय खर्चाचीं बाब असल्यामुळें मागें मुली मारण्याचा प्रघात होता, तो कायद्यानें बंद करावा लागला.

केडा कुणब्यांत प्रचारांत असलेले विवाह विधी ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. जेव्हां चांगलें स्थळ मिळणें अशक्य होतें तेव्हां मुलीचें लग्न एका पुष्पगुच्छाशीं लावितात व तो गुच्छ विहिरीत फेंकून देऊन ती मुलगी विधवा झाली असें समजून मग तिचा कमी खर्चाच्या नात्र पद्धतीनें विवाह लावतात. दुसरा प्रकार म्हणजे विवाहित माणसाशीं पूर्वी काडी मोडून देण्याचा ठराव करून, मुलीचा विवाह मग नात्र पद्धतीनें कोणाशींहि करण्यास मोकळीक होते.

रजपूत शेतकऱ्याचे दोन भेद आहेत. एक गरासिया किंवा जमीनदार, व दुसरा खंडानें जमीन करणारा. ख्रिश्चन लोकाची संख्या कमी नाहीं मिशनऱ्यांचा सुळसुळाट इकडेहि बराच आहे.

शेतकीः—जमीन दोन प्रकारची आहे. एक काळी व दुसरी गुरकट पांढरी. साबरमती नदीच्या खोऱ्यांत जमीन सर्वांपासून झाली आहे. कांहीं ठिकाणीं जमीन बेळगाव जिल्ह्याप्रमाणें तांबूस दगडाची आहे.

जमीनधाऱ्याच्या पद्धती दोन प्रकारच्या आहेत. एक तालुकदारी व दुसरी रयतवारी. शेंकडा ६ जमीनी इनाम आहेत.

मुख्य पिकें—गहूं, बाजरी, जोंधळा, कापूस, भात. इ.

गुरें.—धंधुका तालुक्यांतील गाई फार दूध देणाऱ्या असतात. सर्व इलाख्यांत घोड्यांची निपज चांगली होते. सरकारी बक्षू घोडे असून काबुली व्यापारी काठेवाड, सिंध, अरब या जातींच्या घोड्यांची पैदास करतात.

व्यापारः—साराघोडा येथें. दोन मिठागरें आहेत. सुती कापड, पितळेचीं व तांब्याचीं भांडीं, मातीचीं भांडीं, लांकडावरील खोदींव काम व जोडे, ब्लँकेटें इत्यादि जिन्नस तयार होतात. हा भाग गुजराथच्या सुलतानाच्या ताब्यांत आल्यापासून येथील कारागिरांची त्यांच्या कौशल्याबद्दल तसेंच जिनसाच्या सुबकपणाबद्दल ख्याति आहे. इ स. १९०४ मध्यें येथें ३८ सुताच्या गिरण्या होत्या व त्यांत ६३६६३० चात्या व७८५५ माग चालू होते.व १५०००००० पौंड सूत व २८०००००० पौंड कापड तयार झालें. आज त्यापेक्षां पैदास पुष्कळच वाढली आहे आणि लोखंडी बादली तयार करणें जोरानें चालू आहे.

येथ व्यापारी संघ इतर ठिकाणापेक्षां जास्त पूर्णावस्थेस पोहोंचले आहेत. प्रत्येक धंद्यातील कारागीर अथवा व्यापारी याच्या एखाद्या संघाचा सभासद असतो. अशा संघांत प्रत्येक घराण्यांतील वडील मनुष्य येऊं शकतो. प्रत्येक सभासदाला मत देण्याचा अधिकार असतो व निकाल बहुमतानें ठरतो. जेथें एकाच धंद्याचे पुष्कळ विभाग असतात तेथें प्रत्येक विभागाच्या कारागिरांचा एक स्वतंत्र संघ असतो. या संघाचा उद्देश कामाचे तास व दिवस नियमित ठरवून धंद्यांतील माणसांची आपापसांतील चढाओढीस सुमार ठेवावयाचा. संघाचा निकाल मानला नाहीं तर दंड करण्यांत येतो. व दंड न दिल्यास त्या माणसास जातिबाह्य करण्यांत येतें. जर निरनिराळ्या जातींच्या लोकांचा तो संघ असेल तर संघांतील माणसें संघाचे ठराव न मानणाऱ्यास काम मिळूं देत नाहींत. दंडाशिवाय धंद्यांत नव्यानें शिरणाऱ्या माणसाला कांहीं फी द्यावी लागते. ती रु. ५० पासून ५०० पर्यंत धंद्याच्या महत्त्वाप्रमाणें असूं शकते. या होणाऱ्या उत्पन्नांतून जातीचीं जेवणें व धर्मादाय होतो.

इ. स. ७४६पासून सोळाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत अहमदाबाद व्यापाराचें मुख्य ठिकाण होतें. परंतु पुढें सुरतेचें पाऊल पुढें पडूं लागलें तसें अहमदाबादचें महत्त्व कमी होऊं लागलें.

आयात व निर्गत माल अनुक्रमेः—साखर, लांकूड, धातू, धान्य, नारळ. व निर्यात मालः—कापूस, गळिताचीं धान्यें.

येथील व्यापार धोलेरा व घोगा या बंदरांतून मुंबई बेटाशीं चालतो.

दळण वळणः—आगगाडी या भागांत सुरू होण्यापूर्वी माळवा व मध्यहिंदुस्थानचा व्यापार अहमदाबादमार्फत होत असे. सर्व व्यापार बैलांच्या गाड्या व तांडे यावरून होई. पन्नास वर्षांपूर्वी या भागांत सडका नव्हत्या व पावसाचे दिवसांत व्यापार चालणें अशक्य होई. इ.स १८७०पासून पुष्कळ रस्ते करण्यांत आले आहेत. इ. स. १९०३–०४ मध्यें १२४ मैल सडक व ३३७ मैल कामचलाऊ रस्ते तयार झाले होते. तसेंच बॉंबे बरोडा रेल्वे, राजपुताना माळवा स्टेट रेल्वे, मेहसान-विरमगाव फाटा वगैरे या प्रदेशांतून जातात.

कारभारः—अहमदाबाद जिल्ह्याचे सहा तालुके आहेत. ते असे—दस्क्रोइ, सानंद, विरमगाव, धोलका, धधुका, परांतीज; कलेक्टरच्या हाताखालीं दोन असिस्टंट कलेक्टर व एक डेप्युटि कलेक्टर हे सर्व व्यवस्था पहातात.

एक जिल्हा व एक सेशन्स न्यायाधीश आहे. त्याला खेडा जिल्ह्यांतील खटले तपासण्याचा अधिकार आहे. त्याच्या हाताखालीं पांच मुनसफ, एक स्माल कॉझेस कोर्टाचा जज्ज, एक दुय्यम जज्ज व एक सहकारी जज्ज असतात. अहमदाबाद शहराला एक स्वतंत्र म्याजिस्ट्रेट असतो.

अहमदाबाद जिल्ह्यांत विशेष गोष्ट ही आहे कीं, येथील तालुकदार आणि मेवाशी लोकांच्या ताब्यांत मोठाल्या जमिनी आहेत. हे हिंदु व मुसलमान या दोन्ही जातींचे लोक आहेत.

त्यांतील चुडासमा लोक पूर्वीच्या जुनागड येथील हिंदु राजघराण्यांतील वंशज आहेत. वाघेल जातीचे लोक सोळंकी वंशातील आहेत. गोहेल लोक मारवाडांतून फार पुरातन काळी आलेले आहेत. तसेंच झाल लोक पश्चिमेकडून आले. त्याने मकवाण म्हणून माहीत होते. तसेंच मुसुलमान व हिंदु राजाचे आवडते लोक ( कीं ज्याना त्यानीं मोठाल्या जमिनी बक्षीस दिल्या ) असें या तालुकदार लोकांत पुष्कळ आहेत. तालुकदार पूर्ण मालक असतात. फक्त त्याना सरकारला एक ठराविक रकम द्यावी लागते.

इ. स. १९०३ सालचें जमिनीचें उत्पन्न २३,६९,००० व एकंदर उत्पन्न ६७,३४,००० रुपये होतें.

प्रथम गोघा व परातीज गावाना म्युनिसिपालिटीचा हक्क मिळाला. नंतर पुढें पाच वर्षांत धोलका, अहमदाबाद, विरमगाव, मोडास, धधुका याना म्युनिसिपालिटी मिळाली.

इ. स. १९०१ मध्यें साक्षर लोकांचें प्रमाण शेंकडा११ ४ होतें. पुरुषाचें प्रमाण शेंकडा २०.५ व बायकांचें शेंकडा १.७ होतें.

इ. स. १९०३-४ मध्यें ४०१ शाळा असून ३१४६० मुलें व मुली शिकत होत्या त्यात ८ सरकारी, ६१ म्युनिसिपालिटीच्या, १९७ लोकलबोर्डच्या व ४२ सार्वजनिक फंडातून चाललेल्या आहेत अहमदाबाद शहरांत एक "आर्ट्स कॉलेज" व दोन शिक्षक तयार करण्याच्या शाळा आहेत. एकंदर शिक्षणाप्रीत्यर्थ ३॥ लाख रुपये खर्च होतात व फीचें उत्पन्न ७०००० रुपये होतें.

पाच खाजगी दवाखाने सोडून आणखी या जिल्ह्यात ३ इस्पितळें व १८ दवाखाने आहेत व इ. स. १९०४ मध्यें १८४००० लोकाना औषधोपचार करण्यात आला व त्यापैकीं ४३६४ रोग्याना इस्पितळात ठेवून घेण्यात आलें. एकंदर खर्च ५५५०० झाला, त्यापैकीं १०००० म्युनिसिपालिटी व लोकलबोर्ड यानीं सोसला. अहमदाबाद शहरीं एक पागलखाना आहे, त्यात १०८ वेड्याची सोय आहे

इ. स. १९०३-४ सालात १९००० लोकाना देवी टोंचण्यात आल्या.

शहर.—जिल्ह्याचें मुख्य ठिकाण उत्तर अक्षांश२३° २' व पूर्व रेखांश ७२°३५'. हें मुंबईपासून ३१० मैलावर बाँबे-बरोडा आणि सेंट्रल रेल्वेचें एक स्टेशन आहे.

या शहराच्या भरभराटीच्या काळीं येथें ९ लाख वस्ती होती असें म्हणतात. तसेंच हें संपत्तीचें माहेरघर होतें १८व्या शतकाच्या उत्तरार्धात या शहराचा ऱ्हास होऊन लोकवस्ती पुष्कळ कमी झाली. मुंबई इलाख्यात हें दुसऱ्या नंबरचें शहर आहे. इ. स. १९०१ च्या खानेसुमारींत १,८६,८८९ लोकसंख्या होती. त्यापैकीं हिंदु लोक शेंकडा ७० म्हणजे १.२९,५०५ असून हाच वर्ग श्रीमान व वजनदार होता महत्वाच्या दृष्टीनें दुसरा वर्ग म्हणजे जैन लोक त्यांची संख्या १५,४६० आहे. हे सर्व व्यापार व सावकारी करणारे आहेत. कोष्टी व इतर कारागीर लोक कुणबी वर्गांत मोडतात. मुसुलमानांची संख्या ३८१५९ होती. १९२१ सालीं लोकवस्ती २७४००७ होती. ही संख्या १९११ तील पेक्षा ४१२३० नें जास्त आहे. हें शहर गुजराथ जैन पंथाचें मुख्य ठिकाण असून येथें १२० जैन मंदिरें आहेत. वर्षास २४ जत्रा भरतात व दर तीन वर्षांनी अनवाणी शहर प्रदक्षिणा करण्याचा समारंभ होतो.

गुजराथचा सुलतान अहमदशहा याच्या नावावरून या शहरास अहमदाबाद हें नाव प्रचारात आलें. त्यापूर्वी अनहिलवाडचा सोळंकी रजपूत घराण्यातील राजा करण याचें अशावल नांवाचें शहर या ठिकाणीं होतें. हें साबरमती नदीच्या पश्चिम तीरावर समुद्रसपाटीपासून १७३ फूट उंचावर वसलेलें आहे. या शहराचे तट पूर्वपश्चिम असून त्याची उंची १५ ते २० फूट आहे त्याला १४ वेशी आहेत. नदीचें पात्र ५०० ते६०० यार्ड रुंद आहे व शहर रुपारीवर वसले असल्यामुळें पुरापासून पुष्कळ त्रास पोहोंचतो इ स. १८७५ मध्यें मोठा पूर येऊन ५ लाखावर नुकसान झालें

इतिहास.—पहिल्या सुलतान अहमदनें ४११ त हें शहर राजधानी करून त्याला चार अहमदावरून अहमदाबाद हें नाव दिलें. या शहराच्या इतिहासाचे, दोन भरभराटीचे, दोन उतरत्या काळचे व एक उर्जितावस्थेचा असे पाच भाग पाडता येतील १५ व्या शतकात या शहराची भरभराट होती व त्याचें बरेचसें श्रेय सुलतान महंमद बेगडा ( १४५९-१५११ ) कडे जातें. त्याच्या मरणानंतर ६० वर्षे अहमदाबादला उतरती कळा लागली; परंतु १५७३ त अकबर बादशहानें हें शहर जिंकल्यापासून १६ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत त्याला पुन्हा पूर्व स्थिति प्राप्त झाली. या सुमारास हें शहर फक्त हिंदुस्थानातच नव्हे तर सर्व जगात उत्तम म्हणून त्याची ख्याती होती. १७ व्या शतकाच्या आरंभीं हीच स्थिति होती. इंग्लिश व डच लोकासारखे परकीय व्यापारी येथें आले व अमदाबाद लंडन इतकें विस्तृत असल्यामुळें त्यावेळच्या आंग्ल व्यापाऱ्याना तें फार आवडत असे. या सुमाराला कापड विणणें, खोदीव व कातीव काम करणें, चित्रें काढणें व जरीचीं कामें करणें या सर्व धंद्यात येथील कारागीर फार कुशल होते. १६९५ त रेशमाच्या व जरीच्या कामावर फुलें व पक्षी यांची वेलबुट्टी काढण्यात तें व्हेनिस शहराच्या बरोबरीचें होतें असा एके ठिकाणीं उल्लेख आहे.

औरंगजेबाच्या मरणानंतर येथें अदाधुंदी सुरु झाली व १७३८ ते १७५३ पर्यंत मुसुलमान व गायकवाड याची दुहेरी सत्ता होती.

बाळाजी बाजीरावाच्या कारकीर्दीनंतरच्या कथेची आठवण देणारीं काहीं पत्रें उपलब्ध आहेत तीं येणेंप्रमाणें—

बारभाईनीं पुण्यास सवाई माधवरावास गादीवर बसवल्यानंतर राघोबा दादा उत्तरेंत जाऊन इंग्रजास मिळाला.

त्यावेळच्या त्याच्या हालचालींसंबंधीं पत्रव्यवहारांत शके १६७२ [इ. सन १७५०] पासून पुष्कळ उल्लेख आढळतात.

१६७२ कार्तिकांतर्गत गुजराथपैकीं अहमदाबाद महालाचा भरणा रसद पेशव्याकडे आल्याचा उल्लेखहि एका पत्रांत सांपडतो. ( रा. खं. ६. २१०, ३०८ )

१६७४ शके या वेळचे पेशवे व गायकवाड यांच्यामध्यें गुजराथ प्रांतातील परगण्याचीं वांटणी झाली त्यांत अमदाबाद पेशवे यांच्याकडे राहिला असें एक पत्र आहे ( रा. खं. ६. २७९, ३३९ )

" सन ११६४ समस खमसैन मया व अलफ त्याखालीं अमदाबाद किल्ला येथें श्रीमंताच्या फौजाचा शाहा बैसोन लढाई मातबर जाहाली. हल्ला करून अमदाबादचा किल्ला सर केला. ठाणें श्रीमंतांचें बैसलें " ( रा खं. ११ लेखांक ६६ पान ५७. शके १६७७)

"इंग्रजाची उमेद अमदाबाद घेण्याची आहे" असें बाजी गंगाधर मु॥ वेलापुर; पेशव्यास कळवितो. १६९६ फाल्गुन शुद्ध १२. ( रा. खं. १०. १५७, १०१ ).

राघोबादादा बडोदे अमदाबाद घेण्याची मसलत करीत आहे पण इंग्रजाच्या मध्यस्थीमुळें तसें करितां येईना म्हणून धुळधुळ करीत आहे. असें एक पत्र १६९७ आश्विन वद्य ५ चे आढळते. ( रा. खं. १२. १०२. ५९–६० )

" अमीनखान अमदाबादेस गेले आहेत त्यास, अमदाबादेचें कामकाज होणार नाहीं व इंग्रजाचा शब्द लागेल ऐसा वर्तणूक होऊं नये येविसीं अमीनखानास सूचना लिहून सैमो ल्याहावी " असा १६९७ मार्गशीर्ष महिन्यातील एका अर्धवट सांपडलेल्या पत्रांत मजकूर आहे. यावेळीं धमालेकर मुंबईकरांचें ऐकून आपला पक्ष घेतील कीं नाहीं हा राघोबास विवंचना दिसते. ( रा. खं. १२ १२०, ७२.) याच महिन्याच्या पुढील पत्रांत ( लेखांक १२१ ) असा अर्थाचा मजकूर आहे कीं, अमीनखानाची रवानगी अमदाबादेस झाल्यावर ' लढाई मौकूफ " करण्याविषयीं जनरलचें पत्र आलें; तेव्हां त्याला युक्तीनें परत आणण्यास सदाशिवपंतास राघोबानें अमदाबादेस पाठविलें. पण तेथील आपाजी गणेश ऐवज देईना, इकडे अमीनखानाची सिबंदी फार चढली तेव्हां निरुपायानें अमीनखानाकडे मामलत सांगितली. अमीनखान फार होईजड झाला होता, तरी त्याची उपेक्षा करणें भाग पडलें.

१६९७ फाल्गुन अखेरच्या पत्रांत मजकूर आहे कीं, हरीफडके व आना चळवंत आपटणारी अमदाबाद, निदान सारी गुजराथ देण्याचा तह करीत आहेत असें वर्तमान राघोबाकडे पोंचलें आहे. ( रा खं. १२. १४०, ८८ )

बारभाई राघोबाला " अमदाबाद वगैरे सर्वांचे प्रां॥ पैधरा घास रक्षा पावेतों देतील असें तर्कानें दिसतें. " असी ' फितुरियाकडून ' बापूराव बल्लाळ काणे यानें राघोबाकडे बातमी आणली १६९८ भाद्रपद. (रा खं १२.१८०,१२२.)

अहमदाबाद, डभई वगैरे येथील बंदोबस्त तेथें जाऊन करावा कीं भडोच्यास राहून विचार करावा हा विचार राघोबा, बारभाई व इंग्रज यामध्यें तह होण्याच्या सुमारास करीत आहे ( अहमदाबाद वगैरे परगणे आपल्याला मिळतील अशी राघोबास आशा वाटत होतीसें दिसतें ) (१६९८ आश्विन शु॰ १५ ( रा. खं. १२. १८५, १२५.)

राघोबानें महादजी शिंदास निराशेनें हें पत्र लिहिलें आहे. त्यांत ' पादशहा व असफद्दौले फौजेसुद्धां दक्षिणचे मोहिमेस येणार, अहमदाबाद असफद्दौलास द्यावी ' असा बेत आहे. वगैरे मजकूर लिहिला आहे. १६९८ कार्तिक वद्य१ (रा खं. १२ १८९, १२७.

" दादासाहेब याणीं अमदाबाद, बडोदे व डभईकडे राजाराम गोविंद याची रवानगीचा विचार ठराविला " असें फत्तेसिंग गायकवाड, पेशव्यास लिहितो. १७०१ अधिक श्रावण शु॥ ११. ( रा.खं १० २०५, १४२. ) व पुन्हां गायकवाड, गाजुदीखानाची अमदाबादेवरची मोहीम तहकूब झाली, असें लिहितो १७०१ अधिक श्रावण वद्य ९ ( रा खं. १०. २०८, १४५ )

रामचंद्र पवार डभई परगणा जप्त करून पैका मिळवून पुढें अमदाबादेची जप्ती करावी अशा उमेदीनें आले होते, त्यावर पेशव्याकडील फौजाहि गेल्या होत्या. इतक्यात त्यानें बोलणें लाविलें कीं आपणास " बाहादारी " दिल्यास माघारें जाऊं, पण कांहीं जमलें नाहीं अशा आशयाचें पत्र १७०१ आश्विन वद्य २ रोजीं नानास लिहिलेलें सांपडतें. ( रा. खं. १० २३२, १६२ )

शके १७०४ (सन१७८२) च्या पत्रांत अमदाबादेनिमित्त ( स्वाधीन करून घेण्यास व सिबंदीस ) बरीच रक्कम खर्ची पडली आहे ( रा. खं. १०. २७३, २००–१ )

एकंदर १७५० पासून १८१७ पर्यंत येथें मराठ्यांचीच सत्ता असून उत्पन्नाची विभागणी पेशवे व गायकवाड यामध्यें होत असे. मध्यंतरीं १७८० त इंग्लिशांनीं गायकवाडाच्या वतीनें राजकारस्थानात ढवळाढवळ सुरू करून दोन वर्षेपर्यंत पेशव्याची सत्ता येथून झुगारून दिली. परंतु १७८२ त सालबेच्या तहाप्रमाणें पेशव्याच्या उत्पन्नाच्या अर्ध्या हिश्शावरील हक्क इंग्लिशांनीं कबूल केला. १८१४त पेशव्यांनीं त्रिंबकजी डेंगळे यास आपल्या वतीनें अहमदाबादेस सर सुभेदार नेमलें परंतु त्यानें या सत्तेचा बराच दुरुपयोग केला. पुढें तीन चार वर्षांत कांहीं तहान्वयें व गायकवाडशीं केलेल्या रदबदलीनें या शहरचें स्वामित्व ब्रिटिशांकडे आलें.

येथील इमारतींत हिंदु व सारासिन शिल्पकलेचा मिलाफ उत्तम दिसून येतो. चालुक्यांचीं शिल्पशास्त्रांत उत्तम प्रगतीहि झाली होती व ते जरी जिंकले गेले तरी त्यांच्या शिल्पकलेचा पगडा जेत्यांच्या ( मुसुलमानांच्या ) मनावर बसला होता,

यात शंका नाहीं. शहरांतील व आसपासचीं प्रेक्षणीय स्थळें पुढीलप्रमाणें आहेतः—

मशिदीः—अहमदशहा, हैबतखान, सैयद अलम, मालिक अलम, राणी असनी, कुतुबशहा, सय्यद उस्मानि, मियाखान चिस्ती, सिदि सयद, सिद्दि बसीर, मुहाफिजखान, अच्युत बिबि, दस्तुरखान

कबरी—अहमदशहा, अहमदशहाची बेगम, दर्याखान, अझमखान, मिर अबुद बकीर उद्दीन.

किरकोळ—असावो येथील माता भवानीचें मंदिर, तीन दरवाजा; कांकरिया तलाव, आझमखानाचा राजवाडा; व इतर.

आसपासचीं मुसुलमानी स्थळें—सर्खेज ( ५ मैल ), वाटवा ( ६ मैल ); व शहाआलमची इमारत ( ३ मैल ).

शहर रचनेचा एक विशेष हा आहे कीं, येथें पोळाची पद्धत आहे. एका पोळाल १० घरें किंवा जास्त म्हणजे १०००० वस्ती असते. विशेष मोठ्या पोळांतून एक मुख्य रस्ता जातो, व त्याच्या दोन्ही टोकांना एक एक दरवाजा असतो. ह्यी घरांच्या बाबतींत बरीच सुधारणा झाली आहे. शहरच्या भिंती पाडून शहर विस्तृत करावयाची योजना नुकतीच म्युनिसिपालिटीपुढें होती; पण ती लोकांना पसंत पडली नाहीं. पहिले हिंदु बारोनेट सरचिनुभाई हे अहमदाबादेसच राहतात.

इ. स. १८५७ सालीं या शहरास म्युनिसिपालिटी मिळाली. इ. स. १९०३–०४ सालीं तिचें उत्पन्न १० लक्ष होतें. इ. स. १८९१ पूर्वी विहिरीं, तळीं, व नदी यापासून पाण्याचा पुरवठा होत असे.पण इ.स.१८९२ मध्यें धुधेश्वरचा पाण्याचा साठा तयार झाला व तेव्हांपासून लोकांना चांगलें पाणी मिळूं लागलें.

शहरापासून ३॥ मैलावर शाहीबाग येथें लष्करची छावणी आहे.

पूर्वी अहमदाबाद हें जरतारी, रेशमी व सुती कापड, सोनें चांदीच्या वस्तू व दागिने, लाकडी नक्षी कामयाबद्दल प्रसिद्ध होतें. हें सध्या कापसाच्या गिरण्याचें मुख्य ठिकाण आहे. पहिली गिरणी इ स. १८६१ मध्यें सुरू झाली. इ. सः १९०४ मध्ये येथें ३४ गिरण्या असून ५६१,००० चात्या व ७०३५ माग सुरू होते. म्हणजे १५० लक्षाचें भांडवल या धंद्यात घातलेलें आहे. त्या साली ४२० लक्ष पौंड सूत व २६० लक्ष पौंड कापड तयार झालें. ५० वर कापसाच्या गिरण्या, तीन चार गंजीफ्राक पायमोजे, वगैरे मालाच्या गिरण्या, आठ लोखंडाचे कारखाने, दोन कांच्याच्या पेल्यांचे कारखाने, तीन साबणाचे, चार कातड्याचे व तीन रेशीम विणण्याचे कारखाने, सुमारें ३५ दुध पुरविणाऱ्या कंपन्या, यासारखे बरेच धंदे व कारखाने अहमदाबादेस आहेत.

येथें बऱ्याच खाजगी व म्युनिसिपल प्राथमिक शाळा; दोन कॉलेजें व कायदा शिक्षणाचे वर्ग, तसेंच बरीच हायस्कुलें आहेत. येथें एक वैद्यकीची शाळा असून बरेच दवाखाने तसेंच महारोग्याचें इस्पितळ, पागलखाना, डोळ्याचें इस्पितळ यासारख्या रोगनिवारक संस्था आहेत. येथें पाच पुस्तकालयें आहेत. गुजराथी मासिकें दहाच्यावर प्रसिद्ध होतात. निरनिराळ्या जातीचे व उद्यमाचे संघ येथें असून बलवान आहेत. गुजराथी लोकांचे वाङ्मय, सामाजिक चळवळी, शिक्षणार्थ प्रयत्न यांचें केंद्रस्थान हें शहर असल्यामुळें याचें वर्णन करणें म्हणजे सर्वच गुजराथचा इतिहास देणें होय. तर तें विवेचन "गुजराथ" या सदराखालीं सांपडेल ( इं. गॅ.५–१९०८. मुं. गॅ. ४. अर्नोल्ड—गाईड. )

**अहरिमन**—झरथुष्ट्र संप्रदायांतील दुष्कृत्याची देवता किंवा दैत्य. अवेस्ता–गाथामध्यें याचें नाव 'अंग्रइमन्यु,' इतर अवेस्ता वाङ्मयात 'अह्र मइन्यु,' पहलवीत 'अह्रमन्' आणि अर्वाचीन इराणी भाषेत 'अहरिमन्' अशीं नावें आढळतात. ऑरिस्टॉटलकालीन ग्रीकांना देखील हें नाव माहीत होतें व त्याच्यापासून लॅटिनांनीं 'अरिमनिअस या अपभ्रष्ट स्वरूपात तें स्वीकारलें. गाथामध्यें अंग्रमइन्यु ही जशी दुष्टदेवता गणली आहे, तशीच स्पेंतमइन्यु ही सुष्टु देवता मानिली आहे; तर कनिष्ठ अवेस्तात अहरमइन्यु व अहुरमझ्द ही जोडी कल्पिली आहे. प्राचीन इराणी अंकितलेखांतून अंग्रइमन्यु हा दुष्ट प्रकृतिवाचक शब्द आढळत नाहीं, तर त्या अर्थानें द्राउग हा शब्द योजिलेला दिसतो.

एकंदर झरथुष्ट्र संप्रदायाच्या धार्मिक वाङ्मयांत अहरिमन्चें जें स्वरूप दृष्टीस पडतें तें असें कीं, तो पापाचा अर्क असून नेहमीं दुष्कर्माकडे वळतो व सत्प्रवृत्तीला विरोध करितो, तसेंच तो मोठा कपटी, मत्सरी, अज्ञानी व दुरात्मा आहे ( उदा. यश्न ३०. ३–६; ४५. १–२; ४६. ७ ). तो अहुरमझ्दाच्या सृष्टीवर हल्ले चढवितो व त्यात अपूर्णता, रोग आणि मृत्यु हीं सोडून देतो. दएव नांवाच्या नरकवासी राक्षससैन्याचा तो राजा आहे ( यश्न ३०. २०; ३२. १३; वेंदिदाद २ ३५ ) सरतेशेवटीं या दैत्यसैन्याचा व त्याच्या अहरिमन् राजाचा पराभव माणसाच्या हातूनच होणार आहे; व अहरिमनला निर्बल करून मनुष्यवस्तींतून पार हांकून लावण्यांत येणार आहे; असें भविष्य दारिस्तान ई देनीग, दीनकर्द, बूंदहिश्न इत्यादि पुराणांतून केलेलें आढळतें.

वैदिक भारतीयांची दास अहि या आकाशसर्पाची कल्पना बौद्धांची माराची व सेमेटिकांची सैतानाची कल्पना या अहरिमनशीं ताडून पाहण्याचा बराच प्रयत्न झाला आहे. पण सैतानाखेरीज दुसऱ्या कोणाशीं याचें फारसें साम्य दिसत नाहीं, असें जॅकसन सांगतो ( एरिए १ ) जगरहाटींत असत्त्वाचें प्राधान्य कल्पिल्यामुळें झरथुष्ट्रसंप्रदायाला द्वैतमत

असें पुष्कळदां नाव देण्यात येतें व त्याला पुरावा म्हणून अहुरिमनला पुढें करण्यात येतें. पण अर्वाचीन अवेस्तियन पंडित याचा इनकार करितात व अहरिमन ही *कोणी व्यक्ति नसून केवळ एक तत्त्व किंवा शक्ति आहे असें* प्रतिपादितात. हा वाद या ठिकाणीं अप्रस्तुत असल्यानें त्याचा समाचार झेंद अवेस्ता या लेखांत घेण्यांत येईल.

[संदर्भ ग्रंथ—झेंद अवेस्ता या लेखांत संदर्भग्रंथांचें विशेष विवेचन केलें आहे.]

**अहरौरा**—संयुक्त प्रांत, मिरझापुर जिल्हा, चुनार तहशीलींतील एक शहर. उ. अ. २५° १ पू रे.८३ ३ चुनारच्या आग्नेयेस १२ मैलावर व अहरौरा रोड पासून १३ मैलावर आहे. हे पूर्वी व्यापाराचें मोठ्या महत्वाचें केंद्र होतें, येथें टसर जातीचें रेशीम तयार होत असे पण आता हा धंदा अजीबात बसला. सध्या येथें साखर व लाखेचें रोगण केलेली खेळणी तयार होतात.

येथून जवळच बेलखर खेड्यांत कनोजचा शेवटचा राजा लखनदेव याचा एक शिलालेख आहे. तो ११९६ सालातील आहे. तरी त्यांत मुसुलमानांनी दक्षिण हिंदुस्थान घेतल्याचा उल्लेख नाहीं. (इं. गॅ. ५)

**अहर्गण**—अहर्गण म्हणजे दिवसांचा समुदाय. ज्योतिषामध्यें *अहर्गणाचा उपयोग मध्यम ग्रहसाधन करण्याकरितां* होतो. अहर्गणावरून मध्यम करावयाचें म्हणजे करणापासून *गेलेल्या वर्षसंख्येस ३६५। योनीं गुणावयाचें.* हा गुणाकार म्हणजेच अहर्गण. यावरून व दिनगतीवरून मध्यम ग्रहसाधन करता येतें, पण जसजशी वर्षसंख्या वाढेल तसतशी ही क्रिया फार त्रासदायक होते म्हणून गणेशदैवज्ञांनीं आपल्या ग्रहलाघवांत ११ वर्षांचे ४०१६ दिवस होतात, तितक्या अहर्गणाचें एक चक्र केलें आहे व तितक्या दिवसांतील ग्रहमध्यमगतीस ध्रुव अशी संज्ञा दिली आहे. या गतीचा संस्कार केला म्हणजे अहर्गण ४०१६हून कधींच जास्त होत नाहीं हें पुढें सांगितलेंच आहे. "इनोदयद्वयांतरं तदर्क सावनंदिनम्" असें भास्कराचार्य यांनीं गणिताध्यायांत सांगितलें आहे; याचा अर्थ असा कीं, सूर्योदय झाल्यापासून पुन्हा सूर्योदय होईपर्यंत जो काल त्यास सौर (सावन) दिवस असें म्हणतात. या सौर सावन दिवसासच कुदिन अशी संज्ञा आहे. अहर्गण शब्दांत अहः आणि गण असे दोन शब्द आहेत, त्यांतील अहः म्हणजे सौरसावनदिवस आणि गण म्हणजे समुदाय. तेव्हा सौर सावन दिवसांचा जो समुदाय त्यास अहर्गण असें म्हणतात. सिद्धान्त ग्रंथांत सृष्ट्यारंभापासून इष्टदिवसाच्या सूर्योदयापर्यंत सौरसावनदिवस गणिले जातात म्हणून त्या अहर्गणास सृष्ट्याद्यहर्गण असें म्हणतात किंवा ब्रह्म तुल्य अहर्गण असेंहि म्हणतात. तंत्रग्रंथांत युगारंभापासून इष्टदिवसाच्या सूर्योदयापर्यंत सौरसावनदिवस गणिले जातात म्हणून त्या अहर्गणास युगाद्यहर्गण असें म्हणतात. आणि ग्रहलाघवासारख्या करण ग्रंथांत कोणत्याहि एका शकारंभापासून इष्टदिवसाच्या सूर्योदयापर्यंत सौरसावन दिवस गणिलेले असतात म्हणून त्यास शकाद्यहर्गण असें म्हणतात या अहर्गणासच द्युपिंड किंवा दिनगण असें म्हणतात.

आतां सूर्यसिद्धान्तावरून शके १४४२ चैत्र शु. १ सोमवारच्या प्रातःकालचा अहर्गण आणून दाखवितों.

"सूर्याब्दसंख्यया ज्ञेया. कृत स्याते मता असी ॥ खचतुष्क यमाद्रामि शर रंध्र निशाकराः" असें सूर्यसिद्धान्तांत सांगितलें आहे. यावरून कृतयुगाच्या अन्ती १,९५,३७,२०,००० इतकीं सौरवर्षे झालीं. या कृतयुगाताच्या सौरवर्षांमध्यें त्रेतायुगाचीं सौरवर्षे १२,९६,००० व द्वापर युगाचीं ८,६४,००० मिळवून १, ९५, ५८, ८० ००० इतकीं द्वापर युगान्तीं गत सौरवर्षे झालीं यांत शालिवाहन शकारंभाचीं गत कलि वर्षे ३१७९ इतकीं मिळवून आणि गतशालिवाहन शक १४४२ मिळवून इष्टकालापर्यंत १,९५,५८,८४,६२१ इतकीं सौर वर्षे झालीं. यावरून अहर्गण आणूं प्रथम १,९५,५८,८४,६२१ या सौर वर्षास१२नीं गुणून सौर मास २३,४७,०६,१५,४५२ झाले. या सौर *मासामध्यें अधिकमास मिळविले असता चांद्रमास निघतील* हें उघड आहे. कारण सौरमास व चांद्रमास यामध्यें जो *फरक पडतो त्यासच अधिकमास म्हणतात. करितां अधिक*मास आणूं एका महायुगामध्यें म्हणजे ४३,२०,०००सौर *वर्षांमध्यें* १५,९३,३३६ अधिकमास होतात असें सूर्यसिद्धांतांत सांगितलें आहे. आणि ४३,२०,००० *महायुग सौरवर्षांचे मास* ४३२०००० × १२ = ५,१८,४०,००० झाले. म्हणून ५,१८,४०,००० सौर *मासामध्यें* १५,९३,२३६ *अधिकमास येतात तर* २,३,४७,०६,१५,४५२ सृष्ट्यादि गतसौरमासामध्यें किती *अधिकमास येतील?या* त्रैराशिकावरून२,३,४७,०६,१५,४५२ ×१५,९३,३३६ = ३७, ३९, ६५,७६,५४,१८, २७, ८७२ इतका गुणाकार झाला यास युगसौरमास ५,१८,४०,००० यांनीं भागून ७२,१३,८४,५७८ इतका भागाकार आला हे सृष्टिगत सौरमासातील अधिकमास निघाले म्हणून २ ३,४७,०६,१५,४५२ या सृष्टिगत सौर मासांत ७२,१३,८४,५७८हे *अधिकमास मिळवून*२४१९२००००३० चांद्रमास झाले. यांचे चांद्रदिवस करण्याकरितां ३० नीं गुणून गुणाकार ७,२ ५,७६,००,००,९०० आला. हे चांद्र दिवस (तिथि) झाले. या चांद्रदिवसाचे सौर(सावन) दिवस करण्याकरितां या चांद्रदिवसांतून क्षयाह वजा केले पाहिजेत. कारण चांद्रदिवस व सौर(सावन) दिवस यामध्यें जें अंतर असतें त्यासच अवमशेष किंवा क्षयाहशेष असें म्हणतात. "तिथ्यंत सूर्योदययोश्चमध्ये सदैव तिष्ठत्यवमावशेषम्" *असें भास्कराचार्यांनीहि सांगितलें आहे. हेंच अवमशेष* वाढत वाढत जाऊन जेव्हा पूर्ण एक दिवस होतो तेव्हा त्यास *क्षयाह किंवा अवमदिन असें म्हणतात.* सावन दिवस हा

चांद्रदिवसापेक्षा मोठा असल्यामुळें सावन दिवसाची संख्या चांद्रदिवसाच्या संख्येपेक्षा कमी असते. म्हणून सावन दिवस व चांद्रदिवस यांच्यामधील क्षयाहइतकें अंतर चांद्रदिवसांतून वजा केलें असतां सौरसावन दिवस होतील हें उघड आहे. करितां सृष्टिगत चांद्रदिवसामध्यें क्षयाह किती येतात हें काढूं. एका महायुगामध्यें क्षयाह २,५०,८२,२५२ होतात असें सूर्यसिद्धांतात दिलें आहे. आणि ५,१८,४०,००० ह्या युग सौरमासामध्यें अधिक मास १५,९३,३३६ मिळवून ५,३४,३३,३३६ युग चांद्रमास झाले. यास ३० नीं गुणून १,६०,३०,००,०८० युगचांद्रदिवस झाले म्हणून १६०३०००००८० युगचांद्रदिवसात क्षयाह २,५०,८२,२५२ होतात तर ७,२५,७६,००,००,१०० सृष्टिगत चांद्राहांमध्यें किती क्षयाह येतील? या त्रैराशिकावरून २,५०,८२,२५२ या क्षयाहास ७,२५,७६,००,००,१०० या चांद्रदि- गुणून १,८२,०३,६९,५२,३४,०९,४०,२६,८०० इतका गुणाकार आला. यास १,६०,३०,००,०८० या चांद्राहांनीं भागून भागाकार ११,३५,६०,१६,४२२ आला. हे क्षयाह निघाले हे क्षयाह आलेले ७,२५,७६,००,००,१०० या सृष्टिगत चांद्राहांतून वजा करून शिल्लक ७,१४,४०,३९,८४,४७८ इतकी राहिली. हा सूर्य सिद्धान्तावरून अहर्गण झाला यास वारचक्र ७ नीं भागून शेष उरतात. म्हणून सोमवारच्या मध्यरात्रीचा अहर्गण निघाला, हा सोमवारचा प्रातःकालचा अहर्गण करण्याकरितां ४५ घटिका वजा करून ७,१४,४०,३९,८४,४७७।१५ हा खावयन अहर्गण तयार झाला. या अहर्गणावरून सर्व मध्यमग्रह तयार करता येतात ते असे.

मध्यम ग्रहः—ग्रहमध्यमगति म्हणजे अहर्गण. गणेश दैवज्ञ यांनीं वरील सृष्ट्यादि अहर्गण न आणितां शकापासूनच अहर्गण करून मध्यमग्रह तयार करावयास सांगितलें आहे. याच्या योगानें फार लाख लाख अंकांचे गुणाकार किंवा भागाकार करण्याचें कारण पडत नाहीं. ही सोय मोठी झालेली आहे. तिचें दिग्दर्शन करूं.

प्रथमतः गणेशदैवज्ञांनीं शके १४४२ चैत्र शु. १ सूर्योदयाचे ग्रह सिद्धान्त ग्रंथावरून तयार करून दिलेले आहेत. यास त्यांनीं क्षेपक असें नाव दिलेलें आहे. ते कोष्टक रूपानें खालीं देतों.

राश्यादि क्षेपक

| र. | चं | मं. | बुधकेंद्र | गु | शुक्रकेंद्र | श. | चंद्रोच्च | राहु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | ११ | १० | ८ | ५ | ७ | ९ | ५ | ० |
| ११ | ५९ | ७ | २९ | २ | २० | १५ | १७ | २७ |
| ४१ | ६ | ८ | ३३ | १६ | ९ | २१ | ३३ | ३८ |

गणेश दैवज्ञानीं शके १४४२ चैत्र शु. १ च्या सूर्योदयाचे क्षेपक दिल्यामुळें अहर्गण तेथूनच तयार करणें भाग आहे करितां त्यांनी दिलेली अहर्गणाची रीति खालीं देतो.

$$\text{इष्टशाके}-१४४२ = \text{सौरवर्षगण} \quad \ldots \ldots \ldots (१)$$

$$\frac{\text{सौरवर्षगण}}{११} = \text{चक्रें} + \frac{\text{चक्रशेष}}{११} \quad \ldots \ldots \ldots (२)$$

$$\text{चक्रशेष} \times १२ + \text{चैत्रादिगत मास} = \text{सौरमास} \ldots (३)$$

$$\frac{\text{सौरमास} + २\ \text{चक्र} + १०}{३३} = \text{अधिकमास} \ldots\ldots (४)$$

$$\text{सौरमास} + \text{अधिकमास} = \text{चांद्रमास} \quad \ldots (५)$$

$$\text{चांद्रमास} \times ३० + \text{गततिथी} + \frac{\text{चक्रें}}{६} = \text{तिथि} = \text{चांद्र} \; (६)$$

$$\frac{\text{चांद्रदिवस}}{६४} = \text{क्षयाह} \ldots \ldots \ldots \ldots \ldots (७)$$

$$\text{चांद्रदिवस}-\text{क्षयाह} = \text{अहर्गण} \quad \ldots \ldots \ldots (८)$$

$$\frac{\text{अहर्गण} + ५\ \text{चक्रें}}{७} = \text{वारचक्र} + \frac{\text{इष्टवारशेष}}{७} \quad \ldots (९)$$

या अहर्गणाच्या रीतीमध्यें गणेश दैवज्ञांनीं ११वर्षांचें चक्र गणित सौकर्याकरितां धरल्यामुळें हा अहर्गण ४,०१६ दिवसापेक्षा जास्त वाढत नाहीं ही मोठी सोय झालेली आहे.

उदाहरणः—शके १८३९ श्रावण शु. १५ शुक्रवारीं अहर्गण किती आहे हें सांगा?

उत्तर निष्कासन क्रिया.—१८३९ या संख्येंतून १४४२ वजा करून शेष ३९७ राहिले. यास ११ नीं भागून भागाकार ३६ आला. यास चक्रें म्हणतात. व शेष १ राहिला यास १२ नीं गुणून आलेल्या गुणाकारात चैत्रादि गतमास ४ मिळवून १६ हा मध्यम मासगण झाला. यात चक्र ३६ दुप्पट ७२ आणि १० मिळवून ९८ झाले. यास ३३ नीं भागून २ लब्ध आले. हे आलेले २ अधिकमास १६ मध्यें मिळवून १८ यास ३० नीं गुणून ५४० यात गततिथी १४ मिळवून ५५४ यात ३६ चक्राचा षडांश मिळवून ५६० झाले. यास ६४ नीं भागून ८ क्षयाह आले. ते ५६० तून वजा करून ५५२ हा अहर्गण तयार झाला. वार काढण्याकरिता ५५२ या अहर्गणात चक्रें ३६ याचे ५ पट १८० हे मिळवून ७३२ ही संख्या झाली. हिला ७ नीं भागून शेष ४ राहिले. तेव्हां शून्य सोमवारपासून मोजले असता शुक्रवार आला. इष्टवारहि शुक्रवारच असल्यामुळें आलेला ५५२ हा अहर्गण बरोबर झाला म्हणून प्रश्नाचें उत्तर ५५२ हा अहर्गण झाला.

इष्ट दिवशींचा वार न देतां नुसती तिथि दिली तर त्यावरून जो अहर्गण निघेल तो खात्रीचा समजूं नये. कारण अहर्गणात वाराचें प्राधान्य असतें हें पक्कें लक्षात ठेवावें.

अहर्गण मध्यमसावन मानानेंच करितात. कारण स्फुट सावन हें प्रत्यहीं वक्र असतें,

अहर्गणाची जी रीति दिली आहे, तींमध्यें गणित सौलभ्याकरितां ११ वर्षांचें एक चक्र कल्पिलें आहे. त्या ११ वर्षांचा अहर्गण करून त्यावरून जो मध्यमग्रह तयार होईल तो १२ राशींतून वजा करून जे राश्यादि शेषांक येतात त्यास ध्रुव, किंवा ध्रुवक ध्रुवांक असें म्हणतात

अहर्गणपद्धतीनें ११ वर्षांचा अहर्गण तयार केला असतां ४०१६ सौर सावन दिवसात्मक अहर्गण येतो. कारण ११ सौर वर्षांचे मास ११ × १२ = १३२ यांतील अधिकमास ४ येतात म्हणून १३२ + ४ = १३६ हे चांद्रमास झाले. या चांद्रमासांच्या तिथी १३६ × ३० = ४०८० झाल्या. यामध्यें ६४ क्षयाह येतात. ते ४०८० तून वजा करून ४०१६ हा एका चक्राचा अहर्गण झाला.

ह्या एका चक्रांतील ४०१६ अहर्गणामध्यें जे मध्यम ग्रह तयार होतात त्यास राश्यादि ध्रुव किंवा ध्रुवांक असें म्हणतात.

**अहल्या.**—अत्यंत प्राचीन काळांत दंतकथांचा विषय झालेली एक स्त्री. गौतम ऋषीची पत्नी. ही ब्रह्मदेवानें निर्माण केलेली पहिली स्त्री असून, हिची सौंदर्याबद्दल फार ख्याति होती. इंद्रानें हिचें पातिव्रत्य हरण केलें अशी कथा आहे हिच्याच संमतीनें इंद्रानें हिचें धर्षण केलें असा एक पाठ रामायणाच्या प्रतींत सांपडतो, तर याच्या उलट, इंद्रानें गौतमाचें रूप घेऊन अहल्येला फसविलें असा दुसरा पाठ आहे. हें जारकर्म कसें झालें या संबंधीं पुढील कथाहि आढळते; चंद्र हा इंद्राच्या मदतीस्तव कोंबड्याचें रूप घेऊन मध्यरात्रीं आरवला, तेव्हां गौतमाला पहाट झाली असें वाटून स्नानसंध्येकरितां तो बाहेर पडला तेव्हां इंद्रानें आंत जाऊन शय्यारोहण केलें. गौतमाला जेव्हां ही लबाडी समजली, तेव्हां त्यानें अहल्येला शाप देऊन तिचें विश्वख्यात सौंदर्य नाहींसें केलें दुसऱ्या एका ठिकाणीं गौतमानें तिला शिला बनविली असा वृत्तांत आहे. रामानें पुन्हां तिला पूर्व स्थितीवर आणून गौतमाच्या हवालीं केलें कुमारिल भट्ट या जारकर्माला रूपक समजतो. व इंद्ररूपी सूर्यानें अहल्यारूपी रात्रीचें धर्षण केलें असें हें निसर्गरहस्य आहे असें सांगतो.

'अहल्यायी जार' असें जें इंद्राला विशेषण आहे त्यावरून ही जारकर्माची कथा रचिली गेली असावी. ब्राह्मण ग्रंथांतूनहि अहल्येचा हा इतिहास वर्णित आहे (शत. ब्रा. ३. ३, ४, १८; जै ब्रा. २ ७९; षड्. ब्रा. १ १) अहल्येला शतानंद नावाचा पुत्र होता. [ संदर्भ-ग्रंथ–रामायण बालकांड. सर्ग ४८–४९ उत्तर कां स. ३०; महाभारत व इतर पुराणें;]

**अहल्याबाई.**—ह्या विदुषीचा जन्म केव्हां झाला हें कळण्यास आज कोणत्याहि प्रकारचा प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध नाहीं. मालकम साहेब ती मृत्युसमयीं म्हणजे इ. स. १७९५ त सुमारें ६० वर्षांची होती असें म्हणतो. परंतु इ. स. १७८०-८१ च्या दोन अस्सल पत्रांत आपल्या वयास ५५ वर्षे झालीं असल्याचे अहल्याबाईचे उद्गार आहेत (विविधज्ञानविस्तार, वर्ष ३८ अंक ५, पृष्ठ १४६ ), त्यावरून व इ. स. १७४३ च्या सुमारास मल्हारराव होळकर नाशिकच्या यात्रेस गेला असतां त्यानें तेथें आपल्या उपाध्यायास अहिल्याबाई लग्नसमयीं (इ. स. १७३३ त ) ८ वर्षांची होती म्हणून जें लिहून दिलें होतें त्यावरून तिचा जन्म इ. स. १७२५ त झाला असावा असें ठरतें. तिचा बाप माणकोजी शिंदे हा औरंगाबाद जिल्ह्याच्या बीड तालुक्यांतील चौंडें गावचा पाटील होता शके १६५५ त म्हणजे इ. स. १७३३-३४ मध्यें मल्हारराव होळकराचा पुत्र खंडेराव याशीं हिचा विवाह झाला. लग्नसमयीं खंडेरावाचें वय अवघें दहा वर्षांचें होतें. परंतु पुढें तो व्यसनी निघाल्यामुळें अहल्याबाई "वृत्तीस उदास राहून सासुसासऱ्याचे सेवनीं तत्पर असून अंबादास पुराणिक याजपासून परत्रसाधनाची काहीं व्यवस्था ग्रहण करून, सासुरवासी सबब बोलून जपून युक्तीनें, त्या वस्तूचें दास्य करीत राहिल्या' (होळकराची कैफियत पान ६६ ) खंडेराव वरकड कसाहि असला तरी अहल्याबाईपुढें त्याची मात्रा बिलकुल चालत नसे ती ज्या दिवशीं त्याच्याकडे आंत असे त्या दिवशीं त्याला आपल्या सर्व अव्यवस्थित वृत्तीस रजा द्यावी लागे. अहल्याबाईला पूर्वनयातच लिहिणें वाचणें समजूं लागलें ती मोडी अक्षरहि लिहित असे, तिला पुराण ऐकण्याची गोडी असल्यामुळें तिच्या अंगीं लवकरच बहुश्रुतपणा व चतुरस्रता आली. तिची कुशाग्र बुद्धि व कामांतील हुशारी पाहून मल्हाररावानें बहुधा लवकरच तिच्यावर सरकारी कामें सोंपविलीं असावीं न तीं अठ्ठावीस एकोणतीस वर्षांची असतांनाच तिच्या नावानें पत्रें सुरू झालीं यावरून ती यापूर्वी निदान चार पांच वर्षे तरी म्हणजे चोवीस वर्षांची असतांना आपलें कामकाज करावयास समर्थ असली पाहिजे अर्थात् राज्य चालविण्यास जे गुण लागतात, त्याचा उदय तिच्या अंगीं यापूर्वीच झाला असला पाहिजे. अहल्याबाईस मालेराव व मुक्ताबाई अशीं दोन अपत्यें होतीं. त्यापैकीं मालेराव याचा जन्म इ स १७४५त देपालपूर मुक्कामीं झाला, व त्याच्या पाठीवर तीन वर्षांनीं मुक्ताबाई जन्मास आली. अहल्याबाईच्या नशिबीं सौभाग्यसुख फार दिवस लिहिलें नव्हतें. इ स १७५४ सालीं डीगेजवळ कुंभेरीच्या किल्ल्यास मराठ्यांच्या सैन्याचा वेढा पडला असतां तिचा पति खंडेराव हा गोळी लागून गतप्राण होऊन पडला. या वेळीं अहल्याबाई आपल्या नवऱ्याबरोबरच होती. तिला हें वर्तमान समजतांच तिनें पतीबरोबर सहगमन करावयाचें ठरविलें. परंतु मल्हाररावानें तिला अतिशय

गळ घातल्यामुळें तिला शेवटीं आपलें सहगमन तहकूब करावें लागलें.

खंडेरावाच्या मृत्यूनंतर संस्थानचा सर्व कारभार मल्हाररावानें आपल्या सुनेकडेच सोंपविला. यापुढें ती स्वतः फक्त युद्धप्रसंगाची व उत्पन्नाचीच काळजी करीत असे. तथापि अहल्याबाईच्या कामावर त्यांची एकंदर देखरेख असे व तीहि त्याच्या सल्ल्यानेंच कामकाज पहात असे. अर्थात मल्हाररावाच्या कारकीर्दीत राज्याचा बंदोबस्त चांगला होता, याचं पुष्कळसें श्रेय अहल्याबाईसच दिलें पाहिजे हें उघड आहे इ स १७६६ त मल्हारराव होळकर मरण पावल्यावर राज्याची कुल जबाबदारी अहल्याबाईवरच येऊन पडली. मालेराव या वेळीं वयांत आला होता तरी तो आपली जबाबदारी ओळखणारा नसून होतकरूहि नव्हता. मल्हाररावानंतर शिरस्त्याप्रमाणें मालेरावाच्या नावानें सुभेदारी झाली, परंतु तो गादीवर बसल्यानंतर सारा दहा महिनेच काय तो जिवंत होता. त्याला लवकरच वेडेपणाच्या लहरी येऊं लागून त्याच्या पासून इतरास त्रास होऊं लागला, या त्याच्या वर्तनामुळें अहल्याबाईच्या स्तुतिपाठकांनीं आपल्या उत्साहाच्या भरात त्या माउलीनें आपल्या मुलास मारविलें किंवा त्यास हत्तीच्या पायीं दिलें म्हणून ज्या दंतकथा प्रचलित केल्या त्या अगदी निराधार आहेत. अहल्याबाईच्या मृत्यूनंतर थोड्याच वर्षांनीं मालकम साहेबानें या गोष्टीचा अत्यंत बारकाईनें व जातीनें शोध करून त्यात कांहीं तथ्य नाहीं, अशी आपली खातरी करून घेतली होती (पु १, पान १५१ )

मालेरावाच्या मृत्यूनंतर होळकराचा दिवाण गंगाधर यशवंत चंद्रचूड यानें एखादा होळकर घराण्यातील मुलगा दत्तक घ्यावा अशी आपली इच्छा दर्शविली. परंतु अहल्याबाईनें तें नाकारलें. सैन्याच्या मदतीनें राज्य चालविण्याचा विचार करून तिनें त्या कामीं महादजी शिंदे व पेशवे यांची सुद्धा पूर्ण सहानुभूति मिळविली. स्त्री असल्यामुळें तिला सैन्याचें आधिपत्य स्वीकारून लढाईवर जाता येत नसे, म्हणून त्या कामाकरिता सैन्यातील तुकोजी होळकर या अधिकाऱ्याची तिनें योजना केली पुढें तुकोजीनें पेशव्यास १५,६२,००० रु. नजर केले त्यावरून पेशव्यानीं त्यास सेनापतीची वस्त्रें दिली. तुकोजी महत्त्वाच्या प्रसंगीं अहल्याबाईचा सल्ला घेत असे. तो पुण्यास असला कीं सातपुड्याच्या पलीकडे असलेल्या होळकराच्या मुलुखाचा बंदोबस्त ठेवी व अहल्याबाई त्याच्या उत्तरेकडच्या माळवा वगैरे प्रांताची व्यवस्था ठेवी पण तो स्वारीवर असे तेव्हा सर्वच प्रांत खुद्द अहल्याबाईच्याच देखरेखीं खालीं असत ( होळकराच्या राज्याचें सामान्य वर्णन पा. १०)

अहल्याबाईच्या कारकीर्दीत तिचा व तुकोजीचा वास्तविक विरोध चारपाच महत्वाच्या प्रकरणांत झाला, व त्यालाहि तुकोजीचा भोळसर स्वभाव व अव्यवस्थित खर्च हींच दोन कारणें होतीं पहिला प्रसंग म्हटला म्हणजे तुकोजीचा कारभारी नारो गणेश यानें अहल्याबाईच्या हाताखालीं तिच्या अत्यंत विश्वासातला शिवाजी गोपाळ नावाचा इसम होता त्याच्या पुढें आपलें तेज पडणार नाहीं या भयानें त्याची पुणें दरबार'कडून मोठ्या शिताफीनें पुण्यास बदली केली व तुकोजीनें भोळसरपणानें अहल्याबाईची मंजुरी न विचारतांच त्या बदलीस आपली संमति दिली, हा होय. पुढें १७७१ त नारो गणेश आपल्या मालकासह राघोबाच्या कटात शिरल्यामुळें त्याला विनभाड्याची खोली पाहवी लागली तेव्हा त्याच्या गैरहजेरीत दादाजी हा अहल्याबाईच्या संमतीनें तुकोजीचा कारभार पहात होता परंतु त्याचें व तुकोजीचें बनत नाहीं हें पाहून नारोगणेशानें महादजी शिंद्यास एक लाख रुपये लांच देऊन आपली सुटका करून घेतली व शिंद्याच्याच सूत्रानें तो पुन्हा पूर्वपदीं विराजमान झाला. या सर्व गोष्टी अहल्याबाईस न कळविता परभारेंच झाल्यामुळें खटक्याचा दुसरा प्रसंग आला खटक्याचा तिसरा प्रसंग मात्र याहून जास्त महत्त्वाचा आहे. इंग्रजांशीं झालेल्या पहिल्या युद्धांत होळकराच्या सैन्याचा खर्च रास्त प्रमाणाबाहेर झालासें वाटून त्यास मर्यादा घालण्याचा अहल्याबाईनें प्रयत्न केला. पण या प्रसंगीं ही मोहीम ऐन रंगावर आल्या कारणानें त्या वेळी सैन्यांत काटकसर केली तर अपजय होण्याची फार भीति होती व म्हणून ती काटकसर दुःसह वाटून पुणें दरबारचा राख बाईकडे वळला. असे प्रसंग अहल्याबाईच्या कारकीर्दीत कित्येक वेळा आले असतील. तुकोजीस मल्हाररावाची शिस्त साधत नसल्यामुळें अहल्याबाईकडे त्यास खर्चाबद्दल वारंवार मागणी करावी लागे व अहल्याबाईसहि आपल्या प्रजेच्या हितास्तव त्याचा प्रतिकार करणें भाग पडे. अशा प्रसंगीं पुणें दरबारास तुकोजीची बाजू उचलून बाईविरुद्ध जाण्याचा घाट घालावा लागे, पण शेवटीं उभयतांची तडजोड करून निकाल लागे ( पुरुषोत्तमकृत देवी श्री अहल्याबाई, च. पृ. १६१-६२)

अहल्याबाईनें घरातला कारभार आपल्याकडे ठेवून बाहेरचा कारभार तुकोजीच्या हातीं दिला होता. होळकराचें सैन्य तुकोजी होळकराच्या आधिपत्याखालीं बहुतेक स्वतंत्रपणें पेशव्याची चाकरी करीत असल्यामुळें त्याच्या कामगिरीचा सविस्तर उल्लेख तुकोजी होळकर या सदराखालीं करण्यात येईल स्वतः अहल्याबाईच्या राज्यात लढाया व कलह हे बोटावर मोजण्याइतकेच झाले गोविंदपंत गानु नावाचा एक सज्जन मनुष्य अहल्याबाईचा मंत्री होता. तो खाजगीचें काम पाही कित्येक दिवसपर्यंत त्यानें कारभाऱ्याचेंहि काम केलें होतें. दत्तकासंबंधीं प्रकरणात गंगाधर यशवंत यानें राघोबादादाशीं कारस्थान केलें होतें तरी अहल्याबाईनें त्याच्या मुलाचे गुण लक्षात आणून त्यास पुण्याच्या दरबारीं वकील नेमलें. तिनें खंडेराव नावाचा

वसुलबाकीच्या कामांत मोठा वाकबगार असलेला एक मनुष्य इंदुरास नेमला होता त्याच्या अमदानींत तिची प्रजा फार सुखी व संतुष्ट राहिली. पुणें, हैदराबाद, श्रीरंगपट्टण, नागपूर, लखनौ, कलकत्ता इत्यादि ठिकाणीं होळकराकडून जे वकील नेमले जात त्यांची नेमणूकहि तिच्याचकडून होत असे. तिला आपल्या प्रांताची व्यवस्था करण्यास कधीं सैन्य बाळगण्याची गरज पडली नाहीं. तिला आपल्या प्रजेची तर भीति नव्हतीच, पण इतर राजे रजवाड्यांनींहि कधीं तिच्या राज्यावर स्वारी केली नाहीं. तिच्या कारकीर्दींत चंद्रावताने जें बंड उभारलें तें केवळ स्वजात्यभिमानाचा व स्वसंरक्षणाचा प्रयत्न होता. चंद्रावताचा संबंध उदेपूरच्या सुप्रसिद्ध सिसोदिया वंशाशीं असून त्याची रामपुऱ्याची जहागीर, जयपूरचा माधवसिंह यास तो आनोळी रहात होता तेव्हां त्याच्या इतमामासाठीं त्याचा मामा संग्रामसिंह यानें दिली होती. पुढें माधवसिंहास मल्हारराव होळकराच्या साहाय्यानें आपलें जयपूरचें राज्य मिळालें तेव्हां त्यानें रामपुऱ्याचा भाग होळकरास बहाल केला. ही गोष्ट चंद्रावतास आवडली नाहीं. त्यांनीं योग्य संधि मिळताच होळकराविरुद्ध बंड उभारलें ( इ. स. १७७१ ), या वेळीं तुकोजी होळकर हा विसाजीपंत बिनीवाल्याबरोबर उत्तर हिंदुस्थानांत अडकला होता. परंतु अहल्याबाईनें हिंमत खचू न देता स्वतःच बंडवाल्याशीं तोंड देऊन मंदसोर जवळच्या पळसुडा येथील लढाईंत त्याचा पराजय केला (मालकम). पुढ १७८७ त रजपुतांनीं लालसोट येथें महादजी शिंद्याचा पराभव केला. व होळकराचा निंबाहेडा महाल खालसा करून त्याचें जावद शहर घेतलें. तेव्हां चंद्रावतास जोर येऊन त्यांनीं पुन्हा बंड केलें. हें पाहून अहल्याबाईनें सैन्य जमा करून तें अंबाजीपंत राघोरणसोड इत्यादि लोकांबरोबर रजपुतावर पाठविलें. परंतु ह्या सैन्यावर रजपुतांनीच कच्चो मुक्कामीं छापा घालून अंबाजीपंतास ठार केलें. तेव्हां अहल्याबाईनें तुळाजी शिंदे नावाचा आपल्या माहेरचा एक इसम व मागील खेपेस चंद्रावताचें बंड मोडणारा तिच्या पाहुण्यावरील शरीफभाई यांजबरोबर आणखी पांच हजार स्वार देऊन त्यांना रवाना केलें. या फौजेनें रजपुतांचा पराभव करून जावद, निंबाहेडा, राणीपुरा वगैरे किरकोळ महालांत ठाणीं घालून खुद्द रामपुराहि सर केला यानंतर रजपुतांनीं आमदेचा आश्रय केला, परंतु तोहि किल्ला लवकरच काबीज होऊन अहल्याबाईची फत्ते झाली. (इ स. १७८८) आपल्या राज्यांतील धाडे घालून त्यावर उपजीविका करणाऱ्या गोंड लोकांचा अहल्याबाईनें ज्या रीतीनें बंदोबस्त केला तिजवरून तिचें व्यवहारचातुर्य फार उत्तम रीतीनें व्यक्त होत आहे; तिनें हे लोक आपल्या हद्दींतून कोणाचा माल जाऊं लागला म्हणजे मालकापासून जो भीलकवडी नांवाचा कांहीं कर घेत असत तो मान्य केला परंतु त्याच्या मोबदल्यांत तिनें त्यांजकडून पडित जमीनीची लागवड करून घेतली व त्यांना कांहीं हद्द नेमून देऊन तींत जर कोठें चोरी झाली तर आपण तपास लावून देऊं असा त्यांच्याकडून करार करून घेतला. पुष्कळ दिवसाच्या करारानें जमीन पट्टयानें देण्याची पद्धत अहल्याबाईनेंच सुरू केली असें म्हणतात ( मालकम भाग २ )

तथापि अहल्याबाईचें जें आज सर्वतोमुखी नाव झालें आहे तें तिच्या युद्धकौशल्यामुळें किंवा मुत्सद्दीपणामुळें नसून औदार्य, न्यायप्रियता, भूतदया, सदाचरण, इत्यादि लोकोत्तर गुणांमुळेंच होय. ह्या गुणांमुळें तिला आपली कारकीर्द यशस्वी करून दाखविता आली, एवढेंच नव्हे तर पाटीलबावा, नानाफडनवीस यासारख्या मुत्सद्दीमंडळीसारखें अखेरपावेतों वजन राहिलें. अहल्याबाई म्हणजे साक्षात मातुश्री असें समजून पाटीलबावा तिच्याशीं वागत, पत्रव्यवहार करीत व बोलत. नाना फडनवीस, हरिपंत इत्यादि तत्कालीन प्रमुख मंडळीचें मत अहिल्याबाई आपल्या कामकाजात विचारी, परंतु ती आपलें काम करतांना दुसऱ्याचें वृथा वर्चस्व आपल्यावर पडूं देत नसे. तुकोजी अहिल्याबाईपेक्षा दोनतीन वर्षांनीं मोठाच होता, तथापि तो तिला 'आई' असें म्हणे व त्याचें वर्तन तिच्याशीं दासानुदासासारखें होतें. अहल्याबाईची न्यायप्रियतेबद्दल ख्याति होती. तिच्या धर्मशील वर्तनामुळें तत्कालीन राजेरजवाड्यांचा तिजवर इतका विश्वास होता कीं आसपासचीं संस्थानें तिच्याकडे आपले तंटे घेऊन येत. (उदाहरणार्थ, महेश्वर दरबारची बातमीपत्रें भाग १, पा. १२४; भाग २ पा. १७० पहा.) त्याचे गृहकलह अहल्याबाईनें मिटविले इतकेंच नव्हे तर प्रसंगविशेषीं त्यांची दाद पुणें दरबारापावेतों लावून त्यास योग्य न्याय मिळवून दिला ( पान ११ पहा ). यामुळें पुणें दरबारात कोणास अन्याय झालासा वाट त्याप तो अहल्याबाईकडे येई. मल्हारराव वारला तेव्हां होळकराच्या खजिन्यात १६ कोट रुपये होते. या शिवाय त्या वेळीं संस्थानचे खाजगी व दौलत असे दोन फार मोठे भेद मानण्यात येत. खाजगी म्हणजे राजपत्नीच्या नावानें व्यक्तिविषयक असलेली देणगी अथवा उत्पन्न, व दौलत म्हणजे सरकारी उत्पन्न. यापैकीं खाजगीवर पेशव्याचा कांहीं हक्क नसे; दौलतीच्या मुलुखाचें मात्र अर्धें उत्पन्न पेशव्यास द्यावें लागे. अहल्याबाईच्या हातीं इतका पैसा आला असतांहि तिनें त्याचा दुरुपयोग मुळींच केला नाहीं. दौलतीचा पैसा तिनें प्रजासंरक्षणार्थ खर्च केला. इतकेंच नव्हे तर प्रसंग पडल्यास खाजगीचा पैसाहि दौलतीच्या कामी ती उपयोगांत आणी. अशा रीतीनें दौलत व खाजगी यांतील पैसा सरकारी कामांत खर्च करून जो शिल्लक उरली तिचा तिनें एकंदर हिंदुस्थानांत लोकोपयोगी सार्वजनिक कामें करून ठेवण्यात व्यय केला. होळकराच्या खासगी खजिन्याचा तिच्या हातीं जो पैसा आला तो सर्व धर्मकार्यांत खर्च करण्याकरितां म्हणून तिनें एकीकडे काढून ठेवला

होता. तिनें लोकांच्या सोयीसाठीं जागोजाग अन्नछत्रें, धर्मशाळा, व विहिरी, रस्ते व घाट बांधले आहेत. तिनें काशीविश्वेश्वराचें मंदिर व गया येथील विष्णुपदाचें मंदिर पुनः नवें बांधलें आणि कलकत्यापासून काशीपावेतों मोठा थोरला रस्ता बांधला. [ हरप्रसाद शास्त्राची " स्कूल हिस्टरी ऑफ इंडिया ] " काशीविश्वेश्वराप्रमाणेंच सोरटी सोमनाथाचें देवालयहि तिनें नूतन बांधवून त्यांत मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली. (महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें भाग२,पानें ८६-८७).

याप्रमाणें आसेतुहिमाचल तिनें असलीं पवित्र कार्यें करून आपलें नांव अजरामर करून ठेविलें. तिनें कोणतें काम कोठें करून ठेविलें याची माहिती तिच्या संस्थानांत सांपडत नाहीं, तर ती अन्य ठिकाणीं एके जागीं कशी सांपडणार ! कारण तिनें कित्येक गुप्त दानें केलीं आहेत, तर नित्येक ठिकाणीं जीं देवळें, अन्नछत्रें इत्यादि नित्य खर्चाचीं लोकोपयोगी कामें केलीं आहेत त्यांच्या दानधर्माचा संबंध त्याच गांवीं घरें बांधून किंवा जमिनी खरेदी करून त्यांच्या उत्पन्नाशीं लावून दिला. यामुळें त्याची दाद संस्थानापर्यंत येतच नाहीं.

अहल्याबाईच्या शेवटच्या दिवसांत तिजवर जीं एकामागून एक अनेक कौटुंबिक संकटें गुदरलीं त्यांची कहाणी अत्यंत हृदयद्रावक आहे. तिचे दोघ भाऊ तिच्या उतारपणींच वारले. तिच्या मुलीचा मुलगा नथ्याबा—ज्यास आपल्या मागून होळकराची गादी द्यावयाची असा तिचा विचार होता तो—इ. स. १७९० त आपल्या वयाच्या तेविसाव्या वर्षी क्षयानें वारला. त्याच्या मागून त्याच्या १८ व १० वर्षांच्या दोन स्त्रियांनीं सहगमन केलें. नथ्याबाचा *दहनविधि करून मंडळी परत येतात तोंच काशीराव* होळकराची स्त्री म्हणजे तुकोजी होळकराची सून आनंदीबाई म्हणून होती तिचें देहावसान झालें. पुढें एक वर्षानें तिचा जावई यशवंतराव फणसे वारला होऊन चार तासांत वारला. त्याच्या मागून अहल्याबाई नको नको म्हणत *असताहि तिची मुलगी मुक्ताबाई सती गेली. यावेळीं* अहल्याबाईच्या वयाचीं पासष्ट वर्षें उलटलीं होतीं. तरी हे सर्व आघात खंबीरपणानें व शांततेनें सहन करून आपला कारभार पाहूं लागली. अशा स्थितींत सुद्धां जेव्हां दुसऱ्या वर्षी शिंद्याचा सरदार गोपाळराव यानें तुकोजीची कुरापत काढून त्यावर आपली फौज घातल्यामुळें तुकोजीनें 'येथें असा प्रसंग गुदरला ! इतःपर खर्चाची व फौजेची मदत झाली पाहिजे ' अशीं महेश्वरास पत्रें पाठविलीं, तेव्हांचें तिचें वर्तन एखाद्या तरुण वीरासहि लाजविण्यासारखें होतें. तिनें पांच लक्ष रुपयांच्या हुंड्या सुभेदाराकडे पाठवून पत्र लिहिलें कीं ' हिंमत न सोडतां हरामखोराचें पारिपत्य करावें. खर्चाचा व फौजेचा श्वेत ( सेतु ) बांधते. म्हातारपणीं करव खाशीं असल्यास लिहून पाठवावें मी डेरे दाखल होतें.' असो. खर्ड्यांची लढाई झाल्यावर अहल्याबाईनें फार दिवस काढले नाहींत. ती शके १७१७ च्या श्रावण वद्य १४ स परलोकवासी झाली.

अहल्याबाई दिसण्यांत फार सुंदर नव्हती तरी तिचा चेहरा अत्यंत तेजस्वी दिसे. तिचीं वस्त्रें पांढरीं शुभ्र पण साधीं असत. तिची वृत्ति शांत असे, परंतु तिला असत्याचा तिटकारा *असल्यामुळें जेव्हां कोणी तिच्याशीं तसें आचरण करी* तेव्हां तिला इतका कोप चढे कीं तिच्या कृपेंतील मंडळींहि तिजपुढें जाण्यास धजत नसत. तिचीं धार्मिक मतें व उपवास सडकतर असून तीं तिनें अखेरपावेतों चालू ठेविलीं होतीं. तिच्या कारकीर्दींत इंदूर संस्थानांतील प्रजेचा उत्कर्ष झाला. त्यावेळीं ह्या संस्थानाचे ६ भाग व ८७ तालुके होते. तिच्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांतील ( इ. स. १७६६-९५ ) इंदूर संस्थानच्या उत्पन्नाची सरासरी काढली तर ती १,६०,३०,७३४. येते. मालकम साहेबानें अहल्याबाईची दिनचर्या मोठ्या काळजीनें व कौतुकानें लिहून ठेविली असून तींत तो म्हणतो कीं, ' अहल्याबाई ही सूर्योदयापूर्वी घटका दीड घटका उठून स्नान करी व नंतर पूजाअर्चा करी. यानंतर ती नियमित काळपर्यंत पुराण श्रवणास बसे. नंतर ती दानें देऊन आपणासमक्ष ब्राह्मणास भोजनें घाली. हें होत आहे न होत आहे तोंच तिचें ताट वाढून येई. तिच्या भोजनांत सारे शाकभाज्यांचे पदार्थ असत. ...... भोजन आटोपल्यावर पुनः कांहीं वेळ परमेश्वरस्तव करून थोडा वेळ वामकुक्षी करी. नंतर ती पोषाख करून सरकारी कामकाज करावयास दरबारांत जात असे. ...... ती दरबारा जाई तेव्हां बहुधा दोन प्रहर होत. तेथें ती सूर्यास्तापर्यंत म्हणजे सुमारें सहासात वाजेपर्यंत बसे. यानंतर दोन तीन तास पूजाअर्चा व फराळ वगैरे इत्यांत जात. मग ती नऊ वाजावयाच्या सुमारास सरकारी काम पुन्हां पाहूं लागे. तें दहा अकरा वाजेपर्यंत पाही व त्यानंतर निजावयास जात असे."

[ संदर्भ ग्रंथ.—याच लेखांत पहा. ]

चार कोरीव लेख व काहीं नाणीं सांपडलीं. काही जैन मंदिरें व एक हिंदु देवालय याचे अवशेष अजून दिसतात. ( इं. गॅ. )

(२)-(संयुक्तप्रांत) बुलंदशहर जिल्हा. अनुपशहर तहशिलींत असलेलें एक शहर. उ. अ २८°२८' व पू. रे. ७८°१५'. लो. स ( स. १९०१ ) २३८५. अहार हा शब्द अहि आणि हार या दोन शब्दांपासून बनला आहे अहि म्हणजे सर्प व हार म्हणजे सत्र. जनमेजय राजानें आपलें सर्पसत्र या ठिकाणीं केलें अशी प्रचलित कल्पना आहे व त्यावरून असें नाव पडलें हास्तिनापूर वाहून गेल्यावर सोमवंशीय राजाची हें शहर राजधानी झालें. दुसरा एक प्रचलित समज असा आहे कीं, कृष्णाची भार्या रुक्मिणी येथें राहत असे व ज्या देवळातून कृष्णानें तिला हरण करून नेली तें देऊळ अजून दाखवितात. ,हें ठिकाण खरोखरच फार पुरातन आहे. अकबरच्या कालीं अहार एका परगण्याचें मुख्य ठिकाण होतें. हें शहर गंगेच्या तीरीं उंचावर वसलें असून या ठिकाणीं बरींच देवळें आहेत. जून महिन्यात येथें स्नानाकरिता मोठी यात्रा जमते. ( इं. गॅ )

अहाळींव — या वनस्पतीस लाटिन मध्यें लेपिडियम साटिव्हम, इंग्रजीत कॉमन क्रेस, संस्कृतात अहालिव, गुजराथी भाषेंत अशेळीयो. हिंदींत हालो, मराठींत "हालीव" अथवा अहाळीव हीं प्रचलित नांवें आहेत. त्याचें बीं तपकिरी रंगाचें, मोहोरी एवढें पण अणकुचीदार लांबट असतें. दक्षिण महाराष्ट्रात व गुजराथेंत अहाळींव कोरडवाहू अगर पाणथरी शेतांत बियांच्या पिकाकरिता पेरितात. अहाळिवाचें रोपटें कोंवळें असता त्याची भाजी करितात. ती भाजी अंगास उष्णता आणणारी आहे असें म्हणतात

साहेब लोकात मस्टर्ड ( मोहरी ) व क्रेस (अहाळींव ) यांची कोंवळीं रोपें उपटून स्वच्छ धुवून बारीक चिरून शिरका वगैरे पदार्थ घालून हिरवीच कोशिंबीर करून खातात. अगर कोथिंबिरीप्रमाणें दुसऱ्या पदार्थास स्वाद आणण्याकरिता घालतात. ह्या दोन वस्तू पेरण्यास कोठेंतरी ( कुंडींत, टोपलींत अगर बागेंत ) जागा असल्यास गृहकृत्यात दक्ष व हौशी स्त्रिय, आपल्याकडील स्त्रिया जशा मिरच्या, कोथिंबीर करण्यास परिश्रम घेतात त्याप्रमाणें, जरूर पेरतात. कारण त्या ताज्या उपटून वापरण्यांत त्याचा स्वाद विशेष असतो.

खुरपण्याच्या अणीनें ४–६ बोटावर रेघा पाडून खतावलेल्या मातींत रांगोळी प्रमाणें चिमटीनें बीं पेरावें व हातानें बीं झांकून पाणी घालावें. ४–५ दिवसात बीं उगवून वर येतें तें उगवल्यावर जसें लागेल तसें उपटून वापरतात.

अहाळिवाची लागवड महीनदीकाठीं कोरडवाहून जमीनींत करितात. जेथें अपू होते तेथें याची लागवड करितात. खेडा जिल्ह्यांत याची लागवड होते. हें पीक गोराडू जमिनींत चागलें येतें याचें बीं अफूच्या वाफ्याच्या वरंब्यावर पेरितात खेडा जिल्ह्यात याचें बीं मोहरींत टाकितात. या पिकासाठीं जमीन तयार करून तींत एकरीं शेणखताच्या सुमारें दहा गाड्या देतात. आक्टोबर महिन्यात दोन तीन पौंड बीं वाफ्यात टाकितात. याला एक खुरपणी देऊन तें पातळ करितात. पेरण्याबरोबर पाणी देतात. दुसरें पाणी चार दिवसांनीं देतात पुढें प्रत्येक वेळीं दहाबारा दिवसाच्या अंतरानें आठ वेळ पाणी देतात पीक जानेवारींत तयार होतें, तें कापून आणून ठोकून दाणे तयार करितात पीक स्वतंत्र असल्यास एकरीं ५००–६०० पौंड उत्पन्न होत. दरमणी ३।४ रुपये किंमत पडते ( १ मण ४० = पौंड )

हें बीं खानदेशात पाटाच्या किंवा नदीच्या काठीं पेरतात हें उष्ण, कडू व पुष्टिदायक आहे व त्वग्रोग, वायु व गुल्म याचा नाश करणारें आहे अशी समज आहे

उपयोग.—अहाळींवाची खीर करतात. प्रथम दूध उकळत ठेऊन त्यांत अहाळींव टाकावें व तें चागलें मऊ होऊन खिरीसारखें आटलें म्हणजे त्यात गूळ किंवा साखर घालावी ही खीर वातनाशक असून कमरेस बळकटी देऊन धातुपुष्टी करते. अहाळींवाचे लाडू अगर खीर बाळंतिणीस दिल्यास शक्ति येऊन दूध अधिक वाढतें असें म्हणतात. [ ले. ग के केळकर ]

अहि–(ऋग्वेद७ १०४, ७,६.५७,१६६ )व तदुत्तर वैदिक वाङ्मय यातून ' सर्प ' याअर्थी हा शब्द योजिलेला दिसतो. यानें आपली कात टाकिल्याबद्दल उल्लेख आढळतो ( ऋ. ९.८६, ४४, अथर्व. १ २७, शत ब्रा ११.२, ६, १३; बृह. उप ४ ४,१०, जैमि ब्रा १.५, २ १३९; काठक उप. ९.६, १७ ). याच्या चमत्कारिक हालचालींचाहि उल्लेख केलेला आहे ( ऐतरेय आर. ५.१,४ ) व तीवरून त्याला ' दत्वती रज्जु ' ( दाते असलेली दोरी ) असें नांव मिळालें आहे ( अथर्व ४ ३,२ ) याचा दंश विषारी आहे ( ऋ. ७. १०४,७, अथर्व १० ४,४ इ ) हिंवाळ्यात याला जडत्व प्राप्त होतें म्हणून हा पृथ्वीच्या पोटात शिरतो ( अथर्व १२ १,४६ ) वाघमाऱ्यापासून रक्षण करण्याकरिता याच्या कातेचा उपयोग करितात ( अथर्व १ २७ )

वृत्राला ऋग्वेदात अहि म्हटलें आहे असें दिसतें. कारण वृत्राची विशेषणें अहीला व अहीचीं वृत्राला लाविलेलीं आढळतात. (ऋ १.३२, १–२ व ७–१४) व इंद्रानें अहीला मारिलें असेंहि वर्णन ( ऋ ८८२,२ )आहे अग्नीलाहि अहि असें म्हटलें आहे ( ऋ. १ ७९,१ ) शत्रूला अहीच्या स्वाधीन करण्याविषयीं सोमाला विनविलें आहे ( ऋ ७. १०४,९ ). हा शब्द अनेकवचनी असता ज्यामध्यें अहि हा प्रथमजन्मा आहे ( ऋ.१ ३२,३–४) तें राक्षसकुल बहुधा निर्दिष्ट होतें ( ऋ ९ ८८,४, १०.१३९,६ ) अहिबुध्नाचें चागले गुण दर्शविणारें स्वरूप जें अहिर्बुध्न्य, ती अहीचीच दैवी प्रकृति होय. अवेस्तामध्यें अहि यास सदृश असा अझि शब्द असून त्याचा अर्थहि सर्प असाच आहे याबद्दलच

पुढें अग्नि दहाक अशी शब्दयोजना होऊन त्याचें पुढें झोहाक असें रूपांतर झालें या झोहाकबद्दल अनेक पौराणिक कथा इराणांत प्रचलित आहेत व त्या सर्पाशीं संबद्ध आहेत. ( बुद्धोत्तर जग पृ. ४१ पहा ). अहि या शब्दाचा अहरिमन् या शब्दाशीं संबंध जोडण्याचाहि प्रयत्न झाला आहे [ वेदिक इंडेक्स, वेदिक मायथालॉजी व श्रौत वाङ्मय ] "वल" नावाचें अहीचें नगर होतें, तें कुत्साचा कैवार घेऊन इंद्रानें सर केलें तें सर करून सूर्यांत सामील केल्यामुळें सूर्याचें पारडें जड झालें "वल" आणि "सूर्य" यांच्यामध्यें वन लागलेलें होतें वनांतील लोकांनीं सूर्याची बाजू घेतल्यामुळें सूर्याची फत्ते झाली तेव्हां त्यास पुष्कळ फायदा झाला. इंद्रानें ज्याअर्थी कुत्सासाठीं स्वारी केली आणि स्वारीमुळें सूर्याचें पारडें वाढलें त्यापक्षीं कुत्स हा सूर्याचा राजा झाला. ( भागवती अर्थ ऋग्वेद १० १३८, १-२ ). अहीनें सिंधु प्रांत बळकाविला होता तो इंद्रानें सोडवून अखेरीस अहीसहि ठार केलें ( ऋ १०.११३, ७ ). या उल्लेखावरून अहीचें स्थान बलुचिस्तान होतें असें भागवत म्हणतात.

अहिच्छत्र—( अहिक्षत्र ). अर्वाचीन रामनगर. या प्रसिद्ध प्राचीन नगराचें नांव अद्यापि कायम आहे. तथापि हल्लीं लोकांनीं हें शहर सोडिलें आहे पांडवांच्या वेळीं ही उत्तरपंचाल देशाची राजधानी होती. अहिक्षेत्र किंवा अहिच्छत्र अशा दोन प्रकारांनीं हें नांव लिहितात येथील मूळचा आदिराजा याजवर सर्पानें आपल्या फणाचें छत्र केलें होतें अशी दंतकथा आहे. येथें एक जुना किल्ला आहे. तो आदिराजानें बांधिला असें म्हणतात. भारतात अहिच्छत्र असें नांव आढळतें ( ५.१९ ) भारतात सांगितलें आहे कीं, पांचाल देश हिमालयापासून चर्मण्वती (हल्लींच्या चंबळा) नदीपर्यंत पसरला होता. उत्तर पंचाल ( हल्लींचे रोहिलखंड ) याची राजधानी अहिच्छत्रा होती व दक्षिण पंचाल ( अंतर्वेदी ) ची राजधानी कांपिल्य ( हल्लींची कांपिल ) होती. कांपिल हें बुदाऊन आणि फरुकाबाद यांच्यामध्यें गंगेच्या जुन्या पात्रावर आहे. भारती युद्धापूर्वी पांचाल देशचा राजा द्रुपद याम द्रोणानें जिंकून उत्तरपंचाल आपण ठेवून दक्षिणपंचाल द्रुपदास दिला ( म. भा. १.१३८ )

आदिराजा आणि सर्प यांची दंतकथा आहे, तशाच प्रकारची एक कथा बुद्ध ग्रंथांत आहे; परंतु बौद्धांनीं ती आदिराजाच्या कथेवरून रचिली असावी कारण आदिराजाची कथा प्राचीन आहे. अहिच्छत्र किंवा अहिक्षेत्र हें नांव अनेक शहरांना आहे

टॉलेमी ज्याला अदिसद्र म्हणतो तें हेंच नगर असावें. अहिच्छत्र शहराचा घेर ३ मैल आहे व त्याच्याभोंवती नैसर्गिक तट आहे, असें ह्युएनत्संग लिहितो. हें सर्वांशीं जमतें. याच्या उत्तरेस व पूर्वेस एक ओढा आहे आणि पश्चिम व दक्षिण बाजूस रामगंगा आणि धीमा यांच्यामध्यें किल्ला आहे. ह्युएनत्संगच्या वेळीं येथें १२ विहार, चार, पांच स्तूप आणि वैदिक धर्माचीं ९ देवालयें होतीं. हल्लीं किल्ला मोडकळीस आला आहे; आंत जिकडे तिकडे जंगल आहे, तरी ३२ बुरूज अद्यापि दुरुस्त आहेत.

ह्युएनत्संगानें या राज्याचा घेर ४०० मैल सांगितला आहे. यावरून त्यांत रोहिलखंडाचा पूर्व भागहि येत असावा. [ दीक्षित—भारतवर्षीय भूवर्णन. विल्सन—विष्णुपुराण ४.१६१; एशेज पु. १ पा. ४८, २९१ वगैरे महाभारत. डौसन—हिंदु क्लासिकल डिक्शनरी ]

अहिरगांव—(मुंबई,) नाशिक जिल्हा. निफाडच्या वायव्येस १० मैल. लोकसंख्या (१८८१) ९४५. या ठिकाणीं सन १९१८ मध्यें ठाण्याच्या तुरुंगांतून पळून गेल्यानंतर त्रिंबकजी डेंगळ्यास पुनः पकडलें ( मुं. गॅ. पु. १४ पा. ३५० पहा ). येथें कार्तिक शुद्ध ४ स एका मुसुलमान साधूचा उरुस भरतो. ( मुं. गॅ. १६, १८८३ ).

अहिरी, जमीनदारी—(मध्यप्रांत.) चांदा जिल्ह्यांत ही जमीनदारी सर्वांत मोठी आहे. एकंदर क्षेत्रफळ २५ चौ. मैल. या जमीनदारीचीं गडचिरोळी तहशिलींत आणखी ७७खेडीं असून त्याचें क्षेत्रफळ ५५ चौरस मैल आहे, व ती मालगुजारी हक्काचीं आहेत. या जमीनदारीच्या उत्तरेस झरापापरा, पोटेगांव, खुटगांव आणि पै-मुरंडा जमीनदारी, पूर्वेस बस्तर संस्थान, दक्षिणेस शिरोंचा तहशील, पश्चिमेस प्राणहिता नदी, दिना नाला आणि गडचिरोळी तहशिलीचा कांहीं भाग आहे. हींतून वैनगंगा, प्राणहिता, आणि इंद्रावती या नद्या वाहतात. बहुतेक सर्व जंगल आहे

इतिहासः—हल्लींच्या जमीनदाराच्या मानसु बापु नांवाच्या पूर्वजास चांदाच्या एका गोंड राजानें सुमारें सहा शतकापूर्वी ही जमीनदारी बक्षीस दिली. परंतु ही केव्हां मिळाली त्याची तारीख ठरविण्याइतका कागदी पुरावा नाहीं. कोकशा नांवाचा जमीनदार इ. स. १७०३ पासून १७६९ पर्यंत होऊन गेला त्यावेळेपासून खात्रीलायक माहिती या जमीनदारीबद्दल मिळूं शकते. हा त्यावेळच्या चांदाच्या शेवटच्या गोंड राजाच्या वतीनें मराठ्यांच्या विरुद्ध लढला होता. हा रामशहाचा ( इ. स. १६७२-१७३५ ) नातेवाईक असून त्यास साधो आणि मूला डुरिया नांवाच्या बंडखोरांचा मोड करण्याकरतां म्हणून ही जमीनदारी इनाम मिळाली होती. या बंडखोरांनीं सूरजगड किल्ला आपल्या ताब्यांत घेतला होता कांहीं मर्यांनीं यास जय प्राप्त झाला. यामागून त्याचा वंशज भीमराव अथवा त्र्यंबकराव ( खरें नांव कोणतें याविषयीं संशय आहे ) यास ही जमीनदारी मिळाली ( इ. स. १७७० ते १८१८ ) यानें इ. स. १७७१ सालच्या मराठ्यांच्या आपआपसांतील भांडणांत मुधोजीचा पक्ष घेतला होता. या वेळीं हा व याचा भाऊ मोहनशा यांच्याकडे चांदाचें लष्करी आधिपत्य होतें व याचा तिसरा भाऊ विश्वासराव याच्या ताब्यांत माणिकगड किल्ला होता. या

तिघांनीं पुण्याकडून आलेल्या एका लष्करी तुकडीचा पराभव केला होता. या तुकडीनें मुधोजीचा कबिला पकडून अटकेंत ठेविला होता. या तिघा भावांनीं त्याची सुटका केली असें मेजर लुसी स्मिथ म्हणतो. भीमरावानें आपली कीर्ति मागें ठेविली आहे. मुलुखांत चांगल्या रीतीनें यानें बंदोबस्त ठेवला होता व आसपासचे लहान सहान जमीनदार यानें आपल्या निशाणाखालीं आणले होते. याच्याच अमदानींत ही जमीनदारी इतकी मोठी वाढली आहे. याच्यामागून दर्यावदिनें सहा महिनेच या जमीनदारीचा उपभोग घेतला व नंतर भुजंगरावाच्या ताब्यात ही जमीनदारी आली. ही वेळ मोठी आणीबाणीची होती. याचवेळीं बॅकिन्सॅन आप्पासाहेबास पकडलें होते व यावेळीं भुजंगरावानें आपल्या घराण्याच्या लौकिकाप्रमाणें आपल्या राज्यकर्त्यांची बाजू राखली व चांदा शहराच्या रक्षणार्थ झालेल्या लढाईंत यानें ब्रिटिशांविरुद्ध लढाई केली. पुढें चांदा शहराची लूट झाल्यावर भुजंगरावाकडेच ही जमीनदारी इ. स. १८४७ पर्यंत राहिली. त्यानंतर त्याचा मुलगा व्यंकटेशराव याजकडे आली परंतु तो इ. स. १८५१ सालीं मरण पावला. यानंतर भीमरावची विधवा स्त्री लक्ष्मीबाई हिच्याकडे ही इस्टेट आली. पुढें ती इ.स. १८६१मध्यें मरण पावली. इ. स. १८५७ च्या बंडांत मोलपल्लीच्या जमीनदारानें राजपूरच्या परगण्यात लुटालूट सुरू केली व पुढें थोड्याच वेळानें घोट-अरपल्लीचा जमीनदार व्यंकटराव त्यास येऊन मिळाला व यानीं उघड ब्रिटिशराज्याविरुद्ध बंड उभारलें. या वेळीं त्यांनीं प्राणहिता नदीवरील चिंचगोंडी येथील तारखात्यापैकीं गारटिंयंड आणि हॉल यांस ठार मारिलें. या वेळीं या लक्ष्मीबाईच्या सहायानेंच बाबुरावास पकडण्यांत आलें व या तिच्या कामगिरीबद्दल घोट अरपल्ली जमीनदारीतील ६७ खेडीं हिच्या स्वाधीन करण्यात आलीं. ती अद्याप याच जमीनदारींत चालत आहेत. बंड संपल्यावर व त्तिकडे तिकडे शांतता झाल्यानंतर या जमीनदारींत विशेष लिहिण्यासारखें कांहीं घडलें नाहीं. लक्ष्मीबाईच्या नंतर झालेले जमीनदार मेंगराव ( इ. स. १८६१-१८६६ ); सावित्रीबाई (इ. स. १८६६-१८७१) धर्मराव (इ.स. १८७१ ते १८९३). या जमिनदारींत दत्तक फार वेळ झाले आहेत. इ. स.१८९३ सालापासून ही जमिनदारी भुजंगराव नांवाच्या जमिनदाराकडे आली आहे. हा जमिनदार वाईट चालीचा असल्यामुळे इस्टेटीस कर्ज होत गेलें व इ. स. १९०२ सालीं जमीनदार आपली जमिनदारी चालविण्यास नालायक आहे असें सरकारनें ठरविलें व इस्टेट कोर्ट ऑफ वार्डसच्या ताब्यांत दिली. या वेळीं इस्टेटीस सुमारें एक लाख कर्ज झालें होतें. या वेळीं जमीनदारास कोणी चिथावल्यावरून त्यानें लहानसें बंडच उभारलें. परंतु त्याचा तावडतोब मोड करून भुजंगरावास चांद्यास आणून ठेवलें व ज्यानें त्यात भंग होतें त्यांना इस्टेटींतून काढून टाकल्यावर जमीनदारास पुन्हा अहिरीस जाण्याची परवानगी दिली.

कारभार— या जमिनदारींत एकंदर ३८० खेडीं आहेत. बहुतेक खेड्यांची वहिवाट जमिनदाराकडूनच होते. परंतु कांहींची ठेकेदाराकडून होते. जरवंदी आणि मोलपल्ली तालुके या दुय्यम जमीनदाऱ्या आहेत. जरवंदींत १७ खेडीं असून अहिरीच्या जमिनदारांनीं इ. स. १८५८ मध्यें जागोराव गोंड याम कांहीं लग्नसंबंधाच्या ठरावांत वार्षिक १०० रुपये कर ठेऊन वंशपरंपरेनें दिलीं. मोलपल्ली तालुका हा बंडखोर बाबुरावाच्या जमिनदारीचा भाग असून तो लक्ष्मीबाईनें भोलापट्टनमच्या जमिनदाराला १०१ रुपये टाकोळी ठरवून सर्व हक्कासहित दिला. हल्लीं या तालुक्यांत २३ खेडीं असून टाकोळी १७२ रु. आहे. कोर्ट ऑफ वार्डसनें इस्टेट ताब्यात घेण्यापूर्वीं जीं खेडीं जमिनदाराच्या ताब्यांत होतीं असें समजलें जात असें त्या खेड्याची वहिवाट भूमिया करीत असत या लोकांचें वजन फार असल्यामुळें बहुतेक उत्पन्न ते स्वतःच घेत असत कुळे देखील यांच्यावर सर्वतोपरी अवलंबून असतात. ज्यावेळीं पाहणी केली त्यावेळीं भूमियास काढून टाकले असतांना जीं खेडीं पूर्वीं चांगली भरभराटींत होतीं तीं ओसाड पडलीं असें कांहीं ठिकाणीं आढळून आलें लोकसंख्या (१९११) ३७४२१ होती. येथील जमीन चांगला असून पाऊसहि वेळेवर पडत असल्यामुळें दुष्काळ फारसा पडत नाहीं. येथें राहणारे लोक राजगोंड, मारिया, कोया, तेली, मरार वगैरे जातींचे आहेत.

पिकें:—भात ( मुख्यपीक ), ऊस, ज्वारी, मूग, उडीद, कुळीथ वगैरे. १९०६-७ सालीं लागवडी खालील क्षेत्रफळ ५७९५८ एकर होतें व सारा १३६०० होता.

**अहिर्बुध्न्य**—याचें वैदिक स्वरूप वेदविद्या विभागांतील दैवतेतिहास प्रकरणात सविस्तर दिलें आहे ( ज्ञानकोश-प्रस्तावनाखंड विभाग २ रा, पा. ३३६ ). उत्तरकालीन वाङ्मयांत शिवाचें हें नामांतर म्हणून आढळतें. तसेंच एका रुद्राचेंहि हें नांव आहे.

**अहिवंत किल्ला**.—( मुंबई, ) नाशिक जिल्हा. चांदोर डोंगरांत दिंडोरीच्या उत्तरेस १५ मैलावर हा किल्ला आहे. इ. स. १८१८ मध्यें कॅपटन ब्रिज यानें या टेकडीचें ओबड धोबड, काळी व रोगी अशा प्रकारचें वर्णन दिलें आहे. यावर येण्यास खानदेश व गंगथडी या दोन्ही बाजूंनीं मार्ग आहेत. खानदेशकडील मार्ग सोपा असून गंगथडीकडील मार्ग खोऱ्यातून आहे. पावसाळ्यांत जाणें अशक्य आहे. या खोऱ्यातून पलीकडे गेल्यावर रस्त्यास वळण लागतें व पुढे मधून मधून पायऱ्या आहेत. पुढें दोन दरवाज्यांसारख्या कमानी आहेत व त्यांना लागूनच पडकी भिंत आहे. टेकडीवर एक दगडी कोठार होतें येथें पाणी विपुल

होतें इ स १८१८ साली येथें ५ मनुष्याची शिबंदी असे [कॅप्टन ब्रिग्सचा रिपोर्ट अहमदनगर कलेक्टरची फाईल न ६ जावक किरकोळ ता २०-६ १८१८ ) ( मु गॅ १६ )

**अहिवशी**—अहिवशा, अहिवाम हे सौभरी ऋषीच्या मथुरेंतील आश्रमाचें नाव होतें ब्राह्मणापैकी खरा किंवा ब्राह्मण नसून ब्राह्मण म्हणवून घेणारा हा वर्ग होय हे लोक ब्राह्मण बाप व क्षत्रिय आईपासून जन्मले आहत पूर्वी हे लोक वहात असत जबळपूर व नर्मदा खोऱ्यात याची वस्ती आहे ( रसेल व हिरालाल—कास्ट्स ॲंड ट्राइब्स इन सी पी )

**अहिंसा**—कोणत्याहि सजीव वस्तूला इजा न करण्याच हें तत्त्व फार प्राचान आहे छान्दोग्योपनिषदात (३ १७,४) 'अथयत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ताअस्य दक्षिणा" । या वाक्यात पुरुषरूपी यज्ञाचें अहिंसा ही एक दक्षिणा असल्याचें म्हटलें आहे या उपनिषदाचा काल इ स पू ७ वें शतक धरतात व हाच काल अहिंसातत्त्व उच्चतम कोटीला नेणाऱ्या जैनसप्रदायाच्या उदयाचा आहे मनुस्मृतींत जरी धर्मविहित हिंसा अहिंसा मानिली आहे तरी मासभक्षणाकरिताच केवळ केलेली हिंसा त्याज्य ठरविली आहे ( मनुस्मृति ५ ४४,४८ ) हें तत्त्व निरनिराळ्या भारतीय सप्रदायांतून सवसाधारणपणें आढळतें पण प्रत्येक सप्रदाय याकडे निराळ्या दृष्टीनें पाहातो व आपल्या मताप्रमाणें आचरण ठेवितो

प्रथम ज्या सप्रदायात हें तत्त्व अगदीं परा कोटीला जाऊन पोंचलें आहे त्या जैनसप्रदायाकडे वळूं जैन साधूच्या पंचमहाव्रतामध्यें अहिंसाव्रत हें आद्य आहे. व तें तंतोतंत आचरण्यासाठीं ते—विशेषेकरून स्थानवासी पंथाचे लोक,—नेहमीं बरोबर एक सुताचा कुंचा ( वाट झाडण्यासाठीं ) बाळगितात, तोंडाला फडक्याचा पट्टी ( तोंडात जीवजंतू जाऊं नयेत यासाठीं ) बांधतात व अंगावरील किंवा कपड्यावरील किडे वगैरेहि झाडीत नाहींत कधीं कधीं जैन लोक या जंतूंच्या हत्या टाळण्यासाठीं मनुष्यहत्येकडे दुर्लक्ष करितात उदा सर्पादि घातक प्राणी हातीं सापडले असता त्यांना मुक्त करण्याचा प्रयत्न करितात असें ऐकण्यात येतें की, ढेंकूणपिसा यांचा पांजरपोळ करून, त्यांत लड्डा माणमास पैसे देऊ करून निजावयास पाठवितात ही चाल अजून नष्ट झाली नाही सुरतच्या " बनियन हॉस्पिटल " मध्यें उपद्रवी जीवजंतूकरिता इतर वार्डाबरोबर एक वार्ड असे,असें हॅमिल्टनच्या हिंदुस्थानवर्णनांत लिहिलें आहे (मुखोपाध्याय–सर्जिकल इन्स्ट्रुमेंटस ऑफ दि हिंदूज भा २ पा ५०)

कित्येक जैन लोक अहिंसा आचरण्यासाठीं किती दूरदृष्टि ठेवितात व भावी हिंसा टाळण्यासाठीं तात्कालिक हिंसेस कसा अजाणत प्रवृत्त होतात याचें एक मासलेवाईक उदाहरण म्हणजे असें —उन्हाळ्यात गाई म्हशी वगैरे जनावर आरामशीर झाडाच्या सावलींत बसलेलीं एखाद्या कर्मठ जैनानें पाहिलीं तर तो त्याना तात्काळ तेथून हुसकून लावितो, कारण, जर हीं गुरें अशी आरामशीर जागेंत बसतील तर त्याठिकाणीं त्याचें शेणमूत पडेल, मग त्यात किडे होतील व इतस्ततः ते पसरतील, व सरतेशेवटीं उन्हाच्या तापानें बिचारे मरतील त्यापेक्षा या गुरानाच छायेंत बसू दिलें नाहीं म्हणजे इतक्या जावाचा हानि टळेल! तसच ढुंढये जैन मलोत्सर्गाच्या वेळीं या तत्त्वासाठींच एक घाणेरडा प्रकार करीत असतात, तो अत्यत किळसवाणा आहे हे ढुंढये थंडपाणी, त्यात अनेक सजीव प्राणी असतात म्हणून न पिता केवळ भाताची पेज किंवा भाजीचें पाणी पिऊन राहतात पण पाणी तापवितांना होणारी जीवहत्या याच्या अहिंसेच्या आड कशी येत नाहीं ? जैनशास्त्रात मद्य व लोणी निषिद्ध मानिलें आहे तें या तत्त्वाला अनुसरूनच ( वा गो आपटे विविधज्ञानविस्तार ३५ अ १ ) स्नान करणें, दात घासणें या सारखीं देहशुद्धीचीं कर्मेंहि जैनयतींना निषिद्ध मानिलीं आहेत व या सर्वांचें एकच कारण हिंसाभय हें होय

बौद्ध धर्मांत हें तत्त्व मानव धर्माला अनुसरून योजिलें आहे अष्टमार्गांत हें तत्त्व दोन ठिकाणीं, एकदा योग्य आकांक्षांच्या यादींत व दुसऱ्यांदा सद्वर्तनामध्यें आलेलें आढळतें ( मज्झिम निकाय ३ २५१ = सयुत्त ५ ९ ) तसेंच सप्रदायाच्या दहा नियमां( शिखापदा ) पैकीं व पच शीलांपैकी हें पहिलें आहे ( विनय १ ८३ अंगुत्तर ३ २०३ ) साप्रत उपलब्ध असणाऱ्या जुन्यांत जुन्या बौद्ध प्रथांतील शीलासंबंधींच्या जुन्या बाडांत अहिंसेवर प्रथमच विवेचन केलें आहे व तें अनेक सुत्तांतून जसेंच्या तसेंच घतलेलें आढळतें ( ऱ्हाईस डेव्हिड्स—डायालॉग्स ऑफ दि बुद्ध १ ३, ४ ) अशोकाच्या पहिल्या शिलालेखात ( काल इ स पू २५५ ) पुढील मजकूर आढळतो

ही धर्मानुशासन पत्रिका देवाचा प्रिय प्रियदर्शी राजानें लिहविली—येथें कोणत्याहि जीवाचा हत्या होऊं नये, किंवा जलसे होऊं नयेत कारण असल्या जलशात बहुत दोष आहेत असें प्रियदर्शी राजास दिसून आलें पण देवाचा प्रियदर्शी राजा यास कांहीं जलसे योग्य आहेत असें वाटतें पूर्वी प्रियदर्शी राजाच्या पाकशाळेंत दररोज कित्येक शतसहस्र प्राणी आमटीभाजी करण्याकरिता मारले जात, पण हल्लीं–म्हणजे ही धर्माज्ञा लिहिली जात आहे त्या काळीं–दररोज फक्त तीनच प्राणी मारले जात, ते म्हणजे दोन मोर व एक सांबर—सांबर नेहमी असतेंच असें नाहीं हे तीन सजीव प्राणी देखील पुढें मारले जाणार नाहीत " (स्मिथ–दि ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया पा ९९ )

अशोकाच्या पाचव्या स्तंभावरील लेखात या सम्राटाची अहिंसेंत किती प्रगति झाली हे दिसून येतें जनावरांना खच्ची करण्याच्या तो विरुद्ध असे पण यापूर्वी ७९ वर्षं त्याच्या

राज्यात काय स्थिति होती याची कल्पना येण्यास नक्षिलेच उदाहरण पुरेसें होईल.

इ स. पू ३२६ त अलेक्झांडर तक्षशिला येथ आला तेव्हां आंभी राजानें त्याला सागोतीकरितां ३००० दष्ट बैल व १०००० किंवा त्याहून जास्त बकरीं भेट म्हणून पाठविलीं. यावरून वेदकालाप्रमाणें या वेळींहि लोक खाण्याकरितां गुरं माजवून ठेवीत व अतिथिसत्काराच्या प्रसंगीं त्याची मेजवानी देत गोमांसासंबधीं हिंदूंची प्रचलित भावना त्या काळीं समाजात मुळींच नव्हती म्हटलें असतां चालेल अशोककालीं ती थोडथोडी अहिंसेच्या सरसहा उपदेशानें उद्भुत होऊं लागली व पुढें ती जातिभेदाला व तन्मूलक कलहाला कारणीभूत झाली. असो हा अशोकाच्या स्तंभावरील ५ वा लेख कौटिल्याच्या अर्थशास्त्राशीं जुळतो, उदा. दोन्हीतहि शुक, सारिका, आणि ब्राह्मणी कलहंस यांची हत्या निषिद्ध मानिली आहे भिक्षापर्यटनात कोणतीहि भिक्षा स्वीकारावी असा बौद्धसंप्रदायातील एक नियम आहे, जेव्हां देवदत्तानें बुद्धाजवळ हा नियम कमी व्यापक करण्याकरितां विनंति केली, तेव्हां बुद्धानें तसें करण्याचें साफ नाकारिलें ( विनय २ ११७, ३.२५२ ) बुद्धाच्या तोंडीं घातलेल्या सर्वश्रुत आमगंध सुत्तात असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, मांसाशनानें मनुष्य बिघडत नसून तो दुष्कृत्यांनीं बिघडतो, स्वत बुद्धानें चंड नावाच्या धिसाड्याच्या घरीं डुकराचें मांस यथेच्छ सेवन केलें, व त्यामुळें त्याला अतिसार होऊन मृत्यु आला तेव्हां वरील गोष्टींवरून या अहिंसेसंबधातल्या बौद्ध व जैन विचारात किती फरक आहे हें दिसून येईल हर्षकालीं गोवधनिषेध तीव्र झाला होता तरी इतर प्राण्यांचें मांस ब्राह्मणानांहि निषिद्ध नसे ( वाटर्स, पु १ )

या बौद्ध व जैन अहिंसा तत्त्वामुळें प्राचीन पशुयज्ञ बंद पडले व '' अहिंसा परमो धर्म '' यासारखी शिकवण हिंदूंमध्यें सुरू झाली महाभारतांत हिंसा व अहिंसा या दोन्ही गोष्टींना पोषक अशीं विधानें सांपडतात ( वनपर्व—धर्म-व्याध संवाद, अ २०८, शांति २६४—२६५ ) बौद्ध धर्म लुप्त होऊन गेला तरी व जैनधर्म निर्बल व अल्पसंख्यांक बनला असतांहि ब्राह्मणी धर्माच्या पुनरुत्थापकांना मांसाशन शास्त्रोक्त करून घेतां आलें नाहीं यावरून हें अहिंसा तत्त्व हिंदु समाजात किती खोल दमलें असावें याची कल्पना होईल

ब्राह्मणात सुद्धां सर्वच निवृत्तमांस आहेत असें नाहीं बंगाल, पंजाब वगैरे प्रांतांतील ब्राह्मण जरी मटन खात नसले तरी मासे खातातच त्यामुळें समाजात निवृत्तमांस, मासेखाऊ व मटनखाऊ असे तीन मोठे भेद पडून एकमेकांच्या सोंवळेपणाच्या कल्पनामुळें त्यांच्यात उघड नसला तरी आतून वैर असतेंच. मांसाहार चांगला कीं शाकाहार चांगला हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे तेव्हां त्यांत न पडतां समाजहिताच्या दृष्टीनें पाहिलें तरी निवृत्तमांस लोकांनीं मांसाहाराविषयीं निदान तिटकारा तरी बाळगू नये ज्याला रुचेल तो त्यानें आहार पसंत करावा, तो आपल्या पसंतीचा नाहीं म्हणून त्याबद्दल पूर्ण तिटकारा व द्वेष ठेवू नये म्हणजे परकेपणा वाटण्याचें बंद होऊन जातीजातींत एकी होऊं शकेल, निदान या कारणामुळें तरी तेढ पडणार नाहीं

भूतदयेच्या दृष्टीनें अहिंसा चांगली हें खरें, पण तिला अवास्तव किंमत देऊन आपल्या गरजा मारून टाकणें व अप्रगत किंबहुना मूढ बनणें हें केव्हांहि हिताचें होणार नाहीं मोठा जीव वाचविण्याकरितां लहान जीव नेहमीं बळी पडणारच सृष्टीचा हा सनातन नियम आहे हें आपण प्राणिसृष्टींत पाहतोंच पायाखालीं मुंग्या मरतात म्हणून चालणें सोडतां यावयाचें नाहीं, किंवा हत्या होईल या भीतीनें क्रूर व घातकी जनावरांना मोकळ ठेवून भागावयाचें नाहीं हल्लीं सर्व रोग हे जंतूपासून उत्पन्न होतात म्हणून या जंतूंना मारण्याकरितां ज्या लसी टोंचून घ्याव्या लागतात त्या जीव हत्येच्या कल्पनेमुळें न घेतल्यास, रोग निवारण होणार नाहीं व लहान जंतूंना वाचविण्याचें काल्पनिक समाधान मानून स्वत ची हत्या मात्र करावी लागेल तसेंच हिंसा होईल म्हणून जैनाप्रमाणें रात्रीं कांहीं न खाणें वेडगळ पणाचें दिसेल, कारण आधुनिक काळात रात्रींसुद्धां दिवसा इतकाच उजेड करून शक्य तो हिंसा टाळतां येईल ढुंढिये जैनाप्रमाणें साऱ्या जन्मांत अहिंसातत्त्वानुसार स्नान न करणें हें कोणत्या कोटींत जाईल तें सांगवत नाहीं. असो. तेव्हां अहिंसेच्या नावाखालीं या सुधारलेल्या जगात रानटी लोकांप्रमाणें वागणें केव्हांहि शहाणपणाचें होणार नाहीं अहिंसातत्त्वानें हिंदु धर्माला आध्यात्मिक वैभवाच्या उन्नत शिखरावर बसविलें आहे खरें, पण अध्यात्मदृष्ट्या उच्च पदवी प्राप्त करून देणाऱ्या या तत्त्वामुळें हिंदुस्थान देशास राजकीय दृष्ट्या मृत्यु पंथास जावें लागलें असें जें मॅक्समुल्लरनें विधान केलें आहे तें रा वैद्य निमूटपणें मान्य करितात ( मध्य युगीन भारत भाग १ पान १०६ ) पण तेच महाभारताच्या उपसंहारात अहिंसातत्त्व आम्हीं बौद्ध-जैनांपासून घेतलेलें नसून तें आमच्यात फार प्राचीन काळापासून होतें असें सिद्ध करितात

[सं द र्भ ग्रं थ.—वा गो आपटे—विविज्ञानविस्तार पु ३५ एन्सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स ( अहिंसा ) स्मिथ—आक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया ज्ञानकोश विभाग ४ था छांदोग्योपनिषत्, मनुस्मृति कौटिलीय अर्थशास्त्र एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका—जैनिझम विनयमय वैद्य—मध्ययुगीन भारत १, महाभारत—उपसंहार ]

**अहीर**—धनगराचा व गवळ्याचा एक मोठी जात लोकसंख्या १९११ सालीं ९५०८४८९ होती, त्यात बरेचसे

असतो मध्य प्रांतांतील अहीर लोक गोंड आणि इतर जातींच्या मिश्रणानें तयार झाले आहेत पांद्यांतील गोवारी लोक गोंड आणि अहीरांपासून झाले आहेत मंडल्यांतील कोवरा अहीर हे अहीर आणि गोंड किंवा कवारापासून झालेले आहेत असें रसेल आणि हिरालाल म्हणतात

हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रांतांत असलेल्या अहीरांची माहिती पुढें देत आहों.

बं गा ल —बंगालमध्यें गोआला ( संस्कृत गोपाल ) या नांवानें ही जात ओळखिली जात असून, तिच्या उत्पत्तिकथेवरून कृष्णभक्ति या लोकांत विशेष दिसते चैतन्याच्या वैष्णवपंथापेक्षा हा वैष्णवपंथ खालच्या दर्जाचा आहे. यांच्यांत गोवर्धनपूजा नांवाचा सण असून, त्या दिवशीं शिजविलेल्या भाताच्या राशीला गोवर्धन पर्वत समजून त्याची प्रार्थना करितात व आपल्या जवळच्या गायींना अन्न, शेंदूर व फुलें अर्पण करितात दुसऱ्या कांहीं ठिकाणीं शेणाचा कृष्ण करून त्याची पूजा करितात. याहून जास्त रानटी चाल म्हणजे दिवाळींत डुकराचे चारही पाय बांधून त्याचा जीव जाईपर्यंत त्याच्या अंगावरून गुरें नेतात, नंतर त्याचें मांस शिजवून तें शेतात बसून खातात, इतर वर्षीं मात्र डुकराचें मांस खाण्यास परवानगी नसते

पश्चिम बंगालमध्यें वीर लोरिक व काशीबाबा किंवा काशीनाथ यांच्याविषयीं विशेष आदर दाखविला जातो काशीबाबा हें खून केलेल्या एका ब्राह्मणाचें भूत असून, जर त्याची पूजाअर्चा केली नाहीं तर तो गुरांच्या ठिकाणीं रोग उत्पन्न करितो प्लेगचा प्रादुर्भाव झाल्यास खेड्यांतील गुरें एकत्र जमवून, त्यांच्यावर सरक्या फेंकितात, सर्वांत जास्त लठ्ठ असें जनावर निवडून त्याला दांडक्यांनीं अतिशय मारतात, त्याची आरडाओरड ऐकून बाकीचीं जनावरें भांबावून शेजारच्या गोठ्यांत पळतात व मागून हा बळी म्हणून निवडलेला बैल तिकडे पळतो व अशा रीतानें ही साथ थांबविल्याचें मानितात

सं यु क्त प्रां त —या जातींतील लोक कांहीं वैष्णव तर कांहीं शैव असतात वैष्णव अहीर कृष्णाची उपासना व शैव शिवाची किंवा शिवपत्नीच्या अनेक स्वरूपांपैकीं एका स्वरूपाची—बहुधा विंध्यवासिनी देवीची उपासना करितात साहारणपुराणांत विवाहाधिष्ठात्री दोन देवता आहेत एक ब्रह्मदेवता व दुसरी वटदेवता लग्नाच्या दिवशीं सोनार सोन्याची ब्रह्मदेवता घडवून आणतो लग्नांतील प्रधानविधि झाल्यानंतर नवरानवरी या मूर्तींना चंदन, धूप दीप, फुलें, अर्पून नैवेद्य दाखवितात नंतर घरांतील बायका ही मूर्ति स्वयंपाकघरांत पुरतात व त्यावर एक मातीचा ओटा घालतात रोज याची पूजा होते व सणाच्या दिवशीं याला पक्वान्नाचा नैवेद्य करितात घरांत दुसरें लग्न निघे पर्यंत हें चालतें, नंतर हा ओटा उकरून त्यांतील जुनी मूर्ति काढून त्या जागीं नवी बसवितात ब्रह्मोपासना हल्लीं प्रचारांत नाहीं, पण ती या लोकांत असलेली पाहून नवल वाटतें वटवृक्षाची पूजा ही वृक्षविवाहाच्या चालीशीं निकट संबंध दाखविते अहीरांत नवरा मुलगा नवरीच्या भांगांत कुंकू भरतो त्यावेळींच वटवृक्षाला कुंकू वाहातो

पांचोनपीर व दुसऱ्या अनेक स्थानिक देवांची हे लोक पूजा करितात यांचीं विशिष्ट गोदेवता वीरनाथ होय हा पांच लाकडी मूर्तींचा समूह असतो

म ध्य प्रां त —( नांवें ) —गवळी, ग्वाला, गोलकर, ग्वालान, रावत, गहर, महाकुल इत्यादि

संख्या —( सन १९११ ) ७५०००० मध्यप्रांतांत संख्येच्या मानानें या जातीचा सहावा नंबर आहे ही जात मराठी जिल्ह्यांतील गवारांपासून भिन्न आहे पण गवारी जातीची १५०००० संख्या ही त्यांत मिळविली तर तेली जातीपेक्षां त्याचा नंबर वर लागून ५ वा होईल

व्युत्पत्ति —अहीर नांव अभीर नांवापासून निघालें आहे अभीर जातीचा उल्लेख शिलालेखांत आणि धर्म पुस्तकांतून कोठें कोठें सांपडतो ग्वाला शब्द गोपाल शब्दापासून निघाला आहे गवळी हा शब्द मध्यप्रांतांत दुभत्याचा धंदा करणाऱ्यासच लावितात, गुरें रानांत नेणाऱ्यास लावीत नाहींत चांदा जिल्ह्यांतील गोलकर शब्द (तेलगु गोलार म्हणजे गुरें चारण्यास नेणारा ) या शब्दापासून निघाला असावा राउत शब्द राजपुत्र शब्दाचा अपभ्रंश असावा छत्तीसगडांतील अहीर लोक स्वतःला राउत म्हणवितात उडिया मुलुखांत यास गहर म्हणतात जशपुर संस्थानांत सांपडणाऱ्या एका अहीर जातीचें नांव महाकुल असें आहे हे लोक स्वतःस नंदवंशी समजतात उत्तर हिंदुस्थानांत यांच्या तीन जाती आहेत यदुवंशी, नंदवंशी, आणि गोवालवंशी मंडल्यांतील कावनार आणि जबलपुरांतील कमरिया हे स्वतःला नंदवंशी म्हणवितात कांहीं आपणांस जिझोटिया ( बुंदेलखंडी ) म्हणवितात मारोतिया व नखारिया या जातीही आहेत छत्तीसगडांतील राउतांचे झाडिया, कोसारिया आणि कनवजिया असे तीन भेद आहेत कोसारिया हे सर्वांत जुनें आहेत ( कोसल हे छत्तीसगडाचें जुनें नांव आहे असा रसेल व हिरालाल यांचा तर्क आहे ) कनोजियांपैकीं थेथवार नांवाचे लोक स्वतःस फार उच्च समजतात आणि यांना नौकर ठेविलें तर उष्टीं ते भांडीं घांशीत नाहींत

दौवा लोक बुंदेले रजपूत आणि अहीर बायकांपासून झाले आहेत बुंदेल्या रजपुतानें ठेविलेल्या अहीर स्त्रीला ' परद्वारीण ' म्हणतात. अहीर बायांना रजपूत लोक घरांत दाई म्हणून ठेवीत आणि त्यांच्या मुलांत आणि दूध पाजलेल्या मुलांत बंधुप्रेम फार दृढ असे

यांत रघुवंशी म्हणून एक जात आहे झांशी अहारा प्रमाणेंच ' राज्य ' अहीर हें देखील एका जातीचें नांव आहे.

(म्हणजे ९४७४८०५) हिंदु होते. बिहार ओरिसा व संयुक्तप्रांत यात अहिरांची मोठी संख्या असून, बाकीच्या बहुतेक सर्व प्रांतांतून थोडथोडे आढळतात. सिंधु खोऱ्यातील आभीर व इ. स पू. १ ल्या किंवा २ ऱ्या शतकात हिंदुस्थानात आलेले सिथियन अरब याचा अहिराशीं संबंध जुळविण्यात येतो. उत्तर हिंदुस्थानात मथुरा क्षेत्राशीं यांच्या परंपरेचा संबंध पोहोंचतो व यांच्यातील य(ज)दुवन्सी ही पोट जात आपल्याला यादव वंशांतील लेखिते. दुसरी एक संयुक्त प्रांतांतील नंदबन्सी जात व बंगालमधील नंदघोष नंदाला आपला पूर्वज समजतात

इतिहास.— ख्रिस्ती शतकाच्या सुमारास मध्य आशियांतून आलेल्या लोकांपैकीं आभीर व हे एक असावेत महाभारत आणि पुराणें यातून याचा उल्लेख दस्यु असा आढळतो कधीं कधीं त्यास म्लेच्छ असेंहि म्हटलेलें आहे भगवान श्रीकृष्ण निजधामास गेल्यावर द्वारकेहून कृष्णाच्या स्त्रियास अर्जुन हस्तिनापुरास नेत असता वाटेंत आभीरानीं त्या हिरावून नेल्या. शके १०२ म्हणजे ख्रिस्ताब्द १८० च्या सुमाराच्या सापडलेल्या एका शिलालेखावरून गुजराथेंतील रुद्र संस्थानाच्या सेनापतीचा उल्लेख आभीर म्हणून केला आहे.

नाशिक लेण्यातील शिलालेखात एका आभीर राजाचें वर्णन आहे. ('आभीर पहा') एन्थोविन यानें त्याचा काल ख्रिस्ती चवथें शतक असा ठरविला आहे आन्ध्रभृत्यानंतर दक्षिण(प्रांत) आभीराच्या ताब्यात होती असें पुराणात सांगितलें असून तापीपासून देवगडापर्यंत असणाऱ्या भागास आभीर ही संज्ञा होती. समुद्रगुप्ताच्या वेळीं अभीरांनीं पूर्व रजपुतान्यात आणि माळव्यात वस्ती केली. काठी लोक गुजराथेंत आठव्या शतकात आले तेव्हा बराच भाग अहीरलोकांच्या ताब्यात असलेला त्यास आढळला. मिर्झापूर जिल्ह्यातील एका भागास अहरौरा असें नाव आहे आणि झांशीजवळ असलेल्या एका भागास अहीरवाड असे म्हणतात. ख्रिस्ती शतकारंभाच्या सुमारास अहीर नेपाळचे राजे होते, असें इलियट म्हणतो. खानदेशातहि अहीरांच्या वसाहती महत्त्वाच्या होत्या. असीरगड किल्ला पंधराव्या शतकात आसा अहीरानें बांधला असें म्हणतात. त्याच्या पूर्वजांची वस्ती तेथें ७०० वर्षांपासून होती आणि त्याच्या जवळ खुद्द १०००० गुरें, २०००० मेंढ्या, १००० घोड्या व २००० सैन्य असूनहि आसा या त्याच्या नावानेंच तो लोकात ओळखला जाई. त्याच्या उदारपणामुळें तो फार लोकप्रिय झाला होता. असीरगडाविषयींच्या दंतकथात अतिशयोक्ति असण्याचाहि संभव आहे. ११ व्या (ख्रिस्ती) शतकात टाक आणि चव्हाण रजपुतांच्या ताब्यात हा कि.। आसीर किंवा अहीर या नांवानेंच होता फिरिस्ता यानेंहि असीरगड हा अहीरानें बांधलेला आहे अशी माहिती आपल्या पुस्तकात दिली आहे. तापीनदीच्या खोऱ्यात असलेल्या एखाद्या अहीर संस्थानिकाच्या नावावरून या किल्ल्याच्या नावाचा त्याच्या लोकाशीं संबंध जुळवून देणेंहि संभवनीय आहे.

मध्य प्रांतात गौळी राजांच्या वैभवाच्या दंतकथा अद्याप चालत आल्या आहेत छिंदवाड्यांतील देवगड किल्ला हा एका दंतकथेच्या आधारें पाहता सोळाव्या शतकापर्यंत गवळी राजांच्या ताब्यात होता व त्यापासून नंतर तो गोंडांनी घेतला. देवगड गोंड जातीचा मूळ पुरुष जातबा यानें मनसुर आणि गणसुर या गवळी राजाची नौकरी धरली आणि देवीच्या प्रसादानें त्याचा वध करून स्वतः त्याच्या जागीं राजा झाला. त्यानंतर काहीं वर्षे गवळ्याच्या ताब्यात नरनाळा किल्ला होता आणि पुढें तो मुसुलमानांनीं घेतला सातपुड्याच्या दक्षिणेकडील एका शिखरावर गाविलगड नावाचा किल्ला आहे, सागर जिल्ह्यात प्रचलित असलेल्या दंतकथावरून इटावा आणि खुरई येथें ख्रिस्ती शकाच्या सतराव्या शतकाच्या अखेरपर्यंत गवळी राजे होते

अहीर भाषा.—अहीर किंवा अभीर भाषेपासून निघालेल्या पोट भाषा अद्याप कायम आहेत. पंजाबात रोहटक, व गुरगाव आणि दिल्लीच्या भोंवतीं अहीरवाटी भाषा अद्याप बोलतात. रजपुतान्यांतील मेवाती भाषेचाच हा एक पोटभेद आहे. राजस्थानीच्या मालवी पोटभेदाचेंहि नाव अहीरी आहे आणि खानदेशी म्हणून गुजराथी भाषेचा जो पोटभेद भील भाषेच्या अर्धवट मिश्रणानें तयार झाला आहे त्याला 'अहीराणी' भाषा म्हणतात. ('अहीराणी भाषा' पहा)

या जातीचा आणि पुराणातील यादव जातीचा काहीं संबंध नाहीं असें शोधाअंतीं ठरतें भागवतात नंद किंवा गोप याच्या संबंधानें अभीर किंवा अहीर शब्द कोठें वापरलेला नाहीं. ख्रिस्ती शकाच्या ५५० साली कृष्णकथाचा आणि अहीर शब्दांचा संबंध जोडून दिल्याचा उल्लेख प्रथम सापडतो यावरून या सालाच्या थोड्या अगोदर हा संबंध कोणी तरी जुळविला असावा गुजर आणि शक याप्रमाणेंच हे लोक बाहेरून आले आहेत. आणि पूर्वी आलेल्या "आर्यन्" लोकाप्रमाणें शेतकीचा धंदा न करितां यांनी गुरें पाळण्याचा धंदा केला व त्या धंद्याचें महत्त्व वाढविण्याकरितां कृष्णाशीं व यादवांशीं संबंध जोडला असावा.

मध्याचे अहीर जातीचे लोक आभीरांपासून जन्मले असून वेळोवेळीं देश्य जातींच्या मिश्रणानें वाढत गेले डाल्टन म्हणतो कीं मथुरावंशी ग्वाल उंच असून त्यांचा चेहरा कोवळा आणि रेखीव असतो. त्याचा रंग गव्हासारखा असतो मगधांतील एका पोट जातीचा रंग काळा असून दात पाय फार मोठे, चेहरा ओबडधोबड आणि गावंढळ

असतो. मध्य प्रांतांतील अहीर लोक गोंड आणि इतर जातींच्या मिश्रणानें तयार झाले आहेत. चांद्यांतील गोवारी लोक गोंड आणि अहीरांपासून झाले आहेत. मंडल्यांतील कोवरा अहीर हे अहीर आणि गोंड किंवा कवारांपासून झालेले आहेत असें रसेल आणि हिरालाल म्हणतात.

हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रांतांत असलेल्या अहीरांची माहिती पुढें देत आहों.

बंगाल.—बंगालमध्यें गोआला (संस्कृत गोपाल) या नांवानें ही जात ओळखिली जात असून, तिच्या उत्पत्तिकथेवरून कृष्णभक्ति या लोकांत विशेष दिसते. चैतन्याच्या वैष्णवपंथापेक्षां हा वैष्णवपंथ खालच्या दर्जाचा आहे. यांच्यांत गोवर्धनपूजा नांवाचा सण असून, त्या दिवशीं शिजविलेल्या भाताच्या राशीला गोवर्धन पर्वत समजून त्याची प्रार्थना करितात व आपल्या जवळच्या गायींना अन्न, शेंदूर व फुलें अर्पण करितात. दुसऱ्या कांहीं ठिकाणीं शेणाचा कृष्ण करून त्याची पूजा करितात. याहून जास्त रानटी चाल म्हणजे दिवाळींत डुकराचे चारहि पाय बांधून त्याचा जीव जाईपर्यंत त्याच्या अंगावरून गुरें नेतात; नंतर त्याचें मांस शिजवून तें शेतांत बसून खातात, इतर वेळीं मात्र डुकराचें मांस खाण्यास परवानगी नसते.

पश्चिम बंगालमध्यें वीर लोरिक व काशीबाबा किंवा काशीनाथ यांच्याविषयीं विशेष आदर दाखविला जातो. काशीबाबा हें खून केलेल्या एका ब्राह्मणाचें भूत असून, जर त्याची पूजाअर्चा केली नाहीं तर तो गुरांच्या ठिकाणीं रोग उत्पन्न करितो. प्लेगचा प्रादुर्भाव झाल्यास खेड्यांतील गुरें एकत्र जमवून, त्यांच्यावर सरबत्या फेंकितात; सर्वांत जास्त लठ्ठ असें जनावर निवडून त्याला दांडक्यांनीं अतिशय मारतात; त्याची आरडाओरड ऐकून बाकीचीं जनावरें भांबावून शेजारच्या गोठ्यांत पळतात व मागून हा बळी म्हणून निवडलेला बैल तिकडे पळतो व अशा रीतीनें ही सांथ थांबविल्याचें मानितात.

संयुक्त प्रांत.—या जातींतील लोक कांहीं वैष्णव तर कांहीं शैव असतात. वैष्णव अहीर कृष्णाची उपासना व शैव शिवाची किंवा शिवपत्नीच्या अनेक स्वरूपांपैकीं एका स्वरूपाची—बहुधा विंध्यावासिनी देवीची उपासना करितात. साहारणपुराणांत विवाहाधिष्ठात्री दोन देवता आहेत. एक ब्रह्मदेवता व दुसरी वटदेवता. लग्नाच्या दिवशीं सोनार सोन्याची ब्रह्मदेवता घडवून आणतो. लग्नांतील प्रधानविधि झाल्यानंतर नवरानवरी या मूर्तींना चंदन, धूप, दीप, फुलें, अर्पून नैवेद्य दाखवितात. नंतर घरांतील बायका ही मूर्ति स्वयंपाकघरांत पुरतात व त्यावर एक मातीचा ओटा घालतात. रोज याची पूजा होते व सणाच्या दिवशीं याला पक्वान्नाचा नैवेद्य करितात. घरांत दुसरें लग्न निघे पर्यंत हें चालतें; नंतर हा ओटा उकरून त्यांतील जुनी मूर्ति काढून त्या जागीं नवी बसवितात. ब्रह्मोपासना हल्लीं प्रचारांत नाहीं; पण ती या लोकांत असलेली पाहून नवल वाटतें. वटवृक्षाची पूजा ही वृक्षविवाहाच्या चालीशीं निकट संबंध दाखविते. अहीरांत नवरा मुलगा नवरीच्या भांगांत कुंकू भरतो त्यावेळींच वटवृक्षाला कुंकू वाहातो.

पांचोनपीर व दुसऱ्या अनेक स्थानिक देवांची हे लोक पूजा करितात. यांची विशिष्ट गोदेवता बीरनाथ होय. हा पाच लांकडी मूर्तींचा समूह असतो.

मध्य प्रांत.—(नांवें):—गवळी, ग्वाला, गोलकर, ग्वालान, रावत, गहर, महाकुल इत्यादि.

संख्या.—(सन १९११) ७५०००० मध्यप्रांतांत संख्येच्या मानानें या जातीचा सहावा नंबर आहे. ही जात मराठी जिल्ह्यांतील गवारींपासून भिन्न आहे. पण गवारी जातीची १५०००० संख्या ही त्यांत मिळविली तर तेली जातीपेक्षां त्याचा नंबर वर लागून ५ वा होईल.

व्युत्पत्ति.—अहीर नाव अभीर नावापासून निघालें आहे. अभीर जातीचा उल्लेख शिलालेखांत आणि धर्मपुस्तकांतून कोठें कोठें सांपडतो. ग्वाला शब्द गोपाल शब्दापासून निघाला आहे. गवळी हा शब्द मध्यप्रांतांत दुभत्याचा धंदा करणाऱ्यासच लावितात, गुरें रानांत नेणाऱ्यास लावीत नाहींत. चांदा जिल्ह्यांतील गोलकर शब्द (तेलगु गोलार म्हणजे गुरें चारण्यास नेणारा) या शब्दापासून निघाला असावा. राउत शब्द राजपुत्र शब्दाचा अपभ्रंश असावा. छत्तीसगढांतील अहीर लोक स्वतःला राउत म्हणवितात. उडिया मुलुखांत यास गहर म्हणतात. जशपुर संस्थानांत सांपडणाऱ्या एका अहीर जातीचें नाव महाकुल असें आहे. हे लोक स्वतःस नंदवंशी समजतात. उत्तर हिंदुस्थानांत यांच्या तीन जाती आहेत. यदुवंशी, नंदवंशी, आणि गोवालवंशी. मंडल्यांतील कावनार आणि जबलपुरांतील कमरिया हे स्वतःला नंदवंशी म्हणवितात. कांहीं आपणांस जिझोटिया (बुंदेलखंडी) म्हणवितात. भारोतिया व नखरिया या जातीहि आहेत. छत्तीसगडांतील राउतांचे झाडिया, कोसारिया आणि कनवजिया असे तीन भेद आहेत. कोसारिया हे सर्वांत जुनें आहेत (कोसल हे छत्तीसगढाचें जुनें नांव आहे असा रसेल व हिरालाल यांचा तर्क आहे). कनोजियांपैकी थेथवार नांवाचे लोक स्वतःस फार उच्च समजतात आणि यांना नौकर ठेविले तर उष्टीं से भांडीं घाशीत नाहींत.

दौवा लोक बुंदेले रजपूत आणि अहीर बायकांपासून झाले आहेत. बुंदेल्या रजपुतानें ठेविलेल्या अहीर स्त्रीला 'परद्वारीण' म्हणतात. अहीर बायांना रजपूत लोक घरांत दाई म्हणून ठेवीत आणि त्यांच्या मुलांत आणि दूध पाजलेल्या मुलांत बंधुप्रेम फार दृढ असे.

यांत रघुवंशी म्हणून एक जात आहे. झाडी अहीरांप्रमाणेंच 'राज्य' अहीर हें देखील एका जातीचें नाव आहे.

सगोत्रविवाह आणि चुलत बहिणी, मामेबहिणी, आतेबहिणी व मावसबहिणींबरोबर विवाह निषिद्ध आहे. बायकोच्या वडील बहिणीबरोबर लग्न निषिद्ध आहे. परंतु धाकट्या बहिणीबरोबर निषिद्ध नाहीं.

लग्नें.—मुलींचीं लग्नें रजोदर्शनापूर्वी किंवा मागाहून झालीं तरी चालतात. चंद्रपूरचे गोलकर मात्र बालविवाह करतात. कावनार अहीर मात्र रजोदर्शनापूर्वी लग्नें करीत नाहींत. जातींतल्याच माणसापासून कोणी अविवाहित मुलगी गर्भार राहिली तर पंचायतीच्यामार्फत त्याचें लग्न होतें आणि २० किंवा ३० रुपये पंचायतीचा दंड भरावा लागतो तो खर्च पंच करतात विजातीयानें जर एखादी अहीर मुलगी फसवली तर ती त्यासच देतात आणि शक्य असल्यास त्याच्यापासून ४० ते ५० रुपये दंड घेऊन तो मुलीच्या बापास देतात स्थानिक विवाहपद्धतीप्रमाणें लग्नें लावतात.

कावरा झाडिया, कोसारिया, व राउत लोक ' लगुन ' लिहिण्याकरितांच ब्राह्मणास बोलवितात आणि सवासिन ( वधुवरांचे .तलग ) त्यांचीं लग्नें लावितात. छत्तीस गडात वराला मुलीचा पोषाक करून लग्नाकरिता मिरवणुकीबरोबर वधूगृहीं नेतात.

विधवाविवाहाची पूर्ण मोकळीक आहे. प्रथम वरास विधवेबरोबरच विवाह करावयाचा असल्यास पाहिल्यानें कळ्यारीबरोबर विधि करावा लागतो. मृत नवऱ्याच्या धाकट्या भावाबरोबर विवाह चांगला समजतात. घटस्फोटाची पूर्ण मुभा आहे हुशंगाबाद जिल्ह्यात घटस्फोट करताना नवरा बायकोच्या अंगावरील वस्त्राच्या लहान चिंध्या फाडतात आणि लग्नाच्या वेळीं बांधलेली गाठ सोडिली असें दर्शवितात.

जन्म विधिः—हे लोक गर्भार स्त्रियांचे डोहाळे पुरवितात त्यांच्या डोहाळ्यांतील खाण्याच्या पदार्थांस शिधोरी म्हणतात. कोणा गर्भिणीस तीन मुलें किंवा ३ मुली लागोपाठ झाल्यास चौथें मूलहि तीघा भावंडाप्रमाणें मुलगा किंवा मुलगीच व्हावी असें इच्छितात. परंतु जर तसें न झालें तर त्या मुलास किंवा मुलीस अभागी समजतात एकाच दिवशीं एका गावात एकाच दिशेला दोन स्त्रियास मुलगा आणि मुलगी होऊन त्या एकाच सुइणीच्या देखरेखीखालीं असल्या तर सुइणीच्या द्वारें दोघा मुलास संपर्क होऊन ते आजारी पडतील असें समजतात आणि रोग टाळण्याकरिता मुलाचा मामा तराजू घेऊन एका पारड्यांत मुलास ठेवितो व शेणाच्या गोळ्यांनी त्याचें वजन करतो. आणि शेणाची टोपली गावा बाहेर चौरस्त्यावर ठेवितो मुलाचा जन्म जर अशुभ तिथी वर किंवा नक्षत्रावर झाला तर त्याचे कान ५ व्या महिन्यात टोंचले म्हणज झालें

प्रेत संस्कार.—पुरणें किंवा दहन करणें या दोन्ही चाली प्रचारांत आहेत. छत्तीस गडात मेलेल्याचा प्राण तिसऱ्या दिवशीं परत आणण्याचा एक विधि आहे. रात्रीं तळ्याच्या काठीं बायकांनीं एक दिवा ठेवावा आणि त्याच्या जवळ आलेल्यांतून एक मासा धरून घरीं आणावा आणि कणकेच्या गोळा त्याजवळ ठेवावा. मृताचा मुलगा किंवा जवळचा कोणी नातलग यानें अंगाला हळद लावून एक खडा उचलवा. तो पाण्यानें धुवून भाण्यात टाकावा आणि मृत माणूस स्त्री किंवा पुरुष असेल त्याप्रमाणें कोंबडी किंवा कोंबडा बळी द्यावा. त्या खड्याची गृहदेवतेप्रमाणें पूजा करावी. आणि प्रत्येक वर्षी कोंबडा किंवा कोंबडी बळी देत जावा अशा रीतीनें माशाच्या अंगातून मृताचा प्राण घरात येऊन तो खड्यात प्रविष्ट झाला असें समजतात.

अहीर लोक गाईस पवित्र समजतात. ते कृष्णाची पूजा करतात. नर्मदा खोऱ्यातील लोक भिलाट नावाच्या एका काल्पनिक देवाची फार भक्ति करतात. भिलाट हा एका अहीर स्त्रीस महादेवापासून झालेला मुलगा होय अशी समजूत आहे त्याच्या आंगात फारच अलौकिक सामर्थ्य होतें. इंदुरातील गवळी निमाजीस भजतात. मंडल्यात महिर्षि देवाच्या नावानें एक चौथरा बांधतात खडकदेव ही एक त्यांचीच देवता आहे मतरदेव हा लेखणीचा आणि रानांत केलेल्या गाईच्या कोंडवाड्याचा देव आहे. गुरयादेव हा गाईच्या गोठ्याचा देव आहे. त्यास प्रत्येक वर्षी एक अंडें अर्पण केल्यानें गुरास रोगराई होत नाहीं अहीराचा आवडता साधु हरिदास बाबा म्हणून आहे. त्यानें प्राण शरीरातून काढून शरीर एका अहीराजवळ ठेविलें होतें. तो बरेच दिवस परत आला नाहीं म्हणून शरीराचें दहन केलें. तो आल्यानंतर लोकास चूक समजली आणि तिच्या प्रायश्चित्ताबद्दल त्याची पूजा करण्याचें ठरविलें. महाकुल अहीर महादेवाची पूजा करतात तसेंच पांडवापैकीं सहदेवाची, आणि लक्ष्मीची पूजाहि करतात.

दिवाळी हा अहीराचा मुख्य सण आहे ते या दिवसांत मातीचा एक गोवर्धन पर्वत करतात. याच दिवसात त्याचा मारहाई सण असतो. एका खांबाभोंवतीं कवड्या आणि मोराचीं पिसें बांधून हे लोक गावातून नाचत व गात जातात. बायका या खांबावर एक मातीचा पोपट बसवून घरोघर जाऊन गातात व तांदूळ आणि पैसे गोळा करतात.

चालीरीतिः—हे लोक कोंबडी आणि बकऱ्याचें मास खात नाहींत मंडल्यातील 'काओनेरा' अहीर डुकराचें मास खातात आणि राउत लोक उंदीर देखील खातात. काओनेरा अहीर विटाळशीचा विटाळ मानतात. जातिबहिष्कार, प्रायश्चित्त आणि शुद्धीकरणाचा विधि पंचाईतीकडून व्हावा लागतो.

छत्तीसगडातील राउत बायका पायात काशाचे " वाळे " घालतात. हे अवजड असतात. त्याचें वजन अदमासें ४ ते

५ शेर असतें आणि त्यांना अजमासें ३ ते ६ रुपये किंमत पडते.

धंदाः—गुरें पाळणें हाच त्यांचा मुख्य धंदा आहे. साधारणतः शेंकडा चार लोक घरकामी नोकऱ्याहि करितात.

मुं ब ई इ ला खा—खानदेश, नाशिक, कच्छ, काठेवाड व पालनपूर या भागांत अहीर लोक आहेत. आपण कृष्णाच्या गोपांपैकी असून मथुरेस रहात होतों असें ते सांगतात परंतु हे लोक मूळचे अनार्य जरी नसले तरी हिंदू नव्हते असें मुंबई एथ्नॉग्राफिक सर्व्हेकारांनीं मत व्यक्त केलें आहे. पुढें काहीं वर्षांनी ते हिंदु धर्मांत आले असावे. चवथ्या शतकांत अहीर लोकांचें राज्य खानदेश, नाशिक, काठेवाड पालनपुर व कच्छ या प्रांतांत होतें, याबद्दल बळकट पुरावा आहे. काठी लोक गुजराथेंत ८ व्या शतकांत गेले. तेव्हां बहुतेक मुलुख अहीर लोकांच्या ताब्यांत होता. त्याचप्रमाणें खानदेशांत अहीर लोकांचें बरेंच वर्चस्व असावें कारण असि(शि) रगड नांवाच्या किल्ला "असा अहीर" यानें बांधला व त्यानें आपलें नांव त्या किल्ल्यास दिलें असें फेरिस्ताचें मत आहे ही गोष्ट वर सांगितलीच आहे. रहाण्याच्या स्थानभेदावरून अहीर लोकांचे दोन विभाग आहेतः—कच्छ व काठेवाड यांमध्यें रहाणारे आणि दक्षिण हिंदुस्थानांत रहाणारे. पहिल्या वर्गानें गुराख्यांचा धंदा सोडून सुतारकाम व शेतकी हे धंदे हातीं घेतले आहेत व काहीं जमीनदारहि आहेत. या लोकांत बोरिचा, चोरिडा, माचूआ, प्रांथाळिया व सोरठिया असे पांच पोटभेद असून, एका पोटभेदांतील लोक दुसऱ्या पोटभेदांतील लोकांशीं विवाहसंबंध करीत नाहींत. याखेरीज गुजर अहीर व नेसक अहीर हे दोन फक्त काठेवाड प्रांतांत जास्त आहेत. मुलामुलींचीं लग्नें १२–१५ वर्षांपर्यंत होतात. दरवर्षी, ठरलेल्या दिवशींच विवाह होतात. परभिया नांवाचे हीन ब्राह्मण या लोकांचे उपाध्ये होत. विधवेला लहान दिराशीं लग्न लावितां येतें. हे लोक मांसाहारी आहेत. तुळशीश्याम ( लक्ष्मी व कृष्ण ) व मातादेवी या देवतांची हे पूजा करितात. त्याचप्रमाणें हब्वे ही देवता व बचरा या रजपूत साधूचीहि ते उपासक आहेत.

काठेवाडमध्यें अहीर लोकांची प्रत्येक खेड्यांत एक पंचायत असते व तींत सामाजिक बाबींचा निकाल होतो. जातीसंबंधी महत्त्वाच्या प्रश्नाचा निकाल बाकोडी खाद्या पंचायतीच्या सभेंत केला जातो.

दक्षिण हिंदुस्थानांतील अहीर लोकांनीं आपला धंदा फारसा बदललेला नाहीं. येथील अहीर लोकांत ( १ ) मरवाथिया, ( २ ) धिदावर, (३) घोसी, (४) गोळयन, ( ५ ) गुजर, ( ६ ) रोमावन, असे सहा पोटभेद आहेत; या पोटभेदांत परस्पर बेटीव्यवहार होतो. परंतु ज्यांचें दैवक एकच असेल त्यांचा विवाहसंबंध होत नाहीं. मुलांचीं लग्नें २०–२५ या वयांत होतात. पुनर्विवाहाची चाल आहे. परंतु तरुण विधवेस बहुतकरून आपल्या धाकट्या दिराशीं लग्न लावावें लागतें. या लोकांत काडीमोड होऊं शकत नाहीं. हे लोक मांसाहारी आहेत. उत्तरहिंदुस्थानी व महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या हातचें ते खातात, परंतु मराठ्यांच्या हातचें खात नाहींत. बाप जिवंत असतां मुलाचा वडिलोपार्जित मालमत्तेवर कांहीं हक्क नसतो, त्याचप्रमाणें आई वारल्यावर तिच्या पैशावर मुलींचा कांहीं हक्क नसून तो पैसा तिच्या सुनांकडे जातो. कच्छी व काठेवाडी अहीरांप्रमाणेंच हे अहीर कृष्णाचे भक्त आहेत. लग्नसमारंभांत पंडे ( हिंदुस्थानी ब्राह्मण ) यांचें उपाध्येपण करतात. परंतु त्यांच्या अभावीं दक्षिणी ब्राह्मण चालतो. मृतांस दहन करतात. भाद्रपद महिन्यांत कोणत्या तरी दिवशीं श्राद्ध करतात.

पं जा ब—लोकसंख्या ( १९११ ) २०८५९४. हे बहुतकरून शेतकरी व गुराखी आहेत. ते हिंदु असून दिल्ली भागांत, फिरोजपूर जिल्ह्यांत व दुजाना, पटौडी आणि फुलकियन या संस्थानांत आढळतात. त्यांचा सामाजिक दर्जा गुजर व जाट लोकांसारखा आहे. त्यांच्या मालकीच्या जमिनी असून दिल्ली भागांत ( सिमला सोडून ) व शाहपूर, मिआनवाली व मुलतान या जिल्ह्यांत ते शेतकरी आहेत. ते सैन्यांत सुद्धां चाकरी करतात. यदुबन्सी व नंदबन्सी लोक हे आपणास रजपुतांचे वंशज म्हणवितात. ते गावळबन्सी लोकांहून आपण भिन्न आहों असें दर्शवितात.

रा ष्ट्र वि घ ट ना.—आभीर, पांचाल हीं जुनीं राष्ट्रें, त्यांचें अस्तित्व राष्ट्र या रूपानें नष्ट झाल्यानंतर त्यांची कशी स्थिति होते, हें जाणण्यास अहिरांचें उदाहरण पहाण्यासारखें आहे.

अहीर हे अनेक धंदेवाईक जातींत मिसळून त्यांतच पोटजात होऊन राहिले आहेत. उदाहरणार्थ, महाराष्ट्रांत अहीर सोनार, अहीर हलवाई, अहीर गवळी अशा तऱ्हेच्यां सोनार, हलवाई, गवळी या जातींतून पोटजाती आढळतात. ज्या वेळीं विशिष्ट जातींत स्वतंत्र पोटजात होण्याइतके अहीर गेले नसतील त्यावेळीं त्या जातींत विशिष्ट घराणीं म्हणून ते समाविष्ट झाले असावेत. जसें, ओतार्‍यामध्यें अहीर ही पोटजात नसून एक कुल अगर आडनाव म्हणून आहे. अहीर हे निरनिराळ्या ठिकाणच्या समाजांत कसे अंतर्भूत झाले हें यावरून कळून येणार आहे. अशीं उदाहरणें नजरेस आल्यानंतर जाति, आणि पोटजाती यांचा अभ्यास करूं लागलों म्हणजे असा प्रश्न उपस्थित होतो कीं, विशिष्ट धंद्याची जात प्रधान धरून अहीर, पांचाल या पोटजाती धरणें योग्य होईल कीं, अहीर ही प्रधान जात धरून अहीर गवळी, अहीर सोनार, अहीर हलवाई अशा पोटजाती धरणें योग्य होईल. या प्रश्नाचें विवेचन "जाति" या लेखांत येईल. येथें फक्त ही स्थिति नजरेस आणणें पुरें होईल.

अ हि रा णी भा षा—खानदेशांत पाटरपेशे लोक शिवायकरून बाकीचे लोक खानदेशी किंवा अहिराणी भाषा बोलतात. ही भाषा गुजराथी, मराठी, नेमाडी व हिंदुस्थानी या चार भाषा मिळून झालेली आहे, असा लोकांचा समज आहे. गुजराथच्या पश्चिमकिनाऱ्याजवळ राहणारे जे अभीर लोक अभीरी भाषा बोलत असत, व जिचा उल्लेख प्राकृत वैय्याकरणांनीं केला आहे, तिच्यावरूनच ही अहिराणी भाषा निघाली असावी, असा डॉ. भांडारकर यांचा तर्क आहे. भाषाशास्त्राचा अभ्यास करण्यास ती भाषा फार उपयोगाची आहे. या भाषेची थोडीशी माहिती पुढें दिली आहे.

खानदेशी अथवा अहिराणी भाषा जरी गुजराथीसारखी किंवा मराठीसारखी दिसते, तरी ती मागधी, सौराष्ट्री, शौरसेनी, महाराष्ट्री, पैशाची इत्यादि प्राकृत भाषापासूनच निघाली आहे. ह्या भाषेत ' ळ ' हें अक्षर मुळींच नसून त्याच्या ऐवजीं ' य ' हें अक्षर येतें; जसें:—' काळा ' असें म्हणण्याचे ऐवजी ' काया ' असें म्हणतात. त्या भाषेंतील व्याकरणाचीं रूपें साधारणपणें गुजराथी–किंवा मराठी–प्रमाणेंच आहेत, पण नामाचीं व क्रियापदांचीं रूपें हीं मात्र वरील दोन भाषा-पेक्षा भिन्न आहेत. नामांचें बहुवचन करावयाचें झाल्यास नामाच्या शेवटीं 'स' हा प्रत्यय लागतो जसें–भित ( भिंत ) ह्याचें बहुवचन ' भितस ' ( भिंतीस ) असें होतें. विभक्तींचे निरनिराळे प्रत्यय आहेत. द्वितीया व चतुर्थी या विभ-क्त्यांचा ले हा प्रत्यय आहे; तृतीयेचे नी, वरि व घै, पंचमीचा थिन्; षष्ठीचे ना, नी व न; आणि सप्तमीचे मा व मझार असे प्रत्यय आहेत. आकारान्त पुल्लिंगी व नपुंसक-लिंगी नामाना बहुवचनीं विभक्तिप्रत्यय लावतेवेळीं अ चा ए होतो. वरील गोष्टी पुढें चालवून दाखविलेल्या नामावरून समजतील

नागर ( नागर )

| | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| प्र० | नागर | नागर |
| द्वि० | नागरले | नागरेसले |
| तृ० | नागरनी | नागरेसनी |
| | नागरवरी | नागरवरी |
| | नागरघै | नागरघै |
| पं० | नागरथिन् | नागरेसथिन् |
| ष० | नागरना-नी-न | नागरेसना-नी-न |
| स० | नागरमा | नागरेसमा |
| सं० | नागरमझार | नागरमझार |

आकारान्त, इकारान्त, उकारान्त व ओकारान्त पुल्लिंगी नामाना विभक्तिप्रत्यय लावितेवेळी त्यांचें कांहीं रूपांतर न होतां त्यांच्या शेवटीं विभक्तिप्रत्यय जसेच्या तसेच लागतात. आकारान्त नामांत भिंगोटा ( भुंगा ) अपवाद हा आहे; कारण या शब्दास विभक्तिप्रत्यय लावतेवेळीं शेवटील 'टा' या अक्षराचें 'ट्या' असें सामान्य रूप होतें. उकारान्त नामात जू ( ऊ ) हा शब्द अपवादक आहे. त्याचें 'जुवा' असें बहुवचनीं रूप होऊन विभक्तिप्रत्यय लागताना ' जुवास ' असें सामान्यरूप होतें. पुरुषवाचक व दर्शक सर्वनामें मराठीप्रमाणेंच आहेत; पण त्यांचे विभक्ति-प्रत्यय निराळे आहेत. हे विभक्तिप्रत्यय शिवाय करून प्रथम व द्वितीय पुरुषवाचक सर्वनामांचीं बहुवचनें मराठी-प्रमाणेंच होतात. पण तृतीय पुरुषवाचक दर्शक सर्व नामांना विभक्तिप्रत्यय लागतेवेळीं अनेकवचनी स हा प्रत्यय लागतो. खुलाशाकरितां कांहीं सर्वनामें चालवून दाखवितों:–

| | मी | | तूं | | तो | |
|---|---|---|---|---|---|---|
| | एकव. | बहुव. | ए. | ब. | ए. | ब. |
| प्र. च. | मी | आमि. | तूं | तुमी. | तो, | ते. |
| द्वि. च | माले,मले. | आमले | तुले, | तुमाले. | त्याले | त्यासले |
| तृ. | मावरि. मांघै. | | तुवरी, | | त्यानीं, | त्यासनी |
| | | | तुमावरी, | | त्यावरी | त्यासवरी, |
| | | | तुघै; | तुमाघै., | त्याघै, | त्यासघै, |
| पं. | माथिन् | आमाथिन्, | तुथिन्, | | त्याथिन् | त्यासथिन् |
| | मनाथिन्, | आमाथिन | तुमाथिन् | | | |
| ष. | मना–नी, | आमना | तुना; | तुमना | त्याना– | त्यासना |
| | –न, नी–न | –नी–न | | नी–न | नी–न, | नी–न |
| स. | मनामा, | आमनामा, | तुमा | तुमनामा, | त्यामा, | त्यासमा |
| | मामझार | | तुमझार. | | त्यामझार, | |
| | | | | | | त्यासमझार. |

मराठींतील हा, ही, व हे हीं दर्शकसर्वनामें खानदेशींत पुल्लिंगी है व स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी है अशीं होतात. प्रश्नार्थक सर्वनामापैकीं कोन ( कोण ) याचें विभक्तिप्रत्यय लागतांना रूप बदलत नाहीं; पण काय या सर्वनामाचें विभक्तिप्रत्यय लागताना ' कसा ' असें सामान्यरूप होतें. क्रियापदाचीं रूपें जरी चमत्कारिक आहेत, तरी क्रियापदें नियमित तऱ्हेनें चालतात. या नियमाला फारच थोडे अपवाद आहेत. वर्तमानकाळीं एकवचनी तिन्ही पुरुषीं एकच रूपें आहेत, व बहुवचनीं तिन्ही पुरुषीं निराळीं परंतु एकच रूपें आहेत. त्यांचे अनुक्रमें ' स व ' तस ' हे प्रत्यय आहेत जसें:—कर ( करणें ) यांचीं करस व करतस अशीं अनुक्रमें रूपें होतात. हीं रूपें प्राकृत भाषेंतील वर्तमानकालवाचक धातुसाधित जें ' करंत ' व त्याचा झालेला ' करत ' असा अपभ्रंश, यावरून निघालेलीं असावींत. क्रियापदाचा भूतकाळ न हा प्रत्यय लागून होतो भूतकाळचें प्रथम पुरुषाचें एक वचनी व बहुवचनी ' नु ' व ' नुत ' असे अनुक्रमे प्रत्यय व द्वितीय व तृतीय पुरुषाचे ' ना ' व ' नात ' असें अनुक्रमें एकवचनी व बहुवचनी प्रत्यय आहेत.

भविष्य काळचे खालीलप्रमाणे प्रत्यय आहेतः—

| | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| प्र. पु. | सु | सुत. |
| द्वि. पु. | शी | शाल किंवा शात. |
| तृ. पु. | ई | तीन किंवा तील. |

मराठींत ज्याप्रमाणें कर्माच्या लिंगवचनाप्रमाणें कर्मणिप्रयोगांत क्रियापदाचें रूप बदलतें त्याचप्रमाणें खानदेशी भाषेंतहि बदलतें. जसें 'रामानें घर बांधिलें' याचें खानदेशी भाषेंत 'रामानी घर बांध' (धचा उच्चार लोप होतो.) असें रूपांतर होतें. तसेंच 'ब्राह्मणानें पोथी वाचिली' याचें 'ब्राह्मणानें पोथी वाची' असें होतें. नामाच्या लिंगवचनाप्रमाणें विशेषणाचें रूप बदलतें, पण नामाला विभक्तिप्रत्यय लावले असतां मराठीप्रमाणेंच विशेषणाचें सामान्यरूप होत नाहीं. 'आणि' व 'व' या उभयान्वयी अव्ययांनां खानदेशींत 'आन' व 'न' असे प्रतिशब्द आहेत. 'आणखी' याला 'अखोर' असा विचित्र शब्द आहे. स्थलवाचक क्रियाविशेषणें येणेंप्रमाणें आहेतः— येथें = अठे, इठे ( संस्कृत; अत्र ); तेथें = तठे, तथ ( संस्कृत तत्र ); कोठें = कठे, कथा. कोठ ( संस्कृत, कुत्र ); कालवाचक क्रियाविशेषणें:—जेव्हां = जव्हय, जधय, जधाल ( संस्कृत यदा ); तेव्हां = तव्हय, तधाल (संस्कृत, तदा); केव्हां = कव्हय, कधाय ( संस्कृत कदा ). रीतिवाचक क्रियाविशेषणाचीं रूपें मराठीप्रमाणेंच आहेत. कांहीं शब्द मराठीपासून अगदीं भिन्न असे या भाषेंत आढळतात, त्यांपैकीं कांहीं येथें देतों.—

अंडोर = मुलगा. अंडेर = मुलगी. याक = कडे तिंयाक = तिकडे. इयाक = इकडे. धुरा = पावेतों. मायव = अगाई.

आतां नियमित चालणाऱ्या कांहीं क्रियापदांचे नमुने देतोंः—

अस = असणें

| | वर्तमान | | भूत | | भविष्य | |
|---|---|---|---|---|---|---|
| | एक. | बहु. | एक. | बहु. | एक. | बहु. |
| प्र. | शे, | शेतस, शेतस. | व्हत, | व्हतुत. | अस् | असूत, व्हस्. |
| द्वि. | शेस | ,, | व्हता, | व्हतात | असशी, अशाल, व्हशी, व्हशाल | |
| तृ. | ,, | ,, | ,, | ,, | व्हमी | व्हतीन. |

हो = होणें.

| | वर्तमान | | भूत | | भविष्य | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | व्हस, | व्हतास. | ज्यार, | ज्यारुत. | व्हसू, | व्हसूत |
| द्वि. | ,, | ,, | ज्याय, | ज्यायात. | व्हशी, | व्हशाल व्हशात |
| तृ. | ,, | ,, | ,, | ,, | व्हई. | व्हतिन, व्हतील. |

जा = जाणें.

| | वर्तमान | | भूत | | भविष्य | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. | जाश, | जातस. | गऊ, | गऊत, | जासू, | जासूत. |
| द्वि. | ,, | ,, | ग्या, | ग्यात. | जाशी, | जाशात. |
| तृ. | ,, | ,, | ,, | ,, | जाई | जातिन. |

अहिराणी भाषेंतील एक पद्य—या पद्याचा भावार्थ असाः—एक कुणबी खांद्यावर शेतीचें सामान घेऊन बैल हांकीत चालला असतां मनांत विचार करूं लागला. अमक्या शेतांत कपाशी पेरीन; तिच्या उत्पन्नांतून कर्ज फेडीन; तमक्या शेतांत जोंधळा पेरून, बायकोला त्याच्या उत्पन्नाचे दागिने करीन; गव्हांच्या उत्पन्नावर घर बांधीन; मठ ( मटक्या ) मुगांवर शेतसारा भागवून, तिळांच्या उत्पन्नावर मुलाचें लग्न करीन. असा विचार करीत पेरणी करून घरीं आला, तों दोन महिने दुष्काळांत पडला. पुढें अवर्षण पडल्यामुळें बैल विकून अखेरीस शेतसारा भरावा लागला.

( 'ब्राह्मण कन्या नव्हे क्षत्रिया०' अशासारख्या चालीवर )

खानवर सामान डोक्यावर सरक्या बैल पुढ हुकली दिना ।
कुणबी मनसुबा करत चालना ॥
आडपट्टीमा पेरपु पळ बीवार शे बहु जुना ।
अवंदा कर्ज राहात नाहीं मना
चिचमळामा पेरसु जोंधळा बीवार शे बाजराना ।
बायको तुले खूप घडसू दागिना ॥
त्या परिस येवाशे बहु गव्हाळिना ।
मजबुत घर बांधसु जोग्राना ॥
मठ मुंगवर झोकसु तशील तिळीना मोकळा दाणा ।
एकच पोऱ्याशी परणाना ॥
पेरणी करीसन घर उना दोन महिने जाया दुखना ।
अडीच महिने पाणी नहीं ऊना ॥
म्हणे खुशाल ठाकुर ठेवाशे भाऊ श्रीहरिना॥
उलटा बैल तशीलना दिना ॥

वरील मजकूर मुख्यत्वेंकरून खानदेश गॅझेटियरवरून व कांहीं स्वतःच्या माहितीवरून रा. वि. का. भागवत यांनीं लिहिला आहे. [ विविधज्ञानविस्तार सप्टेंबर १९०६ ]

गद्दी व घोसी अहीर—उत्तर हिंदुस्थानात जेव्हां अहीर लोक मुसुलमान होतात तेव्हां त्यांना घोसी (ओरडणारा, संस्कृत घुष धातूपासून ) किंवा गद्दी म्हणतात. ते द्राविडमिश्र मुसुलमानी धर्म पाळतात मुंबईतील हे लोक जन्म व व लग्नाच्या वेळीं हिंदुसंस्कार करितात. दसरादिवाळीच्या वेळीं देवी लक्ष्मीच्या मूर्तीची पूजा करितात, तुळशीची व होळीच्या वेळीं एरंडाच्या झाडाची पूजा करितात.

पंजाबांतील डोंगरात राहणारे गद्दी यापेक्षा फार निराळे आहेत. हे नांवाचे हिंदु आहेत. शिव, नाग, सिद्ध, वीर आणि देवी यांची उपासना करितात. बायका विशेषतः कैलुनांवाच्या वीराची बाधा होऊं नये म्हणून पूजा करितात. नागांत कैलुंग हा मुख्यांपैकीं एक आहे. शिवाप्रमाणें याचीहि कोयत्याच्या रूपात आराधना करितात. या खेरीज पुजाई असे अवतार म्हटले म्हणजे निपुत्रिक माणसांचीं भुतें आहेत. हीं भुतें द्वाड असून रोग ओढून आणितात;

मन ), क्षत्र ( साम्राज्य ), आर्मइति ( धर्मनिष्ठा, शहाणपण ), हौर्वतात ( उन्नति ), अमेरेतात ( अमरत्व ), स्रओष (आज्ञाधारकता ) ६ वैदिक धर्मातील देवतांत आदित्यसंघ हा गुणधर्मांच्या दृष्टीनें अहुरमझ्दाच्या तोडीचा आहे असें दिसतें. मझ्द, मित्र व अनाहित या त्रिमूर्तीसारखी वरुण, मित्र आणि अर्यमा यांची त्रिमूर्ति वेदांत आहे या दोन त्रिमूर्तीतील मझ्द—वरुण आणि मित्र-मित्र यांचें सादृश्य निःशंकित आहे ज्याप्रमाणें मझ्दाच्या इच्छेनें डरायस राजा झाला, त्याचप्रमाणें वरुणाच्या इच्छेनें किंवा आज्ञेनें जग चालतें ऋत ही त्याची इच्छा, व ह्यिलाच प्राचीन इराणी अश किंवा अर्त म्हणतात. ऋताच्या विरुद्ध कोणी गेल्यास वरुणाचे पाश त्याच्या भोंवतीं पडतात (ऋ १ २४,१० १५) अहुरमझ्दाभोंवतीं जसा नैतिक भावनाविशिष्ट देवतासंघ जमतो, तसा आदित्यसंघात प्रचेतस् वरुण हा पहिला शोभतो

ऋत यांचें अश किंवा अर्त यांशीं जसें साम्य आहे तसेंच अरमति ( धर्मनिष्ठा प्रार्थना ) यांचें आर्मइति यांशीं व वरुणाचें राज्य जें क्षत्र त्याचें मझ्दाच्या क्षत्रवैर्य या साम्राज्याशीं साम्य आहे या शिवाय सौर्वताती ( निष्कापट्य ) म्हणजेच हौर्वतात इ याप्रमाणें मझ्द मिथ आणि अमेशस्पेंत ही वरुण-मित्र आणि आदित्य यांच्याशीं नैतिक स्वरूपात पाहता एकरूप दिसतील

ही भारतीय व पर्शु देवतांची एकरूपता असुरी-बाबिलोनी देवतांतहि आढळून येते सेमिटो-हिटाईट संप्रदायात मित्र, ( वु )अरुण, इंद्र, नासत्य हे आर्यांचे देव अंतर्भूत होते हें मिटनी लेखावरून सिद्ध झालें आहे व्हिन्सेंट श्रोलनें असुरियन देवतांची जी यादी प्रसिद्ध केली आहे ( रेस्युईल डी ट्रॅव्हाक्स १४ १८९३ ), तींत अस्सुर मझाश ( असुर मझ्द-अहुरमझ्दाचें इतिहासपूर्व स्वरूपनाम ) असा एक देव आला आहे या देवानंतर अमेशस्पेंता—आदित्या सारख्या सात अनुयायी देवता दिल्या आहेत हें साम्य आश्चर्यकारक आहे हें खरें पण यांखेरीज असुरियन संप्रदायात भारतीय किंवा पर्शुप्रमाणें त्रिमूर्तीचीहि कल्पना आली आहे तेव्हां फार प्राचीन काळीं आर्यांचा व असुरी किंवा हिटाईट लोकांचा निकट संबंध आला असला पाहिजे हें उघड होतें तो केव्हा व कसा आला याचें विवेचन येथें कर्तव्य नाहीं.

[सदर्भग्रंथ—अवेस्ता-गाथा ऋग्वेद संहिता डार्मेस्टेटर—झेंद-अवेस्ता, ओर्मझ्द एट अहरिमन् ढाला—झोरोआष्ट्रियन थिऑलॉजी हाग-एसेज ऑन दि पार्सीज जॅकसन—डाय इराण रिलिजन ओल्डनबर्ग—डाय इराण रिलिजन ( डायकुल्टूर डर गेजेनवर्ट . १९०६, डाय रिलिजन डेस वेद, १८९४) सजाना—झरथुष्ट्र ॲंड झरथुष्ट्रिॲनिझम इन् दि अवेस्ता मोल्टन-अर्ली झोरोआष्ट्रिॲनिझम मिल—झरथुष्ट्र फिलो दि ॲकीमेनिड्स ॲंड इस्राएल. ए रि ए जस्ट्रो—दि रिलिजन ऑफ बाबिलोनिया ॲंड ॲसिरिया मॅक्स-मुल्लर-ऑरिएंटालिश्चे लिटरेटुर ग्यॉटिंग २५ ]

**अहेरिया**—( संस्कृत अखेटिक = शिकारी ) उत्तर हिंदुस्थानांत आढळणारी. शिकारी, पारधी व चोरटे यांची जात यांची संख्या जवळ जवळ ३५,४७७ आहे यापैकीं पुष्कळसे पंजाब व संयुक्तप्रांत यात राहातात हे द्राविड वंशातील असावे असें दिसतें हे वन्यधर्मी असल्यानें, अभिजात हिंदु वर्गापासून भिन्न अशा देवता यांच्यात आहेत अभिजात विचाराचे असे काहीं अहेरिया देवी उपासक आहेत पण वास्तविक संयुक्तप्रांतात त्यांची जाति विशिष्ट देवता मेखासुर ( स मेष+असुर = मेषासुर ) असून तिच्या उत्पत्तीविषयीं त्यांना काहीं माहिती नाहीं कदाचित ती प्राचीन प्राणिपूजासंप्रदाय दर्शवीत असावी गुगा किंवा जाहीर पीर, या प्रसिद्ध साधूची मुसुलमान पुरोहिताच्या द्वारें पूजा करण्यात येते ( क्रूक, पॉप्युलर रिलिजन,, २११ पासून पुढें) यांचा दुसरा मुसुलमान साधु म्हणजे मुरादाबाद जिल्ह्यांतील अमरोहाचा मियान किंवा मीरान साहेब होय, ( रोझाट्रायर, दबिस्तान ३ २३५ ) अखिया या देवतेचीहि हे पूजा करतात अखिया हा देवत्वाप्रत पोंचलेला एक झाडूवाला होता त्याला डुक्कर बळी देण्यात येतें व त्या प्रसंगीचा झाडूवाला पुरोहित त्याचें थोडेसें रक्त मुलांच्या कपाळाला फासतो, त्यामुळें भुताखेताची बाधा होत नाहीं अशी समजूत आहे बराई व चामर या दोन लहान ग्रामदेवतांनाहि पूजितात चामराला गव्हाचा रोट अर्पण करण्यात येतो, विशेष प्रसंगीं मेषबलिदान होतें, व त्याचें मांस देवासमोर लगेच भक्षण करण्यात येतें हे लोक प्रसिद्ध रामायणकार वाल्मीकि ऋषि यास आद्यगुरुस्थानीं मानतात ही गोष्ट जरा चमत्कारिक दिसते देवतांना बलि विशिष्ट कुलांतील मनुष्यानेंच द्यावा लागतो, या कृत्याला ब्राह्मणांचा पुरोहित चालत नाहीं काहीं विधींतून बळीचा वध करण्यांत येत नाहीं तर त्याच्या कानातून रक्त काढून सोडून देण्यात येतें. मृताच्या भुताची या लोकांना फार भीति वाटते, म्हणून प्रेताला अग्नि दिल्यावर घरीं जातांना ते चितेकडे दगड फेंकतात, हेतु हा कीं, मृताच्या भुतानें आपल्याबरोबर येऊं नये

पंजाबांतील लः—लो. सं ( १९११ ) १९,५०५ यांची हिसार, गुरगाव, कर्नल, व अंबाला हे जिल्हे आणि पतियाळा व झिंद या संस्थानांत मुख्यत्वें करून वस्ती आढळते पतियाळा संस्थानांत कांहीं थोडे अहेरी लोक शीख व महमदी संप्रदायी आहेत बाकी सर्व हिंदू आहेत ते गवताचा व्यापार व मजूरी करितात इगामांत पिकाच्या कापणीकरितां टोळ्या करून फिरतात दिसण्यांत व शरीरानें ते बावरियासारखे असून गांवाबाहेर राहतात

[ सदर्भग्रंथ—क्रूक-ट्राईब्स ॲंड कास्टस ऑफ दि नॉर्थ वेस्टर्न प्राव्हिन्सेस ॲंड औध, पाप्युलर रिलिजन ॲंड फोक

तेव्हां ओढ्याकाठीं मूर्ति स्थापून रोगानें त्याची पूजाअर्चा करावी लागते. शिवाय घातल, योगिनी, रक्षनी आणि बनसत या दुष्टबुद्धि देवता आहेतच यांपैकीं कोणी नद्या, ओढे, कोणी खडक, कोणी राक्षस, भुतें, अरण्यें यावर ताबा चालवितात. डोंगरी जातींत अशा कल्पना असणें अगदीं स्वाभाविक आहे. झाडींत वास करणारा चुंगू नांवाचा एक राक्षस आहे; हा गुरांचें दूध शोषून घेतो. गुरांना रोगी करणारा दुसरा राक्षस गुंगा होय. या देवतांना प्राणी बळी देण्यात येतात गड्डी संप्रदायाचा इतिहास फार मजेदार असून तो भारतीय वन्यधर्मांची माहिती देण्यास चांगला उपयोगी पडेल.

[ संदर्भग्रंथ.—डाल्टन—डिस्क्रिप्टिव्ह ऐथ्नॉलॉजी. रिस्ले-ट्राईब्स ॲंड कास्टस, १ ; नॉर्थ इंडियन नोट्स ॲंड क्वेरीज ५. बुचानन हॅमिल्टन—ईस्टर्न इंडिया गेट—बेंगॉल सेन्सस, १९०१. क्रुक—पाप्युलर रिलिजन ॲंड फोकलोअर. २; रसेल व हिरालाल-ट्राइब्स ॲंड कास्टस् इन सी. पी. रोज-ग्लॉसरी, पु २ पंजाब-सेन्सस रिपोर्ट, १९०१. बाँबे गॅझिटियर १५ हे रा भाडारकर—इं. अँ. जानेवारी १९११ स्मिथ-अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया पु. ९ बाँबे एथ्नोग्राफिकल सर्व्हे, बुले० नं. १. सेन्सस रिपोर्टस १९११. ए. रि. ए. ]

*अहुरमझ्द*—किंवा ओर्मझ्द. मझ्दसंप्रदायांतील हा सर्वश्रेष्ठ देव असून, अह्रिमन जसा दुष्कृत्याची तसा हा सत्कृत्याची देवता म्हणून मानतात. अवेस्ती–फारसी औरमझ्द शब्दापासून पहलवी ओहर्मझ्द शब्द आला व त्यापासून सध्याचें पारशी ओर्मझ्द हें नांव पडलें. प्राचीन अवेस्तांत अशा तऱ्हेचा संयुक्त शब्द येत नसून, मझ्दाअहुरा किंवा अहुरा मझ्दाए, अहुराइ मझ्दाइ, असें रूप दिसतें. अहुर हें विशेषण केवळ मझ्दालाच लावलेलें असतें असें नाहीं तर मित्र ( यश्त १०. २५६९) आणि अपानपात् ( यस्न २ ५; १.५; ६५. १२ ) यानाहि योजिलेलें आढळतें. तथापि मझ्दालाच अहुर ही पदवी विशेषेंकरून देण्यांत येते व जेथें नुसतें अहुर असें नांव असेल तेथें अहुरमझ्द असें समजावें. अहुर-मझ्द म्हणजे संस्कृत असुरमहत् असें प्रो. वै. का. राजवाडे म्हणतात व असुर-मेधस असाहि शब्द सुचविण्यात आला आहे. असुरमेधस् याचा अर्थ सर्वसाक्षी असुर असा होतो. वेदांत हा गुण वरुणाला लाविलेला आहे ( ऋग्वेद १. २४, १४: असुर प्रचेतः). ( असुर पहा. ) ससॅनियन काळांत पूर्णावस्थेस पोंचलेल्या मझ्द संप्रदायात ओर्मझ्द हाच खरा देव आहे व पहलवी ग्रंथांतून त्याला, पूर्णोत्कृष्ट, भूत वर्तमान व भावी अशी शुद्ध व अस्पष्ट प्रकृति आणि प्रकृतीची प्रकृति असें म्हटलेलें आहे. हा सर्वशक्तिमान व सर्वसाक्षी, पूर्णपणें चांगला, सर्वांचें हित पाहणारा,, उपकारी व दयाळू आहे. प्रकाश आणि शुद्धि यांच्या अधिष्ठानाची ही ? असल्यानें अह्रिमनशीं होणाऱ्या झगड्याचा शेवट काय होईल तो याला कळतो. अह्रिमनमध्यें जें नाहीं तें याच्यामध्ये आहे. तेव्हां साहजिकच या दोघांची स्थानेंहि भिन्न आहेत अहुरमझ्द अखंड प्रकाशांत तर अह्रिमन् निरंतर अंधःकारात वास करितो.

अहुरमझ्द व अह्रिमन् हें द्वंद्व गाथाकालीन म्हणतां येईल. विश्वाच्या आरंभीं सत् व असत्, अशा दोन प्रकृती प्रादुर्भूत झाल्या. त्या दोघांनीं सजीव व निर्जीव विश्व उत्पन्न केलें. माणसांनीं यांपैकीं कोणाचा अंगीकार करावयाचा हें स्वतःच ठरवावयाचें असतें व शहाण्या लोकांनाच फक्त ही निवड कशी करावी तें कळतें व त्यानांच शेवटीं सत्प्रकृतीचें यश मिळतें ( यस्न ३३. ३ पासून पुढें ) झरथुष्ट्र संप्रदायांतील या द्वैतमताबद्दलचें विवेचन छंदावेस्ता लेखांत येईलच.

न्याय व सत्य ( अश ) याचा धर्म म्हणजे झरथुष्ट्राचा धर्म अनुसरण्यास, सद्वाचा, सद्विचार व सत्कर्म आचरून, दुरात्मा जो द्रुज त्याची अवहेलना करण्यास व अशा रीतीनें सुखा ( अदा ) च्या राज्या ( क्षथ्र ) स पोहोंचण्यास अहुर मझ्द शिकवितो. मझ्दाचे गुण व सामर्थ्य मोठ्या प्रशस्तिपर शब्दांत वर्णिलेले गाथांतून आढळते ( उदा. यस्न ४४. ३–५ ).

याप्रमाणें अहुरमझ्द हा सर्वसाक्षी, सर्वज्ञाता व सर्वसामर्थ्यवान असुर आहे; गाथांत विशेषेंकरून नैतिक रक्षणकर्ता म्हणून हा येतो. जरी हा मुख्यत्वें प्रकाशाचा देव म्हणून वावरत आहे तरी कोणत्याहि भौतिक बंधांपासून हा पूर्णपणें अलिप्त आहे.

ॲकिमेनियन शिलालेखांतून इराणी सत्ताधीशांना देव जो औरमझ्द हा अतिशय मोठ्या दर्जाचा म्हणून दाखविला आहे. दरायस हा आपणाला औरमझ्दानुयायी म्हणवितो व आपल्या विधानाची सत्यता पटण्यासाठीं औरमझ्दाची शपथ वाहतो. क्सर्क्सीसला औरमझ्दानेंच राजा बनविलें (क्सर्क्सीस पर्सि. ३ ) अंकितलेखांतून औरमझ्दाच्या जोडीला मित्र व अनाहित या दोन देवता कधीं कधीं बसविलेल्या असतात. हिरोडोटस औरमझ्दाचा उल्लेख करीत नाहीं. तथापि पर्शूंची निसर्गपूजापद्धति वर्णन करितो; ती वाचून इराणी लोकांनीं प्राचीन आर्यभावना किती शुद्ध स्वरूपांत रक्षिल्या होत्या तें कळतें.

इंडो-यूरोपियन देवतागणांतील देव नीतीची फारशी पर्वा करीत नाहींत हें म्हणणें ( उदाः–ओल्डनबर्ग डाय रिलिजन डेस-वेद, पा. २८४ ) अतिशयोक्तीचें जरी आहे तरी पंचमहाभूतात्मक आकाशदेव व अहुर मझ्द यामध्यें बराच मोठा विरोध आहे यांत शंका नाहीं. द्यौस् भोंवतीं चंद्र, तारे, वारे, अग्नि, पृथिवी इत्यादि निसर्गशक्तिदर्शक देव जमतात तर इकडे झरथुष्ट्र संप्रदायांतील अहुरमझ्दाकडे खालील नैतिक गुणविशिष्ट सगुण प्रकृतींचें आधिपत्य दिलेलें आहे. अश ( न्याय, सत्यता ); वोहुमनह ( सद्धार्मिक

मन ); क्षत्र ( साम्राज्य ); आर्मइति ( धर्मनिष्ठा, शहाणपण ); हौर्वतात ( उन्नति ); अमेरेतात ( अमरत्व ); सओष (आज्ञाधारकता ) इ. वैदिक धर्मातील देवतांत आदित्यसंघ हा गुणधर्मांच्या दृष्टीनें अहुरमझ्दाच्या तोडीचा आहे असें दिसतें. मझ्द, मित्र व अनाहित या त्रिमूर्तीसारखी वरुण, मित्र आणि अर्यमा यांची त्रिमूर्ति वेदांत आहे. या दोन त्रिमूर्तींतील मझ्द—वरुण आणि मिथ्र-मित्र यांचें सादृश्य निःशंकित आहे. ज्याप्रमाणें मझ्दाच्या इच्छेनें डरायस राजा झाला. त्याचप्रमाणें वरुणाच्या इच्छेनें किंवा आज्ञेनें जग चालतें. ऋत ही त्याची इच्छा, व हिलाच प्राचीन इराणी अश किंवा अर्त म्हणतात. ऋताच्या विरुद्ध कोणी गेल्यास वरुणाचे पाश त्याच्या भोंवतीं पडतात (ऋ १.२४,१०-१५) अहुरमझ्दाभोंवतीं जसा नैतिक भावनाविशिष्ट देवतासंघ जमतो, तसा आदित्यसंघात प्रचेटस् वरुण हा पहिला शोभतो.

ऋत यांचें अश किंवा अर्त यांशीं जसें साम्य आहे तसेंच अरमति ( धर्मनिष्ठा प्रार्थना ) याचें आर्मइति यांशीं व वरुणाचें राज्य जें क्षत्र त्याचें मझ्दाच्या क्षथ्रवैर्य या साम्राज्याशीं साम्य आहे. या शिवाय सौर्वताती ( निष्कापट्य ) म्हणजेच हौर्वतात इ. याप्रमाणें मझ्द मिथ्र आणि अमेशस्पेंत ही वरुण-मित्र आणि आदित्य यांच्याशीं नैतिक स्वरूपांत पाहतां एकरूप दिसतील.

ही भारतीय व पर्शु देवतांची एकरूपता असुरी–बाबिलोनी देवतांतहि आढळून येते. सेमिटो–हिटाईट संप्रदायात मित्र, ( उ )अरुण, इंद्र, नासत्य हे आर्यांचे देव अंतर्भूत होते हें मिटनी लेखावरून सिद्ध झालें आहे विन्सेंट थोलनें असुरियन देवनाची जी यादी प्रसिद्ध केली आहे ( रेस्ट्रुईल डी ड्रेव्हाक्स १४ १८९३ ), तींत अस्सुर मझाश ( असुर मझ्द–अहुरमझ्दाचे इतिहासपूर्व स्वरूपनाम ) असा एक देव आला आहे. या देवानंतर अमेशस्पेंता–आदित्या–सारख्या सात अनुयायी देवता दिल्या आहेत. हें साम्य आश्चर्यकारक आहे हें खरेंच. पण यांखेरीज असुरियन संप्रदायात भारतीय किंवा पर्शुप्रमाणें त्रिमूर्तीचीहि कल्पना आली आहे. तेव्हां फार प्राचीन काळीं आर्यांचा व असुरी किंवा हिटाईट लोकांचा निकट संबंध आला असला पाहिजे हें उघड होतें. तो केव्हा व कसा आला याचें विवेचन येथें कर्तव्य नाहीं.

[संदर्भग्रंथ—अवेस्ता–गाथा. ऋग्वेद संहिता. डार्मेस्टेटर–झेंद–अवेस्ता; ओर्मझ्द एट अह्रिमन्. ढाला–झोरोआस्ट्रियन थिऑलॉजी. हाग–एसेज ऑन दि...पार्सीज. जॅकसन–डाय इराण रिलिजन. ओल्डनबर्ग—डाय इराण रिलिजन ( डायकुल्टूर डर गेजेनवर्ट १. १९०६; डाय रिलिजन डेस वेद, १८९४) संजाना–झरथुष्ट्र अँड झरथुश्ट्रिॲनिझम इन् दि अवेस्ता. मोल्टन–अर्ली झोरोआस्ट्रिॲनिझम. मिल–झरथुष्ट्र. फिलो. दि ॲकीमेनिड्स अँड इस्राएल. ए.रि.ए. जस्ट्रो–दि रिलिजन ऑफ बाबिलोनिया अँड ॲसिरिया. मॅक्समुल्लर–ओरिएंटालिशे लिटरेटुर ग्योटिंग. २५. ]

**अहेरिया.**—( संस्कृत अखेटिक = शिकारी ) उत्तर हिंदुस्थानांत आढळणारी. शिकारी, पारधी व चोरटे यांची जात. यांची संख्या जवळ जवळ ३५, ४७७ आहे. यांपैकीं पुष्कळसे पंजाब व संयुक्तप्रांत यांत राहातात. हे द्राविड वंशांतील असावे असें दिसतें. हे वन्यधर्मी असल्यानें, अभिजात हिंदु वर्गापासून भिन्न अशा देवता यांच्यांत आहेत. अभिजात विचाराचे असे काहीं अहेरिया देवीउपासक आहेत. पण वास्तविक संयुक्तप्रांतात त्यांची जातिविशिष्ट देवता मेखासुर ( सं. मेष+असुर = मेषासुर ) असून तिच्या उत्पत्तीविषयीं त्यांना कांहीं माहिती नाहीं. कदाचित ती प्राचीन प्राणिपूजासंप्रदाय दर्शवीत असावी. गुगा किंवा जाहीर पीर, या प्रसिद्ध साधूची मुसुलमान पुरोहिताच्या द्वारें पुजा करण्यांत येते ( क्रूक, पॉप्युलर रिलिजन,;. २११ पासून पुढें). यांचा दुसरा मुसुलमान साधु म्हणजे मुरादाबाद जिल्ह्यांतील अमरोहाचा मियान किंवा मीरान साहेब होय, ( शेआट्रायर, दबिस्तान ३. २३५ ). जखिया या देवतेचीहि हे पूजा करतात. जाखिया हा देवत्वाप्रत पोंचलेला एक झाडूवाला होता. त्याला डुक्कर बळी देण्यात येतें व त्या प्रसंगीचा झाडूवाला पुरोहित त्याचें थोडेंसें रक्त मुलांच्या कपाळाला फासतो; त्यामुळें भुताखेताची बाधा होत नाहीं अशी समजूत आहे. बराई व चामर या दोन लहान ग्राम देवतानाहि पूजितात. चामराजा गव्हाचा रोट अर्पण करण्यात येतो; विशेष प्रसंगीं मेषबलिदान होतें, व त्याचें मांस देवासमोर लगेच भक्षण करण्यात येतें. हे लोक प्रसिद्ध रामायणकार वाल्मीकि ऋषि यांस आद्यगुरुस्थानीं मानतात ही गोष्ट जरा चमत्कारिक दिसते. देवतांनां बलि विशिष्ट कुलांतील मनुष्यानेंच द्यावा लागतो; या कृत्याला नेहेमींचा पुरोहित चालत नाहीं. कांहीं विधींतून बळीचा वध करण्यांत येत नाहीं तर त्याच्या कानातून रक्त काढून सोडून देण्यात येतें. मृताच्या भुताची या लोकाना फार भीति वाटते; म्हणून प्रेताला अग्नि दिल्यावर घरीं जातांना ते चितेकडे दगड फेंकतात, हेतु हा की, मृताच्या भुतानें आपल्याबरोबर येऊं नये.

पंजाबांतीलः—लो. सं. ( १९११ ) १९,५०५ यांची हिसार, गुरगांव, कर्नल, व अंबाला हे जिल्हे आणि पतियाळा व झिंद या संस्थानांत मुख्यत्वें करून वस्ती आढळते. पतियाळा संस्थानांत काहीं थोडे अहेरी लोक शीख व महंमदी संप्रदायी आहेत. बाकी सर्व हिंदु आहेत. ते गवताचा व्यापार व मजूरी करितात. हंगामांत पिकाच्या कापणीकरितां टोळ्या करून फिरतात. दिसण्यांत व शरीरानें ते बावरियासारखे असून गांवाबाहेर राहतात.

[ संदर्भग्रंथ—क्रूक–ट्राईब्स अँड कास्टस ऑफ दि नॉर्थ वेस्टर्न प्राव्हिन्सेस अँड औघ; पाप्युलर रिलिजन अँड फोक

लोअर ऑफ नार्दर्न इंडिया ए रि. ए. सेन्सस रिपोर्ट-पंजाब. रोज-ए ग्लॉसरी ऑफ दि ट्राइब्स अँड कास्टस ऑफ दि पंजाब अँड नॉर्थ वेस्ट फ्रॉंटियर प्राव्हिन्स ]

**अहोबिलम्**—( मद्रास ) करनूल जिल्हा. शिरवेल तालुक्यातील एक खेडेगांव व मंदिर. उत्तर अक्षांश १५°८' व पूर्व रेखांश ७८°४५.' हें सदर्न मराठा रेल्वेच्या नंद्याल स्टेशनापासून ३० मैल आंत आहे. इ. स १९०१ मध्यें लोकसंख्या १५१ होती हें मंदिर म्हणजे या भागांतील वैष्णवाचें फार फार मोठें क्षेत्र समजलें जातें या ठिकाणीं तीन यात्रेचीं ठिकाणें आहेत. एक डोंगराच्या पायथ्याशीं, दुसरें वराच्या बाजूस ४ मैलावर मध्यभागीं व तिसरें डोंगराच्या माथ्यावर यापैकीं पहिलें फार महत्त्वाचें आहे कारण त्याच्या भिंतींवर व मंडपावर रामायणांतील पुष्कळ देखावे कोरलेले आहेत. येथें होळी पौर्णिमेला जत्रा भरते. सध्या हें मंदिर व चिंगलपट जिल्ह्यांतील तिरुवेलूर येथील याचाच मठ, हीं पुष्कळ उत्पन्न असूनहि अव्यवस्थित स्थितींत आहेत. ( इं. गॅ. ५ ).

**अळतें**—(मुंबई) कोल्हापूर संस्थान. अळतें तालुक्यांतील कोल्हापूरच्या वायव्येस १२ मैलावर असलेलें एक गाव. उत्तर अक्षांश १६°४५' व पूर्व रेखांश ७०°१८'. लोकसंख्या(१९११) ४९६५. येथें रमजान दरगा असून त्यास ६१३ रुपये साऱ्याची इनाम जमीन आहे. गावाच्या पश्चिम बाजूला शिदोबा, धुळोबा, अलंप्रभु, रामलिंग व एक लिंगायत साधु यांचीं देवळें आहेत. या सर्व देवळाच्या वार्षिक जत्रा भरतात अवरंगझेब अथवा अलमगीर बादशहा येथें आला असता त्यानें आपल्या पादुका येथील गावकऱ्यांना दिल्या. त्याप्रीत्यर्थ अलंप्रभूनें हें देऊळ बांधलें आहे असें म्हणतात. अवरंगजेबानें देवळास एक माचा नजर केला, त्यावरून देवाचें नाव अलंप्रभु ठेविलें असेंहि म्हणतात.

हा प्रभू एक लिंगाइत साधू असून त्याच्या स्मरणार्थ अडलिंग नावाच्या त्याच्या शिष्यानें हें देऊळ बांधलें, अशी दुसरी कथा आहे. रामलिंग हें बौद्धाचें किंवा जैनाचें पूर्वीचें देऊळ असावें असें वाटतें. हल्लीं देवळांतील पूजाअर्चा ब्राह्मण पद्धतीनें होते. पूर्वी या ठिकाणीं अळत्याचा रंग तयार करीत त्यावरून या गांवास हें नाव पडलें. हा गाव सुमारें ८०० वर्षांचा जुना आहे. अठराव्या शतकाच्या अखेरीस झालेल्या धामधुमींत हें दोन वेळां जाळण्यांत आलें होतें. [ इं. गॅ. ५-१९०८; मुं. गॅ २४ ]

**अळनावर**—( मुंबई इलाखा ) धारवाड जिल्हा धारवाडच्या पश्चिमेस २० मैलावर असलेलें खेडें. या गावावरून बेळगाव-हल्याळ रस्ता व धारवाड-गोवा रस्ता, असे दोन रस्ते गेले आहेत. मद्रास-सदर्न मराठा रेल्वेच्या पुणें-बंगलोर शाखेवर लोंढा आणि धारवाड यांमध्यें हें स्टेशन आहे. [ धा गॅ ]

**अळंबें**—हीं एक छत्रीच्या आकारांत उगवणारी वनस्पति आहे. ती उकिरड्यावर सडलेल्या पदार्थांवर, वाळलेल्या शेणावर आणि क्वचित् चांगल्या जमिनीवरहि उगवते. याचीं निरनिराळ्या भाषेंतील नांवें—लॅ. फंगी. इं मश्रूम सं भूछत्र गुज फुग्यू हिंदी—छतोनाछता, सावकी छत्री. बंगाली.-कोडक छता, व्यांगेर छाता. कानडी-आळबि, नाई छत्तरिगे हीं होत. अळंबें दोन प्रकारचें असतें विषारी व गोडें विषारी अळंबें खाल्लें असतां अम्मल चढतो, पोट फुगतें, व वांति होऊन मन अस्वस्थ होतें अळंब्याच्या ८ जाती आहेत. चुब्बे, चितळें, गवतें, कुबळें, कुरटी, तेलंगी, भुयफोड आणि मोभळे चुब्बे हातभर उंच वाढतें व त्याची छत्री लहान असते गवतें फार बारीक असतें. कुरटी अगदीं लहान असतें तेलंगी हें सर्वांत उत्कृष्ट समजलें जातें याची छत्री वीत सव्वा वीत व्यासाची असते. भुयफोड हें वाटोळें असून फुगीर असतें. त्याचें छत्र होत नाहीं. मोभळ्याचे भोंगळ्यासारखे किंचित् टोंकदार फळे असतात.

अळंब्याचें बीं अति सूक्ष्म असून त्याचा कधानेंच नाश होत नाहीं शिजवलें असता शिजत नाहीं कुजत नाहीं. जनावराच्या पोटांतून हें बीं तसेंच बाहेर पडतें. ह्यामुळें शेणावर व उकिरड्यावर हीं झाडें फार उगवतात.

अळंब्याचे फळे औषधाकरितां सुकवून ठेवितात. देवी व गोंवर पोटांत पडूं नये म्हणून हे फळे ऊन पाण्यांत वाटून देतात, तसेंच मूळव्याधीवर व दुसऱ्या रोगावर याचा उपयोग होतो असें म्हणतात.

अळंब्याची भाजी व कोशिंबीर करून शूद्र लोक खातात [ पदे. मोडक—पदार्थ वर्णन ].

**अळशी**—' जवस ' पहा.

**अळसुंदे**—चवळीच्या जातीपैकीं एक वेल. लॅटिनमध्यें ज्याला विग्ना कटजंग म्हणतात त्या वर्गांतील हा आहे. ही एक मोठ्या, लांबट शेंगाची व मोठ्या दाण्याची चवळीची जात असते वेलास दुसऱ्या झाडाचा आधार लागतो. चवळीप्रमाणें जमिनीवरच हे वेल वाढत नाहींत. आधार न दिल्यास तितके उंच होत नाहींत. अळसुंद्याचें पीक बागाईत व ओल राहणाऱ्या शेतांत बिन पाण्यावरहि करतात. पावसाळ्यांत बीं पेरतात व हिवाळ्यांत व उन्हाळ्यांत शेंगा तयार होतात. कोवळ्या शेंगाची भाजी व जून शेंगांतील सोलण्याची व वाळलेले दाणे भिजवून फुगले म्हणजे त्याची उसळ करतात. अळसुंद्याचें बीं चवळीच्या दीड दोनपट मोठें लांबट व तपकिरी रंगाचें असतें. कोंकणांत व बेळगांवाकडे अळसुंदे पिकतात. रत्नागिरी जिल्ह्यांत त्यास वालीच्या शेंगा असेंहि म्हणतात.

**अळू** (तेरें)—यास इंग्रजींत, तेरो, एडोस, फ्रेंच कोको, टॅनिआ, इजिप्शियन ॲरम, हीं नावें असून अरबी, फाच, काची, पंजाब-राब, मुंबईः—अळू, तेरें; तेलगुः—शामापंपा. इत्यादि निरनिराळीं नावें आहेत.

उत्पत्तिस्थानः—हिंदुस्थानांतील उष्ण प्रदेशांत व सिलोन प्रांतांतहि हें होतें. यांची पानें कमळाच्या पानासारखीं असून देंठ लांब असतात. याचा कंद खाण्याच्या उपयोगी पडतो व त्याच्या पानाचीहि भाजी करून खातात. याची लागवड बंगाल, आसाम, मद्रास, राजपुताना, दक्षिण, हिमालयनजीकचा प्रदेश इत्यादि सर्व हिंदुस्थानभर आहे.

या झाडाच्या रानटी व लागवड केलेली अशा दोन जाती आहेत. रानटी अळूचे कंद खात नाहींत, फक्त पानें खातात. रानटी झाडाच्या तीन जाती आढळतात पहिल्या जातीचीं पानें निळसर, दुसरीचीं पानें भुरकट व तिसरीचीं हिरवीं असतात. हीं रानटी जातींचीं झुडुपें उष्ण प्रदेशांतील दलदलीच्या जागेंत होतात.

लागवड केलेल्या जातींत गुरीकाचु व असुकाचु हे दोन प्रकार असून एकाचीं पानें व देंठ हीं हिरवीं, व दुसऱ्याचीं जांभळ्या रंगावर असतात. परंतु या दोघांचे कंद सारखेच असतात. लागवड करण्याच्या वेळीं, त्यांचे कांदे लावतात. गुरीकाचूचे कांदे डिसेंबरमध्यें व असुकाचूचे कांदे फेब्रुवारीमध्यें तयार होतात.

लागवडः—" हीं झाडें वाळुकायुक्त जातींत चांगलीं होतात इतर जमीनींत तीं चांगलीं होत नाहींत याची लागवड गोराडूच्या कंदाप्रमाणेंच करितात. लागवड करतांना देंठासकट कंदाचे डोळे जमिनींत पुरतात. कापून ठेविलेले कंदाचे डोळे, जमिनींत पुरण्यापूर्वी कांहीं दिवस राहिले तरी ते खराब होत नाहींत. त्याचप्रमाणें वाढलेले कंद पक्व होऊन जमिनींत पुष्कळ दिवस राहिले तरी वाईट होत नाहींत.

मुंबई प्रांतांत याची लागवड फारशी नाहीं. परसांत मोरीचें पाणी जमतें अशा ठिकाणीं याचे कंद लावितात. गुजराथेंत विहिरीजवळ याचे वाफे असतात ते १२ फूट लांब ते ६ फूट रुंद या प्रमाणाचे करून त्या प्रत्येकांत सुमारें ४० झाडें लावितात. वाफ्यांना भरपूर खत व पाणी द्यावें लागतें व त्यामधील गवतहि वरचेवर काढावें लागतें. कंद सुमारें १२ इंचाच्या अंतरानें लाविले जातात. सुमारें १० महिन्यांनीं हे कंद तयार होतात. कानपुरामध्यें एका एकरांत सुमारें ५० मण व कोइमतुरमध्यें ६२५० पौंड कांदे तयार होतात.

उपयोग.—याच्या कांद्यांत पुष्कळ पिष्टसत्व( स्टार्च ) असतें. कांदे हा एक महत्त्वाचा पदार्थ आहे त्रावणकोरमध्यें याचे निरनिराळे खाण्याचे प्रकार करतात. न्यू गिनीमध्यें या कांद्यांचें पीठ करून त्याचीं बिस्किटें करितात. हे कांदे बहुधा १ रुपयास १॥मण या भावानें मिळतात.

कांद्याचे देंठ व पानें यांचें भाजी, आमटी, रायतें इत्यादि निरनिराळे प्रकार होतात पिकलेलीं पानें व देंठहि गुरांना चारतात, व त्यापासून गुरें चांगलीं पुष्ट होतात.

रासायनिक गुणधर्म.—या झाडांत एक तिखट व कडवट पदार्थ असतो. झाडाचा रस अंबट असतो व त्याचा उपयोग रक्तस्तंभक म्हणून करितात १८८८ मध्यें पेडलर वार्डननीं या झाडावर प्रयोग करून या विषारी तिखट पदार्थांचा शोध लाविला, व हा विषारी पदार्थ ऑक्सलेट ऑफ लाइम याच्या स्फटिकामुळें त्या झाडांत येतो असें त्यांनीं निश्चित केलें या विषारी पदार्थांचें वीर्य, अंबट पदार्थांच्या सान्निध्यानें बाधक होत नाहीं आणि म्हणूनच या झाडाची भाजी करतांना चिंच अवश्य घालतात नाहीं तर जिभेस खाज सुटते. [ वॅट. ]

अळें—(पुणें जिल्हा)जुन्नरच्या पूर्वेस १६ मैलावर हा एक लहानसा गांव आहे. हा पूर्वी होळकराकडे होता. परंतु पुढें तो त्यांनीं ब्रिटिश सरकाराच्या हवालीं केला. दर शुक्रवारी येथें आठवड्याचा बाजार भरतो. अळें येथील कोळवाडींत दर वर्षी चैत्र शुद्ध एकादशीस म्हसोबाची जत्रा भरते. सुमारें हजार दीड हजार लोक जत्रेस येतात. ज्या रेड्याकडून ज्ञानेश्वर महाराजांनीं वेद बोलविले त्या रेड्यास येथें पुरलें अशी समजूत आहे, येथें त्याची समाधि असून तीवर देऊळ बांधलेलें दाखवितात सभामंडपाचें काम अर्धेच राहिलें आहे.

इ. स. १८२७ मध्यें कॅप्टन क्लून्सनें असें वर्णन केलें आहे कीं, हा गांव त्यावेळीं होळकराकडे असून त्यांत ३०० घरें, चार दुकानें, विहिरी व एक मारुतीचें देऊळ होतें ( मुं. गॅ पु. १८. भाग ३ )

अळेगांव—(वऱ्हाड) जिल्हा अकोला. तालुका बाळापूर. बाळापूरपासून १७ मैलावर निर्गुणा नदीं कांठीं हें खेडेगांव आहे. लोकसंख्या ( १९०१ ) २८४८. या ठिकाणीं इमारतीलांकडाचा व्यापार फार चालत असून आठवड्याचा बाजार दर रविवारी भरतो येथें निर्गुणा नदीकांठीं वाळकेश्वर महाराजांचें आणि गांवकुसामध्यें उत्तरेश्वराचें अशीं दोन देवळें असून मानभाव पंथाचे लोक फार लांबून यात्रेकरता येतात. दर चैत्री पौर्णिमेस आणि कार्तिकी पौर्णिमेस जत्रा भरतात. ( अकोला गॅ. १९१० )

अक्षय्यतृतिया—वैशाख महिन्यांतील शुद्ध तृतीयेस " अक्षय्यतृतीया " नांव पडण्याचें कारण ' मदनरत्न' नामक संस्कृत ग्रंथांत श्रीकृष्णाचे तोंडून धर्मराजास असें सांगितलें आहे कीः—

अस्यां तिथौ क्षयमुपैति हुतं न दत्तं
तेनाक्षयेति कथिता मुनिभिस्तृतीया ॥
उद्दिश्य दैवत पितॄन्क्रियते मनुष्यै-
स्तच्चाक्षयं भवति भारत सर्वमेव ॥

' हे युधिष्ठिरा, या वैशाख शुद्ध तृतीयेस केलेलें हवन किंवा दान चिरकालपर्यंत टिकणारें आहे, आणि म्हणूनच या तिथीस " अक्षय्यतृतीया " म्हणण्यात येते देवता व

पितर ह्यास उद्देशून ह्या तृतीयेस केलेलें सर्व कर्म चिरंतन होतें.

ह्या वैशाख तृतीयेस महत्त्व येण्याचें कारण हा कृतयुगाचा ( कांहींच्या मतें त्रेतायुगाचा ) आरंभ समजला जातो व त्या दृष्टीनें कालविभागाचा कोणताहि प्रारंभदिन नेहमींच भारतीयांच्या दृष्टीनें अत्यंत पवित्र व मंगलकारक मानला गेला आहे. मदनरत्न ग्रंथांत श्रीकृष्णानीं युधिष्ठिरास ह्या दिवसाचें माहात्म्य विस्तरशः सांगितलें आहे

ह्या अक्षय्यतृतीयेचे दिवशीं पवित्र गंगादि नद्यांच्या जलांत स्नान करून श्री विष्ण्वादि देवांची पूजा करावी. त्याच प्रमाणें जप, होम, स्वाध्याय, पितृतर्पण, दान वगैरे गोष्टी ह्या दिवशीं मनुष्यप्राण्यास मंगलकारक आहेत. या दिवशीं युगादि श्राद्ध अपिंडक करावें, श्राद्ध न केलें तर तिलतर्पण तरी करावें असें सांगितलें आहे. देवतापितरांच्या उद्देशानें उदककुंभ दान करावें. ह्याबद्दल अशी कथा येणेंप्रमाणें सांगतात:—

पूर्वी एक निर्धन व्यापारी होऊन गेला. तो मधुर बोलणारा, सत्य वचनी, देवब्राह्मणांचा आदरसत्कार करणारा त्याचप्रमाणें पुण्यकारक अशा संतांच्या कथा ऐकण्याची आवड असलेला होता. दारिद्र्यामुळें तो कुटुंबपोषण करतांना अत्यंत व्याकुळ होई. त्यानें एकदा असें वचन ऐकलें कीं रोहिणी नक्षत्रानें युक्त अशा तृतीयेच्या दिवशीं जर बुधसंयोग होत असेल तर कोणतेंहि पुण्यकर्म करण्यास तो उत्तम पर्वकाल होय, व ह्या समयीं दिवशीं केलेलें पुण्यकर्म चिरंतन होतें. ह्याप्रमाणें ऐकून त्यानें गंगा नदी काठीं जाऊन देवता व पितर ह्यांचें तर्पण केलें व घरीं येऊन थंड पाण्यानें व निरनिराळ्या धान्यांनीं त्याच प्रमाणें नाना प्रकारचीं खाद्यपेयें यांनीं पूर्ण असे कुंभ त्यानें शुद्धांतःकरणानें ही नको नको म्हणत असता योग्य व सत्पात्र अशा वृद्धवृंदास दान केले, व मृत्यूपर्यंत सर्व जगाची नश्वरता लक्षांत घेऊन नेहमीं धर्माचरणीं रत झाला.

*त्यानंतर वासुदेव स्मरण करीत तो मृत झाल्यावर पुढल्या जन्मीं कुशावती नामक नगरीचा तो क्षत्रिय राजा झाला. व त्यानें धर्माचरणानें मिळवलेलें ऐश्वर्य अक्षय झाल्यामुळें अनेक मोटमोठे यज्ञ करून गाई, सुवर्ण आणि मोटमोठ्या दक्षिणा ऋत्विजास दिल्या. त्याचप्रमाणें मुके, आंधळे, पांगळे अशा दीन दुबळ्या मनुष्यांस धन दान करीत त्यानें अनेक प्रकारचें वैभव भोगलें परंतु त्याच्या पुण्यकर्माचा क्षयच झाला नाहीं. भविष्योत्तर पुराणांतहि अक्षयतृतीयामत-कथा आहे.*

*ह्याकरितां अक्षय तृतीयेच्या दिवशीं उन्हापासून प्राणिमात्राचें संरक्षण करणाऱ्या सर्व वस्तू म्हणजे, जोडा, छत्री, गाय, जमीन, सुवर्ण, वस्त्रें वगैरेंचें दान फार श्रेयस्कर होय. अशा रीतीनें ग्रीष्मऋतूंत हितकर असे शीतोदककुंभ* त्यांचें पूजन व दान हा या दिवशींचा विशेष प्रघात आहे.

परशुरामजयंतीचा हाच दिवस होय. जमदग्नि ऋषींना रेणुकेपासून रात्रीच्या प्रथम प्रहरांत परशुरामस्वरूपी परमेश्वराची प्राप्ति झाली. या दिवशीं प्रदोषकाली परशुरामाची पूजा करून अर्घ्य देतात.

हल्लीं अक्षय तृतीया हा दिवस स्त्रियांना फार महत्त्वाचा असतो. चैत्र महिन्यांतील वसंतोत्सवानिमित्त होणारे हळदीकुंकवाचे समारंभ या दिवसापर्यंत करावे असें आहे. तेव्हां हा समारंभ न झाल्यास अखेरच्या दिवशीं करतात तेव्हां सहाजिक गावांत या दिवशीं समारंभाची गर्दी असते.

*अक्षविचलन.*—अंडाकृति पृथ्वीवरील चंद्रसूर्यांच्या *विषम आकर्षणामुळें खगोलीय ध्रुवाचें त्याच्या मध्यम स्थितीसभोंवती जें भ्रमण होतें त्यास अक्षविचलन हें नाव आहे. जेव्हां चंद्र किंवा सूर्य हे भूमध्यरेषेच्या पातळींत असतात तेव्हां ते खगोलीय ध्रुवाच्या दिशेंत बदल करूं शकत नाहींत. या पातळीपासून त्यांचें अंतर जितकें अधिक तितका हा बदल अधिक होतो. याच्या परिणामामुळे जी गति निष्पन्न होते तिचे आपणास दोन भाग करतां येतील, एक मध्यम ध्रुव नामक काल्पनिक बिंदूची—जिला संपातचलन म्हणतात ती क्रमिक व जवळजवळ अविषम गति ( संपातचलन पहा ) व दुसरी जिला अक्षविचलन म्हणतात ती सत्या ध्रुवाची या काल्पनिक ध्रुवाभोंवती चंद्रसूर्यांच्या बदलत जाणाऱ्या क्रान्तीमुळें घडून येणारी परिभ्रमण करण्याची गति. चंद्रपातानें परिभ्रमण व त्याच्या कक्षेचा तिर्यक्पणा या योगानें त्या गोलाच्या क्रान्तींत त्याचा पात विशिष्ट स्थळीं आला असतां इतर ठिकाणच्या पेक्षा बराच अधिक फेरफार होतो. चंद्रपाताचा भ्रमणकाल १८.६ वर्षें आहे. या अवधींत एके काळीं त्याच्या क्रान्तीच्या दाक्षिणोत्तर अंतिममर्यादा २८ अंशाहूनहि अधिक असतात तर चंद्रपात त्याच्या समोरच्या बिंदूत असतांना त्या १८ अंशांहून विशेष अधिक नसतात, अक्षविचलन होण्याचें कारण हेंच असून त्या योगें खगोलीय वास्तविक ध्रुव मध्यम ध्रुवाभोंवती ९"च्या अंतरावरून दीर्घवर्तुळाकार मार्गानें वर्तुळकल्प १८. ६ वर्षांत एक प्रदक्षिणा करतो; तथापि हा ध्रुवाच्या परिभ्रमणाचा मार्ग बरोबर दीर्घवर्तुळ होत नाहीं. सूर्यचंद्रांच्या कक्षा दीर्घवर्तुळाकार असल्यामुळें व त्याच्या परिवर्तनशील क्रान्तीमुळें हा मार्ग वास्तविक दीर्घवर्तुळाच्या किंचित आंतबाहेर जातो.*

अक्षक्षेत्र—अक्षक्षेत्र म्हणजे ज्यांतील एक कोण अक्षांशतुल्य आहे असा काटकोन त्रिकोण. यांतील कर्णरेषेस अक्षकर्ण म्हणतात. सूर्य क्षितिजावर असतां आपण पूर्वबिंदूकडून खगोलाकडे पाहिल्यास त्यांतील वृत्तें आपणांस सरल रेषांप्रमाणें दिसून त्या सरल रेषांचीं

जाण अनेक अक्षक्षेत्रें बनविता येतात याबद्दल विवेचन भास्कराचार्यांनी त्रिप्रश्नाधिकारांत केलें आहे

ज्या वेळी दिवस रात्र सारखी असतात, अर्थात् सूर्य विषुववृत्तावर असतो, त्या दिवशीं सूर्य याम्योत्तरवृत्तावर आला असतां व त्यामुळें नतांश अक्षांशतुल्य असतां द्वादशांगुल शंकूपासून एक अक्षक्षेत्र उत्पन्न होतें हें पुढील आकृतींत ( अमक ) दाखविलें आहे तेव्हां जी भुजरूप दक्षिणोत्तर शंकुछाया पडते तिला पलभा म्हणतात, व या अक्षक्षेत्राच्या कर्णास अक्षकर्ण म्हणतात




अक्षक्षेत्र व पलभा दाखविणारी आकृति

सूर्य थेट पूर्वेस वर्षांतून दोन दिवस काय तो उगवतो, इतर दिवशीं तो पूर्व बिंदूच्या उत्तरेस किंवा दक्षिणेस उगवत असतो याचें क्षितिजावरील उदयस्थान व पूर्व बिंदु यांच्या अंतरांशाच्या भुजज्येस अग्रा म्हणतात सूर्य उन्मंडलावर येतो तेव्हां त्याच्या स्थानापासून क्षितिजाच्या पातळीवर लंब काढिला असतां त्या लंबास उन्मंडलशंकु, व तो शंकु व उदयकालिक स्थान यांमधील अग्राखंडास अग्राग्रखंड म्हणतात, व अग्रेच्या अवशिष्ट भागास अग्रादिखंड म्हणतात सूर्य ज्या वर्तुळांत दैनिक प्रदक्षिणा करितो त्यास अहोरात्रवृत्त म्हणतात त्या वृत्ताचे व विषुववृत्ताचे उन्मंडलामुळें दोन दोन तुल्य विभाग होतात उदयापासून उन्मंडलापर्यंत पोंहोचतांवर सूर्यास अहोरात्रवृत्ताचे जे अंश आक्रमावे लागतात, त्यांच्या त्या वृत्तावरील अर्थात् द्युज्याकर्णीय भुजज्येस कुज्या ( कु म्हणजे पृथ्वी ) किंवा क्षितिज्या म्हणतात, व अहोरात्रवृत्ताच्या व्यासार्धापेक्षा म्हणजे द्युज्येपेक्षा त्रिज्या ज्या मानानें मोठी त्या मानानें कुज्येस रूप दिलें असतां तिलाच चरज्या म्हणतात, व चरज्येच्या चापास चरांश म्हणतात

सूर्य उन्मंडल सोडून वर गेल्यावर व समवृत्तास पोंहोंचण्यापूर्वी त्याचें एखादें स्थान घेऊन त्यापासून क्षितिजाच्या पातळीवर लंब काढिल्यास त्या शंकूच्या व उदयस्थानाच्या मधील सरलरेषात्मक अंतरास ( ही रेषा वाढविली असता समवृत्ताच्या पातळीस लंब रूप असते ) शंकुतल म्हणतात, व अग्रेच्या अवशिष्ट भागास भुज किंवा बाहु म्हणतात ( सूर्य दक्षिणगोलस्थ असल्यास अग्रा व शंकुतल यांच्या योगानें भुज तयार होतो ) सूर्य समवृत्तीं येतांच तत्स्थानापासून क्षितिजाच्या पातळीवर लंब काढिला असतां त्या लंबास समशंकु म्हणतात.




अक्षक्षेत्रें दाखविणारी आकृति

उ ख द अ —याम्योत्तरवृत्त द . म उ —क्षितिजाचा व्यास ध्रु, न – उत्तर व दक्षिण ध्रुव त य —विषुववृत्ताचा व्यास. उ ल —अहोरात्रवृत्ताचा व्यास ध्रु म न —उन्मंडलाची पातळी

म ट —अग्रा (म्हणजे उदयकालिक सूर्याची दिगंश ज्या)

क च —उन्मंडलशंकु म्हणजे उन्मंडलस्थ सूर्यापासून क्षितिजाच्या पातळीवर काढिलेला लंब

अक्षक्षेत्रें

| आकृतींतील वर्ण | भुज. | कोटी. | कर्ण |
|---|---|---|---|
| मपध्रु | पम –लंबज्या | ध्रुप –अक्षज्या | ध्रुम –त्रिज्या |
| मकट | कट कुज्या किंवा क्षितिज्या | मक क्रांतिज्या | मट –अग्रा |
| मडट | मट –अग्रा | मड –समशंकु | टड –तद्धृति |
| मडक | मक क्रांतिज्या | कड –(तद्धृति कुज्या) | डम'–समशंकु |
| मकच | कच –उन्मंडलशंकु | मच –अग्रादिखंड | मक –क्रांतिज्या |
| चकट | चट –अग्राग्रखंड | कच –उन्मंडलशंकु | कट –कुज्या |
| हसट | सट –शंकुतल | हस –शंकु | हट –तद्धृति |

[धीं कृ कोल्हटकर भारतीय ज्योतिर्गणित शं बा दीक्षित–भारतीय ज्योतिःशास्त्र, त्रिप्रश्नाधिकार ]

**अक्षांश** —दोन्ही भ्रुवापासून ९० अंश अंतरावर काढिलेलें महावृत्त जें भूविषुववृत्त त्यापासून स्वस्थळापर्यंत जें गोलीय लंबरूप अंशात्मक अंतर त्यास अक्षांश असें म्हणतात.

अथात् अक्षांश काढण्याची सरळ रीत म्हटली म्हणजे आपल्या स्थळांतून जाणाऱ्या याम्योत्तर वृत्तावरील,

भूविषुववृत्तापासून आपल्या स्थळापर्यंत अंतर योजनात्मक किती आहे हें प्रत्यक्ष मापून काढावें म्हणजेः—

$$\text{अक्षांश} = \frac{\text{इष्टयोजनांतर} \times ३६०}{\text{योजनात्मक भूपरिधि}}$$ असें येतें

अक्षांश काढण्याची रीत.—परंतु या प्रकारच्या प्रत्यक्ष रीतीनें अक्षांश मोजणें अशक्यप्राय असल्यामुळें ते काढण्यासाठीं ज्योतिषमूलक पद्धतींचाच अवलंब करावा लागतो. अक्षांश काढण्याच्या ज्योतिषमूलक पद्धती भारतीय ग्रंथांत पुढें दिल्याप्रमाणें आढळतात

( १ ) चापयंत्रानें किंवा चक्रयंत्रानें आकाशांतील ध्रुव ताऱ्याचे उन्नतांश जितके येतील तितकेच स्थळाचे अक्षांश असतात. हे सुमारें अक्षांश निघतील सूक्ष्मत. पाहिजे असल्यास १२ तासाच्या अंतरानें दोन वेळां वेध घेऊन ध्रुवताऱ्याचे उन्नतांश आणून त्याच्या बेरजेचें अर्ध करावें.

( २ ) तीस घटिकांचें दिनमान व तीस घटिकांचें रात्रिमान असेल त्या दिवशीं ( विषुवदिनीं ) मध्यान्ह कालीं द्वादशांगुल शंकूची छाया किती पडली आहे, हें प्रत्यक्ष मापून काढावें. नंतर १२ त्रिज्येनें तयार केलेल्या स्पर्शरेषेच्या कोष्टकांत तें छायामान पाहिलें असतां अक्षांश येतील कारण ती छाया अक्षांशांची स्पर्शरेखा असते.

( ३ ) यष्टियंत्रानें ध्रुवताऱ्याचा वेध घेऊन यष्ट्यग्रापासून भूमीवर लंब टाकावा आणि त्या लंबाचें माप घ्यावें. नंतर यष्टीएवढ्या त्रिज्येनें एक वर्तुळ काढून त्यांत अंशादिकांच्या खुणा कराव्या; व त्या अंशचिन्हित वर्तुळांत, पूर्वी घेऊन ठेवलेलें लंबाचें माप अर्धज्येप्रमाणें दिलें असतां वृत्त परीधीवर जितके अंश असतील तितके स्वस्थळाचे अक्षांश आहेत असें समजावें.

( ४ ) सूर्य उन्मंडलावर म्हणजे दोन्ही ध्रुव व पूर्व बिंदु यांतून जाणाऱ्या वृत्तावर आला असतां गोलयंत्रानें सूर्याचा वेध घेऊन सूर्य आणि पूर्व बिंदु यांच्यामध्यें उन्मंडलावर जितके अंश असतील तितकी सूर्याची क्रान्ति त्या दिवशीं आहे असें समजेल. क्रान्ति समजल्यावर स्वस्थानीय याम्योत्तर वृत्तावर सूर्य आला असतां चापयंत्रानें किंवा तुर्यंयंत्रानें सूर्याचे नतांश मापावेत येणेंप्रमाणें क्रान्ति व नतांश काढले म्हणजे, सूर्य खगोलीय विषुववृत्त व स्वस्थलाचें याम्योत्तरवृत्त यांच्या दरम्यान असल्यास क्रान्ति व नतांश यांची बेरीज केली असतां, व इतर प्रसंगीं वजाबाकी केली असतां अक्षांश निघतात

( ५ ) रात्रीं कोणत्याहि ताऱ्याचा वेध घेऊन गोलयंत्रानें त्या ताऱ्याची क्रान्ति आणावी. नंतर त्याच ताऱ्याचा वेध याम्योत्तर वृत्तामध्यें घेऊन त्याचे नतांश तुर्यादि यंत्रानें आणावेत. म्हणजे त्या ताऱ्याची क्रान्ति व याम्योत्तर नतांश यावरून मागच्या रीतीप्रमाणें अक्षांश निघतील.

( ६ ) अथवा इष्ट यष्टिरूप त्रिज्येनें समभूमीवर एक वर्तुल काढावें, व त्यांत त्या दिवशींचें सूर्याचें उदयास्त-सूत्र काढावें. नंतर इष्ट कालीं यष्टीनें सूर्याचा वेध घ्यावा. वेधकालीं यष्ट्यग्रापासून समभूमीवर लंब टाकावा तो लंब समभूमीवर ज्या ठिकाणीं लागेल त्या बिंदूपासून उदयास्त सूत्रापर्यंत लंबरूप जें अंतर असेल त्याचें माप घ्यावें मग यष्ट्यग्रापासून समभूमीवर टाकलेला लंब हा भुज आणि उदयास्त सूत्रापर्यंत मापलेलें लंबरूप अंतर कोटि; या भुजकोटीवरून कर्ण काढून त्या कर्णानें एक वर्तुळ काढून तें अंशादि चिन्हित करावें त्या वर्तुळांत कोटिरूप अंतर अर्धज्येप्रमाणें दिलें असतां त्या वृत्तपरिधीवर जितके अंश असतील ते अक्षांश समजले जातील आणि त्याच दिक्चिन्हित वर्तुळांत भुजरूप अंतर अर्धज्येप्रमाणें दिलें असतां वृत्तपरिधीवर जे अंश असतील ते लंबांश येतील. लंबांश ९० अंशांतून वजा करून जे शेष राहतील ते अक्षांश होतात कारण खमध्य व ध्रुव या दोहोंमध्यें जें अंशात्मक अंतर याम्योत्तर वृत्तावर मापलेलें असतें त्यास लंबांश असें म्हणतात. नेहमीं लंबांश व अक्षांश यांची बेरीज ९० अंश असते.

( ७ ) अथवा कोणताहि खस्थ पदार्थ पूर्वापर वृत्तांत असतां त्याची क्रांति व नतांश गोलयंत्रादि साधनांनीं प्रत्यक्ष वेध घेऊन काढावेत. नंतर क्रांतीच्या भुजज्येस नतांशाच्या कोटिज्येनें भागिलें असतां अक्षांशाची भुजज्या येते. तीवरून अक्षांश निघतील.

वरील रीति पुढें दिलेल्या आकृतीनें स्पष्ट होईल

ध्रु ख
पू ग्र
पूर्व क्षितिज
उ द
प
पश्चिम क्षितिज

अक्षांश काढण्याची रीत दाखविणारी-
आकृति.

या आकृतींत उपदप हें क्षितिज, ध्रु हा ध्रुव, ख हा आकाशमध्य आणि पूखप हें पूर्वापरवृत्त असून पूर्वापर वृत्तामध्यें ग्र या ठिकाणीं खस्थपदार्थ आहे. तेव्हां खग्र = नतांश; ग्रध्रु = ध्रुवांतर ( = ९०° क्रांति ) आणि खध्रु हे लंबांश = ९०° अक्षांश—या तीन बाजूंनीं झालेला खग्रध्रु हा त्रिकोण असून त्यांतील ग्रखध्रु

होत जाऊन दक्षिण परमक्रांति सुमारें २४ झाल्यावर पुन्हा वाढत जाईल. दिनमानाची नक्की किंमत काढणें झाल्यास

भुजज्या चर = स्पर्शरेषा क्रांति × स्पर्शरेषा अक्षांश

या सारणीनें चर काढून उत्तर गोलात सूर्य असता

दिनमान = २ × चर + ३० पटिका. आणि दक्षिणगोलार्धात सूर्य असता

दिनमान = ३० घ. २ × चर आणि दिनार्ध = १५घ — चर याप्रमाणें अक्षांशावरून चर काढून दिनमान व रात्रिमान निश्चित करता येतें.

अ क्षां शां चें च ल त्व.—पृथ्वीवरील स्थलांचे अक्षांश विषुववृत्तापासून मोजतात. विषुववृत्ताच्या व्याख्येंत असें सांगितलेलें असतें कीं, विषुववृत्ताची पातळी पृथ्वीच्या आसाशीं लंबरूप असते तेव्हां पृथ्वीचा अक्ष ज्या ठिकाणीं भूपृष्ठाला छेदितो ते बिंदु म्हणजे पार्थिव ध्रुव जर चल असल तर विषुववृत्ताच व त्याबरोबर भौगोलिक स्थळाच्या अक्षांशासहि चलत्व प्राप्त होईल हें उघड आहे. गेल्या शतकाच्या अखेरीस झालेल्या संशोधनानें असें आढळून आलें आहे कीं, पार्थिव उत्तर व दक्षिण ध्रुव हे स्थिर नसून ते कांहीं नियमित काळात सुमारें ५० फूट व्यासाच्या वर्तुळात प्रदक्षिणा करितात, व त्यामुळें भौगोलिक स्थळाच्या अक्षांशात त्यास अनुसरून फेरबदल होत असतात.



ध्रुवांचें चलन दाखविणारी आकृति.

असें होण्याचें कारण पृथ्वीच्या आकृतीचा अक्ष व तिच्या भ्रमणाचा अक्ष हे दोन्ही एक नाहींत हें होय. वरील आकृतींत अ द हा पृथ्वीसारख्या एका चापट अंडगोलाच्या कक या लघुतम अक्षामधून घेतलेल्या कापाचा देखावा आहे असें समजा. आतां या अंडगोलास जर कक या अक्षाभोंवतीच भ्रमण करावयास लावलें, तर तो तसाच कांहींहि फेरबदल न होता अनंत काळपर्यंत फिरत राहील. परंतु तो जर या आकृतीच्या अक्षाऐवजीं त्याच्याशीं समरूप एखदा एखादा सूक्ष्म कोन करणाऱ्या खख या अक्षाभोंवतीं फिरूं लागला तर खख हा भ्रमणाचा अक्ष कक या आकृतीच्या अक्षाभोंवतीं कांहीं नियमित काळांत प्रदक्षिणा करील. ही गोष्ट पुष्कळ्या काळापासूनच अवगत असून या उपपत्त्यनुसार पार्थिव ध्रुवाचा भ्रमणकाल गणितानें ३०५ दिवस निघतो.

परंतु १८९० पर्यंत, अक्षांशात फेरबदल होत असतो असें मानावयास बळकट पुरावा होता तरी, अत्यंत काळजीपूर्वक निरीक्षण व संशोधन करूनहि पार्थिव ध्रुवाचा भ्रमणकाल प्रत्यक्ष सिद्ध करता आला नव्हता. सरते शेवटीं शेंडलर यानें असें दाखविलें कीं, निरीक्षणविषयभूत स्थलाच्या अक्षांशात खरोखरच बदल झाला आहे परंतु त्यावरून निघणारा पार्थिवध्रुवाचा भ्रमणकाल ३०५ दिवस नसून ४२८ दिवस आहे गतिशास्त्राच्या नियमानुसार गणितानें काढलेल्या भ्रमणकालांत व प्रत्यक्षानुगम्य भ्रमणकालात असा फरक का पडतो याचा विचार करता असें दिसून आलें कीं जुन्या गणितात पृथ्वी फिरत असताना तिच्या केंद्रोत्सारी शक्तीमुळें विषुववृत्तावरील फुगीर भागात होणारा फरक विचारात घेतलेला नव्हता. थोड्या विचाराअंतीं असें दिसून येईल कीं, मागील आकृतींत दाखविलेल्या अंडगोलाचें द्रव्य, त्यात थोडासा लवचीकपणा असल्यास तो खख या अक्षाभोंवतीं फिरत असता केंद्रोत्सारी शक्तीमुळें बाणांनीं दाखविलेल्या दिशास सरकत राहून त्याच्या आकारात बदल होईल; व या विकृत अंडगोलाचा अक्ष कक न राहता कक व खख याच्या दरम्यान असलेली ववं अशी एखादी रेषा होईल हाच नियम पृथ्वीसहि लागू आहे. ती पोलादाइतकी थोडी लवचीक आहे असें जरी गृहीत धरलें तरी या लवचीकपणामुळें व महासागराच्या चाचल्यामुळें ध्रुवाचा भ्रमणकाल ४५७ दिवस इतका अधिक वाढेल परंतु केल्व्हिन यानें दुसऱ्याच कांहीं कारणानिमित्त अगोदरच असें दाखविलें होतें कीं पृथ्वीचें काठिण्य पोलादाहूनहि अधिक आहे. तेव्हां ही गोष्ट प्रत्यक्ष निरीक्षणानें अजमासें ४२८ दिवस हा जो ध्रुवाचा भ्रमणकाल आला आहे त्याशीं विसंगत दिसत नाहीं.

एतद्विषयक आमच्या संशोधनाचें फल थोडक्यात येणेंप्रमाणें देता येईल.—( १ ) पृथ्वीच्या आकृतीचा अक्ष व भ्रमणाचा अक्ष हे एक नसून एकमेकांशीं सरासरी ०.१५" चा कोन करतात यामुळें ध्रुवास १४ महिन्यांचा प्रदक्षिणाकाल असलेली वर्तुलाकार गति प्राप्त होते. पृथ्वी जर आहे तशीच तिच्या पृष्ठभागावरील द्रव्यांमध्यें कांहीं हालचाल न होता राहील तर या अक्षभिन्नत्वामुळें एक ध्रुव दुसऱ्या ध्रुवाभोंवतीं ०.१५" ची किंवा अजमासें ११ फुटांची त्रिज्या असलेल्या वर्तुळात सुमारें ४२९ दिवसांत प्रदक्षिणा करील ( या गतीस ज्या गणितज्ञानें ती प्रथम शोधून काढली त्याच्या नावावरून युलेरियन गति असें नांव मिळालें आहे. ) परंतु वातावरणजन्य कांहीं कारणामुळें या गतींत वार्षिक फेरबदल होत असतो ही कारणें स्थितिशास्त्रविषयक व गतिशास्त्रविषयक अशीं दोन प्रकारचीं आहेत.

( २ ) स्थितिशास्त्रविषयक कारण म्हटलें म्हणजे पृथ्वीवर हिमाचे किंवा बर्फाचे थर साचून तिच्या ध्रुवांत फेरबदल होत असतो हें होय उदाहरणार्थ, सैबेरियांत जर बर्फ

माचला तर त्यामुळें पृथ्वीचें विषुववृत्त त्या प्रदेशाच्या किंचित जवळ येईल व तिचा ध्रुव त्यापासून किंचित दूर जाईल. याच्या अगदीं उलट परिणाम अमेरिका खंडात होणाऱ्या बर्फ संचयानें घडून येईल. पण आशिया व अमेरिका या खंडांमध्यें स्थूलमानानें रूपसादृश्य असल्यामुळें बर्फाच्या संचयानें ध्रुवाच्या स्थितींत कळून येण्याइतका फरक होईल असें वाटत नाहीं.

( ३ ) गतिशास्त्रविषयक कारकांमध्यें वातावरणीय व महासागरांतील प्रवाह यांचा समावेश होतो. हे प्रवाह जर नेहमीं ठराविक दिशेनेंच वहात असते तर त्यांचा एवढाच परिणाम झाला असता कीं, युलेरियन वर्तुळाकार गतीचा केंद्र पृथ्वीच्या आकृतीचा मध्यम ध्रुव न होता त्याचाच निकटवर्ती दुसरा एक बिंदु झाला असता. परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, या प्रवाहांत वार्षिक फेरबदल होत असतो. यामुळें ध्रुवाच्या भ्रमणामध्यें देखील त्याला अनुसरून फेरबदल होतो.

पार्थिव ध्रुवाच्या स्थानामध्यें फेरबदल होत असतो ही गोष्ट नक्की ठरली तेव्हां, हा प्रश्न ज्योतिष व भूगोलशास्त्राला महत्त्वाचा असल्यामुळें ठरीव ताऱ्यांचे वेध घेऊन या फेरबदलाचें निरीक्षण करण्याकरितां इटालींत कार्लोफोर्टे, जपानांत मिझुसावा, मेरिलंडमध्यें गैथर्सबर्ग, कॅलिफोर्नियांत उकिया आदिकरून ठिकाणीं वेधशाळा स्थापन करण्यांत आल्या. या सर्व वेधशाळा जवळ जवळ एकाच म्हणजे ३९°८' या अक्षांशावर आहेत

**अक्षोभ्यदीक्षित**—हा ब्राह्मण मध्वमतानुसारी होता. तो सावनूर येथील राहणारा होता. यानें लहानपणींच न्यायशास्त्राचा अभ्यास केला असें सांगतात. यानें मध्वमता-विषयीं पुष्कळ ग्रंथ लिहिले.ते सांप्रत उपलब्ध नाहींत हा मोठा खळवादी असे. तो मावनूर येथें शके १४०० मध्यें मरण पावला असें सांगतात. ( ज. रा. कविचरित्र ).

**अज्ञान.**—अज्ञान म्हणजे ज्ञानाचा अभाव किंवा एखाद्या गोष्टीचें ज्ञान नसणें. नीतिशास्त्र व कायदेशास्त्र यांत याला फार महत्त्व आहे. पण तें अलीकडे प्राप्त झालें आहे. ऐतिहासिक दृष्ट्या हें प्रस्थापित झालें आहे कीं, समाज किंवा सामुदायिक राहणी ही पूर्वस्थिति असून पृथक्–वैयक्तिक राहणी ही नंतरची स्थिति आहे; आणि या प्राथमिक अवस्थेंत एका व्यक्तीच्या अपराधाबद्दल सर्व कुटुंब किंवा समाज जबाबदार धरलें जात असे म्हणजे ज्यांना दोषास्पद कृत्याची कांहींहि माहिती नाहीं अशानांहि शिक्षा भोगावी लागे. अशी स्थिति ग्रीक, रोमन वगैरे सर्व प्राचीन यूरोपीय देशांत आरंभीं आढळते. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत दोषास्पदता व अज्ञान यांचा परस्पर संबंध स्पष्टपणें दाखविण्याचा प्रयत्न साक्रेटीस यानें केला. त्यानें असें तत्त्व प्रतिपादिलें कीं, सद्गुण म्हणजे ज्ञान किंवा दुर्गुण म्हणजे अज्ञान ( व्हर्च्यु इज नॉलेज, अँड व्हाइस इज इग्नरन्स ). ही व्याख्या अतिशयोक्तिपूर्ण आहे, असें पुढें आरिस्टॉटलनें दाखविलें. मनुष्याच्या हातून सत्कृत्य घडण्यास सत्कृत्य म्हणजे काय येवढें ज्ञान असून भागत नाहीं, तर त्याप्रमाणें वागण्याची इच्छाहि असावी लागते. नीतिशास्त्राची प्रगति होत गेल्यावर एका व्यक्तीच्या अपराधाबद्दल सर्व कुटुंबाला शिक्षा करण्याची रीत नष्ट झालीच; व शिवाय जाणून-बुजून दुष्कृत्य केल्यास मनुष्य खरा अपराधी समजावा. अजाणतः म्हणजे अज्ञानानें एखादी गोष्ट हातून झाल्यावर त्याला शिक्षा नसावी असेंहि तत्त्व प्रस्थापित झालें.

कायदेशास्त्रांत या बाबतींत आणखीहि प्रगति झाली. "कायद्याचें अज्ञान क्षम्य नसून परिस्थितीचें अज्ञान क्षम्य आहे." हें तत्व सर्वमान्य झालें आहे. तसेंच अज्ञान ठरवितांना बौद्धिक अपात्रतेकडे लक्ष देतात; आणि अल्पवयी किंवा मेंदू बिघडलेल्या इसमाच्या हातून घडलेला गुन्हा क्षम्य समजतात.

**अ ज्ञा न उ र्फ अ ल्प व यी प णा** ( मायनॉरिटी ).—कायदेशास्त्रात, 'अज्ञानी इसम' म्हणजे वयात न आलेला किंवा अल्पवयी असल्यामुळें ज्याला कायदा बंधनकारक होत नाहीं असा इसम, असा अर्थ आहे मनुष्य वयांत आला असें केव्हां समजावें याबद्दल निरनिराळ्या देशांत निरनिराळा कायदा आढळतो, आणि स्त्री व पुरुष यांची वयांत येण्याची कालमर्यादा निरनिराळी आढळते. या बाबतींत प्राचीन काळांतील कायदा हल्लींच्या कायद्याहून निराळा आहे. हिंदुस्थानांत धर्मभेदामुळें हिंदु, मुसुलमान, पारशी, व ख्रिस्ती असे चार समाजांतील चार प्रकार निरनिराळे आहेत हिंदूंचा प्राचीन कायदा मनुस्मृत्यादि ग्रंथांत नमूद आहे, त्यांत सोळा वर्षे पुरीं होईपर्यंत अज्ञानपणा समजावा असें आहे. हल्लीं हिंदी अज्ञानाचा कायदा ( इंडियन मेजॉरिटी ॲक्ट ) सर्व धर्मीयांना लागू केला असून त्याप्रमाणें सामान्यतः अठरा वर्षे पुरीं होईपर्यंत अज्ञान समजतात. पण जर एकाद्याची ईस्टेट कोर्ट ऑफ वार्डस् किंवा कोर्टानें नेमलेल्या पालकाच्या ( गार्डियन ) ताब्यांत असेल तर एकवीस वर्षे पुरीं झाल्यावर तो कायद्यांत आला असें समजतात. दिवाणी बाबतींत सामान्यतः हा कायदा लागू असला तरी विवाह, विवाहदेणगी, घटस्फोट व दत्तक या चार बाबतींत हिंदूंना जुना कायदाच म्हणजे सोळावर्षे मर्यादेचा लागू आहे व सदरहु चार बाबतींतील सोळाव्या वर्षानंतर केलेले करार बंधनकारक होतात. हिंदुस्थानांतील पारशी व ख्रिस्ती यांना सर्व बाबतींत इंडियन मेजॉरिटी ॲक्ट लागू आहे. मुसुलमानांनाहि सामान्यतः तोच लागू आहे; पण विवाह, विवाहदेणगी, घटस्फोट या बाबतींत स्त्रीला चवदा व पुरुषाला सोळा अशी सज्ञानत्वाची मर्यादा आहे.

यूरोपांतील प्राचीन रोमन कायद्यांत अज्ञानपणाच्या तीन अवस्था होत्या; एक सात वर्षांपर्यंत, दुसरी पुरुषाची चवदा वर्षे व स्त्रीची बारा वर्षांपर्यंत व तिसरी पंचवीस वर्षांपर्यंत.

पहिल्या अवस्थेंतील माणसाला कोणतेहि करारमदार करतां येत नसत, पण दुसऱ्या अवस्थेंत ट्युटर (पालका) च्या संमतीनें करता येत असत हल्लीं इंग्लंडमध्यें सरसकट स्त्री पुरुष सर्वांच्या बाबतींत एकवीस वर्षे पुरीं होईपर्यंत अज्ञानपणा दिवाणी कायद्यांत समजतात. फौजदारी कायद्यांत सात वर्षांपर्यंत पूर्ण अज्ञान समजतात, आणि सात ते चवदा वर्षांपर्यंत गुन्हा करण्याइतकें ज्ञान आहे असें पुराव्यानें सिद्ध करावें लागतें. चवदा वर्षांनंतर मात्र प्रत्येक इसम स्वतःच्या गुन्ह्याबद्दल पूर्ण जबाबदार समजला जातो.

**अज्ञानदास**—शिवकालीन शाहीर. यानें अफझल खानाचा वध या ऐतिहासिक प्रसंगावर दोन पोवाडे रचिले आहेत. हे पोवाडे खुद्द जिजाबाईनें रचण्यास सांगून ते शिवाजीकडून ऐकविले व कवीच्या रचनाचातुर्याबद्दल एक घोडा व एक शेर सोन्याचा तोडा त्यास बक्षिस मिळाला. हे दोन्ही पोवाडे छापून प्रसिद्ध झाले आहेत. (ॲकवर्थ व शालिग्राम कृत पोवाडे). हल्लीं प्रसिद्ध असलेल्या सर्व पोवाड्यांपैकीं अज्ञान (किंवा अग्निन) दासाचा पोवाडा सर्वांत जुना आहे. याची रचना एकतारीवर म्हणता येईल अशी साधी आहे. शिवाय ह्या पोवाड्यांत वर्णिलेल्या प्रसंगानंतर लवकरच रचिलेला व शिवाजी आणि त्याचे मावळे सरदार यांनीं खुद्द ऐकिलेला तेव्हां हा बराच विश्वसनीय म्हणण्यास हरकत नाहीं.

हा पोवाडा वाचून त्यावेळचें चित्र डोळ्यांपुढें चांगलें उभें राहतें. सामदामाचे प्रकार होऊन देखील अफजलखान ऐकत नाहीं असें पाहून शिवाजीनें सर्व निरवानिरव केली. आपलें उत्तरकार्य काशीस व गयेस जाऊन करण्यास ब्राह्मणास सांगितलें, दानें दिलीं, दाढी कमी केली व खानाच्या भेटीस निघताना लोकांनीं 'सिवबा सील करा अंगाला' असें विनविलें तेव्हां चिलखत अंगांत घातलें व

डावे हातीं बिचवा त्याला। वाघनख सरजाच्या पंजाला॥
फिरंग पट्टा जिऊ म्हाल्याप दिला। शिवाजी सरजा बंद सोडुनी चालिला॥

निघताना सर्वांचे मुजरे घेतले:—

माझा रामराम दादानु। गडच्या गडकऱ्या बोलिला॥
यतन भाईनु करा। आमच्या संभाजी राजाला॥

या प्रमाणें सर्व गडकऱ्यांना विनंति केली. तसेंच आईस भेटीस न येण्यास विनंति केली होती, पण जिजाई पुत्रप्रेमानें तें न ऐकता पालखींत बसून धांवत आली. त्यावेळीं

शिवबा बोले जिजाऊमवें। बये वचन माझें ऐकावें।
माझी असोशी खानाला। बये जातो भेटण्याला॥

जिजाबाईनें खान बेईमान आहे. तेव्हां जाऊं नये असें पुष्कळ सांगून पाहिलें, पण शिवाजीचे निर्धाराचे शब्द ऐकून

जिजाऊ बोले महाराजाला। शिवबा युद्धीनें काम करावें।
उसनें संभाजीचें घ्यावें॥ जिजाऊ घेती अलाबला।
शिवबा चढती दौलत तुला। घे यशाचा विडा।
शिवबा स्मरे महादेवाला॥ गळा घातली मिठी।
मातेच्या चरणाशीं लागला॥ ध्यानीं आठवूनी-
भगवंताला। शिवाजीराजा सदरे गेला॥

या पुढें अफजलखानाची भेट व वध हा प्रकार विदितच आहे.

या पोवाड्यावरून दुसरें असें कळतें कीं, शिवाजीच्या ताब्यांत त्यावेळीं ४०–५० किल्ले होते. 'महाराज', छत्रपति हीं उपपदें त्याच्या नावाला लाविलीं जात असत. 'शिवाजीच्या तळ्यांत पाणी पिती सर्व जीवु' या वर्णनावरून त्याचें लोकप्रिय राज्य व्यक्त होतें. याखेरीज महाराष्ट्राची तत्कालीन परिस्थिति, खानाचा सरंजाम व स्वारी इत्यादि गोष्टींवर प्रकाश पडतो

[संदर्भ ग्रंथ.—मराठी रियासत, पूर्वार्ध महाराष्ट्रसारस्वत. ॲकवर्थ व शालिग्राम यांनीं प्रसिद्ध केलेले पोवाडे.]

**अज्ञानसिद्धनागेश**—यानीं आपल्या ग्रंथांत नागनाथ हे आपल्या गुरूचें नाव म्हणून दिलें आहे व हें स्वतःचें नाव नुसतें अज्ञान असें देतात यांनीं अविंध भाषेंत पंचीकरण प्रमेय रचिलें आहे. यावरून याचा काल १४००चा सुमार येतो. वरद नागेश व हे एकच असें वाटतें. ग्रंथ—कालज्ञान, पंचीकरण प्रमेय हे आहेत. (सं. क का सू.)

**अज्ञेयवाद** (ॲग्नॉस्टिसिझम)—आपणाला जें वास्तविक ज्ञान होतें तें इंद्रियांस गोचर होणाऱ्या वस्तूंचेंच होतें. ईश्वर, अमरत्व या गोष्टी इंद्रियांच्या म्हणजे प्रत्यक्षाच्या कक्षेपलीकडील असल्यानें त्यासंबंधीं निश्चित मत देण्यास आपणास आधार नाहीं असें इ. स. १८६९ सालीं हक्सलेनें प्रतिपादन केलें, यासच अज्ञेयवाद असें म्हणतात. हक्सलेनें इ. स १८६० मध्यें चार्लस किंग्स्ले यास लिहिलेल्या पत्रांत हें मत सविस्तरपणें मांडलें आहे. त्यांत हक्सलेनें या शब्दाच्या उत्पत्तीबद्दल पुढील विवेचन केलें आहे. तो म्हणतो जेव्हां माझी बुद्धि प्रगल्भ झाली व मी स्वतःला असा प्रश्न विचारूं लागलों कीं आपण नास्तिक, आस्तिक किंवा सर्वेश्वरवादी आहों, किंवा जडवादी, अथवा कल्पनावादी आहों, ख्रिस्तीमताचे आहों कीं स्वतंत्र विचाराचे आहों, तेव्हां मला असें आढळून आलें कीं मी जों जों अधिक ज्ञान मिळवावें व अधिक विचार करावा तों तों या प्रश्नाचें उत्तर देणें मला अधिकाधिक कठिण वाटूं लागावें सरतेशेवटीं मला वरीलपैकीं शेवटच्या विशेषणाखेरीज कोणतेंहि विशेषण बरोबर लागू पडत नाहीं असें मला दिसून आलें ज्या 'एका' गोष्टीबद्दल वरीलपैकीं बहुतेकांचें ऐकमत्य होतें त्याच एका गोष्टींत माझा त्याच्याशीं मतभेद आहे. त्याची अशी खात्री असे कीं, त्यांना कांहीं एक निश्चित ज्ञान (नॉसिस)

झालें आहे व या विश्वोत्पत्तीच्या प्रश्नाचा त्यांनी समाधानकारक उलगडा केला आहे परंतु मला या प्रश्नाचें उत्तर सांपडलें नाहीं, व हा प्रश्न सुटणेंहि अशक्य आहे अशी माझी पूर्ण खात्री होती, आणि ह्यूम व कांट हे माझ्याच बाजूचे असल्यामुळें वरील मत प्रतिपादन करणें धाष्टर्याचें आहे असेंहि मला वाटत नव्हतें. माझी मनःस्थिति अशा प्रकारची असताना मला, मी संस्था सध्या बंद पडून परेच दिवस झाले आहेत पण जिची स्मृति अद्यापि ताजी आहे अशा, " आधिभौतिकमंडळ " ( मेटॅफिजिकल सोसायटी ) या संस्थेचा सभासद होण्याचा लाभ मिळाला. या संस्थेमध्यें सर्व तऱ्हेच्या तात्विक व ईश्वरविषयक मताच्या लोकांचा समावेश होत असे. व जो तो आपलीं मतें अगदीं मोकळ्या मनानें प्रतिपादीत असे. तत्कालीन सर्व तत्त्ववेत्ते व माझे सहाध्यायी कोणत्यातरी विशिष्ट मताचे पुरस्कर्ते होते व आपल्या नांवाला कोणतेंच विशिष्टमत जोडता येत नाहीं याबद्दल मला शेपटी तुटलेल्या कोल्ह्याप्रमाणें वैषम्य वाटत असे. तेव्हा मी आपल्या मताला ' अॅग्नॉस्टिक ' म्हणजे अज्ञेयवादी हें अन्वर्थक नाव दिलें हें नाव ख्रिस्तीसंप्रदायाच्या इतिहासातील " नॉस्टिक " या संप्रदायास प्रतियोगी शब्द म्हणून माझ्या डोळ्यापुढें आलें. कारण ज्याबद्दल मला काहीं ज्ञान नव्हतें त्या गोष्टीबद्दल सर्व ज्ञान असल्याची प्रौढी हे नॉस्टिकवादी लोक मिरवीत असत. अर्थात् मीहि एका वादाचा पुरस्कर्ता आहे असें दाखविण्याकरिता व आपल्या शेपटीचें प्रदर्शन करण्याकरिता लवकरच मीहि आपली कल्पना आपल्या मंडळ्यापुढें सादर केली व सांगण्यास समाधान वाटतें कीं तो शब्दहि रूढ झाला. आणि जेव्हा स्पेक्टेटरनें या कल्पनेचा पुरस्कार केला. तेव्हा या कल्पनेचा जनक कोण आहे हें ठाऊक झाल्यामुळें काहीं लोकांच्या मनात जो संशय उत्पन्न झाला असेल तोहि नाहींसा झाला.

" अॅग्नॉस्टिक " याचा मुख्य अर्थ अज्ञानी असा आहे तथापि अज्ञानी हा शब्द अधिक विनयदर्शक आहे. हक्सलेचा अभिप्रेत अर्थ मी अज्ञानी आहे, एवढाच नसून कांहीं विषय ज्ञानक्षेत्रापलीकडचे म्हणजे अज्ञेय आहेत असा होता. यामुळें या शब्दास महाराष्ट्रांत अज्ञेयवादी हा प्रतिशब्द योजला गेला. स्पेन्सरनें ज्ञेय विषय आणि अज्ञेयविषय यांचें औपपत्तिक विवेचन आपल्या "सिंथेटिक फिलासफी " च्या पहिल्या खंडांत केल्यामुळें अज्ञेयवादी या शब्दास अधिक निश्चित अर्थ उत्पन्न झाला. सर्व प्रचलित मतांत अनेक गोष्टींबद्दल अस्तिपक्षी अथवा नास्तिपक्षी विधानें असत पण हक्सलेच्या मतांत कांहीं गोष्टींचें अज्ञेयत्व प्रामुख्यानें पुढें मांडलें होतें म्हणून या मतास त्यानें अज्ञेयवाद हें नांव ठेवलें. हटननें स्पेक्टेटरमध्यें या शब्दाचा उपयोग केलेला आढळतो व ख्रिस्ती सांप्रदायिक मतांवरील अविश्वासदर्शक म्हणूनहि या शब्दाचा उपयोग केलेला आढळतो. तथापि हटननें जें अज्ञेयवादाचें स्वरूप वर्णन केलें आहे तें हक्सलेच्या मतांशीं जुळणार नाहीं. हक्सलेचें म्हणणें असें होतें कीं ईश्वर, मरणोत्तर स्थिति वगैरे गोष्टींवर विश्वास ठेवण्यास कांहीं तरी आधार पाहिजे पुराव्याशिवाय असल्या गोष्टींवर विश्वास ठेवतां येत नाहीं. व तसा पुरावा मिळणें अशक्य आहे असें त्यास वाटत होतें व ईश्वर वगैरे सारख्या गोष्टींवर विश्वास ठेवण्यास पुरेसा व शास्त्रीय दृष्ट्या ग्राह्य असा पुरावा मिळणें अशक्य आहे हा अज्ञेयवादाचा आधारभूत सिद्धान्त आहे. कांहीं सुशिक्षित मंडळींस अर्थात् वादग्रस्त प्रश्नाचा निकाल पुढें टाकण्यास ही युक्ति पसंत पडली. यास आधुनिक भौतिक शास्त्रीय सिद्धांत परिचित असून पूर्वीच्या केवळ विधानात्मक वादविवाद पद्धतीचा कंटाळा असे. व हक्स्लेसारख्या प्रसिद्ध भौतिकशास्त्रज्ञानें या वादाची मांडणी केली असल्यामुळें एकंदर आध्यात्मिक ज्ञानक्षेत्रावर त्याचा फार महत्त्वाचा परिणाम झाला. कांहीं कालानें जवळ जवळ सर्व संशयवादास हें टोपणनाव पडलें. धर्मोपदेशक या दोन वादाचा निरीश्वर वादाशीं संबंध जोडूं लागले. जरी या दोन वादाचीं क्षेत्रें आता निश्चित ठरलीं असलीं तरी अज्ञेयवादास अद्यापहि निरीश्वरवाद असेंच कांहीं लोक समजतात. आधुनिक शास्त्रीय शोध बायबलमधील 'उत्पत्ति'कथनाच्या विरुद्ध असल्यामुळें धर्मोपदेशक यास पाखंडी समजत. तथापि विकासवादाच्या उद्घाटनानें ख्रिस्ती धर्मशास्त्रातहि एक नवीन दृष्टि शिरली. व पारमार्थिक सम्प्रदायांनीं उपदिष्ट तत्वें व शास्त्र यामधील वादास निराळेंच वळण लागलें. स्पेन्सरच्या तत्वज्ञानपद्धतीविरुद्ध झालेल्या चळवळीचा परिणामहि झाला.

अज्ञेयवाद म्हणजे संशयाची कबुली होय यांत शंका नाहीं. संशयग्रस्त स्थितींत व्यक्तीचें कर्तव्य काय? ईश्वर परलोक, आत्म्याचें अविनाशित्व या गोष्टी सिद्ध झाल्या नाहींत हें खरें, पण नाहींत असेंहि सिद्ध झालें नाहीं. ज्या वस्तूंचें खरें स्वरूप अज्ञेय आहे त्याचे दृश्य परिणाम ज्ञेय असतात हें अज्ञेयवाद्यासहि कबूल आहे अशा वेळेस सश्रद्धानें काय करावें हा प्रश्न उपस्थित होतोच. सश्रद्ध असें म्हणणार कीं अध्यात्मिक बाबतींत जेथें प्रत्यक्ष पुरावा मिळत नाहीं तेथें श्रद्धेनें कोणत्याहि गोष्टीचें समर्थन करूं नये हें म्हणणेंहि सर्वस्वी रास्त नाहीं सामान्य मनुष्यास ईश्वराचें अस्तित्व, मरणोत्तर स्थिति, यासारख्या प्रश्नांसंबंधींचीं आपलीं मतें कांहीं विशेष कारण नसतां अनिश्चित किंवा संदिग्ध ठेवणें अनीतिकारक व त्याचें मनःस्वास्थ्यनाशक किंवा असमाधानजनक आहे. हक्सलेनें जीव, मोक्षाची आशा या गोष्टींवर विश्वास ठेवण्यास योग्य असा पुरावा पाहिजे म्हणून जें आव्हान केलें आहे त्याला उत्तर देणें शक्य आहे. जीवाचें 'अमरत्व' हें 'शक्तिनिलयत्व' व 'प्रकृतीचें अविनाशित्व'

यांच्या निम्म्यानेंहि विलक्षण वाटण्याचें कारण नाहीं व या सिद्धांतामध्येंहि 'विचाराची अंतिम सीमा' असें तरी कां समजावें? सेश्वरवादी आणि निरीश्वर वादी यांतील तडजोडीची वृत्ति अज्ञेयवाद असेल पण तेवढ्यानें त्यास अंतिमता येत नाहीं भौतिक शास्त्रविशारद्यांपैकी कांहीं शास्त्रांतील नियम अधिक सत्य व अंतिम आहेत असें भासवितात पण ते तसे अंतिम नसतात पदार्थविज्ञान अगर रसायनशास्त्राच्या पद्धतीनें विशिष्ट देवतेसंबंधीं खुलासा करता आला नाहीं तरी ईश्वर हें तत्व अमान्य केल्यास त्याचा एकंदर ज्ञानक्षेत्रावर परिणाम होणार नाहीं असें नाहीं. कांहीं अध्यात्मिक घटनांचा भौतिक शास्त्रांतील ज्ञानोत्पादक साधनानीं उलगडा होत नाहीं म्हणूनच हीं दोन्ही ज्ञानक्षेत्रें अलग समजण्यांत येतात. व ज्याप्रमाणें शास्त्रज्ञ हे ज्ञानोत्पादनाकरितां भौतिक मार्गावर अवलंबून राहतात त्याप्रमाणेंच संत, साधु, वगैरे आध्यात्मिक ज्ञानक्षेत्रांत वावरणारे लोक नैतिक व आत्मिक अनुभवावर अवलंबून राहिल्यास त्यात आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं.

अज्ञेयवादास शास्त्रीय व ईश्वरविषयक विचारपद्धतींचा अंतिम विकास असल्याचें श्रेय दिल्यावा व तें श्रेय नाकबूल केल्यावाहि उद्देश धर येऊन गेलाच आहे. आपणास आता हें पाहिलें पाहिजे कीं, मानवी विचारांचें संक्रमण कोणकोणत्या स्थितींतून होत होत हा वाद अस्तित्वांत आला.

अज्ञेयवाद हे शब्द जरी अलीकडेसच प्रचारांत येऊं लागले आहे। तरी अज्ञेयवादामध्यें जी मानसिक प्रवृत्ति गृहीत धरली जाते ती प्रवृत्ति प्राचीन कालापासून आहे. सॉक्रेटीसपासून स्पेन्सरपर्यंत अनेक तत्ववेत्त्यांमध्यें ही प्रवृत्ति आहे हें आपणांस पाश्चात्य वैचारिक इतिहासाचे ज्ञाते सांगतील तो सर्व विकास येथें देण्याचें कारण नाहीं. प्रत्येक संस्कृतीच्या इतिहासामध्यें ज्याप्रमाणें निरीश्वरवादी होऊन गेले त्याप्रमाणें संशयवादी देखील होऊन गेले आहेत, आणि आपल्याकडे हा वाद अनेक पद्धतींनीं व निरनिराळ्या मांडणींत दृग्गोचर होत आहे. जगद्विकासाचें शास्त्रीय स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न वारंवार होतो व आपल्याकडे झाला आहे तो पूर्वींच्या स्पष्टीकरणाविषयीं संशय वाटल्याशिवाय कसा झाला! प्रकृति व पुरुष यांच्या एकमेकांवरील परिणामांनीं जगाचें स्पष्टीकरण करणें वगैरेसारखे प्रयत्न आरण्यकीय किंवा तत्पूर्व कालापासून झाले आहेत. या सांख्य प्रयत्नास कोट मारता तत्ववेत्ता शास्त्रीय तर्क मान्य म्हणेल की नाहीं, किंवा तो त्यास आधिभौतिक म्हणजे मेटॅफिजिकल म्हणेल याविषयीं शंका आहे. तथापि एवढें मात्र त्याबरोबर मानलें पाहिजे कीं, विश्वस्पर्शीमानाच्या अत्यंत व्यापक प्रश्नाच्या स्पष्टीकरणाचा प्रयत्न केल्याखेरीज बहुं सांगतात त्यांच्या प्रयत्नफलास प्रकृतिपुरुषस्पष्टीकरणापेक्षा अधिक शास्त्रीय किंवा कमी आधिभौतिक स्पष्टीकरण करण्यांचें यश आलें नाहीं. अज्ञेयवादाचा जवळ जवळ विचार सर्व प्रकारच्या संस्कृतींत उत्पन्न होत होता यांत शंका नाहीं आणि शास्त्रीय शब्दजालाकडे दुर्लक्ष करणाऱ्या अत्यंत सामान्य मनुष्याला अज्ञेयवाद हा सेश्वरवाद आणि निरीश्वरवाद यांच्या मधला मार्ग वाटतो हें म्हणणें अज्ञेयवादाच्या पुरस्कर्त्यांनी जरी अत्यन्त आग्रहपूर्वक नाकारलें तरी आमहीं अज्ञेयवादाच्या बाहेरच्या वर्गांस तें नाकारणें पटेलसें वाटत नाहीं.

पारमार्थिक व्यवहारात किफायत करणारे अनेक वर्ग समाजात असतात आणि ते जुन्या देवविषयक कल्पनांचें समाजावर वजन कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत असतात जेव्हां ईश्वरस्वरूपविषयक विचार सुरू होतो तेव्हां प्रश्न सोडविणाराकडून नवीन मतें उत्पन्न होऊन उपासनापद्धतींत देखील फरक होऊं लागतो. संशयवाद, ब्रह्मवाद, प्रकृतिपुरुषवाद इत्यादि व्यापक विचारांनीं पारमार्थिक व्यापारावर परिणाम कसकसा होत गेला हें पाहणें हा एक मनोरंजक समाजशास्त्रीय अभ्यास होईल. यूरोपीय पारमार्थिक इतिहासांत व्यापक ईश्वरकल्पना, व संशयवाद हीं गेलीं तीनचारशें वर्षे परिणाम करीत आहेत तर हिंदुस्थानामध्यें ती क्रिया बुद्धपूर्वकालींच झाल्याचें दिसत आहे. आणि त्यावेळच्या विचारविकासाचा परिणाम श्रौतस्मार्त धर्मावर झाला एवढेंच नव्हे तर त्यावेळेस जे जैन आणि बौद्ध संप्रदाय अस्तित्वात आले त्यासहि आपल्या आध्यात्मिक पद्धती त्या संशयग्रस्त स्थितीशीं जुळत्या करून घ्याव्या लागल्या. ऋग्वेदकालीन विचार क्षेत्रांत "कस्मै देवाय हविषा विधेम" (ऋग्वेद. १०.१२१) या तऱ्हेचा चोक्सपणा सुरू झाला व तो प्राचीन भारतीयांच्या वाङ्मयांत एक निराळें वाङ्मय तयार करून बसला.

संशयवादाचें स्वरूप आपल्या वैचारिक इतिहासांत अनेक ठिकाणीं दिसून येईल; त्याचा सविस्तर इतिहास न देता निरनिराळ्या काळाचे व्यक्त केलेले विचार मांडले म्हणजे संशयवादाचें समाजात सातत्य होतें असें दिसून येईल.

सांख्यांचा प्रयत्न सर्व विश्वाचें भौतिक स्पष्टीकरण करण्याचा होता व विश्व हें सत्वरजतम या तीन गुणांच्या मिश्रणापासून व प्रकृतिपुरुषाच्या अन्योन्य क्रियांनी उत्पन्न झालें अशा प्रकारचें मत ते देऊं लागत.

कणसंयुतीनें सर्व जग झालें असें सर्व जगाचें स्पष्टीकरण करण्याचा कणादाचा प्रयत्न होता. उत्तरकालीन वैशेषिकांनीं ईश्वराचें अस्तित्व जरी उघडपणें त्यागिलें नाहीं तरी तो विचारांत न घेण्याचा विषय होय असें ठरविलें. सर्व गोष्टींस कालादिक साधारण कारणें आहेत त्याप्रमाणें ईश्वरहि आहे, त्याविषयीं आपणांस कारणमीमांसेत विचार करण्याचें कारण नाहीं असें त्यांनीं ठरवून टाकलें

जगाचें दैवी स्पष्टीकरण म्हणजे ईश्वरानें सर्व कांहीं केलें असें मानणें होय. हें स्पष्टीकरण दिसतांना सोपें दिसतें पण हें जर कोणी आपणास सांगूं लागले तरी कदाचित

दिसते ती अशी जगांत कार्यकारणसंबंध दिसतो व अनेक क्रियांचे नियम दिसूं लागतात. असें झालें म्हणजे ईश्वर कांहीं तरी नियम लावून देणारा आहे, आणि ते नियम कार्य करीत आहेत, अशी कल्पना उत्पन्न होते. नियम लावून देणारा ईश्वर असतो कोठें, तो सर्गाच्या प्रारंभी होता असें धरलें तर, ज्या जागेंत तो किंवा सर्व विश्व वसविलें गेलें ती जागा कोणी केली, अगर ती जागाच स्वयंभू होती काय, आणि असल्यास ती ईश्वरापेक्षा मोठी नाहीं काय, अशा तऱ्हेचा वाद सुरू होतो. अशा प्रसंगीं शास्त्रीय बुद्धि तरी कुंठित होते, किंवा श्रद्धा तरी कमी होते, म्हणून या दोहोंची संगति कशी तरी लावली पाहिजे. वैशेषिकांनीं ईश्वरास साधारण कारणांत घालून विज्ञानविकासास ईश्वरकल्पना कमी उपद्रवी करण्याचा प्रयत्न केला. व पारमार्थिकांनीं निरपेक्ष भक्तीचा महिमा गाइला. सर्व जग कार्यकारणसंबंधांनीं जखडलें गेलें आहे, ईश्वरी नियम कार्य करीत आहेत, तर ईश्वरभक्ति निरपेक्ष पाहिजे, अशी मांडणी स्वाभाविकच होय.

वैशेषिकांनीं " अज्ञेय " विषयांच्या अस्तित्वाची जाणीव उत्तम दाखवून आपली संज्ञापद्धतीहि बरीच सुधारली. सृष्टींतील अनेक भावांचें अनंतत्व अमर्यादत्व व एकंदरींत अज्ञेयत्व याची जाणीव त्यांना एकंदर पदार्थांचें वर्गीकरण व नामकरण करतांनाच भासून आली, आणि अत्यंत व्यापक आणि अनंत अशा द्रव्य, गुण, अभाव अशा गोष्टींना नांव तरी काय द्यावें, कारण बरेच शब्द अव्यापक ठरणार, असें त्यास वाटून त्यांनीं "पदार्थ " म्हणजे 'शब्दाचे विषय', असें नाव ठेवलें.

आज अज्ञेय म्हणून ज्या गोष्टी वर्णिल्या आहेत त्यांचें वर्णन करण्यास भाषाशास्त्र आणि शब्दसंपत्ति यांचा अपुरेपणा प्राचीनांस वारंवार भासत होता. आणि त्या अपुरेपणाची जाणीव सुशिक्षित काव्यांत त्याप्रमाणेंच शास्त्रीय ग्रंथांत भासून येत आहे. ईश्वराचें वर्णन करावयाचें तें " नेति " " नेति " असें सांगून करावयाचें, असा विचार वारंवार दिसतो. ईश्वराचें स्वरूप जर अज्ञेय आहे तर तो खूप तरी कसा होतो, आणि त्यास खूष करण्याच्या पूजा वगैरे यंत्रांचे प्रयोजन तरी काय, असा प्रश्न उत्पन्न होऊन त्याचा एकंदर पारमार्थिक पद्धतीवर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. सर्गाविषयीं व्यापक व स्वतंत्र विचार आणि जुना पारमार्थिक विचार या दोहोंच्या मनुष्यकर्तव्यविषयक भिन्न अपेक्षा होत्या. त्या भिन्न अपेक्षांची तडजोड ज्ञानमार्गानें केली आणि सुशिक्षितास कर्में नकोत, अशिक्षितास पाहिजेत असें सांगून सुशिक्षितांचा परंपरागत ईश्वर कल्पनेशीं विरोध कमी केला. येणेंप्रमाणें व्यापक विचाराचा परिणाम पारमार्थिक शास्त्रावर प्राचीन भारतीयांत झाला.

अज्ञेयवादाची झांक आपणास बौद्धसंप्रदायामध्यें बुद्ध व अजातशत्रु यांच्या संवादांत, व ब्रह्मजालसुत्तांत पहावयास सांपडते. अजातशत्रूनें " श्रामण्याचें फळ काय ? " असा प्रश्न केला असतां बुद्धानें कांहीं ऐहिक लाभ दाखवून शेवटीं अर्हत्पद व निर्वाणप्राप्ति हीं अंतिम फलें सांगितलीं आहेत. ब्रह्मजालसुत्तांत विश्वाचें अस्तित्व, अनंतत्व, अथवा नश्वरत्व, इत्यादि प्रश्नांबद्दल बुद्धानें सरळ उत्तर न देतां या गोष्टींच्या ज्ञानापासून कांहीं फायदा नाहीं असें सांगितलें आहे. बुद्ध या गोष्टी मला ठाऊक नाहींत, असें स्पष्ट उत्तर देत नाहीं. बुद्ध सर्वज्ञ होता अशी सर्व बौद्धांची समजूत आहे, आणि त्या समजुतीशीं सुसंगत असें बुद्धानें या प्रश्नाचें उत्तर कां दिलें नाहीं हें वाचकानें शोधून काढावयास पाहिजे असा, बौद्ध ग्रंथाचा आग्रह आहे. बुद्ध एका ठिकाणीं आपण स्वतः या सृष्टिनियमाशीं विसंगत नसून हे सृष्टिनियमच आपणाशीं विसंगत आहेत असें म्हणतो. एके ठिकाणीं मतभेद व वादविवाद हीं फार वाईट असल्यामुळें व भिक्षूनें या विग्रहापासून दूर रहावें हें इष्ट असल्यामुळें भिक्षूनें कोणतेंहि मत प्रदर्शित करूं नये असें त्यानें म्हटलें आहे. बौद्धांचा कर्मांवर व मरणोत्तर स्थितीवर विश्वास होता व निर्वाण ही आत्यंतिक सुखाची स्थिति असून ती नास्तित्वापासून भिन्न मानीत असत. निर्वाणाबद्दल बौद्धांमध्यें कांहीं तरी निश्चित कल्पना होती

सामान्य सुखाची कल्पना म्हणजे केवळ दुःखाचा नाश, हीच होती, पण निर्वाण म्हणजे प्रत्यक्ष व आत्यंतिक सुख समजलें जात असे, आणि ती स्थिति अर्हत्स्थितीपेक्षा भिन्न असली पाहिजे, कारण अर्हताच्या अर्हत्स्थितीचा मरणाबरोबर अंत होतो असें म्हणत. अर्हताला त्याच्या कर्मांचें फळ भोगावें लागतच असे

बुद्ध निर्वाणाबद्दल प्रश्नास उत्तर देण्याचें कां टाळतो ? तो सोफिस्टाप्रमाणें पळवाट काढून जात नाहीं. त्याला स्वतःला याबद्दल ज्ञान नव्हतें व आपल्या शिष्यांनीं या गोष्टीबद्दल अज्ञानांत रहावें अशीहि त्याची इच्छा नव्हती, पण तो अवश्यक व अनवश्यक ज्ञानामध्यें भेद करतो व शिष्यांनीं विश्व, पूर्वजन्म अथवा भविष्यत् जन्म, निर्वाण याबद्दल विचार करण्यांत व कल्पना करण्यांत व्यर्थ काळ घालवूं नये, अशी त्याची सूत्रमयांत इच्छा दिसते. अर्हत्पदाची प्राप्तीच जर सर्व इच्छा व विचार नष्ट केल्यानें होते, तर अर्हत्च्या जीवितक्रमाबद्दल बुद्धाला माहिती कोणती देतां येईल ? तसेंच निर्वाणाबद्दलच्या अनवश्यक जिज्ञासेला तरी बुद्ध उत्तर द्यावयाचें नाकारतो याचें कारण या निर्वाणस्थितीची व्याख्याच करणें अशक्य होय, " या गोष्टींचें ज्ञान फक्त तथागतालाच असतें तथागतच हें सर्व जाणतो आम्ही कांहीं जाणत नाहीं " असें बोधिसत्त्वभूमीमध्यें म्हटलें आहे

अज्ञेयवादी या नामाभिधानाचें गेल्या पिढींत जरी बरेच स्वागत झालें तरी या पिढींत त्यावर आक्षेप पुष्कळ निघतात. कित्येकांचा आक्षेप असा आहे कीं, केवळ दुर्बल मनानें

नास्तिक आपणास अज्ञेयवादी म्हणवितात स्पेन्सरचा अज्ञेयवाद आणि हक्स्लेनें ज्या अर्थानें अँग्नास्टिसिझम् हा शब्द वापरला तो अर्थ यात फरक आहे. हक्स्लेनें मनस्थिति वर्णिली आहे तर स्पेन्सरनें शास्त्रस्थिति वर्णिली आहे.

कोणते विषय शास्त्रक्षेत्राबाहेर आहेत हें स्पेन्सरनें सांगितलें त्यास अज्ञेयवाद असें म्हणणें योग्य नाहीं का की, यात स्पेन्सरचा हेतु शास्त्र आणि इतर विचारसमुच्चय यात भेद करण्याचा होता. आणि यामुळे या विषयावरील स्पेन्सरीय विवेचन हा शास्त्रीय ज्ञानाचा भाग आहे असें म्हणता येईल. स्पेन्सरीय विवेचनाचा गोषवारा येथें थोडक्यात दिल्यास तो वाचकास स्वीकार करण्याजोगी सेवा आम्ही करीत आहों असें वाटतें म्हणून स्पेन्सरीय विवेचन येथें देतों.

स्पेन्सरनें प्रथम पारमार्थिक प्रयत्न आणि शास्त्र यातील भेद पुढें मांडला आहे पारमार्थिक विचारपद्धति तपासतांना त्यात अनेक सादृश्यें दिसून येतात. तें सादृश्य पाहिलें म्हणजे अनेक ठिकाणीं जीं मतें उत्पन्न झालीं तीं कांहीं तरी मुळाशीं सत्य असल्याशिवाय उत्पन्न झालीं काय असा विचार मनात येतो. शास्त्र अनुभवजन्य आहेत शास्त्र म्हणजे सामान्य प्रकारचेंच पण अधिक पद्धतशीर बनविलेलें आणि अनुमानपद्धतीनें बरेंचसें विस्तारलेलें ज्ञान होय. शास्त्र जर अनुभवावर रचलेलें आहे आणि पारमार्थिक कल्पनांच्या मुळाशीं जर कांहीं अनुभव आहे तर परमार्थसाधनें म्हणून प्रचलित झालेल्या पद्धति आणि शास्त्रें यांत विरोध का असावा? अनुभवमूलक ज्ञानामध्यें दोन परस्परविरुद्ध अशा गोष्टी दोन्हीं सत्य म्हणून म्हटल्यास तें बरोबर होईल काय? जर अनुभवमूलक ज्ञानामध्यें परस्परविरुद्ध सिद्धांत फार दिवस टिकूं शकत नाहीत, तर शास्त्र आणि पारमार्थिक विचार यामध्यें परस्परविरुद्धता कां असावी असा प्रश्न उपस्थित करून स्पेन्सरनें पुढें यात परस्पर क्षेत्रभिन्नता आहे असें दाखविलें आहे.

पारमार्थिक संप्रदायांतील अतिशय निष्कर्षात्मक सिद्धांत किंवा अंतिम सत्य व शास्त्रांतील अतिशय निष्कर्षात्मक सिद्धांत यांमध्यें तात्त्विक एकवाक्यताच असली पाहिजे व हें तत्त्व मनुष्याच्या ज्ञानाचें आद्य गृहीत कृत्य समजलें पाहिजे.

सामान्य कल्पनाविषयीं असा नियम आहे कीं, ज्या पदार्थाची ती कल्पना असते त्याचे सर्व गुण एकसमयावच्छेदानें त्या कल्पनेंत व्यक्त व्हावे तरच ती कल्पना पूर्ण अशी गणना येईल. असें न झाल्यास व पदार्थाच्या गुणांपैकीं फक्त कांहीं भाग कल्पनेंत उतरल्यास ती कल्पना फक्त चिन्ह अथवा लिंग या स्वरूपाची होते. अशा चिन्हांचाहि प्रत्यक्ष वस्तूंविषयीं अनुमानें करण्यास उपयोग होतो तेव्हां त्यानें समर्थन करता येतें. परंतु अप्रत्यक्ष रीतीनें किंवा अनेक अनुमानांच्या द्वारेंहि चिन्हांवरून प्रत्यक्ष पदार्थांविषयीं कांहीं ज्ञान किंवा त्याचें निश्चित स्वरूप व्यक्त होत नाहीं, तेव्हां तीं चिन्हें निवळ काल्पनिक आहेत असें समजावें. विश्वाविषयींच्या सर्व उपपत्तींना हाच नियम लागू पडतो. विश्वाविषयीं तात्त्विक दृष्ट्या तीन कल्पना करतां येतील. पहिली अशी कीं, तें स्वतःसिद्ध आहे दुसरी अशी कीं, तें स्वयंनिर्मित आहे. तिसरी अशी कीं बाह्य अशा एखाद्या शक्तीनें तें निर्माण केलें या तीनहि उपपत्ती अशा आहेत कीं यांच्या स्पष्ट कल्पना विचारात आणणें शक्य नाहीं परस्परविरुद्ध कल्पनांचें ऐक्य जबरदस्तीनें केल्याशिवाय विश्वाविषयींची कल्पना ठरतच नाहीं स्वतःसिद्धत्व मानल्यानें भूतकाळीं अनादि अशा काळाची अमर्याद गणना करावी लागते, पण ही कल्पना व तिचे आनुषंगिक अवयव हे अशक्य आहेत. त्यामुळें विश्वाचें स्वतःसिद्धत्व मानण्याचा जितका अधिक प्रयत्न करावा तितका तो विफलीभूत होऊन तर्कविरुद्ध कल्पनांचें एक जाळेंच तयार होतें.

विश्वाच्या स्थितिविषयीं विचार केला असतां त्याच आपत्ती दुसऱ्या स्वरूपात दिसून येतात जगांतील बाह्यवस्तु व मानसिक भावना या दोहोंचें आदिकारण असलें पाहिजे असें मानणें विचारदृष्ट्या प्राप्त होतें. परंतु आदिकारण अनंत आणि अनपेक्ष व स्वतंत्र असें मानण्यात परस्परविरुद्ध कल्पना किती येतात हें मॅन्सेलच्या एका ग्रंथात दाखविलें आहे. " अशा तऱ्हेची अनंत व स्वतंत्र शक्ति मानण्यास अनेक तर्कशास्त्रविरुद्ध कल्पना कराव्या लागतात व नाहीं असें मानल्यानेंहि तशाच आपत्ती येतात. ही शक्ति एक आहे असें मानणें यांत विसंगत कल्पना एकत्र होतात, अनेक मानल्यासहि विसंगत कल्पना टळत नाहींत. ती शक्ति पुरुषस्वरूपाची आहे असें मानणें व नाहीं असें मानणें हीं दोनहि तार्किक दृष्ट्या आपत्तिपूर्ण आहेत ती शक्ति अथवा ईश्वर कर्ता असें मानणें व अकर्ता असें मानणें दोनहि विसंगत कल्पनांस कारणीभूत होतात. सर्व दृश्य वस्तूंचा समुच्चय म्हणजेच ईश्वर असें मानणें कठिण आहे. व त्याचा एक भाग असें मानणें हेंहि असंबद्ध आहे.

एवंच आदिकारण हें काय आहे व कोणत्या स्वरूपाचें आहे हें गूढ आहे. सर्व धर्मांमध्यें अनेक भिन्न सिद्धांत असले तरी ईश्वराच्या अज्ञेयतासंबंधानें त्यांचें ऐकमत्य आहे.

हें गूढ उकलण्याचे जे प्रयत्न त्यांनी केलेले आहेत ते मात्र तर्कशास्त्रास पटत नाहींत. त्यावरून हें आत्यंतिक गूढ आहे असा निश्चय होतो. हा जो सिद्धांत याच्याच आधारावर धर्म व आधिभौतिक शास्त्र यामधील विरोध मिटवून त्यांची एकवाक्यता केली पाहिजे.

दिक् आणि काळ हीं काय आहेत याविषयींहि दोन प्रसिद्ध उपपत्ति दिसून येतात. एक अशी आहे कीं, दोनहि बाह्य सृष्टींत असणारीं स्वतंत्र, मनाच्या अस्तित्वावर अवलंबून नसणारीं अशीं द्रव्यें अथवा पदार्थ आहेत. दुसरीच्या

उपरोक्तप्रमाणें हीं दोन मतावर आधारभूत अशीं मानसिक व अंतरदृश्यें आहेत. परंतु हे दोन पदार्थ मानण्यांत विरोधी कल्पना कराव्या लागतात व पदार्थांचे धर्म अथवा भावस्वरूप व पदार्थ मानण्यातहि आपत्ति येनात त्यांचें अस्तित्व मानावें लागतें परंतु इतर पदार्थ हे ज्ञान झालें असतां जी परिस्थिति असते ती परिस्थिति यांच्या ज्ञानासंबंधी नसते. त्यांचें अस्तित्व मनावर अवलंबून आहे, असें म्हणण्यानेंहि अडचणी कमी होत नाहींच एवंच हे दोनहि पदार्थ अज्ञेय आहेत असें मानणें भाग आहे

त्याचप्रमाणें द्रव्याविषयीं वाद उत्पन्न होतो द्रव्य हें अनंत विभाज्य आहे किंवा नाहीं दोनच पक्ष संभवतात. द्रव्य हें विभाज्य आहे असें मानलें तर या गोष्टीची कल्पना करता येत नाहीं.कारण प्रत्यक्ष अनंत विभाग करण्यास अनंत काल पाहिजे जर द्रव्य अनंत विभाज्य न मानलें तर त्याचे कांहीं भाग झाल्यानंतर त्याचा विभाग होणार नाहीं, असा मानावें लागतें परंतु हेंहि तर्कास पटत नाहीं व त्याची कल्पनाहि बरोबर करता येत नाहीं यावरून द्रव्य अज्ञेय आहे असें म्हणावें लागतें.

गति ही कल्पनाहि परस्परविरुद्ध कल्पनांची जनक आहे. दिक्‌च्या शिवाय गति कशी असेल याची कल्पना करता येत नाहीं तथापि निरपेक्ष गति मानली म्हणजे दिक्‌च्या अतीत अशीच गति मानली पाहिजे त्याचप्रमाणें गति व स्थिरता यामधील संक्रमण कसें होतें, त्याचें कल्पनेपुढें चित्र काढता येत नाहीं. गतीचें एका पदार्थापासून दुसऱ्या पदार्थांत गमन कसें होतें त्याचीही कल्पना करता येत नाहीं दिक्‌ द्रव्य व स्थिरता याच्या आनुषंगानें गतीचा विचार केला असताहि तिचें पूर्ण ज्ञान होत नाहीं. अशा रीतीनें वैरोधिक कल्पनामध्यें आपण घोटाळून जातों त्याचप्रमाणें शक्तीविषयीं असेच विरोधात्मक पदार्थ नजरेस येनात शक्तिहि आमच्या भावनेनें ज्ञेय असल्यामुळें ती भावनात्मक आहे अथवा ती एक स्वतंत्र वस्तु आहे हें सांगता येत नाहीं.

मानसिक क्षेत्रातहि असेच विरोध उत्पन्न होतात. मनातील विचारांची परंपरा ही अनंत आहे किंवा मर्यादित आहे ? दोनहि कल्पना स्पष्ट रीतीनें मनात ठरत नाहीत. त्याचप्रमाणे मन अथवा आत्मा ही काय वस्तु आहे हें आपणास सांगतां येत नाहीं. यावरून असा सिद्धांत निघतो कीं, शास्त्रातील अंतिम कल्पना या अज्ञेय अशा वस्तूच्या निदर्शक आहेत. ज्या वस्तूंचें विशदीकरण शास्त्रांत आपण करतों त्याच्या पलीकडे अगम्य अशा वस्तू अथवा शक्ती आहेत, हें शास्त्राचा खोल अभ्यास केल्यास दिसून येतें.

ज्ञान जसजसें वाढतें तसतसें कमी व्यापक सिद्धांत अधिक व्यापक सिद्धांतामध्यें अंतर्गत केले जातात. असें करता करतां शेवटीं असा एक सिद्धांत निघतो कीं, त्याची उपपत्ति लावणें शक्य नसतें कारण कोठें तरी विश्राम हा ठेवलाच पाहिजे यावरून शवटीं अंतिम सिद्धांत हा अगम्य व अनुपपन्न असा असलाच पाहिजे त्याचप्रमाणें आदिकारण अथवा ईश्वर ज्ञेय होण्याकरितां ज्ञानाच्या इतर पदार्थांप्रमाणें कोणत्या तरी प्रकारची ज्ञेयता पाहिजे. परंतु हा प्रकार इतर ज्ञेयांच्या प्रकाराहून निराळा पाहिजे; कारण कार्याकार्यांत जो संबंध असतो तो आदिकारण व कार्य यांत असूं शकणार नाहीं परंतु अद्वितीय अशा प्रकारचें ज्ञान शक्य नाहीं व अद्वितीय नाहीं असें मानल्यास अनेक आदिकारणें मानावीं लागतील. अनेक मानल्यास त्यांच्याशिवाय निराळें कारण त्यांच्या उत्पत्तीकरितां अशक्य आहे व तें आदिकरण होऊन बसेल त्याचप्रमाणें अनेक अशीं निरपेक्ष व स्वतंत्र आदिकारण अथवा ईश्वर मानल्यास त्याचें निरपेक्षत्व जाऊन ते सापेक्ष होईल नामजात्यादि विशिष्ट अशा कोणत्याहि पदार्थाच्या वर्गांत न आल्यानें व दुसऱ्या नामजातिरहित अशा ईश्वराशींहि वर्गीकरण शक्य नसल्यानें अशा ईश्वराचें ज्ञान होणें शक्य नाहीं. कारण प्रत्येक ज्ञानास भेदाभेद,नामजाति संबंध ह्याची आवश्यकता असते

ज्ञान हें पदार्थांमधील संबंधानुसार मानसिक कल्पनामध्यें संबंध करण्यानें होतें, व अधिक क्लिष्ट संबंध असल्यास अधिक क्लिष्ट कल्पना कराव्या लागतात अशा रीतीनें ज्ञानाचें सापेक्षत्व स्पष्ट आहे असें असल्यानें कोणत्याहि विचारात संबंधाशिवाय इतर कांहीं व्यक्त होत नाहीं जीवनाच्या बुडाशीं गेलें तरी हेंच तत्त्व दृग्गोचर होतें

ज्ञान हें सापेक्ष आहे व खऱ्या वस्तू आपणास त्याज्य असतात ज्ञातवस्तूंच्या पलीकडे आपणास जाता येईल कीं काय, हा प्रश्न आता सोडविला पाहिजे सापेक्ष ज्ञानाच्या पलीकडे कांहीं तरी असावें असें आपणास वाटतें. व बुद्धीचा स्वभावच असा आहे कीं, खरे पदार्थ आपणास दृश्य होतात, असें तिला वाटत असतें

अनेक बदल झाले व ज्ञानाच्या नामजाती बदलल्या तरीहि याच्या अतीत असें कांहीं वस्तुतत्त्व—आपल्या विचाराहून स्वतंत्र व विकारहीन असें आहे यात संशय नाहीं तथापि अशा स्वतंत्र व निरपेक्ष वस्तूविषयीं स्पष्ट कल्पना अथवा चित्र आपल्या मनात येणें हें मानसशास्त्राच्या व तर्कशास्त्राच्या नियमाविरुद्ध आहे परंतु ह्या वस्तुतत्त्वाच्या सत्याविषयीं आपली श्रद्धा व ह्या कल्पनेचें स्थिरत्व हीं दोनहि, तें सत्य आपल्या बुद्धीस तरी ग्राह्य आहे यांचीं निदर्शक आहेत.

आपलें सर्व ज्ञान सापेक्ष आहे, त्यामुळें सापेक्ष नाहीं असें स्वतंत्र तत्त्व मानल्याशिवाय सापेक्ष हेंच निरपेक्ष व स्वतंत्र ब्रह्म होऊन बसेल, अर्थात स्वतंत्र असें ब्रह्म मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं

मनातील प्रत्येक दृश्य हें एका अनंत व अज्ञेय अशा शक्तीचें आविष्करण आहे, असें आपणास मानावें लागतें. व या सिद्धांतात शास्त्र व धर्म या दोहोंचा मिलाफ होतो. सर्व धर्मांमध्यें आपल्या ज्ञानास अगम्य, अनंत, व मूलभूत अशा तत्त्वाचा उल्लेख केलेला आहे. धर्मांत कितीहि दोष असले, व चुकीचीं तत्त्वें असलीं तरी हें तत्त्व प्रतिपादन करण्यांत, त्यांनीं आपली सर्व शक्ति खर्च केली आहे. व ह्याच तत्त्वामध्यें अनेक धर्मांची एकवाक्यता होते. याशिवाय जीं कर्में, उपासना व साम्प्रदायिक अवडंबर आहे तें सर्व धर्मांचा क्षणभंगुर भाग आहे, व तो भाग हलके हलके शास्त्राच्या प्रगतीपुढें संकुचित होत चालला आहे.

शिवाय सृष्टिनियमांची संख्या कमी होत होत असेरीस एकाच नियमाखालीं सर्व विश्वांतील नियम आणण्यापर्यंत शास्त्राची मजल आली, म्हणजे धर्मांतील तत्त्व जें अगम्य व अनंत ईश्वर या नावानें आपण ओळखतों, तेंच शास्त्राच्या मुळाशीं आहे असें स्पष्ट होतें. अशा रीतीनें शास्त्र धर्माला पुष्टि आणतें. शास्त्राचा दोष एवढाच आहे कीं, अतिशय खोल न जातां पुष्कळ वेळा तें वरवर विचार करून सामान्य सृष्टिनियमावरच संतुष्ट रहातें, व यामुळें त्याचा व धर्माचा आजपर्यंत अनेक वेळा बेबनाव झाला आहे.

अर्धवट प्रगतीच्या अवस्थेंत या दोहोंचा असलेला विरोध दोघांचें खोल पाण्यात अवगाहन झाल्याबरोबर नाहींसा झाला व जसजसें शास्त्र पूर्णतेला गेलें तसतसें धर्माच्या मायतत्त्वाचें महत्त्व, त्यास कळूं लागलें व दोघांच्या पूर्ण अवस्थेंत त्यांचें पूर्ण तादात्म्य झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

कांहींचें मत असें आहे कीं, जरी ईश्वर इत्यादि अंतिम तत्त्वें निर्गुण व निराकार आहेत, तथापि कांहीं तरी गुण त्याच्यावर लादल्याशिवाय त्याचा आपणास विचार करतां येत नाहीं, परंतु असें म्हणणें ठीक नाहीं. आपल्या बुद्धीस जें वाटतें तें मानणें हेंच आपलें कर्तव्य आहे. बुद्धीस अगम्य अशी वस्तु गम्य आहे असें ओढूनताणून म्हणण्यांत काय तात्पर्य आहे ! कांहीं तरी विचाराचें स्वरूप ईश्वरास असलेंच पाहिजे कारण त्याशिवाय ईश्वराविषयीं मनन करतां येणार नाहीं; परंतु हें स्वरूप अस्पष्ट आहे, हें नेहमीं लक्षांत ठेवावें. जसजसा आपण ईश्वराविषयीं जास्त विचार करतों तसें तसें त्याच्या स्वरूपाविषयीं केलेल्या कल्पना व चिन्हें यांचा त्याग करावा लागतो, यावरून त्याचें अगाधत्व व 'नेतिनेति' स्वरूप सिद्ध होतें. उपाधियुक्त अशा बुद्धीस उपाधिविरहित अशा ईश्वराचें ज्ञान होण्यास कठिण पडतें, याचें कारण त्या दोहोंमधील जमीनअस्मानाचें अंतर हें होय.

यावर सामान्य लोक असा आक्षेप घेतात कीं, असल्या अस्पष्ट व अंधुक व आकाररहित ईश्वरावर विश्वास ठेवणें अशक्य आहे अशा कल्पनांनी नीति व मनुष्याच्या मनांतील मूलभूत भावना दुर्बळ होतात, अशी त्याची कल्पना आहे; परंतु यास एकच उत्तर आहे. हजारों वर्षे पुरुषस्वरूप अथवा आकारयुक्त अथवा अतिशय स्पष्ट चित्रांनीं दर्शित केलेल्या ईश्वराची उपासना केल्यामुळें त्यांना कांहीं दिवस अज्ञेय अशा तत्त्वावर विश्वास ठेवणें जड जाईल

राजकीय बाबतींत जसे कांहीं लोक एकसत्ताक राज्यपद्धतीशिवाय दुसऱ्या पद्धतीस प्रतिकूल असतात त्याप्रमाणें धर्मांतहि प्राथमिक अवस्थेंतील लोक अशा दुर्बळ व अस्पष्ट ईश्वरावर विश्वास ठेवण्यास तयार होत नाहींत. परंतु संस्कृति पूर्ण झाल्यावर त्यांना ह्याच विश्वास जास्त पटेल हें निर्विवाद आहे

एवंच, अनेक धर्मांत भेद असले तरी मूलभूत तत्त्व जें ईश्वर तें सर्वांत सामान्य आहे. हें तत्त्व ज्या प्रत्यक्ष व मूर्त अशा स्वरूपात निरनिराळ्या धर्मांत दाखविलें जातें, तीं स्वरूपें तत्वतः चांगलीं नसून तात्पुरतीं असतात. अनेक धर्म त्या त्या समाजाच्या अवस्थेमध्यें जी संस्कृति असते तिला अनुसरून असतात व त्यापासून त्या समाजांचा फायदा होतो याकरितां कोणत्याहि धर्माची निंदा करणें श्रेयस्कर नाहीं.

परंतु प्रचलित धर्म व धर्मकल्पना तात्पुरत्या फायदेशीर आहेत म्हणून त्या बदलूं नयेत असें मात्र नाहीं. कारण संस्कृति व ज्ञान वृद्धिंगत झाल्यानंतर पूर्वींचे धर्म बदलून त्यांजागीं नवीन येणें हेंच योग्य आहे. त्यामुळें प्रत्येकानें आपापल्या शक्तीनें नवीन कल्पनेचा अंगिकार केला पाहिजे. पुराणमतवादीयांची हेटाळणी करूं नये. परंतु प्रागतिक व सुधारक मतांचीहि पुराणमतवाद्यांनीं भीति बाळगूं नये. दोहोंच्या मिश्रणानेंच हलके हलके नवीन परिस्थितीशीं तादात्म्य करून समाजाची सुव्यवस्थित प्रगति सिद्ध होते.

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## आ



**आ. अर्थनिश्चय**—१ वर्णमालेंतील दुसरें अक्षर. शब्दांना हा उपसर्ग लागला असता त्याचा (संस्कृतांत) अर्थः (१) अपचय: जसें -ओष्णम् ( = जरा उष्ण, आ आणि उष्ण पासून ) ( २ ) विस्तारः जसें आभोग ( = पर्याप्ति आ आणि भोग = सुख ). ( ३ ) उपक्रमविषयक मर्यादाः जसें आसमुद्रात ( समुद्रापासून ), आजन्मतः ( जन्मल्यापासून ). ( ४. ) समाप्तिविषयक मर्यादाः जसें आफलोदय ( फल मिळेपर्यंत ), आसमुद्र ( समुद्रापर्यंत ) ( ५ ) अंतर्भूत करणारी मर्यादाः जसें आक्रमण ( पूर्ण संचार ), आसकलात् ब्रह्म ( सर्व वस्तूंचा समावेश ब्रह्मात होतो ). ( ६ ) अतिरिक्त शब्द म्हणून: जसें आभास, आघ्राण, आघात, आल्हाद. याचा अर्थ भास, घ्राण, घात, व ल्हाद हाच होतो. ( ७ ) हा उपसर्ग शब्दार्थ व विनियोग विस्तृत करितो, संकुचित करतो, उलट करितो, नाहींतर बदलून टाकतो, जसें आग्रह ( आ आणि ग्रह = घेणें यापासून )—एकदा घेतल्यावर ( मत किंवा कार्य ) कायम ठेवणें, आचार ( आ आणि चर = चालणें पासून )—चालणें ( धर्माप्रमाणें ), आगमन ( आ आणि गमन = जाणें पासून )—येणें, आमोद ( आ आणि मोद = आनंद )—सुवास, आकृति ( आ आणि कृति = कृत्य )—रूप.

२ आकारादि अक्षर उच्चारतेवेळीं किंवा पदार्थ खातेवेळीं मुखाचा जो प्रसृत आकार होतो त्यास आ असें म्हणतात, जसें आ करणें —पसरणें —वासणें

३ एखादी गोष्ट ऐकिली नसल्यास किंवा ऐकिली नाहीं असें दाखवावयाचें असल्यास ती पुन्हा सांगण्याचा इशारा देण्याकरितां म्हणून जो तोंडातून आवाज निघतो त्याचा आ असा उच्चार होतो

**अक्षराकृतिविकास.**—आ या स्वराच्या चिन्हाच्या विकाससंबंधांत लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे इतर स्वराच्या स्वतंत्र व व्यंजनसंयोगी चिन्हास निरनिराळीं रूपें असतांना आ या स्वराच्या बाबतींत मात्र इतर अक्षराप्रमाणें अ या स्वराक्षरासच आ या स्वराचें व्यंजनसंयोगी चिन्ह लावून तें अक्षर लिहिण्याची अगदीं पूर्वापारपासून वहिवाट आहे अर्थात् आ या अक्षराचा विकास म्हणजे अ या अक्षराचा विकास अधिक आ या स्वराच्या व्यंजनसंयोगी चिन्हाचा विकास होय यापैकीं पहिला विकासक्रम अ या सदराखालीं अगोदर येऊन गेला असल्यामुळें फक्त दुसऱ्याच विकासक्रमाचा येथें विचार करावयाचा आहे. नागरी लिपीच्या जुन्यांत जुन्या उपलब्ध लेखांत म्हणजे खि. पू. तिसऱ्या शतकांतील अशोकाच्या लेखांत आ या स्वराचें व्यंजनसंयोगी चिन्ह हें व्यंजनाक्षराच्या उजव्या बाजूस सामान्यतः डोक्याशीं पण क्वचित् मध्यावरहि, काढलेली एक लहान आडवी रेषा होती या स्वराच्या सदरहू चिन्हांत फरक करावयाची गरज भासण्यास कुत्यत्वें करून ज या अक्षराचें रूप कारण झालें असावें असें दिसतें. कारण या अक्षरास उजव्या अंगास खालीं, वर व मध्यें या तीनहि ठिकाणीं आडव्या रेषा असल्यामुळें आ या स्वराचें चिन्ह जोडतांना स्पष्टपणासाठीं आडवी रेषा वर किंवा खालीं मुरडण्यांत येऊं लागली. ज या अक्षरासंबंधांतील अडचण ज्या ज्या अक्षराच्या रूपांत उजव्या बाजूस आडवी रेषा होती त्यांना कमी अधिक प्रमाणांत लागू होती. म्हणून उपर्युक्त मुरडलेलें चिन्ह इतर व्यंजनाच्या बाबतींतहि उपयोगांत येऊं लागलें परंतु वर मुरडलेल्या चिन्हाचें इकाराच्या चिन्हाशीं सादृश्य असल्यामुळें शेवटीं खालीं मुरडलेलें चिन्हच प्रचारांत येऊन त्याचा पुढें विकास होऊन आकाराचा हल्लींचा काना तयार झाला खि पू दुसऱ्या शतकांतल्या प्राचीन भट्टिप्रोलूच्या लेखांत व्यंजनास जोडलेलें आकाराचें चिन्ह अगदीं नियमानें खालीं मुरडलेलें सांपडतें हा एक अपवाद सोडून दिला तर आकाराचें वर मुरडलेलें चिन्ह खि. पू पहिल्या शतकाच्या सुमारास ( मथुरेचा महाक्षत्रप शोडसच्या वेळचा जैन लेख पहा ) आणि खालीं मुरडलेलें चिन्ह इसवी सनाच्या दुसऱ्या शतकाच्या सुमारास ( गिरनारच्या शिलेवरील रुद्रदाम्याचा व अमरावतीचा लेख पहा ) प्रथम दृष्टीस पडतें चौथ्या शतकांतील पल्लववंशी शिवस्कंदवर्म्याच्या दानपत्रांत तर या खालीं मुरडलेल्या चिन्हाचा सररहा उपयोग केलेला आढळतो. तथापि आ या स्वराक्षरास व त्याच्या व्यंजनसंयोगी चिन्हास हल्लींच्या सारखें स्पष्ट रूप दहाव्या शतकापर्यंत आलेलें दिसत नाहीं ( छिंदवंशी लल्लचा देवलचा लेख पहा ). प्राचीन काळच्या कांहीं लेखांत आ बनविण्याकरितां अ या अक्षरास हल्लींच्या उकारासारखेंहि चिन्ह जोडलेलें सांपडतें.

[ मोल्स्वर्थ व कँडी—मराठी इंग्रजी कोश, वा. शि. आपटे —संस्कृत इंग्रजी कोश, ओझा—भारतीय प्राचीनलिपिमाला ].

**आकडिया**— काठेवाडमधील बाब्रा ठाण्यांतील एक स्वतंत्र संस्थान. हें बाब्राच्या ईशान्येस सुमारें २० मैलांवर व भदलीच्या उत्तरेस सुमारें ४ मैलांवर केरी नदीच्या उत्तर तीरीं वसलेलें आहे. येथील मालिया ( जमीनदार ) चावडा रजपूत वंशातले असून सबंध काठेवाड द्वीपकल्पांत हें एकच स्वतंत्र चावडा संस्थान आहे

स्टॅटिस्टिक्सचा इतिहास द्यावयाचा म्हणजे दोन प्रकारचा इतिहास द्यावयाचा एक संस्थानविषयक ज्ञानाचा, आणि दुसरा आकडेपद्धतीचा. संस्थानविषयक ज्ञानात आकडपद्धति शिरून व क्रमानें आकडेपद्धतीसच " संस्थानविषयक ज्ञान " (स्टॅटिस्टिक्स) हें नाव कसें मिळालें या क्रियेचा इतिहास द्यावयाचा आहे.

आ क डे शा स्त्रा ची पू र्व पी ठि का —राज्यकारभारात ज्या गोष्टींचें ज्ञान अवश्य असेल तें परिमाणात्मक करण्यासाठीं आकडे गोळा करण्याचें ज्ञान प्राचीन काळापासून प्रचारात आहे रोमन लोकाना आपल्या राज्याच्या संरक्षणसाधनांची बरोबर माहिती मिळवावयाची होती म्हणून त्यानीं नियमित रीतीनें शिरोगणति घेतली होती असें दिसतें. परंतु राज्यव्यवस्थेखेरीज इतर विषयाच्या ज्ञानासाठीं प्रयत्न, आणि उपलब्ध असलेल्या माहितीचा पद्धतशीर उपयोग करण्याची रीति हीं, गेल्या तीन शतकातच प्रचारात आली. जॉन ग्रॅन्ट नामक अंकशास्त्रज्ञानें एक ग्रंथ लिहिला आहे (लंडन १६६६) परंतु तो जॉन ग्रॅंटनें लिहिला नसून सर विल्यम पेटि (१६८७) यानीं लिहिला असें काहीं लोकाचें म्हणणें आहे परंतु पेटीची तो ग्रंथ लिहिण्याची योग्यताच नव्हती. सर विल्यम पेटि याची एवढी मोठी विद्वत्ता होती कीं त्यानें समुद्रातील मासे मोजण्याची कल्पना काढली आहे सध्याचे कार्नेल युनिव्हर्सिटीचे डीन हल् यानीं "पेटीच्या" साम्र ग्रंथाची आवृत्ति काढली आहे, तींत ग्रॅंटचा ग्रंथहि छापला आहे, पण तो ग्रॅंटनेंच लिहिला असावा असा त्यानीं अभिप्राय दिला आहे.

सं स्था न वि ष य क शा स्त्रा ची पू र्व पी ठि का — फ्रॅन्सेस्को सॅन्सो व्हिनो यानें देशवर्णनात्मक परंतु आकड्याशिवाय असलेलें " डेलगोवेर्नो ए ॲमिनिस्ट्रेझिओनी डि डायव्हर्सि रेनि ए रेपब्लिक " हें पुस्तक १५८३त प्रसिद्ध झालें अशा प्रकारचीं पुस्तकें १६ व्या शतकाच्या शेवटीं इटाली व फ्रान्समध्यें प्रसिद्ध झालीं सतराव्या शतकाच्या पहिल्या अर्धांत राज्यकारभार व आयव्ययशास्त्र ह्या विषयावरील ग्रंथात अंकाची योजना करण्याची प्रवृत्ति जास्त प्रचारात आली. वर्णनशास्त्राच्या इतिहासातील दोन थोर नावें म्हटलीं म्हणजे कॉनरिंग (१६०६–१६८१) व आकेन्वाल (१७१९–१७७२) हीं होत. " स्टॅटिस्टिक्स " या शब्दाचा उपयोग प्रथमतः श्री आकेन्वाल यानें केला असें सामान्येंकरून मानिलें जातें.

ज र्म नीं ती ल शा स्त्र स्व रू पा त रा चा इ ति हा स — "स्टॅटिस्टिक्स" या शब्दाचा त्याच्या अर्वाचीन अर्थी उपयोग जे. पी. सुसामिल्च ह्याचें पुस्तक इ. स १७६१ सालीं प्रसिद्ध झाल्यावरच झाला सुसमिल्च हा प्रशियातील एक परमार्थमार्गोपदेशक होता त्यानें 'वर्णनात्मक' अंकपद्धति व 'शासनशास्त्रविषयक' गणितपद्धति एकत्र केली. त्यानें समुच्चयात्मक निरीक्षणाचा उपयोग परिमाणात्मक ज्ञानासाठीं करावयाची पद्धति वापरली व त्या पद्धतीचा उपयोग समाजशास्त्रासाठीं केला. त्याच्या पुस्तकाचा असा उद्देश होता कीं आकडेशास्त्राच्या साहाय्यानें ईश्वर चें अस्तित्व सिद्ध करावें व्यक्तीचें जननमरण हें आकस्मिक व क्षणभंगुर दिसतें खरें पण तें देखील साकल्यानें अभ्यासिलें असता त्यातून ईश्वरी नियम व्यक्त होतो हें त्यानें जननमरणाच्या आकड्यानीं सिद्ध करून दाखविलें पुढें वर्णनात्मक संस्थानशास्त्रज्ञानीं देखील अंकाची उपयुक्तता मान्य केली सुसमिल्चच्या प्रथाचा परिमाण असा झाला कीं संस्थानशास्त्रज्ञात "गणितविषयक" पंथ उत्पन्न झाला व ह्या पंथवाल्यानीं निवळ "वर्णना"वर अगदीं बहिष्कार टाकिला हॅले व दुसरे अंकशास्त्रज्ञ यानीं आपले शोध चालू ठेविले व १८ व्या शतकात लोकाच्या स्थितीविषयीं आकडे जमवून शोध करणारा हा वर्ग वाढत गेला. मृत्युसंख्येचीं कोष्टकें काहींनीं तयार केलीं आर्थर यंग ह्यूम, व दोघे मिराबो वगैरे ग्रंथकारांनीं शासनशास्त्रावरील वादविवादात आकड्याचा उपयोग करण्याचा प्रघात चालू केला हे दोन पंथ १८५०पावेतों वेगळे होते त्यानतर अर्वाचीन कालीं ते एकत्र झालेले आहेत, व प्रत्येक पंथ दुसऱ्या पंथाच्या मताचें महत्त्व मान्य करीत आहे आता हे पंथ ऐतिहासिक परिस्थिति लक्षात आल्यामुळें मोडल्यासारखे झाले आहेत.

आता दोन पक्षाच्या नामांतरमूलक भांडणात न पडतां कित्येक प्रसिद्ध आंकडेशास्त्र्याची व आकडेशास्त्राच्या साहाय्यानें ज्यानीं समाजाभ्यास केला त्याची माहिती देतों

ही माहिती देताना ग्रॅन्ट व पेटीनतर डॉ एडमंड हॅले (१६५६–१७४२) ह्याचा प्रामुख्यानें निर्देश केला पाहिजे. त्यानें १६९३ त रायल सोसायटीला ' मनुष्यजातीच्या मृत्युसंख्येच्या प्रमाणा " वर एक निबंध लिहून दिला. एक वर्षाच्या वयाचीं एक हजार मुलें घेतलीं तर त्यापैकीं प्रत्येक पुढल्या वर्षी किती मृत्यु पावतात याची त्यानें गणना केली (विमा पद्धा) नतर एक वर्षाच्या जिवंत, दोन वर्षांच्या जिवत व तीन वर्षांच्या जिवत असलेल्या मुलाची प्रत्येक वर्षांतल्या मृत्युसंख्येसह तीन मथळ्याखालीं त्यानें आपली माहिती जुळवून पहिलें मृत्युप्रमाणाचें कोष्टक तयार केलें त्याला ' हॅलेचें कोष्टक" म्हणतात. अपघातमूलक मृत्यूंची किंमत ठरविताना ह्या कोष्टकाचा उपयोग कसा करावा हे आज अपघात झाला नसता तर पुढें आयुष्य किती असतें याची शास्त्रीय कल्पना करून त्यावरून हानीची किंमत कशी काढावी हें देखील डॉ हॅलेनेंच शोधून काढिलें

बेल्जममधील मोठा आंकडेपंडित केटेले (१७९६–१८७४) ह्यानें जें चालन दिलें त्यामुळे इ. स १८३४ त ' स्टॅटीस्टिकल सोसायटी ऑफ लंडन" स्थापन झाली समाजाभ्यासासाठीं ही संस्था स्थापन झाली होती, केवळ आकडेशास्त्रासाठीं नव्हती असें तिच्या पहिल्या प्रथावरून दिसून येतें. युनायटेड किंगडममध्यें व दुसऱ्या ठिकाणीं अंकशास्त्रावे शोध चालू ठेवण्याच्या कामीं तिचा बराच उपयोग झाला

केटलेचें या शास्त्राविषयींचें मुख्य कार्य म्हणजे शातापर्य तन्या आंकडेपंडितात असलेलें गामाजविषयक, अगर व्यावहारिक ज्ञान परिमाणात्मक करावयाची प्रवृत्ति वाढविणें हें होतें उदाहरणार्थ, समाजामध्यें निरनिराळ्या वयात मृत्यूचें प्रमाण काय असतें इत्यादि गोष्टींच्या निर्णयासंबंधानें संशोधक प्रयत्न करीत. कोणत्याहि सामाजिक व आर्थिक शास्त्रांतर्गत विषयाच्या अंशाचें साकल्यानें ज्ञान व अंशाभ्यासानें झालेलें प्रत्यक्ष ज्ञान यातलें अंतर शक्य तितकें कमी करावयाचें असा सर्व शास्त्राचा अंतिम हेतु असतो कोणत्याहि गोष्टीचें साकल्यानें अवलोकन केलें, तर त्या गोष्टीविषयीं संपूर्ण सत्य मिळतें, परंतु अवलोकनक्षेत्र जर कमी असेल, तर त्या मानानें सत्य संपूर्ण न होतां केवळ संभाव्य सत्य आपल्या हातीं येतें अवलोकनक्षेत्राच्या लघुदीर्घतेनें सत्यविषयक आगमामात बदल होतो संभाव्यसत्य व संपूर्णसत्य ह्यामधील अंतर दाखविणारी रेषा " संभाव्यता रेषा " होय. निरीक्षणानें मिळविलेल्या परिमाणात्मक ज्ञानात परस्परसंबंध काय आहे हें संभाव्यतारेषेचा उपयोग करून केटलेनें दाखविलें, व अंकशास्त्राला शास्त्रीय स्वरूप दिलें, आणि या अभ्यासांत रेखागणित या प्रकारानें आणल्यामुळें व त्यामुळें अभ्यासाचें क्षेत्र आणि फलद्रूपता हीं वाढल्यामुळें, ही केवळ आतां पद्धतीच आहे अथवा शास्त्र होऊं लागलें आहे, या प्रकारच्या चर्चेस अवकाश झाला.

आकडेशास्त्र यास पद्धति कीं शास्त्र म्हणावें.—या आंकडेशास्त्राला ' पद्धति ' या संज्ञेऐवजीं ' शास्त्र ' ही संज्ञा देतां येईल किंवा नाहीं, हा प्रश्न अभिरुचीचा आहे. या प्रश्नाचें विवेचन करतांना अनेक विद्वानांनीं या शास्त्राच्या वेगवेगळ्या व्याख्या केल्या आहेत. त्या व्याख्यांत "संस्थानविषयक ज्ञान" व "आकडेपद्धति" या दोन्हीं विषयांवरील कल्पना मिश्रित झालेल्या आहेत. आंकडेशास्त्र शासनशास्त्राला दत्तक गेलें, यामुळें शासनशास्त्राच्या अंगभूत असलेल्या कांहीं संस्थानविषयक कल्पना आकडेशास्त्रांत म्हणजे स्टॅटिस्टिक्समध्यें शिरल्या. त्या कल्पना काढून टाकून निव्वळ आंकडेशास्त्र वेगळें करण्याचें काम मनुष्याच्या पुराणप्रियतेमुळें कांहीं कालपर्यंत दुर्घट झालें. आकडेशास्त्राचा व संस्थानविषयक ज्ञानाचा संबंध पार तोडून टाकण्याचा प्रयत्न अनेक विद्वानांनीं केला; परंतु हा संबंध फार निकट भासला गेला असल्यामुळें त्यांनी तसें करतांना दिलेल्या ' स्टॅटिस्टिक्स ' च्या व्याख्यांत वरील ओढाताण दिसून येते मासल्याकरितां कांहीं व्याख्या देतों —

मॉरिस ब्लॉक (१८१६–१९०१) :—" आकड्यांनीं जितकें व्यक्त करतां येईल, तितकें समाजांत रहाणाऱ्या मनुष्यांचें ज्ञान या शास्त्राला 'जनवर्णन' ('डेमॉग्रफी') असें नाव द्यावें."

व्हॉनमेर (ग्रंथकाल १८७७) म्हणतोः—" समाजात घडणाऱ्या गोष्टींचें साकल्यानें परिमाणात्मक अवलोकन करून त्या अवलोकनाच्या पायावर त्या गोष्टींवरून काढलेले मनुष्यांच्या सामाजिक जीवनक्रमाविषयीं नियम आणि त्या गोष्टी यांचें पद्धतशीर विधान व विवरण " अशी स्टॅटिस्टिक्सची व्याख्या करतां येईल".

गॅबॅग्लिओ १८८० मध्यें असें म्हणतोः—' स्टॅटिस्टिक्स ' ह्या संज्ञेचा विस्तृत अर्थ घेतला तर ती पद्धति होय व संकुचित अर्थ घेतला तर तें शास्त्र होय. गणित शास्त्राच्या नियमानुसार केलेल्या प्रत्यक्ष संकलनाच्या योगानें शासनशास्त्रांतर्गत समाजशास्त्राच्या व्यवस्थेचा अभ्यास करणें हा शास्त्र ह्या दृष्टीनें स्टॅटिस्टिक्सचा प्रतिपाद्य विषय होय. "

प्रो जे कानराड, प्रो. लेक्सिस, प्रो वेस्टरगार्ड वगैरे जर्मन ग्रंथकार ब्लॉक व व्हॉन मेर ह्यांच्या मताला अनुसरले आहेत परंतु बर्लिनचा डॉ. आगस्ट मिटशेन यानें आपल्या पुस्तकांत (१९०३) ' स्टॅटिस्टिक्स ' च्या हद्दीचें क्षेत्र बरेच आकुंचित केलेलें आहे. फ्रान्समध्यें प्रो. ॲन्ड्रे लिस्मे व प्रो फर्नंड फॉरे वगैरे गृहस्थांनीं स्टॅटिस्टिक्स ही मुख्यत्वेकरून पद्धति आहे ह्याच मताचा पुरस्कार केलेला आहे

इ स १८३० व १८५० ह्या कालामध्ये प्रसिद्ध झालेल्या कांहीं ग्रंथांत एखाद्या देशाच्या शासनशास्त्रविषयक भूवर्णनाला ' स्टॅटिस्टिक्स ' ही संज्ञा दिलेली आहे व ह्या रीतानें " स्टॅटिस्टिक्स " व " पोलिटिकल अरिथमेटिक " यांतला भेद व्यक्त केला आहे मॉरिस ब्लॉकनें ह्या प्रकारच्या ' स्टॅटिस्टिक्स ' ला ' जनवर्णन ' हें नाव द्यावें अशी फार योग्य सूचना केली आहे. अर्थशास्त्रांतील ऐतिहासिक पद्धतीचे प्रचारक रोशेर व हिल्डेब्रँट ह्यानंतरचा प्रसिद्ध पुरस्कर्ता जो नाइस त्याचें असें मत होतें कीं ' स्टॅटिस्टिक्स ' चा खरा ' शास्त्रीय ' भाग आकडे हाच आहे. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांतल्या कांहीं प्रसिद्ध आकडेशास्त्रज्ञांनीं नाइसचें हें मत स्वीकारिलें आहे. अर्वाचीन लेखकांपैकी बहुतेकांचे-विशेषतः जर्मनांतल्या लेखकांचें-असें मत आहे कीं मनुष्याच्या सामाजिक जीवनक्रमासंबंधाचें शास्त्र व सर्व शास्त्रांना लागू पडणारी शोधपद्धति अशीं अंकपद्धतीचीं दोन स्वरूपें आहेत. (अर्थात् पद्धतीची भिन्नता जरी भासली तरी त्या नावाच्या अन्वर्थक असें काहीतरी क्षेत्र त्या पद्धतींत घुसडून देण्यासाठीं झालेला हा तडफडाट आहे) व्हॉन मेर हांशोफर गॅबॅग्लिओ व ब्लॉक हे ह्या मताचे पुरस्कर्ते होते. डॉ. डब्ल्यू ए. गाय, प्रो. जे. के. इन्ग्रॅम (१८२३–१९०७), सर रॉसन, डब्ल्यू रॉसन, सर रॉबर्ट गिफेन, मि. ए. एल. बॉले ह्या ग्रंथकारांनीं अंकपद्धतीच्या व्यावहारिक उपयोगाचें विवरण केलें आहे. अर्वाचीन आकडेशास्त्रज्ञांत डॉ. विल्यम फार (१८०७–१८८३) याची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. हा १८३९ ते १८८० पर्यंत रजिस्ट्रार जनरलच्या ऑफिसात होता व त्या काळात लिहिलेल्या वार्षिक व दशवार्षिक रिपोर्टांत त्यानें महत्त्वाची आकडेशास्त्रविषयक माहिती जमवून ठेवली आहे त्या रिपोर्टांतून उतारे घेऊन नोएल. ए. हम्फ्रेज

समजेलउत्पत्ति, खप, वगैरेचे आकडे उपयोगी आहेत उत्पादनाच्या पद्धतीचा विकास दाखविणारे आकडेहि मिळतात. किंमती,बाजारभाव, नाणीं, चलनाविषयीं आकडे, सोनें व चांदी यांचे आकडे, धंदेविषयक आकडे दळणवळणाचे आकडे, हे घेऊन अर्थशास्त्रीय महत्त्वाचा अभ्यास करता येतो. सामाजिक अनेक गोष्टी आकड्यांनीं अभ्यासिता येतात आकडेशास्त्राच्या मदतीनें अर्थशास्त्रदृष्ट्या उच्च समाज कसा ओळखावा हा प्रश्न सोडवितांना मोजण्यासारख्या कोणत्या सामाजिक गोष्टी आहेत हें पाहून काहीं प्रगत समाजाचीं अंगें विचारात घेऊं खालीं दिलेल्या गोष्टी ज्या समाजात आढळून येतील तो समाज अर्थशास्त्रदृष्ट्या उच्च दर्जाचा असतो.

एकंदर खर्चात खाण्याच्या खर्चाचें प्रमाण ज्या समाजाचें कमी असेल तो समाज उच्च दर्जाचा असतो दरिद्री मनुष्य व श्रीमान् मनुष्य यांच्या खर्चाच्या तपशिलाचे आकडे पाहिले तर असें आढळून येतें कीं, श्रीमान् मनुष्याच्या खाण्याच्या खर्चाचें प्रमाण सर्व खर्चात फार कमी असतें खाण्याशिवाय पोषाख, घरभाडें, चैनीच्या वस्तू वगैरे गोष्टींनाच जास्त खर्च लागतो गरिबाचे तसें नाहीं त्याच्या एकंदर खर्चात मुख्य खर्च खाण्याचा. इतर गोष्टींचा खर्च त्या मानानें फारच कमी. हाच नियम समाजाला लागू पडतो व एकंदर खर्चात खाण्याच्या खर्चाचें प्रमाण जितकें कमी तितका समाजाचा दर्जा मोठा असें ठरतें

मांसाच्या अथवा त्यासारख्या इतर महाग वस्तूंच्या (उ. दूध, लोणी वगैरे) खपाचें प्रमाण ज्या समाजात अधिक असेल तो समाज उच्च दर्जाचा असतो. दरिद्री मनुष्य व श्रीमान् मनुष्य यांच्या भोजनाचे पदार्थ पाहिले तर श्रीमान् मनुष्य मांस अथवा त्यासारख्या इतर महाग वस्तू ( उ दूध, लोणी वगैरे ) विकत घेऊन खाऊं शकतो, दरिद्री मनुष्य कमी किंमतीचे पदार्थ खातो त्याला महाग पदार्थ घेण्याचें सामर्थ्य नसतें हाच नियम समाजाला लागू पडतो. मांसाच्या अथवा त्यासारख्या दूध, लोणी वगैरे इतर महाग वस्तूंच्या खपाचें प्रमाण जितकें अधिक तितका समाजाचा दर्जा उच्च ठरतो

ज्या समाजात लवकर लग्न करणें शक्य होतें तो समाज उच्च दर्जाचा असतो कारण लग्न करणें या गोष्टीला आर्थिक परिस्थितीनें अडथळा येत नाहीं. श्रीमान् मनुष्याला लग्न वाटेल तेव्हां करिता येतें गरिबाची गोष्ट तशी नाहीं. त्याला आपल्या सांपत्तिक स्थितीवर अवलंबून रहावें लागतें समाजाची गोष्ट अशीच आहे.

ज्या समाजात लग्न झालेल्या स्त्रियांना उपजीविका मिळविण्याकरितां घराबाहेर जाऊन काम करावें लागत नाहीं तो समाज उच्च दर्जाचा असतो श्रीमंतांच्या बायकांना उपजीविकेकरिता घराबाहेर जाऊन काम करावें लागत नाहीं. परंतु तशी गोष्ट दरिद्री मनुष्याची नाहीं त्याच्या बायकांना घराबाहेर जाऊन व मोलमजुरी करून पोटाला मिळवावें लागतें हाच नियम समाजाला लागू पडतो.

ज्या समाजात श्रमविभाग जास्त आहे तो समाज उच्च दर्जाचा असतो. श्रीमान् मनुष्याचीं कामें जास्त असल्यामुळें तीं करण्यास पुष्कळ नोकर तो ठेवितो व त्यांच्याकडून कामें करवून घेतो गरीब मनुष्याला आपलीं कामें स्वत:च करावीं लागतात श्रीमान मनुष्याप्रमाणें त्याला आपलीं कामें वांटून देता येत नाहींत समाजाला हाच नियम लागू पडतो

ज्या समाजात खप विविध प्रकारचा असतो तो समाज उच्च दर्जाचा असतो. श्रीमान मनुष्याला आपल्या गरजा वाढविता येतात कारण त्या पुऱ्या करण्याला त्याच्याजवळ पैसा असतो गरजा वाढल्या म्हणजे त्या पुरविण्यासाठीं त्याच्या घरीं अनेक प्रकारचा माल खपतो. द्रव्याभावामुळें गरिबाच्या गरजा अगदीं मोजक्या, फक्त जरूरीच्या असतात

देशांतील ज्या समाजात शिकलेल्या मनुष्यांचें एकंदर लोकसंख्येशीं प्रमाण जास्त असतें तो समाज उच्च दर्जाचा असतो श्रीमान मनुष्य पैसा खर्च करून साक्षर होऊं शकतो गरिबाला तसें होणें सुलभ नसतें समाजाची गोष्ट अशीच आहे

जनवर्णनशास्त्र —हें मानवशास्त्र व शासनशास्त्र ह्याप्रमाणेंच मनुष्यसमूहाचें शास्त्र होय. जीवनक्रमांतल्या हिताहितविषयक प्रश्नांविषयीं माहिती पुरविणें हा जनवर्णनशास्त्राचा प्रतिपाद्य विषय होय. जीवितरक्षण व वंशवर्धन ह्या दोन हेतूंनीं ह्या शास्त्राच्या अभ्यासाकडे प्रवृत्ति होते. आरोग्यरक्षणास मृत्यूंच्या कारणाचें पृथक्करण करून आणि तेणेंकरून अपमृत्यु मनुष्यसत्तेखालीं आणून आयुर्मर्यादा वाढविण्याचा प्रयत्न करणें महत्त्वाचें आहे या गोष्टींनीं जीवितरक्षण व वंशवर्धन होईल. प्रजोत्पादन हें गर्भधारणेच्या वयाच्या लग्न झालेल्या स्त्रियांच्या संख्येवर अवलंबून राहील. आयुर्वर्धन व प्रजोत्पादन ह्या विषयाचा आकडेशास्त्रानें अभ्यास करितांना खालील गोष्टींचे आकडे पाहिजेत (अ) वयोमानदर्शक आंकडे,(आ)स्त्रीपुरुषाचें प्रमाण दाखविणारे आकडे [इ]वैवाहिक स्थिति—लग्न न झालेल्या, लग्न झालेल्या विधवा झालेल्या व घटस्फोट झालेल्या स्त्रियांचें प्रमाण, (ई)जननमरणाचे आकडे. समाजदृष्ट्या महत्त्वाचे अस समाजांतल्या व्यक्तींचे जे संबंध वस्तुरूप नसून भावरूप आहेत त्यांची मोजदाद आकडेशास्त्रानें कशी करावी ? दळणवळण इत्यादि गोष्टी भावरूप आहेत, परंतु त्यांना परिमाणात्मक स्वरूप द्यावयाचें तें येणेंप्रमाणें —समाजांतील दळणवळण हें रस्त्याचे मैल, पत्रांची संख्या व तारेनें व ध्वनिवाहक यंत्रांनीं दिलेल्या संदेशांच्या संख्या यांनीं मोजिलें जातें. लोकप्रियता निवडणुकींतल्या मतांच्या संख्येनें मोजिली जाते शिक्षणाकरिता कळकळ एखाद्या शहराच्या म्युनिसिपालिटीनें सर्व केलेल्या खर्चाच्या संख्येनें मोजिली जाते समाजाचा सद्गुण हा अपराधांच्या प्रमाणाच्या संख्येनें मोजिला जातो

आकड्याच्या उत्पत्तीचीं साधनें:—जननमरणाच्या आकड्यासारख्या समाजातल्या व्यक्तींच्या अवस्था दाखविणाऱ्या आकड्यांचें त्या समुच्चयाशीं म्हणजे अंशाचें पूर्णांशीं प्रमाण पुष्कळदां काढावें लागतें. म्हणजे अंश हा कितवा अंश आहे हें काढावें लागतें. हें प्रमाण तुलनेसाठीं काढावें लागतें. एकंदर तुलनेचे *प्रकार पाहतां तुलना स्वधर्मी अगर* विधर्मी वस्तूमध्यें होते. एखाद्या विशिष्ट गुणानें अथवा दोषानें युक्त अशा लोकसमूहाचें एकंदर लोकसंख्येशीं प्रमाण काय पडतें हें पहिल्यानें त्या धर्माचें अगर वैगुण्याचें महत्त्व मोजतां येतें. उदाहरणार्थ, एकंदर लोकसंख्येचें वेड्यांच्या संख्येशीं काय प्रमाण आहे हें काढिलें. तर ह्या प्रमाणाची व दुसऱ्या देशाच्या वेड्याच्या प्रमाणाशीं तुलना करितां येईल. पुनः जर शहरांतील लोकांत खेड्यांतल्या लोकांपेक्षा वेड्यांचें प्रमाण जास्त पडतें असें आढळून आलें तर शहरांत राहण्याचा वेडाशीं संबंध आहे कीं काय ह्या गोष्टीकडे शास्त्रज्ञाचें लक्ष्य लागेल. त्याचप्रमाणें पुरुषांमध्यें स्त्रियांपेक्षा *वेडाचें प्रमाण जास्त किंवा कमी पडतें असें आढळून आलें* तर हा विचाराला एक नवीनच विषय होईल. नंतर निरनिराळ्या वयांत वेडाचें काय प्रमाण आहे हें काढण्याचे प्रयत्न शास्त्रज्ञ करतील त्याप्रमाणें वेडाच्या कारणाचें खरें ज्ञान कोठें मिळेल याचें क्षेत्र ठरीव होईल व या विषयासंबंधीं सूक्ष्मज्ञान मिळेल. पारशी व हिंदू यांतल्या वेड्यांच्या *प्रमाणांत पारशांतल्या वेड्यांचें प्रमाण जास्त* असलें व पारशी व हिंदू लोकांपैकीं पारशांचें शहरांत रहाण्याचें प्रमाण जास्त असलें तर ह्या दोन कारणांचा एकत्र विचार करून पारशांतल्या वेड्यांचें प्रमाण जास्त असण्याचें कारण त्यांचें पारशी असणें अथवा रक्तदोष आहे किंवा त्यांचें शहरांत राहणें हें आहे. या गोष्टीचा निश्चय करण्याकडे शोधकाचें लक्ष्य लागेल. जेव्हां एखाद्या वर्गाविषयींचे गुणधर्म समुच्चयानें आपणास समजले असतात तेव्हां त्या गुणधर्मांची कारणमीमांसा करण्यापूर्वी तो वर्ग *कोणत्या परिस्थितींत आहे आणि त्या वर्गांतील* अंतर्घटना कशी काय आहे ह्याचें पृथक्करण करावें आणि परिस्थितीच्या व अंतर्घटनेच्या प्रत्येक अंगाच्या ठायीं त्या गुणधर्मांचें श्रेय अगर दोष कितपत द्यावें याचा विचार आंकडेशास्त्र्यानें केला पाहिजे.

समाजांतल्या व्यक्तींच्या अवस्था दाखविणाऱ्या मूलसंख्या शासनाधिकारी अथवा व्यक्ति अथवा जनता अथवा खासगी संस्था, यांच्या श्रमानें मिळवितां येतात.

शासनाधिकाऱ्यांच्या श्रमानें मिळवितां येणारे आकडे.—सरकारी काम होत असतानाच जननमरणाच्या संख्या, लोकसंख्येचे आकडे, शेताची क्षेत्रफळें, यासारखे पुष्कळ आकडे उपलब्ध होतात सर्व सुधारलेल्या राष्ट्रांची आकडे तयार करण्याची पद्धति बहुतेक सारखीच असते. म्हणून वेगवेगळ्या देशासंबंधाच्या आकड्यांची तुलना करून प्रत्येक देशाचा समाजशास्त्रविषयक पुरावा मिळविणें ही गोष्ट बऱ्याचशा बाबींसंबंधानें शक्य आहे. परंतु कांहीं आकडे इतके भिन्न आहेत कीं त्यामुळें तुलना करणें कठिण जातें. उदाहरणार्थ, अमेरिकेंतल्या पुष्कळ संस्थानांत 'एज्युकेशनटॅक्स' असतो, येथें तसा नाहीं. इंग्लंडांत लँड रेव्हिन्यु नाहीं, हिंदुस्थानांत आहे. वगैरे. याप्रकारें राजशासनविषयक भिन्न प्रकारचे आकडे उपलब्ध होतात त्याशिवाय विशिष्ट विषयासंबंधानें विशेष शोध करण्याकरितां संख्या गोळा केल्या जातात. शिरोगणति, प्राप्तीवरचा कर व जमिनीवरचा कर आणि उत्पन्न झालेल्या वस्तूंची गणति ह्यावरून उपयुक्त संख्याज्ञान प्राप्त होतें

संस्थांच्या मार्फत मिळवितां येण्याजोगे आकडे.—हे दोन प्रकारचे आहेत — ( १ ) देशाच्या कायद्यान्वयें वेगवेगळ्या संस्थांनीं ठेविलेली माहिती. ( २ ) कायद्याकरितां नव्हे परंतु केवळ भागीदाराकरितां संस्थांनीं प्रसिद्ध केलेली माहिती

मूलसंख्या व र करावयाचीं कार्यें — मूलसंख्यांची प्रथम कोष्टकें बनविलीं पाहिजेत

(अ) साधीं कोष्टकें —कोष्टक बनवितांना त्या कोष्टकाच्या योगानें काय दाखवावयाचें आहे ह्याची स्पष्ट कल्पना असली पाहिजे व ती कल्पना बिनचूक भाषेंत व्यक्त केली पाहिजे कोष्टकाचा मथळा काय दाखविण्यासाठीं कोष्टक आहे हें स्पष्ट सांगणारा असावा सामान्य कोष्टकांत दोन प्रकारच्या संख्या येतात. एकाच वर्गाच्या परंतु वेगवेगळ्या काळीं अस्तित्वांत असणाऱ्या अथवा वेगवेगळ्या कालविभागांत अस्तित्वांत येणाऱ्या अशा दोन सामाजिक परिस्थिती दर्शविणाऱ्या त्या संख्या होत उदाहरणार्थ, १८९१, १९०१ व १९११ ह्या वेगवेगळ्या काळीं अस्तित्वांत असणाऱ्या हिंदुस्थानच्या लोकसंख्येचे आकडे व १९११ च्या लोकसंख्येंत वेगवेगळ्या कालविभागांत अस्तित्वांत येणाऱ्या १५ वर्षांच्या अथवा २० वर्षांच्या वयाच्या मनुष्यांचे आकडे. कधीं कधीं प्रमाणविषयक संख्यांचाहि ह्या कोष्टकांत अंतर्भाव होतो तथापि तें साधेंच कोष्टक होईल, कारण प्रथम दिलेल्या ' मूलसंख्यांत ' गूढ असलेल्याच गोष्टी त्या कोष्टकांत उघड केल्या असतात.

( आ ) संयुक्त कोष्टकें:—एकाच विषयाच्या दोन विभागासंबंधीं असणाऱ्या दोन वेगवेगळ्या कोष्टकांचें जर कोष्टक एक केलें तर त्याला संयुक्त कोष्टक म्हणतां येईल उदाहरणार्थ, लोकसंख्येचे आकडे घ्या १८९१, १९११, १९२१ वगैरे सालीं हिंदुस्थानच्या लोकसंख्येचे आकडे दिले व त्याच कोष्टकांत हिंदुस्थानांत असणाऱ्या यूरोपीयांचे व हिंदूंचे वेगवेगळे आकडे दिले, अगर हिंदूंपैकीं साक्षर कोणते व निरक्षर कोणते असे वेगवेगळे आकडे दिले तर तें संयुक्त कोष्टक होईल गणितशास्त्रांत सांगितलेल्या पद्धतींचें अवलंबन करून त्या कोष्टकांत गढ

असलेल्या पुष्कळ नव्या गोष्टी उघड करितो येतील.

(इ) प्रमाणें:—प्रमाणें दाखविण्याची उत्तम पद्धति ह्मणजे तीं शेंकडेवारीनें किंवा शंभर, हजार, दहा हजार व लक्ष यांतील प्रमाण काढून दाखविणें होय." इनक्या संख्येत एक" ही एक पद्धति नेहमींच सुकर पडत नाहीं.

(ई) सरासरी:—सरासरी काढण्याचे दोन प्रकार आहेत

पहिला सरासरी, ही काढताना मेल्याच्या सापेक्ष महत्त्वाकडे लक्ष द्यावयाचें नाहीं. केवळ संख्यांच्या बेरजेला संख्याकानें भागून काढलेली सरासरी

दुसरा मध्य, संख्याच्या सापेक्ष महत्त्वाकडे लक्ष्य देऊन संख्यांच्या बेरजेला संख्याकानें भागून काढलेली सरासरी. उदाहरणार्थ मध्यवयोमान व सरासरी वयोमान काढावयाचें हें काढताना ज्या वयोमर्यादेत सर्वात जास्त लोक येतील त्या वयोमर्यादेतल्या लोकांचीं वयें घेऊन मध्य वयोमान काढलें पाहिजे बाल व अतिवृद्ध यांची संख्या वगळली पाहिजे. सरासरीबरोबर खालील गोष्टी दिलें फायद्याचे होईल

(१) संख्यांचें जें प्रमाण सरासरीपासून फार भिन्न नसतें तें प्रमाण दाखविणारा आंकडा देणें हें चांगलें उदाहरणार्थ, वयाची सरासरी २३ असली तर २२,२१,२४,२५ ह्या वयाच्या मनुष्याच्या संख्येचे आकडे देणें चांगले

(२) सरासरीपासून होणारी सर्वांत जास्त कमी दूरता दाखविणारे आकडे. वरील उदाहरणात १ व ८० ह्या वयाचे आकडे (जास्त दूरता) व २२ व २४ (कमी दूरता) ह्या वयाच्या मनुष्याचे आकडे देणें चांगले.

*अंकपद्धतींतील ऐक्य.*—अंकपद्धतींच्या कार्य पद्धतींतल निरनिराळे प्रकार काढून टाकून त्या पद्धतींचे ऐक्य करणे इष्ट आहे व त्या दिशेनें सुधारणा करण्याचे प्रयत्न इंग्लंडात चालू आहेत. सर्व देशांच्या अंकपद्धतींत ऐक्य आणण्याचें प्रयत्न झाले. १८५३ सालापासून अंकशास्त्रज्ञाच्या संयुक्त सभा ह्या उद्देशानें भरत आहेत व १८८५त "राष्ट्रामधील अंकपद्धतीची संस्था" इंटर नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ स्टॅटिस्टिक्स स्थापन झाली "लंडन स्टॅटिस्टिकल सोसायटी" तर पूर्वीच १८३४ त स्थापन झाली होती.

*युरोपांतील महत्त्वाच्या स्टॅटिस्टिकल सोसायटी*:—या येणेप्रमाणे आहेत.

कॉमिम इंटर नॅशनल डि स्टॅटिस्टिक्

युनायटेड किंग्डमः— रॉयल स्टॅटिस्टिकल सोसायटी. मँचेस्टर स्टॅटिस्टिकल सोसायटी, स्टॅटिस्टिकल अँड सोशल इन्क्वायरी सोसायटी ऑफ आयर्लंड.

युनायटेड:—स्टेट्स:—अमेरिकन् स्टॅटिस्टिकल असोसिएशन.

फ्रान्सः—सोसायटी डि स्टॅटिस्टिक (ग्रेनोबल) सोसायटी डि स्टॅटिस्टिक (मार्सेल्स) सो. फ्रा. डि स्टॅटिस युनि. सो डि स्टॅ डि पॅरिस. सो डि स्टॅ. डेस डोसे व्होस (सेंट मेक्सेंट).

जर्मनी व ऑस्ट्रिया-हंगेरीः— ड्. फ्. ड्. स्टॅटिस्ट स्टॅटिस्टिश्चर व्हर. स्टॅटिस्टिचे गेस.

हॉलंडः— व्हर व्हूर. डि. स्टॅटिस्टइन् नेदरलँड (आमस्टरडम्).

स्पेनः—जन्टा एस्टॅडिस्ट (मॅड्रिड)

ईजिप्तः—ब्यूरो सेन्ट्रल डि स्टॅटिस्ट (कैरो)

जपानः—स्टॅटिस्ट, सो (टोकिओ)

*ॲक्चुअरिअल सोसायटीज्*:—यांपैकीं महत्त्वाच्या खालीलप्रमाणे आहेत.

युनायटेड किंग्डमः—इन्स्टिटयूट ऑफ ॲक्चुअरीज़ फॅकल्टी ऑफ ॲक्चुअरीज़ इन स्कॉटलंड.

युनायटेड स्टेटसः—ॲक्चुआरिअल सो. ऑफ अमेरिका

**आकर.**— दक्षिण हिंदुस्थानातील एक प्रदेश याचा महाभारतात उल्लेख आढळत नाहीं बृहत्संहितेंत याचा उल्लेख (१४ १२) आकरअवंति असा आहे. कर्न यानें "खाणी" असें याचें भाषांतर केलें आहे व तो हा प्रदेश अर्वाचीन खानदेश दर्शवितो असें समजतो.

आकरावति —हा माळव्याचा पूर्वभाग असावा असें डॉ. भांडारकर म्हणतात. गोतमीपुत्र शातकर्णी हा त्यावर राज्य करीत असे असें नाशीकच्या शिलालेखावरून दिसतें. रुद्रदामनें अनूप, सुराष्ट्र, अपरांत इत्यादि प्रांताबरोबर आकरावंति जिंकून घेतलें असें जुनागडच्या लेखावरून कळतें (हिस्टरी ऑफ दि डेक्कन बॉ. गॅ. पु. १ भा. २ पा. १४९ टीप)

**आकलंड.**—हें नार्थ बेटाच्या (न्यूझीलंड) पूर्वकिनाऱ्या वरील एक शहर व बंदर असून, त्याच प्रांताची राजधानी आहे. येथें बिशप असतो. याची लोकसंख्या (इ. स. १९१६)त १,३३,७१२ होती. हें हॉराकी उपसागराच्या मुखावर असून पश्चिम किनाऱ्यावरील मनुका बंदरापासून फक्त ६ मैल आहे. याची जागा फारच मनोहर आहे. ज्या संयोगभूमीवर हें शहर आहे ती सहज ओलांडून जाता येतें व फारच्याचा रस्ताहि आहे. थंड झालेले कित्येक ज्वालामुखी पर्वत याच्या चोहों बाजूंस आहेत. पश्चिमेस रिटिरँगी टेंकडया १४०० फुटाहून उंच आहेत. ज्वालामुखीची, काहीं जमीन रुक्ष आहे परंतु बराच भाग सुपीक आहे. न्यूझीलंड मधील हें सर्वांत चांगले बंदर असून येथें मोठाली जहाजें येऊं शकतात. बंदरात दोन गोद्या आहेत. मुख्य रस्ता क्वीनस्ट्रीट या मुख्य गोदीपासून शहरात जातो व सार्वजनिक इमारती यावरच आहेत. सरकारवाडा, सरकारी कचेऱ्या, चित्रांचें प्रदर्शन, शेअरबाजार, कॅटेमेरी, सेंटपॉल व सेंट पॅट्रिक ह्या प्रार्थनामंदिरें या प्रेक्षणीय इमारती आहेत. येथें पदार्थसंग्रहालय, नाटयगृह व गायनशाळा आहेत, आकलंड युनिव्हर्सिटी कॉलेज व व्याकरणशाळा या शिक्षण-

संस्था आहेत. डोमेनपार्कमध्यें वनस्पतिशास्त्रीय बाग आहे. आल्बर्ट पार्कमध्यें व्हिक्टोरिया राणीचा पुतळा आहे. मुख्य रस्त्यावर विजेच्या ट्रामगाड्या आहेत; पुष्कळ उपनगरें आहेत. मनुकौ बंदरांत वनहुंगा हें ल्हानसें पोटबंदर आहे. माउंटएडनहून शहर व त्याच्या आसमंताच्या भागाचा देखावा फार सुंदर दिसतो. या टेंकडीवर प्राचीन देश्य लोकांनीं बांधलेली तटबंदी आहे.

येथें साखर शुद्ध करणें, जहाजें बांधणें, व कागद, दोरखंडें व विटा बनविणें इ० धंदे आहेत. सागवानाचेंहि काम होतें. हॉब्सन गव्हर्नरनें १८४० मध्यें या शहराचा वसाहतींची राजधानी म्हणून पाया घातला. दक्षिणेस व उत्तरेस रेल्वे आहेत व वसाहतींतील इतर बंदरें, मुख्य पासिफिक बेटें व ऑस्ट्रेलिया इत्यादि ठिकाणाहून येथें नियमितपणें आगबोटी येतात. १८३५ते१८७६ पर्यंत हें शहर प्रांताची राजधानी व १८६५ पर्यंत मुख्य राज्यव्यवस्थेचें ठाणें होतें. नंतर वेलिंग्टन येथें राजधानी नेण्यात आली. सार्वजनिक सभे (जनरल असेंब्ली)चें पहिलें अधिवेशन येथेंच १८५४ मध्यें भरलें येथें म्युनिसिपालिटी आहे.

**आकाबाई**—आकाबाई ही कन्हाडकर रघुनाथपंत देशपांडे यांची कन्या व रामदासस्वामींची शिष्या. हिचा नवरा ल्हानपणींच मरण पावला. बापाच्या अनुमतीनेंच तिनें समर्थांचा उपदेश घेतला. ही मोठी एकनिष्ठ गुरुभक्त होती. परळी किल्ल्यावरील रामदासस्वामींची समाधि व देऊळ हिनें बांधिलें. ही समर्थांच्या मागून चाळीस वर्षांनीं ( शके १६४३ ) त वारली. [ रामदासचरित्र, अर्वाचीन कोश मराठी रियासत. ]

**आकाश, ज्यो ति र्वि ष य क.**—चर्मचक्षूस आकाश हें क्षितिजापाशीं पृथ्वीवर टेंकलेल्या एखाद्या प्रचंड घुमटाप्रमाणें दिसत असल्यामुळें ज्योतिषशास्त्राच्या बाल्यावस्थेंत मनुष्याच्या आकाशसंबंधीं बऱ्याचशा अज्ञानमय कल्पना होत्या. प्राचीन मिसरी लोकांना आकाश ही जड वस्तु आहे असेंच वाटत होतें व म्हणून तें चार दिशांस असलेल्या चार स्तंभावर आधारिलेलें आहे अशी त्यांनीं कल्पना बसविली होती ( विज्ञानेतिहास पृ. ३२४ पहा ) आकाशासंबंधीं खाल्डी लोकांची कल्पनाहि मिसरी लोकांच्या इतकीच अज्ञानमय होती. कारण तें पृथ्वीभोंवती असलेल्या पर्वतांच्या टप्यावर आकाशाचा घुमट बसविला आहे असें कांहीं तरी समजत होते ( विज्ञानेतिहास पृ. ३२६ पहा ). तथापि वैदिक काळच्या भारतीय लोकांची आकाशविषयक कल्पना मात्र बरीचशी वस्तुस्थितीला धरून असावी असें वाटतें. निदान मिसरी किंवा खाल्डी लोकांप्रमाणें दृष्टिभ्रमास बळी पडून आकाश हें पृथ्वीवर आधारिलेलें आहे असें तरी ते समजत नव्हते हें खास ( विज्ञानेतिहास पृ. २९२ ) जसजशी ज्योतिषशास्त्राची प्रगति होत गेली तसतसें आकाश म्हणजे केवळ पोकळी आहे हें ज्ञान मनुष्यास आविर्भूत झालें व त्या पोकळींत दृश्य होणाऱ्या सूर्य, चंद्र, ग्रह, उपग्रह तारे, धूमकेतु, उल्का, रूपविकारी तारे, तारकायुग्म, तारकागुच्छ, तेजोमेघ, नवे तारे या ज्योतिषचमत्कारांविषयींहि ज्ञान वाढूं लागलें. हें ज्ञान कसकसें वाढत गेलें व त्याची आजची स्थिति काय आहे याबद्दल कांहीं संक्षिप्त माहिती मागें विज्ञानेतिहासांतील ज्योतिषशास्त्राचा इतिहास या प्रकरणांत आली आहे व पुढेंहि आणखी यथास्थळीं येइलच.

आकाशाच्या पोकळींतील या तेजोमय रहिवाशांचें निरीक्षण मनुष्य फार प्राचीन काळापासून करीत आला आहे. तथापि उपलब्ध माहितीप्रमाणें आकाशातील तारकांचा व्यवस्थित असा पहिला नकाशा तयार करण्याचा मान बहुधा खि. पू. ३ ऱ्या शतकाच्या सुमारास होऊन गेलेल्या एराटॉस्थिनीसकडे जाईल. एराटॉस्थिनीझनें आपल्या नकाशात आकाशातील केवळ तेजस्वी तारेच अंतर्भूत केले होते. यानंतर खि. पू. दुसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास हिप्पार्कसनें जें तारास्थितिपत्रक तयार केलें तें बरेंच सूक्ष्म असून त्यात १०८० तारकांचा समावेश केलेला होता. पुढें इसवी सनाच्या दुसऱ्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेलेल्या टॉलेमीनें १०२८ तारकांचे शरभोग इत्यादि दिले आहेत. यानंतरचें तारास्थितिपत्रक १५ व्या शतकाच्या पूर्वार्धांतील तयमूरलंगाचा नातू उलुगबेग याचें असून त्यातहि केवळ १०१९ तारकांचीच स्थिति आहे परंतु पुढें सोळाव्या शतकाच्या अखेरीस दुर्बिणीचा शोध लागल्यामुळें हजारों किंबहुना लक्षावधि तारका स्पष्टरूपानें मनुष्याच्या दृष्टिपथाच्या आटोक्यात आल्या व पुढें प्रकाशलेखनाचा शोध लागला तेव्हा दुर्बिणीसहि अगोचर असलेल्या तारकांचा तारास्थितिपत्रकात अंतर्भाव करणें शक्य झालें. हल्लीं फार सूक्ष्म अशीं तारास्थितिपत्रकें पुष्कळ झालीं असून त्यांत सुमारें वीस हजार तारकांची स्थिति आहे. उत्तरध्रुवापासून दक्षिणक्रांति २ पर्यंत असणाऱ्या ९ प्रतीच्या तारकांचें एक स्थूलस्थितिपत्रक झालें आहे. त्यात सुमारें तीन लक्ष तारका आहेत. ही संख्या सुमारें अर्ध्या आकाशातील आहे. नुसत्या डोळ्यानीं अर्ध्या आकाशांत सुमारें तीन हजार तारका दिसतात. यावरून नुसत्या डोळ्यानीं जेथें एक तारका दिसते तेथें मध्यम प्रतीच्या दुर्बिणीनें १०० दिसतात. दुर्बिणींतून दिसणाऱ्या असंख्य तारकांनीं आकाशगंगा झाली आहे. अशा तारका आकाशगंगेपासून दूरच्या प्रदेशांत थोड्याच आहेत. जसजसें आकाशगंगेकडे यावें तसतशा तारका दाट दिसतात. नुसत्या डोळ्यांनीं दिसणाऱ्या तारकाहि आकाशगंगेंत जास्त आहेत. आकाशगंगेखेरीज इतर प्रदेशातहि कोठें कोठें फार दाट तारका आहेत.

**आ का शा चा रं ग.**—भूगोलावरील कोणत्याहि प्रदेशावरील आकाशाकडे पाहिलें असतां आकाशाचा रंग निळाच दिसतो. आकाश जरी अगदीं निरभ्र असलें तरी सुद्धां या निळ्या रंगांत बराचसा फरक दिसतो. खस्वस्तिकाच्या भागीं हा निळा

रंग जास्त दाट असतो व भूपृष्ठापासून जों जों जास्त उंचीवर जावें तों तों हा निळा रंग जास्त गडद होत जातो. या रंगात दुसऱ्या शुभ्र रंगाचें मिश्रण असतें हें सांगावयास नकोच. याबरोबरच हेंहि सांगितलें पाहिजे कीं, आकाशापासून येणारा प्रकाश ध्रुवीभूत झालेला असतो योग्य परिस्थितीमध्यें आकाशापासून येणाऱ्या प्रकाशापैकीं निम्याहून अधिक प्रकाश ध्रुवीभूत झालेला असतो. आकाशाला निळा रंग असण्याच्या कारणांविषयीं अनेक प्रकारचीं मतें शास्त्रज्ञमंडळांत प्रचलित आहेत. कित्येकांचें असें मत आहे कीं, हवेमुळें किंवा तींतील ओझोनसारख्या घटकावयवामुळें आकाशास निळा रंग आला आहे; परंतु यावर असा आक्षेप घेता येण्यासारखा आहे कीं, सूर्योदय किंवा सूर्यास्ताच्या वेळीं हा निळा रंग जास्त गडद झाला पाहिजे; कारण या वेळीं प्रकाशाला फार मोठ्या अशा हवेच्या थरातून जावें लागतें व त्यामुळें प्रकाशास हवेचा निळा रंग जास्त प्रमाणावर आला पाहिजे परंतु असा रंग येत नाहीं म्हणून ही कल्पना फारशी ग्राह्य नाहीं.

ध्रुवीभूत प्रकाश येवो वा अध्रुवीभूत प्रकाश येवो, परंतु हा प्रश्न प्रथमतः उपस्थित होतो कीं, आकाशापासून प्रकाशच का यावा? जर वातावरण मुळींच नसतें किंवा पूर्णपणें पारदर्शक असतें, तर आकाश दिसलेंच नसतें; म्हणजे काळ्या पोकळींतून प्रकाश पृथ्वीवर आला असता. यावरून आकाशांत परावर्तन करणारा कोणता तरी पदार्थ असावा, असें अनुमान काढतां येतें

आकाशाच्या पोकळींत असणारें वातावरण व त्या वातावरणांत असणारे धुळीचे सूक्ष्म कण यांच्या योगानें निळा प्रकाश परावृत्त होत असावा, असें अनुमान शास्त्रज्ञ लोकांनीं बसविलें आहे. शिवाय हवेचे कण आणि धुळीचे कण यांच्या योगानें प्रकाशाचें ध्रुवीभवन होणें शक्य आहे, असें गणिताच्या आधारें सिद्ध करतां येतें म्हणून या अनुमानास उत्तम प्रकारें बळकटी येते.

**आकाशाच्या भिन्न रंगाची उपपत्ति.**—प्रकाशाचे किरण प्रकाशलहरींच्या लांबीहून लहान असलेल्या कणावर आदळले म्हणजे त्यांची इतस्ततः फाकाफाक होते. विच्छिन्न किरणाच्या निळ्या टोंकाबद्दल अत्यंत आखूड असलेल्या निळ्या व जांभळ्या रंगांच्या प्रकाशलहरींची लाल व पिंवळ्या रंगाच्या दीर्घ प्रकाशलहरींहून अधिक पूर्णपणें फाकाफाक होते. म्हणून असले कण असलेल्या माध्यमांतून बाहेर पडणाऱ्या प्रकाशांत लाल रंगाचें आधिक्य असतें व बहुतेक निळा रंग बाजूंस फांकला जातो. आकाशाचा बराचसा भाग निळा दिसतो याचें कारण वातावरणांतील सूक्ष्म कणांमुळें आजूबाजूंस जो प्रकाश फांकला जातो तोच सूर्यापेक्षाहून आपल्या डोळ्यावर पडतो जितके हे कण लहान तितका प्रकाश अधिक अधिक असतो पण त्यांत निळ्या रंगाचें प्रमाण अधिक असतें. क्षितिजापाशीं आकाश खस्वस्तिकापेक्षा अधिक शुभ्र दिसतें; कारण तेथून येणाऱ्या किरणास मोठ्या कणाचें आधिक्य असलेल्या तळच्या वातावरणाच्या अधिक जाडींतून मार्ग आक्रमण करावा लागतो. सूर्यास्ताचे रंग लाल असतात तेंहि याच कारणामुळें होत. तेथून जे किरण सरळ आपल्याकडे येतात त्यांतील बहुतेक निळा रंग आजूबाजूंस फाकाफाक होऊन नष्ट झालेला असतो उंच पर्वतावरून किंवा उंचावर उडत असलेल्या विमानांतून आकाश पाहिल्या पण शुद्ध नीलवर्णाचें दिसतें. कारण त्या वातावरणाच्या भागांत खालच्यापेक्षां मोठ्या कणांचें प्रमाण बरेंच कमी असतें.

**आकाशदेवतेचीं भिन्नभिन्न स्वरूपें.**—जगांतील सर्व प्रमुख व सुधारलेल्या धर्मांना आधारभूत असलेल्या गोष्टींत आकाशांतील देवता अनेक भिन्न व विकृत स्वरूपांत आढळते आशियांतील प्रमुख धर्मपंथांत व कोलंबसपूर्व अमेरिकेंतील अर्धसुसंस्कृत धर्मांत या देवतेला एकच विशिष्ट स्थान दिलेलें आहे. शिवाय ही देवता असंस्कृत अशाहि सर्व धर्मपंथांत ज्या अर्थी आढळते त्या अर्थी धर्मविषयक भावनेच्या इतिहासांत अत्यंत प्राचीन कालांतहि ही असली पाहिजे असें मानण्यास हरकत नाहीं. आकाशदेवतेची पूजा करण्याची पद्धति स्वभाववादा[नॅचरॅलिझम]च्या व पशुपूजे[ॲनिमिझम]च्याहि पूर्वींची आहे कीं काय हें आज निश्चित सांगतां येत नाहीं.

सर्वत्र पूज्य मानल्या गेलेल्या या आकाशदेवतेचीं स्वरूपें, दर्जा व वैशिष्ट्य अनेक भिन्न प्रकारचें आढळतें. अमेरिकेंतील टोल्टेक लोक, मयलोक, इंकालोक, पेरुचे लोक व अत्यंत उत्तरेकडील एस्किमो लोक, तसेंच ब्राझिलमधील व ॲण्डीज पर्वतभागांतील लोक यांच्यामधील पौराणिक ग्रंथांत ही देवता आहे उत्तर आशियांतील शामानी पंथांत, व ऐनु लोकांत ही आकाशदेवता चिनांतील धर्मांतल्या व आद्य जपानी शिंटो धर्मांतल्यासारखी आहे. अंदमानांतील प्राचीन पुलुगु नांवाच्या देवतेशीं व हिंदुस्थानांतील वरुण देवतेशीं आकाशदेवतेचा संबंध आहे. दक्षिणेकडे आस्ट्रेलिया, पोलिनेशिया व मेलॅनेशिया येथील आकाशदेवतेचीं विशिष्ट लक्षणें प्राचीन काळांतहि खाल्डिया, सेमेटिक व मूळसेमेटिक राष्ट्रांतील आकाशदेवतेंत आढळतात तींच आहेत. परंतु या देवतेचें शरीरवर्णन अमेरिकेंतील आणि प्राचीन इजिप्तमधील धर्मांत व इतर पुष्कळ रानटी लोकांच्या धर्मांत जितकें स्पष्ट आढळतें तितकें इतर कोठेंच आढळत नाहीं. बगल लोकांतील इवतसु, यसोग लोकांतील पिर्डा, मुकुलु मरेग लोकांतील वरुग, फुकु लोकांतील उलेटिट गोल्डकोस्ट प्रदेशांतील रोपी, आयव्हरीकोस्टवरील न्यान्मो, किलिमांजारोमधील इरुरी, पूर्व अमेरिकेंतील कोंगोला वगैरे ठिकाणच्या त्या त्या देवता आकाशदेवतेचीं स्वरूपें आहेत.

आकाशदेवतेचें राज्य सर्वत्र असल्याचें आढळतें व अद्यापहि असंस्कृत अशा भूभागात या देवतेच वर्चस्व आहे आकाशदेवतेचें सार्वत्रिक अस्तित्व व तिच्या विशिष्ट गुणा तील सदृशता याचें कारण एकच आहे व तें विश्वरचनेमध्ये ज्या आद्य कल्पनात सर्वत्र आढळणारें एकवाक्यता हें होय. आकाश म्हणजे काय याचें वर्णनहि सर्वत्र सारखेंच आढळतें तें असें कीं, आकाश हा एक द्रवरूप पदार्थाचा मोठा साठा असून त्याला घनरूप पण दृश्य पदार्थाचें अधिष्ठान आहे व त्याच्या खालीं हवा, वारे व हें भूपृष्ठ पसरलेलें आहे समुद्राचा आकाशाशीं संबंध आहे, व मोठमोठ्या नद्यांचा उगम आकाशातूनच होतो आणि ढगांतून पडणारा पाऊस हे आकाशांतीलच पाणी होय पर्जन्यदेवता जलदेवता व इतर अनेक आकाशदेवता यांचीं कार्यें वरील वर्णनानुसार स्पष्ट करण्यात येतात. वातावरणात घडून येणारे इतर अनेक चमत्कारहि आकाशदेवतेकडून केले जातात अशा समजुती मुळें प्राथमिक अवस्थेंतील सर्व धर्मांत आकाशदेवतेला प्रमुख स्थान दिलेलें आढळतें.

आ का श दे व ते चा द र्जा व का र्य —आकाशदेवतेच्या ठिकाणचे गुण व तिचीं कार्यें यांची यादी देणें हें काम मात्र आहे या बाबतींत सर्व ठिकाणच्या वर्णनात साम्य आहे ही गोष्ट निरनिराळ्या धर्मांच्या तौलनिक अभ्यासान सिद्ध झाली आहे आकाशामार्फत होणाऱ्या अनेक कार्यांचीं कारणें शोधून काढीत असता मनुष्यानें आकाशदेवतेवर अनेक गुणांचा अध्यारोप केलेला आहे पर्जन्य व त्याचे भूपृष्ठावर होणार परिणाम हें आकाशदेवतेचें पहिलें कार्य असल्यामुळें पर्जन्य-वृष्टि, वादळ व आकाशातील वीज व मेघांचें गडगडण वगैरे कार्यें आकाशदेवतेचीं होत असें अनुमान मनुष्यानीं काढलें पर्जन्यवृष्टीमुळ भूपृष्ठावर अनेक प्रकारचीं जीवोत्पत्ति होते हें निदर्शनास आल्यावर आकाशदेवता ही प्राणदात्री आहे आणि वीज पडून मृत्यु आल्याचें पाहिल्यावर ती मरण देणारी आहे अशी कल्पना उद्भवली पुष्कळ धर्मांत आकाशदेवतेला उत्पत्तिकार्यात प्रमुख स्थान देण्यात आलेलें आहे काहीं धर्मांत आकाशदेवता पुल्लिंगी असल्याचें व काहीं धर्मांत स्त्रीलिंगी असल्याचें, व ती एकाकीच उत्पत्तिकार्य करीत असल्याचें मानलें आहे, तर इतर कांहीं धर्मांत आकाशाला देव व पृथ्वीला देवी मानून त्यांच्या संयोगानें जगदुत्पत्ति होते असें मानलें आहे याशिवाय पवित्र अग्नि विद्युत्, आकाशातून पडणारे जळते दगड, उल्कापात वगैरे गोष्टी आकाशदेवताच घडवून आणते असा समज पुष्कळ ठिकाणीं आढळतो ( वेदविद्या पा ३११ यौ देवता पहा)

[ सं द र्भ ग्रं थ —ब्रिटानिका, एनसायक्लोपीडिया ऑफ रिलिजन ॲन्ड एथिक्स, मीटिऑरालॉजिकल ग्लॉसरी, ज्योतिर्विलास ]

**आकाशयान**—"विमानविद्या" पहा

**आकूति**—स्वायंभु मनूच्या तीन कन्यातील पहिली वरुचि ऋषींची स्त्री हिला यज्ञ आणि दक्षिणा असें पुत्र-कन्यारूप मिथुन झालें होतें ( भाग स्कं. ३ अ १२ )

( २ ) प्रियव्रत राजाच्या वंशात जन्मलेल्या ऋषभ-देवाच्या कुळातील प्रसिद्ध जो विभु राजा, त्याच्या पृथुषेण नामक पुत्राची स्त्री हिला नक्त नावाचा पुत्र होता.

( ३ ) उत्तानपाद राजाच्या वंशातील जो व्युष्ट नामक राजा, त्याची स्नुषा व सर्वतेज(स)राजाची स्त्री हिच्या पुत्राचें नाव चक्षु. तोच पुढें सहावा मनु झाला होता (भागवत स्कं. ४ अ १३ ).

**आकृति** —एक कौशिकाचार्य ( गारुडविद्येचा आचार्य ) युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ केला त्या काळीं सहदेव दक्षिण दिशा जिंकण्यास गेला असता त्यानें यास जिंकून यापासून करभार घेतला होता ( म भारत सभा अ ३१ ).

( २ ) भोजराजा जो भीष्मक त्याचा भ्राता ( महाभारत स पर्व. अ १४)

**आकृति**—ज्या रेषायुक्त चित्रातील अवयवामधील भूमितिविषयक संबंध काहीं दृश्य जड वस्तूंमधील संबंध व्यक्त करितात त्या चित्रास त्या जडवस्तूंची आकृति म्हणतात.यांचे वर्गीकरण यांच्या उपयोगावरून व शिवाय मूळ वस्तु आणि तिची आकृति यातील सादृश्याच्या प्रकारावरून करण्यात येतें गणितविषयक ग्रंथातील आकृती वाचकाना ग्रंथांतरीं केलेलें गणिती विवेचन समजावें म्हणून दिल्या असतात. आकृतिरचनेचा व्याख्या शब्दात मागितलेला असते, अशाकरिता ती तोरून आकृति काढलेली नसली तर ती वाचकाना काढता यावी. सिद्धातातील विषयाभूत अंगें तींत स्पष्टपणें दाखवलेली असतात तीच आकृति उत्कृष्ट म्हणता येईल

आकृतींचा याखेरीज आणखी अगदीं निराळ्याच तऱ्हेनें उपयोग करिता येतो—तो म्हणजे, मापनाकरितां होय शिल्पशास्त्रज्ञ व इंजिनीयर्स नकाशे व आकृती यांचा उपयोग त्यावरील विशिष्ट अंतरांचे मापन करून खऱ्या परिमाणाचा हिशोब लावण्याकडे करितात अशा उपयोगाकरिता तर नकाशा शक्य तितका बिनचूक असणें अत्यवश्य आहे तेव्हां आतां आकृतींचें दोन वर्ग पाडता येतात एक स्पष्टी-करणार्थ काढलेल्या आकृती, या पाहणाऱ्याच्या मनाला विशिष्ट संबंधच केवळ ज्ञान करून देतात. दुसरा वर्ग म्हणजे प्रमाणशीर काढलेल्या आकृती, यावरून खरीं मापें घेता येतात खेरीज अशा काहीं आकृती असतात कीं त्यातील भागांचा मांडणी महत्त्वाची नसते पण त्यांचे एकमेकाशीं संबंध मात्र नीट व्यक्त करावे लागतात या प्रकारच्या आकृती म्हणजे विद्युत्संयोगाच्या व गुंतागुंती, गाठी, मिश्र-वर्तुळें ज्यात अंतर्भूत होतात त्या भूमितिशास्त्रातील असत त.

के व ळ व मि श्र चि त्रि स आ कृ ती —आकृतींचे आणखीहि वर्ग पाडता येतात. आकृतींतील विशिष्ट बिंदू अक्षरांनीं

अगर काही खुणानीं मात्र दिग्दर्शित केलेले असतात पण ज्यात सांकेतिक चिन्हें मुळीच उपयोजलेली नसतात अशा आकृतींना शुद्ध किंवा केवल चित्रित आकृती (ग्रॅफिक) म्हणावें, ज्यात मूळ परिमाणें आकृतींतील भागांच्या परिमाणावरून ठरविलीं जात नसून, संख्यासारख्या सांकेतिक चिन्हांनीं दिग्दर्शित केलेलीं असतात त्याना मिश्र आकृती म्हणावें जसें, एखाद्या नकाशात स्थळाची समुद्रसपाटीपासून उंची, समुद्रसपाटीपासून जितके फूट एखाद स्थळ असतें ती फुटाची संख्या नकाशात स्थळानुरूप जागीं मांडून दाखविली जाते. दुसरी एक पद्धति आहे तींत जिला परिधिरेषा म्हणतात ती रेषा समुद्रसपाटीपासून विशिष्ट (फूट) उंचीवरील नकाशांतील सर्व स्थळांवरून गेलेली असते व उंचीच्या फुटाची संख्या रेषेवरील एखाद्या बिंदुजवळ मांडलेला असते अशा अनेक परिधिरेषांचा उपयोग करून नकाशातील पुष्कळ स्थळांची उंची चिन्हांच्या थोड्याशा सरपेनें व्यक्त करिता येते तथापि ही पद्धत शुद्ध चित्रित पद्धत नसून वस्तूंचें तिसरें परिमाण आकृतींत दुसऱ्या दोन परिमाणानीं दाखविण्याची काहीं अंशीं तिला सांकेतिक पद्धत म्हणता येईल.

ज्यात दोहोंपेक्षा जास्त चल महत्त्वमानें आहेत अशा महत्त्वमानांतील संबंध पूर्णपणें शुद्ध चित्रित पद्धतीनें दाखविण्यासाठीं आपणाला एकाहून अधिक आकृती काढाव्या लागतील उदाहरणार्थ, बांधणीच्या कामात तीन परिमाणें असणाऱ्या वस्तूचा आकार दाखविण्यासाठीं आपणाला योजनेचे व उंचीचे नकाशे व निरनिराळ्या पातळींतील छेद (सेक्शन्स) या आकृती घ्याव्या लागतात या आकृतिमालिकेंत एका आकृतींतील एक बिंदु दुसऱ्या आकृतींतील एका बिंदूशीं मिळता असतो व सर्व आकृतींतील असे सदृश बिंदू एकाच अक्षरानीं लिहिलेले असतात

घनचित्रदर्शन —स्टेरिओस्कोप (भरीव फाटो दाखविणारें यंत्र) मधील जशा दोन आकृतींचा एकत्र उपयोग केल्यानें तीन परिमाणयुक्त अशा वस्तूंचें रूप दिसतें, त्या आकृती म्हणजे अगदीं जवळच्या दोन बिंदूपासून घेतलेले वस्तूंचे प्रक्षालेख (प्रोजेक्शन्स)होत ज्या बिंदूपासून प्रत्यालेख घ्यावयाचे ते इतके जवळ जवळ असतात कीं, या दोन आकृती एकएका डोळ्यानें अशा एकाच वेळीं पाहिल्यास आपणास सहजच सदृश असणारे बिंदू एकरूप दिसतात ज्या योगानें आपणांला दोन आकृती एकस्मयावच्छेदेंकरून पाहता येतात व एका आकृतींतील विशिष्ट बिंदू आणि दुसऱ्या आकृतींतील विशिष्ट बिंदू याच्यांतील सादृश्य ओळखिता येतें ती वरील स्टेरिओस्कोपची पद्धत शास्त्रामध्यें आज सांगाईत हात असलेल्या पद्धतींमध्यें अतिशय सामर्थ्यवान् व फलदायी म्हणता येईल अशा रीतीनें शुद्ध भूमितींत मजातीय, अन्योन्य व विपरीत प्रतिमांच्या सिद्धांतानी शास्त्रामध्यें बरीच प्रगति केली आहे

आकृतिलेखक— एखाद्या समपृष्ठाकृति (प्लेनफिगर) ची बरोबर, लहान किंवा मोठी नक्कल करण्याचें यंत्र त्यास आकृतिलेखक (पॅंटोग्राफ) म्हणतात याचें स्थूलमानानें आकृति खालीलप्रमाणें देता येईल




वरील आकृतींत अआ व अइ हे दोन लांब हात अ या ठिकाणीं सांधलेले आहेत, व ईउ आणि ईऊ हे लहान हात एकमेकांशीं ई या ठिकाणीं आणि लांब हाताशीं उ व ऊ येथें सांधलेले आहेत ईउ हा अऊ बरोबर करून घेतला आहे आणि तसाच ईऊ हा अउ बराबर करून घेतला आहे. तेव्हा अ या ठिकाणीं कितीही अंशाचा कोन झाला तरी अउईऊ हा नेहमीं समांतरभुज चौकोन राहतो हें यंत्र फिरतीं चाकें लावून कागदाशीं समांतर असें ठेविलेलें असतें अइ या लांब हाताच्या टोंकाशीं क या ठिकाणीं बहुधा एक उभी नळी बसविलेली असते व अशाच तऱ्हेच्या नळ्या आउ व ईउ या लहान हातावर सरकणाऱ्या तकटावर उभ्या केलेल्या असतात या नळ्या, ज्याभोंवतीं यंत्र फिरतें त्या वजनदार आलंबावरील आंसाचा खिळा धरण्याकरिता, किंवा पोलादी सूची किंवा पेन्सिल आंत बसविण्याकरिता केलेल्या असतात जेव्हां नळ्यांचे मध्यबिंदू बरोबर एका रेषेंत असतील (आकृतींतील क ख ग बिंदू आहेत त्याप्रमाणें) तेव्हा गउख हा लहान त्रिकोण गअक या मोठ्या त्रिकोणाशीं नेहमीं सरूप असेल तेव्हा जर आलंब गच्या खालीं ठेवला, पेन्सिल ख येथें लाविली आणि सूची क या ठिकाणीं बसविली तर यंत्र आलंबाभोंवतीं फिरत असताना पेन्सिल व सूचा एकमेकांना समांतर अशीं अनुक्रमें गख गक या प्रमाणात फिरू लागतील. या रीतीनें ख या ठिकाणीं असलेली पेन्सिल क येथाल सूची ज्यावरून फिरते त्या नकाशाची एक लहान प्रत काढील, जर पेन्सिल आणि सूची यांच्या स्थानांची अदलाबदल केली तर मोठा नकाशा निघेल जर आलंब आणि पेन्सिल यांचा अदलाबदल केली व रव या बिंदूंत गकचा मध्य आणण्याची योजना केली, तर नकाशा मूळ नकाशाबरहुकूम (त्याच प्रमाणाचा) निघेल आउ आणि इउ हातांवर १, १ अशीं गुणोत्तरें दर्शविणाऱ्या रेषा खोदलेल्या असतात त्यायोगें ज्या

प्रमाणात नकाशा पाहिजे असेल त्याप्रमाणें काढता येतो. आहर्तिलक यंत्रांच्या अनेक तऱ्हा निघाल्या आहेत. जी. पेलेहैनच्या " डर पॅन्टोग्राफ " ( बर्लिन १९०३ ) या ग्रंथात यांच्या अनेक स्वरूपाची माहिती आढळते

आका.—ही आफ्रिकेंतील निग्रो जातींत सर्वांत ठेंगणी जात आहे. या जातींतील लोकांची सरासरी उंची ४ फुटापेक्षा जास्त नसते. काँगो संस्थानांतील अरुविमि जिल्ह्यांतील जंगली प्रदेशात हे लोक राहतात. त्यांचा रंग भाजलेल्या कॉफीप्रमाणें असून त्यांचे जबडे पुढें आलेले व नाक रुंद असतें. त्यांचें पोट पुढें आलेलें असून पाठीला कणा अवग्रह या चिन्हाच्या आकाराचा असतो त्याच्या कमरेच्या खालच्या भागाच्या मानानें वरचा भाग लांब असतो.

आका लोक जंगलांत राहून पारधीवर उपजीविका करतात. ते हस्तिदंत व मध गोळा करतात व ते देऊन त्यांच्या मोबदला ते तंबाखू, धान्य अगर लोखंडी हत्यारें घेतात. ते फार चलाख परंतु भित्रे आहेत. त्यांचा पोषाख, हत्यारें व भांडीं हीं सभोंवतालच्या निग्रो लोकांप्रमाणें असतात. ते जंगलांत पानें व झाडांच्या फांद्या यांच्या गोल झोंपड्या बांधून त्यांत राहतात.

**आक्सम.**—अबिसीनिया देशांतील, टायग्रे प्रांतांतील एक प्राचीन शहर. हें १४°, ७', ५२" उत्तर अक्षांश व ३८°, ३१', १०" पूर्व रेखांश यावर आहे प्राचीन ग्रंथांतून या ठिकाणीं मोठें राज्य होतें व हीं एक प्रसिद्ध व्यापारी पेठ होती, असा उल्लेख आलेला आहे. अबिसीनियाच्या राजाना या शहरींच राज्याभिषेक करण्यात येई १८७१ मिंवा १८७२ सालीं जॉन राजाला येथेंच राज्याभिषेक झाला

सध्या आक्सम शहरात १००० घरेंहि नाहींत व प्राचीन शहरानें व्यापिलेल्या क्षेत्रफळाच्या एका लहानशा भागात तें वसलें आहे.

प्राचीन काळच्या वैभवाची साक्ष पटवून देणाऱ्या अशा काहीं वस्तू येथें सापडल्या आहेत येथील जुन्या व भव्य इमारतींच्या नाशाचें कारण म्हटलें म्हणजे मादश्रुम या नदीच्या प्रवाहानें त्यांचा पाया ढांसळला हें होय असें बेंट हा म्हणतो. याला कित्येक जातींचा धर्मवेडेपणाहि कारणीभूत झाला असावा असाहि एक तर्क आहे.

**आक्टरलोनीखोरें**—मद्रास इलाख्यातील निलगिरी जिल्ह्याच्या गुडलुर तालुक्यातील एक रमणीय खोरें. याचें क्षेत्रफळ ३९ चौ. मैल व समुद्र सपाटीपासून सर्वसाधारणपणें ३००० फूट उंची आहे. या खोऱ्यात काफी, चहा व सिन्कोनाची लागवड होते. १९०१ सालीं लोकसंख्या ५२६५ होती

**आक्टरलोनी-सर डेव्हिड** ( १७५८-१८२५ )—हा ब्रिटिश सेनापति बोस्टन येथ १२ फेब्रुवारी १७५८ रोजीं जन्मला, आणि कॅडेट म्हणून (१७७७ त) हिंदुस्थानात आला यानें कोईल, अलीगड आणि दिल्ली येथील लढायांतून लॉर्ड लेकच्या हाताखालीं काम केलें. पुढें १८०३ मध्यें दिल्ली येथें त्याला रेसिडेंट नेमण्यात आलें. १८१४ मध्यें मेजर-जनरल असतांना होळकराच्या हल्ल्यापासून त्यानें त्या शहराचा मोठ्या शौर्यानें बचाव केला नेपाळयुद्ध ( १८१४-१८१५ ) सुरू झालें तेव्हां एका पथकावर त्याला सेनापति म्हणून नेमण्यात आलें होतें व १८१५मध्यें त्याच्या कामगिरीबद्दल त्यास बॅरोनेट करण्यात आलें पुढें काटमांडूवर चाल करून जाणाऱ्या सर्व सेनेचें आधिपत्य त्याला जेव्हां देण्यात आलें, तेव्हां आपल्या हुशारीनें गुरखे लोकांचे सर्व डावपेंच हाणून पाडून, या युद्धात त्यानें विजय मिळविला व १८१६ मध्यें सेगवली येथें तह घडून आणला या मर्दुमकीबद्दल ऑक्टरलोनीला जी सी बी. केलें हिंदी सैन्यात हा मान मिळविणारा पहिला अधिकारी ऑक्टरलोनीच होय पेंढारीयुद्धात ( १८१७-१८१८ ) त्याच्याकडे राजपुताना-पथक दिलें होतें. त्यानें अमीरखानाशीं स्वतंत्र करार करून त्याला इतर पेंढाऱ्यांपासून विभक्त केलें नंतर आपलें सैन्य शत्रूच्या दोन मुख्य तुकड्यांमधून नेऊन काहीं चकमक न उडविता लढाईचा शेवट केला १८१८ मध्यें राजपुतान्यात त्याला रेसिडेंट नेमिलें जेव्हां दुर्जनसालनें भरतपूरचा बालराजा बलवंतसिंग याच्या विरुद्ध बंडाळी माजविली ( १८२५ ) तेव्हां ऑक्टरलोनीनें स्वतःच्या जबाबदारीवर राजाला मदत करण्याचा जाहीरनामा काढून तसा आपल्या सैन्याला हुकूम दिला. त्या वेळचा गव्हर्नर जनरल लॉर्ड ॲम्हर्स्ट याला ऑक्टरलोनीचें करणें पसंत पडलें नाहीं तेव्हां ऑक्टरलोनीला अतीशय अपमान वाटून त्यानें राजीनामा दिला व तो दिल्लीस गेला आपल्या इतक्या दिवसाच्या इमानेंइतबारें केलेल्या नोकरीची गव्हर्नरजनरलला काहींच किंमत वाटू नये याचा त्याला खेद होऊन त्याला लवकर मृत्यु आला असें म्हणतात. १५ जुलै १८२५ रोजीं मिरत येथें त्याचा अंत झाला. कलकत्ता येथें ऑक्टरलोनीचें स्मारक म्हणून एक स्तंभ उभारलेला आहे

**ऑक्सफोर्ड**—ऑक्सफर्ड ( ? ). इंग्लंडमधील ऑक्सफोर्डशायर परगण्यातील शहर, काउंटीटाऊन, म्युनिसिपल व पार्लमेंटरी बरो. हें शहर विश्वविद्यालयासाठीं प्रसिद्ध आहे. लोकसंख्या (७९०१) ५७०५२ हें थेम्स नदीवर आहे थेम्स व चेरवेल नद्यामध्यें प्राचीन ऑक्सफोर्डची जागा असावी

पूर्वपश्चिम व दक्षिणोत्तर जाणाऱ्या मुख्य रस्त्याचा मिलाफ जुन्या ऑक्सफोर्डच्या केंद्रावर झाला आहे याला कॅरफॅक्स असें नांव असून येथून हायस्ट्रीट, कॉर्नस्ट्रीट, कॉर्नमार्केटस्ट्रीट. व सेंट आल्डेट्स असे चार रस्ते फुटतात. ऑक्सफोर्ड फार मजबुतीच्या ठिकाणी वसलें आहे

**इतिहास.**—ऑक्सफोर्ड व केंब्रिज यामधील वैमनस्यामुळें त्यांच्या स्थापनेविषयीं पुष्कळ दंतकथा प्रचलित होत्या कित्येक आक्सफोर्डचा संबंध ब्रूट दि ट्रोजन राजा मेम्प्रिक (ख्रि पू १००९) व ड्रुइड यांच्याशीं लावीत परंतु एवढें मात्र खरें कीं, येथें विश्वविद्यालयाची स्थापना शहरानंतर झाली

थेम्स व चेरवेल यांच्यामधील द्वीपकल्पावर एक लहानसें 'रोमनो नामक ब्रिटिश खेडें असावें. मर्सिया व वसक्स यांच्या सरहद्दीवर ऑक्सफोर्ड हें एक महत्त्वाचें ठाणें होतें यावि-षयीं ९१२ सालचा एक उल्लेख इंग्लिश बखरींत आहे. वरच्या थेम्सच्या खोऱ्यांतील हें तटबंदीचें ठिकाण असल्यामुळें यावर डेन्स लोकांनीं पुष्कळ हल्ले केले. शिवाय राजकीय दृष्ट्या हें महत्त्वाचें असून येथें 'विटेना गेमॉट' या सभेच्या बऱ्याच बैठकी झाल्या. नॉर्मन विजयाच्या वेळेस ऑक्सफोर्ड शहराचें बरेंच नुकसान झालें असावें. रॉबर्ट डि ऑइलि नावाच्या नॉर्मन शेरिफाच्या अंमलाखालीं ऑक्सफोर्डची फार भरभराट झाली. यानेंच किल्ल्याचा बुरूज व सेंट मायकेलचें प्रार्थनामंदिर बांधलें स्टीफननें ११४२ सालीं येथील किल्ल्यास वेढा दिला, त्या वेळीं महाराज्ञी मॅटिल्डा इनें त्याच्या हातावर तुरी दिल्या व ती ॲबिंग्डनला गेली

शिक्षणासंबंधीं पहिला संघटित असा प्रयत्न ११३३ त झाला १२१४ त येथें एका विद्यापीठाधिकाऱ्या (चान्सेलर)ची नेमणूक झाली विश्वविद्यालयाचा आरंभ कधीं झाला याची माहिती मिळत नाहीं परंतु ऑक्सफोर्ड हें विद्येचें केन्द्र होण्यास ब्यूमाँट येथें वारंवार भरत असलेला दरबार बऱ्याच अंशीं कारणीभूत झाला १३ व्या शतकांत येथ वेगवेगळे ख्रिस्तीधर्मपंथ आले व त्यामुळें येथील विद्यादानावर बराच परिणाम झाला. तरी पण या शतकांत ऑक्सफोर्डचें राजकीय महत्त्व कायमच राहिलें येथें पार्लमेंटच्या पुष्कळ बैठकी झाल्या त्यांतल्या त्यांत "मॅड" पार्लमेंटची बैठक (१२५८) महत्त्वाची आहे त्याच बैठकींत "ऑक्सफोर्डच्या शर्ती" (प्रोव्हिजन्स ऑफ ऑक्सफोर्ड) तयार झाल्या. १३ व्या शतकाच्या शेवटच्या दशकांत येथें कॉलेजपद्धतीची सुरुवात होऊन तिच्याअन्वयें मर्टन युनिव्हर्सिटी व बेलिअल या कॉलेजांची स्थापना झाली. युनिव्हर्सिटीचें वर्चस्व व तिला राजाकडून मिळत असलेला पाठिंबा यामुळें शहरच्या लोकांचें तिच्याशीं वैमनस्य आलें. या वैमनस्याचें पर्यवसान पुढें सेंट स्कोलॅस्टिकाच्या भयंकर दंगलींत झालें परंतु राजांनीं विश्वविद्यालयाला वेळोवेळीं सनदा व हक्क दिले १५७१ च्या इलिझाबेथ राणीच्या कायद्यानें ऑक्सफोर्ड व केंब्रिज विश्वविद्यालयांस मान्यता मिळाली

मेरीच्या कारकीर्दींत ब्रॉडस्ट्रीटमधल्या एका भागीं प्रसिद्ध रिडले, लॅटिमर व क्रॅनमर यांनीं स्वमतार्थ प्राणत्याग केला. त्यांचें स्मारक म्हणून या ठिकाणीं नवीन तऱ्हेचा, परंतु सुशोभित असा क्रूस केला आहे या धामधुमीच्या काळांत विश्वविद्यालयाचें बरेंच नुकसान झालें परंतु इलिझाबेथ व वोलसे (वूल्से) यांनीं हें नुकसान भरून काढलें राजा व पार्लमेंट यांच्यामधील यादवींत ऑक्सफर्ड, येथें राजपक्षाचें मुख्य ठाणें असून पहिल्या चार्लसनें पार्लमेंट येथें भरत असे. पुढें राजपक्षाचा पराभव झाल्यामुळें चार्लस पळून गेला व ऑक्सफोर्डला वेढा पडून तें शहर १६४६ त पार्लमेंटपक्षाच्या स्वाधीन झालें या लढाईच्या धामधुमींत विश्वविद्यालयांत अभ्यास व शिस्त यांची फार अनास्था झाली व क्रॉमवेल जरी चान्सेलर झाला तरी त्याची भरपाई झाली नाहीं. राज्यसत्तेच्या उत्कर्षाबरोबर विद्यार्थी व शहरवासी यांच्यांत तेढ उत्पन्न झाली. ऑक्सफोर्ड येथें शेवटची पार्लमेंट दुसऱ्या चार्लसनें १६८१ त भरविली. दुसऱ्या जेम्सशीं विश्वविद्यालयाचें अधिकाऱ्यांच्या नेमणुकीच्या बाबतींत वैर आलें हें शहर पुढें जॅकोबाईट पक्षाचें म्हणून प्रसिद्धीस आलें हॅनोव्हेरियन काळांत येथील लोक हॅनोव्हेरियन पक्षाचे झाले व विश्वविद्यालय जॅकोबिन पंथास चिकटून राहिलें शेवटीं तिसरा जॉर्ज १७५५ त ऑक्सफोर्ड येथें गेला असतां हे दोन्ही पक्ष एकत्र होऊन त्यांच्यातील पक्षभेद नामशेष झाला येथूनच ऑक्सफोर्डचा राजकीय इतिहास संपतो.

ऑक्सफोर्ड शहरांतील विद्यालयें, ऑल सोल्स कॉलेज (१४३७):—या शिक्षणसंस्थेंतील शिक्षकमंडळ बहुतेक पदवीधरांचें बनलेलें आहे. या विद्यालयाला सर क्रिस्टोफर कॉडरिंग्टन यांनीं आपलें ग्रंथालय अर्पण केलें

बेलिअल कॉलेज (१२६३)—हें जुन्यापैकीं एक विद्यालय असून विद्वत्तेबद्दल याची फार ख्याति आहे.

ब्रॅसेनोज कॉलेज (१५०९)—हें बी. एन सी नावानें प्रसिद्ध आहे.

ख्राइस्ट चर्च (१५३२)—मंडळींच्या बाजूनेंत हें ऑक्सफोर्डमधील सर्वांत मोठें विद्यालय असून याची घटना विशेष तऱ्हेची आहे. ब्रिटिश व इतर राजघराण्यांतील बरेचसे पुरुष ह्या विद्यालयांत शिकले शिवाय १९ व्या शतकांतील सुमारें १० प्रधानांचा विद्याभ्यास ह्या विद्यालयांत झाला. येथें 'टॉम' नावाची मोठी घंटा आहे

कॉर्पस ख्रिस्ती कॉलेज (१५१६)—येथील लहान ग्रंथालयांत दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखितें यांचा संग्रह आहे

एक्झीटर कॉलेज (१३१४).—ह्या विद्यालयाच्या व बॉडलियन ग्रंथालयाच्या इमारतींच्या दरम्यान एक सुंदर, गर्द असा बाग आहे

हर्टफोर्ड कॉलेज (१८७४)—हें नवीन स्थापन झालेलें विद्यालय आहे.

जीझस कॉलेज (१५७१):—ह्या विद्यालयाचा संबंध वेल्सशीं विशेष येतो.

केबल कॉलेज (१८६९).—हें विद्यालय अगदींच नवीन असून जॉन केबलच्या स्मरणार्थ वर्गणी जमवून बांधिलें आहे.

लिंकन कॉलेज (१४२७):—हें विद्यालय वायक्लिफच्या मतावर प्रतिगामी धोरण म्हणून स्थापन झालें

मॉडलिन कॉलेज(१४५६)—ह्या विद्यालयाची इमारत फार प्रेक्षणीय असून समोरच्या बाजूस घंटाघर आहे.

मर्टन कॉलेज ( १२७० )—सध्याच्या चालू कॉलेज-पद्धतीवरचें हें पहिलें विद्यालय होय. येथील प्रार्थनामंदिर व ग्रंथालय ह्या इमारती महत्त्वाच्या आहेत

न्यू कॉलेज ( १३८६ ):—राजा व पार्लमेंट यामधील यादवीच्या वेळीं येथील टॉवरमध्य व मठाच्या खोलींत राजपक्षीयांचा शिलेखाना होता.

ओरिएल कॉलेज (१३२६):—ह्या विद्यालयातील प्रसिद्ध लोकांनीं ' ऑक्सफोर्ड-चळवळींत ' भाग घेतला आहे

पेम्ब्रोक कॉलेज ( १६२४ )—ह्या विद्यालयात सॅम्युअल जॉन्सनच्या वेळचे कांहीं अवशेष आहेत.

क्वीन्स कॉलेज ( १३४० ):—तिसऱ्या एडवर्डची राणी फिलिपा इच्या स्मरणार्थ याला सध्याचें नाव मिळालें.

सेंटजॉन्स ( १५५५ ), ट्रिनिटी ( १५५४ ), वॅडहॅम (१६१३), आणि वॉर्सेस्टर (१७१४) हीं दुसरीं विद्यालयें आहेत

युनिव्हर्सिटी कॉलेज ( १२४९ )—विश्वविद्यालयाच्या बऱ्याच अगोदर आल्फ्रेडनें याची ८७२त स्थापना केली अशी दंतकथा आहे

कोणत्याहि कॉलेजचा मेंबर असल्याशिवाय परीक्षेला बसण्याचा फायदा १८६८ पासून विद्यार्थ्यांस मिळाला येथे स्त्रियासाठीं चार विद्यालयें असून त्यांना पदवी मात्र मिळत नाहीं.

विश्वविद्यालयाच्या इमारती ब्राडस्ट्रीट व हायस्ट्रीट यांच्या मध्ये आहेत त्यात बोडलीयन ग्रंथालय, क्लॅरेन्डन मुद्रणालय, कान्व्होकेशन हाऊस, रॅडक्लिफ ग्रंथालय ( साप्रत बॉडलीयन ग्रंथालयाची वाचनालयाची खोली ) या मुख्य इमारती आहेत याशिवाय विश्वविद्यालयाचें चित्रसंग्रहालय, ॲशमोलियन पदार्थसंग्रहालय व टेलरची आधुनिक यूरोपीय भाषांची संस्था अशा दुसऱ्या इमारती आहेत. विश्वविद्यालयाचें पदार्थसंग्रहालय, रॅडक्लिफ वेधशाला, हिंदी विद्यार्थी व हिंदी विषय यांच्यासाठीं हिंदी इन्स्टिटयूट व ऑक्सफर्ड युनियन सोसायटी ह्या दुसऱ्या संस्था आहेत

विश्वविद्यालयाचें शासन त्याने केलेल्या कायद्याप्रमाणे चालतें प्रत्येक विद्यालयाचा कारभार स्वतंत्र असतो विश्वविद्यालयाला पार्लमेंटसाठीं दोन सभासद निवडण्याचा हक्क आहे. हिंदी व इतर परकीय विश्वविद्यालयातील विद्यार्थ्यांसाठीं येथे काही सोई केल्या आहेत.

ऑक्सफोर्ड शहरातर्फे एक प्रतिनिधि पार्लमेंटसाठीं निवडतात

**आंका.**—हे लोक मंगोल मानववंशातले दिसतात. यांचा चेहरा रुंद व वाटोळा, नाक चपटें व ओठ बारीक असतात. यांची संख्या फारशी मोठी नाहीं, पण हे फारच रानटी असल्यानें यांच्या शेजाऱ्यांना, उदाहरणार्थ चारद्वारच्या लोकांनां यांच्या दरोड्याची फार दहशत असते. त्यांचे मूळचे दोन वर्ग आहेत—हाजारी खाखा आखा ( किंवा " अग्निभक्षक " ) आणि काप्पाचोरे आखा ( किंवा "कापूसचोर" ). हे दोन्ही वर्ग लूटमार करणारे असून जमीनदाराची सत्ता धाब्यावर बसवीत; तेव्हा १८३६ मध्यें यांच्यावर मोहीम निघून, यांच्या चागल्या वर्तणुकीबद्दल पुढाऱ्यांना वेतन देऊन जामीन घेण्यांत आले, व त्यांच्याकडून शपथा घेवविल्या; त्या शपथापावेतों मोडल्याचें दिसून आलें नाहीं हे लोक इतके असंस्कृत आहेत कीं, जमीन-लागवडाची त्याना माहिती नाहीं. ते गुराढोरांचे कळप बाळगून त्यावर उपजीविका करितात ते गाईचें मास खातात पण दुधाला शिवत नाहींत. भाले, धनुष्यबाण आणि तीक्ष्ण तरवारी हीं त्यांचीं हत्यारें होत. धर्मासंबंधींची यांची कल्पना स्पष्ट नाहीं,प ते पर्वत, नद्या आणि ज्या दाट जंगलात त्यांचीं गुरें चुकतात तीं जंगलें भीतिदायक मानितात हे मृतांना पुरतात व मृत पूर्वजांच्या आत्म्याविषयीं आदर बाळगितात.

**आखाडे**—उर्फ तालमीच्या जागा याना संस्कृत नाव मल्लगृहें आणि फारसी नाव तालीमखाने असें आहे यांची प्रसिद्धि हिंदु लोकात फार प्राचीन कालापासून आहे. पांडवांपैकीं मल्लविद्येंत प्रवीण असलेल्या भीमानें द्रौपदीचा अपमान करणाऱ्या कीचकास व इतर दुर्योधनादि अनेक प्रतिस्पर्ध्यास मल्लयुद्ध करूनच ठार मारलें अशी हकीकत महाभारतात आहे त्याचप्रमाणें हरिवंश पुराणात श्रीकृष्णाच्या मल्लयुद्धाचा व इतर अनेक पुराणातहि अशा मल्लयुद्धाचा उल्लेख आलेला आहे येणेंप्रमाणे मल्लविद्येची आवड हिंदु लोकात फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे

धा र वा ड क डी ल आ खा डे —धारवाड जिल्ह्यातील आखाड्यांना बरेंच महत्त्व आहे. धारवाड जिल्ह्याच्या पूर्व भागांत प्रत्येक मोठ्या खेड्यात एक तरी तालीम असतेच मोठाल्या गावात एकाहून अधिक तालमी असतात या जिल्ह्याच्या पश्चिम भागात तालमीचें प्रमाण जरा कमी आहे ही तालमींची जागा सात फूट उंचीची बांधलेली असते तिच्या भिंतींना चुना देऊन त्यावर तांबडे पट्टे ओढतात व त्यामध्यें शिकारींचीं, कुस्त्यांचीं वगैरे चित्रें काढलेलीं असतात. या इमारतीला खिडक्या मात्र मुळींच ठेवीत नाहींत फक्त एक लाकडी दरवाजा असतो भिंतीच्या बाजूला दोनअडीच फूट उंचीचा एक रुंद ओटा बांधलेला असतो व त्यावर लोक गाणीं म्हणत व विड्या फुंकीत बसतात.

तालमीच्या खोलीच्या पुढें मोकळी जागा असते व तींत कुस्त्या खेळण्याकरिता जागा तयार केलेली असते. तालमीच्या घरात कुस्ती खेळण्याच्या जागेला लागून दुसऱ्या दोन तीन खोल्या असतात. त्यात एका ठिकाणी मल्लखांब व दुसऱ्या ठिकाणीं जोरजोडी, बैठका वगैरे मेहनत करतात शिवाय हिंदूच्या तालमींत मारुतीची मूर्ति आणि मुसुलमानांच्या तालमींत अल्लाचा पंजा पूजेकरिता ठेविलेला असतो हिंदु लोक शनिवारीं आणि मुसुलमान लोक गुरुवारीं या देवाची पूजा करितात शिवाय तालमीमध्यें

कुस्ती खेळणाऱ्याच्या अंगाला लावण्याकरितां काव ठेवलेली असते. गांवच्या तालमीमध्यें ब्राह्मण, वाणी, जैन, लिंगायत, मराठे, मुसुलमान वगैरे सर्व जातींना परवानगी असते. मात्र अस्पृश्य जातींच्या तालमी निराळ्या असतात. तालमीमध्यें १० ते ३० वर्षापर्यंतचे इसम येतात. तालमींत जाणारे लोक दूध पितात व हरभऱ्याची भिजलेली डाळ किंवा तुपांत भिजविलेल्या खारका, किंवा जिलबी वगैरे खुराक खातात. तालमीचा शोक असणारे लोक बहुधा २५ वर्षांच्या वया पर्यंत लग्न करीत नाहींत. कुस्तीमध्यें नावाजलेले पहिलवान लग्न झाल्यावरहि बायकोला घेऊन फारसे रहात नाहींत. मात्र कुस्तीमध्यें एक दोनदा हार आल्यावर कुस्तीचा नाद सोडून पूर्णपणें संसारांत पडतात.

कुस्त्यांचे सामने वर्षांतून एकदां दसऱ्याच्या सुमारास मोठ्या प्रमाणावर होतात त्याच्या आधीं एक महिनाभर सामनेवाले लोक मुद्दाम पौष्टिक पदार्थ खाऊन विशेष मेहनत करितात. कुस्ती जिंकणाऱ्यास हातांतलें कडें किंवा पागोटें किंवा कबजा बक्षीस म्हणून देतात. सामन्याच्या दिवशीं देवापुढें एक दोन बकरीं मारून त्याचे हातपाय देवतेच्या पुढें दगडाखालीं पुरून ठेवितात आणि त्याचें मांस मुसुलमान मराठे वगैरे तालमींतले लोक खातात. तालमींतले ब्राह्मण, जैन, लिंगायत वगैरे शाकाहारी लोक मांसा ऐवजीं फळें व पेढे, जिलबी वगैरे गोड पदार्थ खातात. मेहनत करतांना व कुस्ती खेळतांना लंगोट व चड्डी घाल तात. बहुतेक तालीमबाज लोक आपले कपडे तांबड्या मातीनें रंगवितात. तालीम करण्याची वेळ पहांटे ४ ते ६ व रात्रीं ८ ते १० पर्यंत असते. तालमींमध्यें जोर व बैठका मारणें हे मेहनतीचे मुख्य प्रकार असून जोडी करणें, वजनें उचलणें व कुस्ती खेळणें या गोष्टी असतात.

वेश्यांच्या मुली आणि धंदेवाले पहिलवान सार्वजनिक आखाड्यामध्यें न जातां घरीच तालीम करितात. वेश्यांच्या मुली सर्कशीमध्यें शारीरिक कसरतीचीं कामें करितात. कुस्ती मात्र खेळत नाहींत. अशा वेळीं गळ्यापासून घोट्यापर्यंत घालावयाचा पोषाख अंगाबरोबर घट्ट बसेल अशा प्रकारचा केलेला असतो. व त्यावरूनच कमरेभोंवतीं व खांद्यावरून एक लहानसें वस्त्र गुंडाळलें असतें. मुली पुरुषाप्रमाणेंच तालीम करितात परंतु कुस्त्या करीत नाहींत.

**पेशवाईंतील कुस्त्यांचे आखाडे**—यांची कल्पना खालील त्या वेळच्या एका पत्रांतील मजकुरावरून येईल "श्रीमंतांच्या वाड्यांत पेचमांस जेठी यांच्या लढाया जाहल्या. कर्नाटकांतून पेशजी तीन जेठी आले होते. अडीच महिने रतीब खाऊन बनून गेले काल कुस्ती जाली. त्यास तिघा जेठ्यांपैकीं दोघे जेठी यास येथील शहरांतील तालमीच्या आखाड्यांतील मल्लांनीं चीत केलें. एकास मलवा गोंडी यानें व एकास कसबा गोंडी यानें याप्रमाणें दोघांनीं दोघांस चीत केलें. एक जेठी कर्नाटकाचा त्यांनीं व आबाजी सुतार याची कुस्ती झाली. आबाजीस त्यानें चीत केलें. आणखी तालमींचे आखाड्यांतील गल्लोगल्लींच्या कुस्त्या जाहल्या. आणखी कर्नाटकाचे पहिलवानास रतीब दिला आहे. मास-पक्ष जाहल्यावर आणखी लढाई होईल" ११ दिसें १७८२ (ऐतिहासिक-लेखसंग्रह भा. ८ पा ४१५९)

मेवाडच्या विक्रमाजिताला (१५३५) तालमीचा शोक असे (टॉडचें राजस्थान भाग पहिला पृ ३२१). तो आपला वेळ तालीमबाजांच्या संगतींत घालवी. थोरल्या माधवराव पेशव्यानांहि तालमीचा फार नाद होता कारण त्यांनीं आपल्या मातुश्रीला धाडलेल्या एका पत्रांत येणेंप्रमाणें उल्लेख आला आहे —"वडिलीं तुम्हांजवळ आज्ञा केली कीं, तालीम न करणें म्हणून वारंवार तुम्हांजवळ आज्ञा झाली त्यास मला वडिलांचे आज्ञेपेक्षां तालीम अधिक कीं काय? तालीम सोडली. नमस्कार मात्र घालीत असतो" [ऐ ले सं पत्र नं ७२१, ३१ मे १७६७].

**आखोभगत**—अमदाबादेजवळ राजपूर म्हणून गांव आहे तेथील हा राहणार हा जातीचा सोनार होता हा शालिवाहन शकाच्या १६४० व्या वर्षी होता यानें गुजराथी भाषेत केलेली अक्षय गीता त्या प्रांतीं प्रसिद्ध आहे (का गु.)

**आगगाडी**—आगगाड्यासंबंधानें यांत्रिक माहिती द्यावयाची ती रूळ, ब्रेक व एंजिन या तीन सदराखालीं दिलेली सांपडेल. याशिवाय रस्ते या सदराखालीं आगगाडीचे रस्ते यावर विवेचन सांपडेल. येथें फक्त विकासविषयक व अर्थशास्त्रविषयक माहिती दिली आहे

विकासविषयक

इंग्लंड देशांत प्रथम आगगाडी इ स १८२८ च्या सुमारास सुरू झाली त्यानंतर थोड्याच वर्षांनीं १८४५ मध्यें प्रथम बंगाल्यांत व १८५४ सालीं मुंबई ते कल्याणपर्यंत रेल्वे प्रयोगादाखल सुरू करण्यांत आली. आगगाडीसंबंधाची पाश्चात्य देशांतील माहिती प्रथम देऊं

**इंग्लंड व युनैटेड स्टेट्स मधील आगगाड्यांबद्दल सामान्य माहिती.**—१८ व्या शतकाच्या अखेरच्या सुमारास इंग्लंडमध्यें कोळसा व इतर खाणींच्या मार्गी लोखंडी अरुंद पट्ट्यांचे ट्रामचे रस्ते तयार करून उपयोगांत आणण्यास सुरवात झाली होती परंतु अशा पट्ट्यांवर धूळ, दगड वगैरे पडून चाकांना अडथळा होत असे. अशा ट्रामच्या रस्त्याचा प्रवाशांना वाहून नेण्याच्या कामीं प्रथम उपयोग १८२५ मध्यें करण्यांत आला त्या सालीं स्टॉकटन व डार्लिंग्टन यांच्या दरम्यान सदतीस मैल रेल्वे सुरू करण्यांत आली. प्रथम ही प्रवाशांचीं वाहनें घोडे लावून चालवीत असत वाफेच्या यंत्राचा उपयोग प्रथम खाणीवरील माल वाहण्याच्या कामीं करूं लागले व त्यांना गति मुद्दाम अगदीं थोडी देत असत शुद्ध लोखंडाला किंमत अधिक असल्यामुळें हे लोहमार्ग प्रथम बिडाचे करीत असत. गुळगुळीत लोखंडी रुळांबरोबर चाकांनां धावांहि गुळगुळीत ठेवल्यास फार उपयोग

होईल ही कल्पना त्या वेळच्या इंजिनियरांना नव्हती. १८ व्या शतकाच्या पहिल्या चतुर्थकात मालाची व माणसांची बहुतेक वाहतुक कालव्यांच्या मार्गानें होत असे, व हे प्रवासमार्ग किती गैरसोयीचे होत याची कल्पना देण्याकरतां असें सांगण्यांत येते कीं, या मार्गानें लिव्हरपूलपासून मांचेस्टरला कापडाचे गठ्ठे पोंचविण्यास सबंध अटलांटिक महासागर ओलांडून जाण्याइतका वेळ लागत असे. लिव्हरपूल ते मांचेस्टरपर्यंत रेल्वे तयार करण्यास परवानगी देण्यासंबंधाचा ठराव जेव्हां पार्लमेंटपुढें प्रथम आला त्या वेळीं याच कालव्यांतून वाहतुक करणाऱ्या कंपन्यांच्या चालकांनीं आपलें वजन खर्च करून तो ठराव दोन वर्षें लांबणीवर टाकविला. तथापि अखेर १८२८ मध्यें पार्लमेंटची मंजुरी मिळून कामास सुरवात झाली. प्रथम या रस्त्याचा उपयोग गहूं व इतर माल नेण्याच्या कामींच फक्त करावयाचें ठरलें होतें, व गाड्यांना घोडे जोडावयाचें ठरलें होतें. पण रस्ता तयार होत असतांना जॉर्ज स्टीफनसनच्या आग्रहावरून घोड्यांऐवजीं वाफेचें इंजिन लावावें असें ठरलें. तथापि एंजिनें ठाम एका जागीं बसवून दोर लावून गाड्या ओढाव्या किंवा धावतीं एंजिनें गाड्यांना जोडावीं याबद्दल डायरेक्टर लोकांत मतभेद झाला, पण अखेर धावतीं इंजिनें जोडावीं असेंच ठरलें. पुढें एंजिनच्या गतीसंबधानें वाद माजला, व "तासीं बारा मैल इतक्या वेगानें वाफेचें यंत्र लोहमार्गावरून गाड्या ओढून नेऊं शकेल असें प्रतिपादन करणाऱ्या जहाल मेंदूच्या उत्साही माणसांपैकीं मी नव्हे!" असें मुद्दाम एका इसमानें जाहीर रीतीनें कळविलें. याप्रमाणें भवति न भवति होऊन अखेर 'रॉकेट' जातीचें एंजिन ओढून आगगाडी सुरू झाली व तिला गति तासीं एकोणतीस मैल, कोणाच्या स्वप्नींहि न आलेली, इतकी प्रत्यक्ष देतां येऊं लागली याप्रमाणें लिव्हरपूल व मांचेस्टर याच्या दरम्यान माल व माणसें या दोहोंची वाहतुक आगगाडीनें होऊं लागून पूर्वी तेथें चालू असलेल्या तीस घोड्यांच्या गाड्यांचा धंदा साफ बसला पण उलट या दोन शहरांमधील प्रवाशांची पूर्वीची रोजीं ५०० ची संख्या १६०० पर्यंत वाढली कालव्यांमधून वाहतुक करणाऱ्या कंपन्यांचाहि धंदा बसला. तेव्हां आगगाडीची ही योजना हाणून पाडण्याकरतां त्यांनीं काय काय युक्त्या योजिल्या व कसा विरोध केला याचें गमतीदार वर्णन स्माईल्सकृत जॉर्ज स्टीफनसनचें चरित्र या पुस्तकांत आहे. आगगाडीचा रस्ता तयार करणारांना जमीनदारांकडून अडथळा करविला, शेतकऱ्यांकडून गोळ्या झाडून ठार मारण्याची धमकी देवविली, चर्चमधील फर्मानवरून मार देवविण्याची व्यवस्था केली; व वर्तमानपत्रकर्त्यांकडून असें प्रसिद्ध करविलें कीं, "वाफेचीं एंजिनें चालू झाल्यानें हवेंत उडणारे पक्षी मरतील, आसपासच्या गाई चरत नाहींशा होतील, कोंबड्या अंडीं घालीत नाहींशा होतील, घरांना आगी लागतील, आणि घोड्यांचा उपयोग नाहींसा झाल्यानें ती जातच पृथ्वीवरून अजीबात नष्ट होईल"!! पुढें लंडन व ग्रूलविच यांच्यामध्यें आगगाडी सुरू करण्याचा प्रश्न निघून त्याबद्दलचा प्राइस्पेक्टस् प्रसिद्ध झाला तेव्हां क्वार्टर्ली रिव्ह्यू नामक मासिकांत पुढील टीका प्रसिद्ध झाली "स्टेज कोचाच्या दुप्पट गतीनें म्हणजे तासीं वीसपंचवीस मैल वेगानें वाफेचीं एंजिनें जाऊं शकतील, या विधानापेक्षां अधिक मूर्खपणाची व उपहासाई गोष्ट दुसरी कोणती असूं शकेल ? आणि इतक्या वेगानें कदाचित् आगगाडी चाललीच तर अशा गाडींत बसून आपला जीव धोक्यांत घालण्यास कोण शाहणा प्रवाशी तयार होईल ? त्यापेक्षां पडेल तें भाडें भरून लोक थेम्स नदींतील जहाजांतूनच पूर्वीप्रमाणें प्रवास करीत राहतील. आम्हाला अशी बळकट आशा आहे कीं, पार्लमेंट हा ठराव पास करतांना आगगाडीचा वेग तासीं आठ किंवा नऊ मैलच असावा अधिक असूं नये असा निर्बंध जरूर घालील" पुढें पार्लमेंटमध्येंहि मोठा गमतीचा वादविवाद होऊन अखेर हा आगगाडीचा रस्ता करण्यासहि परवानगी मिळाली.

आगगाडीचा रस्ता अगदीं सरळ व एका पाणसळींत असला पाहिजे अशी प्रथम समजूत होती त्यामुळें त्या वेळच्या इंजिनियरांनीं सर्व प्रदेशाची प्रथम नीट पाहणी करून व नंतर सर्व उंचवटे व खळगे नाहींसे करून रस्ता तयार करण्यास दरमैलीं खर्च ३५००० पौंड येत असे! यानंतरची गमतीची गोष्ट म्हणजे उष्णतेनें पदार्थ वाढतात या शास्त्रीय तत्त्वाच्या अज्ञानाबद्दलची. प्रथम रेल्वेचे रूळ बसवितांना दोन रूळांमध्यें अंतर मुळींच ठेवीत नसत. त्यामुळें एकदा असा प्रसंग आला कीं, ज्या नवीन केलेल्या रस्त्यानें गाडी सकाळीं गेली होती त्याच रस्त्याचे रूळ दुपारच्या उन्हानें वाढून ते रूळ कित्येक ठिकाणीं दोन फूटपर्यंत सरळ सपाटीपासून उंच गेले. तेव्हां त्या रस्त्यानें आगगाडी परत आणण्याकरतां तो रस्ता कसातरी समपातळींत घंईघाईनें आणावा लागला. कित्येक ठिकाणीं तर हा उष्णतेचा परिणाम प्रथम प्रथम लक्षांत न आल्यामुळें आगगाड्या रूळावरून पडून कित्येक अपघातहि झाले.

आणखी एक मौजेची गोष्ट म्हणजे आगगाडीच्या रस्त्याच्या रुंदीसंबंधाची. इंग्लंडमध्यें जॉर्ज स्टीफनसननें प्रथमपासून दोन रूळांत अंतर ४ फूट ८॥ इंच इतकें ठेवण्याचें ठरविलें होतें. पुढें ग्रेट वेस्टर्न रेल्वेकंपनीच्या ब्रुनेलनामक इंजिनियरानें ७ फूट रुंदीच्या ऊर्फ ब्रॉड गेजच्या आगगाड्या व रस्ते बांधण्याचें ठरविलें व रुंदी वाढविल्यानें इंजिनाची शक्ति व गति वाढेल, आगगाडीचे डबे गाडी भरधांव चालली असतांनाहि फारसे हलणार नाहींत व डब्यांचा आकार वाढल्यानें अवजड मालाची नेआण करणें सोईचें होईल इत्यादि फायदे दाखविले. तेव्हां या विषयावरहि खडाजंगी वादविवाद माजला व त्याचा निकाल करण्याकरितां पार्लमेंटनें स्वतंत्र कमिटी नेमली! रस्ते रुंद करण्यांत मुख्य गैरसोय ही होऊं लागली कीं, एका प्रकारच्या रस्त्यावरची

गाडी दुसऱ्या रस्त्यावर जाणें अशक्य असल्यामुळ फार घोटाळा होऊं लागला. स्टीफनसनपद्धतीचा रस्ता २००० मैल होता, तेव्हां ग्रेट वेस्टर्नचा रस्ता फक्त २७० मैलच होता, म्हणून कमिटीनें सर्व रस्ते स्टीफनसनपद्धतीचे असावे असें ठरविलें व त्यामुळें ७ फूट रुंदीचे सर्व रस्ते मोडून पुन ५६॥ इंच रुंदीचे बांधावे लागले !!

यापुढील गमतीची गोष्ट म्हणजे माणसाच्या वाहतुकीच्या डब्यांच्या आकारासंबंधाची. आगगाड्यांतून माणसें नेण्याचें प्रथम ठरलें, त्या वेळीं माणसांचे डबे कांहीं निराळ्या प्रकारें तयार करावेत, असें कोणाहि इंजिनियरच्या डोक्यांत आलें नाहीं. तर माल नेण्याकरितां उघड्या वाघिणी (ट्रक) असत, त्यांतच घोड्यांच्या गाड्यांचा मधला बसण्याचा भाग बसवीत असत. इंग्लंडप्रमाणें अमेरिकेंतहि प्रथम हीच पद्धति होती. असल्या डब्यांची आगगाडी अमेरिकेंत सुरू झाली, तेव्हां पहिल्या दिवशीं सोळा इसम अशा डब्यांत बसून गेले व त्यांत बसून जाण्याचें धारिष्ट केल्याबद्दल इतर लोकांनीं त्यांच्या धडसोपणाची मोठी तारीफ केली ! पण यापेक्षांहि गमतीची गोष्ट म्हणजे आजहि इंग्लंडमध्यें घोड्यांच्या गाडीच्या आकाराचे डबे कायम आहेत. विशेषतः फर्स्टक्लासचे डबे या आकाराचे असतात. लोकांच्या पुराणप्रियतेची कमाल म्हणजे फर्स्टक्लासच्या डब्यांच्या दाराच्या मुठीचा नमुना मुद्दाम जुन्या स्टेजकोचच्या दाराच्या मुठीप्रमाणें अत्यंत गैरसोयीचा असून हुबेहुब तो पूर्वस्थानींच कायम ठेवलेला आहे.

प्रवाशांच्या सोयीच्या दृष्टीनें इतकेंच नव्हे तर चैनीच्या दृष्टीनें आगगाड्यांच्या डब्यांच्या रचनेंत अत्यंत झपाट्यानें सुधारणा पृथ्वीवरील सर्व देशांतल्यापेक्षा युनैटेड स्टेटसमध्यें सर्वांत अगोदर झालेल्या आहेत. सोय व सौंदर्य या दोन्ही दृष्टींनीं पुलमननें सुचविलेल्या नमुन्याचे डबे सर्वोत्कृष्ट ठरले आहेत. अशा डब्यांत मऊ गाद्या बसविलेल्या व वाटेल त्या दिशेला तोंड फिरवितां येईल अशा खुर्च्या, तसेंच खुर्च्यांच्या टेकावयाच्या पाठी पाहिजे तितक्या उभ्या किंवा उतरत्या करण्याची सोय, लावण्याच्या प्रकाशाकरितां रात्रीं निजण्याची सोय व डब्याची एकंदर शोभा वगैरे सर्व गोष्टी उत्तम असतात. अशा आगगाड्यांतून जाणाऱ्या माणसांना आपण घर सोडून प्रवासांत आहोंत, अशी यत्किंचितहि जाणीव येत नाहीं. यासंबंधाचें मि[illegible] सी नार्डॉफ नामक एका अमेरिकन लेखकानें केलेलें वर्णन वाचकांना मनोरंजक व उपयुक्त होईल म्हणून येथें देतों—"सेंट्रल पॅसिफिक रेल्वेच्या पुलमननामक डब्यांत तुम्ही आपलें पांघरलेलें सामान सुमारें व पुस्तकें सोडून घेऊन बसलां की, तुम्हांला अगदीं घरांतल्याप्रमाणें रोजच्या व्यवसायांतल्या सर्व गोष्टी करतां येतात. सर्व प्रकारचीं रोजचीं कामें करणारे हुशार नोकर प्रत्येक काम तत्परतेनें करीत असतात– इतकें कीं, स्वतःच्या प्रत्यक्ष घरांतहि इतकी व्यवस्था रहात नाहीं. तुम्हांला स्वतःच्या इच्छेप्रमाणें स्वस्थ पडावयाला, झोंप घ्यावयाला किंवा वाचावयाला सांपडतें, वेळच्या वेळीं चांगलें शिजविलेलें भरपूर भोजन मिळतें, निरनिराळ्या प्रदेशांतून आगगाडी जात असतां हरएक प्रकारचे निरनिराळे नैसर्गिक देखावे पहावयास मिळाल्यानें व स्वच्छ आनंददायक हवा घेण्यास मिळाल्यानें तुमचें मन सदा आनंदित राहतें आणि नेहमींच्या कामधंद्यांत त्रासलेल्या किंवा घरच्या कटकटीनें वैतागलेल्या तुमच्या मनासहि पूर्ण प्रसन्नता वाटून असा प्रवास करणें हें विश्रांति घेण्याचें एक मोठें साधन आहे, असा अनुभव येतो. टेबलाजवळ लिहीत बसा किंवा दारें बंद करून शांतपणें विचार करीत बसा, पुस्तकें वाचा किंवा फोटोतलीं चित्रें पहा. बरोबर कुटुंब असल्यास तुमची पत्नी खिडकीजवळ बसून कांहीं तरी विणीत किंवा शिवीत असलेली व मधून मधून बाहेरची सृष्टिशोभा पहात असलेली दिसेल. मुलें खालीं बसून खेळतांना किंवा खिडक्यांतून बाहेरील कुत्र्यांची गम्मत पहातांना किंवा खालीं ओकेंवर पाय करून उड्या मारतांना आढळतील. सकाळीं ठरलेल्या वेळीं पोर्टर येऊन तुम्हांला उठवील, नंतर सकाळचा अल्पाहार, दुपारचें जेवण व रात्रीचें जेवण वेळच्या वेळीं तुमच्याजवळ हजर करील. रात्रीं निजण्याच्या अंथरुणाची व पांघरुणाच्या उबदार कपड्यांची व्यवस्थाहि रात्रीचे नोकर येऊन करून देतील. याप्रमाणें अगदीं घरच्याप्रमाणें सर्व व्यवस्था असते."

राजधानीच्या शहरांतील आगगाड्या.— लंडनच्या रस्त्यांची रहदारी अत्यंत वाढून नेहमींचे रस्ते जेव्हां अपुरे पडूं लागले तेव्हां तेथें जमिनीखालून आगगाडीचे रस्ते बांधण्याची मोठी धाडसाची योजना हातीं घेण्यांत आली. शहरांतील रस्त्याच्या खालून पाण्याचे नळ, ड्रेनेजचे नळ, गॅसच्या नळ्या जात असल्यामुळे त्यांचें एक मोठें जाळें जमिनींत पसरलेलें असतें, त्यांपैकीं कशालाहि धक्का लागू न देतां जमिनीखालून रेल्वे तयार करण्याचें १८६३ मध्यें ठरलें. ही रेल्वे पॅडिंगटनपासून निघून एजवेयर रोडखालून जाऊन मेरीलेबोन रोडला पोहोंचते; नंतर पार्क क्रेसंटवरील घराखालून जाऊन, पोर्टलंड प्लेसखालून, यूस्टन रोडखालून जाऊन किंग्ज क्रॉसपर्यंत जाते व तेथें ग्रेट नार्दर्न व मिडलंड रेल्वेला मिळते. या आगगाडीच्या रस्त्यावरील कित्येक कमानी जमिनीखालीं थोडसे इंच इतक्या अंतरावर असतात, कांहीं कित्येक फूट खोल तर कांहीं कमानी घरांच्या व मोठमोठ्या इमारतींच्या पायापेक्षां खोल खालीं बांधलेल्या आहेत. अशा जमिनीखालील रेल्वे बांधण्यांत फार अडचणी असतात. जमिनीच्या पोटांतला भाग कोठें खडकाळ, कोठें वाळुकामय, कोठें चिकणमातीचा असून त्यांतून वर सांगितल्याप्रमाणें पाण्याच्या, ड्रेनेजच्या, गॅसच्या नळनळ्यांना यत्किंचित धक्का न लागूं देतां रेल्वे बांधावयाची असते. लंडनमधील उपर्युक्त रेल्वेची तर कांहीं

स्टेशनेसुद्धां पूर्णपणें जमिनीखालींच बांधलेलीं असून बाकीचीं जमिनीच्या पृष्ठभागावर आलेलीं आहेत. सदरहू मेट्रॉपॉलिटन रेल्वे ( लंडन राजधानीखालील आगगाडी ) पुरी झाल्यानंतर तिला जोडून "दि मेट्रॉपॉलिटन डिस्ट्रिक्ट" रेल्वे बांधण्यांत आली. ती हाईडपार्कपासून निघून लंडनमधील व्हिक्टोरिया टर्मिनसच्या जवळून वेस्टमिन्स्टर ब्रिजला पोहोंचते व तेथून थेम्स नदीच्या बाजूनें जाऊन ब्लॅकफ्रेअर्स ब्रिजपर्यंत गेल्यावर बाजूला वळून मॅन्शनहाऊस मार्केलेन व आल्डगेट स्टेशनापर्यंत गेली. याप्रमाणें सर्व लंडन शहरभर जमिनीखालची रेल्वे झालेली असून या रेल्वेमधून रहदारीहि खूप चालू असते. उदाहरणार्थ सर्वसाधारणपणें या रेल्वेंच्या मूरगेट स्ट्रीट स्टेशनमध्यें जाणाऱ्या व येणाऱ्या मिळून एकंदर गाड्यांची रोजची संख्या सुमारें ८०० असते.

दि पॅसिफिक रेल्वे.—युनैटेड स्टेट्समधील आगगाड्यासंबंधानें एक विशेष गोष्ट म्हणजे अटलांटिक किनाऱ्यावरील न्यूयॉर्कपासून पॅसिफिक किनाऱ्यावरील सॅनफ्रॅन्सिस्कोपर्यंत ३,१२५ मैल लांबीचे निरनिराळ्या कंपन्यांनीं बांधलेले आगगाड्यांचे अनेक रस्ते हीं होय. हा इतक्या लांबीचा प्रवास संपविण्यास अवघा एक आठवडा लागतो. या रस्त्यावर अनेक विस्तृत मैदानें, त्याचप्रमाणें फार उंच उंच पर्वत असल्यामुळें मोठमोठाले पूल व बोगदे बांधावे लागले असून त्यांत इंजिनियरच्या धंद्यांतलें अत्यंत उत्कृष्ट कौशल्य अनेक ठिकाणीं दिसून येतें. ओमाहा हें या रेल्वेवरील एक महत्त्वाचें जंक्शन असून, तेथें एंजिनें व डबे तयार व दुरुस्त करण्याचे मोठमोठाले कारखाने असून त्यांनीं तीस एकर जागा व्यापिली आहे. तेथील लोकसंख्या १८६६ मध्यें ३,००० होती ती १८७० मध्यें एकदम १६,००० वर गेली. ओमाहाच्या पुढें गेल्यावर हा रेल्वेचा रस्ता प्लॅट नदीच्या काठानें जात असून तो दोनचारशें मैलांचा प्रदेश फारच सुपीक व वसाहतीस योग्य असल्यामुळें तेथें लाखों माणसांची सोय होण्यासारखी आहे. ओमाहापासून ५४९ मैल अंतरावरील शर्मन स्टेशननजीक हा रस्ता ब्लॅक हिल्स नामक डोंगरावरून जात असून समुद्राच्या सपाटीपासून, पृथ्वीवरील कोणत्याहि आगगाडीच्या रस्त्यापेक्षा सर्वांत अधिक (८,२४२ फूट) उंच आहे. शर्मनपासून थोडक्या अंतरावर ६५० फूट लांबीचा व १२६ फूट उंच असा लाकडी खांबावर बांधलेला एक पूल असून त्याचें सर्व लाकडी काम पाहून आश्चर्य वाटतें. यानंतर पुढें रॉकी मौंटन नामक पर्वतावरून हा रस्ता जातो. तेथें पर्सी नामक एक स्टेशन आहे. याच्यापुढें ऑगडेन नामक प्रसिद्ध स्टेशन आहे, तेथून ५० मैल अंतरावर आगगाडीचा रस्ता बांधण्यांतील एक अद्भुत कृत्य करण्यांत आलें तें असें कीं, १८६८ सालीं येथील १० मैल रस्ता केवळ एका दिवसांत बांधण्यांत आला. त्याचा प्रकार असा कीं, रूळांनीं भरलेली एक वाघीण तयार झालेल्या रस्त्याच्या टोंकापर्यंत आणल्यावर चार माणसांनीं वाघिणींतील दोन रूळ उचलून पुढल्या स्लीपर्सवर टाकले, व त्यांवरून लगेच वाघीण पुढें ढकलीत नेली; नंतर पुन्हां पुढें दोन रूळ टाकले व त्यांवरून वाघीण पुढें नेली. मागून येत असलेल्या मजुरांपैकीं कांहीं टाकलेले रूळ खिळे मारून घट्ट बसवीत चालले व कांहीं कुदळीखोरीं घेऊन रस्त्यावर खडी टाकीत होते. याप्रमाणें चालविलेल्या कामाचें त्या दिवशीं ७७॥ सेकंदांत २४० फूट इतकें सरासरी प्रमाण पडलें. या दहा मैल लांबीच्या रस्त्यावर रूळ टाकण्याचें काम केवळ आठ माणसांनीं केलें, व त्यांतहि आश्चर्य असें कीं, या दहा मैलांपैकीं ८ मैल रूळ टाकण्याचें काम त्या आठ बहादर इसमांनीं अवघ्या सहा तासांत दुपारच्या जेवणाच्या आंत संपविलें. असो.

यापुढें या रस्त्यावर 'केपहॉर्न' नामक पर्वत लागतो, तेथें एक ठिकाणीं एका अगदीं उभ्या कड्यावर खडक फोडून २,५०० फूट उंचीवर आगगाडीचा रस्ता तयार केला आहे. हें खडक फोडण्याचें काम शिखरावरून दोराला बांधून खालीं सोडलेल्या मजुरांनीं दोराच्या आधारावर उभे राहून केलेलें आहे. अशा रीतीनें ज्या ठिकाणीं रेड इंडियनांपैकीं कोणत्याहि चढाऊ रानटी माणसाचें पाऊल लागणें शक्य नव्हतें त्या ठिकाणीं गोऱ्या लोकांनीं आपल्या शास्त्रीय ज्ञानाच्या बळावर आगगाडीचा रस्ता तयार केला आहे.

शिवाय ज्या रेल्वेकंपनीनें हा रस्ता बांधला तिच्या चालकांचें धाडसहि तारीफ करण्यासारखें आहे. या कंपनीचे मूळ पांच उत्पादक सॅक्रमेंटो नामक शहरांतील रहिवाशी असून त्यांपैकीं दोघ कापडाचे दुकानदार, एक वाणी, व दोघ जंगम माल व्यापारी होते. या अवघड प्रदेशांतून रस्ता बांधतां येणारच नाहीं असें प्रथम कांहीं बड्या बड्या इंजिनियरांनीं मत दिल्यामुळें उपर्युक्त पांच इसमांची सर्व धनिक व राजकारणी इसम थट्टा करूं लागले. शिवाय लोकोमोटिव्ह वगैरे सर्व सामान न्यूयॉर्कहून जहाजांमधून केपहॉर्नला वळसा घालून सॅनफ्रॅन्सिस्कोला आणावें लागलें. तसेंच कॅलिफोर्नियांत मजूर पुरेसे न मिळून मजुरी वाढल्यामुळें कंपनीला चीनमधून १०,००० मजूर आणावे लागले. दहा मैल रस्ता झाल्यावर लोखंडाचे दरहि वाढले. अशा सर्व अडचणी आ करून उभ्या असतांहि धैर्य न सोडतां व सार्वजनिक मदतीची अपेक्षा न करतां मूळ उत्पादकांनीं आपली सर्व खाजगी मालमत्ता मरीला घालून हा रस्ता पुरा केला. या कामांत मि. एस. एस. मौंटेग्यू नामक इंजिनियरची त्यांनां मुख्य मदत झाली.

याप्रमाणें रस्ता पुरा होतांच सॅनफ्रॅन्सिस्को बंदराचें महत्त्व फार वाढून तेथें जपान, चीन व आस्ट्रेलियामधून मालाचीं मोठमोठीं जहाजें येऊन उतरूं लागलीं. पंचवीस वर्षांपूर्वीं जेथें अवघी पांचशें लोकांची वस्ती होती तेथें १,७०,००० लोकसंख्या होऊन गेली. आज सॅनफ्रॅन्सिस्को तर फारच मोठें शहर बनलें आहे.

निरनिराळ्या देशांत आगगाड्यांचें प्रमाण काय पडतें तें पुढील कोष्टकावरून कळेल —

निरनिराळ्या देशांतील लोहमार्गांचें प्रमाण

| देश | १९२० किंवा १९२१ सालीं अमलांत असलेल्या लाइनींची लांबी, मैल | क्षेत्रफळ—चौरसमैल | दर हजार चौ. मैलांत लाइनीचे मैल | १९१९,१९२० किंवा १९२१ सालची लोकसंख्या [दशलक्ष] |
|---|---|---|---|---|
| यु. किंगडम | २३७२४ | १२१६३३ | १९४ | ४७.३ |
| ग्रेटब्रिटन | २०२९७ | ८८७४५ | २२८ | ४२ ६ |
| आयर्लंड | ३४४२ | ३२५८६ | १०७ | ४ ३ |
| हिंदुस्थान | ३७२६५ | १८०२६२९ | २१ | ३१९.० |
| कानडा | ३९११९६ | ३७२९६६५ | १० | ८ ७ |
| आस्ट्रेलिया | २६१०४ | २९७४५८१ | ९ | ५ ४ |
| द. आफ्रिका | ९५०९ | ४७३०८९ | २० | ६ ९ |
| अर्जेन्टाइन | २३५९० | ११५३११९ | २० | ७ ८ |
| आस्ट्रिया | ३९४० | ३०७६६ | १३१ | ६.१ |
| बेल्जम | ४६४९ | ११७४४ | ४२३ | ७.६ |
| ब्राझिल | १७८४७ | ३२७५५१० | ५५ | ३०.६ |
| चिली | ५४०३ | २८९८२९ | १८ | ३ ७ |
| चीन | ९००० | ३९१३५६० | २.३ | ४३६.० |
| झेकोस्लोव्हाकिया | ८४९७ | ५४२६४ | १५७ | १३.५ |
| डेन्मार्क | ३०३२ | ३५०००० | ९ | १२ ७ |
| फ्रान्स | २५०११ | २१२६५९ | १२७ | ३९.४ |
| जर्मनी | ३५९११ | २५०४७१ | १४० | ५९.८ |
| हंगेरी | ४३०७ | ३५६५४ | १२४ | ७ ८ |
| इटाली | ९७४१ | ११०६३२ | ८८ | ४०.० |
| ×जपान | ९,३५९ | २६०७३८ | ३६ | ७७.० |
| नेदर्लंड्स | २३७७ | १२५८२ | १९८ | ६.८ |
| नॉर्वे | २०७२ | १२४९६४ | १७ | २ ३ |
| रशिया | २९९०९ | ७८४०००० | ४ | १२४ ० |
| स्पेन | ९४३६ | १९४७८३ | ४९ | २० ७ |
| स्वीडन | ९४२० | १७३०३५ | ७४ | ५ ९ |
| स्वित्झर्लंड | ३८८१ | १५९७६ | २४३ | ३ ८ |
| तुर्कस्थान | ३७२० | ६१३७२४ | ६ | २० ९ |
| यु. स्टेट्स | २६३००७ | ३७४३५२९ | ७० ४ | १०५ ७ |

अर्थशास्त्रविषयक व कायदेविषयक.

वाहतुकीचे दर—वस्तूंच्या किंमती उत्पादकांमध्यें स्वतंत्र चढाओढ होऊन ठरल्या जाव्या हा सिद्धान्त पुष्कळशा अर्थशास्त्रांत व कायदेशास्त्रांत अगदीं सर्वमान्य होऊन बसला होता पण पुढें जेव्हां आगगाड्यांच्या धंद्याची वाढ होऊं लागली तेव्हां असा अनुभव आला कीं, स्वतंत्र चढाओढीच्या तत्वावर अवलंबून राहून मुळींच भागावयाचें नाहीं हा अनुभव आगगाड्यांच्या धंद्यापुरताच नाहीं. ज्या ज्या धंद्यांत पुष्कळसें मोठें कायम भांडवल गुंतवावें लागतें त्या सर्व धंद्यांची तीच गति असते याचा अर्थ असा कीं, रेल्वेनें प्रवास करणारांना स्वतंत्र चढाओढीच्या तत्वाचा मुळींच फायदा घेतां येत नाहीं कारण, एकाच रस्त्यावरून आगगाड्या चालवून निरनिराळ्या मालकांत आपसांत भाडें घेण्याच्या बाबतींत चढाओढ करणें शक्य नाहीं, कारण, एकाच रस्त्यावरून निरनिराळ्या मालकांनीं आपल्या आगगाड्या चालविणें एक तर धोक्याचें आहे, आर्थिक दृष्ट्या फार मानगडीचें आहे व लोकांच्या सोयीच्या दृष्टीनें एका रस्त्याची व्यवस्था एका मालकाच्या हातांत असणेंच जरूरीचें आहे. तसेंच निरनिराळ्या मालकांनीं निरनिराळे समांतर रस्ते बांधून आगगाड्या चालविणेंहि अशक्य आहे असे दुहेरी तिहेरी रस्ते प्रत्येक ठिकाणीं करणें म्हणजे भांडवलाची उधळपट्टी करणें आहे, असें केल्यानें भांडवलाचें वाटोळं व्हावयाचें शिवाय अशी चढाओढ लागल्यानें सर्व प्रकारचे दर नेहमीं बदलत राहून मालांच्या किंमती नेहमीं अनिश्चित राहतील व त्यामुळ अप्रामाणिक सट्टेबाज लोकांचें चांगलें फावेल हे परिणाम इतके घातक होतात कीं, दोन कंपन्यांत चढाओढीचे प्रसंग कदाचित् आल्यास त्या आपले दर आपसांत ठरवून नक्की करतात व अनिष्ट चढाओढीस वाव देत नाहींत.

आतां चढाओढीनें दर ठरवूं नयेत असें म्हटलें तर ते कोणत्या तत्वानुसार ठरवावे असा प्रश्न राहतो त्याकरितां प्रथम मैली दर ठरविण्याचें तत्त्व अंमलांत आलें. म्हणजे अंतराच्या मानानें भाडें घ्यावें असें ठरलें. परंतु हें तत्वहि योग्य नाहीं असें लवकरच अनुभवास कळून आलें, कारण माल किंवा प्रवासी यांची व्यवस्था ठेवण्याकरितां लागणारा सामान्य सर्व प्रवासाच्या लांबीवर अवलंबून नसतो व हा खर्च भागण्याकरितां थोडक्या अंतराचा प्रवास करणाऱ्यावर योग्य असा दर ठेवल्यास तोच दर लांबच्या प्रवाशास लागू करणें अन्यायाचें ठरतें. उलटपक्षीं जवळचा प्रवास करणारांस जास्त दर व दूरच्या प्रवाशास जरा कमी दर असे तत्त्व अंगीकारल्यास लांबच्या प्रवासात जागोजाग उतरून मध्ड पाडण्याच्या हकाचढ प्रवासी व रेल्वेअधिकारी यांच्यांत तंटे उपस्थित होतात. म्हणून जवळच्या व दूरच्या सर्व प्रवाशांना सरसकट एकच दर लागू करण्याची पद्धति कायम झालेली आहे

तथापि वरील सर्व गोष्टी लक्षांत घेऊन एक सुधारलेली पद्धति योजिलेली असून ती विशेषतः मालाच्या नेआणीला लागू करतात. ही पद्धति अशी कीं, मालाच्या नेआणीबाबत रेल्वे कंपनीला कराव्या लागणाऱ्या खर्चाचे दोन विभाग करतात. एक खर्च प्रत्यक्ष वाहतुकीसंबंधाचा व दुसरा स्टेश

×जपानचे आकडे कोरियासह आहेत.

नावर माल चढविण्याउतरविण्यासंबंधाचा या दुसऱ्या खर्चाबद्दलचें भाडें प्रवासाच्या कमीअधिक लांबीचा विचार न करतां आकारलें जातें. तथापि या पद्धतींतहि दोष असा आहे की, मूळ रस्ता तयार करण्याकरितां गुंतविलेलें भांडवल व नेहमींची रस्तादुरुस्ती यांना लागणारा खर्च याचा विचार त्यांत केलेला नसतो. उलटपक्षीं या खर्चांचा अंशहि भाड्यावर लादल्यास दर फार वाढून हलक्या किंमतीच्या मालाची नेआण रेल्वेनें करणें मुळींच परवडणार नाहीं. तात्पर्य, वरच्या पैकीं कोणतेंहि तत्व सर्वस्वीं ग्राह्य ठरत नाहीं; व शेवटीं असें तत्व ठरतें कीं, मालाच्या किंमतीच्या मानानें त्याला भाडें झेपेल असे दर ठेवावेत; तसेंच ज्याचा व्यापार वाढण्याचा संभव असेल त्या मालावर दर कमी करावे. कारण व्यापार पुष्कळ वाढल्यास दर कमी केले तरी एकंदरीनें फायदाच होतो. मालाला झेपेल असें भाडें ठेवावें, हेंच तत्व एकंदरीनें योग्य ठरतें; कारण ऐपतीप्रमाणें कर बसवावे या करविषयक अर्थशास्त्रीय सुप्रसिद्ध तत्वाच्या भक्कम आधारावर तें उभारलेलें आहे. *या तत्वाची अम्मलबजावणी करण्याकरिता रेल्वेचे* अधिकारी मालाची वर्गवारी करतात, आणि पहिल्या वर्गाच्या *मालावर शेवटल्या वर्गाच्या मालाच्या मानानें दुप्पट, तिप्पट* किंवा चौपट सुद्धां भाड्याचा दर ठेवतात. ही वर्गवारी मालाची किंमत व रेल्वेकंपनीला त्या मालाच्या वाहतुकीप्रीत्यर्थ लागणारा कमजास्त खर्च याकडे लक्ष देऊन ठरवितात. हें तत्व योग्य असून तें लागू करतांना मात्र निरनिराळ्या मालकांना निरनिराळे दर अशी लबाडी करतां येऊं नये म्हणून रेल्वेकंपन्यांनीं या तत्वानुसार ठरविलेल्या भाड्याच्या दराचे तक्ते जनतेच्या माहितीकरतां छापून प्रसिद्ध करावे लागतात.

आ ग गा ड्या व री ल खा ज गी व स र का री मा ल की —वर सांगितलेल्या तत्वाची अम्मलबजावणी रेल्वेवर खाजगी मालकी असल्यानें चांगली होईल किंवा सरकारची मालकी असल्यानें चांगली होईल याबद्दल मतभेद आढळतो. *सरकारची मालकी आगगाड्यावर असल्यास* स्वतःचे उत्पन्न वाढविण्याकरिता सरकार रेल्वेचे दर जरूरीप्रमाणें वाढवील अशी एक भीति असते. वर सांगितलेल्या तत्वाची योग्य अम्मलबजावणी ज्या पद्धतीनें होईल ती मालकीची पद्धति सर्वांत उत्तम हें उघड आहे. हल्लीं रेल्वेवरील मालकीचे तीन प्रकार आढळतात, ते येणेंप्रमाणें:—

(१) *खासगी व्यवस्था व न्यायसभांचें नियंत्रण* —हा प्रकार युनैटेड स्टेट्समध्यें आरंभीं फार होता. ग्रेटब्रिटनमध्येंहि *आरंभीं आगगाड्यांच्या मालकांवर सरकारी कायद्याचें मुळींच नियंत्रण नव्हतें.* या *प्रकारचा फायदा असा असतो* कीं, कोणत्याहि सुधारणा भराभर अंमलांत आणतां येतात. वरील दोन देशांत आगगाड्यासंबंधानें पुष्कळ सुधारणा फार लवकर झाल्या याचें कारण सरकारी कायद्याच्या नियंत्रणाचा त्या वेळीं असलेला अभाव हेंच होय. तथापि या पद्धतीचे तोटे असे आहेत कीं रेल्वेसंबंधाच्या विशिष्ट कायद्याच्या अभावीं सामान्य कायद्यान्वयें आपल्या तक्रारींची कोर्टामार्फत दाद लावून घेणें लोकांना कठिण जातें; आणि रेल्वेच्या वाढत्या विस्तारावरोबर मालकांच्या हातांत अधिकाधिक सत्ता एकवटित होते त्याबद्दल जनतेला हेवा वाटूं लागतो. यामुळें सरकारी कायद्यांचें नियंत्रण घालण्याची अवश्यकता उत्पन्न होऊन आतांपर्यंत यासंबंधानें अनेक निरनिराळे कायदे पास झालेले आहेत.

( २ ) *खासगी कंपन्यांची व्यवस्था व तिजवर देखरेख* करणारें सरकारी खातें:— ही पद्धति फ्रान्समध्यें आरंभापासून सतत चालत आलेली आहे. या व्यवस्थेनें *जनतेच्या सुरक्षिततेकडे आणि आगगाड्या व त्यांचे रस्ते* बांधण्याच्या कामावर योग्य लक्ष राहून, भांडवलाचा विनाकारण खर्च न होऊं देतां भाड्याच्या दरांवरहि योग्य नियंत्रण ठेवतां येत असें या व्यवस्थेच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें आहे. परंतु या गोष्टी पूर्णपणें साधलेल्या नसून उलट या पद्धतीनें रेल्वेकंपन्यांना फारसें स्वातंत्र्य न मिळाल्यामुळें त्यांची *सुधारणा करण्याची प्रगति मंदावते, असा अनुभव आलेला* आहे. शिवाय अशा कंपन्यांनीं सरकारी नियंत्रण पत्करावें *म्हणून त्यांना मोठाल्या सरकारी देणग्याहि द्याव्या लागतात* तसेंच सरकार वाईट असल्यास लांचलुचपत इत्यादि अनीतीचे प्रकार फारच बोकाळतात. तात्पर्य, या पद्धतीनें वाटतात तितके फायदे प्रत्यक्ष पदरांत पडत नाहींत.

( ३ ) आगगाड्यांची सरकारी व्यवस्था व सरकारी मालकी:—ही व्यवस्था प्रथम बेल्जममध्यें सुरू होऊन ती स्कँडिनेव्हिया व हंगेरी या देशांत सतत चालू आहे. १८६० *पासून आस्ट्रेलियांत हेंच धोरण स्वीकारण्यांत आलेलें आहे.* अलीकडे जर्मनींत सर्वसाधारणपणें हीच पद्धति अंमलांत *आली असून रशिया व आस्ट्रिया या देशांतहि सरकारी* भांडवलाच्या सवडीप्रमाणें ती अंगीकारण्याचा उपक्रम सुरू आहे. हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकारनें बराचसा याच पद्धतीचा अवलंब केलेला आहे. सरकारी मालकीचें हें तत्व एकंदरीनें बरेंच चांगलें आहे यांत शंका नाहीं रेल्वेच्या भाड्याला बऱ्याच अंशीं कराचें स्वरूप असल्यामुळें हीं असलीं मोठीं उत्पन्नाचीं बाब सरकारनें आपल्या हातीं ठेवावी हें अगदीं योग्य आहे. आगगाड्या सरकारी मालकीच्या असाव्या ही गोष्ट तत्वतः जरी कबूल असली तरी प्रत्यक्ष अनुभव असा आहे कीं. काहीं देशांतील आगगाड्यांच्या व्यवस्थेवरील सरकारी *अधिकारी खाजगी कंपन्यांच्या मालकाइतकी प्रवासी* लोकांच्या सुखसोयींबद्दल काळजी घेत नाहींत. तेव्हां सरकारी व्यवस्थेंतहि भांडवलाची उधळपट्टी, सुधारणांचा अभाव इत्यादि दोष असणें शक्य आहे.

तथापि या बाबतींत वादविवादाला आतां जागा नाहीं कारण *आगगाड्यांवर सरकारी मालकी असावी असें या विषयावरील* तज्ज्ञांनीं आतां ठाम मत दिलें आहे. आणि सरकारी मालकीच्या पद्धतींतहि *काहीं ठिकाणीं* [illegible]

असल्यास त्याचा दोष सरकारी अधिकाऱ्याच्या अप्रामाणिकपणाकडे व अज्ञानाकडे जितका आहे तितकाच त्या देशांतील एकंदर समाजांतील धंदेवाईक लोकांच्या अज्ञानाकडे व अप्रामाणिकपणाकडेहि आहे. कारण कोणत्याहि स्वतंत्र देशांतील सरकारची *लायकी व कार्यक्षमता त्या देशाच्या समाजांतील* विशिष्ट वर्गांतल्या लोकांच्या प्रामाणिकपणावर व हुषारीवर अवलंबून असते.

इंग्लंडमधील आगगाड्यांबाबतचे कायदे.—इंग्लंडांत एखाद्या रेल्वेकंपनीला आगगाडीचा नवा रस्ता तयार करावयाचा असल्यास प्रथम पार्लमेंटांत तशी परवानगी देणारा कायदा पास करून घ्यावा लागतो. मात्र जर असा रस्ता तयार करण्यांत इतर कोणाच्या हक्काशीं व फायद्यातोट्यांशीं बिलकुल संबंध येत नसेल तर पार्लमेंटची परवानगी मिळविण्याचें कारण नाहीं. म्हणजे एखाद्या जमीनीच्या मालकाला स्वतःच्या जमीनींतच असा रस्ता बांधावयाचा असेल तर तो परवानगी मागितल्यावांचून बांधतां येईल. याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे लॅंबेरिसपासून स्नोडनपर्वताच्या शिखरापर्यंत बांधलेला आगगाडीचा रस्ता हें होय. अशा रस्त्याच्या मालकास कायद्यानें कोणतेहि विशेष हक्क मिळत नाहींत किंवा कायद्याचें कोणतेंहि विशिष्ट बंधन पाळावें लागत नाहीं. मात्र सामान्य कायद्याप्रमाणें शेजाऱ्यापाजाऱ्यांना *अशा खासगी रस्त्यापासून त्रास होऊं लाग*ल्यास त्याबद्दल दावा आणतां येतो. परंतु जेव्हां कंपनीला *लोकांच्या जमिनी मिळवून, नद्यानाल्यांवरून* पूल बांधून, डोंगरपर्वतांत बोगदे खोदून, लोकांच्या घरादारांशेजारून रस्ता तयार करावयाचा असतो तेव्हां पार्लमेंटाची अगोदर संमति मिळविल्याशिवाय काम सुरू करतां येत नाहीं. पार्लमेंटपुढें ठराव येताच प्रथम पार्लमेंटच्या सभासदांच्या एका नियुक्त कमिटीचा रिपोर्ट मागवून, नंतर पार्लमेंटांत पूर्ण वादविवाद होऊन ठराव पास झाल्यास कंपनीला कायद्याची संमति मिळते. मग त्या कंपनीला रस्ता बांधण्यास सुरवात करतां येते, मात्र त्याबरोबर तिला कंपनीज क्लॉजेस अॅक्ट, लॅंड क्लॉजेस अॅक्ट, रेल्वे क्लॉजेस अॅक्ट, रेग्युलेशन ऑफ रेल्वेज अॅक्ट्स, कॅरियर्स प्रोटेक्शन अॅक्ट वगैरे कायद्यांचीं बंधनें पाळून काम करावें लागतें.

तपासणी.—प्रवासी लोकांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें केलेला इंग्लंडांतला पहिला कायदा म्हणजे १८४७ मध्यें पास झालेला रेग्युलेशन ऑफ रेल्वेज अॅक्ट हा होय. या कायद्याअन्वयें कोणत्याहि रेल्वेकंपनीला माणसांची नेआण सुरू करण्यापूर्वी बोर्ड ऑफ ट्रेडला कळवावें लागतें. त्यावरोबर बोर्डानें नेमलेला अधिकारी रस्त्याची पहाणी करून अभिप्राय कळवितो. तो प्रतिकूल पडल्यास परवानगी मिळत नाहीं, व परवानगीशिवाय नेआण सुरू केल्यास रोज २० पौंड दंड होतो. बोर्डामार्फत होणारी तपासणी कायमचा रस्ता, पूल, बोगदे, स्टेशनें, प्लॅटफॉर्म, जिने, वेटिंगरूम्स, सिग्नलांची व्यवस्था वगैरे सर्व गोष्टींसंबंधानें होते. अशी सर्वांगीण तपासणी होऊन परवानगी मिळाल्यानंतर मूळच्या रस्त्याला जोडून आणखी बांधलेला रस्ता, स्टेशनें, जंक्शनें वगैरे नव्या गोष्टींची तपासणी करण्याचा हक्क १८७१ च्या रेग्युलेशन ऑफ रेल्वेज अॅक्टानें बोर्ड ऑफ ट्रेडला देण्यांत आला आहे. येथें एक गोष्ट नमूद केली पाहिजे कीं, एकदा प्रथम *तपासणी करून परवानगी दिल्यानंतर सालोसाल पुन्हा* पुन्हा तोच रस्ता चांगल्या दुरुस्त स्थितींत आहे कीं *नाहीं याची तपासणी करण्याचा अधिकार मात्र बोर्डाला* नाहीं.

अपघाताची चौकशी.—उपर्युक्त १८७१ च्या कायद्यानें प्रत्येक रेल्वेकंपनीवर पुढील गोष्टींसंबंधानें बोर्ड ऑफ ट्रेडला तावडतोब खबर देण्याबद्दलची जबाबदारी टाकली आहे. (१) मनुष्याला ज्यांत इजा झाली आहे किंवा प्राणहानि झाली असे अपघात, (२) माणसांच्या आगगाडीची दुसऱ्या आगगाडीबरोबर झालेली टक्कर, (३) कोणतीहि माणसांची आगगाडी किंवा तिचा कांहीं भाग रूळावरून खालीं घसरणें, (४) ज्यांत प्राणहानि किंवा मनुष्यास इजा झाली असण्याचा संभव आहे असा कोणताहि अपघात. अशी खबर मिळताच बोर्डानें इन्स्पेक्टर नेमून त्या अपघाताबद्दल चौकशी करावयाची असते. नेमलेले इन्स्पेक्टर जरूर *त्या रेल्वेकंपनींतील माणसांच्या साक्षी* घेऊन व कागदपत्र पाहून अपघातासंबंधाचा संपूर्ण रिपोर्ट *स्वतःच्या सूचनांसह बोर्डाकडे पाठवितो.* नंतर बोर्ड रिपोर्टांची नक्कल रेल्वेकंपनीकडे, पार्लमेंटकडे व वर्तमानपत्राकडे लोकांच्या माहितीकरितां पाठवितो. या रिपोर्टांतील इन्स्पेक्टरच्या सूचना *अंमलांत आणण्याची जबाबदारी* कायद्यानें रेल्वेकंपन्यांवर टाकलेली नाहीं. मात्र योग्य व व्यवहार्य सूचना रेल्वेकंपनी स्वतः होऊन अंमलांत आणते असा बहुतेक अनुभव आहे. अपघातामुळें झालेल्या नुकसानीची भरपाई व्यक्तिशः लोकांना कोर्टामार्फत करून घेण्याचा हक्क अर्थात् आहेच.

आगगाड्या चालविण्याविषयीं.—१८८९ च्या कायद्यानें सर्व रेल्वेकंपन्यांना (१) ब्लॉक वर्किंगची पद्धति, (२) सिग्नल व पॉईंटसंबंधीं इंटरलॉकिंगची पद्धति, व (३) ऑटोमॅटिक कंटिन्युअस ब्रेकची व्यवस्था सुरू करण्याबद्दल भाग पाडण्यांत आलें. त्यामुळें या बाबतींत इंग्लंडमधील व्यवस्था इतर बहुतेक देशांच्या मानानें फार पुढें गेलेली आहे. युनैटेडस्टेट्सनें मात्र इंग्लंडपुढें प्रगति केली आहे. ऑटोमॅटिक सिग्नलिंग, विद्युच्छक्तीनें किंवा हवेच्या दाबानें सिग्नल व पॉईंट्स हलविण्याची व्यवस्था, मालगाड्यांनांहि ऑटोमॅटिक कंटिन्युअस ब्रेक या बाबतींत युनैटेड स्टेट्स इंग्लंडच्याहि पुढें आहे.

रेल्वेनोकरांविषयीं.—रेल्वेसंबंधाच्या नोकरांच्या सुरक्षितेसंबंधानें व हितासंबंधानें अलीकडे कायदे करण्यांत

आले आहेत. १८९३ मधाल कायद्यानें, कोणा रेल्वेनोकरा कडून कामाच्या तासासंबंधानें, किंवा कामाच्या वेळामधील विश्रांतीसंबंधानें, किंवा रविवारीहि काम करण्यासंबंधानें तक्रारीअर्ज आल्यास चौकशी करण्याचा हक्क बोर्डाला देण्यात आला आहे. बोर्डाला चौकशी करून योग्य वाटतील त्या सुधारणा करण्याविषयीं हुकूम सोडण्याचा अधिकार आहे. या हुकुमाप्रमाणें वर्तन न केल्यास त्याची चौकशी रेल्वे अँड कॅनॉल ट्रॅफिक अॅक्ट नावाच्या १८८८ मध्यें झालेल्या कायद्यान्वयें स्पेशल कोर्ट करतें. या कोर्टाच्या कमिशनरांना रोजीं शेंभर पौंडपर्यंत दंड रेल्वेकंपनी-कडून मागता येतो. या व्यवस्थेमुळें रेल्वेनोकरासंबंधाच्या बहुतेक तक्रारी दूर झा या आहेत. शिवाय १८८४ च्या नोटीस ऑफ ॲक्सिडेंटस ॲक्टानें रेल्वेंतील कामकऱ्याला दुखापत किंवा प्राणहानि झाल्यास ती गोष्ट बोर्डाला कळविण्याची जबाबदारी रेल्वेकंपन्यांवर टाकली आहे. मात्र अशी दुखापत कामकऱ्याला तीनाहून अधिक दिवस काम करता येणार नाहीं इतपत मोठी असली तरच कळवावें लागतें. तथापि एवढ्यानेंच रेल्वेनोकरांतील अपघाताची संख्या फारशी कमी न झाल्यामुळें १९०० मध्यें रेल्वे एंप्लॉयमेंट प्रिव्हेन्शन ऑफ ॲक्सिडेंटस ॲक्ट या कायद्यानें बोर्डाला, रेल्वेकंपन्यांनीं यासंबंधानें करावयाच्या सुधारणा विषयीं नियम करण्याचा अधिकार देण्यात आला. तेव्हां बोर्डानें ( १ ) मालडब्यांना लेबलें लावण्यासंबंधानें ( २ ) मालाचे डबे हलविण्यासंबंधानें, ( ३ ) इंजिनच्या पॉवरब्रेक-संबंधानें, ( ४ ) स्टेशनें व सायडिंग्ज मध्यें दिवे लावण्या-संबंधानें, ( ५ ) गेज-ग्लासेसची रचना व संरक्षण करण्या-संबंधानें, ( ६ ) आगगाड्यांना ब्रेकव्हान जोडण्यासंबंधानें, ( ७ ) आगगाडीच्या रस्त्यावर दुरुस्तीचें काम करणाऱ्या नोकरांच्या सुरक्षिततेसंबंधानें, वगैरे अनेक बाबींसंबंधानें नियम करून दिलेले आहेत

याशिवाय १८४६ चा ॲक्सिडंटस् कांपेन्सेशन ॲक्ट, १८८० चा एंप्लॉयर्स लायेबिलिटी ॲक्ट व १८९७ चा वर्क-मेन्स कॉंपेन्सेशन ॲक्ट हे अपघातासंबंधाचे आणखी कायदे आहेत.

हिंदुस्थानांतील आगगाड्याबद्दल माहिती.— इंग्लंडमध्यें आगगाड्या सुरू झाल्यानंतरहि बरेच दिवस हिंदुस्थानांत आगगाड्या बांधण्याचा विचार कोणाच्या मनांत आला नव्हता. पुढें १८४५ मध्यें पौरस्त्य देशांतील परिस्थितींत आगगाड्या बांधणें फायद्याचें होईल किंवा नाहीं हें पाहण्याकरितां केवळ प्रयोगवजा कलकत्त्यापासून राणी-गंजपर्यंत ( १२० मैल ), मुंबईपासून कल्याणपर्यंत ( ३३ मैल ) आणि मद्रासपासून आर्कोनमपर्यंत ( ३९ मैल ) तीन रस्ते बांधण्याचें ठरलें. त्याप्रमाणें मुंबई-पासून कल्याणपर्यंतचा रस्ता १८५४ सालीं पुरा झाला व खर्च रु.५५,००,००० लागला. याच वर्षी ' लोखंडी रस्त्याचें संक्षिप्त वर्णन ' या नावाचें कृष्णशास्त्री गाडवडेकर यांनीं मराठींत लिहिलेलें पुस्तक प्रसिद्ध झालें मुंबई आणि ठाणें यांच्यामधील लोखंडी रस्त्यावरून १६ एप्रिल १८५४ रोजीं गाड्या सुरु झाल्या. त्या दिवशीं मोठा समारंभ झाला त्याविषयींचें वर्णन उपर्युक्त पुस्तकांत दिलें आहे तें येणें-प्रमाणेंः—" या शुभसूचक प्रसंगीं जे मोठमोठाले साहेबलोक व नेटिव लोक पाचारिले होते त्यांच्या सत्कारार्थ मुख्य ठाणें (स्टेशन) बोरीबंदर येथें फार व्यवस्था ठेवली होती. नंतर दोन वाजतांक्षणींच लोक मोठ्या दिमाखानें आपापल्या पदवी-प्रमाणें गाड्यांत बसूं लागले. कित्येक मडमा आल्या होत्या. नामदार सर बुइल्यम यार्डली मुख्य जज व धाकटे जज सर चार्लस जाकसन, व मिस्तर ॲलन, आणि बेल, सर हेनरी लीक आणि दुसरे कित्येक साहेबलोक व मुंबईतले मोठमो-ठाले गृहस्थ हे सर्व मिळून सुमारें पाचशें असामी या समा-रंभात सन्मानार्थ आले होते. मौज पाहण्याकरितां बोरी-बंदरापासून तों थेट भायखळ्यापर्यंत मोठी गर्दीच झाली होती. साडेतीन वाजल्याबरोबर राजकीय सलामीची डोंगरी किल्ल्याच्या तटावरून तोफांची सरबत्ती झाली. ज्यानें रांगेतली ( ट्रेन ) एक गाडी ( कॅरेज ) व्यापिली होती असा गव्हर्नर ब्याडबाजा लागलीच राज्याच्या विजयध्वनिरूपानें वाजूं लागला. याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर त्या रांगेला तीन आगीच्या गाड्या लावल्या होत्या त्यांनीं ती रांग ओढली. चार वाजायास पंचवीस मिनिटांचा अवकाश होता तेव्हां गाडी मोठ्या डौलानें निघाली. तेव्हां तेथें जमलेल्या हजारों लोकांच्या समुदायास मोठें साल्हाद आश्चर्य वाटलें. सर्व रस्ता दोहों बाजूंकडून बोरीबंदरापासून भायखळ्याच्या पलीकडच्या पटांगणापर्यंत तमासगिरांनीं दाटला होता. कित्येक लोक आपापल्या गच्च्यांवरून उभे होते. त्याचप्रमाणें मुंबई शहर बायका, मुलें व पुरुष यांनीं गजबजलें होतें. शहरांत जीं उंचउंच ठिकाणें होतीं तेथ देखील हा अद्भुत अचंबा पाहण्याच्या आशेनें लोकांचे थवेच्या थवे जमले होते. याप्रमाणें तो देखावा अत्यंत शोभायमान व लोकांच्या मनास पराकाष्ठेचें उत्तेजन देण्याजोगा झाला होता.

भायखळ्यापलीकडचे माळ ओलांडल्यानंतर माहीम आणि शिवेच्या पुलामधल्या देशांत शिरल्यावर आसपासच्या खेड्यांचे लोक रस्त्याच्या दोहों अंगानें हा चमत्कार पाह-ण्यासाठीं उभे राहिले होते याप्रमाणेंच ठाण्यापर्यंत थोडेबहुत होऊन गेलें. पुढें ठाण्यास पोंचल्यावरहि पुष्कळ समाज जमला होता. पाणी घेण्याकरितां शिवेपलीकडे जो थोडासा विसावा घेतला त्यासुद्धां ठाण्यापर्यंत जाणाऱ्या ह्या अल्प प्रवासास सत्तावन्न मिनिटांचा वेळ लागला. ठाण्यास दरबारचे तंबू दिले होते, त्यांत सुमारें चारशें मनुष्यें बसण्याजोगी बिछा-यत केली होती. सभेमध्यें अध्यक्षस्थानीं रेलवे कंपनीचे मुख्य कारभारी मेजर स्वानसन् बसले होते. त्यांनीं सभे-मध्यें सुरस संभाषण केलें नंतर सभासदांचें संभाषण

झाल्यावर गव्हर्नर ब्यांडवाजा फार उत्कृष्ट वाजूं लागला. मग लागलीच साडेसहा वाजतांना ठाणें सोडून पंचावन्न मिनिटांत पुनः बोरीबंदरच्या ठाण्यास ही मंडळी सुखरूप पोंचली. इतका जरी वेळ झाला होता तरी रस्त्याच्या बाजूवर जे लोक मजा पाहण्यास उभे होते ते गाडी परत येईपर्यंत तसेच तटस्थ उभे होते. त्यांनीं गाडी परत येऊन आपल्या ठिकाणी पोंचण्याच्या समयीं मोठ्या आनंदाचा गजर केला. याप्रमाणें ह्या दिवशीं समारंभाचा थाट झाला."

याच सुमारास म्हणजे १८५३ सालीं लॉर्ड डलहौसी साहेबांनीं ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टराकडे एक मोठा खलिता लिहून पाठविला. त्यांत हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य शहरें रेल्वेनें जोडण्यापासून होणाऱ्या सामाजिक, राजकीय व व्यापारी फायद्याचें वर्णन देऊन निरनिराळे प्रांत आगगाडीचे रस्ते बांधून एकमेकांला जोडण्याबद्दल व देशाच्या अन्तर्भागाचा निरनिराळ्या बंदरांशीं संबंध जोडण्याबद्दल शिफारस केली. या सूचना डायरेक्टरांना पसंत पडल्या; शिवाय लवकरच उद्भवलेल्या सत्तावन सालच्या बंडानें तर आगगाडीचे रस्ते बांधण्याची आवश्यकता सरकारच्या फारच निदर्शनास आली. परंतु या कामाकरितां हिंदुस्थानांत भांडवल जमेना. म्हणून इंग्लिश कंपन्यांनीं इंग्लंडांत भांडवल उभारलें व त्यावर व्याज देण्याची हमी हिंदुस्थानसरकारनें दिली. यामुळें १८५९ च्या अखेरीस आठ निरनिराळ्या कंपन्या मिळून ५००० मैल रस्ता बांधण्याकरितां ५२० लक्ष पौंड हमीचें भांडवल गोळा झालें. त्या आठ कंपन्या येणेंप्रमाणें:— ( १ ) दि ईस्ट इंडियन; ( २ ) दि ग्रेट इंडियन पेनिनशुला; ( ३ ) दि मद्रास; ( ४ ) दि बॉंबे, बरोडा अँड सेंट्रल इंडिया; ( ५ ) दि ईस्टर्न बेंगॉल; ( ६ ) दि इंडियन ब्रँच- हल्लींची दि औध अँड रोहिलखंड स्टेट रेल्वे; ( ७ ) दि सिंध, पंजाब अँड दिल्ली- हल्लींची दि नॉर्थ वेस्टर्न स्टेट रेल्वे; ( ८ ) दि ग्रेट सदर्न ऑफ इंडिया- हल्लींची दि साउथ इंडियन रेल्वे. याप्रमाणें कंपन्या स्थापन होऊन हिंदुस्थानांत आज दिसत असलेल्या आगगाड्यांच्या व्यवस्थेचा मूळ पाया घातला गेला.

आ रं भीं ची नि रा शा ज न क स्थि ति.—या कंपन्या स्थापन होण्यासंबंधानें मुख्य तत्त्व, भांडवलावर व्याज देण्याविषयीं सरकारनें दिलेली हमी हें होय; कारण अशा हमीशिवाय इंग्लंडांत भांडवल देण्यास कोणी तयार होईना, हें व्याज पांच टक्के देण्याचें ठरलेलें असून शिवाय रस्त्याकरितां लागणारी जमीनहि फुकट देण्याचें सरकारनें पत्करलें होतें; मात्र याचा मोबदला म्हणून कंपन्यांनीं व्याज भागून होणाऱ्या नफ्याचा वांटा सरकारला मिळण्याचा करार होता. शिवाय कंपन्यांच्या जमाखर्चावर व व्यवस्थेवर सरकारचें नियंत्रण असावें व पंचवीस वर्षांच्या मुदतीनंतर कंपन्यांनीं रेल्वे सरकारला विकाव्या असेंहि ठरलेलें होतें. अशा रीतीनें बांधलेले आगगाड्यांचे रस्ते चालू होतांच राज्यकारभाराचें काम अधिक चांगलें होऊं लागलें, सैन्याची नेआण सुलभतेनें व जलदीनें करतां येऊं लागली, देशांतला व्यापार वाढला, लोकांचें परस्परांशीं दळणवळणहि पुष्कळ वाढलें. तरी पण कंपन्यांच्या नफ्यांतून भांडवलावरील व्याजहि भागेना. याचा दोष इंजिनियरांच्या स्थानिक परिस्थितीच्या अज्ञानाकडे व रेल्वेचें बांधकाम करतांना अवलंबिलेल्या उच्च प्रतीच्या ध्येयाकडे देण्यांत आला. १८६९ च्या सरकारी बजेटांत १६६½ लाख रुपयांची रेल्वेच्या सदरांत तूट आली. तेव्हां काटकसर करतां यावी म्हणून सरकारनें स्वतःच रेल्वे बांधण्याचें काम हातीं घेतलें व मीटर गेजचा रस्ता करण्याचें ठरविलें. परंतु लवकरच सरकारजवळची रक्कम संपत आली व उरलेली सिंध व पंजाबमधील मीटर गेजचा रस्ता ब्रॉडगेज करण्याच्या कामीं लावावी लागली. हा रस्ता अधिक रुंद करण्याचीं कारणें सैन्यवहनविषयक होतीं. पैशाच्या अभावीं पुन्हां व्याजाबद्दल हमी देऊन कंपन्यांनाच रस्ते बांधण्याचें काम सरकारनें सांगितलें, याप्रमाणें इंडियन मिडलँड रेल्वे ( १८८२–८५; हल्लीं ही दि ग्रेट इंडियन पेनिनशुला रेल्वेंत अंतर्भूत झाली आहे ), दि बेंगाल नागपूर रेल्वे ( १८८३–८७ ), दि सदर्न मराठा रेल्वे ( १८८२ ), आणि आसाम–बेंगॉल रेल्वे तयार झाल्या. या वेळीं सरकारनें पूर्वीपेक्षा अधिक सवलती दिल्या होत्या या रस्त्यांची एकंदर लांबी ४००० मैल झाली.

दु ष्का ळ व वा य व्य स र ह द्द वि ष य क प्र श्न.—१८७९ च्या भयंकर दुष्काळामुळें आगगाड्यांचे रस्ते आणखी वाढविण्याची अवश्यकता वाटूं लागली. पण सरकारजवळ शिल्लक नसल्यामुळें तें काम खाजगी कंपन्यांना सांगणें भाग पडलें. तदनुसार दि निलगिरी, दि दिल्ली—अंबाला—काल्का, दि बंगाल सेंट्रल, आणि दि बेंगाल नार्थवेस्टर्न अशा चार रेल्वे कंपन्या निघाल्या. यांपैकीं पहिलीचें दिवाळें निघालें व उरलेल्या दोन कंपन्यांना सरकाराकडून व्याजाची हमी मिळाली व चवथ्या कंपनीला टिरहूट–रेल्वे भाडेपट्ट्यानें देण्यांत आली. यानंतरची मोठी महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिंदुस्थानांतील संस्थानांतून आगगाड्यांचे रस्ते बांधावे ही सूचना पुढें येऊन हैद्राबादच्या निजामसरकारनें ३३० मैल रस्ता बांधण्यास लागणाऱ्या खर्चाच्या रकमेवरील व्याजाची हमी घेतली आणि संस्थानांच्या हद्दींत रेल्वे बांधण्यास याप्रमाणें सुरवात झाली. हिंदुस्थानांतील आगगाड्यांच्या प्रसाराच्या पहिल्या कालविभागांत म्हणजे १८७० पर्यंत एकंदर ४२५५ मैल रस्ता तयार झाला व त्यापैकीं ४५ मैल खेरीज सर्व रस्ता ब्रॉडगेज होता. पुढील दहा वर्षांत ४२३९ मैल रस्ता होऊन एकंदर ८४९४ मैल रस्ता झाला व त्यापैकीं ६५६२ मैल ब्रॉडगेज, १८६५ मैल मीटरगेज आणि ६७ मैल नॅरोगेज (लहानगेजी) रस्ता होता. यानंतर कांहीं काळ रेल्वेच्या बाबतींत सरकारला तोटा सोसावा लागला नव्हता. पण लवकरच दुष्काळांचे

दर उतरले आणि वायव्य सरहद्दीवर आगगाडीचे रस्ते फार मोठा खर्च करून बांधावे लागले. पंजदेह प्रकरणावरून ग्रेट ब्रिटन व रशिया यांमध्यें युद्धाचा प्रसंग उद्भवण्याचा फार संभव वाटूं लागल्यावरून हिंदुस्थानांतून रेल्वेचे फाटे क्वेटा व चमन पर्यंत तयार करण्यांत आले. हर्नाई व बोलन घाटाच्या निर्जन प्रदेशांतून रस्ता करण्याला इतका बेसुमार खर्च लागला कीं, प्रत्यक्ष रुपये खडीप्रमाणें पसरूनच रस्ता बनविता आला असता असे उद्गार बाहेर पडलेले आहेत. शिवाय खोजक घाटांतील मोठा बोगदाहि मोठा खर्च करून बांधावा लागला. अर्थात् हा सर्व खर्च नफ्याची आशा नसताहि केवळ राजकीय अवश्यकता म्हणून करण्यांत आला.

फेरसुटीची पद्धति.—यानंतर रेल्वे कंपन्यांना सरकारनें आगाऊ रोख पैशाची मदत करण्याचें बंद करून मागाहून फेर सूट देण्याची पद्धति सुरू केली. मुख्य रस्त्यावर त्या लाइनींमार्फत होणाऱ्या वाहतुकीच्या एकंदर उत्पन्नातून फेरसूट देऊन एकंदर डिव्हिडंड ४ टक्के पडेल अशी व्यवस्था करण्याचा करार सरकार रेल्वे कंपन्यांजवळ करूं लागलें. परंतु ही फेरसूट एकंदर उत्पन्नाच्या वीस टक्केपर्यंत देण्याची मर्यादा घालण्यात आली. अशा करारावर अहमदाबाद प्रांतिज, साउथ बिहार व सदर्न पंजाब या तीन कंपन्या नवीन निघाल्या. यांपैकीं पहिल्या कंपनीच्या बाबतींत मात्र वरील अटी अक्षरशः पाळण्यात आल्या. बार्शी लाईट रेल्वे कंपनी ही कोणत्याहि तऱ्हेची हमी घेतल्याशिवाय स्थापण्यात आली. परंतु चार टक्क्याच्या ट्रस्ट बाँडाशीं तुलना करतां ही सूट देण्याची पद्धति कमी फायद्याची दिसूं लागल्यामुळें १८९६ सालीं या नियमाची दुरुस्ती करून त्याऐवजीं शेंकडा ३ टक्क्यांची पूर्ण हमी घेऊन मुख्य रस्त्यांना जितका निव्वळ नफा राहील तितका नफा होईपर्यंत या कंपन्यांच्या निवळ उत्पन्नांत सुटीनें भर घालावयाची असें ठरलें. मात्र या दोहोंची बेरीज एकंदर भांडवलावर ३॥ टक्के व्याज पडेल इतकी व्हावी अशी मर्यादा घालण्यात आली. या नव्या अटीवर बऱ्याचशा उपशाखा चालवणाऱ्या कंपन्या निघाल्या. यांपैकीं कोणत्याहि कंपनीच्या बाबतींत या अटींची अक्षरशः अंमलबजावणी करण्यात आली नाहीं. या अटीहि अपेक्षेप्रमाणें फलद्रूप न झाल्यामुळें त्यांत पुन्हां दुरुस्ती करण्यात आली व असें ठरलें कीं, पूर्ण हमी ३ टक्क्याच्या ऐवजीं ३॥ टक्क्यापर्यंत द्यावी; व सुटीची मर्यादा ३½ पासून ५ टक्क्यांपर्यंत वाढवावी आणि अधिक नफा होईल तो सारखा वाटून घ्यावा. याप्रमाणें रेल्वेमध्यें भांडवल गुंतविणारे लोक पुढे येण्यास उत्तेजन मिळेल अशी तजवीज करण्यांत आली. तेव्हांपासून उपशाखा चालविणाऱ्या रेल्वे कंपन्या काढण्याची प्रवृत्ति येथील लोकांमध्यें थोडीशी वाढली आहे; आणि ज्या लोकांच्या कंपन्या निघाल्या आहेत त्यांच्या रेल्यांनीं बाजारांत भाव चांगला येत आहे.

आगगाड्यांपासून फायदा होण्यास सुरुवात.—मध्यंतरीं एक महत्त्वाचा फरक पडून येत होता. देशांत हळू हळू सुरू असलेल्या आर्थिक उन्नतीमुळें मालाची व माणसाची वाहतुक फार वाढली. प्रथम केलेल्या रेल्वे-कंपन्यांच्या मुदती संपल्यावर पुढील करार अधिक फायदेशीर अटींवर करण्यास सरकारनें सुरवात केली. पंजाब व सिंधमध्यें कालवे पुष्कळ वाढल्यामुळें नॉर्थ-वेस्टर्न स्टेट रेल्वेमध्यें स्वरूपांतर पडून आलें. वायव्य सरहद्दीवर रेल्वेचे रस्ते बिन किफायतीचे असून त्याचा खर्च सोसणें जरूर असल्यामुळें सरकारावर टीका करणाऱ्यांनीं कर्ज काढून रेल्वे बांधणें चुकीचें आहे अशी टीका वळ्याचें तेल वांग्यावर या न्यायानें नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेसंबंधानें चालविली होती. परंतु पुढें चिनाब आणि झेलम या नद्यांचे कालवे तयार झाले त्या वेळीं याच नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेकंपनीच्या रस्त्यावरून धान्याची वाहतुक फारच मोठ्या प्रमाणांत सुरू होऊन हंगामाच्या दिवसांत तर धान्य नेण्याला पुरेसे डबे पुरवणें कंपनीला कठिण पडूं लागले व सरकारास एकंदर नफा फारच होऊं लागला. १९०० मध्यें प्रथम सरकारला थोडासा नफा झाला परंतु पुढें सालोसाल या रेल्वेचें एकंदर उत्पन्न झपाट्यानें वाढत जाऊन तें १९०७–०८ च्या मागील चार वर्षांत दरसाल २० लाख पौंडपर्यंत होत गेलें. १९०८–०९ या सालीं हें उत्पन्न जरा कमी झालें, त्याचीं कारणें हिंदुस्थानांत पडलेला दुष्काळ, अमेरिकेच्या सांपत्तिक स्थितींत उडालेली खळबळ व त्यामुळें जिकडे तिकडे जिनसाच्या किंमतींत झालेली वाढ हीं होत. १९०८–०९ सालीं या कंपनीला फायदा पडण्याऐवजीं उलट १२,४०,००० पौंड तूट आली. परंतु त्याच्या पुढच्या सालींच तूट बिलकूल न येतां उलट थोडासा फायदा झाला व तेव्हांपासून या रेल्वेकंपनीच्या फायद्याचें प्रमाण सारखें हळूहळू वाढतच गेलेलें आहे. इ. स. १९१९ मध्यें हा फायदा १,०८,५८,३७९ झालेला आहे. हिंदुस्थानांतील सरकारच्या करवसुलीचें उत्पन्न बहुतेक अंशीं दरसाल पडणाऱ्या पावसाच्या मानावर अवलंबून असतें व रेल्वेचें उत्पन्नहि त्याच मानानें कमजास्त होत राहणार हें जरी खरें आहे तरी यापुढें हिंदुस्थानांतील रेल्वेच्या उत्पन्नांत कोणत्याहि सालीं तूट येईल असें मानण्याचें आतां मुळींच कारण उरलेलें नाहीं; तर उलट चीनबरोबरचा अफूचा व्यापार बंद झाल्यामुळें हिंदुस्थान सरकारच्या उत्पन्नांत पडणारी तूट रेल्वेच्या उत्पन्नांतून पूर्णपणें भरून निघेल अशी आशा करण्यास बिलकुल हरकत नाहीं.

करारांतील फेरफार.—हमी घेऊन ज्या रेल्वे कंपन्या प्रथम काढण्यांत आल्या त्यांच्या पहिल्या कराराच्या मुदती संपल्यावर पुढें मूळच्या करारांत सरकारनें फेरफार केले व त्यामुळें रेल्वेसंबंधाच्या व्यवस्थेंत फार महत्त्वाचा फरक

झालेला आहे. पांच टक्के डिव्हिडंड व सहामाही हिशोब या अटींमुळें रेल्वे कंपन्यांच्या स्टॉकच्या किंमती चांगल्या असूनहि सरकारच्या तिजोरींतून रेल्वेप्रीत्यर्थ पैसा सारखा खर्च होत होता. ईस्ट इंडियन रेल्वे कंपनीबरोबरच्या कराराची मुदत प्रथम संपली, तेव्हां कलकत्ता ते दिल्ली व वायव्य सरहद्दीवरील प्रांत येथपर्यंत जाणारी ही मोठी रेल्वे सरकारनें आपला हक्क बजावून विकत घेतली व तिची किंमत सालोसालच्या उत्पन्नांतून वार्षिक हप्ते देऊन ठराविक मुदतींत पूर्णपणें फेडून टाकण्याचें ठरवून व भांडवलाची फेड करण्याकरितां बुडित ठेव ठेवण्याचें ठरविलें. याप्रमाणें ही सर्व रेल्वे सरकारच्या मालकीची झाली; पण ती चालविण्याकरितां परत ठराविक मुदतीच्या आश्वासनानें त्याच कंपनीच्या स्वाधीन करण्यांत आली. या व्यवस्थेमुळें १९०१ सालीं संपलेल्या दहा वर्षांत वार्षिक हप्ते, भांडवलावरील व्याज व इतर सर्व खर्चवेंच भागून सरकारला १,००,००,००० निव्वळ फायदा मिळाला. १८८० पासून चौंयाहत्तर वर्षांनीं सर्व हप्ते पुरे झाले म्हणजे या एका रेल्वेपासून सरकारला दरसाल २७,००,००० पौंड निव्वळ नफा मिळत जाऊं लागेल, म्हणजे ६ ते ७ कोटी इतकें भांडवल तयार होईल. या ईस्ट इंडियन रेल्वेइतकें उत्पन्न दुसऱ्या कोणत्याहि रेल्वेचें होत नाहीं, याचें कारण एक तर ती सर्व रेल्वे चांगल्या सधन प्रदेशांतून गेलेली आहे व शिवाय त्या रेल्वेच्या स्वतःच्या मालकीच्या कोळशाच्या खाणी असल्यामुळें त्या कंपनीस कोळसा फार स्वस्त पडतो. तथापि ही दोन विशेष कारणें वगळलीं तरी इतर रेल्वे कंपन्या पहिली करारांची मुदत संपून सरकारी मालकीच्या झाल्यापासून सरकारच्या उत्पन्नांत भरच घालीत आलेल्या आहेत. सरकारला कांहीं एक नफा न होता उलट स्वतःच्या पदरचें व्याज भरावें लागत होतें, त्या पहिल्या मुदतीच्या काळांत झालेल्या सरकारी तिजोरींतल्या खर्चाबद्दल कर्जाऊ भांडवलाचा आकडा कितींनीं वाढवावा हें ठरविणें कठीण आहे. याबद्दलचें भांडवल ५ कोटी पौंड धरावें असें एकानें सुचविलें आहे; आणि हा आकडा जरी कायम धरला तरी सुद्धां रेल्वे सरकारी मालकीच्या बनल्यावर ती सरकारी उत्पन्नाची एक मोठी उत्तम बाब होऊन राहणार आहे यांत शंका नाहीं.

बा हू र स्त्यां च्या सु धा र णे चा प्र श्न—याप्रमाणें आर्थिक परिस्थितींत फरक होतांच रेल्वेच्या धोरणांत फरक करावा लागला आहे. १९०० सालापर्यंत हिंदुस्थानांतील रेल्वेचें सर्व मोठमोठाले रस्ते बांधून पुरे करण्याचें काम चाललेलें होतें परंतु मुंबईपासून दिल्लीपर्यंतची पूर्व राजपुतान्यांतून जाणारी दुसरी रेल्वे नागदा-मथुरा लाईन हा फांटा तयार होऊन पुरा होतांच मुख्य मुख्य रेल्वे बांधण्याचें सर्व काम संपलें. यानंतर मुंबईपासून सिंधपर्यंत थेट जाणारा असा एक रस्ता तयार होणें अवश्य आहे, पण तो केवळ सैन्याच्या हालचालीच्या दृष्टीनें होय. अशा रस्त्यानें व्यापारी वाहतूक फारशी वाढण्याचा संभव नसल्यामुळें आणि कच्छचा राव याची स्वतःच्या मुलुखांतून थेट रेल्वे जाऊं देण्यास संमति नसल्यामुळें या रेल्वेची योजना मागें पडून राहिली आहे. तसेंच हिंदुस्थान व ब्रह्मदेश एकमेकांना जोडण्याकरितां करावयाच्या रस्त्याबद्दल निरनिराळ्या पाहण्या झाल्या आहेत. तथापि हा रस्ता फार डोंगराळ प्रदेशांतून जावयाचा असल्यामुळें व समुद्रमार्गानें ब्रह्मदेशाबरोबर दळणवळणाचा मार्ग अधिक सोयीचा असल्यामुळें त्याहि रस्त्याबद्दल फारशी उत्सुकता नाहीं. कराची व दिल्ली यांना जोडणारा ब्रॉडगेजचा रस्ता थेट करण्याबद्दलच्या योजनेचा विचार चालू आहे. तथापि या नव्या रस्त्याच्या योजनेपेक्षां मुख्य मुख्य रस्त्यांना जोडणाऱ्या व्यापाराच्या सोयीकरितां रेल्वेच्या उपशाखा जागोजाग बांधण्याची जरूर अधिक भासू लागली आहे. शिवाय कर्णाकडे व्यापार इतक्या झपाट्यानें वाढत चालला आहे कीं, मुख्य रेल्वेवर मालाच्या गाड्या पुरविणें कठिण होऊं लागलें आहे. गाड्यांची संख्या वाढवावी लागत असल्यामुळें सर्वत्र दुहेरी मार्ग करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. रेल्वेची आवारें वाढविणें, जागोजाग बंदरें बांधणें व डबे वगैरे सर्व गोष्टींचा साठा वाढविणें या सर्वांची आवश्यकता भासत आहे यामुळें या जुन्या रेल्वेवरच पुष्कळ खर्च करण्याचा प्रश्न पुढें येऊन नवे आगगाडीचे रस्ते बांधण्याचा प्रश्न साहजिकच मागें पडत आहे. या दुरुस्तीच्या कामाला लागणारा खर्च सरकारला जड वाटत असल्यामुळें यासंबंधानें योग्य त्या सूचना करण्याकरितां लंडन येथें लॉर्ड इंचकेप यांच्या अध्यक्षतेखालीं एक लहानशी कमिटी बसून तिनें रिपोर्टांत अशी सूचना केली कीं, १,२०,००,००० पौंड यापेक्षां अधिक खर्च सरकारनें एका वर्षांत रेल्वेकडे करूं नये. पण या सूचनेंत सांगितल्याइतका खर्च करणेंहि सरकारला जड आहे.

स र का री नि यं त्र ण.—रेल्वेकंपन्यांबरोबर केलेल्या प्रथमच्या करारांत सरकारनें व्याजाबद्दलची हमी घेतलेली असल्यामुळें आगगाड्यांच्या रस्त्यांचें बांधकाम सुरू झाल्यापासूनच सरकारला कंपन्यांच्या खर्चावर व त्यानंतर आगगाड्या सुरू झाल्यावर त्यांच्या व्यवस्थेवर व जमाखर्चावर देखरेख ठेवणें भाग झालें. तेव्हां प्रथम सरकारनें स्वतःचे सल्लामसलतगार इंजिनियर नेमले व पुढें नियंत्रण प्रतिनियन्त्रण ठेवणारे अधिकारी नेमले आणि हिंदुस्थानसरकारच्या पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटला रेल्वे ब्रँच म्हणून एक स्वतंत्र उपशाखा जोडण्यांत आली. परंतु रेल्वे सरकारी मालकीच्या होऊं लागल्यापासून वरील व्यवस्था अपुरी व श्रमदायक ठरून एक अध्यक्ष, दोन सभासद व एक चिटणीस एवढ्यांचें मिळून एक स्वतंत्र रेल्वे बोर्ड १९०५मध्यें स्थापण्यांत येऊन त्याचा हिंदुस्थानसरकारच्या व्यापार व

उद्योगधंदे या खात्यांत अंतर्भाव करण्यांत आला. सर्व रेल्वे-संबंधाचें धोरण व काटकसर वगैरे सर्वांचा तपशील या गोष्टी हें बोर्ड ठरवितें; नवे सरकारी आगगाडीचे रस्ते बांधणें; जुन्या रेल्वेवर सुधारणा करणें; व मालाच्या व माणसाच्या वाहतुकीच्या सोयी, निरनिराळ्या रेल्वेमधील भांडणतंटे, सरकारी रेल्वेवरील नोकरांच्या पगाराची वाढ वगैरे व्यवस्था यांविषयीं निर्णय ठरविणें. १९०८ मध्यें या बोर्डाच्या अध्यक्षाचे अधिकार वाढवून त्याला वरिष्ठ कायदे-कौन्सिलाचा सभासद करण्यांत आलें. १९१२ मध्यें बोर्डाचा अध्यक्ष रेल्वेकंपन्यांच्या कामकाजांत फाजील ढवळाढवळ करतो अशा तक्रारी सुरू झाल्यामुळें व्हाइसरायच्या कार्य-कारी मंडळांत रेल्वेमेंबर म्हणून स्वतंत्र सभासद असावा अशी सूचना पुढें आली.

लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें पुढील ठराव फेब्रुवारी १९२३ मध्यें आला व तो मान्य झालाः—

ही असेंब्ली गव्हर्नर जनरल इन कौन्सिलला अशी शिफारस करिते कीं, ईस्ट इंडियन रेल्वे व ग्रेट इंडियन पेनिन्सुला रेल्वे यांची कौलनाम्या (लीजची) मुदत संपल्यावर सरकारनें त्यांची व्यवस्था आपल्या हातीं घ्यावी.

या दोन रेल्वेचे मागील करार अनुक्रमें ३१ डिसेंबर १९२४ आणि ३० जून १९२५ या तारखांस संपतात.

**कंपन्यांची व्यवस्था.**— कंपन्यांच्या ताब्यांत असलेल्या रेल्वेची व्यवस्था करणारें लंडनमध्यें प्रत्येक कंपनीचें एकएक डायरेक्टरांचें बोर्ड आहे. त्या प्रत्येक बोर्डाचा एक एजंट हिंदुस्थानांत असून त्याच्या हाताखालीं एक ट्रॅफिक मॅनेजर, एक चीफ इंजिनियर, एक लोकोमोटिव्ह सुपरिंटेंडेंट, एक स्टोअरकीपर, एक पोलिस सुपरिंटेंडेंट (सरकारनें नेमलेला), आणि एक ऑडिटर इतके अधिकारी असतात सरकारी रेल्वेची व्यवस्थाहि बहुतेक अशीच असते.

**क्लिअरिंग हाऊस.**— रेल्वे कंपन्यांच्या एकमेकींच्या हुंड्यांचा वटारा करण्यासाठीं हिशेब ठरविता येण्याकरितां एक स्वतंत्र क्लिअरिंग हाऊस स्थापन करण्यांत यावें अशी सूचना पुढें आलेली आहे. परंतु निरनिराळ्या कंपन्यांचीं मुख्य ठिकाणें हिंदुस्थानांत फार दूर दूर अंतरावर असल्यामुळें वरील सूचना अमलांत येत नाहीं. हल्लीं क्लिअरिंग हाऊसच्या ऐवजीं हुंड्यांच्या वटाव्याचें काम प्रत्येक रेल्वेच्या ऑडिट ऑफिसमार्फत होत असतें.

**रेल्वे कॉन्फरन्स.**— अन्तर्गत व्यवस्थेतील प्रश्न नीट सोडविता यावे म्हणून १८७६ मध्यें रेल्वे कॉन्फरन्स स्थापन करण्यांत आली. १९०३ मध्यें या कॉन्फरन्सला कायमच्या संस्थेचें स्वरूप देऊन इंडियन रेल्वे कॉन्फरन्स असोसिएशन असें नांव देण्यांत आलें. ही संस्था रेल्वेकंपन्यांच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखालीं असून संस्थेच्या सभासदांतूनच अध्यक्ष निवडला जातो. या संस्थेच्या हातून पुष्कळ उपयुक्त काम झालेलें आहे.

**हिंदुस्थानांतील रस्त्यांच्या रुंदीचीं निरनिराळीं मानें.**— हिंदुस्थानांत स्टँडर्डगेज ज्याला म्हणतात त्याची रुंदी ५ फूट ६ इंच असते. आगगाडीचे रस्ते प्रथम बांधण्याचें काम सुरू झालें त्या वेळीं ब्रॉड गेजच मान असावें म्हणजे वाऱ्याच्या वावटळींपासून उपद्रव होणार नाहीं असें मत होतें. परंतु प्रथमच्या रस्त्याला दर मैली १७,००० पौंड खर्च लागल्यामुळें सरकारनें आगगाड्यांची व्यवस्था स्वतःकडे घेतल्यावर कमी खर्चानें रस्ते करण्याचें ठरवून रुंदीचें मान मीटरगेज म्हणजे तीन फूट तीन पूर्णांक तीन अष्टमांश इंच असावें असें ठरविलें. मीटरगेज अंगीकारण्याचें कारण असें कीं, त्या वेळीं सर्वत्र बाजारांत मेट्रिक सिस्टिम सुरू करण्याबद्दल विचार चालू होता. तथापि प्रथम मीटरगेजचे रस्ते बांधून पुढें वाहतुक वाढल्यावर हेच रस्ते ब्रॉड गेजच करण्याचा मानस असल्यामुळें हे रस्ते फारसे भक्कम बांधले नव्हते. परंतु पुढें वाहतुक तर इतक्या जलदीनें वाढली कीं सर्व रस्ते ब्रॉड गेज मानाचे करण्याऐवजीं मीटर गेज कायम ठेवून तेच रस्ते भक्कम करण्याचें ठरलें. कारण ही योजना कमी खर्चाची होती. या निर्णयानुसार इंडस व्हॅली रेल्वेखेरीज करून बाकी सर्व रस्ते मीटरगेजचेच कायम ठेवून पक्के करण्यांत आले. हल्लीं गंगा नदीच्या उत्तरेकडेस मीटर गेजच्या लोहमार्गांचें एक मोठें जाळें असून तो लोहमार्ग राजपुतान्यांतील व काठेवाडांतील मीटर गेजच्या लोहमार्गांशीं जोडलेला आहे. राजपुतान्यांतील हा मीटर गेजचा लोहमार्ग माळव्यांतून खालीं दक्षिणेस खांडव्यापर्यंत आला आहे. त्याचप्रमाणें इकडे दक्षिण हिंदुस्थानांत सदर्नमराठा रेल्वे व साऊथ इंडिया रेल्वे मीटर गेजच्या आहेत. तेव्हां आतां खांडव्यापासून एक फाटा काढून तो निजाम हैदराबाद गोदावरी रेल्वेनें पश्चिमेकडील रेल्वेस मिळविला म्हणजे हिंदुस्थानच्या उत्तर व दक्षिण भागास जोडणारा मीटर गेजचा एक सलग लोहमार्ग होईल. हा रस्ता बहुधा लवकरच तयार होईल. ब्रह्मदेशामधील सर्व रेल्वे मीटर गेजच्याच आहेत. याशिवाय लहान रेल्वेमुळें २ फूट ६ इंच गेजच्या रस्त्यांहि चांगलें काम देऊं शकतो असा अनुभव आल्यापासून बहुतेक उपशाखा या लहान अडीच फुटी गेजच्या करण्याचीच प्रवृत्ति वाढत आहे.

**आगगाड्यांसंबंधीं कोष्टकें:**— हिंदुस्थानांतील आगगाड्यांच्या व्यवहारामध्यें शक्य तितक्या अधिक सविस्तर ज्ञान व्हावें म्हणून (१) निरनिराळ्या कंपन्यांचे आर्थिकस्थितिदर्शक १९१९–२० सालचे आकडे, (२) एंजिनें, डबे वगैरेंचे १९१५–१६, १९१६–१७, १९१७–१९१८, १९१८–१९१९ व १९१९–१९२० या पांच सालांचे आकडे, (३) आगगाड्यांकडील कामगारांचे चार सालांतील आंकडे, (४) १९१९–२० सालचे रेल्वेवरील सर्व प्रकारच्या अपघातांचे आंकडे व ५ उत्पन्नाची वर्गवारी दाखविणारे आंकडे कोष्टकरूपानें खालीं देत आहोंतः—

## निरनिराळ्या कंपन्यांचे आर्थिकस्थितिदर्शक १९१९-२० चे आंकडे

| आगगाडीचे नाव. (गेजाचे आंकडे नवीन गेज लागेपर्यंतच्या सर्व लायनीस लागू आहेत.) | सुरुवातीचा सन | १९२० मालपर्यंत तयार रस्ता, मैल. | गुंतलेले भांडवल. | एकंदर उत्पन्न. | चालू खर्च | निव्वळ उत्पन्न. | एकंदर उत्पन्नाशी चालू खर्चाचें शेकडा प्रमाण. | एकंदर खर्चाशी निव्वळ उत्पन्नाचें शेकडा प्रमाण. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | सहस्र रु | सहस्र रु. | सहस्र रु. | सहस्र रु. | | |
| १ बेंगाल नागपूर ५'६" गेज | १८८० | २७४६ | ४४९१५८ | ६५७५७ | ३८४९६ | २७२६१ | ५८ ५४ | ६·१० |
| २ बॉंबे बरोडा अँड सेंट्रल इंडिया | १८६० | १५७८ | २९८२७५ | ५७८६५ | ३०९४० | २६९२५ | ५३·४७ | ९·०५ |
| ३ ईस्टर्न बेंगॉल | १८६२ | ६२१ | २५७७०४ | २७५९९ | २०२१३ | ७३८६ | ७३ २४ | २·८७ |
| ४ ईस्ट इंडियन | १८५४ | २७७२ | ८०५५४१ | १३६०८० | ६११४५ | ७४९३५ | ४४·९३ | ९·३० |
| ५ ग्रेट इंडियन पेनिन्शुला | १८५३ | ३३३५ | ७४१६१४ | १३७९३७ | ८५९९२ | ५१९४५ | ६२·३४ | ७ ०३ |
| ६ मद्रास अँड सदर्न मराठा | १८५६ | १०६३ | २०१५४८ | ३७००९ | २०२८८ | १६७२१ | ५४·८२ | ८ ३० |
| ७ नायझॅमस गॅरंटीड स्टेट | १८७४ | ३५२ | ५५६६८ | ९०१७ | ५२५५ | ३७६२ | ५८ २८ | ६ ७६ |
| ८ नॉर्थ वेस्टर्न | १८६१ | ५३२१ | १०२२५०८ | ११७७९१ | ८६६८६ | ५११०५ | ६२·९१ | ५·०० |
| ९ औंध व रोहिलखंड | १८६७ | १६२४ | २२४२१९ | ३२३०६ | १८१९५ | १४१११ | ५६·३२ | ६ २९ |
| १० साऊथ इंडियन | १८६० | ४५० | ७२२९८ | १२६५७ | ६८३८ | ५८१९ | ५४·०२ | ८·०५ |
| ११ एडन ३' ३½ गेज | १९१६ | २९ | ६२६ | ३३५ | ४३३ | -९८ | १२९·३३ | ... |
| १२ आसाम बंगॉल | १८९५ | १०२१ | १८६९०८ | ११२६१ | ८८७१ | २३९० | ७८·७८ | १ २९ |
| १३ बेंगॉल अँड नॉर्थ वेस्टर्न | १८८४ | २०६४ | १७७२०६ | २५३३३ | १११०९ | १४२२४ | ४३·८५ | ८·०३ |
| १४ बेंगॉल दूआर्स | १८९३ | १५८ | १४५२६ | १८०८ | ·९१० | ८९८ | ५०·२८ | ६·१९ |
| १५ भावनगर स्टेट | १८८० | २०६ | १२६५९ | २६०२ | ११७७ | १४२५ | ४५ २३ | १०·९० |
| २ बॉंबे बरोडा अँड सेंट्रल इंडिया | १८७३ | २३३२ | १९६७०७ | ४५२३५ | २६३०३ | १८९३२ | ५८.१५ | ९·६२ |
| १६ बरमा | १८७७ | १६०६ | १३५१६८ | ३२९३० | १८६१३ | १४३१७ | ५६·५२ | ६·६९ |
| १७ डिब्रु-सादिया | १८८२ | ९१ | १३८६९ | १५७३ | १०८६ | ४८७ | ६९·०३ | ३·४८ |
| ३ ईस्टर्न बेंगाल | १८७७ | १११७ | १३४१२९ | १८७८१ | १०७८६ | ७९९५ | ५७·४२ | ५ ९६ |
| १८ गोंडळ | १८८१ | २३१ | ११८१९ | २४२५ | ११६५ | १२६० | ४८·०५ | १०·६६ |
| १९ हैद्राबाद गोदावरी व्हॅली, हिंगोली ब्रँच(१९१२ सुरु)व सिकंदराबाद | १८९९ | ५४५ | ४५५८० | ७१६१ | ३७८९ | ३३७२ | ५२·९१ | ७·४० |
| २० जामनगर [गडवा सुरु०(१९१६) | १८९७ | ५४ | २५८३ | ५१५ | २३७ | २७८ | ४६·१० | १०·७५ |
| २१ जोधपूर-बिकानेर | १८८२ | १३३१ | ८०७५४ | १००९५ | ५३७९ | ४७१६ | ५३ २८ | ११·५७ |
| २२ जुनागड स्टेट | १८८८ | १४० | ७९०० | १०५४ | ५१९ | ५३५ | ४९·२१ | ६·७८ |
| ६ मद्रास अँड सदर्न मराठा | १८८४ | १९६८ | १८४२४१ | २६३९२ | १४१९४ | १२१९८ | ५३·७८ | ६·६२ |
| २३ मोरवी | १८८६ | ९३ | ५४१६ | १२८९ | ४८५ | ८०४ | ३७·५९ | १४·३६ |
| २४ शिमूर-आर्सिकेरे | १८८१ | | | | | | | |
| | १९१८ | २४३ | १८२४३ | १३४१ | ८६६ | ४७५ | ६४·५८ | २·६० |
| २५ रोहिलखंड अँड कुमाऊन | १८८४ | ५७१ | ३८०९७ | ५२६३ | २८९१ | २३७२ | ५४·९३ | ६ २३ |
| १० साऊथ इंडियन | १८६१ | १३०४ | १५०३४० | ३१६४६ | १७३८६ | १४२६० | ५४·९४ | ९·४९ |
| २६ उदेपूर-चितोडगड | १८९५ | ६७ | २२८६ | ४३८ | १९८ | २४० | ४५·१९ | १०·५० |
| २७ अहमदपूर-काटवा २' ६" गेज | १९१७ | ३२ | १९७४ | १२२ | ७६ | ४६ | ६१·९१ | २·३३ |
| २८ अबाजी तरीग लाईट | १९१९ | २१ | आंकडे | उप | लब्ध | नाहीत. | | |
| २९ आराकान लाईट | १९१९ | ?८ | ३०८५ | ४७ | ९७ | ५० | २०७·०५ | ... |
| ३० अरा ससराम लाईट | १९११ | ६५ | २२६८ | २८० | १६५ | ११५ | ५९·१२ | ५·०३ |
| ३१ बंगलार चिक बेल्लापूर लाईट | १९१४ | | कोलर | डिस्ट्रिक्ट | रेल्वे | मध्यें | समाविष्ट | समावि. |
| ३२ बाकूरा-दामूदा-रिव्हर | १९१६ | ६० | ३५५० | २२६ | १४४ | ८२ | ६३·५३ | २·३१ |
| ३३ बरसत बासेरहत लाईट | १९०५ | ५२ | २३९४ | ४०६ | २४० | १६६ | ५९·११ | ६·९३ |
| ३४ बार्शी लाईट | १८९७ | ११८ | ८६२४ | १५९९ | ६०७ | ९८९ | ३८·०९ | ११·४६ |
| ३५ बेंगाल प्रॉव्हिन्शिअल | १८९४ | ४२ | १४५७ | १५२ | ११४ | ३८ | ७४·०० | ५·३८ |
| ३६ बुख्तियारपूर-बिहार लाईट | १९०३ | ३३ | १४२० | १७९ | १३१ | ४८ | ७३·२७ | ३·३६ |
| ३७ बरद्वान-काटवा | १९१५ | ३२ | १८१२ | १७१ | १०३ | ६८ | ६०·४४ | ३·७५ |
| ३८ चपानर-शिवराजपूर-पनि लाईट | १९११ | ३२ | १६५६ | १६४ | १२८ | ३६ | ७८·२६ | २·१५ |

निरनिराळ्या कंपन्यांचे आर्थिकस्थितिदर्शक १९११-२० चे आंकडे (पुढे चालू).

| आगगाडीचें नाव. | सुरुवातीचा सन | १९२० सालपर्यंत तयार रस्ता, मैल. | गुंतलेलें भांडवल. | एकंदर उत्पन्न. | चालू खर्च. | निव्वळ उत्पन्न. | एकंदर उत्पन्नाशीं चालू खर्चाचें शेकडा प्रमाण. | एकंदर खर्चाशीं निव्वळ उत्पन्नाचें शेकडा प्रमाण. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३९ कच्छ स्टेट | १९०५ | ३७ | १०९५ | १०२ | ३३ | ६९ | ३२·१५ | ६·३६ |
| ४० देहरी रोहतस लाईट | १९११ | २४ | ७८६ | २६७ | १४९ | ११८ | ५६ १४ | १४·८४ |
| ४१ धोलपूर बारी | १९०८ | ५२ | १३३९ | १५९ | ८९ | ७० | ५६·१६ | ५·२४ |
| ४२ गोध्रा लुनवाडा | १९१३ | २५ | १३१५ | ८८ | ७६ | १२ | ८५.७९ | ·९५ |
| ४३ जेसोर झेनिदाह | १९१३ | ३७ | १४३३ | १४३ | १२२ | २१ | ८५.३२ | १·४७ |
| ४४ कालिघाट फाल्टा | १९१७ | २५ | १८०९ | २२० | १२९ | ९१ | ५८·४९ | ५·०३ |
| ४५ कोलार डिस्ट्रिक्ट | १९१३ | १०२ | ३११७ | ३४७ | २६३ | ८४ | ७५ ७९ | २ ७० |
| ४६ मदय लाईट | १९१२ | १६ | | माहिती | मिळत | नाहीं | | |
| १० मोरप्पूर आणि तिरुपत्तूर कृष्णागिरि | १९०५ / १९०६ | ९९ | ४०७९ | ३१७ | ३३६ | –१९ | १०६.१४ | ... |
| १ मौरभंज स्टेट | १९०५ | ३२ | ७२७ | ६५ | ५६ | ९ | ८५·७५ | १·२७ |
| ४७ नडियाद कपडवंज | १९१३ | २८ | १४८३ | २२३ | १०६ | ११७ | ४७.४० | ७ ९२ |
| १ पारलाकिमेडी लाईट | १९०० | २५ | ७६८ | ६९ | ४२ | २७ | ६१·३८ | ३.४७ |
| २५ पोवयन लाईट | १८९० | | ८९५ | | | | | |
| ४८ शाहादरा(दिल्ली)साहरणपूर लाईट | १९०७ | ९३ | ४५७१ | ७५७ | ४३६ | ३२१ | ५७·५१ | ७,०२ |
| ४९ तेझपूर बलिपारा लाईट | १८९४ | २० | ४८७ | १६६ | ११६ | ५० | ६९·७३ | १०.२९ |
| ५० दार्जिलिंग–हिमालय २'०" गेज | १८८० | १४६ | १०१३१ | १८७६ | ११३८ | ७३८ | ६०·६६ | ७·२९ |
| ५१ ग्वाल्हेर लाईट | १८९९ | २५० | ७७१२ | ७३७ | ३८८ | ३४९ | ५२·६५ | ४·५३ |
| ५२ हावरा आमता लाईट | १८९७ | ४४ | २६९४ | ७१८ | ४५० | २६८ | ६२·७० | ९·९३ |
| ५३ हावरा शेखाला लाईट | १८९७ | २० | ७६४ | १७२ | १०६ | ६६ | ६१·८६ | ५·२८ |
| ५४ जगध्री लाईट | १९११ | ३ | ११० | २५ | १६ | ९ | ६४·६६ | ८·०३ |
| ५५ जोरहट (प्रांतिक) | १८८४ | ३३ | १११९ | १२६ | १२० | ६ | ९५·४७ | ०·५१ |
| ५६ कुलसे-करपत्तनम् लाईट | २९१५ | ३२ | ५८५ | ५० | ९२ | ४२ | १८२-२२ | ... |
| २१ पिपर बिलर लाईट | १९१० | २५ | २९० | ३९ | २८ | ११ | ७० ७५ | ३·९६ |
| ५७ तरिकेरे नरसिंहराजपूर | १९१५ | २७ | ६३६ | २८ | —२४ | ४ | ८५·७० | ०·६१ |
| एकूण | ...... | ३६७३५ | ५६६३७७७ | ८९१५३२ | ५०६५६५ | ३८४९६७ | ५६.८१ | ६·८० |

एंजिनें, डबे वगैरेंचे आंकडे.

| तपशील. | १९१५–१६ | १९१६–१७ | १९१७–१८ | १९१८–१९ | १९१९–२० |
|---|---|---|---|---|---|
| १ एंजिनें | | | | | |
| (१) उतारूंच्या गाड्यांचीं एंजिनें | १९८२ | १९०२ | १८२४ | आंकडे उपलब्ध नाहींत | आंकडे उपलब्ध नाहींत |
| (२) मालगाड्यांचीं एंजिनें | २६९'१ | २७१८ | २७२५ | | |
| (३) मिक्स म्हणजे उतारू व माल नेणाऱ्या गाड्यांचीं एंजिनें | ३९९७ | ४१४० | ४३४४ | | |
| एंजिनाची एकूण संख्या | ८६७४ | ८७६० | ८८९३ | ८९२३ | ८९८२ |
| २ कोचिंग स्टॉक | २३३९६ | २३७१४ | २४५३७ | २४६८४ | २४७०४ |
| ३ गुड्स स्टॉक | | | | | |
| (१) छप्पर असलेले डबे | १२२६९५ | १२३८३३ | १२३९९२ | १२३९१४ | १२६६७५ |
| (२) उघडे डबे | ५४०४३ | ५४१९७ | ५४४१६ | ५४२०७ | ५४८६४ |
| (३) लाकूड नेणारे डबे | ३८०० | ३६१४ | ३७२५ | ३६८६ | ३६६८ |
| (४) इतर प्रकारचे डबे | ८०९० | ८३५४ | ८८४७ | ९२९६ | ९४३१ |
| गुड्स स्टॉकची एकूण | १८८६२८ | १९००४८ | १९०९८० | १९११०३ | १९४६३८ |

आगगाड्यांकडील कामगार १९१० ते १९२०

| वर्षं | नोकर | | | | रेल्वे ठेकेदारांचे मजूर. | रेल्वेच्या खात्यांत जाणारी मजूर. | रेल्वेच्या शाखांतील उमेदवार व कामगार. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | यूरोपीय | अँग्लो इंडियन | इंडियन | एकूण | | | |
| १९१० ... ... ... | ७४०६ | ९५५४ | ५२२७४१ | ५३९७०१ | १३७२३ | ८२८९ | ८५५२ |
| १९१४–१५ ... ... .. | ७६४१ | १०३४९ | ५८२४९३ | ६००४८३ | १५९८१ | १०६६४ | १०१६३ |
| १९१८–१९ ... ... ... | ६७०२ | १०४५० | ६६७८२४ | ६८४९७६ | आंकड लपलब्ध नाहींत. | | |
| १९१९–२० ... ... ... | ६९४१ | १०८६५ | ६९३८८४ | ७११६९० | आंकडे उपलब्ध नाहींत. | | |

रेल्वेवरील सर्व प्रकारच्या अपघातांचे कोष्टक १९१९ ते १९२०

| तपशील | | | १९१५-१६ | १९१६–१७ | १९१७–१८ | १९१८-१९ | १९१९–२० |
|---|---|---|---|---|---|---|---|
| उतारू | मेले | गाडीच्या अपघातामुळें किंवा रस्ता नादुरस्तीमुळें | ४ | १५ | ५४ | १२ | ८५ |
| | | स्वतःच्या हलगर्जीपणामुळें किंवा गैरवर्तनामुळें. | २४३ | २२९ | २१४ | ३३१ | ३८५ |
| | | एकूण मेले | २४७ | २४४ | २६८ | ३४३ | ४७० |
| | जखमीलोक | आगगाडीलाच्या अपघातामुळें किंवा रस्ता नादुरुस्त झाल्यामुळें. | ८१ | २४१ | २३७ | १३१ | २४१ |
| | | स्वतःच्या गैरवर्तनामुळें किंवा हुलगर्जीपणामुळें | ७४० | ८५८ | | ९८८ | ११५४ |
| | | एकूण जखमी लोक | ८२१ | १०९९ | १०२९ | १११९ | १३९५ |
| रेल्वे नोकर | मेले | आगगाडीला झालेल्या अपघातामुळें किंवा रस्ता नादुरुस्तीमुळ | १९ | २२ | ४० | २३ | ४९ |
| | | स्वतःच्या हलगर्जीपणामुळे किंव-गैरवर्तनामुळें. | ४१४ | ४०३ | ३६८ | ४३३ | ४०१ |
| | | एकूण मेले | ४३३ | ४२५ | ४०८ | ४५६ | ४५० |
| | जखमीलोक | आगगाडीला झालेल्या अपघातामुळें किंवा रस्ता नादुरुस्तामुळें | १०९ | १३८ | २०६ | १५० | २२३ |
| | | स्वत.च्या हलगर्जीपणामुळें किंवा गैरवर्तनामुळें. | ६८७ | ६५९ | ६८६ | ६९२ | ८०० |
| | | एकूण जखमी लोक... | ७९६ | ७९७ | ८९२ | ८४२ | १०२३ |
| इतर इसम | मेले | रेल्वे फाटकांतून जातांना ... | ४० | ४८ | ४४ | ५३ | ४७ |
| | | कायद्याचें अतिक्रमण करणारे... | १३१० | १३६३ | १३५० | १३३५ | १७५० |
| | | आत्महत्या करणारे... ... ... | २५६ | २३९ | २३५ | २७४ | २८५ |
| | | किरकोळ ... ... ... ... | १२७ | ८१ | ८९ | १०२ | १६९ |
| | | एकूण मेले... | १७३८ | १७३१ | १७१८ | १७६४ | २२५१ |
| | जखमीलोक | रेल्वे फाटकांतून जातांना ... | ३५ | ३९ | ५५ | ४५ | ३२ |
| | | कायद्याचे अतिक्रमण करणारे ... | ४२५ | ४५४ | ४५३ | ४८३ | ५७२ |
| | | आत्महत्या करणारे ... ... | ८ | ९ | ८ | २४ | १७ |
| | | किरकोळ ... ... ... ... | ६८ | ३८ | ५२ | ७२ | ६९ |
| | | एकूण जखमी लोक ... | ५३६ | ५४० | ५६८ | ६२४ | ६९० |

उत्पन्नाची वर्गवारी.

| तपशील | १९१५–१६ | १९१६–१७ | १९१७–१८ | १९१८–१९ | १९१९–२० |
|---|---|---|---|---|---|
| १ कोचिंग ट्रॅफिक [ तपशील शंकास्पद ] | सहस्र रु. | सहस्र रु. | सहस्र रु. | सहस्र रु. | सहस्र रु. |
| ( अ ) पॅसेंजर ट्रॅफिक | | | | | |
| ( १ ) पहिला वर्ग | ५८७६ | ७२२६ | ९५२५ | १११६९ | १२८८० |
| ( २ ) दुसरा वर्ग | १०१४१ | १३००१ | १४३३० | १७२६६ | २१७९४ |
| ( ३ ) इंटर क्लास | ११२८२ | १२२४१ | ११५७३ | १४२८८ | १६९६८ |
| ( ४ ) तिसरा वर्ग | १८०४८५ | १९६१५९ | २१४४५१ | २४४२८१ | २७६८९४ |
| ( ५ ) सीझन व माइलेज तिकिटें यांचे पास | २०७३ | २१९२ | २४३६ | २७७४ | ३०९९ |
| एकूण | २०९८५७ | २३०८१९ | २५२३१५ | २८९७७८ | ३३१६२९ |
| ( ब ) इतर कोचिंग ट्रॅफिक | ३२०२१ | ४०३१४ | ४९९३९ | ५२८८७ | ५९७६७ |
| एकूण कोचिंग ट्रॅफिक | २४१८०० | २७०५९५ | ३०१७०५ | ३४२०१६ | ३९०६९३ |
| २ गुड्स ट्रॅफिक [ तपशील शंकास्पद ] | | | | | |
| ( अ ) सर्वसाधारण सामान | २९२३३५ | २९६९२९ | ३१४१७८ | ३४८९९६ | ३४४२२१ |
| ( ब ) लष्करी सामान | ४०५३ | ७१५४ | १४५८८ | १९५७१ | १३४६४ |
| ( क ) आगगाड्यांना लागणारा कोळसा | ६२९३६ | ७९७९१ | ८२६०४ | ८७९५८ | ७८९४९ |
| ( ड ) रेव्हेन्यू स्टोअर्स, बांधकामाच्या सामानासुद्धां | २२५४२ | २४५४० | २७४४६ | २८८२४ | २७४०९ |
| ( इ ) जनावरें | ४२२५ | ४००० | ३६११ | ४३३१ | ५१८४ |
| ( फ ) इतर गुड्स ट्रॅफिक | २२९० | २९३८ | ३७४४ | ३५४४ | ३२९४ |
| एकूण गुड्स ट्रॅफिक | ३८७५७९ | ४१४३०० | ४४४५५४ | ४९१३८९ | ४७११६० |
| ३ तार खात्याचें उत्पन्न | ९५१ | १०८९ | १२६७ | १७१८ | १८०१ |
| ४ आगबोटीचें उत्पन्न | २२४७ | २२३४ | १९३६ | २२२० | २७४९ |
| ५ इतर | १४३३२ | १८६२४ | २३७७७ | २५५२५ | २४७९४ |
| एकूण | × ६४६६०४ | ७०६८४२ | ७७३६३९ | ८९२८९८ | * ८९१५३२ |

× येथें मेसोर-हिंदा व * येथें एडन रेल्वेच्या आंकड्यांसहित.

**आगपेट्या व आगकाड्या, अर्वाचीन अग्निसाधनें**—मनुष्यजातीच्या रोजच्या व्यवहारास अग्नीची अत्यंत आवश्यकता आहे. यामुळें अर्थात् जरूर पडेल त्या वेळेस सुलभ रीतीनें अग्नि उत्पन्न करतां यावा त्यासाठीं मानवजातीचे फार प्राचीन काळापासून प्रयत्न चालत आले आहेत. भौतिक शास्त्रांत आघाडी मारणाऱ्या पाश्चिमात्य देशांत एक म्हण प्रचलित आहे ती अशी की "अग्नि हा चांगला चाकर पण वाईट धनी आहे" म्हणजे अग्नीस आपल्या कह्यांत ठेविलें तर त्यापासून अनेक उपयोग करून घेतां येतील, परंतु त्यास निरर्गल रीतीनें वागूं दिल्यास तो आपल्या सर्व घरादाराचा नाश करील. आध्यात्मवृत्तीचें माहेरघर असलेल्या हिंदुस्थानांत वैदिक रीतीनें आम्हांस लागणारा अग्नि अरणीच्या साह्यानें (पिंपळाच्या फळींत एक खड्डा करून त्यांत पिंपळाचें दुसरें लांकूड उभें धरून मंथन क्रियेनें) उत्पन्न करीत असत. हा अग्नि अतिशय पवित्र मानिला जात असे, व तो अग्निहोत्र्याच्या कुंडांत कायम राहील अशी व्यवस्था करीत. यामुळें घरांत अग्नीचें वास्तव्य कायम असे व गृहस्थांना तो उपयोगीं पडत असे. घरांत वावरणारा अग्नि निखाऱ्याच्या रूपांत असल्यामुळें त्याला उतारा नसतो तो उत्पन्न करण्यास पूर्वी सणकाड्यांचा उपयोग करीत असत. अंबाडीच्या काड्यांच्या आतील गाभ्यास अग्नीवर पातळ केलेल्या गंधकांत बुडवून त्या काड्या ठेवण्याची हिंदुस्थानांत व इतर देशांत पूर्वी चाल असे या रीतीनें चूल पेटविण्यास व दिवाबत्ती करण्यास या गंधकाच्या काड्यांची योजना करीत असत. त्याखेरीज सर्व देशांत पूर्वी प्रचलित असणारें अग्निसाधन म्हणजे चकमक होय गारगोटी, पोलादाची बारीकशी पट्टी व चकमकीच्या घिसटण्यानें ठिणगी धरणारा हलका कापूस किंवा शेवरीसारख्या झाडाचा कापूस, इतकें साहित्य चकमकीनें अग्नि तयार करण्याकरितां लागत असे.

**आगकाड्या बनविण्याचा पहिला प्रयत्न व त्यांत सुधारणा.**—युरोपखंडांतसुद्धां १७ व्या शतकाच्या

अखेरपर्यंत आगकाड्यांची कल्पना कोणास सुचली नव्हती. व तोंपर्यंत तिकडेहि चकमकीचाच उपयोग होत असे आगकाडी तयार करण्याचा पहिला यत्न गाडफ्रे हाकूविझ यानें १६८० त केला परंतु त्यात दोष राहिल्यामुळें त्या प्रयत्नास मोठें महत्त्व देता येत नाहीं. त्यानंतर १८०५ मध्यें प्रोफेसर चॅन्सेल यानें रासायनिक द्रव्यापासून अग्नि उत्पन्न करण्याची युक्ति काढली एका बाटलींत असबेस्टास आणि तेजाब ऊर्फ गंधकाम्ल यांचें मिश्रण ठेवावयाचें व दुसरीकडे साखर व पालाशहरित (क्लोरेट आफ पोटॅश) लावलेल्या काड्या तयार ठेवावयाच्या व जरूर पडताच त्यांपैकीं एक काडी त्या बाटलींत बुडवावयाची कीं अग्नि तयार होत असे.

ही नवीन कल्पना निघाल्यानंतर रसायनशास्त्रज्ञ व कुशल लोकांचें लक्ष्य ह्या विषयाकडे साहजिक लागलें त्यात कोणच्या सुधारणा केल्या असता गैरसोय कमी होऊन, धोक्याची भीति न राहता खर्चेहि कमी पडेल यासंबंधीं त्यांनीं प्रयोग करण्यास सुरुवात केली व या धंद्यांत चढाओढ सुरू होऊन केवळ २० वर्षांच्या आतच रसायनाच्या बाटल्यांच्या जागीं काड्यांच्या पेट्या निघाल्या व त्या एकदम भडकून होणारे अनर्थहि कालांतरानें बंद झाले त्या काड्यांनां सारखा आकार व सुबकपणा याची जोड मिळाली. १८२७ सालीं जॉन वाकर नांवाच्या रसायनशास्त्रज्ञानें घर्षणानें अग्नि उत्पन्न करणारी आगकाडी बनविली. त्या वेळेस एका पेटीला एक शिलिंग किंमत पडत असे, व प्रत्येक पेटीबरोबर काचकागदाचा तुकडा घर्षणाकरिता गुंडाळलेला असे १८३३ मध्यें फास्फरसच्या काड्या तयार झाल्या. परंतु लौकरच साधा, पांढरा किंवा पिवळा गंधक मिश्रणात घातल्यापासून पुष्कळ तऱ्हेचे अपाय होण्याची भीति आहे असें आढळून आलें. या काड्यांच्या धुरामुळें कित्येक ठिकाणीं अपघात होऊन माणसें मृत्युमुखीं पडलीं व कित्येकांस कांहीं विवक्षित रोग जडले. पिवळ्यापेक्षा पांढरा गंधक जास्त अपायकारक आहे, यामुळेंच हिंदुस्थान सरकारनें कायदा करून त्या गंधकाच्या आगपेट्या परदेशातून कोणी आणूं नयेत व येथेंहि तयार करूं नये असें ठरविलें तांबडा फास्फरस घालून सुरक्षित काड्या (सेफ्टीमॅचेस) तयार होऊं लागल्यापासून ही भीति दूर झाली आहे व आपोआप आगपेटीनें पेट घेणें वगैरे अपघातापासून अलीकडे बराच बचाव झाला आहे

क्रिया —आगपेट्यांच्या नवीन धर्तीनें चालणाऱ्या कारखान्यांत मुख्यतः आठ क्रिया असतात

पहिला भाग लाकूड सोलण्याचें काम.—ह्या खात्यात कच्चें ओलें लाकूड रुंद सुरीनें सारखें सोलून याचे काडीला योग्य असे जाड व पेट्यांना योग्य असे रेखाकिंत पातळ पत्रे सोलून काढतात.

दुसरा भागः—जाड पत्र्याच्या काड्या पाडणें व पातळ पत्र्याचे आगपेट्यांना योग्य असे तुकडे पाडणें

तिसरा भाग:—काड्यांच्या चौकटी भरणें.

चौथा भाग —काड्यास गूल लावणें

पांचवा भाग.—आगपेट्यांचीं आतील व बाहेरील टोपणें (पेट्या) तयार करणें व या पेट्यांना रंगीत कागद अथवा लेबलें लावणें.

सहावा भागः—चौकटींतल्या गूल लावलेल्या काड्या सोडवून घेणें [अलग करणें]

सातवा भाग.—काड्या पेट्यांतून भरणें.

आठवा भागः—या तयार झालेल्या आगपेट्यांना बाजूनें घर्षणाचें साधन लावणें [सॅंडिंग]

यानंतर आगपेट्यांचे पुडे बांधणें व बाहेर गावीं जाण्याकरता मोठमोठ्या देवदारी लाकडाच्या खोक्यांत भरणें (पॅकिंग) ह्या क्रिया होतात.

आ ग का ड्यां क रि तां ला कू ड.—उपर्युक्त पहिल्या खात्यांतील (सोलण्याच्या) कामासंबंधानें विचार करता आगपेटी व आगकाडी याच्याकरिता योग्य लाकडाची निवड व मुबलक पुरवठा या दोन गोष्टी मोठ्या अडचणीच्या आहेत पेटीकरितां सोईचें लाकूड न मिळाल्यामुळेंच हिंदुस्थानांतील पूर्वीचे यत्न सफल झाले नाहींत. पेटीच्या लाकडापेक्षा काडीचें लाकूडच स्वस्त, मुबलक व योग्य असलें पाहिजे. पापलर, अस्पाईन, पाईन अशा जातींच्या लाकडाचा उपयोग इतर देशात करितात. आपल्या देशात हीं झाडें हिमालयाशिवाय फारशी कोठें होत नाहींत तेथून तीं आणण्यास खर्च फार लागेल म्हणून त्या लाकडाचा उपयोग होऊं शकत नाहीं. याकरितां जेथें हीं लाकडें पैदा होतात अशा जंगलातच काड्या व पेट्या बनविण्याचे कारखाने निघतील व त्याच्या जवळच रेल्वे स्टेशनालागून काड्यांना रासायनिक मिश्रण लावून व पेट्या तयार करून बाहेर पाठविण्याची तजवीज होईल, तसेंच त्यावरील रेल्वेभाडेंही माफक पडेल तरच हा धंदा हिंदुस्थानात यशस्वी होईल.

मध्यभाग व दक्षिण भाग याच्या जवळपासच्या जंगलातून काटेसावरीची लागवड मोठ्या प्रमाणावर केल्यास कांहीं वर्षांनीं त्या झाडाचा आगपेट्यांचे कारखाने काढण्यास उपउपयोग होईल हिंदुस्थानांतील जंगलखात्याच्या मताप्रमाणें खालील लाकडे या धंद्यास उपयोगी पडतील —

धूप, सलाई, काटेसावरी, चिरंजी, करमागोंद, वायवर्णा, वायाचें झाड, फुगळी, कडूफळ, तसेंच मकावलि, सोनचाफा, आवा, अंबाडी वगैरे एकंदर ५१ झाडें आगपेट्याकरिता कामास येण्यासारखी हिंदुस्थानात आहेत असें ट्रूपसाहेब यांच्या रिपोर्टावरून समजतें. वास्तव भांडवलवाले व ह्या धंद्यातले तज्ज्ञ लोक यांनीं योग्य दिशेनें यत्न केल्यास ह्या धंद्यास कायमचें स्वरूप देण्याचें श्रेय त्यांस मिळेल. या कामीं आजपर्यंत झालेले प्रयत्न का सिद्धीस गेले नाहींत याचाहि पूर्णपणें शोध करून त्यांत अपयश येण्याचा जो










(१) आंत्रपध्दति. (पृ.आ.१०१)
(२-३) हिंदुस्थानांत तयार केलेलीं आगकाड्यांच्या कारखान्यांतील यंत्रें: आगपेट्या व आगकाड्या (पृ.आ.३४)


















(१) अजगर (पृ. अ ६२ पहा) (२) अल्पाका. (पृ. अ. ५५२ पहा) (३) अस्वल. (पृ. अ ६५२ पहा) (४) शेवंडा- अष्टपाद (पृ. अ. ६१५ पहा) (५) झुरळ- अष्टपाद. (पृ. अ. ६१५ पहा) [illegible]- अष्टपाद. (पृ. अ. ६१५, पहा.)

कारणें झालीं असतील तीं टाळणें अत्यंत जरूर आहे. त्रावणकोर संस्थानात सुमारें १५० प्रकारचीं झाडें आहेत त्यापासून आगपेट्या तयार करता येतील

आ ग का ड्यां ना ला ग णा रीं रा सा य नि क द्र व्यें.– " ॲंटिमनीसल्फाईड,आयर्न ऑक्साईड, पोटॅशियम क्लोरेट, पोटॅशियम डिक्रोमेट,लेड डायऑक्साइड,रेडलेड, रेड फॉस्फरस, गंधक, रेसिन, ग्लू, काचेची भुकटी इत्यादि आहेत काडी उत्तम असल्याची परीक्षा पुढीलप्रमाणें करावी. चांगली आगकाडी सावकाश जळते, तिचें गूल पटकन पडत नाहीं. ' सेफ्टी मॅच ' पूर्ण जळली पाहिजे व तिच्यातून राख निघता कामा नये.

आ ग पे ट्या चा व्या पा र.—सन १९१३।१४ पासून १९१८।१९ पर्यंत आयात झालेल्या मालाच्या किंमतीः—

| | |
|---|---|
| १९१३।१४ | ८९ लाख रुपये. |
| १९१४।१५ | १९९ " |
| १९१५।१६ | १३८ " |
| १९१६।१७ | १२२ " |
| १९१७।१८ | २३८ " |
| १९१८।१९ | १६५ " |

जपान, स्वीडन व नार्वे, झेकोस्लोव्हाकिया या देशातून आगपेट्या आपल्या देशात येतात. त्यापैकीं सुरक्षित काड्यांच्या किंमतीचें प्रमाण सुमारें शेंकडा ६० रुपये पडतें व बाकी साध्या आगपेट्या असतात. आगपेट्या तयार करून आपल्या देशात पाठविण्यात सध्या जपानचा नंबर पहिला लागतो. प्रोफेसर गोडबोले यांनीं असें दाखविलें आहे कीं, हिंदुस्थानात दर माणशीं एका सालात सुमारें ४२९ आगकाड्या खपतात, म्हणजे माणशीं दररोज .१२ आगकाडी लागते, पण यूरोपमध्यें दरमाणशीं ६ पासून १९ आगकाड्या रोज लागतात.

हिं दु स्था ना ती ल का र खा ने.—गेल्या २०।२५ वर्षांत सुमारें १६ आगकाड्यांचे कारखाने निघाले. गुजराथ इस्लाम फॅक्टरी नावाचा एक कारखाना अहमदाबादेस चालू स्थितींत आहे. त्यात आगपेट्या (सेफ्टी मॅचेस)व चंद्रज्योतीच्या काड्या तयार होतात. बंगालमधील सुंदरबन मॅच फॅक्टरीहि चांगल्या स्थितींत आहे. कल्हाड येथें एक आगकाड्यांचा कारखाना चालू असून त्यातुन मध्यम प्रकारचा माल बाहेर पडतो. मध्यप्रांतात एलिचपूर येथें एक कारखाना निघाला होता; पण तो बंद पडला. तथापि कोटा ( बिलासपूर ) येथें एक कारखाना चालू असून त्यातूनहि कांहीं माल बाहेर पडतो. इंदूर संस्थानात खरगोण येथेंहि एक कारखाना आहे.

ह्या कारखान्यांच्या मालकांना आजपर्यंत वर्षानुवर्ष तोटाच होऊन राहिला आहे. तरी मोठ्या नेटानें त्यांनीं तो चालविला आहे.

आ ज प र्यं त आ ग पे ट्यां चे का र खा ने बु ड ण्या चीं का र णें.— हीं थोडक्यात खालीं दिलीं आहेत.—

( १ ) योग्य लाकडाचा अभाव किंवा कमी पुरवठा.

( २ ) आगपेट्यांचीं यंत्रें कित्येक ठिकाणीं महाग पडलीं किंवा कित्येक ठिकाणीं जपानी स्वस्त यंत्रें आणूनहि चालविता आलीं नाहीत.

( ३ ) मजूर स्वस्त पण आळशी व अडाणी.

( ४ ) कित्येक ठिकाणीं अपुरें भांडवल

( ५ ) हुशार रसायनशास्त्रज्ञाचा अभाव.

( ६ ) रेल्वेचे दर कारखान्यास प्रतिबंधक असणें

( ७ ) जंगलापासून कारखाने दूर असणें

( ८ ) या धंद्यास लागणारीं रासायनिक द्रव्यें व यंत्रें आपल्याच देशांत मिळत नसल्यामुळें त्यांना उत्तेजन नाहीं.

म हा रा ष्ट्रां ती ल का र खा ने व त्यां ची स्थि ति.— आपल्या महाराष्ट्रात काड्याच्या पेट्या करणारे तीन कारखाने दिसतात. कल्हाड मॅच फॅक्टरी मध्येंतरीं डबघाईस आली होती ती आता चांगली सावरलेली दिसते हा काड्यांच्या पेट्यांचा कारखाना कल्हाड गांवीं एका मोठ्या जुन्या चाळीच्या वाड्यात आज आहे. महायुद्ध सुरु असताना पेटी व काडी करण्यास लागणारें लाकूड मिळत नसल्यामुळें हा कारखाना चालू नव्हता. आता त्यास जंगलातील लाकूड मिळूं लागलें आहे, व कामहि चांगलें होऊं लागलें आहे. पेटी आणि काडी शेवरीच्या ओल्या लाकडापासून करितात, आणि जागच्या जागीं हें लाकूड चार आणे गाडीप्रमाणें विकत मिळतें. तोडणावळ व वाहतुक खर्चामुळें लाकडाची किंमत ६-७ रुपयांपर्यंत वाढते. प्रथम मोठमोठ्या झाडांचे फूट सवाफूट लांबीचे ओंडके मोठ्या गोल करवतीनें कापून त्याची साल काढून टाकितात. ओंडा कितीहि जाड असला तरी चालतो व करवतयंत्र तैल–यन्त्राच्या शक्तीनें चालत असल्यामुळें कापण्याची अडचण पडत नाहीं काड्यांची पेटी तयार होण्यापर्यंतचीं सर्व कामें म्हणजे ओल्या ओंड्यापासून कार्डबोर्डसारखे कमीजास्ती जाडीचे तक्ते काढणें, त्यास घड्या घालण्यासाठीं वण पाडणें, त्याची लांबी-रुंदी कापून लागणाऱ्या मापानें तुकडे बनविणें, पेटीचे आतले व बाहेरचे भाग बनविणें, चिकटवून डबी करणें, लेबलें लावणें, तसेंच काडया कापणें व त्या एकाच जाडीच्या करणें, लेबलें जुळविणें, गूल लावणें, वाळविणें इत्यादि प्रत्येक गोष्ट या कारखान्यात केवळ यंत्राच्या साधनानें केली जाते आणि अशा तऱ्हेनें दररोज सध्या ५० ग्रोस आगपेट्या तयार होत आहेत. ह्या सर्व कामास एकंदर २०-२५ यंत्रें लागतात.

औंध संस्थानातहि काड्यांच्या पेट्या स्वस्त सफाईदार कशा करिता येतील यांविषयीं प्रयोग चालू आहेत. परदेशी पेटीवर ५० टक्के कर बसल्याकारणानें हा धंदा कर्जितावस्थेस येण्य़ास हरकत दिसत नाहीं. इंदूर संस्थानात थोड्या भांडवलात व देशी साधनांनीं पेट्या तयार करण्याचा कारखाना निघाला आहे. (केसरी १६।१।२३).

**वेळूच्या लाकडाचा आगकाड्या करण्याकडे उपयोग.**—वेळूच्या काड्यापासून आगकाड्या व वेळूच्याच आगपेट्या होऊं शकतात, अशाबद्दल पेटंट ऑफिसची नोटीस सप्टेंबर १९२२ च्या ग. इं. गॅझेटांत प्रसिद्ध झाली आहे. वेळूच्या तयार केल्या गेलेल्या आगकाड्या व पेट्या १९२२ च्या आक्टोबर महिन्यांत इंदोर शहरीं उद्योगप्रदर्शन झालें त्या वेळीं प्रदर्शनांत ठेविल्या होत्या, आणि काड्या व पेट्या करण्याची कृतीसुद्धां दाखविली होती. या आगपेट्या करण्याचा कारखाना इंदोर राज्यांत खरगोण मुक्कामीं सुरू झाला आहे.

वेळूच्या आगपेट्या रोज ५ ग्रोस तयार करण्यास गावचे सुतार व लोहार यांजकरवीं फक्त अडीचशें रुपयांची उपकरणें तयार करावीं लागतात, व जवळजवळ १०० रुपये मेण व इतर रसायन खरेदी करण्यास व मजुरी देण्यास लागतात. एक ग्रोस सवादोन रुपयास विकल्यास प्रत्येक ग्रोसामागें सहा आण्यापासून दहा आण्यापावेतों फायदा मिळूं शकतो. यांतील सर्व काम घरोघरीं बायका व पुरुष मिळून करूं शकतात सामान सर्व तयार असल्यास आठ दिवसांच्या शिक्षणानें साधारण पुरुषास किंवा स्त्रीस एकंदर कृतीची माहिती दिली जाऊं शकते असें मांडण्यांत आलें आहे. वेळूची लागवड कमी खर्चांत होऊं शकते. ५।६ वर्षांत वेळू उपयोगीं पडेल अशीं बेटें १०।१५ एकर जमिनींत तयार होऊं शकतात व वेळूची पुढील वाढ सतत चालू राहते. यंत्रें खरेदी करण्यास जे हजारों रुपयांचें भांडवल लागतें, त्याच्या दरमहाच्या व्याजापेक्षा कमी भांडवलांतच आपल्या राहत्या शहराच्या व त्याच्या आजूबाजूच्या व गांवगन्नाच्या पुरवठ्यापुरत्या आगपेट्या प्रत्येक शहरांत होऊन त्याच्या मजुरीचा पैसा त्याच गांवांत राहील, अशी मांडणी करण्यांत आली आहे. माल जास्त काढणें असल्यास उपकरणांपैकीं फक्त एकच वस्तु जास्त प्रमाणावर गावठी सुताराकडून कोणत्याहि लाकडाची करावी या प्रत्येकीस १ रुपया पडतो व प्रत्येक ग्रोसाला अडीच तीस वस्तू लागतात.

**आगपेट्यांचे कारखाने व हिंदुस्थान सरकार.**—बंगालबहार सरकारांनीं काड्यांच्या पेट्यांच्या कारखानदारांना त्यांच्या धंद्यांतील अडचणी दूर करण्याच्या कामीं मदत करण्याकरितां म्हणून तज्ज्ञ नेमला आहे. हा तज्ज्ञ काड्या व पेट्या तयार करण्यास अवश्य पुरणारें लांकूड कोठें मिळेल व काड्यांच्या टोंकाशीं असलेला गूल सादळूं नये म्हणून काय उपाय करावा यासंबंधांत चौकशी करून आपला अभिप्राय रिपोर्टद्वारें प्रसिद्ध करील असें सरकारीरीत्यानें जाहीर झालें आहे. बंगालची या दृष्टीनें पहाणी होऊन रिपोर्ट प्रसिद्ध व्हावयाचा राहिला आहे. बहार प्रांताकडे काम मुकसें सुरू झालें. याप्रमाणेंच जर प्रत्येक प्रांतिक सरकार करील तर हिंदुस्थानांत दरवर्षी विशेषतः जपानांतून अजमासें दोन कोटी रुपयांची काडी जी येते तिला बराच आळा बसून, हा एक महत्त्वाचा धंदा हिंदुस्थानांत चांगला चालेल. खाजगी प्रयत्नानें फार अल्प प्रगति होणार हें निःसंशय आहे तेव्हां या कामीं सरकारनें मदत करणें अत्यवश्य व कर्तव्यप्राप्त आहे, अशी मतें व्यक्त करण्यांत आलीं आहेत.

**हिंदी कारखान्यांत झालेली आगपेट्या बनविण्याचीं यंत्रें.**—या बाबतींत आजपर्यंत झालेल्या संशोधनावरून असें म्हणतां येईल कीं, आगकाड्यांना लागणारा कच्चा माल हिंदुस्थानांत इतका मुबलक आहे कीं, अगदीं सुधारलेल्या यंत्रसामुग्रीच्या मदतीनें आगकाड्या करण्याचे कारखाने निघाल्यास हिंदुस्थानाला पुरेसा, इतकेंच नव्हे तर बाहेर देशीं पाठविण्याइतका, माल येथें होऊं शकेल. मात्र आगकाड्यांचे कारखाने खेड्यापाड्यांतूनहि थोडक्या भांडवलानें काढतां येतील अशी यंत्रयोजना होणें जरूर आहे. हा हेतु मनांत धरून बंगाल्यांतील डॉ. महेंद्र चंद्र नंदी राहणार बलेकच्छ (टिपरा) यांनीं लहानसें तीन मण वजनाचें यंत्र तयार केलें. या यंत्राचा विशेष हा आहे कीं, सरळ शिरा असलेलें कोणत्याहि जातीचें लांकूड या यंत्रांत उपयोगीं पडतें; परदेशी यंत्राप्रमाणें विशिष्ट जातीचेंच लांकूड पाहिजे असें नाहीं. डॉ. नंदी यांच्या यंत्रामुळें हा धंदा इतका सोपा व यशस्वी बनला आहे कीं, बंगाल, बहार व ओरीसा मिळून १५० हून अधिक कारखाने चालू झाले आहेत असें "इंडस्ट्री" मासिकांत (पु. १३, अं. १४८) एका लेखकानें म्हटलें आहे. डॉ. नंदी यांच्या खेरीज इतर शास्त्रज्ञांनीहि कांहीं फेरफार करून असल्या प्रकारचीं यंत्रें अलीकडे तयार केलीं आहेत. या यंत्रामुळें आतां ७५० रुपये भांडवलांत हा कारखाना निघूं शकतो. त्यामुळें प्रत्येक जिल्ह्यांत स्थानिक भांडवल, स्थानिक मजूर व स्थानिक लांकूड घेऊन स्थानिक खपापुरता माल सहज करतां येईल, अशा आशा प्रकट झाल्या आहेत. सदरहू यंत्रें हल्लीं पुढील ठिकाणीं तयार होतात.

(१) डॉ. महेंद्र नंदी पायोनियर आयर्न वर्क्स; कोमिल्ला बंगाल. (२) घटक आयर्न वर्क्स, राय बहादुर रोड, बेहाला कलकत्ता. (३) भवानी एंजीनियरिंग अँड ट्रेडिंग कं. १२२–१ अपर सर्क्युलर रोड कलकत्ता. (४) मेसर्स बी. सी. नंदी आणि कं. ८, विद्यासागर स्ट्रीट, कलकत्ता. (५) बाबू विरेंद्र चंद्रसेन, बारासे० चंद्रनगर. (६) कलकत्ता इंडस्ट्रीज, लि० ७१ कॅनिंग स्ट्रीट कलकत्ता.

**पाश्चात्य पेट्या व काड्या बनविण्याचें यंत्र.**—हें साधें असतें. त्याला एक चाकू असून तो लांकडाच्या ठोकळ्याच्या पातळ चकत्या पाडतो. या चकत्यांनंतर दुसऱ्या विशिष्ट नसत्यांनीं काड्यांच्या पेट्यांचे कोंपरे तयार करण्यासाठीं ओरखाडे काढले जातात. हेंच यंत्र काड्या व समग्र पेट्या तयार करतें; फक्त त्या करतांना नरतरे बदलावे लागतात व चाकू पाहिजे तितक्या जाडीच्या चकत्या पाडण्याकरितां बसवावा लागतो. हें यंत्र प्रथम लोखंडाचें असून त्याचे सर्व भाग पुन्हां नवीन जोड्या स्थितींत बसवितां येतील असेच साधारणतः केलेले असतात. यांतील चाकू

नस्तरे धार लावण्यासाठी बाहेर काढतां येतात. सबंध यन्त्राचें वजन अजमासें तीन मण असतें व त्याला पाच चौरस फुटाइतकी जागा पुरे होते. खाली विटाचा पाया घालून किंवा तीन लोखंडी पायावर हें बसवितात एक यंत्र दहा तासात सबंध सात आठ ग्रोसाचा माल तयार करितें

आगपेट्यांच्या कारखान्यातील मुख्य काम म्हणजे लांक डावरचें, तें वरील यंत्रानें केल्यावर पुढील किरकोळ कामें म्हणजे (अ) रसायनें तयार करणें, (आ) पेट्यांना लेबलें लावणें, (इ) पेट्यांना घर्षणमिश्रणाच्या लपेटा करणें, (ई) पॅरॅफिन लावण्यापूर्वी काड्या वाळविणें, (उ) काड्या, पॅरॅफिन व ज्वालाग्राही मिश्रणात बुडविणें, (ऊ) काड्या व पेट्या वाळविणें, (ए) पेट्या भरणें आणि (ऐ) बांधणें. ही कामें लहानशा कारखान्यात हातांनीं करण्यांत येतात हातांनीं चालविण्याचें वरील प्रकारचें यंत्र ५०० रुपयापर्यंत मिळतें व इतर साधनांना तितकाच खर्च लागतो

हातयंत्राऐवजीं वाफेचें यंत्र घेतल्यास तें ७०० ८०० रुपायांस मिळतें, व त्यानें रोजीं २० ते ३० ग्रोस माल तयार होतो. याप्रमाणें कारखान्याची वाढ येथें होणें बरेंच सोपें झालें आहे असें आहे तरी एक अडचण अशी राहिली होती कीं, येथील काड्या हवेंतील ओलाव्यामुळें सर्द होऊन पेटण्यास कठिण जातात पण फ्रान्समधील एका सरकारी तज्ज्ञानें कधींहि सर्द न होतील अशा आगकाड्या करण्याची कृति काढली ती कृति एका सरकारी रिपोर्टांतून प्रसिद्ध झाली आहे (इंडस्ट्री मासिक पु १२ अं. १५२ पा. ३४० पहा).

इतकें आहे तरी हा एक घरधंदा (होम इंडस्ट्री) होण्या इतका सुलभ व कमी खर्चाचा नाहीं, यंत्राचे कारखानदार आपला माल खपविण्याकरितां चुकीची कल्पना करून देत असतात हें नेहमीं ध्यानात घेतलें पाहिजे (मॉडर्न रिव्ह्यू पु १३ अं. ६ पहा)

हिंदुस्थानात या धंद्यांत तज्ज्ञ म्हणून जे पुढें आले आहेत त्यांचीं नावें —

१. श्रीयुत ए पी. घोष एम एस. सी आय (लंडन) कलकत्ता, हे इंग्लड, जपान, जर्मनी, फ्रान्स, व स्वीडन या देशांतून शिकून आले असून, बंगाल व बहार सरकारनें आपल्या प्रांतांत या धंद्यासंबधात पाहणी करण्याचें काम यांना सांगितलें आहे २. श्री ए टी. मलिक, दार्जिलिंग, ३ रा एम जी. काळे, वर्धा, ४. श्री. एच मैत्री, कलकत्ता; ५ श्री पी सी चक्रवर्ती, कोमिल्ला (बंगाल), ६. श्री पी सी. राय (वंदेमातरम् मॅच फॅक्टरीचे माजी व्यवस्थापक), कलकत्ता; ७ रा मराव व्ही अलतवाडी, मॅनेजिंग डिरेक्टर, कर्नाटक मॅच फॅक्टरी धारवाड (यांनीं स्वत. एक यंत्र व नवीन कृति शोधून काढिली आहे)

आगबोट, आ रं भ —वाफेनें चालणारी पहिली बोट तयार करण्याचें यश इंग्लंडमध्यें सीमिंग्टन यानें मिळविलें, व ही त्यानी बोट १८०२ साली फोर्थ नदी व क्लाईड कालव्यात चालवून दाखविण्यात आली. या नंतर थोड्क्याच वर्षांनीं अमेरिकेंत फुलटन यानें वाफेचीं जहाजें बरींच बांधून त्यातून मालाची व माणसांची भाड्यानें नेआण सुरू केली वाफेच्या बोटी बांधण्याच्या कामांत अमेरिकेइतकी सुधारणा इंग्लडात होण्यास १८१४ साल उजाडलें त्या साली एक लहानशी वाफेची बोट थेम्स नदींत भाडेकरी उतारू घेऊं लागली व तेव्हांपासून आगबोटींचा प्रसार इंग्लडांत इतक्या झपाट्यानें झाला कीं, दोन चार वर्षांत सर्व प्रमुख नद्यांतून वाफेचीं जहाजें चालू झालीं इतकेंच नव्हे, तर १८१९ सालीं एका आगबोटीनें न्यूयार्कपासून लिव्हरपूलचा प्रवासहि केला. तथापि अद्यापि दूरदूरच्या सफरी वाफेच्या बोटींतून करण्याचें धाडस फारसें कोणी करूं लागलें नव्हतें. कारण १८२५ मध्यें आगबोटीनें हिंदुस्थानला जाऊन आल्याबद्दल एका कप्तानाला मोठी रकम बक्षीस देण्यात आली होती, असा उल्लेख आहे. पुढें बऱ्याच वर्षांनीं म्हणजे १८३८ मध्यें दि ग्रेट ब्रिटन नांवाची आगबोट अमेरिकेपासून ब्रिस्टलपर्यंतच्या सफरी नियमितपणें करू लागली. यानंतर अटलांटिक महासागरांत सफरी करणाऱ्या म्हणून मुद्दाम स्वतंत्र बोटी बांधण्यात येऊन १८४५ सालीं दि ग्रेट ब्रिटन या जहाजानें न्यूयॉर्कपर्यंतचा प्रवास अवघ्या चवदा दिवसात केला

विकासविषयक

व ल्हां चीं चा कें व पं खे —या वेळेपासून आगबोटीच्या बांधणींत नव्या युगास खरा आरंभ झाला असें म्हटलें पाहिजे ही ग्रेट ब्रिटन आगबोट मागील बोटींच्या मानानें फारच मोठी होती तिची लांबी ३२० फूट असून ती लाकडाऐवजीं लोखंडी पत्र्याची केली होती आणि गति देण्याकरितां वल्ह्याच्या चाका (पॅडल–व्हील्स) ऐवजीं पंखा (स्क्रू–प्रॉपेलर) लावलेला होता ह्या दोन्ही गोष्टी आगबोटींच्या रचनेंत नव्या होत्या अमेरिकेमध्यें फुलटन यानें वल्ह्यांचीं चाकें व पखे या दोहोंचा उपयोग करून पाहून पंख्यापेक्षां चाकेंच अधीक चागलीं असा निर्णय दिला होता. त्यामुळें बरींच वर्षे आगबोटींना वल्ह्यांचीं चाकें जोडण्यात येत असत पुष्कळ लढाऊ जहाज सुद्धा अशींच करीत असत, परंतु अखेर पंखा गति देण्याच्या कामीं अधिक उपयुक्त असतो असें सिद्ध झालें याचें कारण असें आहे कीं, एकतर वल्ह्यांचीं चाकें शत्रूला मारा करून लवकर नादुरुस्त करता येतात, आणि शिवाय वल्ह्यांचीं चाकें बसविण्याकरितां बोटींवरील डेकचा बराच भाग अडला जातो व त्यामुळें जहाजांतून लढण्याच्या कामास बराच अडथळा होतो याशिवाय आणखीहि एका गोष्टीमुळें पंख्याची योजना अधिक सोईस्कर असल्याचें ठरलें. ही योजना म्हणजे पंखा कसा बसवावा यासंबंधाची होय. मि॰ जे पी. स्मिथ यानें १८३६ सालीं जहाजाच्या कण्याच्या वरच्या बाजूस आणि सुकाणूसमोर ज्या भागाला ' डेडवुड ' म्हण-

तात तेथें पंखा बसविला. या योजनेमुळें जहाजाला गति अधिक येऊं लागली, जहाजाचा महत्त्वाचा नाजुक भाग शत्रूच्या हल्ल्यापासून अधिक सुरक्षित राहूं लागला आणि डेकवरची सर्व जागा लढाईच्या व इतर कामाकरितां मोकळी सांपडूं लागली. या अनेक फायद्यामुळें हल्लीं सर्व आगबोटी वल्ह्याच्या चाकाऐवजीं पंख्याच्याच करितात. फक्त लहान लहान नद्यासरोवरांतील बोटींना वल्ह्याचीं चाकें लावितात.

वल्ह्याच्या चाकाऐवजीं पंख्यानें बोटीला गति देण्यांत एक मोठा फायदा असा असतो कीं, पंखा पाण्यामध्यें कितीहि कमीजास्ती बुडालेला असला तरी तो आपलें काम योग्य प्रकारें करूं शकतो. उलटपक्षीं वल्ह्याचीं चाकें ठराविक मर्यादेपर्यंत पाण्यांत बुडालेलीं असलीं तरच बरोबर काम करतात, कमजास्त झाल्यास जहाजाची गति कमी होते. आतां दूरवर जाणारें जहाज असलें म्हणजे त्यांत कोळसा पुष्कळ भरलेला असतो, पण पुढें कोळसा खपत जाऊन जहाज वर येऊं लागतें आणि मग चरख्याकडून योग्य काम होत नाहीं. शिवाय वाऱ्यानें जहाज बाकडेंतिकडें हालूं लागलें म्हणजेहि वल्ह्याच्या चाकाकडून योग्य प्रकारें काम होत नाहीं. पंख्याच्या कामांत या कोणत्याहि कारणानें अडथळा येत नसल्यामुळें हल्लीं सर्वत्र पंख्याचीच योजना करतात.

बोटी चालविण्याकडे वाफेच्या यंत्राचा उपयोग करूं लागल्यापासून या यंत्राच्या आकाररचनेतहि बराच फरक करावा लागला. अर्थात अशा यंत्रातील मुख्य तत्त्व सगळीकडे सारखेंच होतें. आगबोटींतील वाफेच्या यंत्रांतला विशेष हा कीं, त्याचें सिलेंडर म्ह० पचपात्र फार मोठें म्हणजे आठ नऊ फूट व्यासाचें किंवा त्याहूनहि मोठें असतें व त्यामुळें त्याच्या मानानें इतर यंत्राचे भागहि मोठे असतात. असलें मोठें पचपात्र तयार करणें मोठें कौशल्याचें काम असतें. कारण तें सर्व एकसंधि असावें लागतें व म्हणून तें ओतून करावें लागतें. मेसर्स पेन यांच्या कारखान्यांत असलीं पचपात्रें तयार करीत असत. अशा एकएका पचपात्राचें वजन वीस टनपर्यंत असतें.

जहाजें बांधण्याकडे लोखंडाचा उपयोग.—जहाज लाकडाऐवजीं लोखंडाचीं बांधूं लागल्यापासून नौकानयनाला बरेंच उत्तेजन मिळालें आहे. सारख्याच आकाराच्या लाकडी बोटीच्या दोनतृतियांश लोखंडी बोटीचें वजन असतें. लाकडी जहाजापेक्षां लोखंडी जहाज अधिक जड व्हावें, असें अतज्ज्ञ वाचकांना वाटण्याचा संभव आहे, परंतु लोखंडाची बळकटी अधिक असल्यामुळें पातळ लोखंडी पत्रा वापरूनहि मजबूत जहाजें बांधतां येतात व बाद भक्कम लाकडाच्या जहाजापेक्षां लोखंडी जहाजाचें वजन एकदरीनें हलकें भरून तें अधिक चांगलें तरतें. या गुणामुळें बोटी बांधण्याकडे लोखंडाचा उपयोग करावा, असें सर डब्ल्यू. फेअर बेर्न यानें जोरानें प्रतिपादन केलें. त्यानें असेंहि सुचविलें कीं, जहाजें फार मजबूत असणें जरूर असल्यामुळें रेल्वेचे पूल बांधण्यांत जशी गरडराची योजना करतात, तशी बोटींच्या बांधकामांतहि करावी. दि ग्रेट ईस्टर्न बोट या तत्त्वावर बांधली असल्यामुळें ती अत्यंत भक्कम बनली होती. ही मि० ब्रुनेल यांच्या योजनेबरहुकूम बांधली होती व तिच्यांतून टपाल व प्रवासी दूरच्या केपच्या मार्गानें हिंदुस्थानला नेण्याचें ठरलें होतें. तथापि गतीच्या बाबतींत मूळ अंदाजाच्या मानानें फार निराशा झाली. कारण ही बोट तासीं पधरा मैलापेक्षां अधिक वेगानें चालेना. शिवाय पहिल्या सफरींच्याच वेळीं कांहीं अपघात घडल्यामुळें माणसांच्या प्रवासाला ती निरुपयोगी आहे असें लोकांनीं ठरविलें. तसेंच पुढें एका सफरींत अटलांटिक महासागरामध्यें ही मोठी बोट वादळामध्यें सांपडून जायबंदी झाली. या अनेक आपत्तींमुळें या बोटीची मालक कंपनी पैशाच्या अडचणींत सांपडून तिनें ही बोट २५००० पौंडाला म्हणजे मूळ किंमतीच्या पाऊणपट रकमेला विकून टाकली.

नवीन धर्तीची पहिली लोखंडी आगबोट.— दि ग्रेट ईस्टर्न बोटीवर ज्या आपत्ती आल्या, तो एक केवळ दुर्दैवाचाच प्रकार होय. ब्रुनेल्स कंत्राटदारानीं केलेल्या इतर दोन तीन मोठमोठ्या कामाची अशीच गत झाली. थेम्स नदीचा बोगदा व्यापारीदृष्ट्या अयशस्वी झाला. दि ग्रेट वेस्टर्न रेल्वे मोठमोठे भराव घालून खडक खोदून व बोगदे बांधून तयार केली, पण तीहि पुढं अरुंद करण्याचें ठरल्यामुळें मूळचें काम बरेंच फुकट जाऊन पैशाचें नुकसान झालें. बाक्स टनेल या बोगद्याचें कामहि दुसऱ्या इंजिनियरानीं करण्याचें टाळलें असतें. ब्रुनेलच्या उपर्युक्त कामाप्रमाणें ग्रेट वेस्टर्न बोटीचें कामहि आर्थिक दृष्ट्या त्याच्या अंगावर आलें. तथापि या सर्व कामांत यांत्रिकदृष्ट्या त्यानीं जें कौशल्य व युक्त्या योजिल्या होत्या, त्याचा पुढील इंजिनियरानां पुष्कळ फायदा झाला. त्याचीं सर्व कामें फार मोठ्या प्रमाणावर केलेलीं व अत्यंत धाडसाचीं होतीं. दि ग्रेट ईस्टर्न ही बोट पूर्णपणें निकामी झाली, असें मात्र नाहीं. ती नसती तर कदाचित् अटलांटिक महासागरांतून तारायंत्र करण्याचें काम तितक्या लवकर तयार झालें नसतें. शिवाय अलीकडे लढाऊ किंवा इतर ज्या साध्या मोठमोठ्या बोटी बांधण्यांत येत आहेत, त्याचा मूळ आरंभ ग्रेट ईस्टर्न बोटच होय. या बोटीला वर सांगितलेल्या अपघातानें वास्तविक मोठीशी इजा झालेली नव्हती. त्यामुळें थोड्या फार दुरुस्तीनें तिचा मोठाल्या महत्त्वाच्या कामांत उपयोग करण्यांत आला. १८६५ मध्यें अटलांटिक महासागरांतून २६०० मैल तारायंत्र करण्याचें काम याच बोटीनें केलें. या कामाला लागलेले ५००० टन वजनाचें सामान या एकट्या बोटींत रहात असे. अशा प्रका-

रची इतर कामेंहि या बोटीनें केलीं. कुनार्ड लाईनच्या लिव्हरपूल व न्यूयार्क यामध्यें सफरी करणाऱ्या बोटीपेक्षां ग्रेट ईस्टर्न बोट सातपट मोठी होती. अटलांटिक महासागरात चालणाऱ्या त्या वेळच्या सर्वांत मोठ्या बोटीपेक्षा हिची वाफेची शक्ति तिप्पट अधिक होती आणि हिच्यातून त्याच्या वीसपट प्रवासी जात असत. हिची लांबी ६९२ फूट, रुंदी ८३ फूट, गोल ६० फूट व भरताड (टनेज) २४००० टन होतें. या बोटीला लावलेल्या वल्ह्याच्या चाकाचा व्यास ५६ फूट असून तीं चालविण्याकरिता चार वाफेचीं एंजिनें, प्रत्येकीं ६ फूट २ इंच व्यासाचीं एकएक पंचपात्र असलेलीं होतीं. शिवाय या बोटीला २४ फूट व्यासाचा चार पात्यांचा पंखाहि जोडलेला असून तो चालविण्याकरितां एक निराळें इंजिन होतें. सर्व इंजिनें मिळून ८००० अश्वबलाचें काम होत असें आणि एक संपूर्ण पृथ्वीप्रदक्षणा करण्यास पुरेल इतका कोळसा तिच्यात रहात असे. प्रत्येकीं पन्नास टन वजनाचीं अशीं दहा बाष्पपात्रें (बॉइलर्स) तिच्यात असून बारा टन कोळसा तासीं जळण त्यांना लागे.

वाफेच्या उपयोगाचा प्रसार व गतींत वाढ— बोटी चालविण्याच्या कामीं वाफेच्या यंत्राचा उपयोग फारच झपाट्यानें वाढत गेला. १८५० ते १८६० एवढ्या अवधींत एकट्या लंडन बंदरात येणाऱ्या वाफेच्या जहाजाचें भरताड तिप्पट झालें. पेनिनशुलर व ओरिएंटल कंपनीच्या सुंदर अटलांटिक बोटी चालू झाल्या. होलीहेड व किंग्स्टन लाइननें उत्तम पहिल्या वर्गाच्या बोटी जाऊं येऊं लागल्या. ह्या बोटींना वल्ह्यांचीं चाकेंच होतीं. साधारणपणें प्रत्येक बोटीची लांबी ३३४ फूट, चाकाचा व्यास ३१ फूट व इंजिनच्या पंचपात्राचा व्यास ८ फूट २ इंच आहे. बोटीची किंमत सुमारें ७५००० पौंड आहे. बोटीचा वेग तासीं सरासरी २०८ मैल पडतो. कुनार्ड कंपनीची ग्लासगोच्या एन. नेपियरनें बांधलेली पर्शिया नावाची बोट ३८९ फूट लांब व ४५ फूट रुंद होती.

१८७५ पर्यंत बोटींचा जास्तींत जास्त वेग तासीं २६ मैल असे. १८९५च्या सुमारास हा वेग बराच वाढला होता. बोटी चालताना पाण्याकडून प्रतिकार फार होत असतो. त्यामुळें वेग दुप्पट वाढविणें असल्यास पंख्याची शक्ति चौपट वाढवावी लागते, म्हणजे वाफेची शक्ति आठपट करावी लागते. शिवाय बोटीची गति पुष्कळ अंशीं तिच्या विशिष्ट आकारावर अवलंबून असते. बोटीचा पुढील भाग चांगला निमुळता असला म्हणजे पाणी भराभर तोडलें जाऊन व बोट जलद चालण्यास मदत होते. पण वाफेची मुख्य शक्ति बोटीच्या तळाला पाण्याचा जो अडथळा होतो तो दूर करण्याकडे खर्च होत असते.

आगबोटींची शक्ति व आकार याच्यामध्यें किती झपाट्यानें वाढ होत गेली हें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

| साल | बोटीचें नाव | गतिसाधन | लां.फू. | रुं.फू. |
|---|---|---|---|---|
| १८३८ | ग्रेट वेस्टर्न | वल्हीं | २३६ | ३६ |
| १८४४ | ग्रेट ब्रिटन | पंखा | ३२२ | ५१ |
| १८५६ | पर्शिया | वल्हीं | ३९० | ४५ |
| १८५८ | ग्रेट ईस्टर्न | वल्हीं, पंखा | ६९० | ८३ |

आगबोटीच्या गतीमध्यें जी विलक्षण वाढ झाली तिचें मुख्य कारण आगबोटींतील वाफेच्या यंत्राची सुधारणा हें होय. या सुधारणेमुळें गति वाढली आहे इतकेंच नव्हे तर जळणहि पुष्कळ कमी लागूं लागलें आहे व त्यामुळें बोटीच्या भाड्याचे दर उतरले आहेत. याचा परिणाम असा झाला आहे कीं, पृथ्वीवरील दूरदूरच्या देशात दळणवळण फार वाढलें असून वाफेच्या यंत्रामुळें जगाच्या एकंदर व्यवहारात जी क्रांति घडून आली आहे तिच्यापैकीं बरेंच कार्य आगबोटींनीं केलें आहे.

आगबोटीच्या रचनेंतील सुधारणा.—आगबोटीच्या रचनेचे जे निरनिराळे प्रकार आहेत त्यांपैकीं एक विशेष चमत्कारिक प्रकार म्हटला म्हणजे *इंग्लिश खाडीमधून बोट फार न हलावी म्हणून प्रवासी लोकांच्या* सोयीकरतां केलेली विशिष्ट प्रकारची बोट होय. या बोटीला कॅस्टॅलिया म्हणतात. ही रचना कॅप्टन डिसे यानें स्वतःच्या कल्पनेनें सुचविली. हा कलकत्ता बंदरात एक अधिकारी असून इकडील अनुभवावरूनच त्याला ही युक्ति सुचली. ही युक्ति म्हणजे बोटीच्या दोन्ही अंगाला लाकडाचे मोठे दोन ओंडके, किंवा दोन लहान नावा जोडणें ही होय. असें केल्यानें मोठ्या तुफान वादळात जेथें मोठाल्या बोटी सुद्धा जोरानें वाकड्या तिकड्या हलूं लागतात तेथें असली बोट अगदी संथपणानें चालते असें इकडे हिंदुस्थानात त्याच्या पाहण्यात आलें. मग या योजनेंत सुधारणा करून कॅप्टन डिसेनें दोन तळभाग असलेली बोट बांधण्याची कल्पना काढली. अशा बांधणीमुळें एक तळभाग दुसऱ्याला सावरून धरतो व बोट फारशी हालत नाहीं. दोन बोटी एकाला एक जोडून केलेल्या जुळ्या बोटीसारखा आकार कॅस्टॅलियाला असतो. मोठमोठ्या बोटी तयार होऊं लागल्यानंतरहि पुष्कळ वर्षें डोव्हर, कॅले, फोक्स्टोन, बोलोन वगैरे इंग्लिश खाडींतील सर्व बंदरात लहान बोटीच चालत असत. कारण या बंदरात मोठाल्या बोटींना पुरेल इतकें खोल पाणी नसतें. तथापि वर सांगितलेली कॅस्टॅलिया नावाची बोट पाण्याखालीं फक्त सहाच फूट रहात असल्यामुळें ती भरतीओहटीच्या कोणत्याहि वेळीं फ्रेंच बंदरात जाऊं शकते. असें असून उलट पक्षीं या बोटीवर मोठमोठ्या बोटींतल्या इतके प्रवासी राहूं शकतात. कॅस्टॅलिया बोटीची लांबी २९० फूट आणि रुंदी ६० फुटापर्यंत होती. या बोटीवर प्रवाशाच्या सर्व प्रकारच्या सोई केलेल्या होत्या. या बोटींतून एक हजारावर प्रवासी जाऊं शकत. या बोटीची गति मात्र फार कमी म्हणजे

सरासरी १४ नॉट्स पर्यंत होती. मात्र ही बोट अगदीं स्थिरपणानें चालत असल्यामुळें प्रवाशांना वेडेवाकडे हेलकावे व त्यापासून होणारा त्रास मुळींच सोसावा लागत नसे या बाबतींत या प्रकारच्या बोटींनीं नि:संशय मोठी सुधारणा घडवून आणली आहे. कॅस्टेलिया बोटीचा मुख्य दोष जो मंद गति तो काढून टाकण्याकरितां या प्रकारच्या पुढें बांधण्यात आलेल्या बोटींमध्यें सुधारलेलीं नव्या प्रकारच्या वल्ह्यांचीं चाकें बसविण्यांत आलीं. या सुधारलेल्या बोटींपैकीं इनव्हिक्टा, व्हिक्टोरिया, एम्प्रेस वगैरे बोटींची गति तासीं २१ मैलपर्यंत असे. बोट हालल्यापासून होणारा त्रास टाळण्याकरितां मि० बीसेमर यानें आणखी एक निराळी युक्ति काढली. त्यानें एक मोठा विस्तृत दिवाणखाना (सलून) असलेली बोट तयार केली. बोटींतलें दिशा दर्शविणारें होकायंत्र ज्याप्रमाणें बसविलेलें असतें त्याप्रमाणें आसावर हा दिवाणखाना बसविलेला होता व तो स्थिर राहण्याकरितां अनेक योजना केल्या होत्या. तथापि बीसेमरनें तयार केलेली बोट समुद्रामध्यें प्रवासास नालायकच ठरली.

हा हलण्यापासूनचा त्रास अत्यंत वेगानें चालविणें जरूर असलेल्या लढाऊ जहाजावर तर फारच होत असे. तो इतका कीं खलाशांना तो असह्य होई इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष जहाज त्यामुळें खिळखिळें होऊन लवकर नादुरुस्त होत असे. जहाज इतकें भयंकर हलण्याचें कारण समुद्राच्या लाटांशिवाय जहाजांतील वाफेच्या यंत्राचे धक्के हेंहि असे. हे धक्के इंजिनांतील दट्टया (पिस्टन) व दट्टयाचा दांडा (पिस्टन रॉड) यांच्या संहित गतीमुळें बसत असत. ते नाहींसे करण्याकरितां पाणचक्कीच्या तत्त्वावर बाष्पचक्रीचें इंजिन तयार करण्यांत आलें यांत दट्टया, दट्टयाचा दांडा वगैरे भाग मुळींच नसतात, त्यामुळें जहाजाला वेडेवाकडे हिसके मुळींच बसत नाहींत. या नव्या प्रकारच्या इंजिनाची बोट प्रथम ग्लासगो येथें बांधण्यांत येऊन तिला टर्बीनिया हें अन्वर्थक नांव देण्यांत आलें. ही बोट १०० फूट लांब व ९ फूट रुंद होती, व तिची गति तासीं ३२॥ नॉट म्हणजे सुमारें ३७॥ मैल होती. इतर बोटींतील वाफेच्या यंत्रापेक्षां या बोटींतील बाष्पचक्रीच्या एंजिनाचें वजन कमी होतें, चक्रीला लागणारी जागा कमी होती, तिला खर्चेंहि कमी लागे, दगडी कोळसा कमी पुरे, व जहाजाला गति पुष्कळ अधिक येत असे. याप्रमाणें हें बाष्पचक्रीचें यंत्र सर्व बाजूंनीं फायदेशीर ठरलें.

बो टी चा ल व णा री श क्ति.—बोटी कोळशाच्या वाफेच्या साहाय्यानें चालवाव्या याबद्दल अलीकडे पुष्कळ प्रयोग होत असून वाफेच्या शक्तिप्रमाणें दुसऱ्या पानगहा प्रकारच्या शक्ति उपयोगांत आणण्याबद्दल खटपट चालू आहे. प्रथम उपयोगांत आणलेल्या वाफेच्या शक्तीसंबंधानें पाहतां, गेल्या १०-४० वर्षांत वाफेच्या ऐंजिनाचा आकार तिप्पट चौपट वाढला आहे, व त्यामुळें बोटींची वाहकशक्ति पुष्कळ वाढली आहे. परंतु या ऐंजिनाच्या बोटींची गति फारशी नसते. पुढें बाष्पचक्री (टरबाइन) ची युक्ति निघाली. या नवीन निघालेल्या एंजिनास जागा थोडी लागत असल्यामुळें बोटींत मालाला जागा अधिक मिळूं लागली हा या एंजिनाचा एक फायदा होय शिवाय बोटींची गतीहि वाढली. तथापि गति पुष्कळ वाढवण्याकरितां पंख्याचा व्यास कमी करणें आणि पिच बदलणें या युक्त्या नंतर निघाल्या. याशिवाय वाफेच्या यंत्रात आणखी झालेली सुधारणा म्हटली म्हणजे टरबाइन-शॅफ्ट आणि प्रॉपेलर-शॅफ्ट हे एकाला एक गिअरिंगनें जोडणें ही होय.

बोटी चालवण्याचीं वाफेच्या यंत्राव्यतिरिक्त दुसरीं कांहीं साधनं अलीकडे उपयोगांत येऊं लागलीं आहेत. यांपैकीं एक साधन विद्युच्छक्ति होय.

वाफेच्या यंत्राला तिसरा प्रतिस्पर्धी तैलयंत्र (ऑइल एंजिन) होय. हे यंत्र फार सुटसुटीत असल्यामुळें याला जागा फारच कमी लागते. शिवाय इतर ज्वलन-साधनाच्या मानानें तेलाच्या जळणामध्यें अनेक फायदे असतात, व तैलयंत्राला इतर यंत्रसामुग्रीहि कमी पुरते. तथापि तैलयंत्रं फार मोठ्या अश्वबलाचीं तयार करतां येत नाहींत एका पंचपात्रा (सिलिंडर) ची शक्ति १००० ते १५०० अश्वबल अशा प्रमाणानें १९१४पर्यंत जास्तींत जास्त ६००० अश्वबलापर्यंतचीं तैलयंत्रें करतां येत होतीं. शिवाय दुसरी अडचण म्हणजे तेलाच्या पुरवठ्याची. तेलाच्या खाणी इतक्या विपुल नसल्यामुळें बोटींना बहुतांशीं दगडी कोळशावरच अवलंबून रहावें लागणार, असा आज रंग दिसतो.

तथापि या सर्व युक्त्या अगदीं अलीकडील आहेत. बाष्पचक्रीचा (स्टीम-टरबाइनचा) उपयोग प्रथम १९०५ त करण्यात आला. 'गिअर्ड टरबाइन' ची युक्ति १९१०साली निघाली. हीं इंजिनें १,२०,००० अश्वबलापर्यंत तयार झालेलीं आहेत, रेसिप्रोकेटिंग एंजिन व लो-प्रेशर-टरबाइन यांचा संयोग, आणि गिअर्ड टरबाइनची युक्ति हीं दोन्ही १९१० च्या सुमारास एकाच वेळीं निघाली. त्यापैकीं पहिल्या प्रकारचें यंत्र मंद गतीच्या प्रवाशी बोटी चालविण्याकडे व दुसऱ्या प्रकारचें मालाच्या लहान बोटी चालविण्याकडे उपयोगांत येऊं लागलें आहे. या सुधारणांचें आर्थिक महत्त्व लक्षांत येण्यास पूर्वीच्या बोटींचा व हल्लींच्या बोटींचा कोळशाचा खर्च यांची तुलना केली पाहिजे. कॅनेडियन पॅसिफिक बोटींना प्रत्येकी ३०००टन कोळसा दररोज लागत असे, ल्युसिटेनिया व मॉरिटेनिया या बोटींना रोज १००० टन लागत असे. न्यूयॉर्कला जाऊन येण्याची एक सफर करण्यास ३० दिवस—ज्या इतक्यांत २२ आगगाड्यांभर कोळसा प्रत्येक बोटीला पाहिजे असे. हा कोळसा १०टक्के कमी लागतो, म्हणजे १० [illegible] टनी हिशेब धरल्यास एका बोटीच्या वार्षिक सफरी मिळून १०,००० पौंडांचा खर्च दरसाल कमी लागतो.

१९१२ सालापासून अलीकडे बांधलेल्या बोटी साधारणपणें ६००० अश्वबलाच्या असतात. थोडक्या जागेंत मावणारीं, अलाहिदा यंत्रसामुग्री विशेष न लागणारीं, आणि जलद गतीचीं अशीं एंजिनें बांधण्याकडे हल्लीं मुख्य लक्ष असतें. वाफेचीं एंजिनें, विद्युच्छक्तीनें चालणारीं एंजिनें, तेल-एंजिनें, आणि गॅसएंजिनें यांच्या हल्लीं चालू असलेल्या स्पर्धेंत अखेर अग्रमान कोणत्या प्रकारच्या एंजिनांना मिळेल हें सांगणें आज कठिण आहे.

वर्णनविषयक.

बो टी चा आ का र.—समुद्रावरील वाहतुकीच्या साधनामध्यें नव्या नव्या शोधांनीं जितकी आश्चर्यकारक सुधारणा केलेली आहे तितकी इतरत्र कोठें नसेल. प्राचीन काळच्या किंवा अगदीं अलीकडील १६ व्या १७ व्या शतकांतील मोठमोठाल्या शिडाच्या व वल्ह्याच्या जहाजामध्यें आणि आजकालच्या भव्य आगबोटींमध्यें महदंतर आहे. हल्लींच्या आगबोटींतील सुखसोयींकडे पाहिलें म्हणजे पूर्वीच्या जहाजांतून प्रवास करणें किती धोक्याचें व त्रासाचें असलें पाहिजे याची चांगली कल्पना येऊन तत्कालीन दूरदूरच्या सफरी केलेल्या लोकांची तारीफ केली तितकी थोडीच वाटते. वाफेच्या लोखंडी पत्र्याच्या बोटी बांधूं लागल्यापासून ते १८९० पर्यंत आगबोटींच्या स्वरूपांत व गतींत किती सुधारणा झाली त्याची माहिती वर दिली आहे ती वाचली तरी तेवढ्यानेंहि मनुष्याचें मन आश्चर्यचकितच होऊन जातें. तथापि १८९० पासून अलीकडे तीस वर्षांत झालेली प्रगतीहि क्षुल्लक नाहीं. आकारासंबंधानें पाहतां कुनार्डकंपनीच्या लुसिटेनिया व मॉरिटेनिया आणि व्हाईट स्टार कंपनीची ऑलिंपिक या अटलांटिक महासागरांत सफरी करणाऱ्या बोटी मोठेपणाच्या बाबतींत नमुनेदार आहेत. १९१२ मध्यें ग्रेट ब्रिटनच्या प्रत्येक बोटीचें वजन सरासरी ४००० टन होतें. १०,००० टनाहून अधिक वजनाच्या बोटी फक्त १६ होत्या व ६,००० ते १०,००० पर्यंतच्या बोटी ५४ होत्या. मालाच्या बोटी साधारणपणें ६,००० टनाहून अधिक वजनाच्या नसतात. ऑस्ट्रेलियाला जाणारी व्हाईट स्टार कंपनीची सेरेमिक बोट १८,००० टनाची असून याच कंपनीची कानडाशीं व्यापार करणारी लॉरेंटिक नांवाची बोट १४,५०० टनाची आहे. या एकाच कंपनीच्या १९०१ ते १९१५ पर्यंत बांधलेल्या बोटींचें वजन पाहिल्यास बोटींच्या आकारांत किती झपाट्यानें वाढ होत आहे तें दिसून येईल. त्या आगबोटींसंबंधाची माहिती येणेंप्रमाणेः—

| समुद्राचें नांव | टन | सन |
|---|---|---|
| केल्टिक | २१,००० | १९०१ |
| सेड्रिक | २१,००० | १९०१ |
| [illegible]ल्टिक | २४,००० | १९०४ |
| आड्रिअटिक | २४,५०० | १९०७ |
| ऑलिंपिक | ४६,००० | १९१० |
| ब्रिटॅनिक | ५०,००० | १९१४ |

कुनार्ड कंपनीची १९०५ मध्यें तयार झालेली कॅरोनिया बोट २०,००० टनाची व १९०७ सालीं चालू झालेली लुसिटेनिया बोट ३२,००० टनाची होती.

सु र क्षि त ता आ णि सु ख सो यी.—प्रवाशाची रहदारी जशी जशी वाढत गेली तसतसें प्रवाशाच्या सुखसोयींकडे व बोटी हलण्यानें होणारा त्रास कमी करण्याकडे अधिक लक्ष जाऊं लागलें. बोटी कमी हलाव्या म्हणून योजिलेल्या कांहीं युक्त्या मागें दिल्याच आहेत. आणखी एक युक्ति विल्सकीन्सची होय. बोटीच्या तळाशीं मोठाले पातळ पत्रे बसविलेले असतात; ते बोट हलूं लागली म्हणजे पाण्याला प्रतिकार करितात. या युक्तीनंतर फ्रॅमची टाक्यांची (ॲंटि-रोलिंग टँक्सची) युक्ति निघाली. कुनार्ड कंपनीची १९१२ मधील लॅकोनिया बोट ही या साधनानें युक्त असलेली पहिली बोट होय. बोटीच्या दोन्ही अंगांना मोठाली टाकी ठेवून तळाशीं तीं एका अरुंद नळीनें एकमेकाला जोडलेलीं असतात. बोट एका बाजूला कलली की, त्या बाजूच्या टाक्यामध्यें पाणी वाढतें आणि नंतर एकंदर पाण्यांत वरखालीं अशी गति कांहीं वेळ सारखी चालू रहाते. यामुळें ज्या बाजूला पाणी जास्त असेल त्या बाजूवर वजन जास्त पडून बोटीला दुसऱ्या बाजूला मिळणारा हेलकावा तितक्या मानानें कमी मिळतो. अशा रीतीनें बोटीच्या हेलकाव्यांना प्रतिबंध होतो.

परंतु नुसते हेलकावे बसणें एवढेंच संकट बोटीला नसतें, तर कित्येक वेळा मोठाल्या लाटाखालीं सापडून संपूर्ण बोट एकदम बुडून समुद्राच्या तळाशीं गेल्याचीं उदाहरणें घडतात. कित्येक बोटी अचानक बेपत्ता झालेल्या असून टकरीनें किंवा खडकावर आपटून त्या बुडाल्या असें म्हणण्यास जागा नाहीं. सबब त्या लाटेखालीं सापडून बुडाल्या असेंच म्हणणें भाग पडतें. हा प्रसंग टाक्याच्या युक्तीनें त्या॰ च्यावर आला असावा असें म्हणण्यास जागा आहे; कारण टाक्यामधील पाणी व बोटीचा हेलकावा हीं दोन्ही एकदमच एका बाजूला आल्यास बोट पालथी होण्यास त्यानें मदतच होणार! याकरितां या टाक्याच्या युक्तींत विशेष सुधारणा करण्याचे प्रयत्न चालू आहेत.

बोटी सुरक्षित रहाव्या म्हणून कांहीं अंशीं बोटी बांधताना व कांहीं अंशीं बाह्य साधनांनीं काळजी घेण्यात येते. बोट बांधतांना हल्लीं अशी योजना करतात कीं, सर्व बोटीचा तळमजला जलनिरोधी (वॉटरटाइट) खोल्यांनीं विभागलेला असतो, व एका खोलींत पाणी शिरलें तरी इतर सर्व भाग कोरडे राहतात. याप्रमाणें दोन भाग जरी पूर्णपणें पाण्यानें भरले तरी बोट न बुडतां चालू शकते. शिवाय दुसरी युक्ति

अशी आहे कीं, सर्व बोटींचा तळमजलाच आंतल्या बाजूला कांही अंतरावर सभोंवार वेष्टन घालून विभागितात. अशी रचना प्रथम ऑलिंपिया बोटींत व नंतर ॲक्विटॅनिया बोटींत करण्यात आली. ॲक्विटॅनिया बोटींत बाह्य भागापासून १५ फूट जागा सभोंवार सोडून दुसरें आवरण देण्यात आलें, म्हणजे एका बोटींत दुसरी बोट अशा दोन निरनिराळ्या बोटी बनल्या. अशा बोटीला एखादा खडक किंवा बर्फाचा डोंगर लागून जरी भोंक पडलें तरी आंतील आवरण पूर्ण-पणें शाबूत राहून बोट सुरक्षित चालू शकते. तथापि बोट पूर्ण वेगात असतांना मोठ्या खडकावर किंवा हिमखंडावर आपटली तर तिचा पूर्ण चुराडा उडाल्याशिवाय रहात नाहीं. आणि असले अपघात अटलांटिक महासागरात "टिटॅनिक" सारख्या प्रचंड बोटींना झाल्यामुळें अलीकडे या हिमखंडा( आइसबर्ग )वर लक्ष ठेवून त्याची बातमी सर्व बोटींना देण्याची तजवीज 'आइस स्काउट' मार्फत होत असते. शिवाय बर्फाचा डोंगर जवळ आल्याची इशारत पाण्याचें उष्णमान एकदम कमी झाल्यानेंहि बोटीवरील चालकांना मिळण्यासारखी असते. हा फरक तावडतोब दर्शविणारें शीततादर्शक (क्रिजिडोमीटर) नावाचें यंत्र मॅक्नेब नावाच्या शास्त्रज्ञानें केलें आहे. हें यंत्र जहाजाच्या पुढील बाजूला भोंवतालीं समुद्राचें पाणी फिरत राहील अशा रीतीनें बसविलेलें असतें, व उष्णमानात विशिष्ट फेरबदल झाल्या-बरोबर त्याची सूचना जहाजावरील अधिकाऱ्याला विजेची घंटा वाजून मिळेल अशी योजना केलेली असते. शिवाय या यंत्रानें हवेंतील उष्णमानात झालेला फरक तावडतोब कळूं शकतो.

बोटींना दुसरें भय आगीचें असतें. म्हणून जहाजांतील कोणत्याहि तळघरात ( होल्डमध्यें ) लागलेली आग तावड-तोब बोटीवरील अधिकाऱ्यांना कळावी अशी एक युक्ति "मॉरेटॅनिया" व इतर कित्येक बोटींवर अलीकडे करण्यात आली आहे. पण मुख्य सुधारणा म्हणजे पूर्वी जे बोटींचे भाग लाकडाचे असत ते सर्व हल्लीं पोलादाचे केलेले अस-तात ही होय. तथापि अद्यापहि बोटींना आगी लागतात. पण आग बहुधा मालाच्या बोटींतील मालाला लागते. एकंदरीनें पाहतां बोटी अदाह्य धातूच्या असल्यानें सुरक्षितपणा पुष्कळ असतो यात शंका नाहीं. रोनेओ कंप-नीनें तर बोटींतील दरवाजे, खुर्च्या, टेबलें वगैरे सामानहि शक्य तितकें लोखंडी वापरण्याची पद्धति सुरू केली आहे. जहाजाला अर्धा किंवा एक इंचाचा जाड पत्रा न वापरतां पांसाश इंच जाडीचा दुहेरी पत्रा मध्यें हवा खेळण्यास पोकळ जागा ठेवू. वापरणें अधिक फायदेशीर असल्याचें क्युनार्ड कंपनीनें प्रत्यक्ष अनु-भवाअंतीं ठरविलें असून "अॅक्विटॅनिया" वगैरे अलीक-डील बोटी याच पद्धतीनें बांधलेल्या आहेत.

तिसरा धोक्याचा प्रसंग म्हणजे बोट धुक्यानें लावलेली दिशा सोडून निराळ्याच मार्गानें जाऊं लागते, आणि जो खडक किंवा किनारा टाळला असें कप्तानास वाटत असतें त्यावरच जाऊन नेमकी आपटते. असा मार्गांत फरक झाल्यास तो लक्षात यावा म्हणून बोटीवरील होकायंत्रा मध्यें एक युक्ति केलेली असते, ही युक्ति अशी कीं, दिशा दर्शविणाऱ्या घड्याळ्यासारख्या तबकडीवर बोटीचा मार्ग बदलेल त्याप्रमाणें रेषा उमटण्याची तजवीज केलेली असते. शिवाय त्यांत मार्ग केव्हां बदलला ती नक्की वेळ दर्श-विण्याचीहि योजना केलेली असते. दुसरी गोष्ट अशी कीं, धोक्याचा किनाऱ्याचा भाग आसपास जवळ असल्याची सूचना मिळावी म्हणून अलीकडे एक युक्ति योजलेली असते. १८२६ मध्यें जेनेवा सरोवरावर प्रयोग करात असतांना असें आढळून आलें होतें कीं, हवेंतल्यापेक्षां पाण्यातून ध्वनि चौपट वेगानें प्रवास करतो पुढें मि. एच डी. मर्बी या अमेरिकन विद्वानाला असें आढळून आलें कीं, पाण्यातून प्रवास करणाऱ्या ध्वनीला हवेंतल्या सारखे अड थळेहि बाधा करू शकत नाहींत या शोधाचा फायदा घेऊन खडकाळ किनारा जवळ आल्याची सूचना बोटीवर मिळावी अशी व्यवस्था अलीकडे करण्यात येत असते, ती येणें प्रमाणें. समुद्रतळाच्या आधारावर एक ६१ फूट इंचीचा त्रिपाद खांब उभा करून त्याला सुमारें तीन मण (२ हंडेड-वेट) वजनाची घंटा टांगतात. ही घंटा किनाऱ्यावरील स्टे-शनांतून किंवा लाईटशिपमधून नेलेल्या विजेच्या तारेनें वाजत राहण्याची व्यवस्था केलेली असते. या घंटेचा आवाज १५-२० मैल दूर ऐकूं जातो. किंवा समुद्रातील पाषाणदर्शकाला (बॉयला) घंटा बांधलेली असते. घंटा पाण्याखालीं १६ फूट असते, आणि लाटांबरोबर बॉय हालत राहिल्यामुळें घंटा वाजत राहते. या घंटेचा आवाज ऐकूं येण्याकरितां बोटीच्या दोन्ही अंगांना बाहेरच्या बाजूस पाण्यामध्यें बुडून राहतील अशा २२ चौरस इंचाच्या दोन टाक्या बसवलेल्या असतात. टाकींत मायक्रोफोन (सूक्ष्मध्वनिदर्शक) ठेवलेला असून त्याच्या तारा सुकाणूवाल्याच्या खोलींतील टेलेफोनला जोडलेल्या अस-तात. तेथें स्विच हालवून आवाज कोणत्या बाजूनें येत आहे हें ऐकणाराला समजून घेतां येतें. ही युक्ति अगदीं अलीकडे निघालेली आहे तरी तिजमुळें शेंकडों लोक आणि पुष्कळ जहाजें संकटांतून आजपर्यंत बचावण्यांत आलीं आहेत दाट धुकें पसरल्यामुळें आजूबाजूस कांहीं दिसत नसलें तरी कप्ता-नाला या टेलेफोनच्या आणि दिशादर्शक नकाशाच्या साहाय्यानें आपली बोट खडकाळ किनाऱ्याच्या बाजूनें सुर-क्षित रीतीनें हाकारतां येते.

**आधुनिक बोटींतील चैनीच्या योजना**—बोटी-वरील तीनचार हजार लोकांचा निर्वाह चालण्याकरितां खाण्यापिण्याच्या उत्तम पदार्थांचा जो मोठा साठा करून ठेवतात त्याच्या इतकी आश्चर्याची गोष्ट बोटीवर दुसरी-कोणतीच नसेल. किनाऱ्यावरील उत्तमोत्तम होटेलमध्येंहि

बोटीवरच्या पेक्षा अधिक चांगली सोय नसते लुसिटानिया सारख्या बोटींमध्यें दूरच्या सफरीच्या वेळीं जी अन्नसामुग्री घेण्यात येते तिची कल्पना पुढील यादीवरून येईल

| | |
|---|---|
| ४५००० पौंड गोमांस | १८०० पौंड कॉफी |
| १७००० पौं. मटन | १०००० ,, साखर |
| ३००० पौं बकऱ्याचें मांस | २८०० ,, सुकविलेलीं फळें |
| २५०० पौं. डुकराचें मांस | ८० पेट्या नारिंगें |
| १२०० पौं. ताजे मासे | २३० ,, सफरचंदादि फळें |
| ७५० पौं. इंग्लिश सालमन | ८०० पौंड द्राक्षें |
| ८००० सिगार | १५०० पीचेस, नेक्टेराईन्स |
| ३ जिवंत कासवें | ४० पेट्या पीअर्स |
| २०० पेट्या वाळलेले मासे | १५० ,, इंग्लिश मेलन्स |
| १०० पौंड कॅव्हिअर | २० केळ्याचे लोंगर |
| २००० कोंबडीचीं पिलें | १००० पौं इंग्लिश टोमॅटो |
| ६०० कोंबड्या | २० पेट्या लिंबू |
| १५०० पौंड गोवत्समांस | २६०० जॅम व मार्मालेड |
| १५० टर्की जातीचीं कोंबडीं | ४५० डबे बिस्किटें |
| ३०० बदकाचीं पिलें | २५० बॅरल कणीक |
| ६० हंस पक्षी | २ टन मीठ |
| १५०० इतर खाण्याचे पक्षी | १४०० पौंड हॅम |
| १५० ग्रेस | ४००० ,,खारें डुकराचें मांस |
| ५५०० पौंड लोणी | १६०० ,,पनीर (चीझ) |
| २८ टन बटाटे | ४०००० अंडीं |
| ३००० गॅलन दूध | १५०० बाटल्या दारू |
| १००० पौंड चहा | २० बॅरल ऑइस्टर |

रोज अन्न शिजवून तयार करणारीं अनेक पाकगृहें असतात वाफेच्या उष्णतेनें पदार्थ शिजवितात. मलाईच्या वर्फाचीं व इतर पाकनिष्पत्तीचीं यंत्रें विद्युच्छक्तीनें चालतात अन्न शिजविण्याच्या कामाशिवाय इतरहि पुष्कळ कामें विद्युच्छक्तीनें करविण्यात येतात कपबशा, सुऱ्या, वगैरे सामान धुवून साफ करणें, बुटांना पॉलिश करणें, बोटींतील पंखा-माहून अधिक घड्याळें चालविणें, टेलिफोन चालविणें वगैरे सर्व कामें विजेच्या शक्तीनेंच चालतात. ऑलिंपिया ॲक्विटेनिया, इंपिरेटर वगैरे बोटींवर वरील सर्व सोयी असून शिवाय विश्रांतिगृहें, भोजनगृहें, लेखनवाचनगृहें, व्यायामगृहें, स्नानगृहें, वगैरे सोयी असतात व तीं इतकीं सुशोभित केलेलीं असतात कीं, यापेक्षां मोठमोठ्या शहरांतहि अधिक सुंदर व्यवस्था पहावयास मिळत नाहीं या सर्व जागा इतक्या ऐसपैस व मोठ्या असतात कीं, ब्रिटिश क्वीन, नामक बोटींतील भोजनगृह ६० फूट लांब आणि ३० फूट रुंद होतें आणि ऑलिंपिक बोटींतील ११४ फूट लांब व ९२ फूट रुंद होतें

वर सांगितलेल्या अन्नसामुग्रीशिवाय इतर अनेक प्रकारचें सामान, वस्त्रप्रावरण बोटीवर असतें तें येणेंप्रमाणें —

| | |
|---|---|
| ४०००मलमल | १५०००एकेरी चादरी |
| ७५००ब्लँकेट्स | ३०००दुहेरी चादरी |
| ६०००सरपोस | १५०००उशांचे अभ्रे |
| २०००आरश्यावरील वस्त्रें | ७५००आगपुसणी |
| ३५००स्वैपाक्याचीं वस्त्रें | २५०००सुंदर टुवाल |
| ३०००खिडक्यावरील पडदे | ४००००किरकोळ वस्त्रें |
| ३६००पलंगपोस | ८००उशा |
| ३६००गाद्या | |

याशिवाय कांचेचीं व धातूचीं भांडीं वगैरे सामान घेतलें जातें तें:—

| | |
|---|---|
| ४५००कप | ४००साखरेचीं भांडीं |
| ३०००चहाचे कप | ४००फळांचीं ताटें |
| १५००कॉफीचे कप | ४००लोण्याचीं भांडीं |
| ३०००गोमांसरसाचे कप | ४००भाजीपाल्याचीं भांडीं |
| १०००मलईचीं भांडीं | ८०००जेवणाचे कांटे |
| २५००फराळाच्या बशा | ७५००फळांचे ,, |
| १८००० जेवणाच्या बशा | १५००मांसाचे ,, |
| २०००दारूचे पेले | ४००क्रीमचीं भांडीं |
| १२००कॉफीचीं भांडीं | ४००लोण्याच्या सुऱ्या |
| १२००चहाचीं भांडीं | १५००फळांच्या सुऱ्या |
| ४५००फराळाच्या बशा | १५००मांसाच्या सुऱ्या |
| ३०००चहाच्या बशा | ८०००सर्वोपयोगी सुऱ्या |
| १५००कॉफीच्या बशा | ३००आडाकित्ते |
| २५००पाण्याच्या बाटल्या | ५०००जेवणाचे चमचे |
| ५००पुष्पपात्रें | १०००चहाचे चमचे |
| | १५०० मिठाचे चमचे |

कुनार्ड, व्हाइट स्टार ॲलन व इतर कित्येक कंपन्या बोटीवर प्रवासांत असतांना दैनिक पत्रें काढून बिनतारी यंत्रानें मिळविलेली ताजी बातमी प्रवाशांना रोज वाचावयास देतात गायनवादनाचे जलसे व इतर खेळहि बोटींवर चालतात याप्रमाणें बोटीनें प्रवास करतांना घरच्यापेक्षां कोणतीहि गोष्ट प्रवाशांना कमी पडत नाहीं येणेंप्रमाणें पन्नाससाठ वर्षांपूर्वींच्या मानानें हल्लीं बोटीवर पुष्कळ अधिक सुखसोयी असतात हें दिसून येईल.

*विशिष्ट कामाच्या आगबोटी*, तेलाच्या बोटी — जुन्या बोटींशीं तुलना करतां दुसरी एक अशी महत्त्वाची गोष्ट दिसून येतें कीं, हल्लीं व्यापारधंदे फार वाढल्यामुळें बोटींचेहि निरनिराळे प्रकार निघाले आहेत उदाहरणार्थ, घासलेट तेल पूर्वी पेट्यांतून किंवा पिपांतून नेत असत, पण अलीकडे ब्रिटिश बोटीवाल्यांनीं स्वतंत्र तेल नेणाऱ्या बोटी तयार केल्या आहेत १८९३ सालीं अशा तेलाच्या स्वतंत्र बोटी ८० होत्या व त्यांचें सरासरी भरताड प्रत्येकीं २५०० टन होतें. १९१४ च्या सुमारास ही संख्या ३०० असून हल्लीं ती

वाढतच आहे. अशा बोटीला ऑईल टॅंकर म्हणतात. त्यात तेल भरण्याकरिता व काढण्याकरिता पंप वापरतात बोटींत तेलाकरिता निरनिराळ्या टाक्या करतात, सर्व एक मोठें साठवण करीत नाहींत, कारण बोट हलताना सर्व तेल एका बाजूला येऊन भार पडल्यास बोट पालथी होण्याचा धोका असतो. प्रत्येक टाकी सरासरी २८ चौरस फुटाची असते पुढल्या टाक्या, मागल्या बाजूच्या टाक्या, सामानसुमानाची जागा आणि एंजिनरूम याच्यामध्ये सुरक्षितपणाकरिता मोकळी जागा सोडलेली असते एंजिनरूम बोटीच्या अगदीं मागल्या भागाला असते याप्रमाणें आगीचा संभव टाळण्याकरिता दुसरीहि काळजी घेतात तरी सर्व बोट तेलानें भरून दूरचा प्रवास करणें अत्यंत धोक्याचें काम होय. असें असूनहि आजकाल शेंकडों बोटी हें करीत असतात, तेव्हां त्यावरील खलाशाच्या धाडसाची तारीफच केली पाहिजे.

आगगाड्या नेणाऱ्या आगबोटीः—बोटीचें काम निरनिराळ्या देशांतील किंवा खंडांतील रेल्वेनें जाणारे प्रवासी व माल एकमेकाकडे पोहोंचविणें हें होय परंतु एवढ्यानें भागत नाहीं नद्या, सरोवरें किंवा लहानलहान समुद्र अशा ठिकाणीं मालप्रवाशासुद्धा सर्व आगगाडीच उचलून एका तीराहून दुसऱ्या तीराला नेण्याचें काम बोटींना करावें लागतें. कित्येक नद्यावर पूल बांधणें अशक्य असतें त्यामुळें तेथें बोटींची योजना करतात. अशा प्रकारचें विशेष महत्वाचें उदाहरण म्हणजे जर्मन स्टेट रेल्वेचें सॅसनिंझ स्वीडन स्वीडिश स्टेट रेल्वेच्या ट्रेलबोर्ग स्टेशनाशीं जोडण्याकरिता बाल्टिक समुद्रांतील अत्यंत वादळमय ६४ मैलाचा प्रवास करणाऱ्या बोटींचें होय या ठिकाणीं दोन जर्मनीच्या व दोन स्वीडनच्या अशा चार बोटी आहेत. प्रत्येकीची लांबी सुमारें ३७० फूट असून वेग १६॥ नॉटपर्यंत असतो. बोटींतील डेकवर रूळ बसविलेले असून बंदरातून आगगाडी बोटीवर घेतात. बोटींत पाण्याची टाकी असून तींत पाणी कमजास्त करून बोटींतले रूळ बरोबर धक्क्याला लावण्याची व्यवस्था करतात. यामुळें आगगाडींतील प्रवाशांना जागेवरून न हालतां बाल्टिक समुद्र ओलांडून जातां येतो त्याचप्रमाणें रशियन सरकारची लेकबैकल नावाची बोट बैकल सरोवरावरून आगगाड्या नेण्याचें काम करीत असते. हिंवाळ्यांत या सरोवराचें पाणी गोठून जातें त्यामुळें बर्फ फोडून जाण्याची बोटीला योजना केलेली असते ही बोट चालविण्याकरिता जोडपंखा लाविलेला आहे व्होल्गा नदीवर अशीच सोय केलेली असून डेनमार्क युनैटेड स्टेट्स कानडा वगैरे देशांतहि अनेक ठिकाणीं अशा सोया आहेत ब्रिटिश फर्मनें अशा बर्फ फोडून चालणाऱ्या बोटी ४००हून अधिक बांधलेल्या आहेत कानडांतल्या सरोवरांतूनहि अनेक ठिकाणीं अशा सोयी केलेल्या आहेत.

नद्यांतील व सरोवरांतील बोटी.—समुद्रांतल्या बोटींपेक्षा नद्यासरोवरांतील वाहतुक करणाऱ्या बोटी बऱ्याच निराळ्या नमुन्यावर बांधाव्या लागतात. पृथ्वीच्या पाठीवरील बऱ्याच भागांतल्या व विशेषतः ब्रिटनमधल्या नद्या फारच अरुंद असल्यामुळें मोठाल्या बोटी त्यांतून जाऊं शकत नाहींत. युनैटेड स्टेटमध्यें एकाला एक जोडून जी अनेक सरोवरें आहेत त्यांतून चालणाऱ्या बोटीहि निराळ्या नमुन्याच्या आहेत. ह्या सरोवरांतील प्रवास हजारों मैलांचा असून पूर्वी येथून शिडाचीं जहाजें चालत असत. अलीकडे आगबोटी चालू झाल्यापासून प्रवाशाच्या सोयीकरितां अनेक सुधारणाहि झालेल्या आहेत. सरोवराच्या काठानें वस्तीहि बरीच वाढून रेल्वेचे रस्ते झाले असल्यामुळें सरोवरांतली रहदारी फार वाढली आहे इ. स. १८७२ पासून नद्यासरोवरांतील वाहतुकीकरिता निराळ्या नमुन्याच्या लोखंडी बोटी मोठ्या प्रमाणावर होऊं लागल्या. ह्या बोटींना गति देणारे पंखे असतात. बाष्पपात्र आणि एंजिन बोटीच्या मागच्या बाजूस असतें अशा बोटींची लांबी ३५०–४०० फूटपर्यंत, आणि रुंदी ४०–५० फुटापर्यंत असते. एकएका बोटींतून ५००० पर्यंत प्रवाशी जाऊं शकतात

मिसिसिपी, मिसौरी, हडसन वगैरे नद्यांतून प्रवास करणाऱ्या बोटीहि अशाच लांबट पण अरुंद आकाराच्या असतात. हडसन नदींतून चालविण्याकरितां क्लेरमॉंट नावाची पहिली बोट फुल्टन यानें १८०७ च्या सुमारास बांधली. तिची लांबी १६३ फूट आणि रुंदी फक्त १८ फूट व खोली ७ फूट होती. हिंवाळ्यांत पाणी गोठून बर्फ झाल्यावर त्या काळीं बोटी बंद ठेवीत असत. अशा बोटींना गति देण्याकरितां १८६५ पर्यंत बहुतेक वल्ह्याची चाकेंच लावीत असत. हडसन नदींमधील चालणारी अलीकडील व फार चांगली बोट 'न्यू यॉर्क' ही होय. ही १८८७ सालीं चालू झाली. तिची गति २० मैलपर्यंत असे. ह्या बोटीवर पहिल्या वर्गासुद्धा सर्व दर्जाच्या प्रवाशाच्या सर्व प्रकारच्या सुखसोयी केलेल्या होत्या. ग्रेटब्रिटनसारख्या लहान देशांतील लहान नद्यांतून चालवण्याकरितां बांधावयाच्या बोटींचा प्रश्न विशेष अवघड असतो शिवाय अशा देशांत रेल्वेचे रस्ते पुष्कळसे झालेले असल्यास जलमार्गाची आवश्यकता लोकांस पटण्यास उशीर लागतो डान्यूब, मिसिसिपी वगैरे मोठाल्या नद्यांचीं पात्रें रुंद आणि प्रवाह संथ असल्यामुळें त्यामधून सामान्य प्रकारच्या बोटी चालू शकतात नद्यांमधून चालणाऱ्या बोटींचा मुख्य विशेष म्हटला म्हणजे त्या फार उथळ असतात पुष्कळ बोटींचा पाण्याखालील भाग १८ इंचाहून अधिक नसतो बहुतेकींना गति देण्याकरितां एक वल्ह्याचें चाक बोटीच्या मागच्या अंगास बसविलें असतें तथापि पंख्याच्या बोटीहि असतात.

जगांतील सर्वांत मोठ्या आगबोटी—(आकारानुक्रमें)— मॅजेस्टिक, लेव्हियाथन, बेरेंगारिया, ऑलिंपिक, ॲक्विटेनिया, हॉमेरिक, पॅरिस, मॉरेटेनिया, ऍम्प्रेस

ऑफ स्कॉटलंड, कॅरॅबिओलो, बेलाभिक, ॲड्रियाटिक, रॉटरडॅम, बाल्टिक, जॉर्ज वॉशिंगटन, फ्रान्स, डुइलिओ, गिउलिओ, ससेरे, एंप्रेस ऑफ कॅनडा, एंप्रेस ऑफ चायना, अमेरिका, सेड्रिक, सेल्टिक, मिनेसोटा, कॅप पोलोनिओ, रेझोल्यूट, रिलायन्स, सिथिया, फॅरोनिया, लॅकोनिया, कार्मानिया, अगॅमेम्नान, अदर्डेल, कॅसल, विंडसर कॅसल, लॅपलंड, समरिया, सेरॅमिक, एंप्रेस ऑफ फ्रान्स, माउन्ट व्हर्नान, प्रेसिडेंट ग्रॅंट, काउन्ट रोसो, ओहिओ, अरेबिक, मिनेकाहडा, ट्रान्सिल्व्हेनिया, टस्कॅनिया, न्यू ॲम्स्टरडॅम, एंप्रेस ऑफ इंडिया, एंप्रेस ऑफ एशिया, एंप्रेस ऑफ रशिया, डोरिक, पिट्सबर्ग, रेजिना, मॉंटकाम, मॉंट्रोज, मॉंटक्लेअर, हंस, नरडुंड, कॅमेरोनिया, टिन्हेनिया, एंप्रेस ऑफ ब्रिटन, नलदेरा, किंग अलेक्झांडर, ॲंडीम, अलमांझोरा, मागोलिया, मोल्डाव्हिया. सर्व १५,५०० टनाच्या किंवा त्याहून मोठ्या आहेत.

अ गा ती ल अ ति श य ज ल द जा णा ऱ्या आ ग बो टी (वेगानुक्रमें) — मॉरेटॅनिया, मॅजेस्टिक, अक्विटॅनिया, फ्रान्स, बेरेंगॅरिया, ऑलिंपिक, ऑरेंजे नस्सौ, प्रिन्सेस ज्युलिआना, वाहिने, पॅरिस, व्हॉन स्टयुबेन, एंप्रेस ऑफ एशिया, एंप्रेस ऑफ रशिया, ला लोरेन, ला सॅव्होए, प्रिन्सेस पॅट्रिशिया, लेव्हियाथन अगॅमेम्नन, माउन्ट व्हर्नॉन, एंप्रेस ऑफ फ्रान्स, नैराना, एस्पेरिया, मओरी, डुंगाना, प्रिन्स हेंड्रिक, ल्युटेटिया, मस्सिलिया, चार्लस रो, यांपैकीं २० नॉट (समुद्रातील मैल) खालीं कोणत्याहि बोटीचा वेग नाहीं [संपादकीय]

यन्त्रशास्त्रविषयक

आ ग बो टी व री ल यं त्रें — आगबोट चालविण्यास शक्ति तयार करण्यासाठीं वाफेच्या इंजिनाचाच बहुतेक उपयोग करतात आज ज्या आगबोटी समुद्रात प्रवास करीत आहेत त्यांपैकीं शेकडा ९५ आगबोटी वाफेच्या इंजिनानीं चाललेल्या आहेत परंतु गेल्या १० वर्षांत ऑईल इंजिनापैकीं काहीं जातींचीं इंजिनें आगबोटी चालविण्याच्या कामीं उपयोगात आणण्यात येऊं लागलीं आहेत. तथापि पुढील चाळीसपन्नास वर्षांत वाफेच्या इंजिनानीं चालणाऱ्या बऱ्याच आगबोटी माणसें व माल आणण्याच्या कामाकरिता बांधण्यात येतीलच.

बॉयलरः—वाफ उत्पन्न करण्यासाठीं बॉयलर (म्हणजे बाष्पपात्र) वापरण्यात येतें आगबोट जशी लहान मोठी असेल तसे आकारानें लहान मोठे एक किंवा अधिक बॉयलर एका आगबोटीवर बसविलेले असतात. जमीनीवर चालणाऱ्या कारखान्यांतून ज्या प्रकारचे बॉयलर वापरतात त्यापेक्षा हे बायलर आकारानें व वजनानें निराळे असतात व यांची रचना थोडक्या जागेंत जास्त वाफ उत्पन्न करण्यास सोइस्कर होईल अशी केलेली असते बॉयलरमध्यें विस्तव असतो व त्याचा धूर निघून जाण्यासाठीं मोठमोठे बंब वर आणलेले असतात. हे यंत्र पाहून आगबोटींत बॉयलर कोणत्या ठिकाणीं आहेत हें सहज समजतें

इंजिन.—निरनिराळ्या बॉयलरमध्यें वाफ उत्पन्न करून ती मोठ्या नळाच्या द्वारें मुख्य इंजिनात आणलेली असते. या नळाला ज्या ठिकाणीं प्रत्येक बॉयलरमधून वाफ बाहेर देणाऱ्या नळाचा सांधा येतो त्या सांध्यावर एक दरवाजा अथवा झाकण बसविलेलें असतें. यामुळें वाटेल तेव्हा कोणताहि बॉयलर निराळा करून त्यातील वाफ सोडून देता येते

या मुख्य नळातून जिकडे निरनिराळीं यंत्रे चालू असतात तिकडे लहान मोठ्या नळ्या लावून वाफ नेलेली असते एका आगबोटीवर मोठ्या इंजिनाशिवाय ठिकठिकाणीं बसविलेलीं लहान लहान वाफेचीं इंजिनें असतात सामान भरण्यास किंवा उतरून टाकण्यास लहानमोठे क्रेन (यारी किंवा डिगल्या) ठिकठिकाणीं असतात त्यांना वाफेचीं इंजिनें जोडलेलीं असतात विजेचे दिवे लावण्यासाठीं डायनामो चालविण्यास इंजिनें असतात बर्फ करण्याचीं यंत्रें चालविण्यासाठीं किंवा निरनिराळ्या ठिकाणी पाणी काढून टाकण्यासाठीं किंवा पाणी भरून घेण्यासाठीं पंपाची योजना असते तीस वाफेचीं इंजिनें लागतात. सारांश इतकाच कीं, बायलर एका ठिकाणीं असून इंजिन ठिकठिकाणीं वाटलेली असतात मुख्य इंजिन बहुतेक आगबोटींना एक असत या इंजिनाची शक्ति आगबोटीच्या मागच्या टोंकास नेलेली असते व तेथें ही शक्ति पाण्यास मागें ढकलून देण्याच्या प्रयत्न करून आगबोटीस पुढें ढकलते.

आगबोटीवरील इंजिनातील विशेष —आगबोटीवरील इंजिन व जमीनीवरील इंजिन यात जमिनअस्मानाचे अंतर आहे. जमिनीवर इंजिन आडवें असतें व त्याला वाटेल तितकी जागा असते आगबोटीवर जागेची अडचण म्हणून थोडक्यात थोडकी जागा व्यापून जितकी जास्त शक्ति उत्पन्न करता येईल तितकी करण्यासारखा इंजिनें आगबोटीसाठीं तयार करतात हें इंजिन उभें असतें म्हणून याला जागा फार थोडी लागते इंजिनाची रचना करताना व उपांगाची योजना करताना जागेची अडचण ध्यानात घेतलेली असते. तसेंच इंजिन हलकें व ररक्याची देखील काळजी घ्यावी लागते. आगबोटीच्या इंजिनाच्या पुष्कळ जाती आहेत. त्या वाफेच्या इंजिनाच्या सदरात येतील च

इंजिनघर —इंजिनखोलीची व्यवस्था चांगली असते निरनिराळ्या भागात जाण्यासाठीं लोखंडी जिने असतात इंजिनाच्या निरनिराळ्या भागाना तेल देण्यासाठीं किंवा तपासण्यासाठीं तेथें जाण्यास सोइस्कर रस्ते तयार करून बसविलेले असतात आयत्यावेळीं वार, दोऱ्या, फळ्या, जम वून पराच्या बांधण्याच कारण सहसा कधीं पडत नाहीं इंजिनघरात ठिकठिकाणीं यंत्राच्या भागाच नकाशे ठेवलेले असतात व निरनिराळ्या नळ्या कोठकोठून गेल्या आहेत याचे नकाशेहि टांगलेले असतात चालू स्थितींत काम चालत असताना लागणारी अवजारें अगदीं व्यवस्थित रीतीनें

लावून ठेवलेलीं असतात. शेंकडों माणसांचें जीवित ज्या यंत्राच्या सुरक्षीतपणावर अवलंबून असतें त्या यंत्राची काळजी घ्यावी तितकी थोडीच होते. इतकी दक्षता ठेवूनहि केव्हां केव्हां आगबोटींची यंत्र बिघडतात व उशीर होतो.

निरनिराळ्या यंत्रांना लागणारे किरकोळ भाग तयार करून आगबोटीवर ठेवलेले असतात. किंवा कांहीं मोडतोड झाल्यास ती दुरुस्त करण्यास लागणारें सामान व हत्यारेंहि भरपूर ठेवावीं लागतात. इतकेंहि करून कधीं कधीं अशी वेळ येते कीं एखादी आगबोट यंत्र नादुरुस्त झाल्यानें आपल्या शक्तीन चालेनाशीं होऊन दुसऱ्या आगबोटानें ओढून आणावी लागते.

शाफ्टिंग (लाटाची माळ) व आवणें.—आगबोटाच्या पुढच्या टोंकापासून पाहिले म्हणजे इंजिन व बॉयलर हीं साधारणपणें मध्यभागीं येतात. त्यातल्या-त्यात इंजिन मागच्या बाजूस असतें. कारण इंजिनात उत्पन्न झालेली शक्ति अगदीं मागच्या टोंकास नेऊन तथून ती आगबोटीच्या बाहेर काढून पाण्यात न्यावी लागते. या कामासाठीं जाड असें शाफ्टिंग वापरतात. इंजिन जसें लहान मोठें असेल तसें शाफ्टिंग लहान मोठें (जाडीत) असते. हें शाफ्टिंग बरोबर बसण्याकरिता ठिकठिकाणीं 'आवणें' (बेअरिंग्ज) बसविलेलीं असतात. व हें एकसारखें फिरत असल्यामुळें याचा इतर सामानाशीं संबंध येऊ नये म्हणून यासाठीं एक बोगदेवजा लांबचलांब भुयार बांधलेलें असतें. या भुयारांत माणसांना (इंजिनात काम करणाऱ्या) इंजिना-पासून निघून ते थट आगबोटीच्या मागल्या टोंकापर्यंत दोन्ही बाजूंनीं जातां येतें. या शाफ्टिंगच वजन व गति फार असल्यानें व सर्व आगबोट पुढें ढकलण्याचा जोर यानेंच लावावयाचा असल्यानें याला ज्या आवणामध्यें ठेवतात तीं कधीं कधीं तापू लागतात. एकदमच सर्व कधींहि तापत नाहींत पण मधून मधून एखादंदुसरें तापावयास लागतें. अशा वेळीं तेथें लागणाऱ्या इतर जिनसांबरोबर पाणी लागतें. हें तापटतोय मिळावें म्हणून एक नळ भुयाराच्या छपराच्या आतील बाजूस लावून एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत नेलेला असतो. या नळाला प्रत्येक आवणावर येईल अशा जागीं एक एक कॉक (म्हणजे तोटी) बसविलेला असतो. हा कॉक उघडतांच आवणावर थंड पाण्याची धार सुरू होते.

ढकल आवण.—हे शाफ्टिंग तुकडे जोडून केलेलें असतें. अगदीं मागच्या टोंकास जें आवण असतें तें फार बळकट व आकारानें मोठें करावें लागतें. इंजिन चालू होऊन पंखा फिरू लागला म्हणजे त्यामुळें पाणी मागें ढकलून गति उत्पन्न होऊ लागते तेव्हां प्रथम या आवणावरच जोर येतो. याला ढकल-आवण उर्फ थ्रस्ट बेअरिंग असें म्हणतात. याची रचना अगदीं निराळी असते व आगबोट पाण्यांतून ढकलण्यास करणारा जोर अगदीं पहिल्यानें या भागावरच लागू होत असल्यामुळें हा भाग अत्यंत महत्त्वाचा आहे. याला वंगण वगैरे घालण्याची अत्यंत खबरदारी घ्यावी लागते.

यानंतर आणखी महत्त्वाचा भाग म्हणजे एक लाकडाचें आवण हा होय. हें लाकडाचें आवण समुद्राचें पाणी आगबो-टींत येऊ देत नाहीं असा याचा गुण आहे. हें अगदीं मागच्या भिंतींत बसविलेलें असतें. या भिंतीच्या पलीकडे अफाट समुद्र असतो. या ठिकाणीं एक खोली असते तिचे दर वाजे पाणी आत येऊ न देण्याइतके घट्ट असतात. कधीं कधीं काम पडल्यास हे दरवाजे उघडून पंख्याजवळ जातां येते.

पंखा.—आगबोटींच्या इंजिनास शक्तिग्राहक चक्र ऊर्फ गतिचक्र नसतें व शक्तिवाहक चाकें नसतात. इंजिनात तयार झालेली शक्ति शाफ्टिंगमधून वर सांगितल्याप्रमाणें अगदीं मागच्या टोंकास जाते. तेथें शक्तीपासून गति तयार करण्यासाठीं एक पंखा लावलेला असतो. हाच शक्तिग्राहक चक्राचें काम करतो. हा पंखा म्हणजे एक मोठा स्क्रू होय. स्क्रूला पुष्कळ पाळ (आटे) असतात, पण या स्क्रूला आटा एकच असतो पण याचा घेर मोठा असतो. या पंख्याच्या पानांना तिरपेपणा दिलेला असतो तो स्क्रूच्या (मोठ्या परिघाच्या) हिशोबानें दिलेला असतो. हा पंखा (स्क्रू-प्रॉपेलर) फिरू लागला म्हणजे पंखा हा स्क्रू व पाणी ही ढेबरी (नट) होते. अर्थात् फिरणाऱ्या स्क्रूच्या ढेबरीला गति उत्पन्न होते. त्याप्रमाणें आगबोटीचा पंखा फिरू लागला म्हणजे पाण्याला गति मिळते व स्क्रूच्या फिरण्याला पाण्यानें जो अडथळा होतो त्यामुळें हा स्क्रू आगबोटीला सहजच पुढें ढकलतो. आगबोट चालण्याचें हेंच तत्त्व आहे. (विमानें हवेत या प्रकारानें स्क्रूसारखा पंखा वापरून हवेला मागें ढकलून आपण पुढें सरकतात.)

पंखा हा अत्यंत महत्त्वाचा भाग असून तो अत्यंत अव-घड जागीं बसविलेला असतो. तथापि तेथें जाऊन देखील माणसांना काम करावें लागतें. पंख्याला ४ पाकळ्या अस-तात. व या बोल्ट लावून एका बुधल्यावर बसविलेल्या अस-तात (हा बुधला शाफ्टिंगवर बसविलेला असतो). बुधला व पाकळ्या मिळून पंखा होतो. कधीं कधीं एखादी पाकळी मोडून किंवा गळून पडते. अशा वेळीं गोदीवारा न पाहतां पाण्यांत जाऊन तेथें दुसरी पाकळी बसवावी लागते. कधीं कधीं सबंध पंखा देखील सैल होऊन गळून पडतो. अशा वेळीं उपयोगीं पडावा म्हणून एक सबंध पंखा व त्यासाठीं लागणारें किरकोळ सामान म्हणजे बोल्ट, नट, चाव्या इत्यादि तयार ठेवलेलें असतें. तसेंच एखादी पाकळी गळून पडल्यास उपयोगी पडाव्या म्हणून २।३ पाकळ्या जास्त ठेविलेल्या असतात.

इतर यंत्रें.—याप्रमाणें बॉयलर, इंजिन, शाफ्टिंग व पंखा मिळून आगबोटीला चालविणारीं मुख्य यंत्रें आहेत. इतर त्यांनाहि मागें उल्लेख आलेलाच आहे. आगबोट कशी लहान

मोठा असेल त्या मानानें व तिला जें काम करावयाचें असेल त्याप्रमाणें तिच्यावरील सुखसोयी कमीजास्त असतात माणसे नेणाऱ्या आगबोटीवर माल नेणाऱ्या आगबोटीपेक्षा सुखसोयी जास्त असल्यानें त्या साधण्यासाठीं जास्त यंत्रें ठेवावीं लागतात माल नेणाऱ्या आगबोटीवर ज्या प्रकारच्या मालाची नेआण करावयाची असेल त्याप्रमाणें आणखी निरनिराळीं यंत्रें ठेवावीं लागतात

उदाहरणार्थ रॉकेल भरून नेणाऱ्या आगबोटीवर रॉकेल उपसून टाकण्यासाठीं पंपाची व्यवस्था लागते इतर आगबोटींवर रहाटमाळा ( एलीव्हेटर ) किंवा क्रेन ( डिगऱ्या ) लागतात भाजीपाला, मास, किंवा इतर नासणारे जिन्नस म्हणजे फळें यांची नेआण करणाऱ्या आगबोटींना बर्फ तयार करण्याचें बरेंच मोठें यंत्र जोडावें लागतें

**आगबोटीचें बांधकाम** —आगबोट बांधताना ती कोणत्या कामाकरिता वापरावयाची याचा विचार करून तिची बांधणी व यंत्रयोजना करावी लागते आगबोट बांधणें हें अत्यंत खर्चाचें काम आहे व एकदा एका कामासाठीं बांधलेली आगबोट भलत्याच कामाला वापरली तर त्या कामालाहि ती जशी उपयोगी पडावी तशी पडत नाहीं म्हणून आधींच सर्व तऱ्हेची तयारी करून ठेवावी लागते अगदीं पहिल्याप्रथम नकाशे तयार करतात हे नकाशे तयार करणें अत्यंत खर्चाचें व कुशलतेचें काम आहे

एकमापी जहाज ( स्टँडर्ड शिप ) —आजपर्यंत ज्या आगबोटी तयार झाल्या त्या सर्व एक एक स्वतंत्रपणें बांधल्या गेल्या व अद्यापीहि याचप्रमाणें बऱ्याच बांधल्या जात आहेत परंतु या आगबोट बांधण्याच्या तऱ्हेनें खर्च फार येतो व कामहि हळूहळू होतें म्हणून एक नवीन पद्धत प्रचारात आली आहे या पद्धतीस 'एकमापी' पद्धत म्हणतात या पद्धतीचें पहिलें व मोठें उदाहरण म्हणजे 'फोर्ड मोटारगाडी' हें होय विषयस्पष्टीकरणार्थ आपण आपल्या घराचें उदाहरण घेऊं पुणें शहरात घराचें मोजण्याचें माप खण आहे पण खण = अनिश्चित फूट असेंच आहे काहीं ठिकाणीं एकाच दिवाणखान्यात लहानमोठे खण आहेत म्हणजे जर खणाची रुंदी नक्की केली तर घर बांधणाऱ्या मनुष्यास "दांडे" विकत घेताना हिशोबाचें काम नाहीं, मग मोडून घेतले म्हणजे झालें तसेंच प्रत्येक मनुष्य स्वतंत्र तऱ्हेनें घर बांधतो, कोणाच्या गॅलरी २॥ फूट तर कोणाची ३॥ फूट ! अशा तऱ्हेनें घरें बांधण्यापेक्षा सर्वसाधारणपणें सोईस्कर पडतील अशीं निरनिराळ्या दहा प्रकारचीं घरें ( सुमारें ४००० रुपयांपासून ४०००० रुपयांपर्यंतचीं ) तयार केलीं व तशींच घरें सर्वांनीं बांधावयाचीं ठरविलें म्हणजे एकमापी घरें झालीं म्हणजे मग दारें, खिडक्या, खांब, दांडे, कैच्या, कौलें सव सारखीं लागणार याच पद्धतीनें आगबोटी बांधण्यास नव्या सुरवात झाली आहे इंग्लंडात ४१५ एकमापी आगबोटींचे नमुने तयार करून त्या नमुन्याप्रमाणें आगबोटी बांधीत आहेत

नमुना ए, हा धान्याची वाहतुक करण्यासाठीं आहे लांबी ४००फूट, ५१५०टन (डिसप्लेसमेंट), एक मजला

नमुना बी, सर्व मापें एप्रमाणेंच पण सर्व माल नेण्यासाठीं तयार केलेला दोन मजली

नमुना सी, वरीलपेक्षा लहान

नमुना डी किनाऱ्यावरील व्यापारासाठीं२००० टनाचा

नमुना एफ, लांबी ३७६ फूट व ४४०० टनाचें

या सर्व जहाजाना गति एकच म्हणजे साडेअकरा नॉट होती याप्रमाणें नमुने ठरल्यानंतर मग त्याच्या प्रत्येक भागाचे नकाशे करून ते भाग तयार करावयास सुरवात होते

एकमापी पद्धतीनें होणारी श्रमविभागणी — आजपर्यंत सर्व काम आगबोटीच्या कारखान्यात करावें लागत असे. परंतु आतां हे भाग निरनिराळ्या कारखान्यात तयार करता येतात पूल बांधण्याच्या कामात वाकबगार असलेल्या कारखानदाराकडून लोखंडी नाटाचें काम करून घेतात लोखंडाला भोकें पाडणें, त्यांना वाकविणें इत्यादि कामें अशा कारखान्यात केल्यानें स्वस्त पडतात अशाच तऱ्हेनें समुद्रकिनाऱ्यापासून शकडो मैल अंतरावर असणाऱ्या कारखान्यात सामान तयार करून घेऊन किनाऱ्याच्या गावीं आगबोटी फार त्वरेनें जोडून घेतात वरील आगबोटींचीं इंजनें एकसारखीं,पंखे एकसारखे, सामानसुमान, टेबलें, खुर्च्या, सतरंज्या एकसारख्या व एकमापी असतात यामुळें मोडतोडीस दुरुस्तीचा खर्च फार येत नाहीं

जर्मन लोकानीं आगबोटी बुडवून विलायतेंत उपासमार करण्याची वेळ आणली, तेव्हा इंग्लंडनें एकमापीपद्धतीप्रमाणें झपाट्यानें आगबोटी बांधून त्याच्याशीं टक्कर दिली अशा एकमापी आगबोटी बांधण्याची सर्व देशानीं सुरवात केली आहे.

हिंदुस्थानात १००० टनापर्यंत आगबोटी कलकत्त्यास होतात येथ आगबोटी बांधावयास अडचणी म्हणजे शिप प्लेट्स वगैरे सर्व सामानसुमान जेथें मोठ्या प्रमाणावर होतें, तेथेंच स्वस्त पडतें जोंपर्यंत लोखंडी मालाचे कारखाने आपल्या देशात वाढले नाहींत तोंपर्यंत येथें आगबोटी बांधण्याचा धंदा वाढणार नाहीं

नकाशा व नमुना तयार करणें —अगदीं पहिल्या प्रथम ड्रॉइंग उर्फ नकाशा तयार करून घेतात हे नकाशे तयार करणें अत्यंत खर्चाचें काम आहे. आगबोट बांधण्याचें प्रत्यक्ष काम सुरू करण्याच्या आधीं हे सर्व नकाशे तयार करावे लागतात निरनिराळ्या भागाचे नकाशे निरनिराळे तयार करतात त्यात सर्व मापें अगदीं बारकाइनें तपासून मांडलेली असतात ड्राइंग ऑफिसमध्यें प्लॅन तयार झाल्यावर त्या आगबोटीचा एक लहान नमुना तयार करतात हा नमुना काहीं फूट लांब असतो ही नमुन्यानीं आगबोट पाण्याच्या

टाकीत सोडून ती कशी काय होईल हें साधारणपणें ठरवितात व ती ज्या गिऱ्हाइकासाठीं तयार करावयाची असेल त्याच्या गरजा योग्य रीतीनें भागविण्यास ती उपयोगी पडेल किंवा नाहीं हें या नमुन्यावरून ठरवितात. याप्रमाणें नकाशेखात्यांतून नकाशे तयार होऊन बाहेर पडले म्हणजे मग ते दुसऱ्या खात्यांत जातात. याला मोल्डिंग खातें म्हणतात. येथें प्रत्येक भागाचा नकाशा घेऊन तो पुऱ्या आकाराच्या जमिनीवर काढतात व ज्या ज्या ठिकाणीं जसजसा आकार किंवा गोलाई असेल तसा आकार बरोबर काढतात. या ठिकाणीं नकाशांत कांहीं चुका झालेल्या असल्यास त्या दुरुस्त करतात.

आगबोट बांधण्याची जागा; घसरण, जोडण्या व पूल — नकाशाची तयारी झाल्यानंतर पुढें प्रत्यक्ष आगबोट बांधण्याच्या कामाला सुरुवात होते. या कामाच्या जागेला घसरण (स्लिप) असें म्हणतात. ही घसरण म्हणजे एक मुद्दाम बांधलेला उतार असतो. याचें समुद्रांतील टोंक पूर्ण ओहोटीच्या वेळीं पाण्यांत थोडेंसें बुडलेलें असतें व किनाऱ्यावरील टोंक पूर्ण भरतीच्या वेळीं पाण्याच्या बाहेर बरेंच लांबवर गेलेलें असतें. या घसरणीचा उतार अशा बेतानें दिलेला असतो कीं, वेळ येईल तेव्हां आगबोट यावरून सहज घसरत घसरत समुद्रांत जाईल. ही घसरण ज्या पायावर बांधलेली असते ते अतिशय मजबूत व पक्के असावे लागतात. कारण आगबोटीचें व माणसाचें ओझें यावर पडतें. हें पायाचें काम पाहिलें तर असें दिसेल कीं, हजारों टन वजनाचें कॉंक्रीट यांत वापरलें असेल. घसरण ही खालची बाजू होय. आतां उजवी व डावी बाजू पाहूं. या दोन्ही बाजू म्हणजे अवाढव्य पोलादी तुळया, दांडे वगैरेंची जोडणी होय. ही या प्रकारची जोडणी दोन्ही बाजूंस करावी लागते. साधारण आगबोट जितकी उंच बांधावयाची असेल त्याहून आणखी पुष्कळ उंचपर्यंत ही जोडणी उभारलेली असते. या जोडणीच्या माथ्यावर दोन्ही बाजूंस दुहेरी रूळ बसविलेले असतात. या रुळावरून मोठमोठे लोखंडी क्रेन (डिंगऱ्या) ठेवलेले असतात व यामुळें जड सामान बाहेरून उचलून आंत जागच्या जागीं आणून बसविण्यास सोपें पडतें. दोन्ही बाजूंच्या दोन जोडण्यांच्यामध्यें आडवा असा आणखी एक पूल असतो, कधीं अधिकहि असतात. हे पूल एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत सरकवितां येतात व यांचा उपयोग अवजड सामान इकडून तिकडे नेऊन जागच्या जागीं ठेवण्यास होतो. या पुलावर क्रेन असतात. आगबोट बांधण्याच्या म्हणजे प्रत्यक्ष जोडण्याच्या जागेची ही व्यवस्था आहे. ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष सामान तयार होतें त्या ठिकाणीं हजारों यंत्रें व माणसें राबत असतात.

कील उर्फ बूड व सांगाडा उभारण — घर बांधतांना ज्याप्रमाणें पहिल्यानें पाया बांधतात त्याप्रमाणें आगबोटीचा पहिल्यानें मध्यभाग तयार करतात. याला कील असें म्हणतात. यामध्यें निरनिराळ्या जाती आहेत. परंतु अलीकडील उत्तम ठरलेली व मोठमोठ्या आगबोटींना योजिलेली कीलची रचना 'सपाटबुडी' ही आहे. म्हणजे आगबोट जर मधोमध कापून तिचे दोन तुकडे केले तर पाण्यांत बुडलेला भाग इंग्रजी यू अक्षरासारखा दिसेल. हा कील म्हणजे पाण्यांत राहणारा आगबोटीचा खालचा भाग होय. याला मग बाजूच्या चौकटी जोडतात. आगबोटीचें एकंदर पोलादी नाटाचें काम पाहिलें तर असें दिसतें कीं पुष्कळ नाटा आडवे उभे जोड देऊन, एकमेकींना बांधलेल्या आहेत. घर बांधण्यापूर्वी लाकडाची जोडणी ज्याप्रमाणें ३।४ मजल्यापर्यंत बांधीत जातात व मग मधल्या भिंती, पडद्या वगैरे करतात, त्याचप्रमाणें आगबोटीची जोडणी अथवा सांगाडा आधीं तयार करून घेतात व मग त्याला मोठमोठे पत्रे जोडतात.

दुहेरी बुडाचा फायदा — पूर्वी बुडाला व बाजूंना एकेरी पत्रे वापरीत असत. परंतु अलीकडे दुहेरी पत्रे लावणें फायदेशीर ठरलें आहे. ही गोष्ट ग्रेट ईस्टर्न नांवाच्या आगबोटींत अनुभवास आली. ही आगबोट ६९२ फूट लांब आहे. एका प्रवासांत खडकावर घासून हिच्या बुडाला १०० फूट लांब भगदाड पडलें, परंतु दुहेरी बूड असल्यामुळें पहिले पत्रे जरी फाटून गेले तरी त्याच्या आंतील पत्रे शाबूत राहिल्यामुळें ही आगबोट सुरक्षित गेली. हा अनुभव आल्यामुळें नवीन आगबोटी दुहेरी बुडाच्या बांधण्याची रीत निघाली आहे व पूर्वी बांधलेल्या आगबोटींना (खर्चाकडे न पाहतां) दुहेरी बूड लावण्यांत येत आहे. व्हाईट स्टार कंपनीची टिटॅनिक आगबोट बर्फाला लागून बुडाल्याची हकीकत सर्वांना माहीत आहेच. यानंतर टिटॅनिकच्या सारखीच दुसरी आगबोट ऑलिंपिक होती, तिला अडीच लक्ष पौंड खर्च करून व्हाईट स्टार कंपनीनें दुहेरी बूड बसवून घेतलें. मॉरेटानिया नांवाच्या आगबोटीला दुहेरी बूड आहे इतकेंच नाहीं तर पाण्यांत बुडणारा जितका भाग आहे तितका सर्व दुहेरी पत्र्याचा आहे.

लोखंडी नाटांचा सांगाडा व त्याला जोडावयाचे पत्रे यांना भोकें आधींच पाडलेलीं असतात. या भोकांची मोजदाद करणें कठिण आहे. सर्व भोकांत रिव्हेट घालून ती यांत्रिक हातोड्यांनीं फुलवून घट्ट करतात. हे यांत्रिक हातोडे दाबलेल्या हवेनें किंवा पाण्यानें चालतात.

पुढचें आणि मागचें टोंक — आगबोटीचें पुढचें टोंक व मागचें टोंक यांत फार अंतर आहे. पुढचें टोंक उंच असून त्याचा पुढील भाग अगदीं निमुळता झालेला असतो. आगबोटीची रुंदी जरी कितीहि असली तरी सर्व आगबोटींचें पुढचें टोंक अगदीं निमुळतें म्हणजे पाचरीसारखें असावें लागतें. हें टोंक पाण्यांत घुसतें. टोंक जर रुंद किंवा चपटें असतें तर पाण्याचा अडथळा फार झाला असता व आगबोटीला गति आली नसती. पुढच्या लाटीनें

पाणी आत येऊं नये म्हणून हें टोंक उंच करून जसजसें मागें यावें तसतशी उंची कमी केलेली असते.

मागचें टोंक फार निराळें असतें. याला निराळ्या प्रकारचें काम करावयाचें असतें. याच्या खालच्या बाजूस पंखा फिरत असून शाफ्टीचे गतीमध्यें रूपांतर होत असतें. या टोंकावर पाहिल्यानें सर्व जोर येतो. आगबोट वळविण्याचें साधन जें सुकाणूं तें या टोंकास लावलेलें असतें. म्हणून आगबोट चालतांना पाण्याचा जोर या सुकाणूवर व त्यावरून मागच्या टोंकावर आपोआप येतो. म्हणून हें टोंक करतांना तें अतिशय काळजी-पूर्वक व बळकट करावें लागतें. वर सांगितलेलें पंख्याच्या मागचें आवरण याच भागांत असतें. त्यावर फार जोर असतो. एकंदरींत पुढच्या टोंकाच्या मानानें मागचें टोंक फार बळकट करावें लागतें. अलीकडे कांहीं आगबोटींना दोन पंखे लावतात यामुळें या टोंकाच्या रचनेंत आणखी फरक पडतो. हीं दोन टोंकें निराळीं तयार करून मग "कील"ला जोडतात. तसेंच टोंक तयार करण्याच्या आधीं त्याचा लाकडी नमुना तयार करतात. या नमुन्यावर निरनिराळीं अंतरें दाखविणाऱ्या रेघा आखून ठेवतात व त्यावरून मग मागचें टोंक तयार करतांना कांहीं चूक होत आहे कीं काय हें पाहून पुन्हा दुरुस्त करण्यास सोपें पडतें.

शाफ्टिंग, सुकाणूं व पंखा बसवून जहाज तरंगविणें — घराच्या रचनेंत ज्याप्रमाणें निरनिराळे मजले व खोल्या असतात तशा आगबोटींवर असतात. वर जो आधीं तयार केलेला पोलादी सांगाडा सांगितला त्या सांगाड्यामध्यें ठिकठिकाणीं लाकडाच्या नाड्या बसवून योजिलेली रचना होईल अशा मापाचीं भोकें आधींच पाडून ठेवलेलीं असतात. यामुळें एकदा कामास सुरवात झाल्यावर जोड कामाची उठावणी फार झपाट्यानें होते.

वर सांगितल्याप्रमाणें सांगाडा, धुड व बाजू तयार झाल्यावर मुख्य शाफ्टिंग आंत बसवून घेतात, नंतर पंखा व सुकाणूं बसवितात. इतर यंत्रें आधीं बसवितातच असें नाहीं. मुख्य इंजिन व बॉयलर बसविण्याच्या आधीं इतकें तयार झालेलें जहाज पाण्यांत सोडतात. पाण्यांत सोडण्याची तयारी करण्याच्या आधीं सर्व "घसरणीला" वंगण, चरबी वगैरे लावतात. यामुळें आधींच उतरत्या असलेल्या भागावर आगबोटीच्या बाजू सहज घसरूं लागतात. या वेळीं, बांधण्याच्या वेळीं आजूबाजूस दिलेले थिरावे व ताण काढून घेतात. पाण्याच्या दाबानें चालणाऱ्या यंत्रांनीं पहिल्यानें जोर लावून जहाजास सरकवितात. अगदीं पहिल्यानें सरकण्याची गति फारच थोडी असते; ती इतकी कीं डोळ्यांनीं दिसत देखील नाहीं. इतक्या मंदगतीनें आगबोट आरंभीं सरकत असते तरी वंगण लावून गुळगुळीत केलेल्या भागावर जसजशी ती आंत येते तसतशी ती जास्त जोरानें पुढें सरूं लागते. आगबोटीचें वजन फार असल्यामुळें गुरुत्वाकर्षणानें हा जोर झपाट्यानें वाढून आगबोट सरकून पाण्यांत जाते. हें काम करण्यासाठीं मुख्यतः भरतीची वेळ पाहतात. कारण तेव्हां फार लांबपर्यंत जावें लागत नाहीं.

इंजिनें व बॉयलर यांची स्थापना व उरलेल्या कामाची पूर्तता:—पाण्यांत तरंगूं लागल्यावर मग मासल्यांनीं बांधून दुसऱ्या ओढणाऱ्या आगबोटींनीं या आगबोटीस तिच्याकरितां ठरविलेल्या जागीं नेऊन ठेवितात. तेथें ओढून नेल्यावर मग इंजिनें व बायलर आंत सोडतात. कारण असें कीं, हे फार मोठमोठे डाग असल्यानें यांना आंत सोडावयास मोकळी जागा पुष्कळ लागते.

इंजिनें व बॉयलर आंत बसल्यावर मग बाकीच्या कामास सुरवात होते. हें काम म्हणजे सुतारकाम, दिवेबत्त्या, सामानसुमान, आफिसें, रहावयाच्या खोल्या वगैरे बांधणें हें होय. याकरितां लागणारें सर्व सामान आधींच आणून ठेवलेलें असतें. खिळे, बोल्ट वगैरे त्या त्या मापाचीं प्रमाणशीर असतात. कपाटें, टेबलें, खुर्च्या, दिवे, टांगावयाचे नक्षीचे ब्रॅकेट हे अगदीं मापाप्रमाणें असतात. ज्या जागेंत सामान बसवावयाचें असेल त्या जागेंत व सामानांत एका इंचाचाहि फरक पडत नाहीं. [ ले. दिवाकर यशवंत फाटक. ]

**आगबोट लागणें**, लक्षणें.—समुद्रामध्यें आगबोट हलूं लागली म्हणजे कांहीं माणसांना अशक्तपणा मळमळणें, वांति, चक्कर आदिकरून लक्षणें मुख्यत: होतात. आगबोटीची एकदां एक बाजू खालीं समुद्रांत जाणें नंतर तीच बाजू पुनः वर येणें. अशी एकसारखी हालचाल सुरू झाली म्हणजे मस्तकांत घेरेंच होऊन भोंवळ येणें व पोटांत ढवळून येऊन तोंडास मळमळ सुटून वांति होण्याची भीति वाटते, किंवा वांत्या होतातहि प्रथम वांतीमध्यें फक्त खाल्लेलें पडतें, नंतर पित्तमिश्रित पाणी पडूं लागतें जोरानें ओकाऱ्या आल्याच्या श्रमामुळें थोडें रक्तहि वांतीबरोबर पडतें. ज्या मानानें बोटीच्या वरखालीं होण्याच्या हालचालीचा जोर असेल त्या मानानें वांतीस चढउतार पडतो तरी पण मधून मधून वांती आपोआप थांबून रोग्यास अंमळ विश्रांति मिळते व त्यास अंमळ निद्राहि लागते. वांति होऊं लागली म्हणजे शरीरास फार ग्लानि येते; व म्हणून सर्वांग पांढरें फटफटीत व थंड घामानें डबडबलेलें, नाडी अशक्त व शरीरास व मनास पराकाष्ठेची ग्लानि व औदासिन्य अशीं लक्षणें होतात. अगोदरच इतर रोगामुळें शरीर खंगलेलें नसेल तर या दुखण्यापासून कोणाहि उतारू सहसा दगावत नाहीं.

कारणें — अशीं लक्षणें कां व्हावीं यांचीं कारणें अनेक आहेत. आपलें शरीर तोलून धरण्याच्या कामीं भोंवतालच्या पदार्थांवर भिस्त ठेवण्याची आपणांस उपजत संवय झालेली असते, व ती संवय आगबोट हलते तेव्हां आपणांस नडते व माणसास आपला झोंक जाईल असें प्रतिक्षणीं वाटतें. या भीतीमुळें मेंदूवर व मज्जास्थानावर एकसारखे भीतीचे आघात होत राहून शरीरतोलनाचें कार्य आपोआप घड-

ण्यास त्रास पडतो. रुधिराभिसरणात फार चलबिचल उडून रक्तवाहिन्यातील रक्ताच्या दाबात फरक पडतो व म्हणून वांति, मळमळ हीं चिन्हें होतात. हालचालीमुळें उदरांतील पोट वगैरे इंद्रियें बरीच हलतात व तसेंच नेहमींप्रमाणें डोळ्याचा उपयोग शरीरतोलनाच्या कामीं निरुपयोगी झाल्यामुळें या असहाय स्थितींत आणखी भर पडते. बाकी अंधार असला किंवा उतारु अंध असला तरी देखील त्यास आगबोट लागते यावरून दृष्टीचो शरीरतोलनाच्या कामीं मदत गौण असली पाहिजे. रोग्याच्या मनात जहाज लागण्याची अगोदरच दहशत असल्यास बोट हलूं लागताक्षणीं त्यास वांति होते. आगबोट मऊ मऊ कापसात बुडाल्याप्रमाणें एकदा बरीच खोल खालीं व पुनः बरीच उंच वर होत असल्याची मनास व शरीरास स्पष्ट जाणीव, आगबोटींवर येत असलेले नानाप्रकारचे उग्र वास व घाणी यामुळें माणसाचें डोकें फिरून त्यास वांति होते.

रो ग चि कि त्सा.—पुष्कळ लोक आगबोट न लागण्यास अमुक उपाय अगर औषध चांगलें आहे असें म्हणतात पण तें खरें नाहीं. बोट याप्रमाणें जोपर्यंत वर खालीं हलूं न देण्याची युक्ति निघाली नाहीं तोंपर्यंत उतारूंस थोडी फार वांति निसर्गनियमानुसार होणें अपरिहार्य असतें. लॉवर्तीं कोचें व खुर्च्या आरामात पडून रहाण्यासाठीं टांगतात, पण त्यापासूनहि फारसा उपयोग नसतो. जहाज मोठें असून त्याच्या बुडाशीं पुष्कळ वजन असेल तर आगबोट कमी हालते परंतु तशा बोटींतहि वांति होत नाहीं असें मात्र नाहीं. या रोगावर ठरलेलीं औषधें अगदीं रामबाण असतात असें नाहीं. एखाद्या औषधानें एखाद्या रोग्यास गुण वाटला तर त्याच औषधानें दुसऱ्या उतारूचीहि वांति थांबते असा नियम नसतो. पित्तशामक औषधें ( पोटॅशियम ब्रोमाइड, क्लोरल हैड्रेट, ब्रोमुराल ) हीं पुष्कळांना उपयोगी पडतात कोणी डॉक्टर याच्या उलट म्हणतात कीं जहाजावर पाय ठेवण्यापूर्वी दोन तास तरी निदान अगोदर कडक कॉफी एक लहान पेलाभर घ्यावी. त्यामुळें वांती झाली तरी ती इतकी भयंकर नसते, व ती अजीबात न होण्याचाहि संभव असतो. आगबोट चालू होताक्षणीं किंवा ती चालू होण्याच्या अगोदर सुद्धा डोळे मिटून उंच उसें न घेता पडून अगर निजून रहावें. याप्रमाणें थंडीपाऊस नसल्यास कोठडींत निजून रहाण्यापेक्षा डेकवर निजणें चांगलें. असें केल्यानें बहुधा आगबोट लागण्याचें टळतें. डेकवर पाय मात्र पांघरुणात चांगले गुरफटून घ्यावे. पण कांहीं जणांना कोठडींतच पायाशीं ऊन पाण्याची बाटली ठेवून बरें वाटतें; कारण त्यानें झोंप सहज लागते, व त्या वेळेपुरती तरी निदान वांतीची किंवा मळमळीची धास्ती नसते वांति अखेर झालीच तर ती बरीच झाल्यावर ग्लानि येऊं नये म्हणून वेळेवरच अरारूटची पातळ लापशी किंवा तसलेच कांहीं हलके व पातळ पदार्थ पोटात जाऊं द्यावेत. सोडावाटर, लेमोनेड, अशीं थंड व फसफसणारीं पेयें घेतल्यानें किंवा बर्फ, क्लोरोफार्म, अफू, हायड्रोसायनिक ॲसिड घेतल्यानें वांतीचें शमन होतें मात्र हीं शेवटलीं औषधें विषारी आहेत म्हणून तीं डॉक्टराकडून घ्यावींत. आल्कोहोल ( दारू ) पिणें बहुधा निरुपयोगीच असते, कारण त्यानें उलट वांति वाढून ग्लानि फार येते. कांहीं रोग्याच्या पाठीच्या कण्यावर बर्फाची लावोडी पिशवी ठेऊन त्यांना बरें वाटतें. आमिल नायट्रेट व कोकेन हीं औषधेंहि कधीं गुणावह होतात व कधीं होत नाहींत.

**आगरकर** ( १८५६-१८९५ )—महाराष्ट्रीय लेखक व समाजसुधारक गोपाळ गणेश आगरकर याचा जन्म सन १८५६ सालीं झाला. गृहस्थिति अगदीं गरिबीची असल्यामुळें आपल्या आप्ताच्या आश्रयानेंच यांनीं रत्नागिरीस व वऱ्हाडात विद्याभ्यास केला सन १८७५ सालीं म्याट्रिक्युलेशन परीक्षा पास होऊन हे डेक्कन कॉलेजात आले. त्याच्या पुढील परीक्षा सारख्या उतरत गेल्या व सन १८७९ सालीं त्यास दक्षिणाफेलोची जागा मिळाली. या सालच्या सप्टेंबर महिन्यातच स्वतंत्र शाळा आणि कॉलेज काढण्याचा विचार ठरविण्यात आला. पण या सालीं याची एम. ए. ची परीक्षा न उतरल्यामुळें आणखी एक वर्ष कॉलेजात राहून सन १८८० सालीं एम. ए.ची परीक्षा पास झाल्यावर हे "न्यू इंग्लिश स्कूल"च्या मंडळींत येऊन काम करूं लागले. शाळेंत व कॉलेजात असताच यास मराठींत लिहिण्याचा नाद असे, व डेक्कन कॉलेज संमेलनाकडून एका मराठी निबंधाबद्दल यास बक्षीसहि मिळालें होतें. यांच्या मनाच्या प्रवृत्तीस अनुकूल असे इतर समवृत्तीच्या स्नेह्यांचें प्रोत्साहन मिळाल्यावर त्यांनीं मोठ्या हौसेनें व आनंदानें विद्याप्रसाराच्या कामीं आपलें आयुष्य खर्च करण्याचा निश्चय केला. तो त्यांचा निश्चय शेवटपर्यंत ढळला नाहीं. कॉलेजात असतांना याचा विषय इतिहास हा होता. त्याच्या अध्ययनानें ह्याच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति उत्तरोत्तर दृढ होत गेली. न्यू इंग्लिश स्कूलमध्यें आल्यानंतर त्याच सालीं केसरी व मराठा हीं दोन पत्रें काढण्याचें ठरून त्यांपैकीं केसरीच्या संपादकाचें काम याजकडे देण्यांत आलें. आगरकरांचा व त्यांच्या मित्रांचा मुख्य उद्दिष्ट कार्याखेरीज इतर बाबतींत पहिल्यापासूनच थोडा मतभेद होता; परंतु १८८८ सालापर्यंत तो विशेष रीतीनें व्यक्त करण्याची कोणासहि आवश्यकता दिसली नाहीं. या सालच्या सुमारास डेक्कन एज्युकेशन सोसायटींत व अन्यत्र ज्या कांहीं गोष्टी घडून आल्या त्यामुळें केसरी आणि सुधारक अशीं दोन पत्रें करावीं लागलीं. "कोणताहि हातीं घेतलेला विषय मार्मिक आणि जोरदार रीतीनें प्रतिपादन करण्याची याची शैली त्यांच्या लेखावरून चांगली व्यक्त होते. केसरीस सध्याची स्थिति येण्यास गोपाळराव हे पुष्कळ अंशीं कारणीभूत झाले होते. इतकेंच नव्हे तर केसरीचे संपादक या नात्यानें त्याचा व महाराष्ट्रातील लोकांचा कांहीं वर्षें परिचय होऊन

तो संबंध कोल्हापूर प्रकरणानें अधिक दृढ झालेला होता. देशी वर्तमानपत्रांत जर कांहीं महत्त्व आलें असलें तर तें वन्याच अंशीं आगरकर यांच्या बुद्धिमत्तेचें व मार्मिक लेखाचें फळ होय," असे उद्गार केसरीनें यांच्या मृत्युलेखांत काढले आहेत. शाळा व कॉलेज यांचें काम करून राहिलेला वेळ पंधरा वर्षेपर्यंत, त्यापासून म्हणण्यासारखी कांहीं किफायत नसतां, त्यांनीं वर्तमानपत्रें चालविण्यांत घालवेला. यावरून मराठी भाषेच्या द्वारें आपले विचार लोकांपुढें मांडून त्यास एक प्रकारचें शिक्षण देण्याची आगरकरांची उत्कृष्ट इच्छा व हौस पूर्णपणें व्यक्त होते. त्यास दम्याची विकृति पहिल्यापासूनच होती; त्यामुळें त्यांच्या शरीराची काठी मजबूत असतांहि शेवटचीं १०।१२ वर्षे ते सतत थोडेबहुत आजारी होते. त्यांनीं औषधोपचार अतिशय केले पण त्यापासून कांहीं गुण आला नाहीं; व शेवटीं एक दोन वर्षे तर त्यांची प्रकृति पुष्कळ थकली होती शेवटीं शेवटीं त्यांच्या यकृतासहि विकार होऊन त्यामुळें पायास सूज आली व अखेरीस उदर होऊन त्यास १७ जून १८९५ रोजीं सकाळीं देवाज्ञा झाली.

'सुधारक' पत्रातील लेखाखेरीज आगरकरांनीं लिहिलेलीं दोन तीन पुस्तकें आहेत 'आमचे डोंगरांतील १०१ दिवस.' यांत डोंगरी तुरुंगांतील अनुभव व विचार प्रकट केले आहेत. शेक्सपियरच्या हॅमलेट नाटकाचें भाषांतर 'विकारविलसित'नावाचें केलेलें आहे. त्या पुस्तकाच्या योग्यतेसंबंधानें बराच मतभेद होईल हॅमलेटचें पात्रच रंगवितांना भाषांतरकारानें अनभिज्ञता दाखविली आहे. पुष्कळांना अपरिचित असणारें त्यांचें आणखी एक पुस्तक व्याकरणांतील वाक्यमीमांसेसंबंधीं आहे " केसरींतील निवडक निबंध " या ग्रंथद्वयात आगरकरांनीं लिहिलेले बरेच लेख आहेत. ते त्यांनीं केसरीचे संपादक असतांना लिहिलें. सुधारकांतले त्यांचे लेखहि प्रसिद्ध झालेले आहेत महाराष्ट्रीय मध्यम वर्गाचा आयुष्यक्रम आर्थिक कारणांनीं बदलत चालला तेव्हां नवीन परिस्थित्यनुरूप अशा आयुष्यक्रमाचें समर्थन यांनीं केलें यामुळें " सुधारक " नावाचा वर्ग यांस आपला तत्त्ववेत्ता समजत असे.

[ संदर्भ ग्रंथ—परचुरे—आगरकर. व. मा. नाईक—आगरकर. मनोरंजन—आगरकर अंक, पु. २२ वें. केसरी १८।६।१८९५ आगरकरांचे निबंध केसरींतील निवडक निबंध इत्यादि ]

**आगरवाल.**-मुंबई, मद्रास वगैरे सर्व प्रांतांतून यांची वसति जास्त आढळते विशेषत. पंजाबांत व संयुक्तप्रांतांत आगरवाल लोकांची वसति जास्त आहे. १९११ च्या खानेसुमारींत यांची संख्या १०,१९,६९८ (पैकीं ५,४७, ४१२पुरुष व ४,७२,२८६ स्त्रिया) भरली यांत हिंदू, शीख, जैन, बौद्ध व मुसुल्मानधर्मी आहेत. हिंदूंची संख्या सर्वांत जास्त (९,११,७२२)असून त्याखालोखाल जैन आगरवाल भरतात.

**चालीरीती**—दसऱ्याच्यां दिवशीं हे घोड्याची व शस्त्रांची पूजा करितात. भाटिया मारवाड्यांच्याप्रमाणें हे दिवाळींत मषीपूजन न करितां दसऱ्याला करितात; यावरून कांहींचें असें म्हणणें पडतें की यांचे पूर्वज स्वतःस क्षत्रिय समजत असावेत

बहुतेक हिंदू आगरवाल विष्णूची उपासना करितात. शिवाची व शिवशक्तीची उपासना करणारे कांहीं आहेत; तरी पण यांच्यांत पशुहत्या व मद्यमांसभक्षण नाहींच म्हटल्यास चालेल. जैन आगरवालांविषयीं तर विचार करावयासच नको. कारण ते पूर्ण अहिंसामत पाळणारे तेव्हां या समान चालीरीतींमुळे जैन व शैववैष्णव आगरवालांमध्यें शरीरसंबंध होण्यास हरकत येत नाहीं जेव्हां नवरा व बायको एका धर्माचीं नसतात तेव्हां बहुधा बायको नवऱ्याचा धर्म विधिपूर्वक स्वीकारते व माहेरीं असतांना वेगळे करून रातें यांची ज्ञातिदेवता लक्ष्मी असून, पिंपळाच्या झाडालाहि फार मानण्यांत येतें. बायका नागाचीहि पूजा करितात. इतर हिंदूंप्रमाणें श्राद्धपक्ष करण्याची यांच्यांत चाल आहे.

**आसाममधील आगरवाल**— आसाम प्रांतात या जातीची लोकसंख्या ५२६० (सन १९११) आहे. उत्तर हिंदुस्थानांतील या जातीचे लोक श्रीमंत व्यापारी असून मनूनें केलेल्या वैश्यवर्णांतील आपण आहों असें ते म्हणतात. 'कया' या व्यापक शब्दानें या जातीचे सर्व लोक दर्शविले जातात

**पुणें जिल्ह्यातील आगरवाल.**—या जातीची वसति पुणें जिल्ह्यातील हवेली, मावळ, शिरूर, पुरंदर व खुद्द पुणें शहर इतक्या ठिकाणीं आहे. ते स्वतांस आगरसेन नांवाच्या ऋषीचे वंशज मानतात. या ऋषीच्या सतरा मुलांनी शेषाच्या सतरा मुली ज्या नागकन्या त्यांच्याबरोबर लग्नें झालीं. त्यांच्यांत सतरा गोत्रें आहेत, त्यांपैकीं बासल, एरण, कासल, गार्ग, गोएल, मंगल व मितल हीं मुख्य आहेत. यांच्यांत सगोत्रविवाह होत नाहींत. ते मूळ आग्रा येथून आले व मारवाडांत कांहीं दिवस राहून सुमारें दोंडशें वर्षांपूर्वी पुण्यास आले. त्यांच्यात सच्चे आगरवाले, दस्से व विसे आगरवाले आणि मराठे आगरवाले हे पोटभेद आहेत. मराठे आगरवाले हीं सच्च्या आगरवाल्यांची अनौरस संतति होय. सच्चे, दस्से व विसे आगरवाले यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. पण त्यांचा धार्मिक आचार व चालीरीती यांत फारसा फरक नाहीं त्यांच्यांत गणपतलाल, गिरधारीलाल, कन्हाईलाल, नारायणदास, विठ्ठलदास इत्यादि पुरुषनामें, व भागीरथी, गंगा, जमना, लक्ष्मी, राई वगैरे स्त्रीनामें सामान्यतः आढळतात. ते मारवाडी वाण्यांसारखे दिसतात व मध्यम बांध्याचे व नीटस असतात. यांच्या बायका देखण्या असतात. ते घरांत मारवाडी भाषा — पण

बहुतेक हिंदुस्थानी व गुजराथी मिळून बनलेली भाषा बोलतात. ते पक्के शाकाहारी असून कांदे, लसूण, गाजर, व मसूर हे जिन्नस ते खात नाहींत. ते दक्षिणी ब्राह्मणाप्रमाणें पोशाख करतात व जानवें किंवा तुळशीची माळ गळ्यांत घालतात. ते शेंडी, कल्ले व वर्धा कर्धा दाढीहि ठेवतात. बायका चोळ्या, व जोडे घालतात, व डोक्यापासून पायापर्यंत शुभ्र वस्त्र अंगाभोंवतीं धरतात. त्या डोक्यांत बोर, कानांत झुबें, नाकांत नथ, आणि मंगळसूत्र, बाजूबंद, बिचवे, कडीं वगैरे दागिने घालतात. पुरुष हाताच्या बोटांत अंगठ्या सेरीज दुसरे कांहीं दागिने घालीत नाहींत. त्यांच्या जेवणांत तांदूळ, डाळी, भाजीपाला, गहूं, लोणी, मसाला वगैरे जिन्नस असतात. ते मेहनती, गरीब, व्यवस्थित व कंजूष असतात. हे लोक उद्यमी, व्यापारी, वाणी, सावकार, धान्य व कापडाचे दुकानदार, हलवाई, शेतकरी व जमीनदार असतात. हे धार्मिक वृत्तीचे असून मुख्यत बालाजीचे उपासक आहेत. त्यांचें पौरोहित्य मारवाडी ब्राह्मण व त्यांच्या अभावीं दशस्थ ब्राह्मण करतात. ते पंढरपूर, मथुरा, नाशिक, काशीवृंदावन व रामेश्वर येथील यात्रा करतात. ते एकादशी, महाशिवरात्र, रामनवमी, गोकुळअष्टमी, वगैरे उपोषणें करतात, आणि होळी, दसरा, दिवाळी वगैरे सण पाळतात. रामानंद किंवा वल्लभाचार्य पंथाच्या लोकांना गुरु करून त्यांना ते मोठा मान देतात. मूल जन्माला आल्यावर पांचव्या दिवशीं ते सटवाईची पूजा करतात. मूल महिन्याचें झाल्यावर त्याचें नांव ठेवतात. मुलगा आठनऊ वर्षांचा झाला म्हणजे त्याला गुरुकडे नेतात व गुरु त्याच्या गळ्यांत तुळशीची माळ बांधतो व कानांत मंत्र सांगतो. मुलींचीं दहा ते बारा वर्षांच्या दरम्यान व मुलांचीं पंधरा ते वीस वर्षांच्या दरम्यान लग्नें होतात. या जातींत विधवाविवाहाला मोकळीक नाहीं. ते मृतांना जाळतात.

[संदर्भग्रंथ—रिस्ले-ट्राइब्स अँड कास्टस ऑफ बंगाल. क्रूक-ट्राइब्स अँड कास्टस ऑफ नॉर्थ वेस्टर्न प्रॉव्हिन्सेस अँड औध. ग्रौस—मथुरा. ए रि ए (बनिया) बॉं गॅ व्हॉ १८, भाग १ सेन्सस ऑफ इंडिया १९११ ]

आगरी—यांस आगळे कुणबी असेंहि म्हणतात. हे अजून मराठ्यांत मिसळलेले नाहींत. हे लोक ठाणें जिल्हा कुलाबाजिल्हा व जंजिरें संस्थान यांतून आढळतात. यांची एकंदर लोकसंख्या १९११ सालीं २३३५५२ होती. पैकीं ठाणें जिल्ह्यांत ११५४८ व कुलाबा जिल्ह्यांत ११६७११ असा आगरी वस्ती होती. १९११ सालच्या खानेसुमारींत स्वत काम करणारे असे १२५४८ पुरुष व ८७००० स्त्रिया यांच्या धंद्याची वर्गवारी कांहींशी होती. तींत असें आढळून आलें की, ४७८९४ पुरुष व २०४८१ स्त्रिया शेतकी करितात. केवळ ६१ पुरुष व ६२ बायका, भिकारी, गुन्हेगार किंवा अनीतीनें धंदे करणारे सांपडले.

शुद्ध आगरी, दास आगरी व वरप आगरी असे या जातीचे तीन पोटविभाग आढळतात.

शुद्ध आगरी.—या जातीच्या मिठ आगरी, जस आगरी, ढोल आगरी अशा तीन शाखा आहेत. यांचा परस्परांत रोटीबेटी व्यवहार चालतो. हे ठेंगणे व काळे असून कष्टाळू असतात. यांचा पेहेराव म्हणजे कमरेभोंवतीं गुंडाळलेलें आखूड धोतर, अंगरखा, कुणबी पद्धतीचें पागोटें असा असतो. हे कट्टे दारूबाज असतात. यांचा नित्याहार तांदूळ, मासे वगैरे असतो. यांचा व्यवसाय, शेतकी, मीठ तयार करणें वगैरे असून हे व्यवहारांत मितव्ययी व चोख असतात. सर्व हिंदू देवता यांना मान्य आहेत. त्यांच्या आवडीचें दैवत म्हणजे खंडोबा व इतर स्थानिक देव होत. मद्यपी असल्यामुळे हे प्राय द्रव्यहीन असतात.

दास आगरी.—यांच्या उत्पत्तीसंबंधीं पुढें दिलेली दंतकथा नमूद करण्यासारखी आहे. एका आगरी स्त्रीचीं मुलें वांचत नव्हतीं. तेव्हां तिनें महाराच्या देवाला असा नवस केला कीं, माझें मूल जर जगेल तर मी डोक्यावर गाईचें हाड व कानावर लोंबणारें फूल खोंवून महारवाड्यांत प्रवेश करीन. नवसानंतर तिचें मूल जगलें व तिनें आपला नवस फेडला. या धर्मबाह्य कृत्याबद्दल तिला जातिबहिष्कृत केलें. दास आगरी हे तिचे वंशज आहेत. यांचा शुद्ध आगऱ्यांशीं रोटीबेटीव्यवहार नाहीं.

वरप आगरी.—हे एके काळीं ख्रिस्ती होते असें दाखविणारे पुरावे यांत शिल्लक आहेत. कारण यांच्यात गोमीझ, सोझ, फर्नांडिस वगैरे आडनांवें आढळतात. रामचंद्र बाबा जोशी, भाई मुकुंद जोशी व विठ्ठल हरि नाईक वैद्य या तिघा माध्यंदिन ब्राह्मणाच्या साहाय्यानें त्यांना पावन करून पुन्हां जातींत घेतलें असें म्हणतात (इ. स. १८२०–२८). यावरून यांना नव मराठे असें म्हणतात. शुद्ध आगरी व दास आगरी यांना हलके मानतात. यांचा धर्म व आचारविचार इतर आगऱ्यांप्रमाणेंच आहेत.

आगरी लोकांची विशेष मद्यासक्ति व त्यांची हलक्या सलक्या देवतांची उपासना हीं पाहून आर्य व अनार्य यांच्या विपर्यासकोच्या कल्पना बाळगणारे खानेसुमारीकार त्यांना अनार्य समजतात. मॅकिनटॉश व विल्सन त्यांना कोळी समजतात (ट्रॅन्झ्. बॉंबे जिऑ. सोसायटी १ १९४).

आगरी जातीचा इतिहास.—हा आगरी मंडळी येणेंप्रमाणें सांगतात—सुमारें ६०० वर्षांपूर्वी अलीबाग तालुक्यांत तीन लहान लहान राज्यें होतीं. एक चौल, दुसरें आवास सासवणें येथ व तिसरें सागरगड येथें. चौल व आवास येथें हिंदू राज्यें होतीं व सागरगडावर दिल्लीच्या बादशहाच्या वतीनें मुसुलमान सरदार रहात असून तो दोन्ही हिंदू राज्यांकडून करभार वसूल करून तो दिल्लीस पाठवी. पुढें सागरगडावरील मुसुलमान सरदार बलाढ्य होऊन दिल्लीस करभार पाठविनासा झाला व बाद-

शहाचें हुकूम अमान्य करूं लागला. म्हणून दिल्लीच्या बादशहानें एक सरदार त्याच्या पारिपत्याकरितां पाठविला, परंतु त्यास यश न येतां तो दिल्लीस परत गेला. नंतर बादशहानें दुसरा सरदार पाठविण्याचें ठरवून मुंगीपैठणच्या मांडलिक राजा बिंब यास पत्र पाठवून दिल्लीहून येणाऱ्या सरदारास मदत करण्याविषयीं विनंति केली. राजा बिंब यानें ती सरकारची विनंति मान्य करून आपलें सर्व सैन्य घेऊन ठरल्याप्रमाणें दिल्लीहून येणाऱ्या मुसुलमान सरदारास टाण्याजवळ येऊन मिळाला. मुसुलमान सरदारानें पश्चिमेच्या बाजूनें जाऊन गडावर स्वारी करावी, व लढाईस सुरवात झाली म्हणजे राजानें आपले लोक घेऊन पूर्वेकडील बाजूनें गड चढून हल्ला करावा असें ठरलें होतें. त्याप्रमाणें दोघेहि चाल करून गेले. पश्चिमेच्या बाजूस लढाईस सुरवात झाल्या-बरोबर राजा बिंबानें आपल्या सर्व लोकांसह गड चढून छापा घातला; व गडावरील सरदारांचा मोड करून त्यास पकडून दिल्लीहून आलेल्या सरदाराबरोबर त्यास दिल्लीस पाठवून दिलें व आपण गडावर राहून राज्यकारभार पाहूं लागला. कांहीं दिवसांनीं त्यानें चौल व आगास सासवणें येथील राज्यें जिंकलीं. आसपास कोणी शत्रू नसल्या-मुळें राजानें परत जाण्याचा बेत रहित करून तेथेंच कायमचें राज्य स्थापण्याचें ठरविलें. त्याच्या सैन्याचाहि हा बेत पसंत पडून तें तेथेंच राहिलें. शांततेच्या वेळीं इतक्या मोठ्या सैन्याची जरूर नसल्यामुळें राजानें पुरेसे लोक पदरीं ठेवून बाकीच्यांना मिठागरें बांधून दिलीं व जरूर त्या ठिकाणीं गावठाणें घालून तेथें वसाहत करण्यास सांगितलें. मिठागराचें उत्पन्न चांगलें व किफायतशीर असल्यामुळें मुंगीपैठणास जाण्यापेक्षां येथेंच राहणें या लोकांस अधिक आवडलें. राजा बिंबानंतरहि त्याचे वंशज हें राज्य पुष्कळ वर्षें सुरळीतपणें चालवीत होते. या इतिहासामध्यें बिंब हा बादशहाच्या विनंतीवरून त्याच्या मदतीसाठीं इकडे आला हें विधान संशयास्पद आहे.

पुढें हळूहळू मिठागरें व वसाहती वाढत जाऊन आगरी लोकांची वसति कुलाबा जिल्ह्यांतील अलीबाग, पेण, पनवेल, कर्जत, रोहें व माणगांव तालुक्याचा थोडा भाग येथें व जंजिरा व ठाणें जिल्ह्याचा बराच भाग या ठिकाणीं पसरत गेली. जेथें खारटपणाचा भाग आहे तेथें व त्याच्या लगतच्या प्रदेशांतच फक्त आगरी लोकांची वसति पसरलेली आहे, याचें कारण असें दिसतें कीं मिठागराचा धंदा चांगला व किफायतशीर वाटल्यामुळें राजा बिंबानें मिठागरें बांधून दिलीं तीं त्याच्या बरोबर असलेल्या लोकांसच पिकविण्याचा हक्क दिला असावा व त्यामुळें दुसऱ्या लोकांचा या धंद्यांत शिरकाव झाला नसावा असें दिसतें. याप्रमाणें हा धंदा आगरी जातींत पिढ्यानुपिढ्या चालत आलेला आहे असें हल्लींच्या स्थिती-वरूनहि स्पष्ट दिसत आहे. नवीन आलेल्या लोकांचा मुख्य धंदा आगराचा होऊन राहिल्यामुळें व अपरिचितपणामुळें त्यांच्या जातीचें नांव मूळच्या लोकांस माहीत नसल्यामुळें मूळचे लोक या नवीन लोकांस आगरी, या नांवानें संबोधूं लागले व पुढें हेंच नांव त्या विशिष्ट लोकांच्या जातीचें नांव म्हणून प्रचारांत आलेलें दिसतें. अनेक जातींचीं नांवें धंद्यावरून पडलेलीं आहेत या तत्त्वास अनुसरून या जातीचा आगर पिकविण्याचा मुख्य धंदा असल्यामुळें या जातीस आगरी हें नांव पडलें असें दिसतें.

ज्ञा ती च्या आ त्मो न्न ती सा ठीं प्र य त्न — हा रकान्या खालील पुढाऱ्यांच्या प्रयत्नावरून लक्षांत येईल. १ कै. गणा-देव हिराजी म्हात्रे जे. पी. राहणार मुंबई हे ज्ञातींतील पहिले जे. पी. होत. हिंदुमुसलमानांच्या दंग्याच्या वेळीं यांनी आपल्या ज्ञातीतर्फे चांगली कामगिरी केली. २ कै. रामजी बाळाजी म्हात्रे रा. मुंबई ज्ञातींतील पहिले मोठे कंत्राटदार. मुंबई येथील डाक बंदर येथें यांनी स्वतःच्या खर्चानें ज्ञातीसाठीं स्मशान-भूमि व धर्मशाळा बांधलेली आहे. ३. श्रीयुत–तुकाराम धर्माजी मोकल, राहणार हाशिवरें तालुका अलीबाग जि. कुलाबा; यांचें घराणें पुरातन असून यांनीं मद्यपाननिषेधासाठीं व ज्ञातिबांधवांची सांपत्तिक स्थिति सुधारण्याविषयीं बरेच प्रयत्न केले व करीत आहेत. ४ कै. बाबाजी नारायण पाटील मुंबई, ज्ञातींतील दुसरे कंत्राटदार, मुंबई येथील आगरी पाड्यांत संस्थापक देऊळ बांधून त्यांत त्यांनीं मोफत शाळा चालू केली आहे. ५ श्रीयुत विठोबा रावजी पाटील राहणार शहाबाज, तालुका अलीबाग, जि. कुलाबा, हे ज्ञातींतील प्रमुख व्यापारी असून चालू असलेल्या ज्ञातिहितकारक चळवळीचे चालक व आधारस्तंभ आहेत. ६ कै. हरी भोमाजी पाटील, राहणार शहाबाज हे आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षापासून ज्ञातिहितकारक चळवळींत पडूं लागले. ज्ञातिपरिषदेचे उत्पादक व कार्यकारी चिटणीस. ७. श्रीयुत लक्ष्मण गोविंद पाटील राहणार वाघ्रण, तालुका अलीबाग, जि. कुलाबा, हे आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षापासून ज्ञातिहितकारक चळवळींत आहेत. मुंबई येथील आगरी विद्यार्थी—आश्रमाचे संस्थापक. ८ श्री बाळू हरी पाटील, राहणार वाघ्रण, तालुका अलीबाग, जि. कुलाबा, आगरी अनाथ विद्यार्थी-फंडाचे उत्पादक. ९ कै. लक्ष्मण तुकाराम पाटील, राहणार करंजे, पेटा उरण, जि. कुलाबा. १० श्रीयुत–महादेव रामजी घरत, राहणार मुंबई; आगरी परस्पर सहकारी पतपेढीचे उत्पादक व कार्यकारी अध्यक्ष. ११ श्री. लक्ष्मण धर्माजी म्हात्रे, तालुका पन-वेल, जि. कुलाबा, हे पुरातन घराण्यांतील असून ज्ञातीचे पुढारी आहेत.

नि वा डे व ठ रा व.— ज्ञातिसभेंत वगैरे निवाडे होतात व वरील ज्ञातीच्या हितासंबंधानें कोणकोणते ठराव पास होतात यांची माहिती होण्याकरितां पुढील निवाडपत्रें व ठराव दिले आहेत

श्री

समापत्र शके १७५१ मनमथ नाम संवत्सरे वैशाख वद्य ११ रविवार, समस्त गोतगंगा मीठ आगळे एकवीस पाटील व चोगळे व कुळे समस्त गोतगंगा यांमध्यें अर्ज करतो, रामीबाई बिन गोविंद म्हात्रा याची बायको ही अर्ज करतो, मी हूल घेऊन माहीमास गेलो होतो तर तेथें चार घटका झाले. रात्र समय आठ वाजले म्हणोन दिसत नाहीं तर तिचे बापानी घराची मारतर पो नागू मराठा व बाळु मराठा हे दोघे धनी पो तर ते माहिमा जागून सोधून गाडी करून येत होते ती गाडी लौवर येईल म्हणोन गाडी केली ती गाडी रो दाही तेथें दुरती जाली मग मी म्हणलें की मज रात्र झाली ये दोघे धनी नेवावयास आले तर आम्हास सोरऊन दिली म्हणून माझ्या वहडकी दोन वेळा केल्या की तू गारीन घमलीस. म्हणोन नवऱ्यानें टाकून दिली तर मजला कासी गंगेचा आगत्य लागली म्हणोन भवताई मिळाली तर कासी गंगेनें विचार केला की, रामी बाईचे पदरीं काही दोस नाहीं म्हणोन कासी गंगेनें पंक्ति पावन केले जाती मिळती केली व रामी बाईनें पाट लावला होता तो कासी गंगेन माफ केला सर्वे जे केले ते कासी गोताचे अनुमतें झाले तर गोताचा जेवन खर्च मिळुन घेतले रूपये ३०. बाई रामीस पंक्ति पावन केले मागें मोरें कोनी देजा दिसी निघाला तर कासी गोत जबाब देईल हे लिहून दिले सही इस्त अक्षर धर्मा हाम म्हात्र मु॥ मुंबई मीठ आगळे

हें पत्र लिहून माहुलकर पाटील यास पे॥ तर तुम्ही मान्य करने हरकन कोणाचे ऐकोन न करने हे समापत्र लिहून दिले सही

(२४इगमांच्या सभा)

श्री.

सभापत्र शके १७६२ सार्वरी नाम संवत्सरे माहे मार्गेश्वर शुद्ध १४ दिवस मंगळवार ते दिवशीं वरालकर व नाना वकर व मार्टुंगकर व गांवकर व खारकर व शिवरीकर व वासनोलीकर, व भोईवाडीकर व ठाकूरकर व माहीमकर व मोग्गावकर व वालकर, व दोमरीकर व नीरगावकर समस्त गंगा धामागोन सुद आगळे श्री पांडुरंगाचे देवळांत बसून ठराव केला ऐसीजे देवजी भोमर म्हात्रा सुभाम शीव गावें दुसऱ्याचें अन्न भोजित शिजले या करितां ब्राह्मणापासून प्रायश्चित्त मार्गे करून गंगेचे अनुमतेंकरून शुध केले व गंगामेतानी देवदंड रुपये अडीच व गोतदंड रुपये अडीच व दोघे घेऊन गंगागोतानी पंक्तिपावन केले यासी कोणी भ्रष्ट मानू नये. यास दोष ठेऊं नये जो ठेवील त्यास गोतदंड रुपये ५० व देवदंड रुपये ५० व सरकार दंड रुपये ५०.

(२६इसमांच्या सभा)

॥ श्री ॥

समस्त सुद्ध आगळे ज्ञाति मंडळाकडी प्रांत उत्तर कोंकण जिल्हे—मुंबई, ठाणा, कुलाबा नाशिक यांचे एकमत होऊन-खाली लिहिल्याप्रमाणें ठराव पसंत करून कायम केले आहेत, त्यांविरुद्ध कोणीहि वागूं नये, विरुद्ध वागणारानें पंचवीस रुपयेपर्यंत जात गंगेच्या फंडांत द्यावे लागतील व त्यास गुन्हा केल्यापासून रुपये देईपर्यंत अपगत ठेविले जाईल

| लग्नाच्या खर्चाचे ठराव. | पाटाच्या खर्चाचे ठराव |
|---|---|
| १। सालपुडा सव्वा रुपया | १० पूर्वीच घरच्या वारसास पूर्वी देज दिलें असल्यास दहा रुपये |
| २० मुलाच्या बापास घेणें असल्यास तादुळसुद्धा वीस रुपये | १० नवरे मुलीस घेण असल्यास दहा रु |
| ५ जातीस पांच रुपये | ५ जातीस पाच रुपये |
| ५ सावर्धन पाच रुपये | ५॥ नवरीस वस्त्रें साडेपाच रुपये |
| ८॥ नवरीस वस्त्रें साडेआठ रुपये. | २५ दागिने देज घेतलें असल्यास पचवीस रुपये |
| ३० दागिने देज घेतलें असल्यास रुपये तीस | १। ब्राह्मणास दक्षणा सव्वा रुपया |
| २। ब्राम्हणास दक्षणा सव्वा दोन रुपये (मुलाकडून १॥ रुपया व मुलीकडून ॥।) | १ जातगंगेस |
| १॥ जातगंगेस (मुलाकडून एक रुपया व मुलीकडून ॥) | |
| ॥। पाटलाचे बैठकी. बद्दल बारा आणे | |

(१) कोणाही जात गृहस्थानें दारू किंवा ताडी पिऊ नये व जुगार खेळूं नये आमंत्रण असल्याखेरीज कोणी कोणाचे घरीं कार्यीं प्रयोजनीं जाऊं नये जुमतें आमंत्रण असल्यास एकाच मनुष्यानें जावें व सर्व मंडळीस असल्यास सर्वांनीं जावें या विरुद्ध वागणुकीचा कोणी कोणावर पुरावा करून दिल्यास गुन्हेगारास वर दर्शविलेली सजा केली जाईल व पुरावा देणारास पाच रुपये बक्षीस दिले जाईल

(२) व्यभिचार करण्याची आपले जातींत सक्त मनाई आहे व्यभिचार करणारास जातींतून अपगत ठेविले जाईल व त्याबद्दल पुरावा करून देणारास दहा रुपये पर्यंत बक्षीस दिले जाईल

(३) कोणाही जातगृहस्थानें एकापेक्षा अधिक बायका करू नये लग्न होऊन पांच वर्षे मूलबाळ होत नसल्यास किंवा बायको हमेशा आजारी असल्यास ज्ञातीस तसें कळवून ज्ञातीच्या हुकमानें दुसरी बायको करावी विनाकारण एकी पेक्षा अधिक बायका करणारास गुन्हेगार ठरवून पंचवीस रुपयावर रुपये ज्ञातीचे फंडांत द्यावे लागतील

(४) वयात आलेली नवरा असलेली स्त्री कोणीहि आपले कडे दहा दिवसांपेक्षां अधिक दिवस ठेऊ नये. तीस नवऱ्याकडे पोंचती करावी व ती बाई ऐकत नसल्यास ज्ञातीस कळवावें. कोणाची स्त्री किंवा मुलगी वाईट चालीची निघाल्यास किंवा ती कोठें निघून गेल्यास तिच्याबद्दल बातमी

त्यांना जातीस दिलीच पाहिजे. हा नियम मोडणारास पंचवीस रुपयांवर रुपये जातीच फंडात द्यावे लागतात

हे नियम आमच्या गांवकऱ्यांस कबूल आहेत

आ ग री भा षा —ही भाषा देशी कुणब्यांच्या भाषेहून बरीच भिन्न आहे दोन आगरी पुरुष एकमेकांशी झपाट्यानें बोलत असता अपरिचित पांढरपेशास त्यांच्या बोलण्याचा उलगडा चटकन होत नाहीं आगरी बायका बोलू लागल्या तर त्यांचे बोलणे समजून घेण्याच्या कामांत त्या पांढरपेशाची त्रेधा उडते त्यांच्या भाषेत विशेष पुढीलप्रमाणें आहेत

१. वर्ण —( १ ) ' ग ' च्या ठिकाणीं मूर्धन्य ' ज ' चा प्रयोग करितात. उ० जेला = गेला ' जेला हें रूप ' गेला ' ह्या रूपापेक्षा मूळ धातू जो ' जा ' त्याशीं अधिक मिळतें आहे ह्याप्रमाणेंच ' घ ' च्या ऐवजीं मूर्धन्य 'झ' योजितात उ० ' झेतलें ' = ' घेतलें ', ' झ्या ' = 'घ्या ' पण ' क ' ' ख ' च्या ऐवजीं ' च ' ' छ ' यांचा प्रयोग करीत नाहींत ( २ ) 'ड' च्या बद्दल 'र' ची योजना करितात उ०, ' उराला ' = उडाला आणि कधीं कधीं, ' र ' च्या ऐवजीं ' ड ' योजितात उ० ' वाडा ' = वारा, ' आग्री ' ' ल्य मोठा वाडा आला नी वारा उरून जेला ' = ' फार मोठा वारा झाला आणि वाडा ( गुरांचा गोठा रानात बांधितात तो ) उडून गेला ' (३ ) कधीं कधीं ' र ' च्या ठिकाणीं ' हि ' ऐकू येतो ' उ०' मुलगा लरतो' = ' मुलगा रडतो'।

२ नामें — ( १ ) गोंड = भोसकू, कुपणात पाडलेली वाट उ० टोणग्यानीं वईन तीन गोंड पाडले = कुपणात तीन भोसकी पाडून वाटा केल्या ( २ ) ' हेतू ' = आठवण, स्मरण उ०, ' त्या कामाची मला हेतू राहिली नाहीं, ' असा हेतू शब्दाचा स्त्रीलिंगी प्रयोग आठवण ह्या अर्थी योजितात ( ३ ) ' अदावत ' = अडचण उ ' हें शेत घेता, पण त्यात लय अदावत आहे ' म्ह अडचण आहे गाडीवाटेंत दगड, ओहोळ झाडें, किती तरी अदावत।

३ सर्वनामें —( १ ) देशी ' म्या ' ह्या तृतीयेच्या रूपाऐवजीं ' मी ' सर्वनामास तृतीयेचा ' नीं ' प्रत्यय जोडून ' मिनी असें रूप साधितात. उ० ' मिनी काय केलें ? ' सदरहूप्रमाणें ' तू ' याचें रूप ' तुनी ' असें योजितात ( २ ) ' मी ' सर्वनामाची चतुर्थी ' मना ' अशी योजितात उ०, ' मना माहीत नाहीं ' ' मना काय ठाऊक ? ' आपलीं लहान मुलेंहि ' मना खाऊ दे ' असेंच म्हणतात हें ' न ' आणि ' ल ' यांच्या अभेदाचें उदाहरण आहे लिंब, निंब, लहाना = लाना = नाना ( गुजराथी ), ' लवणें = नवणें ( हिंदी ), ' नमन ' ( संस्कृत ) ( ३ ) ' काय ' ह्या सर्वनामास, द्वितीया, व चतुर्थी विभक्तीचा प्रत्यय ' ला ' तृतीयेचा प्रत्यय ' शी ' व षष्ठीचा प्रत्यय ' चा ' लावून त्या त्या विभक्तींचीं रूपें उपयोजितात मात्र काय यांतील ' का ' अक्षरास ऱ्हस्वत्व देतात उ०, ' कयाला ' = कशाला, ' कयाशीं ' = कशाशीं ' कयाचा ' कयाचीं ' ' कयाचें ' = कशाचा, कयाची, कशाचें, इ प्रचलित मूळरूपांतहि, ' का ' स ऱ्हस्वत्व देऊन ' क ' ह्या ऱ्हस्व अक्षराची योजना झाली आहे ' ऐशा विद्या काशाला' ' ऐशी बाईल काश ला ' कासया धरियला हय ता तुवा ' ' वगैरे पद्य सर्वश्रुत आहेत तेथें ' काय ' यांतील ' का ' दीर्घच राहिला आहे पण प्रचलित भाषेत त्यास ऱ्हस्वत्व देऊन काशाला'इ रूपें योजितात त्याप्रमाणें'कायाला' 'कायाशी' ' कायाचा ' अशीं रूपें न करिता कयाला, कयाशीं, कयाचा, अशीं रूपें आगरी उपयोजितात मराठीत दोन दीर्घ अक्षरें एकत्र आलीं असता एकास, विशेषत पहिल्यास ऱ्हस्वत्व देण्याचा स्वाभाविक जो प्रचार आहे त्यास अनुसरूनच ' का ' स येथें ऱ्हस्वत्व आलें आहे ( ४ ) ' कती ' ( किती ) हें संख्यानामवाचक प्रश्नार्थक सर्वनाम वापरतात, तें मराठींतील ' किती ' पेक्षा संस्कृत ' कति ' शीं अधिक मिळतें आहे उ०, ' किती दिवस लागतील,' किती दिवस लागतील? किती चुना मळला?' = किती चुना मळला, (५) ' बिसरा = दुसरा उ बिसरा उपाय काय ' = दुसरा उपाय काय ? ' बिसरा ' पासूनच बिसरून = दुसरून = दुसऱ्यानें, पुन्हा असें अव्यय सिद्ध झालें आहे येथें 'दु' च्या ठिकाणीं 'बु' व्हावयाचा पण ' बु ' पालटून ' बि ' च होतें

४ क्रियापदें —( १ ) ' सांग ' धातूच्या भूतकाळाचें रूप साधताना शिष्ट भाषेंतील मध्यंतरींचा ' त ' आदेश न योजितां, धोपट मार्गाचें रूप ' सांगलें ' असें योजितात. उ मिनीं सांगलें' = मीं सांगितलें मागणें याचें ' मांगलें ', ( हिंदी ' मंगना' ) उ० त्यानें मांगल म्हणून मिनी दिल. आपलीं मुलेंहि प्रथम बोलू लागलीं म्हणजे मीं ' करलें ' असेंच धोपट मार्गाचें रूप योजितात प्याला, प्यायला ह्या रूपाच्या ऐवजीं ' पिला असें रूप पी धातूपासून सिद्ध करितात. उ०, बैल पाणी पिला ( २ ) काहीं क्रियापदाचे अर्थ देशावर माहीत नाहींत उदाहरणार्थ, ( अ ) हिल्गणें = अडकणें, अडकून राहाणें उ०, ' गवताची मोळी जाळींत हिलगला ( अडकली ) हें क्रियापद उर्दूंत व हिंदींत प्रसिद्ध आहे, पण देशी मराठींत नाहीं ( आ ) पोगळणें = सुटणें, मोकळा होणें, विस्कळित होणें उ०, ' गवताचा भारा पोगळला ' = सुटला, विस्कळित झाला ( इ ) कळणें, ( कळण ) = दिसणें उ०, झाडावर वावळें आहेत म्हणता पण मला कळत नाहीं ( मला दिसत नाहींत, माझ्या नजरेस येत नाहींत ) ( ई ) आरडणें = हाक मारणें, बोलावणे उ०, ' दादा तुला ओरडतात ' = हाक मारतात ( उ ) ' बोलणें ' = उत्तर करणें उ " मिनीं सांगल लौकर ये, तो बोलतो ( उत्तर करतो ) काम आटपून येईन "

५ अव्ययें —( १ ) ' पासून ' याची योजना ' पेक्षा ' याच्या ऐवजीं करितात उ०, 'बाजारी खोबरेलापासून नार-

त्याचें तेल लय नामी '=बाजारी खोबरेलापेक्षा नारळाचें तेल फार चांगलें 'काळ्यापासून लाल्या मवाद तलख =काळ्यापेक्षा लाल्या अधिक तलख (२) विसरून = दुसरून, दुसऱ्यानें पुन्हा वर सर्वनामामध्यें 'विसरा' पहा (३) मंग=मग, नंतर उ०, 'मी भाकर खाईन, मंग गुरामागें जाईन.'

घर, तर, मर इत्यादि शब्दांतील प्रथम 'अ' स्वराप्रमाणें 'मगा' यांतील पहिल्या 'अ' स्वरास ओढून दीर्घत्व देऊन उच्चारण्याचा परिपाठ मराठींत आहे. येथें तें दीर्घत्व 'अ' ला ओढून न देता त्यावर अनुस्वार देऊन साधिलें आहे.

आगरी लोकांचीं कांहीं आडनावें.-[१]भोईर, धुळे, डागरे, सुठे, मेहेर, शेणे, कराळे, डाइरे, जोगळे, वेखंडे, गोंडे, ठाणगे, इ [२]शाखेरीज मराठ्यांचीं आडनावें त्यांच्यात आढळतात तीं:—पोवार, जाधव, मोहित, महाडिक, घोरपडे, इ धंद्यावरून व गावावरून आडनावें आहेत तीं—भोपी, माळी, भगवत, इस्माळी, म्हसकर, कोंडिलकर, खारकर, इ

आगरी लोकांतील कार्डी नांवें— पुरुषाचीं:--हशा, उंग्या, हेंद्या, हाबऱ्या, बेंडया, चाग्या, वामा, गोमा, चाया, पोशा, धाया, ढुंद्या बायकाचीं:—वाळकी, मुढी, नामी, धाकली धाळी, इ. (वि. विस्तार पु. ४३. अं ९)

जातपंचायत—सर्व जातीची एक पंचायत नाहीं ग्रामपंचायती असून शिवाय तर्फपंचायती आहेत विशेष प्रसंगीं जवळजवळच्या दोन अगर दोहोंपेक्षा जास्त तर्फांची पंचायत भरविण्याची वहिवाट आहे. कांहीं ठिकाणीं पंचायतीचा अध्यक्ष निवडला जातो व कांहीं ठिकाणीं तो वंशपरंपरेनें चालत आलेला असतो. तथापि न्यायाचा निवाडा पंचाच्या संमतीनें केला जातो. सर्वसाधारण अशीं जातीचा देवळें नाहींत, तरी पण प्रत्येक गावात गावकीच्या (ज्ञातिगृहस्थाच्या) मालकीचीं अगर कांहीं विशेष व्यक्तींनीं स्वखर्चानें बांधलेलीं व त्याच्या मालकीचीं अशीं देवळें आहेत. कांहींना सरकारी वेतनें आहेत, कांहींची व्यवस्था वर्गणीनें होते आणि कांहींची व्यवस्था स्वतः मालकाकडून होते. चाळी, घरें, जमीन-जुमला वगैरे मालमत्ता मुळींच नाहीं.

जातीचा कर नाहीं, परंतु लग्नाच्या वेळीं गावाचा हक्क म्हणून ठराविक रकम वसूल करण्यात येते. तिच्यावर ज्ञातिगृहस्थाचा हक्क असतो.

पंचायतीनें निवाडे लिहून ठेवण्याची पद्धति नाहीं. अलीकडे कांहीं ठिकाणीं सुमारें २५ वर्षे निवाडे लिहून ठेवण्याची पद्धति सुरू झाली आहे. पंचायतीचे निकाल अमलात आणण्याचें बाबतींत भोजनखर्च घेण्याचें व मानपानादि वहिवाट बंद करण्याचें जातीच्या स्वाधीन आहे. पूर्वापार वहिवाटीनें शासन करण्याचा अधिकार चालू आहे परंतु अशा प्रकारच्या अधिकाराचा प्रश्न अद्याप सरकारी कोर्टांत उपस्थित झालेला नाहीं.

पंचायतीपुढे नित्य येणारे प्रश्न म्हटले म्हणजे शिवारगाळ अनुनुकसानी व शेतभात, गुरेंढोरें वगैरे आगाळिकसंबंधीं होत; आणि महत्त्वाचे नैमित्तिक प्रश्न म्हटले म्हणजे जातीच्या व धर्माच्या नियमाविरुद्ध केलेल्या कृत्यांविषयीं होत.

माळी, भंडारी, मराठे, कोळी आणि तिलोरी कुणबी ह्या जाती आगरीशीं सदृश असून भिन्न आहेत अन्नोदक व्यवहार फक्त ब्राह्मणजातीबरोबर चालतो. जातींत पोटजाती नाहींत चितपावन, गोवर्धन आणि पळशे जातीचे भिक्षुक यांचे विवाहादि संस्कार करितात जातीच बहुतेक सर्व प्रश्न आतच सोडविते, मात्र क्वचित महत्त्वाच्या धार्मिक प्रश्नावर ब्राह्मणाचें मत घेण्यात येतें

गेल्या तीनचारशें वर्षांत जातीचें स्थलांतर मुळीच झालें नाहीं इंग्रजी राज्यापूर्वी जातीचा आचार चालीरीतींस अनुसरून होता असें ज्ञातीच्या मंडळींचें म्हणणें आहे त्यानंतर कांहीं बाबतींत सुधारणेच्या दृष्टीनें फरक पडत चालला आहे.

जातींत पुनर्विवाह रूढ असून विधवाची व निराश्रित मुलाची सोय केलेली नाहीं जातींतील पुनर्विवाहाच्या पद्धतीमुळें स्त्रियाशीं अधर्मव्यवहारानें संतति झाल्याचीं उदाहरणें घडत नाहींत असें ज्ञातिसभा म्हणते

[संदर्भ ग्रंथ—बॉ. गॅ पु. १३, भा. १. सेन्सस रिपोर्ट १९११, पु ७ आगरी-ज्ञाति-परिषदेच्या सेक्रेटरीकडून व आगळे-ज्ञातिहितवर्धक मंडळाच्या अध्यक्षाकडून आलेली माहिती [ज्ञानकोशकारानीं सर्व जातींना आपआपली माहिती सविस्तर पुरविण्याविषयीं विनंति केली होती तदनुसार या ज्ञातीनें आपल्या सभा भरवून एकमतानें जी माहिती पाठविली तिचा येथें उपयोग केला आहे] आगळे ज्ञातीच्या वहिवाटीचे नियम वि विस्तार पु ४३ ऍन्ट्रॉ यशन्स या जिर्ना. सोसायटी.१९४]

आंग्रे—मराठशाहींत नौकानयनात जे मराठे सरदार नामांकित झाले त्यामध्यें कुलाब्याच्या आंग्र्याचें नाव प्रमुख आहे. ज्या समुद्रकांठच्या प्रदेशात आंग्र्यानीं आपलें नाव गाजविलें त्यास पूर्वी अष्टागर म्हणजे आठ गावाचा समुदाय असें म्हणत. हल्लीं या गावाचा समावेश अलीबाग तालुक्यात होतो. या गावात पूर्वी चौल हा गाव फार प्रसिद्ध होता. पुढें शिवाजीला या प्रांताची उपयुक्तता विशेष वाटून त्यानें तेथे किल्ले बांधून आपलें ठाणें बसविलें. त्यानें अलीबाग येथें सन १६८० मध्यें एक मजबूत किल्ला बांधिला, तोच कुलाबा होय. परंतु शिवाजी अल्पायुषी झाल्यामुळें त्याच्याहातून हा प्रांताचा बंदोबस्त त्याच्या मनाजोगता झाला नाहीं.

मूळपुरुष.—आंग्र्याचा पहिला प्रसिद्ध पुरुष तुकोजी संकपाळ हा असून त्यानें शहाजी भोसले याला मोगलाविरुद्ध कोंकणात युद्ध करण्यात मदत केली होती. तो आपला मुलगा कान्होजी यासह आरंभीं शिवाजीच्या आरमारांत नोकर होता. हे दोघेहि आपल्या कामात प्रवीण

व नेकीनें वर्तत असून शिवाजीच्या वेळेसच ते विशेष प्रसिद्धीस आले संभाजीच्या कारकीर्दीत कुलाब्यावर सिवजी गुजर नावाचा सरदार असून कान्होजी आंगरे मकपाळ हा दर्यावर्दी व फिरती आरमार याजवर मुख्य नेमलेला होता कान्होजी सकपाळ हा हर्णजवळ आंगरवाडी म्हणून गाव आहे तेथील राहणारा असल्यामुळे त्यास व त्याच्या वंशजास आंगरे हें उपनाव प्राप्त झालें

का न्हो जी.—आंगऱ्याचा पहिला प्रसिद्ध पुरुष तुकोजी हा इ सन १६९० च्या सुमारास मरण पावला व त्याचा मुलगा कान्होजी त्याचे काम पाहू लागला.कान्होजी हा आंगरे घराण्याचा संपादक होता सन १६९७–९८ च्या सुमारास तो मराठ्यांच्या आरमाराचा अधिपति झाला कुलाबा, सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग या ठिकाणी त्याचीं बळकट ठाणीं होतीं १६९९ सालीं त्यानें पोर्तुगीज व शिद्दी यांच्या संयुक्त आरमाराशीं लढून सागरगड किल्ला घेतला व कुलाबा, खांदेरी, सागरगड या ठाण्यांचा काहीं भाग आणि राजकोट व चौल यांतील सर्व वसूल आपणास मिळावा असा तह करून घेतला शाहू व ताराबाई यांचें भांडण सुरू झालें तेव्हां कान्होजीनें ताराबाईचा पक्ष स्वीकारून तिजकडून मुंबई ते सावंतवाडीपर्यंतचा समुद्रकिनारा, राजमाचीचा किल्ला व कल्याण भिवंडी परगणा इतक्याचें अधिकारपत्र मिळविलें पुढें १७१३ सालीं बाळाजी विश्वनाथामार्फत त्याचा शाहूशीं तह होऊन त्यास खांदेरीपासून देवगडपर्यंतच्या मुलुखाचें आणि दहा कोंकणी किल्ल्यांचें अधिकारपत्र, आरमाराच्या मुख्य सेनापतीची जागा आणि सरखेल ही पदवी शाहूकडून मिळाली कान्होजीनें मुसुलमान, इंग्रज व फिरंगी या त्रिवर्गांशीं लढून मराठ्यांचा जंजिरे व प्रांत यांचें रक्षण केलें कान्होजी हा इ स १७२९ सालीं मरण पावला त्याला विवाहित स्त्रीपासून दोन व उपस्त्रीपासून चार असे एकंदर सहा पुत्र होते (कान्होजी पहा).

से खो जी.—कान्होजीच्या मृत्यूनंतर त्याचा वडील औरस पुत्र सेखोजी हा सरखेलीचा कारभार पाहू लागला त्याचा स्वभाव मनमिळाऊ असून त्याचें वैमनस्य भांडण तंटा वगैरे कोणाशीं काहीं नव्हतें परंतु तो फार दिवस जगला नाहीं इ स १७३३ त तो मरण पावला (सेखोजी पहा)

स भा जी.—सेखोजीनंतर कान्होजीचा धाकटा औरस पुत्र संभाजी व दासीपुत्र मानाजी यांच्या दरम्यान दौलतीकरितां झगडे सुरू झाले आंगऱ्यांच्या घराण्यांत दुफळी पाडून त्यांची सत्ता कमी करण्याच्या हेतूनें बाजीरावानें मानाजीस वजारतमाब असा किताब देऊन कुलाब्यास स्थापिलें व संभाजीस सरखेलाचें पद देऊन सुवर्णदुर्ग व त्याच्या दक्षिणेकडील मुलूख वांटून दिला बाजीरावाचें हें कृत्य संभाजीस आवडलें नाहीं त्यानें शाहूकडून ही व्यवस्था फिरवून घेण्याची खटपट केली, पण तींत त्यास यश आलें नाहीं यामुळें संभाजी व मानाजी यांमध्यें कायमचें वाकडें आलें (संभाजी पहा)

तु ळा जी.—मानाजीचा सख्खा भाऊ तुळाजी हा संभाजीजवळ राहून कारभार पहात असे इ स. १७४१ त संभाजी मरण पावला तेव्हां तुळाजीनें संभाजीचा जागा घेऊन त्याचें भांडण पुढें चालविलें तुळाजी हा पेशव्यांचा कट्टा द्वेष्टा असल्यामुळें पेशव्यांनीं इंग्रजांची मदत घेऊन तुळाजीचे सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग वगैरे किल्ले काबीज केले व तुळाजीस व त्याच्या बायकापोरांस कैद करून (स १७५६) डोंगरी किल्ल्यांत अटकेंत ठेविलें (तुळाजी पहा)

मा ना जी.—मानाजीकडे कुलाब्याचा अधिकार १७३५ सालीं पेशव्यांनीं सोंपविला तद्दिवसापासून तो पेशव्यांशीं मिळून आपल्या बंधूशीं झगडत होता तुळाजीशीं झालेल्या अखेरच्या युद्धांत देखील तो घाटावर येऊन पेशव्यास मदत करीत होता परंतु पेशव्यांनीं तुळाजीचा पाडाव करून त्यास कैदेंत टाकल्यावर त्याच्याकडे असलेले किल्ले वगैरे त्याच्याच घराण्यांतील मानाजीस देऊन आंगऱ्यांची दौलत पुन्हां एक केली नाहीं बाणकोट व दासगांव हीं इंग्रजांस देऊन विजयदुर्ग किल्ला पेशव्यांनीं स्वतः घेतला व तेथें आपला आरमारी सुभा स्थापन करून आनंदराव धुळप यास सुभेदार नेमिलें मानाजी हा यानंतर पुढें लवकरच म्हणजे १७५८ सालीं वारला (मानाजी पहा)

र घू जी.—मानाजीच्या मृत्यूनंतर त्याचा दासीपुत्र रघूजी याला पेशव्यांच्या मदतीनें प्रथमच शिद्दयाशीं लढावें लागलें त्यानें उंदेरी बेट शिद्दयाकडून घेऊन पेशव्यांस दिलें रघूजीनें अलीबागेस राहून आपल्या मुलुखाची नीट व्यवस्था केली व चौल इत्यादि ठिकाणीं मिठागरें वगैरे काढून आपलें उत्पन्न वाढविलें तो पेशव्यास दरसाल दोन लक्ष रुपये खंडणी देत असे व अलीबागच्या सरंजामाबद्दल पदरी फौज ठेवून तो पेशव्यांची नोकरी करी रघूजी हा १७९३ सालीं मरण पावला।

मा ना जी दु स रा व बाबुराव.—रघूजीच्या निधनानंतर जयसिंग आंगरे हा रघूजीच्या मानाजी नांवाच्या अल्पवयी मुलाचें पालकत्व स्वीकारून कुलाब्याचा कारभार पाहूं लागला जयसिंगानें ही गोष्ट पुणें दरबारास न विचारतां केला असल्यामुळें मानाजी व जयसिंग हे दोघेहि कारभारीमंडळाच्या रोषास पात्र झाले पण सवाई माधवराव पुढें लवकरच मरण पावल्यामुळें बाजीरावास गादी मिळून कारभारी मंडळाची सत्ता संपुष्टांत आली असें दिसतें कीं या वेळच्या कारस्थानांत मानाजीचा पक्ष पेशव्यांनीं घेतला त्यामुळें प्रतिपक्षी जयसिंग यानें शिंद्याच्या दरबारीं मदत मिळविण्याविषयीं बोलणें लावलें शिंद्याकडील सरदार बाबूराव हा अलीबागेस आला, पण अखेर त्यानें उभय पक्षांच्या हक्कदारांना कैदेंत टाकून स्वतःच अलीबाग बळकाविली बाबूराव हा आंगरे घराण्यांतील पुरुष असून तो दौलतराव शिंद्याचा मामा होता (वंशावळी पहा)

१८१३ साली बाबूराव जायगाव येथें मृत्यु पावल्यावर मानाजीस आपलें डोकें वर काढतां आलें व पेशव्यांस १० हजाराचा मुलुख व खांदेरी बेट देऊन त्यानें अलीबाग परत मिळविली. मानाजी हा १८१७ साली वारला या दोन पिढ्यांतल्या भाऊबंदकीमुळें अत्यंत नुकसान होऊन आंगऱ्याची तीस पसतीस लक्षांची दौलत तीन लक्षावर आली

रघूजी दुसरा.—मानाजीच्या पश्चात् त्याचा अल्पवयी मुलगा रघूजी हा गादीवर बसला. त्याचा कारभार विवलकर याजकडे होता. पेशवाईची समाप्ति झाल्यानंतर १८२२ साली इंग्रज व आंगरे यांचा तह होऊन आंगऱ्यांनी इंग्रजांची सत्ता कबूल केली. तेव्हांपासून आंगऱ्याच्या गादीचा वारसा ठरविण्याचा अधिकार इंग्रजांकडे आला १८३८ साली रघूजी वारला. पुढें दोन वर्षांनीं त्याचा मुलगा दुसरा कान्होजी हाहि वारल्यामुळें आंगरे घराण्याची औरस संतति नष्ट झाली तेव्हां रघूजीच्या बायकोनें दत्तकाची परवानगी मागितली परंतु इंग्रजांनीं ती नाकारून संस्थान खालसा केलें.

पर्यालोचन —आंगऱ्यांचें घराणें दर्यावर्दीपणांत विलक्षण धाडसी होतें. लहानपणापासून समुद्राच्या लाटांवर हेलकावे खाऊन त्यांच्या अंगीं कणखरपणा व धाडस हे गुण उपजतच पैदा झाले होते तेव्हां व्यापारी जहाजांवर हात मारून संपन्न होण्याकडे या गुणाचा उपयोग आंगऱ्यांनीं केला. त्या वेळच्या व्यापाराच्या मानानें चांचेपणाचा धंदा फायदेशीर होता. गुलामाचा व्यापार, चांचेपणा इत्यादि शब्द आज आपण ऐकिले म्हणजे ते आपल्या कानास कसेसेच लागतात; व त्या गोष्टी प्रत्यक्ष करणारे लोक मनुष्य या नावास योग्य आहेत की नाहींत अशी शंका येते. परंतु कोणत्याहि गोष्टीचा विचार करणें तो परिस्थितीच्या मानानें करावा लागतो. प्रत्यक्ष इंग्रज व्यापाऱ्यांनी सुद्धां चांचेपणांत अग्रगण्यता संपादिली होती. डग्लस म्हणतो, मराठे चांचे दुष्ट तर खरेंच, पण इंग्रज चांचे त्याहीपेक्षां दुष्ट होते; कारण इंग्रजांचें ज्ञान जास्त असून त्यांची भूक शमलेली नव्हती.

आंगऱ्यांचा व इंग्रजांचा समुद्रावर पुष्कळ वर्षे झगडा चालू होता त्याची हकीकत वाचली असतां या पाश्चात्य दर्यावर्दी लोकांबरोबर आमचे लोक इंग्रजी आरमारयांबरोबरी करूं शकले, इतकेंच नव्हे, तर शेंकडो वर्षे त्यांनी इंग्रजांची डाळ शिजूं दिली नाहीं, याचें आज मोठें नवल वाटतें. सन १७२४ पासून १७५४ च्या दरम्यान इंग्रजांचीं दोन, फ्रेंच्यांचें एक व डच लोकांचीं तीन मोठालीं लढाऊ जहाजें आंगऱ्यांनीं काबीज केलीं इंग्रजांनीं नाना प्रकारचे डावे केले, केव्हां पोर्तुगीजांची मदत घ्यावी, केव्हां शिद्याशीं सख्य करावें व केव्हां तर भाऊबंद होऊन आंगऱ्यांशींच तह करावा, असे अनेक प्रकार त्यांस करावे लागले. घेरिया उर्फ विजयदुर्ग किल्ल्यावर इंग्रजाचे जे गोळे जाऊन पडत, ते कापसाचे, लोंकरीचे किंवा भुसाचे केलेले आहेत असें आंतल्या लोकांस वाटे. पश्चिम किनाऱ्यावर आंगऱ्यांशीं लढण्याचें म्हणून एक आरमार कंपनीनें निराळेंच ठेविलें होतें. त्याचा खर्च सालीना पाच लाख रुपये होता. ' ससेक्स ' नावाचें इंग्रजाचें जहाज आंगऱ्यांनीं काबीज केलें, तेव्हां उभयतांत जो संग्राम मातला तो सतत ३८ वर्षे चालू होता. आंगऱ्याचा दरारा इतका होता की, अरबी समुद्रांतून येणारी इंग्रजांचीं जहाजें किनाऱ्यावर सुखरूप आणण्याबद्दल आंगऱ्याच्या वाटाड्यास पांच हजार रुपये बक्षीस देण्याचा कंपनीचा रिवाज पुढें पुष्कळ दिवस चालू होता. आंगऱ्याच्या घराण्यांतील पुष्कळ बायकाहि पुरुषाप्रमाणेंच पराक्रमी होत्या जयसिंगाची बायको सकवारबाई हिनें सन १७९८ च्या सुमारास खांदेरी बेट काबीज केलें, तें तिजपासून परत घेण्याची कोणाचीच छाती होईना. तिचा नवरा पुण्यास तुरुंगांत होता, ' बेट स्वाधीन करशील तर नवऱ्याची सुटका करितो ' असें वचन शिद्यानें तीस दिलें. त्यावर भरंवसा ठेवून तिनें किल्ला खालीं करून दिला. पण शिद्यानें वचनभंग करून तिच्या नवऱ्यास ठार मारिलें. रघूजीची बायको आनंदीबाई अशीच पराक्रमी होती. ती अनेक प्रसंगीं मोठ्या शौर्यानें लढली. शिद्याच्या शेजारीं व शिद्याचा प्रतिकार करावा लागल्यामुळें, आंगऱ्याच्या अंगांत क्रूरपणाहि बराच उत्पन्न झाला होता. निदान आंगऱ्याच्या वाटेस जाऊन त्याच्या अनियंत्रित जलाधिसत्तेस जो कोणी अडथळा करी त्यास विलक्षण हाल भोगावे लागत. पोत्यांत घालून सागरगडाच्या टोकावरून खालीं समुद्रांत कडेलोट करणें ही नेहमींची ठरलेली शिक्षा होती आंगऱ्याच्या पदरीं उत्तम जातीचे अरबी व इराणी बहुमोल घोडे पुष्कळ असत. जमिनीवरहि आंगऱ्याचा अंमल बराच होता. शाहू छत्रपतीच्या वेळेला आंगऱ्यांचें प्रस्थ फारच मोठें होतें. लोहगडाचा मजबूत किल्ला त्याच्या ताब्यांत होता. तथापि आंगऱ्यांनीं राजचिन्हें कधींहि धारण केलीं नाहींत. शिवाजीच्या पश्चात मराठशाहीवरील बिकट प्रसंगांत शिद्दी, मोंगल व पोर्तुगीज या तीन सत्तांशीं शौर्यानें आणि हिकमतीनें टक्कर देऊन, मराठे लोकांचा अंमल समुद्रकिनाऱ्यावर कायम राखिल्यामुळें आंगऱ्यांचें घराणें राष्ट्रेतिहासांत प्रमुख समजलें जातें.

स. १६९० च्या सुमारास कान्होजी काम पाहूं लागला तेव्हांपासून सुमारें १५० वर्षेपावेतों म्हणजे इ. १८४० पर्यंत आंगऱ्यांची सत्ता अरबी समुद्रावर चालू होती असें स्थूलमानानें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्रजांच्या सुपर्दीस येतां देऊन, त्याचें राज्य सुमारें १५० मैल लांब व २० पासून ६० मैल रुंद इतक्या जमिनीच्या टापूवर पसरलेलें होतें. सन १८४० त वारसाच्या अभावीं त्याचें राज्य इंग्रजांकडे खालसा झालें त्यावेळीं त्याचें उत्पन्न तीन लाखांचें होतें

आंगऱ्यांची वंशावळ.

सेखोजी संकपाळ, रा. आंगरवाडी, हर्णैनजीक.

तुकोजी आंगरे, स. १६९०. [ १८४० त राज्य खालसा.

१ कान्होजी, सरखेल १६९०–१७२९

१ ली मथुराबाई, २ री लक्ष्मीबाई ( मानाजी जगताप ), ३ री गहिनाबाई ( दिनकरराव भोसले. )

२ सेखोजी १७२९–३३ | ३ संभाजी १७३४–३५, मृ. ४१. | ४ तुळाजी १७३४–५६ | ५ मानाजी १७३५–५८ | येसाजी | धोंडजी

मानाजीचे मुलगे १०, बायका २ राधिकाबाई, भागीरथीबाई, | मैनाबाई, दौलतराव शिंद्याची आई ८ बाबूराव. १७९९-१८१३

१ महिमाजी २ रघूजी ३ चिमाजी ४ हिरोजी ५ धोंडजी

६ तुकोजी ७ कृष्णाजी ८ सुभानजी ९ तुळाजी १० राम

६ रघूजी १७५८–९३

१ ली नर्मदाबाई शितोळे, आनंदीबाई भोसले, राधाबाई = रघूजींच्या बायका.

१ अथवा संभाजी ] ० ७ मानाजी २ रा. कान्होजी जयसिंग, कारभारी, खून १८००

प्रथम १७९४–१७९९, नंतर कैद, पुन्हा १८१३–१७. | ली सकवारबाई

१ ली २ री गजराबाई नरसिंहराव कदम | मुरारराव

९ रघूजी २ रा. १८१७ ३८

स्त्रिया ५ भागीरथी, कमळा, भवानी, यशोदा, अंबिका

कान्होजी दुसरा

१८३८–३९

[ संदर्भ ग्रंथ—ग्रांटडफ; कैफियती यादी वगैरे; मराठी रियासत; इतिहाससंग्रहांत ( जुलै व आगस्ट १९०९ ) छापलेली आंगऱ्यांची बखर; मुंबई गॅझेटियर; मराठे आणि इंग्रज ]

**ऑगस्टस बादशहा.**—( खि. पू० ६३—इ. स. १४ ).—ऑगस्टस या शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ पूज्य बादशहा ( व्हेनेरेबल मॅजेस्टिक ) असा आहे. ही पदवी रोमन सीनेटनें गायस ऑक्टेव्हियस याला त्यानें केलेल्या उत्कृष्ट राजकीय कामगिरीबद्दल दिलेली असून ती त्यानें पहिला रोमन बादशहा या नात्यानें धारण केली होती. पुढेंहि अनेक रोमन बादशहांनीं तीच पदवी मूळच्या ऑगस्टसशीं नात्याचा कांहीं एक संबंध नसताहि चालू ठेवलेली होती. गायस ऑक्टेव्हियस हा खि. पू. ६३, सप्टेंबर २३ रोजी म्हणजे ज्या वर्षी सिसिरो कान्सल होता व कॅटिलाइनचा गुप्त कट झाला होता त्या सालीं जन्मला. त्याचें घराणें बरेंच जुनें व मूळ व्हेलेट्री प्रांतातलें होतें; परंतु रोममध्यें क्युरुल मॅजिस्ट्रेटची जागा व सेनेटमधील सभासदत्व हीं त्याचे घराण्यांत प्रथम त्याच्या बापासच मिळालीं. त्याच्या आईचें नांव ॲटिया; ही ज्यूलियाची मुलगी होती. ही ज्यूलिया म्हणजे एम. ॲटियस बाल्बसची बायको आणि प्रत्यक्ष ज्यूलियस सीझरची बहीण. या बड्या नात्यामुळें ऑक्टेव्हियसच्या आयुष्यक्रमाला विशिष्ट दिशा लागली. त्याच्या पांचव्या वर्षीच ( खि. पू. ५८) त्याचा बाप वारला; सुमारें एक वर्षानें त्याच्या आईनें दुसरें लग्न केलें व त्यामुळें त्याचा सावत्र बाप एल. मार्कस फिलिपस हा त्याचा पालक झाला. आपल्या वयाच्या बाराव्या वर्षीच त्यानें आपली आजी ज्यूलिया हिच्या उत्तरक्रियेच्या प्रसंगीं रोमन वहिवाटीप्रमाणें मृताच्या स्तुतिपर भाषण केलें. सार्वजनिक भाषण करण्याचा त्याच्या आयुष्यांतील हा पहिला प्रसंग होय. खि. पू. ४८ मध्यें त्याला 'टोगा व्हिरिलस ' ( वस्त्रविशेष ) मिळून त्याची पॉंटिफिकल कॉलेजमध्यें निवड झाली. हा एवढा मोठा मान त्याच्या आईचा मामा ज्यूलियस सीझर त्या वेळीं रोमचा सर्वाधिकारी (डिक्टेटर) झाला होता त्यामुळेंच मिळाला. खि.पू. ४६ मध्यें सीझरनें आफ्रिकेंत जे विजय मिळविले त्यामध्यें ऑक्टेव्हियस होता. खि. पू. ४५ मध्यें सीनेटनें त्याला पॅट्रिशियन ( उच्च रोमन ) करून घेतलें. आणि सीझरच्या 'मास्टर्स ऑफ हॉर्स ' ( घोडेस्वारावरील अधिकारी ) पैकीं एक नेमला. खि पू. ४५ मध्यें सीझर पार्थियन लोकांवर स्वारी करण्याचे बेत करीत होता त्याला अनुसरून त्यानें ऑक्टेव्हियसला इल्लिरियामधील ॲपोलोनिया नावाच्या ग्रीक वसाहतींत गुप्तपणें माहिती मिळविण्याकरितां पाठविलें होतें. तेथें असतां मार्गे रोममध्यें सीझरचा खून झाल्याची बातमी त्याला कळली, तेव्हां तो परत इटालींत आला. तेथें त्याला असें समजलें कीं, सीझरनें त्याला आपल्या ज्यूलियन घरा-

पणानें दत्तक घेऊन आपला वारस नेमिलें आहे व त्यामुळें त्याला गायस ज्यूलियस सीझर ऑक्टेव्हियस असें नामाभिधान प्राप्त झालें आहे. परंतु हा वारसा त्याच्या उलटा घात करणाराच होता, त्याच्या आईनें व इतरांनीं तो अमान्य करण्यासच त्याचें मन वळविलें असतें. परंतु ऑक्टेव्हियसला आपल्या स्वतःच्या बुद्धिसामर्थ्याचा विश्वास असल्यामुळें त्यानें सीझरच्या मृत्युपत्राप्रमाणें आपल्यावरील रोमन साम्राज्य हातीं घेण्याची जबाबदारी पतकरण्याचें व रोमनलोकांना दिलेल्या रकमा वाटून देण्याचें जाहीर केलें. परंतु सीझरचें सर्व कागदपत्र व मालमत्ता मार्क अँटनीच्या कबज्यात होती. व तो ऑक्टेव्हिअसच्या हक्काकडे कानाडोळा करूं लागला. ब्रुटस व कॅशियस आपआपल्या प्रांतीं निघून गेले. व सिसेरो अँटोनियसच्या कलानें वागून पुढें त्याला दगा देण्याच्या विचारात होता. अशा परिस्थितींत ऑक्टेव्हियस फारच हुशारीनें वागला. त्याला सैन्याचा बराच पाठिंबा होता. सेनेटनेंहि कान्सलांना अँटोनियसविरुद्ध सशस्त्र होण्यास सांगून ऑक्टेव्हियसला मदतीस बोलावलें; तेव्हां त्यानें ४३ मध्यें अँटोनिअसचा म्यूटिना येथें पराभव केला.

कॉन्सल म्हणून निवडणूक व प्रतिस्पर्ध्यांशीं सामना.—पुढें सैनिकांच्या मागणीप्रमाणें व सेनेटच्या मर्जीविरुद्धहि तो कॉन्सल म्हणून निवडून आला, तेव्हां त्यानें अँटोनियस व लेपिडस यांच्याशीं तडजोड केली व सेनेटनें त्या तिघांचें अधिकारीमंडळ नेमून पांच वर्षांच्या मुदतीनें त्यांच्या हातीं अधिकार दिला. नंतर तिघांनीं मिळून शासनार्ह लोकांची यादी करून तीनशें सेनेटचे सभासद व दोन हजार सरदार ( नाइट्स ) ठार मारविले, पुष्कळ शहरांतील जमीनी जप्त करून सैनिकांत वाटून दिल्या; सिसेरोलाहि अँटोनियसच्या सांगण्यावरून मारण्यांत आलें.

नंतर ऑक्टेव्हियस व अँटोनियस यांनीं मिळून ब्रुटस व कॅशियस यांवर स्वारी करून त्यांचा फिलिपी येथें पराभव केला. नंतर या दोघां विजेत्यांमध्येंच युद्ध जुंपलें, पण लवकरच पुन्हां तह ठरून अँटोनियसनें ऑक्टेव्हियसची बहीण ऑक्टेव्हिया हिच्याशीं लग्न केलें व दोघांत वाटणी करून अँटोनियसनें पूर्वसाम्राज्य व ऑक्टेव्हियसनें पश्चिमसाम्राज्य घेतलें व लेपिडसला आफ्रिकेंतील प्रांत दिला. दरम्यान सेक्स्टस पॉम्पियसनें प्रबळ होऊन रोमला होणारा धान्याचा पुरवठा बंद केला, तेव्हां त्याला भूमध्यसमुद्रांतील बेटें दिलीं, पण लवकरच ऑक्टेव्हियसनें त्याच्यावर स्वारी करून त्याला आशियांत पळवून लाविलें व तो तिकडेच मरण पावला. लेपिडसला सर्व हुद्दे सोडावे लागले. तेव्हां आतां दोघांतच खरी स्पर्धा लागली; परंतु तंटा निकरावर येण्यापूर्वी मध्यंतरीं पांच वर्षें गेलीं. त्या अवधींत अँटोनियसनें कांहींएक मदत न करतां क्लिओपाट्रा राणीबरोबर विलासांत तीं वर्षें घालविलीं. त्यामुळें रोमन लोकांच्या स्वाभिमानादि भावनांना धक्का बसला व त्यांचा ऑक्टेव्हियसकडे अधिकच ओढा वळला. खि.पू.३८ मध्यें ऑक्टेव्हियसनें लिव्हियाशीं विवाह केला. तिच्या हुशारीचा त्याला त्याचा विश्वासू मित्र अग्रिप्पा याच्याप्रमाणेंच फायदा झाला. तिकडे क्लिओपाट्रानें ग्रीको-ओरिएंटल साम्राज्य स्थापण्याचा घाट घातला. अँटनीनें ऑक्टेव्हियाशीं काडीमोड केली व एक व्यवस्थापत्र केलें. त्यावरून तो क्लिओपाट्राच्या बराच कबजांत गेल्याचें दिसत होतें. त्यामुळें गोष्ट निकरावर येऊन त्या दोघांविरुद्ध युद्ध पुकारण्यात आलें. तेव्हां ३१ मध्यें ॲक्टियम येथें निकराची लढाई होऊन तींत अँटनीच्या आरमाराचा पूर्ण नाश झाला व जमीनीवरील सैन्यहि शरण आलें. ३० मध्यें ऑक्टेव्हियसनें अलेक्झांड्रियाला वेढा दिला. तेव्हां अँटनी व क्लिओपाट्रा या दोघांनीं आत्महत्या केली.

साम्राज्याची पुनर्घटना व नवीन विजय.—याप्रमाणें शत्रूंचें निर्मूलन करून सर्वत्र शांतता स्थापून ऑक्टेव्हियस रोमला परत आला. अर्थात् रोमन लोकांनीं त्याचें अत्यानंदानें स्वागत केलें. नंतर त्यानें साम्राज्याच्या पुनर्घटनेचें काम केलें. सेनेट, मॅजिस्ट्रेट व लोकमंडळ सर्वांनीं आपआपलीं कामें पूर्ववत् सुरू केलीं. ऑक्टेव्हियसकडे सरहद्दीवरील प्रांतांचें आधिपत्य १० वर्षें दिलें. सर्व लष्कर व आरमार यांवरील सत्ता त्याच्या हातीं दिली व परराष्ट्रकारभार त्याच्याकडेच सोंपविला, आणि दरसाल त्यालाच कॉन्सल नेमण्याचें ठरविलें. २७ मध्यें लोकशाहीचा मुकुट त्याच्या घराच्या दारावर चढविण्यात येऊन त्याला ऑगस्टसही पदवी मिळाली.

नंतर ऑगस्टसनें स्वतः गॉलमध्यें, एशियामध्यें व स्पेनमध्यें जाऊन तेथें सुव्यवस्थित राज्यकारभार सुरू केला. या कामांत एकंदर दहा वर्षें घालवून इ. स. पू. १८ या सालीं तो रोमला परत आला. तेव्हां आणखी पांच वर्षें त्याच्याकडे साम्राज्याधिकार देण्यात आला. पुढील दोन तीन वर्षें त्यानें रोममध्यें सुधारणा करण्यांत घालविलीं व 'ज्युलियन लॉ' वगैरे कांहीं कायदे केले. इ. पू. १६ मध्यें साम्राज्याच्या उत्तर सरहद्दीवर जर्मन टोळ्यांनीं हल्ले सुरू केले. हें संकट दूर करण्याच्या कामांत ऑगस्टसचीं पुढील २५ वर्षें गेलीं. या कामांत टायबेरियस व ड्रूसस या त्याच्या सावत्र मुलांनीं त्यास मदत केली. टायबेरियसनें डॅन्यूब नदीवर कार्नंटम येथें लष्करी ठाणें स्थापिलें. मध्यंतरीं ऑगस्टसची मुदत पुनः पुन्हां वाढविण्यांत आली; पण या सुमारास लेपिडस मरण पावला व त्याचा विश्वासू मित्र अग्रिप्पा सोडून गेला. खि. पू. ९ मध्यें ड्रूसस हा त्याचा पराक्रमी मुलगा वारला. टायबेरियस हा त्याचा सावत्र मुलगा; त्याच्यावर ऑगस्टसची मर्जी नव्हती. तेव्हां त्यानें अग्रिप्पाचे दोन मुलगे गायस व ल्यूशियस यांना दत्तक घेऊन ते आपले वारस असल्याचें जाहीर केलें, परंतु दोघेहि पाठोपाठ मरण पावले; तेव्हां नाइलाजानें त्यानें टायबेरियसलाच वारस नेमिलें.

पुन्हा जर्मनी जिंकण्याच्या कामाकडे तो वळला इ.स. ५ च्या सुमारास मार्कोमॅनी ( बोहेमिया ) प्रांताचा राजा मॅरोबोडस याच्यावर स्वारी करण्याची त्यानें जंगी तयारी केली; परंतु इतक्यांत पॅनोनिया व डालमेशिया येथें बंड उद्भवलीं. तीं मोडण्याकरितां त्याला परत यावें लागलें. खुद्द इटालीवर स्वारी होण्याचा रंग आला तेव्हां रोमला येऊन सैन्यभरतीचें काम त्यानें झपाट्यानें सुरू केलें प्रांतोप्रांतींचीं सैन्याचीं पथकें बोलावण्यात आलीं, तरी तीन वर्षे युद्ध झालें तेव्हां कोठें तें बंड मोडलें. इतक्यात जर्मन प्रांतामध्यें व्हेरसच्या रोमन सैन्याचा पराभव झाल्याची बातमी आली; परंतु ऑगस्टस त्या वेळीं बहात्तर वर्षांचा असल्यामुळें जर्मनी जिंकून तो रोमन प्रांत बनविण्याची महत्वाकांक्षा त्याला सोडून द्यावी लागली. त्यानें फक्त कुमक पाठवून सरहद्द संरक्षण करण्याचें काम केलें. राहिलेलीं त्याच्या आयुष्याचीं पांच वर्षे ( इ. स. १०–१४ ) कोणतेंहि युद्ध किंवा संकट उपस्थित न होतां शांततेंत गेलीं. सेनेटनें त्याच्या अधिकाराची मुदत आणखी दहा वर्षे वाढविली, पण आतां कारभाराचा सर्व भार ऑगस्टसनें सावत्र पुत्र, टायबीरियस यावर टाकला होता. इ. स. १३ मध्यें त्यानें रोमन लोकांची नवी खानेसुमारी करविली. त्यापूर्वी त्यानें ती दोन वेळां करविली होती. नंतर रोम सोडून नेपल्सला जाऊन शेवटीं तो आपल्या बापाच्या जुन्या राहत्या गावीं म्हणजे नोला येथें जाऊन राहिला. त्याचा आजार वाढतच गेला व शेवटीं सर्व मित्रमंडळींच्या भेटी घेऊन साम्राज्याच्या व्यवस्थेची निरवानिरव करून, १९ ऑगस्ट इ. स. १४ रोजीं आपल्या वृद्ध, अत्यंत हुशार, विश्वासू व प्रेमळ पत्नीच्या बाहुप्रदेशावर पडून त्यानें प्राण सोडला. मरतांना त्यानें पत्नीला उद्देशून “ आपल्या विवाहबंधनाचा विसर पडूं देऊं नको ” असे शेवटचे शब्द उच्चारिले. होते त्याचें शव रोमला नेण्यात आलें व तेथें अत्यंत सन्मानपूर्वक त्याचा दफनविधि करण्यात आला.

स्व भा व व र्ण न —व्होलटेरसारख्या कांहीं थोड्या लेखकांनीं ऑगस्टसचें 'परंपरागत लोकशाही बुडवून लोकांच्या राजकीय स्वातंत्र्याचें हरण करणारा पुरुष ' असें वर्णन केलें आहे. हे अपवादात्मक लोक सोडले, तरी पुढील पिढ्यांतील टीकाकारांचीं मतेंहि त्याच्यासंबंधानें बरींच विविध आहेत. त्यात कोणी त्यानें सत्ता कोणत्या साधनांनीं मिळविली या दृष्टीनें, तर कोणी त्यानें ती सत्ता कशी उपयोगास लावली अशा विशिष्ट दृष्टीनें बोलणारे लोक आहेत. तत्कालीन प्रचलित दंतकथाहि आतां अविश्वासार्ह ठरल्या असून हल्लीं आपणास ऐतिहासिक साधनें उपलब्ध आहेत, त्यावरून त्याच्याविषयींच्या मतांत महत्वाचा फेरबदल झालेला आहे. वयात आल्यावर प्रथम प्रथम त्यानें केलेल्या लढाया, क्रूर कृत्यें व त्याच्या ध्येयाच्या मार्गांत आडवी येणारी कोणतीहि गोष्ट कापून काढण्याची त्याची तयारी त्या गोष्टी सर्वांस मान्य आहेत. तरीहि ख्रि. पू. ३८ मध्यें लिव्हियाशीं विवाह केल्यापासून इ स १४ मध्यें मरेपर्यंतच्या त्याच्या चरित्राचें बारकाईनें अवलोकन केल्यास असें दिसून येतें कीं, तो धूर्त, विजयी व कारस्थानी पुरुष किंवा निपुण राजकारणी इसम होता इतकेंच केवळ नव्हे, तर जगातील थोर पुरुषांपैकीं तो एक होता. एका बलाढ्य साम्राज्याच्या राज्यकारभाराची पुनर्घटना कशी करावी याची योग्य योजना ठरवून ती प्रत्यक्ष अंमलात आणणारा मुत्सद्दी तो होता विस्कळलेलें रोमन साम्राज्य सुसंघटित करून त्यांत शांतता व समाधान स्थापन करणारा व रोमन संस्कृति दोन शतकांहूनहि अधिक काल जिवंत राखणारा तो पुरुष होता.

**ऑगस्टसबाद.**—ड्रेस्डेनच्या पूर्वेस२० मैलांवर एका रमणीय खिंडींत वसलेलें सॅक्सनीच्या राज्यातील जर्मनीचें एक आरोग्यकारक ठिकाण लोकसंख्या ९००. येथें क्षारयुक्त व लोहगुणात्मक पाण्याचे पांच झरे आहेत याचें पाणी पिण्याच्या व स्नानाच्या उपयोगात आणतात. अर्धांगवायु, संधिवात, मज्जातंतुव्यथा व स्त्रियांचे रोग या विकारांवर हें रामबाण औषध आहे अशी समजूत आहे येथें उन्हाळ्यात पुष्कळ लोक रहावयास येतात

**ऑगस्ट्राम, अन्डर्स जोनास**—हा स्वीडन देशातल्या लागडो गावीं तारीख १३ आगष्ट १८१४ रोजीं जन्मला उप्साला विश्वविद्यालयात त्याचें शिक्षण झालें. खगोलशास्त्राची प्रत्यक्ष माहिती मिळविण्याकरितां हा सन १८४२ सालीं स्टॉकहोम येथील वेधशाळेत गेला पुढें त्याला भूचुंबकशास्त्राची आवड उत्पन्न झाली; त्यामुळें त्यानें स्वीडन देशांतील निरनिराळ्या भागांची पहाणी करून त्या देशांतील भिन्नभिन्न भागाचा ( चुंबकीय ) कल आणि बल हीं निश्चित केलीं युजन नावाच्या स्वीडिश जहाजानें १८५१ ते १८५३ सालापर्यंत पृथ्वीप्रदक्षणा करून पृथ्वीवरच्या निरनिराळ्या भागांचें भूचुंबकत्व निश्चित करितां येईल अशी माहिती मिळविली, तिचा उपयोग करून घेण्याचें काम स्टॉकहोम येथील शास्त्रीय अॅकेडेमीनें त्याजकडे सोंपविलें. हें काम त्याच्या मृत्यूच्या अगोदर कांहीं दिवसपर्यंत चालून संपलें सन १८५८ सालीं त्याला उप्साला येथें पदार्थविज्ञानशास्त्राचा अध्यापक नेमण्यात आलें. पुढें तारीख २१ जून १८७४ रोजीं तो त्याच ठिकाणीं मरण पावला.

त्या चे ले ख व शो ध.—त्याच्या एकंदर लेखनात उष्णतेच्या वहनाविषयीं जें लिहिलें आहे तें पुष्कळ महत्वाचें आहे. विच्छिन्नकिरणशास्त्रावर त्यानें उपयुक्त माहिती मिळविली. सन १८५३ सालीं त्यानें असें दाखवून दिलें कीं, जर एखाद्या धातूच्या दोन विद्युद्ध्रुवातून ठिणगी उत्पन्न केली आणि ती ठिणगी विच्छिन्नकिरणदर्शक यंत्रांतून पाहिली तर आपणास दोन प्रकारचे पट्टे एकत्र दिसतात, त्यांपैकीं एक पट्टा त्या धातूचा असतो आणि दुसरा पट्टा ज्या वायूंत ठिणगी उत्पन्न झालेली असते त्या

वायूचा असतो त्याचा दुसरा शोध म्हणजे त्यानें मूलरच्या सिद्धान्ताचा उपयोग करून असें दाखवून दिलें कीं, एखाद्या तप्तवायूतून ज्या प्रकारची प्रकाशकिरणें निघतात त्याच प्रकारचीं किरणें त्या वायूकडून शोषिली जातात त्यानें हा जो शोध लावला त्या शोधाकडे कित्येक वर्षें पर्यंत दुर्लक्ष झालें परंतु प्रकाशीकिरणाच्या सहाय्यानें एखाद्या पदार्थातील मूलद्रव्यें ओळखण्याच्या विद्येचें मूल या शोधात आहे सन १८६१ सालापासून सूर्याच्या विच्छिन्नकिरणपटाकडे त्यानें विशेष लक्ष पुरविलें व सन १८६२ सालीं त्यानें असें सिद्ध केलें की, सूर्यावर उज्जा (हायड्रोजन) नावाचें मूलद्रव्य आहे सन १८६८ सालीं त्यानें सूर्याच्या विच्छिन्नकिरणपटाचा एक नकाशा तयार केला शास्त्रज्ञांनीं पुष्कळ वर्षेंपर्यंत या नकाशाचा प्रमाणग्रंथाप्रमाणें उपयोग केला आहे या एकाच गोष्टीवरून त्या नकाशाचा योग्यता लक्ष्यांत येईल सन १८६७ सालीं यानच प्रथमत उत्तरध्रुवस्थ अग्णतेजोमंडलाच्या प्रकाशाचं विच्छेदन केलें परंतु या विच्छिन्नकिरणपटात दिसणारी एक विशिष्ट पीतरेषा आणि राशीचक्रात दिसणारी पीतरेषा या एकच आहेत असें समजण्यात मात्र त्यानें चूक केली आहे

*आगळे*—आगरी पहा

*आगाखान*—अगाखान पहा

**आगाशी**—मुंबई इलाख्यात ठाणें जिल्ह्याच्या वसई तालुक्यातील एक बंदर हें वसईच्या उत्तरेस १० मैलावर उत्तर अक्षांश १९° २८' व पूर्व रेखांश ७२° ४७' वर असून बा बी सी आय रेल्वेच्या विरार स्टेशनापासून ३। मैलाच्या रस्त्यावर आहे सोळाव्या शतकाच्या आरंभीच्या वर्षांत या बंदरास बरेंच महत्त्व होतें या ठिकाणीं लाकडाचा मोठा व्यापार व जहाजें बांधण्याचें काम चालत असें पोर्तुगीज लोकांनीं हें बंदर दोन वेळ लुटलें इ स १५४० मध्यें त्यांनीं एक जहाज पळवून नेलें त्यातून त्यांनीं दोन तीन वेळ पोर्तुगालच्या सफरी केल्या. मुंबई बंदराशीं येथून सुक्यामेव्याचा व्यापार सुमारें ४००० रुपये किंमतीचा चालतो इ स १६९१ मध्यें शंकराजी केशव फडके यांनीं बांधलेलें एक भवानी शंकराचें देवालय येथें आहे तेथील कुंडात स्नान केलें असतां त्वचेचे रोग बरे होतात असें म्हणतात याखेरीज हनुमान्, विष्णु गणपति यांचीं देवालयें आहेत पारसनाथाचें एक जैन देवालय शंभर वर्षें पूर्वीं मुंबई येथील एका वाण्यानें बांधलेलें आहे. येथें एक यादवकालीन लेख आहे

**आगीमाशी**—जगलामध्यें सहा प्रकारच्या डसणाऱ्या माशा आहेत त्यांतील ही एक जात आहे हिला वैद्यशास्त्रात स्थानिक मक्षिका असें नाव दिलें आहे हिनें दंश केला असतां तो दंश कृष्णवर्ण होऊन सुजतो, पिकतो आणि सुजतो तेणेंकरून दाह, मूर्च्छा, ज्वर व दंशावर फुल्या येणें हीं लक्षणें होतात ही मक्षिका प्राण हरण करणारी आहे दंश होताच दंशास तुबडा लावून रक्त काढावें असा तज्ज्ञ लोक त्यावर इलाज सागतात

२ आग्या मोहोळाची जी माशी असते, तिलाहि आगी माशी म्हणतात ही माशी डसली असता त्या दंशावर गांधी येऊन कांहीं वेळ आग होते यावर पाढऱ्या कांद्याचा रस लावतात

**आगूः**—श्रौतकर्मीतो एक पारिभाषिक शब्द कोणताहि यागात होता नामक ऋत्विज ज्या वेळीं अध्वर्यूच्या सूचनेवरून देवतेसंबधीं याज्या पठण करतो, त्याच्या पूर्वी ज्या देवतेस उद्देशून याज्या पठण करावयाचा असतो त्या देवतेचा उल्लेख करावयाचा असतो व त्याच्या पूर्वी 'ये यजामहे' असा मंत्र पठण केला जातो यालाच 'आगू' अशी संज्ञा आहे

यागाच्या वेळीं अध्वर्यु प्रथम 'आश्रावय' असा मंत्र म्हणतो त्यानंतर आग्नीध्र 'अस्तुश्रौषट्' हा मंत्र म्हणतो, त्यानंतर अध्वर्यु 'यज' असा मंत्र पठण करतो, त्यापुढें होता 'ये यजामहे' हा 'आगू' पठण करून पुढें याज्या म्हणतो व याज्येच्या शेवटीं वौषट असें म्हणतो असे हे यागासंबंधीं शब्द प्रत्येक याज्येच्या वेळीं पठण केले जातात, यावर अन्वर्थक असा 'चतुर्भिश्च चतुर्भिश्च द्वाभ्या पचभिरेवच हूयतेच पुनर्द्वाभ्या समेविष्णु प्रसीदतु ॥ हा श्लोक आहे या श्लोकातील पाहिले दोन 'चतुर्भिश्च' म्हणजे 'आश्रावय' व 'अस्तुश्रौषट्' हे शब्द होत. त्यापुढील द्वाभ्या म्ह० 'यज' हा शब्द आणि पचभि म्हणजे 'ये यजामहे' हे शब्द असून शेवटचा द्वाभ्या म्हणजे 'वौषट्' हा शब्द होय 'वौषट' याला वषट्कार अशी संज्ञा आहे

**आगेर**—महाराष्ट्रातील आगरीप्रमाणें कर्नाटकातील मीठ तयार करणारे हे एक कानडा जिल्ह्यात आढळतात लो स (१९११) ३६८८ ह्या लोकात देवकावरून पुष्कळ गोत्रें झालीं आहेत त्यांचीं नावें —(१) काड्डिन (साबर) बालि, (२) यावन बाली, (३) आने बाली इत्यादि यावन (वासव) बाली गोत्राचे लोक कामव खात नाहींत, आने (हत्ती) बाली गोत्राचे लोक हत्तीला पूज्य मानतात व हस्तिदंताचे दागिने अंगावर घालीत नाहींत त्याचप्रमाणें इतर गोत्राचे लोक आपल्या देवकप्राण्याचा आदर ठेवण्याकरिता पुष्कळ वस्तूंचा उपयोग करीत नाहींत या लोकात सगोत्रविवाह होत नाहींत, मामेबहिणीशीं लग्न लाविता येतें, परंतु आतेबहिणीशीं व मावसबहिणींशीं लग्न करिता येत नाहीं मुलीचें लग्न ६ ते १० वर्षांपर्यंत होतें व मुलाचें ६ ते २५ वर्षांपर्यंत होतें या लोकात बहुपत्नीत्वाची चाल मुळींच नाहीं. विवाहसमारंभातील मुख्य भाग म्हणजे नवरा व नवरीवर अक्षता टाकणें हा समजला जातो पुनर्विवाहाची चाल ह्या लोकात रूढ आहे. परंतु प्रथमवरानें विधवेशीं लग्न लावण्याची सक्त मनाई आहे मंगलकार्यांत ह्यांचे उपाध्याय

ब्राह्मण नसून त्या जातींतलाच एखादा वजनदार मनुष्य उपाध्यायाचें काम करितो.

हे लोक मांसाहारी आहेत व त्यांचा दर्जा अस्पृश्यांहून वर, परंतु शेतकऱ्यांहून खालीं असा आहे. कानडांतील इतर जातींप्रमाणें हे लोक कृष्णाचे भक्त आहेत व यांचा धंदा मीठ तयार करण्याचा आहे.

या लोकांत पुरुषांचीं सामान्य नांवें म्हणजे, बोम्मा नागू, जेट्टि, म्हास्ति, वेंकटा, बिम्मा, होन्ना आणि चोर; बायकांचीं देवी, बुकी, नागी, निम्मा, जोगी, अ गे वेडु ही होत. यांच्यांत कुलनामें नसतात. तथापि धंद्यावरून किंवा गावावरून कांहीं आडनावें आलेलीं दिसतात. यांची गृहदेवता म्हणजे शहाळें (सालीसकट नारळ). जन्मभाषा कानडी. पुरुषनायका कासोटा घालीत नाहींत. दोघेहि कानांत सोन्याचीं किंवा पितळेचीं हूलवजा कुडलें घालतात. मीठ करण्याच्या आनुवंशिक धंद्याखेरीज शेतांत खर्गें, ताडाच्या पानाच्या छत्र्या तयार करणें, यासारख्या गोष्टीहि करतात. यांची जात कोटेगारापेक्षा श्रेष्ठ व उप्पाराच्या तोलाची आहे. कुलदेवता हनुमंत आहे. दगड, वारुळें वगैरे वस्तूनांहि देवता म्हणून पुजण्यांत येतें. ते आपले सर्व संस्कार ब्राह्मणाकडून करून न घेतां कोळकार (गांवचा पुढारी) याजकडून करवितात. तथापि हविगांना (ब्राह्मणांना) ते मान देतात. यांच्या घरातून देवमूर्ति आढळत नाहींत. हे होळी, दिवाळी, गणपति तुलसीविवाह यासारखे सण पाळतात.

जा त पं चा य त —अंकोला तालुक्यांत प्रत्येक खेड्यांत बुधवंत व गौडा नांवाचे दोन अधिकारी असतात. हे अधिकारी जातीसंबंधीं प्रश्नांचा विचार खेड्यांतील या जातीच्या लोकांच्या सभेंत करितात. अंकोला येथील वेंकटरामण्णा मंदिराचा मठाधिपती हा त्या लोकांचा धर्मगुरु आहे. अंकोला येथें या लोकांची एक मध्यवर्ती संस्था आहे; व हिचा अधिकार अंकोला तालुका व कुमठा व कारवार तालुक्यांतील कांहीं भागापर्यंत चालतो. बारिक सारीक गुन्हे खेड्याच्या सभेपुढें निकालाकरितां ठेविले जातात. परंतु महत्त्वाच्या खटल्याचा निकाल ही मध्यवर्ती संस्था देते. जारकर्माबद्दल बायकांना जातीबाहेर टाकण्यांत येतें व व्यंकटरमणाच्या मठाधिपतीकडे त्यांना पाठवून देवाची सेवा करविण्यांत त्यांचा काल घालविला जातो. [बॉं. गॅ. पु. १५ भाग, सेन्सस रिपोर्ट १९११ पु ७].

**आग्जबर्ग** —समुद्रसपाटीपासून १०५० फूट उंच असलेल्या पठारावर वसलेलें जर्मनीचें, बव्हेरियाच्या, राज्यांतील स्वाबिआ जिल्ह्याचें मुख्य शहर. हें म्यूनिकच्या वायव्येच्या किंचित् पश्चिमेस ३९ मैलावर दोन लहान नद्यांच्या मध्यें आहे. ऑग्सबर्ग हें म्यूनिक, रेजेन्सबर्ग, उल्म व इंगोलस्टाड या शहरांशीं लोहमार्गांनीं जोडलेलें आहे इ स.१७०३ मध्यें या शहराची तटबंदी पाडून टाकली व त्या ठिकाणीं सडक करण्याकरितां मार्ग काढले. शहरांत मॅक्सिमिलियन नांवाची जी नामांकित रुंद सडक आहे, तिच्यावर शिल्पकलेच्या दृष्टीनें उत्कृष्ट अशीं पुष्कळ घरें आहेत. त्यांपैकीं फुग्गर हाउस नांवाची जी इमारत आहे तिच्या सर्व दर्शनी भागावर ओल्या गिलाव्यांत कोरून काढलेलीं सुंदर चित्रें आहेत. या शिवाय विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या काळांत बांधलेलें नगरभवन, हल्लीं जेथें सरकारी कचेऱ्या आहेत तो बिशपाचा वाडा, दहाव्या शतकांतील रोमन कॅथेलिक क्याथीड्रल, यांत्रिक व औद्योगिक कलांची संस्था सेंट कॅथेरीनच्या पुरातन मठांत असलेला संग्रह, अजबखाना, वेधशाळा, वनस्पतिबाग वहिम्या मुख्याची शाळा, अनाथगृह, नाटकगृह, दोन लक्ष पुस्तकें असलेलें म्युनिसिपालिटीचें ग्रंथसंग्रहालय, हुंडीबाजार वगैरे कांहीं स्थलें पहाण्यासारखीं आहेत. ऑग्जबर्ग, हें दक्षिण जर्मनींतील विणकामाच्या धंद्याचें मुख्य ठिकाण आहे. १०,००० लोक या धंद्यातच कामावर असतात. ओपणें रंगविणें, कागदाचे कारखाने, रेशमीवस्त्रें, खिशांतील घड्याळें व गणितविषयोपयोगी उपकरणीं बनविणें, जवाहिरी धंदा, इंजिनें तयार करणें, ओतकामाचे कारखाने इत्यादि धंद्यांत या शहराची प्रसिद्धि आहे.

हें जर्मनींतील ॲसेटिलिन वायु तयार करण्याच्या धंद्याचें केंद्रस्थान आहे येथें मुद्रणालयें, शिळाछापाचे धंदे व ग्रंथप्रकाशन यांचीहि बरीच वाढ झालेली आहे. 'ऑग्जबर्ग गॅझेट' हें यूरोपखंडांतील नामांकित वर्तमानपत्रांपैकीं एक आहे.

रोमन बादशहा ऑगस्टस यानें ख्रिस्ती शकापूर्वी सुमारें १४ व्या वर्षी या ठिकाणीं रोमन लोकांची वसाहत केली असल्यामुळें त्या बादशहावरून या शहराचें ऑगसबर्ग हें नांव पडलें. पांचव्या शतकांत याला हूण लोकांनीं लुटलें. यानंतर तें फ्रेंच राजाच्या सत्तेखालीं आलें. शार्लेमॅननें बव्हेरियाचा ३ रा ड्यूक तासीलो यांच्याशीं जें युद्ध झालें, त्यांत जवळजवळ हें सर्व शहर उध्वस्त झालें होतें. साम्राज्य मोडल्यानंतर हें शहर स्वाबियाच्या ड्यूकच्या हातीं आलें तेव्हांपासून या शहराच्या व्यापाराचा उत्कर्ष होऊं लागला व लवकरच तें इटलि व उत्तरयूरोप यांच्याशीं व्यापार करण्याचें केंद्रस्थान झालें, परंतु १५ व्या व १६ व्या शतकांतील भौगोलिक शोधामुळें येथील व्यापारास थोडा धक्का बसला. इ स. १२७६ पासून १८०६ पर्यंत हें साम्राज्यांतर्गत स्वतंत्र शहर होतें व त्यानंतर तें बव्हेरियाच्या राज्यास जोडलें गेलें.

**आग्नीध्र**—श्रौतकर्मांतील एका ऋत्विजाचें नाव. याच ऋग्वेदांत उल्लेख 'अग्निध' 'अग्निमिंध' या रूपांत आहे. तैत्तिरीय संहितेंतहि वरील रूपांतच याचा उल्लेख आहे. अथर्ववेदांत (२० २, ३, ) मात्र आग्नीध्र असें स्पष्ट रूप आढळतें. ब्राह्मण वाङ्मयापासून सूत्रांत वगैरे आग्नीध्र असा स्पष्ट उल्लेख येतो. या ऋत्विजाकडे कोणकोणत्या यागांत कोणकोणतें कर्म असतें याचें विवेचन विभाग २ वेदविद्या पृष्ठ ११८ येथें आलें आहे.

**आग्नीध्र**—प्रियव्रत राजास, बर्हिष्मतीच्या ठायीं झालेल्या दहा पुत्रांतील ज्येष्ठ पुत्र. क्षारसमुद्रानें वेष्टित जे जंबुद्वीप, त्याचा हा अधिपति होता. यानें, पूर्वचित्ति नामक अप्सरेशीं दहा कोटि वर्षेपर्यंत यथेच्छ समागम करून तिजपासून नाभि, किंपुरुष, हरि, इलावृत्त, रम्यक, हिरण्मय, कुरु, भद्राश्व, आणि केतुमाल असे नऊ पुत्र उत्पन्न केले होते. कांहीं काळानें ती अप्सरा दिव्यलोकीं निघून गेली असता, हा तिच्या विरहानें अत्यंत उदास झाला. नंतर त्यानें आपल्या द्वीपाचे नऊ भाग( वर्ष अशा संज्ञेचे) करून तेथील आधिपत्य एकेक पुत्रास दिलें व अरण्यांत तपार्थ गमन केलें. ( भाग ५ स्कंध अ. १–२ )

**आग्नेयकोसल**—इंद्रप्रस्थाच्या आग्नेयी दिशेकडे असणारा कोसलदेश. याची राजधानी अयोध्या ही सरयू नदीच्या कांठीं आहे. पांडवांच्या वेळेस येथें बृहद्बल नावाचा सूर्यवंशी राजा असून, त्याचा सहोदर दीर्घयज्ञ हा युवराज होता ( महाभा. सभा. अ. ३० ) (वाल्मि रामायण अयोध्याकांड सर्ग ६८).

**आग्यादेवी**.—(सं. मसूरिका; मरा देवी, गुज काकामालिया; हिं माता ) मसूरिका चवदा प्रकारच्या आहेत त्यांतील हा एक भेद आहे. या मसूरिका नीलवर्ण, चपट्या व विस्तीर्ण असून मध्यें खोलगट व महापीडायुक्त अशा असतात. या कांहीं कालानें परिपक्व होतात व फुटून पू स्रवतात यामुळें कंठाचा अवरोध होऊन अरोचकता येते. डोळ्यावर झापड, बडबड व पदार्थावर अप्रीति यांहीकरून युक्त ज्या देवी त्यास आग्यादेवी अथवा सन्निपात मसूरिका असें म्हणतात. ' देवी ' शब्द पहा.

**आग्रा विभाग**–संयुक्तप्रांतांतील एक विभाग. उत्तर रेखांश २६.२२ ते २८.२ आणि पूर्व अक्षांश ७७°.१७, ते ८०, १. यांचे दरम्यान असून, क्षेत्रफळ ८३८४ चौ. मै. आहे. हा संयुक्तप्रांताच्या पश्चिम भागात असून गंगा व यमुनाया नद्यांमधील सर्व दुआब या भागांत मोडतो.

म र्या दा.—उत्तरेस अलीगड जिल्हा आणि पंजाबांतील गुरगाव जिल्हा. पूर्वेस गंगा नदी. दक्षिणेस ग्वाल्हेर, धोलपूर संस्थानें व अलाहाबाद विभाग पश्चिमेसमा भरतपूर संस्थान लागून गेलेलीं आहे. कमिशनर आग्रा शहरीं राहतो.

क्षे त्र फ ळ, लो क सं ख्या व सं रे.–लोकसंख्या(१९२१) ४१,८२,८२५. इ. स. १८७७–७८ हा प्रांत दुष्काळग्रस्त होता व इ. स. १८८१–९१ या काळांत या प्रांतास पुरापासून फार नुकसान पोहोचलें, इ स. १९०१मध्यें हिंदुलोकांची वस्ती शेकडा ९० होती व मुसलमान लोक शेकडा ९ होते. जैन २,८२०५, ख्रिश्चन १०८०५, ' आर्य ' ११३३६. या प्रांतास पांच जिल्हे आहेत. यांत८२ शहरें व ८०८३ खेडीं आहेत. जिल्ह्यांची लोकसंख्या १९२१ सालची व क्षेत्रफळ यांसंबंधी माहिती पुढीलप्रमाणें —

| जिल्हा | क्षेत्रफळ | लोकसंख्या | वसूल |
|---|---|---|---|
| मथुरा | १४४५ | ६,११,१३८ | १७२२७००० |
| आग्रा | १८४५ | ९,२४,१५५ | १९७५००० |
| अलिगड | १६८५ | १०,६१,७४५ | |
| मैनपुरी | ३६७५ | ७,४८,०२७ | १४४५००० |
| इटा | १७३४ | ८,२९,७६० | १३७६००० |

मो ठीं श ह रें –आग्रा, मथुरा, वृंदावन आणि मैनपुरी हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत मथुरा, आणि वृंदावन हीं वैष्णवपंथी धर्माचीं केंद्रस्थानें आहेत मुसलमानी सत्ता सुरू होण्यापूर्वी कनोज हें पुष्कळ घराण्यांचें राजधानीचें शहर होतें. आग्रा शहर सोळा व सतराव्या शतकाच्या पहिल्या भागांत मोंगलांची राजधानी होतें उत्तम इमारतीच्या रूपानें त्याची वैभवकालाची स्मृति तेथें कायम आहे.

इ ति हा स — अकबरानें मोंगल राज्याचे जे बारा सुभे पाडले होते त्यांतील आग्राप्रांत एके काली एक होता याप्रांताला हें नाव हें शहर एके कालीं सुभा माग्रज्याची राजधानी होतें यावरून पडलें. ऐनिइ अकबरीमध्यें या सुभ्याची माहिती येणें प्रमाणें सांपडते.–पलवल ( गुरगाव जिल्हा ) पासून घाटमपूर ( कानपूर जिल्हा ) पर्यंत याची लांबी १७५ कोस व रुंदी कनोज पासून चंदेरी पर्यंत १०० कोस होती. अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत हा सुभा मोंगल बादशाहीचा भाग होता पण वास्तवीक पाहता रजपूत, जाट, मराठे व पठाण हेच याचे दंगर वर्षेपर्यंत राजे होते.

ब्रिटिश अमदानीत या प्रांता पूर्वेकडील भाग बंगाल इलाख्यांत प्रथम सामील केला गेला होता. पण राज्यकारभार चालविण्यास अडचण भासूं लागल्यामुळें या भागापुरती दिवाणी, फौजदारी, न्यायकचेरी व वसुलखातें हीं खातीं १८३१ मध्यें निर्माण करण्यात आलीं. यावर कलकत्ता येथील न्यायाधिशाची कांहीं एक हुकमत चालत नसे. थोड्या वर्षांनीं सध्याचा संयुक्त प्रांत ( औंध सोडून ) व बुंदेलखंड हा एक स्वतंत्र गव्हर्नरच्या ताब्यांतील इलाखा मानण्यानें ठरलें. परंतु ही योजना कधीं अमलांत आली नाहीं पण एक लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्यांत आला. नार्थ वेस्टर्न प्राव्हिन्सेस व औध हें नांव बदलून 'आग्रा व अयोध्येचा संयुक्तप्रांत' असे म्हणण्याचा प्रघात पडला. संयुक्त प्रांतास आतां गव्हर्नर आणि द्विदल राज्यपद्धति आहेत.

**आग्रा जिल्हा**—आग्रा नावाच्या प्रांतांतील त्याच विभागांतील संयुक्तप्रांतांतील एक जिल्हा. उत्तरअक्षांश २६ ४५' ते २७ २४' व पूर्व रेखांश ७७ २६ ' ते ७८ ५१' क्षेत्रफळ १८४५ चौ. मैल. लो. सं. १९२१ साली ६११३३८.

दे श व र्ण न.–उत्तरेस मथुरा व इटा; पूर्वेस मैनपुरी आणि इटावा, दक्षिणेस ग्वाल्हेर व धोलपूर संस्थानें आणि पश्चिमेस भरतपूर. यमुना, बाणगंगा, आणि चंबळा या नद्यांमुळें याचे चार भाग झाले आहेत. हा एकंदर प्रदेश गंगेच्या

काठचा झालेला असल्यामुळें फार सुपीक आहे येथें ५१२ फूट खोलीवर खडक लागतो यमुना नदीच्या उत्तरभागांतील दुआबामध्यें मिळणारीं सर्व झाडें येथें होतात चित्ते, तरस हे डोंगराळ प्रदेशांत आढळतात यमुना नदीच्या आसपास लांडगे व हरीण पुष्कळ आहेत साबर पुष्कळ ठिकाणीं आढळतो नदीमध्यें माशांना कमतरता नाहीं. पश्चिमेकडील वाळूच्या मैदानाला हा प्रांत जवळ असल्यामुळें हवा फार कोरडी आहे. हिंवाळा व उन्हाळा फार कडक असतो, तरी पण हवा रोगकारक नाहीं ज्यानुआरीमध्यें उष्णतामान ५९ असतें, तेंच मेमध्यें ९६ अंशावर असतें पावसाचें सरासरी मान २६ इंच असतें. याचा स्वतंत्र असा महत्त्वाचा इतिहास नाहीं फक्त यातील पुष्कळ शहरांशीं मोगल बादशहाचा संबंध आला दिल्ली राजधानी होण्यापूर्वी आग्रा हें मोगल बादशहाचें राजधानीचें शहर होतें इ स १५२७ मध्यें फत्तेपूर येथें एक मोठें युद्ध झालें त्यांत बाबराचा जय झाला. सिकंदरा येथें अकबराची मशीद आहे आग्र्याच्या शहाजहानानें बांधलेला ताजमहाल तर सर्वत्र प्रसिद्ध आहे सामोगड येथें शहाजहानचें ज्ञातारपण तुरुंगांत गेलें इ स १७६१ मध्यें आग्रा शहर जाट लोकांनी घेतलें पुढें पुष्कळप्रकारें गडबड होऊन इ स १८०३ मध्यें आग्रा लार्ड लेकच्या हस्तगत झालें इ स १८५७ च्या बंडात या भागात पुष्कळ गडबड झाली होती

लोकसंख्या — जिल्ह्यात ११९७ खेडीं व ९ शहरें आहेत इ स सात १९२१ मध्यें लोकसंख्या ९,२४,१५५ होती याच्या तहशिली पाडल्या आहेत त्या येणेंप्रमाणें कोष्टकातील व पुढील लोकसंख्येचें आकडे १९०१ सालचे आहेत

| तहशील | क्षे फ | शहरें | खेडीं | लोक स. | साक्षरता |
|---|---|---|---|---|---|
| इतिमादपुर | २७७ | २ | १८० | १५९८८१ | ४३३३ |
| फिरोझाबाद | २०३ | १ | १८६ | ११९७७५ | ३३२४ |
| बाह | ३४१ | १ | २०४ | १२३५९१ | ३८२४ |
| फतेहाबाद | २४१ | १ | १६१ | ११४७३३ | २८९७ |
| आग्रा | २०२ | १ | १४० | २११०४४ | २१४०९ |
| केरोवली | २७२ | २ | १७१ | १२३८१२ | २६०५ |
| खेरागड | ३०५ | १ | १५५ | १२७६९२ | २९११ |

हिंदूलोक शेकडा ८६ आहेत व मुसलमान शें १२ आहेत १२९५३ जैन, ५५२२ ख्रिस्ती, २३५४ आर्य शेकडा ९९ लोक हिंदी बोलतात व शें १ उर्दू भाषा बोलतात चांभार लोकांची वस्ती सर्वात जास्त म्हणजे १७५००० आहे त्याच्या खालोखाल ब्राह्मण ११७००० रजपूत ८९०००, जाट ६९०००, बनिये ६५०००, कच्छि ५३०००( हा शेतकरीवर्ग आहे, ) कोरी ( कोष्टी ) ३२००० गडरि ( धनगर ) अहीर ( गवळी ), गुसरलोध ( शेतकरी ) मल्ला ( नावाडी व कोळी ) हे प्रत्येकीं ३०००० ते २०००० पर्यंत आहेत येथील मुसुलमान आपणास शेख म्हणवितात पठाण लोक ११००० भिस्ती सय्यद, भणी इत्यादींची लोकवस्ती प्रत्येकी ८०० पासून ६०० पर्यंत आहे शेकडा ४८ लोक शेती करणारे आहेत

शेतकी —जमीन सर्वत्र चांगल्या मगदुराची आहे व पाटाच्या पाण्याचा पुरवठा चांगला मुबलक आहे नदीच्या बाजूला वाळुकामिश्रित जमीन उत्तम सुपीक आहे त्यास "कचउर" हें नांव आहे बुंदेलखंडातील मार जातीच्या जमीनीसारखी काळी जमीन ग्वाल्हेरच्या हद्दीवर पुष्कळ आहे जमीनधाऱ्याची पद्धती—जमीनदारी महाल ११ पूर्ण पट्टी १८२४, व अर्धपट्टीदारी १६६८, याप्रमाणें आहे बाजरी, चणे, जवार, गहू ही मुख्य धान्यें आहेत, कापूस ११८ चौ मै जमीनींत पेरला जातो शेतकीमध्यें सुधारणा होत नाहीं जमीन दिवसानुदिवस कमी लागवडीस येत आहे

| तहशील | ए ज | लागवडीचा | पाण्याची | पडीक |
|---|---|---|---|---|
| इतिमादपुर | २७७ | २०५ | ७५ | २३ |
| फिरोझाबाद | २०३ | १४१ | ६० | १३ |
| बाह | ३४१ | १५० | १२ | २५ |
| फतेहाबाद | २४१ | १६९ | ६० | १९ |
| आग्रा | २०२ | १५१ | ६० | २३ |
| केरोली | २७२ | २१० | ६७ | ३६ |
| खेरागड | ३०९ | २०६ | ३४ | ५६ |

येथील मूळचीं गुरें नावाजण्यासारखीं जातिवंत नाहीत बहुतेक मध्यहिंदुस्थान व पंजाब येथून येतात घोड्याची उपज चांगल्या प्रकारची व्हावी म्हणून वळू घोडे सरकारनें ठेविले आहेत इ स १९०३–४ मध्यें एकंदर लागवडीखाली असलेल्या १२७२ एकर जमीनीपैकीं ३३८ जमीन पाटाच्या व विहिरीच्या पाण्यावर केली गेली होती सर्वांत महत्त्वाची खनिज संपत्ति म्हणजे वालुकामिश्रित पाषाण ( सँडस्टोन )याच्या खाणी केरोली व खेरागड तहशीलमध्य आहेत

अधिकारीवर्ग — कलेक्टर, त्याशिवाय दोन सिव्हिल सर्विस पैकीं माणसें, पाच डेप्युटी कलेक्टर्स आणि प्रत्येक तहशीलीला एकेक तहशीलदार दोन मुनसब व एक स्मालकाजकोर्टाचा जज्ज असतो

साक्षर लोकांचें प्रमाण — शेकडा ४ आहे इ स १९०२—०३ मध्यें २६६ शिक्षणसंस्था होत्या व त्यांत १२९११ विद्यार्थी शिकत होते, त्यात विद्यार्थीनींची संख्या १५१३ होती शिवाय १०२ खाजगी शिक्षणसंस्थेत काम करीत होत्या त्यांत २०९९ विद्यार्थी शिकत होते तीन उच्चशिक्षणाचीं आर्ट कॉलेजें असून त्यांतील दोहोंमध्ये कायदा शिकविला जातो एक वैद्यकाम शाळा आहे शिक्षणाव प्रीत्यर्थ जवळजवळ २॥ लाख रुपये खर्च होतात त्यांतील ६७००० फीचे वसूल झालेले असतात त्या जिल्ह्यात १६ इस्पितळें असून अशक्त रोग्यांची सोय आहे, आग्रा फिरोझाबाद या दोन शहरास म्युनिसिपालिटी आहे व त्या

शिवाय ६ शहरांची इ. स. १८५६च्या २०व्या कायद्याप्रमाणें व्यवस्था आहे.

**आग्रातहसील**-उत्तरअक्षांश २७.३, ते २७,१७ व पूर्व रेखांश ७७५१,ते ७८. १३ यावर असून २०२ चौरस. मैल आहे. इ. स. १९०१ मध्यें येथील लोकसंख्या २९१०४४ होती. यात १४० खेडीं व आग्राशहर असून हें जिल्हा व तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. इ. स. १९०३—४ मध्यें जमीनिचा वसूल ( सरकार सारा २२४००० व इतर कर ३०००० होता. पूर्व व उत्तर या दोन सिमेवरून यमुना नदी वाहत जाते या नदीच्या सोन्यात खणवाण्याच्या नवताच्या दोऱ्या व दरें होतात. यांतील व पुष्कळ रान चराईचें आहे. बहुतेक संबंध तहशील एक पठारच आहे. इ. स. १९०३—४ मध्यें १५१ चौ. मै. जमीन लागवडीस आली.होती आग्रा कनालमुळें पुष्कळ जमीन भिजते. व बाकीची जमीन विहिरींच्या पाण्यावर कसली जाते.

**आग्रा शहर** या जिल्ह्याचें राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण. हें यमुना नदीच्या उजव्या तीरावर उत्तर अ. २७ १०, व पूर्व रे. ७८°३' वर आहे. कलकत्याहून हें रेल्वेमार्गानें ८४३ मैल दूर आहे व मुंबईपासून ८३९ मैलावर आहे. संयुक्त-प्रांतात हें दुसऱ्या नंबरचें महत्वाचें शहर आहे इ स. १९०१ मध्यें लोकसंख्या १८८०२२ होती. त्यापैकीं हिंदूंची संख्या १२१२४५व मुसुलमानांची ५७७६० होती १९२१ मध्यें लोकसंख्या १८५५३२ होती.

इ ति हा स.—याचें पूर्वीचें नाव यमप्रस्थ होतें असें अर्वाचीन कोशकार म्हणतात इ. स. १५०५ मध्यें येथें एक भूकंपाचा धक्का बसला होता. अकबर बादशहाच्या पूर्वी आग्रा शहर लोदी बादशहाची राजधानी होती. त्यावेळीं वस्ती यमुनेच्या पूर्व तीरावर होती. इ. स. १५२६ मध्यें इब्राहिम लोदीचा पराभव झाल्यावर बाबरानें येथें वस्ती केली, व फत्तेपूर शिक्री येथें रजपुताचा पराभव करून राज्याची मुळं खोल दजविल्यावर हें त्याचें नेहमींचें राहण्याचें ठिकाण झालें. तो इ. स. १५३० मध्यें वारला पण त्याचें शव काबूल येथें पाठविण्यात आल्यामुळें येथें त्याची कबर वगैरे नाहीं.

दिल्लीशहर अस्वच्छ वाटल्यामुळें आग्रा येथें यमुनेच्या पूर्व तीरावर अकबरानें प्रथम नवें शहर वसविलें. शिवाय आग्रा हें राज्याच्या मध्यठिकाणीं असल्यामुळें मोठेंमोठे देश-देश ठेवण्यास दिल्लीपेक्षा ज्यास्त सोईस्कर होतें. आग्रा येथून पूर्वेस, उत्तरेस व दक्षिणेस तीन मोठाले रस्ते जात असत. यमुनेच्या पश्चिमकिनाऱ्यावरील जागा मोकळी व जास्त सोयीची वाटल्यामुळें अकबरानें तेथें नवीन इमारती बांधिल्या. तेथील लाल दगडाचा तट स. १५६६ त अकबरानें बांधला. आग्र्याचें पहिलें नाव अकबराबाद असें होतें. जहांगीर याच आग्र्याचा उन्हाता इ.स. बाहून तो आपला वेळ बहुधा लाहोर व काश्मीर या ठिकाणीं काढीत असे. शहाजहानानें आग्रा सोडून दिल्लीची नवीन रचना केली. तथापि. ताजमहाल बांधून आग्र्याचें नाव त्यानें अजरामर करून ठेविलें आहे. शिवाय त्यानें मोतीमशीद, जुम्मामशीद व दिवाण-इ-खासमहाल अशा तीन भव्य इमारती बांधि या. औरंगजेब बहुधा लष्कर घेऊन एकसारखा फिरतीवर असे, म्हणून स्वतंत्र राजधानीची त्यास जरूर पडली नाहीं मेंडेलस्लोनें (स. १६३८ ) आग्र्याचें वर्णन दिलें आहे त्यावेळेस शहरात प्रवाशासाठीं ८० धर्मशाळा असून त्या बहुतेक तीन मजली होत्या. बादशहापाशीं अपार संपत्ति असून तिजवर विशेष सक्तीचा पहारा होता ही संपत्ति निदान तीस कोटि पौंड म्हणजे साडेचार अब्ज रुपये असावी असा मेंडेलस्लोचा अंदाज आहे. आग्र्याची लोकसंख्या ६ लाख होती.

अवरंगजेबानें राजधानी आग्रा शहराहून दिल्लीस नेली. पानिपतच्या मोहिमेपूर्वी अहंमदशहाची जी हिंदुस्थानात स्वारी झाली त्यावेळीं त्यानें आग्रा शहर लुटून फस्त केलें होतें असें १७५७ च्या एप्रिलमधील मराठ्याच्या एका पत्रावरून दिसतें ( रा. खं. १, ६३, १११ ). मोगलाच्या उतरत्या काळात जाट लोकानीं आग्र्यावर पुष्कळ हल्ले केले. इ स. १७६१ मध्यें सुरजमल जाटानें हें हस्तगत केलें. इ. स. १७७० मध्यें मराठ्यानीं जाटाना तेथून हुसकावून दिलें व चार वर्षांनीं तें शहर नजफखानानें घेऊन तो तेथें बादशहाप्रमाणें राहिला. पुढें शिंद्यानीं तें शहर घेऊन इ. स. १८०३ पर्यंत आपल्या हातात ठेवलें. नंतर लार्ड-लेकनें तें घेतल्यावर इ.स. १८३५ मध्यें जेव्हा आग्रा इलाखा निराळा करण्यात आला तेव्हा तें पुनः मुख्य ठिकाण झालें. इ. स. १८५७ च्या बंडात हें एक बंडवाल्याचें मुख्य ठिकाण होतें.

प्रे क्ष णी य स्थ ळें.—येथील किल्ला, जुम्मा मशीद, ताजमहाल, इतिमा उद्दवला याची कबर व चिनीका रोझा व तसेच सिकंदरा येथील अकबराची कबर ह्या मुख्य, प्रेक्षणीय, सुंदर व टुमदार इमारती आहेत येथें प्रवाशाच्या सोयी साठीं पांच हॉटेलें,एकधर्मशाळा व एक डाकबंगला आहे. एक डोळ्याचें व दुसरें बायकांकरिता हॉस्पिटल,शिवाय दोन इतर हॉस्पिटलें येथें आहेत. ताजमहालची माहिती पुढें स्वतंत्र येणार असल्यानें ती येथें दिली नाहीं.

इ.स. १८६२ मध्यें आग्रा शहरास म्युनसिपालिटी मिळाली. इ. स. १९०३—४ मध्यें एकंदर उत्पन्न ५.३ लाख होतं व खर्च ४.८ लाख होता. हें एक फौजेचें ठिकाण आहे.

व्या पा र व उ द्यो ग धं दे.—पूर्वी हें शहर व्यापाराची मोठी पेठ होतें. येथून रजपुतान्यात व मध्यहिंदुस्थानात साखर व तंबाखु पुष्कळ जात असे व तिकडून मीठ कापूस व तूप येत असे. सध्या हें ईस्ट इंडिया ग्रेट इंडियन पेनिन्सुला व राजपुताना-माळवा या रेल्वेचे

मक्तान आहे बाहेरून येणारा माल येथून जवळच्या शहरांतून पोहोंचविला जातो पूर्वी येथे सोन्याची व रुप्याची तार ओढणें, कशिदाचे काम, चित्रें वगैरे, संगमरवरी दगडावरील नकशीकाम वगैरे पुष्कळ कलाकौशल्य असे परंतु यूरोपीयन मालाच्या आवकीमुळें हेधंदे सध्या बसत चालले आहेत इ.स १९०३मध्यें येथें ६ कापसाचे कारखाने होते त्यांत ९५९ मनुष्यें काम करीत होतीं तसेंच ३ सुताच्या कापडाच्या गिरण्या असून त्यात १५६२ मनुष्यांना काम मिळत होतें हल्लीं २ दाडाच्या, ७ कापडाच्या, १ तेलाची, व २ दळणाच्या गिरण्या असून लोखंडाचा, कातड्याचा, सतरंज्याचा, वगैरेंचा असे कांहीं कारखानेहि आहेत आग्र्याच्या जेलमधील सतरंज्या प्रसिद्ध आहेत येथें चार बँकाचे व्यवहार चालतात.

शि क्ष ण सं स्था —संयुक्तप्रांतात आग्रा शहर हें विद्येचें केंद्र आहे इ स १८२३ मध्यें येथें सरकारी कॉलेज सुरु झालें इ स १८८३ मध्यें तें तेथील एका मंडळाच्या ताब्यात देण्यांत आलें इ. स. १८४१ त रोमन कॅथॉलिक कॉलेज उघडण्यात आलें इ. स १८५० मध्यें सेंटजॉन कॉलेज निघालें ५-६ हायस्कुलें व इतर दुय्यम इंग्रजी शाळा असून म्युनसीपालिटीची एक शाळा आहे व २२ शाळांना तिच्याकडून मदत मिळते याशिवाय एक मास्तराकरितां नार्मलस्कूल व दुसरें एक मेडिकलस्कूल आहे या शहरात २० छापखाने आहेत व त्यात तीन मासिकें, एक पंधरवडयास निघणारें पत्र, पाच दर आठवडयास निघणारीं वर्तमानपत्रें व एक दैनिक हीं छापून निघतात

आग्रा हें अकबरचा इतिहासकार अबुलफझल व त्याचा भाऊ सुप्रसिद्ध कवि फैझी यांचें जन्मस्थान आहे मीर टकी, शेख वलि महमद व इतर पुष्कळ फारसी ग्रंथकार येथें १९ व्या शतकांत होऊन गेले

**आग्रा कॅनाल (कालवा)**—दिल्ली शहराच्या खालच्या अंगाला ११ मैलावर घेतलेला यमुना नदीचा कालवा हा उत्तर हिंदुस्थानातील पाटबंधाऱ्याच्या कामात एक महत्वाचा आहे पूर्वी दुष्काळात ज्या प्रदेशाला फार नुकसान पोंहोचत असे अशा प्रदेशाचें यानें संरक्षण होत इ स १९०४ मध्यें मुख्य भागाची लांबी १०० मैल होती पाणी वाटून देणाऱ्या मार्गाची लांबी ६२३ मैल, व ड्रेनेजकरिता १९१ मैल होती हा कालवा इ स १८७४ मध्यें तयार झाला व इ स १८७५ च्या वसंतऋतूंत त्याचा उपयोग होऊं लागला इ स १९०४ पर्यंत या कामासाठीं १०२ लाख रुपये खर्च झाला या कालव्याखालीं ५९७००० एकर जमीन भिजू शकते ती येणप्रमाणें—दिल्ली ८००० एकर, गुरगाव जिल्हा २१०००० एकर, मथुरा २२८००० व आग्रा जिल्हा १५१००० एकर इ स १९०३ ०४मध्यें २६०००० एकर जमीन या कालव्याच्या पाण्यावर कसली जात होती इ स.१९०३-०४ मध्यें एकदर उत्पन्न ८ ४ लाख व खर्च वजा जाता निव्वळ उत्पन्न ५ ६ लाख होतें, म्हणजे एकदर भांडवलावर शेंकडा ५॥ व्याज पडलें या कालव्याच्या १२६ मैलाच्या भागात बोटींतून मालाची ने आण करणं शक्य होतें परंतु तो धंदा किफायतीचा होईना इ स १९०३-०४मध्यें फक्त १४२७१ टन माल या नदींतून नेण्यात आला इ स १९०४मध्यें ही ने आण बंद करण्यात आली, कारण त्यापासून कालव्याचा मुख्य उद्देश जो जमीनीला पाणी पुरविणें त्यांत व्यत्यय येऊं लागला

**आंग्लो इंडियन**—यांना पूर्वी युरेशियन किंवा ईस्टइंडियन म्हणत मिश्र रक्तापासून उत्पन्न झालेल्या या संततीस हाफ कास्ट अशा तऱ्हेच्या तुच्छतादर्शक संज्ञेऐवजी चांगलें भारदस्त असें "आंग्लो इंडियन" हें नाव "यूरोपियन अँड आंग्लोइंडियन डिफेन्स असोसिएशननें 'पुष्कळ विचाराअंतीं शोधून काढिलें व हिंदुस्थानसरकारनें एक ठराव करून त्याला मान्यता दिली हल्लीं या लोकांना यूरेशियन म्हटल्यास आवडत नाहीं यूरेशियन हें नाव मार्क्विस आफ हेस्टिंग्जनें यांना दिलें. मुख्यत्वें करून यूरोपियन बाप व नेटिव आई यांच्यापासून झालेल्या संततीस पुष्कळ दिवस पर्यंत ईस्ट इंडियन या नावानें ओळखीत सबब यूरेशिअन लोक यूरोपियन पुरुषाची व एतद्देशीय स्त्रियांची संतति नव्हेत पुष्कळ संतति इंग्रजांच्या दृष्टीनें प्रतिलोमहि आहे अशा प्रसंगीं बाप ख्रिस्ती असल्यास मिश्र संतति यूरेशियनांत मोडे, बाप मुसुलमान असल्यास मुसलमानात मोडे, हिंदु स्त्रीस लग्न न करतां इंग्रजापासून प्रजा झाली तर ती प्रजा हिंदूमध्येंच मोडते. हिंदु पुरुष व यूरोपियन स्त्रिया अशीं लग्नें फार अलीकडे कांहीं झाली आहेत आणि त्यापासून झालेल्या प्रजेच्या सामाजिक भवितव्याविषयीं आज कांहींच विधान करता येत नाहीं. यूरेशियन लोकांचीं हाफ कास्ट, चीचि (चड्डा?) कर आणि त्यांच्या उच्चारावरून त्यास लावलेलें "चीं चीं बात" हीं दुसरीं नावें असून तीं त्यांना बेअब्रूकारक वाटतात ईस्ट इंडयनांना फिरंगी असेंहि म्हणत यूरेशियन समाजातील रक्तें पाहू गेल्यास तीं फारच बहुविध आहेत असें दिसून येईल अनेक यूरोपीयन राष्ट्रांचीं रक्तें या समाजात आहेत याला त्यांची आडनांवेंच साक्ष देतील

व श वि चा र — पोर्तुगाज, डच, ब्रिटिश, डॅनिश, फ्रेंच इत्यादि यूरोपीय राष्ट्रांचें या जातीवरचें वर्चस्व खालील यूरेशियन आडनांवाच्या बहुभाषी भेळमिसळीवरून उघड दिसून येतें —गोमेज, दसुझा, गोनसाल्वेस, रोझारियो, कामाल, दकूझ, द कास्ट, द सिल्वा, फर्नांन्डिझ, फोनसेका, लाझारो, हेन्रीकेस, झेवियर, मेन्डोंझा, राड्रिग्झ, सलडाना, आल्मेडा, हेल्ड, व्हानस्पाल, जानसेन, आगस्टाइन, निसन, कार्नेलें, ला ब्रान्ज, लाव्होकाट, पास्कल, डब्राईन, आबर्ट, रायन मॅकर्कटिश, मॅक्फर्सन, हॅरिस, जानसन स्मिथ, इत्यादि

प्राचीन यूरेशियनांचा वंशावळ अज्ञात आहे १९१५ सालीं मद्रास येथें भरलेल्या इंडियन सायन्स कांग्रेस" मध्यें डा आनंडेल यांनीं यूरेशियन लोकांवर एक निबंध वाचला

आणि प्रकाशचित्रेंहि दाखविलीं. त्यावरून असें दिसून आलें कीं, बरेचसे यूरेशियन अस्सल गोरे तोंडवळ्याचे, काहीं बंगालीबाबूप्रमाणें तोंडवळ्याचे, काहीं नीग्रोसारखे, काहीं मलायी लोकांसारखे, काहीं सामान्य कॉकेशियन तोंडवळ्याचे असे दिसतात. आणि काहीं चिनी लोकांप्रमाणें हुबेहुब दिसतात. त्यावरून कलकत्त्याच्या यूरेशियन वसतींत फार भिन्न रक्तें आहेत. यूरेशियन लोकांमध्यें जितकें आणे इंग्रज रक्त असेल तितक्या आण्यांनीं त्याची पदवी ठरवीत असा त्यांच्यात एक काळ होऊन गेला. ब्रिटिशांनीं मद्रास येथें आपली वसाहत केल्यावेळीं, व्यापारी व सैनिक, यांच्या बरोबर स्त्रियांचा भरणा कमी असल्यामुळें ते या देशांतील स्त्रियांशीं वाटेल तसा संबंध जोडूं लागले. शिवाय, यावेळीं ब्रिटिशांच्या ताब्यांतील प्रदेश इतर यूरोपियन व एतद्देशीय शत्रूंपासून बचावणें भाग पडत असल्यानें, वरिष्ठ अधिकाऱ्यांवरून सैन्याला उपयोगी पडेल या इराद्यानें उत्तम संकरप्रजा तयार करण्याचा प्रयत्न जारीनें होऊं लागला. अवलाद सुधारण्यासाठीं, भिन्न वंशाचें रक्त तींत घालून तिला सामर्थ्यवान् करण्याकरितां संकरसंयोग अवश्य आहे अशी त्यावेळीं समजूत होती, व या कामीं ब्रिटिश सैनिकांचा उपयोग करण्यांत आला. यापुढें जसजशी ब्रिटिश वसाहतवाल्यांची संख्या वाढत चालली व मातृभूमीशीं व्यवहार करणें सुसाध्य होऊन इंग्लिश बायका मिळेनातशा झाल्या, तसतसा येथील इंग्रजांचा एतद्देशीय किंवा यूरेशियन स्त्रियांशीं संबंध घटूं लागला. हल्लीं यूरेशियन पुरुष बहुधा आपल्याच जातींतील बायको करितो त्यामुळें ही जात नष्ट होत नाहीं. तथापि खानेसुमारींत या संकरजातींतील पुष्कळ लोक आपणाला यूरोपियन या जातिवर्गांत घालून घेत असल्यानें दिवसेंदिवस यांची संख्या कमी कमी दिसण्याचा संभव आहे.

लो क सं ख्या.—१९११ तील यांची संख्या १०१६५७ होती. फिरती वगळल्यास ती १००४५१ भरेल इ. स. १९०१ मधील संख्येपेक्षां ही संख्या १५ टक्क्यांनी जास्त आहे. मद्रास ( २६००० ), आणि बंगाल ( २०००० ) प्रांतांत यांची वस्ती अतिशय आहे. संयुक्त प्रांत, मुंबई, आणि ब्रह्मदेश या ठिकाणीं यांची संख्या ८ ते ११ हजारांपर्यंत भरते. बिहार आणि ओरिसा, मध्यप्रांत आणि वऱ्हाड, व पंजाब यांत ती सुमारें २५०० आहे. संस्थानांतून, विशेषतः म्हैसूर व हैद्राबाद या प्रांतांत एकंदर १४००० च आंग्लोइंडियन दिसतात. १९०१ सालापेक्षां यांची संख्या जी वाढलेली दिसते यांचें कारण, जर हें नवीन नांव न मिळतां पूर्वीचेंच यूरेशियन हें नांव कायम असतें तर ज्या ख्रिस्त्यांनी आपणांस यूरोपियन म्हणून घेतलें असतें, त्यांनीं आंग्लोइंडियन या सदरांत आपलें नांव नुसतें घालू दिलें हें होय. शिवाय पुष्कळशा इंडियन ख्रिस्त्यांनीं आपण आंग्लोइंडियन असें सांगितलें म्हणून ब्रिटिशांच्या ताब्यांत आल्यापासून तेथें यूरोपियनांप्रमाणें आंग्लोइंडियनांची संख्या फार झपाट्यानें वाढली. येथें दर हजार आंग्लोइंडियन पुरुषांशीं बायकांचें प्रमाण ९८४ आहे, म्हणजे हिंदुस्थानांतील बायकांच्या प्रमाणाहूनहि हें थोडें जास्त आहे. एकंदर आंग्लो-इंडियनांमध्यें निम्म्याहून जास्त रोमन कॅथॉलिक व ⅓ अँग्लिकन आहेत; प्रेसबिटेरियन बॅप्टिस्ट आणि मेथॉडिस्ट शेंकडा २ पासून २½ पर्यंत आहेत. आंग्लो-इंडियन शब्दाची व्याख्या कायद्यानें समाधानकारक नाहीं. जे यूरोपीयन लोकांचे वंशज ते कायद्याच्या काहीं बाबतींत यूरोपीयन म्हणून गणले गेले आहेत. आणि तेच दुसऱ्या काहीं गोष्टींत आंग्लो इंडियन म्हणून वर्णिले गेले आहेत.

आं ग्लो-इं डि य न व यू रो पी य न यां चा सा मा जि क सं बं ध.—हा फार अनिश्चित आहे. गरीब यूरोपीयन लोकांचीं जरी यांच्याबरोबर लग्नें होतात तरी त्यास यूरोपीय वर्गाच्या शूद्राप्रमाणें वागविलें जातें. नुकतेंच म्हणजे १९२३ सालीं बेनेट नांवाच्या एका आंग्लो-इंडियन कुटुंबानें एका इंग्रज अनाथ मुलीस पालन करण्यास घेतलें. तिचें इंग्लंडपासून येण्याचें बोटभाडें दिलें, आणि तिला संवर्धनासाठीं ठेवलें, हें यूरोपीयन लोकांस सहन न होऊन त्यांनीं त्या मुलीला बेनेट कुटुंबापासून परत घेऊन इंग्लंडला परत पाठविलें ( याचा खर्च मात्र हिंदुस्थानानें दिला ). या उदाहरणावरून इंग्रज व यूरेशियन यांमधील वृत्ति व्यक्त होते.

आं ग्लो-इं डि य नां ची रा ज की य वृ त्ति.—आजपर्यंत आंग्लोइंडियन वर्ग बहुतांशीं सरकार व इंग्रज भांडवलवाले यांच्या कृपेवरच अवलंबून असे. व त्याचें राजकीय ध्येय एवढेंच होतें कीं, इंग्रज सरकारनें त्यास अधिक पसंतीनें वागवावें आणि देश्य व इंग्रज यांच्या मधील पगाराच्या, मोठमोठ्या अधिकाराच्या जागा त्यास द्याव्यात, रेल्वे कंपन्यांनीं त्यास देश्यांपेक्षां अधिक पगारावर नेमावें, आणि इंग्रज सरकारनें त्यास अधिक पसंतीनें वागविणें शक्य व्हावें यासाठीं स्वराज्याविरुद्ध त्यांनीं चळवळ करावी, निदान स्वराज्यविषयक बाबतींत उदासीन असावें. त्यांना इतकें पसंतीनें वागविण्यांत येई कीं, त्यांनीं यूरोपीयन लोकांना हुंडणावळीमुळें येणाऱ्या तोट्याबद्दल मिळणारी रक्कमहि यूरोपीयन म्हणून मागून मिळविली होती. त्यांच्या या प्रकारच्या वृत्तींत १९१९ सालच्या स्वराज्याच्या हप्त्यानें बराच फरक पडूं लागला आहे. त्यांची "आंग्लो-इंडियन अँड डोमिसाइल्ड यूरोपीयन असोसिएशन" स्थापन झाली असून तिच्या शाखा दर प्रांतांत आहेत. या संस्थेनें राजकीय व सामाजिक गोष्टींत या वर्गाची उन्नति करण्यासाठीं बरीच खटपट चालविली आहे. त्यांनीं असें ओळखिलें आहे कीं, दिवसानुदिवस आंग्लो इंडियन लोकांस अधिक पसंतीनें वागविण्यास सरकार असमर्थ होत चाललें आहे, हिंदुस्थानांतील इतर लोकांबरोबर सहकारिता करून आणि त्यांमध्यें आपल्याविषयीं

प्रेम वाढवून आपण आपला कार्यभाग करून घेतला पाहिजे आपण इंग्रज नव्हे, तर आपण हिंदुस्थानचे नागरिक आहों हें प्रत्येकान लक्षात घेतले पाहिजे हिंदुस्थानच्या नैतिक, सामाजिक, औद्योगिक बौद्धिक आणि राजकीय उन्नतीसाठीं इतर भारतीयाबरोबर आपणहि झटलें पाहिजे, आपण दीड लक्ष लोकांनीं तीस कोटि इंडियन लोकापासून दूर राहण्याचा प्रयत्न केल्यास तें आत्मघातकी होईल, रेल्वे वगैरेंच्या ठिकाणीं नोकरी करणाऱ्या आंग्लो इंडियन लोकाकडून इंडियन लोकांचा अपमान होऊं नये या बद्दल काळजी घ्यावी १९२३ च्या एप्रिल महिन्यात मद्रास मधील आंग्लो इंडियनानीं आपल्या जातीचीं आपण आपणास इंडियन म्हणवावें कीं, आंग्लोइंडियन म्हणवावें कीं यूरोपियन म्हणवावें याविषयीं मतें घेतलीं तेव्हा १२२मतें, आपण इंडियन म्हणवून घ्यावें अशीं पडलीं (टाइम्स आफ इंडिया १५।४।२३) या सुमारास कलकत्याच्या त्यांच्या एका परिपदेनें ठराव केले ते येणेंप्रमाणें —(१) ब्रिटिश साम्राज्यांत सनदशीर पद्धतीनें हिंदुस्थानला स्वराज्य मिळविण्यासाठीं प्रयत्न करणें, (२) लष्करात अधिकाधिक प्रवेश करून घेणें,(३) लष्कर ईंडियनाइझ करताना म्हणजे लष्कराच्या ठायीं भारतीयत्व स्थापन करताना आपल्या प्रवेशास व्यत्यय होऊ नये, आणि देहराडून येथें हिंदी ऑफिसर तयार करण्यासाठीं जें कॉलेज काढलें आहे त्यात आपलाहि प्रवेश व्हावा आंग्लो इंडियनाच्या स्वतंत्र पलटणी कराव्यात व त्यावर त्यांचेच अधिकारी असावेत

१९२१च्या मे महिन्यात सिमल्यास एक प्रसिद्धिपत्रक छापलें गेलें त्यात आंग्लो इंडियन लोकास लष्करी खात्यात काय सवलती देण्यात येतील याचें विधान आहे आंग्लो इंडियनाच्या तोफखाना, रिसाला व पायदळ यांच्या स्वतंत्र पलटणी जरी तयार करण्यात येणार नाहींत तरी त्यांचा उपजीविकाक्षेत्र म्हणून सिमलरायफल्स, मोटारीवरील तोफखाना, आणि किनाऱ्यावरील तोफखाना यात, तसेंच सप्लाय आणि ट्रान्सपोर्ट खात्यात प्रवेश होणार आहे, आणि त्यात पगाराची पद्धति इंग्रज नोकराप्रमाणेंच राहील

**आंग्लो इंडियन वाङ्मय, प्रस्तावना** — भारतात निरनिराळे मे पंथ, जाती आणि विचारसंप्रदाय आहेत व ज्या निरनिराळ्या भाषा आहेत त्यामुळें निरनिराळीं वाङ्मयें उत्पन्न होतात सर्व देशव्यापकवाङ्मय देशात असतेंच त्याबरोबर विशिष्ट वाङ्मयेंहि असतातच प्राचीन कालापासून ही प्रवृत्ति दिसत आहे सर्वजनव्यापी वाङ्मय संस्कृतमध्यें असे परंतु विशिष्टजनव्यापी वाङ्मय कधीं कधीं संस्कृतात तर कधीं कधीं प्राकृतमध्यें होई. महाराष्ट्रीय वाङ्मय हें विशिष्ट पण प्रादेशिक होय, तर बौद्धाचें पाली वाङ्मय आणि जैनाचें प्राकृत वाङ्मय हें सांप्रदायिक होय संस्कृत हें शिष्टवाङ्मय पडलें त्यामुळें लोकप्रिय चाली आणि लोकप्रिय गाणीं संस्कृतात फारशीं शिरलीं नाहींत लोकप्रिय चालींना प्रवेश संस्कृतमध्ये अगदीं झाला नाहीं असें नाहीं आचार्यांच्या नावावर खपणारी त्यांची चर्पटपंजरी, जयदेवाची अष्टपदी किंवा अर्वाचीनात प्रचलित असणारें 'मंदमंद वायुविचलति" हें पद हीं सर्व लौकिक वाङ्मयाचा किंवा लौकिकवाङ्मयाश्रित ग्रंथरूपाचा संस्कृत भाषेंत प्रवेश दाखवितात गुणाढ्याचा बृहत्कथासागर, कथासरित्सागररूपानें अखिलभारतीय झाला ही गोष्ट वरील नियम स्पष्ट करिते सध्याचें हिंदुस्थानात जें इंग्रजी वाङ्मय तयार झालें आहे तें अनेक प्रकारच्या कारणामुळें व अनेक प्रकारच्या मागण्यांनीं उत्पन्न केलें आहे. लोकाना जबाबदार नसलेली राजसत्ता आपलें लिखाण देशी भाषेंत न करता परकीय भाषेंत करी यांत नवल नाहीं हिंदुस्थानातील देशी संस्थानें आपले अहवाल इंग्रजींतच छापतात याचें कारण त्यास लोकमताची जबाबदारी फारशी वाटत नसून इंग्रज सरकारासच आपण जबाबदार आहोंत असें वाटतें वर्तमानपत्रें इंग्रजींतच पुष्कळ चालवावीं लागतात याचें कारण संपादकाची टीका सरकारच्या नजरेस पडला पाहिजे हें होय

आंग्लो इंडियन वाङ्मय म्हणजे भारतविषयक व भारतभूमीवर झालेलें इंग्रजी वाङ्मय याचें व्यापक क्षेत्र म्हणून येणेंप्रमाणें सांगता येईल (१) इंग्रजाचे इतिहास व इतिहाससाधनें, (२) इंग्रजांचे प्रवासविषयक ग्रंथ, (३) हिंदुस्थानातील वाङ्मयाचीं इंग्रजी भाषांतरें, (४) सरकारी अहवाल व कागदपत्रें, (५) कॉंग्रेससारख्या देशी संस्थाचे अहवाल किंवा देशी वर्तमानपत्रें, मासिकें वगैरे, (६) राजकीय, सामाजिक किंवा पारमार्थिक प्रश्नासबधानें किंवा विषयासबधानें देशी लोकांनीं व इंग्रजानीं केलेलीं स्वतंत्र पुस्तकें, (७) इंग्रजानीं किंवा आंग्लकुलसंभवानीं उत्पन्न केलेलें ललित वाङ्मय,(८) देश्यानीं उत्पन्न केलेलें इंग्रजी ललित वाङ्मय,(९) संशोधनात्मक वाङ्मय यापैकीं ललित वाङ्मयाकडेच सध्या लक्ष देऊं. इतर विषयावरील वाङ्मय त्यातील विषयाप्रमाणें अनेक सदरात जाईल

**ललित वाङ्मय** —हिंदुस्थानात इंग्रजी राज्य स्थापन झाल्यामुळें कल्पनाप्रचुर भावनासंपन्न व गूढविचारात्मक पौर्वात्य भूमिकेंत पाश्चात्य वाङ्मयाच्या बीं रुजविण्याचा प्रसंग अवचित घडून आला देश्य व परकीय या दोन वाङ्मयाचा पूर्ण मिलाफ होणें शक्य नव्हतें परंतु त्यांचा एकमेकावर कांहींच परिणाम होऊ नये हेंहि दुरापास्त होतें त्यामुळें अखेर मिश्र विचाराचें आंग्लो इंडियन ललितवाङ्मय निर्माण झालें यात नामांकित लेखकांची संख्या अल्प प्रमाणात आहे

हिंदुस्थानातील निरनिराळ्या वनस्पतींचें व प्राणिमात्राचें नयनमनोहर स्वरूप पाहून कोणाहि परदेशस्थ लेखकास स्फूर्ति झाल्याशिवाय राहणें शक्य नव्हतें सर्व जगात अत्युच्च व बर्फाच्छादित शिखरें धारण करणाऱ्या पर्वताच्या रांगा येथ आहेत भागीरथीसारख्या नद्यांच्या दर्शनानें जरा

कोणांस काव्य करण्याची स्फूर्ति झाली तर त्यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं त्याचप्रमाणें येथें प्रत्यही दृष्टीस पडणारे जातीजातींतील व निरनिराळ्या पंथाच्या लोकांतील परस्पर कलह पाहून विचारी मनुष्यास नवीन विचार सुचल्या शिवाय रहात नाहींत. याशिवाय आंग्लोइंडियन लोकांच्या आयुष्यक्रमातील कांही विशिष्ट अनुभवामुळेंहि कांहीं विचार व भावना उत्पन्न होऊन त्यायोगानें वाङ्मयाचें कार्य होणें अपरिहार्य होतें.

द्रव्यार्जन करणे व कीर्ति मिळविणे यापैकीं कोणत्या तरी एका हेतूनें प्रेरित होऊन लेखक वाङ्मयाचें कार्य करण्यास प्रवृत्त होतो असें मानण्यास हरकत नाहीं हिंदुस्थानांतील आंग्लोइंडियन लेखकांस द्रव्यार्जनाच्या बुद्धीनें लेखनाचें कार्य करण्याची आवश्यकता नसते ही अनुभवाची गोष्ट आहे. जेव्हां एखादा इंग्रज नोकरी, धंदा किंवा व्यापार करण्याकरिता हिंदुस्थानात येतो तेव्हां त्याची अगोदरपासूनच सर्व प्रकारची उत्तम व्यवस्था करून ठेवलेली असते. त्यामुळें जर त्याला वाङ्मयविषयक कार्य करण्याची इच्छा झाली तर तो तें आपल्या फुरसतीच्या वेळीं करणार हें उघड आहे. आणि फुरसतीच्या वेळीं व आरामखुर्चीवर पडून केलेलं कार्य साधारणप्रतीचें व्हावें ही गोष्ट ओघानें प्राप्त होणारी आहे.

आंग्लोइंडियन ललितवाङ्मय अगदीच साधारणप्रतीचें का व्हावें यास दुसरींहि अनेक कारणें देण्यांत येतात. त्यापैकीं एक असें आहे कीं इकडील वरिष्ठ अधिकाऱ्याच्या मतानें, जर एखादा अंमलदार लेखनाचें कार्य करूं लागला तर त्याजकडून त्याच्यावर सोंपविलेलें सरकारी काम नीट रीतीनें होणार नाहीं, आणि म्हणून वरिष्ठ अधिकारी होता होईल तों तशा लेखकांस त्याच्या लेखनकार्यापासून परावृत्त करितात. दुसरें असें कीं, आंग्लोइंडियन वाङ्मय वाचणारा वाचकवर्ग अगदीं अल्पसंख्याक असल्यामुळें लेखकास आपलें कार्य करण्यास नीटपणें उत्तेजन मिळत नाहीं. तिसरें असें कीं जो इंग्रज हिंदुस्थानांत येतो तो आपल्या व्यवसायात निमग्न असतो. त्याला इतर काम करण्यास फुरसत नसते, तें करण्याची त्याला आवश्यकताहि नसते. जर कीर्ति मिळविण्याच्या हेतूनें तो लेखनाचें कार्य हातीं घेईल तर इंग्रज लोकांचें इंग्लंड व हिंदुस्थान यामध्यें एकसारखें दळणवळण चालू असल्यामुळें त्यानें लिहिलेले ग्रंथ वाचण्याला कायमचा वाचकवर्गहि मिळणें मुष्किलीचें होईल अशा स्थितींत हल्लीं उपलब्ध असलेलें वाङ्मयहि कसें निर्माण झालें याचें आश्चर्य वाटतें.

असो. वर निर्दिष्ट केलेल्या विपरीत स्थितींत आंग्लोइंडियन वाङ्मयाचा विस्तार हळूहळू वाढत गेलेला आहे. हिंदुस्थानचें सृष्टिसौंदर्य, एतद्देशीयांचा आयुष्यक्रम व निरनिराळे धर्मपंथ हे सर्व विषय आंग्लोइंडियन वाङ्मयात येऊन गेलेले आहेत. परंतु सर्व प्रकारच्या गद्यात्मक व पद्यात्मक आंग्लो-इंडियन वाङ्मयांत चहूंकडे भरलेला एक विषय म्हटला म्हणजे स्वदेशविरहविलाप हा होय.

ललित वाङ्मयारंभ—हिंदुस्थानातील आंग्लोइंडियन ललितवाङ्मयास इ. स. १७८३ सालीं प्रारंभ झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं यापूर्वीचा काळ लढाया, रक्तपात राजकारणी मसलती, हिंदुस्थानासारखा हिरा आपल्या मुठींत असावा याकरिता दोन पाश्चात्य राष्ट्रांत चालू असलेला लढा आणि शिस्तीनें चालणाऱ्या अल्पसंख्याकांनीं शिस्तीनें न चालणाऱ्या बहुसंख्याकांवर मिळविलेला विजय इत्यादि गोष्टींनीं व्यापलेला आहे तो काल लेखणी बाजूस ठेवून तरवार चालविण्याचा होता शांततेच्या काळांत उदय पावणाऱ्या वाङ्मयास शस्त्रास्त्राच्या खणखणाटांत वर डोकें करण्यास अवकाश न मिळावा हें साहजिक आहे.

इ. स. १७८३ सालीं आंग्लोइंडियन वाङ्मयाचा उदय झाल्यापासून एकोणिसाव्या शतकाचीं पहिलीं तीस वर्षे संपेपर्यंत फक्त दोनच ग्रंथकारांचीं नावें प्रामुख्यानें नमूद करण्यासारखीं आहेत आणि तीं म्हणजे सर विल्यम जोन्स व जॉन लेडन हीं होत. इतर सर्व वाङ्मयाप्रमाणें ऑंग्लोइंडियन वाङ्मयाचाहि प्रारंभ कवितेपासून झाला.

सर विल्यम जोन्सः—सर विल्यमजोन्स हा प्राधान्येंकरून कायदेपण्डित , व पौर्वभाषाभिज्ञ होता आणि कविता करणें हा त्याच्या कार्यक्रमातील गौण भाग होता. तो इ. स. १७८३ मध्यें न्यायाधीशाच्या जागेवर कलकत्त्यास आला. आपल्या जागेवर रुजू झाल्याबरोबर त्यानें स्वतःस शास्त्रीय व भाषाविषयक संशोधनाच्या कार्यास वाहून घेतलें, आणि "दि कलकत्ता सोसायटी" या नावाची संस्था स्थापून तिचा तो पहिला अध्यक्ष झाला. इंग्लंडमध्यें असतानाच त्यानें पौर्व विषयाचा व्यासंग केलेला होता आणि हिंदुस्थानात आल्यावर तर त्यानें चहूंकडे प्रवास केला आणि पौर्व अद्भुत व गूढविद्येचें संपूर्ण ज्ञान करून घेतलें. तें ज्ञान संपादन करीत असतां त्यांतील कांहीं भाग केवळ इंग्रजी वाचकांकरितां इंग्रजी कवितेतून प्रसिद्ध करण्याचा त्यानें क्रम ठेवला होता. अशा तऱ्हेचें वाङ्मयकार्य करण्यास तो सर्वतोपरी पात्र होता. कार्यकर्तृत्वास प्रधान धर्म मानून आळसात काळ घालविणे हें मोठे पाप आहे असें समजणाऱ्यांपैकीं तो एक होता.

ऑंग्लोइंडियन—काव्य—लेखकांत सर विल्यम जोन्स याला ज्या काव्यांवरून येवढें श्रेष्ठ स्थान प्राप्त झालें तीं अशीं: (१)" दि एचॅन्टेड फ्रूट, ऑर हिंदू वाईफ, "( २ ) संस्कृत, पर्शिअन व अरेबिक काव्यांचीं भाषांतरें आणि (३) अनेक देवतांचीं स्तोत्रें.

(१) 'दि एन्चॅंटेड फ्रूट ऑर हिंदु वाईफ',—हें सर विल्यम जोन्स याचें सर्वांत मोठें काव्य आहे. त्यांतील कथानक प्रलयकाळापूर्वीचें आहे असें कवीनें म्हटलें आहे. हें

कथानक असें:-पांच भाऊ व त्या सर्वांची मिळून एक पत्नी, असे महाजन एका फळझाडापाशीं गेले व त्या भावापैकीं एकानें त्या झाडावर साठ हाताच्या उंचीवर असलेलें फक्त एकच फळ नेम धरून पाडलें तें फळ पाडलेलें पाहून ब्राह्मण त्यास म्हणाले, हें तुम्ही पाडलेलें फळ एका महामुनीचें आहे आणि तें जर तुम्ही जागच्या जागीं लटकावून न द्याल तर तुमचा नाश होईल "तें जागचे जागीं जाऊन चिकटण्यास एकच उपाय आहे आणि तो उपाय म्हटला म्हणजे प्रत्येकानें आपण केलेलीं पापें अगदीं सत्यनिष्ठपणानें व प्रामाणिकपणानें तावडतोब कबूल करावींत त्या पाच भावांनीं आपआपलीं पापें कबूल केल्यावर तें फळ पन्नास हात वर चढलें आता तें फळ फक्त दहा हात वर जावयाचें राहिलें होतें परंतु त्या भावांच्या पत्नीनें आपलें पाप पूर्णपणें कबूल न केल्यामुळें तें फळ फक्त आठच हात वर चढलें अखेर सर्व भावांनीं आग्रह केल्यामुळें ब्राह्मण गुरूनें आपलें चुंबन घेतल्याची तिनें कबुली दिली. याप्रमाणें तिनें कबुली दिल्यावर तें फळ लगेच आपल्या जागीं जाऊन चिकटलें आणि त्या सर्वांचे प्राण वाचले.

( २ ) संस्कृत पर्शियन व अरेबिक काव्यांची भाषांतरें.- सर विल्यम जोन्सनें केलेलीं भाषांतरें सुरस व सुंदर आहेत त्या सर्वांत कविकुलगुरु कालिदासाच्या अभिज्ञानशाकुंतल नाटकाचें भाषांतर तर अप्रतिम झालें आहे इंग्रजी वाचकास संस्कृत नाटकाची कल्पना येण्यास तें एक उत्तम साधन झालें ही गोष्ट निर्विवाद आहे

( ३ ) अनेक देवतांचीं स्तोत्रें,— सर विल्यम जोन्स यानें ज्या आठ हिंदु देवतांवर स्तोत्रें रचिलीं आहेत त्यांचीं नांवें येणें प्रमाणें—कामदेव, प्रकृति, इंद्र, सूर्य, लक्ष्मी, नारायण, सरस्वती आणि गंगा.

इ. स. १७९४ मध्यें सर विल्यम जोन्स निवर्तल्यावर जवळ जवळ दहा वर्षें आंग्लो-इंडियन वाङ्मयांत कांहींच भर पडली नाहीं.

जॉन लेडन —इ. स. १८०३ मध्यें जॉन लेडनसारखा सुप्रसिद्ध कवि व लेखक हिंदुस्थानांत आला त्याचें भाषाज्ञान सर विल्यम जोन्सच्या बरोबरीचें होतें लेडन हा इ. स. १८०३ च्या अखेरीस हिंदुस्थानांत आला आणि लागलीच त्यानें आपलें लेखनकार्य सुरू केलें या पूर्वी त्यानें "सीन्स ऑफ इन्फन्सी" "लॉर्ड साउलिस" "दि मर्मेड" "दि एल्फिन किंग" इत्यादि काव्यग्रंथ लिहिले होते आणि त्यावरून हिंदुस्थानांत आल्यानंतरहि काव्यकर्तृत्वाचें काम करण्याची आपली पात्रता त्यानें सिद्ध केली होती

गंगानदीच्या मुखाजवळ असलेल्या सागर नांवाच्या बेटांत त्यानें "व्हेंगेंस" हा काव्यग्रंथ लिहिला त्यानंतर "ओड ऑन लीव्हिंग वेलार" "डर्ज ऑफ दि डिपार्टेड इयर" "क्रिस्टमस इन पेनांग" "व्हर्सेस ऑन दि डेथ ऑफ नेल्सन" "ओड ऑन दि बॅटल ऑफ कोरुना" आणि "दि बॅटल ऑफ आसई" हे काव्यग्रंथ त्यानें लिहिले परंतु वरील सर्व काव्यापेक्षा "ओड टु ॲन इंडियन गोल्ड कॉइन" या त्याच्या काव्यांत काव्यरस उत्कृष्ट उतरला आहे. हिंदुस्थानांत आल्यावर आंग्लो इंडियन लोकांच्या मनांत जे मनोविकार उद्भवतात ते सर्व सदर काव्यांत उत्तम रीतीनें व्यक्त झाले आहेत हिंदुस्थानांतील पैशाच्या लोभानें इंग्रजास आपल्या गृहसौख्यास कसें अंतरावें लागतें, याचें त्यानें त्यांत हृदयस्पर्शी चित्र रेखाटलें आहे.

लेडन हा जरी हिंदुस्थानांत आठच वर्षें होता, तरी तेवढ्या काळांतील त्याच्या कार्यावरून त्याच्या निधनानें आंग्लोइंडियन वाङ्मयाचें अतोनात नुकसान झालें असें म्हणावें लागतें. सर विल्यम जोन्सप्रमाणें लेडन हाहि कवीपेक्षा भाषाभिज्ञ या नात्यानें अधिक महत्त्वाचा होता. विद्वत्तेमध्यें जरी सर विल्यम जोन्सपेक्षा लेडन हा कमी प्रतीचा होता, तरी त्याचें काव्यकर्तृत्व जोन्सपेक्षा अधिक सरस होतें.

किरकोळ कवी.—उत्तम काव्य निर्माण होण्यास कवीच्या अंगची प्रतिभा व बाहेरची अनुकूल परिस्थिति या दोन गोष्टी कारणीभूत होतात त्यापैकीं एक किंवा दोन्ही गोष्टींचा अभाव असेल तर कवीची कृति "किरकोळ" या सदराखालीं येते. या सर्व आंग्लो इंडियन किरकोळ कवींच्या काव्यांतून स्वदेश-विरह-विलाप प्रामुख्यानें दृष्टीस पडतो अशा प्रकारच्या कल्पना हेबरनें आपल्या पत्नीस उद्देशून लिहिलेल्या कवितेंत आढळतात. तोच नमुना रिचर्डसन विरचित 'कन्सोलेशन ऑफ एग्झाईल" "ए ब्रिटिश इंडियन एग्झाईल टु हिज डिस्टंट चिल्ड्रेन", "होम व्हिजन्स" या काव्यांतून पहावयास सांपडतो, परंतु या दोन कवींचा समकालीन कवि जो काल्डरकॅंबेल याच्या कवितेंत वरील कल्पनांच्या विरुद्ध विचार प्रगट केलेले आहेत यानंतर वीस वर्षांनीं फिरून डब्ल्यू ई. कॅंटोफरच्या "दि आंग्लो इंडियन लायर" या काव्यांत वरील स्वदेशविरहविलाप कानीं येतो आणि या एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं ट्रेगो वेब आणि लायल या कवींनीं त्या विलापास परम कारुणिक स्वरूप दिलें याविषयीं लायलचें "लॅंड ऑफ रिग्रेटस" हें काव्य सुप्रसिद्ध आहे

वर्णनपरकाव्यें —भावनाप्रधान काव्याखेरीज आंग्लोइंडियन कवींनीं वर्णनपर काव्येंहि लिहिलीं आहेत आर हारडेन राट्रे यानें इ. स. १८३० मध्यें "दि एग्झाईल" नांवाचें वर्णनात्मक काव्य लिहिलें त्यातील कथानक असें:- ॲपोलो नांवाचें जहाज आफ्रिकेच्या दक्षिण किनाऱ्यावर आपटून नाश पावलें या अपघातांत काव्यनायकाच्या सर्व जिवलग नातलगास जलसमाधि मिळाली. त्यामुळें या काव्याचें वाचन जरी उदास व कंटाळवाणें होतें, तरी अडचणीच्या वेळीं मनुष्याच्या मनाचे व्यापार कसे चालतात, याचें हुबेहूब वर्णन त्यांत पहावयास सांपडतें याच सुमारास एच. मेरिडिथ पार्कर यानें "दि ड्रॉट ऑफ इम्मोर्टेलिटी"

हें काव्य निर्माण झालें. पुष्पांवर मदिरेचें आगमन हा त्या काव्याचा विषय असून तो महाभारतांतून घेतलेला आहे. ले वी नॉर्टनचें "नेमेसिस" आणि मि कॉनचें "मिचेल डि मार्ग" व "दि गोल्ड फाइंडर" हीं काव्यें वर्णनात्मक काव्याच्या सदरांत पडणारीं आहेत. या सर्व कवींमध्यें ज्यानें या जातीच्या काव्यरचनेंत श्रेष्ठपणा संपादन केला तो युरेशियन कवि हेन्री एल व्ही डेरोझिओ हा होय. "फकीर ऑफ जुंघीरा" हें त्याचें उत्कृष्ट काव्य आहे. त्यांतील संविधानक शोकरसप्रधान आहे. नलिनी या त्या काव्यांतील नायिकेचा पति निवर्तल्यावर तिनें त्या वेळच्या चालीप्रमाणें सती जाण्याची तयारी केली. सती जाणें शास्त्रविरुद्ध जरी तिच्या मनाचा कल होता तरी केवळ कर्तव्य करण्याच्या बुद्धीनें तिनें तशी तयारी केली होती. सर्व तयारी झाल्यावर ती सूर्याचें शेवटचें स्तवन करीत असता तिच्या प्रेमास पात्र झालेल्या एका दरोडेखोराच्या नायकानें तिला उचलून नेलें. त्यानंतर त्या दोघांनीं कांहीं काळ अत्यंत सौख्यांत घालविला, परंतु अशा तऱ्हेचें सौख्य फार वेळ टिकत नाहीं. नलिनीच्या पित्यानें तिला सोडविण्याकरितां कांहीं लोक जमा केले व त्या दरोडेखोराच्या टोळीवर छापा घातला. त्या लढ्यांत दरोडेखोरांचा जय झाला, परंतु त्यांचा नायक पडला व त्याजबरोबर नलिनीनें आपला आत्मघात केला. याप्रमाणें डेरोझिओचीं अनेक काव्यें आहेत आणि हें सर्व वाङ्मयकार्य त्यानें वयाच्या विसाव्या वर्षाच्या आंत केलें; परंतु पुढें चार वर्षांच्या आंतच तो कॉलऱ्याच्या भक्ष्यस्थानीं पडला, व कीट्सच्या मृत्यूनें ज्याप्रमाणें इंग्रजी वाङ्मयाचें अपरिमित नुकसान झालें, त्याप्रमाणें त्याच्या मृत्यूनें आंग्लोइंडियन वाङ्मयाचें झालें. वर्णनात्मक काव्यें रचणाऱ्यांमध्यें मिस मेरी ई लेस्ली या कवयित्रीचा उल्लेख केला पाहिजे. "इना अँड अदर पोएम्स" हा तिचा पहिला काव्यग्रंथ इ स. १८५६मध्यें प्रसिद्ध झाला आणि त्यानंतर थोड्याच अवधींत "सां रोम" "ॲसिरेशन्स अँड लिमेंड्स फ्रॉम इंडिया" व "हार्ट एकोज फ्रॉम दि ईस्ट" हीं काव्यें अंतराअंतरानें प्रगट झालीं. "लिमेंटस फ्राम इंडिया" या काव्यांत १८५७ सालच्या बंडावरील कवयित्रीचे विचार प्रदर्शित झाले आहेत. "हार्ट एकोज फ्राम दि ईस्ट" या काव्यांत ती ज्या पवित्र क्षेत्रांत गेली होती त्यांचीं वर्णनें व तेथें तिच्या मनांत उत्पन्न झालेले विचारतरंग नमूद केलेले आहेत. याशिवाय वर्णनात्मक काव्य.... नमूद करण्यासारखीं आंग्लोइंडियन काव्यें म्हटलीं म्हणजे ऑर्ज पॉवेल थामस याचा "पोएम्स" या नांवानें प्रसिद्ध झालेला काव्यग्रंथ आणि गुलाम मॉटरफोल्ड या कवीचा 'इंडियन बॅलड्स अँड अदर पोएम्स" हा काव्यग्रंथ हे होत. इ स. १८८९ त एच वी डब्ल्यु. मॉरिस यानेंहि ज्यांत ऐतिहासिक व पुराणवस्तुविषयक माहिती दिली आहे, असा "इंडिया" नावाचा काव्यग्रंथ प्रसिद्ध केला. अशा रीतीनें विशेष बारकाईनें विचार केला, तर वर्णनात्मक काव्यांच्या सदरांत पडण्यासारखीं आणखीहि दहा बारा काव्यांचीं नांवें शोधून काढतां येण्यासारखीं आहेत. त्यांपैकीं पुष्कळ काव्यांस इ. स १८५७ सालच्या बंडाचा विषय कारणीभूत झाला. अशा तऱ्हेच्या काव्यांत चार्लस आर्थर केली याच्या "दिल्ली अँड अदर पोएम्स' या काव्यग्रंथाचा उल्लेख केला पाहिजे.

सर एड्विन आर्नोल्ड किंवा सर आल्फ्रेड लायल हे कवी जर बाजूस ठेवले तर आंग्लो इंडियन लेखकांत तत्त्वविवेचन करणारे कवि फारच थोडे होऊन गेले. मिसेस कारशोरचा 'सॉग्स ऑफ दि ईस्ट" या नावाचा जो काव्यग्रंथ आहे त्यांतील 'फॅमी अँड रीझन" या भागांत मानवी जीवितासंबंधीं कांहीं विचार प्रदर्शित केले आहेत. त्याचप्रमाणें कोणी आर एफ एफ या संक्षिप्त नावाखाली "ड्रीम ऑफ ए स्टार" नावाचें एक विचारपूर्ण काव्य प्रसिद्ध केलेलें आहे.

नाट्यग्रंथ–स्वतंत्र प्रकरणांत विचार करण्याइतके आंग्लोइंडियन लेखकांनीं लिहिले नसल्याकारणानें त्याचाहि विचार या प्रकरणांत केला असतां गैरवाजवी होणार नाहीं. डब्ल्यू टी पिअर्सनें लिहिलेलें "अवर इंडियन अंकल" नावाचें प्रहसन व अशाच तऱ्हेचीं कांहीं किरकोळ नाटकें वगळलीं तर आनंदरसप्रधान आंग्लो इंडियन नाटकें नाहींतच, असें म्हटलें तरी चालेल. अलेक्झांडर डो याचें अनुकरण करून ज्यांत पौरस्त्य चालीरितींचें चित्र रेखाटलें आहे, असें "तारा दि सती" नावाचें शोकरसप्रधान नाटक लेफ्टनेंट कर्नल जे. सी. डेव्हिडसन यानें लिहिलें. त्यांतील संविधानक थोडक्यांत असें आहेः—रामचंद्र नांवाचा कोणी एक ब्राह्मण दुराचरणी व ठग झाला होता, परंतु तारा नावाच्या कोण्या स्त्रीची दुःस्थिति पाहून त्यानें तिच्याकरितां आपलें वर्तन सुधारलें व तिच्याशीं विवाह करण्याचें कबूल केलें. तारेचा यापूर्वी कुलीन नावाच्या इसमाशीं वाङ्निश्चय झालेला होता, परंतु तो बहुपत्नीक असल्यामुळें विवाह त्याच्याशीं करणें तिला पसंत नव्हतें. आणि म्हणून रामचंद्राबरोबर लग्न करण्यास तीहि तयार झाली. शेवटीं ती त्याच्या नाशास न कळत कारणीभूत होऊन ठग लोकांच्या हातांत सांपडली. त्याच्याकडून आपली विटंबना होऊं नये म्हणून तिनें अग्निकाष्टें भक्षण करून प्राणत्याग केला. या डेव्हिडसनच्या नाटकाचें अनुकरण करून मि ई. आर. मॅकभाथ हिनें "दि मेड ऑफ काश्मीर" हें नाटक रचिलें. त्यांत नूर अफगाणच्या वैवाहिक दुस्थितीचें चित्र रेखाटलें आहे. याशिवाय आणखीहि एक दोन नाटकें लिहिलेलीं असतील, परंतु त्यांचा निर्देश करण्याइतकीं तीं महत्त्वाचीं नाहींत. एतद्देशीयांच्या जीवनक्रमासंबंधीं इतकींच नाटकें आहेत. याशिवाय आंग्लो इंडियन व इतर जीवनक्रमाविषयीं आंग्लो इंडियन लेखकांनीं लिहिलेलीं आणखीहि नाटकें आहेत. उदाहरणार्थ, जी. सी.

थॉमसनें लिहिलेलीं " मिचेल ओरोम्बेलो, ऑर दि फेटल मौक्टि " व " दि ॲसेसिन, ऑर दि रायव्हल लव्हर्स. " हीं नाटकें, जे. ए. पार्करचें " ऑनेस्ट इंग्लंड, ऑर ए सोल लेड बेअर " हें नाटक व या सर्वांत अधिक लोकप्रिय झालेलें एल. सी. इन्स यानीं लिहिलेलें " रेडिम्हिव्हा " हें नाटक, इत्यादि नाटकें या प्रकारचीं होत.

सर एड्विन आर्नोल्ड:—हे आपल्या 'दि लाइट ऑफ एशिया' नांवाच्या अत्युत्कृष्ट ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हणतात कीं, जगांतील सर्व धर्मांत बुद्धधर्माचा प्रसार जास्त असून एका पिढीच्या मागें या आशियातील धर्माचा यूरोपियन लोकांस मागमूसहि नव्हता. बुद्धधर्माचा प्रसार नेपाळ, सीलोन व पूर्वेकडील द्वीपसमूहापासून तों चीन, जपान, तिबेट, मध्यआशिया, सायबेरिया व स्वीडिश लॅप्लंड पर्यंत झाला आहे, व ज्या देशांत त्या धर्माचा प्रवर्तक जन्मास आला त्या हिंदुस्थानांतहि त्याचा प्रभाव नाहींसा झाला असें नाहीं. ज्या जगातील एकतृतीयांशापेक्षा अधिक मानव जातीस नैतिक व धार्मिक कल्पना दिल्या तो, अत्यंत धैर्य, अत्यंत सौम्य, अत्यंत पवित्र व अत्यंत परोपकारी असला पाहिजे हें उघड आहे.

गेल्या ५० वर्षांत अन्यधर्मी लोक सदर धर्माचा विचार करूं लागले आहेत. मॅक्समुल्लर सारख्यांनीं पाश्चात्य लोकांस या आशियातील धर्माची ओळख करून दिली आहे. जें कार्य त्या लोकांनीं तत्त्वशोधकाकरितां केलें आहे तेंच सर एड्विन आर्नोल्ड यानें काव्यप्रेमी लोकांकरितां केलें आहे. त्यानें आपल्या ' दि लाइट ऑफ एशिया " या सर्वोत्तम काव्यांत गौतमबुद्धाचा आयुष्यक्रम व त्याचें तत्त्वज्ञान यांची माहिती दिली आहे. हातीं घेतलेल्या विषयाची आवड व वर्णन करण्याची अप्रतिम शैली या दोन्ही गोष्टी आर्नोल्डच्या ठिकाणीं असल्यामुळें त्याचें काव्य अत्युत्तम झालें आहे.

सर एड्विन आर्नोल्ड इतर काव्यग्रंथांचे विषयहि संस्कृत पुस्तकांतून घेतलेले आहेत, उदाहरणार्थ.—"इंडियन पोएट्री" यांत "गीतगोविंद" या संस्कृत काव्याची छाया असून मूळ ग्रंथांतील कल्पना व विषयासक्तीचा भागहि जशाच्या तसाच स्पष्ट उतरला आहे. इंडियन आयडिल्स यांत महाभारतांतील आख्यायिकासंग्रह आहे त्यांत विस्तृत व चित्तवेधक आख्यायिका नलदमयंतीसंबंधीं आहे

"दि सॉंग सेलेस्चियल" यांत भगवद्गीतेंतील श्रीकृष्णार्जुनसंवाद घेतलेला आहे "दि सीक्रेट ऑफ डेथ" या काव्यांतील विषय वेदांतपर व नीरस आहे या शिवाय "पर्ल्स ऑफ दि फेथ ऑर इस्लाम्स रोझरी" आणि ' लोटस ॲंड ज्युएल" या सारखीं आणखीहि काव्यें आर्नोल्ड कवीनें लिहिलीं आहेत त्याच्या इतर सर्व ग्रंथांचा उल्लेख न केला तरी एका ग्रंथाचा केलाच पाहिजे आणि तो ग्रंथ म्हणजे "दि लाइट ऑफ दि वर्ल्ड" हा होय.

विनोदी व हास्यरसोत्पादक कविता:—हा ऑंग्लो इंडियन वाङ्मयांतील विशिष्ट प्रकार आहे. असल्या कविता प्रथम ऑंग्लोइंडियन पत्रांतून प्रसिद्ध होऊन नंतर त्यांतील निवडक पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेल्या आहेत. ज्या वेळीं ऑंग्लोइंडियन वाचकास लायलच्या लायलचक्र तात्त्विक विवेचनाचा व लेडनच्या करुणरसमय विलापलहरींचा कंटाळा आला होता, तेव्हां हास्यरस उत्पन्न करण्यास किंवा मनोरंजन करण्यास असल्या वाङ्मयाचा फार उपयोग झाला. डब्ल्यू ट्रेगो वेब याचा "इंडियन लिरिक्स" या नांवाचा एक असला विनोदी काव्यग्रंथ आहे त्यांत नेटिव्ह नोकराचे दोष, सरकारी नोकराच्या कामाची ठराविक पद्धत, हिंदुस्थानांतील ऑंग्लोइंडियन लोकांची थाटाची रहाणी आणि गिर्यारोहण वगैरे ॲंग्लो इंडियन लोकांच्या आयुष्यांतील इतर गोष्टी इत्यादि विषयांवर विनोदपूर्ण कविता आहेत. त्याचप्रमाणें "अवर सेल्व्हज ॲंड अदर्स" "दि ओल्ड "पंखावाला" "दि नाच गर्ल" व "दि पार्शीहैट" या त्याच्या कवितांवरून एतद्देशीयांच्या आयुष्यक्रमांतील व चारित्र्यांतील कांहीं भागांचें चित्र रेखाटण्यांत तो किती तरबेज होता हें दिसून येतें. देशी लोकांची त्यांतल्या त्यांत सुशिक्षित लोकांचीं रहाणी व वागणूक इंग्रज लेखकांस विनोदपूर्ण लेख लिहिण्यास व इंग्रज वाचकास हंसविण्यास फार सोपें साधन आहे हें पुष्कळ लेखकांनीं ओळखिलें आणि त्या प्रकारच्या लेखांची परंपरा जी त्या वेळेस सुरू झाली ती आजून अव्याहत चालू आहे. शिवाय इतर ऑंग्लोइंडियन कवींप्रमाणें स्वदेशविरहविलापपर कविता आहेत त्यांत त्यानें इतर कवींचेंच अनुकरण केलेलें आहे दि सॉंग ऑफ डेथ" "बेबीज ग्रेव्ह" आणि "दि मेमोरियल वेल ॲंड गार्डन्स" व" कानपूर " या त्या कविता होत.

अशा तऱ्हेच्या कविता लिहिणारा दुसरा कवि टी. एफ्. विग्नोल्ड हा होय. त्याच्या कवितेंत उपहासाचा व मस्करीचा बराच भाग आहे. " लेव्हिओरा ऑर दि व्हाईम्स ऑफ ए सक्सेसफुल कापिटेटर " व" दि रायझिंग मॅन " " अवर पीयर्स " हे त्याचे उत्कृष्ट काव्यग्रंथ आहेत.

परंतु विनोदी व मस्करीच्या कवितेचे अत्युत्कृष्ट व नमुनेदार मासले पहावयाचे असल्यास ते 'अलिफ चीम' या टोपण नावानें प्रसिद्ध असलेल्या कवीच्या " लेज ऑफ इंड " आणि किप्लिंगच्या " डिपार्टमेंटल डिटीज् " या काव्यांत पहावयास मिळतील हीं दोन्हींहि काव्यें प्रथम वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालीं होतीं दोन्हीहि काव्यांत आंग्लोइंडिअन आयुष्यक्रमांतील निरनिराळ्या अवस्थांचीं विनोदी वर्णनें दिलेलीं वाचावयास सांपडतात मधून मधून उदात्त विचारहि प्रगट केलेले आहेत

विनोदी व औपरोधिक निबंधकार हेन्री मेरिडिथ पार्कर यानें या विनोदी निबंध लिहिण्याच्या प्रकाराचा पाया घातला त्याचा " बोल पॉजिस " हा निबंधसंग्रह सर्वमान्य झालेला आहे त्याच्या मागून इ. स. १८७८मध्यें फिल रॉबिन्सन यानें

हिंदुस्थानांतील वनस्पति, पशु, पक्षी व मानवी प्राण्यांच्या विशिष्ट चालीरीती यांचें विनोदी व चटकदार वर्णन केलेलें आहे. " इन माय इंडियन गार्डन " " ऑन लीव्ह इन् माय कांपाउंड " " अंडर दि पंखा " हे त्याचे मुख्य निबंधसंग्रह आहेत या विनोदी वाङ्मयानंतर औपरोधिक वाङ्मयास सुरवात झाली. या प्रकारचे निबंध लिहिण्यास जी. अॅबेरिघ मॅके नांवाच्या लेखकानें 'सर अलिबाबा' या टोपण नावाखालीं सुरवात केली. त्यानें "ट्वेंटीवन डेज इन इंडिया" हा एकच निबंधसंग्रह लिहिला. परंतु तेवढयानें त्यानें आपल्यास ॲंग्लोइंडियन वाङ्मयलेखकांत कायमचें स्थान मिळविलें आहे, तथापि विनोदी व औपरोधिक निबंध लिहिण्याच्या कामीं ज्यानें सर्वांवर ताण केला तो इल्टयूडस प्रिचर्ड हा निबंधकार होय. त्याचा " दि क्रानिकल्स ऑफ बजबजपूर" हा निबंधसंग्रह सर्वविश्रुत झालेला आहे. यापूर्वी ॲंग्लोइंडियन काव्य-वाङ्मयांत लेडन, हेबर, रिचर्डसन व बेथ या कवींनीं अनेक विलापगीतें रचलेलीं होतीं. त्यानंतर तसल्या प्रकारच्या वाङ्मयांत कांहीं तरी बदल होणें अवश्य होतें अशा वेळीं फिल रॉबिन्सन, सर अलिबाबा, पारकर, औपरोधिकलेखनपटु प्रिचर्ड आणि विविध वाङ्मयलेखक किपलिंग यांनीं आपल्या विनोदी लेखांनीं पूर्वीच्या कवींच्या विलापकांनीं उत्पन्न केलेलें नैराश्यपूर्ण वातावरण बदलून टाकलें

का दं ब री वा ङ्म य.—कादंबरी वाङ्मयाची लोकप्रियता व विपुलता हें एकोणिसाव्या शतकांतील वाङ्मयाचें वैशिष्टय आहे आणि तें वैशिष्टय ॲंग्लो–इंडियन वाङ्मयाच्या बाबतींतहि दृष्टीस पडतें; तथापि ॲंग्लोइंडियन कादंबरीकाराचें कार्य अनेक दृष्टीनीं फार कठिण होतें. त्यास आपला एक डोळा इंग्रजी जनतेकडे तर दुसरा ॲंग्लोइंडियन समाजाकडे ठेवावा लागत असे. ज्यांनीं आपलें सारें लक्ष इंग्रजी समाजाकडेच दिलें त्यांनीं आपल्या वाचकांच्या सोयीकरितां इकडील बारीक सारीक गोष्टींबद्दलहि स्पष्टीकरणाची रेलचेल केल्यामुळें त्यांच्या कादंबरींतील सांविधानकाची ओढाताण झाली आहे, व ज्यांनीं आपलें लक्ष्य ॲंग्लोइंडियन समाजाकडे ठेविलें त्यांनीं स्पष्टीकरणास अभावात फांटा दिल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्या इंग्रजास दुर्बोध झाल्या आहेत. शिवाय ॲंग्लोइंडियन कादंबरीकारांनीं आपल्या कादंबऱ्या इंग्लंडांतील वाचकांनीं वाचाव्या या महत्त्वाकांक्षेनें न लिहितां जर त्या ॲंग्लोइंडियन लोकांची व एतद्देशीयांची लोकप्रियता संपादन करण्याच्या बुद्धीनें लिहिल्या असत्या तर त्यांचें कार्य अधिक यशस्वी झालें असतें. असो त्याप्रमाणें खरी ॲंग्लोइंडियन कादंबरीकाराचें कार्य जितकें यशस्वी व्हावें तितकें झालें नाहीं तरी टाचणिक पद्धतीचीं दृश्यें किंवा प्रवासवर्णनें प्रसिद्ध करीत बसण्यापेक्षां एतद्देशीय व ॲंग्लोइंडियन लोकांच्या आयुष्यक्रमाचीं चित्रें रेखाटण्याचें कार्य त्यांनीं सिद्ध करून दाखविलें यांत विवाद होत नाहीं.

मोरिअरच्या इराणविषयक " हाजीबाबा " नांवाच्या कादंबरीची चहूंकडे वाहवा झालेली पाहून आपणहि हिंदुस्थानविषयक कादंबऱ्या लिहाव्या अशी बुद्धि ॲंग्लोइंडियन लेखकांत उत्पन्न झाली. तिला अनुसरून त्यांनीं आपल्या पहिल्या कादंबऱ्या लिहिल्या परंतु त्यास व्यवस्थित स्वरूप नसल्याकारणानें त्यास वाङ्मयक्षेत्रांत कायमचें स्थान प्राप्त झालें नाहीं अशा प्रकारच्या कादंबऱ्या म्हटल्या म्हणजे जे. बी. फ्रेजरच्या " दि कुझिलबश " व ' पर्शियन अॅडव्हेंचरर " या कादंबऱ्या, भिनार्बी प्रसिद्ध झालेली " ईस्ट इंडिया स्केच बुक " व दि बाबू अॅन्ड अदर टेल्स " हीं पुस्तकें, डब्ल्यु बी. हॉक्लेच्या " पांडुरंग हरि " ( या कादंबरीला " अनाथ पांडुरंग " हें मराठी स्वरूप प्राप्त झालें आहे ) व ' 'टेल्स ऑफ झेनाना " या कादंबऱ्या आणि मेडोज टेलरची ' कन्फेशन्स ऑफ ए ठग " ही कादंबरी ( यासहि ' ठगाची जबानी " असें मराठी स्वरूप प्राप्त झालें आहे ) या होत.

या सर्व कादंबरीकारांत मेडोज टेलर हाच प्रथम विशेष प्रसिद्धीस आला. त्याची जी इतकी ख्याति झाली ती त्याच्या " दि कन्फेशन्स ऑफ ए ठग " या कादंबरीवरून झालेली नसून त्यानें ज्या पुढें ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या त्यामुळें झाली त्यानें इ स. १८४० त " टिपू सुलतान " ही कादंबरी लिहिली व त्यावरून ऐतिहासिक कादंबरी लिहिण्यास तो कितो पात्र होता हें कळून आलें. त्यानंतर त्यानें " तारा " " राल्फ डार्नेल " व " सीता " या आपल्या तीन सुप्रसिद्ध कादंबऱ्या एकामागून एक अशा रीतीनें प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. या तीन कादंबऱ्यांचा परस्परांशीं संबंध आहे. इ स १६५७ त शिवाजी महाराजांनीं विजापूरकरांवर विजय मिळवून मराठ्यांची सत्ता प्रस्थापित केली; इ. स. १७५७ त प्लासीच्या लढाईनें मराठ्यांची सत्ता नाहींशी होऊन तिच्याजागीं ब्रिटिशांची सत्ता प्रस्थापित झाली इ. स. १८५७ त शिपायांचें बंड झालें. नक्की शंभर वर्षांच्या अंतरानें घडलेल्या या तीन गोष्टींचा आधार घेऊन वरील तीन कादंबऱ्या रचण्यांत आलेल्या आहेत. इ. स. १८७८ त ' ए नोबल क्वीन ' या नांवाची मेडोज टेलरनें आपली अखेरची कादंबरी प्रसिद्ध केली. त्या कादंबरींत सुप्रसिद्ध चांदबिबीच्या पराक्रमाचें वर्णन आहे.

यानंतर अलेक्झांडर अॅलरडाइस यानें ' दि सिटी ऑफ सन्शाईन " या नांवाची कादंबरी लिहिली. तींतील हकीकत धूपनगर या खेड्यांत घडल्याचें दाखविलें आहे. धर्म, जात, शिक्षण, न्याय, बालविवाह, मानवकार्य इत्यादि विषयांचें विवेचन या कादंबरींत केलेलें आहे. मिसेस एफ. ए. स्टीलच्या " फ्रॉम दि फाईव्ह रिव्हर्स " " टेल्स ऑफ दि पंजाब " " दि फ्लावर ऑफ फर्गिव्हनेस " आणि " इन दि पर्मनंट वे " या कादंबऱ्यांत देशी लोकांच्या आयुष्य-

प्रमाचें चित्र पहावयास सांपडतें. मि. आर. ई. फॉरेस्ट याच्या "दि बॉण्ड ऑफ ब्लड" या नावाच्या कादंबरींत रजपूत लोकांच्या चालीरीतींचें वर्णन केलेलें आहे. अशाच जातीच्या दुसऱ्या कादंबऱ्या म्हटल्या म्हणजे मि आर. डब्ल्यू फ्रेझर यांनीं इ. स. १८९५ त प्रसिद्ध केलेली "सायलेंट गॉड्स, ॲंड सन-स्टीप्ड लॅंड्स" व मि. जे. डब्ल्यू शेरर यानें लिहिलेली "ए प्रिन्सेस ऑफ इस्लाम" या होत.

वर सांगितलेल्या कादंबऱ्यांपेक्षा ज्यांत आंग्लोइंडियन आयुष्यक्रमाचें वर्णन करावयाचें होतें अशा कादंबऱ्या लिहिण्याच्या कामीं आंग्लोइंडियन लेखकास अधिक यश आलें असावें. कादंबऱ्यांचा उपक्रम आपणांस डब्ल्यू डॉलाफील्ड आर्नोल्डच्या "ओकफील्ड, ऑर फेलोशिप इन् दि ईस्ट" या कादंबरींत व जॉन लँग याच्या "दि वेदरबाइज् टू क्लेव्हर बाय हाफ" या कादंबरींत पहावयास सांपडतो. जॉन लँग पासून तें अखेर विशेष प्रसिद्धीस आलेल्या कादंबरीकारापर्यंत जो मध्यंतरींचा काळ गेला त्यांत साधारण प्रतीचेच कादंबरीकार उदयास आले. फ्लॉरेन्स मॅरिअट (मिसेस रॉस चर्च), मिसेस कॅडेल यांच्या कादंबऱ्यांत नावाजण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. त्यांतल्या त्यांत सर जॉर्ज टी. चेस्ने व सर हेन्री एस. कनिंगहॅम यास ही कला बऱ्याच अंशानें साध्य झाली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांनीं लिहिलेल्या अनेक कादंबऱ्यांपैकीं चेस्नेची "दि डिलेमा" व कनिंगहॅमची "दि कॉनिक्वस्ट ऑफ हरटीपूर" या दोन कादंबऱ्यांनीं ऑंग्लोइंडियन वाचकास वरेंच वेड लावून दिलें होतें.

आंग्लोइंडियन वाङ्मय लेखक या र डिआर्ड किप्लिंगची योग्यता.—आतापर्यंत वर्णिलेल्या सर्व आंग्लोइंडिअन लेखकांपेक्षां रडिआर्ड किप्लिंगनें हिंदुस्थानविषयक गोष्टींत अधिक सहानुभूति व्यक्त केलेली दिसून येते. त्यानें आपलें "डिपार्टमेंटल डिट्टीज" हें काव्य लिहिल्यापासूनच त्याला आंग्लोइंडियन वाङ्मयक्षेत्रात स्थान प्राप्त झालें. तथापि काव्यापेक्षा संक्षिप्त कथा लिहिण्याच्या बाबतींत त्याची बरोबरी करणारा कोणीहि आंग्लोइंडिअन लेखक झाला नाहीं हें विधान इ. स. १८९० त किप्लिंगनें हिंदुस्थान सोडण्यापूर्वींहि खरें होतें. परंतु त्यानंतर प्रसिद्ध झालेल्या त्याच्या "जंगल बुक्स" आणि "किम्" या दोन पुस्तकांनीं या विधानाला अधिकच बळकटी आली. किम या पुस्तकांत दोन गोष्टी प्रमुखपणानें दृष्टीस पडतात एक त्यांत संविधानक बिलकुल नाहीं आणि दुसरें त्यांत एतद्देशीयांचा आयुष्यक्रम, धर्म व त्यांचीं धारस्थानें याविषयीं भरपूर माहिती दिलेली आहे. त्यामुळें त्याला "कादंबरी" या सदरांत घालतां येत नाहींच परंतु त्यास कल्पित ग्रंथ म्हणणेंहि बरोबर होणार नाहीं. त्याचें योग्य ठिकाण म्हणजे वर्तमानपत्री वाङ्मय हें होय.

रडियार्ड किप्लिंगच्या उत्कृष्ट ग्रंथाचे चार भाग पडतात. (१) संक्षिप्त गोष्टी, (२) साम्राज्यवादी कविता, (३) "दि जंगल बुक्स" आणि (४) "किम्" यांपैकीं त्याच्या साम्राज्यवादी कविता वजा केल्या तर बाकीचे सारे ग्रंथ आंग्लोइंडिअन म्हणण्यास हरकत नाहीं.

येणेंप्रमाणें त्याच्या ग्रंथाचे जे विभाग आंग्लोइंडियन म्हणून समजता येतात त्यांत त्यानें इतर सर्व आंग्लोइंडियन लेखकांवर ताण केलेली आहे आणि त्यामुळें त्या सर्वांत त्याला श्रेष्ठ स्थान देण्यात येतें.

उपसंहारः—आंग्लोइंडियन वाङ्मयाची थोडक्यांत हकीकत आहे. या हकीकतींत त्या वाङ्मयाचे साधारण मानानें गुणदोष काय आहेत याचें दिग्दर्शन झालेलें आहे. आंग्लो-इंडियन वाङ्मयाच्या काव्य-विभागाचा कांहीं भाग स्वदेशविरहविलापानें व्यापिला आहे, तर कांहीं भागात या देशांतील सृष्टिसौंदर्य व एतद्देशीयांचा धार्मिक आयुष्यक्रम यांचें वर्णन केलेलें आढळतें. त्याचप्रमाणें आंग्लोइंडियन लेखकास जेव्हां या विलापगीतांचा कंटाळा आला तेव्हां प्रतिक्रियेस सुरवात होऊन विनोदी व औपरोधिक वाङ्मय उत्पन्न झालें आणि अखेर एतद्देशीयांच्या व आंग्लोइंडियन लोकांच्या आयुष्यक्रमाचीं चित्रें रेखाटणाऱ्या कादंबऱ्या अनेक आंग्लोइंडियन लेखकांनीं लिहिल्या, परंतु त्या सर्वांवर रडिआर्ड किप्लिंग यानें संक्षिप्त गोष्टी लिहून ताण केली इत्यादि हकीकत आम्हीं वाचकास निवेदन केलीच आहे यावरून आंग्लो-इंडियन वाङ्मयाला कांहीं निश्चित दिशा नाहीं असें जें सकृद्दर्शनीं वाटतें तें तसें नसून त्याचा विकास पुढील पांच दिशांनीं झाला आहे असें निश्चितपणें दिसून येतें. पहिली दिशा, स्वदेशविरहाबद्दल विलाप, दुसरी आशिया खंडातील निरनिराळ्या धर्मांचें विवेचन, तिसरी आंग्लो-इंडियन लेखकांची विनोदी लेख लिहिण्याची प्रवृत्ति, चवथी एतद्देशीयांच्या आयुष्यक्रमाचें व या देशांतील सृष्टिसौन्दर्याचें वर्णन आणि शेवटची, म्हणजे सुखप्रधान, दुःखप्रधान व सुखदुःखविवर्जित अशा आंग्लो-इंडियन सामाजिक परिस्थितीचें विवरण या पांच दिशांनीं ज्या कल्पित वाङ्मयाचा विकास झाला, त्यांत अद्याप पुष्कळ उणीवा आहेत ही गोष्ट कबूल केली पाहिजे. सुखप्रधान किंवा दुःखप्रधान नाटकाचा व निबंधाचा अद्याप त्या वाङ्मयात ठिकाण नाहीं. कारण इंग्रजींत नाटकें करून हिंदुस्थानांत पोट भरण्याची शक्यता नाहीं.

आंग्लोइंडियन कादंबऱ्यांत जी कल्पकता विविधता आहे ती हिंदुस्थानांतील कोणत्याहि देशी भाषेंतील कादंबऱ्यांत नाहीं, असें म्हटलें तरी प्रत्यवाय नाहीं. याशिवाय आंग्लोइंडियन कादंबऱ्या जितक्या विपुल आहेत तितक्या (बंगाली वगळून धरली तरी) कोणत्याहि देशभाषेंत नाहींत गेल्या दोनशें वर्षांत देशी वाङ्मयाचा जो विकास झाला त्यापेक्षां आंग्लोइंडियन वाङ्मयाचा खचितच जास्त झाला, याचें कारण पैसे

खर्च करण्याची इंग्रजांस शक्ति, सर्व कारभार इंग्रजींत असल्यामुळें इंग्रजी दप्तराच्या अधिक सोई, आणि इंग्लंडांतील वाचकवर्गाचें अस्तित्व, या गोष्टी होत्या. देशी लोकांस आंग्लोइंडियन कादंबऱ्या हें आपलें राष्ट्रीय वाङ्मय वाटत नाहीं; याचीं कारणें कांहीं अंशीं देतां येतील तीं येणेंप्रमाणें:— देशी लोकांच्या करमणुकीसाठीं हें वाङ्मय नसून इंग्रजांच्या करमणुकीसाठीं असल्यामुळें त्यांतील मजकूर देशी लोकांस आवडेल असा असणें शक्य नाहीं. विवेचनास हिंदुस्थानांतील मध्यमवर्ग यांत गाळलेला असे. राजेरजवाड्यांचा, ठगारूंचा, पेंढारकुलांचा आणि काल्पनिक फकिरांचा वर्ग यांत वर्णनासाठीं असे. (आधारग्रंथ—ओटनकृत)

**आंग्लो-सॅक्सन**—नॉर्मन लोकांनीं इंग्लंड जिंकण्यापूर्वीच्या इंग्रजी इतिहास, भाषा आणि वाङ्मय यांच्या काळाला "आंग्लो-सॅक्सन" असें नांव सामान्यतः लावितात. या नांवाचा इतिहास आल्फ्रेड राजापर्यंत मागें नेतात. इंग्लंडचा आल्फ्रेड राजा "रेक्स आंग्लोरम सॅक्सोनुम" ही पदवी कधीं कधीं धारण करी. या पदवीचा उगम कशामुळें झाला हें निश्चित सांगतां येत नाहीं. इ.स. ८८६ मध्यें आल्फ्रेडच्या आधिपत्याखालीं निरनिराळ्या राज्यांचें जें अखेरचें एकीकरण झालें त्याच्याशीं या पदवीचा संबंध असावा असें पुष्कळजण मानतात. पूर्वी आंग्ली आणि सॅक्सन अशीं दोन वेगवेगळीं राष्ट्रें होतीं पण तीं फारच प्राचीन काळीं एकत्र झालीं असावींत असें दिसतें. "आंग्लो सॅक्सोनीज" हा शब्द प्रथम इंग्लंडबाहेर यूरोपखंडांत रूढ झालेला दिसतो; कारण आल्फ्रेडच्या मागील शतकांत होऊन गेलेल्या पाल दि डिकन याच्या लेखांतून तो आढळतो. यूरोपखंडांतील जुन्या सॅक्सन लोकांहून निराळे असे जे ब्रिटनमधील इंग्लिश रहिवाशी त्यांचें विशेष प्रकारें दिग्दर्शन करण्याकरितां म्हणून हें नामाभिधान त्यांना यूरोपांत लावण्यांत येई.

**आघाडा**:—यास संस्कृतांत अपामार्ग, शेखरी, अधःशल्य वगैरे अनेक नांवें त्याच्या आकारावरून व गुणावरून प्राप्त झालेलीं आहेत. इंग्रजींत यास 'रफ चॅफ ट्री' असें म्हणतात. हें वर्षायु झुडुप तणासारखें जंगलांत उत्पन्न होतें. याची उंची ४ पासून ६ फूटपर्यंत असते. पावसाळ्यांत हीं झाडें फार होतात. व तीं बहुधा हिंदुस्थानांतील सर्व भागांत आढळतात. याच्या दांड्यावर रेषा व फार बारीक लव असते. पानें लांबट वर्तुळाकृति असून मागची बाजू कांहींशी सरबरीत असून तिजवर फार बारीक लव असते व पुढील बाजू नरम असते. आघाड्याच्या तुऱ्यांत अतिशय बारीक, नरम व कांटेदार बी सांपडतें. हें झाड औषधी कामांत उपयोगी पडतें. याच्या तीन जाती आहेत; पांढरा, तांबडा, व पाणआघाडा. तीनहि जातींत औषधी गुणानें पांढरा आघाडा श्रेष्ठ समजला जातो. जुन्या वैद्यांच्या मतानें याच्या क्षारांत अपामार्गीय म्हणजे रक्षण करण्याचा गुण आहे.

**अपामार्गक्षार करण्याची रीत.**—आघाड्याचीं झाडें आणून वाळवावीं. नंतर त्यांची राख करून मातीच्या मडक्यांत घालावी. त्यांत राखेच्या चौपट पाणी घालून तीं चांगली कालवावी. नंतर एक रात्र तें मिश्रण तसेंच स्थिर ठेवून सकाळीं त्यावरील निवळ पाणी लोखंडाच्या कढईंत घालून खालीं जाळ लावावा. त्यांतील पाणी सर्व आटल्यावर कढईच्या बुडाला क्षार राहील तो काढून घ्यावा.

**गुण**—आघाड्यांत महत्त्वाचे औषधी गुण आहेत. या झाडाचीं (मूळ, देंठ, पानें, बी व फुलें हीं सर्व) अंगें निरनिराळ्या अनुपानानें देऊन नाना तऱ्हेच्या व्याधींवर हें झाड उपयोगिलें जातें. उंदराच्या व कुत्र्याच्या विषावर, कर्णरोग व दंतरोग, डोळ्याचे रोग, रातांधळे, पित्त, कफ, उपदंश वगैरे विकारांवर हें झाड गुणकारी आहे. जलोदर रोगावर या वनस्पतीचा पुष्कळ उपयोग होतो. या वनस्पतीच्या अंगीं जुलाब होण्याचेहि गुण आहेत. विंचवाच्या दंशावर आघाड्याची मुळी अगर तुरे पाण्यांत वाटून लावावे. उंदराच्या विषावर आघाड्याच्या बीजांच्या तुऱ्यांचा रस मधाबरोबर ७ दिवस द्यावा, कुत्र्याच्या विषावर आघाड्याचें मूळ १ तोळा कुटून मधाबरोबर द्यावें; कोरफडीचें पान व सैंधव दंशावर बांधावें म्हणजे ३ दिवसांत विष उतरेल. रातांधळ्यावर संध्याकाळीं भोजनानंतर आघाड्याच्या मुळ्या सुमारें १ तोळा खाण्यास देऊन झोंप घ्यावयास सांगावें. याप्रमाणें ३ दिवस करावें. कफावर—आघाड्याचीं झाडें मुळासकट आणून त्यांची राख करून ती राख एक पासून २ वालपर्यंत मधांतून द्यावी म्हणजे कफाचा नाश होतो. येणेंप्रमाणें देशी वैद्य आघाड्याचें गुणवर्णन करतात. (पदे—वनौषधि गुणादर्श, वॅटस् कमर्शियल प्राडक्टस)

**आघात (आकस्मिक)**—डोक्यावर मार बसणें, पोटावर लाथ बसणें यासारखी शरीरास भयंकर इजा होऊन किंवा एखादी शोकदायक वार्ता अकस्मात कळून किंवा कांहीं भयंकर कृत्य नजरेस पडून जो मनास एकदम धक्का बसतो, व त्याच्या योगानें शरीरास जी भीतिसूचक व अतिशय ग्लानि येते, त्या स्थितीस हें नांव आहे. एखादे वेळीं एक पहिलवान कुस्तीच्या वेळीं आपल्या प्रतिस्पर्ध्यास लोळविण्यासाठीं तसा स्पष्ट करार नसल्यास, थोबाड, ऊर, किंवा पोट यावर ठोसा लगावतो. त्यानंतर ताबडतोब ज्याप्रमाणें एखादी इमारत एकदम ढासळावी त्याप्रमाणें त्या माणसाचा लोळागोळा होऊन तो जमिनीवर बेशुद्ध होऊन पडतो. असें होण्याचें कारण पुढें दिल्याप्रमाणें आहे. हृदयाला एकदम अशक्तता प्राप्त झाल्यामुळें मेंदू, चेहरा यांतील धमन्यांत रक्त जोरानें त्याच्यानें नेहमीप्रमाणें ढकलवत नाहीं म्हणून चेहरा पांढरा फटफटीत होतो, व मेंदू, ज्यांवर ताबा राहील, असें संदेश पाठविण्यास असमर्थ होतो; उदरांतील मोठाल्या शिरांमध्ये एकदम पाणीच रक्तसंचय होतो, कारण इतर ठिकाणच्या रक्तवाहिन्यांतील रक्त एकदम त्यांत उतरतें व त्यांत

मांसातून वमत. उग्र रोगामध्यें विशेष रक्तपात होतो, असें धमनीविस्तरण व रक्तार्बुदस्फोट या किंवा प्रसूतीनंतर फाजील रक्तस्रावादि कारणामुळें मेंदूमध्यें रक्ताचा पुरवठा कमी होऊन ही स्थिति प्राप्त होते. अन्य कारणें, दुसरा एखादी मोठी रक्तवाहिनी फुटणें, जठरमणातील धमनी फुटणें हीं होत. जठरांतील पदार्थ तेथील व्रण फुटल्यामुळें बाहेर पडून उदरांत जें नाजूक व सूक्ष्म मज्जातंतूंचें जाळें असतें त्यावर त्या अन्नादि पदार्थांचा दाब पडतो.

रो ग ल क्ष णें.—रोग्याचा चेहरा पांढरा फटफटीत होऊन त्याला पुष्कळ व चिकट असा घाम सुटतो, त्यास बिलकूल शुद्धि नसते, त्याची नाडी इतकी सूक्ष्म व अशक्त होते कीं, एखादे वेळी ती हातास मुळींच समजत देखील नाहीं, अथवा हृदयावर हात ठेवून हृदयाची हालचाल होत असेल म्हणून तपासावें तों तीहि धडपणें चाललेली दिसत नाहीं. आपलें भोंवताली काय चाललें आहे, आपण आहोंत कोठें याची काहींएक जाणीव रोग्यास नसते व त्याच्यानें काहींएक हालचाल करवत नाहीं. एवढेंच नव्हे तर कानाशीं ओरडून त्यास हाक मारली तरच तो " ओ " देतो किंवा एखादे वेळीं तेंहि त्यास कळत नाहीं. नंतर तो बोलूलाच तर आपणास फार थंडी वाजत आहे असें तो म्हणतो, व तो कुडकुडत असून थंडी वाजत असल्याचीं लक्षणें त्यास होतात. या स्थितींत तो काहीं वेळ पडून असतो. यानंतर त्यास अम्मळ उतार पडल्याचें पूर्व लक्षण हेंच कीं, तो हळूच परंतु आपोआप पूर्वी ज्या स्थितींत बराच वेळ पडला, तीमुळें कदाचित् अंग अवघडल्यामुळें सुखकर अशा दुसऱ्या कुशीवर वळून अथवा सोयीस पडेल त्या इतर स्थितींत पडून राहतो व नंतर त्याची उलघाल होत असल्याचें दिसून येतें व तोहि मला अमुक होत आहे किंवा अमक्या ठिकाणीं लागलें आहे, असें कुरकुरू लागतो. कदाचित् त्यास वांति होते व ती होणें हेंहि एक सुचिन्हच समजावें. त्यानंतर नाडींत शक्ति परत आल्याचें चिन्ह दिसूं लागून रोगाचें परावर्तन अगर द्वितीय स्थित्यंतरास आरंभ होतो. असाच उत्तरोत्तर उतार पडत गेला म्हणजे रोगी बरा होतो, पण हा उतार जर का थोडा वेळ टिकला तर रोग्यास पुनः बेशुद्धि येते व असें झाल्यानें कदाचित् शेवटीं रोगी दगावतोहि. कारण हें स्पष्ट ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, ज्या कारणानें ही स्थिति प्राप्त झाली ती इतकी भयंकर असते कीं तिचा शेवट मृत्यूंत होणें बरेंच संभवनीय असतें. कधीं तर मध्यें रोगी शुद्धीवर न येता इजा झाल्यावर थोड्या वेळानें मरण पावतो, व अशा वेळीं रोगी आणि त्याची नाडी अधिकाधिक क्षीण होत जाऊन शेवटीं मरण येतें. या आघातावस्थेचें कारण असें - त्या भयंकर इजेचें ज्ञान प्रथम अधोमस्तिष्काच्या ठायीं होतें, व हा भाग अत्यंत नाजुक व महत्त्वाचा असल्यामुळें त्यांतून शरीरांतील सर्व स्नायूंवर हुकमत चालविणारे, व स्पर्शवेदनादिकांचे ज्ञानवाहक, मज्जातंतू बधिर होऊन कांहीं कालपर्यंत निश्चेष्ट स्थितींत रोगी पडतो व रोग्यास हातपाय वगैरे काहीं हलविता येत नाहींत. स्नायूंनाहि अनैच्छिक जडत्व येतें, त्यामुळें श्वसन, हृदयक्रियादि व्यापार फार सूक्ष्म व मंद चालून नाडी अति सूक्ष्म रीतीनें चालतें. त्याच कारणामुळें रक्तवाहिन्यांमध्यें जें मांसल आवरण असतें त्यांत शैथिल्य येऊन त्या मोठ्या होतात, व त्यांत व विशेषतः उदरांतील मोठ्या शिरांमध्यें बरेंचसें रक्त साचून राहातें. या कारणामुळें त्वचेंतहि फारसें रक्त नसल्यामुळें त्वचा चटकन लक्षांत येण्याजोगी पांढरी फटफटीत दिसते. हृदयांतील मज्जातंतूंस रक्त न पोंचून ते क्षीण होतात म्हणून, व हृदयांत पुरेसें रक्त नसल्यामुळें, हृदय उडण्याची क्रिया फारच मंद चालते.

उ प चा र प द्ध ति.—रोगाचीं हीं कारणें व स्वरूप हीं नीट ध्यानांत ठेविलीं असतां कोणत्या धोरणावर उपचार करावयाचे तें नीटपणें समजतें. वर वर्णिलेली स्थिति सुधारण्यासाठीं (१) मोहरी वाटून तिचा लेप किंवा फलाणीचा कापडा टरपेंटाइन तेलांत भिजवून तो हृदयप्रदेशावर ठेविल्यानें हृदयास या बाह्योपचारानें बरेंच उत्तेजन मिळतें. (२) रोग्याचे हात व पाय उभे अथवा उंच करून त्या स्थितींत ते ठेविल्यानें त्यांतील रक्त गुरुत्वाकर्षणानुसार खालीं उतरतें व त्यामुळें मेंदूस रक्ताचा पुरवठा बराच होतो. (३) खालून वर उदर चोळून व दाबीत गेल्यानें त्यांतील मोठ्या रक्तवाहिन्यांत जो फाजील रक्तसंचय झालेला असतो, त्यांतील बराच भाग हृदयाकडे लोटला जातो. रोग्याची विशेष भयंकर अवस्था असल्यास पाऊणशेर कोमट पाण्यांत चमचाभर मीठ विरघळवून तें पाणी शिरेमध्यें टोंचून घालावें. या उपायास आणखी मदत होण्यासाठीं पोटांत उत्तेजक पेय पदार्थ व औषधें (ब्रांडी, ईथर, कुचल्याचें सत्त्व, अमोनिया वगैरे डॉक्टरांच्या सल्ल्यानें देववावींत. रोग्याच्यानें औषध पिववत नसेल इतकी बेशुद्धि आली असल्यास त्यास हीं औषधें टोंचून घालावींत. रणांगणावर मृतप्राय स्थितींत आढळले म्हणून पुष्कळ शिपायांना कदाचित् तसेंच टाकून देण्यांत येतें, पण यांपैकीं पुष्कळजण या रोगामुळें केवळ बेशुद्ध स्थितींत असून योग्य उपचारांनीं बरे होण्यासारखे असण्याचा बराच संभव असतो. या शिपायांना ते घाव अथवा गोळी लागून पडल्यानंतर लागलीच ईथर हें औषध पिचकारीनें हृदयप्रदेशावर टोंचावें म्हणजे ते शिपाई बहुधा जगण्याच्या पक्षाला लागण्याचा पुष्कळ संभव आहे, यांत शंका नाहीं. मनाची दुःखदायक वार्तेमुळें भयंकर चलबिचल झाली असतांना हृदय फारच दुबळें होतें, व त्यांतून मेंदूकडे पुरेसा रक्ताचा पुरवठा होत नाहीं, म्हणून रोग्याचे डोळ्यांपुढें चक्कर, अंधेरी येऊन तो बेशुद्ध होतो. ही बेशुद्धि फार वेळ टिकत नाहीं, व अशा वेळीं रोगी आडवाच निजलेल्या स्थितींत असतोच, त्यांतच त्याचे पाय उभे करून अथवा उंच धरल्यानें त्यांतील रक्त गुरुत्वाकर्षणामुळें हृदयात

चमन करावें परंतु मध्यपश्चात्यावेळीं श्रौताचमन करावें मधल्या बोटाच्या मधल्या पेऱ्यावर अंगठ्याचें अग्र संकुचित करून ठेवणें ही गोकर्णाकृति होय आचमनासंबंधानें धारा मासिक गोष्टी या पत्रीं पुष्कळ आहेत (धर्म मासिक वर्ष १ ला अंक ७ वा) पौराण नांव समजलें जाणारें आचमन केवळ पौराण नसून स्मार्त आहे त्याचा बौधायनस्मार्तसूत्रांत उल्लेख आहे

**आचार्य चिंतामणि रघुनाथ**—हे मद्रास येथील ज्योतिषशाळेंत १७ वर्षे पहिले असिस्टंट होते महाराष्ट्रांत जसे केरूनाना व काशीकडे बापूदेव तसेच मद्रासकडे चिंतामणि रघुनाथ आचार्य होते यांचा जन्म १७ मार्च १८२८ साली झाला त्यांची जन्मभाषा व जन्मदेश तामिळ (द्रविड) असावा असें दिसतें, यास संस्कृत भाषा येत नव्हती तरी यूरोपीय गणिताचें आणि ज्योतिषाचें ज्ञान यास उत्तम होतें व यामुळें भारतीय ज्योतिषाचें ज्ञान साहजिक झालें होतें, पुष्कळ वर्षे ते स्वतः वेध घेत असत सन १८४७ त त्यांनीं मद्रास वेधशाळेंत नोकरी पत्करिली शेवटपर्यंत ते तेथेंच होते वयाच्या बावन्नाव्या वर्षी ते मृत्यु पावले, त्यांचे घराणें ज्योतिष्याचें आहे, त्यांचे वडील वेधशाळेंत असिस्टंट होते

'ज्योतिष चिंतामणी' नावाचा ग्रंथ यांच्या वडिलांनीं केला हा ग्रंथ मूळचा द्राविडी भाषेंत आहे. त्याचें संस्कृत भाषांतर करून तें तामिळ, तेलगी देवनागरी लिपींत छापावयाचें म्हणून १८७४ साली सभा वगैरे झाल्या होत्या परंतु अखेर कांहीं झालें नाहीं, (दीक्षित कृत भा ज्योतिःशास्त्र)

**आंजणा (कुणबी)**—संस्थान बडोदे, लो सं ३०,९२० (१९११) ही जात मुख्यत कडी प्रांतात आढळून येते हे लोक कुणब्यापेक्षा रजपुताप्रमाणेंच जास्त दिसतात कांहीं लोकांच्या नावाशेवटीं सिंग असें उपपद असतें, उदा० दानसिंग, हरिसिंग इत्यादि एकमेकांत रोटीबेटीव्यवहार होतात अशीं एकंदर २२ गोत्रें (घराणीं) आंजणांत आढळतात त्यांचीं कांहीं नावें म्हणजे राठोड, सोळंकी, चोहान व परमार आंजणा हे डुकरेमेंढ्या, रानडुकरें व ससे यांचें मांस खातात, इतर कुणबी तें खात नाहींत हे लोक अफू व मद्य यांचें सेवन करितात, बहुतेक पुरुष स्त्री राखतात आंजणा मूळचे नवसरी प्रांतांतील वन्यधर्मी व चोरावंशाचे असावेत उत्तर गुजराथेंतील रजपूत राजांनीं या जातींतील कांहीं लोक गाडी हाकण्यास ठेविले होते व आंजणा हे त्यांचे वंशज असें मानण्यांत येतें अजूनही ते आपणाला चोरा म्हणवितात जातकर्म करितात, व त्याचप्रमाणेंच मृतासाठीं रडणाऱ्या बायकांना शिजविलेले गहूं किंवा ज्वारी देतात या जातींतील बायका पुरुषांना कृषिकर्मांत मदत करितात यांचा पंथ पाहतां, हे रामानुजी शैव, आणि स्वामीनारायणपंथी आढळतील यांचे उपाध्याय औदिच, मेवाड, मोढ आणि विसनगर नागर ब्राह्मण होत. मुलांचीं लग्नें त्यांच्या अकराव्या वर्षापूर्वी करण्यांत येतात यांच्यांत विधवाविवाह व घटस्फोट रूढ आहेत घटस्फोटाचे व इतर ज्ञातिविषयक तंटे गावचा पुढारी ज्ञातींतील कांहीं शिष्ट मंडळींच्या विचारानें मिटवितो

**आंजणा लोकांचा लग्नविधि**—या लोकांत एकाद्या मुलगा होऊन पंधरा एक दिवस होतात न होतात तोंच त्या मुलाच्या लग्नासंबंधीं वाटाघाट सुरू होते ज्याची या मुलाच्या येतावी मुलगी असेल त्याला दुसऱ्याकडून वरपिता विचारितो होकार मिळताच वराकडील मंडळी एक रुपया व गूळखोबऱ्याची वाटी घेऊन मुलीच्या घरीं जातात, व वाटाघाटीअंतीं पक्कें ठरलें म्हणजे वरपिता तो रुपया व गूळखोबरें कन्यापक्षास देऊन घरीं परततो

याप्रमाणें सगाई झाल्यावर गावकरी लोक सांगतील तेव्हां वधूवराचें लग्न होतें जोशास बोलावून त्याच्या व पंचाच्या संमतीनें मुहूर्त ठरतो नंतर निदान पावमणासह बरोबर वधूपिता वरपित्याकडे कुंकुममंडित लग्नपत्रिका धाडतो यांची गणपतिस्थापना म्हणजे पाण्याच्या तांब्याला कुंकवाचीं पाच बोटें लावून त्यावर नारळ ठेवून कलशाची पाटावर स्थापना करणें नंतर माणेकस्तंभारोपण (केडवा कुणब्याप्रमाणें) होतें लग्नापूर्वी एक दिवस वराचा मामा त्यास अंगरखा, उपरणें, पायजमा वगैरे पोषाख व एक रुपया देतो नंतर वरास हळद लावून स्नान घालतात मग मामानें दिलेला पोशाख देऊन हातीं रुपया देतात वरपिता त्यास पागोटें बांधतो व मामा हातीं कट्यार अगर तरवार देतो, नंतर त्यास घोड्यावर बसवून स्त्रीपुरुषांसह गावांतून मिरवितात वरासह सर्व स्त्री-पुरुष वाजत गाजत वधूमंडपाजवळ दाखल झाल्यावर वधूमाता वरास कुंकू लावून त्याच्या हातीं अक्षता व नारळ देऊन त्याचा पूजासत्कार करते नवरीला हळद लावून नंतर तिच्या मामानें आणलेलीं वस्त्रें तिला नेसवितात मग मामा तिला मंडप्यावर आणून बसवितो कन्येकडील उपाध्याय एका ताटांत कुंकू, अक्षता, नाडे (लालरंगाचीं सुतें) तीळ जव, तूप व पाण्यानें भरलेलें भांडें घेऊन येतो, नाडे चौपदरी करून त्याच्या 'वरमाळा' करितो, व त्या वधूवरांच्या गळ्यांत घालतो नंतर मातीच्या कुंडांत अग्नि प्रदीप्त करून होम व प्रदक्षिणा हीं कृत्यें केडवाकुणब्याप्रमाणें करण्यांत येतात. मग कन्येची आई कंसार(शिरा)व तूप घेऊन 'चारी' (चबुतरे)त येते वधूवरापुढें ठेविते वर त्यास फक्त स्पर्श करून हात धुवून सासूचा पदर धरतो, व कांहीं देणगी देण्याचें कबूल करून घेतल्याखेरीज सोडीत नाहीं यानंतर वरमाता वधूवरावर अक्षता टाकते मुलीकडील पोक्त मनुष्य मुलीला घेऊन मुलाकडील पोक्त मनुष्याच्या ओटींत घालतो—म्हणजे अर्थात त्याच्या मांडीवर बसवितो यासमयीं जमलेल्या मंडळींतून प्रत्येक जण मुलीच्या हातीं एक एक रुपया देतो वधू मोठी असल्यास तिला त्यावेळींच सासरीं नेतात, लहान असल्यास नेत नाहींत कन्या बारा-

वर्षांची झाली म्हणजे तिचा पिता उपाध्यायाबरोबर तिला घेऊन जाण्याविषयीं निरोप पाठवितो मग वरापता वर व इतर स्नेही गामह कन्येच्या घरीं जातो यावेळीं त्यास वधू करितां दागिने न्याव लागतात मुलाच्या पाठवणीच्या वेळीं तिचा बाप जावयास कर्णभूषणें, धोतर, चांदीची आंगठी, वनात, वगैरे देतो इतर मडळीस प्रत्येकीं एक एक धातर देण्याचा चाल आहे मुलाला यथाशक्ति दागिने व ससारोप योगी वस्तू देतात लग्नसमयीं मुलगी मोठी असल्यास या वस्तू तिला एक मूल झाल्यावर देतात

पुनर्विवाह—केडवा कुणब्याप्रमाणें यांच्यातहि 'नातु म्हणजे पुनर्लग्न करण्याची चाल आहे पहिला नवरा विद्यमान असतांहि असा पाट लावितो येतो नवरा हयात असता कांहीं कारणानें त्याचा सबध सोडावा वाटल्यास मुलीचा बाप जावयास कांहीं रकम देतो, म्हणजे तसें करितां येतें व पुन्हा लग्न करण्याचा अधिकार मुलीच्या आईबापास अगर भावास वगैरे असतो रविवारीं अगर मगळवारीं पाट लागतो ( सेन्सस रिपोर्ट—बडोदें, अलोनी—लग्नविधि व मोहाळे )

आंजी—हें गाव वर्धा तहसिलींत असून धाम नदाच्या कांठीं आहे हें वर्धा शहरापासून ९ मैल वायव्य दिशस आहे भोंसल्याच्या अम्मलदारींत हें गाव महत्त्वास पोहोंचलें याठिकाणीं मातीची एक गढी बांधिली आहे हें परगण्याच स्थान आहे परतु अलीकडे कमाविसदार ह्या गावीं येथें राहतो मागें पेंढारा लोकापासून या गावाम त्रास पोंचला होता या ठिकाणीं इ. स १८७० च्या सुमारास म्युनिसिपल फडातून कापूस तोलण्याचा जी एक जागा तयार केली ती गईच्या आत होती यासुमारास येथील लोकसख्या २७७० होती. येथें सुती कापड तयार होऊन रगविलें जातें, व याच कापडाचा व्यापार या गावीं मुख्यत्वेंकरून होतो ( म प्रा ग्या १८७०,

आजीवक, विषयप्रवेश— बौद्ध व जैनसप्रदायाच्या अतिप्राचीन सूत्रग्रथावरून त्या पथाच्या स्थापनेच्या कालीं म्हणजे इ स. पूर्वी सहाव्या शतकाच्या अखेरीस आजीवक नावाचा एक धर्मपथ अस्तित्वात होता, असे दिसून येतें कांहीं जैन ग्रथावरून या पथाचा मुख्य सस्थापक गोशाल मखलीपुत्र हा होता असें कळून येतें गोशालापूर्वी नदवच्छ व किससकिच्छ हे आचार्य होऊन गले असें कांहीं पडित म्हणतात जैनाच्या सातव्या अंगग्रथामध्यें गोशाल यानें सद्दालपुत्त नावाच्या पुरुषास आजीवक पथात समाविष्ट करून घेतल्याचा उल्लेख आहे, व भगवतीसूत्रामध्यें गोशालाच्या चरित्राची हकीकत दिली आहे बौद्ध व जैन आख्यायिकामध्यें या पंथास इच्छास्वातत्र्य व नैतिक जबाबदारी हीं तत्त्वें अमान्य असल्याचें म्हटलें आहे

आजीवक या संज्ञेचा बरोबर अर्थ काय आहे या विषया आपणास माहिती आढळत नाहीं आजीव या सस्कृत शब्दाचे अर्थ एका विशिष्ट जातीचा धंदा किंवा वृत्ति असा असून बौद्ध सप्रदायामध्यें भिक्षूस अवश्यक असलेल्या आठ गोष्टी पैकीं सम्यक् आजाव म्हणजे चागली वृत्ति हा एक आहे कमतत्त्वाच्या शृखलेमधून मुक्त झालेल्या भिक्षूनें कोणता धदा पत्करावा याविषयीं गोशालाचा कांहीं विशिष्ट मतें बन लेलीं होतीं असें दिसतें या विशिष्ट मताचा ज्यानीं स्वीकार केला होता, त्या लोकास विरुद्ध पथाच्या लोकानीं आजीवक ही सज्ञा प्रथम दिली व नतर या संज्ञेतील वाईट अर्थ निघून जाऊन हें केवळ एका पथाचें नाव बनलें

गोशालाचें चरित्र—गोशालाच्या बापाचें नाव मखली असें असून तो धदेवाईक भिक्षेकरी होता. त्याचे आईबाप दरिद्री असल्यामुळें एकदा पर्जन्यकाळांत एका गोठ्यामध्य आश्रयास राहिल असता त्या ठिकाणीं या आजीवक पथाच्या संस्थापकाचा जन्म झाला असल्यामुळें यास गोशाल हें दुसरें नामाभिधान देण्यात आलें गोशाल हा मोठा झाल्या वर त्यानें आपल्या बापाचाच पेशा पत्करिला व अशा रीतीनें तो भटकत असता त्याची व निग्रथ ( निर्ग्रंथ ) पथाचा सस्थापक जो महावीर याची अनेक वेळा गाठ पडली महावीरास लोकाकडून पुष्कळ मान मिळतो हें पाहून गोशालानें अनेक भिटकारण्या सोसून सरतेशेवटीं हरप्रयत्नानें आपणास महावीराच्या शिष्यशाखेमध्यें समाविष्ट करून घतलें परतु या दोघा पुरुषाच्या स्वभावामध्यें व वागणुकी मध्यें जमीनअस्मानाचें अतर असल्यामुळें व गोशाल हा एक लबाड, लफंगा गृहस्थ असल्यामुळें सहा वर्षांच्या अव धीमध्यें या दोघाची मैत्री तुटली यानतर गोशालानें आजीवक लोकाचा निराळाच एक पथ स्थापन करून श्रावस्ति नगरातील एका कुंभारिणीच्या वाड्यामध्यें आपला मुक्काम केला पुढें सोळा वर्षानतर महावीर हा श्रावस्ति नगरात आला असता त्यानें तेथें चाललेली गोशालाची चलती पाहून त्या ढोंगी तपस्व्याचीं बिंगें बाहेर काढली या गोष्टीचा सूड उगविण्याकरिता गोशालानें महावीराकडे जाऊन महावी राच्या पूर्वीच्या गोशाल नावाच्या मित्रापेक्षां आपण स्वत भिन्न असल्याचें भासविलें परतु गोशालाची लबाडी उघड कीस आली व दोन्ही पथाची मारामारी होऊन तींमध्यें गोशालास हार खावी लागली या दुष्कीर्तीचा गोशालाच्या मनावर इतका अनिष्ट परिणाम झाला कीं, त्यानें सर्व निय त्रणें झुगारून देऊन मद्यपान, नाचरग, त्या कुंभाराच्या दुकानातील राड झालेलें थड पाणी आगावर शिंपडून घेणें, कुंभारिणीसाठीं लाल घोटणें इत्यादि गोष्टींकडे आपणास वाहून घेतलें कांहीं दिवसानीं त्याला एकाएकी पश्चात्ताप झाला व त्यानें आपल्या शिष्यास महावीराच्या स्वत विषयींच्या ( गोशालाविषयींच्या ) भाषणाची आठवण दिली व आपलीं निंद्य कृत्यें चव्हाट्यावर जाहीर करून नतर आपला अंत्यविधि करण्याविषयीं आज्ञा केली अर्थात् शिष्यानीं त्यानें सांगितल्याप्रमाणें केलें नाहीं हें सांगावयास नकोच

कृत्यें होत, व यानंतरचे तीन प्रसंग गोशालाच्या मृत्युसमयींच घडून आल्याचें गोशालाच्या चरित्रावरून दिसतें

गोशालाच्या मृत्युसमयीं घडून आलेल्या अशाच एका प्रसंगावरून "चत्तारिपाठागाइम चत्तारि अपाणगाइम्" प्राशन करावयाच्या चार गोष्टी व प्राशन न करता केवळ स्पर्श करावयाच्या चार गोष्टी,या विशिष्ट तत्त्वाची उत्पत्ति झाली. तापाच्या झटक्यांत गोशालानें एक आंबा हातात घेतला व कुंभाराच्या अंगणात असलेल्या चिखलात स्वतःस बुडवून घेतलें असें सांगितलें आहे. ह्या प्रसंगावरूनच त्याला एकदम वरील विचार सुचले असावेत.

"मज्झिम निकाय" या बौद्ध ग्रंथामध्यें 'सच्चक' नावाचा एक निर्ग्रंथ पंथातील मनुष्य, गोशाल मंखलीपुत्त व त्याचे दोन मित्र ह्यानीं स्थापन केलेल्या आजीवक पंथातील लोकाचे आचार कसे असतात ह्याची माहिती बुद्धास देत असल्याचें दाखविलें आहे. दीघ निकाय ह्या ग्रंथामध्येंहि अशीच हकिकत आहे. ह्यावरून हें वर्णन केलेले आचार सरसहा तापस संप्रदायास सारखेच लागू पडत असावेत असें दिसतें. ह्याठिकाणीं असेंहि म्हटलें आहे कीं, आजीवक हे कधीं कधीं खाण्यापिण्याची खूप चैन करतात व लठ्ठ बनतात. अर्थात हें विधान गोशालाच्या रंगेल चरित्रास उद्देशूनच केलेलें असावें.

वरील विवेचनावरून एवढें स्पष्ट दिसून येईल कीं, आजीवक पंथाचीं कांहीं मतें जरी सर्वांस पटणारीं नसलीं तरी ह्या पंथाचा समावेश जैनामध्येंच करणें सयुक्तिक दिसतें. महावीर व गोशाल यांचे मतभेद तत्त्वासंबंधीं नसून केवळ आचारासंबंधीं होते. उदाहरणार्थ 'सूत्रकृतांग' ग्रंथामध्यें गोशाल याच्या बरोबर महावीराच्या आर्दक नावाच्या एका शिष्याचा वादविवाद झाल्याचें दाखविलें आहे. त्यामध्यें (१) शीतजल प्राशन,(२)न शिजविलेलें धान्य खाणें,(३) मुद्दाम तयार केलेल्या वस्तूंचा परिग्रह,(४) स्त्रीसंग करणें ह्या चार गोष्टींबद्दल महावीरानें जे निर्बंध घातले होते ते गोशालास मान्य नव्हते. विशेषतः ह्यापैकीं शेवटची गोष्ट जी स्त्रीसंगतीबद्दल तर विशेषच वाद होता. महावीर व गोशाल ह्या पूर्वींचा जो पार्श्व त्यानें आपल्या अनुयायास (१) अहिंसा, (२) सत्य, (३) अस्तेय व (४) अपरिग्रह हीं चार व्रतें सांगितलीं होतीं. ह्यामध्यें महावीरानें ब्रह्मचर्य व्रताची भर घातली. परंतु दरम्यान साधारण समजून अशी होती कीं, ब्रह्मचर्याचें जरी साक्षात विधान केलेलें नाहीं तरी तें अध्याहृत आहेच. परंतु वास्तविक गोष्ट अशी होती कीं, जरी विवाहित स्त्री ही एक मालमत्ता समजली जात असल्यामुळें अपरिग्रहानें तिचा निषेध होतो त्याचप्रमाणें अस्तेयव्रतानें परस्त्रीगमनाचा निषेध होतो. परंतु अनूढागमनाच्या पापकर्माची वासलात कशी लावावयाची? ही आपत्ति टाळण्याकरितां महावीरानें सरसकट ब्रह्मचर्य व्रताचा उपदेश केला. अशा रीतीनें गोशालाच्या नीतिबाह्य आचरणामुळें महावीरास ब्रह्मचर्य नियमाची कडक स्थापना करावी लागली, व दोघामधील भांडणाचें मूळ हेंच होय.

ह्या एका मुख्य कारणाखेरीज दुसरीं मतभेदाचीं कारणें बरींच होतीं. उदाहरणार्थ महावीरानें भिक्षेकरिता एक पात्र जैनमुनीनें बाळगावें अशी सवलत दिली. परंतु गोशालाचें म्हणणें असें कीं अन्न हें हाताच्या अंजलीरूप भिक्षा पात्रांतच खाल्लें पाहिजे. तसेंच वस्त्रप्रावरणाच्या बाबतींत पार्श्वानें शरीराभोंवतीं परिकरवस्त्र वापरण्याची परवानगी दिली होती, व महावीरानें फक्त जरूरीपुरतेंच कटिबंधन वापरण्याची सवलत दिली, परंतु गोशालानें मात्र नग्न स्थितींतच राहण्याचा उपदेश केला. तथापि महावीर व गोशाल हे एकत्र असतांना महावीर हा नग्न स्थितींतच रहात असे. ह्या किंवा अशाच दुसऱ्या कित्येक मतभेदामुळें आजीवक पंथाची जैनापासून विभागणी करण्यात आली

आ जी व कां ची ऐ ति हा सि क मा हि ती:—अशोकाच्या ज्या शिलालेखामध्यें आजीवकाचा प्रथम उल्लेख येतो, ते शिलालेख इ. सनापूर्वी २२७ पासूनचे आहेत. यानंतर इ सनाच्या ५५० च्या सुमारास होऊन गेलेल्या वराहमिहिरानें आपल्या बृहज्जातक, लघुजातक या ज्योतिषविषयक ग्रंथात आजीवकासह सहा प्रकारच्या तापसाचा उल्लेख केला आहे. वराहमिहिराच्या वेळीं ह्या पंथाचे लोक सर्वत्र असावेत असें दिसतें. यानंतर इ. स. ८७६ च्या सुमारास होऊन गेलेल्या शीलांक नावाच्या जैन टीकाकारानें आजीवकाच्या अस्तित्वाबद्दल पुरावा दिला आहे. या उल्लेखामध्यें आजीवक हे दिगंबर जैन होत असें प्रथमच दर्शविलें आहे. यानंतर इ. स. ९५० च्या सुमारास होऊन गेलेल्या हलायुधानें आपल्या 'अभिधान रत्नमाला' नामककोशात जैनाचे दिगंबर व श्वेतांबर हे पंथ व त्याचे असंख्य पोटभेद सांगितले असून त्यामध्यें दिगंबरानाच "आजीवक" म्हणतात असें त्यानें सांगितलें आहे. यानंतरचे 'आजीवक' पंथासंबंधीं शेवटचे उल्लेख इसवी सनाच्या तेराव्या शतकांत झालेल्या कांहीं देवालयातील जुन्या लेखामध्यें आले असून हे लेख म्हटलें म्हणजे इ. स. १२३८ ते १२५९ च्या दरम्यान राजराज नावाच्या चोल घराण्यातील नृपतीनें विरिंचिपुराशेजारीं असलेल्या पोयगै येथील पेरुमाल देवालयास कायमच्या खर्चाकरिता दिलेल्या जमिनीसंबंधीं भिंतीवर कोरलेल्या दानपत्रिका होत. या लेखावरून आजीवक हेच दिगंबर जैन होत असें दिसतें. अशा रीतीनें इ. स. च्या सहाव्या शतकापासून आजीवक हें नाव जैनामध्यें दिगंबर पंथास लाविलें असल्याचें दिसतें.

आजीवक हे वैष्णव होते कीं काय या संबंधानें वाद आहे. प्रो. कर्न व बुह्लर हे त्यांना वैष्णव समजतात. प्रो. पाठक व डॉ. भांडारकर यानीं हें म्हणणें चुकीचें म्हणून सिद्ध केलें आहे. (बुद्धपूर्व जग पा. १२९—१३२ पाहा.)

गोशाल त्यास मंखलीपुत्त किंवा मंखली ( दंड हातात घेणारा ) असें म्हणत असत ही गोष्ट वर आलीच आहे. यावरून तो मूळांत एकदंडी तापसांच्या पंथांपैकीं एक होता असें स्पष्ट दिसतें; व पुढें जरी त्यानें महावीराची विचार-पद्धति स्वीकारली तरी आपलीं स्वतःचीं कांहीं मतें व हातात दंड घेण्याची प्राचीन चाल हीं मात्र कायम ठेविलीं. यामुळेंच निर्ग्रंथ पंथामध्यें गोशालाच्या अनुयायास आजीवक किंवा एकदंडी या संज्ञा देण्यात आल्या. सांप्रत देखील श्वेतांबरापेक्षा दिगंबराचे वरील आचार भिन्न आहेत. अशा तऱ्हेनें निरनिराळ्या बाजूंनीं विचार केला तर जैनामधील दिगंबर व श्वेतांबर या दोन पंथाच्या विभागणीचें मूळ त्या संप्रदायाच्या महावीर व गोशाल या दोन संस्थापकापर्यंत जाऊन भिडतें. बौद्ध संप्रदायाच्या धर्मग्रंथामध्यें आजीवक पंथाबद्दल कांहीं महत्त्वाचे उल्लेख आढळतात परंतु त्यांवरून स्वतंत्रपणें महत्त्वाची माहिती कांहींच उपलब्ध होण्यासारखी नाहीं असें दिसतें.

[ सं द र्भ ग्रं थ.—बुह्लर एपिग्राफिका इंडिका पु. २. याकोबी जैन सूत्राज ए. वी. ई. पु. २१ आणि ४४. कर्न-मॅन्युअल ऑफ इंडियन बुद्धिझम. ओल्डेनबर्ग–बुद्ध. ऱ्हीस डेव्हिड्स्–बुद्धिस्ट इंडिया; डायालोग्स ऑफ बुद्ध. राकहिल लाइफ ऑफ बुद्ध. सेनार्ट–इन्स्किप्शन्स डि पियदस्सी. स्मिथ–अशोक. वेबर–कॅटलॉग ऑफ दि रॉयल लायब्ररी, बर्लिन. होर्नेल–ए. रि. एथिक्स ( आजीविकाज ) हलायुध–अभिधानरत्नमाला. त्रिपिटक ग्रंथ. ज्ञानकोश–बुद्धपूर्व जग, इंडियन अँटिक्वरि पु. ४१. जर्नल बॉ. ए. सो [ पृ. २०; २१.]

**आज्यप.** –पितृगणांतील एक भेदविशेषाचें नांव आहे. महाभारतांतील अनुशासनपर्वांत हे ब्रह्मयाचा मानसपुत्र जो पुलह ऋषि, त्याचे वंशज असून यज्ञामध्यें आज्य ( शेळीच्या दुधापासून झालेले तूप) त्याचेंच पान करतात, म्हणून यांना आज्यप नांव पडलें असा उल्लेख आहे. यांस सुस्वधा असेंहि कोठें कोठें म्हटलें आहे. अग्निहोत्र्यानें करावयाच्या दर्शपूर्ण-मास यागामध्यें आज्यप नांवाच्या देवांना उद्देशून याग होत असतो. आज्यप हे वैश्य वर्णासहि पूज्य आहेत. ( मत्स्य पुराण अ. १५ )

**आटकोट**—भादर नदीच्या पश्चिम तीरावर व राजकोटपासून तीस मैलावर असलेलें एक शहर ( काठेवाड ) लोकसंख्या २०६७ (१८८१), जसदनच्या काठी घराण्यांतील लोकांपासून जाम साहेबानें हें मिळविलें. प्रसिद्ध लाखो फुलानी, यानें हें शहर वसविलें अशी स्थानिक दंतकथा आहे, लाखो, मोठा झाल्यावर तो इतका हट्टी व धाडशी बनला कीं, बापाच्या हुकमांत राहणें त्याला न आवडून त्यानें लाखामोर्ची नांवाचें खेडें वसविलें. यानेंच प्रथम काठेवाडात बाजरी परदेशांत लुटालूट करताना आणली असें म्हणतात. लाखोच्यानंतर अहीर, खेरडीचे रुमान, सोरठचे मुसुलमान, व लखानी खाचर या लोकांनीं येथें राज्य केलें. १८ व्या शतकाच्या अखेरीस जामने तें काबीज केल्याचें वर दिलेंच आहे येथें दवाखालय, शाळा आणि न्यायाधिशाचें ऑफिस आहे. जसदन संस्थान पहा [ बॉ. गॅ. ८ ]

**आटनेर.**—हे गाव बेतुल जिल्ह्यात आहे. तें बदनूरच्या थेट दक्षिणेस असून त्यांतील लोकसंख्या इ. स. १८७० च्या सुमारास १९३८ होती. येथें प्रत्येक आठवड्याला बाजार भरतो. वऱ्हाड प्रांताशीं याचा मोठा व्यापार चालतो. या ठिकाणीं पोलिस ठाणें, शाळा व दवाखाना हीं आहेत. जकातीचा नायब या गावीं राहतो, मराठ्यांच्या अमलदारींतील येथें एक पुरातन किल्ला आहे. या ठिकाणीं खोदलें म्हणजे अजून देखील चौरस केलेले दगड सापडतात ( म. प्रां ग्या. १८७०. )

**आटपाडी महाल**— औंध संस्थानचा हा सर्वांत मोठा महाल सातारा जिल्ह्यांत आहे याचें क्षेत्रफळ सुमारें २३७ चौरस मैल असून लोकसंख्या ३६२२७ आहे. या महालांत ३३ गावें आहेत, त्यांपैकीं आटपाडी व दिघंची हीं दोन मोठीं आहेत. पाऊस सरासरी १५ इंच पडतो. मुख्य पिकें बाजरी, मटकी, गहूं, हरबरा, रताळी, मका हीं होत साळी, कोष्टी व धनगर या लोकांचीच वस्ति फार आहे बहुतेक लोक अशिक्षित आहेत. या महालांत घोंगड्या, पासोड्या, खादी, लुगडीं वगैरे कापडी माल विशेष निघतो. महालाचा वसूल ८०००० रुपयांचा आहे.

**आटपाडी गांव**—आटपाडी महालातील एक मोठा गाव. उ.अ. १७ २५, व पू. रे. ७४ ६९, लो. सं. ( १९०१ ) ५०२७. येथील खिल्लारी बैल प्रसिद्ध आहेत येथें म्युनिसिपालिटी, दवाखाना, पोष्ट व मामलेदार, फौजदार, मुनसफ यांच्या कचेऱ्या आहेत, एक इंग्रजी–मराठी शाळा गावात आहे कऱ्हाड पंढरपूर या रस्त्याच्या नजीकच हें गाव असल्यामुळें पंढरपुरला जाणारे पुष्कळ यात्रेकरू येथें येतात. येथून १२ मैलावर खरसुंडी येथें नाथाचें प्रख्यात देवालय आहे तेथें वर्षांतून दोन वेळा मोठा गुराचा बाजार भरतो.

**आट्यापाट्या.**–हा प्रसिद्ध महाराष्ट्रीय खेळ किती जुना आहे हें सांगवत नाहीं. तुकारामाच्या अभंगांत मृदंग पाटीचा उल्लेख सापडतो. तथापि मराठ्याच्या नवसंशोधित इतिहासांत या खेळाचा नामनिर्देश कोठें आहे कीं काय हें कोणी पाहिलेलें दिसत नाहीं. कोणी म्हणतात मराठ्याचा गनीमी कावा या खेळात अंतर्भूत झालेला आहे. कसेंहि असो, एवढें मात्र उघड दिसतें कीं, या खेळात महाराष्ट्रीयाचा नेहमीचा साधेपणा व अडदांडपणा ( सरळ अर्थानें ) भरलेला आहे. या खेळाची ठोकळ रूपरेषा, एकानें दुसऱ्यास ठराविक जागेंत (पाटींत ) अडवावयाचें व दुसऱ्यानें त्याला हुलकावणी देऊन निसटून जावयाचें, अशी आहे मध्यंतरी बरींच वर्षे क्रिकेट फुटबालचा प्रचार इकडे झाल्यापासून हा खेळ मागें पडला होता. पण पुन्हां राष्ट्राभिमानी मंडळींच्या प्रयत्नानें त्याचा समावेश ' शील्ड मॅच ' मध्यें होऊं लागला. व त्याकरिता या

खेळास आटपशीरपणा व शिस्तहि लावून देण्यात आली तेव्हां आता हा महाराष्ट्रीय खेळ अस्सल खेळाडूंना खेळण्यास लायक आहे हे पुण्याच्या डेक्कन जिमखान्याच्या आट्यापाट्यांच्या नियमावलीवरून समजून येईल त्याच नियमावलीतून आम्ही जी पुढील माहिती उद्धृत करीत आहों ती या खेळाची कल्पना आणून देण्यास पुरेशी आहे पुण्यातील हायस्कुलांत आट्यापाट्यांच्या शर्यती होऊन त्याबद्दल शील्ड ठेवण्यात आलें आहे निरनिराळ्या कॉलेज्यांच्याहि आता आट्यापाट्यांत शर्यती होतात शिक्षणसंस्थांच्या चुरशी सुरु झाल्यापासून खेळास व्यवस्थित स्वरूप आलें आहे व फेरबदलहि झाले आहेत उदाहरणार्थ, खेळणाऱ्यांपैकी एखादा भिडू मेला तर डाव संपत असे. पुढ तीन गडी मरेपर्यंत खेळणाऱ्या पक्षाचें आयुष्य वाढविण्याचा प्रकार "पूना स्कूल्स ॲथलेटिक असोसिएशननें पाडला डेक्कन जिमखान्यानें गडी मरण्यावर खेळाचा शेवट अवलंबून न ठेवता खेळाला कालमर्यादा घातली आणि प्रत्येक दोषाबद्दल किती गुण कापावे हें ठरविलें

आकृति न. १
खेळण्याची जागा



पूर्वतयारी—अगण बिनचूक आखता यावें म्हणून एक पोलादी टेप, चार लाकडी मेखा, खिळे, तारेच्या चुका, अच्छेर सुतळी, मोठी लोखंडी मेख, चुन्याची फक्की, पाणी, झारी व इतर किरकोळ साहित्य संग्रहीं असावें

आकृति न १ मधील बाहेरील मोठ्या काटकोन चौकोनाच्या चार कोपऱ्यांत चार लाकडी मेखा माराव्या हे चार बिंदू एकदा कायम करून, बाहेरील चौकोन प्रथम नक्की झाले कीं, बाकीचे सर्व अगण, दिलेली अंतरें टेपानें मोजून घेऊन झटकन बिनचूक आखता यतें बाहेरील चौकोन ८९ फूट १ इंच लांब व २३ फूट रुंद चौकोनाचा कर्ण (अदमासें) '९१ ११ आहे (आकृति न १ पाहा)

मापें—(१) प्रत्येक पाटी १३ इंच रुंद व २३ फूट लांब (२) सूर १३ इंच रुंद व ८९ फूट १ इंच लांब (३) सुराच्या योगानें प्रत्येक पाटाचे दोन बरोबर समान विभाग झाले पाहिजेत. (४) एका पाटाच्या बाहेरील रेषेपासून शेजारील पाटीच्या बाहेरील रेषेपर्यंत अंतर—११फूट प्रत्येक काडेछेद (उ ट)—१३ इंचाचा चौरस असावा

व्याख्या व नियम—१ आरंभीच्या पाटीस (आकृति न. १ मधील अ' ही पाटी) चाभारपाटी अगर कपाळपाटी म्हणतात सर्व पाट्यांना दुभागून जाणा या उभ्या पाटीस (आकृति न १ मधील, क ख ' ही उभी पाटी) मृदंग अगर सूर असें म्हणतात शेवटच्या पाटीस (आकृति न १ मधील ' ओ ' ही पाटी) लोणपाटी म्हणतात.

२ सूर व इतर पाट्या ह्यांमधील छेदास (आकृति नं. २ मधील ' ट ' ' ठ ' इत्यादि छोट्या चौरसास) काडेंछेद म्हणतात

३ सुराच्या योगानें झालेल्या पाटीच्या प्रत्येक विभागास पाटीचें काडें असें म्हणतात (उदाहरणार्थ, आकृति न २ मधील ' य ' हा विभाग) व दोन पाट्यांमधील सुराच्या भागास सुराचें काडें म्हणतात (उदाहरणार्थ.—आकृति न २ मधील ' क्ष ' हा विभाग).

४. सुरानें डावाच्या सुरुवातास चाभारपाटींतील काडेंछेदांत निदान एक पाऊल ठेऊन, पहिल्या पाटींतील काडेंछेदात निदान एक पाऊल टाकून, परत पुन्हा चाभारपाटींतील काडेछेदात एक पाऊल टाकणें यास काडें चिरणें असें म्हणतात (आकृति न १ मध्यें ' क ' पासून ' ट ' पर्यंत जाऊन फिरून ' ट ' पासून ' क पर्यंत येणें)

५ पाट्यांवर उभें राहून विरुद्ध पक्षास अडवून मारण्याचा जे प्रयत्न करतात त्यांना पाट्या धरणारे अथवा पाटीवाले म्हणतात आणि पाट्या ओलांडण्याचा जे प्रयत्न करितात त्यांना खेळणारे असे म्हणतात

६ चांभारपाटी व सूर ह्या दोन्ही पाट्या एकच गडी धरतो, व ह्या पाट्या धरणाऱ्या गड्यास मृदंग अगर सूर

धरों म्हणतात. यांनीच्या पाट्यांवरून प्रत्येक पाटीवर एक एक याप्रमाणें गडी नेमून देतात.

७. खेळणारानें (लोण असताना) पाटीवाल्यास उद्देशून 'तोंड' असा शब्द स्पष्ट व मोठ्यानें उच्चारणें यास तोंड मागणें म्हणतात. हा शब्द ऐकताक्षणींच पाटीवाल्यानें आपलें तोंड लोणपाटीकडे फिरविलें पाहिजे

८. पाटीवाल्याच्या शरीराचा कोणताहि भाग पाटीच्या मर्यादेच्या बाहेर झुकून मागील अगर पुढील बाजूस जमीनीवर लागला तर त्यास पाय चुकला असें म्हणतात.

९ पाटीवाल्याच्या पावलाशिवाय इतर कोणताहि भाग जर जमीनीस लागला तर त्यानें हात टेकला असें म्हणतात.

१०. एक पाऊल जमीनीवरून उचलून पाटीवाला जर दुसऱ्या पायावर उभा राहील तर त्यानें पाय उचलला असें म्हणावें.

११. खेळणाराचें पाऊल जर मर्यादेच्या बाहेर गेलें तर त्याचा तो पाय बाहेर गेला असें म्हणतात (नियम २४ पहा).

[टीप (१): अंगठ्याचें टोंक मर्यादेत जमिनीस लागलेलें असून इतर सर्व शरीर बाहेर असलें तरी पाय बाहेर गेलासें होत नाहीं. (२): सर्व शरीर मर्यादेबाहेर अधांतरीं असल्यास पाय बाहेर गेलासें होत नाहीं.]

१२. नियमाचें उल्लंघन न करितां पाटीवाल्यानें खेळणाऱ्यास हातानें स्पर्श करणें यास गडी मारणें असें म्हणतात.

१३. चाभारपाटीकडून लोणपाटीकडे खेळत जाणें यास वरून खालीं जाणें व लोणपाटी उलटून चाभारपाटीकडे परत खेळत येणें यास खालून वर येणें असें म्हणतात.

१४. खेळणारांपैकीं खालून वर येणारा व वरून खालीं जाणारा हे एका चौकांत आले म्हणजे लोण मिळालें असें म्हणतात. व तें खालून वर येणाऱ्यानें वरून खालीं जाणारास पोंचविलें असें समजतात

१५ आकृतींत दर्शविल्याप्रमाणें आंगण आखावें आखलेल्या आंगणाच्या प्रत्येक बाजूला निदान दहा दहा फूट जागा मोकळी ठेवावी.

१६. सुरवातीच्या वेळीं खेळणारांनीं चाभारपाटीच्या बाहेर असलें पाहिजे, व पाटीवाल्यांनीं चाभारपाटीकडे तोंड करून पाटीवर असावें.

१७. सुरवातीची सूचना झाल्याबरोबर सुरानें काडें चिरावें. काडें चिरल्याखेरीज त्यास गडी मारता येत नाहींत.

१८. (अ) काडें चिरताना सुरानें मृदंगावरच असलें पाहिजे. (आ) सुरानें योग्य रीतीनें काडें न चिरल्यास पंचांनीं त्यास तें पुन्हा चिरण्यास सांगावें. मात्र सूर पहिल्या दोन पाट्या ओलांडून गेल्यावर त्यास काडें पुन्हा चिरण्यास सांगतां येणार नाहीं

१९. इतर पाटीवाल्यांनीं डावाच्या सुरवातीची सूचना झाल्याबरोबर लगेच गडी मारण्यास हरकत नाहीं

२०. पाटीवाल्यानें गडी मारण्याच्या ऐन वेळेस पाटीच्या हद्दीच्या मागील बाजूस हात जाऊं देऊं नये. हा नियम सुरास लागू नाहीं.

[टीप—परंतु खेळणाऱ्या गड्याच्या शरीरास अडकून हात मागें गेल्यास चालेल.]

२१. पाटीवाल्यांनीं मारतांना व त्यानंतर लगेच (१) वर पाय उचलूं नये, (२) हात टेकूं नये, (३) आपलीं पावलें विरुद्ध दिशेस वळूं नयेत, (काटकोनापर्यंत फिरविण्यास हरकत नाहीं) अगर पाय चुरूं देऊं नये व (४) हात मागें नेऊं नये. यांपैकीं कोणतीहि अट मोडल्यास गडी मारला नाहीं असें समजावें.

२२. पाटी धरीत असतां, पाटी धरण्याच्या वेगांत डावाची हद्द ओलांडून, आपल्या पाटीच्या सरळ रेषेंत पाटीवाल्यास पलीकडे जाण्यास हरकत नाहीं

२३. मृदंगानें पाय उचलण्यास व आपल्या पाटीवर हात टेकण्यास हरकत नाहीं.

२४. खेळणारानें दोन्ही पाय एकदम बाहेर जाऊं देतां कामा नये. एक पाय बाहेर गेल्यास चालेल. मात्र या वेळीं दुसऱ्या पायाचें टोंक मर्यादेंत जमीनीवर टेंकलेलें असलें पाहिजे (या संबंधीं कोंडीचे नियम निराळे आहेत ते पुढें पहावेत.खेळणाऱ्या पक्षापैकीं सर्वांत पुढच्या गड्यानें लोणपाटी धरणाऱ्याजवळ तोंड असा शब्द स्पष्ट उच्चारून तोंड मागावें. तोंड पोंचल्यावर त्या वेळीं त्या पाटींत असणाऱ्या सर्व खेळणाऱ्यांनीं अगोदर खालीं यावें व नंतर ती पाटी पुन्हा ओलांडण्यास लागावें (गडी खालीं येत असतांना पाटीवाल्यास त्याना मारतां येत नाहीं) प्रत्येक पाटींत या प्रमाणें करीत चाभारपाटीकडे यावें. खेळणाऱ्या पक्षापैकीं सर्वांत पुढील गडी चाभारपाटी ओलांडून गेल्याबरोबर लोण झालें असें म्हणतात

२६. लोण झाल्याबरोबर न मेलेल्या गड्यानीं डाव पुनः लगेच सुरु करावा. या वेळेसहि सुरानें काडें चिरावयास पाहिजे.

२७. लोण पोहोंचविणारा व घेणारा हे दोघे एकाच चौकांत अथवा काठ्यांत आले पाहिजेत; एरव्हीं लोण मिळालेसें होणार नाहीं. एकास लोण मिळाल्याशिवाय त्यास तें दुसऱ्यास पोहोंचवितां येत नाहीं.

२८. लोण न मिळतां अगर वर गडी आल्यास, त्यानें तें न पोहोंचवितां गडी वर गेल्यास, तो वारगळला म्हणजे मेला असें समजावें; व जेथपर्यंत तोंड पोंचलें असेल तेथपर्यंतच लोण झालें असें समजावें.

२९. तोंड मागितल्याखेरीज आपण होऊन पाटीवाल्यानें तोंड देऊं नये. खेळणाऱ्या गड्यानें तोंड मागताक्षणींच पाटीवाल्यानें त्यास तोंड दिलें पाहिजे. एकदा तोंड दिल्यावर मग खेळणाऱ्यास त्या पाटींत पुन्हा तोंड मागण्याची जरुरी नाहीं.

एकदां तोंड दिल्यावर पाटीवाल्यानें डाव संपेपर्यंत अगर लोण होईपर्यंत आपलें तोंड चाभारपाटीकडे वळवूं नये

३०. कोणताहि खेळणारा गडी मेला अगर कोणत्याहि रीतीनें बाद झाला तर त्यानें लगेच खेळाच्या बाहेर येऊन सरपंचास तशी वर्दी द्यावी व ते सांगतील त्या ठिकाणीं डावाबाहेर बसावें.

आकृति नं. २.

कोंडी.




कोंडी.—[ १ ]पाटीवाला व सुर हे दोघे एकाच चौकांत खेळणारे गडी कोंडतात त्यास कोंडी धरणें असें म्हणतात असतात परंतु खेळणारा गडी कोंडीमधील पाटीवाल्याच्या समोरील कोंडीतील पाटीवर, जर लागला नसेल तर ती कोंडी समजूं नये

[टी पः—खेळणाऱ्या गड्याच्या शरीराचा कोणताहि भाग पाटीवर असल्यास तो पाटीवर लागला आहे असें समजावें.]

(२) कोंडींत व तिच्या लगतच्या वरच्या पाटींत लागतांना दोन्ही पावलें पूर्णपणें अंतिम मर्यादेच्या आत पाहिजेत, व त्या ओलांडल्याबरोबर कोणताहि पाय बाहेर असता कामा नये.

[३] *कोंडीच्या वरील लगतच्या पाटींत, कोंडीच्या बाजूच्या चौकांत* ( अ ) जर मुळींच खेळणारा नसेल तर त्या पाटीवाल्यानें आपल्या पाटीच्या कोंडीपलीकडील अर्ध्यांतच राहिलें पाहिजे. उदाहरणार्थ 'प' ह्या चौकांत कोंडी असून 'फ' ह्या चौकात मुळींच खेळणारा नसेल। तर 'मभ' पाटीवाल्यानें 'भ' ह्या अर्ध्यांतच उभें राहिलें पाहिजे. (आ) त्या चौकात खेळणारा असेल तर पाटीवाल्यास त्यास ( *कोंडीतून लागणाऱ्या गड्यास मुद्दाम अडथळा न करता* ) या कोंड्यात मारण्याचा अधिकार आहे; परंतु मारतांना जर *एखाद्या नियमाचें उल्लंघन झालें तर खेळणाऱ्या गड्यास* परत पुन्हां पाटींत आलें पाहिजे. उदाहरणार्थ 'प' ह्या चौकात *कोंडी* असून 'फ' ह्या चौकात खेळणारा असेल तर 'मभ' ह्या पाटीवाल्यानें 'म' ह्या अर्ध्यांत येऊन, कोंडीतून लागणाऱ्या गड्यास अडथळा न करितां, 'फ' ह्या चौकातील गड्यास अडवावें.

[४] *कोंडीच्या वरील लगतच्या पाटींत* जर एकच खेळणारा असेल तर त्यानें कोंडी असेपर्यंत कोंडीतून सुराच्या कडेनें लागणारा आपला गडी पाटीवाल्याच्या मार्गांतून दूर होईपर्यंत, त्या पाटीच्या पलीकडील अर्ध्यांतच असलें पाहिजे उदाहरणार्थ 'प' ह्या चौकात कोंडी असून वरील लगतच्या पाटींत एकच खेळणारा गडी असल्यास त्यानें 'ब' ह्या अर्ध्यांतच राहिलें पाहिजे [ आट्यापाट्या व खो खो, डेक्कन जिमखाना पुणें १९२२ ]

या खेळाच्या सामन्याची व्यवस्था पहाण्याकरितां सरपंच, पंच, वेळाधिकारी ( टाईमकीपर ), हिशोबनीस नेमण्यात येतात. जितक्या पाट्या ओलांडल्या असतील त्याप्रमाणें गुण देण्यात येतात व जास्त गुण मिळविणाऱ्या पक्षाचा जय झाला असें मानतात.

**खेळाची पद्धति**.—*आट्यापाट्याचें मैदान आकृतींत* दाखविल्याप्रमाणें आखून त्यावर पाटीवाले व खेळणारे तयारीनें *उभे राहिले असता संकेत झाल्याबरोबर सूर मारणारानें* काडें चिरतो व बहुतकरून तिसऱ्या पाटींत कोंडी धरतो. *इतक्या अवधींत खेळणारे गड्यांनीं* चपळाई करून चाभारपाटीवर व मृदंगावर सुराचा धाव चुकवून इतर पाटीवाल्यांना हुलकावण्या देऊन शक्य तितकें खालीं जावें. साधेल तर चौथ्या व पुढल्या पाटींत निसटून यावें कारण गडी खालीं गेले कीं, सुराला वरची कोंडी सोडून खालीं कोंडी करणें प्राप्त होतें. कोंडीची पाटी ( वरची व खालची ) धरणारे गडी व सूर लांब हाताचे नजरबाज व चपळ असतील तर कोंडी फुटणें मुष्किलीचें जातें. अशा वेळीं कोंडींत वेढलेले खेळाडू धिम्मेपणानें हुलकावण्या देता देता कडेनें अगर मधून भाग चुकवून निसटले तर त्यांनीं मात केली म्हणावयास हरकत नाहीं. कडेनें ओखडून पडण्याची विद्या याच प्रसंगात कामाला येते. कोंडींतील तिन्ही गड्याच्या हुलकावण्या एक्या ठेक्यात येतशीर पडतील तर *कार्यभाग लवकर साधतो.* अशा कोंड्या फोडीत व पाट्या ओलांडीत खेळणारे पुढें सरकत असतात. शेवटची म्हणजे लोणपाटी, हिला या डावात फार महत्व आहे. ती ओलांडली कीं डाव उलटतो. गड्याचीं तोंडें फिरतात. या उलटींत खालून वर येणारा गडी विजयाचें ' लोण ' अगर पाणी वर आणतो एका भिडूचे हस्तें दुसऱ्याला, असें तें लोण

एक एक मुक्काम पुढें सरतें त्यानें जर चामारपार्टी ओलां डली तर शेण पुरं होऊन पुनः खेळणाऱ्यांचा मारा सुरू होतो ! या खेळांत उगीच घाई करून गडी मरूं दिल्यास व्यर्थ नुकसान होतें सबब खेळणाऱ्याच्या नायकानें बारीक नजरेनें वेळप्रसंग ओळखून काम चालविलें पाहिजे व इतरांनीं नायकांचे हुकूम ऐकून कामें उठविलीं पाहिजेत यासाठीं या नायकांनें जबाबदारीचें काम समयज्ञ खेळाडूकडेच द्यावें. आतां पार्टीवाल्याचे बाजूनें विचार करावयाचा म्हटलें त्यांचा मुख्य आधार म्हणजे सूर इतरांच्या मानानें सुरावर कामाचा बोजाहि फार पडतो. सर्व पार्टीवाले व सूर यांनीं आपापलें अंग फार तोललें पाहिजे व पाय वगैरे मर्यादेंत ठेवावे. पाय चुरस्त कामा नयेत प्रथमपासूनच जर पार्टीच्या मागच्या रेषेला खेंचून पाय ठेवण्याची सवंय केली तर पुढें चुकण्याची भीति रहात नाहीं खेळणाराच्या हुलकावण्यावरोवर पार्टीवाल्यानें पाय नाचवूं नयेत, तर स्थिरपणें खेळणाऱ्याचे नजरेला नजर न भिडविता फक्त त्याचे पाया वर लक्ष ठेवून त्याला निसटण्याला अवसर न देता आपलें अंग तोलून सावधपणें पाय चाळवीत असावें. पार्टीवाल्यानें खेळणाऱ्या गड्यास स्पर्श करावयाचा तो स्पष्ट कळण्याजोगा करावा. तोंड देणें, वरून गडी आल्यास अडकावणें, सूर आल्यास झटकन कोंडी करणें, किंवा कोंडी पालटणें ही कामें त्यानें चपळाईनें व तत्परतेनें केलीं पाहिजेत वेसावधपणा या खेळांत केव्हांच कामाचा नाहीं. खेळणाऱ्या बाजूनें आपले हलके व कच्चे गडी सांपडूं नयेत म्हणून शक्य तर भारी गड्याकडून सुजगावणी व हुलकावण्या देऊन, धांवणारा चकवावा; अगर त्यास पळवावें व दमवावें थोड्या वेळांत गडी मारणें हें धोरण बसणाऱ्यांचें असावें, व शक्य तितके गडी कमी खर्ची घालून जास्त वेळ विरुद्ध पक्ष झुलवावा हें धोरण उभे राहणाऱ्या पक्षानें असावें.

**आठवडा**—"वार" पहा, व विज्ञानेतिहास पृ. ९६ पहा.

**आडगांव**—अडगाव पहा.

**आडगांवची लढाई**—ही २९ नोव्हेंबर १८०३ रोजीं एका बाजूस इंग्रज आणि दुसऱ्या बाजूस नागपूरकर भोसले व शिंदे यांच्या फौजा यांच्या दरम्यान झाली ( इंग्रज मराठे युद्ध, दुसरें पहा ) आडगावची लढाई होण्याच्या पूर्वी रघूजी भोसल्याच्या सैन्याची छावणी गाविलगडानजीक आडगाव येथें पडली असून शिंद्याची फौज त्याच्या छावणीपासून पांच मैलाच्या आंतच सिरसोली येथें होती. रघूजीच्या सैन्याचें आधिपत्य त्याचा भाऊ वेंकाजी उर्फ मन्याबापू यामकडे असून त्यावेळ या वेळीं रघूजीचे सर्व पायदळ, कांहीं फौज व बऱ्याचशा तोफा होत्या स्टीव्हन्सन यास जनरल वेलस्लीचा गाविलगडास वेढा देण्याचा हुकुम झाला असल्यामुळें तो तेथून जवळच येऊन पोंचला असून जनरल वेलस्ली हा त्याला मदत करण्याकरितां दक्षिणेकडून येत होता तारीख २३ नोव्हेंबर रोजीं शिंद्याच्या वकीलानें वेलस्लीशीं युद्धतहकुबीचा ठराव केला. परंतु भोसल्यानें अद्याप इंग्रजांकडे आपला वकील पाठविला नसल्यामुळें स्टीव्हन्सन हा भोसल्याशीं लढाई देण्याच्या तयारींत होता शिंद्याच्या वकीलानें इंग्रजांनीं भोसल्याशीं लढाई करूं नये म्हणून वेलस्लीपाशीं पुष्कळ रदबदली केली, परंतु वेलस्लीनें त्यास साफ सांगितलें कीं, युद्धतहकुबीचा ठराव भोसल्याशीं झाला नसून तो फक्त तुमच्या आमच्यामध्यें आहे, एवढेंच नव्हे तर तुम्ही कबूल केलेल्या सर्व अटी पूर्ण केल्याशिवाय तुमच्याशीं चाललेलें युद्ध देखील तहकूब झालें असें समजण्यांत येणार नाहीं. तारीख २८ नोव्हेंबर रोजीं स्टीव्हन्सन हा मराठ्यांशीं व्हावयाच्या लढाईंत आपणास वेलस्लीची मदत मिळावी म्हणून त्याच्या येण्याची वाट पाहत मुक्काम करून राहिला. परंतु इकडे मराठे आपली छावणी हालवून तेथून निघून गेले स्टीव्हन्सनच्या अपेक्षेप्रमाणें त्याला वेलस्ली येऊन मिळाल्यावर दुसऱ्या दिवशीं ते दोघेहि मराठ्यांच्या पाठलागास निघाले दिवसभर प्रवास करून जनरल वेलस्ली हा आपल्या मुक्कामाच्या ठिकाणीं आला तेव्हां शत्रुपक्षाची थोडीशी बिनीची फौज पुढें आलेली त्याच्या दृष्टीस पडली. त्या दिवशीं त्यानें बरीच मोठी मजल केली असल्यामुळें तिचा पाठलाग करण्याच्या भानगडींत न पडतां त्यानें म्हैसूरच्या फौजेस तिच्या तोंडावर पाठवून तो छावणी देण्याच्या तयारीस लागला परंतु इतक्यांत मराठ्यांची आणखी बरीच फौज मागून आल्यामुळें म्हैसूरच्या फौजेच्या मदतीस जाणें अवश्य झालें. जनरल वेलस्ली थोडी फौज घेऊन पुढें जातो तोंच त्याच्या असें नजरेस पडलें कीं, आडगावच्या पुढील विस्तीर्ण मैदानात मराठ्यांचें सैन्य फळी धरून उभें राहिलें आहे. हें पाहून तो लागलीच आपलें सैन्य घेऊन शत्रूवर हल्ला करण्याकरितां निघाला. शत्रूच्या जवळ येऊन पोंहचताच त्यानें आपल्या सैन्याच्या दोन रांगा करून पुढें पायदळ व मागें फौज अशी मांडणी केली. रांगा बनवींत असतां इंग्रजाच्या सैन्यांत जरा घोंटाळा उडाला तो पाहून मराठ्यांनीं त्याच्यावर तोफा रोखून त्यांना सरबत्ती दिली. परंतु रांगा तयार होताच इंग्रजांचें सैन्य व्यवस्थित रीतीनें व धिमेपणानें पुढें जाऊं लागलें. तें पाहून मराठ्यांच्या सैन्यांतून एक पांचशें पायदळाची तुकडी इंग्रजाच्या ७४ व्या व ७८ व्या पलटणींवर मोठ्या त्वेषानें चालून आली, व इकडे शिंद्याच्या फौजेनेंहि त्याच वेळीं त्याच्या पहिल्या पलटणीवर व मद्रासी शिपायांच्या सहाव्या रेजिमेंटावर हल्ला केला शत्रूवर चालून आलेल्या मराठ्यांच्या पायदळाच्या तुकडींतील तर पांचशेंच्या पांचशें लोक ठार झाले शिंद्याच्या फौजेनें केलेला हल्लाहि परतवून लावण्यांत आला, व तिजवरील अंमलदार गोपाळराव भाऊ हा जखमी झाला त्यामुळें मराठ्यांच्या सैन्यांत गोंधळ उडून ते मागें परतले व इंग्रजांची, म्हैसूरकरांची व निजामाची फौज त्यांचा पाठलाग करीत त्यांच्यामागें गेली. या लढाईंत ब्रिटिश सैन्यांतील ठार, जखमी व चुकलेल्या

माणसांची संख्या १४६ होती मराठ्यांच्या सैन्यात किती प्राणहानि झाली याचा कोठें उल्लेख नाहीं पण ती बरीच असावी असा माटडफ अंदाज करतो

**आडनांव**—समाजात एकाच नावाच्या अनेक व्यक्ती सापडतात त्या अर्थी व्यक्तीचा निर्देश अधिक निश्चितपणें करता यावा म्हणून जे कांहीं उपाय योजण्यांत येतात ते आडनावाच्या उत्पत्तीस कारण होतात. जेव्हा एकच नावाच्या व्यक्ती भिन्न वंशातील किंवा कुळातील असतील तेव्हा त्याना कुलनामासहित संबोधिल्यास कोण कोणता हें ओळखण्याचे सोपें जातें या दृष्टीनें आडनावें प्रचारात आली असावीत. तीं बहुतेक सर्व समाजातून दृष्टीस पडतात आडनावाचें महत्त्व इंग्रजी राज्यातच वाढलें पेशवाईत व्यक्तीचे नाव व बापाचें बापाचें नाव एवढाच नामनिर्देशाचा प्रकार असे. आडनावे जीं पडतात तीं कांहीं कारणामुळे पडत असतात आडनावें अनेक कारणानीं बदलतात. एका आडनावाच्या जागीं दुसरें आडनाव जें येतें त्याचाहि कांहीं इतिहास असतोच. उदाहरणार्थ, इचलकरंजीकर ब्राह्मणवंशाला घोरपडे हें मराठा जातीचें नाव पडणें. मराठे जातीच्या घराण्यांचीं आडनावें घेतलेलीं या सारखीं पुष्कळ ब्राह्मणकुळें सांपडतील, बागल, पोळ, सावंत, घोरात वगैरे आडनावें मराठ्याप्रमाणें ब्राह्मणांचींहि आहेत इंग्रज धन्याचें आडनाव घेणारे ब्राह्मण व परभू नोकर महाराष्ट्रीयात आहेत तसे पारशी पुष्कळच आहेत कांहीं प्रांतातून कुलवाचक जुनीं आडनावें नसतात पण आडनावाचें महत्त्व असतें. तेव्हा आडनावाप्रमाणेंच कांहीं विशिष्ट आळींचीं गावाचीं किंवा दुसरीं नावें, वैयक्तिक नामाच्या पुढें किंवा मागें जोडून देऊन आडनावाचे कार्य भागवितात. कांहीं कृतीमुळे आडनावें बदललीं अशा उदाहरणात रास्ते, ढमढेरे हीं नावें येतील

**आडनावाचें पुरातनत्व.**—मराठ्यातील बरींच आडनावें फार जुनीं असावीत. शिलाहारापासून शेलारे, प्रमारापासून पवार, मौर्यापासून मोरे, चालुक्यापासून चाळके, पल्लवांपासून पालव, कदंबापासून कदम अशीं माडणी करण्यात आली आहे. महाराचीं कांहीं आडनावें पौराणिक कालापासून असणें शक्य आहे. तीं नागकुलाच्या नावावरून तीं निघालीं आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न राजवाडे यानीं इतिहाससंग्रहातील, कोंकण व नागलोक या लेखात केला आहे. राजाचीं कुलनामें जशीं जुनीं तशीं ब्राह्मणाचींहि जुनीं असावींत राजवाडे यानीं ज्यास गोत्रें म्हणून म्हटलें आहे आणि ज्यापासून आजचीं आडनावें व्युत्पादिलीं आहेत असे, शब्द अनेक आहेत राजवाड्याच्या मतांचा स्वीकार करताना आमचा जो थोडा अभिप्रायभेद आहे तो आम्हीं पुढें व्यक्त केला आहे कित्येकानीं देवकाचीं नावें ही आपली आज आडनावें बनविलीं आहेत. ही परिस्थिति केवळ महाराष्ट्रातच नसून सर्व हिंदुस्थानभर आहे. ज्या ब्राह्मणास आडनावें नसतात त्यानीं गोत्राचीं नावें आडनावें म्हणून घेतलीं आहेत. कांहीं अलीकडील आडनावाचीं उत्पत्ति निश्चितपणें बाराव्या शतकापर्यंत भिडविण्यात आली आहे. शके ११७१,११८१ व ११८२ यामधील यादव व चालुक्य यांचे जे ताम्रपट संशोधिले गेले आहेत, त्यात पुढील आडनावें आढळतातः-प्रभू देसाई, घैसास, पटवर्धन, भानु, उपाध्याय, पाठक व घळशे ( भा. इ सं मं —तृतीय संमेलन वृत्त ).

**महाराष्ट्रेतर आडनावें**—शास्त्री, आचार्य, भट, भट्टाचार्य, उपाध्याय, मुखोपाध्याय(मुकर्जी ) हीं बंगाल्यांतील मूळचीं उपाध्यायपेशाचीं ब्राह्मणी नावें होत बोस आणि घोस,दत्त आणि मित्र, सेन आणि गुप्त यासारखीं नांवें जातिबोधक आहेत गुप्त हें नाव वैद्यांत व दास हें नाव कायस्थात आहे बंगाल प्रांतात आडनावें फार थोडीं आहेत मद्रास–म्हैसूरकडे ब्राह्मणात अय्यर, अयंगार हीं पदर्शक आडनावें असतात व शूद्रात नायडू, मदलियार, पिले यासारखीं विशिष्ट अधिकारदर्शक नावें सापडतात शिखात व रजपुतात तर आडनावें नाहींत, नावापुढें सिंग ( सिंह ) लावितात. कांहीं देवकाचीं नावें घेऊन आडनावें करतात, कित्येक नावाचा उत्तरभाग आडनाव करतात. पंजाबी काश्मिरी हिंदूंत अशीं कांहीं नावें दिसतात.

मलबारात नायर व मेनन या महत्त्वाच्या जातिवाचक पदव्या आडनावाप्रमाणें योजतात. उत्तरहिंदुस्थानात ; राम, प्रसाद,दास, लाल चंद. मल,नंद हीं नावें व्यक्तिनामात अंतर्भूत असतात, तेव्हा इंग्रजींत लिहिताना उत्तरभाग आडनाव बनतो. मुसुलमानात आडनावें क्वचितच दिसतात, बक्ष, दीन गुलाम, ख्वाजे, फकीर, काझी, मुनशी, शेख, सय्यद वगैरे नावें आडनावाप्रमाणें आता उपयोगीं लागले आहेत. हीं बहुधा पंथवाचक किंवा ऐतिहासिक किंवा पदवीदर्शक असतात. पारश्याचीं नावें हिंदूंप्रमाणें राहण्याच्या ठिकाणावरून किंवा धंद्यावरून पडलेलीं असतात. उदाहरणार्थ, बाटलीवाला, रेडीमनी, कॉन्ट्रॅक्टर, सकलातवाला, एडनवाला, पथकी, जोशी, संजाना इ०

**महाराष्ट्रीय आडनावाचें वर्गीकरण**—हें शिक्षक मासिकात पुढील प्रमाणें दिले आहे

[ अ ] धंद्यावरून किंवा पदवीवरून पडलेलीं नावें—कारखानीस, देशमुख, देशपांडे, कुलकर्णी, जोशी, पाटील, पोतदार, सुतार, माळी, पुराणीक, फडणीस, भट, वैद्य,स्वयंपाकी इत्यादि बागळे याची उत्पत्ति राजवाडे 'वागुलिकः म्हणजे तांबूलकरकवाही अशी देतात दतोत व बागलेमंडळी वागुर म्हणजे विद्वान अशी देतात

[ आ ] गावावरून पडलेलीं नावें --पुणेंकर, नागपुरकर, चिपळूणकर, गोरेगावकर, म्हैसूरकर, राजापुरकर इ०

[ इ ] रंगावरून तयार झालेलीं नावें —काळे, गोरे, हिरवे, पांढरे, पिवळे, करडे इत्यादि

[ई] प्राणिवाचक नावें:—रेडे, घोडे, तट्टू, ढेकणे, वाघ, आस्वल, मांजरे, एडके, बगळे, कोल्हे, गाढवे, कावळे, हंस, राजहंस, कोकीळ, मस्से, ढोर, टोळ इ०

[उ] नात्यांवरून पडलेलीं नांवें:—पोरे नातू, पित्रे, सातपुते, पुत्रे, अष्टपुत्रे, नवरे, इ०

[ऊ] वृक्षवनस्पतींवरून निघालीं नावें:—पिंपळे, मोगरे, फुले, पळशे, उंबरे, बदरे, खैर, कळके, मुळ्ये भेंडे इत्यादि.

[ऋ] पदार्थावरून पडलेलीं नावें:—मुसळे, साखरे, तेले उखळे, कस्तुरे, पितळे, सोने, तांबे, खडके, पर्वते, गंगावणे इ०

[ॠ] निंदाव्यंजक नावें:—आगलावे, घोडमुखे, नकटे ननवरे, दहीभाते, बोंबले [महाशब्दे], खुळे, विध्वंस, माताडे, बावळे ·गिळसे इ०

[ए] गुणावरून दिलेलीं नावें:—धैर्यवान्, अजिंक्य, दाते, टि [ति] लक, पूर्णपात्रे, सहस्रबुद्धे, पंडित, महाबळ, मनोहर, रास्ते, विनोद, कोटीभास्कर, जयवंत इ०

[ऐ] प्राचीन ऋषींवरून पडलेलीं नावें:—वैशंपायन, व्यास, अत्रे, गर्गे, पराशर. गौतम, विश्वामित्र, जमदग्नि इ०

[ओ] शरीरावयवावरून बनलेलीं नावें:—पोटे, डोळे, [एक] बोटे, माने, काणे इ०

[औ] अश्लील शब्दावरून दिलेलीं नावें:—हगवणे, लव्हे, नलवडे, गाडेकर, झवकिरे, ढेंगणे इ०

याप्रमाणें आडनावाची आणखीहि वर्गवारी पाडता येईल. शिवाय वर वर्गीकृत केलेलीं आडनावें त्या त्या वर्गात ठाम बसतीलच असें नाहीं. नावाचा इतिहास लक्षात न घेता सामान्य मनुष्यास त्यावरून जो बोध होतो तोच या वर्गीकरणात उपयोजिला आहे. तेव्हां आडनावाचे वर्ग चुकण्याचाहि संभव आहे. फक्त वर्गीकरणाची एक दिशा दाखविण्याचा या ठिकाणीं प्रयत्न केला आहे.

रा. वि. का. राजवाडे यांनीं अनेक आडनावांच्या पौराण व श्रौतसूत्रीं गोत्रावरून व्युत्पत्ती लाविल्या आहेत; पण आडनावें व पौराण शब्द यास संयोजक मध्यकालीन प्रामाण्यें सांपडत नसल्यानें त्या काल्पनिक वाटतात. फाण्टाः पासून फाटक, कौरव्यापासून कर्वे, आकशायेया· पासून आगाशे, श्वानेयाः पासून साने, आश्मरथ्याः पासून मराठे, गौधिलिपासूनः गोंधळे, कानिंत्रि = कानिटकर, पिंडिकाक्षाः = पेंडसे, कौमंडा = गोवंडे गाधरायणाः = गद्रे, इ० (भा. इ. सं. मंडळ, प्रथम-संमेलन-वृत्त). यात दोष येतो तो असा. कर्वे यांचें गोत्र कौरव्य असे नसून गार्ग्य आहे. आगाशे यांचें गोत्र आकशायेय नसून कौशिक आहे, मराठे यांचें कपि आहे, पेंडसे यांचें जामदग्न्य आहे, गोवंडे यांचें वसिष्ठ आहे गद्रे यांचें कौशिक आहे. इ० तेव्हां रा. राजवाडे यांनीं जें मत दिलें आहे त्याच्या मान्यतेविषयीं अनुकूल बोलावयाचें झाल्यास फारतर असें म्हणता येईल कीं, गोत्र हा शब्द दोन अर्थांनीं वापरीत असावेत, एक प्रचलित अर्थ व एक आडनावांच्या वाचक अर्थ.

**आडनावें लिहिण्यांतअर्वाचीन तऱ्हा.**—आतां काहींचीं आडनावें लिहिण्याची विचित्र पद्धति आहे. कांहीं तळवलकर यासंबंधी 'टी. वाकर' असें इंग्रजी नांवाशीं साम्य जोडण्याकरितां लिहितात. दुसरे काहीं, ठाकरे हें नांव 'थॅकरे' या इंग्रजी आडनांवाप्रमाणें इंग्रजींत लिहितात. एका व्यक्तीने सहस्रबुद्धे हें लांबलचक नाव आटपशीर करण्याकरितां 'एस. बुधे' असें लिहून त्याला नावीन्य आणिल्याचें अवलोकिलें आहे. मागें डॉ. रघुनाथ 'पराजप्ये' हे परांजपे असें न लिहिता पराजप्ये असें का लिहितात याविषयीं जाहीर चर्चा झाली. (ज्ञानाजन) आडनावावें इंग्रजी स्पेलिंग कसें करावें याविषयीं तर धरबंदच नाहीं. असें करण्यांत काहींचा सद्हेतूहि असतो. कारण 'मुळे' हें नाव इंग्रजींत लिहिलें तर महाराष्ट्रेयेतर इसमाला तें 'म्यूल' (खेंचर) असें वाटेल व आपला अपमान होईल या हेतूनें मुळ्यें असें लिहिण्यात येतें. महाराष्ट्रीयाची जी शाखा कर्नाटक व तंजावर इकडे गेली त्यांतील लोक प्रथम बापाचें नाव, मग आडनावें ही आद्याक्षरात लिहून शेवटीं आपलें सर्व नाव लिहितात; जसे; व्ही. पी. माधवराम (माजी म्हैसूर दिवाण) = माधवराव विश्वनाथ पाटणकर; त्याचप्रमाणें टी. माधवराव (माजी बडोदेसरकारचे दिवाण), आर. रघुनाथराव इ० ही चाल आपल्याकडील कांहीं लोकांनीं, उचललेली दिसते. याचें कारण मूळ नावानें ओळखण्यात कमीपणा येतो किंवा महाराष्ट्रीय नावानें पेढ्या चालणार नाहींत अशी भीति वाटते म्हणून असावें. पंडित टी. गोपाळराव (= गोपाळराव टोकेकर); व्ही. किसनराव (= कृष्णराव वैशंपायन) इत्यादि या प्रकारातलीं उदाहरणें देता येतील. (चिं. ग. कर्वे शिक्षक मासिक वर्ष ३ अंक ६).

हिंदुस्थानात आडनावें बदलण्यासंबंधीं निषेधक कायदा नाहीं. त्यामुळें ब्राह्मण जातींचीं आडनावें घेण्याची पद्धत काहीं ब्राह्मणेतरांत दिसून येते. मद्रास इलाख्यांत 'सौराष्ट्र' जातीची मंडळी अय्यर व अय्यंगार अशीं आडनावें लावूं लागल्यामुळें पुष्कळ ब्राह्मणांस त्यामुळें दुःख होतें.

**आडनावाची पाश्चात्त्य पद्धत.**—आडनावासंबंधानें सार्वत्रिक चाल अशी आहे कीं, मनुष्य बापाच्या नांवावरून ओळखला जावा. पण इंग्लंड आणि युनायटेड स्टेट्समध्यें हें कायद्यान बंधकारक नाहीं. मनुष्याला आपल्या मर्जीप्रमाणें वाटेल तें नाव धारण करण्यास कायद्याची मनाई नाहीं. आणि नवें नाव धारण करताना कोणताहि विशिष्ट विधि करावा लागत नाहीं. उलटपक्षीं एखादा मनुष्य बापाच्या नावावरून किंवा दुसऱ्या एका नांवावरून सुप्रसिद्ध झालेला असला आणि पुढें त्याला तें नाव बदलावेंसें वाटेल तर या

नवीन नावानें लोकांनीं त्याला संबोधावें अशी सक्ती लोकांवर त्याला करता येत नाहीं, तसेंच एकाचें नाव दुसऱ्यानें घेतां कामा नये असा सक्तीचा प्रतिबंध इंग्रजी कायद्यानें घातलेला नाहीं. तथापि जर एकाद्या माणसानें नवें नाव धारण केलें, व तें जाहीर व्हावें व सरकारदरबारीं मान्य केलें जावें अशी इच्छा असली तर त्याला सरकारचा परवाना मिळविणें जरूर असतें त्याकरिता इंग्लंडमध्यें हेरल्डच्या ऑफिसमार्फत अर्ज करावा लागतो हा अर्ज मंजूर झाल्यास राजाच्या शिक्क्याचा व होमसेक्रेटरीच्या सहीचा परवाना देण्यात येतो. मृत्युपत्र वगैरे करून जेव्हा एखादी इस्टेट दुसऱ्याला देण्यात येते, तेव्हा मृत्युपत्र करणारा किंवा इस्टेट देणारा इसम इस्टेट घेणाऱ्यानें आपलें ( इस्टेट देणाराचें ) नाव लावावें अशी अट घालतो. नाव बदलल्याबद्दल प्रसिद्धी व्हावी व पुरावा देतां यावा म्हणून केलेला बदल वर्तमानपत्रद्वारें जाहीर करण्याचा मार्ग व सुप्रीम कोर्टाच्या मध्यवर्ती ऑफिसांत तें नोंदवण्याचा मार्ग अवलंबण्यात येतो

फ्रान्स व जर्मनीमध्यें नाव बदलावयाचें असल्यास त्याला सरकारी मान्यता मिळवावी लागते. १९००चें जर्मन कोड कलम १२ प्रमाण, नवीन नाव धारण करण्याला कोणाचा प्रतिबंध असेल किंवा त्यामुळें कोणाचें नुकसान होण्यासारखें असेल तर नवें नांव घेणाऱ्या इसमास तें सोडून देण्यास भाग पाडता येतें. इंग्लंडमध्यें स्त्रीचें लग्न झाल्यावर नवऱ्याचें आडनाव तिला धारण करावें लागतें स्कॉटलंडमध्यें कुमारपणांतलेंच नाव विवाहोत्तर चालू ठेवण्याचा व त्यापुढें 'उर्फ' घालून नवऱ्याचें नाव जोडण्याची पद्धत आहे. पुनर्विवाह झाल्यावर पुन्हा नव्या नवऱ्याचें नाव धारण करावें असा नियम आहे. पण त्याला एक अपवाद असा आहे कीं, एखादा मोठा किताब धारण करणाऱ्या स्त्रीनें सामान्य मनुष्याबरोबर पुनर्विवाह लावल्यास पूर्वीचा किताब कायम ठेवण्याची तिला परवानगी असते ( ए ब्रि नेम या लेखांतील उतारा ).

**आडी**–हा अंधकासुराचा पुत्र. यानें, उग्र तप करून देवास प्रसन्न केलें, आणि अमरत्व मागितलें. तेव्हा त्यांनीं तें दुर्लभ आहे असें सांगितल्यावर, मी रूपांतर पावल्यावांचून मरू नये येवढें मला द्या असें मागितलें; तें त्यास त्यांनीं तथास्तु वचनानें देऊन, स्वर्लोकीं गमन केल्यावर, आपल्या पित्यास मारणाऱ्या शिवाचें वैर उगवावें म्हणून, हा कैलासास गेला, आणि तेथें द्वारावर वीरक नावाचा शिवगण होता त्यानें आपल्यास अडवूं नये या हेतूनें सर्परूप धारण करून गुप्तरूपानें आंत शिरला. नंतर सर्परूप टाकून पार्वतीचें रूप धारण करून शिवासमोर जात आहे तोंच शिवानीं तें कपट जाणलें व त्यास त्यानेंच संपादिलेल्या वरप्रदानाप्रमाणें तत्काल वधिलें ( मत्स्य पुराण. अ. १५५ ).

**आडेगांव**—ही जमीनदारी छिंदवाड्याच्या ईशान्यदिशेस आहे. ही दरईन्या वंशाकडे होती, पणपुढें ही खरक भारथी गोसावी याजकडे गेली. हा गोसावी जबलपूर मंडला आणि शिवनी यावर इ. स. १८०१ मध्यें सुभेदार होता ह्या जमीनदारींत ८९ गावें असून हिचा पुष्कळ मोठा भाग जंगली आहे पूर्वेच्या भागास शेती होते [ मध्यप्रांत ग्याझेटियर इ. स. १८७० ]

**आडेनार्ड**—बेल्जममध्यें हें शहर घेंट पासून १८ मैलावर आहे या शहराची लोकसंख्या १९०४ सालीं ६५७२ होती या ठिकाणीं मालबरो यानें फ्रेंचावर १७०८ यावर्षी मोठा जय मिळविला येथील टाउन हॉल फार सुंदर आहे.

**आडर्मी आंझून**– डी रूयीटर मायकेल (१६०७–७६) याचा जन्म फ्लशींग शहरीं २४ मार्च १६०७ रोजीं झाला. हा एक डच आरमारी अधिकारी होता हा आपल्या वयाच्या ११ व्या वर्षी जहाजावरील हलक्या प्रतीचा नोकर झाला व याच वेळेपासून त्याच्या दर्यावर्दी आयुष्यक्रमास सुरवात झाली १६४० त हा सरकारी नोकर होऊन स्पेनविरुद्ध पोर्च्युगालच्या मदतीस पाठविलेल्या आरमारावरील तिसऱ्या दर्जाच्या अधिकाऱ्याच्या जागी याची नेमणूक झाली व पुढें ३ नोव्हेंबर १६४१ रोजीं केप सेंटव्हिनसेंट येथें झालेल्या चकमकींत हा प्रसिद्धीस आला. यानंतर १६५२ पर्यंत हा एका व्यापारी जहाजाचा कप्तान होता इ. स. १६५३ मध्यें डच लोकांनीं इंग्लंड देशावर केलेल्या स्वारींत हा असून इंग्रजांशीं झालेल्या तीन सामन्यांत यानें अप्रतिम शौर्य व कौशल्य दाखविलें. १६५९ त स्वीडिश लोकांविरुद्ध डेनमार्कच्या राजास मदत करण्याबद्दल बक्षीस म्हणून याला सरदार केलें. १६६५ त याला इंग्लंडवर पाठविलेल्या एका मोठ्या आरमाराचा सेनापति नेमलें. या युद्धांत यानें इंग्रज लोकास थेम्स नदीचा आश्रय घ्यावयास लाविलें. १६७६ त याची फ्रान्स विरुद्ध स्पेनला मदत करण्याकरिता भूमध्यसमुद्राकडे रवानगी झाली. याच युद्धांत यास ता. २१ एप्रिल रोजीं प्राणघातक जखम होऊन ता. २९ रोजीं मृत्यु आला. याचा दफनविधि ॲमस्टरडॅम शहरीं होऊन येथेंच त्याच्या स्मरणार्थ एक भव्य स्मारक उभारण्यांत आलें.

**आतर्डी**—आत्रपद्धति पहा.

**आतपमूर्च्छा ( 'सनस्ट्रोक' )**.—कडक ऊन किंवा अत्यंत उष्ण हवेचा परिणाम शरीरांतील मज्जातंतूवर प्रथम होऊन त्यामुळें हृदय,श्वसनेंद्रियें यांची क्रिया बिघडते व ताप आणि मूर्छा येते. हें या रोगाचें मुख्य स्वरूप होय. उष्ण हवा असून तींत सर्दपणाची भर पडली म्हणजे हवा अगदीं कुंद होऊन कित्येक माणसांना आपल्या देशांत अशी धूक लागते. थंड देशांतहि मध्येंच जेव्हां कडक ऊन पडतें तेव्हा तेथेंहि कांहीं माणसांना अशी मूर्छा येते. सैन्यांतील पलटणींतून लढाईच्या वेळीं काम पडल्यामुळें किंवा एरवीं उन्हाळ्यांत अशी मूर्छा आल्याचीं उदाहरणें पूर्वी फार असत, व त्या पासून मृत्युहि घडत असत. परंतु

शिपायांची शरीरप्रकृति, पोषाख व त्यांची गोळीबार काळ-वेळ पाहून हालचाल करणें व त्यांस आराम होईल अशी व्यवस्था ठेवणें, या बाबींकडे अधिक लक्ष पुरविल्यामुळें तेथील मृत्युसंख्येचें प्रमाण पुष्कळ कमी झालें आहे. अशी आतपमूर्च्छा येण्यास पूर्वीपासून अनुकूल स्थिति पुढील कारणामुळें उत्पन्न होते:--

रो गां चीं का र णें.—मोठें दुखणें येऊन शरीर खंगणें; मज्जातंतु बिघडणें; काळजी,दगदग,अतिश्रम व खाण्यापिण्यांत अनियमितपणा; व मुख्यतः दारूबाजीपासून खंगलेलें शरीर; तसेंच स्वच्छतेचा अभाव असल्यामुळें त्वचेची क्रिया सुरळीत न चालणें; हृदय व फुप्फुसें यांची क्रिया नीट चालण्यास अड-चण पडेल इतके कपडे, पट्टे व कमरबंद घट्ट वापरणें; गलिच्छ हवेंत सदा रहाणें; इत्यादि. त्याचप्रमाणें अनुकूल स्थिति असून मनुष्य दमला असतां त्यास कडक उन्हांत चालण्याचें काम पडल्यानें लूक लागतें यांत नवल नाहीं. पण बिन्हाडांतून अगर बराकींतून अतिगर्दी व घाण माजली असतां, अगर आगबोटींवरहि अशी परिस्थिति असल्यास सावलींतहि कांहीं जणांनां आतपमूर्च्छा येते. एंजिनांत कोळसे घालणारे लोक, परीट वगैरे भट्टीजवळ काम करणारी माणसें, यूरोपांतून नुकते आलेले यूरोपियन लोक यानां त्यांतलें त्यांत हा रोग विशेष होतो.

मू र्च्छे चे भे द —शरीर तापलें असतां त्याची स्वाभाविक-पणें मर्यादेबाहेर उष्णता वाढूं नये, अगर कडक थंडीमध्यें शरीर थंड न होतां त्याचें स्वाभाविक उष्णतामान कायम रहावें, अशी आपोआप व्यवस्था राहण्यासारखी निसर्गाची योजना आहे. तशीच योजना रुधिराभिसरण व श्वसनक्रिया आपोआप सुर-ळीत चालण्यासाठींहि आहे. पण उन्हानें अगर उष्णतेनें त्यांत बिघाड झाल्यामुळें रोगलक्षणें उद्भवतात व त्या लक्षणानुसार पुढील तीन प्रकारचे आतपमूर्च्छेचे भेद आढळतात.

मूर्च्छाप्रधानभेदः- पराकाष्ठेची ग्लानि येऊन मूर्च्छा फार जोराची येते, अगर ती येण्याची प्रवृत्ति वरचेवर होते. त्या बरोबर ओकारी, घेरी चक्कर, प्रथम घाबरणें व नंतर गुंगी येणें, व त्यानंतर मूर्च्छा; मूर्च्छेमध्यें चेहरा पांढरा फटफटीत होणें, शरीर थंड, नाडी अशक्त व जलद, धापा टाकल्या प्रमाणें श्वास, डोळ्याच्या बाहुल्या बारीक होणें हें होतें व नंतर योग्य इलाज न होतील तर मृत्यु येतो.

श्वासरोधप्रधान भेदः—ओकारी, चक्कर, घेरी, हीं लक्षणें कधीं होतात तर पुष्कळ वेळां होतहि नाहींत आणि रोग्यास एकदम अर्धांगाचा झटका आल्याप्रमाणें बळकट बेशुद्धि येते, तींत चेहरा व डोळे लाल दिसतात, नाडी जलद चालते, घोरण्याप्रमाणें श्वसनक्रिया चालते, स्पर्शज्ञान नष्ट होतें व कधीं कधीं झटकेहि येतात व एकदम मृत्यूहि पुष्कळदां येतो. तथापि हाहि रोग उपचार केल्यानें सुसाध्य आहे.

महाज्वरप्रधान भेदः—या भेदांत शरीराचें उष्णतामान बेसु-मार वाढून ताप १०८ ते ११० डिग्रीपर्यंत चढतो. त्याबरोबर तृषा, तलखी, जलद नाडी, अंग ठणकणें, मस्तकशूल, ओकारी, मळमळ, श्रम, दाह, हीं लक्षणें जरूर होतात. अशी स्थिति एकदोन दिवस राहिल्यानंतर मृत्यु तरी येतो किंवा रोगाचें श्वासरोधमूर्च्छेमध्यें रूपांतर होतें. आरंभींच उपाय सुरू ठेविले तर या प्रकारची मूर्च्छाहि बरी होते. शिवाय इतरहि कांहीं मिश्र प्रकारच्या आतपमूर्च्छा पाहण्यांत येतात.

या रोगामुळें मृत झालेल्याची तपासणी केल्यानंतर असें आढळलें आहे कीं, मेंदूमध्यें रक्ताचा बराचसा अभाव दिसतो, फुप्फुसांत रक्ताधिक्य होतें, हृदय व शरीरांतील इतर स्नायू मऊ व दुर्बल होतात. रक्त काळसर व न गोठणारें होतें, रक्तपेशींचा आकार बदलतो. उन्हाची लूक लागल्याचे परि-णाम रोगी बरा झाल्यावर अल्पशेषरूपानें राहतात व प्रकृ-तीवर व मज्जातंतूवर कायमचा परिणाम घडतो. मस्ति-ष्कावरणदाहामुळें असो किंवा दुसऱ्या कारणामुळें असो मस्तकशूल, अपस्माराप्रमाणें झटके, चिडखोरपणा, स्वभा-वांत पालट हीं लक्षणें होतात. त्यानंतर उन्हांत हिंडणें, विस्तवाजवळ बसणें, उष्ण हवा किंवा उत्तेजक पेयें पिणें हीं पूर्वीप्रमाणें पुढें सहन होत नाहींत असें अनुभवास येतें. या रोगांत शेकडा ४०–५० रोगी दगावतात असें आकड्यां-वरून दिसतें.

प्र ति बं ध क उ पा य —ज्यांनां उन्हांत काम करावें लागतें, त्यांनीं आपले कपडे सैल शिववून ते वापरावे, मस्तकास ऊन न लागेल असें आड शिरत्राण घालावें; नुसती टोपी घालून कडक उन्हांतून हिंडूं नये. मद्यपान व इतर शारीरिक अत्याचार व अनियमितपणा यांपासून अलिप्त असावें, थोड-थोडें थंड पाणी वरचेवर प्यावें, उन्हाळ्यांत रात्रीं उघड्या हवेंत निजावें.

आ त प मू र्च्छे स उ प चा र.—हे ज्या प्रकारची मूर्च्छा असेल, त्या अनुरोधानें करावे लागतात. पहिल्या प्रथम रोग्यास उचलून थंडगार अशा सावलीच्या ठिकाणीं नेऊन निजवावें. असल्या माणसाला प्रथम हृदयक्रिया बंद पडून मरण येण्याची अगर निदान अंतःक्षोभ होऊन मेंदूस धक्का बसून बेशुद्धि येण्याची धास्ती असते. ती टळण्यासाठीं त्याला अगदीं एकसारखें निजवून ठेवून पूर्ण विश्रांति द्यावी व पोटांत अमोनिया, व ब्रांडीमिश्रित उत्तेजक औषधें देऊन हातपाय चोळावे व ऊब येण्यासाठीं ते शेकावेत; पण रोगी जर एक-दम बेशुद्ध पडला असेल किंवा ज्वरातिशयानें घाबरा झाला असेल तर नानातऱ्हेनें त्यास शीत उपचार करणें हाच श्रेय-स्कर उपाय होय. त्यासाठीं मस्तकावर व अंगावर थंड पाणी शिंपडावें अगर धार धरावी, अंगास बर्फ चोळावें किंवा गुदद्वारावाटे बर्फमय पाण्याचा बस्ति देऊन गुदांतील उष्णता-मान १०२ होईपर्यंत हे उपाय चालू ठेवावे. इतक्यावर उष्णतामान येऊन ठेपलें म्हणजे पुढें तें आपोआप नेहमीच्या उष्णतेपर्यंत येतें. बस्तीखेरीज इतर उपायांनींहि उष्णता-

मान बरेंच कमी होतें, व मंद झालेली श्वसनक्रिया जोरानें चालू लागते. छातीस अगर मानेच्या मागें टरपेंटाईन तेल चोळणें किंवा मोहरी वाटून ती फडक्यावर पसरून लावणें हेहि उपाय वरील उपचाराबरोबर करण्यालायक आहेत

हे उपाय करूनहि ज्वर मात्र कमी झाला आहे, पण शुद्धि येत नाहीं, अशी स्थिति असल्यास डोक्यावरील केस काढून त्या जागीं डागल्यानें उपयोग होतो असें म्हणतात वरील उपायानें ज्वर हटत नसेल तर एखादी शीर तोडून कांहीं रक्त वाहूं द्यावें. व हृदंतील शीर तोडणें विशेष श्रेयस्कर पडतें. या उपायाचा अशावेळीं अवलंब अवश्य करून पहावा. शिरेंतून रक्तच वहात नाहीं, असें आढळून आल्यास त्या शिरेवाटें लवणाम्बु रक्तामध्यें घालावें. यानंतर रोगी सावध झाल्यावर त्यास थंड हवेच्या ठिकाणीं नेल्यानें फार उत्तम फायदा होतो. पोटात पोटॅशिअम आयोडाईड हें औषध देणें चांगलें. यानें आणखी दुष्परिणाम फारसे होण्याचें टळतें. जेथें जेथें या रोगापासून अधूपणा अथवा दुःख झालेलें नजरेस येईल तेथें तेथें मोहरी, टरपेंटाईन सारखीं औषधें बाह्योपचारासाठीं योजावींत.

याशिवाय ज्या विशिष्ट प्रकारचा आतपमूर्च्छा रोग झाला असेल. त्यावर विशेष उपयुक्त असेहि इलाज करावे. उदाहरणार्थ, स्ट्रिक्निया ( कुचल्याचें सत्व ) हें औषध त्वचेखालीं जरूरीप्रमाणें टोंचल्यानें मागाहून हृदयव्यापारात जो दुबळेपणा कदाचित् रहातो, तो नाहींसा होऊन त्यापासून श्वसनक्रियाहि चांगली चालते.

**आतार**—मुंबई इलाख्याच्या बहुतेक जिल्ह्यांतून यांची वसति आढळते. यांना मूळ महतुलतार असें नाव होतें पण पुढें अत्तरादि सुगंधिद्रव्यांच्या व्यापारावरून अत्तार किंवा आतार हें नाव रूढ झालें. फुटकळ सुगंधि द्रव्यें विकणारांची ही जात आहे. मुसुलमान लोकच या जातींत आढळतात. हा धंदा करणारे हिंदुलोक तेली, गुरव आणि बेलदार जातीचे असतात. आतार हे मूळ हिंदू असून अवरंगझेबाच्या कारकीर्दींत मुसुलमान झाले आहेत. या जातीचे मुसुलमान, पिंजारी, कसाई आणि कुंजडे या जाती सोडून इतर मुसुलमानांबरोबर विवाह करतात. कासार, कलईगार, यासारख्या मुसुलमानांची व यांची जात सारखीच समजली जाते. हे हिंदू लोकांस धर्मांतर करून जातींत घेतात.परंतु उच्च कुलोत्पन्नांच्या बरोबर विवाहसंबंध करीत नाहींत. नवीन दीक्षा दिलेल्या माणसाची सुंता करतात. परंतु तो म्हातारा असला अथवा त्यास पुढील काळजी नसेल तर एक विड्याचें पान सुंडाळी करून कापलें म्हणजे झालें.

विवाहपद्धति.—न्हाण येण्यापूर्वी या लोकांत मुलींचें लग्न झालेंच पाहिजे. तसें न केलें तर आईबापास माणूस मारल्याचें पाप लागतें. मुलाचा बाप वधू शोधावयास निघतो आणि आपण मागणी केली असता ती मान्य होईल असें पाहून तेथें लग्नाचा ठराव करण्याकरिता एखादी नातलग किंवा ओळखीची बाई पाठवितो. लग्नाच्या पूर्वी मुलाला एक 'छाप' नांवाची सोन्याची किंवा रुप्याची आंगठी द्यावी लागते या आंगठीला लहान पेल्यासारखें एक झाकण असते. ५० पासून २५० रुपयापर्यंत मेहर ठरवितात. वधूचे आईबाप तिला स्वयंपाकाची भांडीं, बिछाना व पलंग देतात. लग्न झाल्यावर पलंगावर वधूवरास बसवून बायका गाणीं गातात, वधूवरांचें प्रतिबिंब परस्परास आरशांतून दाखवितात. वरात परत आली म्हणजे वराच्या घरांतील स्त्रिया सामोऱ्या जातात आणि वैवाहिक संबंधाच्या चेष्टा करितात.

नंतर तामवलीमा नावाची मेजवानी होते आणि नवीन दांपत्यास त्यांचें वय कितीहि लहान असलें तरी अंतर्गृहात कोंडून ठेवतात. यांच्या लग्नात हिंदु चालींचेंहि थोडें मिश्रण झालें आहे. मंडप बांधणें, तेल हळद वधूवरांच्या आंगास चोळणें आणि कंकण बांधणे या हिंदू चाली यांच्यात आहेत. लग्नापूर्वी जर कुमारिकेनें पुरुषसंबंध केला आणि गर्भार झाली नाहीं तर तिचें लग्न यथासांग पूर्वोक्त विधीप्रमाणेंच होतें पण जर गर्भार झाली तर मूल होईपर्यंत लग्न थांबवत आणि मग विधवाविवाहाप्रमाणें होतें. कानीन मुलगा तिच्या बरोबर राहतो पण तिच्या नवऱ्यावर त्याचे वारसाचे कांहींच हक्क नसतात. विधवेला नवरा मेल्यानंतर ४० दिवसानीं पुन्हा लग्न करता येतें. धाकट्या दिराबरोबर लग्न केलें असता हरकत नाहीं. दांपत्यापैकीं कोणाच्याहि इच्छेनें घटस्फोट करता येतो. आणि परस्पराचा स्वभाव न जुळला तरी घटस्फोट होतो. दोन साक्षीदारांच्या समक्ष नवऱ्यानें बायकोला मातृतुल्य म्हटलें कीं, घटस्फोट झाला. यांच्यात मामाच्या मुलीबरोबर लग्न होतें. लग्नात काजीला सव्वा रु. किंवा पागोटें दिलें म्हणजे झालें.

चालीरीती.—आतारी हे सुनी पंथाचे मुसुलमान आहेत, हे पीरांना मानतात. 'शबरात' सणात हे आपल्या पितराच्या थडग्यावर हलवा ठेऊन दिवा लावतात. हे इतर मुसुलमानाप्रमाणेंच डुकराचें मांस खात नाहींत, कुत्र्यास अपवित्र समजतात. व कोळ्यास पवित्र समजतात. कारण त्यानें गुहेच्या तोंडाशीं जाळें घालून हसन आणि हुसेन यांचा बचाव केला. कोणी लोक पीरास गुरू समजतात. एकाच पेल्यातून शरबत प्यालें म्हणजे शिष्य झाला. सुतकशौच यांच्यात मुळींच मानीत नाहींत. दारू प्याली असता चालते.यांच्यात कोणी गोमांस खातात व कोणी खात नाहींत.हालहाल करून प्राण्याचें रक्त वाहूं दिल्यानंतर ते खाण्यासारखे होतात असें मानतात.फक्त मासेच याला अपवाद आहेत.वारसाचा कायदा हिंदूंचाच मानितात. देवी निघाल्या असता 'माता' पूजन करतात बायका पडद्यात रहात नाहींत. त्या दातास दांतवण लावतात. व अत्तरें व तंबाखु विकतात.

**आतिथ्य**—हा मनुष्याविषयीं परोपकारबुद्धि दाखविण्याचा एक प्रकार आहे. हा गुण अगर ही परोपकारबुद्धि जीवनकलह तीव्र नसलेल्या समाजांत फार आढळून येते. होमरच्या वेळीं थसाली नांवाचा मानसलेला प्रांतच आतिथ्याच्या बाबतींत नांवाजलेला होता. पण ग्रीसच्या इतर भागामध्यें अशा प्रकारची परोपकारबुद्धीचीं उदाहरणें क्वचित् आढळत. रानटी लोकांमध्यें आतिथ्याचें महत्व मनुष्याला येणाऱ्या अडचणींमुळें फार दिसून येतें. पण सुधारलेल्या समाजामध्यें आतिथ्य हें एक भूषण समजलें जातें. ॲरिस्टॉटलनें आतिथ्य हा गुण चैनीच्या अगर औदार्याच्या सदरांत घातलेला आहे. श्रीमंत मनुष्याच्या अनेक लक्षणांपैकीं आतिथ्य हें एक प्रमुख लक्षण मानलें जात असे. सार्वजनिक महत्व प्राप्त करून घेऊं इच्छिणाऱ्या मनुष्यानें या आतिथ्यासंबंधीं नेहमीं खबरदारी घेण्यास शिकलें पाहिजे व तें शास्त्र अवगत करून घेतलें पाहिजे असें प्लेटोच्या 'मेनो' ग्रंथांत म्हटलें आहे.

**हिंदुस्थानांतील आतिथ्य.**—हिंदूंचे जे आचारधर्म सांगितले आहेत त्या धर्मान्वयें, अतिथिसत्काराचें महत्व आहे. आतिथ्य हाच यज्ञ होय असें अथर्ववेद सांगतो. तथापि हिंदुधर्मामध्यें चातुर्वर्ण्यव्यवस्था अंमलांत असल्यानें व जातिभेदाचे निर्बंध कडक रीतीनें पाळले जात असल्यानें भलत्याच जातीच्या मनुष्याला भोजनामध्यें भाग घेतां येत नाहीं. सहभोजनाची एवढी बाब सोडून दिली तर इतरबाबतींत आतिथ्यसत्काराची कल्पना हिंदुलोकांमध्यें पूर्णपणें दृष्टोत्पत्तीस येते. कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं, जगांतील इतर कोणत्याहि लोकांपेक्षां हिंदु लोकांमध्यें अतिथीला विन्मुख न पाठविण्याची जास्त खबरदारी घेण्यांत येते. अतिथिसत्कार हें धार्मिक कर्तव्य म्हणून मानिलें जातें. आतिथ्यासंबंधीं स्मृतींतयें सुद्धां नियम घालण्यांत आलेले आहेत. ब्राह्मण अतिथींविषयीं जरी अधिक उदार धोरण ठेवण्यांत आलेलें आहे तरी पण इतर कोणत्याहि वर्णाच्या अतिथींविषयीं अनादरबुद्धि दाखविण्यांत आलेली नाहीं. मात्र क्षत्रियाला ब्राह्मणानंतर व वैश्यशूद्रांना नोकरांबरोबर जेऊं घालावें असें मनुस्मृतींत म्हटलेलें आहे. (मनु अ. ३ श्लो. १११–१२)

यदि त्वतिथिधर्मेण क्षत्रियो गृहमाव्रजेत्
भुक्तवत्सु च विप्रेषु कामं तमपि भोजयेत्
वैश्यशूद्रावपि प्राप्तौ कुटुम्बेऽतिथिधर्मिणौ
भोजयेत्सह भृत्यैस्तावानृशंस्यं प्रयोजयन्

इतर कोणत्याहि जातीचा अतिथि आला तरी त्याला यथाशक्ति जेवण घालावें व त्याचा सत्कार करावा. अतिथि हा कोणत्याहि वेळीं आला तरी त्याला परत पाठवितां कामा नये असेंहि स्मृतिवचन आहे.

अतिथिपूजन हें गृहस्थाश्रमीयाचें प्रमुख कर्तव्य आहे. गृहस्थाश्रमीयानें तें व्रत न पाळलें तर त्याला पाप लागतें व 'तो जिवंत असून मेल्याप्रमाणेंच आहे' असें स्मृतींमध्यें म्हटलेलें आहे. अतिथींच्या पूजनानें स्वर्गप्राप्ति व धनधान्यसमृद्धि होते. (मनु. ३.१०६) अतिथि शब्दाचा अर्थ

एकरात्रं तु निवसन्नतिथिर्ब्राह्मणः स्मृतः
अनित्यं हि स्थितो यस्मात्तस्मादतिथिरुच्यते

म्हणजे एक दिवस राहाणारा अतिथि असा मनुस्मृतींत (३ १०२ दिला) आहे. याज्ञवल्क्यस्मृतींत 'अध्वनीनोऽतिथिर्ज्ञेयः' अशी अतिथिशब्दाची व्याख्या केली आहे. हा विशेष अर्थ जरी स्मृतींत रूढ असला तरी व्याकरणदृष्ट्या 'घरीं येणारा पाहुणा' म्हणजे अतिथि असाहि करतां येईल. आपले आप्त, इष्टमित्र घरीं आले तर त्यांचें मोठ्या प्रेमानें स्वागत करावें असेंहि स्मृतींमध्यें म्हटलेलें आहे.

इतरानपि सख्यादीन्संप्रीत्या गृहमागतान्
सत्कृत्यान्नं यथाशक्ति भोजयेत्सह भार्यया
(मनु ३. ११३)
भोजयेदागतान्काले सखिसंबंधिबान्धवान् ॥
(याज्ञवल्क्य प्र ५ श्लो. १०८)

अतिथि, आप्तइष्ट व घरचे नोकर यांचीं जेवणें झाल्यावर नंतर मग यजमानानें आपल्या पत्नीसह अवशिष्ट अन्नाचें ग्रहण करावें असें सांगितलेलें आहे.

भुक्तवत्स्वथ विप्रेषु स्वेषु भृत्येषु चैव हि ।
भुञ्जीयातां ततः पश्चादवशिष्टं तु दम्पती
देवानृषीन्मनुष्यांश्च पितॄन्गृह्याश्च देवताः ।
पूजयित्वा ततः पश्चाद्गृहस्थः शेषभुग्भवेत् ॥ ११७ ॥
(मनु अ. ३)

अशा प्रकारची अतिथिसत्काराची कल्पना हिंदु लोकांमध्यें आढळून येते. हीच कल्पना वेदांतून, ब्राह्मणांतून व उपनिषदांतूनहि सांपडते. कठोपनिषदांत, व ऐतरेय ब्राह्मणांत अतिथिपूजनाचे उल्लेख आलेले आहेत. पुराणामध्यें व पुराणोत्तर वाङ्मयामध्यें तर अतिथिसत्काराचें महत्व पावलोपावलीं वर्णिलेलें आढळून येतें. शिवलीलामृतांतील श्रियाळचांगुणाकथा हें याचें उत्कृष्ट उदाहरण आहे. अर्वाचीन हिंदु लोकांमध्यें पाहुण्याचें आदरानें स्वागत करण्याची बुद्धि नेहमीं आढळून येते; पूर्वीप्रमाणें जरी अतिथिसत्कार केला जात नाहीं तरी सामान्य जनतेमध्यें उदार बुद्धि अद्यापिहि कायम आहे असेंच दिसून येते. त्याचप्रमाणें अतिथिपूजनाला धार्मिक स्वरूप देऊन हिंदुग्रंथांनीं अतिथिपूजनाचें महत्व अधिक स्पष्ट तऱ्हेनें लोकांच्या नजरेस आणलेलें आहे.

**बौद्ध.**—यांच्या आतिथ्याचें संबंधीं विवेचन तीन भागांत करणें श्रेयस्कर होईल (१) सामान्य अथवा अशिक्षित लोकांत आपापसांत असलेली आतिथ्यतत्परता, (२) धर्मसंप्रदायांतील लोकांशीं वागतांना सामान्य लोकांची आतिथ्यतत्परता, व (३) धर्मसंप्रदायांतील लोकांमध्यें असलेली आपापसांतील आतिथ्यतत्परता.

(१) सामान्य जनांची परस्पराविषयीं आदर बुद्धिः—यासंबंधींचे उल्लेख सूत्रग्रंथामध्यें सामान्य नीतितत्त्वांचें विवरण करताना आढळून येतात. 'दीर्घ 'मध्यें (३.१९०) असें म्हटलेलें आहे की उत्तम बायको ही आपल्या पतीच्या घरच्या माणसांशीं फार लीनतेनें वागते, (१.११७) मध्यें असें म्हटलें आहे कीं उत्तम नागरिकाचें कर्तव्य म्हणजे पाहुण्यांना सन्मानानें व आदरानें वागविणें हें होय. जातकग्रंथामध्यें (३.३२) एका गोष्टीतील नायक आपल्या आतिथ्यतत्परतेचे गोडवे गात असलेला आढळून येतो. त्याच ग्रंथामध्यें एका ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, जो गृहस्थ अतिथीला भोजन घालीत नाहीं त्याचा यज्ञ फुकट आहे. हे वर दिलेले विचार बौद्धधर्मांतीलच आहेत असें मात्र नव्हे. वरील विचारापैकीं कांहीं विचार बुद्धधर्मीय नसलेल्या कांहीं चांगल्या माणसांनीं काढलेले आहेत. सारांश बौद्धग्रंथांतील वरील विचार हे तत्कालीन समाजामधील आतिथ्याविषयींची कल्पना प्रकट करतात असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

(२) धर्म संप्रदायांतील लोकांशीं वागताना सामान्य लोकांची आतिथ्यतत्परता—बौद्धधर्माच्या उदयकाळीं धर्मप्रसार करणारे पुष्कळसे प्रव्रजित असत. त्यांपैकीं पुष्कळसे कुलीन असले तरी इतर अनेक वर्णांचे व जातींचे होते. या प्रव्रजितांना अन्नवस्त्रादिक देणें हें धर्मकार्य मानिलें जात असे. या प्रव्रजितांचे मोठमोठे संघ असत; व प्रत्येक संघ आपापल्या मुख्यानें घालून दिलेल्या नियमाप्रमाणें वागत असे. या सर्वच संघाना लोकांकडून यथाशक्ति मदत होत असे. बौद्धधर्मीयांनीं आपल्याच धर्माच्या लोकांना तेवढें अन्नवस्त्र द्यावें व इतरांना देऊं नये अशा प्रकारचा उपदेश कधींहि केला नाहीं. उदाहरणार्थ सिंह नावाचा एक कुलीन तरुण प्रथमतः जैन धर्मीचा असताना नंतर बौद्धधर्मीय झाला तरी पण बुद्धदेवानें जैनधर्मीयांशींहि आदरबुद्धि दाखविण्याचा त्याला आग्रहपूर्वक उपदेश केला होता. तसेंच भिन्न धर्मांच्या उपदेशकांशींहि उदारबुद्धीनें व प्रेमानें वागविण्याविषयींचे उल्लेख अशोकाच्या शिलालेखामध्यें आढळून येतात.

(३) धर्मसंप्रदायामध्यें परस्पराविषयींची आदरबुद्धि.—बुद्ध प्रव्रजित हे नेहमीं हिंडत असल्याकारणानें ते इतर प्रव्रजितांच्याकडेहि प्रवासामध्यें वास्तव्य करीत असत, व अशावेळीं एका प्रव्रजितानें दुसऱ्या प्रव्रजिताशीं कसा तऱ्हेनें वागावें यासंबंधीं विनयग्रंथाच्या तिसऱ्या भागामध्यें नियम सांगितलेले आहेत. इतर राष्ट्रांतील आतिथ्याचे प्रकार पुढील प्रमाणें आहेत.

इराणी.—अवेस्ता आणि पल्हवी ग्रंथामध्यें आतिथ्यसत्कार करणें ही गोष्ट गृहीतच धरलेली असल्यामुळें त्यामध्यें आतिथ्यवाचक शब्द देखील आढळून येत नाहीं; पण त्या ग्रंथामध्यें 'जेव्हां एक मित्र दुसऱ्या मित्राच्या घरीं जात असे त्या वेळीं तो कांहीं तरी नजर म्हणून नेत असे' अशा व इतर कांहीं उल्लेखावरून या विषयींचा निर्देश केला जातो. पुहसिदर्तीह्रा १९ मध्यें असें म्हटलेलें आहे कीं, सद्गुणी मनुष्याला समाधान अगर बक्षीस देऊन न थांबता त्याचें आग्रहपूर्वक स्वागत करावें. कारण सद्गुणी मनुष्याचें स्वागत करणें हें आहुरमझ्दाला आवडणाऱ्या तीन कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य मानिलें आहे.

पारसी लोकांच्या आतिथ्याविषयींचे कांहीं प्रकार यस्त २४, ६२-६४ मध्यें आढळून येतात. ज्या वेळीं सद्गुणी मनुष्याचा आत्मा 'अनंत तेजा' च्या स्वर्गामध्यें जातो, तेव्हां तेथें त्याला इतर मृतात्मे, देवदूत भेटतात व त्याला निरनिराळे प्रश्न विचारूं लागतात, पण आहुरमझ्द त्यांना तसें न करण्याविषयीं व त्या आत्म्याला उत्तम आसन, अन्न व विश्रांति देण्यास सांगतो. नरकामध्यें सुद्धां मृतात्म्याला त्याच्या पूर्वी आलेले मृतात्मे प्रश्न विचारूं लागण्यापूर्वी त्याला तेथील घाणीचें अन्न देण्यात येतें. त्याचप्रमाणें अर्ताई-वीराफमध्यें असें म्हटलें आहे कीं, तृषाकुल झालेल्याला व भुकेल्याला पाणी व अन्न देणें, हें पहिलें कर्तव्य होय. नंतर वाटेल तर त्याची चौकशी व त्याच्या कामासंबंधीं माहिती विचारावी.

पारसी लोकांच्या आतिथ्याविषयीं चांगली माहिती करून देणारा ग्रंथ म्हणजे फिर्दोसीचा शाहनामा हा होय. त्यामध्यें जरी राजे लोक परराष्ट्रीय वकिलाचें कसें स्वागत करीत, याविषयींचेच फार उल्लेख असले तरी पण कांहीं उदाहरणावरून खालच्या वर्गामध्यें आतिथ्याचा कोणता प्रकार होता यासंबंधींहि थोडी फार माहिती मिळते.

देलाममध्यें अशी चाल होती कीं, पाहुण्याचें स्वागत कुटुंबातल्या एकट्या मनुष्यानेंच करावयाचें व बाकी सर्वांनीं पाहुण्याच्या नजरेस देखील पडावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें देलाममध्यें अन्न विकण्याची वहिवाट नसे, वाटेल त्याच्या घरीं शिरलें असता त्याला अन्न मिळत असे, असें अलमकदिसी म्हणतो. अर्वाचीन इराण हें इतकें पूर्णाशानें मुसुलमानी बनलें आहे कीं, इराण व इस्लाम यामधील भेद काढणें मोठें कठिण काम झालें आहे. तथापि पूर्ण मुसुलमानी बनण्याच्या किंचित् पूर्वीच्या इराणी लोकाचीं म्हणजे कुर्द लोकांच्या आतिथ्यासंबंधींची कांहींशी कल्पना सोनच्या,' वेषांतरान मेसॉपोटेमिया व कुर्दिस्तान येथील प्रवास 'नावाच्या पुस्तकावरून कळण्यासारखी आहे.

अरब.—या लोकांत आतिथ्य करणें म्हणजे अतिथीला भोजन देणें असा अर्थ होतो. 'आदरसत्कार करणें' व अन्न देणें हे कुराणामध्यें समानार्थी शब्द मानतात. ही आतिथ्याची पद्धत अब्राहामनें प्रथमतः शोधून काढली असें समजतात. "मध्यरात्रीं देखील आम्ही पाहुण्याचें, मग तो शत्रू असला तरी स्वागत करतों" वगैरे अभिमानपूर्वक केलेलें वर्णन अरब भाटाच्या काव्यामधून आढळतें. कुराणामध्यें

(११.८०) लोट हा पाहुण्याच्या बाबतीत आपल्याला बत्रा न लागू देण्याविषयी सोदोमच्र लोकांना विनंति करतो, महंमदाच्या चरित्रामध्यें कित्येक प्रसंगी शत्रूचें आगतस्वागत करण्याचें नाकारलेलें, अगर स्वागत करणें न करणें सेनापतीच्या मर्जीवर अवलंबून ठेवलेलें आढळून येते

आतिथ्यमूलक विश्वासाचा दुरुपयोगः—पुष्कळदां इतर देशांप्रमाणेंच अरबस्तानामध्येंहि शत्रूला अतिथि म्हणून जेवण्यास बोलावून त्याला पकडावयाचें असे प्रकार होत असत मदिनामधील ज्यू हे अरब लोकांचे अश्रित कसे झालें यासंबंधीच्या कथांमधून दोनदा वरील प्रकार वर्णन केलेला आहे. १८११ मामलुक लोकांच्या बरोबर वागतानाहि अशाच प्रकारचें वर्तन महंमदअलीनें केलें होतें. विषाच्या योगानें शत्रूचा काटा काढण्याची पद्धत खलिफाच्या अमदानींत सरसहा चालू होती. कुराणामध्यें 'न्यायदिनी अतिथींच्यासाठीं केलेल्या रात्रीचा जाय विचारावयाची परमेश्वराला देखील लाज वाटेल' (कुतअल कुलब १३१०–१८२) असें म्हटलें आहे

तथापि सेमाइट वंशाच्या लोकामध्यें आणि सामान्यत सर्वच पौरस्त्य लोकामध्यें आतिथ्य हे धार्मिक कर्तव्य म्हणून मानलें जातें. ख्रिस्तपूर्वकाली अतिथींस आगतस्वागत, मेजवानी, त्याच्या अनावरास अन्न घालणें हें होई व वेळप्रसंगीमागितल्यास मुलगीहि अर्पण करण्यात येत असे! ग्रीक व रोमन लोकांतील आतिथ्याचे खासगी व सार्वजनिक असे दोन प्रकार असत. यजमान व अतिथि हे परस्पराना काहीं वस्तू नजर करीत व अशा प्रकारें जुळलेला संबंध पिढ्यानुपिढ्या चालत असे

ख्रिस्ती आगमपूर्व यूरोपीय —अतिथीला ठार मारण्याची पद्धत केल्टिक लोकांमध्यें होती असे डिडोरेसनें म्हटलें आहे पण तें साफ खोटें आहे. गॉल लोक पाहुण्याचें उत्तम प्रकारें आतिथ्य करीत. आयरिश लोकांमध्यें आतिथ्य करणें हा एक प्रकारचा कायदाच होता 'त्यांचीं घरें मोठीं असून तेथें अतिथींना कधींहि मज्जाव होत नसे असें आडेनोव्हननें आयरिश लोकांचें वर्णन केलें आहे. आतिथ्याची व्यवस्था पाहण्याकरिता नेमलेल्या खास अधिकाऱ्याच्या ताब्यात आतिथ्याच्या खर्चासाठीं जमीनी दिलेल्या असत. आयर्लंडमधील लोकांप्रमाणेंच वेल्समध्येंहि राजाला अतिथींचा यथायोग्य सत्कार करावा लागत असे. व त्यांच्यासाठीं अथितिगृहें व आतिथ्याध्यक्ष नेमावे लागत.

ख्रिस्ती.—या लोकांनीं आतिथ्याच्या चालीला सार्वजनिक स्वरूप दिलें. त्यांनी सुरु केलेल्या अतिथिगृहाचेंच परिणत स्वरूप म्हणजे हल्लींची हॉस्पिटलें होत. धर्माध्यक्षानें अतिथितत्पर असलेंच पाहिजे अशी सेंट पॉलची आज्ञा होती. विधवागृहें, अनाथालयें, वृद्धशुश्रूषागृहें, बालसंगोपनगृहें, वगैरे संस्थांच्या कल्पनेचा उगमहि यापासूनच आहे. अशा प्रकारचें पहिलें गृह भ्रान्समध्यें लीयां येथें ५४२ त चाईल्डबर्ट या राजानें स्थापन केलें. पोप ग्रेगरीनें ६ व्या शतकामध्यें अतिथिगृहें बांधिलीं रोग्यांची शुश्रूषा स्त्रियांकडून केली जाणारीं गृहें आगस्टाइन सिस्टर्स (पॅरिस), सिस्टर्स ऑफ सेंट थॉमस, सिस्टर्स ऑफ चॅरिटी हीं होत.

चिनी व जपानी.— चिनी लोक जात्याच आतिथ्यतत्पर आहेत. त्याप्रमाणेंच किंबहुना त्याहीपेक्षां जपानी लोक अधिक आतिथ्यशील आहेत फार प्राचीन काळा जपानी लोकांत अशी चाल होती की, पाहुण्याला जे पदार्थ खावयास द्यावयाचे ते, पाहुण्याला त्रास पडूं नये म्हणून अगोदर यजमान चावून ठेवीत असे! खुद्द जपानी देवांनीं देखील परकीय देवांचें आगतस्वागत केलें अशी कथा आहे. अशा प्रकारचें आदरातिथ्य जपानी लोकांनीं केलें म्हणूनच जपानी राष्ट्र सहज ख्रिस्ती करून टाकूं, अशी आशा ख्रिस्तीयरच्या मनांत उद्भवली कोरियामध्यें मात्र परधर्मीयाचा पूर्णपणें छळ व कापाकापी करण्यांत येत असे. सोळाव्या शतकातील जपानाशीं १९ व्या शतकातील कोरियाची तुलना केल्यास या दोन संस्कृतींमधील अंतर दिसून येईल ("दान" "सामाजिक सुधारणा" हे शब्द पहा).

[संदर्भ ग्रंथ.—मनु व याज्ञवल्क्य स्मृति शिवलीलामृत विनयपिटक एनशन्ट लॉज ऑफ आयर्लंड कुरी—मॅनर्स ॲंड कस्टम्स ऑफ दि एन्शन्ट आयरिश. कीटिंग–हिस्टरी ऑफ आयर्लंड. ट्रलिटिल• सोशल लाईफ दि चायनीज. ग्रे–चायना. उल्हहॉर्न–ख्रिश्चन चॅरिटी इन दि एन्शट चर्च. बर्डेट–हॉस्पिटल्स ॲंड असायलम्स ऑफ दि वर्ल्ड. अवेस्ता ग्रंथ निहॉर्गी गुक्लिस–रिव्ह्यु ऑफ दि इन्ट्रोडक्शन ऑफ ख्रिश्चॅनिटी इंटु चायना ॲंड जपान. केम्री–अकाउंट ऑफ ए सीक्रेट ट्रिप इन दि इंटीरियर ऑफ कोरिया. बज– बुक ऑफ दि डेड. हॉल–एन्शंट हिस्टरी ऑफ नियर ईस्ट. साईस–पॅट्रिआर्कल पॅलेस्टाइन डे–सोशल लाइफ ऑफ दि हिब्रूज एन्सायक्लो रिलिजन ॲंड एथिक्स (हॉस्पिटॅलिटी)]

आतीम.—सं. अ. प. भा. १७२.० (यिटर्बिअम किंवा निओ यिटर्बिअम) आतीम हें रासायनिक धातुमूलतत्त्व असून दुर्मिळ मृत्तिकाधातुवर्गांतील आहे. याचा शोध इ. स. १८७८ सालीं मेरिग्नाक यानें लावला. हें मूलतत्त्व प्रथम स्कंदयुक्त असें यानें काढलें होतें. आतीमाचा प्राणिद ($आ_2प्र_3$) हा पांढरा असून त्याचें वर्णहीन स्फटिक होतात. याचा स्फटिक रूप हरिद (आह ३·६ उ२प्र) वर्णहीन व आर्द्रता शोषक असतो. निर्जल हरिद उष्ण केल्यावर त्याचा ऊर्ध्वपात होतो. इ. स. १९०७ सालीं अर्बेन यानें आतीमांतून दोन नवीं मूलतत्त्वें निरनिराळीं केलीं. त्यांचीं नावें नव-आतीम उर्फ निओयिटेर्बिअम, व ल्युटेसिअम (प. भा. १७४.०) अशीं आहेत. इ. स. १९०८ सालीं एव्हान वेल्स बॅाश यानें आपलें हेंच मत प्रसिद्ध केलें, परंतु त्यानें या मूलतत्त्वास आल्डेबरेनियम आणि कॅसिओपियम अशीं नांवें दि

**आतुरसंन्यास**—मरणास अत्यंत पात्र झाला म्हणजे रोगादिकांनीं व्याप्त होऊन आता मरणार असा जो प्राणी त्यास 'आतुर' असें म्हणतात. अशा रीतीचा आतुर झालेला ब्राह्मण असल्यास तो जो संन्यास घेतो त्यास आतुरसंन्यास म्हणतात या आतुरसंन्यासात संकल्प, प्रेषोच्चार, आणि अभयदान हीं तीन कर्में मुख्य आहेत. अष्टश्राद्धादि दंडग्रहणांत अंगभूत कर्म यथासंभव म्हणजे संन्यस्त होणाऱ्यास शक्ति असल्यास करावें. कर्त्यानें पूर्वी मंत्रस्नान करून शुद्ध वस्त्र धारण करावें आणि 'मी ज्ञानप्राप्तिपूर्वक मोक्षसिद्धीकरितां आतुरविधीनें संन्यास करतो' असा संकल्प करून पाच केश बाकी ठेवून वपन करावें आणि स्नानकरून संध्यादि उपासनाविधी यथाशक्ति करून अग्नीचा आरम्भाच्या ठिकाणीं समारोप करावा. कर्ता अग्निहोत्री असल्यास पूर्णाहुति करून श्रौताग्नीचा आ म्याच्या ठिकाणीं समारोप करावा. नंतर उदक घेऊन मंत्रांनीं उदकांत होम करावा मग मंत्रांनीं उदकाचें अभिमंत्रण करून 'पुत्र, द्रव्य, लोक इत्यादिकाची इच्छा मी टाकली' असें म्हणून तें पाणी प्यावें व पुन्हा 'माझ्यापासून सर्व भूतास अभय आहे' असें म्हणून पाणी प्यावें त्याचप्रमाणें 'मी सर्व संन्यस्त' म्हणजे सर्व टाकलें असें म्हणून पाणी प्यावें तदनंतर पूर्वेकडे तोंड करून उंच हात करावे आणि प्रेषोच्चार करून पूर्वेस पाणी टाकून राहिलेली शेंडी आणि जानवें तोडून पाण्यात टाकावें म्हणजे आतुरसंन्यास झाला. या संन्याशानें पुत्राच्या घरीं राहूं नये असें धर्मसिंधूंत सांगितलें आहे. [धर्मसिंधु; विधानकल्पतरु.]

**आत्महत्या**—आत्महत्या म्हणजे हेतुपूर्वक स्वतःचा प्राण स्वतः घेणें. आत्महत्या करण्यास व्यक्ति प्रवृत्त का होतात त्या कारणाची मीमांसा करण्याकडे नीतिशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांनीं नेहमीं लक्ष दिल्याचें आढळतें. पाश्चात्य देशांत आत्महत्याची सर्व जबाबदारी राजकीय परिस्थितीं-वर टाकण्याची प्रवृत्ति झालेली आहे सुधारलेल्या पाश्चात्य देशांतील या कारणाची पौरस्त्य देशांतील—उदाहरणार्थ जपानसारख्या सुधारलेल्या देशांतील आत्महत्येच्या कारणाशीं तुलना करितां यावयाची नाहीं, कारण जपान वगैरे कित्येक पौरस्त्य देशांत कांहीं विशिष्ट परिस्थितींत माणसानें आत्महत्या करणें हें नैतिक व धार्मिक कर्तव्यच समजतात. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील सती जाण्याची चाल घ्या. सती जाणें हा केवळ एक आत्महत्येचाच प्रकार असूनहि तें एक मोठें उच्च धार्मिक कृत्य आहे असें हिंदु लोक मानतात उलटपक्षीं ख्रिस्ती दृष्टीनें आत्महत्या करणें हें पाप गणलें असून, सर्व ख्रिस्तधर्मी देशांत तो गुन्हा मानलेला आहे. अलीकडे पुष्कळशा यूरोपीय देशांतील आत्महत्यांचे आंकडे मिळवून केलेल्या कार्यकारणमीमांसेवरून असें निदर्शनास आलें आहे कीं, आत्महत्येचें कृत्य व्यक्ति स्वयंप्रेरणेनें (दुसऱ्याच्या जबरदस्तीनें नव्हे) करण्यास प्रवृत्त होते हें खरें असलें तरी, ते कृत्य करण्यास भाग पाडणारी कारणें खाजगी वैयक्तिक परिस्थितीव्यतिरिक्त इतर कांहीं निराळीच असतात व तत्संबंधीं कांहीं ठराविक नियमहि निघतात. उदाहरणार्थ, निरनिराळ्या देशांत आत्महत्येचें प्रमाण निरनिराळें पडतें. तर त्याच्या पृथक्करणानें हीं जाणली पाहिजेत.

दर लक्ष लोकसंख्येस वार्षिक आत्महत्येचें हें प्रमाण सॅक्सनी संस्थानांत इतर ठिकाणच्या मानानें फारच म्हणजे ३९२ (१८७२-८२ सालांत) होतें. याच्या खालोखाल डेन्मार्कमध्यें २५१ होतें स्वित्झर्लंडची राज्यव्यवस्था जगांत नमुनेदार धरतात तरी तेथें आत्महत्येचें प्रमाण कमी नाहीं. तें २३९ (त्याच सालांत) होतें. बाडेन (जर्मनी) मध्यें १९८ वुर्टेंबर्ग १८९, प्रशिया १६६ जर्मनीमध्येंच साक्सनी, बाडेन, प्रशिया, वुर्टेंबर्ग हीं चार संस्थानें घेतलीं तर तेवढ्यांतल्या तेवढ्यांत किती फरक आहे हें पहाण्याजोगें आहे, आणि स्थानिक फरकांची कारणें विचारांत घेण्याजोगीं आहेत. फ्रान्समध्यें त्याच कालांत हें प्रमाण १८० आहे जेथें अर्वाचीन तन्हेचा व्यावहारिक विकास फार झाला आहे तेथें आत्महत्या अधिक असें म्हणावें, तर बेलजमसारख्या कारखान्याच्या बाढींत अत्यंत पुढारलेल्या देशांतहि तें १०० च आहे, स्वीडनमध्यें ९२ होतें, इंग्लंड व वेल्समध्यें ७५, नार्वे ६९, स्कॉटलंड ४९, आयर्लंड १७. वरील सर्व आंकडे १८७७ पासून १८८९ पर्यंत सालाचे आहेत

या आंकड्याचा हिशोब करता असें म्हटलें पाहिजे कीं, आयर्लंडच्या साडेचार पट इंग्लंडांत आत्महत्येकडे प्रवृत्ति आहे. प्रशिया व फ्रान्समध्यें ती दसपट आणि साक्सनीमध्यें २३ पट आहे या दृष्टीनें विचार करूं लागलें म्हणजे या आंकड्यांचें यथार्थ महत्त्व लक्षांत येईल.

ही निरनिराळ्या प्रदेशांची तुलना झाली एकाच प्रदेशाच्या आंकड्यांकडे लक्ष अनेक दृष्टींनीं देता येतें आणि प्रत्येक देशांतील आंकड्यांचें अधिकाधिक पृथक्करण करूं लागलें म्हणजे कांहीं प्रवृत्तीहि लक्षांत येतात. इंग्लंड व वेल्समध्यें १८८२ सालीं ७५ प्रमाण होतें, तें बहुतांशीं एकसारखें वाढत आहे. १८८६ सालीं ८२ झालें, पण पुढें १८९० सालीं पुन्हा ७० झालें. तें मात्र एकसारखें वाढत चाललें आहे; आणि शेकडा ३० प्रमाणानें पुढील १५ वर्षांत वाढलें. १८९५ पासून १९०० पर्यंत ते ९० च्या आसपास होतें. १८९५ मध्यें ९२ झालें १८९६ मध्यें ८६ झालें. १८९७ मध्यें ९० झालें १८९८ मध्यें ९१ झालें, १८९९ मध्यें ८९ झालें व १९०० मध्यें ९० झालें यानंतर पुढें मात्र तें एकसारखें वाढत चाललें आहे. पुढील दरसालचे आंकडे अनुक्रमानें ९६, ९९, १०७, ९९, १०४ असे आहेत. दरसालच्या आंकड्यांकडे दुर्लक्ष करून पंचवार्षिक सरासरी घेतली तर आत्महत्येकडे इंग्लंडची प्रवृत्ति एकसारखी वाढत आहे पण इतर राष्ट्राच्या मानानें ही प्रवृत्ति

अजून फार नाहीं हें कबूल केलें पाहिजे. इंग्लंडमधलें स्त्रीपुरुषांचे आत्महत्येचे आकडे पाहिले तर असें दिसून येईल कीं, १८८६, १८९०, १८९५, १८९६, १८९७, १८९८, १८९९, १९००, १९०१, १९०२, १९०३, १९०४, १९०५ या वर्षांत स्त्रियांचे एकंदर आत्महत्या करणारात प्रमाण २४.४, २५.८, २५.९, २५.४, २५.१, २४.७, २५.४, २५.२, २५.७, २४.७, २४.७, २४.५, २५.० असें दिसून येईल. १८८८ पासून १८९७ पर्यंतच्या एकंदर आंकड्यामध्यें स्त्रियांचें प्रमाण २५.३ असें येतें. सरासरीनें असें म्हणता येईल कीं, २५ स्त्रिया जर आत्महत्या करतील तर पुरुष ७५ करतील. यावरून प्रवृत्तिकारणांवर अंशतः प्रकाश पडतो.

निरनिराळ्या आत्महत्या करण्याच्या पद्धती लक्षात घेऊन त्यांचें वर्गीकरण करण्यात आलें आहे तें असें:—फांस लावून, भोंसकून, पाण्यांत बुडवून घेऊन, विष खाऊन, गोळी घालून घेऊन, व इतर. आत्महत्येकडे प्रवृत्तीमध्यें केवळ स्त्रिया व पुरुष यांत फरक आहे असें नाहीं तर आत्महत्येच्या साठीं वापरलेल्या साधनांतहि हा फरक दृष्टीस पडतो. विशेष आत्महत्यासाधनांची स्त्रियांत अगर पुरुषांत प्रियता २५शीं ७५ या प्रमाणाच्या ऐवजीं प्रत्येक प्रकारात कीं निराळी प्रमाणें दृष्टीस पडतील. त्यावरून दृष्टास पडेल फास लावून घेणारात स्त्रिया शेकडा २५ न दिसतां १९.०७ इतक्या दिसतात. भोसकून घेणारात स्त्रियांचें प्रमाण १७.६ आहे पाण्यांत बुडवून आत्महत्या करणारात १८.६ आहे, वीष खाणारात मात्र सपाटून म्हणजे ४२.१ आहे. हा प्रकार आत्मघातकी स्त्रियांत अधिक लोकप्रिय आहे. स्त्रियांत कमी आढळून येणारा प्रकार गोळी घालून घेऊन आत्महत्या करणाराचा यात ९९.७ शेकडा पुरुष तर २.३ स्त्रिया आहेत. आत्महत्येच्या इतर पद्धतींत स्त्रियामध्यें प्रमाण २२.९ आढळतें.

कांहीं देशांत आत्महत्येचें प्रमाण इतर देशातल्यापेक्षा अधिक कां असतें व युरोपांतील निरनिराळ्या देशांत सामान्य प्रमाण निरनिराळें कां आहे, यासंबधींचीं कारणें निश्चित करता आलेलीं नाहींत. तथापि निरनिराळीं कारणें सुचविण्यात येतात तीं (१) हवामान, (२) मेंदूच्या विकारांचें प्रमाण, (३) मद्यपान हीं होत; तथापि हीं कारणें समाधानकारक नाहींत. अशी एक गोष्ट पुढें आली आहे कीं प्रॉटेस्टंट धर्मपंथी लोकांतल्यापेक्षा रोमन कॅथोलिक लोकांत आत्महत्येचें प्रमाण कमी आहे, आणि तें रोमन कॅथोलिकांपेक्षाहि ज्यू लोकांत कमी आहे. तसेंच शिक्षितांपेक्षा (प्राथमिक शिक्षण मिळालेले लोक धरून) अशिक्षितांत आत्महत्येचें मान कमी असतें ही गोष्ट विशेष विचार करण्यासारखी आहे. तसेंच आत्महत्या शहरांपेक्षां खेडेगांवांत कमी होतात शिवाय शहरांमध्यें कांहीं कांहीं वेळीं आत्महत्यांची संख्या एकदम पुष्कळ वाढते व ही एक रोगाची साथच असावी असें वाटूं लागतें. पांच वर्षांच्या वयाच्या आंत आत्महत्या मुळींच कोठें होत नाहींत, पांच ते दहा वर्षांच्या वयात फार क्वचित होते, दहा वर्षांच्या वयापासून मात्र हे प्रमाण सारखें वाढत जाऊन त्याची पंचावन्न ते पासष्ट या वयाच्या दरम्यान कमाल मर्यादा होते. स्त्रियांत पूर्ववयातच आत्महत्येची कमाल मर्यादा होते. साधनासंबंधानें पाहता पुरुषांत गळफासानें टांगून घेणाराची संख्या सर्वांत अधिक असते, तर स्त्रियांत विष खाणाऱ्याची संख्या अधिक असते. तसेंच ऋतूंमध्यें उन्हाळ्याच्या महिन्यांत आत्महत्या सर्वांत अधिक होतात, व हिंवाळ्यात सर्वांत कमी होतात. धंद्याच्या मानानें पाहता डॉक्टर, लष्करी शिपाई, खाणावळवाले व रसायनाचा धंदा करणारे या लोकांत आत्महत्येचें प्रमाण जास्त असतें; आणि धर्मोपदेशक, रेल्वेड्राइव्हर्स, कोळसेवाले व खलाशी यांत तें कमी असतें. तसेंच रोजगाऱ्यांपेक्षा बेकार लोकांत हें प्रमाण दुप्पट असतें.

धा र्मि क क ल्प ना.—मेंदू बिघडून वेडाच्या लहरींत मनुष्य आत्महत्येस प्रवृत्त होतो, यांत आश्चर्य नाहीं; पण विचारशक्ति पूर्णपणें शाबूत असताहि अनेक कारणामुळें मनुष्य आत्महत्या करण्यास प्रवृत्त होतो. अशा कारणांपैकीं धार्मिक समजुती हें प्रबल कारण असतें. पृथ्वीच्या पाठीवरील कित्येक धर्म आत्महत्या करावी असें म्हणणारे आहेत, तर कित्येक त्याचा पूर्णपणें निषेध करणारे आहेत. त्यांचा येथें देशवार क्रमानें विचार करूं.

हिंदुस्थान—वैदिक—ऋग्वेदकालांत ऐहिक जीवन व त्यांतील अनेक प्रकारचीं सुखसौख्यें यावर इतकी आसक्ति असल्याचें दिसून येतें कीं, आत्महत्ये विधानें ऋग्वेदांत मुळींच उल्लेख नाहींत व यांत आश्चर्य नाहीं. सतीसंबंधानेंहि त्यावेळीं प्रतिकूल मत होतें असें अनुमान निघतें. इतर वेदाच्या संहितांत व ब्राह्मणग्रंथांतहि यासबधानें उल्लेख नाहींत. तथापि ब्राह्मणग्रंथांत अशी कल्पना पुढें मांडलेली आहे कीं, इतर सर्व यज्ञांपेक्षा आत्मयज्ञ श्रेष्ठ होय. तसेंच शतपथ ब्राह्मणांत पुरुषमेध व सर्वमेध या यज्ञांत यजमानानें सर्वस्वाचा त्याग करून वनांत जावें असें प्रतिपादिलें आहे. या दोन्ही गोष्टी मनुष्याला आत्महत्या करण्यास प्रवृत्त करण्याच्या व त्याच्या कृत्यास धार्मिक संमति दर्शविणाऱ्या आहेत, असें "एनसा. रि. एथिक्स" मध्यें डा. कीथ म्हणतात, पण वैराग्य व आत्महत्या यांचें समीकरण करणें योग्य नाहीं. उपनिषद्ग्रंथांत व्यक्तिगत आत्मा आणि परमात्मा हे एकच असून ते एकमेकांत विलीन होऊन जाणें हें पारमार्थिक ध्येय मानिलें आहे. जाबाल, कंठश्रुति या उत्तरकालीन उपनिषदांत तर ज्याला आत्मज्ञान झालें आहे, अशा संन्याशानें महाप्रस्थानास निघावें किंवा प्रायोपवेशनानें, जलसमाधि घेऊन अथवा अग्निकाष्ठें भक्षण करून आपलें ऐहिक अस्तित्व संपवावें असें सांगितलेलें आहे.

महाभारतकालीन —ज्याप्रमाणें भारतीयांचा प्रयत्न आयुष्यांत उदार आचरणानें राहण्याचा असे त्याचप्रमाणें उदात्त रीतीनें मृत्यु यावा अशीहि त्याची महत्त्वाकांक्षा असे. घरांत दुखण्यानें पडून रोगानें आंथरुणावर मरण येणें, हें एक अतिशय दुर्दैव आहे असें ब्राह्मण व क्षत्रिय मानीत, 'अधर्मः सुमहानेष यच्छय्यामरणं गृहे। अरण्ये वा विमुच्येत संग्रामेवा तनुं नरः॥' क्षत्रियाला मरणाची योग्य जागा म्हटली म्हणजे अरण्य किंवा संग्राम' असें गदायुद्धाच्या वेळीं पाण्डवांनीं 'तूं आम्हांस शरण ये' असें दुर्योधनास म्हटलें असतां त्यानें उत्तर दिलें. क्षत्रियास लढाईत मरणें हें एक अतिशय आनंदायक व पुण्यकारक फल वाटे. ब्राह्मणहि घरीं रोगानें मरणें हें क्षत्रियाप्रमाणेंच दुर्दैव मानीत, व जे लोक धैर्यवान् असत ते देहत्याग महाप्रस्थानानें किंवा अग्निकाष्ठें भक्षण करून अर्थात चिता पेटवून त्यांत जाळून घेऊन किंवा पवित्र नदींत जलसमाधि घेऊन देहत्याग करीत असत. इतर लोक अरण्यांत जाऊन संन्यासी होत व संन्यासवृत्तीनें राहून मरणाची मार्गप्रतीक्षा करीत. हीं वर्णनें आपल्यास कदाचित असंभवनीय वाटत असतील, परंतु ग्रीक इतिहासकारांनीं अशीं प्रत्यक्ष वर्णनें लिहून ठेवलेलीं आहेत कीं, दोन ब्राह्मण अथेन्स शहरीं आजारी पडले, त्या वेळेस त्यांनीं चिता प्रज्वलित करून तीवर आनंदानें आरोहण केलें. स्ट्रेबो ग्रंथकारानें, शिकंदराबरोबर जो कलनस ( कल्याण ) नांवाचा योगी गेला होता, त्याच्या मरणाचें वर्णन असें केलें आहे. "पसरगादी या शहरीं जेव्हां तो आजारी पडला, तेव्हां त्याच्या आयुष्यांत हें पहिलेंच दुखणें असून त्यानें आपल्या वयाच्या ७३ व्या वर्षी राजाच्या विनंतीला मान न देतां आपल्या देहाचा अंत केला. एक चिता तयार करून तिच्यावर एक सुवर्णाचा पर्यंक ठेवला आणि त्याच्यावर तो पांघरूण घेऊन स्वस्थपणें पडला आणि चितेस आग लावून दिली."कोणी असें म्हणतात कीं त्यानें एक लाकडाची खोली तयार करविली; त्यांत लतापत्रें भरलीं आणि त्यास आग लावून दिली व मग तो समारंभानें वाजत गाजत तेथें गेला आणि त्यानें चितेंत उडी घेतली व लांकडाप्रमाणें तो जळून गेला. हिरोडोटसनें असें वर्णन केलें आहे कीं, "जेव्हां कोणी एखादा योगी रोगानें ग्रस्त होतो तेव्हां तो अरण्यांत एकांतीं जाऊन स्वस्थपणें पडतो. मग तो मेला किंवा जिवंत आहे याविषयीं कोणीच चवकशी करीत नाहीं." अशा प्रकारचे निरनिराळे देहत्यागाचे प्रकार महाभारतांतहि वर्णन केलेले आहेत. इतकेंच नव्हे तर धर्मशास्त्रांतहि त्यांचे विधी सांगितले आहेत महाप्रस्थानाचा विधि धर्मग्रंथांत व वैदिक वाङ्मयांत वर्णिलेला आहे. त्याचप्रमाणें चितारोहण करण्याचा विधि व नदींत जलसमाधि घेण्याचा विधि वर्णिलेला आहे. हिरोडोटसनें वर्णन केलेला प्रकार प्रायोपवेशनाचा होय हें उघडच आहे प्रायोपवेशन म्हणजे श्वास कोंडून प्राण देणें हें होय अशा विधीनें प्राणत्याग केला असतां तो आत्महत्या होत नाहीं अशी समजूत त्या काळीं होती

बौद्ध व जैन.—बुद्धानें देहदंडाच्या सर्व प्रकाराचा व त्याबरोबरच आत्महत्येचा निषेध केलेला आहे. जैन धर्मांत आत्महत्येला संमति दिली आहे इतकेंच नव्हे तर तसें करण्याबद्दल त्या धर्मांचा उपदेश आहे. तथापि वाटेल त्यास आत्महत्या करण्यास परवानगी नसून फक्त परमावस्थेप्रत पोहोंचलेल्या संन्याशासच तसें करण्याची आज्ञा आहे अशी आत्महत्या करण्याचा मार्ग अन्नपाणी वर्ज करणें हा सांगितलेला असून अशा नसल्लेखन प्रकारानें एक महिन्यांत मरण आल्याचे उल्लेख जैन ग्रंथांत विपुल सांपडतात. अशा प्रकारच्या आत्महत्येचा मार्ग अगदीं अलीकडील काळांतहि लोकप्रिय असल्याचें दिसून येतें. ११७२ मध्यें हेमचंद्र या विद्वान् गुरूच्या शिष्यानें कुमारपाल राजाच्या मृत्यूनंतर प्रायोपवेशनानें देह ठेविला १९१२ मध्यें अहमदाबाद येथें एका आगल्या सशक्त संन्याशानें ४१ दिवस अन्नपाणी वर्ज करून प्राण सोडला. तथापि आत्महत्या फक्त संन्याशांनीं करावी असा जैन धर्माचा सक्त नियम आहे

आधुनिक हिंदु धर्म.—धर्मसूत्रें व धर्मशास्त्रें यामध्यें याविषयीं जे विचारस्वरूप आढळतें, तेंच कालपर्यंत कायम होतें. मनूनें अशी परवानगी दिली आहे कीं, रोगानें किंवा मोठ्या संकटानें ग्रस्त झालेल्या इसमानें ईशान्य दिशेस प्रवासाला निघावें व फक्त पाणी व वायु भक्षण करून देह थाळवावा व मरून जावें. शिवाय जलसमाधि, अग्निकाष्ठभक्षण वगैरे जुन्या ऋषींच्या पद्धतीहि मनूनें ग्राह्य मानल्या आहेत. जीवात्मा परमात्म्यांत विलीन करणें हें जुनें पारमार्थिक स्वरूप बदलून उपास्य सगुण दैवताशीं एकरूप होणें असा अर्थ धार्मिक आत्महत्येला अलीकडे प्राप्त झाला होता. प्रसिद्ध भक्त मिराबाई द्वारकेस श्रीकृष्णाच्या मूर्तींत एकरूप झाली अशी कथा आहे जगन्नाथपुरीस जगन्नाथाच्या रथाच्या चाकाखालीं पडून आत्महत्या करणाऱ्या भक्तांची भावना याच प्रकारची असते. ईश्वराशीं सारूप्य पावण्याच्या हेतूखेरीज ज्या तत्सम हेतूनें आत्महत्या होते तो हेतु म्हटला म्हणजे स्वर्गांत प्रियजनास भेटणें हा होय. या हेतूमुळेंहि आत्महत्या होतात ब्रिटिश सत्ता हिंदुस्थानांत प्रस्थापित झाल्यापासून धार्मिक, सामाजिक वगैरे सर्व प्रकारच्या आत्महत्यांना कायद्यानें बंदी करण्यांत आलेली आहे. पातिव्रत्यरक्षणार्थ आत्महत्यांना आजहि जनता दोष देईल काय ?

चीन.—चीनच्या इतिहासांत व वाङ्मयांत आलेल्या वृत्तान्तावरून आत्महत्येचा प्रचार चीनमध्यें बराच होता असें दिसतें. विशेषतः एका चिनी कादंबरींत असें कथानक आहे कीं, ज्याला आपलें वाग्दान केलें आहे, अशा आपल्या प्रियकराच्या थडग्यावर, त्याच्या प्रतिस्पर्ध्याशीं ढरविलेलें आपलें लग्न टाळण्याकरतां नायिका आत्मदान

करतें व त्यावर ती प्रतिस्पर्धी आपल्या वधूचा स्वर्गांत सापडतील तसारा लावण्याकरिता व त्याबरोबरच तिच्या प्रियकरावर सूड उगवण्याकरिता आत्महत्या करून घेतो. युद्धांत पराजय पावल्यामुळें सेनापतींनीं, प्रजेच्या कोपामुळें ओढवणारा अनर्थ टाळण्याकरितां जुलमी राजांनीं, पदच्युत केलेल्या राजांनीं, ज्यांचा सर्व लाज्य म नला गेला अशा मुत्सद्यांनीं, हद्दपारीची शिक्षा झालेल्या अपराध्यांनी व निराश झालेल्या कैद्यांनीं, बादशहाची गैरमर्जी झालेल्या मंत्र्यांनीं, कट उघडकीस आलेल्या बंडखोरांनीं. लज्जास्पद विवाहबंधन टाळण्याकरितां स्त्रियांनीं, फाशीची शिक्षा सुनावण्याचा वारंवार प्रसंग आलेल्या न्यायाधिशांनीं, स्वामिनिष्ठ सेवकांनीं, पुत्रशोक झालेल्या पितरांनीं वगैरे अनेक प्रकारच्या परिस्थितींतील इसमांनीं आत्महत्या केल्याचीं उदाहरणें चरित्रात्मक ग्रंथांत आहेत. शिवाय आपद्ग्रस्त व रोगग्रस्त लोकांनीं आत्महत्या केल्याचीं उदाहरणेंहि चीनमध्यें पुष्कळ सापडतात. तीव्र मनोविकाराला बळी पडून आत्महत्या केल्याचीं उदाहरणें आहेत. गळफास लावणें, विहींरीत उडी टाकणें, अफू खाणें हीं सामान्य साधनें चीनमध्यें आत्महत्या करण्याकरितां उपयोगांत आणतात. अद्यापिहि चीनमध्यें आत्महत्येच्या संख्येला आळा पडलेला नाहीं.

जपान.—हा देश आत्महत्येच्या संख्यातिशयाबद्दल सर्व जगांत प्रसिद्ध आहे. १९१५ पर्यंतच्या आंकड्यांवरून पाहतां ही संख्या अद्यापहि कमी झालेली नाहीं. जपानी लोकांचीं आत्महत्या करण्याचीं साधनें येणेंप्रमाणें:—

हाराकिरी (पोट–फाडणें) —याला सेप्पु कु असेंहि म्हणतात. हा प्रकार वरिष्ठ दर्जाच्या, दरबारी व राजघराण्यांतील माणसामध्यें प्रचलित असून जपानच्या फौजदारी कायद्यानें याला संमति दिलेली आहे. हाराकिरीचा प्रघात १२ व्या शतकापासून प्रचलित असून तो एक मोठा धार्मिक विधि आहे असें मानतात. या कृत्याकरतां घरापाठीमागील बागेंत पांढऱ्या कापडाचे पडदे लावून जागा तयार करतात. तेथें कोणी मित्र किंवा नातेवाईक साक्षीदार ठेवून आत्महत्या करणारा इसम एका लहानशा तरवारीनें आपलें पोट आडवें फाडतो. नंतर जवळचा माणूस त्याचें डोकें कापून त्याची यातनांतून सुटका करतो.

शिंजु. (प्रणयी स्त्रीपुरुषांनीं एकदम जीव देणें) एकमेकांवर प्रेम करणारे स्त्रीपुरुष ऐहिक त्रास चुकून परलोकांत सुखानें राहण्यास सापडावें म्हणून एकदम आत्महत्या करतात. याकरितां बहुधा हें जोडपें स्वतःस कळकट दोरानें एकत्र बांधून पाण्यांत बुडून जीव देतें. अलीकडे विष पिऊन किंवा आगगाडीखालीं चेंगरून प्राण देण्याचा मार्ग अवलंबिण्यांत येतो. अशाहि आत्महत्यांची संख्या कमी नाहीं.

(३) जुंशी, म्हणजे स्वतःचा मालक किंवा स्वामी मरण पावल्यावर त्याच्या मागोमाग परलोकांत जाण्याकरतां सेवकांनीं करावयाची आत्महत्या हा प्रकार इसवीसनापूर्वीपासून जपानांत चालू आहे. १७४४ पासून या चालीला बंदी करण्यांत आलेली आहे तरीपण अशा आत्महत्या अद्यापिहि चालू आहेत. या प्रकाराचें अलीकडील सुप्रसिद्ध उदाहरण म्हणजे जनरल नोगी व त्याची पत्नी यांनीं १९१४ सालीं जपानचे मेजी बादशाह मरण पावल्यावेळीं केलेली आत्महत्याच होय.

मुसलमानी देश.—आत्महत्येचा निषेध करणारीं अशीं प्रत्यक्ष वाक्यें कुराणांत नाहींत. तथापि महंमद पैगंबराच्या उपदेशाचा एकंदर रोंख आत्महत्येच्या विरुद्ध आहे यांत संशय नाहीं. आत्महत्या करणें हें पाप आहे अशी समजूत मुसुलमानी समाजांत पुष्कळ शतकें चालत आलेली असून हल्लींहि ती कायम आहे. इतकेंच नव्हे तर आत्महत्या करणाऱ्याच्या देहाचे और्ध्वदेहिक विधीहि करूं नयेत असें महंमदानें सांगितल्याची दंतकथा आहे, पण तो कायदा आहे असें हल्लींचे मुसुलमान लोक मानीत नाहींत. एकंदरींत सर्व मुसुलमानी देशांत आत्महत्येचें प्रमाण फारच अल्प आहे, आणि साधारणपणं विचार करतां असें आढळून येतें कीं, सामान्य परिस्थितीपेक्षां धार्मिक समजुतीच माणसांना आत्महत्या करण्यास अधिक प्रवृत्त करितात असें म्हणावें लागतें. मुसलमान लोकांत आत्महत्येची संख्या अत्यल्प असते याचें बरेंच श्रेय त्या संप्रदायाच्या पुढील उपदेशाला आहे.

जगांतील पारमार्थिक विचारांपैकीं कित्येक आत्महत्येला अनुकूल आहेत तर कित्येक तीव्र विरोध करणारे आहेत. आत्महत्येच्या समर्थनपर दिलेल्या निरनिराळ्या विचारांतील कारण वरील देशवार दिलेल्या माहितीवरून लक्षांत येणारीं आहेत. त्यांपैकीं परलोकप्राप्ति, प्रियजनसहवास व पापांवमोचन हीं प्रमुख होत. आत्महत्येचा निषेध करणारे धर्म एका विशिष्ट उच्च दर्जाच्या संस्कृतीचेच असतात असें नाहीं. कित्येक अगदीं असंस्कृत लोकांच्या धर्मांतहि आत्महत्या निषिद्ध मानल्याचें आढळतें. अशा निषेधाचें मुख्य कारण म्हणजे मृत्यूनंतर प्राप्त होणाऱ्या शिक्षायोनीबद्दलची भीति हें होय. बौद्धधर्मासारख्या उच्च संस्कृतीच्या धर्मामध्यें आत्महत्येचा निषेध 'अहिंसा परमोधर्मः' या तत्वान्वयें केलेला आहे. परिणततस्वरूप पावलेल्या ज्यू धर्मानें आत्महत्येचा तीव्र निषेध केलेला आहे. ख्रिस्ती धर्मच्या 'ओल्ड टेस्टमेंट' या पवित्र ग्रंथांत स्पष्ट निषेधपर असें एकहि वाक्य नाहीं; त्याचप्रमाणें 'न्यू टेस्टमेंट' नामक ख्रिस्ती धर्मग्रंथांतहि तशीं वाक्यें नाहींत. ख्रिस्ताच्या सुप्रसिद्ध दहा आज्ञांपैकीं सहाव्या आज्ञेचा अर्थ मात्र आत्महत्यानिषेधपर करतात. उत्तरकालीन ख्रिस्ती धर्मांत हें निषेधाचें तत्व हळूहळू पूर्णपणें प्रस्थापित झालेलें असून प्रॉटेस्टंट धर्मपंथांनींहि आत्महत्येचा जोरानें निषेध केलेला आहे. निरनिराळ्या देशांतील नीतिशास्त्रविषयक ग्रंथांत तद्देशीय धर्मग्रंथांतील मतेंच थोडफार फरकानें पुनरुद्भूत केलेलीं

आढळतात. प्लेटो व अरिस्टाटल या दोघांच्या मतांत आत्महत्येचा निषेध आहे; व त्याचें एक कारण आत्महत्येनें दिग्दर्शित होणारा व्यक्तिगत भ्याडपणा हा नैतिक दुर्गुण आणि दुसरें कारण राष्ट्रीय हानि म्हणजे राष्ट्राला उपयोगी पडणारी एक व्यक्ति नाहींशी होणें हें दिलेलें आहे. तथापि असाध्य रोग किंवा आत्यंतिक अपमान झाला असतां माणसानें आत्महत्या करावी हा अपवाद वरील दोघांहि तत्त्ववेत्यांनां मान्य होता. पुढें अथेन्सचें स्वातंत्र्य नष्ट झाल्यावर व्यक्तीचें राष्ट्रीय महत्त्व कमी होऊन व्यक्तीच्या खाजगी हिताहिताच्या दृष्टीनें आत्महत्या करणें योग्य आहे किंवा नाहीं असा वाद सुरू झाला आणि स्टोईकपंथाच्या तत्त्ववेत्त्यांनीं आत्महत्येचें समर्थनच नव्हे तर शिफारसहि केलेली आहे अखिल ऐहिक आपत्तींतून सुटका होण्याचें साधन म्हणून त्यांनीं आत्महत्येची प्रशंसा केलेली आहे. आधुनिक काळांत यूरोपांत आत्महत्येचें नैतिकदृष्ट्या महत्त्व कमी कमी होत गेलेलें असून वैद्यकशास्त्रांतील तज्ज्ञांनीं आत्महत्येचें कारण मेंदूंतील विकृति होय अशा दृष्टीनें या प्रश्नाची चिकित्सा व संशोधन सुरू केलेलें आहे. ही दृष्टि अलीकडे वळावत असलल्या बुद्धिप्रामाण्यवादित्वाला धरून असल्यामुळें सदरहू प्रश्नाला सर्वस्वी योग्य व अभिनंदनीय असेंच वळण लागलेलें आहे. तथापि मेंदू पूर्णपणें निरोगी असूनहि जे लोक आत्महत्या करण्यास प्रवृत्त होतात त्यांच्या मनःस्थितीसंबंधानें नैतिकदृष्ट्या कारणमीमांसा करण्याचाहि प्रयत्न चालू असून अतींद्रिय कारणाचा या विषयांत अन्तर्भाव अलीकडील नीतिशास्त्रज्ञ करीत नाहींसे झालेले आहेत. यावरील अगदीं अलीकडील ह्यूमचें "आत्महत्येसंबंधी विचार" ह्या नावाचें पुस्तक फार महत्त्वाचें आहे. शिवाय अलीकडे वळावलेला तत्त्वज्ञानातील जो 'उपयुक्ततावाद' तो आत्महत्येला फारच अनुकूल आहे असें म्हणावें लागतें; कारण उपयुक्ततावादविषयक तत्त्वज्ञानग्रंथांत सत्कृत्य म्हणजे ज्याच्या योगानें मानवजातीच्या एकंदर सौख्याच्या बेरजेंत [ या ठिकाणीं सौख्य म्हणजे विषयसुख असाच अर्थ आहे ] भर पडतें अशी व्याख्या असल्यामुळें त्यावरून सरळ अनुमान असें निघतें कीं, जर एकाद्या माणसानें आत्महत्या केल्यास इतर कोणाहि माणसास यत्किंचितहि दुःख होण्याचा संभव नसून किंवा अल्प दुःख होण्याचा संभव व सुख मात्र पुष्कळांना पुष्कळ होण्याचा संभव असल्यास त्यानें आत्महत्या करणें हें नैतिक दृष्ट्या सत्कृत्यच होय. तत्त्वज्ञानांतील अतींद्रियवादी जे पंथ आहेत ते आत्महत्येच्या कृत्याचा निषेधच करतात, त्यांतील कांट व शोपेनहार हे तत्त्ववेत्ते प्रमुख होत. तथापि अतींद्रियपंथी तत्त्वज्ञानावर विशेष विश्वास नसलेल्या सामान्य सुशिक्षित जनसमाजाला आत्महत्येची स्टोईकपंथानें केलेली आत्यंतिक स्तुति किंवा कांटप्रभृतींनीं केलेली आत्यंतिक निंदा दोन्हींहि मान्य नसून या दोन्ही टोंकांना मध्यवर्ति असा एखादा मार्ग श्रमाया असें वाटत आहे. स्वतःचा स्वतः घात करून घेणें हें कृत्य कांहीं विशेष प्रकारच्या परिस्थितींमध्येंच समर्थनीय आहे असें हल्लीं बहुतेकांचें मत आहे. अर्थात् ती विशिष्ट परिस्थिति अशाच असामान्य प्रकारची असली पाहिजे कीं, सदरहू आत्महत्येचें कृत्य भ्याडपणाचें किंवा अनीतिमूलक आहे असें म्हणण्यास यत्किंचितहि जागा असतां कामा नये.

मुंबईइलाख्यांत १९२२ मध्यें २७२ आत्महत्या झाल्या. प्रमाण दर दहालाखांत १४ म्हणजे आयर्लंडहून थोडेसें कमी आहे [ संदर्भग्रंथ.–वैद्य महाभारत–उपसंहार ए. शि. एन्. रिलिजन अँड एथिक्स एन्. सोशल रिफॉर्म्स. ]

**आत्मा** — निसर्गातील जडाहून भिन्न असें जें तत्त्व तो आत्मा होय अशा अर्थानें हा शब्द आपण उपयोगिला जातो. हा फरक देह व आत्मा या मनुष्यांतील दोन घटकांनीं दर्शविला जातो. आत्म्याची कल्पना अगदीं प्राथमिक अवस्थेतील मनुष्याला असते; ती मनुष्याच्या देहाला चलनवलन करण्याचें सामर्थ्य देणारी शरीरान्तर्गत शक्ति या अर्थानें असते, आणि तीच कल्पना सर्वत्र लागू करून सर्व वस्तूंत आत्मा किंवा ईश्वरीतत्त्व आहे अशा प्रकारचा सर्वचैतन्यवाद(ॲनि

तीवरून दिसून येतें की, वैदिक लोक हिंदुस्थानांत आले त्या वेळींच; देहाहून आत्मा निराळा असून तो मरणोत्तरहि कायम असतो या कल्पना त्यांच्यांत रूढ होत्या. मृतपूर्वजांचें श्राद्ध वगैरे करून पिंड देणें या विधींवरून हेंच दिसतें. मनुष्याचे आत्मे मरणोत्तर देवलोकीं जाऊन राहतात ही कल्पना प्रथम उद्भवून नंतर आत्मा अविनाशी असतो हें तत्त्व प्रस्थापित झालें असावें. यानंतरची पायरी पुनर्जन्मवाद व कर्मवाद ही होय. याचा अर्थ असा कीं, मनुष्याचा आत्मा पृथ्वीवर पुन्हां पुन्हां जन्माला येतो व मागील जन्मांच्या कर्मांचें फळ चालू जन्मीं भोगीत असतो. तसेंच चालू जन्मांतील कर्मांचें फळ भोगण्याकरितां त्याला पुनर्जन्म येतो. याप्रमाणें जन्ममरणाचें गाडें गारसें निरंतर चालू असतें. अर्थात् फक्त देह मरणसमयीं नष्ट होतो व आत्मा कायम राहून पुनर्जन्म घेतो. आत्मा अमर व शाश्वत आहे. याच कर्मवादांतील आणखी एक तत्त्व असें आहे कीं, मनुष्यानें एका जन्मांत फार चांगलीं कृत्यें केल्यास पुढल्या जन्मीं तो राजा किंवा देव होतो, पण वाईट कृत्यें केल्यास समाजांतील हलक्या जातींत किंवा पशुपक्ष्यांच्या योनींत किंवा वनस्पतींच्या जातींत, किंवा भूतपिशाचयोनींत जन्मास येतो. यावरूनच हें सिद्ध होतें कीं, मनुष्य, देव, प्राणी, वनस्पती, किंवा भूतपिशाच या सर्वांतील जे आत्मे ते सर्व एकाच प्रकारचे असतात व त्यांना केवळ देहभिन्नत्वामुळें भिन्नता प्राप्त होत असते. आत्म्यासंबंधींचा हिंदु पारमार्थिक विचारांतील हा दुसरा महत्त्वाचा सिद्धांत होय. याच सिद्धान्तांत हिंदूंचें दैवतबाहुल्याचें मत प्रतिबिंबित झालेलें दिसतें.

याशिवाय आत्म्यासंबंधीं आणखी एक महत्त्वाची कल्पना म्हणजे ब्रह्मात्मा किंवा परमात्मा ही होय. ही कल्पना अशी आहे कीं, दृश्य व अदृश्य अशा संपूर्ण विश्वाला आंत, बाहेर सर्व बाजूंनीं व्यापून राहिलेलें असें उच्च तत्त्व आहे तें ब्रह्म होय. या ब्रह्मापासून सर्व देव, माणसें, व विश्व निर्माण झालें. वेदान्ततत्त्वज्ञानाचें मूलबीज यांतच आहे. त्यानंतर विचारी माणसांना असा प्रश्न पडला कीं, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून कायमची सुटका होण्यास कांहीं मार्ग आहे कीं नाहीं? या प्रश्नाला अस्तिपक्षीं उत्तर देऊन अशी सुटका किंवा मुक्तता होण्याचे निरनिराळे मार्ग सुचविणारे अनेक तत्त्वज्ञानी पंथ निघाले मनुष्याच्या शरीरांतील आत्मा आणि ब्रह्म किंवा परमात्मा दोन्हीं एकच आहेत हें ज्ञान ज्यास होतें तो मुक्त होतो असा सिद्धांत पुढें मांडण्यांत आला. वेदान्त नामक तत्त्वज्ञानपंथाचें हेंच मूळ असून त्याचें विवेचन अगदीं प्राचीन उपनिषदांत केलेलें आढळतें.

यानंतर सांख्य, वैशेषिक, अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैत, वगैरे निरनिराळे तत्त्वज्ञानाचे पंथ निघून त्यांनीं जीवात्मा व परमात्मा यांच्या स्वरूपाबद्दल व जीवात्म्याला मुक्ति प्राप्त करून घेण्याच्या साधनाबद्दल निरनिराळ्या प्रकारचें प्रतिपादन केलें. (वेदान्त वैशेषिक सांख्य इ. पहा.) आत्मा मुक्त झाल्यावर तो सर्वव्यापी व सर्वज्ञानी बनतो असेंच या बहुतेक पंथांचें मत आहे. वैशेषिक दर्शन प्राण व आत्मा निराळे मानतें.

इस्लामी.— कुराणांत असें सांगितलें आहे कीं, अल्लानें प्रथम मनुष्य उत्पन्न केला, तेव्हां त्यानें मनुष्याच्या शरीरांत स्वतःचा निश्वास सोडून आत्मा किंवा जीव उत्पन्न केला. आणि याप्रमाणें उत्पन्न झालेल्या आदामाच्या आत्म्यापासून त्याच्या सर्व वंशजांचे आत्मे उत्पन्न झाले. गर्भावस्थेंतील देहामध्यें उत्पन्न होणारा आत्मा ही आत्म्याची द्वितीय उत्पत्ति होय. आत्मा हृदयामध्यें स्थित असतो व म्हणूनच धर्मज्ञान, धर्मबुद्धि व धर्मश्रद्धा किंवा अश्रद्धा हींहि माणसाच्या हृदयांत असतात म्हणूनच अश्रद्धावान माणसाचें हृदय अल्ला आकुंचित करतो व श्रद्धावानाचें हृदय मोठें करतो, असें कुराणांत सांगितलें आहे. बाह्य गोष्टींचें ज्ञान डोळे व कान यांच्याद्वारें हृदयास मिळतें, म्हणून हीं दोन ज्ञानेंद्रियें कुराणांत विशेष महत्त्वाचीं मानलीं आहेत. महंमदाला अल्लानें प्रकटीकरणद्वारा आपली साक्ष जी पटविली ती श्रोत्रेंद्रियामार्गें होय, अशी इस्लामी दंतकथा आहे.

अल्लानें आत्मा प्रथम उत्पन्न केला त्याच वेळीं त्याच्यामध्यें दोन प्रवृत्ती, (एक सत्प्रवृत्ति व दुसरी असत्प्रवृत्ति) उत्पन्न केल्या, आणि मनुष्यांतील या सत्प्रवृत्तीला उद्देशून महंमदानें आपला उपदेश करावा अशी मूळ कल्पना होती. पण महंमदानें पुढें मनुष्याला प्रवृत्तिस्वातंत्र्य असतें ही गोष्ट नाकारून त्यानें सर्वस्वीं अल्लाच्या शब्दाप्रमाणें म्हणजे कुराणांतील वचनाप्रमाणें चाललें पाहिजे असा उपदेश केला.

दुसरी गोष्ट ही कीं, अल्लानें बाहेरून आत्मा शरीरांत घातला त्याप्रमाणें निद्रावस्थेंत किंवा मरणोत्तर त्याला हा आत्मा शरीरापासून निराळा करतां येतो. मरणानंतर शरीरापासून निराळा झालेला आत्मा कशा स्थितींत असतो याबद्दल कुराणांत जें वर्णन आहे त्यावरून थोड्याचाच निश्चित अर्थ करतां येतो. पुण्यशील लोक मरण पावले म्हणजे त्यांचे आत्मे आपल्या सन्निध ठेवतो आणि अंतिमन्यायदिनानंतर (डे ऑफ जजमेंट) शरीरें उत्थान पावलीं म्हणजे त्यामध्यें ते आत्मे तो पुन्हा प्रस्थापित करतो.

अल्ला मनुष्याचे आत्मे त्याच्या जन्माची वेळ आली म्हणजे आपल्या स्वर्गीय राज्यांतून पाठवून देतो. त्याचप्रमाणें प्राणी, राक्षस, भूत पिशाच, देवदूत यांचे आत्मेहि देव उत्पन्न करतो. मृत्यु येतो तेव्हां आत्मा मुखाच्या मार्गानें बाहेर पडतो असें, आणि डोक्याच्या मागच्या भागांतून बाहेर पडतो असें कोणी म्हणतात. दुसरी अशी एक समजूत आहे कीं, मृत्यु आल्यावर आत्मा स्वर्गास जातो, पण देव त्याला पुन्हा परत पाठवितो व तो आत्मा आपल्या थडग्यांतील शरीराभोंवती कांहीं काळ फिरत राहतो. तेथें मुनकिर व नकीर नावाचे देवदूत त्याची परीक्षा घेतात, आणि त्यानें इस्लामी धर्मावर श्रद्धा दाखविली तर त्याला स्वर्गांत नेऊन देवाच्या सिंहासनानजीक एका मेणबत्तीवर ठेवतात. पण जो

आत्मा पापी असतो व अल्लाला मानीत नाहीं त्याचा ते देव दूत तेथेंच छळ करतात व नंतर नरकांतहि छळ करतात. जे लोक धर्मश्रद्धावान असतात पण पापकर्म करतात त्यांना शुद्धिलोकामध्यें ठेवतात, परंतु सर्वसामान्य समजूत अशी आहे की. अन्तिमन्यायदिनापर्यंत आत्मा पक्ष्याच्या स्वरूपांत-धर्मश्रद्धावंताचा आत्मा हिरव्या पक्ष्याच्या स्वरूपांत-राहतो ज्या माणसांचे खून झालेले असतात त्याचे आत्मे घुबडाच्या स्वरूपात थडग्याच्या बाजूस बसून सूड घेण्याकरितां ओरडत असतात.

**बौद्ध**—बौद्ध धर्मग्रंथात जीव, अत्तन, सुत्त, पुग्गल, वेदगू वगैरे अनेक शब्द आत्मा या अर्थी आलेले दिसतात. जीव म्हणजे जिवंत असलेली वस्तु असा शब्दार्थ आहे पण बौद्धग्रंथात आत्मा या अर्थी जीव हा शब्द बहुधा न वापरता अत्ता, सुत्त,पुग्गल यापैकीं कोणता तरी शब्द वापरतात, सुत्त-वाङ्मयात 'अत्ता' हाच शब्द आत्मा या अर्थी जागजागीं वापरलेला आढळतो. वेदान्ती लोक आत्मा याचा जो अर्थ किंवा जे वर्णन करतात त्याचसंबंधात बौद्धानीं त्याच्याबरोबर मोठा वाद केलेला आहे बौद्ध धर्मवेत्त्यानीं देह व आत्मा हें हिंदूंचें द्वैतमत अमान्य केलें असून त्यानीं शरीरांतील व्यापारांचे रूप, वेदना, विज्ञान, संज्ञा व संस्कार असे पांच खंध (स्कंध) कल्पले आहेत, आणि विनाशी, विकारी व दुःखस्थान असलेल्या शरीरांत अविकारी, शाश्वत, आनंदमय असा आत्मा असणें शक्य नाहीं, असें त्याचें म्हणणें आहे. शरीरात जीवात्मा म्हणून जो मानतात तो नसतो असें जरी त्यांचें मत आहे तरी मृत्यु येताच शरीर व मन सर्वस्वी नाश पावतें असें मात्र ते मानीत नाहींत. सस्सतवाद, उच्छेद-वाद, अनिश्चवाद आणि कर्मवाद असे त्याचे चार प्रसिद्ध सिद्धांत आहेत. हिंदूंचा कर्मवाद त्यानीं मान्य करून असें म्हटलें आहे कीं, मृत्यूनंतर मनुष्य कृतकर्मामुळें उत्पन्न झालेल्या एक प्रकारच्या शारिरिक व मानसिक शक्तीच्या रूपानें अस्तित्वात राहतो व त्याला पुनर्जन्महि असतो. जीवात्म्यासंबंधाचें वेदान्त्यांचें म्हणणें अमान्य करून त्याऐवजीं मरणोत्तर स्थितीसंबंधानें स्वतःचे स्वतंत्र सिद्धांत नीटपणें पुढें मांडले नसल्यामुळें बौद्ध धर्माला एक प्रकारचा कायमचा दुबळपणा आलेला आहे. पुनर्जन्मावर विश्वास आणि आत्म्यावर अविश्वास याची जुळणी करणें बौद्धाना नेहमीं कठिण जात असे हे दाखविण्याकरितां एक प्राचीन संवाद येथें उद्धृत करतें.

मिलिंदपन्ह ग्रंथात आत्म्यासंबंधीं विवेचनात्मक कथा आहेः-मिलिंद राजाकडे एकदा एक साधु आला असता त्यानें त्याचें नांव विचारिलें, तेव्हां त्या साधूनें उत्तर दिलें कीं, "मला नागसेन म्हणतात; परंतु तें केवळ नांव आहे, तो कांहीं आत्मा नव्हे अथवा त्या नावाला कोणतेंहि शरीर चिकटलेलें नाहीं." या गोष्टीबद्दल तो राजा आणि साधु यांच्यामध्यें एक अत्युत्कृष्ट संवादात्मक प्रवचन झालें. बौद्धधर्माचें जें आद्य तत्त्व कीं, आत्मा म्हणून कोणी वस्तु नाहीं, जीवात्म्याचें अस्तित्व वास्तविक नसून सृष्टीमध्यें फक्त पदार्थविषयक व मानसिक क्रियामध्यें सतत बदल होत असतात या तत्त्वाची आणि बौद्धानें स्वतः घेतलेल्या पुनर्जन्मपरंपरेची जुळणी करणें फार मुष्किलीचें आहे यापेक्षाहि कर्मवादाचें तत्त्व, म्हणजे कर्मांना फल असतें, हें जें सर्व बौद्धनीतिशास्त्रामध्यें अतिशय महत्त्वाचें तत्त्व, त्याची वरील तत्त्वाशीं संगति लावणें फारच कठिण आहे या दोन प्रश्नांपैकीं पहिल्या प्रश्नासंबंधीं झालेला संवाद पुढें दिला आहेः—

राजा म्हणतो, ' आर्य नागसेन, जो पुन्हा जन्मास येतो तो तोच असतो किंवा दुसरा कोणी असतो ? "

थेर म्हणतो, " तो तोच नसतो किंवा दुसराहि नसतो."

" याला दृष्टांत सांगा."

" राजा, तुला काय वाटतें ? तू लहानपणीं पाय हलवणारें असें लहान मूल होतास, तसाच आता मोठा झाल्यावरहि आहेस काय ? "

"नाहीं. महाराज, तें लहान मुलगा· तें पाय हलविणारें लहान मूल दुसरें होतें व मी आता मोठा झाल्यावर दुसराच आहे."

"असें जर असेल तर तुला कोणी माता नाहीं, पिता नाहीं. तुला कोणी शिक्षण दिलें नाहीं, तूं दहा नियमाचा केव्हांहि अभ्यास केला नाहींस व तुला केव्हांहि शहाणपण आलें नाहीं, तर मग हे राजा, निरनिराळ्या गर्भांच्या चार अवस्थामध्यें त्याची आई प्रत्येक वेळीं निराळी होती काय? त्याचेंच पुढें लहान मूल झाल्यावर त्याची आई दुसरी कोणी होती काय ? व तो मोठा झाल्यावर त्याची तिसरीच कोणी आई असते काय ? ज्याला विद्या शिकविली जाते तो आणि ज्याला विद्या येते तो, हे निराळे असतात काय ? जो गुन्हा करतो तो निराळा आणि ज्याचे हातपाय तोडिले जातात तो निराळा, असें असतें काय ? "

" नाहीं महाराज, परंतु या गोष्टीला तुम्ही काय उत्तर द्याल ? "

" हे राजा, मी स्वतः लहान अर्भक, हातपाय हालविणारें मूल होतों व आता मोठा मनुष्य आहें. एकाच शरीरामध्यें हीं सर्व एकत्र एकत्वानें वास करीत आहेत."

"याला दृष्टांत सांगा."

" हे राजा, जर एखाद्या मनुष्यानें दिवा लावला तर तो सर्व रात्र जळेल किंवा नाहीं ? "

" होय तो जळेल."

" तर मग हे राजा. रात्रीच्या पहिल्या प्रहरातील ज्योत आणि दुसऱ्या प्रहरातील ज्योत, या एकच असतील काय ? "

" नाहीं महाराज."

' तर मग हे राजा, रात्रीच्या पहिल्या प्रहरातील दिवा निराळा आणि शेवटच्या प्रहरातील दिवा निराळा असें असूं शकेल काय ? "

" नाही. महाराज एकाच गोष्टीमुळें दिव्याचा सर्व रात्रभर प्रकाश पडत होता "

" त्याप्रमाणेंच हे राजा, अशाच रीतीनें क्रियांची परंपरा अस्तित्वांत येते. जो उत्पन्न होतो तो निराळा, जो नाहीसा होतो तो निराळा; परंतु त्या दोहोंचा संबंध जोडणारें असें कांहीं तरी एक आहे आणि त्यामुळें मनुष्य जेव्हां अखेरीस निर्वाणामध्यें विलीन होतो तेव्हां तो तोच नसतो किंवा निराळाहि नसतो "

जरी चिरकालीन आत्म्याचें अस्तित्व नसतें तरी मुद्दां मनुष्याला त्याच्या कर्माचें फल मिळतें. या गोष्टीच्या स्पष्टीकरणार्थ या ठिकाणीं एक दृष्टांतांची मालिकाच दिली आहे. त्यांपैकीं एक दृष्टांत दिला आहे.

" एका मनुष्यानें दुसऱ्याचे आंबे चोरले आहेत, अशी गोष्ट घ्या. आंब्यांच्या मालकानें त्या मनुष्यास धरून राजापुढें नेलें आणि म्हटलें कीं, महाराज, यानें माझे आंबे चोरले आहेत. आतां जर तो चोर म्हणूं लागला कीं, महाराज, मी या मनुष्याचे आंबे चोरले नाहींत त्यानें जे आंबे लाविले ते निराळे होते व मी जे नेले ते निराळेच होते. तेव्हां मला शिक्षा करणें योग्य नाहीं, तर मग हे राजा, या मनुष्याला शिक्षा मिळेल काय ? "

" होय, महाराज त्याला शिक्षा मिळाली पाहिजे."

" कां बरें ? "

" तो मनुष्य कांहींहि म्हणाला, तरी त्यानें जे आंबे नेले, त्याबद्दल त्याला शिक्षा मिळाली पाहिजे. कारण पहिले आंबे जर नसते तर हे आंबे अस्तित्वातच आले नसते."

यापुढें राजानें नागसेनाला प्रश्न विचारिला कीं, सर्व दुःखांचा शेवट केवळ या जन्मींच संसारत्याग केल्यानें होत नाहीं, तर पूर्वजन्मींहि त्याकरितां प्रयत्न करणें अवश्य आहे, असें आपण म्हणतां हें कसें ? तेव्हां नागसेनानें राजास पुढील प्रश्नांत उत्तर दिलें आहे "तूं तहान लागल्यानंतरच विहीर खोदण्यास आरंभ करशील काय ? अथवा भूक लागल्यावरच तूं नांगरणी, पेरणी, कापणी यांचें शिक्षण घेशील काय ? अथवा शत्रु दरवाजाजवळ येऊन उभा राहिल्यावर तूं खंदक खोदण्यास, तट उभारण्यास व किल्ले बांधण्यास सुरुवात करशील काय ? "

*ख्रि स्ती.*—जुन्या करारांत मानवी रचनेमध्यें द्वैत कल्पिलें नाहीं. देह आणि आत्मा यांच्यांत मुळींच विरोध नाहीं इतकेंच नव्हे, तर त्या शास्त्रांत देहाला वेगळा असा शब्द मुळींच सांपडत नाहीं मनुष्य घटकद्वयानें बनला आहे. एक घटक म्हणजे निश्वास—आत्मा व दुसरा, त्यानें अचेतन केलेल्या शारीरिक इंद्रियांचें जाळें. हे दोन घटक वेगवेगळे केले तर मनुष्यच जागेवर उरत नाहीं नव्या करारांत हीच कल्पना आधाराला घेतली आहे व मृत्यूनंतरहि मानवी तत्त्व शिल्लक राहतें हा नवा सिद्धांत तिला जोडला आहे. याशिवाय पवित्र आत्म्याचें तत्त्व ख्रिस्ती संप्रदायांत शिरून आत्म्याचें ईश्वराशी नातें जोडण्यांत आलें. आत्म्याच्या रणभूमीवर पापरूपी दैत्याशीं पवित्र आत्मा लढतो व विजयी होतो ही कल्पना सेंटपालनें प्रसृत केली.

ज्यू वातावरणांतून निघून रोमन साम्राज्यभूमीवर जेव्हां ख्रिस्तीसंप्रदायानें पाय ठेवला तेव्हां आत्म्याविषयींच्या हिब्रू कल्पनेला नवीन ग्रीक वळण लागलें आत्मा ही विश्वांतील एक सृष्टवस्तु असून विश्वसंकल्पित साध्याचें तें एक साधन आहे, असें ग्रीक पंडित मानीत. ही ग्रीक कल्पना उघडपणें मूळच्या ख्रिस्ती कल्पनेच्या विरुद्ध होती. तथापि आत्म्याची ग्रीक कल्पना उचलतांना ख्रिस्त्यांनीं मृतदेह पुनरुत्थापित होतो ही मूळची ज्यू कल्पना टाकिली नाहीं हें विशेष आहे.

रेनायसन्स आणि रेफॉर्मेशन यापुढील काळीं आत्मतत्त्वाविषयीं अनेक प्रकारचे शोध झाले त्या सर्वांत आत्म्याचें धार्मिक महत्त्व ख्रिस्ती लोकांना पटलेलें दिसतें

आजच्या भारतीयांत आत्मा म्हणजे जीव समजतात. यूरोपीयांत जीवाशिवाय सोल म्हणून कांहीं चीज आहे असें म्हणणाऱ्या लोकांचे विचार अस्पष्ट आहेत. (संदर्भग्रंथ—सर्व देशांतील धार्मिक व तात्त्विक वाङ्मय).

**आत्मानंद**—ऋग्वेदसंहितेंतील १·१६४ वें '*अस्य वामस्य*' या शब्दांनीं सुरू होणारें जे सूक्त त्याला अस्यवामीय सूक्त म्हणतात हें सूक्त मोठें गूढ व अध्यात्मपर दिसतें. या सूक्तावर आत्मानंदानें एक संस्कृत भाष्य लिहिलें आहे

**आत्माराम**—या नांवाचे तीन संस्कृत टीका-ग्रंथकार होऊन गेले, त्यांपैकीं एक जयकृष्णभट्टाचा मुलगा (आफ्रेक्ट)

**आत्माराम स्वामी**—हे रंगनाथ स्वामीचे धाकटे बंधु हे निजामहैद्राबादेस नोकर होते यांचें मूळ नांव विठ्ठल. यांनीं केलेल्या पदांच्या शेवटीं यांचे बंधु रंगनाथ यांचेंच नांव यांनीं घातल्यानें यांचीं पदें कोणतीं हें ओळखणें अशक्य झालें आहे समाधि शक १६२६,सं. पार्थिव, श्रावण वद्य ८. आत्माराम नांवाचे तीन संतकवी चांदोरकरांनीं दिले आहेत पण त्याच म्हणणें अद्याप ग्राह्य धरतां येत नाहीं.

ग्रं थ —नारद चरित्र, नारदाची लावणी, रामदास स्वामीचरित्र. पदें (स. क अ सू.)

**आंत्रपद्धति**—मुखापासून गुदद्वारापर्यंत पंचवीस तीस फूट लांबीच्या अन्नमार्गानें आपण खाल्लेलें अन्न पचन पावून मलरूपानें बाहेर पडतें. यांपैकीं मुख, अन्ननलिका व जठर हे वगळले असतां जो वीस ते पंचवीस फूट लांबीचा नलाकृति अन्नमार्ग त्यास आंतडीं म्हणतात. यांतच ठिकठिकाणीं यकृत्पिंड, स्वादुप्यंक्रियापिंड यांतून स्रवणारे अन्नपाचक रस नलिकामार्गें येऊन अन्नपचन करतात. आतड्याची रचना आंतील बाजूस श्लेष्मल त्वचेची असून त्याच्या बाहेर स्नायूंचीं बनलेलीं तीन वेष्टणें असतात. व त्यामुळें आपोआप मल पुढें ढकलला जातो. सर्व वेष्टनांबाहेर ओमावरणाचें वेष्टण असतें आतड्याचें लघुआंत्र

किंवा आंत्रक आणि महदांत्र असे आकारमानाप्रमाणें दोन स्थूल भाग असून यांपैकी प्रत्येकाचे तीन उपविभाग आहेत ते असे —(१) सुमारें बारा बोटें लांबीचें द्वादशांगुल्यांत्र हें इंग्रजी 'सी' या अक्षरासारखें पण लांबट असतें. या अक्षरामध्यें जो पोकळ भाग आहे तेथें स्वादुपिंड असतो व शेजारीं पित्ताशय, मूत्रपिंड वगैरे महत्त्वाचीं इंद्रियें असतात (२-३) पुढें उरलेल्या भागापैकीं दोन पंचमांश भागास 'जेजुनम' व तीनपंचमांश भागास 'इलियम' हीं नावें आहेत यांतील विशेष हा आहे कीं यांत मनस्वी, वळकट्या असून सूक्ष्मदर्शकयंत्राच्या साह्यानेंच व्यक्त होणारे अन्नरसशोषण करणाऱ्या असंख्य नळ्या येथें असतात व हा भाग हलू नये म्हणून पाठीच्या कण्यास बंधनांनीं जखडलेला असतो.

यापुढें महदांत्र लागतें यांपैकीं (१) पहिल्या भागास 'सीकम' म्हणतात याचा आकार३-४ इंच लांबीच्या फुगीर पिशवीसारखा असतो यांत आंत्रनलिकानामक गर्भावस्थेंतील अवयवाची जंताच्याआकृतीची पोकळ नळी असते, व तिच्या दाहामुळें आंत्रनलिकादाह नामक रोग होतो. या आंतड्यांत दोन पडदे अशा रीतीनें बसविले असतात कीं, वरील मळ पुढील आंतड्यांत ढकलला मात्र जावा परंतु तो उलट मार्गें जाऊं नये. (२) दुसऱ्या उपभागास 'कोलन' म्हणतात व त्याचे उभा, आडवा व उतरता असे तीन भाग आहेत व सर्वांची एकंदर लांबी अडीच ते तीन फूट भरेल. बहुतेक अन्नरसपचन व शोषण पूर्वींच होऊन गेल्यामुळें अवशेष जो मळ त्यास शरीराबाहेर पडण्यास लायक असें घट्ट स्वरूप येथें प्राप्त होतें. (३) माकडहाडापासून दीड वीत लांबीचें 'गुदांत्र' असतें. गुदांत्राचे नळीपुढें 'मूत्राशय' असतो व शिवाय या गुदांत्राच्या मागें स्त्रियांमध्यें आंत्रावरणानें बनलेली एक गर्भाशयापुढें असणारी पोकळी असते हे सर्व आंतड्याचे भाग आंत्रावरण नामक सर्वसाधारण वेष्टनानें जठरांतील सर्व इतर इंद्रियांप्रमाणें आच्छादिलेले असतात व स्थानपरत्वें योग्य अशा बंधनांनीं उदरांतील पृष्ठभागास व पाठीच्या कण्यास जखडलेले असल्यामुळें ते इजेपासून प्रायः निर्धोक असतात तथापि आंतड्यांतील घाण (पू) आंतडें फुटून बाहेर पडल्यास आंत्रावरण हें आच्छादन निरोगी अवस्थेंत जितकें आच्छादनास उपयोगीं पडतें तितकेंच तें अशा रुग्णावस्थेमध्यें रोगप्रसार करण्यास कारण होतें बहुतेक अन्नशोषण लहान आंतड्यांत झालें तरी सर्व महदांत्रामध्यें अन्नशोषण करणारे एकटे दुकटे पिंड ठिकठिकाणीं असतात व म्हणून रोगी बेभान असल्यास गुदद्वारा वाटें दूध, पातळ अन्न, वगैरे घालून कित्येक दिवस अगर आठवडे त्यास जगविता येतें. आमातिसार, विषमज्वर या रोगांत हे एकटे दुकटे पिंड विकृत होऊन दाहावस्थेंत असतात

**आंत्रावरोध** –आंतड्यांतील मळ ज्या रोगांत पुढें आपोआप नेहमींप्रमाणें ढकलला जात नाहीं, त्यास हें नांव असून त्याच्या निवृत्तीसाठीं शस्त्रवैद्याची मदत बहुधा घ्यावी लागते या रोगाचीं अनेक कारणें आहेत. त्यांपैकीं आंत्रग्रीवानिरोध झालेला अंतर्गळ हें कारणांपैकीं एक मुख्य असतें व त्यामुळें आंतडें कुजू लागून मलोत्सर्जन न झाल्यामुळें रक्तामध्यें विषशोषण होऊन मनुष्य मरतो. याचे 'तीव्र' आणि 'दीर्घकालीन' असे दोन मुख्य भेद असून त्यांपैकीं तीव्र भेदाचीं कारणें, लक्षणें व इतर विशेष माहिती पुढें दिली आहे यापक्षां विशेष माहितीसाठीं उदरांतील शरीररचनेचें चांगलें ज्ञान अगोदर वाचकास पाहिजे म्हणून संक्षिप्त वर्णन फक्त पुढें दिलें आहे

**रोगाचीं कारणें**—(१)आंतडें उदरांतील एखाद्या छिद्रांतून सरकल्यामुळें आंतड्याचें कसेंबसें पडेल इतका दाब पडतो अथवा दाब आंतडें उदरांतील अन्य भागास चिकटल्यामुळें अगर बंधनाच्यायोगें बद्ध झाल्यामुळें असून आंत्रावरोध होतो. कारण आंतड्याच्या वेटोळ्यास बाध पडल्यामुळें त्यांतील मळ पुढें जाऊं शकत नाहीं या प्रकारच्या रोगाचीं लक्षणें एकाएकीं होऊं लागतात रोग्यास एकाएकीं पोटांत भयंकर वेदना येऊं लागतात व त्याबरोबर लवकरच त्याची अत्यंत निःशक्तता दिसूं लागते. ज्या ठिकाणीं वेदना होते, तेथेंच रोग असतो असा नियम नसतो कारण वेदना बहुधा बेंबीच्या आसपास असते वांति एकसारखी आरंभापासून सुरू असून दुसऱ्या ते नवव्या दिवसाच्या दरम्यान त्या वांतीस नरकाप्रमाणें दुर्गंधि येते पोटांत रोगाची फुगीर गांठ दिसत नाहीं, शौचास मुळींच होत नाहीं प्रथम हातास पोट मऊ लागतें, पण रोगनिवारण न झाल्यास आंत्रावरणदाह या रोगाचा आरंभ होऊन त्यामुळें पोटास स्पर्शहि सहन न होऊं देण्याइतकी वेदना सुरू होते अशा रोग्याला पूर्वी आंत्रावरणरोग बहुधा झालेला असतो शस्त्रक्रियेनें रोगी बरा केला नाहीं तर तो पांचव्यापासून सातव्या दिवसाच्या आंत मरण पावतो कारण त्याचा अतिशय शक्तिपात होतो किंवा आंत्रावरणरोगामुळें रक्तांत विषशोषण होऊन त्यामुळें रोगी मृत्यु पावतो (२) आंतड्यास पीळ पडणें हें एक कारण या रोगाचें हें दुसरें आहे व तें आंतडें स्वतःच पिळवटलें गेल्यामुळें अगर एका आंतड्याचा दुसऱ्या आंतड्यास पीळ अगर वेढा पडल्यामुळें शक्य होतें डाव्या कटिप्रदेशाच्या पुढील भागीं बहुधा असें होतें, पण क्वचित्काळीं उजव्या बाजूसहि हा रोगप्रकार होतो रोग झाल्यास आंत्रावरणदाह होऊन चिकट स्त्रावामुळें तें आंतडें चिकटतें व त्यास पोषण करणारा रक्ताचा पुरवठा रक्तवाहिन्यांतील अभिसरण बंद होऊन नाहींसा होतो पुष्कळ दिवसांत शौचास मुळींच झालें नाहीं ही माहिती रोग्याकडून मिळते वरील प्रकारच्या रोगप्रकाराप्रमाणेंच याहि रोगप्रकाराचीं लक्षणें एकाएकीं सुरू होतात परंतु वेदना मात्र अगदीं एकसारखी नसते मात्र तीस सुरुवात फार लवकर होते व शौचक्रिया अगदीं निखालस बंद होते

पोटास वाताची फुगवटी फार व अतित्वरित येऊन त्यामुळें रोगी घाबरा होतो. प्रथम रोगमध्ये एकाच ठिकाणी असते. शस्त्रक्रियेनें रोग बरा न केल्यास मृत्यु लवकर आल्यावाचून टळत नाहीं (३) आतड्यात आगंतुक पदार्थ अडकणें हें एक या रोगाचें तिसरें कारण आहे. कधीं कधीं आतड्यांत पित्ताचा खडा अडकून त्यावर बोट असून या पित्त शरीरच्या अडचणीमुळें मळाच्या गतीस अंशतः अवरोध होतो. रोगलक्षणांना आरंभ पाटशूळ व वांति यांमुळें होतो व वांतीस लवकरच नरकप्राय दुर्गंधि येते. पोट मऊ लागतें पण हाताने नळामध्यें अडथळा कोठें आहे हें बहुधा समजत नाहीं. इतर लक्षणात रोगाच्या स्थानाप्रमाणें पुष्कळ वैचित्र्य असतें. परंतु जितका रोग गुदाच्या जवळ असेल तितकीं लक्षणें तीव्रतर असतात. चुकून मोठा पदार्थ गिळल्यास तोहि अडथळा करूं शकतो. परंतु गारोडी लोक चाकू, गारगोटीचे दगड, नाणी, चिलीम इत्यादि पदार्थ गिळून ते सरासरीच गुदद्वारावाटे बाहेर पाडतात. असले पदार्थ अडलेच तर ते बारावोटी आकडें आतडे व सीकम या आतड्यात बहुधा अडकतात व त्यामुळें पीडा कित्येक आठवड्यांनी अगर महिन्यांनीहि होऊं लागते व झाली तरी ती काहीं दिवस टिकते; नंतर कांहीं काळ आराम वाटल्यानंतर पुन्हा पीडा होऊं लागते अशीच टाचण्याचा पुंजका अगर ७०० खारकाच्या बियांचा पुंजका आतड्यात अडकलेले खरे नमुने विलायतेतील आतुरालयपदार्थसंग्रहालयात आहेत. 'क्ष' किरणाचा शोध लागल्यापासून अशा आगंतुक पदार्थांचें निदान बरोबर करण्यास बरेंच सुलभ पडूं लागलें आहे. आतड्यात पित्ताश्मरी अगर दुसऱ्या प्रकारचा खडा प्रथम लहान असून त्यावर मळ, आम, न पचलेले पदार्थ इत्यादिकांचीं पुटें व थर बसून त्याचा आकार वाढल्यामुळें तो पुढें मळाच्या गतीस पूर्ण अवरोध करतो. कृश मनुष्याच्या आतड्यातील पदार्थांचें निदान पोट चाचपून करिता येतें. (४) आतड्यामध्यें दुमड पडणें हें अवरोधित अंतर्गळाच्या खालोखाल प्रमुख कारण आहे ज्या लहान मुलांना अशा प्रकारचा रोग होतो त्यापैकीं निम्या मुलांना हा रोग बहुधा दहा वर्षांच्या आतील वयांत होतो व यांतील निम्या मुलांना एक वर्षाच्या आत म्हणजे अगदी शैशवावस्थेंत तो होतो व त्यात मुलींपेक्षा मुलांचें प्रमाण अधिक असतें. आतड्यासारख्या पोकळ नळीचा वरील भाग खालच्या भागामध्यें बळें घुसविला असता आतड्यास घडया पडून एकेबाजूस तीन पदरी व दुसऱ्या बाजूस तशाच दुमडलेली घडी पडते. निवळ यामुळें इजा झालेली नसते पण आतड्याचा भाग जो खालील भागात घुसतो त्या वरोवर आंत्रफलावरणनामक जाड पडदाहि घुसला गेल्यामुळें त्यातील रक्ताभिसरणक्रियेस प्रथम त्या दाबामुळें प्रतिबंध होतो व मागाहून तर ती क्रिया त्या दाबामुळें मंद पडते. व आत्र कुजण्याची अगर फुटण्याची भीति असते. 'आंत्रावरणदाह' रोगास आरंभ होतोच व त्यामुळें चिकट लस स्रवून त्या लसीमुळें वरील एकांत एक आतडें घुसून उत्पन्न झालेले आतड्याचे पदर एकमेकांस चिकटतात व ते पदर सोडविणें उत्तरोत्तर कठिण होतें. क्वचित् हें घुसणें आपोआप नीट होतें अगर त्यामुळें फक्त आतड्याचा मार्ग आकुंचित होऊन मळाच्या गतीस आडथळा होत नाहीं; पण वर सांगितल्याप्रमाणें तें कुजल्यास त्यास छिद्र पडून फुटतें. तें न फुटलें तर क्वचित्प्रसंगी कुजलेला भाग तुकडे होऊन गुदद्वारावाटे पडून जातो व आतड्याच्या खालील आणि वरील भाग आपोआप सांधतात. आतडें दुमडण्याचीं कारणें मळ पुढें ढकलणाऱ्या आतड्याची क्रिया कोणत्याहि कारणामुळें फाजील जोरानें होणें, व आतड्यांत होणाऱ्या लघुप्रीवामयांचा अंताचा किंवा दाहोत्पादक न पचलेल्या अन्नाचा समूह,हीं होत. काहींचें मत सीकम नामक आतड्याचा भाग लहानमुलांमध्यें सुटा फिरता असतो व मोठ्या माणसात तो पुढें बद्ध होतो, म्हणून सीकम या आतड्याची अबद्धस्थिति हें एक मोठें कारण आहे. या रोगाचे स्थानपरत्वें भेद असून तीव्र व दीर्घकालीन हे ते भेद होत. तीव्र भेद फार करून मुलांमध्यें बराच पाहण्यांत येतो प्रथम राहून राहून व नंतर एकसारखी पोटात कळ, मुरडा होऊन रक्त व आव पडून अतिसार होणें, हीं मुख्य लक्षणें होत. पूर्वी सांगितलेल्या रोगकारणामुळें जितका वांतीस लवकर आरंभ होतो तितका यामध्यें होत नाहीं. शौचाच्या वेळीं फार कुंथावें लागते व नंतर पूर्ण शक्तिपातास आरंभ होतो, बहुतेक रोग्यांना पोटास फुगवटी येते व रोगाची गाठ काहींजणामध्यें पोट चाचपून हातास लागते व काहींजणाच्या गुदद्वारांशीं ती दिसते अगर हातास लागते. दीर्घकालीन भेद मोठ्या माणसामध्यें आढळतो; लक्षणें एकसारखीं चालू नसतात; रोगनिदान बरोबर होण्यास अडचण पडते, कारण जुनाट संग्रहणीप्रमाणें लक्षणें असतात. शेवटीं रोगाचें तीव्र स्वरूप एकाएकीं प्रगट होऊन रोग्यास जुलाब, वांति व रक्तातिसार होऊन शक्तिपातामुळें रोगी मरण पावतो तेव्हा हा रोग असावा असें वैद्यास वळतें. (५) वरील रोगकारण व आगंतुक पदार्थादि कारणें दीर्घकाल टिकणाऱ्या स्वरूपात आढळतात.पण वर सांगितल्याप्रमाणें कधीं त्यास तीव्ररूप प्राप्त होऊन रोगी मरतो. (६) पूर्वीच्या रोगामुळें उत्पन्न झालेल्या एखाद्या बंधनाचा वेढा आतड्यास पडून त्यामुळें अकस्मात मळाच्या गतीस निरोध होतो.(७) उपजतच आतड्याची रचना आंत्रावरोधास अनुकूल असणें हेंहि एक मोठें कारण आहे. भाकड्या आतड्यास छिद्र नसून मोठ्या आतड्याशीं त्याचा संबंध नाहीं असा प्रकार आढळतो.आतड्याची पोकळीउपजतच अरुंद असल्यामुळें त्यात मळाची गाठ अगर फळाच्या बियासारखे पदार्थ अडकेपर्यंत हा रोग कळत येत नाहीं.उपकडेच्या

मुलास गुदद्वाराचें छिद्र कधीं कधीं नसतें. पण तें लवकर लक्षात येतें.

उपचार.—यास योग्य उपचार होण्यास त्याचें निदान लवकर होऊन शस्त्रक्रिया जितकी अगोदर होईल तितकी इष्ट आहे. कुजलेल्या आतड्याच्या विशोषणास आरंभ झालेल्या रोग्यावर शस्त्रक्रिया करणें म्हणजे ती फार उशीरा होय. रेचकामुळें उपयोग होत नाहींच पण अपाय मात्र खास होतो. या प्रकारच्या शस्त्रक्रिया करण्यात वाकबगार असलेले सर फ्रेडरिक ट्रीव्हस् यांच्या मतें पोट चोळणें व हस्तसंकेतानें रोगग्रंथि वरी करणें, हे एकेकाळीं प्रचलित असलेले उपाय सध्या निरुपयोगी ठरले आहेत, कारण अगदीं मृतप्रायस्थितींत असलेलें आतडें फुटेल न फुटेल अशा सशयित स्थितींत असल्यास या उपायांनीं तें खास फुटतें. मात्र शस्त्रक्रिया लांबणीवर टाकण्यास अगर तीस मुळींच फाटा देण्यासाठीं कांहींतरी सबब हवी असल्यास हें निमित्त उपयोगी पडतें. शस्त्रक्रियेमध्यें फुगलेलें आतडें कापून त्यांतील घाण वाहून टाकणें व जो अडथळा असेल तोहि काढणें हीं कार्यें करावयाचीं असतात. या रोगाचे दीर्घकालीन भेद असतात त्यांचीं संक्षिप्त कारणें व इतर माहिती पुढें दिली आहे.

रोगाचे भेद.—(१) आगंतुक पदार्थ अगर मळाच्या मोठ्या गाठी आतड्यात अडकून बसणें. याचें दुसरें कारण बद्धकोष्ठाची खोडी असलेल्या वृद्ध स्त्रियात आढळून येतें व त्यामुळें पोट चाचपून हातास लागेल येवढी, कणकेच्या गोळ्याप्रमाणें मऊ व कांहीं भागीं कठीण अशी गाठ लागते. इतका मळ मोठ्या आतड्यात मारण्याचें कारण मूळव्याध, गुदभ्रंग व यासारखे दुःखदायक रोग असल्यामुळें व मळविसर्जनाच्या कामीं उदराच्या स्नायूंमध्यें स्वाभाविक अगर मागाहून आलेली दुर्बलता हें होय. रोग प्रगट होण्यापूर्वी कांहीं काळ रोग्यास बरं वाटेनासें होऊन जिभेस बुरशी, मुखास दुर्गंधि व मलसंचयविषरोपणामुळें थोडा ज्वर हीं लक्षणें होतात. ही स्थिति सुधारण्यासाठीं पोटात क्यालोमेल हें औषध बेलाडोनाशीं मिश्र करून डाक्टरी सल्ल्यानें घ्यावें व पुष्कळ पाण्याचा बस्ति देत जावा. गाठी फार मोठ्या असल्यास चमच्यासारख्या शस्त्रानें त्याचे तुकडे करतात. (२) आतड्याची पोकळी क्यान्सर व इतर प्रकारच्या रोगग्रंथींमुळें अरुंद होणें, अगर पूर्वी अंतरावरण झाल्यामुळें ती कांहीं जागीं चिकटून अरुंद होणें किंवा आत्ररक्तवाहिन्यावरणातील रसग्रंथींत रोग होऊन त्यामुळें आतड्यास वेढा पडून पोकळी अरुंद होणें या रोगास आत्राघात म्हणतात, व ती शस्त्रक्रियेनें सुधारण्यासाठीं विकृत आत त्याशेजारीं चांगलें आतडें आणून त्याचा जोड करून वरील मळाचा प्रवाह पुढें सरेल असें करितात. आत्रघात होण्यास आमातिसार व क्षयजंतुजन्यातिसार हींहि कारणें असतात. साधल्यास क्यान्सर व इतर रोगग्रंथींहि त्यावेळीं कापून काढतात. क्यान्सर रोग मध्यम व उतार वयाच्या माणसांना होतो व त्याची लक्षणें फारच सावकाशपणें प्रगट होतात. (३) आतड्यास जुनाट दुमड असणें हें एक कारण आहे व तें लवकर न ओळखता आल्यामुळें क्यान्सर रोग, क्षयजंतुजन्य आत्रावरणदाह अगर गुदातील पोकळीच्या आकाराचा ग्रंथिरोग यांपैकीं रोग असल्याचा संदेह पडतो. शस्त्रवैद्यास साधेल तर त्यानें त्या आतड्यात पपानें वारा भरून दुमडलेली घडी सोडवावी. पण त्या घड्या प्रायः चिकटलेल्या असल्यामुळें उदर चिरून तो रोग कापून काढणें हें योग्य आहे व अशा शस्त्रक्रिया यशस्वी झाल्याची बरीच माहिती आहे. (४) एखाद्या बाह्यग्रंथिरोगाचा अगर बंधनाचा दाब बसून मळाची गति कुंठित होते अशीं उदाहरणें कधीं कधीं पहाण्यात येतात. त्यावेळीं रोगनिदानासाठीं उदर चिरून रोगस्थिति जशी आढळेल त्याप्रमाणें ती दाब पाडणारी गाठ कापणें अगर आतड्याची चिकटलेली स्थिति दुरुस्त करणें या शस्त्रक्रिया त्यावेळीं उरकून घ्याव्या. जर पूर्वीच्या आत्रावरणदाहरोगामुळें आतड्याची एकमेकांत फारच गुंतागुंत झाली असेल तर रोगट भाग वगळून वरील आतड्याचा खालील आतड्याशीं संबंध जोडता येतो व या शस्त्रक्रियेमुळें मळाच्या प्रगतीस येणारा अडथळा दूर होतो. आतड्याच्या रचनेमध्यें मळ पुढें ढकलण्यास समर्थ असा व आतड्याचें आकुंचन करणारा मासल थर असतो, त्यात स्तंभत्व अगर शैथिल्य येऊन मळाची गति कांहीं रोग्याची बंद होते असें म्हणतात. पण त्याविषयीं वाद चालू आहेत.

आत्रेय.—सं. चि; प. भा. ८९.० आत्रेय ( यिट्रिअम ) हें रासायनिक धातु-मूलतत्त्व आहे. याचें आणि श्रीक ( सिरियम ); निभृत ( लायान्थम ) द्विक ( डायडिमियम ) आणि अर्ब ( अर्बिअम ) या मूलतत्त्वांशीं पुष्कळ साधर्म्य असून सृष्टींत याचें साहचर्यात हें आढळतें. आत्रेयक्षार तयार करण्यास उत्तम मूलद्रव्य म्हटलें म्हणजे "गादोलिनाईट" हें खनिज होय. या खनिजात कुनिगच्या मताप्रमाणें खालीं लिहिल्याप्रमाणें घटक असतातः—

सिकता = २२. ६१० ०/० यित्रिआ ( यि$_2$ प्र$_3$ ) = ३४.६४० ०/० अर्ब (अर्बियम), श्रीक, द्विक, निभृत, लोह, वदुर, खट, मग्न, आणि सिंधु यांचे प्राणिद = ४२.७५ ०/०

सर्व दुर्मिळ मृत्तिकाधातूंप्रमाणें याचें निस्कासन करणें फार कठिण आहे. कृष्णवर्ण, करड्या रंगाचा रजोरूप आत्रेय धातु असतो तो हरिदाचे पालाशधातूनें संक्षीकरण केलें असतां निघतो किंवा आत्रेय व सिंधु यांच्या द्रुत हरिदाचें विद्युत् पृथक्करण करावें. आत्रेय धातु थंड पाण्याचें सावकाश पृथक्करण करतो, परंतु उष्ण पाण्याचें मात्र तात्काळ करतो. आत्रेय प्राणिद ( यित्रिआ यि$_2$ प्र$_3$ ) पिंवळसर पांढऱ्या रंगाच्या चूर्ण रूपात असतो, अत्युष्णमानावर याच्यापासून पांढरा शुभ्र अतितेजस्वी प्रकाश निघतो. आत्रेय सावकाश पण पूर्णपणें खनिजाम्लात विद्राव्य असतो. विद्युत्स्फुलिंगाच्या योगानें याच्या विद्युद्दर्शीकरणावरून हा ओळखता येतो.

आग्नेयक्षाराचें कार्य कारकपरीक्षकांवर जरकासारखें असतें. आग्नेयाचा परमाणुभारांक ह्रॉफ्ट यानें निश्चित केला आहे.

**आग्नेय.**—यज्ञामध्यें प्रेक्षकामधील अग्रपूजेचा अधिकारी आग्नेय या नावानें बोधिला जातो ( वेदविद्या पृ. २१२ पहा).

**आदमखान.**—( १५६१ )याचें मूळ नाव अधमखान असें होतें म्हणणें आहे. हा हुमायूनचा दासीपुत्र असावा असें म्हणतात. अकबराची दाई (अनगा) माहूम ही हुशार व खटपटी बाई होती. हरएक कारभारांत ढवळाढवळ करण्याची तिला हौस असे.ती स्वभावानेंहि दुष्ट होती.बाहिराम खानास काढून टाकण्यांत हिचें अंग होतें असें दिसतें. आपला मुलगा आदमखान यास योग्यतेस चढविण्यासाठीं तिनें नाहीं नाहीं त्या खटपटी केल्या. बाझबहादुर(प्रख्यात हिंदी कवियित्री राणी रूपमती हिचा पति ) म्हणून एक पठाण सरदार माळवा प्रांतांतील काहीं भाग बळकावून तेथील बादशहा बनला होता. त्याजवर अकबरानें हा आदमखानास पाठविलें. आदमखान हा अकबराचा विश्वासू कामदार होता. त्यानें बाझबहादुरचा पराजय करून त्याचा सर्व मुलूख काबीज केला. तेव्हां बाझबहादुर बऱ्हाणपुराकडे पळून गेला. पुढें आदमखानानें बहादुरच्या राज्यांत अधमपणाचें वर्तन चालविलें. सर्व लूट त्यानें स्वतःकडे ठेविली आणि बाझबहादुरचा जनानखानाहि आपल्याजवळ अडकवून ठेविला. त्यांत बाझबहादुरची एक सुंदर स्त्री होती. (ही रूपमतीच असावी) तिचा अभिलाष धरून आदमखानानें तिच्या भेटीस जाण्याची वेळ नेमिली. तिला नाहीं म्हणतां येईना. ती सुंदर पोशाख करून आदमखान येण्याच्या वेळेस पलंगावर निजून राहिली. खान आल्यावर पाहतो तों ती मेलेली दिसली. आदमखानाकडून अप्रतिष्ठा न व्हावी म्हणून त्या पातिव्रतेनें विष खाऊन आत्महत्या केली होती. बाझबहादुरच्या दुसऱ्या पुष्कळ स्त्रिया जनानखान्यांत होत्या. त्या अकबरास चढाव्या लागतील म्हणून माहूम अनगेनें सर्वांस ठार मारविलें. आदमखानानें हें अधिकाराबाहेर जें काम केलें तें अकबरास आवडलें नाहीं. तो एकदम फौज घेऊन आग्र्याहून आला, आणि आदमखानास बरोबर घेऊन परत गेला. पुढें त्याजपासून सर्व लूट परत घेऊन त्यास कामावरून काढिलें, आणि त्याच्या जागीं आपला गुरु पीरमहंमदखान यास नेमिलें. स्वतः बादशहा आपणावर रागावला आहे असें आदमखानास वाटलें नाहीं. महंमदखान उर्फ शम्सुद्दीन नावाचा एक अकबराचा वजीर (व त्याच्या एका आवडत्या दाईचा नवरा) होता. बहिरामखानाचा बंदोबस्त करण्यांत त्यानेंच पुढाकार घेतला असून माहूम अनगेचें प्रस्थहि यानेंच मोडिलें म्हणून आदमखानाचा त्याजवर डोळा होता. तेव्हां हाच आपला नाश करूं पाहत आहे, असें समजून वजीर वाड्यांत काम करीत बसला असतां त्याजकडे जाऊन त्याचा आदमनें प्राण घेतला ( मे १५६२ ) हें वर्तमान ऐकून अकबर त्या ठिकाणीं आला, आदमखान त्याच गच्चीवर दिसला. अकबराचा हात तलवारीकडे गेला, पण ताबडतोब आत्मसंयमन करून त्यानें आदमखानास गच्चीवरून खालीं लोटून देण्याचा हुकूम केला, तेणेंकरून त्याचा अंत झाला. अकबराचा चरित्रकार कर्नल मॅलेसन म्हणतो कीं, याप्रसंगीं आदमखानानें जनान्याचा आश्रय घेतला असताहि अकबरानें त्याचे राईराई एवढे तुकडे करून गच्चीवरून खंदकांत फेंकून दिले. मुलाच्या दुःखानें माहूम अनगा पुढें चाळीस दिवसांनीं मरण पावली. [ सरदेसाई —मु. रियासत बील—ओरिएंटल बायोग्राफिकल डिक्शनरी. इतिहाससंग्रह १. ७ मॅलेसन-अकबर]

**आदाम**—ख्रिस्ती संप्रदायदृष्ट्या हें जगांत प्रथम उत्पन्न केलेल्या माणसाचें नांव आहे. आदाम हा शब्द जातिवाचक आहे, म्हणजे यापासून मनुष्यजातीचा बोध होतो परंतु याचा उपयोग फार प्राचीन काळापासून विशेषनामासारखा केला जात आहे.

**आदामची उत्पत्ति.**—बायबलमध्यें दिलेली कथा अशी आहे कीं ईश्वरानें एकंदर विश्वोत्पत्ति सहा दिवसांत केली प्रारंभीं देवानें आकाश व पृथ्वी हीं उत्पन्न केलीं. प्रथम सर्वत्र अंधार पसरलेला होता व देवाचा आत्मा जलावर तरंगत होता. नंतर देवानें प्रकाश उत्पन्न केला ही पहिल्या दिवशींची कामगिरी होय. दुसऱ्या दिवशीं आकाश व जल निरनिराळें केलें, तिसऱ्या दिवशीं कोरडी जमीन व तीवर गवत,झाडें,झुडपें; चवथ्या दिवशीं नक्षत्रें, पांचव्या दिवशीं जीवजंतु व पक्षी, सहाव्या दिवशीं अनेक जातींचे वनपशू व ग्राम्यपशु,याप्रमाणें उत्पन्न केलें,व या सर्वांवर धनीपणा चालविणारें स्त्रीपुरुष असें एक जोडपें आपल्या प्रतिच्छायेपासून उत्पन्न केलें. भूमींतील मातीचा त्यानें मनुष्य करून त्याच्या नाकपुड्यांत प्राणवायु फुंकला या मनुष्याकरितां एदनांत एक सुंदर बाग देवानें केली, व या आद्यपुरुष आदाम याला सहकारिणी पाहिजे म्हणून त्याच्याच शरीराची एक फांसळी काढून त्यांत मांस भरून ईव्ह नावाची स्त्री निर्माण केली. हीं दोघें एदन येथील बागेंत प्रथम नग्नस्थितींतच राहूं लागलीं. या बागेंतील ज्ञानवृक्ष म्हणून जें झाड होतें त्याचें फळ खाऊं नका बाकी सर्व झाडांचीं फळें खा, असें देवानें त्यांना सांगितलें. पण एके दिवशीं एक सर्प तेथें येऊन त्यानें ईव्हचें मन वळवून त्या दोघांना ज्ञानवृक्षाचें फळ खाण्यास लावलें त्याबरोबर ज्ञान होऊन त्यांना नग्नस्थितींत राहण्याची लाज वाटूं लागली. तेव्हां त्यांनीं अंजिराचीं पानें शिवून स्वतःकरितां वस्त्रें केलीं. पण परमेश्वरानें ज्ञानवृक्षाचें फळ खाण्याच्या अपराधाबद्दल शाप देऊन त्या दोघांना त्या बागेंतून बाहेर हाकून लाविलें तेव्हांपासून मनुष्य मरणाधीन झाला आदाम-ईव्हला एबेल, केन आणि सेथ हे तीन मुलगे झाले. एबेलला केननें ठार मारलें केन व सेथ यांच्यापासून मानववंश विस्तारला.

या कथेचें थोडक्यांत परीक्षण म्हणजे असें:—( १ ) ही गोष्ट वाचली असतां असें सहज मनांत येतें कीं, या

कथेच्या लेखकास मानवी संस्कृतीचें व बौद्धिक उन्नतीचें फार भय वाटत असावें. (२) हिब्रू धर्मशास्त्रातली ही आदाम-कथा फार साधी व सरळ आहे (३) आदामास बोलता कसें येऊं लागलें? त्याग परीक्षणशक्ति व अंतर्ज्ञान कसें व कोठून प्राप्त झालें? सर्पानें आदामाचा नाश का केला व तो कोण होता? यासारख्या प्रश्नांचीं उत्तरें देणें कठिण पडतें. (४) कित्येक ग्रंथकारांनीं या कथेस रूपक मानून त्याचा अर्थ सांगण्याचा प्रयत्न केला आहे (५) ख्रिस्ती धर्मशास्त्रात फार क्वचित प्रसंगीं या कथेचा उल्लेख केलेला आहे. यावरून असें वाटतें कीं ही कथा हिब्रूलोकामध्यें दुसऱ्या कोणाकडून आली असावी.(६) या कथेच्या उगमा-बद्दल बराच मतभेद आहे. ही कथा खालीं लिहिलेल्या बाबीलोनी गोष्टींवरून कांहीं अंशीं रचली असावी असें वाटतें.

बेरोससमध्यें सांगितलेल्या बाबिलोनियातील बेल देवतेचा उपासक आणि बाबिलोनियन ज्योतिषशास्त्रावरील ग्रीक भाषांतर करणारा आपल्या ग्रंथात असें म्हणतो कीं, देवगणापैकीं एकानें "बेल" ऱ्या हुकुमानें वेलचें रक्त व चिखल एकत्र करून मनुष्यास उत्पन्न केलें

प्राचीन बाबिलोनमध्यें प्रचलित असलेली आदापाची गोष्ट.—तींत असें सांगितलें आहे कीं, देवानें आदामु किंवा आदापा यास उत्पन्न केलें, त्यास ज्ञानशक्ति दिली पण त्यास अमर केलें नाहीं. त्यास तसें होता आलें असतें पण स्वर्गीय बापाच्या लबाडीमुळें तो मर्त्य झाला.

एआबानीची गोष्ट.—यास आरुरु ह्या देवीनें चिखलातून उत्पन्न केलें. याचे केस लांब होते. हा फार कामुक होता. रानटी अवस्थेंतून एका वेश्येनें त्याची सुटका केली.

एटनाची गोष्ट.—एटना इष्टार देवीपासून वर मिळविण्याकरिता स्वर्गांत जाऊं लागला पण त्यास भीति वाटून तो पृथ्वीवर पडला. बायबलेतर ख्रिस्ती धर्मवाङ्मयात व ज्यू वाङ्मयात आदाम ही व्यक्ति जगदारंभीं कल्पिली आहे.

मुसुलमानांनीं आदामची कथा कांहीं फेरफार करून ख्रिस्ती धर्मग्रंथांतूनच घेतली आहे, शिवाय बऱ्याचशा हिब्रू-कथाहि आपल्याशा केल्या आहेत. त्यांच्या धर्मसंप्रदायात आदाम ही महत्त्वाची व्यक्ति दिसते. त्याला त्यांनीं आपल्यांतील दंतकथांनीं चांगलें सजविलें आहे.

आपल्या अष्टादशपुराणात समाविष्ट केलेल्या भविष्य पुराणात आदामची कथा आली आहे (प्रतिसर्गपर्व. अ.४), तींत विष्णूनें आपल्या मळापासून आदम व हव्यवती या आदिमानव जोडप्याला उत्पन्न केलें असें म्हटलें आहे.

**आदामचें शिखर**—"ॲडम्स पीक" हें इंग्रजी नांव पोर्तुगीजांपासून आलें आहे. कोलंबोपासून ४५ मैलांवर उ.अ. ६. ५५ व पू. रे. ८०. ३० या स्थळीं हें पर्वतशिखर आहे. त्याचें मूळ सिंहली नाव समनल आणि पाली समंतकूट किंवा "सुमनकूट" असें आहे. हा उंच डोंगर सिलोनमधील मध्यप्रदेशाच्या नैर्ऋत्येकडील कोंपऱ्यात सपाटीपासून एकदम वर ७४२० फूट चढलेला दिसतो. शिखरावरून दिसणारा देखावा जगांतील अत्युत्कृष्ट देखाव्यांपैकीं एक गणला जात असून फारच थोड्या पर्वतावरून (जरी ते यापेक्षा उंच असले तरी) असा समुद्र व भूमि यावरील अफाट देखावा दृष्टीस पडेल. इतकें आहे तरी हें शिखर सृष्टिसौंदर्याकरिता प्रसिद्ध नसून सुप्रसिद्ध यात्रेचें स्थान म्हणून चिरपरिचित आहे. त्यावरील एका खडकात माणसाच्या पायाच्या आकाराचा एक खळगा असून त्याची उपपत्ति निरनिराळे यात्रेकरू निरनिराळ्या प्रकारें लावितात. यात्रेकरूंचा मोठा संघ ह्या पावलाकडे मोठ्या भाविक बुद्धीनें पहात असलेला आढळतो. आपल्या शेजारच्या माणसाच्या मनात त्या पावलाबद्दल आपल्यापेक्षा निराळी भावना आहे असें समजून देखील त्याचें ध्यान ढळत नाहीं. उदाहरणार्थ बौद्धलोक तें बुद्धाचें पाऊल म्हणून समजतात, शैव शिवाचें समजतात, ख्रिस्ती सेंट थॉमसचें समजतात, तर मुसुलमान तें आदामचें पाऊल आहे असें मानतात. वरील निरनिराळ्या कल्पनाचा उगम कसा झाला हें सांगणें अवघड आहे. खरा उगम कोणता हें कोणचीच कल्पना गृहीत धरल्यानें कळणार नाहीं. किंबहुना बौद्धांची कल्पना, ह्मणजे जीविषयीं आपणाला जास्त माहिती आहे ती सुद्धा आपणास बुचकळ्यात पाडील या पावलासंबंधानें बौद्धाचा प्रथम उल्लेख इ. सनाच्या पाचव्या शतकाच्या पहिल्या चरणात बुद्धघोषानें बौद्ध विधि-नियमावर लिहिलेल्या "समंत पासादिका" नावाच्या भाष्यात आहे.

ऱ्हीस डेव्हिड्स् हा सीतावक जिल्ह्याशेजारीं मॅजिस्ट्रेट असताना त्यानें जी दंतकथा ऐकली ती अशी कीं, राजा वलगम बाहु (इ. स पूर्वी ८८ ते ७६) आपल्या कारकीर्दीच्या आरंभीं दक्षिणेकडील पर्वतांत हद्दपार होऊन राहिला असता त्याला हें पाऊल दिसलें. या कथेविषयीं वाङ्मयीन पुरावा मात्र आढळत नाहीं. पालीमध्यें मात्र 'समतकूट वण्णना' नावाचें एक काव्य आढळतें. तथापि त्याचा काल समजत नाहीं. या काव्यावरून आदाम शिखराविषयींच्या माहितींत कांहीं महत्त्वाची भर पडलेली दिसत नाहीं.

इ. स. ४१२ च्या सुमारास सिलोनला गेलेल्या फॉह्यिन या चिनी प्रवाशानें या पावलाचा उल्लेख केला आहे. सर इमर्सन टेनेंट, तीन मध्ययुगीन चिनी भूगोलज्ञाच्या ग्रंथातून 'पानकू' या नावानें त्याच्या पुराणात प्रसिद्ध असलेल्या आदाम शिखरावरील पावलाविषयींचे उतारे देतो (सिलोन १. पा. ५८४-५८६) कदाचित् या चिनी भूगोलज्ञांनीं मुसुलमानापासून ही पावलासंबंधीं कथा घेतली असेल कारण त्याच्या काळापूर्वी चीनमध्यें बरेचसे मुसुलमान वस्ती करून राहिले होते, व बाह्यप्रदेशासंबंधीं सर्व माहिती तेथील अरब मुसुलमानाकडून चिनी लोकांना मिळत असे व या

पावलाचा संबंध आदामकडे लावण्याची कल्पना त्यांच्या ( मुसुलमानांच्या ) मनांत पूर्वीपासूनच होती. उदाहरणार्थ दमास्कस येथें मोझेसच्या पावलाचा ठसा पाहिलेला इब्नबतूता या शिखरावरील आदामाचें पाऊल पाहिल्याचें लायलचक वर्णन देतो. सर इमर्सन टेनेंट यांना असें खात्रीपूर्वक वाटतें कीं, ही आदामपावलाची कल्पना मुसुलमानांनीं नॉस्टिक खिस्त्यांपासून घेतली असली पाहिजे ( सिलोन १ पा १३५ ).

शिवपदाची कल्पना यापुढील काळांतली दिसते. इब्नबतूता ( सुमारें १३४० ) असें सांगतो कीं, आपल्या बरोबर शिखरावर आलेले चार जोगी दर वर्षी ही यात्रा करीत. पुढील शतकांतल्या पोरक्कम् या सिरांत ( परक्रम बाहु चरित ) यांत एक ब्राह्मण समनल येथून यात्रा करून परत आल्याचा उल्लेख सांपडतो पण यापैकीं कोणत्याहि ग्रंथांत हें पाऊल शिवाचें, असें म्हटलेलें नाहीं. परक्रम बाहुचरितांत तर तेथील देवता सुमन ही आहे असें लिहिलेलें आहे. पण महानशांत सीतावक्काच्या राजसिंहानें ( इ. १५८१–१५९० ) या शिखराचें उत्पन्न कोणी शैवसाधूना दिल्याचा उल्लेख सांपडतो. राजसिंहानें आपल्या हातानें पितृवध केला होता, तेव्हां भिक्षूंनीं त्याला दोषमुक्त करून घेण्याचें नाकारिलें. पण शैव साधूंनीं तसें करण्याचें कबूल केलें म्हणून राजसिंहानें आपल्या अंगाला राख फासून शैवधर्म स्वीकारला. १७४१ मध्यें कंयाडीचा राजा कीर्तिश्री यानें पुन्हां बौद्धभिक्षूंना या शिखराचें उत्पन्न दिलें. या काळापासून पावलाविषयींच्या शैव कथेचा उगम असावा. कदाचित् हा काल थोडा पाठीमागेंहि जाईल. "यत्त्वन कैलास मानमीय" या चिकोमालीसव यांच्या तामिळी पुराणांत या शिखरावरील शिवपदापासून नद्या काढल्या असें म्हटलें आहे. या ग्रंथाचा काल निश्चित नाहीं.

या पादचिन्हासंबंधीं तामिळी आणि सिंहली लोकांचें कसेंहि मत असलें तरी ते तेथील देवता समन देवीयो ( सिंहली ) किंवा सुमन ( पाली ) आहे असें मानितात. अद्यापि तिचें देऊळ पावलावरील मंडपाच्या खालच्या बाजूस दिसत असून स्कीननें त्याची प्रतिमा आपल्या ग्रंथांत दिलेली आहे ( स्कीन—ॲडम्स पीक, कोलंबो, १८८० ). शिवाय स्कीननें १८८० मध्यें शिखरावर असलेल्या इमारतीचे नकाशे दिले आहेत. टनेंटन १८६८ मधील नकाशे दिले आहेत आणि डॉ. रॉस्टनें १९०२ मधील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें पादचिन्ह आणि वरचा मंडप यांचीं दोन चित्रें दिलीं आहेत. शिखराला ज्या योगानें इतकें महत्त्व प्राप्त झालें आहे त्या पावलाची लांबी ५½ फूट व रुंदी २½ फूट आहे. पावलाची टांच ओळखूं येते पण पुढील बोटें दिसत नाहींत. तीं मंडपाच्या भिंतीखालीं अडकलेलीं आहेत असें वाटतें.

**आदामाईट**—खिस्ती पाखंड्यांचा एक पंथ. हा खि. श. दुसऱ्या तिसऱ्या शतकांत उत्तर आफ्रिकेंत चांगला प्रचलित होता. खिस्ती संप्रदायाच्या बाल्यावस्थेंत उत्पन्न झालेली कांहीं 'नॉस्टिक' मतें व कांहींशीं साधुवृत्ति धारण करून या पंथाचे लोक आपणांला अगदीं मूळच्या निर्दोषी आदामासारखे समजत. विवाहबंधन पापमूलक मानून ते विवाहाची पद्धत वर्ज्य करीत व विधिविरहित वाटेल तें आचरण करीत व असें दिमाखानें सांगत कीं, आमचें कोणतेंहि कृत्य चांगलें किंवा वाईट ठरत नाहीं, म्हणजे कोणताच कलंक आम्हांला लागत नाहीं. हा पंथ फार दिवस टिकला नाहीं. पण मध्ययुगांत यूरोपखंडांत फ्री स्पिरिटच्या अनुयायांनीं या पंथाचीं मतें पुन्हां एकवार पुढें आणिलीं.

**आदिग्रंथ**—शीख लोक आपल्या धर्मलिखाणाला "ग्रंथ" हा शब्द योजितात. या पवित्र लिखाणाचे दोन मुख्य भाग आहेत ( १ ) आदिग्रंथ, हा शीखांचा पांचवा गुरु जो अर्जुन त्यानें बाबा नानक व इतर अनेक धर्मसुधारक यांच्या लेखांचें संकलन करून तयार केला, आणि ( २ ) दसम पादशाही ( संक्षिप्त रूप "दसम ग्रंथ" ), म्हणजे दहावा पादशहा जो गुरु गोविंदसिंग याचा ग्रंथ. सर्व शीख लोक पहिल्या ग्रंथाला प्रमाणभूत मानतात, व कांहीं थोडे शीख समाजांतील नहाल लोक दुसऱ्या ग्रंथाला महत्त्व देतात. या आदिग्रंथाचें विवेचन करणाऱ्याला "ग्रंथी" असें नांव आहे.

कर्तृत्व—हल्लींच्या स्वरूपांत असलेला आदिग्रंथ गुरु अर्जुन ( १५८१–१६०६ ) यानें रचिला, पण त्याच्या कालानंतर कांहीं तेघबहादुराचीं पदें व गुरुगोविंदसिंगाचा एक दोहोरा, या ग्रंथांत समाविष्ट करण्यांत आला. या संहितेंत कोणकोणाचीं पदें आहेत हें खालील वर्गवारीवरून दिसून येईल :—

( अ ) शीखगुरु—बाबा नानक, अंगद, अमरदास, रामदास, अर्जुन, तेघबहादुर, गोविंदसिंग.

( आ ) भगत—बेणी, भीकन, धन्ना, फरीद ( शेख ) जयदेव, कबीर, नामदेव, पीपा, रामानंद, रविदास, सधना, सैणु, सूरदास, त्रिलोचन.

( इ ) भट—भलहउ, भिका, दास, गंगा, हरिबंश, जलन, जालप, कल ( कलु, कल्हु ), कलसु, कलसहार, कीरतु, मथुरा, नल, रड, सल.

यांतील नामदेव हा पहिला मराठी अभंगकवि असून तोच या ग्रंथांतील सर्वांत प्राचीन लेखक दिसतो. कबीराचे दोहरे सर्वांच्या माहितीचे आहेत, ते या ग्रंथांत फारच उठावदार दिसतात. त्याचप्रमाणें गीतगोविंदाचा कर्ता जयदेव, अद्वैताकडे वळलेला रामानुजसंप्रदायी रामानंद व प्रख्यात संत सूरदास यांचीं परमार्थपर पदेंहि आदिग्रंथांत गोंविलीं आहेत. तेव्हां हा ग्रंथ शीखेतर हिंदूंना परका वाटणार नाहीं. एका दृष्टीनें पाहिलें तर शीखपंथ आणि महाराष्ट्रांतील भागवतपंथ यांचा निकट संबंध आहे. ज्ञानेश्वराचा बाप विठ्ठल, कबीर व नामदेव हे तिघेहि रामानंदाचे शिष्य या

नात्यानें गुरवधु होते नामदेव हा त्याचा आदि कवि तर महाराष्ट्रांतील भागवत सम्प्रदायातील हा अत्यंत जुन्या पुरुषापैकीं एक होता

*विभाग* —आदिग्रंथात पुढीलप्रमाणें विभाग आहेत –

( १ ) जप किंवा जपजी –नानकाची प्रस्तावना

( २ ) सोदरु —आस व गूजरी रागातील सायंप्रार्थना

( ३ ) सो पुरखु —आस रागातील सायंप्रार्थना.

( ४ ) सोहिला —गौरी, आस व धनासरी रागातील निजण्यापूर्वी म्हणण्याची प्रार्थना

वरील चार भाग उपासनेकरितां लागत असल्यामुळें ग्रंथारंभीं घातले आहेत या नंतर —

( ५ ) राग —हा ग्रंथाचा मुख्य भाग हे राग ३१ असून त्यात निरनिराळ्या गुरूंचीं पदें अव्यवस्थितपणे घातलीं आहेत रागाच्या नावावरून आंतील विषयाचा बोध होत नाहीं प्रत्येक रागाच्या शेवटीं भगतांचीं वचनें कशीं तरी जोडून दिलेलीं दिसतात पहिल्या चार रागांत महत्त्वाचा विषय गोंवला आहे व पुढील किरकोळ रागांतून जे विषय मांडले आहेत ते *केवळ ग्रंथाचा व्याप वाढविण्याकरितांच* होत जें ज्याला सांपडेल तें घुसडून देण्याच्या क्रियेमुळें, आदिग्रंथ मोठा कंटाळवाणा व असंबद्ध असा झाला असून त्यांतील रमझुमणाऱ्या शब्दसागरात विचाररत्नें फार थोडींच आटळतात

( ६ ) भोग —म्हणजे ग्रंथपरिणति, यांत निरनिराळ्या गुरूंचे व भगतांचे श्लोक व पद आलीं आहेत

ग्रंथातील माल निरनिराळ्या ठिकाणाहून घेतला असल्यानें, लिखाण एका भाषेत लिहिलेलें नसून, अर्वाचीन हिंदुस्थानातील निविध भाषांत लिहिलें गेलें आहे उदाहरणार्थ, *नामदेवानें जुन्या मराठींत रचना केली,* व *त्रिलोचन* ब्राह्मणानें नामदेवाचेंच अनुकरण केलें जयदेवानें संस्कृत व अर्वाचीन भाषा यांचें विचित्र मिश्रण उपयोगांत आणिलें, तर *रामानंदानें कबीर व त्याचे शिष्य यान्याप्रमाणें जुन्या* हिंदींत आपलीं वचनें गोंविलीं नानक व त्याच्या पुढचे गुरु हे पंजाबांत राहणारे असूनहि त्यांनीं हिंदीसदृश भाषा वापरावी हें चमत्कारिक वाटतें, पण ज्याप्रमाणें कबीर व इतर भगत यांची धार्मिक शिकवण त्यांनीं उचलली, त्याचप्रमाणे भाषाहि उचलली यांत नवल नाहीं पण परिणाम असा झाला कीं, ग्रंथांतील बराचसा भाग अर्वाचीन शीखांना दुर्बोध झाला आहे [ नानाक, नामदेव, शीख, ] पाहा.

ग्रंथातील छंद जुन्या प्राकृतांतील किंवा नवीन बनविलेले दिसतात. त्यामध्यें दोहरा, दुपदा, त्रिपदा, चौपदा, पंचपदा, अष्टपदी, श्लोक, डखणा, छंट, पउरी, सवाईआ व *गाथा ही वृत्तें आढळतात सर्व ग्रंथ छंदोबद्ध आहे हें सांगणें* नकोच

*आदिग्रंथातील भाषेचा नमुना* —मासल्याकरितां कांहीं गीतें खालीं उद्धृत केलीं आहेत

श्लोक —

कतंच माता कतंच पिता कतंच बनिता बिनोद सुतह ॥
कतंच भ्रात मीत हित बंधव कतंच मोहु कुटुंब ते॥
कतंच चपल मोहनी रूप पेखते त्याग करोती ॥
रहंत संग भगवान सिमरण नानक लब्ध्यं अच्युत तनह ॥

अष्टपदी —

इउ मैं करम कमावदे जम डंडु लगै तिन आइ ॥
जि सति गुरु सेवनिसे उबरे । हरिसेती लिव लाइ ॥ १
मन रे गुरमुखि नामु धिआइ ॥
धुरि पूरबि करते लिखिआ तिना गुरमति नामि समाइ ।
रहाउ ॥
विणु सतिगुर परतीति न आवई नामि न लागो भाउ ॥
सुपनै सुखु न पावई दुख महि सवै समाइ ॥ २

सवाईआ —

*गावउ गुन परम गुरु सुख सागर दुरत निवारण सब्देर॥*
गावहि गभीर धीरमति सागर जोगी जंगम ध्यानु धेरे ॥
गावहि इंद्रादि भगत प्रहिलादिक आतम रसु जिनि
जाणिओ ॥
कवि कलसुजसु गावउ गुर नानक राज जोगु जिनि
माणिओ ॥

*गाथा* —

कर्पूर पुहप सुगंधा परस मानुख्य देहं मलीणं ॥
मज्जा रुधिर दुरगंधा नानक अथि गरबेण अग्यानणो ॥

दोहरा:—

बल छुट किओ बंधन परे कछू न होत उपाइ ॥
*कहु नानक अब ओट हरि गज जिउ होहु सहाइ॥*
संगि सखा सभि तजि गए कोऊ न निबहिओ साथ ॥
कहु नानक इह बिपति मैं टेक एक रघुनाथ ॥

*आदिग्रंथातील कांहीं विषय* —प्रणयिनी व प्रियकर यामधील प्रेमाची ईश्वरप्रेमास उपमा —

( १ )

( १ ) अरेरे! काय नावडत्या स्त्रीचें जीवित, संसाराच्या आसक्तीमुळें तिचा नाश झाला लोणा आलेली भिंत ज्याप्रमाणें रात्रंदिवस पडते झडते त्याप्रमाणें ( *तिचा नाश होतो* ) शब्दा ( नामा )शिवाय सौख्य उत्पन्न होत नाहीं, प्रियतमाच्या प्राप्तीशिवाय दुःख नाहींसें होत नाहीं ( विश्रांति ) हे सुंदर *तरुणस्त्रिये, प्रियतमाशिवाय शृंगार कसला! घरात जावयास* तुला देवडीवर परवानगी मिळत नाहीं, उखऱ्यातील लबाड मनुष्य कुचकामाचा आहे.

( २ ) तोच स्वतः शहाणा तोच चुकला *नाहीं, तोच खरा व थोर शेतकरी होय ( की जो )* पाहिल्यानें जमीन तयार करून घेऊन तींत नामरूपी बीं पेरतो नशीबाच्या ओघाप्रमाणें एका नामापासून नऊ भांडारें उत्पन्न झालीं आहेत

( ३ ) जो गुरुला जाणीत नाहीं असा शहाणा, कसलें त्याचें शहाणपण आणि कसलें त्याचें सद्वर्तन, त्या आंधळ्यास नामाचा विसर पडतो, स्वच्छंदी मनुष्याच्या मनात गाढ काळोख असतो त्याचे ( जन्ममरणाचे ) फेरे थांबत नाहींत, मेल्यावर तो पुन जन्मतो व दु ख पावतो

(४) चंदन विकत आणलें, तसेंच कुंकू व केसाच्या भांगाकरिता शेंदूर, पुष्कळ उटी, पानसुपारी व कापूर ( वगैरे साहित्य ) पण जर ती स्त्री ह्रदयेशाला सुप करणार नाहीं तर हें सर्व साहित्य व्यर्थ होय

( ५ )सर्व सुखाचा उपभोग व्यर्थ होय, सर्व दागिने अप्रस्तुत वस्तू होत, जोपर्यंत ती ( गुरूच्या ) शब्दानें पूर्ण विद्ध झाली नाहीं ( तोपर्यंत ) गुरूच्या द्वारीं तिला मान कसा मिळेल। हें नानका । त्याच आवडत्या स्त्रिया भाग्यवान होत कीं ज्याचें नवऱ्यावर प्रेम असतें [ आदि १३ कर्ता नानक ]

२

(१) विषयी मनाचा मनुष्य जीं कामें करतो तीं नावडत्या स्त्रीच्या आंगावरील दागिन्याप्रमाणें असतात. शेजेचा पति येत नाहीं, एकसारखी ती दु खी असते प्रियतमाचा राजवाडा तिला प्राप्त होत नाहीं, त्याचे घरदार ( तिच्या ) दृष्टीस पडत नाहीं ( विश्रांति ) घेणे, त्या नामाच्या ठिकाणीं मन एकाग्र करून ध्यान कर सतमंडळाशीं जो संबंध ठेवितो, तो मनातल्यामनात रामनामाचा जप करून आनंद पावतो

( २ ) ती शिष्या नेहमीं प्रिय स्त्री असते ( कीं जी) प्रियतमास ह्रदयात धारण करते, ती मधुर भाषण करते, नम्रपणें चालते, तिचा पती शय्येवर तिजशीं विलास करतो त्या प्रिय स्त्रिया सौंदर्ययुक्त असतात कीं, ज्याच्या मनात गुरु विषयीं अमित प्रेम असतें

( ३ ) भाग्याचा उदय होऊ लागतो तेव्हा पूर्ण भाग्योदयानें सद्गुरूची प्राप्ति होते अत करणातील दु ख व भ्रांति काढून टाकली जाते व सौख्याची प्राप्ति होते गुरूच्या इच्छेस अनुसरून जी चालते तिला लेशमात्र दु ख होणार नाहीं

( ४ ) गुरूच्या आज्ञेंत अमृत आहे, तें काणालाहि सहज प्राप्त होतें ज्यांना तें मिळालें त्यांनीं तें अत करणातील अहंकार काढून टाकून प्राशन केलें. हे नानक, शिष्यानें नामाचें चिंतन केलें तर तो सत्स्वरूपाशीं एकरूप होतो ( आदि १३ ४४, कर्ता अमरदास )

३

( १ ) जेव्हा ती स्वत च्या प्रियतमास जाणते तेव्हा ती त्यास आत्म्यासह शरीर अर्पण करते आवडत्या स्त्रिया जी कामें करतात ती ती करते, त्यामुळें सहजच सत्स्वरूपाशीं तिची एकतानता होते व तें सत्स्वरूप ( तिला ) मोठेपणा देतें( विश्रांति ) हे बघे, गुरुशिवाय भक्ती करता येणें शक्य नाहीं जरी प्रत्येकास भक्तीचा इच्छा असली तरी ती त्यास गुरुशिवाय प्राप्त होत नाहीं

( २ ) ( ईश्वराव्यतिरिक्त ) प्रेमामुळें चौऱ्यायशी लक्ष (जन्मां)ची सख्या या मोहक स्त्रियच्या वांटणास आली आहे गुरुखेरीज तिला निद्रा मिळत नाहीं, तिची सर्व रात्र दु खात जाते ( गुरूच्या ) शब्दाशिवाय प्रियकराची प्राप्ति होत नाहीं, ती आपल्या जीविताचा व्यर्थ नाश करते

( ३ ) अहंभावानें ती जगात वागते ( पण ) तिच्या वाट्यास संपत्ति नसते व अभ्युदयहि नसतो. नामाचें चिंतन न करणारा प्रत्येक अंध हा यमाच्या पाशानीं बद्ध होतो सद्गुरूची प्राप्ति होताच अत करणात हरिनामाचें स्मरण होऊन सपन्नावस्था प्राप्त होते

( ४ ) ज्याची नामाच्या ठिकाणीं आसक्ति आहे तो गुरूच्या सहज प्रकृतीनें शुद्ध होतो ( त्याचें ) ह्रदय व देह हीं रगानें रगून जातात, त्याची जिव्हा मधुर रसाचें पान करते हे नानका तो रग नाहींसा होत नाहीं ( कारण ) हरीनें तो प्रथमच लाविलेला असतो ( आदि १४ ४७ कर्ता अमरदास )

४

( १ ) हे अभिनव तारुण्ययुक्त स्त्रिये, आनदकारी राम हा माझा प्रियकर होय, जिचें आपल्या प्रियकरावर प्रेम व आसक्ति असते ( तिच्यावर ) रामाची कृपादृष्टि असते जर ईश्वर स्वत. तिजवर कृपा करील तर ती आपल्या प्रियकरास भेटेल. प्रियकराच्या सांनिध्यात तिची शय्या सुखदायक होते, सप्तपुष्करिणी अमृतानें भरून जातात दयासागरा, ( मजवर ) दया व करुणा कर, ( म्हणजे गुरूच्या ) सद्वचनास अनुसरून मी तुझें श्रेष्ठगुण गात राहीन नानक ( म्हणतो ) स्वत च्या पतीला–हरीला पाहून ती स्त्री सुखी होते व ( तिचें ) मन आनदपूर्ण होतें

( २ ) हे तरुण व निसर्गरमणीय स्त्रिये, रामाचें अनन्य प्रेम हेंच ( माझें ) स्तवन ( होय ) माझ्या चित्तास व शरीरास हरि सौख्यदायक आहे, मला भगवान रामाच्या भेटीचा आवड आहे ईश्वरविषयक प्रेमानें जी व्याप्त होते, ' हरी ' हीच जिची विनवणी, ती हरीच्या नामात सौख्यानें वास करते मग तिची सद्गुणाशीं ओळख होते, मग तिला ईश्वराची जाणीव होते, तिचे अपराध लुप्त होतात, तिचे दुर्गुण नाश पावतात तुझ्याशिवाय माझ्यानें एक क्षणभर राहावत नाहीं, सागण्यानें किंवा ऐकण्यानें धार धरवत नाहीं. हे नानक, प्रियतमा, प्रियतमा, म्हणून जी आक्रोश करते तिच्या जिव्हेस त्याचा आस्वाद मिळून तिचें मन आनद पावतें

( ३ ) हे सख्या, हे सहचरा, तो व्यापारी राम माझा प्रियतम आहे हरीचें नाव विक्रयार्थ घेतलें आहे व राम हा अनंतपट गोड व अमोलिक आहे जर तो अमोलिक, सत्स्वरूप व प्रिय परमेश्वर घरात मान्य समजला जात असेल तर ती तरुण स्त्री घरी असते कोहींजण हरीच्या सांनिध्यांत सुखानुभव घेतात मी दाराशीं उभा

राहून आक्रोश करतो कारणाचें सामर्थ्यवान कारण, तो भाग्यदायी ( विष्णु ) स्वत (माझें) काम शेवटास नेता नानक ( म्हणतो ) ( जिच्यावर त्याची ) कृपादृष्टि असेल ती भाग्यवती व आवडती स्त्री, ती ( आपल्या ) हृदयात ( गुरूचें ) वचन धारण करते

( ४ ) माझ्या घरात खरा आनंद भरला आहे, ता ईश्वर, तो रामसखा आला आहे प्रेमानें ओथबून जाऊन तो माझा उपभोग घेत आहे, ( माझें ) मन काढून नेऊन रामास दिलें आहे ( माझें ) स्वत चें मन ( त्याला ) दिलें आहे हरि हा नवरदेव मिळ विण्यात आला आहे, आपल्या मर्जीप्रमाणें तो ( माझा ) उपभोग घेत आहे ( जिचें ) शरीर व अत करण प्रियकरास अर्पण केलें जातें ती ( गुरूच्या ) मगल आशिर्वचनानें स्वगृहीं अमृतफल प्राप्त करून घेते बुद्धिमत्तेनें ग्रथावलोकनानें व मोठ्या शहाणपणाच्या जोरावर त्याची प्राप्ति होत नाहीं, जे त्याच्या अत करणास रिझवितात त्याना तो प्रेमामुळेंच भेटतो नानक ( म्हणतो ) ईश्वर आमचा सखा आहे, आम्ही या जगातील नाहीं आहों [ आदि १ कर्ता नानक ]

५

( १ ) सावरीचा वृक्ष सरळ असतो, पुष्कळ लाब व पुष्कळ रुद असतो जे ( त्याच्या जवळ ) आशेनें येतात ते ( त्याजपासून ) निराशेनें परत कां जातात ? ( त्याचीं ) फळें वेचव असतात, ( त्याचीं ) फुलें घाणेरडीं असतात, ( त्याचीं ) पानें निरुपयोगी असतात, ( त्याचेंच ) गोडी विशेष, हे नानका, कीं ज्यामध्यें चागलेपणा व सत्य हेंच वैशिष्टय आहे प्रत्येकजण स्वत स नमस्कार करतो, दुसऱ्यास कोणीहि करीत नाहीं ताजव्यात घालून वजन केलें असता जो खालीं जातो तोच जड होय हरणास मारणारा पातका दुप्पट खोल वुडून जातो अशुद्ध अत करण घेऊन ( परत ) नाणाऱ्याच्या ( पूजेच्या प्रसगीं ) नम्र केलेल्या मस्तकाचा काय उपयोग ?

( २ ) तो ग्रथाध्ययन करतो, व सध्यापाठ म्हणतो तो पाषाणाची पूजा करतो, त्याचें ध्यान बगळ्याप्रमाणें असतें ( त्याच्या ) मुखात असत्य असतें, ( बाहेरून मात्र ) शृगार अत्युत्कृष्ट केला असतो तो ( दिवसातून ) तीन वेळ गायत्रीचें चिंतन करतो, गळ्यात माळ असून त्याच्या कपाळीं टिळा असतो त्याचीं दोन दोन धोतरें व रेशमी वस्त्रें असतात ( हींच ) ब्राह्मणाचीं कर्तव्यें असें जर त्याला वाटत असेल तर खरोखर हे सव उद्योग म्हणजे शुद्ध गदळ होत नानक म्हणतो व त्याचें म्हणणें योग्यच आहे कीं, सद्गुरूवेरीज त्याला (खरा) मार्ग सापडत नाहीं ( त्याचा ) पोशाख व स्वरूप ( पवरी ) रम्य आहे, तो जग सोडून ( यमाच्या दरबारात ) जात आहे त्यानें स्वत ज्या वऱ्या वाईट गोष्टी केल्या त्याच माप तो पदरात घेत आहे हरीच्या इच्छेस अनुसरून हुकूम सुटले आहेत कीं अरुद रस्त्यानें त्यानें पुढें गेल पाहिजे नग्नावस्थेंत तो नरकात जातो, तेथें घोर दृश्य दृष्टीस पडतें इहलोकीं गुण उधळून तो ( आता ) पश्चात्ताप करीत आहे [ आदि १४ २ कर्ता नानक ]

ईश्वराचें एकत्व सिद्ध करणारा उतारा —

१

( १ ) माया ही द्वितीय होय ' असें मग समजतें काम, क्रोध व लोभ हे अध पात होत ( विश्राति ) मी द्वितीय कोणास म्हणू ? असा कोणीच नाहीं सर्वांतर्यामी तो एक सर्वश्रेष्ठ आहे

( २ ) द्वैताविषयीं बोलणाऱ्या मूर्खांना ( ता ) द्वितीय ( आहे ) तो येतो व जातो मरून तो ( पुन ) द्वितीय होतो

( ३ ) पृथ्वी आणि आकाश याच्याकडे मी द्वैतभावानें पहात नाहीं सर्वच लोक नर व नारी होत

( ४ ) सूर्य व चद्र हे तेजस्वी दीप मी पाहातो सर्वांमध्यें तो परमप्रिय तरुण ( हरि ) सलग भरून राहिला आहे

( ५ ) दयायुक्त होऊन त्यान माझें मन ( एकत्वाकडे ) वळविलें आहे. सद्गुरूनें मला एकेश्वराचें ज्ञान करून दिलें आहे

( ६ ) तो एक सर्वश्रेष्ठ शिष्यास माहीत झाला आहे द्वैताचा नाश केल्यानतर गुरूच्या वचनानें त्यानें त्याचा उमज करून घेतला आहे

( ७ ) त्या एकाची सत्ता सर्व जगातून अव्याहत चालू आहे त्या एकापासून सर्व सृष्टि उत्पन्न झाली आहे

( ८ ) मार्ग दोन एक हिंदुधर्म व दुसरा मुसुलमान धर्म ( पण ) ईश्वर एकच आहे याचें ज्ञान करून घ्या गुरुवचनाच्या द्वारें त्याची आज्ञा समजून घ्या

( ९ ) सर्व प्रकारचीं रूपें व रग ( त्याच्या ) मनात आहेत, असें एकाची स्तुती करणारा नानक म्हणतो (आदि पा ३२०० कर्ता नानक )

ईश्वराचें सर्वव्यापित्व दाखविणारा उतारा —

२

( १ ) एक कळशी घेतला व ती पाण्यानें भरला, ( अशा करिता कीं ) मी ईश्वरास स्नान घालीन. बेचाळीस लक्ष जीवजतू त्या पाण्यात उत्पन्न झाले, बघा, मी विठ्ठलास काय करू ? (विश्राति) हे बघा, मी जेथें जातो तेथें विठ्ठल आहेच तो अत्यत उल्हासी व सदा खेळकर आहे

( २ ) फुलें आणलीं, हार तयार केला, मी प्रभूची पूजा करता ( पण ) कृष्णभ्रमरानीं त्याचा सुवास आधींच लुटून नेला, हे बघा, मी विठ्ठलास काय करू ?

( ३ ) दूध आणलें व खीर तयार केला, कीं, मी ईश्वरास नैवेद्य समर्पण करावा ( पण ) वासरान प्रथमच दूध उष्टं करून टाकलें, हे बघा, मी विठ्ठलास काय करू ?

(४) येथें विठ्ठल आहे, तेथें विठ्ठल आहे, विठ्ठलावांचून जग नाहीं. नामा म्हणतो, प्रत्येक स्थलाचे ठायीं, प्रत्येक वस्तूंत तूं भरून राहिला आहेस ( आदि. पा. ६६५ कर्ता नामदेव ).

हिंदु व तुर्क यांचीएकीकरण्याबद्दलचा उतारा.—

२

(१) हिंदु व तुर्क कोठून आले? हे कोणी निर्माण केले? (आपल्या) मनांत शोध करून व विचार करून (मला) सांग नंदनवन व नरक कोणी निर्माण केला? (विश्रांति.) काझीसाहेब, आपण कोणत्या ग्रंथाचें विवरण करितां? (ग्रंथ) वाचणारे व (त्यावर) विचार करणारे सर्व मेले, कोणाहि एकाला (सारें) ज्ञान झालें नाहीं.

(२) हे बंधो! बळजबरीनें व प्रेमानें सुंता करण्यात आली, मी त्याला मान्यता देणार नाहीं. जर ईश्वर मला तुर्क बनवील तर तोच स्वतः माझी सुंता करील.

(३) जर एखादा सुंता करण्यानेंच तुर्क बनेल, तर एखाद्या बाईचें काय करावें! ज्याअर्थी त्या बाईला आपला अर्धांगीपणा सोडता येत नाहीं त्याअर्थी तिनें हिंदूच राहिलें पाहिजे.

(४) (कुराण) ग्रंथ टाकून देऊन रामाला भज, अरे मूर्खा! तूं मोठा जुलुम करीत आहेस. कबीर रामावर विश्वास टाकतो, तुर्कांचा पराभव व नाश झाला [ आदि. पा. ६५५ कर्ता कबीर ].

[ संदर्भग्रंथ.—आदिग्रंथाच्या आवृत्त्या अनेक आहेत. मराठींत भाषांतर, नामदेवाचे अभंग ग्रंथस्वरूपात आहेत. इंग्रजीभाषांतर ट्रंप यानें केलें आहे. 'ग्रंथावर एनसायक्लोपीडिआ ऑफ रिलिजन अँड एथिक्समध्यें एक लेख आहे. ट्रंपची प्रस्तावना महत्त्वाची आहे. ]

**आदितियाना.**—पोरबंदरच्या ईशान्येस ९ मैलावर व बरडा टेंकडयापासून जवळच असलेलें एक ठिकाण ( काठेवाड ). लोकसंख्या १४४१ (१८८१). हें खेडें अगदीं अलीकडचें म्हणजे १७४८ त वसलेलें आहे. तरी पण तें बरेंच पुढें आलेलें आहे. येथील पोरबंदर नावाच्या दगडाची निर्गत मुंबई व इतर बऱ्याच ठिकाणीं होते. येथें या दगडाला मारवाडी ओ पत्थर (लोण्याचा दगड) असें म्हणतात. येथून जवळच एक जांबुवान नावाचें लेणें आहे ( बाँ. गॅ. ८. ३५५

**आदिनारायण.**—१ हे ब्राह्मण वैदिक व गायक असत. हे शके १६०० नंतरचे असावेत

ग्रंथ—संस्कृत प्राकृत पदें ( सं. क. का सू. )

**आदिपुराण**, कालव कर्ता.—जैन लेखक जिनसेन व गुणभद्राचार्य यांनीं रचलेल्या महापुराण नामक ग्रंथाचा पूर्वार्ध. महापुराण हा ग्रंथ जिनसेनाच्या मनांत आपण स्वतःच सर्व लिहून संपवावयाचा होता. परंतु अर्धा अधिक ग्रंथ रचल्यावर जिनसेनास मृत्यु आल्यामुळें जिनसेनाचा शिष्य गुणभद्र यानें उरलेला ग्रंथ संपविला. या ग्रंथाचें संकलित नाव वस्तुतः महापुराण असेंच आहे.

परंतु पहिल्या ४८ पर्वांत पहिल्या तीर्थंकाराचें चरित्र असल्यानें व तो एकंदर ग्रंथाचा पूर्वार्ध आहे म्हणून लौकिकात त्याला आदिपुराण व उत्तरार्धास उत्तरपुराण असें म्हणतात. या आदिपुराणापैकीं जिनसेन स्वामीनें फक्त ४२ पर्वे पूर्ण व ४३ व्या पर्वाचे ३ श्लोक केले असून बाकीचा भाग (१६२० श्लोक) गुणभद्रानें रचिला आहे. जिनसेनकृत आदिपुराणाचा भाग इ. स ८४३ च्या सुमारास पूर्ण झालेला दिसतो त्याचें बहुतेक आयुष्य राष्ट्रकूटांच्या राज्यात म्हणजे महाराष्ट्र व कर्नाटक या भागात गेलें असल्यामुळें महाराष्ट्रास त्यावर व त्याच्या ग्रंथावर बराच हक्क सांगता येण्यासारखा आहे.

स्वरूप.—एकंदर महापुराणात २४ तीर्थंकर, १२ चक्रवर्ती, ९ नारायण, ९ प्रतिनारायण व ९ बलभद्र या ६३महापुरुषांचीं चरित्रें आलीं आहेत. यांपैकीं आदिपुराणात मुख्यत्वेंकरून प्रथम तीर्थंकर व प्रथम चक्रवर्ती यांच्याच चरित्राचा समावेश होतो. दिगंबर संप्रदायातील प्रथमानुयोगाचा हा प्रधानग्रंथ असून जैनवाङ्मयामध्यें हा एक परमोत्तम ग्रंथ समजला जातो आदिपुराण हें केवळ पुराणच नसून कवीनें यात आपल्या रचनाकौशल्यानें जैन लोकांच्या एकूण एक कथांचा, चरित्रांचा व भूगोलादि माहितीचा संग्रह केला आहे. जैन संप्रदायाचीं जेवढीं म्हणून सर्वमान्यतत्त्वें आहेत तीं सर्व या ग्रंथात कोठेंना कोठें काहीं तरी गोष्टींचा संबंध आणून कोणत्याना कोणत्यातरी रूपानें निवेदन केलीं आहेत. या ग्रंथाचें प्रामाण्यहि बरेंच समजलें जात असून मागील ग्रंथकारांनीं या ग्रंथातील आधार आर्ष म्हणून मोठ्या आदरानें उद्धृत केलेले सापडतात.

कवीमध्येंहि ह्या ग्रंथाला काव्य म्हणून मान्यता आहे. यात महाकाव्याचीं बहुतेक सगळीं लक्षणें आढळून येतात हा ग्रंथ शृंगारादि नवरसांनीं ओतप्रोत भरलेला असून यातील काव्यहि सामान्यतः उच्च प्रतीचें आहे. पदलालित्य, अर्थसौष्ठव प्रासादिकपणा, गांभीर्य, कोमलता इत्यादि काव्याच्या सर्व गुणांनीं तो युक्त असून यांतलि सृष्टिवर्णनें व मानसिक विचारांचें चित्र रेखाटण्याचें कामहि बरेंच साधलेलें आहे. जैन पंडितांच्या मतें यातील काव्य वाचकाचें मनोरंजन करितें इतकेंच नव्हे, तर सुखाचा मार्ग दाखवून संसारातील कष्टापासून स्वतःस मुक्त करून घेण्याचा प्रयत्न करण्यास वाचकांस उत्तेजन देतें. आधुनिक वाचकास या ग्रंथात कांहीं दोष आढळत असल्यास तो हा कीं, शृंगारादि रसांत वाचकास तन्मय करून कवि तेथेंच थांबत नाहीं, तर लागलीच तो ते सर्व असार कसे आहेत हें दाखविण्याकरितां तत्त्वज्ञानात शिरतो. पुराणांतील सर्व विषय ज्या एका गोष्टीच्या सूत्रात गोंविलेले आहेत ती पर्वंवार पुढें दिल्याप्रमाणें आहे.

आ दि पु रा णा ती ल क था, पहिलें पर्वः—यात मंगलाचरण, प्रतिज्ञा व महापुराण नावाची सार्थकता, ग्रंथकाराचें लघुत्व, प्राचीन कवींचें स्मरण, काव्य व कवि, सज्जन व दुर्जन, धर्मकथाचें महत्त्व, कथा, वक्ता व श्रोता यांची लक्षणें, कथा सांगण्याचा प्रसंग, पुराणाच्या श्रवणपठणाचें फल, हे विषय आहेत.

दुसरें पर्वः—श्रेणिक राजानें वर्द्धमान स्वामीजवळ येऊन पृच्छा केल्यावरून गौतम गणधर जमलेल्या मंडळीस पुराण सांगूं लागले, असा उपोद्घात करून यात पुढें गणधरस्वामीची स्तुति व श्रुतस्कंधाच्या चार अनुयोगाचें वर्णन केलें आहे.

तिसरें पर्वः—यात कालाचें लक्षण, वृषभदेवापूर्वीच्या तीन युगाचें वर्णन, वृषभदेवाच्या १४ पूर्वजाचें ( कुलकराचें ) वर्णन व त्यांच्या काळची माहिती आहे.

चौथें पर्वः—यात प्रथम देशवर्णन व सृष्टिकर्त्याचा निषेध, जंबुद्वीप, गंधिला देश व अलकानगरी यांचें वर्णन येऊन मग अलका नगरीच्या अतिबलाच्या राज्याची हकीकत व त्याचें तपश्चरणार्थ गमन कथन केलें आहे. यापुढें अतिबलपुत्र महाबल याच्या कथेस आरंभ होतो.

पाचवें पर्व—महाबल एकदा राजसभेंत बसला असता महाबलाच्या मंत्र्यांनीं आपल्या स्वामीपुढें धर्मनिरूपण केलें, पैं जीवतत्त्वाच्या विषयावर त्यांच्या निरनिराळ्या मंत्र्यांमध्यें वादविवाद होऊन त्याच्यासमोर निरनिराळ्या मताचें मंडन व खंडन झालें. त्यांपैकीं स्वयंबुद्ध नामक मंत्र्यानें महाबलाच्या पूर्वजांपैकीं अरविंद, मणिमाली, शतबल व सहस्रबल यांच्या गोष्टी दृष्टांतादाखल कथन करून राजाच्या मनावर छाप बसविली. पुढें स्वयंबुद्ध एकदां मेरु पर्वतावर गेला असता तेथें दोन गगनविहारी मुनींकडून स्वयंबुद्धास महाबलाच्या पूर्वजन्माची हकीकत कळली. त्या हकीकतीच्या साहाय्यानें स्वयंबुद्धानें महाबलास पडलेल्या स्वप्नाचें स्पष्टीकरण करून त्यास तपश्चरणार्थ पाठविलें. महाबल मृत्यु पावल्यावर त्याचें ललितांग नामक देवांत रूपांतर होऊन तो स्वर्गास गेला.

सहावें पर्व—ललितांगाचा पुण्यक्षय होताच त्याची स्वर्गातून च्युति होऊन विदेह देशांतील उत्पलखेटक नगरच्या राजाच्या घरीं त्यानें वज्रजंघ नावानें पुनर्जन्म घेतला व ललितांगदेवाची स्वर्गांतील आवडती राणी स्वयंप्रभा हिनें विदेहदेशांतील पुंडरीकिणी नगरीच्या वज्रदंत राजाच्या घरीं श्रीमती नावानें जन्म घेतला. श्रीमतीस एकदा पूर्वजन्माची आठवण होऊन ललितांगाशीं पुन्हा संयुक्त होण्याची तीस उत्कट वासना झाली.

सातवें पर्व.—तेव्हां तिच्या विरहानें तिचें समाधान करून तीस आपल्या, तिच्या व वज्रजंघाच्या पूर्वजन्माची हकीकत सांगितली. यानंतर श्रीमतीच्या सल्लानें महापूत चैत्यालयांत जाऊन तेथें श्रीमतीच्या पूर्वजन्मींच्या हस्तांचें चित्र अडकवून ठेविलें. वज्रजंघ त्या चैत्यालयांत आला, तेव्हां त्यास चित्रांतील पूर्वजन्मींच्या गोष्टींची ओळख पटली व त्यावरून हाच ललितांग अशी सर्वांची खात्री होऊन वज्रजंघाचा श्रीमतीशीं म्हणजे त्याच्या मामेबहिणीशीं विवाह झाला.

आठवें पर्व—वज्रजंघ हा श्रीमतीसह क्रीडा करीत व अनेक सुखाचा उपभोग घेत बरेच दिवसपर्यंत पुंडरिकिणी नगरींत आपल्या श्वशुरगृहीं राहून शेवटीं हत्ती, घोडे, रत्नभूषणें इत्यादि श्वशुराकडून मिळालेली विदागी घेऊन आपल्या उत्पलखेटक नगरीस परत आला. पुढें काहीं काळानें वज्रजंघाचा पिता वज्रबाहु यास शरत्कालचे क्षणभंगुर मेघ पाहून वैराग्य उत्पन्न झालें व त्यानें आपल्या पुत्राकडे राज्यकारभार सोंपवून जैनेश्वरी दीक्षा घेतली इकडे वज्रजंघाचा सासरा वज्रदंत यासहि सुगंधलोलुपतेनें कमलांत अडकून मरण पावलेल्या भ्रमराची स्थिति पाहून विषय सुखाचा वीट आला त्यानें आपला पुत्र व वज्रजंघाचा भगिनीपति अमिततेजा यास राज्यकारभाराचा भार स्वतःच्या शिरावर घेण्याविषयी म्हटलें; पण त्यानें संसारांत पडण्याचें नाकारून आपल्या पित्याबरोबरच दीक्षा घेतली. वज्रजंघाला हें वर्तमान समजताच तो तावडतोब पुंडरीकिणी नगरीस जावयास निघाला. वाटेंत त्यानें आपल्या सैन्यासहवर्तमान शष्प सरोवरीं मुक्काम केला असता तेथें दोन दिगंबर चारणमुनींनीं येऊन त्यास त्याच्या पूर्वजन्माची हकीकत सांगितली, व पुढें आठव्या जन्मीं तुम्ही वृषभदेव तीर्थंकर व्हाल असें भविष्य कथन केलें. यानंतर वज्रजंघानें पुंडरीकिणी नगरीस जाऊन आपली बहीण अनुंधरी हिचें समाधान केलें व आपल्या अल्पवयस्क पुंडरीक नामक भाच्याच्या पुंडरीकिणी नगरीच्या राज्याचा बंदोबस्त करून तो स्वनगरास परत आला.

नववें पर्व.—वज्रजंघ व श्रीमती मरण पावल्यावर त्यांना शष्पसरोवराच्या तीरीं दिगंबर मुनींना केलेल्या अन्नदानामुळें उत्तरकुरुच्या योगभूमींत जन्म प्राप्त झाला. तेथें त्यांच्या जीवास दोन मुनींच्या ( यांपैकीं एक मुनि पूर्वजन्मीं वज्रजंघ महाबल नामक राजा असतांना त्याचा स्वयंबुद्ध नामक मंत्री होता ) उपदेशामुळें सम्यग्दर्शन झालें व पुढें मृत्यु आल्यानंतर ते दोघे अनुक्रमें श्रीधर व स्वयंप्रभ देव होऊन दुसऱ्या ऐशान स्वर्गांत गेले.

दहावें पर्व.—श्रीधरदेव एकदा आपले गुरु श्रीप्रभ पर्वतावर आलेले ऐकून त्यांच्या भेटीस गेला असता त्यानें आपण महाबल राजाच्या जन्मीं असतांना आपले जे तीन मिथ्यादृष्टि मंत्री होते, त्यांची गति काय झाली म्हणून विचारिलें व त्या प्रसंगानें श्रीधरदेवाच्या गुरुनें त्यास नरकांतील दुःखें सविस्तर वर्णन करून सांगितलीं. स्वर्गांतून च्युत झाल्यावर श्रीधरदेव पूर्वविदेहक्षेत्रांतल्या महावत्स देशाच्या सुसीमा नगरच्या राजाच्या घरीं सुविधि नामक पुत्र होऊन

जन्मास आला व त्याच्या पूर्वजन्मींच्या श्रीमती राणीनें सुविधीच्या राणीच्या पोटीं मुलाचा जन्म घेतला. आयुष्याच्या अंतीं सुविधीनें निर्ग्रंथ दीक्षा धारण करून मोक्षमार्गानें आराधन केलें व शरीरत्याग करून तो अच्युत स्वर्गाचा इंद्र झाला.

अकरावें पर्व —हा अच्युतेंद्र नंतर पूर्वविदेहक्षेत्रांतल्या पुष्कलावती देशाच्या पुंडरीकिणी नगरींतील वज्रसेन राजाचा वज्रनाभि नामक पुत्र झाला व पूर्वी एका जन्मीं जे केवळ व्याघ्रादि जीव होते ते आपल्या पुण्यप्रभावेंकरून या वज्रनाभि राजपुत्राचे बंधू झाले. वज्रनाभि राजा झाल्यावर त्यानें आपल्या आयुष्याच्या अंतीं मुलास राज्य देऊन आपण स्वतः दीक्षा घेतली व ध्यान, तपश्चरणादि करून मरणानंतर 'सर्वार्थसिद्धांत' अहमिंद्र पद मिळविलें.

बारावें पर्व —अहमिंद्ररूपी वज्रनाभीचें स्वर्गांतील आयुष्य संपल्यावर तो अयोध्यानगरींत इक्ष्वाकु कुलामध्यें चौदावा कुलकर जो क्षत्रियश्रेष्ठ नाभिराजा त्याची स्त्री मरुदेवी हिच्या पोटीं वृषभदेव तीर्थंकराचा जन्म घेण्यास उद्युक्त झाला. येथें वृषभदेव जन्मास येणार म्हणून या अयोध्या नगरीची रचना इंद्राच्या आज्ञेनें खास देवांनींच केली होती. अहमिंद्र मरुदेवीच्या गर्भांत प्रविष्ट होतेवेळीं देवांनीं त्या नगरीवर रत्नांचा वर्षाव केला. मरुदेवीला सोळा स्वप्नें पडून वृषभदेवाच्या जन्माच्या सूचक अशा शुभ्र गजादि सोळा शुभ वस्तू दिसल्या. इंद्रादि देवांनीं भूलोकावर येऊन उत्सव केला व इंद्राच्या आज्ञेनें दिक्कुमारी देवी मरुदेवीची सेवा करू लागल्या.

तेरावें पर्व —नऊ मास पूर्ण झाल्यावर वृषभदेवाचा जन्म झाला. तेव्हां सौधर्म स्वर्गाचा इंद्र हा इंद्राणी व देवगण यांच्यासहित अयोध्येस आला व मरुदेवीस मोहनिद्रा आणून इंद्राणीमार्फत एक मायावी मूल मरुदेवीजवळ ठेवून तो वृषभदेवास घेऊन मेरुपर्वतावर गेला. तेथ वृषभदेवास अभिषेक करण्यात येऊन त्याची षोडशोपचारें पूजा करण्यात आली.

चौदावें पर्व —मग इंद्राणीनें वृषभदेवास नानाविध अलंकारांनीं भूषित केल्यावर इंद्रानें त्याची स्तुति केली व नंतर तो त्यास पुन्हां अयोध्येस घेऊन आला. तेथें आल्यावर त्यानें मरुदेवीचा मोहनिद्रा दूर केली व तिची व नाभिराजाची अतिशय स्तुति करून तो आनंदानें नृत्य करू लागला. यानंतर त्या बालकाचा नामकरणविधि होऊन त्याचें उपर्युक्त वृषभदेव हें नाव ठेवण्यात आलें. या बालकाचें संगोपन करण्याकरितां निरनिराळ्या देवता दायी होऊन अयोध्येस राहिल्या होत्या.

पंधरावें पर्व —वृषभदेवास यौवनावस्था प्राप्त झाल्यावर नाभिराजानें त्याचा कच्छमहाकच्छाच्या भगिनी यशस्वती व सुनंदा या सुरूप कन्यकांशीं विवाह लावून दिला. पुढें यशस्वतीस गर्भ राहून यथाकालीं चक्रवर्तीच्या लक्षणांनीं युक्त असा भरत नामक पुत्र झाला.

१५

सोळावें पर्व —भरतानंतर वृषभदेवास यशस्वतीपासून आणखी ९९ पुत्र व ब्राह्मी नावाची एक कन्या आणि दुसऱ्या सुनंदा राणीपासून त्यास बाहुबली नामक पुत्र व सुंदरी नांवाची कन्या झाली. ही सुंदरी वृषभदेव जेव्हां वज्रजंघाच्या जन्मीं होता तेव्हां त्याची अनुंधरी नामक धाकटी बहीण होती व त्याचे दुसरे कांहीं पुत्रहि असेच त्याचे पूर्वजन्मींचे ऋणानुबंधी मनुष्य किंवा प्राणी असून आपल्या कर्मानुसार निरनिराळे जन्म घेऊन व स्वर्गवास करून ते आतां वृषभदेवाचे पुत्र झाले होते. वृषभदेवानें आपल्या दोन कन्यांना व्याकरण, छंद व अलंकार हीं शास्त्रें शिकविलीं व आपल्या १०१ पुत्रांकडून विनयादि शास्त्रांचें अध्ययन करविलें. वृषभदेवाचा वीस (पूर्व?) लक्षांचा कुमारकाल संपण्याच्या सुमारास या पृथ्वीवरील सर्व कल्पवृक्ष नष्ट होऊन औषधी शक्तिहीन झाल्यामुळें व प्रजा रोगांनीं व्याप्त होऊन ती नाभिराजाकडे आली. नाभिराजानें या लोकांस आपलीं दुःखें वृषभदेवाकडे जाऊन कळविण्याविषयीं सांगितलें. तेव्हां वृषभदेवानें स्मरणमात्रेंकरून इंद्रास बोलाविलें व त्याच्याकडून जशी विदेहक्षेत्रांत पृथक पृथक घरें व गांव इत्यादिकांची रचना होती तशी या भरतक्षेत्रांतहि करविली, व सहा कर्मांचा उपदेश करून क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे तीन वर्ण प्रगट केले. येणेंप्रमाणें प्रजेस सुस्थिति प्राप्त झाली तेव्हां खुद्द देवांनीं येऊन वृषभदेवास राज्याभिषेक केला. वृषभदेवानें प्रथमतः प्रजा उत्पन्न केली व त्यानंतर प्रजेच्या आजीविकेचे नियम तयार करून त्यानीं आपआपल्या मर्यादांचें उल्लंघन करूं नये म्हणून नियम घालून देऊन राज्यकारभार करण्यास सुरुवात केली.

सतरावें पर्व —इंद्रानें नीलांजना नामक देवांगनेचें नृत्य चाललें असतां मृत्यु घडवून आणल्यामुळें वृषभदेवास वैराग्य प्राप्त झालें व तो भरतास राज्यपदीं व बाहुबलीस युवराजपदीं स्थापून दीक्षा घेण्यास सिद्ध झाला. तेव्हां इंद्रादि देवांनीं मोठ्या हर्षानें येऊन वृषभदेवास पालखींत घालून वनांत नेलें. शोकपूर्ण अंतःकरणानें त्याच्या सर्व राण्या व मातापिता त्याचा दीक्षाग्रहण समारंभ पाहण्यासाठीं सिद्धार्थक वनांत त्याच्या मागोमाग गेले. तेथें वृषभदेवानें दीक्षा घेतला. तेव्हां इंद्रानें त्याची स्तुति केली.

अठरावें व एकोणिसावें पर्व —वृषभदेवानें सहा महिने उपवास करण्याची प्रतिज्ञा करून तपश्चरण करण्यास प्रारंभ केला. अनशनादि सहा बाह्यतपें, प्रायश्चित्तादि सहा अंतरंग तपें, अहिंसादि पांच महाव्रतें इत्यादिकांनीं वृषभदेवाचें शरीर अत्यंत देदीप्यमान झालें. वृषभदेवाची तपश्चर्या चालू असतां कच्छ व महाकच्छ राजांचे पुत्र नमि व विनमि हे तेथें आले व ते वृषभदेवाच्या पायीं लागून राज्याचा कांहीं भाग आपणांसहि द्यावा म्हणून आर्जव करूं लागले. वृषभदेवाच्या तपश्चर्येत हें विघ्न उद्भवलें जाणून फणीश्वर धरणेंद्र हा तेथें आला व नमि व विनमि यांची समजूत घालून त्यांना

विजयार्द्ध पर्वतावर येऊन आला; व या अत्यंत शोभायमान विजयार्द्ध पर्वताच्या उत्तर व दक्षिण श्रेणींचें राज्य त्या राजपुत्रास देऊन धरणेंद्रानें त्याचें समाधान केलें.

विसावें व एकविसावें पर्वः—शरीरधारणा करण्यासाठीं आहार ग्रहण करण्याचा मार्ग दाखविण्यासाठीं वृषभदेव संचारार्थ निघाला व सहा महिन्यांनीं हस्तिनापुरीं सोमप्रभराजाच्या मंदिरात प्रवेश करून त्याच्या श्रेयास नामक भावानें केलेलें आहारदान ग्रहण करता झाला. मौनव्रतधारी वृषभदेवानें श्रेयासाकडून आहारदान घेतल्याचें समजताच वृषभदेवपुत्र भरतानें श्रेयासाकडून आहारदानविधीची माहिती करून घेतली. यानंतर वृषभदेव एकदा पुरिमताल नगराच्या एका उद्यानात ध्यान लावून बसले असता त्यास केवलज्ञानाची प्राप्ति झाली.

बाविसावें व तेविसावें पर्वः—वृषभदेवास केवलज्ञानाची प्राप्ति होऊन त्याच्या कर्मांचा नाश होताच तीनांहि लोकात मोठी खळबळ उडाली. इंद्रादि देवास मोठा आनंद होऊन ते स्वर्गातून वृषभदेवाच्या दर्शनास आले, व इंद्र आणि इंद्राणी यांनीं वृषभदेवाची पूजा करून त्याची स्तुति केली.

चोविसावें पर्वः—इकडे भरतास कंचुकीकडून पुत्रजन्माची वार्ता, आयुधपालाकडून चक्रोत्पत्तीची हकीकत व मुनिजनाकडून पित्यास कैवल्यप्राप्तीची बातमी या एकदमच कळल्या असता त्यानें इतर सर्व गोष्टी बाजूस ठेवून प्रथम पित्याकडे जाऊन त्याची पूजा केली व अष्टोत्तरशत नामावलीनें त्याची स्तुति केली. यानंतर भरतानें विचारल्यावरून वृषभदेवानें त्यास जीवादि तत्वाचें स्वरूप समजावून सांगितलें. भरताच्या बंधूनें वृषभसेनापासून दीक्षा घेऊन तो पहिला गणधर झाला; व वृषभसेनाच्या कन्या ब्राह्मी आणि सुंदरी त्याचप्रमाणें सोम, श्रेयास इत्यादिकांनींहि दीक्षा घेतल्या.

पंचविसावें पर्वः—भरत गेल्यानंतर इंद्रानें सहस्रनामावलियुक्त अशी वृषभदेवाची स्तुति केली व मग वृषभदेव भूतलावरील लोकांवर अनुग्रह करण्याकरिता पुन्हा संचारार्थ निघाला.

सव्विसावें, सत्ताविसावें व अठ्ठाविसावें पर्वः—पितृपूजा करून आल्यावर भरतानें प्रथम चक्राची पूजा करून नंतर पुत्रजन्माबद्दल उत्सव केला. पुढें शरदृतु प्राप्त झाल्यावर तो सैन्य घेऊन दिग्विजयार्थ निघाला. प्रथम पूर्व दिशेच्या रोखें निघून त्यानें गंगाकांठीं आपला तळ दिला, व पुढें गंगेच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें भिल्लादि राजाना अंकित करीत तो समुद्रकिनाऱ्यावर येऊन पोहोंचला, पण त्या समुद्रास गाईच्या खुरातील डबक्याप्रमाणें तुच्छ लेखून तो रथात बसून त्यात प्रवेश करता झाला, व इच्छितस्थळीं पोंचल्यावर त्यानें बाणाच्या टोंकास 'हा वृषभदेवाचा पुत्र चक्रवर्ती भरत याचा बाण असून त्याच्या राज्यात राहणारे तुम्ही सर्व त्याचे अंकित आहात' असें लिहून तो पूर्व दिशेस सोडला. हा बाण मगध देशात जाऊन पडला तेव्हां मगध देवास अत्यंत क्रोध आला; पण मगध-देवाच्या निकटवर्ती देवांनीं त्याची समजूत केल्यामुळें तो भरतास येऊन भेटला व त्यास करभार देता झाला.

एकोणतिसावें व तिसावें पर्वः—यानंतर भरत पूर्वेकडील देश पादाक्रांत करीत समुद्राच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें दक्षिणेस गेला व त्याहि भागातील राजे अंकित करून त्यानें दक्षिण समुद्राच्या किनाऱ्यावर आपला तळ दिला. तेथें त्यानें हत्तींची क्रीडा अवलोकन केली. पुढें दक्षिणसमुद्राचा स्वामी वरतनुदेव यास जिंकून तो पश्चिमेकडील देश पादाक्रांत करीत नर्मदातीरीं आला, व गिरनारच्या तराईतून निघून त्यानें सिंधु नदीच्या संगमावर मुक्काम केला यानंतर त्यानें पश्चिम समुद्राचा स्वामी प्रभासदेव याचा पराभव केला.

एकतीसावें पर्वः—पुढें तो सिंधुनदाच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें उत्तर दिशेस कूच करीत विजयार्द्ध पर्वतानजीक येऊन पोहोंचला. तेथें विजयार्द्धपर्वताच्या स्वामीनें भरताच्या भेटीस येऊन त्यास करभार देताच सर्व दक्षिण भारत पादाक्रांत करण्याचें काम संपूर्ण झाल्यामुळें भरतानें गंधपुष्पादिकांनीं चक्राची पूजा केली. नंतर तेथेंच मुक्काम करून भरत उत्तर दिशेस जाण्याची तयारी करीत असता कृतमाल नामक देवानें येऊन त्यास विजयार्द्ध पर्वतातील घाट वगैरेंची माहिती सांगितली. भरतानें मग आपल्या सेनापतीस पाठवून दंडनीतीनें विजयार्द्धपर्वताच्या समीपवर्ती सर्व राजास आपलें अंकित केलें.

बत्तिसावें पर्वः—यानंतर भरत विजयार्द्ध पर्वतातील तमिस्रा नामक घाटानें आपल्या सैन्यासह बाहेर पडला व चिलात व आवर्त नांवाच्या म्लेच्छ राजाबरोबर युद्ध करून त्यानें त्यास जिंकून घेतलें. मग तो जेथून सिंधु नद हिमालयातून पडतो. त्या ठिकाणीं आला. येथील हिमालय पर्वताची शोभा पाहिल्यावर तो वृषभाचल पर्वत पहावयास गेला व तेथें एका शिलेवर आपली प्रशस्ति लिहून तो जेथें गंगानदी हिमालयातून पडते त्या स्थळीं आला. आपल्या सेनापतीस पूर्वखंड पादाक्रांत करण्यास पाठवून भरत स्वस्थ विश्रांति घेत पडला असता, त्या भागांतील विद्याधराचे स्वामी नमि व विनमि यांनीं भरताच्या भेटीस येऊन त्यास आपली सुभद्रा नामक भगिनी अर्पण केली. म्लेच्छ राजाना पादाक्रांत करून सेनापति परत आल्यावर भरत खंडकप्रपात नामक घाटानें दक्षिणेकडे आला.

तेहेतीसावें पर्वः—अशा रीतीनें पर्वत ओलांडीत येत असतां भरत कैलासपर्वतापाशीं आला, तेव्हां त्यानें त्या पर्वतावर जाऊन जिनेंद्रदेवाची पूजा व स्तुति केली, व नंतर तो ठिकठिकाणीं मुक्काम करीत दिग्विजयास निघाल्यापासून साठ हजार वर्षांनीं अयोध्येस परत आला.

चौतिसावें पर्वः—परंतु चारहि दिशांचा दिग्विजय करीत असतांना कोठेंहि न अडलेलें भरतानें चक्र अयोध्येच्या

बाहेर भचकून राहिलें याचें कारण अद्यापपर्यंत स्वतः भरताचे बंधू परस्परांतील मत्सरभाव सोडून त्याचे अंकित झाले नव्हते, असें सांगण्यात आल्यावरून भरतानें आपल्या बंधूस आपणास शरण येण्याविषयीं निरोप पाठविला. 'आमचा पिता जिवंत असतांना आम्ही त्याशिवाय इतरास प्रणाम कसा करावा' असें म्हणून भरताचे बंधू वृषभदेवाकडे सल्ला विचारण्यास गेले. वृषभदेवाच्या उपदेशानें त्या सर्वांनीं दीक्षा घेऊन तपश्चरणास सुरवात केली.

पसतीसावें, छत्तीसावें व सदतीसावें पर्व —भरताचा सापत्नबंधु बाहुबली यानें दीक्षा घेतली नाहीं, किंवा भरताच्या निरोपाप्रमाणें तो त्याच्या आज्ञेनुसार वागण्यासहि तयार झाला नाहीं. यामुळें भरतास त्याशीं युद्ध करणें प्राप्त झालें. बाहुबलीनें दृष्टियुद्ध, जलयुद्ध व मल्लयुद्ध या तीहींतहि आपल्या वडील बंधूस 'पराभूत केलें. परंतु साम्राज्यलक्ष्मीची ही चंचलता पाहून त्यास वैराग्य आलें, व त्यानें दीक्षा घेऊन तपश्चरण आरंभिलें, व केवलज्ञान प्राप्त करून घेतलें. भरत आपल्या राजधानींत आल्यावर मोठमोठ्या राजांनीं येऊन त्याचा राज्याभिषेक पार पाडला.

अडतीसावें, एकोणचाळीसावें व चाळीसावें पर्वः— नंतर भरतास धनदान करून लोकास संतुष्ट करण्यासाठीं महोदय यज्ञ करण्याची इच्छा झाली व त्यानें सदाचरणी लोक निवडून ब्राह्मणवर्णाची स्थापना केली, व त्यांना पूजा, जीविका, दान इत्यादिकांचा उपदेश केला, व गर्भान्वय दीक्षान्वय, कर्त्रन्वय, वगैरे क्रिया त्यास सांगून भूमी शुद्ध करण्याचे मंत्र, सात प्रकारचे पीठिकामंत्र, गर्भाधानादि क्रियांचे विशेष मंत्र इत्यादि गोष्टी त्यास पढविल्या

एकेचाळीसावें पर्वः—पुढें कालांतरानें भरतास एकदां दुःस्वप्न पडल्यावरून त्यानें वृषभदेवाकडे जाऊन आपल्या ब्राह्मणवर्णाच्या स्थापनेंत काहीं दोष राहिले आहेत कीं काय म्हणून विचारिलें. तेव्हां वृषभदेवानें सांगितलें कीं तू केलेली ही वर्णस्थापना चौथ्या कालाच्या अंतापर्यंत ठीक चालेल, परंतु पुढें कलियुगांत या ब्राह्मणांना अहंकार उत्पन्न होऊन ते लोकांस मिथ्याशास्त्रें पढवूं लागतील. हें ऐकून भरतानें घरीं आल्यावर अनिष्टशांत्यर्थ भगवंताला अभिषेक, दान वगैरे कृत्यें केलीं.

बेचाळीसावें पर्वः—पुढें एके दिवशीं राजेलोकांच्या सभेमध्ये भरत सिंहासनावर अधिष्ठित झाला असतांना त्यानें क्षत्रियधर्माचा उपदेश केला.

त्रेचाळीसावें पर्व —येथून पुराणाचा पुढील भाग गुणभद्रानें केला असल्यामुळें तो आरंभीं जिनसेनापेक्षां आपलें लघुत्व कबूल करतो. नंतर श्रेणिक राजानें गौतमगणधरास, स्वयंवरप्रवर्तक भरतपुत्र अर्ककीर्तीस जिंकणारा, व वृषभदेवाच्या ८४ गणधरांपैकीं ७१ वा गणधार जो जयकुमार त्याचें चरित्र विचारल्यावरून गौतम तें कथन करतो, अशा प्रस्तावनेनें पुढील कथेस आरंभ होतो जयकुमार हा हस्तिनापुरच्या सोमप्रभ राजाचा वडील पुत्र असून सोमप्रभानें दीक्षा घेतल्यावर तो राजा झाला. वाराणसी नगरीच्या अकंपन राजानें आपली सुस्वरूप कन्या सुलोचना हिचें स्वयंवर मांडल्यावरून त्यासाठीं इतर राजांप्रमाणें जयकुमारहि गेला असतां सुलोचनेनें त्यास वरमाळ घातली

चव्वेचाळीसावें पर्व —हें पाहून भरताचा मुलगा अर्ककीर्ति यानें मत्सरप्रेरित होऊन युद्धाची तयारी केली अकंपन राजानें त्याची समजूत घालण्याचा आपल्याकडून प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाला तेव्हां जयकुमार क्रोधाविष्ट होऊन अर्ककीर्तीशीं लढण्यास आला अर्ककीर्ति व जयकुमार या दोहोंत झालेल्या युद्धामध्यें जयकुमारास पूर्वोपकृत अशा एका नागदेवाकडून नागपाश व बाण मिळाल्यामुळें जयकुमारानें अर्ककीर्तीचा पराभव करून त्यास कैद केलें. युद्धांतील प्राणहानि पाहून जयकुमारास वाईट वाटलें व त्यानें घरीं आल्यावर भगवन्ताची स्तुति केली

पंचेचाळीसावें पर्व —अकंपनानें आपल्या मंत्र्याच्या सल्ल्यानें अर्ककीर्तीची क्षमा मागून त्याचा जयकुमाराशीं सलोखा करून दिला, व त्यास आपली धाकटी कन्या देऊन त्याची रवानगी केली इकडे जयकुमाराचाहि सुलोचनेशीं विवाह झाला अकंपनानें भरत चक्रवर्तीकडे आपला दूत पाठवून त्यास सुप्रसन्न करून घेतलें व मागून श्वशुरगृहाहून घरीं जात असतां जयकुमारहि भरताच्या भेटीस जाऊन आला. अकंपनास पुढें वैराग्य उत्पन्न होऊन त्यानें दीक्षा घेतली व त्यास केवलज्ञानाची प्राप्ति झाली

शेचाळीसावें व सत्तेचाळीसावें पर्व —एके दिवशीं एका विद्याधरविद्याधरीच्या जोडप्यास पाहून पूर्वजन्माचें स्मरण होऊन जयकुमाराच्या तोंडून 'हे प्रभावती' व सुलोचनेच्या तोंडून 'हे रतिवर' असे शब्द बाहेर पडले त्यामुळें लोकांनीं उगीच संदेहांत राहून शंका कुशंका काढूं नये म्हणून जयकुमारानें सुलोचनेकडून आपल्या पूर्वजन्मांची हकीकत सर्वांस सांगितली पुढें जयकुमार आपल्या भावास राज्य देऊन देशपर्यटन करून आला व नंतर आपल्या मुलास गादीवर बसवून त्यानें दीक्षा घेतली तेव्हां सुलोचनेस अत्यंत दुःख होऊन तिनेंहि दीक्षा घेतली पुढें एके प्रसंगीं भरतानें पृच्छा केल्यावरून वृषभदेवानें त्यास धर्मनिरूपण केलें व यानंतर काहीं काळानें वृषभदेव मोक्षाप्रत जाते झाले वृषभसेन गणधरानें भरताचें शांतवन केल्यावर तो स्वनगरीं परत आला. शेवटीं भरतहि विरक्त होऊन त्यानें दीक्षा घेतली व त्यास केवलज्ञान होऊन तो मुक्त झाला. यथाकालानें सर्व गणधरहि मुक्त झाले.

पर्यालोचन —आदिपुराणांतील कथासूत्र वर दिल्याप्रमाणें आहे या कथासूत्राच्या अनुषंगानें कवीनें ठिकठिकाणीं ऋतूंचें वर्णन, नगरांचें वर्णन, स्त्रियांच्या सौंदर्याचें वर्णन, ऋतूंचें वर्णन, वनलीलांचें वर्णन, सेनेचें वर्णन, युद्धाचें वर्णन इत्यादि अनेक गोष्टींना आपल्या ग्रंथात

समावेश करून काव्याचा परिपोष करण्याचा प्रयत्न केला आहे, पण त्याबरोबरच या ग्रंथांत आपल्या सर्व धर्मतत्त्वांचा समावेश करून आपल्या पंथाचा तो एक आदर्शभूत धर्मग्रंथ करण्याचें ध्येयहि कवीनें आपल्यापुढें ठेवलेलें आहे. यामुळे पुष्कळ ठिकाणीं पंथाबाहेरील वाचकास अगदींच तो नीरस होईल जेथें जेथें म्हणून वृषभदेवाशीं संबंध आला आहे तेथें तेथें कवीनें त्याचें एक स्तोत्र रचून ठेविलेलें असून एक दोन ठिकाणीं तर त्याची मजल अष्टोत्तरशत नामावलि किंवा सहस्रनाम यासारख्या अगदींच रुक्ष याद्या देण्यापर्यंत आली आहे. वृषभदेवाच्या ध्यानाचें वर्णन करण्याकरितां मवध एकविसावें पर्व (अडीचशेंहून अधिक श्लोक) खर्ची घातलें असून ३८–४२ हीं पांच पर्वें केवळ सांप्रदायिक तत्त्वें व विधी यांच्या हकीकतींनींच भरलीं आहेत पुराण जैन सांप्रदायिक आहे, तरी त्यावर ठिकठिकाणीं हिंदू पुराणाचीं छाप पडलेली दिसून येते. वृषभदेवास जैन लोक ईश्वरी अवताराप्रमाणें मानीत असल्याप्रमाणें त्याच्या गर्भप्रवेशाच्यावेळीं किंवा जन्माच्यावेळीं इंद्रादि देव आनंदोत्सव करतात व तो राज्योपभोगांत निमग्न झालेला पाहून त्यास अवतारकार्याची आठवण देतात. असलीं वर्णनें जरी कांहीं अंशीं साहजिक वाटलीं, तरी इंद्र प्रत्येक वेळेस मर्त्यलोकीं येऊन वृषभदेवापुढें चाकराप्रमाणें वर्तत असल्याचें दाखविण्यांत कवीनें बराचसा अतिरेक केलेला दिसतो. असल्या ग्रंथावर संस्कृत वाङ्मयाचें किंवा कवींचें वर्चस्व पडणें अगदीं अपरिहार्य होतें. उदाहरणार्थ, नवव्या पर्वांतील वज्रजंघ व श्रीमती यांच्या सहा ऋतूंतील भोगाचें वर्णन साधारणतः ऋतुसंहाराच्या धर्तीवर लिहिलेलें आहे. अकराव्या पर्वांतील वज्रनाभि राजाच्या व त्याच्या दीक्षागृहीत वज्रसेन पित्याच्या वैभवाच्या तुलनेचे ४९–५५ श्लोक वाचून कोणासहि रघुवंशांतील अज राजाच्या व त्याच्या संन्यस्त पित्याच्या तुलनेची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं 'स्वपूर्वापरकोटिभ्यां विगाह्य लवणार्णवं। मध्यें भारतवर्षस्य स्थितं तन्मानदंडवत्' (पर्व १८) यासारख्या कांहीं उपमांतून तर कालिदासाचीच शब्दरचना थोडासा फेरफार करून उसनी घेतलेली दिसते ('पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य स्थितः पृथिव्या इव मानदण्डः' हा श्लोकार्ध पहा). एकंदर संस्कृत कवींत या पुराणाच्या कर्त्याचा कालिदासाच्या ग्रथांशीं निकट परिचय होता हें त्याच्या 'पार्श्वाभ्युदय' नावाच्या काव्यावरून तर स्पष्टच दिसतें. या काव्यांत मेघदूतांतील प्रत्येक ओळ समस्यापूर्तीसाठीं घेऊन सर्व पार्श्वचरित्र लिहिलें आहे. कथानकाच्या दृष्टीनें या ग्रंथांतील विशेष म्हटला म्हणजे त्यांतील पुनर्जन्मविषयक भाग होय कथानकांत वृषभदेवाबरोबर जेवढ्या म्हणून व्यक्ती आल्या त्यांपैकीं जवळ जवळ बहुतेकांच्या पूर्वजन्माची हकीकत वृषभदेवाच्या पूर्वजन्माबरोबरच दिलेली पहावयास सापडते. एकंदर कथानकाचें अवलोकन केलें असतां असें दिसतें कीं, पहिल्या पिढीच्या कथानकांतीलच सर्व पात्रें आपल्या पापपुण्यानुसार पुनर्जन्म घेऊन दुसऱ्या पिढीच्या कथानकांत अवतरत आहेत. या बाबतींतील कवीची चिकाटी पाहून त्यानें पुनर्जन्मवादतत्त्वाच्या स्पष्टीकरणाच्या दृष्टीनेंच आपलें सर्व कथानक बसविलें आहे कीं काय, अशी कोणासहि शंका आल्याशिवाय राहणार नाहीं

कानडींत जें आदिपुराण आहे तें या संस्कृत आदिपुराणाच्या धर्तीवरच आहे त्याची रचना व भाषाशैली इतकी उत्कृष्ट आहे कीं, कानडी वाङ्मयांत त्याला फार वरचा दर्जा दिला जातो पंपकवीनें तें इ स ९४१ च्या सुमारास रचिलें.

**आदिबुद्ध**—नेपाळांतील एक 'ऐश्वरिक' बौद्ध पंथ यांत ध्यानी बुद्ध आहेत व इतर पूर्वकालीन विचारपद्धतींचा समावेश आहे या पंथाच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान व्हावें यासाठीं नेपाळांतील एकंदर पारमार्थिक परिस्थिति लक्षांत घेतली पाहिजे धार्मिक व लौकिक अशा दोन्ही प्रकारच्या मध्ययुगीन बौद्ध वाङ्मयाचें नेपाळ हें एक आगरच आहे. या ठिकाणीं स्तूप व इतर प्राचीन पवित्र गोष्टी जागजागीं आढळतात येथील ब्राह्मणानुयायी लोकहि महायानपंथातील बोधिसत्व आणि बुद्ध यांची उपासना करितात व आपल्यांतील जुने विधी आचरतात; पण बौद्धसंप्रदायस्वरूपामध्यें पुष्कळच बदल झाला आहे व "संघ" कधींच नाहींसा झाला आहे. ब्रह्मचारी, भिक्षू व विवाहित वज्राचार्य यांच्यामध्यें कांहीं फरक जर असेल तर तो केवळ नावाचाच आहे. स्वाभाविक, ऐश्वरिक, कार्मिक आणि यात्निक हे जे चार तत्त्वज्ञानांतील पंथ नेपाळांत विशेष रुजले आहेत, त्यांच्या ठिकाणीं बौद्धसंप्रदायाचा फारच थोडा अंश उतरला आहे. हे सर्व नावापुरतें त्रिरत्नाला मानतात. त्यांच्या मतें 'बुद्ध' म्हणजे मन 'धर्म' म्हणजे जड द्रव्य आणि 'संघ' म्हणजे गोचर सृष्टींत या दोघांना जोडणारा दुवा होय. वास्तविक, स्वाभाविक हे केवळ चार्वाक आहेत. ऐश्वरिक हे नैय्यायिक आणि ईश्वरवादी मीमांसक यांच्याशीं बरेचसे सदृश वाटतात. कार्मिक आणि यात्निक लोक, दैव आणि पुरुषाकार यासंबंधीं भारतीयांत सर्वमान्य असणारीं मतें प्रतिपादितात. हे सर्व पंथ प्राचीन आहेत; पण त्यांचा बौद्ध त्रिमूर्तीशीं वर वर असणारा संबंध व संघ शब्दाला आलेला विलक्षण अर्थ यांचमुळें कदाचित् हल्लीं नेपाळांत दिसणारें स्वरूप त्यांना प्राप्त झालें असेल.

सूतसंस्कृतींतील अवतारकल्पना, आणि वेदांतांतील सर्व जग ब्रह्ममय आहे, हा विचार, व त्याच्यायोगानें देशांतील अनेक उपासना, व अनेक ऐतिहासिक पुरुषांचें अनुयायित्व यांचें एकीकरण इतिहासपुराणवाङ्मयाच्या मार्फत झालें व तें वेदांतामार्फत वेदपरंपरेशीं जोडण्यांत आलें. व ज्या क्रियेनें हिंदुस्थानांतील अनेक जातींस व वंशांस एका पद्धतीखालीं आणलें ती क्रिया हिंदुस्थानाबाहेर बौद्धांमार्फत झाली. ब्रह्म,

आरंभ यासवर्षां मतें गौतमास मान्य नव्हतीं पण गौत माच्या अनुयायांत, चोहोकडे धर्मप्रसार करण्याची इच्छा उत्पन्न झाली, तेव्हां त्याच्यापुढेंहि स्थानिक उपासना व मतें यांचा बौद्धसंप्रदायाशीं संगति उत्पन्न करून देण्याचा प्रश्न आला व तो त्यांनीं भारतीय विचारपद्धतीनेंच सोडविला भार तीय जनतेंत रूढ असलेल्या विचारक्रमाचा म्हणजे कर्मवाद, पुनर्जन्म अवतारकल्पना, 'सर्व जगाचें एक आदिकारण' या तऱ्हेच्या कल्पनांचा तत्कालीन विचेचा अभ्यास करणा ऱ्याच्यावर परिणाम झाला नसणें अशक्य होतें बुद्ध गौतमा वर तो झाला होता, पण गौतमास आपल्या विचाराचा पद्ध तशीर मांडणी करण्याची आवश्यकता पडली नाहीं त्या मुळें तो त्याच्याकडून मांडलाहि गेला नाहीं पद्धतशीर मांड णीनी जरूर पुढें अनुयायास भासली वेदांत त्यांनीं जरी उघडपण घेतला नाहीं तरी प्रच्छन्नपणें त्यांनीं वेदांतित्व पत्करलें त्या तऱ्हेचीं मतें वेदांतानें प्रतिपादिलीं त्या त ऱ्हेचीं मतें ब्राह्मणजातिसंबद्ध ब्रह्मशब्दास वगळणाऱ्या व बुद्ध शब्दाचें महत्त्व वाढवू इच्छिणाऱ्या त्यांना अन्यरूपांत मांडावीं लागलीं 'ब्रह्म'शब्दाच्याऐवजी 'बुद्ध' शब्द सोंवळा केलेला, तर सर्व व्यापक तत्त्व ब्रह्म म्हणण्याच्या ऐवजी बुद्धत्व म्हटलें म्हणजे झालें या प्रसारकांनीं ऐतिहासिक बुद्धास पुसटून टाकलें नाहीं, पण त्याच्या चरित्राच्या मांडणींत फरक केला, एवढेंच नव्हे तर "ऐतिहासिक बुद्ध" म्हणून अनेक होऊन गेले असें दाखविलें व त्याऱ्यापेक्षाहि जबरदस्त बुद्ध उत्पन्न केले निर्वाणप्राप्ति म्हणजे बुद्धीभवन होय किंवा अति मानुष श्रेयस्कर अशा अनेक स्थितींच्या सोपानपरंपरेनें एकसारखें वर चढत जाणें हें आयुष्याचें आदिकर्तव्य होय जेणेंकरून गौतम ज्या स्थितीला पोंचला त्या स्थितीला आपण पोंचू इत्यादि गोष्टी प्रसारकांनीं प्रतिपादिल्या आहेत, शिवाय जगाचें आद्यकारणतत्त्व त्यासच बुद्ध म्हटलें आहे

या तऱ्हेची विचारपरंपरा महायानाच्या अनेक संप्रदा यांत (मग तो संप्रदाय नेपाळांत, चीनमध्यें, किंवा जपानांत निघो) प्रगट होऊन तिनें स्थानिक दैवतें, विश्वोत्पत्तिकल्पना व बुद्धाचें नांव यांत संबंध उत्पन्न करून बौद्धसंप्रदायाचे अनेक पंथ निर्माण केले त्यांतच प्रस्तुत लेखाचा विषय अस लेले व आदिबौद्ध नांवाखालीं चालू असलेले संप्रदाय येतात

संशोधकाचें या पंथाकडे लक्ष— महायानपंथा तील अनेक संप्रदाय जरी संशोधकास बरेच परिचित आहेत तरी आदिबुद्धपंथाकडे लक्ष नवीनच गेलें आहे. हॉडसन याच्या लेखावरून यूरोपीय पंडितास आदि बुद्धाचें नांव प्रथम माहीत झालें असें 'अबेल रेमुसत' यानें इ. स. १८३१मध्यें जें म्हटलें तें निःसंशय खरें आहे हॉड सन यानें आपल्या निबंधांत नेपाळांतील ऐश्वरिक बौद्धांच्या दर्शनाची ज्याप्रमाणें सोपपत्तिक व संपूर्ण माहिती दिली आहे त्याप्रमाणें ती इतरत्र कोठेंहि सांपडत नाहीं पाश्चात्य पंडित एकेश्वरी व ऐश्वरिक बौद्धदर्शनाचें जरी प्रथम फार काळजीपूर्वक अध्ययन करीत असत तरी पुढें स्पेन्सहार्डी व बर्नाफ यांच्या प्रयत्नामुळें लोकांचें लक्ष फिरून त्या प्राथमिक अथवा प्राचीन बौद्धदर्शनाकडे वळलें गेल्या काहीं वर्षांत जे प्रतिमालेखाचे शोध लागले आहेत व तिबेटी वाङ्मयाच्या अध्ययनाकडे जें लक्ष लागलें आहे, त्यामुळें ऐश्वरिक बौद्धमतास फिरून प्राधान्य प्राप्त झालें आहे सदर दर्शनांत महायानाच्या तात्त्विक, गूढ व दैवतेतिहासात्मक विचाराचें जें एकीकरण झालें आहे त्यामुळें त्याचें अध्ययन करणें महत्त्वाचें आहे इतर बौद्धदर्शनांत जें ऐश्वरिक मत दृष्टीस पडत नाहीं तें यांत प्राचुर्यानें दृष्टीस पडतें हा या दर्शनाचा विशेष आहे महायानाच्या विचाराची परिणति जास्त व्यापक अशा ईश्वरकल्पनेंत व जगत्कल्पनेंत झाली ऐश्व रिकदर्शन हें अर्धवट नैय्यायिक (इं० ईश्वरास्तित्ववादी) व अर्धवट शैव (इं० सर्वेश्वरत्ववादी) आहे असें दिसून येतें तथापि ऐश्वरिकदर्शन व महायान यांत अगदीं स्पष्ट फरक असल्यामुळें हा आदिबुद्धपंथ एक निराळाच स्वतंत्र तिसरा किंवा चौथा बौद्धपंथ होता असें बर्नाफ यानें प्रति पादन केलें आहे, हा संप्रदायभेद केवळ विचारभेद न राहता, नवीन पाठभेद उत्पन्न करण्यापर्यंत पोंचला आहे "कारणापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व गोष्टींचें कारण तथागतानें स्पष्ट करून सांगितलें आहे या सूत्राच्या जागीं "कारणा पासून उत्पन्न होणाऱ्या गोष्टींचें तथागत हेंच कारण आहे" असा पाठभेद आदिबौद्धांनीं घेतला आहे असें हाडसन म्हणतो हॉडसननें विवेचिलेल्या ऐश्वरिकाचा दुसरा एक हा विशेष होता कीं, त्याच्या दर्शनांत स्त्रीविषयक, तांत्रिक व ऐन्द्रजालिक भाग मुळींच नव्हता पण ऐश्वरि कांत हा भाग पुष्कळच आहे हाडसनची शोधपद्धति सदोष होती हॉडसन यानें या विषयाची माहिती जुन्या शास्त्रीमंडळीकडून मिळविली होती तो त्याच्या शब्दास देववाणीप्रमाणें प्रमाण मानीत असे शिवाय तुमच्या म्हण ण्यास आधार काय असें त्यानें त्या शास्त्रीलोकांस विचारलें तर ते त्यास कुठल्यातरी ग्रंथांतील भागाचा आधार दाखवून त्याचें समाधान करीत असत, व हाडसन त्याची पूर्ण तपासणी करण्यास समर्थ नव्हता अशी शंका येते. हाडसननें यूरोपीय कल्पनांनीं प्रश्न विचारावे, व पंडितांनीं अनुरूप उत्तरें द्यावीं असें झाल्यानें धर्मकल्पना जरा अर्वा चीन विचारास साजतील अशाच मिळावयाच्या

स्वयंभू पुराण—हा एक ग्रंथ आधारार्थ हाडसननें घेतला ज्यांत विशेष तांत्रिक भाग नाहीं अशा या पुराणावरून पंथस्वरूप ठरविणें योग्य नाहीं नेपाळी ऐश्वरिक वाङ्मयांत जरी दैवतकथासंग्रहाचा बराच मोठा भाग होता तरी तो पंथ शैव विचाराऱ्या संसर्गापासून अगदींच अलिप्त नव्हता

आदिबुद्धदर्शनाचा यथार्थबौद्धधर्माशीं व हिंदूच्या सामान्य विचारपद्धतीशीं काय संबंध होता त्यानें संशोधन

करणें यांतच आदिबुद्धदर्शनाचें महत्त्व आहे. याचा पुढील तीन रीतींनीं थोडा विचार केला असता सोईस्कर होईल"— (१) साधारण प्रसिद्ध असलेल्या आदिबुद्ध दर्शनांची संक्षिप्त माहिती, (२) आदिबुद्ध दर्शनाच्या पूर्वगामी पद्धतींचें संशोधन; व (३) आदिबुद्धदर्शनाचें स्थान व त्याचें तात्त्विक व ऐतिहासिक विवेचन.

आ दि बु द्ध द र्श न —बुद्ध हें ब्रह्माप्रमाणें आदितत्त्व आहे पण तें तत्त्वज्ञान सामान्यास गोचर कसें होणार सामान्य वर्ग गवाक्षता टाकून मोकळें होऊं पहाणारा! तेव्हां त्या अव्यक्तासहि व्यक्तत्व देणें भाग पडलें आदिबुद्ध किंवा परमादिबुद्ध हा ब्रह्माप्रमाणें स्वयंभू असून त्या नावानेंच काठमाडु येथील देवालयात एका मूर्तीची पूजाअर्चा करण्यात येते आदिबुद्धास कोणी कधीं पाहिलें नाहीं, तो निर्वाणस्थितींत आहे, तो शुद्ध तेज:स्वरुपी आहे, तो शून्यतेमधून प्रगट होतो व तो अनेक नावांनीं प्रसिद्ध आहे. त्याला उद्देशून कोणी प्रार्थना करीत नाहींत, असें म्हणतात तथापि त्याच्या देवळात त्याची पूजा करण्यात येते ज्याला एकनिष्ठभवन म्हणतात अशा उच्च प्रदेशात तो राहतो. त्या उच्च प्रदेशाला चैत्याचा कळस आहे असें म्हणतात अनेक निराकार स्वर्ग आहेत असें जें बौद्धविश्वरचनाशास्त्रात म्हटलें आहे त्याचें येथें विस्मरण झालेलें दिसतें प्रत्येक देवतेप्रमाणें त्याला एक मंडल किंवा गूढवलय असतें.

अव्यक्तास व्यक्त स्वरूपात आणणाऱ्या, म्हणजे ब्रह्मस्वरूपी तत्त्वाचा ऐतिहासिक बुद्धाशीं संबंध उत्पन्न करणाऱ्या अनेक माळण्या आहेत. एकींत आदिबुद्ध, ध्यानीबुद्ध, मानुषी बुद्ध या परंपरेनें अव्यक्त तत्त्व आणि गौतम यात संबंध उत्पन्न केला आहे.

हा आदिबुद्ध किंवा महाबुद्ध आपल्या पाच ध्यानकर्मांनीं पाच ध्यानीबुद्ध निर्माण करितो ते येणें प्रमाणें -(१) वैरोचन, (२) अक्षोभ्य, (३) रत्नसंभव, (४) अमिताभ, आणि (५) अमोघसिद्ध. हे प्रवृत्तिजगांत आहेत, त्यांची प्रार्थना करीत नाहींत. आदिबुद्धाप्रमाणें त्यांचीं चैत्य नावाचीं देवालयें आहेत. ज्यांच्या योगानें ते उत्पन्न होतात त्या ज्ञान व ध्यान या शक्तींनीं ते ध्यानी बोधिसत्त्व उत्पन्न करितात. उदा. समंतभद्र, वज्रपाणि, रत्नपाणि, अवलोकित अथवा पद्मपाणि व विश्वपाणि ते जड विश्व निर्माण करणारे आहेत. परंतु ते जीं विश्वें निर्माण करितात तीं नश्वर असतात. आणि अशा प्रकारचीं तीन विश्वें आतापर्यंत नष्ट झालीं आहेत ज्यात सध्या आपण आहोंत तें अशा प्रकारचें चौथें विश्व आहे. तें चौथ्या बोधिसत्त्वाचें म्हणजे अवलोकितेश्वराचें कार्य आहे. तोच हल्लींच्या विश्वाचा ईश्वर आहे. नाथ व जिन (जेता) असा अमिताभ हा त्याचा विशिष्ट बुद्ध आहे. चौथा मानवी बुद्ध जो शाक्यमुनि तो त्याचा उपदेश आहे. एकंदर पाच मानुषी बुद्ध आहेत. हे पाच मानुषीबुद्ध पाच ध्यानीबुद्धांचे संवादी आहेत याचा अर्थ ते ध्यानीबुद्धापासून उत्पन्न झाले आहेत, म्हणजे ते त्याचे अवतार आहेत, असें नसून ते केवळ ध्यानीबुद्धांचें प्रतिबिंब किंवा निर्माणकाय आहेत.

कारंडव्यूह, श्रीकालचक्रतंत्र, नामसंगीति व तांत्रिक ग्रंथ हॉडसन यानें ज्या ग्रंथाचा आधार घेतला होता त्या 'कारंडव्यूहात' मांडणी निराळीच आहे. या ग्रंथाचा काल ठरविणें हें कठिण आहे काव्यस्वरूपात असलेल्या कारण्डव्यूहासंबंधानेंहि तीच अडचण उत्पन्न होते. परंतु त्या कारण्डव्यूहाच्या गद्यस्वरूपी ग्रथाचें जें तिबेटी भाषांतर आहे त्यावरून त्याची अखेरची कालमर्यादा ठरविता येते. सदरहू गद्यात्मक कारण्डव्यूहात पद्यात्मक कारंडव्यूहात दृष्टीस पडणारा पुढील भाग गाळलेला आहे: 'आदिबुद्ध, स्वयंभू, आदिनाथ हा ज्योतिरूपात प्रथम उत्पन्न झाला' तो प्रथम विश्वोत्पत्तीसंबंधीं ध्यान करितो व सृष्टीचें काम पुढें चालविण्याकरिता अवलोकितेश्वरास उत्पन्न करितो (अवलोकितेश्वर पहा). त्यानें बुद्ध उत्पन्न केले असें म्हटलें नसून फक्त पाच बुद्धाच्या अंशानीं तो बनला आहे असें मानण्यात येतें.

आदिबुद्ध अथवा परमादिबुद्ध हें नाव प्राचीन लेखातून दृष्टीस पडतें. हें नाव व त्याच्याशीं संलग्न असलेलें दर्शन याचा आणि श्री कालचक्रतंत्र याचा अत्यंत निकट संबंध आहे. श्रीकालचक्रतंत्र हें शैवसंप्रदायाच्या स्फूर्तीनें उत्पन्न झालेलें असून त्याची माहिती हिंदुस्थानात १० व्या शतकात व तिबेटात ११ व्या शतकात झाली.

महायान, तान्त्रिक व आदिबुद्धदर्शन —" तान्त्रिक बौद्ध मत " हें महायानापासून थोडेसें निराळें आहे. हें वेदांताशीं सदृश आहे. आणि यात आदिबौद्धमत प्रतिबिंबित झालें आहे. चौथ्या शतकातील तांत्रिक ग्रंथकार(" असंग " पहा) हा आदिबुद्धाचा उल्लेख करतो. तंत्रें हीं ज्या काळात होतीं म्हणून समज होता त्यापेक्षा तीं अधिक प्राचीन आहेत ही गोष्ट आता सर्वांस विदित झाली आहे. नामसंगीतिग्रंथात मंजुश्रीस आदिबुद्ध म्हटलें आहे हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. मंजुश्रीचें नेपाळी स्वरूप निर्णीत झालें तें हिंदुस्तानातील स्वरूपास चीनमध्यें चिनीसंस्कार होऊन मग तें नेपाळात आलें असें ड. ला व्हाली पूसीं आपल्या (एन. रि. एथिक्स मधील) मंजुश्रीवरील लेखात म्हणतात. मंजुश्रीला नेपाळी तिबेटी व चिनी बौद्धसंप्रदायात मनूप्रमाणें संस्कृतीचा संस्थापक बनविलें आहे. चंद्रकीर्तीचा (७ वें शतक) समकालीन चन्द्रगोमिन् यानें नामसंगीतीवर टीका लिहिली आहे, असें जें तारानाथानें प्रतिपादन केलें आहे ते जर खरें असेल तर नामसंगीति हा ग्रंथ दहाव्या शतकाच्या पूर्वी लिहिला असावा असें निश्चयानें म्हणता येईल नामसंगीति व अनेक तान्त्रिक ग्रंथ याच्या टीकेमध्यें जे अर्थ केले आहेत ते ग्रंथोत्पत्तीच्यावेळीं ग्राह्य मानीत असत

किंवा नाहीं याची येथें मीमांसा करण्याचें कारण नाहीं. आपण माडणी तेवढी पाहूं. ज्यापासून बुद्धाची उत्पत्ति होते तें ज्ञान तो मूर्तिमंत असल्यामुळें, व तो बोधिसत्व (म्हणजे ज्ञानसत्व) यापेक्षा अधिक असल्यामुळें आणि धर्मकाय अथवा धर्मधातुवागीश्वर असा असल्यामुळें मंजुश्रीला आदिबुद्ध म्हणण्यास चांगलीं कारणें होतीं असें म्हणावें लागतें. त्याच्या मूर्तीत अज्ञानाचा नाश करणारें खड्ग व प्रज्ञापारमितेचा महाग्रंथ हीं त्याचीं दोन आयुधें दाखविलेलीं असतात. ज्याप्रमाणें प्रज्ञापारमितेला (जिला पुढें आदिप्रज्ञा म्हणूं लागले) पुराणमताभिमानीग्रंथात बुद्धमाता म्हणतात त्याप्रमाणें मंजुश्री हा वादीराज व वागीश्वर असल्यामुळें त्यालाच लक्षणेनें त्रिकाल आदिबुद्ध म्हणण्याचा प्रघात पडला होता. तो तथागताच्या अंशापासून उत्पन्न झाला, किंवा त्याच्या उलट त्याच्या शरीरातून पाच बुद्ध उत्पन्न झाले असें ग्रंथातरीं म्हटलेलें आहे. मस्तकावर पाच बुद्ध आहेत असा त्याच्या मूर्ती आहेत किंवा ते पाच बुद्ध त्याच्या शीर्षाभोंवतालच्या तेजोवलयात प्रतिष्ठित झालेले दाखविण्यात येतात. तो चतुर्मुख असून सरस्वतीपति होता व त्यामुळें त्याच्यात व महादेवात विलक्षण साम्य दाखविण्यात येतें. शिवाय कधीं कधीं त्याचें कामदेव किंवा शिव याच्याशींहि तादात्म्य करण्यात येतें हें सर्व जरी खरें असलें तरी मंजुश्री हा प्रज्ञेचा राजा होता म्हणून त्यास आदिबुद्ध म्हणत असत ही गोष्ट खरी आहे (मंजुश्री पहा.).

कांहीं लेखातून जरी मंजुश्रीला तान्त्रिक आदिबुद्ध म्हटलेलें आहे तरी तात्त्विक विवेचनापासून त्याना उदगम झाला होता ही गोष्ट निर्विवाद आहे. तंत्रातील आदिबुद्ध निराळ्या स्वरूपाचा होता व तो आणि ब्रह्मा किंवा विष्णू याच्यापेक्षा तो व शिवब्रह्मा (हा वज्रसत्व वज्रधर) याच्यात अधिक सादृश्य होतें.

आ दि बु द्ध द र्श ना च्या पू र्व गा मी प द्ध ती — हीनयानापासून वर दाखविलेल्या बुद्धधर्माच्या स्वरूपापर्यंत कसकसा विकास होत गेला हे कळण्यासारखें आहे (महायान पहा). आता निर्वाणस्थितींतील बुद्ध, बोधिसत्व, बुद्ध व बोधिसत्व याच्याविषयीं घोटाळा, या तीन देहाचा वाद व ध्यानीबुद्ध याचा विशेषतः वैभाज्यवादी स्थविर वैतुल्यक या मताप्रमाणें विचार करावयाचा आहे.

अर्धवट निर्वाणस्थितींत असलेले बुद्धः—वैभाज्यवादी व स्थविर याच्या मतानें निर्वाण म्हणजे विनाश, याहून दुसरें कांहीं नाहीं. विधिविषयक ग्रंथात याविषयीं कांहीं निश्चित विधान केलेलें नाहीं ज्याप्रमाणें सागरातील उदकाची मोजदाद करणें शक्य नाहीं त्याप्रमाणेंच निर्वाणस्थितींतील बुद्ध ज्ञानगम्य नाहींत कारण ते अनंत आहेत असें त्यात प्रतिपादन केलेलें आहे. यावरून असेंहि अनुमान काढिलें आहे कीं, निर्वाण ही जरी अनिर्वचनीय अवस्था आहे तरी ती शून्यतेहून भिन्न आहे.

सुखावती, महावस्तु, सद्धर्मपुंडरीक, धर्मसंगीतिसूत्रें, लंकावतार व बोधिचर्यावतार.- निर्वाणाबद्दल अधिक मीमांसा करण्याचा स्वर्गात देवी बुद्धाची वसति आहे हें दाखविण्याकरिता ब्राह्मणी पद्धतीनें त्या प्रश्नाची वाटाघाट करण्याची आवश्यकता नाहीं. कारण कल्पातापर्यंत आपलें आयुष्य वाढविण्याचें सामर्थ्य शाक्यमुनीमध्यें आहे असें पहिल्या वर्गातील सुत्तात म्हटलें आहे. देवास व मानवास अदृश्य असला तरी तो जिवन्तच होता असें मानण्यात येत होतें यात शंका नाहीं. आणि या कामीं जुन्या ग्रंथाप्रमाणेंच नवे ग्रंथकारहि वरील कल्पनेवर विश्वास ठेवण्याला तयार होते. शरीरसौंदर्याचा यत्किंचित न्हास न होता तो बुद्ध कोट्यानुकोटि कल्पें जिवंत राहतो असें 'सुखावतींत' म्हटलें आहे. परंतु शाक्यमुनि तर पुरीं ऐशीं वर्षेंहि जगला नाहीं. त्याचें दीर्घायुष्यत्व एक त्या तथागतासच माहीत!

शाक्यमुनि, गणितांहि बुद्ध, फार काय पण होणाराहि बुद्ध (बोधिसत्व) हा आपल्या अंतकाळीं साधारण माणसाप्रमाणें घाबरलेला, काळजींत असलेला, वडबड करीत असलेला, हातपाय हालवीत असलेला, किंवा यातना सोशीत असलेला, दृष्टीस पडतो असें महावस्तूंत सांगितलें आहे. परंतु हें केवळ तो आपल्या समजुतीकरिता करितो, वास्तविक पाहूं गेलें तर तो विलक्षण असून वर निर्दिष्ट केलेल्या सर्व विकाराच्या पलीकडचा व त्यापासून अलिप्त असा आहे. याच्याविरुद्ध मत प्रतिपादन करणें म्हणजे पाखंडवाद करणें होय असें मानण्यात येतें पुढील बुद्धाचा देह अमूर्त असल्याची समजूत आहे. त्यात ऐहिक भाग नाहीं. बोधिसत्वास वास्तविक माता, पिता, पुत्र इत्यादि कांहीं नाहींत अशी कल्पना आहे. हा लोकोत्तरवाद वैतुल्यक पंथाच्या वाङमयात विशेष स्पष्ट रीतीनें सांगितला आहे. त्याच्या मतानें शाक्यमुनीनें ह्या जगात प्रत्यक्ष अवतार कधीं घेतलाच नाहीं. परंतु आपला संदेश जगाला देण्याचें काम त्यानें एका मूर्तीकडे सोंपविलें.

पुष्कळ युगाच्या पूर्वी शाक्यमुनीनें दुसऱ्या एका प्राचीन शाक्यमुनीच्या समक्ष बोधिमत घेतलें असें महावस्तूंत सांगितलें आहे. आठ हजार दीपंकर नावाच्या बुद्धाचा, तीन अब्ज शाक्यमुनींचा त्याच पुस्तकात उल्लेख आहे. हा प्राचीन बुद्ध व प्रचलित बुद्ध हे दोघे एकच होते असें जर आपण मानलें, सर्व दीपंकर, सर्व शाक्यमुनि सर्व ध्वजोत्तम, यांच्या जागीं जर आपण एक दीपंकर व एक शाक्यमुनि समजलें, आणि वैतुल्यकाप्रमाणें शाक्यमुनीनें भौतिक देह धारण केलाच नाहीं असें धरून चाललों तर आपणास सद्धर्मपुण्डरीकपद्धति म्हणजे काय होती याची कल्पना येईल. अनेक युगापूर्वी म्हणजे सुरवातीस शाक्यमुनि बुद्ध झाला, त्याचे ह्या लोकांचे अवतार म्हणजे ज्यात तो बुद्ध झालेला दिसतो व शेवटीं निर्वाण अवस्थेप्रत जातो

ती सर्व माया आहे. महावस्तूंत अशेरचें स्वरूप जरी फार उशीरा प्राप्त झालें तरी वर सांगितलेल्या ख्यातील कल्पना फार प्राचीन असल्याचें दिसून येतें. सद्धर्मपुंडरीकाचा काल इ. स. २६५ हा आहे. शाक्यमुनीनें भौतिक देह धारण केलाच नाहीं या कल्पनेचा पाटलिपुत्राच्या राजसभेंत (सुमारें ख्रि पू. २४६) धिक्कार केला. ऐतिहासिकदृष्ट्या जरी राजसभेची गोष्ट संशयास्पद असली तरी बौद्धलोकांमध्यें पुढील कल्पना फार प्राचीन काळीं प्रचलित होत्या हें निर्विवाद आहे. (अ) शाक्यमुनि हा आपल्या ऐहिक परिनिर्वाणानंतर ध्यानस्थस्थितीमध्यें आहे. तो बुद्ध झाल्यावेळेपासून त्या अवस्थेंतून बाहेर पडलाच नाहीं. तो खरोखर निर्वाणास केव्हा प्राप्त होईल हें शोधून काढण्याचें कारण नाहीं "ज्ञान व गुण यानीं मंडित, दया व परोपकार यांचे केवळ पुतळे, अनेक जीवांचे आधार, नित्यसमाधीमध्यें राहणारे असे ते भाग्यशाली बुद्ध संसारामध्येंहि नाहींत व निर्वाणातहि गेले नाहींत" असें धर्मसंगीतिसूत्रात सांगितलें आहे (आ) वैभाज्यवाद्याच्या (पुराणमतवाद्याच्या) मतानें शाक्यमुनीनें बुद्ध झाल्यावर कांहीं अवशिष्ट भाग मागें ठेवून निर्वाणात प्रवेश केला. तो अवशिष्ट भाग म्हणजे प्रेरणा करणारा जो आत्मा किंवा विचार करणारी जी बुद्धि त्याच्या व्यतिरिक्त देह. त्या देहात जिवंत राहण्याचे व बोलण्याचे व्यापार शिल्लक राहिले आहेत. परंतु ध्यानावस्थेंत बोलण्याचा व्यापार चालू असणें शक्य नाहीं म्हणून त्या देहास माया देह असें म्हणतात.

दिव्य बोधिसत्वः—महायानपंथामध्यें एक असा सिद्धांत आहे कीं बोधिसत्व हा अतिशय कृपाळू व मानवप्राण्याच्या संरक्षणाकरितां निर्वाण न पावलेल्या विभूती होत. वस्तुतः विभूतिमत्त्वानें बोधिसत्वापेक्षा बुद्ध हे श्रेष्ठ आहेत, परंतु अधिकाराच्या दृष्टीनें बोधिसत्व जास्त आहेत. प्रत्येक बुद्ध, बुद्धस्थिति प्राप्त होण्यापूर्वी बोधिसत्व असल्यामुळें व दिव्य बोधिसत्वापासूनच त्यास बुद्ध होण्याचा आदेश मिळत असल्यामुळें बुद्धाचा उगम बोधिसत्वापासून मानण्यात येतो परंतु याच्या उलट बोधिसत्व यासहि 'जिनपुत्र' म्हणण्यात येतें, कारण त्याचें बौद्धतत्त्वाचें ज्ञान बुद्धाच्या शिकवणुकीपासूनच प्राप्त झालेलें असतें. हीनयानपंथामध्ये देखील भविष्यकालीन 'बुद्धास बुद्ध होण्याचा अगाऊ आदेश अगोदरच्या बुद्धापासूनच मिळतो. 'लंकावतार' ग्रंथामध्यें बोधिसत्वास बुद्धापासून नुसता आदेशच नव्हे तर अभिषेकहि होत असतो असें म्हटलें आहे. याच्या उलट गांधार शिल्पामध्यें कांहीं बोधिसत्वांच्या हातीं अभिषेककलश असलेले दाखविले आहेत. प्राचीन बौद्ध उत्पत्तिमताप्रमाणें प्रत्येक बुद्ध असंख्य बोधिसत्वामध्यें आध्यात्मिक जीवन उत्पन्न करतो. परंतु शिल्पामध्यें बुद्धाबरोबर आढळून येणारे हे बोधिसत्व, बुद्धाच्या पुत्राप्रमाणें दि त नसून धाकट्या भावाप्रमाणें दिसतात.

बुद्ध आणि बोधिसत्व याच्या कल्पनेंतील घोटाळा — या वरील विवेचनावरून हें स्पष्ट दिसून येईल कीं, बुद्ध व बोधिसत्व याच्या स्पष्ट कल्पनामध्यें बराच घोंटाळा असल्यामुळें त्याची बरोबर व्याख्या करणें अशक्य आहे महावस्तु, बोधिचर्यावतार, कारंडव्यूह इत्यादि ग्रंथांमधील घोंटाळ्याचा उलगडा होत नाहीं वर म्हटलेंच आहे कीं, अध्यात्मदृष्ट्या बुद्ध हे बोधिसत्त्वाचे एकाच वेळीं पिता व पुत्र मानण्यात येतात बुद्ध व बोधिसत्व यामधील या गूढ स्वरूपाच्या संबंधाबद्दल अध्यात्मदृष्ट्या मेळ घालता येईल, परंतु या बाबतींतील महत्त्वाचा पुरावा गांधार, मागध शिल्पावरून व प्रतिमाशिल्पावरील ग्रंथावरून मिळणार आहे

'त्रिकाय' सिद्धांत—वर उल्लेखिलेला परस्परविरोधी पुरावा बौद्ध दैवतविज्ञानात एकत्रित झाला असून त्या ठिकाणीं सर्व प्रकारचा विरोध नाहींसा होतो महायान पंथामध्यें 'त्रिकाय' सिद्धांतात प्रमुखपणें हाच विषय विवेचन केला आहे ह्या सिद्धांतात बुद्धाला (१) धर्मकाय, (२) संभोगकाय व (३) निर्माणकाय अशीं तीन शरीरें असल्याचें सांगितलें आहे बुद्ध किंवा दुसरी कोणतीहि व्यक्ति निर्वाणस्थितींत जेव्हा प्रवेश करते तेव्हा तिला 'धर्मकाय' (शून्यत्व) याची प्राप्ति होते, असें महायान पंथांपैकीं माध्यमिकाचें म्हणणें आहे, परंतु योगाचार याचाच अर्थ रूपशून्यत्व म्हणजे सद्वस्तुमात्रत्व असा करितात. बुद्धाचें खरें शरीर "संभोगकाय" हेंच होय. कारण धर्मकाय म्हणजे वस्तुतः शून्यत्वच होय. संभोगकाय हें अतिमानुष असून त्यामध्यें आनंद, सद्गुण, ज्ञान इत्यादिकाची स्थिति असते. उदाहरणार्थ, श्रीकृष्णानीं भगवद्गीतेमध्यें अर्जुनास दाखविलेलें विश्वस्वरूप हें संभोगकायच होय. शाक्यमुनि ज्या शरीरानें या जगतात बुद्धस्वरूपात अवतार घेतो, तें शरीर 'निर्माणकाय' होय.

ध्यानी बुद्ध.—वरील सिद्धांताच्या अनुरोधानें अमिताभ वगैरे जे मूळचे बुद्ध म्हणून मानले जातात, तेच कालांतरानें बोधिसत्व, वज्रधर वगैरे झालेले दिसतात. प्रत्येक बुद्धास आपल्या 'संभोगकाय' शरीरात असताना एक स्त्री असे व तीपासून बोधिसत्व उत्पन्न होतो.

प र्या लो च न.—अशा रीतीनें ह्या घोंटाळ्याच्या दैवतविज्ञानात कांहीं तरी सुसंबद्धता आणण्याकरिता पाच बुद्धांपैकीं एखाद्या वैरोचनासारख्या बुद्धास वरचें महत्त्वाचे स्थान दिलें असावें किंवा मंजुश्री, वज्रधर किंवा आदिबुद्ध यासारखी एक नवीन सहावी देवता आणली असावी.

वज्रधर, वज्रसत्व, वज्रपाणी हीं नांवें दिसण्यांत सारखीं असलीं तरी वज्रधर हें 'धर्मकाय' असून वज्रसत्व हे निर्माणकाय आहे व वज्रपाणि हा एक बोधिसत्व असून ग्रन्वेडेल वगैरे संशोधकांनी तो मूळचा वेदकालीन इंद्र असावा असें म्हटलें आहे

वस्तुतः आदिबुद्धपंथाचा एक मुख्य विशेष असा आहे की, त्यामध्ये सहाहि बुद्धांच्या वरच्या दर्जाची एक 'समंतभद्र' नावाची 'धर्मकाय' रूपांत असलेली देवता मानिली आहे व तिच्या ठिकाणी सर्व बुद्ध व अनेक साधू यांच्या ठिकाणच्या वर्णनीय गुणांचा अध्यारोप केला आहे. इतर सामान्यबुद्ध केवळ त्याची प्रतिबिंबें नसून कांहीं ठराविक कालांतरानें त या आदिबुद्धापासून निर्माण होतात असें म्हटलें आहे. हें उत्पत्तितत्व मरी मुळांत सामान्य हिंदु विचारांतील असलें तरी बौद्ध तत्वज्ञानांत याची परमावधि झालेला दिसते व त्यामध्यें शाक्यमुनि, अवलोकितेश्वर, वैरोचन वगैरेस 'योगीश्वर' ही संज्ञा लाविलीआहे

'महायान' व 'आदिबुद्ध' यांतील मुख्य फरक.— जुन्या महायान पंथांतील सिद्धांतामध्यें व या नवीन आदिबुद्ध सिद्धांतामध्यें भेद काय याचा विचार करूं लागलों तर आपणांस असें दिसून येईल कीं, महायानपंथांत संसार हा अनादि मानला असून संसार व निर्वाण यामध्यें शून्यस्वरूपानें कांहींच भेद नाहीं असें म्हटलें आहे; परंतु या नवीन आदिबुद्धपंथांत 'तथागतगर्भ' जो समंतभद्र त्यापासून सर्व जगाची उत्पत्ति झाल्याचें मानिलें आहे.

आदिबौद्ध ग्रंथ तांत्रिक ग्रंथांपासून निश्चितपणें भिन्न करता येणार नाहींत असें आम्हांस वाटतें. असंग हा तांत्रिक बौद्ध मताचा मर जवळ जवळ आद्यपुरुष होता. तर नेंच आदिबुद्धास प्रथम प्राधिक महत्त्व देणारा आदिबुद्ध संप्रदायावरील ज्ञान अजून अंधुक स्थितींत आहे असें म्हटलें पाहिजे ए. रि. ए. मधील आदिबुद्धविषयक लेख लिहिणारे लुई डीला व्हाली पूसी ( बेलजममधील 'गांड' येथील युनिव्हर्सिटीचे संस्कृतचे प्रोफेसर ) यांचीं या संप्रदायाच्या स्वरूपाविषयीं व इतिहासाविषयीं कांहीं मतें तो लेख लिहिल्यानंतर बदललीं असें त्यांच्या त्याच ज्ञानकोशांतील "महायान" या लेखावरून दिसतें

[ संदर्भग्रंथ — महायान' या लेखांत महायान पंथांतील महत्वाच्या ग्रंथांची यादी सापडेल. "आदिबुद्ध" संप्रदायांचे मुख्य ग्रंथ वर उल्लेखिलेलेच आहेत. संशोधकांच्या लेखांपैकीं महत्वाचे लेख येणेंप्रमाणें हॉडसन—एसेज ऑन दि लँग्वेजेस, लिटरेचर अँड रिलिजन ऑफ नेपाळ अँड तिबेट कर्न—मॅन्युअल ऑफ बुद्धिझम. व्हॉडेल—दि बुद्धिझम ऑफ तिबेट. ग्रुडवेल—बुद्धिस्ट आर्ट इन इंडिया. मॉनियर विल्यम्स—बुद्धिझम. रॉकहिललाइफ ऑफ बुद्ध एन सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स आदिबुद्ध, अवलोकितेश्वर, असंग, मंजुश्री, महायान लेख ]

**आदिमसंघ** ( प्रोटोझोआ )—गोडें व खारें पाणी, पाणथळ जमीन आणि ओला अगर कुजका पाला, यांत मुख्यतः सांपडणाऱ्या अति सूक्ष्म—नुसत्या डोळ्यांनी न दिसणाऱ्या—प्राण्यांचा संग्रह या संघांत होतो. या सूक्ष्म जंतूंच्या ( ॲनिमलक्यूल ) शरीराचे अस्थिचर्मादि भाग पडत नाहींत, सर्व जीवांमध्यें—प्राणी व वनस्पति मिळून—सांपडणारें व जीविताचें अनन्यसाधारण स्थान असें जें चैतन्यद्रव्य अगर पिंडद्रव्य ( प्रोटोप्लॅझम ) त्याच्या असंस्कृत अगर अविशिष्ट स्थितींतील बारीक बारीक पिंडें म्हणजे या संघातील प्राणी होत. या असंस्कृत चैतन्यद्रव्याच्या पिंडांना इतर प्राण्याप्रमाणें 'आहारनिद्राभयमैथुनानि' इत्यादि व्यापार करता येतात, व या संघांतील अशा अनंत प्राण्यामध्यें पुष्कळ निरनिराळे आकार व तन्हेतन्हेचे जीवनव्यापाराचे प्रकार आढळतात. तसेंच या सूक्ष्म जंतूंतील आकारवैचित्र्य व कर्मवैचित्र्य आनुवंशिक असतात. या आनुवंशिक भेदामुळें यांच्या उपजाति ( स्पीशीज ) ओळखितां येतात. नंतर निरनिराळ्या उपजातींतील साधर्म्य व वैधर्म्य लक्षांत घेऊन या प्राणिमात्राचे जाति, गण, वर्ग इत्यादि उत्तरोत्तरव्यापी भागांमध्यें वर्गीकरण करतां येतें; परंतु या विश्वरूपदर्शनाला सूक्ष्मदर्शकयंत्ररूपी सप्तम दर्शनाची किंवा दिव्यचक्षूची आवश्यकता आहे

परंतु निरनिराळ्या उपजाति, जाति, गण व वर्ग यांच्या विशिष्ट लक्षणांनी युक्त अशा या अनंत प्राण्यांच्या घोटाळ्यांत एकच पाया अगर मूलरचना स्पष्ट होत असल्यामुळे या समूहाला संघ (फायलम) ही संज्ञा देतात. विकासवादाच्या तत्वाप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं जे पहिले प्राणी उत्पन्न झाले त्यांच्या व या सूक्ष्म जंतूंच्या शरीररचनेंत व जीवनक्रमांत बरेंच साम्य असल्यामुळें या प्राण्याच्या संघाला आदिमसंघ म्हणतां येईल या सूक्ष्म जंतूंच्या जीवनयात्रेचें कोडें उकलण्यासाठीं यांच्यामधील अगदीं प्राथमिक स्थितींत असलेल्या व म्हणून सुबोध अशा आमीबाचें सूक्ष्मावलोकन करूं

आ मी बा —साचीव पाण्याच्या डबक्यांतील तळची बुळबुळीत मळी सूक्ष्मकाखालीं पाहिली तर त्यांत बरेच वेळां हा आळशी प्राणी आढळतो सकृद्दर्शनीं एक पारदर्शक राध्याचा मलीन विषमाकार तुकडा आपण पहात आहों असें वाटतें. बेदाण्यासारख्या बीजरहित फळामध्यें जसा मध्यवर्ती चिकट गीर व त्याच्या सभोंवार तशाच रंगाची साल असते, त्याप्रमाणें या प्राण्याच्या शरीरावें पिंडमध्य ( एंडोप्लॅझम ) व पिंडावरण ( एक्टोप्लॅझम ) असे दोन भाग करता येतात पिंडमध्यांत वाळूसारखे पुष्कळ कण पसरलेले असल्यामुळें तो भाग किंचित् अपारदर्शक व खरबरीतहि दिसतो सभोंवतालच्या पातळ पिंडावरणांत रेती नसते व तें पारदर्शक असल्यामुळें बाहेरील पाण्यापासून वेगळे करतां येत नाहीं

वर वर पाहणाराला हा प्राणी निश्चिताकार असावा व हालचाल करीत नसावा असें वाटतें, परंतु त्याच्याकडे सूक्ष्मदर्शकाच्या साहाय्यानें कांहीं वेळ निरखून पाहिल्यावर अगर थोड्या वेळाच्या अंतरानें याची रेखाचित्रें काढिलीं म्हणजे याचा आकार स्थिर नसून हळू हळू सारखा बदलत असतो असें लक्षांत येईल कमळाच्या पाकळ्यांसारख्या सर्व बाजूंनी पसरलेल्या या प्राण्याच्या भागांना

पाद ( स्यूडोपॉड ) म्हणें; कारण त्याच्यायोगानें हा स्थलांतर करितो. याच्या पायाचा आकार कायम नसून क्षणोक्षणीं बदलतो; एवढेंच नव्हे तर त्याचें अस्तित्वहि याच्या इच्छेवर अवलंबून असतें. ज्या वेळीं शरीराच्या एखाद्या भागीं पाय फुटावयाचा असतो, तेव्हां त्या ठिकाणीं पिंडावरणावर एक टेंगूळ येतें. पहिल्यानें तें पिंडावरणाचेंच बनलेले असतें. क्रमाक्रमानें त्याचा आकार वाढत जातो व त्यात पिंडमध्याचा भाग शिरतो. कांहीं कालानें त्याला करांगुलीचें रूप येतें. पाय नाहींसा होत असला म्हणजे वरील फरक विरुद्ध क्रमानें होतात. वरील तऱ्हेचीं स्थित्यंतरें नेहमीं होत असल्यामुळें याचा आकार सदोदित बदलतो; व हा फेरबदल त्याच्या इच्छेवर अवलंबून असल्यामुळें त्याला आपण कालिदासाच्या मेघाप्रमाणें कामरूप म्हणूं.

ज्या वेळीं या प्राण्याला एका विवक्षित दिशेनें जावयाचें असतें, तेव्हां त्या बाजूचे पाय वाढत जातात व इतर बाजूंचे पाय आत ओढले जातात. अशा तऱ्हेनें एका बाजूची वाढ होऊन सर्वच पिंडमध्य त्या पायात शिरतो व त्याच दिशेनें पुन्हा पुन्हा पाय फुटून हा प्राणी त्या दिशेनें पुढें पुढें सरकतो. याच्या आसपास रेतीचे कण पाण्यात पडले असले व त्याचा स्पर्श याच्या पायाला झाला तर त्या कणाला चुकवून हा प्राणी स्थलांतर करतो, असें या जातीच्या प्राण्याच्या हालचाली बऱ्याच वेळा लक्षपूर्वक पाहाणाऱ्याच्या नजरेस आल्याशिवाय रहात नाहीं.

वरील तऱ्हेच्या या प्राण्याच्या हालचाली, वेळोवेळीं होणारें त्याचें रूपांतर व नेहमीं स्पष्ट दिसणारी त्याची आकृति यांचा विचार करता या प्राण्यातील चैतन्यद्रव्य मऊ व पाण्यात न मिसळणारें आहे असें लक्षांत येतें.

वर आपण या प्राण्याचे स्थूलमानानें दोन भाग केले आहेत. आतां आपण पिंडमध्याकडे सूक्ष्मदर्शकाच्या प्रवलकाचे (लेन्स)च्या साधानें पाहूं. अशा रीतीनें अतिविस्तारित पिंडमध्यांत एक चैतन्य-केन्द्र व एक संकोचीविवर दृष्टीस पडेल. चैतन्य केन्द्र ( न्यूक्लिअस ) हा चैतन्यद्रव्याचा एक दाट, वाटोळा विशिष्ट भाग असून त्याचा आकार बदलत नाहीं. त्याच्यामध्यें असलेल्या कांहीं द्रव्यामुळें त्याच्यावर पिंडमध्यापेक्षां रंग लवकर चुलतात व प्रकाशांकरणाचेंहि त्याच्यामध्यें जास्त वक्रीभवन होतें. संकोचीविवर (कॉंट्रॅक्टाईल-वॅक्यूओले ) म्हणजे सूक्ष्मदर्शकाच्या प्रबल कांचेखालीं पिंडमध्यात दिसणारी वाटोळी स्वच्छ जागा अगर पोकळी होय. हिचा आकार हळू हळू वाढतो व पूर्ण वाढ झाल्यावर याच्यायोगें पिंडमध्याची एकपंचमांश जागा व्यापिली जाते. वाढ पूर्ण झाल्यावर विवर एकदम संकोच पावून अदृश्य होतें व पुन्हा कांहीं कालानें त्याच ठिकाणीं वरील तऱ्हेच्या संकोचीविवराची वाढ होते. याशिवाय पिंडमध्यांत संकोच न पावणारीं पुष्कळ विवरें असतात.

या प्राण्याची जी नेहमीं हळू हळू हालचाल चालू असते, ती केवळ फेरफटका करण्याच्या हेतूनें नसते याचें पोट या हालचालींवर अवलंबून असतें. इतर जातींच्या आपल्यापेक्षा लहान अशा सूक्ष्म भागावर अगर इतर जीवाच्या सूक्ष्म भागांवर हा प्राणी आपली उपजीविका करतो अशा एखाद्या अन्नकणाला त्याचा पाय लागला म्हणजे तो कण त्याच्या पिंडावरणात खेंचला जातो, नंतर त्याचा प्रवेश पिंडमध्यात होतो. या ठिकाणीं त्या अन्नकणासभोंवार थोडी निर्मळ जागा दिसूं लागते, त्यालाच ' अन्नविवर ' ( फूड-वॅक्युओले ) म्हणतात. वरील अन्नकणाचा जेवढा भाग याला पचविता येतो तेवढा अन्नविवरात नाहींसा होतो व अवशिष्ट भाग बाहेर सारला जातो. अन्नविवरात वरील जीवजन्य ( ऑर्ग्यानिक ) अन्नकणाचा जो भाग नाहींसा होतो त्याचें पचन होऊन तो चैतन्यद्रव्यांत मिसळला जातो व चैतन्यद्रव्याची वाढ होते. अर्धवट पचलेले अगर पचन होऊन अवशेष राहिलेले रंगीबेरंगी भाग पिंडमध्यात पुष्कळ आढळतात. अन्नविवरातील अन्नकणासभोंवतालच्या द्रवात पाचनशक्ति असावी, असें या संघातील इतर प्राण्याच्या सदरील द्रवाच्या रासायनिक पृथक्करणावरून वाटतें.

येथपर्यंत कामरूप आमीबाचें स्थूल व सूक्ष्म अवलोकन आणि चलनवलन, अन्नग्रहण व अन्नपचन इत्यादि व्यापाराचा विचार झाला. आता त्याच्या इतर व्यापाराकडे म्हणजे श्वसन, उत्सर्जन व अपत्योत्पादन या व्यापाराकडे वळूं.

चैतन्यद्रव्यात अतिसंमिश्र रासायनिक द्रव्यें असल्यामुळें त्यात पुष्कळ संचित ( पोटेन्शिअल ) शक्ति असते व या द्रव्यांच्या रासायनिक पृथक्करणापासून वरील संचितशक्तीचें रूपांतर होऊन उत्पन्न झालेली चालक (कायनेटिक) शक्ति खर्ची पडून आमीबाच्या वरील स्वयंप्रेरित हालचाली होत असल्या पाहिजेत. ह्या प्रकारच्या हालचाली एका बाजूनें चालू राहिल्या व दुसऱ्या बाजूनें चैतन्यद्रव्यातील संचित शक्तींत भर पडली नाहीं तर मृत्यु ठेवलेला आहेच; परंतु अन्नरूपानें ज्या जीवजन्य वस्तूंचें पचन होतें त्या वस्तूंतील संचित शक्तीची भर चैतन्यद्रव्यात पडल्यामुळें श्वसनोच्छ्वसन, उत्सर्जन व चलनवलन इत्यादि नित्य व नैमित्तिक व्यापाराकरितां लागणाऱ्या शक्तीच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी होते. चैतन्यद्रव्यात संचितशक्तीचें जे चालक शक्तींत रूपांतर होतें त्याला व्यवच्छेदजीवनक्रिया (कॅटॅबोलिझम) म्हणतात व अन्नग्रहणापासून अन्नांतील ग्राह्यांशाचें चैतन्यद्रव्यात रूपांतर होऊन संचित शक्तींत भर पडते त्याला निर्माणजीवनक्रिया ( ॲनॅबोलिझम ) म्हणतात. निर्माणजीवनक्रिया म्हणजे जमा होय आणि व्यवच्छेदजीवनक्रिया म्हणजे खर्च होय.

ज्या ज्या ठिकाणीं व्यवच्छेदजीवनक्रिया चालू असते त्या त्या ठिकाणीं चैतन्यद्रव्याकडून प्राणवायु आत घेऊन

कार्बानिक आम्ल वायु (कार्बानिक ऑसिड गॅस) बाहेर टाकिला जातो, असें अनुभवान्तीं सिद्ध झालें आहे. या क्रियेला श्वासोच्छ्वास किंवा श्वसनोच्छ्वसन म्हणतात, ५ ही घडामोड सर्वांगावांत आढळते; तेव्हां ती आमीबांतहि होत असावी. त्यानें शेष शरीराचा सर्व पृष्ठभाग असतें. उच्छ्वसन किंवा कार्बानिक आम्लवायूचें विसर्जन हें एक उत्सर्जनाचें अंग आहे. याशिवाय इतर उत्सृष्ट पदार्थ आहेत व मूत्राम्ल हा त्यांपैकीं एक आहे. मूत्राम्ल आमीबासारख्या सूक्ष्मजंतूंच्या संकोचोनिविरांतील द्रवांत असल्याचें सिद्ध झालें आहे.

आमीबाला अन्नाचा पुरवठा भरपूर झाला म्हणजे त्याची वाढ झपाट्यानें होते व वाढ पूर्ण झाल्यावर त्याच्या पृष्ठभागावर एक खांच दिसूं लागते मावणीची वाढ आत होऊन एकापासून दोन जीव निरनिराळे होतात पृष्ठभागावरची मोवणी वाढून आमीबाच्या पिंडावरण व पिंडमध्य यांचे दोन भाग होत असता चैतन्य केंद्राचेंहि द्विधाकरण होतें व दोनहि शकलांमध्यें एकेक केंद्र स्थापित होऊन दोन सूक्ष्मजंतू तयार होतात. आमीबासारख्या सूक्ष्मजंतूंचे तुकडे केले तर ज्या भागात चैतन्यकेंद्राचा अंश असतो त्या भागाची अनुकूल परिस्थितींत वाढ होऊन त्यापासून एक स्वतंत्र आमीबा तयार होतो उलटपक्षीं ज्या भागात केंद्राचा अंश मुळींच नसतो त्याच्याकडून अन्नग्रहणादि कार्यें न होता त्याचा शेवट लवकरच होतो. तसेंच एखाद्या आमीबाचें केंद्र पिंडमध्यापासून वेगळें केलें तरी केंद्राला आपली जीवन यात्रा लवकरच संपवावी लागते. यावरून सहज लक्षांत येईल कीं पिंडमध्य व केंद्र यांचें परस्पर साहाय्य व साहचर्य असल्याशिवाय जीवनव्यापार होत नाहींत

प्रतिकूल परिस्थितींत आ.लें सर्व पाय आवरून घेऊन आपल्या शरीरावर एक पातळ पटल (सिस्ट) उत्पन्न करून आमीबा आपलें संरक्षण करितो. या संरक्षित अगर पटलयुत स्थितीला गुलिकावस्था (एन्सिस्टेशन) म्हणतात. या परिस्थितींत या प्राण्याचा प्रवेश धुळीबरोबर वाऱ्यानें कोठेंहि होतो व अनुकूल परिस्थिति प्राप्त झाली म्हणजे हा आपल्या कवचाबाहेर पडून पूर्ववत आयुष्यक्रम चालू करतो. चैतन्य द्रव्याच्या खालोखाल जीविताला आवश्यक असें जें जल त्याच अभाव किंवा सभोंवतालच्या उष्णतामानांत होणारा कांहीं अंशाचा फरक इत्यादि कारणानीं उत्पन्न होणाऱ्या प्रतिकूल परिस्थितींत कांहीं ठराविक कालापर्यंत वरील तऱ्हेनें या प्राण्याला आपलें रक्षण करतां येतें.

एखाद्या भांड्यांत कांहीं जीवजन्य वस्तु भिजत घातली तर त्या पाण्यांत एक दोन दिवसांनीं निरनिराळे सूक्ष्मजीव आपोआप उत्पन्न होतात व आपापला संसार थाटतात, असें सूक्ष्मदर्शनाच्या योगानें दिसतें. हे जीव-प्राणी वनस्पति-तेथें आपोआप उत्पन्न झाले असें एकदम वाटतें. परंतु वरील पदार्थांत धूळ जाऊं दिली नाहीं व पूर्वी हजर असलेल्या त्यांतील जीवांना अगर जीवांच्या अण्डांना उष्णतेनें अगाऊच मारून टाकिलें तर त्यांत सूक्ष्मजीव उत्पन्न होत नाहींत व पदार्थहि कुजत नाहीं असें बऱ्याच शोधाअंतीं सिद्ध झालें आहे, व त्यावरोपर "जीवो जीवस्य कारणम्।" हें तत्त्वहि प्रस्थापित झालें आहे.

हा प्राणी निसर्गत. अमर आहे व आकस्मिक कारणांनीच फक्त याला मृत्यु येतो हें वरील विवेचनावरून लक्षांत येईलच अन्नपचन करून चैतन्यद्रव्यानीं वाढ, चलनवलन, अनुकूल किंवा प्रतिकूल परिस्थित्यनुरूप स्वत च्या हालचालींत किंवा शरीराच्या आकारात स्वसंरक्षणार्थ योग्य तो फरक करण्याची शक्ति अथवा सचेतनत्व (इरिटेबिलिटी), श्वसनोच्छ्वसन, उत्सर्जन, अपत्योत्पादन इत्यादि आमीबाचे व्यापार सर्वजीवांत आढळतात, म्हणून वरील क्रियांना जीव धर्म म्हणू. आतां वनस्पती व प्राणी यांच्यामध्यें मुख्य फरक म्हणजे प्राणिजातींतील सर्वसामान्य चलनवलनक्रिया, अन्यत्र तयार झालेल्या जीवजन्य पदार्थांवर होणारी उपजीविका आणि पेशींत सामान्यतः दिसून येणारा पर्णरंजन (क्लोरोफिल) व सत्वांश (सेल्युलोज) याचा अभाव हे होत

स्थू ल वि क्षे प क ग ण.-(लोबोसा) आतां या संघातील इतर प्राण्याचा विचार करूं आमीबाबरोबर संघातील डिफ्लुजिया व आर्सेल या प्राण्याचा समावेश स्थूलविक्षेपक गणात होतो व त्याचा आकारातील सादृश्य त्यांच्या छद्मपादात आहे या गणातील सूक्ष्म जंतूचे पाय बोथट व स्थल असतात आमीबाप्रमाणें हे दुसरे दोन जातीचे प्राणी सांचीव पाण्याच्या गाळात सापडतात डिफ्लुजियाच्या शरीरापासून एक चिकट पदार्थ तयार होऊन व त्याला रेतीचे कण चिकटून या जीवाभोंवतीं एक कोश तयार होतो या कोशाला एक तोंड असतें व त्यातूनच या प्राण्याचें छद्मपाद बाहेर पडतात आर्सेलाचा कोश शार्ङ्गी (किटिन) द्रव्याचा झालेला असतो बऱ्याच कीटकाच्या अंगावर असलेलीं कवचें यान द्रव्यानीं बनलेलीं असतात

स छि द्र क व च क ग ण.—(फोरॅमिनिफेरा) या गणातील प्राण्याचा कोश विरल असून त्याला अनंत छिद्रें असतात कोश खडूचा बनलेला असतो या गणातील आदिमजंतूंचे (प्रोटोझन) तंतुसारखे बारीक व लांब छद्मपाद एकमेकात गुंतून त्यांचें जाळें बनतें. या प्राण्यांचें चैतन्यद्रव्य कोशात न मावतां त्याचा एक पातळ थर कोशावर पसरतो व त्या थरापासूनच याचे छद्मपाद फुटतात. एखादा अन्नकण याच्या पायाच्या जाळ्यांत सापडला म्हणजे आजूबाजूचे पाद त्याला चिकटून त्याच्या सभोंवतीं चैतन्यद्रव्याचें मंडल तयार होतें, व तेथेंच त्याचें पचन होतें. पचनीं पडलेला भाग पायातून कोशात जातो.

ज्याचे कोश गोलाकार असून त्यात एक अखंड पोकळी आहे असे प्राणी या गणात फारच थोडे आढळतात बहुतकरून बऱ्याच 'सछिद्रकवचक' प्राण्याच्या बाल्यावस्थेत

वरील एकपदरी कवच असावें, नंतर जशी वाढ होत जाते तसें आरंभींच्या कोशाबाहेरील चैतन्यद्रव्याचा थर वाढून या थराच्या बाहेर परंतु पूर्वींच्या कोषाशी सांधलेला असा नवीन कोष तयार होतो व याप्रमाणें दुपदरी कवच तयार होतें हा क्रम असाच पुढें चालू राहून संकीर्ण व विविधाकार कवचें तयार होतात नवीन नवीन होणाऱ्या पदराच्या लहानमोठ्या प्रमाणावर व पूर्वीच्या कोषांशीं होणाऱ्या पुष्कळ प्रकारच्या सांध्यामुळें एकापेक्षा अधिक खण असलेल्या संकीर्ण कवचांचे पुष्कळ निरनिराळे नमुने या प्राण्यात पाहण्यास मिळतात चैतन्यद्रव्याची वाढ होऊन अशा रीतीनें अनेकखणी कवच तयार झालें म्हणजे पुष्कळ केन्द्रेंहि त्याबरोबर तयार होतात

या गणातील बहुतेक उपजाती समुद्राच्या पृष्ठभागावर असतात व त्याठिकाणीं त्यांची वसती इतकी दाट असते की, त्यांच्या कवचरूपी सांगाड्याचे थरच्याथर समुद्राच्या तळावर सांचतात इंग्लंडातील जे खडूचे डोंगर आहेत त्यातील खडूचे प्रस्तर असेच काहीं युगापूर्वी समुद्राच्या तळाशी यांच्या सांगाड्याच्या थरांनीच बनलेले आहेत असें भूगर्भशास्त्र सांगतें

या गणांत द्विधाकरणाशिवाय बीजकणोत्पत्ति (स्पोरुलेशन) मार्गानेंहि अपत्योत्पादन होतें या दुसऱ्या मार्गानें प्रजावृद्धि व्हावयाची असली म्हणजे कोषातील चैतन्यद्रव्याचे बारीक बारीक वाटोळे तुकडे पडतात, नंतर प्रत्येकाला एका बाजूला केसासारख्या कशा (फ्लॅगेलम) फुटतात कशांचा उपयोग या गोलाकार तुकड्यांना किंवा बीजकणांना वल्ह्यासारखा होतो. कशांच्या हालचालीवर बीजकण काहीं काल कोषात पोहतात व नंतर मुखातून बाहेर पडतात. समुद्रात स्वतंत्रपणें पोहत असता त्यापैकीं दोघादोघाचा संयोग होऊन संयुक्त बीजकण तयार होतो पुढें संयुक्तबीजकणाची वाढ होऊन व त्यावर कोष तयार होऊन त्याचें रूपांतर सच्छिद्रकवचप्राण्यात होतें

द्वि क व च क ग ण —(रॅडिओलॅरिया) या गणातील सूक्ष्म जंतूंची रचना व जीवनक्रमहि सच्छिद्रकवच जंतूंप्रमाणेंच असतात परंतु कवचात दोन एकमध्य कोष असतात व ते गारगोटीचे झालेले असतात. एक कोष प्राण्याच्या पृष्ठभागावर असतो व दुसरा मधोमध असतो बाहेरील कोषावर निरनिराळ्या आकाराचे काटे असतात हे प्राणी समुद्रातच राहतात खोल समुद्रात अथवा महासागरात तळाशी यांच प्राण्यांच्या कवचाचे थर सांचतात, कारण यांच्याबरोबर पाण्याच्या पृष्ठभागावर असलेल्या सच्छिद्रकवचक जंतूंचे खडूचे सांगाडे खोल पाण्यातील कार्बोनिक आम्लवायूनें विरघळून जातात.

वरील तीनहि गणांचा समावेश कामरूप अगर छद्मपाद आदिमजंतूंत होतो याशिवाय कामरूप (रिझोपोडा) वर्गांत तारकितविक्षेपक (हेलिओझोआ) गणाचा समावेश होतो या गणांतील प्राण्यांचे छद्मपाद सरळ, कठीण व कृश असतात व प्राणी प्रकाशकिरणयुक्त ताऱ्यासारखे दिसतात

स्थू ल रू प आ दि म जं तु (मायक्टोझोआ)- या वर्गांतील प्राणी भूवर असून कुजणाऱ्या पानांवर वगैरे आढळतात काहीं ईव लाबारंदेचे चैतन्यद्रव्याचे पातळ पापुद्रे अगर पिवळट थर म्हणूनच या वर्गांतील प्राणी हे हळूहळू पुढें सरकतात व राक्षसी आमीबाप्रमाणें दिसतात यांच्या वसतिस्थानात सांपडणाऱ्या सरलसूक्ष्म वनस्पतीं(बॅसिली)वर यांचा निर्वाह होतो यांच्या शरीरात पुष्कळ केंद्रें असतात काहीं वेळ अशा रीतीनें कालक्रमणा करून हा राक्षसी आमीबा आपल्या सभोंवती एक कोश तयार करतो कोशाच्या आंत चैतन्यद्रव्याचे पुष्कळ लहान लहान भाग पडून बीजकण तयार होतात व त्या प्रत्येकात एकेक केंद्र असतें आरंभीं या सकेंद्रबीजकणावर एकपेशीय द्रव्याचें आवरणहि तयार होतें काहीं कालानें हे बीजकण कोषाबाहेर पडून काहीं काल कामरूप स्थितींत घालवितात नंतर त्यांना एकेक कशा फुटते या सकश व सकेंद्र प्राण्यात संकोचीविवरहि असतें व हा आपली कशा मागें पुढें हालवून इकडून तिकडे हिंडतो, सरलसूक्ष्म वनस्पतींवर उपजीविका करतो व द्विधाकरणानें या स्थितींत यांच्यापासून प्रजावृद्धीहि होते काहीं कालानें कशा अंतर्धांत पावतात, आकृति विषम होते, व असे बरेच विषमाकार प्राणी संयोग पावून त्यांच्यापासून पुसल्या डोळ्यांना दिसणारा एक राक्षसी आमीबा तयार होतो.

स प्र तो द व र्ग.— (मॅस्टिगोफोरा) या वर्गांतील प्राण्यांना एक अगर अनेक कशा असतात, व या वर्गांत आकार व व्यवसाय यासंबंधीं वैचित्र्य फार आढळतें. या वर्गाचें प्रतिरूप हरितयुग्लीना (युग्लीना व्हिरिडिस) हें आहे

ह रि त यु ग्ली ना —ज्या तळ्यात हे प्राणी असतात त्यातील पाणी हिरवें दिसतें या सूक्ष्म प्राण्याचा आकार सुतानें भरलेल्या चातीसारखा असतो, या लांबट प्राण्याचा मध्यभाग फुगलेला असतो एक टोंक चपटें असतें व त्यांत एक खळगा असतो, या खळग्याच्या तळापासून एक कशा फुटलेली असते व या खळग्याबाहेर अथवा गलविवराबाहेर ती पाण्यांत हालत असते या टोंकाला पूर्वभाग म्हणतात मोराच्या पिसाच्या प्रत्येक शाखेला जसे बारीक बारीक आखुड तंतू सर्व अंगभर फुटलेले असतात त्याप्रमाणें यांच्या कशेवर आखूड पक्ष्म (सिलिया) असतात. आपल्या कशेला हिसके देऊन हा प्राणी इतस्ततः फिरतो याला छद्मपाद केव्हांहि फुटत नाहींत या प्राण्याच्या शरीरावर एक पातळ पापुद्रा असतो, त्याच्या आतल्या बाजूला चैतन्यद्रव्याच्या थरात तिरकस व अन्वायाम (लाँगिट्यूडिनल) रेषा दिसतात यावरून आकुंचनशील चैतन्य द्रव्यमय तंतूंचा हा थर झालेला असावा असें काहीं

म्हणतात याच्या फुगीर मध्यभागीं याचें केंद्र असतें व पूर्वभागीं गलविवराच्या तळाशीं चैतन्यद्रव्यांत याचें संकोचीविवर असतें. या प्राण्याचा सर्व भाग हिरवा असून शरीरांत पर्णरंजनहि सांपडतें संकोचीविवराशेजारीं एक रक्तनिलक असतो व हा त्याचा अविकसित नेत्र असावा. या प्राण्याची उपजीविका जलस्थ वनस्पतींप्रमाणें पाण्यांत विरलेल्या कार्बानिक आम्ल वायूवर व खनिज पदार्थांवर होते यास इतर प्राणी अथवा वनस्पती भक्षण कराव्या लागत नाहींत. परंतु हा प्राणी आपलें अन्न वनस्पतींप्रमाणें निसर्गतत्त्व ( इन ऑरग्यानिक ) पदार्थांपासून आपल्या शरीरांत पर्णरंजनाच्या मदतीनें तयार करतो व त्यावर त्याची उपजीविका होते.

याच्या कशेच्या चलनवलनानें पाण्यांत खळबळ उडून या पाण्याच्या गलविवरांत मलप्रवाहाबरोबर सेंद्रियजन्य अन्न-कण शिरतात, व त्यांचा प्रवेश चैतन्यद्रव्यांतहि झालेला कधीं कधीं आढळतो. यावरून इतर प्राण्यांप्रमाणें या जंतूंना जीवजन्य व घन अन्नकण पचविता येतात असें वाटतें. अशा तऱ्हेनें या सूक्ष्मजंतूची उपजीविका कांहीं अंशीं वनस्पती प्रमाणें व कांहीं अंशीं प्राण्याप्रमाणें होत असल्यामुळें, वन-स्पतिशास्त्रज्ञ याला वनस्पतींच्या कोटींत ढकलितात, व प्राणि-शास्त्रवेत्ते हा प्राणी आहे असें मानितात. असाच मतभेद या गणांतील बऱ्याच जंतूंसंबंधीं होतो. कधीं कधीं हालचाल बंद करून आपल्या सभोंवतीं पेशीयमत्वांशाचा कार्बो हाय-ड्रेट कोश उत्पन्न करतो कोशांतर्गत चैतन्यद्रव्यांत-द्विधाकरणानें अगर अनेकधाकरणानें पुष्कळ सदृश जंतु तयार होतात व ते कांहीं काल कामरूप राहून वर वर्णिलेल्या पूर्णावस्थेप्रत पोंहोचतात.

स क श ग ण.—वरील सूक्ष्म जंतूला या वर्गांतील सकश-गणांत स्थान मिळतें. सकशप्राण्यांना एक ते चार पर्यंत कशा असतात. यांतील कांहींची वाढ अंकुरोत्पत्तीनेंहि होते व जन्मद व संघांमांत जंतूंची ताटातूट न होतां बहुशाख वृक्षा-प्रमाणें यांचा पुंज तयार होतो. व्हॉलवाक्स वगैरे प्राण्यांचा पुंज गोल असून आंतून पोकळ असतो पुंजांतील प्रत्येक जंतूला दोन कशा असतात व पुंजांत श्रमविभाग होऊन कांहीं जंतू अप-त्योत्पादन करतात अशा जंतूंच्या अनेक द्विधाकरणांनीं पुष्कळ सदृश जंतू तयार होतात व ते रिक्तगर्भ गोलाप्रमाणें आपली रचना करून व प्रत्येकाच्या दोन दोन कशा बाहे-रच्या बाजूस पसरून त्यांच्या हालचालीवर आपल्या जन्मद पुंजाच्या पोकळींत संचार करितात.

द्विधाकरण ( बायनरी फिशन ),अनेकधाकरण व अंकुरो-त्पत्ति हे निर्द्वंद्वोत्पत्ती ( ॲसेक्शुअल मल्टिप्लिकेशन ) चे प्रकार आहेत. द्विधाकरणांत जन्मद प्राण्यापासून दोन सारख्या आकाराचे जीव तयार होतात अनेकधाकरणांत चैतन्यद्रव्याचे अनेक तुकडे पडून एका जीवापासून पुष्कळ जीव तयार होतात. आणि अंकुरोत्पत्तीमध्यें नवीन होणारा जीव जन्मद जीवापेक्षां लहान असतो या गणांतील कांहीं प्राण्यांत द्वंद्वोत्पत्तीहि होते. या प्रकारांत दोन संयोगी बीज-कण ( गॅमेट ) एकत्र होऊन त्यांच्यापासून एक संयुक्तबीज-कण तयार होतो. नंतर संयुक्तकणापासून अनेक अनेक-धाकरणांनीं पुष्कळ बीजकण तयार होतात. संयुक्त प्राण्याचें अनेकधाकरण होण्यापूर्वी त्यावर एक संरक्षक पटल उत्पन्न होतें व या पटलाबाहेर शेवटीं बीजकण पडतात व कशा फुटून इकडे तिकडे स्वतंत्रपणें संचार करितात. व्हॉलवाक्स पुंजांतील संयोगीकण लहान मोठे असतात. यांचे बृहत्संयोगी कण व सुविकासित किंवा अत्युत्क्रांत प्राण्यांचे अंड-पेशी यांच्यांत फार साम्य आहे तसेंच या पुंजाचे लघुसंयोगी कण लांबट असतात व त्यांच्या एका टोंकाला दोन कशा अस-तात म्हणून हे लघुसंयोगीकण इतर प्राण्यांच्या शुक्रबीजां (स्पर्म) सारखे दिसतात

स प्र णा ल ग ण (चोॲनोफ्लॅगेलाटा) ––सप्रणालगणांतील सूक्ष्म जंतूंना एकेक कशा अथवा प्रतोद असून तो ज्या जागीं फुटलेला असतो त्याठिकाणीं एक चैतन्यद्रव्याचा पेला झालेला असतो, त्यालाच प्रणाल म्हणतात. प्रतोद अगर कशा पेल्याच्या मध्यभागीं व बरीच लांब असल्यामुळें ही एक फुलझाडाची बुंडीच असावी असें वाटतें. प्रणाल आकुंचन-शील असून त्याच्या हालचालींनीं पाण्यात खळबळ उडाली म्हणजे बारिक बारिक अन्नकण बाहेरच्या अंगास चिकटतात व हळूहळू खालीं सरकून चैतन्यद्रव्यांत खेंचले जातात व त्यासभोंवतीं तेथें अन्नविवर तयार होतें

शरीरांत केंद्राशिवाय एकदोन संकोचीविवरें असतात. या गणांतील कवचयुत प्राण्यांना खालीं देंठ किंवा नाल असतें. याची वाढ अन्वायामद्विधाकरणानें होऊन व उत्पन्न झालेल्या व्यक्ती एकमेकांना सांधलेल्या राहून त्यांच्यापासून वृक्षासारखे पुंज तयार होतात कांहीं जंतू गुलिकावस्थेंत जाऊन अनेकधाकरणानें अपत्यवृद्धि करून बारिक बारिक सप्रतोद जंतुकांना जन्म देतात, व त्यांची वाढ होऊन त्यांचें रूपान्तर पूर्णावस्थेंतील सप्रणाल जंतूंत होतें.

या गणाशिवाय या वर्गांत द्विकश ( डायनोफ्लॅगेलाटा ) व गोल कणांचा (सिस्टो फ्लॅगेलाटा) समावेश होतो. द्विकशजंतूंना दोन कशा असतात. व त्यांची कवचें विचित्र व दर्शनीय असतात. बहुतेक प्राणी समुद्रांत राहतात. यागणांतील कांहीं जातिविशेषामुळें समुद्राचें पाणी मंदप्रभ ( फॉस्फॉरेसंट ) होतें व रात्रीं काजव्याप्रमाणें चकाकतें. गोलगणांतील प्राणी बरी-एवढे मोठे असतात व त्यांच्यामुळें समुद्राला मंदप्रभत्वहि येतें.

प रा न पु ष्ट व र्ग.—( स्पोरोझोआ ) या वर्गांचें प्रातिरूप चचल एकपटली ( मोनोसिस्टिस ॲगिलिस ) नांवाचा जंतु आहे. हा भूकृमीच्या [अर्थवर्म] शुक्राशयांत आढळतो. हा लांबट व चपटा प्राणी कृमीसारखा दिसतो. याची दोनहि टोंकें निमुळतीं झालेलीं असतात. अनुक्रमानें शरीराचें आकुंचन

व प्रसारण करून हा स्थलांतर करतो पूर्णावस्थेत याच्या शरीरावर एक पटल असतें शरीरातील द्रव्याचे दोन भाग पडतात, बाहेरचा थर दाट असतो, व मधला कोर पातळ असतो. याचें कद्र मोठें असून त्यात केंद्रमध्यहि असतें. संकोची-विवर व पृष्ठभागावर कशा किंवा छद्मपाद नसतात हा प्राणी परोपजीवी असल्यामुळें याला अन्नरस तयारच मिळतो व पृष्ठभागानें अन्नरस शोषून त्यावर निर्वाह करणें एवढीच कामगिरी त्याला करावी लागते

अपत्योत्पादनासाठीं दोनदोन जतू एकत्र होऊन त्यांचा एक गोल बनतो, त्यावर एक पटल तयार होतें अशा गोलांतील प्रत्येक जतूच्या केंद्राचे अनेक द्विधाकरणांनीं पुष्कळ भाग पडतात नंतर त्या प्रत्येक केंद्रशकलासभोंवतीं चैतन्य द्रव्याचें मडल तयार होतें अशा रीतीनें पुष्कळ संयोगीकण तयार होतात या सुमारास गोलातील दोन प्राण्यांचीं मधलीं पटल नाहींशीं होऊन चैतन्यद्रव्याचा एकजीव होतो व त्यात वरील सयोगीकण फिरू लागतात नंतर दोनदोन संयोगीकणाचा सयोग होऊन संयुक्तकण तयार होतो. सयुक्तकण मध्यें फुगीर असता व त्यावर एक शार्ङ्गीद्रव्याचें पटल तयार होतें या प्रत्येक संयुक्तकणापासून अन्वायामद्विधाकरणांनीं चंद्राच्या कोरेसारखीं बीजशकलें तयार होतात हीं शकलें पटलाबाहेर पडून आपल्या निमुळत्या टोंकाच्या चलनवलनानें इकडे तिकडे स्वतत्रपणें फिरू लागतात ही या जतूची डिंबावस्था ( लेराइड स्टेज) झाला भूकृमीच्या वाढत असलेल्या शुक्रपेशींत हीं बीजशकलें शिरतात व पेशीस्थ जीवनाचा काहीं काल उपभोग घेऊन बाहेर शुक्राशयाच्या पोकळींत येतात व तेथें पूर्णावस्थेला पोंचतात

स्वै र ग ति क ग ण —( ग्रेगॅरिनिडा )हा जतु स्वैरगतिक गणातला आहे या गणातील इतर सूक्ष्मजतू झुरळ, शेऊळ, ( लॉबस्टर ), शतपदी ( घोण ) इत्यादि प्राण्यांच्या अन्ननलिकेत राहून त्याच्या अन्नरसावर पोसतात यापैकीं काहींच्या देहाचे दोन अगर तीन भाग स्थूलमानानें पडतात दोन ठिकाणीं चिंबून ज्याचे तीन भाग पडले आहेत अशा प्राण्याच्या पूर्वभागाच्या पूर्वटोंकाला आकड्यासारखे वक्रप्रसर असतात व ते त्यामुळें यजमानाच्या अन्ननलिकेला चिकटून राहतात पूर्णावस्थेंत पूर्वभागापासून सुटून उदरात स्वतंत्रपणें इकडे तिकडे वावरतात

पे शी स्थ ग ण —( कॉक्सिडिइडिया ) पेशीस्थ गणातील जतू सर्व प्राण्यांच्या शरीरात आढळतात, व कोणत्याहि इंद्रियाच्या पेशींत सापडतात, परतु मुख्यतः अन्ननलिकेच्या अंतर्कलेत ( एपिथेलियम ) मध्यें याचें वास्तव्य असते या गणातील जतू रुधिरपेशींत कधींहि आढळत नाहींत काहीं जतू पेशींच्या केंद्रातहि शिरतात

रु धि र स्थ ग ण —( हेमोस्पोरिडिया ) रुधिरस्थगणातील जतू रुधिरातील रक्तपेशींत( रेड कॉर्पस्कल्स )आपलें बहुतेक आयुष्य घालवितात हे जंतू पृष्ठवंश प्राण्यांच्या रुधिरांत सापडतात मनुष्यें, इतर सस्तन प्राणी, व काहीं पक्षी याच्या रुधिरपेशींत या गणांतील जंतू शिरले व तेथें त्याची वाढ झाली म्हणजे निरनिराळे ताप वरील प्राण्यांत उद्भवतात, असें बऱ्याच अवलोकनानीं सिद्ध झालें आहे या गणातील काहीं उपजातींचा प्रवेश मनुष्याच्या रुधिरपेशींत झाला म्हणजे हिंवतापाचे निरनिराळे प्रकार त्याच्यात उद्भवतात असें आता सिद्ध झालें आहे

हिंवतापाचे जतू रोग्याच्या रक्तपेशींत कामरूपस्थितींत आपली कालक्रमणा करितात या स्थितींत त्यांची अनेकधा करणानीं वाढ होते व उत्पन्न झालेले जतू आसपासच्या दुसऱ्या पेशींत शिरतात यापैकीं काहीं गोल असतात व काहीं चंद्रकोरीसारखे दिसतात यापैकीं काहीं पुंसयोगीकणाचे कोष बनतात व काहींपासून प्रत्येकीं एकेक स्त्रीसयोगीकण तयार होतो या स्थितींत एका प्राण्याच्या शरीरातून दुसऱ्या यजमानाच्या शरीरात या जतूना प्रवेश करावा लागतो. हिंवतापाच्या जतूंचा दुसरा यजमान अनाफिलीस जातीचा मच्छर आहे वरील स्थितींत दुसरा यजमान मिळाला नाहीं तर अकालमृत्यु येतो तापकरी मनुष्याला या जातीचा मच्छर चावला म्हणजे शोषून घेतलेल्या रक्ताबरोबर या जतूंचा प्रवेश त्याच्या जठरात होतो रक्ताच्या प्रत्येक बिंदूत असे जतू पुष्कळ असत यामुळे वरील तऱ्हेनें प्रत्येक अवस्थेंतील जतूंचा प्रवेश मच्छराच्या जठरात होतो. परंतु कोषस्थ सयोगीकणाशिवाय बाकी सर्व या नवीन यजमानाच्या जाठरद्रव्यानें नाश पावतात प्रत्येक पुंसयोगीकणाच्या कोषातून पुष्कळ ततूसारखे पुंसयोगीकण बाहेर पडतात व स्त्रीसयोगीकण स्त्रीकोषातून बाहेर पडतो नतर या स्त्रीसयोगीकणाच्या केंद्राचें दोन वेळा द्विधाकरण होऊन व ते दोन भाग बाहेर पडून स्त्रीकणात केंद्राचा चवथा भाग शिल्लक राहिला म्हणजे स्त्रीकण गर्भधारणेला योग्य होतो नंतर या तयार झालेल्या गर्भपात्र स्त्रीकणात स्वेच्छाविहारी पुकण शिरून गर्भधारणा होते पुढें वाढ होऊन मध्यें फुगीर व दोनहि टोंकाना निमुळता असा गर्भ होतो व काहीं कालानें अन्ननलिकेच्या भिंतींत शिरून भिंतींच्या स्नायूंत आपलें ठाणें देतो. तो तेथें आल्यावर एक पटल उत्पन्न करितो त्याच्या आत त्याची खूप वाढ होते व अन्ननलीकेच्या बहिर्भागावर एक फुळी आली आहे असें वाटतें वरील पटलस्थ स्थितींत एका गर्भापासून अनेक ततूसारखे जतू तयार होतात व कोष फाडून त्याचा सचार मच्छराच्या शरीराच्या पोकळींत किंवा रुधिरगुहेंत (होमोसेले ) होतो या ठिकाणीं भटकत असता त्याचा प्रवेश लालापिंडात ( सॅलिव्हरी ग्लॅंड ) होतो व अशा या मच्छराच्या चावण्याबरोबर ते मनुष्याच्या रक्तात शिरतात व तेथें त्याची पूर्ण वाढ होते अशा रीतीनें त्याचा फैलाव व त्याच्याबरोबर हिंवतापाचा फैलाव होतो

नि र्या स ज व र्ग.—( इन्फुसोरिआ )पदुकाकार जंतु (स्लिप्ड ॲनिमलक्यूल, पॅरॅमॅसियुम) हा या वर्गाचे प्रतिरूप आहे. ज्यांत गवत दोन तीन दिवस कुजत पडलें आहे अशा पाण्यात उत्पन्न होणाऱ्या बारिक बारिक जीवात हे सांपडतात. हे डोळ्यांना दिसण्याइतके मोठे असून त्यांचा रंग पांढुरका असतो. या जंतूंचा पूर्वभाग बोथट असून पश्चिमभाग निमुळता असतो. या प्राण्यास अधरतल (व्हेंट्रल)व ऊर्ध्व तल (डॉर्सल) असे दोन पृष्ठभाग आहेत. अधरतलभागीं एक तिरकस खांचणी असून त्यांतच गलविराचें मुख असतें. गलविवराचा शेवट मध्यभागीं मऊ चैतन्यद्रव्यांत होतो. सर्व पृष्ठभागावर आखूड पक्ष्माच्या अथवा लोमांच्या अन्वायाम रांगा असतात. कक्षविवरांतहि पक्ष्म असतात. शरीरांतील मध्यभागीं द्रव्य पातळ असतें व बाह्यभागीं दाट थर असतो. पृष्ठभागावर एक विरल पटल असतें व तें गलविवरांतील पृष्ठभागावरहि पसरलेलें असतें. या पटल' (क्युटिकल)पासून पक्ष्म उद्भवतात. बाह्यभागांत एके ठिकाणीं दोन केंद्रें असतात व त्यांना आकारावरून महा व लघु केंद्र म्हणतात. महाकेंद्राचें द्विधाकरण फार सोपें आहे; परंतु लघुकेंद्राचें द्विधाकरण गूढ व चमत्कारिक आहे.

संकोचीविवरें दोन असतात व सूक्ष्मदर्शकाखालीं बिनचूक सहज ओळखितां येतात. प्रत्येक विवरासभोंवतीं सात आठ, लांबट व विपुलमध्य अशा विवरशाखा असतात. या शाखायुक्त संकोचीविवराचीं आकुंचनें व प्रसारणें पुढीलप्रमाणें होतात. आसपासच्या चैतन्यद्रव्यांतील त्याज्य पाणी झिरपून पहिल्यानें विवरशाखांची वाढ होते. त्यांची पूर्ण वाढ झाल्यावर त्या एकदम आकुंचन पावून अदृश्य होतात व त्याबरोबर मध्यवर्तीविवर फार झपाट्यानें वाढतें. पूर्णवाढ होऊन तें संकोच पावलें म्हणजे त्यांतील द्रव या सूक्ष्मजंतूच्या शरीराबाहेर पडतो व पुन्हा पूर्ववत विवरशाखा वाढतात. हा क्रम आमरण चालतो.

या जंतूच्या बाह्यभागांत लहान शल्यकोष (ट्रायकोसिस्टस) प्रकाशकिरणासारखे विकीर्ण झालेले असतात. या जंतूला कोणत्याहि प्रकारची उपाधि पोंचली म्हणजे या कोशातून लांब व बारिक सुईसारखीं शल्यें बाहेर पडतात व सर्व पृष्ठभाग सकंटक होतो. सूक्ष्मदर्शनाखालीं या प्राण्याला आयोडिनद्रवानें मारिलें, तर सर्व शरीरावर हीं शल्यें उभीं राहतात.

गलविवरांतील पक्ष्मांच्या हालचालींनीं पाण्यांत खळबळ उडून लहान लहान जंतू याच्या गलविवरांत शिरतात व पुढें चैतन्यद्रव्यांत शिरतात. अन्नकण व एक पारदर्शकद्रव असलेलीं अन्नविवरें याच्य शरीरांत सारखीं फिरत असतात व अन्नाचें पचन होऊन त्यांतील अन्नकण कमी कमी होतो. सत्व (स्टार्च) व ओजस (प्रोटिड) असलेले पदार्थ त्याला पचवितां येतात. पचन होऊन अवशिष्ट राहिलेला भाग एका विवक्षित ठिकाणीं गलविवरांतून बाहेर पडतो. या भागाला गुदभाग म्हणतात. या ठिकाणीं गलविवरासारखें कायमचें मुख अथवा द्वार नसतें.

अनुविरतर (ट्रॅन्सव्हर्स) द्विधाकरणानें त्याची वाढ होते. पहिल्यानें केंद्राचे दोन दोन भाग पडतात व नंतर शरीराचे दोन आडवे भाग पडतात व दोनहि भागात एकेक लघु व महाकेंद्र असतें. अशा तऱ्हेची प्रजावृद्धि पिढ्यानुपिढ्या बिनतक्रार चालत नाहीं. मधून मधून दोन दोन प्राण्यांचा संयोग होऊन केंद्रद्रव्याचा अंशतः विनिमय व्हावा लागतो. यासाठीं दोन दोन प्राणी अधरतलानें एकमेकास चिकटतात. प्रत्येकाच्या महाकेंद्राचे बारिक बारिक भाग पडून चैतन्यद्रव्यात अदृश्य होतात. याच सुमारास दोन द्विधाकरणानीं लघुकेंद्राचे चार भाग पडतात. यापैकीं दोन नष्ट होतात व शिल्लक राहिल्यापैकीं एक स्थिर असतो व दुसरा भाग चचल असतो. नंतर दोघाची चचल प्रकेंद्र (प्रोन्यूक्लिअस) एकमेकाच्या चैतन्यद्रव्यात शिरून त्याचा व या नवीन स्थिर प्रकेंद्राचा एकजीव होतो. अशा रीतीनें दोनहि प्राण्यात एकेक केंद्र तयार होतें व प्राणी अलग होतात. नंतर प्रत्येकाच्या केंद्राचे दोन भाग पडतात व त्यापासून लघु व महाकेंद्र तयार होतात. या केंद्रद्रव्याच्या विनिमयानें प्रत्येक जंतु जोमदार होऊन पूर्ववत् द्विधाकरणानें अपत्यवृद्धि करितो.

निर्यासजंतूच्या अंगावर नेहमीं बाल्यावस्थेंत पक्ष्म असतात व या भेदावरून त्याचे पुढील दोन गण पडतात.

लोमपाद (सिलिआटा):—या गणांतील जंतूंच्या अंगावर पक्ष्म सदोदित असतात, परंतु ते एकसारखेच नसतात. कांहीं जंतूंच्या कांहीं ठिकाणीं ते आखूड तर कांहीं ठिकाणीं लांब असतात. व शरीराच्या कांहीं भागावर मुळींच नसतात. या गणात आकारवैचित्र्य फार आढळतें. कांहीं अंडाकृति, तर कांहीं वृक्काकार (किड्ने) किंवा पेल्यासारखे अगर वर्ण्यांसारखे दिसतात. काहींना दोन वर्हीं आहेत असें वाटतें; काहींचें शरीर लांबट असून विकसित प्राण्याप्रमाणें यांच्या देहाच्या स्थूलमानानें अन्वायाम भाग पाडतां येतात. कांहीं स्वेच्छाविहारी आहेत, कांहींना देंठ फुटून देंठानें कोणत्यांना कोणत्यातरी जलस्थ वस्तूला ते जन्मभर चिकटून राहतात.

घंटाकार जंतु (व्हॉर्टिसेला):—हे वरील दुसऱ्या प्रकारात येतात. जलस्थ वनस्पतींच्या अंगावर असलेल्या मळींत हे बऱ्याच वेळा सापडतात. नावाप्रमाणें घंटाकार असून आपल्या देंठानें कोणत्याना कोणत्यातरी वस्तूला चिकटून राहतात. घंटेसारखा दिसणारा भाग आतून पोकळ नसतो. व त्याच्या वाटोळ्या कडेवर पक्ष्मांची रांग असते. पक्ष्माच्या आतल्या बाजूला तसेच एक वर्तुलाकार खाचणी असते. या खाचणींत गलविवराचें मुख असतें. खाचणीच्या आंत मध्यवर्तीलान्या कडेलाहि पक्ष्म असतात. पदुकाकार जंतूप्रमाणें याचें गलविवर पक्ष्मल असतें व त्यांत एक चैतन्यद्रव्याचा

पातळ व गुंडाळलेला पापुद्रा असतो व त्यावर लोम अथवा पक्ष्म असतात. या लोमाच्या संगतवार मार्गे पुटें होण्यामुळें गलविवरात जलप्रवाहाबरोबर अन्नकण शिरतात नंतर मधल्या पातळ द्रव्यात शिरून त्याच्या सभोंवतीं द्रवयुक्त अन्नाविवर तयार होतें व अशीं विवरें या सोगटीसारख्या प्राण्यात फिरतांना आढळतात. पचन होऊन अवशिष्ट राहिलेले कण एका विशिष्ट ठिकाणाहून गलविवरात सोडले जातात या ठिकाणीं कायमचें गुदद्वार असावें असें वाटतें

संकोचीविवर एकच असतें महाकेंद्र अश्वनालासारखें असून त्याचीं टोंकें निरनिराळ्या समभूपृष्ठभागपातळींत असतात त्याच्या शरीराच्या बाह्यभागीं चैतन्यद्रव्यात स्नायुपेशींच्या सारख्या अनुविस्तर अथवा आडव्या रेघा असतात. याच भागाचा देंठ झालेला असतो व तो नेहमीं ताठ न राहता त्याचीं व्यावर्तिमंडलें ( स्पायरल ) पडून प्राणी मागें ओढला जातो

अपत्योत्पादनाच्या वेळीं मध्यमंडलाच्या मधोमध खाचणी पडून व ती देंठापर्यंत वाढत जाऊन कांहीं वेळ एका देंठाला दोन प्राणी चिटकलेले दिसतात त्यातील एकाची वर्तुलाकार खाचणी नाहींशी होऊन केंसहि जातात. नंतर देंठाजवळच्या भागात एक नवीन लोमाची राग फुटते व प्राणी देंठापासून सुटून पाण्यात पोहूं लागतो कांहीं कालानें एकाजागीं चिटकून त्याला एक देंठ फुटतो व नवीन घटाकार प्राणी तयार होतो.

अंकुरोत्पत्तीचाहि प्रकार या प्राण्यात आढळतो व सद्योजात व जन्मदर्ततूची ताटातूट न होता प्रत्येकापासून पुन्हा वाढ झाल्यामुळें सूक्ष्मदर्शनाखालीं आपण एखादें पुष्कळ बेचारलेलें झाड पहात आहों असें वाटतें

मधून मधून निरनिराळ्या वंशातील जंतू संयोग पावतात व पदुकाकार जंतूंप्रमाणें याचीं महाकेंद्रें नाहींशीं होतात व लघुकेंद्रापासून प्रकेंद्रें उत्पन्न होऊन केन्द्रद्रव्याचा परस्पर विनिमय होतो व नंतर दोन्ही निराळे होतात संयोग पावणारे प्राणी लहानमोठे असले तर लहान प्राण्याचें चैतन्य द्रव्यहि मोठ्या प्राण्यात मिसळून जातें व त्याचें अपत्योत्पादन जोरानें चालू होतें. एकाच वंशातील प्राणी वरील तऱ्हेनें संयोग पावले तर पुढें उत्पन्न झालेलीं अपत्यें अनुकूलस्थितींतहि आपोआप मरतात असें आढळून आलें आहे.

शू ल ध र ग ण —( टेंटॅक्युलिफेरा ) शूलधर जंतूंहि निरनिराळ्या विचित्र आकाराचे असून त्याच्यातील विशेष म्हणजे त्याचीं शूलासारखीं इंद्रियें होत. शूल बारिक वाटोळे व लाब तंतूसारखे असून त्याच्यामधील चैतन्यद्रव्याची कोर मऊ असते व बाहेरचा भाग कठिण असतो. टोंक पसरट असून त्याच्या योगानें त्याला दुसऱ्या पदार्थांना चिकटता येतें. शूलाचीं पसरट टोंकें एखाद्या निर्यासजंतूला चिकटलीं म्हणजे या नवीन प्राण्याचें तेवढ्या जागेवरचें पटल विरघळून जातें, व त्याचें चैतन्यद्रव्य शूलाच्या मधल्या मऊ भागातून शूलधर प्राण्याच्या शरीरात शिरताना दिसत कांहीं जंतू आपल्या सभोंवतीं सनाल कवच तयार करितात, व कांहीं एकमेकास देंठानीं चिकटलेले राहून सूक्ष्म वनस्पती प्रमाणें दिसतात

आतापर्यंत या संघातील कांहीं मुख्य मुख्य परिचित प्राण्याचें वर्णन झालें कामरूपवर्गांत अमीबासारखे आळशी व गृहहीन कांहीं प्राणी आहेत, व कांहीं विकसित प्राणी आपले छद्मपाद आसपास दूरवर पसरून अन्नाचा शोध करणारे व स्वसंरक्षणार्थ खडूचें किंवा शार्करीय द्रव्याचें आपल्या शरीरावर घर बाधणारेहि आहेत. स्थूलरूपवर्गातील प्राणी या संघातले राक्षसच असून त्याची प्रजावृद्धीहि राक्षसीच आहे सप्रतोदवर्गांतील जंतू स्वैरविहारी असून त्याचीं चलनेंद्रियें अथवा प्रतोद लाब व थोडेच असतात या वर्गातील कांहीं एकाकी प्राण्यात चित्रभानु अथवा नेत्रहि असतो, कांहीं पुंज करून आपली माणुसकी अथवा समाजप्रियता दाखवितात निर्यासज वर्गातील प्राण्याचीं चलनेंद्रियें अथवा लोम आखूड परंतु सर्व पृष्ठभागावर असतात, किंवा या वर्गात कांहीं प्राण्याना निरनिराळ्या आकाराचे शूल असतात याच्या उलट परान्नपुष्टवर्गातील प्राणी सर्वांत लहान असून त्याना चलनेंद्रियें नसतात व ते प्रतिकूल परिस्थितींत आपलें रक्षण आपल्या शरीरावर पटल उत्पन्न करून करितात. यावरून या संघातील निरनिराळ्या प्राण्याच्या परिस्थित्यनुरूप शरीररचनेची व निरनिराळ्या जीवनक्रमाची ठोकळ कल्पना येईल.

बहुतेक सर्व आदिमजंतू खाऱ्या किंवा गोड्या पाण्यात असतात व महासागराच्या तळापासून पर्वताच्या शिखरापर्यंत कोठेंहि सापडतात. हे प्राणी फार लहान व हलके असल्यामुळें या संघातील बऱ्याच जातींचा संचार पृथ्वीवर सर्वत्र होतो. ह्या संघातील बऱ्याच जातींचे प्राणी परोपजीवी आहेत व कांहीं मनुष्यास रोगकारक असे आहेत.

या संघातील व्होल्वाक्स वगैरे जाती एकपेशीय व्यक्तींचे प्राणी पुंज नसून अनेकपेशीय व्यक्ती आहेत असें सकृद्दर्शनी वाटतें. इतर संघातील प्राणी जसे अनेक परस्परावलंबी आदिमजंतूंचे किंवा पेशींचे झालेले असतात, तद्वत् या प्राणिवृंदातील व्यक्ती परतंत्र आहेत. कारण जननक्रिया करणाऱ्या व्यक्तींना पक्वान्नरसासाठीं इतर व्यक्तींवर अवलंबून रहावें लागतें, त्याप्रमाणेंच अन्नरस तयार करणाऱ्या व्यक्तींना प्रजोत्पादन करिता येत नसून या जीवधर्मांतील एका महत्त्वाच्या कार्यासाठीं पूर्वोक्त व्यक्तींवर अवलंबून रहावें लागतें. म्हणून तत्त्वतः व्होल्वाक्सला एकपेशीय प्राणिवृंद न समजता अनेक पेशीय व्यक्ती समजण्यास कांहीं हरकत नाहीं. तथापि इतर संघातील प्राण्याच्या शरीरात श्रमविभाग बऱ्याच बाबतींत होत असल्यामुळें अशा प्राण्यातील पेशींना फारच पारतंत्र्य भोगावें लागतें म्हणून व्होल्वाक्स हा प्राणिवृंद आहे असें मानण्याचा प्रघात पडला आहे.

वेदकालीन व पुराणकालीन आर्य लोकांना अतिसूक्ष्म डोळ्यांना न दिसणारे अगणित जीव आपल्या सभोंवतीं हवेंत, पाण्यात अथवा जमीनीत आहेत हे माहीत होतें हे सिद्ध करण्यास अवतरणें देण्याची जरूरी नाहीं त्यांना ही वस्तुस्थिति दैवी शक्तीनें समजली किंवा भौतिक शोधाच्या सहाय्यानें समजली हे ठरविण्याचें काम आपण तज्ज्ञाकडे सोंपवूं

हल्लींच्या जीवनशास्त्राची मुख्यत आदिमजीवाची माहिती पाश्चात्यांनीं गोळा केली वरील लोकात जीवनशास्त्र व नास्तिकपणा याचा प्रसार एकदमच झाला आरंभीं या दोघांचा एकमेकापासून फार फायदा झाला जीवनशास्त्रात नवीन शोध लावण्यात नास्तिक्यताभिमान्यांना हुरूप आला व जसजसे या शास्त्रात शोध लागत गेले तसतसे विश्वाचें कोडें सुटत चाललें असें त्यांना वाटलें आनुवंशिक संस्कार अंडाच्या व शुक्रबीजाच्या मार्फत गर्भांत येत असले पाहिजेत व आमीबा सारखे अकेंद्र प्राणी सर्व जीवधर्म चालवीत असतात हें समजल्याबरोबर विश्वाच्या उभारणीचें व संहारणीचें कोडें सुटलें असें त्यांना वाटलें हा त्याचा हर्ष फार दिवस टिकला नाहीं कारण वरील शोधांनीं जीविताचें कोडें सुटलें तर नाहींच परंतु तें कांहीं अंशीं जास्त कठिण झालें कारण आमीबा सारखा अतिसूक्ष्म पदार्थ सर्व जीवधर्म पिढ्यानुपिढ्या विनचूक चालवितो किंवा, आमीबासारख्या लहान गर्भाकडून एखाद्या अजस्र प्राण्याचे आनुवंशिक धर्म एका व्यक्तीकडून दुसऱ्या व्यक्तींत विनचूक जातात तेव्हा या चैतन्यद्रव्याच्या कणात शक्ति तरी काय आहे हें नवीनच कोडें उत्पन्न होतें [ लेखक एस् एच हेले ]

**आदिलशाही**—या घराण्याचा संस्थापक युसफ आदिलखान हा बहामनी राज्याचा कारभारी ख्वाजे जहान गवानचा परममित्र असुन याची त्यानें दौलताबादच्या सुभ्यावर नेमणूक केली होती परंतु ख्वाजेजहानाच्या मरणानंतर युसफ आदिलखानाची विजापुरास नेमणूक झाली. तेव्हा तेथें हा स्वतंत्र होऊन यानें इ स १४८९ त राजचिन्हें धारण केलीं आदिलशाही घराण्याची पुढ दिलेली हकीकत इ स १६३१ पर्यंत बहुतेक मोडकाच्या फेरिस्ता, बुसातिने, सलातीन व ग्रिग्जनें भाषांतर केलेला दुसरा एक फारसी ग्रंथ या आधारावर रचलेल्या आदिलशाही व निजामशाही घराण्याच्या इतिहासावरून घेतली असून त्यापुढील माहितीसाठीं ग्रांटडफमधील टीपा एकत्र केल्या आहेत ही उत्तरार्धांतील हकीकत पुढें शहाजी व शिवाजी याच्या चरित्रात उपलब्ध ऐतिहासिक साधनांच्या आधारें देण्यात येईल तीन तेव्हा ग्रांटडफच्या चुका पुढें येतीलच

ग्रांटडफच्या माहितीचा इतर साधनातील माहितीशीं आरंभींच जो विरोध दिसून येतो तो हा कीं, सोळाव्या शतकांत झालेल्या शहांची ग्रांटडफनें दिलेली यादी मेडोजच्या दक्षिण 'हिंदुस्थानातील घराणीं' या पुस्तकातील यादीशीं किंवा मोडकाच्या यादीशीं कारकीर्दींच्या काळाच्या बाबतींत जमत नाहीं ग्रांटडफच्या पुस्तकातील यादी पुढें दिल्याप्रमाणें आहे

( १ ) युसफ आदिलशहा —हा इ स १४८९ त स्वतंत्र झाला व १५१० त मरण पावला

( २ ) इस्मायल आदिलशहा —हा १५१० त आपल्या बापाच्या गादीवर बसला, व १५५४ त मरण पावला.

( ३ ) मल्लू आदिलशहा —पुढें मल्लू आदिलशहा यास त्याच्या बापाची गादी मिळाला व तो इ स १८५५ त पदच्युत झाला

( ४ ) इब्राहिम आदिलशहा —हा आपल्या भावामागून राजा झाला व १५५७ त मरण पावला.

सुलतान अली आदिलशहा —इब्राहिमच्या पश्चात अली आदिलशहा हा आपल्या बापाच्या गादीवर बसला याचा इ स १५८० खून झाला

( ६ ) इब्राहिम आदिलशहा —अली आदिलशहानंतर इब्राहिम आदिलशहा हा त्याचा मुलगा राजा झाला

ग्रांटडफच्या यादींतील मुख्य फरक म्हटला म्हणजे त्यानें इस्मायल आदिशहाची कारकीर्द २० वर्षांनीं अधिक लांबविली असून त्याऐवजीं इब्राहिम आदिलशहाची कारकीर्द तितकीच कमी केली आहे

का ल वि भा ग —विजापूरचें आदिलशाही घराणें इ स १४८९ पासून १६८५ पर्यंत म्हणजे जवळ जवळ दोन शतकें टिकलें या दोनशें वर्षांतील विजापूरच्या राजांच्या परराष्ट्रीय व्यवहाराची अमीर बेरिदाचा पाडाव, निजामशाहीशीं स्पर्धा, मोंगलाविरुद्ध निजामशाहीस मदत, मराठ्यांचा उदय आणि औरंगजेबाविरुद्ध लढा या पाच भागात साधारणपणे कालानुक्रमें वांटणी करता येते ( १ ) विजापूरचीं पहिलीं ४२ वर्षे म्हणजे इ स १५३१ पर्यंतचा काळ स्वातंत्र्य प्रस्थापनार्थ बहामनी राजास बाहुलें करून बसलेल्या अमीर बेरिदाशीं झगडून त्याचा पाडाव करण्यात गेला या अवधींत आदिलशहानीं जीं जीं युद्धें केलीं मग तीं विजयानगरच्या हिंदु राजाशीं झालेलीं असोत किंवा अहमदनगरच्या मुसुलमान राजाशीं झालेलीं असोत त्यात बहुधा अमीर बेरिदाचेंच कारस्थान किंवा शत्रुपक्षास साहाय्य आढळून येईल यापुढील ६३ वर्षांतील युद्धें अहमदनगरची निजामशाही व विजापूरची आदिलशाही यामध्यें राज्यवृद्धीसाठीं चाललेल्या स्पर्धेमुळें उत्पन्न झालीं परंतु इ स १६१४ त दुसरा बुऱ्हाण निजामशहा मरण पावल्यावर अहमदनगरच्या राज्यांत घोंटाळे माजून तें राज्य जिंकण्याकरिता उत्तरेकडून मोंगलानीं स्वारी केली तेव्हा विजापूरच्या आदिलशहानें आपसांतील भांडणें बाजूस ठेवून इ स १६३६ त निजामशाहीचा अंत होईपर्यंत तीस व तिच्याप्रीत्यर्थ लढणाऱ्या शहाजीस यथाशक्ति मदत केली निजामशाही बुडाली तेव्हा आदिलशहाच्या वाट्यास तिचा बराचसा भाग आला व यापुढें शहाजी विजापूरच्या चाकरीस राहिला व त्यानेंहि आदिलशहाकरिता कर्नाटकांत बरेंच

विजय मिळविले. परंतु निजामशाहीच्या अंतकालबरोबरच मराठ्यांच्या उदयास सुरवात झाली. व अफजलखानाच्या वधापासून त्याच्याशीं प्रत्यक्ष तोंड लागून स्थूलमानानें इ. स. १६७५ पर्यंत ह्मणजे दुसऱ्या अली आदिलशहाच्या मृत्यूनंतर तीन वर्षेपर्यंत ती चालली. शिवाजीची कर्नाटकातील मोहीम या नंतरची आहे. तरी आदिलशाहीच्या जीवितास याचवेळीं शिवाजीपेक्षा मोगलाचेंच अधिक भय असल्यामुळें व शिवाजीनें कर्नाटकातील मोहिमेंत जिंकलेला मुलख अखेर आदिलशाहीस मोगलाविरुद्ध मदत करूनच बक्षीस ह्मणून मागून घेतला असल्यामुळें यापुढील आदिलशाहीचा झगडा शिवाजीपेक्षा मोगलाशींच अधिक होता असें म्हटलें पाहिजे. अली आदिलशहाच्या मृत्यूनंतर तख्तनशीन राजा अल्पवयी असल्यामुळें दरबारच्या मंडळींत सत्तेकरिता झगडे लागून औरंगजेबास विजापूर दरबारी आपलें कारस्थानाचें जाळें पसरण्यास फावलें, व त्यानें आदिलशाही जिंकून घेण्याकरिता एकावरएक सरदार पाठवून व शेवटीं स्वतः जातीनें येऊन इ.स.१६८६ मध्यें तें राज्य खालसा केलें.

आदिलशाहीच्या इतर राज्यांशीं झगड्यामध्यें कांहीं झगडे बरेच गुंतागुंतीचे होते. त्यांचा संबंध इतर राज्यांशीं व मूळच्या बहामनी राज्याशीं येतात. ते गुंतागुंतीचे झगडे घेण्यापूर्वी पोर्तुगीजांशीं आलेला संबंध प्रथम देतों.

*पो र्तु गी जां शीं झ ग डा.*—आदिलशाहीच्या पहिल्या दीडशें वर्षांचा इतिहास देताना पोर्तुगीज व आदिलशाही यांच्या संबंधाविषयीं ग्राटडफनें दिलेली हकीकत, ती त्यानें 'डी फारिआ' या यूरोपीय साधनाच्या आधारें घेतली असल्यामुळें आपणास विशेष महत्त्वाची आहे. पोर्तुगीज व आदिलशाही यांतील झगड्याची माहिती ग्राटडफच्या इतिहासांत पुढें दिल्याप्रमाणें मिळते:—ता. २७ फेब्रुवारी सन १५१० रोजीं पोर्तुगीज लोकांनीं विजापूरच्या राजापासून गोवें घेतलें, परंतु तें विजापुरकराच्या हातीं थोड्याच महिन्यांनीं परत आल्यामुळें अल्बुकर्क यानें ता.२५ नोव्हेंबर १५१० रोजीं तें पुन्हा जिंकून घेतलें. इ. स. १५४८ त विजापूरच्या राज्यांतील,गोव्याच्या आसमंतांतील भागापासून बाणकोटपर्यंत सर्व शहरें, पोर्तुगीज लोकांनीं जाळून टाकलीं व तेथील लोकांची कत्तल केली. एकदा तर इब्राहिम आदिलशहास पदच्युत करण्याकरिता त्यांची मदत मागण्यात येऊन त्यांना आदिशाहीच्या अंतर्गत राजकारणांत ढवळाढवळ करण्याचीहि संधि आली होती. पुढें इ.स. १५७१त अली आदिलशहानें गोव्यास वेढा दिला, परंतु पोर्तुगीज लोकांनीं त्यास हाकून लाविलें. या पराभवानंतर विजापूरच्या राजांनीं पोर्तुगीजांपासून गोवें घेण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं.

*अ मी र बे रि द चा पा डा व.*—इ. स.१४८९पासून१५३१ पर्यंतचा काळ म्हणजे आदिलशाहीच्या युसफ व इस्मायल या पहिल्या दोन राजांच्या अवळ अवळ सबंध कारकीर्दी अमीर बेरिदाशीं झगडून किंवा त्यानें रचलेल्या कारस्थानामुळें उद्भवलेल्या. शत्रूस तोंड देऊन आपलें स्वातंत्र्य प्रस्थापण्यांत गेल्या. कासीम बेरीद हा सुलतान महंमद बहामनी यांस नामधारी राजा करून सर्व सत्ता बळकावून प्रबळ झाला होता व त्याच्या मनांत विजापूर प्रांत आपल्याकडे घ्यावयाचा होता. ही गोष्ट युसफ आदिलखानाचा नाश केल्याशिवाय घडून येणें शक्य नसल्यामुळें त्यानें आरंभींच दुसऱ्या तर्फेतील कितीएक सुभेदारास आदिलखानाविरुद्ध उठवून आपण स्वतः त्यावर चालून आला व विजयानगरच्या राजासहि दक्षिणेकडून आदिलखानाच्या मुलखावर स्वारी करून रायचूर व मुद्गल हे किल्ले हस्तगत करण्यास भर दिली; परंतु आदिलखानानें प्रथम विजयानगरच्या राजाशीं तह करून कासीम बेरीद वगैरे मंडळींचा समाचार घेतला व पुढें विजयानगरच्या राजानें त्याच्या मुलखावर स्वारी केली तेव्हां त्याचाहि स्वतंत्रपणें पराभव केला (इ. स. १४९३). तथापि एवढ्यानें कासीम बेरिदानें लावलेल्या कलागतीचा समूळ नायनाट होणें शक्य नव्हतें. इ. स. १५१० मध्यें युसफ आदिलशहा मरण पावल्यावर त्याचा पुत्र अल्पवयी असल्यामुळें त्याच्या दरबारांतील सरदारांनीं सत्ता बळकाविण्यासाठीं खटपट चालविली, तेव्हां विजयानगरच्या राजानें रायचूर दोआबात स्वारी करून आदिलशाहीचा रायचूर किल्ला काबीज केला. यानंतर पुढें इ. स. १५१४ मध्यें अमीर बेरिदानेंहि महंमदशहा बहामनीच्या नावाखालीं निजामशहा, कुतुबशहा यांची कुमक मागवून आदिलशाहीवर स्वारी केली; पण इस्मायल आदिलशहानें त्यांचें कांहीं चालू न दिल्यामुळें तो भग्नमनोरथ होऊन परत आला. या विजयानें हुरूप येऊन इस्मायल आदिलशहानें विजयानगरपासून रायचूरमुद्गल घेण्याचा प्रयत्न केला; पण तो सफल झाला नाहीं. यापुढें आदिलशाहीविरुद्ध बेरिदाचें व निजामशहाचें सख्य जमण्यास एक नवीन कारण घडून आलें. इस्मायल आदिलशहाची बहीण मुरियम सुलताना हिचें लग्न निजामशहाशीं होऊन आदिलशहानें निजामशहास सोलापूरचा किल्ला व त्याबरोबरचे साडेपांच परगणे देण्याचें कबूल केलें; पण आदिलशहानें हा करार न पाळल्यामुळें निजामशहानें बेरिदाच्या मदतीनें सोलापूर घेण्यासाठीं विजापूरच्या मुलखांत दोनदा स्वारी केली; पण दोनहि वेळा त्यास अपयश येऊनच परत यावें लागलें. येणेंप्रमाणें बेरीदशहापासून आपणास वारंवार उपद्रव होतो, असें पाहून इस्मायल आदिलशहानें बेरिदावर स्वारी करून त्यास कैद करून बेदर शहर व किल्ला हस्तगत करून घेतला. तथापि इस्मायलनें उदार अंतःकरणानें त्यास मुक्त करून कल्याण व कंधार स्वाधीन करण्याच्या करारावर बेदर शहर अमीर बेरिदास दिलें. यानंतर इस्मायलनें रायचूरमुद्गल घेण्याकरितां विजयानगरवर पुन्हां स्वारी केली व शेवटीं सतरा वर्षांनंतर ते किल्ले एकदांचे पुन्हा काबीज केले. अमीर बेरिदानें कबूल

केल्याप्रमाणें कल्याण व कंधार या किल्ल्यांच्या चाव्या स्वाधीन न केल्यामुळें इस्मायलनें इ स १५३१ मध्यें सरतेशेवटीं त्या किल्ल्यास वेढा देऊन ते काबीज करण्याचा निश्चय केला बेरिदानें बुन्हाण निजामशहास आपल्या मदतीला बोलाविलें, पण इस्मायलनें त्या दोघांनांहि पराभूत करून आपला मनोरथ पूर्ण केला अमीर बेरिदाची ही बहुतेक शेवटचीच धडपड होती. यानंतर त्यानें आदिलशाहीविरुद्ध लढण्यात फक्त एकदाच भाग घेतला. इस्मायलशहाच्या मृत्यू ( इ स. १५३४ ) नंतर त्याचा पुत्र इब्राहिम आदिलशहा याचे त्याच्या प्रधानाशीं वाकडें आलेलें ऐकून निजामशहा व बेरिदशहा यांनीं मिळून विजापूरच्या मुलुखावर पुन्हां एकदा स्वारी केली, पण याहि स्वारींत त्यांस अपयशच आलें व सोलापूरचा किल्ला आदिलशहाकडे कायमचा ठेवण्याचा ठराव करून निजामशहास परत यावें लागलें यानंतर अमीर बेरिद मृत्यु पावल्यामुळें आदिलशाहीस त्याच्या कारस्थानामुळें होणारा त्रास कायमचा नष्ट झाला

निजामशाहीशीं स्पर्धा —यापुढील काळांतील आदिलशाहीचा मुख्य शत्रू म्हणजे अहमदनगरचें निजामशाही घराणें होय ही दोनहि घराणीं आपआपल्यापरी राज्यवृद्धीसाठीं प्रयत्न करीत असल्यामुळें त्यांचें एकमेकाशीं साहजिकच वैर आलें आदिलशहाचें विजयानगरशीं युद्ध उपस्थित होण्यास जसे सरहद्दीवरील रायचूर, मुद्गल हे किल्ले कारणीभूत होत आले, तसे निजामशाहीशीं युद्ध उपस्थित होण्यास सोलापूरचा किल्ला व त्याखालील साडेपाच परगणे हें कारण होऊं लागलें.आतापर्यंत बुन्हाण निजामशहानें ते आपल्या कबजांत घेण्याचा कित्येक वेळा प्रयत्न केला होता,पण तो सफळ झाला नाहीं. आदिलशहा व निजामशहा हे एकमेकाचे इतके कट्टे दुष्मन बनले होते कीं, एकमेकाचा नाश करण्यासाठीं ते दक्षिणेंतील प्रबल होत चाललेल्या विजयानगरच्या हिंदु राजासहि बिनदिक्कतपणें आपल्या मदतीस बोलावीत असत इ स. १५४३ सालीं बुन्हाण निजामशहा हा विजयानगरचा रामराय व गोवळकोंड्याचा कुतुबशहा यांची मदत घेऊन विजापूरच्या मुलुखावर चालून आला, तेव्हां इब्राहिम आदिलशहाचा वृद्ध व इमानी प्रधान आसदखान यानें विजयानगरशीं तह करून व निजामशहास सोलापूर महाल देऊन मागें परतविलें व कुतुबशहाशीं एकट्याशीं युद्ध करून त्याचा पूर्णपणें पराभव केला. यानंतर निजामशहानें पुन्हां उचल खाल्ली, परंतु आतां त्याचा एकट्याचा पराभव करणें आदिलशहास अड गेलें नाहीं, परंतु इब्राहिम आदिलशहाच्या दुर्वर्तनामुळें यापुढें मात्र विजयश्रीनें आदिलशाही घराण्यास सोडून निजामशाहीस माळ घातली. बुन्हाण निजामशहानें अवघ्या सहा महिन्यांत विजापूरच्या राज्यावर दोनदां स्वारी करून विजय संपादन केले पुढें १५४९ सालीं आसदखान मरण पावला, तेव्हां तर बुन्हाण निजामशहास चांगलेंच फावलें त्यानें विजयानगरच्या रामरायाशीं दोस्ती करून विजापूरच्या मुलुखावर स्वारी केली आणि स्वत करिता कल्याणी, व सोलापूर व विजयानगरकरितां रायचूर व मुद्गल हीं काबीज केलीं पुढें इ. स १५५३ मध्यें बुन्हाण निजामशहा मरण पावल्यावर त्याचा पुत्र हुसेन गादीवर आला, तेव्हां इब्राहिमानें कल्याणी व सोलापूर परत मिळविण्याच्या उद्देशानें हुसेनच्या प्रतिपक्ष्यास मदत करून त्यास अहमदनगरच्या गादीवर बसविण्याचा घाट घातला, पण हुसेनकडून पराभव पावल्यामुळें त्यास नामोहरम होऊन परत यावें लागलें यानंतर आदिलशहाच्या वाढत्या गैरवर्तणुकीमुळें त्याच्या स्वत च्याच राज्यांत बंडें उपस्थित होऊन त्यास विजयानगरची कुमक घ्यावी लागली

इब्राहिम आदिलशहा या दु स्थितींत फार दिवस जगला नाहीं इ स १५५७ मध्यें त्याला मृत्यु येऊन त्याचा पुत्र अली आदिलशहा गादीवर आला यानें राज्यारूढ होतांच विजयानगरच्या रामरायाशीं दोस्ती केली व त्याच्या मदतीनें निजामशहावर स्वारी करून इ स १५५८ त त्याजकडून कल्याणीचा किल्ला परत घेतला. तंव्हा हुसेन निजामशहानें कुतुबशहास आपली मुलगी देऊन त्याच्याशीं सख्य केलें व त्याच्या मदतीनें विजापूरच्या मुलुखावर चाल करून येऊन कल्याणीस वेढा घातला मागील स्वारीच्या वेळीं हिंदूंच्या उद्धटपणाचा कटु अनुभव अली आदिलशहास आला होता, तरी त्यानें या वेळींहि पुन्हां विजयानगरची मदत घेऊन कल्याणीचा वेढा उठविला विजयानगरच्या मदतीनें आदिलशहास आपला सोलापूरचा किल्लाहि निजामशहापासून सहज सोडविता आला असता, पण हिंदूंच्या उद्धटपणाचा व अत्याचाराचा इतका कडेलोट झाला कीं, आदिलशहा घाबरून गेला व केवळ नळदुर्ग नामक एक कमी महत्वाचा किल्ला हस्तगत करून त्यानें विजयानगरच्या सैन्यास वाटेस लाविलें वरील मोहिमींतील हिंदूंच्या वर्तनामुळे मुसुलमानास चीड येऊन त आपले खासगी द्वेष बाजूस ठेवून एकत्र झाले इ. स १५६४ त आपसांतील स्नेहबंधन दृढ करण्यासाठीं चांदबीबी नांवाची आपली मुलगी व सोलापूरचा किल्ला हुसेन निजामशहानें आदिलशहास दिला व सर्व मुसुलमान राजांनीं एकजुटीनें विजयानगरच्या राज्यावर स्वारी करून इ स १५६५ मध्यें तालीकोटच्या लढाईंत त्या प्राचीन हिंदू राज्यास धुळीस मिळविलं

तथापि मुसुलमानी राजांतील ही एकी विजयानगरचें राज्य नष्ट झाल्यावर क्षणभरहि टिकली नाहीं त्याच वर्षी अली आदिलशहा दक्षिणेंतील मोहिमेंत गुंतला आहे, असें पाहून निजामशाही सैन्यानें विजापूरवर स्वारी केलीच, तेव्हां उलट निजामशाही तख्तावर बालराजा आल्यामुळे तेथील दरबारी घोंटाळे माजलेले पाहून इ स १५६७ त अली आदिलशहानें निजामशाहीचा काहीं मुलूख काबीज करून त्याच्या रक्षणार्थ धारूर नामक किल्ला बांधला, पण निजामशाही सैन्यानें हा मुलूख आदिलशहाकडे फार दिवस राहूं

दिला नाहीं यानंतर इ. स. १५६८ त अली आदिल-शहानें दक्षिणेंत स्वारी करून अदवानीचा मजबूत किल्ला काबीज केला व पुढें त्यानें मूर्तिजा निजामशहाची गांठ घेऊन त्यास वऱ्हाड काबीज करण्यास मुभा देऊन स्वतःला दक्षिणेंतील विजयानगरच्या मुलुखावर अम्मल बसविण्यास मोकळें करून घेतलें. त्याप्रमाणें अली आदिलशहानें इ. स. १५७३ त दक्षिणेंत मोहीम केली व तोरगळ, धारवाड, बंकापूर इत्यादि किल्ले काबीज करून व जेर, चंद्रगुंडी वगैरे ठिकाणच्या पाळे-गारांपासून खंडण्या घेऊन सुमारें तीन वर्षांनीं तो विजापुरास परत आला.

येणेंप्रमाणें राज्याच्या अभिवृद्धीसाठीं इष्ट असलेली शांतता आदिलशाहीस चांगली दहा बारा वर्षें लाभली. अली आदिलशहाच्या मरणापूर्वी विजापूरच्या राज्याच्या चतुःसीमा ग्राटडफनें येणेंप्रमाणें दिल्या आहेत उत्तर—नीरा नदी, अक्कलकोट, नळदुर्ग व कल्याण हे सरहद्दीवरील जिल्हे होते पश्चिम—कांहीं अपवाद सोडून बाणकोटपासून रामास भूशिरापर्यंत समुद्रकिनारा दक्षिण—तुंगभद्रा नदी. या नदीच्या दाक्षणेस असलेला अदवानी जिल्हा व कदाचित् नेंधील ( ? ) जिल्हा विजापूरकराकडेच होता. पूर्व—रायचूर, यादगीर, मूळखेड व बेदर या आदिलशाही जिल्ह्याची सरहद्द.

पुढें १५८० मध्यें अली आदिलशहाचा वध होऊन त्याचा पुतण्या इब्राहिम हा अल्पवयी राजा गादीवर आला, तेव्हां मूर्तिजा निजामशहानें आदिलशाही मुलुखावर स्वारी करून जुनें वैर उकरून काढलें. तथापि त्यास पराभव पावून परत यावें लागलें. पुढें त्यानें कुतुबशहाच्या मदतीनें आदिल-शाहीवर पुन्हां स्वारी केली; पण विजापूरच्या दरबारांतील अबदुल हुसन नामक सरदाराच्या परिश्रमानें याहि वेळीं आदिलशाही राज्य संकटांतून बचावलें यानंतर कांहीं काळानें मूर्तिजा निजामशहाचा मुलगा मिरान हुसेन व इब्राहिम आदिलशहाची बहीण खुदीजा सुलताना यांमध्यें शरीर-संबंध होऊन दोन्ही राजांत पुन्हा नवीन नातें उत्पन्न झालें; पण मूर्तिजा निजामशहा व मिरान हुसेन या दोघांचेहि पुढें लवकरच एका वर्षाच्या अंतरानें वध होऊन जमालखान नामक सरदारानें सत्ता बळकाविल्यामुळें इब्राहिम आदिलशहानें इ. स १५८८ मध्यें अहमदनगरावर स्वारी करून आपल्या बहिणीस विजापुरीं परत आणलें व नंतर जमालखानाचा पाडाव करण्याच्या कामीं मूर्तिजाचा भाऊ बुऱ्हाण यास कुमक पाठविली; पण बुऱ्हाण निजामशहास या उपकाराची आठवण फार दिवस राहिली नाहीं आदिलशहाचा बंड-खोर सरदार दिलावरखान यास आश्रय देऊन त्याच्या चिथावणीनें त्यानें इ. स. १५९२ मध्यें विजापूरच्या मुलुखावर स्वारी केली व तींत अपयश आलें, तेव्हां पुन्हां दोन वर्षांनीं तो इब्राहिम आदिलशहास पदच्युत करण्याच्या कटांत सामील झाला तथापि इब्राहिमाच्या मुत्सद्दीपणापुढें हार खाऊन त्यास स्वस्थच बसावें लागलें.

मों ग ला वि रु द्ध नि जा म शा ही ग म द त.—दुसरा इब्राहिम आदिलशहा हा विचारी व उदार अंतःकरणाचा राजा होता त्याच्या हातीं सत्ता आल्यापासून त्यानें निजामशाही विरुद्ध लढाईचें धोरण कधींच स्वीकारलें नाहीं. निजामशाही विरुद्ध त्याला ज्या ज्या लढाया कराव्या लागल्या त्या बहुतेक बुऱ्हाणनिजामशहाच्या अविचारानेंच उपस्थित झाल्या होत्या इ. स. १५९४ मध्यें बुऱ्हाण निजामशहा मृत्यु पावून निजामशाही राज्यात अव्यवस्था झाली तेव्हां इब्राहिमाच्या सल्लागारांनीं त्यास या संधीचा फायदा घेण्याचा उपदेश केला; पण त्यानें तो ऐकला नाहीं. इतकेंच नव्हे तर पुढें निजाम-शाहींतील घोंटाळ्याचा फायदा घेऊन ती घशांत घालण्या-करिता अकबरानें दाक्षिणेंत फौज पाठविली, तेव्हा अहमद-नगरचें रक्षण करण्यासाठीं आदिलशहानें निजामशाही घराण्यांतील आपली चुलती चांदबीबी हिला यथाशक्ति मदत केली. अहमदनगरास मोंगलांच्या प्रचंड सैन्याचा वेढा पडून निजामशाही सैन्याचा पराभव होत असल्याचें त्यास कळताच त्यानें सोहलखानास पंचवीस हजार स्वारानिशीं सरहद्दीकडे निजामशाही सैन्यास मदत करण्यासाठीं रवाना केलें. नंतर वऱ्हाडप्रांत देऊन मोंगलाशीं तह झाल्यावर मिआनमंजू नामक सरदारानें चांदबीबीनें पुरस्कार केलेल्या बहादूर नामक राजपुत्राविरुद्ध अहंमद नावाच्या एका तोत यास तख्तावर बसविण्याचा हट्ट धरला. तेव्हां इब्राहिम आदिलशहानें मिआनमंजुची समजूत घालून तोतयास नेमणूक करून दिली व मिआनमंजूस आपल्या पदरीं सरदारी दिली. अशाच प्रकारें महंमदखान नामक दुसऱ्या एका निजामशाही सरदारानें पुंडाई आरंभली तेव्हां आदिलशहानें चांद सुलतानाच्या सहाय्यास आपली फौज पाठविली. यानंतर मोंगल वऱ्हाडप्रांताबाहेर पाय पसरीत आहे असें आढळून आल्या. वरून इ. स. १५९७ मध्यें त्याच्या सैन्यानें निजामशाही-बरोबर मोंगलाशीं मोठी लढाई दिली. दुसरा मूर्तिजा निजा-मशहा तख्तनशीन झाल्यावर इ. स. १६१० सालीं त्याच्या उपद्व्यापास कंटाळून त्यास पदभ्रष्ट करण्याचें मलिकंबराच्या मनात आलें तेव्हां इब्राहिम आदिलशहानेंच मलिकंबरास उपदेश करून पुन्हा आपल्या धन्यास मान द्यावयास लाविलें. पण पुढें इ. स १६१७ ( १६१५ ? ) सालीं मात्र आदिलशहानें आपण स्वतः तटस्थ राहून मलिकंबरास शरण आणण्याच्या कामीं शहाजहानास मदत केली. पुढें थोड्याच वर्षांनीं ( इ. स. १६१९ मध्यें ) आदिलशहानें अमीर बेरि-दावर स्वारी केली व बरीदशाही बुडवून बेदरचा किल्ला आपल्या राज्यांत समाविष्ट केला. इ. स. १६२१ मध्यें आदिलशाही फौज दक्षिणेस बंडखोराच्या पारिपत्यास गेली असतां तिकडे तिनें कर्नूळचा किल्ला घेतला. वर सांगितलेल्या आदिलशहाच्या तटस्थपणामुळें असो किंवा दुसऱ्या कांहीं

कारणामुळे अंगो मलिकंबर यापुढें आदिलशहाशीं व त्याचप्रमाणें आपल्या धन्याशीहि उपवादानें वागू लागला. आदिलशहास हें सहन झालें नाहीं. त्यानें मोंगलाचें साहाय्य घेऊन इ. स. १६२४ मध्यें अहमदनगरास चाल केली. परंतु मलिकंबरानें या सैन्याचा भातवडी येथें धुव्वा उडवून आदिलशहाकडील कित्येक नामांकित चांगले सरदार कैद केले. इतकेंच नव्हे तर पुढच्या वर्षी उलट तोच स्वतः विजापूरवर चाल करून गेला व त्या शहराचा नाश करून आदिलशहाचा बराचसा मुलूखहि त्यानें हातात घातला.

इ. स. १६२६ मध्यें इब्राहिम आदिलशहा मरण पावला. त्याचा विजापूर येथें असलेली भव्य व सुंदर कबर ही फार प्रेक्षणीय इमारत आहे. एकंदरीत हा फार चांगला राजा होता असें दिसतें. हा मेला तेव्हां त्याच्या खजिन्यात विपुल पैसा असून देशाचा भरभराट होती. याच्या सैन्यात ८०,००० घोडेस्वार व दोन लक्ष पायदळ होतें असें जें विजापूरच्या बखरींत म्हटलें आहे त्यांत काहीं अतिशयोक्ति असली पाहिजे हें उघड असलें तरी, त्याची सेना बरीच मोठी होती एवढें यावरून अनुमान काढण्यास काहीं हरकत नाहीं असें ग्रांट डफ म्हणतो.

इब्राहिमच्या मागून त्याचा पुत्र महमद गादीवर आला. त्याच्या कारकीर्दीतहि अहमदनगरविषयक धोरण एकंदरीत त्याच्या बापासारखेंच सुप्तपणाचें होतें. इकडे इब्राहिम आदिलशहा मरण पावला त्याच सुमारास तिकडे मलिकंबरासहि मृत्यु येऊन निजामशाही राज्यांत पुन्हा बखेडा सुरू झाला, व मोंगल पुन्हा स्वारी करून निजामशाही बुडवितात कीं काय अशी धास्ती वाटूं लागली. महमद आदिलशहास निजामशहा व मोंगल यामधील युद्धांत पडण्यास काय कारण झालें याची हकीगत ग्रान्टडफ देतो ती अशी:—

शहाजहान बादशहाचा सेनापति अजिमखान यानें अहमदनगरपासून धारूरचा किल्ला घेतला तेव्हां महमद आदिलशहा यानें आपला सेनापति रणदुल्लाखान यास पाठवून, मोंगल व विजापूरकर यांच्यामध्यें मलिकंबराच्या वेळीं झालेल्या एका गुप्त तहानुसार तो किल्ला आपल्या स्वाधीन करण्यात यावा अशी अजिमखानास विनंति केली. यावर विजापूरकरांनीं करारप्रमाणें अहमदनगराचें राज्य घेण्याच्या कामीं मोंगल बादशहास मदत केली नसल्यामुळें या किल्ल्यावर त्याचा हक्क पोहोंचत नाहीं असें अजिमखानानें उत्तर दिलें. याच वेळीं निजामशहानें आदिलशहास सोलापूरचा किल्ला परत करून मोंगलापासून संरक्षण करण्याकरितां त्याचा दोस्ती संपादन केली. परंतु त्याचें कारस्थान परिपक्व दशेस येण्यापूर्वीच रणदुल्लाखान व मोंगल सैन्य यामध्यें लढाई होऊन तींत विजापूरच्या सैन्याचा पराभव झाला (१६३१).

आदिलशहा व मोंगल यामध्यें कलह उत्पन्न होताच शहाजहान बादशहानें असफखान याच्या हातां खालीं दक्षिणेंत मोठें सैन्य पाठविलें. असफखानानें त्याच वर्षी म्हणजे इ. स. १६३१ तच विजापुरास वेढाहि दिला होता. परंतु विजापूरकरांनीं मोंगल सैन्यास दाणावैरण वगैरे काहीं मिळूं न दिल्यामुळें असफखानानें वेढा उठविला व पश्चिमेकडे मिरजेपावेतों मुलूख लुटीत व उध्वस्त करीत तो परत गेला.

निजामशाही दरबारांत सध्या मलिकंबराचा पुत्र फत्तेखान हाच सर्व सत्ता बळकावून बसला असून, शहाजी हा आपला सासरा जाधवराव याचा खून झाल्यामुळें अहमदनगर सोडून निघाला होता. दौलताबाद किल्ल्यातील शिबंदीची अव्यवस्था व निजामशाहीतील असंतोष या दोन कारणामुळें दौलताबाद किल्ला सहज हस्तगत करतां येईल असें शहाजीनें आदिलशहाच्या नजरेस आणल्यावरून, आदिलशहानें तो किल्ला घेण्याकरितां फौज पाठविली. हें वर्तमान कळताच निजामशाहीतील कारभारी फत्तेखान यानें मोंगलांचा दक्षिणचा सुभेदार मोहबतखान याची मदत मागितली. परंतु तो दौलताबादच्या किल्ल्याजवळ आल्यावर विजापूरकरांनीं फत्तेखानास आपल्याकडे वळवून घतलें व किल्ल्यातून फत्तेखानानें व बाहेरून विजापूरकरांनीं मोहबतखानाच्या सैन्यावर तोफांचा भडिमार करण्यास सुरवात केली. तेव्हां मोहबतखानास स्वतः यऊन त्यानें किल्ल्यास वेढा देऊन तो हस्तगत केला व खान डौरान यास किल्ल्याच्या संरक्षणार्थ ठेवून आपण स्वतः विजापूरच्या सैन्याचा पाठलाग करण्यासाठीं निघाला (१६३३). विजापूरचें सैन्य मागें हटत असतां दोन्ही सैन्यांत कित्येक चकमकी झाल्या. मोहबतखान विजापूरच्या राज्यांत बराच दूरवर आल्यावर, महमद आदिलशहाचा कारभारी मुरारपंत यानें त्यास तहाच्या बोलण्यास गुंतवून, सैन्याच्या एका तुकडीस दौलताबादेवर अचानक हल्ला करण्याकरितां पाठविलें, परंतु तिला तो किल्ला घेतां आला नाहीं. पुढें मोंगल सैन्यानें परांडा किल्ल्यास वेढा दिला. पण तो किल्ला स्वाधीन न झाल्यामुळें त्या सैन्यास वेढा उठवावा लागला. इतकेंच नव्हे तर मागें हटत हटत बऱ्हाणपूरपर्यंत परत जावें लागलें (१६३४).

इ. स. १६३५ मध्यें शहाजहान बादशहानें विजापूरकर व शहाजी यावर एका मोठ्या सैन्याची योजना केली. या सैन्यानें शहाजी व विजापुरकर यांचे एकामागून एक असे कित्येक किल्ले घेतले. परंतु शहाजानें मधून मधून मोंगल सैन्यावर हल्ले करावे व ते पाठलाग करण्याकरितां आले कीं त्याला चुकवावें हा मार्ग स्वीकारला होता व इकडे महमद आदिलशहानेंहि विजापुरच्या तटबंदीबाहेरील तळीं व विहिरी कोरड्या करून टाकल्यामुळें, विजापुरला वेढा देणें अशक्य झालें होतें. तेव्हां मोंगल सैन्यानें शत्रूच्या मुलुखांत जिकडे तिकडे लुटालूट व जाळपोळ करून तो उध्वस्त करून टाकण्यास सुरवात केली, व अशा रीतीनें आदिलशहास तहाचें बोलणें लावण्यास भाग पडलें (१६३६).

या तहानें परांडा व सोलापूर हे दोन किल्ले व त्याच्या खालील प्रदेश, सोलापूरच्या पूर्वेस असलेले नळदुर्ग, बेदर, व कल्याणी हे जिल्हे, आणि उत्तरेस बसईनदीपावेतोंचा व भीमा व निरा या नद्यामधील निजामशाहीचा मुलख एवढें विजापुराकराकडे ठेवण्यात येऊन, त्यानीं मोगल बादशहास सालीना वीस लक्ष होन खंडणी द्यावी, व शहाजी शरण येऊन त्यानें आपले सर्व किल्ले सोडले नाहींत तर महमद आदिलशहानें त्यास कोणत्याहि प्रकारची मदत करूं नये असें ठरलें.

मराठ्याचा उदय.—आदिलशाहींत आरंभापासूनच मराठ्याच्या कर्तृत्वास अनुकूल अशी परिस्थिति होती आदिलशाहींचा संस्थापक युसफ आदिलशहा मुसुलमान होता तरी त्याचा मराठ्यावर मुळींच कटाक्ष नव्हता. इब्राहिम आदिलशहा सिंहासनारूढ झाल्यावर ( ग्रांटडफप्रमाणें इ. स. १५५५ त ) त्यानें तर सरकारी हिशेबाच्या कामीं फारशीच्या जागीं मराठी भाषा उपयोगात आणली महत्वाच्या सनदा मात्र दोन्ही भाषात लिहिल्या जात होत्या. या योगानें महाराष्ट्र ब्राह्मणाच्या हातीं अधिकाधिक सत्ता येऊं लागली. त्यानें आपल्या सैन्यातील बरेचसे परदेशी शिपाई काढून टाकून त्याऐवजी तीस हजार दक्षणी घोडेस्वाराची फौज ठेवली व कित्येक सरदाऱ्याहि महाराष्ट्रीय लोकास दिल्या. बारगीर ठेवण्याची पद्धतीहि यानेंच प्रचारात आणली. सोळाव्या शतकात विजापूरच्या चाकरींत असलेले मराठे सरदार अनेक होते. चंद्रराव मोरे, रावनाईक निंबाळकर उर्फ फलटणराव, झुंजारराव घाटगे, माने, घोरपडे, डफळे, वाडीचे सावंत, इत्यादि अनेक नावें उदाहरणादाखल देता येतील. आदिलशहाचे बरेचसे विजय मराठे लोकाच्या मदतीनेंच मिळविलेले होते तथापि त्यास राज्यविस्तार करीत असताना मराठ्याविरूद्ध मुळींच झगडावें लागलें नव्हतें असें मात्र नाहीं. इ. स. १५७८ त अली आदिलशहानें कर्नाटकातील बर्गी सरदाराचा पुंडावा मोडण्याकरिता आपली फौज पाठविली होती. परंतु तिचें मराठे घोडेस्वारापुढें काहीं न चालल्यामुळें शेवटीं अली आदिलशहानें कारस्थान रचून या सरदाराचा विश्वासघातानें जीव घेतला असें फेरिस्ता म्हणतो. तथापि मराठ्याना पुढें आणण्याचें खरें श्रेय बर्गीसारख्या पुंड टोळ्याना नसून जो निजामशाहीच्या राजकारणात कित्येक वर्षे मुरला होता व ज्यानें मोगल बादशाहीस कित्येक वर्षे झुलविलें त्या राजकारणपटु शहाजीसच दिलें पाहिजे. हें कार्य आपण स्वतः पडद्याआड राहून साधण्यास आदिलशाहींत प्रवेश झाल्यावर शहाजीस चागली संधि मिळाली.

शहाजीच्या जहागरीचा विस्तार:—इ. स. १६३७ त मुरारपंताच्या शिफारशीवरून महमद आदिलशहानें शहाजीस आपल्या पदरीं चाकरीस ठेवून त्यास पुणे व सुपे हे दोन परगणे जहागीर दिले. यानंतर लवकरच रणदुल्लाखान नावाच्या आपल्या सेनापतीबरोबर शहाजीस देऊन त्या दोघाची महमद आदिलशहानें कर्नाटकच्या स्वारीवर रवानगी केली. कर्नाटकात शहाजीनें बजावलेल्या कामगिरीमुळें खूप होऊन विजापूरदरबारात त्यास कर्नाटकात होसकोटें, बाळापूर, शिरें, बंगलोर व कोल्हार हे जिल्हे, व महाराष्ट्रातील इंदापूर व बारामती हे दोन परगणे जहागीर करून दिले, व कन्हाड जिल्ह्यातील २२ परगण्याच्या देशमुखीची त्यास सनद करून दिली

महमद आदिलशहा स्वतः शूर माणूस नव्हता. तो विजापूर सोडून क्वचितच बाहेर जात असे आपली फौज सेनापतीच्या स्वाधीन करून तो स्वतः विजापुरात नगरसुधारणा करण्यात गर्क झाला होता. यामुळें शहाजीस मुकाट्यानें आपली सत्ता वाढविण्यास चागलेंच फावलें. त्यानें आपली स्त्री जीजाबाई व मुलगा शिवाजी याच्या स्वाधीन आपली महाराष्ट्रातील जहागीर करून व त्याच्या मदतीस आपलीं विश्वासू माणसें ठेवून तो स्वतः कर्नाटकात वेगळा राहू लागला.

शिवाजीचा उद्योग व शहाजीस कैद.—इ स १६४६–४७ या दोन वर्षांच्या अवधींत शिवाजीनें तोरणा, चाकण, कोंडाणें व पुरंदर हे किल्ले हस्तगत करून रक्तपात वगैरे काहीं एक न करता चाकणपासून नीरा नदीपावेतों मुलख आपल्या कबजात घेतला, व मोरबद टेकडीवर राजगड नावाचा एक नवीन किल्ला बाधला. महमदशहास या सर्व गोष्टी समजल्या असल्या तरी, जोंपावेतों स्वतः शहाजी आपल्या ताब्यात आहे तोंपर्यंत आपणास असल्या गोष्टींविषयीं काळजी करण्याचें काहीं कारण नाहीं असें त्यास वाटलें असावें. पण पुढें इ स. १६४८ मध्यें शिवाजीनें कल्याणहून विजापूरकडे जाणारा खजीना लुटून कल्याण व त्याच्या आसपासचे किल्ले घेतले, व लोहगड, राजमाची, भूरप, तिकोना, कांगोरी, कोआरी [ ? ] तळें, घोसाळें व रायरी हीं एकामागून एक आपल्या ताब्यात घेतलीं, तेव्हा विजापूरदरबारास फार काळजी वाटूं लागली. शिवाजीस त्याच्या वडिलाकडूनच उत्तेजन मिळत असलें पाहिजे अशी महमद आदिलशहाची समजूत असल्यामुळें फौज पाठवून शिवाजीचा बंदोबस्त करण्यास तो कचरत होता त्यानें मुधोळच्या बाजी घोरपड्यास गुप्त संदेश पाठवून त्याच्याकडून शहाजीस कैद करविलें, व दिलेल्या मुदतींत शिवाजी शरण आला नाहीं तर त्याच्या दगडी तुरुंगास ठेविलेलें एक भोंकहि कायमचें बंद करून त्याचा जीव घेण्याचा धाक घातला ( १६४९ ).

शिवाजीचा बंदोबस्त करण्यास अडचणी:—परंतु शिवाजीनें शहाजहान बादशहास अर्ज करून आपल्या वडिलाची तुरुंगातून सुटका करून घेतली. यानंतर चार वर्षेपर्यंत शहाजीस विजापूर सोडून जाण्याची आदिलशहानें परवानगी दिली नव्हती; पण इ. स. १६५३ त कर्नाटकात बरीच गडबड माजली असल्याविषयीं दरबारात बातम्या

येऊं लागल्या, तेव्हां मात्र शहाजीस बंदोबस्त करण्यासाठीं कर्नाटकांत जाऊं देणें आदिलशहास भाग पडलें. शहाजी विजापुरांत असतांना शिवाजीवर फौज पाठवावी, तर महंमद आदिलशहास अशी भीति वाटत होती कीं, तसें केलें असतां शिवाजी नुकताच घेतलेला कल्याणसभोंवतालचा प्रदेश मोंगल बादशहाच्या स्वाधीन करील, व मग आपण त्या प्रदेशास कायमचेंच मुकूं. कारण विजापुराकडील खंडणी तुंबली असल्यामुळें शहाजहान बादशहास तो मुलूख आपल्या ताब्यांत घेण्यास ही चांगलीच सबब होती. मध्यंतरीं बाजी शामराजाकडून शिवाजीस पकडण्याचा आदिलशहानें प्रयत्न केला पण तो सफल झाला नाहीं (१६५१-५२).

महमद आदिलशहा ता. ४ नोव्हेंबर सन १६५६ रोजीं विजापूर येथें मरण पावला. महंमद आदिलशहानें मोंगलांची खंडणी नियमितपणें अशी कधींच दिली नव्हती. परंतु त्यानें दाराच्या मार्फत मोंगलांच्या दरबारीं वशीला लावून शहाजहानाशीं सख्य ठेविलें होतें. अवरंगजेबाच्या मनांत दक्षिणदेश पादाक्रांत करून घेण्याचे विचार कित्येक दिवसांपासून घोळत होते. परंतु त्यातहि महमद आदिलशहाच्या दाराशीं असलेल्या या संबंधामुळें त्याचा विजापुरावर विशेषच दात होता. महमद आदिलशहाच्या निधनानंतर त्याचा पुत्र अली आदिलशहा सिंहासनारूढ झाला तेव्हां त्याचें वय एकोणवीस वर्षांचें होतें. त्याच्या राज्याचे उत्पन्न अजूनहि बरेंच होतें, खजीन्यांत विपुल पैसा होता व देश सुपीक होता. त्याचें सैन्य बरेंच मोठें होतें तरी तें या वेळीं कर्नाटकांतील बंडखोर जमीनदारांस हुकूमतींत आणण्यांत गुंतलें असल्यामुळें विभागलेलें होतें.

मोंगलांची कुरापतः—अली आदिलशहा तख्तनशीन झाला तेव्हां त्यानें शहाजहान बादशहाच्या अपेक्षेप्रमाणें त्यास सम्राट, म्हणून नजराणा पाठविला नाहीं किंवा गादीवर बसण्यास त्याची परवानगी देखील घेतली नाहीं, ही गोष्ट शहाजहानास न आवडून त्यानें असें जाहीर केलें कीं, "अली आदिलशहा हा माजी सुलतानाचा खरा मुलगा नसल्यामुळें विजापूरच्या गादीस वारस नेमण्याचा हक्क मोंगल बादशहास आहे." याप्रमाणें विजापूरकरांशीं युद्ध करण्यासाठीं नाहीं तरी कारण उकरून काढून शहाजहानानें मीरजुमला व अवरंगजेब यांची विजापूरच्या स्वारीवर नेमणूक केली. इ. स. १६५७ च्या मार्च महिन्यांत आपली सर्व तयारी पूर्ण करून अवरंगजेब व मीरजुमला हे विजापूरच्या मुलखांत चालून आले. कल्याण, बेदर व कुलबुर्गा हे तीनहि किल्ले एकामागून एक त्याच्या हातीं पडले व ते बिलकुल वेळ न गमावितां विजापूरच्या रोखानें जाऊं लागले. मध्यंतरी विजापूरच्या फौजेनें मोंगल सैन्यावर वारंवार हल्ले करून त्यांना अगदीं सतावून सोडलें होतें, परंतु लवकरच अवरंगजेबानें विजापूरचा कारभारी व सेनापति खान महमद याला लांच देऊन फितूर केल्यामुळें त्यानें मोंगलांच्या सैन्यास अडवून धरण्यांत कुचराई केली. विजापूरकरांकडील दुसरे सरदार शत्रूच्या सैन्याच्या मार्गांत विघ्नें आणण्याकरितां आपणाकडून धडपड करीत होते; परंतु त्यांना मुख्य सेनापतीची मदत न राहिल्यामुळें, विजापूरच्या लोकांनीं त्यांच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें शहराबाहेरील पाणी व दाणावैरण नाहींसें करण्यापूर्वींच अवरंगजेबाच्या सैन्याचा विजापुरास वेढा पडला. या वेळीं विजापूर काबीज करणें फारसें कठिण काम नव्हतें; परंतु याच सुमारास अवरंगजेबास आपला बाप अत्यवस्थ असल्याची बातमी समजल्यामुळें त्यानें आदिलशहानें लाविलेलें तहाचें बोलणें मान्य केलें. व त्याच्यापासून बराच नगदी पैसा घेऊन तो घाईघाईनें उत्तरेस निघून गेला.

इ. स. १६५८ त आदिलशहानें आपला कारभारी खान महमद यास त्याच्या विश्वासघाताबद्दल प्रायश्चित्त म्हणून मारेकरी घालून मारविलें, परंतु त्याची मालमत्ता जप्त न करतां ती त्याचा मुलगा खवासखान यासच देण्यांत आली.

शिवाजीवर अफजलखानाची नेमणूक व त्याचा वधः—शिवाजीचा आदिलशाहीविरुद्ध प्रयत्न यापूर्वींच उघड झाला होता तरी इ. स. १६५९ पर्यंत आदिलशहास त्याच्या पारिपत्यार्थ सैन्य पाठविण्यास सवड झाली नाहीं. त्या सालच्या सप्टेंबर महिन्यांत विजापूरदरबारानें शिवाजीच्या पारिपत्याकरितां ५००० फौज ७००० निवडक लोकांचें पायदळ, भरभक्कम तोफखाना, आणि उंटावरील जेजाला वगैरे भरपूर साहित्य बरोबर देऊन अफजलखान नावाच्या सरदाराची योजना केली परंतु तो प्रतापगडाखालीं शिवाजीच्या मुलाखतीस आला असतां शिवाजीनें त्याच्या पोटांत वाघनखें खुपसून त्याचा प्राण घेतला, व त्याच्या बेसावध फौजेवर छापा घालून तिची धूळधाण केली. या प्रसंगीं विजापूरकरांचे ४००० घोडे व खजीन्यासुद्धां छावणीचें सर्व सामान शत्रूच्या हातीं सापडलें.

शिवाजीची चढाईः—अफजलखानाच्या वधानंतर इ. स. १६५९ तच शिवाजीनें पन्हाळा, पावनगड, वसंतगड, रांगणा, खेळणा व सह्याद्रीच्या घाटमाथ्यावरील व खालील पन्हाळ्याच्या आसपासचे इतर सर्व किल्ले घेतले. त्यानें कृष्णानदीच्या काठानें खंडणी वसूल करीत जाऊन बत्तीसशिराळ्याच्या गांवांत ठाणेंहि घातलें होतें. शिवाजीच्या या कृत्यास आळा घालण्याकरितां त्याच सालच्या डिसेंबर महिन्यांत मिरज येथील रुस्तुमजमान नावाच्या सरदाराची योजना झाली पण शिवाजीनें त्याच्या फौजेचा धुव्वा उडवून त्यास कृष्णेपार घालवून दिलें, व अगदीं विजापूरच्या जवळपासपर्यंत खेडीं लुटीत व गांवोंगांवाहून खंडण्या गोळा करीत जाऊन तो त्वरेनें खेळण्यास (विशाळगडास) परत आला. यानंतर (जानेवारी १६६०) त्यानें राजापुरा-

पासून खंडणी गोळा केली, व दाभोळ व त्यावालील प्रदेश काबीज केला.

शिद्दी जोहाराकडून पन्हाळा काबीजः—शिवाजीनें एकामागून एक मिळविलेल्या विजयामुळें विजापुरकर इतके घाबरून गेले कीं, दरबारातील सरदारांनीं आपसातील भांडणें घटकाभर बाजूस ठेऊन कर्नूळच्या शिद्दी जोहाराची, बरीच मोठी सेना बरोबर देऊन शिवाजीवर रवानगी केली, व त्याच वेळीं जंजीन्याच्या फत्तेखानानें व वाडीच्या सावंतानीं शिवाजीच्या मुलखावर हल्ला करावा असें ठरलें पन्हाळ्याचें रक्षण करण्याकरिता स्वतः शिवाजीच त्या किल्ल्यात येऊन राहिला असल्यामुळें शिद्दी जोहारानें प्रथम त्याच किल्ल्यास वेढा दिला (मे १६६०). हा वेढा चार महिनेपर्यंत बसला होता. शिवाजीनें तो किल्ला आणखीहि कित्येक दिवसपर्यंत झुंजविला असता, परंतु किल्ल्याशीं बाहेरचें दळणवळण अगदीं बंद पडल्यामुळें आपले लोक इतर ठिकाणीं काय करीत आहेत हें शिवाजीस कळण्यास मार्ग राहिला नाहीं म्हणून त्यानें किल्ला स्वाधीन करण्यासंबंधीं शिद्दी जोहाराशीं बोलणें लावून, त्याचे लोक गाफिल झाले असता एके रात्रीं तो कांहीं निवडक मावळ्यासह गुप्तपणें बाहेर पडला. पाठलाग करणाऱ्या सिद्दी जोहाराच्या लोकांनीं त्यास दुसऱ्या दिवशीं सकाळीं गाठलें, तेव्हा त्याना अडवण्यास बाजी प्रभूस मागें ठेवून तो तेथून महा मैल असलेल्या रांगणा (?) किल्ल्यावर सुखरूप जाऊन पोंचला (सप्टेंबर १६६०).

आदिलशहाचें स्वारींत जातीनें आगमनः—शिवाजी निसटल्याचें वर्तमान ऐकून शिद्दीजोहाराला शिवाजीकडून लाच मिळाली असली पाहिजे अशी आदिलशहास शंका आली, व म्हणून त्यानें शिद्दीजोहारास काढून स्वारीचें आधिपत्य आपल्या स्वतःकडे घेतलें (जाने. १६६१). पावसाळ्यास सुरुवात होण्यापूर्वी आदिलशहानें रांगणा व विशाळगड हे दोन किल्ले खेरीज करून पन्हाळा व पन्हाळ्याच्या आसपासचे सर्व किल्ले शिवाजीपासून परत घेतले. शिवाजीहि इकडे कांहीं स्वस्थ बसला नव्हता. त्यानें देखील राजापूर व शृंगारपूरकर दळव्यांचा सर्व मुलख आपल्या ताब्यात घेतला होता व त्याच सालच्या पावसाळ्यात त्यानें जंजीन्याच्या शिद्द्यापासून दंडाराजपूरहि घेतलें.

कर्नाटकातील बंडः—पावसाळा संपल्यावर आदिलशहास महाराष्ट्रातील मोहीम सोडून कर्नाटकातील बंडें मोडण्याकरिता त्या प्रांतीं जावें लागलें. रायचूर व तोरगळ यावर निकराचे हल्ले करून आदिलशहानें त्यात आपलें बरेंच शौर्य दाखविलें परंतु तीं स्थळें त्याच्या हातीं आलीं नाहींत (१६६२) त्याच वर्षी त्यानें शिद्दी जोहाराचा पराभव केला. पुढें शिद्दी जोहाराच्याच लोकांनीं आदिलशहाची क्षमा मिळविण्याकरितां आपल्या धन्याचा वध केल्यामुळें त्याचा कांटा मार्गांतून कायमचाच नाहींसा झाला. बंडें मोडण्यांत दोन वर्षें कर्नाटकांत घालविल्यावर शेवटीं मोंघ्यान्या राजापासून खंडणी घेऊन आदिलशहा विजापुरास परत आला. परंतु एवढी खटपट करूनहि आदिलशहास त्या प्रांतांतील बंडाचा पूर्ण उपशम करता आला नाहींच

शिवाजीशीं सलोखाः—आदिलशहा कर्नाटकांत गेल्यावर इकडे शिवाजीनें मागील मोहिमींत गमावलेला सर्व मुलख आपल्या ताब्यात घेतला, व वाडीच्या सावंताचा देश पादाक्रांत करून त्याना आपलें अंकित केलें शेवटीं आदिलशहानें इब्राहिमखानाच्या जागीं नेमलेला आपला कारभारी जो अबदुल महमद त्याच्या सल्ल्यावरून शहाजीच्या मध्यस्तीनें शिवाजीशीं सलुख केला (१६६२). पण इ. स १६६४ त शिवाजी मोंगलांच्या मुलखात लुटालूट करण्यात गुंतला असता पन्हाळ्यास ठेवलेल्या विजापूरच्या सरदारांनीं तह मोडून कोंकण प्रांत परत मिळविण्याचा नेटाचा प्रयत्न केला. परंतु शिवाजी मोठें सैन्य बरोबर घेऊन त्याच्यावर चालून आला, व आक्टोबर महिन्यात एका लढाईत त्याचा पूर्ण पराभव केला. या लढाईत विजापूरकराकडील ६००० लोक मारले गेले असें कारवार व राजापूर येथील इंग्रज वखारवाल्यांनीं लिहून ठेविलें आहे. पुढें इ. स. १६६५च्या आरंभाला शिवाजीनें आपली कांहीं फौज विजापूरकराच्या कृष्णेच्या दक्षिणेकडील मुलखात लूट करण्यास पाठविली होती असें दिसतें. त्याच सालच्या फेब्रुवारी महिन्यात त्यानें बार्सेलोराहून बरीच लूट नेली व गोकर्णाच्या आसमंतांतील मुलखांत लुटालूट करून कारवारपासून खंडणी घेतली. वर सांगितल्या प्रमाणें विजापूरकरांनीं जरी शहाजीच्या मध्यस्थीनें शिवाजीशीं केलेला तह आपण होऊन मोडला होता तरी शिवाजी बरेच दिवसपर्यंत विजापूरकराच्या फारसा कधीं वाटेस गेला नाहीं. पण इ. स. १६६५ मध्यें त्याचा जयसिंहाशीं जो तह झाला त्या तहानें त्याला विजापूरकराविरुद्ध मोंगलास मदत करणें भाग पडलें.

पुन्हा मोंगलांची स्वारीः—त्या सालच्या नवंबर महिन्यात मोंगलांचे सरदार जयसिंह व दिलेरखान शिवाजीस आपल्या मदतीस घेऊन विजापूरच्या मोहिमीस आले. विजापूरकराच्या अंगात खंडणी देण्याचें आता सामर्थ्य न राहिल्यामुळें त्यांची खंडणी नेहमीं तुंबून रहात असे, व म्हणून औरंगजेबच्या मनांत विजापुरावर केव्हाहि स्वारी करावयाची असली कीं, त्याला खंडणी ही एक चांगलीच सबब होऊन राहिली होती या संयुक्त सैन्यानें विजापूरच्या निंबाळकर जहागिरदाराचें फलटण व तत्तोन्याचा किल्ला घेतला व मार्गांतील तटबंदीचीं ठिकाणें काबीज करीत ते पुढें चालले. आदिलशहानें मोंगलाशीं युद्ध करण्याची तयारी चालविली होती, तरी तो खंडणी चुकती करण्याचें अभिवचन देऊन स्वारी टाळण्याचा प्रयत्नहि करीत होता. परंतु जयसिंहानें मोहीम तहकूब न केल्यामुळें मंगळवेढ्याजवळ विजापूरच्या सैन्यानें मोंगलास प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. विजापूरचा कारभारी अबदुल महमद

हा आदिलशहाच्या सैन्याचा यावेळीं सेनापति होता विजापूरच्या सैन्यानें यावेळीं बरेंच शौर्य दाखविलें. पण त्याचा तादृश उपयोग झाला नाहीं

पुन्हा विजापुरास वेढा व तह:— इ स १६६६ त जयसिंहानें विजापुरास वेढा दिला परंतु त्याला शत्रूच्या घोडेस्वाराकडून फारच त्रास होऊं लागला आधल्या वर्षी पाऊस फारच थोडा पडला असल्यामुळें जयसिंहाच्या छावणींत पाण्याचा तुटवडा पडला होता व त्याच्या सैन्यात आजाराह बादशहाप्रमाणात होता. त्यांत आणखी शत्रूच्या घोडेस्वारांनीं जयसिंहाच्या छावणींत येणारी रसद मारून नेण्याचा क्रम चालू ठेविला व गोंवळकोंड्याच्या राजानेंहि आदिलशहाच्या मदतीस कांहीं फौज पाठविली अवरंगजेबानें शिवाजीस आपल्या दरबारीं बोलविल्यामुळें तो सर मागील सालच्या अखेरीसच त्याला सोडून गेला होता अशा स्थितींत अवरंगजेबाकडून मदत मिळण्याच्या बाबतींत निराशा झाली तेव्हां जयसिंहानें अवरंगाबादेस आपलें सैन्य परत नेलें इ स १६६८ त मोंगल व विजापूरकर याच्यामध्यें आग्रा येथे तह होऊन विजापूर दरबारमार्फत दाहा अबदुल हुसेन यानें मोंगलानीं विजापूरच्या मुलखास उपद्रव देऊं नये म्हणून सोलापूरचा किल्ला व १,८०,००० होन उत्पन्नाचा मुलूख मोंगलास दिला

शिवाजीस खंडणी —विजापूरच्या मुलखातून चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा शिवाजीचा बेत आहे ही गोष्ट आदिलशहाचा कारभारी अबदुल महमद यास समजतात त्यानें दरसाल तीन लक्ष रुपये शिवाजीस देण्याचें कबूल करून त्याच्याशीं सलूख केला (१६६८) हिंदूस खंडणी देणें ही गोष्ट मुसुलमान लोकास फार अपमानाची वाटत असल्यामुळें हा व अशाच प्रकारचे दुसरे करार नेहमीं गुप्त ठेवण्यात येत होते.

अली आदिलशहाचा मृत्यु व दरबारांतील भजबजपुरी'— ता १५ डिसेंबर सन १६७२ रोजीं विजापूरच्या अली आदिलशहास पक्षपाताच्या विकारानें पछाडलें व एवकरच तो कांहीं दिवसांनीं मृत्यु पावला यावेळीं त्याचा मुलगा सुलतान सिकंदर यास पाचवें वर्ष होतें व अबदुल महमदाखेरीज करून विजापूर दरबारांतील सर्व सरदार आपला तडीराम गार करून घेण्याकरिता धडपडत होते अबदुल महमदामध्यें हा दोष न हता, परंतु या धडखोर सरदारांवर वचक ठेवण्याइतकी त्याच्या अंगीं धमक हि नव्हती. राजपुत्र वयात येईपावेतों सर्व राज्यकारभार खवासखानानें चालवावा व आणि व दुसरे दोघ सरदार याच्याकडे राज्याच्या निरनिराळ्या भागाचा अधिकार सोंपविण्यांत यावा अशा त्यानें अली आदिलशहाजवळ शिफारस केली स्वत बादशहास ही व्यवस्था पसत नव्हती, परंतु तिला समति देण्याशिवाय आतां गत्यंतरच नव्हतें राज्यकारभार हातीं आल्यावर खवासखानानें कबुलीप्रमाणें मुजफरखानास कर्नाटकात पाठविलें, परंतु अबदुलकरीमास सेनेचें आधिपत्य देऊन व अबदुल महंमदाचा बाबत सर्व प्रकारें मानमरातब ठेवून त्याचें समाधान करण्याचा त्यानें प्रयत्न च लविला

शिवाजीची उचल —सिकंदर आदिलशहा गादीवर येताच शिवाजीनें पुन्ह विजापुरविरुद्ध उचल केली या सरदाराच्या हाताखाली असलेल्या ब्राह्मण नोकरांकडून शिवाजीस विजापूर दरबारची बित्तंबातमी लागत असल्यामुळ त्यानें विजापुरांत माजलेल्या भजबजपुरीचा शक्य तितका फायदा घेण्याचा निश्चय केला त्यानें इ स १६७३ च्या मार्च महिन्याच्या सुमारास पन्हाळा घेतला व हुबळी शहर लुटून तेथून अपरंपार संपत्ति नेली शिवाजीच्या हातून हुबळी शहरांतील जें कांहीं सुटलें होतें त्यावर तेथेंच ठेवलेल्या विजापूरच्या सैन्यानें हात मारून आपली धुवडी भरून घेतली।

युद्ध —इ स १६७३ त शिवाजीनें कारवार, अकोला वगैरे समुद्रकिनाऱ्यावरील स्थळें घेण्यास आपलें आरमार पाठविलें व इकडे परळी, सातारा, चदन, वंदन, पांडवगड, नदगिरि व तत्तोरा हे सव किल्ले हस्तगत करून घेतले तेव्हां विजापूरदरबाराकडून अबदुल करीम यांची शिवाजीवर रवानगी झाली त्यानें पन्हाळ्याच्या आसपासचा मैदानातील मुलूख शिवाजीपासून घेतला, परंतु इकडे प्रतापराव गुजरानें विजापुराजवळ बिनहरकत लुटालूट करण्यास आरंभ केल्यामुळें अबदुल करीमास परत बोलाविण्यात आलें प्रतापरावानें मिरज व विजापूर याच्या दरम्यानच विजापूरच्या सेनापतीस आडविलें व त्यास इतकें सतावून सोडलें कीं युद्ध तहकूब करण्याविषयीं प्रतापरावास विनंति करणें त्याला भाग पडलें प्रतापरावानें त्यास विजापूरला सुरक्षित जाऊं दिलें, परंतु कांहीं दिवसांनीं शिवाजी फेंड्यास वढा देऊन अडकून पडला आहे व प्रतापरावहि दूर वऱ्हाड पैनघाटात स्वाऱ्या करण्यास गेला आहे अशी संधि साधून अबदुलकरीम पन्हाळा घेण्याच्या उद्देशानें जंगी तयारी करून विजापूर हून निघाला व प्रतापराव परत येईपर्यंत तो अगदीं पन्हाळ्याजवळ येऊन पोहोंचला (१६७४) प्रतापराव गुजर विजापुरच्या सर्व सैन्यावर मागचा पुढचा कांहीं एक विचार न करता एकदम तुटून पडला. तेव्हां अबदुलकरीमानें त्याच्या मुद्दां त्याच्या निवडक लोकांची कत्तल करून मुख्य सैन्याची दाणादाण केली परंतु विजापूरच्या सैन्याची पराभूत झालेल्या लोकाचा पाठलाग करण्यात फाकाफाक झाली आहे असें पाहून हसाजी मोहित्याच्या हाताखालीं असलेल्या शिलकी फौजेनें आदिलशहाच्या सैन्यावर हल्ला केला, व त्याचा पराभव करून अबदुलकरीमास नामोहरम होऊन पुन्हा विजापूरला जावयास लाविलें

इ. स १६७५ त शिवाजीनें पन्हाळा व तत्तोरा यांच्यामधील सब ठाणीं घेऊन फोंड्याला विळखा घातला, परंतु शिवाजी कोंकणात गेला आहे अशी संधि साधून विजापूरकराकडील सरदार निंबाळकर व घाटगे यांनीं पन्हाळा व

तसारा यांच्यामधील शिवाजीनें घेतलेली सर्व ठाणीं परत हस्तगत करून घेतली. हें पाहून शिवाजीनें जिंकलेल्या मुलुखाचा पक्का बंदोबस्त होऊन तो पुन्हा शत्रूच्या हातीं जाणार नाहीं, अशी व्यवस्था करण्याचें ठरविलें. त्याचें पुढील वर्ष राज्याचा अंतर्गत बंदोबस्त करण्यातच गेलें. त्याच्या पुढील वर्षी त्यानें कर्नाटकात मोहीम केली, तेव्हा विजापूरचा कांहीं मुलूख घेतला; पण ज्याप्रमाणें इ. स. १५९४ त निजामशाही राज्यात बदाबुंदी माजून त्यावर मोंगलाची स्वारी आली तेव्हा आदिलशहानें आपली स्पर्धा सोडून निजामशाहीस साह्यच केलें, त्याचप्रमाणें आदिलशाही दरबारात घोटाळे माजलेले पाहून मोंगल विजापूरचें राज्य गिळंकृत करण्याकरिता पुढें आलले पाहून शिवाजीहि आपल्या मोहिमा टाकून त्याच्या मदतीस धावून आला.

अ व रं ग जे बा चि रु द्ध ल ढा, खवासखानाचा वधः— अकबराच्या वेळेपासून मोंगलानीं दक्षिणेंतील राज्यें आपल्या साम्राज्यात अंतर्भूत करण्याचा प्रयत्न चालविला होता, परंतु आतापर्यंत विजापूरचें राज्य त्याच्या कचाट्यात सापडलें नव्हतें; परंतु आता विजापूरच्या मसनदीवर अल्पवयी राजा येऊन दरबारात कलह माजल्यामुळें मोंगलास आपला हेतु सिद्धीस नेण्यास चागलेंच फावलें. खवासखानाचें लक्ष्य आपल्या राजाचें हित साधण्यापेक्षा स्वतःचा फायदा करून घेण्याकडेच विशेष होतें. त्यानें मोंगलाचा दक्षिणचा सुभेदार जो खानजहान त्याजजवळ विजापूरवरील मोंगलाच सार्वभौमत्व कबूल करून आपल्या बालवयी राजाची बहीण पादशहा बिबी हिला अवरंगजेबाच्या मुलास देण्याबद्दल अभिवचन दिलें. ही गोष्ट विजापूर दरबारातील इतर सरदारास माहीत होताच अबदुलकरीमप्रभृति मंडळींनीं खवासखानाचा वध करविला.राजाच्या बहिणीबद्दल विजापूरच्या लोकास विशेष अभिमान वाटत असल्यामुळें खवासखानाच्या वधामुळें कोणासहि दुःख झालें नाहीं आणि म्हणून खानजहान विजापूरच्या सरहद्दीवर चालून आल्याबरोबर सर्व लोक आपल्या राज्याचें रक्षण करण्याकरिता अबदुल करीमाच्या हाताखालीं लढण्यास तयार झाले. मोंगल व विजापूरकर यांच्यामध्यें झालेल्या लढायात विजापूरकरासच यश येत गेलें व दिल्लिरखान व अबदुलकरीम हे धर्मबांधवच असल्यामुळें पुढें लवकरच दिल्लिरखानाच्या मध्यस्तीनें मोंगल व विजापूरकर यांच्यामध्यें सलूख करण्यात आला ( १६७५ ).

अवरंगजेबाची भेदनीतिः—अवरंगजेब बादशहानें मलिक बरखुदार नावाचा आपला एक वकील विजापूरच्या दरबारीं पाठविला होता. हा वरपांगी अबदुलकरीमाशीं अगदीं सभ्यपणाचें वर्तन ठेवीत असे; परंतु आंतून मात्र विजापूर दरबारात दोन तट पाडून त्यातील एक पक्ष आपल्याकडे वळवून घेण्याची त्याची खटपट चालली होती. विजापुरांत मोंगल व अफगाण असे दोन तट उद्भवले होते व अबदुलकरीमानें खवासखानाचा वध करविला असल्यामुळें दिल्लिरखानाच्या मध्यस्तीनें मोंगलांशीं झालेलें सख्य फार दिवस टिकणें दुरापास्त होतें. अबदुलकरीम हा राजाचें हित तेंच आपलें हित असें मानीत असल्यानें त्यानें शिवाजीस मिळणेंच अधिक नैसर्गिक होतें व दिल्लिरखान व मोंगलांच्या सैन्यातील इतर अफगाण लोक यांच्याशीं असलेला त्याचा संबंध नसता तर त्यानें तसेंच केलेंहि असतें(१६७६).

शिवाजीची कर्नाटकात स्वारीः—इ. स. १६७७ त शिवाजीनें कुतुबशहाशी दोस्ती करून व त्याच्याजवळून तोफखाना व पैसा घेऊन कर्नाटकातील विजापूरकराच्या मुलुखावर स्वारी केली. आदिलशाहींतील अंतर्गत बखेड्यामुळें हा मुलूख वस्तुतः आता केवळ नावालाच त्या राजाच्या सत्तेखालीं राहिला होता. जिंजीचा किल्ला तेथील मुसुलमान किल्लेदारानेंच शिवाजीच्या स्वाधीन केला व वेलोरचा मजबूत किल्ला त्याच्या सैन्यानें सप्टेंबरच्या अखेरीस सर करून घेतला. यानंतर शिवाजीनें कर्नाटकगड व आणखी दोन किल्ले ( जगदेवगड व महाराजगड ) काबीज केले. शिवाजी कर्नाटकात गेला असता विजापूरचा कारभारी अबदुलकरीम व मोंगल सरदार दिल्लिरखान यांनीं मिळून गोवळकोंड्यावर स्वारी केली; परंतु मादण्णापंतानें अगोदरपासूनच चांगली तयारी करून ठेविली असल्यामुळें त्यानें या संयुक्त सैन्यास परतून लाविलें. विजापूरच्या सैन्यास पगार न मिळाल्यामुळें त्याची अगदीं दुर्दशा झाली होती व याच वेळीं अबदुल करीमहि आजारी पडून तो पुढील ( १६७८ ) सालच्या जानेवारी महिन्यात मरण पावल्यामुळें विजापूरच्या दरबारीं सर्वच अव्यवस्था झाली.

विजापूर दरबारातील मसूदखान नावाच्या एका सरदाराजवळ खासगी संपत्ति विपुल असल्यानें आपलें कर्ज वारून विजापूरच्या सैन्याचा पगार चुकता करण्याचा व मागें खवासखानानें केलेल्या तहाच्या अटी पाळण्याच्या करारावर दिल्लिरखानानें त्यास कारभारी केलें ( १६७८ ); परंतु विजापूरला येतांच मसूदखानानें आपल्या फौजेस रजा दिली व लोकांचीं मनें संतुष्ट राखण्याकरिता त्यानें पादशहाबीबीहि मोंगलाच्या स्वाधीन करण्याचें नाकारलें

इकडे शिवाजीनें बल्लारी, कोपळ व बहादुरबेंडा व त्याच्या आसमंतातील प्रदेश घेतल्याचें ऐकून विजापूरकरांचें सैन्य कृष्णा व तुंगभद्रा यांच्या दोआबात आलें होतें; पण हंबीरराव व जनार्दनपंत यांनीं या सैन्यावर हल्ला करून त्याचा पूर्ण मोड केला व ५०० घोडे, ५ हत्ती व त्या लष्कराचा सेनापति यांना धरून नेलें ( १६७८ ). यानंतर त्यांनीं सर्व दोआब प्रांत आक्रमण करून कोपळ व बल्लारी यांच्या आसमंतातील विजापूरच्या राज्यांतील बंडखोर देशमुखास हुकमतात आणलें. पावसाळ्यास आरंभ होऊन नद्यांना पूर आल्याकारणानें मसूदखानास मराठ्याचा प्रतिकार करतां आला नाहीं.

**मोंगलाविरुद्ध शिवाजीची मदत व त्यास कर्नाटकातील मुलूख बक्षीस** —इ स १६७८ तच मोंगलाचा विजापूर दरबारातील वकील सरसुदारखान यानें पादशहाबीबीची मागणी केली मसूदखान तिला मोंगलाच्या स्वाधीन करण्यास तयार नसल्यानें शहराच्या रस्त्यात मोंगल व विजापूरकर याच्यामध्यें लढाई होण्याचा प्रसंग आला होता, पण स्वत पादशहाबीबी त्या ठिकाणीं गेली व भावाचें व त्याच्या राज्याचें रक्षण करण्यासाठीं आपण होऊन मोंगलाच्या छावणींत जाण्याचा तिनें आपला निश्चय जाहीर केल्याकारणानें तो प्रसंग टळला. दिल्लिरखानानें लवाजमा देऊन पादशहाबीबीची अवरंगाबादेस रवानगी केली; परतु आपण स्वत विजापुरावर चालून आलाच (१६७९) तेव्हा मसूदखानानें शिवाजीची मदत मागितली विजापूरला वेढा घालण्याच्या निश्चयापासून दिल्लिरखानास परावृत्त करण्याकरिता शिवाजीनें भीमेपासून गोदावरीपर्यंत मोंगलाचा मुलूख लुटून उध्वस्त केला व गोदावरी ओलाडून जालना देखील लुटला, तरी सुद्धा दिल्लिरखानानें आपलें वेढ्याचें काम तसेंच पुढें चालू ठेविलें होतें शेवटीं वेढा देणारें सैन्य शहराच्या कोटापावेतों येऊन पोहोंचलें, तेव्हा विजापुराकडे त्वरित येण्याविषयीं मसूदखानानें शिवाजीस निरोप पाठविला मसूदखान आपल्या लोकास उत्तेजन देत असल्यामुळें त्यानीं आपल्या शहराच्या रक्षणाचें काम मोठ्या निश्चयानें चालविलें होतें. इकडे शिवाजी कडून हंबीररावाच्या नेतृत्वाखालीं आलेल्या फौजेनेंहि दिल्लिरखानाच्या सैन्याभोंवतीं घिरट्या घालून त्याची रसद बंद पाडली होती, यामुळें पावसाळा सपताच दिल्लिरखानानें वेढा उठवून हटनी लुटली व कृष्णा ओलाडून कर्नाटक प्रातीं लुटालुटीस आरंभ केला, पण तेथें शिवाजीच्या सैन्यानें त्याच्याशीं लढाई देऊन त्याचा पूर्ण पराभव केल्यामुळें दिल्लिरखानास परत जाणें भाग पडलें (१६७९) विजापूरला मदत केल्याबद्दल मोबदला म्हणून शिवाजीनें कोपळ व बल्लारी यांच्या आसमंतातील प्रदेश विजापूरकराकडून मागून घेतला आणि कर्नाटकातील आपली जहागीर व द्रविड प्रातातील त्यानें नुकताच जिंकून घेतलेला मुलूख याच्या वरील स्वामित्वाची सनदचिठ्ठी देण्यासहि त्याना भाग पाडलें (१६८०)

**विजापूर दरबारची स्थिति** —मसूदखानानें विजापूरच्या फौजेंतील बहुतेकास पूर्वींच काढून टाकल असल्यामुळें आता विजापूरकराजवळ मराठे मनसबदाराच्या फौजेशिवाय फारच थोडें घोडदळ राहिलें होतें या वेळीं विजापूर दरबारात सर्जेखान हाच काय तो एक चागला सरदार होता, परतु याच्या हाताखालील सैन्य घोडेस्वाराचेंच असल्यामुळें मसूदखानाचें घोडदळास रजा देण्याचें धोरण याला न आवडून या दोघात गाढांनिकच वितुष्ट आल व म्हणून मसूदखानानें इ स १६८१ च्या सुमारास राज्यकारभारातून आपलें अंग काढून तो अदवानीस गला मुसुलमान सरदारात दुही माजविण्याकरिता अवरंगजेबाचा वकील म्हणून विजापूरदरबारीं ठेवलला जो मलिक बरखुदार नांवाचा गृहस्थ होता त्याचेंच हे खेळ होते. त्यानें विजापूरच्या लोकास असें भासविलें कीं मराठ्याशीं नुकताच जो तुम्हीं तह केला आहे त्यामुळें अवरंगजेबाची तुमच्यावर फार खप्पा मर्जी झालेली आहे. यामुळें मसूदखान जातो न जातो तोंच विजापूरकरानीं अवरंगजेबास खूष करण्याकरिता पुढचा मागचा विचार न करिता मराठ्यापासून मिरज परत घेतले व त्याच्याशीं कायमचें वैर संपादन केलें यावेळीं विजापूरदरबारची स्थिति फार चमत्कारिक झाली होती जहागीर गमावण्याच्या भीतीनें सर्व मराठे मनसबदार स्वत ला विजापूरकराचे चाकर म्हणवीत होते, परतु त्यांचे कांहीं नातेवाइक मात्र उघड उघड मोंगलाच्या चाकरीस जाऊन राहिले होते दक्षिणेंतील या लोकामध्यें भाऊबदकी तर इतकी माजली होती कीं प्रतिपक्षाचा सूड घेण्याकरिता हे लोक स्वारी करून येणाऱ्या शत्रूस जाऊन मिळत एवढेंच नाहीं तर स्वहित साधलें नाहीं तरी केवळ विरुद्ध बाजूचें नुकसान करिता यावें म्हणून आपला धर्म सोडून मुसुलमान झाल्याचीं उदाहरणें काहीं थोडीं आढळून येत नाहींत

**अवरंगजेबाची विजापुरावर मोहीम** —अवरंगजेबान दक्षिणेंत आल्यावर विजापूरच्या मोहिमेवर राजपुत्र आजिमशहा याची योजना केला (१६८४) कित्येक दिवसपर्यंत विजापूरकराशीं लढण्यात आजमशहास म्हणण्यासारखें यश आल नाहीं, परतु पुढ लवकरच त्यानें सोलापुरास वेढा घालून पुढील वर्षी तो सर केला (१६८५)

इ स १६८५ सालचा पावसाळा सपून लढाईचा मोसम सुरू होताच अवरंगजेबानें रोहउल्लाखान याला विजापुरास वेढा देण्याकरिता जाण्याविषयीं हुकूम केला, व त्याच सालच्या अखेरीस स्वत अजिमशहाहि विजापुराकडे सावयास निघाला या सालीं अवर्षण पडल्यामुळ विजापूरच्या आसपास दुष्काळ पडला असून त्या भागात जें काय थोडें बहुत धान्य झालें होत तेंहि किल्ल्यामध्यें साठवून ठेवण्यात आलें होतें म्हणून विजापूरच्या फौजेनें अजिमशहास अगोदर विजापुराजवळ येऊ दिलें व नतर सोलापुर यथील बाद शहाच्या छावणीशीं त्याचें असलल दळणवळण बद पडून त्याला त्रास द्यावयास सुरवात केली या वेळीं अजिमशह च्या सर्व सैन्याचा नाशच व्हावयाचा परतु ऐन वेळेस बादशहानें पाठविलेल्या धान्याच्या २०,००० गोण्या त्याला मिळाल्यामुळें तो या आणीबाणीच्या प्रसंगातून वाचला (१६८६)

**विजापूरकाबीज** —यानतर बादशहानें स्वत विजापुरास येऊन त्या शहराला वेढा दिला किल्ल्यात शिबदी थोडी असून शिपायाचा पगार तुबलेला होता तरी शहरातील लोकानीं मोठ्या शौर्यानें किल्ला लढविण्याचें काम चालू ठेविलें होतें शेवटीं अवरंगजेबाच्या तोफानीं शहराच्या तटबदीस भगदाड पाडलें परतु बादशहानें हल्ला न करतो

तत्तारा यांच्यामधील शिवाजीनें घेतलेली सर्व ठाणीं परत हस्तगत करून घेतलीं. हें पाहून शिवाजीनें जिंकलेल्या मुलुखाचा पक्का बंदोबस्त होऊन तो पुन्हा शत्रूच्या हातीं जाणार नाहीं, अशी व्यवस्था करण्याचें ठरविलें. त्याचें पुढील वर्ष राज्याचा अंतर्गत बंदोबस्त करण्यातच गेलें. त्याच्या पुढील वर्षी त्यानें कर्नाटकात मोहीम केली, तेव्हां विजापूरचा कांहीं मुलूख घेतला; पण ज्याप्रमाणें इ. स. १५९४ त निजामशाही राज्यात अदाधुंदी माजून त्यावर मोंगलांची स्वारी आली तेव्हां आदिलशहानें आपली स्पर्धा सोडून निजामशाहीस साह्यच केलें, त्याचप्रमाणें आदिलशाही दरबारात घोंटाळे माजलेले पाहून मोंगल विजापूरचें राज्य गिळंकृत करण्याकरितां पुढें आलले पाहून शिवाजीहि आपल्या मोहिमा टाकून त्याच्या मदतीस धावून आला.

अवरंगजेबाविरुद्धलढा, खवासखानाचा वधः— अकबराच्या वेळेपासून मोंगलांनीं दक्षिणेतील राज्यें आपल्या साम्राज्यात अंतर्भूत करण्याचा प्रयत्न चालविला होता, परंतु आतापर्यंत विजापूरचें राज्य त्यांच्या कचाट्यात सापडलें नव्हतें, परंतु आतां विजापूरच्या मसनदीवर अल्पवयी राजा येऊन दरबारात कलह माजल्यामुळें मोंगलांस आपला हेतु सिद्धीस नेण्यास चांगलेंच फावलें. खवासखानाचें लक्ष आपल्या राजाचें हित साधण्यापेक्षां स्वतःचा फायदा करून घेण्याकडेच विशेष होतें. त्यानें मोंगलांचा दक्षिणचा सुभेदार जो खानजहान त्याजजवळ विजापूरवरील मोंगलांचें सार्वभौमत्व कबूल करून आपल्या बालवयी राजाची बहीण पादशहा बिबी हिला अवरंगजेबाच्या मुलास देण्याबद्दल अभिवचन दिलें. ही गोष्ट विजापूर दरबारातील इतर सरदारांस माहीत होताच अबदुलकरीमप्रभृति मंडळींनीं खवासखानाचा वध करविला. राजाच्या बहिणीबद्दल विजापूरच्या लोकांस विशेष अभिमान वाटत असल्यामुळें खवासखानाच्या वधामुळें कोणासहि दुःख झालें नाहीं आणि म्हणून खानजहान विजापूरच्या सरहद्दीवर चालून आल्याबरोबर सर्व लोक आपल्या राज्याचें रक्षण करण्याकरितां अबदुल करीमाच्या हाताखालीं लढण्यास तयार झाले. मोंगल व विजापूरकर यांच्यामध्यें झालेल्या लढायात विजापूरकरांसच यश येत गेलें व दिल्लिरखान व अबदुलकरीम हे धर्मबांधवच असल्यामुळें पुढें लवकरच दिल्लिरखानाच्या मध्यस्तीनें मोंगल व विजापूरकर यांच्यामध्यें सलूख करण्यात आला (१६७५).

अवरंगजेबाची भेदनीतिः—अवरंगजेब बादशहानें मलिक बरखुदार नांवाचा आपला एक वकील विजापूरच्या दरबारीं पाठविला होता. हा वरपांगीं अबदुलकरीमाशीं अगदीं सभ्यपणाचें वर्तन ठेवीत असे; परंतु आंतून मात्र विजापूर दरबारात दोन तट पाडून त्यांतील एक पक्ष आपल्याकडे वळवून घेण्याची त्याची खटपट चालली होती. विजापुरांत मोंगल व अफगाण असे दोन तट उद्भवले होते व अबदुलकरीमानें खवासखानाचा वध करविला असल्यामुळें दिल्लिरखानाच्या मध्यस्तीनें मोंगलांशीं झालेलें सख्य फार दिवस टिकणें दुरापास्त होतें. अबदुलकरीम हा राजाचें हित तेंच आपलें हित असें मानीत असल्यानें त्यानें शिवाजीस मिळणेंच अधिक नैसर्गिक होतें व दिलेरखान व मोंगलांच्या सैन्यातील इतर अफगाण लोक यांच्याशीं असलेला त्याचा संबंध नसता तर त्यानें तसेंच केलेंहि असतें (१६७६).

शिवाजीची कर्नाटकात स्वारीः—इ. स. १६७७ त शिवाजीनें कुतुबशहाशीं दोस्ती करून व त्याच्याजवळून तोफखाना व पैसा घेऊन कर्नाटकातील विजापूरकरांच्या मुलखावर स्वारी केली. आदिलशाहींतील अंतर्गत बखेड्यामुळें हा मुलूख वस्तुतः आतां केवळ नांवालाच त्या राजाच्या सत्तेखालीं राहिला होता. जिंजीचा किल्ला तेथील मुसुलमान किल्लेदारानेंच शिवाजीच्या स्वाधीन केला व वेलोरचा मजबूत किल्ला त्याच्या सैन्यानें सप्टेंबरच्या अखेरीस सर करून घेतला. यानंतर शिवाजीनें कर्नाटकगड व आणखी दोन किल्ले (जगदेवगड व महाराजगड) काबीज केले. शिवाजी कर्नाटरात गेला असता विजापूरचा कारभारी अबदुलकरीम व मोंगल सरदार दिल्लिरखान यांनीं मिळून गोंवळकोंड्यावर स्वारी केली; परंतु मादण्णापंतानें अगोदरपासूनच चांगली तयारी करून ठेविली असल्यामुळें त्यानें या संयुक्त सैन्यास परतून लाविलें. विजापूरच्या सैन्यास पगार न मिळाल्यामुळें त्याची अगदीं दुर्दशा झाली होती व याच वेळीं अबदुल करीमहि आजारी पडून तो पुढील (१६७८) सालच्या जानेवारी महिन्यात मरण पावल्यामुळें विजापूरच्या दरबारीं सर्वच अव्यवस्था झाली.

विजापुर दरबारांतील मसूदखान नांवाच्या एका सरदाराजवळ खासगी संपत्ति विपुल असल्यानें आपलें कर्ज वारून विजापूरच्या सैन्याचा पगार चुकता करण्याच्या व मागें खवासखानानें केलेल्या तहाच्या अटी पाळण्याच्या करारावर दिल्लिरखानानें त्यास कारभारी केलें (१६७८); परंतु विजापुरला येताच मसूदखानानें आपल्या फौजेस रजा दिली व लोकांचीं मनें संतुष्ट राखण्याकरितां त्यानें पादशहाबीबी

वेढा तसाच कायम ठेवण्याचें ठरविलें शहरांत अन्नाचा तुटवडा पडून आंतील लोकांची अगदीं असहाय स्थिति झाली होती. या सर्व गोष्टी नेहमी डोळ्यापुढें दिसत असल्यामुळे इ स. १६८६ च्या अक्टोबर महिन्यांतील १५ व्या तारखेच्या सुमारास अखेरीस विजापूरचे लोक बादशहास शरण आले तेव्हां बादशहानें विजापूरच्या मुख्य सरदारास आपल्या चाकरींत घेतलें, व राजपुत्र सिकंदरशहास आपल्या छावणींत कैदेंत ठेविलें. येथेंच तो पुढें तीन वर्षांनीं ( १६८९ ) मरण पावला याला अवरंगजेबानें विषप्रयोग करून मारलें असावें अशी तत्कालीन कित्येक लोकांस शंका होती

समालोचन —आदिलशाहीचा एकंदर इतिहास वाचला असतां असें दिसून येतें कीं इ स १६५९ मध्यें शिवाजीवर मोहीम पाठवून त्याच्याशीं समोरासमोर लढण्याचा प्रसंग येईपर्यंत आदिलशाही राज्याचा सर्व काळ सत्तावर्धनांतच गेला होता. आरंभीं बेदरप्रभृति सरदाराशीं लढावें लागलें तें मूळ स्वतंत्र राज्य स्थापन करण्यासाठींच होय त्यानंतर निजामशाहीशीं झगडा सुरू झाला. पण तो झगडा स्वतःच्या राज्याची मर्यादा वाढविण्याकरितांच असून त्या वेळेस आदिलशहांना दक्षिणेंतील विजयानगरच्या मुलुखावर चांगलाच हात मारावयास मिळाला. यानंतर मग ऱ्हासाच्या वेळेचा काळ आला. पण त्यांतहि आरंभीं आरंभीं शहाजी सारख्या बलिष्ठ मराठे सरदाराकडून विजापूरच्या राज्यास दक्षिणेंत राज्यविस्तार करण्यास मदतच होत गेली. सारांश आदिलशाहीचा ऱ्हास झाला तो अखेरच्या अवघ्या पाव शतकांतच होय. येणेंप्रमाणें आदिलशाहीची पावणेंदोन शतकें वर्धिष्णु स्थितींत गेल्यामुळें व या अवधींत तीस जे राजे लाभले तेहि बहुतेक गुणग्राहकच निघाल्यामुळें तिचें वैभव अपरंपार वाढलें आदिलशाहींत जीं कांहीं ठळक ठळक शिल्पकामें झालीं त्याच्या यादीकडे जरी नुसती नजर फेंकली तरी देखील आदिलशाहींतील संपत्तीचा व तिचा कलाकौशल्याच्या उत्तेजनाच्या कामीं कसा विनियोग झाला याची सहज कल्पना करतां येते आदिलशाहीचा संस्थापक युसफ यानें खुद्द विजापूर शहराची स्थापना करून, कित्येक बाजार व व्यापारी पेठा वसवून व अनेक अजस्र तट बांधून शहरास शोभा आणली सोलापूर, परांडा, मिरज इत्यादि किल्ल्यांचीं विशाल व मजबूत कामें या कारकीर्दींतच झालीं. याच्या मागून इस्मायल आदिलशहा गादीवर आला. त्यानें चंपामहाल व मुद्गल हे किल्ले बांधले. त्याचा पुत्र इब्राहिम आदिलशहा याच्या कारकीर्दींत अनेक किल्ल्यांस उत्तम दगडी कोट बांधून इब्राहीमपूर शहर वसविण्यांत आलें. पुढें अली आदिलशहानें *गगनमहाल, जम्मामशीद, इब्राहीमपूर, सदाफुल्ल* यासारखीं सुंदर कामें उठविलीं. नंतर इब्राहिम आदिलशहा तख्तनशीन झाला. त्यानें तर नवरसपूर, नवरसमहाल, सातमजली माडी, आनंदमहाल, आरसेमहाल अशीं सुंदर व रम्य स्थळें बांधून आपल्या पूर्वजांवर ताणच केली याचा अनुगामी महंमद यानें घोलघुमटासारख्या उत्तम इमारती तयार करविल्या. याच्यापुढें नवरत्नखचित शिरपेंच लटकलेले हजारों मानकरी, सरदार, अमीरउमराव आणि बडे लोक लीनतेनें उभे असत; रत्नभूषणांनीं शृंगारिलेले शेंकडों हत्ती सज्ज असत हा नुसता शहरांत फिरावयास गेला तरी ह्यावर लोक सोन्यारुप्याचीं फुलें उधळीत असें म्हणतात याच्या जिलबींच्या हजारों घोड्यांच्या जिनास हिरे, मोत्यें, पाचू, माणकें वगैरे लटकलेलीं असत असें याच्या वैभवाचें वर्णन आढळतें याची औदार्याबद्दलहि बरीच ख्याति होती. वारंवार द्रव्याची तुळा करून तें तो गोरगरीब व फकीर यास वांटी याचा पुत्र दुसरा अली आदिलशहा याच्या कारकीर्दींतहि विजापूर प्रांतांतून सोन्याचा धूर निघत होता तथापि याच्याच कारकीर्दींत आदिलशाहीच्या अवनतीस सुरवात झाली व ती लागलीच पुढच्या शहाच्या अमदानींत रसातळास गेली

**आदिलशाही घराण्याचा वंशवृक्ष.**




[ संदर्भग्रंथ —महंमद कासीम फेरिश्ता या फारसी इतिहासकाराच्या ग्रंथांत इ स १५९६ मध्यें तो मरण पावला

तेथपर्यंत हकीकत आहे. तिच यानें फेरिस्ताच्या इतिहासाच्या भाषांतरात दुसऱ्या एका फारसी ग्रंथाचें भाषांतर दिलें आहे पण त्यांतील हकीकतहि अद्याप अपुरी आहे 'बुसातिने सलातीन' या नावाच्या फारसी ग्रंथात मात्र समग्र इतिहास आढळतो याशिवाय उत्तरकालीन आंग्ल इतिहासकार एलफिन्स्टन, टेलर, मीडोज् वगैरेंच्या ग्रंथांतूनहि आदिलशाहीचा त्रोटक इतिहास पहावयास मिळतो. ]

आदिस आबाबा— हो अबिसीनियाची व तदंतर्गत "शोआ" राज्याची राजधानी. येथे अबिसीनिया आणि इटली यांमध्ये १८९६ सालीं तह होऊन अबिसीनियाचें स्वातंत्र्य इटलीकडून कबूल करण्यात आलें उत्तर अक्षांश ९° १′ पू. रे. ३८° ५६′. हें जिबुटी बंदरापासून ४५० मैलांवर आहे. याची समुद्रसपाटीपासून उंची ८००० फूट आहे. अबिसीनियामध्ये शहरें नाहींत व आदिस आबाबालाहि शहर म्हणणें कठिण जाईल व्यापार आर्मेनियन व हिंदुस्थानी लोकांच्या हातीं आहे हें शहर दुसऱ्या मेनेलिकनें १८९२ साली स्थापन केलें

आंदोलनलेखक ऑसिलोग्राफ—विद्युत्प्रवाहाच्या दर्शनीं होणारा कमीजास्तपणा किंवा आंदोलनें दाखविणारे यंत्र या यंत्राच्या साहाय्यानें गतिजन्यविद्युतयंत्रापासून निघणाऱ्या विद्युत्चलनांत ज्या ज्या क्षणीं जो जो फरक होतो तो नमूद केला जाऊन, ते सर्व बिंदु एका वक्ररेषेत दाखविले जातात, या वक्ररेषेवरून अमुक वेळीं यंत्राची शक्ति काय होती हे समजते हे आंदोलनलेखक निरनिराळ्या प्रकारचे आहेत

निमिषाव धीनें पहाण्याची पद्धत—विद्युत्प्रवाहजनकाशीं म्हणजे डायनामोशीं जोडलेल्या दिक्परिवर्तक (आल्टरनेटर) ज्या म्हणजे विद्युत्प्रवाहाची दिशा बदलणाऱ्या यंत्राच्या दांड्याला एक धातूचा पत्रा बसविलेली विद्युद्वाहक तबकडी असते या तबकडीच्या दोन्ही बाजूस दोन कमानी [स्प्रिंग्ज] असतात, व तबकडी फिरत राहून ज्यावेळीं कोणतीहि एक कमान त्या धातूच्या पट्टीला लागते त्या वेळीं त्या दोन्ही कमानी विद्युत् दृष्ट्या जोडल्या जातात. या दोन्ही कमानींच्या मंडलात जर व्होल्टमापक ठेविला तर व्होल्टमापकाचा काटा सरासरी विद्युच्चलनाचा जोर न दाखविता विशिष्ट क्षणीं असलेला जोर दाखवितो आता जर एकच धातूचा तुकडा घालून काहीं नियमित कालावधीनें यंत्राचा विद्युद्दाब पहाण्याच्या ऐवजीं कमानींचा विद्युद्दृष्ट्या जोड सतत ठेवून प्रत्येक क्षणीं असलेला यंत्राचा विद्युद्दाब पाहिला तर दिक्परिवर्तक यंत्राच्या एका फेऱ्यात क्षणोक्षणीं त्याच्या दाबांत होणारा फरक दाखविणारी एक अखंड लहरी सारखी वक्ररेषा दिसेल

हॉस्पिटेलियरचा आदोलनलेखक— याची रचना अशी.—वरीलप्रमाणें विद्युत्प्रवाहजनकाच्या साह्यानें विद्युतद्वाहक पदार्थाचें एक विद्युद्रोधक नळकांडें फिरतें ठेवून, त्या नळकांड्याच्या कडेला एक धातूची पट्टी बसवून त्याच्या भोंवतीं तीन कमानी ठेवलेल्या असतात या कमानी त्या नळकांड्याला त्याच्या प्रत्येक फेऱ्यात काही वेळ चिकटून, त्याचा व त्यांच्याशी जोडलेल्या विद्युत्संचायकाचा असा संबंध येऊन कोणत्यातरी एका विवक्षित क्षणीं भिन्नमार्गी विद्युत्प्रवाहाच्या दृष्टीने या कमानी जोडल्या जातात व तो विद्युत्संचायक विद्युद्भारयुक्त होतो, त्यानंतर त्याच्या व्होल्टमापकाशीं नळकांड्याच्या फेऱ्याचें प्रमाण विद्युत्प्रवाहजनकाच्या फेऱ्याच्यापेक्षा कमी ठेवलेलें असतें. अशा तऱ्हेनें कमान नियतकालावधीनें जरी नळकांड्याला स्पर्श करीत असली तरी त्याच्या प्रत्येक स्पर्शावधीच्या वेळीं दिक्परिवर्तक त्याच्या अगोदरच्याच फेऱ्याच्या स्थितींत असण्याचा संभव अगदींच कमी असल्यामुळे दिक्परिवर्तकाच्या एका फेऱ्यात तें कोणकोणत्या दशेतून जातें हें व्होल्टमापकावरून दिसून येईल अशा स्थितींत व्होल्टमापकाची दर्शक सुई जर दुसऱ्या एका कागद गुंडाळलेल्या फिरत्या नळकांड्यावर ठेविली तर ती त्या यंत्रातून निघणारी विद्युत्प्रवाहशक्ति लहरीसारख्या वक्ररेषेनें दाखवील याशिवाय ब्लाँडेल, डडेल ब्राउन इत्यादिकांचे भिन्न आंदोलनलेखक आहेत

आद्याक्षरसंयोग (मोनोग्रॅम)—हे मूळ एकाक्षरी सहीचें चिन्ह असून, सध्या दोन किंवा अधिक अक्षरें एकमेकात गुंतवून तयार केलेली आकृति, असा याचा अर्थ होतो. हीं एकमेकात गुंतविलेलीं अक्षरें एखाद्या नावातील सर्व अक्षरें किंवा एखाद्या माणसाचें स्वतःचें नाव, कधीं आई बापाचें नाव व आडनाव, यातील आद्याक्षरें असतात, व हा अक्षरसंयोग 'सीला' करिता किंवा पत्रांवर शिक्का मारण्याकरिता किंवा अन्य कारणाकरिता केलेला असतो पुष्कळशा प्राचीन ग्रीक व रोमन नाण्यावर राज्यकर्त्यांची आद्याक्षरें या पद्धतीनें लिहिलेली आढळतात यूरोपात पूर्वेकडील साम्राज्याच्या बादशहाच्या सह्यातील या पद्धतीनें लिहिलेलीं अक्षरें उत्तरकालीन लॅटिन व ग्रीक लिपींतील असत. फ्रँकिशराज्याच्या सह्याहि मोनोग्रॅम पद्धतीच्या असत. चार्लस दि बाल्डच्या नाण्यावरील मोनोग्रॅम पूर्णावस्थेस पोंचलेल्या मोनोग्रॅमचा नमुना म्हणता येईल. मोनोग्रॅममधाल अतिशय प्रसिद्ध म्हणजे "पवित्र मोनोग्रॅम"; यात ख्रिस्ताच्या नांवांतील दोन आद्याक्षरें संयुक्त केलेलीं असतात पूर्वीचे प्रथमप्रकाशक मोनोग्रॅम किंवा अक्षराकृती आपल्या खुणेकरिता वापरीत व त्या जुनी छापील पुस्तकें ओळखण्याच्या कामीं फार महत्त्वाच्या आहेत चित्रकार व शिल्पकार याच साधनाचा अवलंब करीत मध्ययुगात धार्मिक बाब, व्यापार व कलाकुसरी यांच्या उपयोगांकरिता अशा अनेक आकृती तयार केलेल्या आढळतात प्रत्येक मोठ्या मनुष्याजवळ, प्रत्येक शौकीन गृहस्थाजवळ, प्रत्येक कारागिराजवळ स्वतःचा मोनोग्रॅम असे गर्वड्याची खूण देखील अशा पद्धतीची असे

व्यापाऱ्यांना सरदारांप्रमाणें कुलचिन्हें वापरण्याचा हक्क नसल्यानें ते साधीं अक्षरें मोनोग्रॅमच्या पद्धतीनें जुळवून तें आपलें चिन्ह म्हणून उपयोगांत आणीत. हीं "व्यापाऱ्यांची चिन्हें" बहुशः मालकाच्या नावांतील आद्याक्षरें घेऊन व त्यांना विशिष्ट वळण देऊन मोनोग्रॅमप्रमाणें तयार केलेलीं असत. यांत बहुतकरून नेहमीं एक "क्रॉस" चिन्ह अंतर्भूत करीत; त्याचा हेतु वादळें किंवा अन्य आपत्ती यांपासून संरक्षण व्हावें असा असेल, किंवा पूर्वेकडील महंमदी व्यापाऱ्यांच्या मालांतून आपला माल ओळखून घेतां यावा म्हणून ही खिस्ती खूण घातली असेल. राजेलोक सुद्धां स्वतः साठीं निरनिराळ्या तऱ्हेचे मोनोग्रॅम करवून घेत

**आंधळी कोशिंबीर**—[लपंडाव]हा एक मुलांचा खेळ आहे तो असाः—जीं मुलें खेळणारीं आहेत त्यांतील एकास पुढें घेऊन बसून त्याचे डोळे भोज्या, म्हणजे ज्यास खेळावयाचें नसेल, तो आपल्या दोन्ही हातांनीं झाकतो, आणि बाकीचे सोबती एकीकडे जाऊन लपतात नंतर इकडे भोज्यानें त्याचे डोळे सोडताच तो जाऊन त्या गड्यांतून एखाद्यास शोधून धरून शिवतो ज्यास तो शिवला असेल त्याजवर डाव आला असें होतें; परंतु ज्यास शिवणें असेल त्याला; तो भोज्यास शिवण्याच्या पूर्वीं शिवलें पाहिजे ज्या गड्यावर डाव आला असेल त्याचे डोळे भोज्याकडून झाकले जाऊन वर लिहिलेल्याप्रमाणें पुन्हां खेळ चालू होतो. *या खेळास विद्याकल्पतरूकार आंधळी कोशिंबीर म्हणत.* पण आज कोणी तसें म्हणणार नाहीं. आज त्यास केवळ लपंडावच म्हणतील. *आज आंधळी कोशिंबीर या नांवानें जो खेळ प्रचलित आहे तो असाः—ज्या गड्यावर डाव* आला असेल त्याचे डोळे इतर सोबत्यांपैकीं एकानें धोतरानें वगैरे बांधून त्याला आतां काहीं दिसत नाहीं अशी खातरी झाल्यावर बाकीच्या सोबत्यांनीं लपावयाचें व डोळे बांधलेल्यानें त्यांपैकीं कोणा एकास शिवावयाचें म्हणजे त्याजवरील डाव गेला. याप्रमाणेंच पुढील डाव आलेल्याचे डोळे बांधावयाचे व खेळ चालू करावयाचा.

**आंध्र**—दक्षिणहिंदुस्थानांतील एक प्राचीन राष्ट्राचें नाव. यवतमाळ व चांदा जिल्ह्यांतील आंध हेच आंध्र असावेत मौर्य व मेगॅस्थनीस यांच्या कालीं, सध्या तेलगू भाषा बोलणारे लोक आंध्रराष्ट्र या नावानें संबोधिले जात असत. व ते गोदावरी व कृष्णा या दोन नद्यांमध्यें राहात असत असें व्ही. ए स्मिथच्या 'अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया' या पुस्तकात वर्णन आहे. कॅम्पबेलच्या तेलगु व्याकरणात अथर्वणाचार्यांच्या त्रिलिंगानुशासनम् मधील जो उतारा घेतलेला आहे त्यावरूनच वरील वर्णन लिहिलें आहे असें दिसतें. त्या उताऱ्यात असें वर्णन आहे कीं 'स्वयंभू मनूच्या वेळेस आंध्राचा ईश्वर जो हरि, त्यानें काकुलम येथें सुचंद्र राजाच्या उदरीं जन्म घेतला त्यानें श्रीशैलम्, भीमेश्वरम्, कालेश्वरम व महेंद्रपर्वत यास जोडणारी एक भिंत बांधली. तिला तीन महाद्वारें होतीं व त्यास त्रिनेत्रधारि ईश्वर त्रिलिंगाच्या रूपानें रहात असे. आंध्रविष्णूनें निशुंभदानवाबरोबर तेरा युगें लढाई करून, त्याला ठार मारिलें व तो गोदावरीच्या तीरावर राहूं लागला म्हणून त्या देशाला त्रिलिंगम् असें नांव पडलें' वरील उतारा आंध्रकौमुदीनें अथर्वणाचार्यांच्या ग्रंथातून घेतला व कॅम्बेलनें आंध्रकौमुदीतून घेतला आहे. अथर्वणाचार्यांच्या उताऱ्याचा पुरावा इतिहासदृष्ट्या फोल आहे हें सहज दिसून येईल. त्यास प्राचीन आख्यायिका देणारा म्हणूनहि किंमत देता येत नाहीं. सुचंद्र नावाचा आंध्रराजा इतिहासात मुळीं नाहींच. पुराणांतील आंध्रघराण्याचा पहिला राजा शिमुक हा होय. त्यालाच सिंधुक, शिशुक, शिप्रक अशीं नावें आहेत, परंतु सुचंद्र असें नांव नाहीं. नंतर अथर्वणाचार्यानें, विष्णु, इंद्र, बृहस्पति, सोमचंद्र, कण्व, पुष्पदंत, धर्मराज, इत्यादि ग्रंथकर्त्यांचे आधार दिले आहेत. परंतु त्यातील एकहि सांपडत नाहीं; तसेंच अथर्वण शिक्षोपनिषदाचा म्हणून जो उतारा अथर्वणाचार्यानें दिला आहे तो मूळ उपनिषदात सापडतच नाहीं. यावरून असें दिसतें कीं, अथर्वणाचार्य हा तेलगू भाषेचा पुरस्कर्ता असून, त्या वेळच्या शुद्ध भाषेच्या पुरस्कर्त्यांनीं त्याला विरोध केल्यामुळें, त्यानें आपल्या ग्रंथात स्वकपोलकल्पित उतारेच भरून दिले. याच ग्रंथकर्त्याची एक कारिका छापली गेली आहे. तींत दंडीच्या काव्यादर्शांतील पुष्कळ कविता आहेत. अथर्वणाचार्यानें वाल्मिकी सूत्रातील उतारेहि दिले आहेत. हीं सूत्रें त्रिविक्रमानें १४ व्या शतकांत लिहिलीं. यावरून अथर्वणाचार्याचा काल १४ व्या शतकानंतरचा होय हें उघड आहे. "आंध्रविष्णु गोदावरी नदीचे तीरीं राहिला" "या अथर्वणाच्या वाक्यावरून राजमहेंद्री हें शहर तेलगू राजाची राजधानी झाल्यानंतर पुष्कळ वर्षांनीं अथर्वणाचार्य होऊन गेला असें दिसतें

आंध्राविषयीं सर्वांत प्राचीन उल्लेख ऐतरेय ब्राम्हणात आहे. त्यात आंध्र, पुंड्र, शबर आणि पुलिंद या चार ( दस्यु ) जाती विश्वामित्राच्या बहिष्कृत पुत्रांचे वंशज होत असें म्हटलें आहे. हे विंध्यपर्वताच्या आसमंतात रहात असावे. बहुतेक पुराणातून आंध्रराष्ट्राचा उल्लेख सापडतो. टॉलेमीकालापूर्वीच्या "पेउटिंजेरियन टेबल्स" मध्यें 'अँड्री इंडी' असें नाव आढळतें. ७ व्या शतकांत लिहिलेल्या बाणकृत कादंबरींत, शाबरलोक विंध्यपर्वतावरील जंगलात रहात' असा उल्लेख आहे. अशोकाचा शिलालेख नं १३ यात असें लिहिलें आहे कीं, आंध्र व पुलिंद लोक माझ्या राज्यांत राहतात, व माझ्या धर्माचें अनुकरण करतात. अशोकाच्या मागून आंध्र लोकांचा उत्कर्ष झाला. त्या वंशातील पहिला राजा, राय शिमुक शातवाहन हा व्हि. ए. स्मिथच्या मतें ख्रि पू. २२० वर्षें होऊन गेला. नानाघाट येथील लेण्यात त्याचें व त्याच्या नंतरचा आंध्रराजा 'शिरी सातकर्णी' याचें नाव कोरलेलें आहे. त्याच्या नंतरचा राजा कृष्ण यानें

राजधानी नाशिक येथें असावी. यानंतर आंध्रनामाचा उल्लेख हात्तिगुंफा दरीतील कलिंग राजा खारवेला याच्या शिलालेखांत सांपडतो. तेथें 'खि. पू. १६८ सालीं सातकानी राजा पश्चिमेकडील प्रांताचं रक्षण करीत होता' असा उल्लेख आहे. हा सातकानी मत्स्यपुराणांतील तिसरा किंवा पांचवा आंध्रराजा असावा. यावरून आंध्र देश त्यावेळीं कलिंग देशाच्या पश्चिमेस असावा. यानंतर ख्रि. पू. २ ऱ्या शतकांत लिहिलेल्या चाळिसगांवानजीक पितळखोऱ्यांतील शिलालेखांत प्रतिष्ठानचा किंवा पैठणच्या राजाचा उल्लेख आहे. यानंतर १७ वा आंध्रराजा हाल हा स्मिथच्यामतें इ.स. ६८ च्या सुमारास होऊन गेला. गुणाढ्यानें पैशाचांपैकीं लिहिलेली बृहत्कथा याच राजाच्या पत्नीप्रीत्यर्थ लिहिली अशी दंतकथा आहे यावरून ही राज्ञी उत्तरेकडील राजकन्या असावी. जुन्या महाराष्ट्री भाषेंत लिहिलेलें सप्तशतीकाव्य हाल यानेंच लिहिलें.यावरून व आंध्र शिलालेख प्राकृत भाषेच्या रूपांत लिहिलेले आहेत यावरून आंध्रलोक महाराष्ट्री भाषेसारखीच भाषा बोलत असावेत. सध्यां आंध्र शब्दाचा अर्थ तेलगू असा होतो, म्हणून पूर्वी देखील आंध्रलोक तेलगू भाषाच बोलत होते असें पुष्कळ इतिहासकार म्हणतात. सर वॉ. इलियट यानें सर कलिंग, टॉलेमीचें टिलिंग्टन, त्रिकलिंगम, त्रिलिंगम, तेलगू व आंध्र याची खिचडीच करून ठेवली आहे. जर प्राचीन आंध्र राजे तेलगू बोलत असते तर तेलगू साहित्याचा जन्म इ. सनाच्या ११ व्या शतकांत न होतां खिस्ती शकापूर्वीच झाला असता.

यानंतर आंध्रदेशाचा उल्लेख प्लिनीच्या लेखांत (इ.स. ७७) सांपडतो. सर्व हिंदुस्थानांतील तत्कालीन शिलालेखांत आंध्रांचा उल्लेख आहे. यावरून त्यावेळेस आंध्र राष्ट्र फार बलाढ्य असून त्याचें वर्चस्व सर्व हिंदुस्थानभर असावें. पेरिप्लसमधील वर्णनावरून आंध्र देशास दक्षिणापथ (दख्खन) नाव होतें असा प्रथमच स्पष्ट पुरावा मिळतो पेरिप्लसमध्यें कल्लिएना नामक शहराचा उल्लेख आहे तें शहर कल्याण असावें. यावेळेस 'क्षहराट' वंशातील शकक्षत्रप हे बलाढ्य होऊन कल्याण येथें आंध्रांचें वस्तान नीट बसेनासें झालें.

शक व आंध्र यांच्या नेहमीं लढाया होत व हळूहळू आंध्रलोक हिंदुस्थानाची पश्चिम बाजू सोडून पूर्व बाजूस घसरले. पुढें इ. स. १५० त दक्षिणापथाचा राजा पुळुमायी याचा शकक्षत्रप रुद्रदामन् यानें खरपूस समाचार घेतला ('शातवाहन' पहा).

आं ध्र ना णीं.—अतिप्राचीन आंध्र नाणीं दोन होतीं. यांवरहि शिलालेखांप्रमाणें प्राकृतभाषेंतीलच शब्द आहेत. १ ला व २ रा विलिवायकुर व शिवालयकुर (इ. स. ८४–१३८) याच्या वेळचीं धनुर्बाणचिन्हांकित सर्व नाणीं कोल्हापुरास सांपडलेलीं आहेत. पुळुमायी व त्यानंतरचे राजे (इ स. १३८-२२९) यांच्यावेळचीं नाणीं गोदावरी व कृष्णा याच्या आसपास सांपडलीं. स्मिथच्या मतें या नाण्यांचें उत्तरेकडील व पश्चिमेकडील नाण्यांशीं सादृश्य आहे; दक्षिणेकडील नाण्यांशीं नाहीं. यावरून व वरील विवेचनावरून असें स्पष्ट दिसतें कीं, आंध्रलोक हिंदुस्तानचे पूर्व किनाऱ्याकडील रहिवाशी नसून, ते मूळ विंध्यपर्वताच्या आसपास राहत होते असें विझगापट्टमचे पी. टी. श्रीनिवास अय्यंगार सिद्ध करितात (इं. अ. पु. ४२).रा. चिंतामणराव वैद्य याच्या मतेंहि आंध्र म्हणजे पूर्व घाटावरचा देश होय (मध्ययुगीन भारत-भाग १). इ. सनाच्या तिसऱ्या शतकांत आंध्रलोकांचा पश्चिमेकडील प्रदेश शकाच्या हातीं गेला. याची राजधानी उज्जनी ही होती. त्याचा पूर्वेकडील मुलख पल्लवानीं घेतला. याला आंध्रपथ म्हणत असत. या प्रांताच्या सुभेदाराची राजधानी धनकट येथें होती. इ. स. ३४० त समुद्रगुप्तानें दिग्विजय केला तेव्हां पल्लवाच्या हस्तिवर्मा सुभेदाराचा त्यानें वेंगी (पदवेगी किंवा आप्नगरम) येथें पराभव केला. यानंतर आंध्रलोकांचा कोठें पत्ता लागत नाहीं. दक्षिणेकडील प्रदेशास मात्र आंध्र हें नाव पडलें. ७ व्या शतकांतील हुएनत्संग या चिनी प्रवाशाच्या वर्णनांत आंध्रदेशाचा उल्लेख आहे पुढें ११ व्या शतकांतील तेलगू 'महाभारतम्' चा लेखक नानय्याभट्ट यानें तेलगू भाषेस आंध्र हें नांव दिलें.

व्हिन्सेंट स्मिथसारखे काहीं इतिहासकार आंध्रांना द्राविडवंशीय लोक म्हणून मानतात तर मध्ययुगीन भारतकार त्यांना आर्य समजतात. पुढील उताऱ्यात रा. वैद्य यांनीं सातवाहनाची ऊर्फ आंध्रांची जात निश्चित केली आहे.

'सातवाहन कोणत्या जातीचे होते असा प्रश्न आहे. ते आर्य कीं अनार्य ? मराठे कीं द्रविड ? या प्रश्नाचा निर्णय करणें कठीण असलें तरी तें काम महत्त्वाचें आहे. अद्यापि या प्रश्नाचें उत्तर कोणीं निश्चित दिलेलें नाहीं. तथापि पूर्वीचा महाराष्ट्रांतील विरल वस्तीचा प्रश्न जसा रामायणाच्या साहाय्यानें सोडविता आला, तसा इतर पुराणें व दुसरे प्राचीन लेख याच्या आधारानें याहि प्रश्नाचा निर्णय करण्याचा आम्ही प्रयत्न करतों. सातवाहन ऊर्फ आंध्रभृत्य याना पुराणांत शूद्र म्हटलें आहे. सातवाहन ऊर्फ शालिवाहन हा ब्राह्मण सापासून शेषाला (नागाला) झालेला पुत्र होय, अशी दंतकथा प्रचलित आहे. असल्या दंतकथा जरी वरकरणीं वेडेपणाच्या दिसल्या तरी त्यांत काहीं तथ्यांशहि असतो. आंध्रलोक इतर द्रविड लोकांहून अगदीं निराळे दिसतात. द्रविडापूर्वी पुष्कळ शतकें ते आर्यांच्या संस्कृतीशीं संबद्ध झालेले असल्यामुळे त्यांचा देश महाभारतांतील देशनामाच्या मालेंत उत्तरेकडील मिश्र-आर्य देशांत गणिलेला असून दक्षिणेकडील म्लेच्छ देशांत सांगितलेला नाहीं मग हे आंध्र लोक नागवंशीय मानावे कीं काय ? आजमितीस आंध्र देशाच्या म्हणजे तैलंगणाच्या निकट असलेल्या नागपूर प्रांतात नाग लोकांची पुष्कळच वस्ति आहे तेलंगी ब्राह्मण निःसंशय आर्यवंशीय असून त्यांचे

महाराष्ट्रब्राह्मणांशीं अजून शरीरसंबंधहि होत आहेत; पण तेलंगी क्षत्रियाचे मात्र मराठा क्षत्रियांशीं विवाहसंबंध होत नाहींत. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां सातवाहन घराणें नागवंशीय असून त्यानें इ स. पूर्वी पहिल्या शतकाच्या मध्याच्या सुमारास पाटलिपुत्राचें राज्य जिंकून तेथें आपलें वर्चस्व स्थापिलें व पुढें महाराष्ट्रावर स्वारी करून तेथींहि आपला अंमल बसविला असें अनुमान करावयास हरकत नाहीं. त्यांची राजधानी प्रतिष्ठान म्हणजे पैठण येथें असून ती पूर्वीहि महाराष्ट्राची राजधानी होती.

वर सांगितल्याप्रमाणें सातवाहन मूळचे नागवंशीय होत; पण पुढें त्यांचे क्षत्रियांशीं शरीरसंबंध होऊं लागले. नर्मदेच्या पलीकडे उज्जनी येथें शक नावाचे मूळ परदेशस्थ पण त्यावेळीं सर्वथा हिंदु बनलेले राजे राज्य करीत होते; त्यापैकीं रुद्रदामन् राजाच्या कन्येशीं एका सातवाहन राजानें विवाह केल्याचें प्राचीन लेखावरून दिसून येतें व त्यांत कांहीं आश्चर्यहि नाहीं पूर्वी चंद्रगुप्तानें एका यवनकन्येचें पाणिग्रहण केलें होतें. तो शूद्र होता, तथापि तसें करावयास क्षत्रिय राजांना सुद्धा अडचण नव्हती. असो सातवाहन या नागवंशीय राजांना आर्य क्षत्रिय आपल्या मुली देत, हें जरा चमत्कारिक वाटतें. तथापि चमत्कारिक वाटलें तरी तें खरें आहे. या सातवाहनाच्या दानलेखांत राजाच्या नावांना गौतमीपुत्र,वासिष्ठीपुत्र इत्यादि जीं विशेषणें लाविलेलीं आढळतात, त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. या शब्दांचा अर्थ गौतम किंवा वसिष्ठ या गोत्रांतील राजस्त्रियांचे पुत्र असा आहे हें उघड आहे; पण या स्त्रियांच्या गोत्राचें महत्त्व काय ? त्या जर ब्राह्मणाच्या मुली असत्या, तर त्यांच्या गोत्राचा निर्देश करण्याची तादृश आवश्यकता नव्हती म्हणून यासंबंधानें आमचा तर्क असा आहे कीं, त्या दक्षिणेंतील सुप्रसिद्ध क्षत्रिय राजघराण्यांतील स्त्रिया होत्या. सातवाहनांचा सामाजिक दर्जा क्षत्रियांपेक्षा अर्थातच कमी प्रतीचा होता व त्यामुळें त्यांना आपल्या मातृवंशाचें गोत्र मिरविण्यांत बहुमान वाटत असला पाहिजे. शिवाय मातृगोत्राचा आपल्या नावांत निर्देश करण्याची चाल म्हणजे कांहीं नवी होती असेंहि नाहीं. बृहदारण्यकोपनिषदांत वंशकथनामध्यें पुष्कळांच्या मातृगोत्राचा उल्लेख केलेला आहे. उदाहरणार्थ, त्या उपनिषदाच्या शेवटच्या अध्यायाच्या शेवटच्या ब्राह्मणांत पौतिमाषीपुत्र, कात्यायनीपुत्र, भारद्वाजीपुत्र, कौशिकीपुत्र, आत्रेयीपुत्र अशीं अनेक नांवें सांगितलीं आहेत (बृ ६.५). अलीकडच्या काळीं सुद्धा रजपूत राजे आपल्या राण्यांना राठोडणी, चोहानी इत्यादि पैतृक नांवें बहुमानास्पद म्हणून देत आले आहेत. राजघराण्यांत जन्मलेल्या स्त्रीला परक्या घराण्यांत लग्न होऊन गेल्यावर आपल्या पितृगोत्राचा निर्देश अवश्य वाटणें स्वाभाविक आहे. म्हणून आम्हाला असें वाटतें कीं, सातवाहन राजांनी क्षत्रिय कन्यांशीं विवाह केल्यामुळें त्यांचे पुत्र आपल्या मातृगोत्राचा बहुमानानें उल्लेख करीत यावरून आणखीहि एक गोष्ट दिसून येते ती अशी कीं दक्षिणेंतील मराठाक्षत्रिय घराण्यांत कांहीं विशिष्ट गोत्रें असून तीं त्यावेळीं सुद्धा काळजीपूर्वक संभाळून लक्षांत ठेविलेलीं होतीं सातवाहनाच्या या विवाहसंबंधावरून मराठाक्षत्रियांमध्यें जीं सूर्यवंश, सोमवंश व नागवंश अशीं तीन वंशनामें चालत आलेलीं आहेत, त्यांना फार प्राचीन काळाचा म्हणून महत्त्वाचा आधार मिळतो. सातव्या शतकांतील मराठा क्षत्रियांमध्यें सुद्धां नागवंश चालू होता, हें पुढें दिसून येणार आहे (मध्ययुगीन भारत भा १ पा. १६९–७२)'

वरील चिंतामणराव वैद्य यांच्या लेखांतील अवतरण आम्हांस सर्वस्वी मान्य नाहीं. तथापि त्याचें म्हणणें एक बाजू म्हणून दिलें आहे.'नागाचा पुरुष व अन्य जातीची आई यापासून आंध्र राजकुलाची उत्पत्ति झाली', हें विधान बरोबर असणें अशक्य नाहीं. तथापि आई ब्राह्मण नव्हती, असें दाखविण्यासाठीं रा. वैद्य यांनीं दिलेले पुरावे समाधानकारक नाहींत शिवाय वैद्य व इतर लेखक यांची राष्ट्रनिर्णायक पद्धतीच सदोष आहे. या पद्धतीनें एखाद्या कुलाचा उद्भव मात्र स्पष्ट करतां येईल मोठ्या जातीचा उद्भव या पद्धतीनें देण्याचा प्रयत्न करणेंच चुकीचें आहे. आंध्र, पौंड्र, कलिंग यासारख्या नावांनीं प्रसिद्ध असलेलीं प्राचीन काळचीं राष्ट्रें कोणतीं होतीं, हें आजच्या अस्तित्वांत असलेल्या लोकांच्या जातिकुलनिर्देशानें सांगावयासाठीं राष्ट्रनिर्णायक पद्धतीविषयींच थोडेंसें विवेचन करणें प्राप्त होतें. याविषयावर पद्धतशीर विचार केलेला दिसत नाहीं. याविषयीं संशोधन करतांना आपणास प्रथम असें पाहिलें पाहिजे कीं, विवेचनार्थ घेतलेलें " राष्ट्र " हें कुल होतें कीं, " जाति " होते. कां कीं, कुल किंवा जाति या दोन्ही प्रकारच्या समुच्चयाच्या नावाला अनेकवचनी प्रत्यय लावून राष्ट्रार्थानें त्याचा उपयोग करण्यांत येत असे व पुढें तो शब्द कालांतरानें अधिक व्यापक होई कुलाच्या ताब्यांतील प्रदेशांतल्या लोकांवरहि कदाचित् कुलनाम लादलें जाई. 'मौर्याः' म्हणजे मौर्य कुलांतील लोक किंवा मौर्यांच्या ताब्यांत असलेल्या प्रदेशांतील लोक असे दोन्ही अर्थ व्हावयाचे. राज्यसंस्थापना करून राष्ट्रनाम उत्पन्न करणारे लोक 'कुल' असत किंवा राष्ट्रहि असत. राज्यसंस्थापना कदाचित् भाडोत्री लोक घेऊन एखादें कुल किंवा व्यक्ति करी किंवा एखाद्या जातीचा पुढारी आपल्या जातीच्या साहाय्यानें आपलें राज्य व त्याबरोबर आपल्या जातीचें राज्य इतरांवर लादी. "आंध्राः" हे कोण होते याचा विचार करूं लागलों म्हणजे आपण असा विचार करावा कीं, आपण आंध्र जातीविषयीं विचार करीत आहों कीं, राज्य करणाऱ्या एखाद्या कुलाविषयीं करीत आहों. कुलविषयक विचार फारसा महत्त्वाचा नाहीं, कां कीं, राजे लोकांचे अनेक लोकांबरोबर संबंध होत आणि पुढें ज्या जातीचे राजे आप-

णास म्हणवीत असतील त्या जातींचें रक्त त्या कुलांत फारच थोडकें असेल. अनेक मोंगल बादशहाच्या अंगात ज्याप्रमाणें रजपुतांचें रक्त खेळत होतें, त्याप्रमाणें पांड्य, चेर, केरल या दाक्षिणात्य राजकुलामध्यें औदीच्य क्षत्रियाचेंहि रक्त खेळत होतें. आपणास असें आढळेल की, आंध्राच्या किंवा पल्लवाच्या राजकुलाचे संबंध कोणाशीं होत होते, यावरून राजाच्या मूळ जातीवर प्रकाश पडणार नाहीं, एवढेंच नव्हे तर ते आर्यन् होते किंवा द्रविडीयन् होते, यावरहि प्रकाश पडणार नाहीं. कारण आर्यन् किंवा द्रविडीयन या कल्पनाच त्या काळीं नव्हत्या व त्या विवाहसंबंधात मुळींच येत नसत. स्वतःस सफेद आदमी व मद्रासेकडील लोकांस काला आदमी समजणाऱ्याची आंध्रासारख्या विजयशाली राष्ट्रास आपल्यात ओढण्याची तडफडहि कांहीं अर्वाचीन लेखकाचे लेख सदोष करीत आहे.

आंध्र ही जाति होती म्हणजे तो राष्ट्रस्वरूपी अनेक लोकांचा समाज होता, कुल नव्हतें. आंध्र जातीचे कांहीं राजे होऊन गेले. त्यांनीं आपली सत्ता वाढविली, निरनिराळ्या ठिकाणीं राज्य केलें, बायका अनेक ठिकाणच्या केल्या. असें झालें म्हणजे राजघराणें जातीपासून तुटतें. राजघराण्याची गणना क्षत्रियात होऊं लागली म्हणजे जातीपासून निराळें होण्यास साहाय्य होतें, तें राजघराणें आणि इतर राजघराणीं मिळून एक सामाजिक वर्ग होतो आणि त्यावर स्थानिक भाषेचा पगडा अधिक बसूं लागतो. समजा, गायकवाड रजपुतांशीं लग्नें करूं लागले म्हणजे गायकवाडाचा मराठेपणा कमी होईल आणि पुढें कालांतरानें ते पूर्ण गुजराथी बनून जातील. एवंच आंध्र राजघराण्याची भाषा महाराष्ट्री नसली तरी महाराष्ट्री झाली असल्यास नवल नाहीं, आणि राजघराण्याच्या स्थितीवरून आंध्र महाराष्ट्रीय होते कीं, तैलंग होते हा प्रश्न सुटत नाहीं.

जी जात राष्ट्रस्वरूपी असेल ती महत्त्वाच्या स्थानापासून भ्रष्ट झाली म्हणजे तिचा दुसऱ्या जातींशीं लग्नव्यवहार कमी होतो, तिच्याशीं लग्नव्यवहार करण्यास इतर उत्सुक नसतात. असें झालें म्हणजे ती केवळ जात बनते. अशा परिस्थितींत आपण असें पाहिलें पाहिजे कीं, ती जात अजून कांहीं निराळ्या नावानें किंवा सदृश नावानें शिल्लक आहे काय? आंध्राचें स्थान गोदावरीचा काठ होता. ते महाराष्ट्रीय होते कीं, तैलंग होते, याबद्दल वाद आहे. अशा परिस्थितींत त्याच प्रदेशात असलेली आंध ही जात प्राचीन आंध्राची अवशेष असावी असें वाटतें. ही जात यवतमाळपासून चांद्यापर्यंत पसरली आहे आणि या जातीचे कांहीं लोक मराठी बोलतात आणि कांहीं तैलंगी बोलतात. कांहीं आंध आज निराळ्या जातिनामानेंहि प्रसिद्ध असतील. एकंदरीत असें म्हणता येईल कीं, प्राचीन आंध्र हे जाति होते, त्यांचा वसतीचा प्रदेश गोदावरीचा काठ होता आणि त्यापैकीं कांहीं महाराष्ट्री बोलत असावेत व कांहीं तैलंगी बोलत असावेत.

हल्लींचे आंध्र म्हणजे तेलगु लोक. यांचें विवेचन 'तेलगु' या लेखांत सापडेल.

शातवाहनाच्या आधिपत्याखालीं आंध्रदेश मोठा भरभराटींत होता. त्याचें सैन्यबल चंद्रगुप्त मौर्याच्या खालोखाल होतें. या राज्यात तीस कोटअमलेलीं शहरें, याशिवाय असंख्य गावें (ऐहोळच्या लेखान्वयें १२,०००) आणि १,००,००० पायदळ, २००० घोडदळ व १००० हत्तीदळ इतकें सैन्य होतें असें प्लिनी वर्णन करितो (नॅचरल हिस्ट्री पु ६). शातवाहन घराण्याची आंध्रदेशावरील सत्ता इ. स. २०० च्या सुमारास नाहींशी झाली. नंतर वाकाटकाचें राज्य सुरू झालें. त्याच्या प्रधानानीं अजिंठ्याचीं लेणीं खोदलीं असें म्हणतात. वाकाटक ब्राह्मण होते पण त्याचे प्रधान बौद्धधर्मीय दिसतात. इ. स. ५ व्या शतकात ओरिसांतील एक यवन घराणें आंध्रात येऊन सत्ताधीश झालें. हें यवन घराणें इ. इ. ९६३ पर्यंत टिकलें. या यवनवर्चस्वाखालीं सुद्धा आंध्रात पूर्वीप्रमाणेंच बौद्धधर्माचें प्राबल्य होतें. मग मात्र शैवधर्म येथें प्रस्थापित झाला.

अकराव्या शतकात आंध्राचा ज्यात समावेश होतो, त्या तैलंगण प्रांतावर 'नरपति' नावाचे राजे राज्य करीत होते. १३०९ मध्यें मलीक काफरनें येथील राजास मुसलमानांचे मांडलिक बनविलें. यानंतर गोंवळकोंड्याच्या मुसुलमान राजानीं हा प्रांत कायमचा घेतला. १६८७ मध्यें कुतुबशाहीची समाप्ति होऊन मोंगल बादशहाकडे हा प्रांत गेला. त्याच्याकडून हैदराबादच्या निझामाकडे व शेवटीं इंग्रजाकडे अशी याची दास्यपरंपरा आहे.

आंध्रानीं विद्येंत चांगला लौकिक संपादन केला आहे. त्याचें म्हणजे आंध्रवाङ्मय, 'तेलगु वाङ्मय' या सदराखालीं देण्यात आलें आहे.

[संदर्भग्रंथ.—वैद्य मध्ययुगीन भारत, भा. १; स्मिथ—अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया. बाँबे ग्याझेटीयर, भा. २; इं. गॅ. पु. ७ (वराड) व पु. २३ (तैलंगण), काल्डवेल—कंपॅरिटिव्ह ग्रामर ऑफ द्राविडियन लँग्वेजेस; कँप्वेल—ग्रामर ऑफ दि तेलगू लँग्वेज; सरदेसाई—मुसलमानी रियासत; पुराणें; प्लिनी—नॅचरल हिस्ट्री, इंडियन अँटिक्वेरी पु. ४२ श्रीनिवास अय्यंगार याचा लेख.]

**आंध्र कालिदास.**—या कृष्णातीरवासी तैलंगी ब्राह्मण कवीचा उदय शके ९०४ मध्यें झाला. लहानपणींच तैलंगी व संस्कृत भाषेचा अभ्यास केल्यामुळें हा मोठा रसिक कवि झाला. यानें, निरनिराळ्या प्रांतात प्रवास केला. 'रमार्तविजय' नामक एका ग्रंथाचें तैलंगी भाषेमध्यें भाषांतर यानें केलें तें अजून सर्व तेलगू देशात प्रसिद्ध आहे. कालिदास नामक जो प्रख्यात संस्कृत कवि, त्याच्या व याच्या नावात फरक असावा म्हणून याच्या नावामागें आंध्र (तेलगू) हें उपपद लाव-

ण्यात आलें [ तेलगु वाङ्मय, शंकर सायमा परशाकृत. मुंबई. १९१२ ]

**आंध्रभृत्य—**, शातवाहन ' पाहा.

**आनंद—**बुद्धाच्या प्रमुख शिष्यांपैकीं एक. हा शाक्य वंशीय क्षत्रीय असून बुद्धाचा जवळचा भाऊबंद होता. याची बुद्धाच्या ठिकाणीं लहान मुलाप्रमाणें भक्ति असून, "उपट्ठाक" किंवा पट्टशिष्याचा मान यांकडे असे. निर्वाणाच्या पूर्वी बुद्धाच्या तोंडीं आनंदाचा स्तुतिपाठ घातला आहे ( दीघ मधील महापरिनिब्बान सुत्त, ५ १४४–१४६. ) पण तो त्याच्या बुद्धांविषयीं किंवा अंतर्दृष्टीविषयीं नसून लोकांत त्याची असलेली मान्यता व धर्मासंबंधीं गोड भाषण या मुळें आहे यास प्रमाण बुद्धनिर्वाणाच्या वेळीं अनुरुद्धाच्या तोंडी घातलेलें भाषण मननीय आहे, पण तेच आनंदाच्या तोंडचें मानवी दुःखाच्या साध्या उमाळ्यासारखें भासतें जरी सर्व बुद्धशिष्य यापूर्वीच अर्हत्‌पणाला पोंचले होते तरी अद्यापि आनंद मेख ' च राहिला होता. बुद्धनिर्वाणानंतर जी सभा भरली तींतील पहिल्या शंभर सदस्यांत आनंद एकटाच काय तो अर्हत् नव्हता ( विनय. ५ २८५ ) सभा भरण्यापूर्वी तो अर्हत् बनला ( विनय २. २८६ ) व तींत त्यानें प्रमुख भाग घेतला; पण त्याच्या पूर्वीच्या गफलतीबद्दल सभेनें त्याची कानउघाडणी करण्यास कमी केले नाहीं.

बुद्ध आपलें मनोगत आनंदाला सांगत असे तेव्हां बुद्धानंतर धर्मविषयक वादांत आनंदाचा सल्ला घेऊन वादाचा निकाल लावण्यात येई. बौद्ध भिक्षू स्त्रियास कधींहि बरें म्हणत नसत; पण आनंद त्यांची तरफदारी करी. त्याच्याच मध्यस्थीमुळें बुद्धानें मोठ्या नाखुषीनें भिक्षुणीसंघ स्थापन करण्याची परवानगी दिली. तरी सुद्धां राजगृह येथें भरलेल्या संगीतीमध्यें त्याला या स्त्रीपक्षपाताबद्दल जाब द्यावा लागलाच ( विनयपिटक ११, १, १० ).

[ संदर्भग्रंथ.—त्रिपिटक. आपटे–बौद्धपर्व. ए. ब्रि. ए. रिलिजन अँड एथिक्स. बुद्धोत्तर जग—ज्ञानकोश विभाग ४ था.]

**आनंद कवि**( राजानक )—हा काश्मीर देशांत राहणार असून शैव होता. यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर काव्यप्रकाशनिदर्शन नामक टीका लिहिली ( १६६५ ) याशिवाय ' नैषधीय टीका ' हा त्याचा ग्रंथ आहे असें आफ्रेट कोशावरून दिसतें. 'विस्तारिका ' टीकाकर्त्याच्या( परमानंद चक्रवर्ती भट्टाचार्य )उल्लेख या टीकेंत आहे. यावरून परमानंद चक्रवर्तीच्या मागून हा झाला असें ठरतें [ वि. वि. पुस्तक २२ अंक १–२. आफ्रेट–कॅटलॉगस् कॅटलॉगोरम ].

**आनंदगांव**— आनंद तालुक्याचें मुख्य ठिकाण. अहमदाबादच्या दक्षिणेस ४० मैलांवर हा गाव असून तेथें बी. बी. सी. आय. रेल्वे गोध्रा–रतलाम रेल्वे व पेटलाद रेल्वे मिळतात. इ. स. १८८९ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. उत्पन्न सुमारें दहा हजार, लोकसंख्या (१९२१) ११०२४ पावसाचें मान सरासरी ३५ इंच आहे. येथें एक सरकारी दवाखाना व मुक्तिफौजेचें इस्पितळ आहे. दोन हेअन्या व जिनिंगचे कांहीं कारखानें येथे चालतात. आनंद मिडलस्कूल व कॅथॉलिक कॉन्व्हेंट अँड आर्फनेज या दोन शिक्षणसंस्था आहेत.

**आनंदगिरि—**( ११९० -११९९ ) आनंदतीर्थ, अनंतानंदगिरि, आनंदज्ञान, आनंदज्ञानगिरि, ज्ञानानंद, ज्ञानानंदगिरि, व माधव हीं याचीं दुसरीं नावें आहेत याचे पूर्वाश्रमाचें नाव वासुदेवाचार्य असें होतें. यानें शंकरविजयग्रंथ केला व जो जो वृत्तांत याच्या समोर घडून आला तो तो यानें जसाचा तसाच यथास्थित लिहिला अशी समजूत आहे. हा बृहस्पतीच्या अंशानें जन्मला होता म्हणून माधवाचार्यांनीं आपल्या शंकरविजयांत लिहिलें आहे. शंकराचार्यांनीं जें गीताभाष्य लिहिलें त्यावर जो याची व्याख्या आहे तिला 'आनंदगिरी' असें म्हणण्याचा लोकांत प्रचार आहे. आनंदगिरीनें सदतीसापेक्षा अधिक स्वतंत्र ग्रंथ लिहिले आहेत ( भ कोश, आफ्रेटकोश ).

**आनंदतनय—**हा कवि ज्ञातीचा देशस्थ, आश्वलायन ब्राह्मण, अकोट येथील कुळकर्णी होय. याचें मूळ नाव गोपाळपंत असून बापाचें नाव अनंदराव होतें. मुरारपरब्रह्म म्हणून जे एक नामांकित साधू होते त्याचा हा शिष्य व शिवाजी राजाचा बाप जो शहाजी त्याचा गुरु होता. अरणी म्हणून कर्नाटकांत जो परगणा आहे तेथील मामलत याजकडेस होती अशी वृद्ध माहिती अर्वाचीनकोशकार देतात. याशिवाय अधिक माहिती संतकविकाव्यसूचीकार देतात ती अशीः—याचें आडनाव वेदोभास्कर व ह्याही रघुनाथ पंडित.

ग्रंथ—शबरीआख्यान, शिबिकथा, विश्वामित्राभिगमन, उमारमासंवाद, कंदुकाख्यान, कृष्णचरित्र, गणिकोद्धार, चेंडूफळी, विठ्ठलस्तुति, गोरसक्रीडा, ताटकावध, नवरसचरित्र, बाळचरित्र, मृगीचरित्र, महाबळचरित्र, मार्कंडेयाख्यान, मखरक्षण, विषयपंचक, सीतास्वयंवर, सुदामचरित्र, सेतुबंध, श्रियाळचरित्र, राधाविलास, नौकानयन, गर्गगीता, आरति, पूतनावध, सवाया, कुंटणीचरित्र, रामायण ( श्लोक ), पदें. ' कंगाल ते ब्राह्मण आरणीचे । परंतु ते शूर रणांगणींचे' हा त्याचा श्लोकार्ध दक्षिणेंतील महाराष्ट्रीयांत सर्वतोमुखी आहे. महाराष्ट्रकविचरित्रांत या कवीविषयीं उत्कृष्ट विवेचन आढळतें, तर महाराष्ट्रसाहित्यांत अनंत व आनंदतनय या दोहोंतील साम्य वर्णिलें आहे.

मोरोपंताचा या कवीविषयींः–( "आनंदतनय अरणि करशोभवि फार कवन यमकाहीं तत्सूक्ति पाठ ज्याला त्याचें पाहे व भवन यम काहीं" याप्रमाणे अभिप्राय आहे ( सन्मणि माला ). हा योद्धाहि असावा असें " अरणीचा शिपाई " या त्यानेंच घेतलेल्या नामाभिधानावरून दिसतें. हा कवि १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रसिद्धीस आला

असावा. रघुनाथपंडित व आनंदतनय समकालीन असून त्यांचें एकमेकांशीं व्याह्यांव्याह्यांचें नातें होतें अशी सामान्य समजूत आहे त्यांची वर्णनशैली बरीच मोहक असून चित्रकाव्याकडे त्यांचा विशेष ओढा होता त्यांची भाषा प्रौढ, सरस आणि स्थलविशेषीं अलंकृत अशी आहे मराठींत अक्षरगणवृत्तात्मक काव्यरचना प्रथम त्यांनींच सुरू केली असें कोणी म्हणतात, त्याचप्रमाणें दिंडीवृत्ताचा मराठींत प्रथम प्रचार यांनींच केला असें दिसतें यांची कवनें महाराष्ट्र हरिदास नेहेमीं वापरतात यांचें ' सीतास्वयंवर " काव्य यमकमय आहे उदाहरणार्थ खालील एकदोन कविता पहा

ती त्या सौधतटीं सख्यास निरखी चापें कळी गोरटी ।
माता सिंहकटी ससंभ्रम उठी । कामें घटी गोमटी ॥
नभीं धावत सज्जनस्तुतगुणा ते भव्य भागीरथी ।
पावे दाशरथी कृपाब्धिजवळीं ते शोण डोळा कथी ॥

हळु हळु अमलांगी, संगती राजबाळीं ।
जवळ जवळ आली शोभते घोसबाळी ॥
स्वकरिं कुसुममाला घेउनी, त्या कृपाळा ।
घरनि सुख उमाळा, लक्षिती लोकपाळा ॥

त्यांचें शबराख्यान कमिक पुस्तकांत असल्यामुळें चालू पिढींत बरेंच परिचित आहे तमाशांत याचें वंशज राहातात.

[ सदर्भग्रंथ—आजगावकर–महाराष्ट्र कविचरित्र, भाव महाराष्ट्रसारस्वत स क का सूची अर्वाचीन कोश भ व कविता भाग १ ]

**आनंद तालुका**—(मुंबई इलाखा) खेडा जिल्ह्यातील एक तालुका २२° २६' आणि २२° ४४' उत्तर अक्षांश ७२° ५२' आणि ७३° १३' पूर्व रेखांश, क्षेत्रफळ ·४४ चौरस मैल या तहशिलींत उमरेठ, ओड आणि आनंद हीं गांवें व ८५ खेडीं आहेत. पूर्वेकडील थोडासा भाग सोडून दिल्यास बाकीचा प्रदेश सुपीक आहे पाणीपुरवठा पुरेसा नाहीं लोकसंख्या सुमारें दीड लाख आहे

**आनंदनाथ**—कुरोलीचे आनंदबाबा हे कऱ्हाडास आले व तेथें त्यांनीं जगदंबेची आराधना केली व तेथेंच मठ स्थापन केला समाधि शक १७२५ माघ व॥१२. शिष्य प्रल्हादबाबा ग्रंथ–भक्तमंजिरी [ सं क का. सू ]

**आनंदपुर**—(पंजाब इलाखा) होशियारपुर जिल्ह्याच्या ऊना तहशिलींतील एक गांव हा सतलज नदीच्या वामतीरावर आहे ३१°१४' उत्तर अक्षांश, ७६°३१' पूर्व रेखांश लोकसंख्या ( १९०१ ) ५०२८ नॉर्थवेस्टर्न रेल्वेवरच्या जुलुद किंवा सिरभिंद स्टेशनावर उतरून या गांवीं जावें लागतें तेग बहादुर नांवाच्या शीख गुरूनें हा गाव वसविला शिखांचा दहावा गुरु गोविंदसिंग याचें हें आश्रयस्थान होतें येथेंच औरंगजेबाच्या सैन्यानें त्याचा पराभव केला. तेग बहादुराच्या भाऱ्यांनीं जी 'सोधी' शाखा आहे तिचें हें मुख्य ठिकाण असून अद्यापि या गावास धार्मिक महत्त्व आहे येथें शिखांचीं पुष्कळ देवळें आहेत. इ स १८६७ साली येथें म्युनीसिपालिटी स्थापन झाली इ स १९०३–४ साली तिचें उत्पन्न ३००० रुपये व खर्च २१०० रुपये होता ( इं गॅ. ५–१९०८ )

**आनंदपूर**—(बंगाल इलाखा) ओरीसामधील केंवझार संस्थानांतील एक खेडें, हें वैतरणा नदीच्या वामतीरावर वसलेलें आहे २१°१३' उत्तर अक्षांश ८६° ७' पूर्व रेखांश लोकसंख्या ( १९०१ ) २९४५ बंगाल–नागपूर रेल्वेच्या भद्रख स्टेशनापासून या गावास जाण्यास चांगला रस्ता आहे येथें जंगलांतील पदार्थांचा बराच व्यापार चालतो [ इं. गॅ ५–१९०८ ]

**आनंदपूर**—( मुंबई इ ) काठेवाडमधील एक स्वतंत्र मांडलिक संस्थान लोकसंख्या ( १८८१ ) १४६· यथील अनंतेश्वराचें किंवा अनेश्वराचें देऊळ १०६८ त बांधलेलें आहे असें म्हणतात आनंदपूरची नवीन वहनी १६०८ च्या अलीकडील असून ती ' काठी ' लोकांनीं केलेली आहे हें संस्थान धागा टेकड्यांच्या आळींत असून त्याच्या आसपास उत्तम घोडे मिळतात ( मुं गॅ ८–१८८४ )

**आनंदमूर्ति**—मुळगाव भालगाव जन्मठिकाण–आगळगाव मातापिता साविभी महादेव,आडनाव जोशी, गोत्र वसिष्ठ ऋग्वेदी, यांचें मूळचें नाव अनंत यांचें आनंदमूर्ति हें नांव पडण्याचें कारण पुढील कथेंत अर्वाचीन कोशकारांना दिलें आहे – रघुनाथस्वामी म्हणून कोणी एक नाशिकचे राहणार होते त्यांचा क्रम गंगोत्रीस जाऊन तेथें कावड भरावी व रामेश्वरास अर्पण करावी तेथून सेतु ( वाळू ) घ्यावा आणि ती गंगेंत आणून अर्पावा व त्याचप्रमाणें पुन्हां करावं याप्रमाणें चालत असता अनंतभट्ट हा त्यांचा शिष्य होऊन त्यांजबरोबर यात्रा करू लागला एकदा रामेश्वरास जातांना रघुनाथ स्वामींचा मुक्काम प्रतिवर्षाप्रमाणेंच ब्रह्मनाळ येथें झाला असतां लोकांनीं प्रार्थना केली कीं आतां आपलें वृद्धापकाळ आला आहे यास्तव येथेंच राहावें परंतु ती गोष्ट त्यांनीं अमान्य करून त्या सर्वांस सांगितलें कीं हा अनंतभट्ट येथें राहील व हा राहिला असता आम्हीं राहिलों असें मानून तुम्ही याची सेवा करावी इतकें सांगून त्यांस त्यांनीं ठेवलें व आपण निघून गेले तेव्हांपासून यांच्या आनंदित वृत्तीवरून यास आनंदमूर्ति असें नाव पडलें हा पुरुष अत्यन्त समाधानी होता व समर्थ रामदास स्वामी यांच्या पंचायतनांत यांची गणना होती यांची समाधि शक १६१८ मार्गशीर्ष शुद्ध १४ च दिवशीं ब्रह्मनाळींच झाली ( रामदास चरित्र ) यांचे ग्रंथ प्रसिद्ध नाहींत पण पदें आहेत. आनंदमूर्तींची वाणी रसाळ असून ते फार प्रेमळ कीर्तन करीत असें महाराष्ट्र सारस्वत कार लिहितात

[संदर्भग्रंथ—अ. की. महाराष्ट्र सारस्वत. मं. क. का. सूचि. रामदास रामदासी]

**आनंदराय मखीन**—हा भारद्वाजकुलांतील नृसिंहाचा पुत्र होता. हा शहाजी (१६८७-१७११) व सरफोजी (१७११-२७) या तंजावरच्या राजाच्या पदरीं होता. यानें 'विद्यापरिणयन' नांवाचें एक संस्कृत नाटक लिहिलें. हें नाटक वेदकवीनें लिहिलें व आनंदरायाच्या नांवें तें प्रसिद्ध होण्याला परवानगी दिली अशी कथा आहे. या नाटकांत प्राकृत भाषेचें नाईत किंवा खरा विदूषकहि नाहीं हें नाटक सरफोजीच्या कारकीर्दींत लिहिलें. यांत शिवभक्ति जीव राजाला अविद्या नांवाच्या पत्नीशीं बंदिमान होण्याला लावते, नंतर जीव व विद्या यांचें प्रेम जडून लग्न होतें अशी कथा आहे. या कवीचें दुसरें नाटक 'जीवानंदन' हें होय. हें शहाजीच्या कारकीर्दींत लिहिलें. हें अन्योक्तिपर आहे. यांत राजा जीव व राजा यक्ष्म (क्षय) यामधील युद्ध दाखविलें आहे. शिव, जीवाला कांहीं औषधी व योगसिद्धि देतो व त्यामुळें जीव यक्ष्मावर जय मिळवितो. [स्टेनकनो इंडियन ड्रामा आफ्रेक्टोश]

**आनंदराव गायकवाड.** (१८००-१८१९) रावजीस दिवाणगिरीची प्राप्ति—गोविंदराव गायकवाडानंतर बडोद्याच्या गादीवर आलेला पुरुष [याच्या कारकीर्दींसंबंधीं कांहीं पुरवणी माहिती गायकवाड घराण्याच्या इतिहासांत आली असून पुढें दिलेल्या हकीकतीस मुख्यत: गाइकवाचा आधार आहे] गोविंदराव गायकवाड मरण पावला तेव्हां त्याच्या मागें त्याचे ४ औरस पुत्र, सात दासीपुत्र व शिवाय कांहीं मुली एवढा मोठा परिवार होता. औरसपुत्रांमध्यें आनंदराव हा सर्वांत वडील असून संस्थानांतील प्रमुख अधिकाऱ्यांनीं त्यालाच जहागिरीचा खरा वारस ठरविलें होतें परंतु आनंदराव स्वतः मदबुद्धीचा असल्यामुळें संस्थानांत निरनिराळे पक्ष उद्भवून ते आपल्या तंत्रानें कारभार चालविण्यासाठीं धडपड करीत होते. कान्होजीराव नांवाचा गोविंदरावाचा एक दासीपुत्र होता. दासीपुत्रांमध्यें तोच सर्वांत वडील असून फार धीट व महत्त्वाकांक्षी माणूस होता. त्याला त्याच्या बंडखोर वर्तनामुळें गोविंदराव मरण्याच्या अगोदरच अटकेंत ठेवण्यांत आलें होतें परंतु गोविंदरावाचें देहावसान होतांच त्यानें आनंदरावावर आपलें फार प्रेम असल्याचें दाखवून स्वतःची सुटका करून घेतली व नांवाला केवळ दिवाणाचा मुतालिक होऊन कांहीं महिने जहागिरीचा सर्व कारभार, त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें चालविला. परंतु त्यानें पैशासाठीं राजघराण्यांतील स्त्रियांवर जो जुलूम केला त्यामुळें तो लवकरच सर्वांस अप्रिय झाला व इतकेंहि करून अरब शिपायांचा रोजमुरा देण्यास लागणाऱ्या पैशाची त्यास सोय करतां न आल्यामुळें तेहि त्याच्याविरुद्ध उठण्यास तयार झाले. सरतेशेवटीं एके रात्रीं (२९ जानेवारी १८०१) अरब शिपायांनीं कान्होजीच्या घरास वेढा घातला व त्यास कैद करून आनंदरावापुढें उभें केलें. आनंदरावानें कान्होजीची त्याच्या अत्याचाराबद्दल चांगली कानउघाडणी केली व त्यास रामपूरच्या तुरुंगांत अटकेंत ठेवण्याचा हुकूम केला.

**इंग्रजांच्या कुमकेची याचना.**—येणेंप्रमाणें पूर्वीचा दिवाण रावजी आप्पा यास पुन्हां दिवाणगिरीचा अधिकार प्राप्त झाला. पण कान्होजीप्रमाणें त्यासहि पैशाची अडचण भासूं लागली. इकडे कान्होजीची आई गजराबाई ही सुरतेस होती तिनेंहि कडीचा जहागीरदार खंडेरावाचा मुलगा मल्हारराव यास रावजी आप्पाविरुद्ध उठाव करण्यास चिथविलें. दोन्हीहि पक्षांनीं इंग्रजांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला. रावजीनें इंग्रजांस असें आश्वासन दिलें कीं, मी तुम्हांस गोविंदरावानें देऊ केलेला चौऱ्याशीं परगणा व सुरतची चौथ तुमच्या स्वाधीन करीन. उलट कान्होजीच्या पक्षानें हा मुलूख त्याच्याकडे ठेवून शिवाय चिखली परगणा देण्याचें आमिष दाखविलें. मल्हाररावाचें म्हणणें कीं आपणास गायकवाडाच्या कुटुंबास परकीयांच्या प्रतिबंधांतून मुक्त करण्याकरितां मदत पाहिजे, तर उलट रावजीचें म्हणणें कीं, आपण आनंदरावाच्या हुकुमानेंच मल्हाररावाविरुद्ध मदत मागावयास आलों आहों. रावजीचा भाऊ बाबाजी हा बडोद्याच्या फौजेवरील मुख्य होता. त्याचा रावजीस आधार असून बडोद्याच्या शिबंदींतील अरब लोकांच्या ७००० भाडोत्री पायदळांतील बरेचसे लोकहि त्याच्याच पक्षाचे होते. तथापि त्याचें या शिपायांवर वजन असें मुळींच नव्हतें. पेशवाईंत शिपायांचा पगार दरमहाच्या दरमहा सरकारांतून क्वचितच मिळत असल्यामुळें त्यांचें त्यांच्या सैन्याबरोबर असलेल्या एखाद्या मोठ्या सावकाराच्या गुमास्त्याकडे उधारीचें खातें असे. हे सावकार केवळ शिपायांसच नव्हे तर संस्थानिकांसहि जबर व्याज घेऊन रकमा पुरवीत असत. त्यामुळें त्यांचेंच ह्या शिपाई लोकांवर वजन असे. बडोद्यांत अशा प्रकारचे मंगल पारिख व शामळ बेचर असे दोन मोठे संपत्तिमान सावकार होते. ह्या दोघांचाहि रावजीस पाठिंबा असल्यामुळें यावेळीं बडोद्यांत त्याचाच पक्ष फार प्रबळ होता. उलटपक्षीं कान्होजीचा पक्ष ज्यानें उचलला होता तो मल्हारराव फार बुद्धिमान व धाडसी माणूस होता. अगोदर हा कान्होजीस पदच्युत करण्यास तयार झाला होता, पण आतां कान्होजीच्या वतीनें त्यास बडोदें सरकारास द्यावी लागत असलेली पेशकशीची रकम मागील बाकीसह माफ करण्याचा करार करण्यांत आल्यामुळें बरीच मोठी सेना गोळा करून तो कान्होजीच्या बाजूनें लढावयास आला व आनंदरावाची ठाणीं १८०१च्या अखेरीस काबीज करूं लागला. तेव्हां रावजीनें इंग्रजांशीं बोलणें लावून मल्हाररावाविरुद्ध आपणास मदत केल्यास इंग्रजांच्या पांच पलटणी चाकरीस ठेवण्यास आपली तयारी आहे असें मुंबई सरकारास कळविलें.

**कडीच्या जहागिरदाराविरुद्ध मोहीम.**—ही विनंति ऐकून मुंबई सरकाराचा मोह अनावर झाला व गव्हर्नर जनरलकडून परवानगी आली नव्हती, तरी त्यांनीं मेजर अलेक्झांडर वाकर यांच्याबरोबर रावजींच्या मदतीस १६०० लोक पाठविले. वाकरची तुकडी १८०२ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या अखेरीस बाबाजींच्या हाताखालीं असलेल्या गायकवाडाच्या सैन्यास येऊन मिळाली व त्यानंतर गायकवाड व बाबाजी यांचें संयुक्त सैन्य मल्हाररावाच्या कडीवर चाल करून जाऊं लागलें. तेव्हां झालेल्या गोष्टीबद्दल मल्हाररावानें दिलगिरी प्रदर्शित करून ताबे केलेलीं सर्व ठाणीं परत करण्यास तयार झाला. तथापि लवकरच या बाबाबाबतीत मल्हाररावाला लढाई अटळ असें दिसून आल्यावरून इंग्रजांचें सैन्य थबकून राहिलें होतें तें पुन्हां पुढें येऊं लागलें. मल्हाररावानें अद्यापिहि तहाची वाटाघाट चालू ठेवली होती. अशा रीतीनें तहाचें बोलणें चालू असतां मल्हाररावानें ता. १७ मार्च रोजीं शत्रूच्या सैन्यावर अचानक हल्ला केला, पण तो परतून लावण्यांत आला. या हल्ल्यांत इंग्रजांचे सुमारें ५० लोक ठार झाले असतील.

याप्रमाणें मल्हाररावाच्या सैन्यास मार बसूं लागले; तथापि त्यानें विरुद्ध पक्षांतील गायकवाडाच्या सैन्यांत फितूर करून ठेवला असल्यामुळें पुढें लवकरच आटोक्यांत येऊन वाकर यास आपण शत्रूच्या पूर्णपणें कचाट्यांत सांपडलों आहों असें उघड उघड दिसून आलें. वाकर यानें वरिष्ठांस आपली परिस्थिति निवेदन करतांच त्यांनीं मुंबई येथून जेवढें सैन्य पाठवितां येण्यासारखें होतें तें सर्व कर्नल सर विल्यम क्लार्क याच्या हाताखालीं देऊन रवाना केलें. हें सैन्य खंबायतेस एप्रिलच्या १२ व्या तारखेस येऊन पोंचलें व त्यानंतर दोन दिवसांनीं तें कडी येथें वाकर आपल्या तुकडीचें शत्रूपासून रक्षण करीत मदतीची वाट पहात बसला होता त्याच्याकडे निघून गेलें. मल्हाररावाचें सैन्य कडी शहराच्या आश्रयानें एक चांगला मजबूत खंदक खणून राहिलें होतें. क्लार्क यानें कडीस येतांच विलंब न लावतां प्रथम तें शहर काबीज करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें एप्रिल महिन्याच्या ३० व्या तारखेस पहाटेस शत्रूवर हल्ला चढविण्यांत येऊन खंदक सर करण्यांत आला. या हल्ल्यांत इंग्रजांकडील १६३ माणसें जखमी व ठार मिळून कामास आलीं. यानंतर पुढें लवकरच मल्हारराव इंग्रजांस शरण आला (३ मे १८०२) व कडी शहर बडोदें सरकारच्या हवालीं करण्यांत आलें. तथापि इंग्रजांनीं आपल्या पायदळाच्या दोन तुकड्या एका ब्रिटिश अधिकाऱ्याच्या हाताखालीं कडी येथें शिबंदी म्हणून ठेवल्या व थोडेसें सैन्य क्लार्कबरोबर मुंबईस रवाना करून बाकीचें बहुतेक सर्व सैन्य कर्नल वुडिंग्टन याच्या हाताखालीं गायकवाड दरबारचा नवीन पोलिटिकल रेसिडेंट मेजर वाकर याच्या मदतीस ठेविलें.

कडी शहर काबीज होऊन मल्हारराव शरण आल्यानें गायकवाड घराण्याच्या दोन्ही शाखा पुन्हां एकत्र होऊन त्यांचा मुलूख एका सत्तेखालीं आला. मल्हाररावास राहण्याकरितां नडियाद हा गांव नेमून देण्यांत आला व त्या जिल्ह्याच्या उत्पन्नांतील सवालक्ष रुपये त्याच्या खर्चासाठीं वेगळे काढून ठेवण्यांत येऊं लागले. मोहीम संपतांच इंग्रजांनींहि आपलें बक्षीस सव्याज पदरांत पाडून घेतलें. चोऱ्याशी परगणा व सुरतच्या चौथीचा गायकवाडाचा हिस्सा मोहिमीपूर्वींच देण्यांत आला होता. शिवाय आतां गायकवाडानें दोन हप्त्यांनीं मोहिमीचा खर्चहि सव्याज इंग्रजांच्या पदरांत घालण्याचें कबूल करून त्याच्या तारणादाखल सुरत अठ्ठाविशी इंग्रजांकडे ठेविली. याचवेळीं त्यानें गुप्तपणें दरमहा ६५००० खर्चाचें इंग्रजांचें २००० शिपायांचें यूरोपियन तोफखाना असलेलें कुमकी सैन्यहि आपल्या पदरीं ठेविलें. ४ जून १८०२ रोजीं चिखली परगणा इंग्रजांच्या हवालीं स. १८५९ पासून बक्षीस म्हणून करण्यांत आला. यासोबत (५ मे १८०३) कैऱ्याचा किल्ला व जहागीर देण्यांत आली.

**सणखेडा काबीज.**—बडोद्याजवळ सणखेडा म्हणून एक गांव आहे तेथें गणपतराव नांवाचा गायकवाड घराण्यांतील एक पुरुष मामलतदार होता. त्यानें आपण मल्हाररावाच्या पक्षाचे आहोंत असें जाहीर केलें असून त्या गांवचा कारभारहि तो त्याच्याच नांवानें चालवीत होता. गोविंदरावाच्या दासीपुत्रांपैकीं मुरारराव नांवाचा एक पुत्रहि त्याला येऊन मिळाला होता. रावजी आप्पानें इंग्रजांच्या कुमकी सैन्याचा एक तुकडी पाठवून सणखेडा काबीज करून घेतला (७-७-१८०२;) परंतु गणपतराव व मुरारराव हे त्यांच्या हातीं लागले नाहींत. ते तेथून जे निसटले ते धारच्या पवाराकडे जाऊन त्याच्या आश्रयास राहिले.

**अरब सैन्यास रजा.**—कांहीं दिवसांपासून बडोद्यांत अरब शिपायांचेंच साम्राज्य होतें असें म्हटलें तरी चालेल. त्यामुळें रावजी आप्पा व त्याचे सल्लागार इंग्रज यांनीं बडोद्याचें लष्कर कमी करण्याचें काम हातीं घेतलें. तेव्हां अरब शिपायांस ती गोष्ट मुळींच आवडली नाहीं. त्यांनीं आपल्या तुंबून राहिलेल्या पगाराची रक्कम अवाच्या सव्वा फुगवून तिची फेड करण्याचा तगादा लाविला, व गायकवाडास कैद करून आपल्या बाकीची फेड झाल्याशिवाय त्याला मुक्त करण्यास आपण तयार नाहीं असें जाहीर केलें. त्यांनीं कान्होजीरावास निसटून जाऊं दिलें. याच सुमारास मल्हाररावहि नाहींसा झाला. कांहीं उद्योग नसलेल्या शिपायांचा गुजराथेंत नेहमीं पुष्कळसा भरणा असतो. त्यांतल्यात्यांत मल्हाररावाच्या सैन्यास नुकतीच रजा देण्यांत आली असल्यामुळें या वेळीं तर त्याच्या योगानें देशांत कांहीं घडामोडी उपस्थित होण्याची भीति विशेष होती. प्रथम वाकर यानें गोडीगुलाबीनें समेट घडवून आणतां येतो असें त्यास पहावा या विचारानें तसा प्रयत्न करून पाहिला; तो निष्फळ झाल्यावर मुंबईहून एक यूरोपियन पलटण मागविण्यांत आली, व गायकवाडाच्या कुमकी सैन्यास तीं

येऊन मिळाल्यावर कर्नल वुडिंग्टन याने बडोदें शहरास १८०२ सालीं डिसेंबरच्या १८ तारखेस वेढा दिला. हा वेढा ता. २६ पर्यंत चालू होता. या अवधींत अरब लोकांनीं शहराच्या तटबंदीच्या व घरांच्या आसऱ्यानें शत्रूच्या सैन्यांतील अनेक अंमलदार नेम धरून ठार केले. या वेळांत हल्ला करणाऱ्या लोकांपैकीं दुसरेहि बरेच लोक कामास आले. परंतु शेवटीं तटबंदीस भगदाड पडणार असें दिसून येतांच अरब लोक शत्रूस शरण आले. या वेळीं असें ठरविण्यात आलें कीं बडोदें सरकारानें शिपायांचो जी काय योग्य बाकी देणें निघेल तिची फेड करावी व ती होतांच अरब लोकांनीं गुजराथ सोडून निघून जावें. त्याप्रमाणें बडोदें सरकारानीं शिपायांचें एकंदर १७॥ लाख रुपये देणें निघालें तें सर्व फेडून टाकलें. तेव्हां अरब सैन्यांतील बहुतेक मुख्य मुख्य लोकांनीं निमूटपणें निघून जाऊन आपलें वचन पूर्ण केलें परंतु अबूद जमादारप्रभृति कांहीं लोक बरेचसे शिपाई बरोबर घेऊन ठरल्या दिशेनें न जातां कान्होजीस मिळण्याच्या उद्देशानें अगदीं उलट दिशेनें चालते झाले. तेव्हां त्यांचा पाठलाग करण्याकरितां वुडिंग्टन यास पाठविण्यांत आलें होतें व त्यानें या लोकांच्या छावणीवर छापा घालून त्यांना उधळून लाविलें. तथापि ते लोक पुन्हां एकत्र होऊन कान्होजीस जाऊन मिळाले.

कान्होजीची उचलबक व त्याचा पाठलाग.—वर सांगितल्याप्रमाणें कान्होजी हा बडोद्याहून निघाला तो प्रथम महाराष्ट्राच्या उत्तर सरहद्दीवर राजपिपळी म्हणून एक डोंगराळ मुलूख आहे तेथें गेला; व तेथें बरचसे लोक जमवून बडोदें शहरास वेढा पडला होता त्या सुमारास परत गुजराथेंत आला. त्यानें बाबाजीच्या फौजेवर हल्ला करून तिची दाणादाण केली. नंतर पुन्हां तो बडोद्याकडे चालून येऊं लागला.

बडोदें हस्तगत झाल्यानंतर पांच दिवसांनीं मेजर होम्स याच्या हाताखालीं एक रेजिमेंट व एक पलटण देऊन त्याला कान्होजीचा पाठलाग करण्यासाठीं रवाना करण्यांत आलें. (१ जानेवारी १८०३) कान्होजी हा फौज जमवीत, गांवोगांव खंडण्या घेत इकडून तिकडे फिरत होता. बडोद्यांत आपल्यास अनुकूल असलेला एक पक्ष उत्पन्न करण्याचीहि त्याची खटपट चालली होती. इंग्रजांच्या तुकडीनें एक महिनाभर कान्होजीचा पाठलाग करण्यांत घालविल्यावर तिच्या मदतीस २५० यूरोपियन व ३०० हिंदी शिपाई आणखी पाठविण्यांत आले. एकदा कान्होजी हा सौरी गांवापासून चार पांच मैलांच्या अंतरांत एका घळीमध्यें आपल्या लोकांसह दबा धरून बसला असतां होम्स याचें विनीचें सैन्य तेथें आलें. तें सर्व आंत येईपर्यंत कान्होजीच्या लोकांनीं बिलकुल हालचाल केली नाहीं. पण ते आंत येतांच एकदम गोळ्यांचा वर्षाव सुरू झाला, व त्यायोगें शत्रुपक्षाचें सैन्य अस्ताव्यस्त होतांच अरब लोक तरवारी हातांत घेऊन त्यावर मोठ्या उत्साहानें नेट धरून चाल करून गेले व विनीच्या लोकांची दाणादाण करून ते तसेच पुढें घुसले. हें पाहून मेजर होम्स आपल्या घोड्यावरून खालीं उतरला, आपण स्वतः पुढें होऊन त्यानें आपल्या सर्व सैन्यास शत्रूवर घातलें, व मोठ्या शौर्यानें लढून विपक्षीय लोकांस रणक्षेत्रांतून हाकून लाविलें (फेब्रुवारी ६). या प्रसंगीं इंग्रजांचे पांच अंमलदार धरून एकंदर १०० लोक जखमी व ठार झाले. या पराभवानंतर आणखी सुमारें एक महिना कान्होजी गुजराथेंत होता. शेवटीं कपडवंजाजवळ त्यानें इंग्रजांशीं लढण्याचा अखेरचा एक प्रयत्न केला. त्यावेळीं मेजर होम्स यानें त्याची छावणी हल्ला करून घेतल्यामुळें त्याच्या सर्व लोकांची वाताहत झाली. यानंतर कान्होजी उज्जनीस पळून गेला.

इंग्रजांचा बडोदें सरकारवर पगडा.—काठेवाडमधून खंडण्या गोळा करण्याकरितां दरवर्षी बडोद्याहून बरेंच सैन्य रवाना करावें लागत असे. गायकवाडाच्या सेनेबरोबर इंग्रजांच्या रेसिडेंटानेंहि ब्रिटिश सैन्य बरोबर घेऊन प्रत्येक वेळीं जावें. यामुळें देशांत शांतता प्रस्थापित होऊन वसुलाची वाढ झाली. अशा रीतीनें इंग्रजांनीं लवकरच बडोदें सरकारवर आपला पगडा बसविला व यात पर त्या राज्यांतील महत्त्वाच्या सर्व गोष्टी ब्रिटिश रेसिडेंट ले. क. वाकर याच्या तंत्रानें होऊं लागल्या.

बडोद्याच्या कारभारी मंडळांत बहुतेक परभू लोकांचाच विशेष भरणा असून इंग्रजांना धरून घेणारा रावजी आप्पाजी हा त्यांत प्रमुख होता. पण तो १८०३च्या जुलईमध्यें मरण पावला. त्यानें आपल्या मरणापूर्वीं सीताराम रावजी नामक आपल्या एका पुतण्यास दत्तक घेतलें असल्यामुळें रावजी मेल्यावर रेसिडेंटाच्या संमतीनें या सीताराम रावजीसच मुख्य कारभाऱ्याची जागा देण्यांत आली. बरेच दिवस त्याचें काम पाहिल्यावर जेव्हां तो त्या कामास नालायक असल्याचें दिसून आलें तेव्हां इतके दिवस गायकवाडाच्या सेनाधिपतीचें काम करीत असलेला त्याचा चुलता बाबाजी यास सीतारामास मदत करण्याविषयीं इंग्रजांनीं पाचारण केलें. परंतु सीताराम काम करण्यास नालायक म्हणून नको होता तर बाबाजीस त्याच्या हातीं सर्व सत्ता राहिल्यास तो डोईजड होईल म्हणून इंग्रज भीत होते म्हणून ते दिवाणाची सत्ता कमी करण्याची कांहीं युक्ति पहूं लागले. गायकवाडाचा भाऊ व त्याच्या जहागिरीचा वारस जो फत्तेसिंह त्यास १८०२ सालीं होळकराचा एक सेनापति पुण्याहून आपल्याबरोबर घेऊन गेला होता. शिवाय होळकरानें गायकवाडाच्या घराण्यांतील या एका वारस पुरुषास सैन्य देऊन गुजराथेंत पाठविलें तर नसती भानगड उपस्थित होईल अशी इंग्रजांस भीति होतीच. तेव्हां त्यांनीं फत्तेसिंहाबद्दल पैसे भरून त्याला होळकरापासून सोडविलें व १८०६ पासून तो राजप्रतिनिधि म्हणून बडोद्याचा

कारभार पाहूं लागला. फत्तेसिंहानें गंगाधरशास्त्री नामक एका इसमाची आपल्या चिटणिसाच्या जागेवर नेमणूक केली. या गंगाधरशास्त्र्यावर लवकरच पुढें रेसिडेंटाचा विश्वास बसल्यामुळें बाबाजी मरण पावल्यावर, व सीताराम्याच्या हातून दुर्वर्तन घडल्यावर फत्तेसिंह व रेसिडेंट यांच्या मदतीनें एक नाव खेरीज करून बाकी सर्व मुख्य कारभाऱ्याचे अधिकार गंगाधरशास्त्र्यांच्या हातीं आले.

इंग्रज व गायकवाड यांमधील नवीन तह.—१८०२ सालच्या मार्च, जून व जुलै महिन्यांत इंग्रजांचे गायकवाडाशीं जे तीन निरनिराळे करारमदार झाले होते त्यांत काहीं फरक करून व काहीं नवीन कलमें घालून ते पक्के करून घेण्याकरितां इंग्रज व गायकवाड यांच्या दरम्यान तारीख २१ एप्रिल सन १८०५ रोजीं एक नवीन तह झाला. यापूर्वी गायकवाडानें २००० शिपायांचें कुमकी सैन्य स्वतःच्या पदरीं ठेवून घेतलें होतें, परंतु आतां त्यानें ३००० पायदळ व तोफखान्याची एक कंपनी ठेवण्याचें कबूल केलें. हें सैन्य गायकवाडाच्या मुलखातच ठेवलें जावें, परंतु काहीं महत्त्वाच्या प्रसंगींच त्याचा उपयोग करण्यांत यावा असें ठरविण्यांत आलें. हें सैन्य पोसण्याकरितां गायकवाडानें धोलका, नडियाद, बीजापूर, माहतूर, मुडा, करांचा कप्पा व सीमकटोडा हे १०,७०,००० रुपये उत्पन्नाचे ७ जिल्हे तोडून देऊन काठेवाडावर एक लक्षाच्या वराता दिल्या. चौऱ्याशी, चिखली व कैरा हे परगणे व सुरतेच्या चौथे मधील गायकवाडाचा हिस्सा हे अगोदरच इंग्रजांना अर्पण करण्यांत आले होते. इंग्रजांचें गायकवाडाकडे सुमारें ४१½ लक्ष रुपयांचें घेणें निघत असल्याचें दिसून आल्यावरून सालीना अजमासें १४ लक्ष उत्पन्नाच्या मुलखाचा वसूल इंग्रजांनीं त्या कर्जाच्या फेडीकरितां आपल्याकडे लावून घेतला. गायकवाड व पेशवे यांच्या देण्याघेण्याचा हिशोब इंग्रजांपुढें ठेवण्याचें गायकवाडानें कबूल करून आपल्या पदरीं कोणीहि यूरोपीय माणूस चाकरीस न ठेवण्याचा व ब्रिटिशांच्या अनुमतीशिवाय कोणत्याहि परक्या संस्थानिकाशीं कलागत उपस्थित न करण्याचा करार केला.

सुराज्याची स्थापना.—गोविंदरावाच्या हातीं जहागीर आल्यापासून पेशवे व गायकवाड यांनीं परस्परांच्या देण्याघेण्यासंबंधीं अद्यापपर्यंत काहीं हिशोब केलेला नव्हता. आबा शेलूकरानें बंड मोडल्यावर बडोदें सरकारानीं अहमदाबादची इजाऱ्याची रक्कम, काटेवाड, पिटलावद, नापार, कवडाराणपूर, धंडुका, गोगो, यांची खंडणी व खंबायतमधील काहीं हक्क या सर्वांबद्दल पेशव्यास दरसाल पांच लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें होतें. जेव्हां मुंबईकर इंग्रजांनीं रावजी आप्पाजीच्या पक्षास कुमक करण्यासाठीं बडोद्यास आपलें सैन्य रवाना केलें तेव्हां बडोदें संस्थानचा, वसूल ५५ लक्ष तर खर्च ८२ लक्ष अशी स्थिति होती. राज्यांतील सर्व सत्ता अरब शिपायांच्या हातीं आली असून, गायकवाडाच्या कुटुंबांतील माणसांत कलह माजून फूट पडली असल्यामुळें कोणत्याहि धाडशी माणसास आपला तळीराम गार करून घेण्यास ती उत्तम संधि होती. पेशव्याचें घेणें शिवाय करून बडोदें सरकारास दुसरें जे कर्ज होतें त्या सर्वांचा फडशा सुमारें ४२ लक्ष रकमेवर करण्याचें ठरलें असून ती रक्कम काहीं स्वतः इंग्रजांकडून व काहीं त्यांच्या जमानतीवर घेऊन उभी करण्यांत आली होती. ज्यांच्या बंडामुळें इंग्रजांना बडोद्याच्या राज्यांत आपलें कायमचें ठाणें देण्यास अवसर मिळाला तो मल्हारराव गायकवाड बडोद्यांत पूर्वी अरब लोक वेढले गेले होते त्याच वेळेस नडियादहून चालता झाला होता. हा पुढें काहीं दिवसांनीं अगदीं उपासमार होत असलेल्या स्थितींत गायकवाडाचा सेनापति बाबाजी यांच्या हातीं लागला. बाबाजीनें त्याला इंग्रजांच्या हवालीं केलें व इंग्रजांनीं त्यास सुरतेच्या किल्ल्यांत व त्याच्या आसमंत भागांत साध्या नजरकैदेखालीं ठेविलें. या ठिकाणीं तो बरेच दिवस होता व शेवटीं याच स्थितींत त्याचें देहावसानहि झालें. १८०८ सालीं कान्होजी शरण आला. त्याला प्रथम काहीं नेमणूक करून देऊन मोकळेंच बडोद्याजवळ पाद्रा येथ ठेविलें होतें. परंतु फार दिवस त्याच्यानें स्वस्थ बसवलें गेलें नाहीं. इ. स. १८१२ सालीं त्यानें कारभाऱ्याविरुद्ध कारस्थान रचल्यामुळें त्याला कैद करून मद्रासेस नेऊन तेथें राजकीय कैदी म्हणून ठेवण्यांत आलें.

गंगाधरशास्त्र्याचा खून.—पेशवे व गायकवाड यांच्या दरम्यान सध्या दोन भानगडीचे प्रश्न होते. एक पेशव्याचें गायकवाडाकडे येणें असलेलें देणें व दुसरा अहमदाबाद व त्याखालील दुसऱ्या काहीं पेशव्याच्या मुलखाचा गायकवाडाकडे असलेला इजारा. प्रथमतः या भानगडीच्या प्रश्नाचा निकाल लावण्यासाठीं गायकवाडानीं बापू मैराळ नांवाचा आपला एक वकील पुण्यास पाठविला. पेशव्याच्या हिशोबानें त्याचें गायकवाडाकडे जवळ जवळ एक कोट रुपये घेणें निघत होतें. तथापि गायकवाडाच्या घराण्यानें आपल्या वडिलांचा पक्ष घेतल्यामुळेंच त्यावर अनेक संकटें आलीं होतीं, हें जाणून बाजीराव या घेण्यापैकीं ६० लक्ष रुपयांची गायकवाडास सूट देण्यास तयार होता. उलटपक्षीं गायकवाडाचें असें म्हणणें होतें कीं, 'पेशव्याच्या कारभाऱ्यांनीं पुरंदरच्या तहाच्या वेळीं आमच्याकडे असलेलें भडोच अन्यायानें इंग्रजांस दिल्यामुळें आमचें आतापर्यंत जें नुकसान झालें आहे तें त्यांनीं भरून द्यावें आणि आबा शेलूकराचें बंड मोडण्याच्या व गुजराथेंतील पेशव्याच्या व आमच्या मुलुखाच्या संरक्षणाच्या प्रीत्यर्थ आलेला खर्च पेशव्यांनीं आपणास द्यावा.' बाजीरावानें प्रथम गायकवाडानीं बापू मैराळाच्याऐवजीं दुसरा कोणी तरी इसम पाठवावा, असा हट्ट धरला व जेव्हां गायकवाडांकडून बापू मैराळाच्या जागीं गंगाधरशास्त्री नांवाचा दुसरा एक इसम आला, तेव्हां

त्यानें कांहीं कारणें काढून गंगाधरशास्त्र्यांचीहि गांठ घेण्याचें नाकारलें (इ. स. १८१४); परंतु इंग्रजांनीं हीं कारणें गैरवाजवी असल्याचें ठरविल्यावरून शेवटीं बाजीरावानें अहमदाबाद वगैरेंचा इजारा गायकवाडाकडेच पुन्हां चालू ठेवण्याची विनंति साफ नाकारली; इतकेंच नव्हे तर त्याच्या मर्जीतील त्रिंबकजी डेंगळे नावाच्या इसमानें पेशव्याच्या नांवावर गुजराथेंतील जिल्हेहि आपल्या ताब्यात घेतले. हें पाहून गंगाधरशास्त्र्यानें ब्रिटिश रेसिडेंटाचा सल्ला घेऊन, वादाच्या प्रश्नाचा निकाल लावण्याचें काम इंग्रजांकडे सोंपवून पुन्हा परत बडोद्यास जाण्याचें ठरविलें. गंगाधरशास्त्र्यानें परत जाण्याचें ठरविलें आहे, असें समजताच बाजीराव व त्रिंबकजी यांच्या वृत्तींत एकदम फरक पडला (इ स. १८१५). त्रिंबकजी डेंगळे आता गंगाधरशास्त्र्यास हरभऱ्याच्या झाडावर चढवून त्याची मनधरणी करूं लागला व शेवटीं पंढरपूर मुक्कामीं संधि साधून त्यानें त्याचा खून करविला (१५ जुलै १८१५ गंगाधरशास्त्री पहा)

गंगाधरशास्त्र्याच्या खुनांत गायकवाडाचा मुख्य कारभारी सीताराम रावजी याचेंहि अंग होतें. सीताराम रावजी हा गंगाधरशास्त्र्याचा मत्सर करीत असून तो बाजीरावास फितुरहि झाला होता. पंढरपूर येथें गंगाधरशास्त्री कोणता हें मारेकऱ्यांना दाखवून देण्याचें काम या सीताराम रावजीच्याच दोघा हस्तकांनीं केलें होतें. इंग्रजांनीं बाजीरावापासून त्रिंबकजी डेंगळ्यास आपल्या ताब्यात घेतलें त्याच वेळेस या दोघा इसमासहि कैद करण्यात आलें होतें. त्यानंतर त्यांना गायकवाडाच्या स्वाधीन केलें व गायकवाडानीं त्यास डोंगरी किल्ल्यात अटकेंत ठेविलें. बाजीरावानें त्रिंबकजीस इंग्रजांच्या हवालीं करण्यापूर्वी सीताराम रावजी हा त्रिंबकजीच्या कांहीं लोकांसह सैन्य जमा करीत होता म्हणून सीताराम रावजी यास बडोद्याच्या राज्यकारभारांतून दूर करून इंग्रजांनीं पुढें त्यास फत्तेसिंहाच्या इच्छेविरुद्ध आपल्या ताब्यात घेतलें.

**इंग्रजांशीं पुरवणी तह.**—ता. १३ जानेवारी सन १८१७ रोजीं इंग्रज आणि पेशवे यांच्या दरम्यान जो तह झाला त्याअन्वयें बाजीराव केवळ चार लक्ष रुपये वार्षिक खंडणी घेऊन गायकवाडावरील आपल्या जुन्या नव्या सर्व हक्कांस सोडचिठ्ठी देण्यास तयार झाला; व १८१४ सालीं ज्याची जुनी दहा वर्षांची मुदत संपल्यामुळें गायकवाड ती वाढवून घेण्यासाठीं खटपट करीत होते तो अहमदाबादचा इजारा पूर्वीच्याच म्हणजे साडेचार लक्ष रुपये रकमेवर त्यानें गायकवाडास कायमचा दिला. या तहामुळें गायकवाडास स्वतः कांहीं हातपाय न हालवितां फार फायदा मिळाला असा मुंबई सरकाराचा समज होऊन ते गायकवाडावर आणखी कुमकी फौज लादण्याचा विचार करूं लागले. त्याप्रमाणें तारीख ६ नोव्हेंबर सन १८१७ रोजीं इंग्रजांनीं गायकवाडाशीं एक नवीन तह केला. मुलुखाचा बंदोबस्त करणें व गायकवाडावर लष्करी खर्चाचें योग्य प्रमाण लादणें असे या तहाचे दोन उद्देश होते. गायकवाड लष्कराकडे पुष्कळ खर्च करतात तरी त्यांच्या सैन्याची व्यवस्था नीट नसल्यामुळें बंदोबस्ताचा भार आम्हांवरच पडून लढायांचा खर्च आम्हांस सोसावा लागतो अशी इंग्रजांची तक्रार होती. म्हणून त्यांनीं आतां गायकवाडाची कांहीं शिबंदी कमी करून त्यांच्या कुमकी सैन्यात एक हजार पायदळ व घोडदळाचीं दोन रेजिमेंटें एवढी भर टाकली, व या सैन्याच्या खर्चाकरितां आपल्या मुलुखाच्या बंदोबस्तास ठीक जो प्रदेश घेणें अवश्य दिसलें तो गायकवाडापासून मागून घेतला.

**इंग्रजांना युद्धांत मदत.**—या तहानें गायकवाडाचें सैन्य कमी केलें गेल्याबद्दल जरी फत्तेसिंहास वैषम्य वाटत होतें तरी त्यानें १८१७ च्या अखेरीस इंग्रजांचें पेशव्यांशीं व नागपुरकर भोसल्यांशीं जें युद्ध उपस्थित झालें त्यांत मदत करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. यावेळीं इंग्रजांचें बरेंच सैन्य पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्यात गुंतलें होतें. त्यांत पुन्हा त्याचें शिंद्यांशीं सूत नसून मल्हारराव होळकराच्या दरबारांतील एक पक्षहि त्यांच्या विरुद्ध होता. यामुळें इंग्रजांस गायकवाडाकडून जी कांहीं मदत मिळेल ती हवीच होती. नुकत्याच झालेल्या तहाप्रमाणें फत्तेसिंहानें इंग्रजांची कुमकी फौज तर तावडतोब वाढविलीच, पण शिवाय त्यानें आपल्या एका सरदारास बरोबर २००० सैन्य देऊन त्यास इंग्रज अधिकाऱ्यांबरोबर माळव्यांतील मोहिमींत पाठविलें व पुढें इंग्रजांनीं या सैन्यापैकीं २०० स्वार कोंकणांतील मोहिमींत पाठविण्याविषयीं विनंति केली तेव्हां त्यानें तिलाहि आपली संमति दिली. माळव्यांतील या युद्धांत गायकवाडास फार खर्च येऊन १८१२ पासून संस्थान कर्जमुक्त होतें तें पुन्हा कर्जबाजारी झालें. या मदतीबद्दल गायकवाडास इंग्रजांनीं नवीन मुलूख वगैरे कांहीं दिला नाहीं. या युद्धापासून त्यांना जो कांहीं फायदा झाला तो इतकाच कीं, पेशव्यांची सत्ता अस्तित्वात असती तर त्यांना पेशव्यांना जे ४ लक्ष रुपये खंडणी म्हणून द्यावे लागले असते ते आतां द्यावे लागणार नव्हते.

**फत्तेसिंहाचा मृत्यु.**—२३ जून १८१८ रोजीं फत्तेसिंह मरण पावला. आनंदरावानंतर बडोद्याच्या गादीचा वारस त्याचा १९ वर्षांचा धाकटा भाऊ सयाजी हा असून शिवाय तो स्वभावानें शांत पण चलाखहि होता म्हणून संस्थानांतील कित्येक लोक सयाजीच्या नेमणुकीविरुद्ध होते तरी इंग्रजांनीं त्याचीच बाजू घेऊन फत्तेसिंहानंतर त्यास राजप्रतिनिधि नेमलें. पण सयाजी हा स्वतंत्र विचाराचा माणूस होता. १८१७ सालीं झालेल्या तहामध्यें असं एक कलम होतें कीं, इंग्रजांना बाहेर कोठें युद्धास जावें लागलें तर गायकवाडानीं त्यास मदत करावी व तिजबद्दल त्यांना युद्धापासून झालेल्या फायद्याचा हिस्सा मिळेल. या कलमाच्या

आधारावर सयाजीराव इंग्रजांपासून त्यांना मागील युद्धांत जो मुलूख मिळाला त्यांतील हिस्सा मागूं लागला. इंग्रजांना वाटत होतें कीं, गायकवाडांस आपल्यापासून अगोदरच फार फायदा झाला असल्यामुळें त्यास नवीन मुलूख देण्याची गरज नाहीं.

या व दुसऱ्या एका प्रश्नाचा विचार करण्यास व अंतर्गत भानगडीचा निकाल लावण्यास गव्हर्नर एलफिन्स्टस बडोद्यास येणार तोंच २ आक्टोबर १८१९ रोजीं आनंदराव मृत्यु पावला. मरणसमयीं त्याचें वय पंचावन्न वर्षांचें होतें.

[ संदर्भ ग्रंथः—ग्रांटडफ; मुंबई गॅझेटियर-बडोदें; रूलर्स ऑफ बरोडा ( एज्युकेशन सोसायटीज प्रेस, भायकला, येथें १८७९ साली छापलेलें ) ].

**आनंदराव धुळप**—याच्या घराण्याचें मूळचें उपनाम मोरे असून शिवाजीनें जावळी येथें ज्या मोरे घराण्याची धूळधाण केली तें हेंच होय. जावळीच्या झटापटींत ज्या त्रिवर्गांचा शेवट झाला त्यापैकीं हणमंतराव हा आनंदरावाचा पूर्वज होता. जावळीहून हाकालपट्टी झाल्यावर याचे पूर्वज स्वसंरक्षणार्थ विजापूर दरबारी येऊन राहिले व तेथें त्यांनीं समशेर गाजविल्यामुळें त्यांस धुळप हा बहुमानाचा किताब मिळाला. पुढें शिवाजीच्या भीतीनें हणमंतरावाचे वंशज घवडे बंदरीं जाऊन राहिले इ. स. १७६४ मध्यें आनंदराव ह्या दर्यायुद्धांत नाणावलेल्या गृहस्थाकडे मराठ्यांच्या आरमाराचें आधिपत्य आलें. आनंदराव हा इ. स. १७९४ पर्यंत सुभे आरमाराचा प्रामुख्यानें कारभार आटपीत असे. पेशवाई नष्ट झाल्यावर त्याच्या वंशजास इंग्रजांनीं पोलिटिकल पेनशन करून दिली ( भा. इ. सं. मं. अहवाल शके १८३३ पृ ११५). पेशव्यांच्या डायरींत आनंदराव यांच्या नावचा आरमाराकडील सरदार म्हणून पहिला हुकूम आढळतो. त्याची तारीख ३० सप्टेंबर इसवी सन १७६४ (रबिलाखर ४ खमस सितैन मया व अलफ) ही आहे. त्याच्या हाताखालीं बाळाजी हरि यास आरमाराकडील अमीन म्हणून व जगन्नाथ नारायण यास आरमाराचा कारभारी म्हणून नेमलें होतें ( थो. मा. पेशव्यांची रोजनिशी, भाग १, पृ. ३४२ ). यांची कर्तबगारी इ. स. १७६७।६८ दिसून आली. कारण त्याच रोजनिशींत पुढें सालगुदस्ता आरमाराकडील लोकांनी हैदराशीं झालेल्या लढाईत कामकाज चांगलें केल्यावरून आरमाराच्या शिलकेंतून ४२५० रुपये बक्षीस वाटण्याचा ६ रबिलाखर, समान सितैन मया व अलफ रोजाचा आनंदराव धुळप यांस हुकूम आहे. माधवरावाच्या मृत्यूनंतर व नारायणरावाच्या वधानंतर पेशवाईत होणाऱ्या खळबळीमुळें आपले हातपाय पसरण्यास योग्य संधि आहे असें इंग्रजास वाटून त्यांनीं वसईसाठीं घेण्याची मसलत केली,तेव्हां मुंबईकडे मराठ्यास डोळा फिरवावा लागला. इ. स. १७७४ मध्यें आनंदराव धुळप आरमार घेऊन रेवदंड्याच्या बारावर आल्याचें कळल्यावरून त्यानें व रघूजी आंग्रे यांनीं एकत्र मुंबईच्या शहरांत जाऊन शहर लुटून फस्त करावें व नंतर साष्टीस इंग्रज बसला आहे त्याचें पारिपत्य करावें, असा पेशव्यांचा ता.२१-१२-१७७४ ( १७ सवाल ) रोजीं हुकूम सुटला ( भा. इ. सं. मं. अहवाल शके १८३३ पृ. ११८ ). आनंदरावाला आपली पुरी कर्तबगारी दाखविण्यास १७८१ नंतर संधि मिळाली. आनंदरावाचा हाताखालील सरदाराशीं बेबनाव उत्पन्न होऊन सरकारी कामास हरकत होऊं लागल्यामुळें दरखदारास परत बोलावण्यांत येऊन आरमाराचा कारभार सर्वस्वीं आनंदरावाकडे सोंपविण्यात आला ('५ रमजान इसन्ने समानीन मया व अलफ = २५ आगस्ट १७८१)असें दिसतें. (प. रो )पृ. १९५) वरून दरबारनें आनंदरावास दिलेला जोर चांगला उपयोगी पडला इ स. १७८३ सालीं त्यानें इंग्रजांविरुद्ध मोठा जय मिळविला (छ ५ जमादिलावली) इंग्रजांची एक लढवई दुधोशी बोट एक बतेला व व तीन शिबाड अशीं पाच गलबतें, सरंजाम, दारूगोळा व गाडद भरून कर्नाटकाकडे जात असता रत्नागिरीनजीक आनंदराव धुळपाच्या आरमाराची व त्याची दोन प्रहर लढाई झाली इंग्रजांचा पराभव होऊन सर्व गलबतें पाडाव केलीं. या लढाईत इंग्रजाकडील तीस पसतीस गोरे इसम धरून सुमारें चारशेंपर्यंत लोक मराठ्यांच्या हातीं लागले. मराठ्याकडील आठ बरे बरे आसामी ठार व पाऊणशें माणूस जखमी झालें व इंग्रजाकडील एक कप्तान व पंचवीस आसामी ठार व कित्येक जखमी झाले.या बहादुरीबद्दल पेशव्यांनीं ता २५ मे स. १७८३ (शके १७०५चैत्र व. ९;२२ जमादिलावल सुरू सलास समानीन मया व अलफ ) रोजीं आनंदरावास 'बहुमान खासगीचा पोषाख व कंठी' देऊन शाबासकीचें पत्र पाठविलें तें उपलब्ध आहे ( भा. इ. सं मं. अहवाल शके १८३३ पृ १२० ).

**आनंदराव पवार,१ पहिला** ( इ. स. १७२८-३६)—धार संस्थानचा मूळ उत्पादक जो उदाजी पवार त्याचा धाकटा भाऊ. याचा बाप सुपेकर संभाजी बुवाजी. 'विश्वासराव' यानें जिंजीच्या वेढ्यात पराक्रम केल्यावरून त्यास रामचंद्रपंत अमात्यानें योग्यतेस चढविलें, व पुढें हा व याचे बंधू शाहूपाशीं उदयास आले. इ. स. १७२८ च्या सुमारास बाजीरावाचें व उदाजीचें वांकडें आल्यामुळें बाजीरावानें उदाजीस कैदेंत ठेवून आनंदरावास धारेस नेमिलें असें रियासतकार म्हणतात ( मध्यभाग पृ. ३८० ). तथापि पुढें तीन वर्षांनीं बाजीराव व त्रिंबकराव दाभाडे यांच्या मध्यें वैमनस्य आलें तेव्हां आनंदराव दाभाड्याच्या पक्षास मिळाला व ता. १ एप्रिल सन १७३१ रोजीं डभई नजीक झालेल्या लढाईत दाभाड्याच्या बाजूनें लढत असतां जखमी झाला. बाजीरावानें माळवा प्रांतांतील देशमुख देशपांड्यांस ता. ६ आगस्ट सन १७३६ रोजीं काढलेलें एक आज्ञापत्र उपलब्ध आहे त्यावरून व महलोई दप्तरांतील एका पत्रावरून रियासतकारानी इ. स. १७३६ हा आनंदरावाचा

मृत्युकाल ठरविलेला आहे. उलटपक्षी ग्रांटडफ यानें मराठी कागदपत्राच्या आधारावर असें नमूद केलें आहे कीं इ. स. १७४२ च्या पावसाळ्यांत बाजीरावाचा नर्मदातीरीं मुक्काम होता तेव्हां त्यानें आनंदरावाची वसईच्या लढाईनंतर प्रथमच भेट घेऊन त्याच्याकडे धार व तिच्या आसमंतातील मुलूख कायम केला (पु. २,पृ.९). इतकेंच नव्हे तर इ.स. १७५०च्या सुमारास देखील आनंदराव हयातच होता. असा ग्रांटडफचा समज झालेला दिसतो (पु. २, पृ. ४० पहा).

आनंदरावास यशवंतराव व रायाजी असे दोन पुत्र असून (पानिपत प्रकरण) त्यांपैकीं यशवंतराव हा आनंदरावामागून धारचा अधिकारी झाला व रायाजीस महाराष्ट्रात सरंजामी उत्पन्न नेमणूक मिळाली. पेशव्यांची रोजनिशी ४, पृ. २८३ वरून या आनंदरावास मैनाबाई नांवाची स्त्री असून ती त्याच्या मागून बरींच वर्षें म्हणजे सवाई माधवरावाच्या कारकीर्दीपर्यंत जिवंत होती असें दिसतें.

२ दुसरा, (१७८०-१८०५)—धारचा खंडेराव पवार यास गोविंदराव गायकवाडाची कन्या मैनाबाई हिच्या पासून झालेला पुत्र यास खंडेरावामागून इ. स. १७८०मध्यें धारचा अधिकार प्राप्त झाला. त्यावेळीं हा केवळ अर्भक असल्यामुळें वय त येईपर्यंत याचें संगोपन याच्या आजोळीं गायकवाडाच्या घरीं झालें यांच्या गायकवाड घराण्याशीं असलेल्या संबंधामुळें, गोविंदरावाच्या मृत्यूनंतर बडोद्यास अराजकता माजली तेव्हा गायकवाडाच्या घराण्यातील असंतुष्ट मंडळी धार संस्थानच्या आश्रयास आली, व आनंदरावास पुढें करून गायकवाडाच्या राज्यांत बखेडा उपस्थित करण्याचाहि प्रयत्न करण्यात आला. यास मैनाबाई नांवाची स्त्री असून रामचंद्रराव नांवाचा एक पुत्र होता (धार पहा).

**आनंदराव रास्ते**—याच्या वडिलाचें नांव भिकाजी शामजी गोसले असें असून शाहूनें भिकाजीपंतास त्याची सचोटी पाहून त्याचें पूर्वीचें 'रसदे' हें पद मोडून रास्ते म्हणजे रास्त वागणारे हें नाव दिल्यापासून त्याचें घराणें त्याच नांवानें प्रसिद्धीस आलें. नानासाहेब पेशव्याची स्त्री गोपिकाबाई ही याची सख्खी बहीण होती. याचा ज्येष्ठ बंधु मल्हारराव मृत्यु पावल्यानंतर गणपतराव नावाचा आनंदरावाहून वडील भाऊ हयात असता आनंदरावाच्या कर्तृत्वावर सरकारची मेहेर होऊन त्याच्या नावें सरदारी करून दिली (कैफियती व यादी) नारायणरावाचा वध झाला तेव्हा हा पेशव्यातर्फे कर्नाटक प्रांतात अधिकारी होता (भा. इ. सं. मं. संमेलनवृत्त शके १८३७). पुण्यास असलेली रास्त्याची पेठ या आनंदरावानेंच वसविलेली असून, तिच्याकरितां आनंदरावास नागझरीपलीकडे पावणे पंचवीस बिघे एक पांढ जमीन देण्याविषयी पेशव्यांकडून ता. ७ डिसेंबर १७८५ रोजीं हुकूम झाला (पेशव्यांची रोजनिशी ८. पृ. ३५५).

आनंदराव मरण पावल्यावर किल्ले पाडवगड सरंजामाचे गावसुद्धां आनंदरावाच्या निसबतीस होता तो सरकारात जप्त करून बाजीरावानें त्याची कमावीस ता. १ एप्रिल स. १८०१ रोजीं बाळाजी कुंजर यास सांगितली (पेशव्यांची रोजनिशी ५ पृ. ९८).

आनंदराव यास महिपतराव म्हणून पुत्र होता. पण तो मृत्यु पावल्यामुळें अरबीसन ११९५ (इ. स. १७९४–९५) सालीं वडील भाऊ गणपतराव याचा–कनिष्ठ पुत्र माधवराव यास त्यानें दत्तक घेतलें (पंत प्रधान यांची दुसरी शकावली).

**आनंदवर्धन**—(८५०)– 'अलंकार' या विषयावर लिहिणारा काश्मीरचा लेखक. आनंदवर्धन, मुक्ताकण आणि शिवस्वामी असे तिघेहि ग्रंथकार अवंतिवर्मनाच्या कारकीर्दीत (८५४–८८३) प्रसिद्धीस आले होते असें कल्हण म्हणतो (राजतरंगिणी ५.३४). परंतु आनंदवर्धनाचा काल यानंतरचाहि असूं शकेल, कारण अभिनवगुप्ताच्या 'लोचन' या ग्रंथामध्यें मनोरथ हा आनंदवर्धनाचा समकालीन होता असें सांगितलें आहे. आनंदवर्धनाचे प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे, अर्जुनचरित, दीनाक्रंदनस्तोत्र, देवीशतक, ध्वन्यालोक किंवा हृदयालोक आणि विषमबाणलीला हे होत. यांपैकीं ध्वन्यालोक हा अलंकारशास्त्रात प्रमाणभूत मानलेला सुप्रसिद्ध ग्रंथ होय.

**आनंदवल्ली**—(मुंबई इलाखा नासिक जिल्हा.) आनंदवल्ली हें ठिकाण नासिकच्या पश्चिमेस तीन मैलावर असून तेथून गोदावरीचा रमणीय प्रवाह अगदीं नजिक वहात आहे. आनंदवल्ली हें एक लहानसें खेडें असून, त्याचें पूर्वीचें नाव मौजे चावंडस असें होतें. तेथे प्रथमतः रघुनाथराव उर्फ राघोबादादा पेशवे हे इ. स. १७६४ मध्यें आपले पुतणे थोरले माधवराव साहेब पेशवे याच्याशीं रुसवा करून जाऊन राहिले. त्यावेळीं श्रीमंत गोपिकाबाईसाहेब ह्या गंगापुरास रहात होत्या. इ. स. १७६४ च्या डिसेंबर महिन्यांत केसो गोविंद याची चावंडस उर्फ आनंदवल्ली येथील कारभारावर नेमणूक झाली. केसो गोविंद यास बंदोबस्तासाठीं पन्नास स्वार व पन्नास प्यादे दिले असून, त्याजकडे कारखाने, इमारतींचेंहि काम सांगितलें होतें. यावरून इ. स. १७६४ पासून चावंडस हें ठिकाण अरमराटीस आलें असें दिसतें. चावंडस येथे मोठा तटबंदी वाडा वगैरे तयार होऊन त्यास किल्ल्याचें स्वरूप प्राप्त झालें. येथे तारीख २ ऑगस्ट इ. स. १७६४ रोजीं श्री. रघुनाथराव पेशवे यांची स्त्री आनंदीबाई यास प्रथम पुत्ररत्न प्राप्त झालें. अर्थात येथील वास आनंददायक झाला, म्हणून, या किल्ल्यास आनंदीबाईनें 'आनंदवल्ली' असें नाव दिलें, अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे, व कागदपत्रावरून पाहिलें असतांहि तीस पुष्टि येते. येथील कारभारी केसो गोविंद यास दिलेल्या छ ३० जमादिलाखर खमस सितैन रुपया व अर्पण म्हणजे ता. २४

डिसेंबर इ स १७६४ च्या सनदेमध्यें "तुम्हास चावद गेस कारमाराम ठेविलें आहे." असा उल्लेख आहे, व छ १ जमादिलाखर सीत सितैन मया अलफ म्हणजे ता १५ नोव्हेंबर इ स १७६५ च्या सनदेमध्यें "आनदवल्ली येथें तुम्हास नद्दर्मी ठेविलें आहे त्यांस तेथील बदोबस्ताची कलमें" असा दुसरा उल्लेख आहे यावरून इ स १७६४ नतर व इ स १७६५ मध्यें 'आनंदवल्ली' हें नांव अस्तित्वात आलें असें दिसून येतें

आनदवल्ली येथें रघुनाथराव पेशवे हे इ स १७६५ पासून इ स. १७६८ पर्यंत मधून मधून राहिले होते येथेंच त्यांनीं आनंदीबाईच्या सल्ल्यानें पेशवाईची गादी घेण्याकरितां अनेक राजकारस्थानें केलीं, आणि १५००० सैन्य जमवून घोडपपर्यंत चाल केली परतु थोरले माधवराव पेशवे यांनीं घोडपवर स्वारी करून त्याच्या सैन्याचा पराभव केला व त्यांनां कैद करून पुण्यास नेलें इ स १७६८ च्या जून महिन्यात चावडस उर्फ आनंदवल्ली येथील ठाणें श्री दादासाहेब यांच्याकडे दिल्याचा उल्लेख सापडतो दादासाहेब वारल्यानतर पुढें आनदीबाईची प्रकृति नादुरुस्त झाली, तेव्हा तिनें नाना फडणीस यांजकडे, आनदवल्लीस हवा बदल करण्यासाठीं पाठवावें म्हणून, लक्ष्मणभट उपाध्ये याच्या मार्फत पुष्कळ खटपट केली नाना फडणीस यांनीं आनदीबाईच्या विनंतीस मान देऊन, तिला सर्व सरंजामासह इ स १७९२ मध्यें कोपर गांवाहून आनंदवल्ली येथें पाठविलें परतु तिचा वास तेथें फार दिवस झाला नाहीं सुमारें दोन वर्षांनीं म्हणजे इ स १७९४ मध्यें तिचा आनदवल्ली येथें शेवट झाला तीं मृत्यु पावल्यानंतर बाजीराव चिमणाजीआपा व अमृतराव इ स १७९५ पर्यंत आनदवल्ली येथेंच बंदिवा सात होते परंतु त्यांनीं गुप्त राजकारणें केल्यावरून नाना फडणिसांनीं त्यास इ स १७९५ मध्यें जुन्नरच्या किल्ल्यांत नेऊन कैदेंत ठेविलें यानतर आनदवल्लीचें सव वैभव व महत्त्व नष्ट होत जाऊन, तेथील भव्य राजवाडा व किल्ला आजमितीस रसातळास गेला आहे तेथील पडक्या भिंती व तोफांचा मार सहन केलेला एक प्रचंड दरवाजा मात्र अद्यापि अस्तित्वात आहे [इतिहास संग्रह पु ६ मुं ग पु १६ आंटडफचा इतिहास]

**आनंदीबाई (डॉ जोशी)**—परदेशातून शिकून आलेली पहिली महाराष्ट्र महिला आनंदीबाई यांचा जन्म पुणें येथें शके १७८७ चैत्र शुद्ध ९ रोजीं झाला यांच्या वडिलांचें नांव गणपतराव अमृतेश्वर केतकर (जोशी) ते कल्याणचे इनामदार होते आनंदीबाईचें बाळपण बापाच्या घरीं कल्याणासच गेल लहानपणीं त्या फार हूड व खेळकर अशा असल्यामुळें, त्यांच्याकडून म्हणण्यासारखा लिहिण्या वाचण्याचा अभ्यास झाला नाहीं त्यांचें माहेरचें नाव यमुना होतें आनदीबाईचा विवाह त्यांच्या वयाच्या दहाव्या वर्षी, त्यावेळीं ठाण्यास पोस्टमास्तरच्या हुद्यावर असलेले रा रा गोपाळ विनायक जोशी सगमनेरकर यांच्याशीं झाला गेल्या शतकाच्या अखेरीस पुण्यास माजलेल्या पंचहौदमिशन चहाप्रकरणाच्या मुद्याशीं हेच गोपाळराव असून, त्या काळीं महाराष्ट्रात एक विचित्र व्यक्ति म्हणून यांचें नांव सर्वतोमुखीं असे गोपाळरावांचें हें द्वितीय कुटुंब त्यांनीं मात्र आपल्या पत्नीच्या विद्याभ्यासाकडे पहिल्यापासून फारच लक्ष दिलें आणि शेवटीं तें त्यांनें शिक्षण त्यांनीं अनेक प्रकारच्या गैरसोयी, मोठाले खर्च आणि लोकापवाद हीं सर्व सहन करून पूर्णत्वास नेलें

सौ आनंदीबाई ह्या आत्या बुद्धिमती होत्या गोपाळराव हे नोकरीच्या संबंधानें ठाण्याहून अलीबाग, कोल्हापूर, मुंबई, भुज, कलकत्ता वगैरे दूरदूरच्या ठिकाणीं फिरले, व त्या प्रत्येक ठिकाणीं सौ आनंदीबाई ह्या बरोबर असून तेथें तेथें त्यांचा अभ्यास गोपाळरावजींच्या शिक्षणा खालीं अव्याहत चालला होता मध्यंतरी आनंदीबाईंना तीन अपत्यें झालीं परतु त्यांतील एकहि वाचलें नाहीं गोपाळरावजींचा आपल्या पत्नीला परदेशांत पाठवून डाक्टरी शिक्षण देवविण्याचा फार हेतु होता, त्यासाठीं ते सुमारे सात आठ वर्षांपासून आपली परदेशगमनाची कांहीं तरी सोय व्हावी म्हणून प्रयत्न करीत होते शेवटीं अमेरिकेंतील न्यूजर्सीपैकीं रोझेल नांवाच्या गांवीं असणाऱ्या एका मिसेस कार्पेटर नावाच्या बाईशीं गोपाळरावांचा पत्रव्यवहार सुरू होऊन, तिचें त्यांना पूर्ण मत मिळालें कीं, तुम्ही आपल्या पत्नीसह अमेरिकेंत यावें, आम्ही तुमचा यथाशक्ति सर्व प्रकारें समाचार घेऊ व तुमचे इष्ट हेतु सफळ करण्यास मदत करू मिसेस कार्पेटर या थोर व उदार बाईच्या पत्र व्यवहारावरून गोपाळरावजींनीं आपल्या बायकोस अमेरिकेस पाठविण्याचा निश्चय केला पहिल्यानें त्याचा उभयतां चाहि तिकडे जाण्याचा विचार होता, परंतु त्यांच्याजवळ दोघांच्या प्रवासापुरता पैसा शिल्लक नसल्यामुळें त्यांनीं एकट्या आनदीबाईनाच पाठविण्याचा निश्चय केला ह्या परदेशप्रवासाला एक महाराष्ट्रीय ब्राह्मण स्त्री एकटीच जाणार आहे अशी बगालातल्या वर्तमानपत्रात बातमी प्रसिद्ध होऊन लोक आश्चर्यचकित झाले, व तेव्हा लोकांचे अनेक सहाय मिळू लागले असें पाहून आनंदीबाईनीं श्रीरामपूर येथील कॉलेजांत एके दिवशीं एक सुंदर इंग्रजी व्याख्यान दिलें त्या व्याख्यानात त्यांनीं, आपण अमेरिकेस कां जाते? व तीहि एकटीच कां जाते? लोकापवादाची भीति आपण कां बाळगूं नये? आणि मी हिंदु व ब्राह्मण म्हणून अमेरिकेस इतक्या दूर परदेशांत जात आहे तशीच मी हिंदु आणि ब्राह्मण या स्थितींत परत माघारी येणें संभाव्य आहे कीं नाहीं? इत्यादि मुद्याच्या गोष्टींवर उत्तररूप असें उत्कृष्ट प्रतिपादन केलें यावेळीं गोपाळराव श्रीरामपुरासच पोस्टमास्तर होते

१८८३ च्या एप्रिल महिन्यात आनंदीबाई ह्या कलकत्त्याहून आगबोट मार्गानें निघाल्या. त्या अमेरिकेस आपल्या इच्छित स्थळीं, न्यूजर्सीपैकीं रोझेल येथें कार्पेटर कुटुंबात जाऊन पोंचल्या तेथें त्या कुटुंबातील सर्व मनुष्यांनीं आनंदीबाईचें उत्तम प्रकारें व मोठ्या प्रेमानें स्वागत केलं व आता तुम्हाला कोणत्याहि प्रकारचा कमीपणा वाटणार नाहीं असें त्यास सांगितलें त्या कुटुंबातील मुख्य बाई जी मिसेस कार्पेटर तिला तर आनंदीबाई मावशी या नावानें हाक मारीत असत. त्यानीं फिलाडेल्फिया येथील स्त्रियाच्या वैद्यकीय पाठशाळेंत जाऊन शिकण्याची सर्व योजना केली, आनंदीबाईची हुशारी आणि त्याचें विद्याव्यासंग बघून तेथील युनिव्हर्सिटीनें त्यास त्यांच्या निर्वाहापुरती एक स्कॉलर्शिप दिली आणि त्याचा तेथें उत्तम प्रकारें अभ्यास चालण्यास कोणत्याहि प्रकारची अडचण राहिली नाहीं

पुढें गोपाळराव ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान वगैरे एशियाखंडांतील पूर्वेकडील देश पहात पहात सानफ्रान्सिस्को मधून अमेरिकेमध्यें प्रविष्ट झाले, व आपल्या अभ्यासमग्न पत्नीला भेटण्यासाठीं ते आपल्या 'मावससासरीं' दाखल झाले तों आनंदीबाईचाहि तीन वर्षांच्या मुदतीचा नियमित अभ्यास पूर्ण होऊन त्याची डाक्टरची शेवटची परीक्षा होण्याचे दिवस अगदीं जवळ आले होते आनंदीबाईची ही एम. डी म्हणजे 'डाक्टर ऑफ मेडिसिन' ( वैद्यशास्त्रपारंगत ) ची परीक्षा होती व हीच शेवटची परीक्षा होती. ती त्यांनीं दिली व त्यात त्यास यश मिळालें त्यांच्या पदवीदानाबद्दलची जी मोठी विद्वत्सभा भरली होती त्या सभेमध्यें गोपाळराव जोशीहि हजर होते. त्याचप्रमाणें इंग्लंडातून प्रसिद्ध पंडिता रमाबाईहि मुद्दाम आपल्या ह्या देशभगिनीच्या सन्मानप्रेक्षणास हजर झाल्या होत्या. मोठ्या समारंभानें 'उईमेन्स मेडिकल कॉलेज फिलाडेल्फिया' या संस्थेच्या चान्सेलरानें, आनंदीबाईच्याविषयीं तेथें जमलेल्या लोकास माहिती कळवून, त्यांच्या विद्वत्तेची फार प्रशंसा केली, आणि त्यास एम डी. पदवीचा डिप्लोमा दिला

सौ आनंदीबाई ह्या डाक्टरीच्या परीक्षेंत उतरल्याचें वर्तमान हिंदुस्थानात प्रसिद्ध होताच, इकडे, कोल्हापुरास आबासाहेब कागलकर यांनीं स्त्रियांकरिता इस्पितळ बांधण्याचें ठरविलें होतें, त्या इस्पितळावर डॉक्टर आनंदीबाईची ३५० रुपये दरमहावर नेमणूक केली. ही नेमणूक पतकरून ह्या सौ आनंदीबाई ह्या आपल्या नवऱ्याबरोबर हिंदुस्थानात येण्यास निघाल्या. वाटेंत त्यांची तब्येत शैत्यानें ज्यास्त बिघडून त्या हिंदुस्थानात येऊन पोंचतात तों त्यांच्या वर त्या रोगानें आपला बराच पगडा बसविला आणि त्याचें तें शैत्याचें दुखणें क्षयावर गेलें, असें त्यास मुंबई येथें आल्यावर तेथील डाक्टरांकडून कळलें त्या मुंबईस ता. १६ नोव्हेंबर सन १८८६ रोजीं आल्या अनेक वैद्यांचीं व डॉक्टरांचीं औषधें वगैरे झालीं, परंतु त्यापासून त्यांना यत्किंचितहि गुण न येता, अखेरीस त्याचा ता २७ फेब्रुवारी १८८७ म्हणजे फाल्गुन शुद्ध ४ रविवार, शके १८०८ रोजीं, पहाटे दोन वाजता अंत झाला मरणकाली डॉ. आनंदीबाईचें वय अवघें २१ वर्षें आणि ११ महिन्याचें होतें ! 'आनंदीबाईनें हिंदु स्त्रीसमाजाच्या खऱ्या खऱ्या यातनांचें निवारण करण्याकरिता आपलें आयुष्य, आपली बुद्धि व आपलें सर्वस्व खर्ची घालण्याचा निश्चय केला...स्वधर्म, स्वाचार व स्वरूढी याचा योजनसहस्राच्या किंवा अर्धभूगोलाच्या अंतरावरहि अल्पमात्र त्याग केला नाहीं...आनंदीबाईची मूर्ति शातपणें सर्व कुलीन स्त्रीपुरुषाच्या हृदयांत निरतर वास करील तिच्या यश पटाचा नाद हिंदुत्व आहे तोंपर्यंत त्यांच्या कानास सुख देईल' अशी केसरीसारख्या पुराणमताभिमानी पत्रानेंहि आनंदीबाईची प्रशंसा केली आहे ( २९ मार्च १८८७ ) आनंदीबाईच्या ठायीं देशाभिमान तीव्रतेनें वागत होता, हें त्यांच्या पत्रावरून दिसतें त्याचें चरित्र श्री काशीबाई कानिटकर यांनीं लिहिलें आहे. या चरित्रासारखा सुंदर चरित्रग्रंथ मराठींत दुसरा अजून झाला नाहीं

**आनंदीबाई (पेशवे)**—राघोबादादा उर्फ रघुनाथराव पेशवे याचें सुप्रसिद्ध द्वितीय कुटुंब ही राघो महादेव ओक मळणकर याची कन्या असून हिचें लग्न तारीख १७ डिसेंबर १७५५ रोजीं कृष्णातीरीं गलगलें येथें स्वारींत झालें ही मराठ्याच्या इतिहासात कारस्थानी स्त्री म्हणून प्रसिद्ध आहे तिचें राघोबावर बरेंच वजन असून तो राजकारणातहि तिच्या सल्ल्याप्रमाणें चालत होता असें दिसतें. थोरला माधवराव मरण पावल्यावर सातारच्या महाराजापासून नारायणरावाकरिता पेशवाईची वस्त्रें आणण्यास नारायणरावाबरोबर जातेवेळीं राघोबादादा पंचवीस लक्षाच्या सरंजामाकरिता अडून बसला होता पण आनंदीबाईनें 'सरंजाम घेण्याऐवजीं नारायणराव म्हणतो त्याप्रमाणें स्वत:च वडीलपणानें कारभार करावा' असा राघोबास सल्ला दिल्यावरून तो हट्ट सोडून नारायणरावाबरोबर गेला ( ऐ. ले सं. 'भाग ४, पृ. १९६८ ) तथापि आनंदीबाई मोठी कारस्थानी स्त्री आहे असा नारायणरावाचा पक्का ग्रह झालेला असून तिच्या हालचालीवर त्यानें करडी नजर ठेविली होती असें दिसतें. नागपूरकर भोंसल्याच्या बखरींत ( पृ. ९३ ) तर असें म्हटलें आहे कीं, 'नारायणरावानें तिचे लुगड्यात फंदाचे कागद लपविलें म्हणून लुगडे फेडून छळणा करावी.' नारायणरावाचा वध 'ध' चा 'मा' करून हिनेंच केला असा तत्कालीनाचा दृढ समज होता असें पाडुरंग नामक कवीचें नारायणरावाच्या वधावरील काव्य इतिहाससंग्रहात ( मार्च १९१० ) प्रसिद्ध झालें आहे त्यावरून स्पष्ट होतें. आपल्यावरील हा आरोप स्वत आनंदीबाईहि जाणून होती असें इतिहाससंग्रहात छापलेल्या (पु ६, अं ४, ५, ६) मेणवली दप्तरातील एका पत्रावरून

कळतें तथापि त्याच पत्रावरून नाना फडणीस आदिकरून मडळींस तिच्या अपराधाचें माप तिच्या पदरांत घालण्याइतका स्पष्ट पुरावा मिळाला नव्हता अशीहि शंका उत्पन्न होते राघोबादादाचें अस्सल पत्र रामशास्त्र्यांच्या हातीं पडलें (ग्राटडफ) त्यावरून 'ध' चा 'मा' झाला होता हें जरी सिद्ध झालें असलें तरी तो कोणी केला हें त्यास गूढच राहिलें असावें

नाना फडणिसानें तुळ्या पवाराची जबानी घेतली तींतहि आनंदीबाईचें नाव पुढें आलें नव्हतें (इ स वर्ष १ अं ९) नारायणरावाच्या वधानंतर गंगाबाई सती जाऊं लागली तेव्हा आनंदीबाईनें 'जातीस कुठें तुझी पाळी चुकली आहे' असें म्हटलें असल्याचा हरिवंशाच्या बखरींत (कलम ७२) उल्लेख आहे, पण ज्या आनंदीबाईनें गंगाबाई गरोदर आहे असें मानूनहि तिच्या सहगमनास हरकत केली तीच पुढें गंगाबाईचा गर्भपात करण्याचा प्रयत्न करीत आहे अशी नाना फडणिसाच्या पक्षाच्या मंडळीस शंका येऊं लागली हा शंका परशुरामभाऊनें वामनरावास लिहिलेल्या एका पत्रांत व्यक्त केलेला सापडते (अधिकारयोग प १०) बारभाईनीं कारस्थान करून राघोबादादाविरुद्ध कट केला तरी आनंदीबाईची नाना फडणीस व सखारामबापू यास साळसूदपणें पत्रें जात होतींच १७७४ च्या एप्रिलांत बऱ्हाणपूर मुक्कामाहून आनंदीबाईनें नानास जें पत्र लिहिलें त्यांत तर पुरंदरची सर्द हवा लेकरास मानवणार नाहीं' अशी सवाई माधवरावाबद्दल काळजी व्यक्त केली आहे आनंदीबाई गरोदर असल्यामुळें १७७५ मध्यें राघोबादादा तीन मार्गे धार येथें ठेवून इग्रजांची कुमक घेण्यास गेला तेव्हा हि आनंदीबाईचें राघोबादादाच्या राजकारणांत लक्ष होतेंच १७७५ च्या फेब्रुवारींत लिहिलेल्या एका पत्रांत तिनें फितुरी लोकांबद्दल काळजी घेण्याविषयीं सखाराम हरि वगैरे मंडळीस बजावलें आहे त्याचप्रमाणें पुढें चार महिन्यांनीं सखाराम हरि तिच्या नवऱ्याप्रीत्यर्थ लढताना जखमी झाला तेव्हा त्यास तिनें ममतापूर्वक उत्तेजनपर लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे (इ स. पु १, अ १२) पुढें १७७५ मध्यें आनंदीबाईस धारच्या किल्ल्यातच अटकेंत ठेवण्यांत आलें येथून इ स १७७८ च्या सप्टेंबर महिन्यांत तिनें नानाफडणिसास लिहिलेल्या पत्रांतील "हल्लीं यवनाक्रांत ब्राह्मणी दौलत फितुरानीं होऊं पाहते तुमच्या चित्तांतील उमेद आद्याप जात नाहीं. आम्ही येथें तुमच्या स्वाधीन पावणेदोन वर्षें जाहाली कार्यसिद्धि तुमची काहींच न जाहाली नुकसान पाच हजार फौजेच, सरंजामी गुंतले, ही झाली विशेष काहींच न झालें तुमची फौज गुतुन आमचा धन्याचे पायासीं वियोग." या वाक्यावरून तिचा गुस्तहीपणा चांगला ध्यानांत येतो (इ स पु १, अंक ४) आनंदीबाईच्या पत्रांत गोंचदारपणाहि बराच आढळतो त्याच दिवशीं लिहिलेल्या सखाराम भगवंताच्या पत्रांत ती नाना फडणिसाच्या नवीन लग्नास उद्देशून लिहिते "नवी भावजय लाडकी केली तिचें नाव काय ठेविलें व दुसरी करावयाची कधीं?" तथापि वरील उपरोधिक वाक्यें लिहिणाऱ्या स्वतः आनंदीबाईच्याच यजमानांनीं सुरतेस येऊन राहिल्यावर तिच्या भिवतपणींच भिकाजीपंत पडशाच्या मथुराबाई नामक कन्येशीं लग्न केलें होतें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे पुढें इग्रजांशीं तह होऊन राघोबादादा मराठ्यांकडे आला तथापि बाजीरावास पेशवाई प्राप्त होईपर्यंत आनंदीबाईस स्वातंत्र्य प्राप्त झालें नाहीं राघोबादादाच्या मृत्यूपर्यंत ती त्यासबरोबर कोंपरगांवास नाना फडणिसाच्या प्रतिबंधांत होती कारभारी मंडळींचें तिच्याशीं वर्तन एकदरींत बरेंच निष्ठुरपणाचें होतेंसें दिसतें काव्येतिहाससग्रहांतील (प. ४९६) एका पत्रांत राघोबादादा मृत्यु पावल्यावर आनंदीबाईच्या अंगावरील सौभाग्यालंकार काढून आणण्यास नानानें ताबडतोब आपला हस्तक कोंपरगांवी पाठविला होता असा उल्लेख आहे आनंदीबाईस शके १७१५ प्रमादी सवत्सर फाल्गुन वद्य ११ स(भा इ स मं वार्षिक इतिवृत्त शके १८३५ घडफळे यादी) म्हणजे ता २७ मार्च १७९४ रोजीं आनंदवली येथें देवाज्ञा झाली. तीस दुर्गाबाई उर्फ गोदूबाई नावाची कन्या (महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, वर्ष ८, पृ १५९ पहा) आणि बाजीराव व चिमणाजीअप्पा असे दोन पुत्र होते.

**आनर्त**—प्राचीन भारतवर्षीय देश हा उत्तर आणि पश्चिम अशा दिशाभेदानें दोन प्रकारचा आढळतो वैवस्वतमनूचा पौत्र व शर्याति राजाचा पुत्र जो आनर्त, त्याच्या नावावरून आनर्त देश प्रसिद्धीस आला अशी कथा आहे महाभारत (२ २६, ११७, ३ १३, ६१०, ८ ७२, २३५०, ५ ८३, २९६४, ६ ९, ३५९, ८ ५, ९६, १४ ५२, १५२५ इ), भागवत (१ १०, ३५, ९ ३, २८, १० ५२, १५ इ), बृहत्सहिता (१४ १७, १६ ३१ इ) या सारख्या प्राचीन ग्रंथातून याचे उल्लेख सापडतात आनर्त हा गुजरायचा एक भाग असे तो उत्तरेकडे असून त्याची राजधानी आनंदपुर किंवा आनर्तपुर (हल्लींचें वडनगर) होती सत्य, त्रेत, द्वापर आणि कलि या चार युगात या शहराचीं नावें अनुक्रमें चमत्कारपुर, आनर्तपुर, आनंदपुर व वृद्धनगर (वडनगर) अशीं पडत गेलीं अशी एक दंतकथा आहे क्षत्रप रुद्रदामन् (इ स. १५०) चा गिरनार येथें जो शिलालेख उपलब्ध आहे, त्यांत जुनागडच्या पहलव सुभेदाराच्या ताब्यांत आनर्त व सुराष्ट्र हे दोन निरनिराळे भाग असल्याचा उल्लेख सांपडतो काहीं पुराणांतून आनर्तांत सुराष्ट्राचा समावेश केलेला असून त्याची राजधानी द्वारका असें म्हटलें आहे. भागवतांत तर द्वारकेलाच आनर्त म्हटलें आहे [गुजरायचा इतिहास–गु गॅ पु १, भा १ प्रा को बृहत्संहिता भागवत महाभारत]

**आनाम**—ही एक भाषा आहे, आणि ही भाषा बोलणारें राष्ट्र आहे कोचीनचीन आणि टाक्विन हीं राज्यें

पूर्वी आनामचा भाग समजत असत. या भाषेविषयीं परिचायक मजकूर पहिल्या विभागच्या १८५ पृष्ठावर सांपडेल. आनाम आणि भोंवतालचा प्रदेश येथील सामाजिक पद्धति आणि राज्यव्यवस्था याचेंहि विवेचन त्याच विभागच्या १९६-१९८ या पृष्ठात दिलें आहे. या प्रदेशात भारतीय व चिनी संस्कृतींचें मिश्रण कसें झालें आहे तें तेथें सविस्तर स्पष्ट केलें आहे. या माहितीशिवाय इतर माहिती फक्त येथें दिली आहे.

लो क व र्ण न.—आनामी लोकांचें स्थानिक नांव "गिओची" असें आहे. या लोकांमधील प्रचलित दंतकथावरून हे लोक पूर्वी चीनच्या दक्षिणभागांत होते. या लोकांचें स्वरूप पुढें मात्र हिंदूसंस्करणानें व मयामांतील हैंवधर्मी चाम लोकांशी शरीरसंबंध झाल्यानें पालटलें आहे. हे मंगोलियन लोकांपेक्षां सर्वांत निकृष्ट बांध्याचे व दिसण्यांत कुरूप आहेत असें वर्णन लोक करतात. चिनी लोकांपेक्षां हे काळे असतात. परंतु कांबोज लोकापेक्षां काळेपणात कमी आहेत. याचे केंस काळे व खरखरीत असतात, त्वचा जाड असते, व कपाळ अरुंद असतें. हे आपले दात काळे करतात आणि विडे फार खातात. त्यांच्या पायांचे आंगठे इतर बोटांपासून अधिक दूर असतात व ही त्यांच्या जातीची विशेष खूण धरण्यास हरकत नाहीं. नाक अत्यंत चपटें असतें मान आंखूड असते व खांदे फारच उतरते असतात. कोचीन-चीन मधील आनामी लोक टोंकिनच्या आनामी लोकांपेक्षा अधिकच दुर्बल व ठेंगणें असतात. पुरुष व स्त्रिया रुंद तुमानी वापरतात, अंगरख्यास बाह्या आखूड वापरतात, पायांत जोडे घालीत नाहींत आणि गवती टोपी वापरतात.

इ ति हा स.—आनाम मधील मूळचे लोक "चाम" जातीचे व हिंदु संस्कृतीचे होते, याना पुढें गिओची (आनामी) लोकांनीं जिंकलें. व आनाम कायम केला. चाम लोकांचें राज्य असतां तेथें संस्कृति चांगल्या प्रकारची होती हें आज तेथील शिल्पांच्या अवशेषावरून उघड होतें. गिओची लोक उत्तर आनाम व टोंकिन येथून आले व ते चिनी वंशाचे होते व त्यांचे प्राचीन राजे चिनी राजघराण्यांतील पुरुष होते असें त्यांचे ऐतिहासिक ग्रंथ म्हणतात. ते दक्षिणेकडे येऊन त्यांनी राज्यस्थापना केव्हां केली हें निश्चयात्मक समजत नाहीं. परंतु प्राचीन राजघराण्याची उचलबांगडी ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकात झालेल्या चिनी स्वारीनें केली आणि स्वारीचा नायक त्या देशाचा राजा बनला. जुनें राजघराणें दोन्हें मधें होतें असें धरून चाललें तर तेथें हिंदु संस्कृति ख्रि. पू. पांचव्या शतकात अधिकारारूढ होती असें होईल. व हिंदूंच्या तेथील वसाहतींचा काल त्याच्याहि पूर्वी जाईल व या हिशेबानें हिंदुस्थानच्या इतिहासकल्पनेची व संस्कृतिप्रसारकल्पनेची पुन्हा उभारणी करावी लागेल. नवीन चीनी राजघराणें बारा शतकें म्हणजे ख्रिस्तोत्तर दहाव्या शतकापर्यंत टिकलें. त्यानंतर हें देश पराणें आलें. हा आनामी लोकांचा स्वातंत्र्याचा काल होय. तो काल १४०७ पर्यंत टिकला. १४०७ सालीं देश पुन्हा चिनी लोकांच्या ताब्यांत गेला पण पुन्हां १४२८ सालीं आनामी लोकांनीं स्वातंत्र्य स्थापन केलें, तें १८ व्या शतकाच्या अंतापर्यंत टिकलें. मात्र १५६८ सालीं कोचीन चीनचा सुभेदार स्वतंत्र झाला. १७८७ सालीं गियालांग नांवाच्या एका बंडखोरानें सोळाव्या लुईची मदत मिळविली आणि १८०१ मध्यें सर्वच आनाम कोचीनचीन व टाँकिन हीं फ्रेंच सैन्याच्या मदतीनें हस्तगत केलीं, तेव्हां पासून फ्रेंचांचें मांडलीक या नात्यानें हें राज्य अस्तित्वांत आहे.

ध र्म.—आनाम लोकांसंबंधीं एक विशेष गोष्ट अशी आहे कीं त्यांच्यामध्यें धार्मिक संप्रदाय फार आहेत. स्वतःच्या मनाची खातरी वगैरे गोष्टींकडे न पाहता परंपरागत आलेल्या धार्मिक गोष्टी करीत राहणारे हे लोक आहेत. चिनांतील बौद्धधर्म, कन्फ्युशियसचा संप्रदाय, व ताओधर्मपंथ या तीन परकी संप्रदायाचें ज्ञान या लोकांत आहे. या तीन संप्रदायानां सरकारचा पाठिंबा असून उच्च वर्गांतले लोक व विद्वान लोक याच पंथाचें आचरण करतात; द्यौ व पृथ्वी याची उपासना केली जाते पण ती फक्त राजाकडून. पण या दैवतांबद्दल आनामी लोकांच्या मनांत पूज्य भावना असते. सामान्य जनता मृत पूर्वजांची पूजा करणारी आहे. पितरांचें पूजन करणें तें कुटुंबातील मुख्य इसम करतो. इतर तामस दैवतें व भूतपिशाचें यांची पूजाअर्चा सार्वजनिक देवळांतून करतात. याशिवाय अभिचारकर्में म्हणजे जादूटोणा वगैरेचे अनेक प्रकार चीन, हिंदुस्थान व इंडोचायना द्वीपकल्प येथील लोकांमधून अनामी लोकांत शिरले आहेत. कोणत्या देशातल्या लोकांपासून कोणतीं अभिचारकर्में या लोकांनीं उचलली तें सांगता येत नाहीं; पण एकंदरीनें वन्य धर्मानें (ॲनिमिझम) अनेक प्रकार आनामी लोकांत दृढमूल झालेले आहेत.

रा ज्य व्य व स्था.—तत्वतः आनामवर तेथील बादशहाची सत्ता चालते. त्याच्या मदतीला 'कोमाट' म्हणजे एक गुप्त मंत्रिमंडळ असतें. अंतर्व्यवस्था, जमाबंदी, युद्ध, विधी, न्याय आणि सार्वजनिक कामें अशा सहा खात्यावरील प्रमुख अधिकारी वरील मंडळाचे सभासद असतात. ह्यूए येथें राहणारा रेसिडेंट फ्रान्सचा प्रतिनिधी असून देशाचा खरा सत्ताधीश तोच असतो. आनाममधील मुख्य फ्रेंच अधिकाऱ्यांचें एक मंत्रिमंडळ असून त्याचा अध्यक्ष रेसिडेंट हा असतो. या कौन्सिल डी प्रोटेक्टोरेट मध्यें कोमाटमधील दोन सभासद घेतले जातात. हें मंडळ सर्व स्थानिक कामें व करव्यवस्था पहातें.

प्रत्येक प्रांतावर एक एतद्देशीय गव्हर्नर असून त्यांतील जिल्ह्यावर व तालुक्यावर एतद्देशीय अधिकारीच असतात. बादशाही सरकारकडून गव्हर्नरांना हुकुम सुटतात पण

त्यांच्यावर फ्रेंच रेसिडेंटची देखरेख असते. दरबारकडून एतद्देशीय अधिकारी नेमले जातात पण एखादी नेमणूक रद्द करण्याचा अधिकार रेसिडेंटकडे असतो. अधिकारी वर्गांतील लोक सभाजातील सर्व दर्जाचे असतात. टुरेन प्रांतात फक्त फ्रेंच न्यायसभा आहे पण एतद्देशीयाने कायदेच त्यांच्या सल्ल्यांतून उपयोजितात. इतर प्रांतात एतद्देशीय न्यायसभा आहेत. आनामी खेडेगाव स्वयंशासित असतें; त्याचें एक लहान मन्त्रिमंडळ असून एका अधिकाऱ्यामार्फत एकंदर अंतर्व्यवस्था चालते. लहानसहान गुन्हे चालविण्याची सत्ताहि या खेडेगावाला दिलेली असते. मोठाले गुन्हे गव्हर्नरनें नेमलेला न्यायाधीश पाहतो. अशा खेडेगांवांचीं एका जिल्ह्यांतील मंत्रिमंडळें, जिल्हा प्रतिनिधी निवडतात व हा प्रतिनिधि सरकारपुढें लोकांची बाजू मांडतो. आनामच्या स्थानिक बजेटात येणारे प्रत्यक्ष कर म्हणजे डोईपट्टी व जमीनपट्टी होत. डोईपट्टी १८ पासून ६० वर्षें वयाच्या पुरुषावर असते. १९०४ सालीं स्थानिक बजेटांतील प्रत्यक्ष करापासून जमलेली रक्कम २८०४८३५ पौंड होती व सर्वांचा आकडा २३२८८० पौंड होता. समाजांतील प्रत्येक माणसाला शिक्षण मिळावे अशी व्यवस्था केलेली आहे प्राथमिक शाळेंत चिनी लिपी व कन्फ्यूशियसचीं वचनें फक्त शिकविलीं जातात. याच्याहून वरच्या दर्जाच्या जिल्ह्याच्या ठिकाणीं असणाऱ्या शाळेंत सहामाही परीक्षा घेण्यात येऊन प्रांताच्या मुख्य ठिकाणीं इन्स्पेक्टरच्या देखरेखीखालीं असणाऱ्या शाळेंत निवडक विद्यार्थी पाठविले जातात. सरतेशेवटची त्रैवार्षिक मोठी परीक्षा जी होते तींत पसार होणाऱ्या विद्यार्थ्यांलाच फक्त डॉक्टरची पदवी व सरकारी अधिकार मिळविण्याला लायक अशी जी ह्यूए येथें परीक्षा होते तिला बसण्याला परवानगी मिळते ही जी आपल्याकडील आय्. सी. एस्. सारखी परीक्षा असते तींत स्थानिक इतिहास, शासनविषयक विधींचें ज्ञान, चालू रीती कायदे, कन्फ्यूशियसची नीति, कुलीन आचार, राजकीय व सामाजिक आयुष्यांतील संस्कार व खाजगी आणि सार्वजनिक आयुष्याला उपयोगी अशा गोष्टी हे अभ्यासक्रमांतील विषय असतात. याच्यापुढें आनामी लोकाचें शिक्षण गेलेलें नसतें. त्यांच्या एकंदर शिक्षणक्रमांत शास्त्रीय कल्पना, सृष्टिज्ञान, किंबहुना युरोपियन शिक्षणक्रमांत येणाऱ्या अगदीं प्राथमिक गोष्टी यांना अजीबात फांटा दिलेला आढळून येईल. चिनी लेखनाच्या खाष्टपणामुळें शिक्षणाचें मातेरें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. आनामी अधिकाऱ्याला चिनी भाषा अवश्य आली पाहिजे, कारण तो चिनी लिपींत लिहीत असतो. पण ती लिपी कल्पनासूचक असल्यानें लिपिविहन उच्चारलेले शब्द अनामी व चिनी भाषांत वेगवेगळे ऐकू येतात. त्यामुळें एकच सरकारी खलिता चिनी मनुष्य चिनी भाषेंत वाचतो व आनामी, आनामी भाषेंत वाचतो।

आनाममधील मुख्य शहरें म्हणजे फ्रेंच आणि एतद्देशीय सरकार या दोघांची राजधानी जी ह्यूए शहर ( लोकसंख्या सुमारें ४२००० ), टुरेन ( ४००० ), फनथिएट ( २०००० ), क्विनॉन आणि फैफो ही होत. कोचीन-चीन पासून टाँकीन पर्यंत समुद्रकाठानें जाणारा रस्ता बहुतेक मोठ्या शहरांतून किंवा त्यांजवळून जातो या रस्त्याखेरीज रेल्वेचे दळणवळणाचे मार्ग आहेतच.

आधुनिक स्थिति—टुरेन, क्वीन-नॉन आणि वसुआनडे हीं बंदरें यूरोपीयन व्यापारार्थ खुलीं केलीं आहेत. त्याचें जकातीचें उत्पन्न फ्रान्सकडे जातें. ह्यूए राजधानींतील (लोकसंख्या ६०६११) किल्ल्याचा कांहीं भाग फ्रेंच लष्कराकडे आहे आनाम मधील सर्वांत मोठें शहर जें बिन्ह-डिन्ह येथें सुमारें पाऊणलाख वसती आहे. फ्रेंच सरकारच्या हाताखालील आनामी अधिकारी सर्व अंतर्व्यवस्था पाहतात या सरंक्षित राष्ट्राचें क्षेत्रफळ सुमारें ५२१०० चौरस मैल व लोकसंख्या ( १९१४ ) ५२००००० आहे. शहरांतून आणि समुद्रकिनाऱ्याला आनामी लोकांची वस्ती आहे. पांच हायस्कुलें, मुलांच्या प्राथमिक शाळा ४६, व मुलींच्या प्राथमिक शाळा सात आहेत व १९१८ सालचें स्थानिक बजेट ५०४७१७३ पीॲस्टर्स इतकें होतें. फनरंग नदीचा उपयोग सुमारें १०००० एकर जमीन भिजविण्याकडे होत असून मध्यआनामामध्यें कांहीं लहानसहान पाटबंधारेहि आहेत तांदूळ, मका इत्यादि धान्यें, साखर, पानें, तंबाखू, वेलदोडे, दालचिनी, काफी, रंग, औषधी वनस्पती, बांबू इत्यादि वस्तू येथ होतात. कच्चें रेशीम दरवर्षी सुमारें ८००००० किलोग्राम इतकें तयार होत असून त्यांपैकीं एकतृतीयांश परदेशीं रवाना होतें. आनामामध्यें सुमारें २१५००० गुरें आहेत लोखंड, तांबें, जस्त आणि सोनें, क्वागनाम प्रांतांत सापडतें. टुरेनजवळ कोळशाच्या खाणीहि आहेत. उत्तर, मध्य आणि दक्षिण भागांत मीठ तयार करण्याचे कारखाने आहेत १९१६ सालीं आनाममधील एकंदर आयात ५८२५००१ फ्रँक व निर्यात ४४३८२५१ फ्रँक होती. बाहेर जाणारा मुख्य माल म्हणजे कापूस, चहा पेटोल, कागदी माल आणि तंबाखू होय. साखर, तांदूळ, सुती व रेशमी कापड, दालचिनी, चहा आणि कागद हे बाहेरून येणाऱ्या जिनसापैकीं मुख्य जिनस होत [ ब्रिटानिका. ए. रि. ए. स्टेटसमन १९१९ ]

आनुवंशिकता (हेरेडिटी)—प्राणिज अगर उद्भिज्ज या दोन्ही कोटींतील व्यक्तींमध्यें आपआपल्या मातापितरांचे ठायीं वसत असलेले गुणदोष प्रायः उतरतात. त्यांवरून जी ढोबळ अनुमानें काढतां येतात तीं ज्या शास्त्रांत समाविष्ट केलीं आहेत व ज्या भाववाचक नामानें तीं व्यक्त केलीं जातात त्यांस हें नांव दिलें आहे. या शास्त्राच्या व्यावहारिक स्वरूपास इंग्रज ग्रंथकार " युजेनिक्स " असें म्हणतात आणि आपल्याकडे " सुप्रजानिर्माणशास्त्र " असा शब्द योजितात.

आनुवंशिकता हें शास्त्रांग असें गणलें जाण्यापूर्वी याच्या सत्यतेविषयीं लोकांत जाणीव होती व आहे, हें "बीज तसा अंकुर" व "शुद्ध बीजा पोटीं, फळें रसाळ गोमटीं" इत्यादि म्हणींवरून उघड होतें. हे *गुणधर्म संततीमध्यें पूर्णपणें व नेहमीं उतरतातच असा अबाधित नियम नसतो.* इतकेंच नव्हे तर त्याचा पूर्णपणें अभावहि तीमध्यें कधीं कधीं दिसून येतो. केव्हां तर संततीपैकीं काहींत समान गुणदोष उतरल्याचें व काहींत न उतरल्याचें व काहींत उलट गुण असल्याचें दृष्टीस पडतें व "तुळशींत भांग" "सूर्याच्या पोटीं शनैश्चर" इत्यादि म्हणी या अपवादात्मक उदाहरणांची जाणीव जनतेंत असल्याची साक्ष पटवितात. पुढील *पिढींत समान गुणधर्म उतरविण्यातील ही अनियमितता* व स्वयंनिर्णय शक्ति यांविषयींहि कांहीं ढोबळ अनुमानें जीवितशास्त्रवेत्त्यांनीं बसविलीं आहेत. दोन्ही कोटींतील अगदीं खालच्या दर्जाच्या व्यक्तींपासून झालेली संतति हुबेहुब मागच्या पिढीशीं समानधर्मीय असते कारण त्यांची जननक्रिया त्यांना विशिष्ट जननेंद्रियें नसल्यामुळें अगदींच साध्या प्रकारची असते. ज्याप्रमाणें झाडाच्या फांदीस अंकुर, मोड अगर डोळा फुटून तेथून नवीन फांदी निर्माण व्हावी त्याप्रमाणें त्या दर्जाच्या व्यक्तींची जननक्रिया म्हणजे एका साध्या शरीरास म्हणजे पेशीस मोड फुटून अगर एकाच ठिकाणीं करकोचा पडण्यास आरंभ होऊन ती क्रिया *वाढून क्रमानें एका* शरीराचीं ( पेशीचीं ) दोन शरीरें होतात. अशा जननक्रियेसाठीं स्त्रीपुरुषसंयोग आवश्यक नसतो. एका शरीरापासून पूर्ण समानाकृति व समानधर्मीय असें दुसरें शरीर निर्माण होण्याचा गुण तें शरीर ज्या जीवनपेशीचें ( प्रोटोप्लॅझम ) बनलेलें असतें त्यांतच निसर्गानें ठेवलेला असतो. यांपेक्षां वरील दर्जाच्या व्यक्तींमध्यें प्रजोत्पादन अत्यंत सूक्ष्म *अंडीं अगर त्या क्रियेसाठीं निर्मिलेल्या पेशी अगर पेशींचे समूह यांच्या साह्यानें होतें,* व *गर्भोत्पत्ति, गर्भाची वाढ व जनन* तशीच क्रियेचीं इतर इंद्रियें ही सर्व गर्भावस्थेंत तयार होतात. अशा वेळीं हे आनुवंशिक गुणधर्म पुढील संततींत कसे उतरतात, व प्रजोत्पादनशक्ति बीजरूपानें पुढील पिढींत गर्भावस्थेंत गर्भ असतानाच कशी स्थापन केली जाते, व ती यथायोग्य काळीं कशी जागृत होते, यांचें विवेचन वीसमान या जीवितशास्त्रवेत्त्यानें केलें आहे त्याच्या मतें गर्भांतील सर्व पेशींची वाढ त्यांनां मिळत असलेल्या पोषक द्रव्यामुळें वर सांगितलेल्या मोड फुटण्याच्या क्रियेनें अगर द्विगुणीभवनक्रियेनें होऊन त्यांचे प्रजोत्पादन होतें. तसें झालें म्हणजे जीवनपेशीच्या मध्यभागीं जें केंद्र असतें त्यासह एका पेशीच्या (केंद्रासह) दोन पेशी होतात. या तऱ्हेनें गर्भाची शारीरिक वाढ व प्रजोत्पादनादि विशिष्ट कार्यें करण्यास समर्थ अशा विशिष्ट इंद्रियांची वाढ, गर्भावस्थेंत होते, परंतु हे सर्व हळू हळू क्रमानें होतें. ज्याप्रमाणें प्रथम *कोंबडी, नंतर अंडें, नंतर त्या अंडयांतील मगज या क्रमणा*वस्थेंतून गेल्यावर नंतर कोंबडीसारखें पिलूं उपजतें, एकदम उपजत नाहीं, त्याप्रमाणें गर्भावस्थेंत पूर्ण तयार होणारें शरीर संक्रमणावस्था पावून नंतर जन्मास येतें, असा *वीसमानच्या विवेचनाचा थोडक्यांत आशय आहे यावर इतर शास्त्रज्ञांनीं जोराचे आक्षेप घेतले आहेत. दोन्ही बाजूस* प्रयोग आणि दीर्घ निरीक्षण यांची जोड असल्यामुळें प्रत्येकाच्या म्हणण्यांत सत्याचा अंश असला पाहिजे या आक्षेपकाच्या उपपत्ती मूळच्या वीसमानच्या सिद्धांताच्या उलटहि आहेत, व आक्षेपकांपैकीं एकानें पुढील तत्त्वाचा शोध लाविला तो हा कीं विशिष्टगुण, धर्म, व कार्यक्षमता ही जीवनपेशीमध्यें इतर पेशींपेक्षां फार अधिक स्पष्टपणें नजरेस येतात जीवनपेशीमध्यें जें केंद्र असतें तें केंद्र व तें ज्या पदार्थाचें बनलेलें असतें त्या पदार्थांत विशिष्टगुणधर्म, व कार्यक्षमतासह *एकशक्ति पुढील पिढींत उतरण्याचें सामर्थ्य साठविलेलें* असतें येथपर्यंतचे सर्व प्रयोग व निरीक्षण ज्यांचा स्त्रीपुरुषभेददर्शक जननेंद्रियांनीं प्रत्यक्ष संयोग होत नाहीं अशा व्यक्तींवरून ठरविण्यांत आले आहेत, मग अशा त्या व्यक्ती कधीं स्त्रीलिंगी असतात व कधीं पुल्लिंगी असतात. परंतु याहून उच्च दर्जाच्या प्राणिज व उद्भिज्ज कोटींतील व्यक्तींच्या प्रजोत्पादनासाठीं अगर फलप्राप्तीसाठीं स्त्रीपुरुषांचीं गर्भसंभावक बीजें एकत्र व्हावीं लागतात जीवनपेशींतील केंद्रामध्यें आनुवंशिक गुणधर्म संततींत निर्माण *करण्याचा धर्म असतो असें मानण्यास सबळ पुरावा* शास्त्रज्ञांनीं गोळा केल्याचें वर सांगितलें आहे, त्यांत माणसीं भर म्हणून प्रयोगाच्या पुराव्यानिशीं असेंहि म्हणतां येईल कीं, गर्भसंभव होण्याच्या अगोदर स्त्रीबीजांतील व पुरुषबीजांतील असलेला सर्व जीवनपेशी केंद्ररूपी पदार्थ दोघांचाहि निमेनिम खर्च होतो व म्हणून आनुवंशिक गुणदोष या कोटींतील व्यक्तींमध्यें मातापितरें या दोहोंकडून प्राप्त होतात. परंतु अगोदर वर सांगितलेल्या हलक्या दर्जांतील व्यक्तींमध्यें गर्भसंभवास फक्त स्त्री अगर पुरुष पुरेसा होत असल्यामुळें त्यामध्यें गुणदोषसंभवहि अमळ कमी परंतु खास असतो. येथपर्यंत या विषयाचें शास्त्रीय प्रयोग व *निरीक्षण यावरून निघालेलें विवेचन झालें* यानंतर आतां व्यावहारिक व आनुभाविक विवेचन करण्यास हरकत नाहीं. त्यासाठीं संतति व मातापितरें यांचे स्वभाव, गुणदोष, समानधर्म *यांचें सूक्ष्म निरीक्षण व वर्गीकरण* व्यवस्थितपणें केलें पाहिजे. *याकामीं असा अनुभव येतो कीं, अमुक एक दोष* अगर गुण मातापितरांत असलेला घेतला तर संततीमध्यें तो उतरतो अशींहि फार उदाहरणें सांपडतात, व असे गुण उतरत नाहींत अशींहि थोडीं उदाहरणें सांपडतात. यांनाच ढोबळपणें व सामान्यतेनें आनुवंशिक गुणधर्म म्हणतां येईल व असा स्पष्ट व विस्तृत अर्थ घेतला म्हणजे मातापितरांचे सर्व गुणदोष व मनोधर्म संततींत उतरतात असें अवलोकनांत येईल ज्या देशांतील, जातींतील व उपजातींतील

मातापितरें असतील त्या वंश, जाति, उपजातीचे जे सर्वसाधारण गुणदोष असतील ते, व एकेकट्या मातापितराचे त्या शिवाय स्वत चे जे गुणदोष असतील ते संततींत कमी अधिक प्रमाणात उतरण्याचा पूर्ण संभव असतो, इतकेंच नव्हे तर मातापितराच्या शरीररचनेतील अगदी बारीक सारीक सुद्धा चिन्हें व लक्षणें, प्रकृतिमान, आवाज, चालण्याची ढब, हस्ताक्षर, मनोधर्म, व्यसनें, दोष, रोग वगैरे हरएक स्वाभाविक व शारीरिक धर्म संततींत उतरतात हे गुणधर्म आनुवंशिक तेनें मातापितरांत उतरलेले असतात व तेच पुढें संततींत प्रगट होतात. यात मौजेचें उदाहरण असें आहे चांगल्या विशेष दुधाळ गाईस खोड होऊन पुढें त्याच्यापासून एखादी गाय गाभण राहिली तर तिची कालवड चांगली दुधाळ निघण्याचा तिच्या पित्याच्या आनुवंशिकतेमुळें बराच संभव असतो. म्हणजे हा दुधाळपणाचा गुण त्या बैलामध्यें पुल्लिंगी धर्मामुळें जरी सुप्तावस्थेंत होता तरी तो त्याच्या संततींत प्रगट झाल्याविना राहिला नाहीं. वासवडीची माता जर दुधाळ गाईपासून प्रसवली असली तर दुधात साखरच पडली म्हणावयाची. हा आनुवंशिक बरावाईट गुण संततींत उतरविण्याचा या वरील दर्जातील व्यक्तींचा गुण हीन दर्जाच्या मागें सांगितलेल्या अण्डिज व उद्भिज्ज कोटींतील व्यक्तींतहि दिसून येतो. मात्र त्यामध्यें जननक्रियेसाठीं स्त्रीपुरुषसंयोग आवश्यक नसतो हे वर सांगितलेंच आहे.

आनुवंशिक संस्कारामुळें व्यक्तींचा स्वभाव व प्रकृति यात होणाऱ्या फरकाचे स्वाभाविक आणि आगंतुक असे दोन उपभेद मानिले आहेत, त्यापैकीं पहिल्याचें स्पष्टीकरण येणेंप्रमाणें आहे:—मातापितराचें कुल, जात, स्वभाव व प्रकृति हीं बाह्य ढवळाढवळ अगर उपद्रव गर्भास गर्भावस्थेंत पोचली नाहीं तर संततींतहि उतरतात, व गर्भाची शरीररचना, व प्रकृतीहि मागील पिढीच्या वळणावरच बनते हा पहिला म्हणजे स्वाभाविक प्रकार होय. परंतु गर्भधारणा झाल्यावर कोंवळ्या गर्भास, अगर प्रौढ गर्भास किंवा मूल उपजल्यानंतर सुद्धा जर त्यास कांहीं उपद्रव, इजा, अथवा रोग झाला तर संततीमध्यें स्वाभाविक आनुवंशिक गुणधर्मांचा पूर्णपणें उद्भव न होता त्या त्या उपद्रव, इजा, अगर रोगाच्या प्रकाराच्या व तीव्रतेच्या मानानें संततीमध्यें आगंतुक गुणधर्म उगम पावतात. निरनिराळ्या मातापितराच्या शरीरावर अमुक भागाचा अगर इंद्रियाचा फाजील उपयोग करणें अगर मुळींच उपयोग न करणें यामुळें जंतुजन्य व इतर विषें, श्वसन, पोषण इत्यादींमध्यें असणारे दोष या अनेक कारणांनीं जे नानाविध बरे वाईट परिणाम घडलेले असतात, तसेच परिणाम त्याच्या संततीवरहि तीं तीं कारणें घडली असतां होतीलच. यास आनुवंशिक म्हणावें किंवा नाहीं याविषयीं संशयच आहे. मातापितरापासून संततीस रोगहि आनुवंशिकतेमुळें होतो. जे रोग व इतर गोष्टी संततींत उतरतात त्या पुढील तीन तत्वाच्या अनुरोधानें उतरतातः—( १ ) फक्त माता अगर पिता याच्या शरीराच्या व प्रकृतीच्या ठेवणीवरहुकूम संततीच्या शरीराची ठेवण व प्रकृति असल्यामुळें एखाद्या शरीरभर पसरून वास्तव्य करून राहणाऱ्या रोगास सहज बळी पडण्याची व टिकाव न धरण्याची प्रवृत्ति माता अगर पिता यात जशी असेल तशी तीं संततींतहि येईल ( २ ) रोगकारक बीज अगर जंतु मातेच्या अंडाशयातील स्त्रीबीजात म्हणजे स्त्रीसूक्ष्माडात अगर पुरुषाच्या वीर्यातील बीजातहि असूं शकतात ( ३ ) अगर रोगजंतूपासून निर्माण झालेले शरीरांतील विष स्त्रीसूक्ष्माडात अगर वीर्यातील बीजात अगर नाळेंतील धमन्यावाटे गर्भांतहि पसरूं शकतें. म्हणून यापैकीं पहिल्या दोन प्रकारास स्वाभाविक आनुवंशिकतेमुळें तो रोग अगर ते गुणधर्म आले असें न म्हणता ते आगंतुक आनुवंशिकतेमुळें आले असें म्हणावें. उदाहरणार्थ फिरंगोपदंश रोग माता निरोगी असून पिता त्या रोगानें पीडित असल्यास गर्भास होऊन संतति उपजतच रोगी निपजेल, अगर उलट पिता निरोगी असून मातेस तो रोग असल्यासहि असाच प्रकार होईल. अगर असेंहि होऊं शकेल कीं, गर्भसंभव झाल्यानंतर मातेस उपदंश होऊन तो गर्भाच्या नाळेंतील धमन्यावाटे गर्भांत पसरतो. क्षय व दुसरे काहीं रोग माता अगर पिता याना झाले असतील तर तो रोग होण्याची प्रवृत्ति संततिमध्यें उतरते असें पाहण्यात येतें

वरील सर्व माहितीवरून तत्वत असें वाटतें कीं, अमुक शारीरिक गुणधर्म माता अगर पिता याच्या ठायीं असले म्हणजे ते संततींत येतील. परंतु व्यवहारात असें आढळून येतें कीं संततीचे गुणधर्म ठळकपणें माता पितराप्रमाणें(या भेदास समिश्रभेद म्हणतात)पूर्ण नसून ते अर्धवट स्थितींत व्यक्त होतात. याखेरीज दुसरी तऱ्हा म्हणजे माता अगर पिता याचे स्वत चे खास गुणधर्म एकमेकाच्या गुणधर्मांपेक्षा विशेष जोरकस असतील तर संततींत मातेच्या अगर पित्याच्या जोरकस गुणधर्मांचा पगडा अधिक प्रमाणात दिसून येईल. उदाहरणार्थ शिद्दी, यहुदी, किंवा चिनी लोकांनीं इतर जातींत बेटीव्यवहार केल्यास संततीमध्यें इतर जातीपेक्षा त्या जातीचेच गुणधर्म अधिक दिसून येतात ( या भेदास प्रबल भेद म्हणावें ) तीच स्थिति यूरोपियन व एतद्देशीय यांजपासून झालेल्या संततीची होय. तिसरा प्रकार म्हणजे संततींत केवळ मातेचे अगर पित्याचे ( यास एकपक्षीय भेद म्हणतात ) गुणधर्म पूर्णपणें उतरणें हा होय. जनावराच्या व झाडाच्या भिन्न जातीपासून नवीन संकरजाति अथवा नव्या अवलादी उत्पन्न करणाऱ्या संशोधकांनीं प्रयोग केले आहेत त्यावरून दिसून येतें कीं, भिन्नजातीय मातापितरांमध्यें एकदां मातृसमान व दुसऱ्या खेपेस पितृसमान संतति उत्पन्न होते परंतु सजातीय मातापितरापासून होणाऱ्या संततीमध्यें मातापितराचे गुण

उतरलेली वरील संमिश्र तऱ्हेची आनुवंशिकता पहाण्यात येते.

मा तृ पि तृ पू र्व जां च्या चे प रि णा म.— आनुवंशिक गुणधर्म व्यवहारात अजमावणें म्हणजे केवळ माता आणि पिता यांचे शारीरिक, गुणधर्मांची बेरीज करणें एवढाच अर्थ नव्हे, ते ठरविण्यामध्यें अनेक अडचणी व आभास उत्पन्न होतात हें दिसून आलेंच असेल. हें काम वाटतें तितकें सोपें नव्हे. मातापितरें अगर आजोबा, पणजोबा यांच्या डोक्याचें मोजमाप, उंची वगैरे दिली असतां त्यावरून पुढील संततीची उंची, मोजमाप वगैरे जवळ जवळ अंदाजता येतें असें नेहमी व खात्रीनें घडत नाहीं. अमुक एक जात उंच व अमुक जात ठेंगणी असें ढोबळपणें ठरलेलें असतें खरें. शीख, रजपूत लोक अगर स्कॉच लोक उंच आणि जपानी सामान्यतः ठेंगणे असें असलें तरी पहिल्या लोकांत आनुवंशिकतेमुळें ठेंगणी माणसें व जपानी लोकांत अगदीं उंच माणसें नसतील असें म्हणता येत नाहीं. एका किंवा अनेक जातींतील कोठले तरी परंतु असंख्य लोकांच्या उंचीचें प्रमाण पाहून आकडे-शास्त्राच्या आधारानें अमुक जात उंच व अमुक ठेंगणी असें ठरवितात. थोडक्या लोकसंख्येवरून अनुमानें बसविणें निरुपयोगी आहे. उंचीचें प्रमाण आनुवंशिकतेमुळें पित्याचें सहा फूट असलें तर मुलांमध्यें पांच फूट ११ इंच म्हणजे कमीहि होऊं शकतें; त्याच कारणामुळें पित्याची उंची साडेपांच फूट असली तर मुलाची पांच फूट आठ इंच म्हणजे अंमळ जास्तीहि असलेली पाहण्यांत येते. निकट पितराचे गुणधर्म संततींत न येता मातापितराच्या पूर्वजांचेहि गुणधर्म संततींत येतात. केवळ पित्याचीच नव्हे तर मातापितराचे आजे व पणजे यांची उंची व वजनाप्रमाणें संततीमध्यें प्रगति किंवा विपरीतगति पाहण्यांत येते. बाप व आईपेक्षांहि वडील असे जे आजे, पणजे, खापरपणजे इत्यादि पूर्वज असतील तर आईबापें दोघेंहि ठेंगणीं असून पूर्वज उंच असल्यास एखादी संततीहि उंच असूं शकेल.

आनुवंशिकतेचा आणखी एक प्रकार आहे तो असाः— नवरा मेलेल्या एका स्त्रीनें पुनः लग्न केल्यावर संतति झाली तर तिचा तोंडवळा व गुणधर्म मृत नवऱ्याप्रमाणें असतात असें क्वचित पाहण्यात येतें. जनावराची निपज करणाऱ्यांच्या नित्य अनुभवाची ही गोष्ट आहे असें म्हणतात. परंतु खरोखर पाहतां जनावरांत व इतरांत या विपर्यांना बळकट पुरावा सापडला नाहीं. याच्या समर्थनार्थ पुढील दोन कारणें दिलीं जात असतातः ( १ ) पहिलें बापाच्या वीर्यांतील बीज मातेच्या गर्भाशयांत अंदाजापेक्षां फार दिवस अधिक वास्तव्य करितें. ( २ ) मातेच्या गर्भाशयांत गर्भधारणा झाल्यापासून तिच्या शरीरावर अगर जननेंद्रियावर असा तो गर्भ वाढत नाहीं तसा परिणाम होतो, व मातेच्या स्वभावांत व गुणधर्मांत पूर्वीच्या बापाशीं सादृश्य येतें. पहिलें कारण सयुक्तिक दिसत नाहीं व दुसऱ्या कारणाविरुद्ध असा बळकट पुरावा आणला आहे कीं, कोणाहि पित्याच्या सर्वांत धाकट्या मुलामध्यें त्याचें स्वतःशीं साम्य कमी प्रमाणांत असतें.

आनुवंशिकतेनें शारीरिक गुणधर्म संततींत प्रकट होतात, तसे मानसिक गुणधर्म प्रकट होतात कीं नाहीं, याबद्दल वाद आहे. सुप्रजानिर्माणशास्त्राचा इंग्लंडांतील मोठा प्रवर्तक फ्रान्सिस गाल्टन यानें 'हेरिडिटरी जीनिअस' नांवाचें एक पुस्तकहि अस्तिपक्षीं उत्तर देण्यासाठीं पुरावा म्हणून दिलें आहे; पण त्या पुस्तकाचें वाचन केलें असतां पुराव्यावरून त्याचे सिद्धांत सिद्ध होतातसें वाटत नाहीं आणि महापुरुषता आनुवंशिक नाहीं, असें विधान केल्यास तें आज खोडता येईल असें वाटत नाहीं.

**आन्वीक्षिकी**—प्राचीन काळीं विद्येचें वर्गीकरण त्रयी ( वेद ), आन्वीक्षिकी, वार्ता ( वैश्यांचें शास्त्र ) व दंडनीति असें करण्यांत येत असे. आन्वीक्षिकी ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांनींहि अभ्यासावी असें होतें. आन्वीक्षिकीमध्यें तर्कशास्त्र व अध्यात्मशास्त्र या दोहोंचाहि अंतर्भाव होई. कुल्लूकानें मनुस्मृतींत आलेल्या ( ७–४३ ) शब्दाचें स्पष्टीकरण करतांना भूतप्रवृत्ति आणि प्रयुक्ति याचा उपयोग करणारी तर्कविद्या व ब्रह्मविद्या या दोहोंचाहि अंतर्भाव केला आहे आणि या अभ्यासाचा हेतु अभ्युदय आणि व्यसन या दोहोंपासून होणाऱ्या हर्षविषादाचें प्रशमन व्हावें हा दिला आहे. म्हणजे व्यवहारांत पडून पुन्हां व्यवहारापासून होणाऱ्या सुखदुःखापासून मनाला विकल्प होऊं नये हें या अभ्यासाचें ध्येय ठेवलें आहे; परंतु भागवतांत (७.१२,२३) या अभ्यासाचें स्वरूप निराळें दिसतें. तेथें वानप्रस्थानें त्यास वार्धक्यानें अगर व्याधीनें आपल्या विद्येंत अगर आन्वीक्षिकींत व्यत्यय आला तर त्यानें उपास करावा असें सांगितलें आहे. आन्वीक्षिकीचें अधिक व्यापक स्वरूप कौटिल्यनीतींत दिलें आहे. विद्यांची यादी देतांना आन्वीक्षिकीस प्रथमस्थान देऊन तो त्रयीस द्वितीय स्थान देतो आणि बार्हस्पत्य आणि औशनस हे त्रयी व आन्वीक्षिकीस विद्यांमध्यें स्वतंत्र स्थान देत नाहींत; पण कौटिल्य देतो असें दाखवितो. आन्वीक्षिकीमध्यें तो अध्यात्मास मुळींच प्राधान्य देत नाहीं, तर सांख्य, योग आणि नास्तिकमत ( लोकायत ) यांचा अंतर्भाव करतो. जेव्हां त्रयीविषयीं, वार्तेच्या नियमाविषयीं किंवा दंडनीतीच्या नियमाविषयीं संदेह उत्पन्न होईल तेव्हां आन्वीक्षिकी हें शास्त्र संदेहनिर्णयास दूरदृष्टि, वाणी व कृति यामध्यें समतोलपणा ठेवण्यास उपयोगी पडतें असें सांगतो. इतर सर्वप्रकारच्या ज्ञानास हें शास्त्र मार्गदर्शक आहे आणि सर्व प्रकारचीं कार्यें करण्यास सौकर्य उत्पन्न करणारें हें शास्त्र आहे ( पु. १, अ. २ ). मालतीमाधवांतील उल्लेखावरून ( अंक १ ) भवभूतीच्या काळीं देखील आन्वीक्षिकीचा

अभ्यास करावा, अशी सुशिक्षितांत कल्पना असावी. त्या वेळेस तो अभ्यास चालू असेलच असें खात्रीनें म्हणवत नाहीं. 'आन्वीक्षिकीस त्रयीपेक्षा अधिक महत्त्व दिल्यावरून चाणक्य हा पर्शियन असावा, खराखुरा ब्राह्मण नसावा' असल्या कल्पना डॉ. स्पूनरनें पुढें मांडल्या आहेत; पण त्यांत तथ्य नाहीं (अर्थशास्त्र पहा). कां कीं, अर्थशास्त्रावरील हा ग्रंथ चाणक्यानेंच केला असेल, अशी अगोदर खात्री नाहीं आणि वेदविरुद्ध बोलावयास परतः मनुष्य नको. वेदांना लोकायताचा भाग म्हणणारे जे बार्हस्पत्य त्यापेक्षां चाणक्याचें मत अर्थात् कमीच धाडसाचें आहे.

**आन्सोदर.**—(काठेवाड) भावनगरपासून ४७ मैलांवर असलेलें लिलिया जिल्ह्यांतील खेडें. लो. सं. सुमारें तेराशें. खेरडीचा लोमा खुमान येथें कांहीं दिवस राहत असे. त्याचें व नवानगरच्या जामचें भांडण होतें. लोमा फार शूर असे. लोमाला कोणत्याहि प्रकारें हार घेण्यास लावणें शक्य नाहीं असें कळून आल्यावर जामनें त्याला नवानगरला बोलावून विश्वासघातानें ठार मारिलें. हल्लीं हें खेडें भावनगरांत मोडतें (मुं. गॅ. पु. ८.)

**आपग्गा.**—ही तामीळ कवयित्री अव्हैयरची बहीण व पिरलीची मुलगी होती. हिचा जन्म अर्काट प्रांतांतील ऊटकाडु नावाच्या गावांत झाल्यावर पिरलीनें हिला तेथेंच रानांत सोडिलें. ही एका परटाच्या हातीं सांपडून तिनें हिचें पालनपोषण केलें. पुढें हिला शास्त्रज्ञान कसें झालें असेल तें असो. हिनें 'नीतिपातल' नावाचा नीतिशास्त्रावर एक ग्रंथ रचिला व इतर भावंडांप्रमाणें अविवाहित राहिली (कवि. च.)

**आपटा.**—यास संस्कृतांत अश्मंतक, मराठींत आपटा, गुजरायींत असोदरो किंवा आशोत्री वगैरे नावें आहेत. हें जंगली झाड आहे. याचीं पानें कांचनाच्या पानांसारखींच परंतु त्यापेक्षा जाड व मोठीं असतात यास लांबट शेंगा येतात. याचीं पानें तंबाखूच्या विड्या करण्याकडे उपयोगीं पडतात. या झाडाच्या अंतरसालीची मजबूत व टिकाऊ दोरखंडें होतात. विजयादशमी किंवा दसरा या दिवशीं शमीवृक्ष नसेल तर अश्मंतक वृक्षाची पूजा करावी असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. त्या दिवशीं एकमेकांस आपट्याचीं पानें स्नेहवृद्धीकरितां वाटावीं असा हिंदुलोकांत रिवाज आहे यामुळें आपट्याच्या पानांचा खप त्या दिवशीं फार होतो. आपट्याचीं झाडें औषधी कामाकरितां सुद्धां फार उपयुक्त आहेत. उदाहरणार्थ वातगुल्म व पोटशूळ यांवर आपट्याच्या पाल्याच्या रसांत मिऱ्याची पूड व तिळाचें तेल सात थेंब टाकून पितात [पदे—वन. गुणादर्श भा. १]

**आपटे, घराणें.**—कोंकणस्थ, कौशिक गोत्री. या घराण्याचें मूळ गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील वेंगुर्लें तालुक्यांत असलेलें आजगांव नावाचें खेडें होय आपटे घराण्याचे मूळ पुरुष आजगांव येथील विश्वनाथभट हे होत. त्यास पुत्र दोन; महादेवभट व कृष्णंभट. महादेवभटाचा वंश आजगांव येथें हल्लीं आहे; आणि कृष्णंभटाचा वंश मालवणनजीक त्रिंबक येथें आहे, असा सर्व आपट्यांची ज्या एका पुरुषापासून उत्पत्ति झाली असणें शक्य आहे त्या पुरुषाचा पत्ता गोविंदराव आपटे पुरावा दिल्याशिवाय लावतात]।

ग्वालेर —आजगांव येथील वंशांपैकी विष्णुभट आपटे हे शके १७०० मध्यें मिरज येथें गेले. त्याचा दुसरा मुलगा नारायण उर्फ नारो विष्णु यांनीं दुसरे बाजीराव पेशवे यांचें सेनापतित्व मिळविलें व ते १८१७ मध्यें कोरेगांवच्या लढाईंत लढले; व पेशवाई बुडाल्यानंतर ग्वालेर येथें शिंदे सरकारच्या पदरीं सरदारकी केली याच घराण्यांतील रावसाहेब यांना शेवटचे बाजीराव पेशवे यांची कन्या बयाबाई ही दिली होती. ('बयाबाई' लेख पहा) हें आपट्यांचें सरदार घराणें अद्याप ग्वालेरास आहे.

पुणें:—केशव व त्याचे बंधु विठ्ठल आपटे हे दोघे दशग्रंथी वैदिक थोरले बाजीराव पेशवे यांचे कारकीर्दींत पुण्यास आले व त्यांनीं सोमयाग केला म्हणून त्यांच्या वंशजांना दीक्षित हें उपनांव प्राप्त झालें. या आपटेदीक्षितांचे वंशज पुण्यांत अद्याप आहेत. या घराण्यांतील एक रामदीक्षित यांचा पुण्यांत दयानंदसरस्वतीबरोबर वाद झाला.

याशिवाय देवास, आजरें (रत्नागिरी), लिंबगोवें (सातारा), जमखिंडी, मायगांव (सातारा), मालपें (संस्थान गगनबावडा), गोळप (रत्नागिरी), धुळें, कोल्हापूर, आक्षी–नागांव (कुलाबा), वगैरे ठिकाणीं या घराण्याच्या शाखा आहेत [गो वि आपटेकृत आपटे घराण्याचा इतिहास पाहा].

**आपटे, वामन शिवराम** (१८५८—१८९२)—वामनरावांचा जन्म इ. स. १८५८ सालीं सावंतवाडी संस्थानांतील असोलीपाल येथें झाला. हे चार वर्षांचे असतांच यांचे वडील निवर्तले. तेव्हां यांच्या मातोश्री त्यांना बरोबर घेऊन कोल्हापुरास आल्यानंतर चार वर्षांनीं त्या वारल्या. त्यावेळीं वामनराव यांचा विद्याभ्यास चालला होता. घरची अतिशय गरीबी असल्यामुळें हे माधुकरी मागून निर्वाह करीत होते. इ. स १८७३ त हे डेक्कन कॉलेजमध्यें अभ्यासास गेले. १८७९त ते एम. ए. झाले त्यांनीं कॉलेजांतल्या स्कॉलरशिपा व सर्व बक्षिसें मिळवून युनिव्हर्सिटींतून भाऊ दाजींचें २०० रुपयांचें व भगवानदासाचें ४००रुपयांचें अशीं बक्षिसें मिळविलीं. हे डेक्कनमध्यें फेलो होते. हे उत्तमपैकीं शिक्षक असल्याची यांची ख्याति आहे. इ. स. १८८० या वर्षी न्यू इंग्लिशस्कुलांत हे शिक्षक झाले. पुढें इ. स. १८८१ पासून 'केसरी' आणि 'मराठा' हीं पत्रें चालू झालीं. तीं पत्रें

आणि 'न्यू इंग्लिस्कूल' चालविण्याच्या कामी कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, बळवंतराव टिळक, वामनराव आपटे, गोपाळराव आगरकर आणि महादेवराव नामजोशी हे पंचक एकचित्तानें झटूं लागलें. फर्ग्युसन कॉलेजासंबंधीं यशाचा जास्त वाटा वामनरावजी आपटे यांचेकडे आहे. वामनराव संस्कृतांत मोठे पंडित होते 'स्टूडंट्स गाईड, स्टूडंट्स प्रोग्रेसिव्ह एक्सरसाईजेस, इंग्लिश–संस्कृतकोश, संस्कृत–इंग्लिश कोश आणि कुसुममाला' हीं पुस्तकें यांनी केलीं आहेत. हीं विद्वानास मान्य असून विद्यार्थ्यांस फारच उपयोगी आहेत. हे विषम ज्वर होऊन इ. स. १८९२ च्या आगस्ट महिन्याच्या ९ व्या तारखेस प्रातःकालीं दहा वाजता पुणें शहरीं मरण पावले

**आपटे, महादेव चिमणाजी** (१८४५–१८९४)— याचा जन्म शके १७६७ च्या फाल्गुन महिन्यांत झाला. हे लहानपणापासून मोठे बुद्धिमान् व अभ्यासी असत. घरची स्थिति फार गरिबीची असताहि इ. स. १८६८ त ते बी. ए. झाले, आणि इ. स. १८७१ त एलएल्. बी. झाले. ह्या दोन्ही परीक्षांत ते पहिले आले होते. ते एलएल्. बी. झाले तेव्हां मुंबईतल्या नानाशंकरशेटच्या शाळेवर हेडमास्तर होते; हे फार चागले शिक्षक होते असें सागतात त्याना भाषाविषय फार आवडत असे; याची योग्यता जाणून यानां सरकारनें युनिव्हर्सिटीचे फेलो नेमिलें होते. हे हायकोर्टांत वकिली करूं लागले, व याना पैसा चागला मिळूं लागला. याच्या मनात आपल्याकडून आपल्या देशाचें काहींतरी हित व्हावें, असें आलें. आपल्या देशात कलाकौशल्याची वृद्धि व्हावी, म्हणून यानीं एका गृहस्थास, कलाकौशल्य शिकून येण्याकरिता विलायतेस आणि अमेरिकेस पाठविलें. त्यात याचे पुष्कळ रुपये खर्च झाले. तसेंच पुण्यासहि चाकूकाऱ्याचा कारखाना काढण्याचा विचार करून कोणा एका गृहस्थास त्यानीं हाताशीं धरलें होतें; त्यातहि त्याचा पुष्कळ पैसा खर्च झाला परं; दोन्ही कृत्यात पैसा खर्च होऊन उपयोग काहींच झाला नाहीं याशिवाय उत्तर हिंदुस्तानात कानपुरास एका देशी कातण्याच्या कारखान्यात ह्यानीं पाच–पन्नास हजार रुपये घातले. या सर्व गोष्टींवरून एवढें स्पष्ट होतें कीं, याना आपल्या देशाचें मुख्य व्यंग चागलें कळलें होतें, आणि तें नाहींसें करण्याचा प्रयत्न करण्याची इच्छा प्रबल होती महादेवरावानीं लाख दीडलाख रुपये खर्च करून प्राचीन संस्कृत ग्रंथाच्या जीर्णोद्धारार्थ "आनंदाश्रम" म्हणून पुणें शहरात कायमची संस्था करून ठेविली आहे, या संस्थेमध्ये नुसत्या प्राचीन ग्रंथाचाच जीर्णोद्धार व्हावयाचा आहे असें नाहीं, तर प्राचीन संस्कृत विद्येचा अभ्यास करणाऱ्या १०।१२ विद्यार्थ्यांची जेवणाची व रहाण्याची वगैरे सर्व प्रकारची सोय व्हावी, आणि प्रत्यहीं पाच संन्याशांस तरी पुर्डी मिळेल अशी व्यवस्था करून ठेविली आहे. हे आपल्या वकिलीच्या कामात फार प्रवीण होते. कोठेंहि एखादा विकट खटला आला कीं, मोठमोठ्या देणग्या कबूल करून लोक यांना नेत असत. याच्या मृत्यूचें वर्तमान कळल्यावर मुंबईहायकोर्टांत चीफजस्टिस बेली हे महादेवरावाविषयीं म्हणाले कीं, "बुद्धीचें विशदत्व, न्यायाच्या कामात जे कायदे लागतात त्या सर्वांचें मार्मिकज्ञान आणि न्यायाधिशाशीं अत्यंत सभ्यपणाचें वर्तन या गुणात महादेवराव आपटे वकील याना दुसऱ्या कोणत्याहि वकिलाच्यानें मागें टाकवलें नाहीं." महादेवरावाचें मराठी लेखनहि चागलें असे 'मौजेच्या चार घटिका' म्हणून ह्यानीं शाकुंतल नाटकाचें भाषांतर लिहून बरेच वर्षांपूर्वी छापून प्रसिद्ध केलें आहे (चित्रासाठीं "वेदविद्या" पहा).

आपण शेवटीं संन्यस्त होऊन म्हणजे 'नारायण नारायण' म्हणतच समाधिस्त व्हावयाचें असा निश्चय महादेवरावानीं कितीएक वर्षांपासून केला होता, आणि आपणाकरिता आनंदाश्रमामध्यें समाधी बाधूनहि ठेविली होती. ह्याच्या इच्छेप्रमाणें सन्यास घेऊन 'आनंद सरस्वती' हें नाम धारण केल्यावर शात चित्तानें काहीं वेळानें ते इ. स. १८९४ च्या आक्टोबर महिन्याचे बाविसावे तारखेस मुंबई येथें समाधिस्त झाले. आनदसरस्वतींचें शव पुण्यास नेऊन, त्याच्या इच्छेनुरूप सिद्ध केलेल्या समाधींत स्थित केलें. माधवरावाना पुत्र नसल्यामुळें त्यानीं स्थापन केलेल्या 'आनंदाश्रम' संस्थेची सर्व व्यवस्था त्यानी ट्रस्टी नेमून त्याचे स्वाधीन केली. त्याच्या मागें त्याचे पुतणे सुप्रसिद्ध हरिभाऊ आपटे(पहा) हे आनंदाश्रमाचें काम पहात असत. हल्लीं प्रि. विनायकराव आपटे हे पाहतात.

**आपटे, हरि नारायण** (१८६४–१९१९)—हरिभाऊंचा जन्म ८ मार्च १८६४ रोजीं मुंबईस झाला. त्याचे वडील नारायणराव हे लहान नोकरीपासून चढत चढत पोस्टल सुपरिंटेंडेंट झाले व दीडशें रुपये पेन्शन बसल्यावर पुण्यास घर बाधून राहिले. त्याना हरि, रामचंद्र, दत्तात्रय, गणेश व केशव असे पाच पुत्र होते. हरीभाऊंच्या वयाचीं पहिलीं चवदा वर्षे मुंबईस गेलीं. त्यानंतर ते पुण्यास आले. या वेळेस ते इंग्रजी चवथ्या इयत्तेंत होते. वाङ्मयातील हरिभाऊंचा अगदीं पहिला प्रयत्न म्हणजे ते इंग्रजी चवथ्या इयत्तेंत होते तेव्हाचा होय. त्यावेळीं मेडोज टेलरच्या एका कादंबरीचें त्यांनीं भाषांतर केलें. कोणत्याहि भाषेंत हरिभाऊंची स्वाभाविकच विशेष गति होत असे. फ्रेंच, जर्मन, बंगाली वगैरे भाषा त्याना अगदीं अल्पावकाशात व अल्पायासांत शिकता आल्या.

हरिभाऊ १८७८ सालीं पुण्यास आल्यानंतर सुमारें दोन वर्षांनीं न्यू इंग्लिश स्कूल स्थापन झालें. या शाळेंतील अगदीं आरंभीच्या विद्यार्थ्यांपैकीं हे एक होते हरिभाऊ हे न्यू इंग्लिश स्कूलमध्यें गेले तेव्हा त्याचे वय अल्प होतें, पण त्या वेळेपासून त्याना वाचनाचा अतिशय नाद असे. यामुळें त्याचे सहाध्यायी व त्याचा शिक्षकवर्ग यानां त्याच्या-

बद्दल फार आदर वाटे. यावेळीं "निबंधमाले" ने सर्व समाजांत खळबळ उडवून दिली होती, ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. विष्णुशास्त्री यांनीं मराठी भाषेला नवीन प्रकारचें व श्रेयस्कर वळण लावलें, याबद्दल त्याचो सर्वतोमुखी प्रशंसा होत असे. हरिभाऊ हेहि निबंधमालेचे कट्टे भक्त होते; पण ते मालेची आणि तिच्या कार्याची नुसती प्रशंसाच करून राहिले नाहींत, तर विष्णुशास्त्र्यांचा आदर्श पुढें ठेवून आपणहि वाङ्मयमंदिराची शोभा वाढविण्याचा प्रयत्न करावा, अशी त्यांनीं आकांक्षा बाळगली व ज्या वाचनाच्या जोरावर विष्णुशास्त्र्यांनीं मराठी भाषेवर प्रभुत्व मिळविलें त्याच वाचनाचा आश्रय करून त्यांनीं ही आपली आकांक्षा फलद्रूपहि केली, ही गोष्ट आजमितीस सर्वांच्या प्रत्ययास आली आहे. विष्णुशास्त्री रेनॉल्डसच्या कादंबऱ्या वाचीत असत, ही गोष्ट कानीं आल्याबरोबर हरिभाऊंनींहि त्याच कादंबऱ्या वाचण्याचा सपाटा लावला, यामुळें त्यांच्या डोळ्यांवर परिणाम झाला तो त्यांना पुढें जन्मभर भोगावा लागला.

हरिभाऊंच्या लेखनक्रियेला त्यांच्या वयाच्या चवदाव्या वर्षींच प्रारंभ झाला, हें वर सांगितलेंच आहे. गोपाळराव आगरकर यांनीं केलेलें हॅम्लेटचें भाषांतर 'विकारविलसित' या नांवानें प्रसिद्ध झालें, त्यावर निबंधचंद्रिका मासिकांत हरिभाऊंनीं सन १८८२ त एक टीकात्मक लेख लिहिला, या वेळीं हरिभाऊ हे विद्यार्थीच होते. आपल्या विद्यार्थ्यानें आपल्या पुस्तकावर ७२ पृष्ठांचा एक टीकात्मक लेख लिहिला हें पाहून प्रि. आगरकर यांना अर्थातच परमावधीचें कौतुक वाटलें. यानंतर निबंधचंद्रिकेंत त्यांचे आणखीहि कित्येक निबंध प्रसिद्ध झाले. हरिभाऊंचा शेक्सपीअरचा व्यासंग विशेष असे आणि त्या व्यासंगाला सतरा अठरा वर्षांच्या अल्पवयातच साधारण प्रगल्भ स्वरूप आलें. हा त्यांचा व्यासंग त्यांनीं आजन्म चालू ठेवला होता. शेक्सपीअरचीं नाटकें व त्यावरील विद्वान ग्रंथकारांचीं परीक्षणें यांचा त्यांनीं फारच चांगला अभ्यास केला होता. शेक्सपीअरचें एक विस्तृत परीक्षण करावें, असा विचार ठरवून त्यांनीं जे थोडे लेख लिहिले ते 'चित्रमयजगता' त प्रसिद्धहि झाले आहेत; पण पुढें तें काम तसेंच अपुरें राहिलें. शेक्सपीअरच्या सॉनेट्सचेंहि भाषांतर त्यांनीं सुरू केलें होतें. त्याचा सरासरी तृतीयांश भाग लिहूनहि तयार झाला आहे. शेक्सपीअर, कालिदासप्रभृति महाकवींच्या ग्रंथांचें हृद्गत उकलण्याची हरीभाऊंची हातोटी वाखाणण्यासारखी होती. हरीभाऊंचा इंग्रजीप्रमाणेंच संस्कृतचा व्यासंग चांगला असे. संस्कृत कवींमध्यें हरीभाऊंची कालिदासावर विशेष भक्ति असे. 'कालिदास, शेक्सपीअर व भवभूति' या मथळ्याखालीं प्रि आगरकर यांनीं स. १८८१ सालीं एक लेख लिहिला होता त्यांत त्यांनीं 'कवि' या दृष्टीनें भवभूतीची योग्यता कालिदासाहूनहि अधिक आहे, असें विधान केलें होतें. तें हरीभाऊंना अर्थातच न आवडून त्यांनीं 'विचारा' या सहीनें केसरीकडे एक पत्रव्यवहार पाठविला, व तो त्या पत्राच्या याच सालच्या ता. २९ मार्चच्या अंकांत प्रसिद्धहि झाला आहे. या लेखांत भवभूतीहून कालिदास हा कसा अधिक सरस व मनोज्ञ कवि आहे हें त्याच्या ग्रंथांतील अनेक उदाहरणें देऊन हरीभाऊंनीं दाखविलें आहे.

हरीभाऊंची प्रवेशपरीक्षा १८८३ सालीं झाली. त्यानंतर ते डेक्कन कॉलेजमध्यें शिकावयास गेले. त्यांचा बहुतेक वेळ अवांतर पुस्तकें वाचण्यांत जावयाचा १८८४ सालीं पी. ई. च्या परीक्षेंत अर्थातच नापास झाले, व दुसऱ्या वर्षी म्हणजे १८८५ सालीं फर्ग्युसन कॉलेजची स्थापना झाली, त्यावेळेस ते त्या कॉलेजमध्यें गेले या कॉलेजमध्येंहि हरीभाऊंच्या पी. ई. चा निकाल आदल्या सालाप्रमाणेंच होऊन त्यांच्या पुढच्या वर्षी ते डेक्कन कॉलेजमध्यें गेले प्रो. भानु, प्रो. विजापूरकर, श्रीयुत ना. म समर्थ, ही मंडळी याच वेळेस या कॉलेजमध्यें होती याच वर्षी येथें रीडिंगरूम व लायब्ररी स्थापन झाली. या लायब्ररीस घ्यावयाच्या पुस्तकांची निवड करणारांपैकीं हरीभाऊ हे एक होते. त्यांनीं या लायब्ररींतील बहुतेक पुस्तकें एक वर्षांत वाचलीं, पण इंग्लिश व संस्कृत याशिवाय बाकीच्या विषयांचें याहि वर्षी त्यांना दर्शन न घडल्यामुळें परीक्षेचा निकाल त्यांच्या उलट झाला ! यानंतर एक दोन वर्षें घरच्या मंडळींच्या आग्रहावरूनच ते परीक्षेच्या नादांत होते, पण त्यांत यश न येतां त्यांना हा नाद सोडून द्यावा लागला. यापुढें हरीभाऊ कादंबरीलेखनाकडे वळले. हरीभाऊंची पहिली कादंबरी 'मधली स्थिति". या कादंबरींत मद्यपानाचे व तदनुषंगिक इतर व्यसनें यांचे दुष्परिणाम दाखविले आहेत दुसरी कादंबरी मनोरंजन व निबंधचंद्रिका यांत प्रसिद्ध झालेली 'गणपतराव' ही होय. यांतील प्रतिपाद्य विषय "पुनर्विवाह" हा आहे. तिसरी "पण लक्ष्यांत कोण घेतो" ही होय. यांत केशवपनाच्या हिडिस चालीचा निषेध केला आहे. चवथी "यशवंतराव" या कादंबरीचा पूर्वार्धच प्रसिद्ध झाला आहे. सामाजिक व राजकीय बाबतींत भलतें शिक्षण मिळाल्यामुळें कसे दुष्परिणाम होतात याचें विवेचन या कादंबरींत केलें आहे. "मी" या पाचव्या कादंबरींत देशसेवेसाठीं संन्यस्तवृत्ति स्वीकारण्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. सहावी "भयंकर दिव्य" हिच्यांत सोनेरी टोळीचीं दुष्कृत्यें, विचित्र सहाय्यीपणाचा परिणाम वगैरेंचें वर्णन आहे. कालानुरोधानें, "मायेचा बाजार" या कादंबरीचा नंबर सातवा लागतो. दुष्ट पतीमुळें स्त्रियांच्या होणाऱ्या दुस्थितीचें शब्दचित्र या कादंबरींत रेखाटलें आहे. आठवी "आजच" व नववी 'कर्मयोग' यांत 'पतित स्त्रियांचा उद्धार' हा संकल्पित विषय आहे. दहावी 'जग हें असें आहे' ही कादंबरी होय.

या सर्व कादंबऱ्यांत एकंदर तीन पिढ्यांचा इतिहास आहे 'गणपतराव' या कादंबरींतील गणपतरावाचा

मुलगा चंद्रशेखर हा कर्मयोगाचा नायक आहे. 'मी' या कादंबरींतील ताईचा मठ, हा "भयंकर दिव्यात," "आजच" मध्यें व "कर्मयोगांतहि" अधिष्ठित झालेला दिसतो. "यशवंतरावां" तील व "भयंकर दिव्या" तील पात्रें "आजच" मध्यें आणि "कर्मयोगात" हि आलेलीं आहेत. वर दिलेल्या दहा कादंबऱ्यांपैकीं 'गणपतराव" "आजच" व "कर्मयोग" या अपूर्ण आहेत

हरीभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्या पुढें दिल्याप्रमाणे आहेतः—पहिली "म्हैसूरचा वाघ" दुसरी "उषःकाल" यात शिवाजीचा उदयकाल वर्णन केला आहे. तिसरी "सूर्योदय", यात अफजलखानाच्या वधाचें कथानक वर्णन केलें आहे. चवथी "सूर्यग्रहण," या कादंबरींत शिवाजी औरंगजेबाच्या कैदेंत पडलेला आहे, त्या काळची स्थिति आलेली आहे. पाचवी ऐतिहासिक गोष्टीची म्हणजे "गड आला पण सिंह गेला" ही होय. सहावी "मध्यान्ह"; ही सवाई माधवरावाच्या काळची आहे. सातवी "चंद्रगुप्त", आठवी "कालकूट;" या कादंबरींत पृथ्वीराज चव्हाणाचें कथानक आहे. नववी "वज्राघात," हींत विजयानगरच्या विनाशकालाची परिस्थिति वर्णन केली आहे, व दहावी "रूपनगरची राजकन्या" ही होय या कादंबऱ्यांपैकीं "सूर्यग्रहण," "मध्यान्ह," व "कालकूट" या अपूर्ण स्थितींतच आहेत. हरीभाऊंच्या सामाजिक तीन व ऐतिहासिक तीन अशा एकंदर सहा कादंबऱ्या अपूर्ण राहिल्या आहेत. यांतील बहुतेक कादंबऱ्या त्यानीं १८८९ सालीं सुरु केलेल्या "करमणूक" पत्रांत प्रसिद्ध झाल्या आहेत.

"कथानकाचा संकल्प ठरवून त्याची सुसंगत रीतीनें रचना करणें, त्यांतील पात्रांचा कथानकांतील प्रसंगानुरूप उठाव करणें, स्थलवर्णनांची हुबेहुब मांडणी करणें, पात्रांच्या स्वभावाचें यथार्थ दिग्दर्शन करणें, कथानकांतील निरनिराळ्या घटकांचा परिपोष यथाक्रम व यथाप्रमाण होईल अशी तरतूद करणें वगैरे संबंधांत हरीभाऊंचा हातखंडा असे. कल्पनेनें निर्मित अशा कृत्रिम सृष्टीची स्वाभाविक सृष्टीप्रमाणें बेमालुम बनावट करणें हा जो उत्कृष्ट कादंबरीकाराचा गुण तो हरीभाऊंना सहजसाध्य होता 'महाराष्ट्र वाङ्मयांतील ते सर वॉल्टर स्कॉट होते' असें जें त्यांच्याविषयीं म्हणत तें अगदीं यथार्थ होतें, हें त्याच्या कादंबऱ्यांतील उठावदार प्रसंग वाचणाराला सर्वस्वी मान्य होईल." असें जें त्यांचे चरित्रकार रा. आंबेकर लिहितात त्यासंबंधी कोणाचेंहि दुमत असणार नाहीं.

हरीभाऊंचें बहुविध विषयाचें वाचन असल्यामुळें त्याचा बहुश्रुतपणा चौरस असे मिल, मोर्ले, स्पेन्सर वगैरे ग्रंथकार; टेनिसन, वर्डस्वर्थ, बायरन, ब्राऊनिंग आदिकरून कवी; ग्रीन. गिबनप्रभृति इतिहासकार; डिकन्स, स्कॉट, जेन आस्टेन, जॉर्ज ईलियट, थॅकरे वगैरे कादंबरीकार यांचे ग्रंथ त्यांना विशेष अवगत असत या ग्रंथकारांपैकीं कोणाच्या ग्रंथांतील विशेष महत्त्वाचा किंवा मनोहर भाग त्याच्या वाचण्यांत आला तर पुष्कळ वेळां त्यावर एखादा सुंदर निबंध लिहून ते एखाद्या संस्थेपुढें वाचीत व तो पुष्कळ वेळां तज्ज्ञ माणसानांहि विशेष पसंत पडे. त्याच्या 'करमणुकी'नें तर महाराष्ट्राला चटका लावून सोडला होता. त्यात ललितवाङ्मयाखेरीज इतर उपयुक्त व शास्त्रीय माहितीहि असे हरीभाऊंनीं 'संतसखुबाई' व सती पिंगला' हीं दोन भक्तिपर नाटकें लिहिलीं आहेत.

पुणें म्युनिसिपालिटीचे हरीभाऊ ६ वास वर्षे सभासद होते, व तीन वर्षे अध्यक्ष होते. हरीभाऊंची वृत्ति शांत व स्वभाव मनमिळाऊ असल्यामुळें म्युनिसिपालिटींत कित्येक वर्षे प्रतिकूल परिस्थिति असताहि त्यांना पुष्कळ महत्त्वाचीं कामें करतां आलीं. म्युनिसिपल बाबतींत जेव्हां जेव्हां सरकारशीं दोन हात करण्याचा प्रसंग येई तेव्हां तेव्हां हरीभाऊ मोठ्या धैर्यानें आणि निर्भिडपणें पुढें सरसावत म्युनिसिपालिटींत ते स्कूलबोर्डाचे चेअरमन असतां त्यानीं पुणे येथील अजबखान्यांत शिक्षण या विषयावर शिक्षकापुढें व्याख्यानें दिलीं तीं फारच महत्त्वाचीं व अध्यापनाचें काम करणाराना अत्यंत उपयोगी अशीं होतीं लोकलबोर्डाचे कित्येक वर्षे ते व्हाइस प्रेसिडेंट होते. पुणें येथील मद्यपान निषेधक मंडळीचे ते आत्येवाईक सभासद होते. पुणें जिल्ह्यांकरितां प्रथम आबकारी कमिटी नेमली तेव्हां तींत ते म्युनिसिपालिटीतर्फे सभासद असुन लोकपक्षाची बाजू कमिटीपुढें मांडण्याचे काम त्यानीं अनेक वेळां चांगल्या रीतीनें केलेलें आहे. पुणें येथील सेंट जॉन ॲम्ब्युलन्स कमिटीचे ते सभासद होते त्याचप्रमाणें फीमेल हायस्कूलच्या कौन्सिलचेहि ते सभासद होते. नूतन मराठीविद्यालयाकरितां स्वार्थत्यागपूर्वक प्रयत्न करणाराचे तर ते अग्रणी होते. ते सुधारक व आगरकरांनुयायी म्हणून गणले जात. त्यांना एकच मुलगी होती पण ती लहान वयातच वारली तिच्या मृत्यूमुळें हरिभाऊंना फार दुःख झालें. पुढें त्याना जलोदराची भावना होऊन शेवटचे कांहीं महिने कष्टांत गेले. [(आंबेकरकृत चरित्र. मासिक मनोरंजन पु. २४ वें) काशीबाई कानिटकर यानीं महाराष्ट्रसाहित्यपत्रिकेंत (वर्ष ९, अं. १) लिहिलेलें चरित्र मोठ हृदयंगम आहे वाग्भट नारायण देशपांडे यांनीं हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांचें सुंदर परिशीलन विविधज्ञानविस्तारात (पु. ५१) केलें आहे.]

**आपद्धर्म.**—आपद्धर्म हा विषय धर्मशास्त्रात बराच महत्त्व पावला आहे. याच्या अस्तित्वाचें कारण श्रमविभागात्मक चातुर्वर्ण्य व संस्कारिक चातुर्वर्ण्य यांतील असंगति होय. मनुष्याचें उपजीविकेचें साधन हें त्याच्या योग्यतेवर अवलंबून असतें जन्मावर नसतें, आणि श्रमविभागावर चातुर्वर्ण्य अस्तित्वात असलें तरी संस्कारदृष्ट चातुर्वर्ण्य अगदीं निराळें असतें. संस्कारदृष्ट चातुर्व-

ण्याप्रमाणें वैश्य कोण? जो वैश्याचा धंदा करतो तो नव्हे पण वैश्याचे संस्कार ज्याला असतील तो. संस्कार कर्मावर अवलंबून नसून जन्मावर अवलंबून असतात, ते व्यक्तीच्या लहानपणीं होतात आणि कर्म तर तरुणपणीं ठरतें. या परिस्थितीमुळें कर्माप्रमाणें संस्कार राहिले नाहींत. कर्माप्रमाणें संस्कार करावे व मान्यता द्यावी हा उपदेश अशक्य झाल्यामुळें संस्कार झाले असतील तदनुरूप कर्म करावें असा उपदेश धर्मशास्त्रकार व नीतिशास्त्रकार करूं लागले. संस्कारानुरूप कर्म शक्य नसेल तर काय करावें? याला तोडगा काढला तो असा. जे कर्म करावें लागेल तें आपद्धर्म म्हणून करण्यास हरकत नाहीं. अशी त्यास पुस्ती जोडण्यात आली. आपद्धर्मावर विवेचन करतांना धर्मशास्त्रकार पहात कीं उच्च वर्णाचे संस्कार पावलेल्यानें अगदीं हलकीं कामें न करता जरा वन्या दर्जाचीं कामें करावीं.

ब्रा ह्म णा चा आ प द्ध र्म.—'ब्राह्मणाला प्रतिग्रह, याजन व अध्यापन हीं वृत्तिसाधनें आहेत,' या वचनानें सांगितलेल्या याजनादि मुख्यवृत्तींचा असंभव झाल्यास दुसरा जीवनोपाय याज्ञवल्क्य असा सांगतोः—ब्राह्मणानें, कुटुंब मोठें असल्यामुळें आपल्या वृत्तीवर निर्वाह होणें अशक्य झाल्यास तसल्या आपत्तींत शस्त्रग्रहण इत्यादि क्षत्रियाच्या कर्मानें निर्वाह करावा. आणि त्यावरहि निर्वाह होईनासा झाल्यास वैश्याच्या वाणिज्यादि ( व्यापार वगैरे ) वृत्तीवर निर्वाह करावा. परंतु शूद्रवृत्तीचा केव्हांहि आश्रय करूं नये त्याचप्रमाणें आपत्तींतहि हीनवर्णाच्या पुरुषानें ब्राह्मणादि उत्तम वर्णाच्या वृत्तीचा आश्रय करूं नये; तर ब्राह्मणानें क्षत्रियाची वृत्ति, क्षत्रियानें वैश्याची व वैश्यानें शूद्राची असा आपत्कालीं आपल्या खालच्या वर्णाच्या वृत्तीचा अवलंब करावा; सर्वांत श्रेष्ठ जी ब्राह्मणवृत्ति तिचा अवलंब करूं नये. असें वसिष्ठानें ( अ. २ सूत्र २२—२३ ) सांगितलें आहे. शूद्राला उत्कृष्ट कर्म ( ब्राह्मकर्म ) व ब्राह्मणाला अपकृष्ट कर्म ( शूद्रकर्म ) करणें प्रशस्त नाहीं. पण मधल्या दोन वर्णांचें कर्म ( क्षत्रियाचें शस्त्रधारण व वैश्याचे वाणिज्य ) सर्वांस सारखेंच हितकारक आहे. आपत्तींत सापडलेल्या शूद्रानें वैश्यवृत्तीवर अथवा शिल्पावर निर्वाह करावा. मनूनें ( अ. १० श्लो. १०० ) यासंबंधीं विशेष सांगितला आहे तो असा कीं, 'ज्या कर्मानें द्विजाची शुश्रूषा केल्यासारखें होतें ती कारागीरांची कर्मे व विविध शिल्पें यावर निर्वाह करावा.' याच न्यायानें अनुलोम संततींतील लोकांनींहि आपत्तींत आपल्यापेक्षा हीन जातीच्या वृत्तीचा आश्रय करावा. याप्रमाणें आपल्यापेक्षा किंचित् हीन जातीच्या वृत्तीनें आपत्तींत उपजीविका केल्यावर आपत्ति संपल्यानंतर प्रायश्चित्तानें आपल्याला पवित्र करून घेऊन स्वतःच्या वृत्तींत पुनः स्थित व्हावें ( म्हणजे पुनः आपल्या वृत्तीचा आश्रय करावा ) किंवा निंद्यवृत्तीनें संपादन केलेलें धन योग्य मार्गांत खर्च करावें. कारण, मनूनें ( अ. १० श्लो १११ ) जप, होम, याजन, अध्यापन यांच्या योगानें आपत्तींत केलेलें पाप नाहींसें होतें आणि प्रतिग्रहनिमित्तक पाप त्यागानें व तपानेंच जातें असें म्हटलें आहे.

आता वैश्यवृत्तीनें जिवंत राहणाऱ्या ब्राह्मणानें कोणत्या वस्तूंचा विक्रय करूं नये तें सांगितलें आहे. बोरें व रिठे हीं सोडून केळीं इत्यादि फळें ब्राह्मणानें विकूं नयेत पण नारदानें ( अ.१ श्लो. ६५ ) 'आपोआप गळून पडलेलीं पानें; फळांपैकीं बोरें व रिठे; दोऱ्या, कापसाचीं वस्त्रें, इत्यादि विकार न पावलेल्या वस्तू विकाव्यात' असें म्हणून बोरें व रिठे विकण्याची अनुज्ञा दिलेली आहे माणिक्यादि सर्व प्रकारचे पाषाण; पट्टवस्त्र; सोमनांवाची लता, कोणत्याहि प्रकारचा ( स्त्री, पुरुष, नपुंसक ) मनुष्य, मांस इत्यादि सर्व प्रकारचें कल्य; वेत, गुळवेल इत्यादि लता, तीळ, सर्व प्रकारचे भोज्य पदार्थ, गूळ, उसाचा रस, साखर इत्यादि रस; सर्व क्षार पदार्थ; दहीं दूध; तूप; ताक; लोणी इत्यादि सर्व आर्द्रपदार्थ; तलवार वगैरे शस्त्रें; सर्व प्रकारचें मद्य, मध, लाख; उदक; दर्भ, माती, अजिन [ कृष्णाजिन ], पुष्पें, बकऱ्याच्या केंसाची गोंगडें, चमरीप्रभृति वन्य पशूंचे केंस; विष; भूमी; रेशमी वस्त्रें, निळीचा रस, मीठ, सैंधव; मास, घोडे; गाढव; इत्यादि एकशफवान् प्राणी; शिसें व दुसरेही सर्व प्रकारचे खनिज धातू; सर्व प्रकारची भाजी, ओल्या औषधी; पेंड; अरण्यांतील पशु व चंदन; सुगंधि पदार्थ ह्या सर्व वस्तु वैश्यवृत्तीनेंहि निर्वाह करणाऱ्या ब्राह्मणानें विकूं नयेत. क्षत्रियादिकांनीं विकल्यास त्यांस कांहीं दोष प्राप्त होत नाहीं. म्हणूनच नारदानें [ अ. १ श्लो. ६१ ] वैश्यवृत्तीनें उपजीविका करणाऱ्या ब्राह्मणास दूध व दहीं अविक्रेय आहे असें सांगितलें आहे.

आता वरील वचनास अपवाद सांगितला तो असाः अगदीं अवश्यक असलेलीं पाक यज्ञादि कर्मे, त्याच्या साधनभूत अशा व्रीहिप्रभृति धान्याचा अभाव झाल्यामुळें जर होईनाशीं झालीं तर त्या धान्याकरितां तीळ विकावे. पण तें जितकें धान्य घ्यावयाचें असेल तितकेच विकावेत अधिक किंवा उणे विकूं नयेत. 'शक्ति नसल्यामुळें औषधाकरितां व यज्ञाकरितां जर तीळ अवश्यच विकावयाचे झाले तर ते त्याच्या भारंभार धान्य देऊन विकावे' पण दुसऱ्या निमित्तानें अथवा अन्य प्रकारानें तीळ विकल्यास 'तो विकणारा ब्राह्मण किडा होऊन पितरांसह भविष्ठेंत पडतो' असें मनूनें ( अ. १० श्लो ९१ ) सांगितलें आहे. पूर्वोक्त निषेधाचें उल्लंघन केल्यास पुढील दोष सांगितले आहेत. मेंदी, मीठ, व मांस यांचा विक्रय केल्यास पातित्य येतें. दूध, दही व मद्य यांचा विक्रय केल्यास हीनत्व येतें. एखादा निर्धन मनुष्य सर्व कुटुंब उपवासीं मरत असल्यामुळें आपत्तींत असतानांहि क्षत्रियवृत्तींत अथवा वैश्यवृत्तींत पडत नाहीं तो अतिशय हीन पुरुषापासून प्रतिग्रह घेऊन त्याचें अन्न खात असला तरी

पापानें लिप्त होत नाहीं. कारण, त्या आपत्तींत असत्प्रतिग्रह करण्याविषयीं अधिकार दिलेला आहे.

ब्राह्मण व क्षत्रिय यानां वैश्यवृत्ति व स्वतः केलेली शेती याची अनुज्ञा दिलेली आहे. त्याचप्रमाणें शिल्पादिकांचीहि अनुज्ञा दिलेली आहे स्वयंपाक करणें इत्यादि शिल्प, सेवा, वेतन घेऊन शिकविणें इत्यादि विद्या, द्रव्य स्वतः व्याजी लावणें व त्या व्याजावर निर्वाह करणें, धान्यादि वाहून नेण्याकरिता भाड्याची गाडी ठेवून तिच्यापासून उत्पन्न झालेल्या भाड्यावर निर्वाह करणें, दुसऱ्याचें मनोगत ओळखून त्याप्रमाणें आचरण करणें, जेथें पुष्कळ गवत, वृक्ष व जल आहे अशा ठिकाणीं वास करणें, राजापाशीं याचना करणें, व स्नातक असूनहि भिक्षान्नावर निर्वाह करणें, हीं आपत्तींतील जीवनसाधनें आहेत. मनूनेंहि ( अ. १० श्लो. ११६ ) विद्या, शिल्प इत्यादि दहा प्रकार जीवनोपाय म्हणून सांगितले आहेत.

धान्याचा सर्वतोपरि अभाव झाल्यास कांहीं न खाता तीन दिवस उपाशीं रहावें व नंतर अब्राह्मणापासून म्हणजे शूद्रापासून, त्याच्याअभावीं वैश्यापासून व वैश्याच्याहि अभावीं कर्महीन क्षत्रियापासून एक दिवस पुरेल इतकें धान्य न विचारताच घ्यावें म्हणजे त्याचा अपहार करावा. आणि हरण केल्यावर त्या धान्याच्या मालकानें ' तूं हें माझें धान्य का हरण केलेंस' असें विचारल्यास 'मी हें तुझें अमुक धान्य उपजीविकेकरिता चोरलें'असें खरें खरें सांगावें. मनूनेंहि ( अ. ११ श्लो. १७ ) असेंच सांगितलें आहे. जो क्षुधेनें व्याकुळ होऊन दुःख भोगीत आहे अशा आपद्ग्रस्त ब्राह्मणाचें आचरण, कुल, शील ( आत्मगुण ), शास्त्रश्रवण, वेदाध्ययन, कृच्छ्रचांद्रायणादितप, याचें चांगलें परीक्षण करून राजानें त्याच्या धर्मवृत्तीची योजना करावी. न केल्यास त्यास दोष लागतो असें मनूनें ( अ. ७ श्लो. १३४ ) सांगितलें आहे. आपत्तीमध्यें ब्राह्मण किंवा क्षत्रिय याना वैश्यवृत्ति जरी पत्करलेली असली तथापि हिंसाबाहुल्य, व पराधीन असलेल्या कृषिकर्माचा ( शेतकीचा ) प्रयत्नानें त्याग करावा. जातीनें अधम असणारा पुरुष ज्यावेळीं लोभाविष्ट होऊन उत्कृष्ट जातीच्या वृत्तीचा अवलंब करतो त्यावेळीं राजानें त्याला निर्धन करून स्वराष्ट्रांतून घालवून द्यावें [ याज्ञवल्क्य व मनुस्मृति ]. येणेंप्रमाणें अनेक प्रकारचें विवेचन निरनिराळ्या ग्रंथकारांनीं केलें आहे.

**आपव**—वरुणाचा वासिष्ठ म्हणून एक मुलगा होता त्यालाच आपव असें म्हणत. मेरु पर्वताजवळ या ऋषीचा पवित्र आश्रम होता. तो सहस्रार्जुनाकडून दग्ध झाल्यामुळें 'तुझे सहस्रहि हात भग्न होतील व एक तपस्वी ब्राह्मण तुला ठार मारील' असा त्यानें त्याला शाप दिला ( मत्स्य पु. अ. ४३ ). होमहवनादि नित्यविधि यथासांग चालावा म्हणून सर्व कामधेनूंमध्यें श्रेष्ठ अशी एक धेनू त्याला प्राप्त झाली होती. ती धेनू वसूंनी चोरून नेली. तेव्हां त्याला फार राग आला आणि त्यानें वसूंना शाप दिला ( महाभारत आदिपर्व अ. ९९ ).

**आपस्तंब**—कृष्णयजुर्वेदीय पंधरा अध्वर्युशाखांपैकीं तैत्तिरीय शाखेंतील एक दाक्षिणात्य सूत्रकार. यानें एका उपशाखेचा प्रचार केला. सत्याषाढसूत्र हें हिरण्यकेशीय उपशाखेचें सूत्र आहे. त्याप्रमाणेंच आपस्तंब हें आहे. या दोन सूत्रामध्यें थोडा भेद आहे. या उपशाखेची श्रौत, गृह्य, धर्म, व शुल्ब अशीं चारहि प्रकारचीं सूत्रें प्रसिद्ध आहेत. आपस्तंब हा खिस्तपूर्व कालात होऊन गेला असें खात्रीनें म्हणवत नाहीं. आपस्तंब आपणास अर्वाचीनच समजतो. याच्या हयातींत आंध्र राज्य दक्षिणेंत चालू होतें

**आपस्तंबकल्पसूत्र**—आपस्तंब कल्पसूत्राचे तीस भाग आहेत. या भागास ' प्रश्न ' अशी संज्ञा आहे यापैकीं पहिल्या चोविसांत ' वैतानिक ' यज्ञासंबंधीं माहिती आहे. पंचविसाव्या प्रश्नांत सर्व कल्पसूत्रांच्या परिभाषा दिल्या असून, प्रवरखंड, हौत्रक आणि त्याचें काम याची माहिती आहे. सव्विसाव्यांत गृह्यविधींची माहिती असून सत्ताविसाव्यांत गृह्याग्नि व तत्संबंधीं नियम हीं दिलीं आहेत. अठ्ठाविसांत आणि त्याच्या पुढच्या एक भात कांहीं नियमावलि असून तिसाव्यांत वेदी वगैरे आराव्यांत याची चर्चा केली असून कांहीं भूमितीचीं तत्त्वें दिलीं आहेत. आपस्तंबधर्मसूत्र हा एक कल्पसूत्राचा भाग आहे. यांत चार वर्णांचीं म्हणजे ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र याचीं कर्तव्यें व त्याचप्रमाणें कांहीं कर्में वगैरे कथिलीं आहेत. या सूत्राचा पाया यजुर्वेदांतील तैत्तिरीय संहिता होय. धर्मसूत्र हें ग्रंथाच्या मध्येंच असल्यामुळें अशी सहज शंका येते कीं तें मागाहून लिहिलें गेलें असावें. परंतु ही शंका व्यर्थ आहे. तसें जर असतें तर तो भाग ग्रंथाच्या प्रारंभीं किंवा शेवटीं आला असता. दुसरींहि कित्येक अशीं अनुक्रम प्रमाणें दाखविता येतील कीं त्यावरून सर्व कल्पसूत्राचा कर्ता एकच असला पाहिजे हें सिद्ध होईल. सर्व कल्पसूत्रात एकच विशिष्ट धोरण दिसतें. सत्ताविसावा' प्रश्न ' हा फार लहान आहे. आपस्तंब गृह्यसूत्रांत फक्त गृह्यविधीच दिले आहेत. इतर गृह्यसूत्रांत (उदाहरणार्थ आश्वलायन, शांखायन, गोभिल आणि पारस्कर) पाकसंस्थासंबंधींहि विचार केलेला आढळतो. सत्ताविसावा ' प्रश्न ' लहान आहे. याचें कारण असें कीं इतर भागांत त्या विषयाचें विवेचन करावयाचें होतें. दुसरा मुद्दा असा कीं सर्व कल्पसूत्रांत परस्पर उल्लेख आलेले आहेत. धर्मसूत्रांत कित्येक प्रसंगीं ज्या ज्या वेळीं विधी सांगितले आहेत त्या त्या वेळीं 'यथोपदेशम्' असे शब्द आहेत. कित्येक सूत्रें ' प्रश्न ' आणि धर्मसूत्र यांत एकच आहेत. अर्थात ही पुनरुक्ति वाचकाचें लक्ष जावें एतदर्थच कर्त्यानें केली असली पाहिजे. एतावता धर्मसूत्र हें वेगळें नसून तो मुख्य ग्रंथांतलाच एक भाग आहे. अर्थातच श्रौतसूत्र आणि

धर्मसूत्र हे भाग एकानेंच लिहिले असले पाहिजेत. 'ऋत्वेरा जायामुपायेत्' अशासारखे अशुद्ध प्रयोग सूत्रें दोन्ही ठिकाणी सांपडतात. आता जर दोहोंचा कर्ता एक नाहीं असें मानलें तर दोघेंहि तसाच अशुद्ध प्रयोग करतील हें संभवत नाहीं. अस्तु.

परंतु खरा कर्ता कोण हें कोडें अद्यापि उलगडलें गेलें नाहीं. आपस्तंब हें उपनाव अथवा एका पुरुषाचें नाव आहे. परंतु एवढें खरें आहे कीं आपणास या शाखेचा थोडा बहुत इतिहास व आपस्तंबाचे काहीं ग्रंथ यांची माहिती आहे. चरणव्यूह ग्रंथात खालील माहिती आहे. तैत्तिरीय शाखेंत अंतर्भूत असलेली जी खाण्डिकेय ("खाडिकेय" असा सुद्धा रूपभेद आढळतो.) शाखा, त्या शाखेची आपस्तंब ही एक शाखाआहे. खाण्डिकेय शाखेचे पांच भेद आहेत. "खाण्डिकेयाना पंच भेदा भवन्ति। आपस्तंबी बौधायनी, सत्याषाढी, हिरण्यकेशी औखेयीचेति" असे भेद एकाठिकाणी दिले आहेत. पण "कालेता, शाट्यायनी हैरण्यकेशी भारद्वाज्यापस्तंबीचेति" असाहि पाठ आहे. बोधयानाचीं सूत्रें आपस्तंबाच्या आधीं रचलीं गेलीं आहेत. आपस्तंबाच्या ग्रंथावरून पाहतां तो आपणांस ऋषि किंवा मंत्रद्रष्टा म्हणून म्हणवून घेत नसे. आपस्तंब ब्राह्मण हें तैत्तिरीय ब्राह्मणाचेंच दुसरें एक नाव आहे. तित्तिरी हा वैशंपायनाचा शिष्य असून त्यानें तित्तिरी पक्षी होऊन कृष्ण यजुर्वेद उचलला अशी दंतकथा आहे. आपस्तंबाच्या मतें 'अवर' लोकांत ऋषि जन्मास येणें शक्यच नाहीं केवळ पूर्व जन्मींच्या पुण्याईनें ते ऋषींसारखे होतात. तो स्वतः आपणास कलयुगांत जन्मलेला समजत असे. आपस्तंबाच्या वेळेस यजुर्वेदाच्या सूत्रकालास प्रारंभ झाला होता. आतां सर्व वेदाच्या सूत्रांचाकाल एकचआहे हें मॅक्समुहरचें म्हणणें खोटें असो वा खरें असो आपस्तंबसूत्राचा काल हा वेदकाल नसून तो ख्रिस्तीशकाच्या पूर्वी पाचव्या शतकास किंवा त्यानंतरहि बराच अलीकडे असला पाहिजे.

आतां बौधायन हा आपस्तंबाच्या पूर्वीचा आहे हें पुष्कळ प्रमाणानीं सिद्ध करून दाखविता येईल. (१) कित्येक प्रसंगीं आपस्तंबानें बौधायनाचें म्हणणें खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे, (२) कित्येक ठिकाणीं दोघांचीं सूत्रें जशींच्या तशींच आहेत (आपस्तंब. ध. सू. १. १०, २९; ८-१४). यावरून कोणी कोणाची नक्कल केली असा संशय येईल परंतु इतर प्रमाणानीं तो संशय दूर होतो. काहीं ठिकाणीं आपस्तंबाचीं मतें अगदीं सुधारक थाटाचीं आहेत. परंतु या दोहोंमध्यें किती काल गेला असावा हें सांगता येत नाहीं. महादेवाच्या मतें भारद्वाज हा या दोहोंमध्यें होऊन गेला असावा. बौधायन आणि आपस्तंब यांच्यामधील कालाचें अंतर शतकांनीच मोजलें पाहिजे. त्याचप्रमाणें आपस्तंब हा सत्याषाढ अथवा हिरण्यकेशिन् याच्या पूर्वीचा असला पाहिजे, कारण त्यानें आपस्तंबाच्याच सूत्रांचा थोडाबहुत फेरबदल करून संग्रह केला आहे. हिरण्यकेशीय गृह्यसूत्र आणि धर्मसूत्र याचा मेळ बसत नाहीं. मातृदत्तानें गृह्यसूत्रावर व महादेवानें धर्मसूत्रावर टीका लिहिल्या आहे. ते दोघेहि ओढाताण करून दोहोंचा कर्ता एकच आहे असें म्हणतात, कित्येक ठिकाणीं संकल्पांत "आपस्तंबान्तर्गत हिरण्यकेशी शाखाध्यायी" असें वाक्य आढळतें. यावरून आपस्तंब हा आधींचा आहे हें निराळें सांगावयास नकोच. दोहोंमधल्या कालाचें अंतर सुमारें शेंदोंडशें वर्षे असावें. या सर्व प्रमाणावरून असा निष्कर्ष निघतो कीं कृष्णयजुर्वेदाच्या सूत्रकालाच्या मध्यें कोठें तरी आपस्तंबाचा काल असावा आपस्तंबानें चारहि वेदांतील वचनें उद्धृत केलीं आहेत ऋग्वेद आणि सामवेद यापेक्षा यजुर्वेदांतील बरींचशीं वचनें उद्धृत केलीं गेलीं आहेत. श्रौतसूत्रांत शुक्लयजुर्वेदांतलि वचनें आहेत. अथर्ववेदांतील वचनें श्रौत वाङ्मयांत विशेष आढळून येत नाहींत, आपस्तंब धर्मसूत्रांत तर तें एकच आहे.

आपस्तंबानें आपल्या धर्मसूत्रांत नऊ आचार्यांचा उल्लेख केला आहे ते कण्व, काण्व, कुणिक, कुत्स, कौत्स, पौष्करसादि, वार्ष्यायणी, श्वेतकेतु आणि हारित हे होत. यापैकीं कांहींचा उल्लेख निरुक्तांत आहे, व कांहींचा पाणिनीच्या सूत्रांवर जीं वार्तिकें आहेत त्यांत आहे. यापैकीं कण्व आणि हारित हे सूत्रकार आहेत. आपस्तंबास पूर्वमीमांसा आणि वेदांत याची चांगली माहिती होती. प्रत्यक्ष जैमिनीच्या मीमांसासूत्राची त्याला माहिती नसेल परंतु तशाच कोणच्या तरी ग्रंथाची असली पाहिजे. त्याचप्रमाणें केवळ उपनिषदें आणि आरण्यकें यांतील माहिती होती असें नाहीं तर बादरायणाच्या सूत्राप्रमाणेंच पद्धतशीर रीतीनें मांडलेल्या वेदांततत्त्वाचीहि त्याला माहिती होती.

आपस्तंबानें पुराणाचाहि आधार कित्येक ठिकाणीं दिला आहे. व नुसतें पुराणांत आहे इतकेंच सांगून न थांबतां त्या विशिष्ट पुराणाचें नावहि दिलें आहे भविष्यपुराण हें 'उपपुराण' आहे; त्याचा उल्लेख केला आहे परंतु हल्लींच्या भविष्य पुराणांत आणि त्यांत साम्य दिसत नाहीं. सर्व पुराणांत पुढें बरेच फेरबदल झाले असावे असें यावरून दिसतें.

शूद्र आणि स्त्रिया यांना अर्थशास्त्राचें ज्ञान असावें असें त्याचें मत आहे (अर्थशास्त्र पहा) अर्थशास्त्रांत गायन, वादन, नर्तन, कला, व्यापार इत्यादिकांचा समावेश होतो. मधुसूदनसरस्वतीनें आपल्या प्रस्थानभेदांत अर्थशास्त्रास अथर्ववेदाचा 'उपवेद' म्हटलें आहे. यावरून आपस्तंब हा अलीकडचा असावा असें अनुमान निघतें.

आपस्तंब शाखेची जुन्या संस्कृत वाङ्मयांत कोणची जागा होती याचें आतापावेतों विवेचन झालें. आतां हिंदुस्थानाच्या कोणत्या भागांत या शाखेची परंपरा होती व आहे तें पाहूं. चरणव्यूहभाष्यांत आणि महार्णव ग्रंथांत पुढील माहिती दिली आहे: हिंदुस्थान हा देश नर्मदा

नर्दानें विभागला गेला असून आपस्तंब शाखेचा प्रसार नर्मदेच्या दक्षिण भागात आहे. पुढें असेंहि म्हटलें आहे कीं, तैत्तिरीय आणि आपस्तंब शाखा या मुख्यतः आंध्र देशात असून त्याचा प्रसार उत्तरेस गोदावरी नदीपावतों आहे. हें वर्णन वस्तुस्थितिद्योतकच आहे. महाराष्ट्र, कानडा, निजाम सरकारचा प्रांत आणि उत्तरसरकार हा प्रांत वगळला असतां संपूर्ण मद्रास इलाखा या प्रांतात या शाखेचा प्रसार आहे. देशस्थ ब्राह्मणाशिवाय कोंकणातले कांहीं चित्तपावन ब्राह्मणहि आपस्तंबीय आहेत असें एक ग्रंथकार म्हणतो पण तें चुकीचें आहे. गैरसमजानें हिरण्यकेशीयास आपस्तंब म्हणतात. उत्तरहिंदुस्थान आणि मध्यप्रांत या भागात ही शाखा दिसून येत नाहीं. क्वचित स्थलीं जेथें मराठा सरदाराच्या बरोबर इकडचे ब्राह्मण गेले आहेत तेथें या शाखेचे लोक आहेत. परंतु तेथील मूळच्या रहिवाशाचा यांच्याशी बेटीव्यवहार होत नाही. गुजराथेंत नागर, खडावल, भार्गव, कपिल, मोताल वगैरे लोक शुक्लयजुर्वेदाच्या माध्यंदिन अथवा कण्व शाखेचे आहेत. राजपुताना, हिंदुस्थान आणि पंजाब या देशात हीच स्थिति आहे. मध्यप्रांतात कोठें कोठें मैत्रायणीय शाखेचे लोक आहेत. पूर्वी राजे लोकानीं ब्राह्मणांना ज्या जमीनी दिल्या आहेत त्याच्या शासनपत्रातूनहि हीच गोष्ट दिसून येते.

आपस्तंब हा स्वतः दाक्षिणात्य होता. कारण तो ठिकठिकाणीं म्हणतो कीं 'उत्तरेकडील लोक असें असें करितात' या शोधावरून हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासावर बराच प्रकाश पडतो. जुनी संस्कृति व परंपरा याचें मूलस्थान हिंदुस्थानच्या वायव्य दिशेस अथवा फार झालें तर विंध्याचलाच्या उत्तरेस होतें. दक्षिणेंतले कलिंग, द्रविड, आंध्र, चोल आणि पाड्य या देशांनीं या संस्कृतींत विशेषसा भाग घेतला नव्हता. ब्राह्मणें आणि सूत्रें यांत याचा उल्लेख नाहीं. ऐतरेय ब्राह्मणांत दक्षिणेकडल्या ( व त्यांतच आंध्र देश आहे ) कांहीं रानटी जातींचा उल्लेख आहे. बौधायनानें आपल्या धर्मसूत्रांत ( १ ) असें म्हटलें आहे कीं कलिंग देशांत कोणी गेल्यास त्यानें यज्ञ करून शुद्ध झालें पाहिजे. पाणिनीच्या अष्टाध्यायींत आणि कात्यायनाच्या वार्तिकांत चोल आणि पाड्य यांचा उल्लेख आहे. कित्येक खोदकामें व नाणीं यांवरून असें सिद्ध होतें कीं इसवीसनापूर्वी दुसऱ्या शतकांत आंध्र देश फार भरभराटींत असून त्याची राजधानी कृष्णा नदीच्या काठीं कोठें तरी असावी. त्या देशातील राजानीं बुद्धधर्मास जरी आपली मदत दिली तरी ते सनातन ब्राह्मण धर्माचे अनुयायी होते. कित्येकाना 'वेदश्री' आणि 'यज्ञश्री' म्हणण्याचा परिपाठ असे. तिसऱ्या शतकापासून या दक्षिणेंतील देशांचा पूर्ण इतिहास आपणांस उपलब्ध आहे.

एवढें मात्र आपणास निःसंशय म्हणतां येईल कीं आर्यन् लोकांनीं दक्षिण देश जिंकून तेथें आपली सुधारणा स्थापिली परंतु उत्तर हिंदुस्थानच्या सुधारणेच्या मानानें पाहता ती फार उशीरां झाली. अर्थात् कोणत्या शतकांत ती झाली हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. आर्यन् लोकांनीं तो देश जिंकिल्यानंतर बराच काळ लोटला असावा यावरून आपस्तंबाचा व त्याप्रमाणें दाक्षिणेंतील इतर वाङ्मयाचा काल फार अलीकडला असला पाहिजे. म्हणजे इसवीसनापूर्वी आंध्र देशात जेव्हा ब्राह्मण राजे राज्य करीत होते तेव्हा तो असावा. परंतु जॉर्ज ब्यूलर आणि मॅक्समुल्लर यांच्या मतें हें विधान चुकीचें आहे. याला ते धर्मसूत्रात आलेल्या 'श्वेतकेतु' शब्दाचा आधार दाखवितात. या श्वेतकेतूचा उल्लेख शतपथ ब्राह्मण आणि छांदोग्योपनिषद् यामध्यें आलेला आहे आणि तो 'अवर' होता म्हणजे अर्वाचीन अथवा समकालीन होता. हा श्वेतकेतु मॅक्समुल्लरच्या मतें शुक्लयजुर्वेदाचा याज्ञवल्क्य व विदेहराजा जनक याना समकालीन होता. आणि ज्या अर्थी आपस्तंब हा श्वेतकेतूस 'अवर' म्हणतो त्या अर्थी आपस्तंब आणि श्वेतकेतु यामध्यें फार झालें तर दोन अथवा तीन शतकाचा काल लोटला असावा. यावरून आपस्तंबाचा काल मागें लोटला पाहिजे. हें अनुमान दुसऱ्याहि गोष्टीवरून सिद्ध करता येईल. आणि ती म्हणजे सूत्राचें भाषावैशिष्ट्य होय. या सूत्रातले कांहीं शब्दप्रयोग वैदिक आहेत, कांहीं पाणिनीनें मुद्दाम बनविलेले आहेत तर कांहीं अपाणिनीय आहेत. वाक्यरचनेंतहि बराच फेरबदल दिसतो. एवढ्याशा लहानशा धर्मसूत्रात अपाणिनीय प्रयोग बरेचसे आल्यामुळें असें अनुमान निघतें कीं आपस्तंब हा पाणिनीच्या पूर्वीचा असावा. निदान पाणिनीचें व्याकरण प्रचारात येण्यापूर्वीचा असावा. तेव्हा आपस्तंबाचा काल इसवी सनापूर्वी तिसरें शतक असावा. आपस्तंब धर्मसूत्राचा उल्लेख पहिल्यानें विज्ञानेश्वराच्या मिताक्षरेंत सापडतो. या धर्मसूत्रावर हरदत्तानें सोळाव्या शतकात 'उज्ज्वलावृत्ति' नामक टीका लिहिली आहे. या पूर्वीहि बऱ्याच टीका झाल्या असल्या पाहिजेत हें हरदत्तानें 'अन्ये' 'अपरे' इत्यादि केलेल्या शब्दप्रयोगावरून कळतें.

कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचेच आपस्तंब, वैखानस, बौधायन, भारद्वाज, वाधूल व हिरण्यकेशी हे सूत्रभेद आहेत. या प्रत्येक सूत्राचे श्रौत, गृह्य व धर्म असे भाग आहेत. वरील सर्व सूत्रात कर्मपरत्वें थोडथोडा फरक आहे ( बौधायन पहा. ) आज लोकात ऋग्वेदी व त्याच्या जोडीला आपस्तंब असा उल्लेख केला जातो व तो सर्व कृष्णयजुर्वेदाचें अध्ययन करणारांना उद्देशून केला जातो. परंतु कृष्णयजुर्वेदाचें अध्ययन वरील सर्व सूत्राचे लोक करतात. आपस्तंब हे सामान्यतः देशस्थ आहेत व हिरण्यकेशी हे कोंकणस्थ आहेत.

**आपिशली**-एक प्राचीन संस्कृत वैय्याकरणी. व्याकरणावर याचा ग्रंथ आहे. पाणिनी, कैय्यट, बोपदेव इत्यादि ग्रंथकार याचा उल्लेख करितात. हा यास्कानंतर व पाणिनी-

पूर्वी म्हणजे इ. स. पू. ८ व्या शतकांत होऊन गेला असावा.

**ऑप्पर्ट ज्यूलियस ( १८२५-१९०५ )**—हा प्राचीन असुरी संस्कृतीचा जर्मन अभ्यासक हॅम्बर्ग येथें ९ जुलै १८२५ रोजीं जन्मला. त्याचे आईबाप ज्यू होते. हायडेलबर्ग, बॉन व बर्लिन येथें अभ्यास करून तो कील येथें १८४७ मध्यें ग्रॅज्युएट झाला. पुढील सालीं तो फ्रान्समध्यें गेला व तेथें लाव्हाल व र्‍हीस येथें जर्मन भाषेचा शिक्षक बनला व फावल्या वेळात प्राच्य विद्यांचा अभ्यास करूं लागला. १८५२ मध्यें फ्रेसनेलबरोबर मेसापोटेमियांत पुराणवस्तुसंशोधनाच्या कार्यार्थ तो गेला. १८५४ मध्यें स्वदेशीं परत आल्यावर तिकडून आणलेल्या कीलाकृति लेखाचा त्यानें स्वतः चांगला अभ्यास केला व १८६१ मध्यें तत्संबंधीं एक महत्वाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. १८५७ मध्यें पॅरिसमधील नॅशनल लायब्ररीला जोडून असलेल्या भाषा शिकविण्याच्या शाळेंत संस्कृत भाषेचा प्रोफेसर म्हणून नेमला गेला व त्या वेळीं त्यानें संस्कृत भाषेचें व्याकरणविषयक एक पुस्तक लिहिलें. तथापि त्याचें विशेष लक्ष असुरियाच्या प्राचीन अभ्यासाकडे होतें. असुरियांतील मूळ भाषा तुराणी भाषावंशातील आहे, हा त्याचा महत्वाचा शोध होय १८६९ मध्यें आप्पर्टला ' कॉलेज डी फ्रान्स ' या संस्थेंत तौलनिक भाषाशास्त्राचा व पुराणवस्तुशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यांत आलें १८६५ मध्यें त्यानें असुरिया व खाल्डिया या देशांसंबंधीं अनेकांनीं केलेल्या संशोधनाच्या साहाय्यानें एक इतिहास लिहिला त्यानंतर त्यानें प्राचीन मीडियाची भाषा व इतर प्राचीन गोष्टी यासंबंधीं पुष्कळ अभ्यास करून १८७९ मध्यें एक पुस्तक लिहिलें तो पॅरिस येथें २१ ऑगस्ट १९०५ मध्यें मरण पावला ऑप्पर्टनें असुरियाच्या पौराणिक कथा व कायदे यासंबधानें तसेंच इतर प्राच्य देशांतील प्राचीन संस्कृतीसंबंधानें बरेंच लिहिलें आहे

**आप्पाकवि**—हा कवि तैलगणांत रहात असे यानें तेलगू भाषेंत छंदःशास्त्रावर 'आंध्रप्रयोगरत्नाकर' आणि 'वृंदा संभावना काव्य' असे दोन ग्रंथ रचिले पहिला ग्रंथ तेलगू छंदःशास्त्र व भाषाशास्त्र यावर फार उत्कृष्ट असून लोकमान्य आहे. दुसऱ्या ग्रंथांत भागवतांतील वृंदेची कथा वर्णिली आहे. या कवीच्या कालासंबंधीं माहिती नाहीं [ कविचरित्र. तेलगू वाङ्मय अ. कोश ]

**आप्पा देसाई निपाणकर**—याचें मूळ नाव सिधोजीराव निंबाळकर हा प्रथम दौलतराव शिंद्याच्या पदरीं नोकर होता. इ स. १८०० सालीं दौलतराव शिंद्यानें आप्पा देसायाच्या हाताखालीं आपल्या पलटणी देऊन त्यास परशुरामभाऊ पटवर्धनाची जहागीर कामीव करण्याकरितां रवाना केलें देसायाच्या सैन्यापैकीं पायदळाच्या पलटणी परत फिरल्या पण देसायाच्या फौजेनें पटवर्धनाच्या मुलुखांत बरीच लुटालूट केली. १८०३ सालीं जनरल वेलस्ली हा म्हैसूरच्या उत्तर सरहद्दीवरून बाजीरावास मसनदीवर बसविण्याकरितां पुण्याकडे येत असतांना आप्पा देसाई हा कृष्णा नदीच्या तीरीं त्यास येऊन मिळाला. बाजीरावाच्या पदरीं बापू गोखले वगळल्यास आप्पा देसाई हा एकटाच उत्तम सेनानायक होता इ स १८०८सालीं आप्पा देसायानें विश्वासराव घाटग्यास मदत करून त्याच्या ताब्यात असलेल्या चिकोडी व मनोळी या जिल्ह्यांचें कोल्हापूरकरापासून रक्षण केलें. परंतु पुढें बाजीरावाकडून त्याला फूस मिळाल्यामुळें त्यानें हे दोन्हीहि जिल्हे आपल्याच कबजांत घेतले याच सुमारास कोल्हापूरच्या सैन्यानें सावंताच्या वाडीस वेढा दिल्यामुळें खेम सावंताची बायको लक्ष्मीबाई हिनें विश्वासराव घाटगे व आप्पा देसाई यांना आपल्या मदतीस बोलाविलें स्वतः बाजीरावाचीच या गोष्टीस गुप्तपणें संमति मिळाल्यानें आप्पा देसायानें ती तात्काळ कबूल केली तो लक्ष्मीबाईच्या मदतीस गेला व वाडीचा वेढा उठवून त्यानें घाटावरील कोल्हापूरकराच्या मुलुखावर स्वारी केली आप्पा देसाई आतां सावंतवाडी संस्थानावरहि आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करूं लागला. आप्पा देसायाच्या कारकुनाच्या चिथावणीवरून खेम सावंताच्या मुलाचा गळा दाबून प्राण घेण्यांत आला, परंतु या खुनामुळें आप्पा देसायाचा मुळींच फायदा झाला नाहीं. कारण फोंड सावंत नावाच्या सावंताच्या घराण्यांतील वारसदार इसमानें आप्पा देसायाचें बहुतेक सैन्य घाटांवर कोल्हापूरकराशीं लढण्यांत गुंतलेलें आहे ही संधि साधून आपल्या मुलुखांत असलेलें त्याचें सर्व सैन्य देशाबाहेर हाकून लावलें व संस्थानचा कारभार आपल्या हातीं घेतला बाजीरावाच्या कपटीपणामुळें इ. स १८१३ च्या सुमारास आप्पा देसायास विनाकारण आपल्या चतुर्थांश जहागिरीस मुकावें लागलें

बाजीरावाच्या गुप्त उत्तेजनामुळें त्यानें कोल्हापूरकरांचा कांहीं मुलुख सोडण्याचें नाकबूल केल्यावरून इंग्रजांनीं त्याजकडून त्याची चतुर्थांश जहागीर बाजीरावास देवविली

तथापि यापुढेंहि कांहीं वर्षें आप्पा देसाई हा बाजीरावाच्याच पक्षास चिकटून होता ता १ जानेवारी १८१८ रोजीं कोरेगावची लढाई झाली, तींत हा पेशव्याच्याच बाजूनें लढत होता आप्पा देसाई हा बाजीरावाचा एक नाणावलेला सेनापति होता तरी बाजीरावाचें राज्य इंग्रजांनीं घेतल्यावर त्यांनीं आप्पा देसायाची जहागीर खालसा केली नाहीं कारण एक तर आप्पा देसाई हा पेशव्याला बऱ्याच उशीरा मिळाला होता. शिवाय तो इंग्रजाविरुद्ध नेटानें असा कधींच लढला नव्हता आणि एके प्रसंगीं तर त्यानें इंग्रजाकडील कैद्यास दयाळूपणानें वागविलें होतें पेशव्याशीं युद्ध चाललें असतांच त्याचा इंग्रजाशीं पत्रव्यवहार सुरू होता परंतु त्यानें पेशव्याचा पक्ष बऱ्याच उशीरा सोडल्यामुळें त्याला त्याच्या जहागिरीपैकीं चिकोडी व मनोळी हा भाग कोल्हापूरकरास परत करण्यास आला व शिवाय निजामाच्या राज्यांतीलहि त्याचें बरेंच उत्पन्न बुडालें. बाकीची त्याची

जहागीर त्याने त्याला परत देण्यात आली व निजामाच्या राज्यांतील उत्पन्न बुडल्यामुळे झालेल्या नुकसानीचीहि अंशतः भरपाई करून दिली गेली [मांटडफ.]

**आप्पा बळवंत**—( इ. स १७४८–१७९८ ) पेशवाईतील सरदार व शिलेदार (कृष्णराव बळवंत मेहेंदळे पहा).

**आप्री**—श्रौतकर्मातील पारिभाषिक शब्द. ऋग्वेदातील कांहीं सूक्तांना ही संज्ञा आहे. या संज्ञेचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत (५.१,८) आला असून तेथें त्यासंबंधीं एक आख्यायिका आहे ती अशीः—" प्रजा उत्पन्न करून प्रजापति श्रमित झाला असतां अप्रींच्या योगानें आपले श्रम नाहींसे होतील असें वाटल्यावरून त्यानें प्रथम आप्रीसंबंधीं याग केला." या कारणावरून पशुयज्ञामध्यें प्रथम आप्री सूक्तांतील प्रत्येक ऋचा पठण केली जाऊन प्रयाज नामक याग होतो 'अप्री सूक्ताचें ऋग्वेदांतील स्थान आणि आप्रींचा गोत्रप्रवराशीं, नराशंस व तनूनपात् या देवताशीं व त्याच्या अनुषंगानें आकाशातील सप्तर्षींशीं संबंध' यासंबंधीं सविस्तर विवेचन पूर्वी (विभाग तीन पृष्ठ ४९१ येथें) केलें आहे.

**आप्यन** ('युपिअन')—आप्यन हा एक उत्कर्ब (हायड्रोकार्बन) आहे. तो वसा (पॅराफिन) वर्गातील असून बहुधा पेंचुन (पिन्टेन) क५ उ१२ असावा. याचा शोध के रीचेनबाश यांनीं लाकडाच्या डामरांत लावला. हा पदार्थ लाकूड, दगडी कोळसा, रबर, हाडें, राळ, आणि स्थिर तेलें यांचें निर्मल व शुष्क पातन केलें म्हणजे त्याच्या पातनांत (डिस्टिलेटमध्यें) येतो. हा वर्णहीन असून अत्यंत बाष्पभावी (व्होलटाईल) आहे. तसाच तो ज्वालाग्राही रसरूप (लिक्किड) असून त्याचें २०° उष्णतामानावर वि. गु ०.६५ असतें.

**आफ्रिका**—हें एक मोठें विस्तीर्ण खंड आहे ह्या खंडासभोंवतीं जिकडे तिकडे समुद्र आहे. भूपृष्ठाच्या दक्षिणेकडे झुकलेल्या मुख्य तीन भागांपैकीं हें सर्वांत मोठें आहे. किनाऱ्यालगतचीं बेटें सोडून या खंडाचें क्षेत्रफळ १,१२,६२,००० मैल आहे. आफ्रिका हिंदुस्थानच्या सहापट आहे आफ्रिका व यूरोप या दोन खंडांमध्यें भूमध्यसमुद्र आहे. आशिया व आफ्रिका हीं दोन्ही खंडें सुवेझच्या संयोगीभूमीनें पूर्वी जोडिलीं होतीं. याची दक्षिणोत्तर लांबी म्हणजे 'रास बेन साक्का' या अगदीं उत्तरेच्या टोंकापासून तों अगुल्हास भूशिरापर्यंत ५००० मैल आहे, व पूर्वपश्चिम लांबी व्हर्डे भूशिरापासून तों रास हाफूनपर्यंत ४६०० मैल आहे भूपृष्ठस्वरूपाचें अवलोकन करितां या खंडाचे त्याच्या रचनेप्रमाणें उत्तरआफ्रिका व दक्षिणआफ्रिका असे दोन भाग करतां येतील

या खंडाची सर्वसाधारण उंची सुमारें दोन हजार फुटांपर्यंत येईल. जरी या खंडांत दहा हजार फुटांपेक्षां उंच पर्वत अथवा पठारें नाहींत, तरी उंचवट्याचे प्रदेश हें एक या खंडाचें वैशिष्ट्य आहे असें म्हणतां येईल. हे उंचवट्याचे प्रदेश पूर्वेस व दक्षिणेस आहेत व उत्तरेकडे व पश्चिमेकडे प्रदेशाची उंची हळू हळू कमी कमी होत गेली आहे. या खंडाचे स्वाभाविकरीत्या चार मुख्य भाग पडतात;ते असेः—(१) किनाऱ्यालगतचा सपाट प्रदेश, येथें बहुतेक दलदल असते व "मॅनग्रोव्ह" वनस्पतीचें दाट जंगल यांत माजलेलें असतें किनाऱ्याचा प्रदेश सखल होत जाणाऱ्या उंचवट्याच्या भागाच्या शेवटच्या पायऱ्या आहेतसें कांहीं ठिकाणीं दिसतें. (२) उत्तरेकडील "अटलस" पर्वताची राग हा दुसरा एक महत्त्वाचा भूभाग होय. हा एकसारखा उंच प्रदेश नसून दूरपर्यंत फार सखल आहे व कांहीं ठिकाणीं तर समुद्रसपाटीपेक्षांहि खोल असे भूभाग आहेत. (३) दक्षिण व पूर्व या भागांत असलेल्या उंच पठारांची साधारण उंची ३५०० फूट आहे. (४) उत्तरेस व पश्चिमेस सपाट प्रदेश आहेत त्यांभोंवतीं किनाऱ्याच्या आंत उच्च भागाचे पट्टे आढळतात.

पर्वतः—या खंडाच्या दक्षिण भागांत पश्चिमेकडे जमिनीचा भाग खचल्यासारखा होऊन एक सरोवराची माळ तयार झाली आहे या मालिकेच्या पश्चिमेस किलीमांजारो पर्वत आहे. त्याचीं 'मावेन्झी' व 'किबो' हीं दोन शिखरें आहेत. त्यामध्यें किबो हें शिखर आफ्रिकेंत अतिउंच आहे याची उंची १९,३२१ फूट आहे. दुसरा केनया पर्वत,याची उंची १७००० फूट आहे. या मालिकेच्या पूर्वेस 'रुवेनझोरी'नावाची डोंगराची राग आहे. 'किव्हु' सरोवराच्या उत्तरेस 'किरुंगा' नावाचा ज्वालामुखी पर्वतसमूह आहे, त्यापैकीं कांहींचीं मुखें मध्या जागृतावस्थेंत आहेत.

या खंडाच्या पूर्वेस व पश्चिमेस उंचवट्याच्या भागाचे पट्टे किनाऱ्याशीं समांतर पसरलेले आहेत. ॲबिसीनियांतील पर्वताचा कांहीं भाग तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यास लागून आहे. सर्वांत उंचवट्याचा प्रदेश 'गीनीच्या' आखाताच्या जवळ आहे व तेथें ६००० ते ८००० फूट उंचीचीं शिखरें आढळतात. त्यांत कॅमेरूनचें शिखर सर्वांत उंच आहे अगदीं पश्चिमेकडे 'फुटा जालन' नावाची उच्च भूमि आहे. हीमध्यें व अटलस पर्वताच्या रागेमध्यें मात्र उंचवट्याच्या जमिनीचा पट्टा सांपडत नाहीं.

पश्चिमेच्या व पूर्वेच्या उंच भागामध्यें जो या खंडाचा प्रदेश आहे त्याचे सहजगत्या दोन विभाग होतात.(१) कांगो नदीच्या थडीचा प्रदेश; याच्या आकारावरून येथें पूर्वी समुद्र असावा अशी शंका भूगोलवेत्त्यास येते. (२) उत्तरेस साहाराचें प्रसिद्ध वाळवंट आफ्रिकेच्या पूर्वटोंकापासून पश्चिमेकडे तांबड्या समुद्रापर्यंत पसरलेलें आहे व आफ्रिकेचा उत्तर भाग यानेंच व्यापलेला आहे.

नद्या.—आफ्रिकेच्या उंचवट्याच्या भागांतूनच तेथील नद्यांचा उगम होतो. बहुतेक नद्यांचे प्रवाह लांबीनें लहान

रात्रीच्या उष्णतेच्या प्रमाणांत फारच अंतर असतें रात्रीं केव्हां केव्हां पाणी गोठण्यापर्यंत थंडी पडते

दक्षिण आफ्रिकेंत उष्णता कमी असते, याचें असें कारण आहे कीं, मोठमोठ्या महासागराच्या सान्निध्यामुळें येथाल अरुंद प्रदेशाच्या हवेंत दमटपणा येऊन त्यातील उष्णता माफक होते उत्तरेचा प्रदेश फारच विस्तीर्ण असल्यानें समुद्रावरून आलेल्या वाऱ्याचा अंत प्रदेशात दूरवर शिरकाव होत नाहीं म्हणून अगदीं किनाऱ्यालगतच्या भागात उष्णतामान कमी असतें साहाराच्या वाळवटात पाऊस फारच कमी पडतो विषुववृत्ताच्या आसपास व अबिसीनियाच्या उच्च प्रदेशात व नाईल नदाच्या थडींत फार पाऊस पडतो सर्वांत जास्त पाऊस गीनीच्या आखाताजवळच्या भागात पडतो. कॅमरून पर्वतावर ३९० इंच पाऊस पडतो पावसाचे पट्टे पश्चिमेकडून पूर्वेकडे गेलेले दिसतात. पूर्वेकडील किनाऱ्यालगतच्या भागात हवामान व पाऊस उत्तरेकडील प्रदेशातल्या प्रमाणें असतो विषुववृत्ताच्या आसपास दोनदा पावसाळा येतो साहारा वाळवटाच्या सीमेवर असलेल्या प्रदेशात अति उष्ण व वालुकामय वारे वाहातात अगदीं उत्तरकडाल व दक्षिणेकडील भागात हवा आरोग्यकारक असते त्याचप्रमाणें साडेसहा हजार फूट उंचीवरच्या भागात निरोगी थंड हवामान असतें दलदलीच्या भागात विषारी डास असल्यामुळं तेथें तापाच्या साथी नेहमी सुरु असतात हा भाग विषुववृत्ताच्या आसपासचा प्रदेश होय काहीं भागात 'त्से' नावाच्या एक प्रकारच्या माशा चावल्यानें निद्रारोग होऊन मृत्यु येतो

प्राणी —वनस्पतींच्या वैशिष्ट्यावर प्राण्यांचें वसतिस्थान अवलंबून असतें गवताळ माळरानासारख्या सपाट भागात हरिणें, जिराफ, झाब्रा, रानरेडे, रानगाढवें, गेंड वगैरे प्राण्याचें वसतिस्थान असतें त्याचप्रमाणें तीं ज्याचीं भक्ष्य आहेत असे हिंस्र प्राणी तेथेंच असतात. सिंह, चित्ता, तरस अस्वलें, खोकडें व लांडगे इत्यादि हिंस्र पशू अटलस पर्वताच्या भागात राहतात कुरणात व दाट अरण्यात हत्ती कळप करुन राहतात याखेरीज बबून, मोडराल सपुच्छ व विपुच्छ माकडें हीं गवताच्या माळरानात असतात मोठ्या नद्या हें पाणघोडें नक्र वगैरे जलचर प्राण्याचें वसतिस्थान होय दक्षिण यूरोपात सापडणारे बहुतेक पक्षी आफ्रिकेंत आढळतात पण शहामृग व सेक्रेटरी ह्या दोन जातींचे पक्षी मात्र या खंडातच असतात विषारी साप, विंचू यांच्या पुष्कळ जाती विषुववृत्तात आहेत टोळ, वाळवी, याचा काहीं भागात अतोनात उपद्रव होतो दक्षिण व पूर्व आफ्रिकेंत काहीं जागीं निद्रारोगकारक 'त्से' माशा आहेत त्याच्या दंशानें सर्व पाळीव प्राणी मरतात.

भू स्त र शा स्त्री य मा हि ती —भुस्तरशास्त्रदृष्ट्या व आकृतींत आफ्रिकेचें हिंदुस्थान देशाशीं पुष्कळ साम्य आहे दोहोंमध्यें मोठालीं पठारें आहेत दोन्ही उत्तर भागात रुंद असून दक्षिणेकडे निमुळतीं होत जातात आफ्रिकेचा मध्य भाग म्हणजे उंच पठार आहे या पठाराची कड समुद्रकाठाशीं समांतर आहे पठाराच्या भोंवतीं एक कमी उंचीचा पट्टा आहे व या पट्ट्याच्या पायथ्याशीं समुद्रकाठची सपाट जमीन आहे

आहेत ज्या काहीं थोड्या मोठ्या नद्या आहेत त्यांचे प्रवाह उच्चप्रदेशातून बाहेर पडण्यापूर्वी बरेच दूरवर तेथेच वहात गेलेले दिसतात मुख्य नद्यांचे उगम उत्तरेच्या व पश्चिमेच्या भागात आढळतात नाईल व कांगो नद्यांचें उगमस्थान म्हटलें म्हणजे या खंडांतील सरोवरांचें पठार होय नाईल नदी हीं लांबीनें सर्वांत मोठी आहे. या नदीचा उगम भूमध्यरेषे-लगतच्या मध्य आफ्रिकेच्या डोंगराळ भागात होतो येथून उगम पावून या नदीचा प्रवाह 'व्हिक्टोरिया नायाझा' सरोवरास मिळतो यापुढें नाईल नदीस (५° १०') मोठ्या दलदलीच्या प्रदेशातून व्हात जाताना 'अबिसीनियाच्या' आहेत 'बेबीशेबिला' ही नदी किनाऱ्यापर्यंत वाहात येऊन तेथील वाळवटात नाहींशी होते त्याच प्रमाणें हॉवाश नदी अबिसीनियाच्या उच्च प्रदेशांत उगम पावून एडनच्या आखाताजवळील वालुकामय भागात गुप्त होते वरील नद्या सोडून, सरोवरास मिळणाऱ्या नद्या अन्याच आहेत त्यांत "ओमो" नदी अॅबिसीनियाच्या पठारातून निघून रूडाल्फ सरोवरास मिळते आफ्रिकेंतील बहुतेक नद्यांच्या मुखाशीं मृत्तिकावध प्रवाहाबरोबर आलेल्या गाळानें तयार होतो. व या नद्यात त्या उच्च प्रदेशातून आल्यामुळें धबधबेहि असतात या सर्व अडचणी पार पडल्यावर गलबतें व्यापारा करता दूर जाऊ शकतात

**सरोवरें**—आफ्रिकेंत पूर्वेकडील उच्च प्रदेशात बरीच सरोवरें आहेत हीं सरोवराची साधारण अर्धवर्तुलाकार मालिका या पठाराच्या कवचाचा काहीं भाग खचून झाली असावी असें भूगोलवेत्त्यांचें मत आहे दक्षिणेत न्यासा व त्याच्या उत्तरेस टांगानिका कीव्हु,आलबर्ट एडवर्ड व आलबर्ट हीं सरोवरें आहेत. टांगानिका हें पृथ्वीवरील गोड्या पाण्याच्या सर्व सरोवरात मोठें आहे. याची लांबी ४०० मैल, व रुंदी ३०–४० मैल आहे हें किती खोल आहे हें नक्की सांगता येत नाहीं याशिवाय आबिसीनियात रूडाल्फ, व्हिक्टोरिया नायाझा चाड वगैरे सरोवरें आहेत चाड हें पश्चिमेस आहे न्यासा हें ४३० पुरुष खोल आहे. बाकीचीं उथळ आहेत. व्हिक्टो-रिया नायाझा हें फक्त ५० वाव खोल आहे न्यासा व टांगा निका सरोवराच्या राजू कड्यासारख्या उभ्या वर गेल्या आहेत ऋतुमानातील फरक सोडून या सरोवरातील पाण्याची सपाटी खालींवर होत असते. कितीएक शतका-पासून हीं सुकावयास लागलीं आहेत या सरोवराच्या उत्पत्तीबद्दल बराच मतभेद आहे. येथें समुद्रात सापडणारे जलचर प्राणी आढळतात, म्हणून हा (अंतर्गत) प्राचीन समुद्राचा भाग असावा असे काहींचें मत होतें. पण अर्वाचीन शोधावरून हें चुकीचें आहे असें समजतें

**बेटें**—मादागास्कर बेटाशिवाय बाकी सर्व बेटें अगदीं लहान आहेत मादागास्कर बेटाचें क्षेत्रफळ २२९८२० मैल आहे हें आफ्रिकेच्या आग्नेयीस आहे याच्या पूर्वेस मारिशस व रियुनियन हीं आहेत वायव्येस केनरी व केपव्हर्डचा द्वीपसमूह हीं आहेत. हीं सर्व ज्वालामुखीपर्वताच्या क्रिये-मुळें झालीं आहेत

**हवापाणी**—हे खंड उष्णकटिबंधात आहे. या खंडा-तून भूमध्यरेषा जाते हवामान पावसावर, उंचीवर, व समुद्र-सान्निध्यावर अवलंबून आहे. दक्षिण आफ्रिकेपेक्षां उत्तर आफ्रिका जास्त उष्ण आहे वालुकामय प्रदेशात व सखलात असलेल्या सपाट भागास उष्णतामान फारच अधिक असतें. साहाराच्या वाळवटात हवा अतिशय विरळ असल्यानें व किरणरूपाने उष्णता लवकर बाहेर गेल्यानें, दिवसाच्या व

आहेत. ज्या कांहीं थोड्या मोठ्या नद्या आहेत त्यांचे प्रवाह उच्चप्रदेशांतून बहिर पडण्यापूर्वी बरेच दूरवर तेथेंच वहात गेलेले दिसतात मुख्य नद्यांचे उगम उत्तरेच्या व पश्चिमेच्या भागांत आढळतात नाईल व कांगो नद्यांचे उगमस्थान म्हटलें म्हणजे या खंडांतील सरोवरांचें पठार होय. नाईल नदी ही लांबीनें सर्वांत मोठी आहे. या नदीचा उगम भूमध्यरेषेपलीकडच्या मध्य आफ्रिकेच्या डोंगराळ भागांत होतो. येथून उगम पावून या नदीचा प्रवाह 'व्हिक्टोरिया नायांझा' सरोवरास मिळतो यापुढें नाईल नदीस ( ७° १०५ ) मोठ्या दलदलीच्या प्रदेशांतून वहात जातांना 'अबिसीनियाच्या' बेहरेलगाझल, सोबॅत, निलीनाइल व ॲतबरा वगैरे नद्या मिळतात. तेथून वाळवंटाच्या प्रदेशांतून जाऊन ती भूमध्यसमुद्रास मिळते कांगो बॅंवेझा नदी बँगवेलु सरोवरास मिळते, व या सरोवरांतूनच कांगोचा उगम होतो. या स्थळीं या प्रवाहास पुष्कळ नांवांनीं ओळखितात. येथून म्वेरु सरोवरांतून वाहात जाऊन ती पुढें उत्तरेकडे वळते नंतर एक विस्तीर्ण अर्धवर्तुळाकार वळण घेऊन ती नैर्ऋत्येच्या बाजूनें अतलांतिक महासागरास मिळते अर्धवर्तुळाकार वळण घेतांना कांगोस पुष्कळ नद्या मिळतात कांगोच्या पाणवठ्याच्या उत्तरेस 'चाड' नांवाचें सरोवर आहे हें सरोवर शारी नदीच्या प्रवाहानेंच भरतें. याच्या पश्चिमेस नायजर नदीच्या थडीचा प्रदेश लागतो या नदीचा उगम पश्चिमेच्या उंचवट्याच्या भागांत होतो तेथून ही नाईलच्या उलट दिशेनें वाहात जाऊन अतलांतिक महासागरास मिळते ड्रॉकेन्सबर्गचा डोंगर अगदीं आफ्रिकेच्या दक्षिण भागांत आहे तेथून आरेंज नदीचा उगम होतो व पुढें ती अतलांतिक महासागरास मिळते

याशिवाय दक्षिण आफ्रिकेंतील पश्चिमेकडील उंचवट्याच्या भागांतून निघून अतलांतिक महासागरास मिळणाऱ्या ज्या नद्या आहेत त्यांचीं नांवें क्रमानें, क्वान्झा आगोवे व सनागा ह्या दोन व्होल्टा, कोमो, बंदना, गँबिया व सेनेगाल या आफ्रिकेच्या पश्चिमेकडील उंच प्रदेशांत उगम पावून दक्षिण दिशेनें वाहात जाऊन अतलांतक महासागरास मिळतात. हिंदी महासागरास मिळणाऱ्या नद्यांपैकीं सर्वांत मोठी नदी झांबिझी होय या नदीचा उगम ११° २१' ३" दक्षिण रे. २४° २२' पूर्व रे. अ या स्थळीं ५००० फूट उंचीवर होतो. यापुढें ती प्रथम पश्चिमेकडे व नंतर दक्षिणेकडे वाहात जाऊन पूर्वेकडे वळण घेते. 'न्यायासा' सरोवराच्या वरसाडीनें पाणी शिरे नांवाच्या नदीनें या नदीस मिळतें ही नदी हिंदी महासागरास मिळते याशिवाय दुसरी दक्षिणेंतील पूर्ववाहिनी नदी म्हटली म्हणजे लिम्पोपो ही होय.

पूर्वेच्या उंचवट्याच्या प्रदेशांतून निघून हिंदी महासागरास मिळणाऱ्या पुष्कळ लहान नद्या आहेत, त्यांपैकीं रोव्हुमा, रुफिजी, टॅना, जुबा व वेबीशेबिली या मुख्य आहेत 'वेबीशेबिली' ही नदी किनाऱ्यापर्यंत वाहात येऊन तेथील वाळवंटांत नाहींशी होते. त्याच प्रमाणें हॉवाश नदी अॅबिसीनियाच्या उंच प्रदेशांत उगम पावून एडनच्या आखाताजवळील वालुकामय भागांत गुप्त होते. वरील नद्या सोडून, सरोवरास मिळणाऱ्या नद्या पुष्कळच आहेत त्यांत "ओमो" नदी अॅबिसीनियाच्या पठारांतून निघून रूडाल्फ सरोवरास मिळते आफ्रिकेंतील बहुतेक नद्यांच्या मुखाशीं मृत्तिकाबंध प्रवाहाबरोबर आलेल्या गाळानें तयार होतो. व या नद्यांत त्या उंच प्रदेशांतून आल्यामुळें धबधबेहि असतात या सर्व अडचणी पार पडल्यावर गलबतें व्यापाराकरतां दूर जाऊं शकतात

**सरोवरें**.—आफ्रिकेंत पूर्वेकडील उंच प्रदेशांत बरीच सरोवरें आहेत ही सरोवरांचा साधारण अर्धवर्तुळाकार मालिका या पठाराच्या कवचाचा कांहीं भाग खचून झाली असावी असें भूगोलवेत्त्यांचें मत आहे दक्षिणेंत न्यासा व त्याच्या उत्तरेस टांगानिका, कीव्हु, आलबर्ट एडवर्ड व आलबर्ट हीं सरोवरें आहेत. टांगानिका हें पृथ्वीवरील गोड्या पाण्याच्या सर्व सरोवरांत मोठें आहे. याची लांबी ४०० मैल, व रुंदी ३०–४० मैल आहे हें किती खोल आहे हें नक्की सांगतां येत नाहीं. याशिवाय अबिसीनियांत रूडाल्फ, व्हिक्टोरिया नायांझा चाड वगैरे सरोवरें आहेत. चाड हें पश्चिमेस आहे न्यासा हें ४३० पुरुष खोल आहे. बाकीचीं उथळ आहेत. व्हिक्टोरिया नायांझा हें फक्त ५० वाव खोल आहे. न्यासा व टांगानिका सरोवराच्या बाजू कड्यासारख्या उभ्या वर गेल्या आहेत ऋतुमानांतील फरक सोडून या सरोवरांतील पाण्याची सपाटी खालींवर होत असते. कित्येक शतकांपासून हीं सुकावयास लागलीं आहेत. या सरोवरांच्या उत्पत्तीबद्दल बराच मतभेद आहे. येथें समुद्रांत सांपडणारे जलचर प्राणी आढळतात, म्हणून हा ( अंतर्गत ) प्राचीन समुद्राचा भाग असावा असें कांहींचें मत होतें. पण अर्वाचीन शोधावरून हें चुकीचें आहे असें समजतें.

**बेटें**.—मादागास्कर बेटाशिवाय बाकी सर्व बेटें अगदीं लहान आहेत. मादागास्कर बेटाचें क्षेत्रफळ २२९८२० मैल आहे हें आफ्रिकेच्या आग्नेयीस आहे. याच्या पूर्वेस मारिशस व रियुनियन हीं आहेत. वायव्येस केनरी व केपव्हर्डचा द्वीपसमूह हीं आहेत. हीं सर्व ज्वालामुखीपर्वतांच्या क्रियेमुळें झालीं आहेत.

**हवापाणी**.—हें खंड उष्णकटिबंधांत आहे. या खंडांतून भूमध्यरेषा जाते. हवामान पावसावर, उंचीवर, व समुद्रसान्निध्यावर अवलंबून आहे. दक्षिण आफ्रिकेपेक्षां उत्तर आफ्रिका जास्त उष्ण आहे. वालुकामय प्रदेशांत व सखलांत असलेल्या सपाट भागांत उष्णतामान फारच अधिक असतें. साहाराच्या वाळवंटांत हवा अतिशय विरळ असल्यानें व किरणरूपानें उष्णता लवकर बाहेर गेल्यानें, दिवसाच्या व

आहेत ज्या कांहीं थोड्या मोठ्या नद्या आहेत त्यांचे प्रवाह उच्चप्रदेशांतून बाहेर पडण्यापूर्वी बरेच दूरवर तयेच वहात गेलेले दिसतात मुख्य नद्यांचें उगम उत्तरेच्या व पश्चिमेच्या भागात आढळतात नाइल व कांगो नद्यांचें उगमस्थान म्हटलें म्हणजे या खंडांतील सरोवरांचें पठार होय नाईल नदी ही लांबीनें सर्वांत मोठी आहे या नदीचा उगम भूमध्यरेषेप-लगतच्या मध्य आफ्रिकेच्या डोंगराळ भागात होतो येथून उगम पावून या नदीचा प्रवाह व्हिक्टोरिया नायाझा' सरोवरास मिळतो यापुढे नाईल नदास (७° १०५) मोठ्या दलदलीच्या प्रदेशांतून वहात जाताना 'अबिसीनियाच्या' बेह्रेलगाझल,सोबेत, निळानाइल व अॅतबरा वगैरे नद्या मिळ तात तेथून वाळवंटाच्या प्रदेशांतून जाऊन ती भूमध्यसमुद्रास मिळते कांगो चॅंबेझी नदी बँगवेलु सरोवरास मिळते, व या सरोवरांतूनच कांगोचा उगम होतो या स्थळीं या प्रवाहास पुष्कळ नाल्यांनी ओल मिळतात येथून म्वेरू सरोवरांतून वाहात जाऊन ती पुढें उत्तरेकडे वळते नंतर एक विस्तीर्ण अर्धवर्तु ळाकार वळण घेऊन ती नैर्ऋत्येच्या बाजूनें अतलांतिक महा सागरास मिळते अर्धवर्तुळाकार वळण घेताना कांगोस पुष्कळ नद्या मिळतात कांगोच्या पाणलोटाच्या उत्तरेस 'चाड' नावाचें सरोवर आहे हें सरोवर शारी नदाच्या प्रवाहानेंच भरतें याच्या पश्चिमेस नायझर नदाच्या खोऱ्याचा प्रदेश लागतो या नदीचा उगम पश्चिमच्या उतरत्याच्या भागात होतो तेथून ही नाईलच्या उलट दिशेनें वाहात जाऊन अतलांतिक महासागरास मिळते ड्राकेन्सबर्गचा डोंगर अगदीं आफ्रिकेच्या दक्षिण भागात आहे तेथून ऑरेंज नदीचा उगम होतो व पुढें ती अतलांतिक महासाग रास मिळते

याशिवाय दक्षिण आफ्रिकेतील पश्चिमेकडील उच्च-वट्याच्या भागांतून निघून अतलांतिक महासागरास मिळ-णाऱ्या ज्या नद्या आहेत त्यांचीं नावें अनुक्रमें, क्वान्झा आगोबे व सनागा ह्या होत व्होल्टा, कामो वदना,गॅंबिया व सेनेगाल या आफ्रिकेच्या पश्चिमेकडील उच्च प्रदेशात उगम पावून दक्षिण दिशेनें वाहात जाऊन अतलांतिक महासागरास मिळतात हिंदी महासागरास मिळणाऱ्या नद्यांपैकीं सर्वांत मोठी नदी झांबिझी होय या नदीचा उगम ११° २१' ३" दक्षिण रे. २४° २२' पूर्व रे या स्थळीं ५००० फूट उंचावर होतो यापुढे ती प्रथम पश्चिमेकडे व नंतर दक्षिणेकडे वाहात जाऊन पूर्वेकडे वळण घेते 'न्यासागा' सरोवराच्या वर सांडीनें पाणी शिरे नावाच्या नदीनें या नदीस मिळतें ही नदी हिंदी महासागरास मिळते याशिवाय दुसरी दक्षिणेंतील पूर्ववाहिनी नदी म्हटली म्हणजे लिम्पोपो ही होय

पूर्वेच्या उतरत्याच्या प्रदेशांतून निघून हिंदी महासाग रास मिळणाऱ्या बऱ्याच लहान नद्या आहेत, त्यांपैकीं रोव्हुमा, रूफिजी, टॅना, जुबा व वेबीशेबिली या मुख्य आहेत 'वेबीशेबिली' ही नदी किनाऱ्यापर्यंत वाहात येऊन तेथील वाळवंटांत नाहींशी होते त्याच प्रमाणें हॉवाश नदी अबिसीनियाच्या उच्च प्रदेशांत उगम पावून एडनच्या आखाताजवळील वालुकामय भागात गुप्त होते वरील नद्या सोडून, सरोवरास मिळणाऱ्या नद्या बऱ्याच आहेत त्यांत "ओमो" नदी अॅबिसीनियाच्या पठारातून निघून रूडाल्फ सरोवरास मिळते आफ्रिकेतील बहुतेक नद्यांच्या मुखाशीं मृत्तिकामय प्रवाहावरोबर आलेल्या गाळानें तयार होतो. व या नद्यांत त्या उच्च प्रदेशांतून आल्यामुळें धबधबेहि असतात या सर्व अडचणी पार पडल्यावर गलबतें व्यापारा-करता दूर नाऊ शकतात

स रो व रें —आफ्रिकेंत पूर्वेकडील उच्च प्रदेशांत बरीच सरोवरें आहेत हीं सरोवरांचा साधारण अर्धवर्तुलाकार मालिका या पठाराच्या कवचाचा काहीं भाग खचून झाली असावी असें भूगोलवेत्त्यांचें मत आहे दक्षिणेंत न्यासा व त्याच्या उत्तरेस टांगानिका,कीव्हु,आलबर्ट एडवर्ड व आल्बर्ट हीं सरोवर आहेत टांगानिका हें पृथ्वीवरील गोड्या पाण्याच्या सर्व सरोवरांत मोठें आहे याची लांबी ४०० मैल, व रुंदी ३०–४० मैल आहे हें किती खोल आहे हें नक्की सांगतां येत नाहीं याशिवाय आबिसीनियांत रूडाल्फ,व्हिक्टोरिया नायाझा चाड वगैरे सरोवरें आहेत चाड हें पश्चिमेस आहे न्यासा हें ४३० पुरुष खोल आहे. बाकीचीं उथळ आहेत. व्हिक्टो रिया नायाझा हें फक्त ५० वाव खोल आहे. न्यासा व टांगा निका सरोवराच्या बाजू कड्यासारख्या उभ्या वर गेल्या आहेत ऋतुमानांतील फरक सोडून या सरोवरांतील पाण्याची सपाटी खालींवर होत असते. कित्येक शतका-पासून हीं सुकावयास लागलीं आहेत. या सरोवरांच्या उत्पत्तीबद्दल बराच मतभेद आहे. येथें समुद्रांत सापडणारे जलचर प्राणी आढळतात, म्हणून हा (अंतर्गत) प्राचीन समुद्राचा भाग असावा असें कांहींचें मत होतें. पण अर्वाचीन शोधावरून हें चुकीचें आहे असें समजतें

बे टें —मादागास्कर बेटाशिवाय बाकी सर्व बेटें अगदीं लहान आहेत. मादागास्कर बेटाचें क्षेत्रफळ २२९८२० मैल आहे हें आफ्रिकेच्या आग्नेयीस आहे याच्या पूर्वेस मारिशस व रियुनियन हीं आहेत वायव्येस केनरी व केपव्हर्डचा द्वीपसमूह हीं आहेत हीं सर्व ज्वालामुखीपर्वताच्या क्रिये-मुळें झालीं आहेत

ह वा पा णी —हें खंड उष्णकटिबंधांत आहे. या खंडा-तून भूमध्यरेषा जाते हवामान पावसावर, उंचीवर, व समुद्र-सान्निध्यावर अवलंबून आहे. दक्षिण आफ्रिकेपेक्षां उत्तर आफ्रिका जास्त उष्ण आहे वालुकामय प्रदेशांत व सखलांत असलेल्या सपाट भागांत उष्णतामान फारच अधिक असतें. साहाराच्या वाळवंटांत हवा अतिशय विरळ असल्यानें व किरणरूपानें उष्णता लवकर बाहेर गेल्यानें, दिवसाच्या व

रात्रीच्या उष्णतेच्या प्रमाणांत फारच अंतर असतें. रात्रीं केव्हां केव्हां पाणी गोठण्यापर्यंत थंडी पडते.

दक्षिण आफ्रिकेंत उष्णता कमी असते; याचें असें कारण आहे कीं, मोठमोठ्या महासागराच्या सान्निध्यामुळें येथील अरुंद प्रदेशाच्या हवेंत दमटपणा येऊन त्यांतील उष्णता माफक होते. उत्तरेचा प्रदेश फारच विस्तीर्ण असल्यानें समुद्रावरून आलेल्या वाऱ्याचा अंतःप्रदेशांत दूरवर शिरकाव होत नाहीं, म्हणून अगदीं किनाऱ्यालगतच्या भागांत उष्णतामान कमी असतें. साहाराच्या वाळवंटात पाऊस फारच कमी पडतो. विषुववृत्ताच्या आसपास व अबिसीनियाच्या उच्च प्रदेशांत व नाईल नदीच्या थडीत फार पाऊस पडतो. सर्वांत जास्त पाऊस गीनीच्या खाखाताजवळच्या भागांत पडतो. कॅमरून पर्वतावर ३९० इंच पाऊस पडतो. पावसाचे पट्टे पश्चिमेकडून पूर्वेकडे गेलेले दिसतात. पूर्वेकडील किनाऱ्यालगतच्या भागांत हवामान व पाऊस उत्तरेकडील प्रदेशांतल्या प्रमाणें असतो. विषुववृत्ताच्या आसपास दोनदा पावसाळा येतो. साहारा वाळवंटाच्या सीमेवर असलेल्या प्रदेशांत अति उष्ण व वालुकामय वारे वाहातात. अगदीं उत्तरेकडील व दक्षिणेकडील भागांत हवा आरोग्यकारक असते त्याचप्रमाणें साडेसहा हजार फूट उंचीवरच्या भागांत निरोगी थंड हवामान असतें. दलदलीच्या भागांत विषारी डांस असल्यामुळें तेथें तापाच्या साथी नेहमीं सुरू असतात. हा भाग विषुववृत्ताच्या आसपासचा प्रदेश होय. कांहीं भागांत 'त्से' नांवाच्या एक प्रकारच्या माशा चावल्यानें निद्रारोग होऊन मृत्यु येतो.

व न स्प ति.—वनस्पतींची वाढ उष्णता व ओलावा यावर अवलंबून असते. उत्तरेकडील व दक्षिणेकडील समशीतोष्ण भागांतील वनस्पति दुसऱ्या प्रदेशांतील वनस्पतीपेक्षां भिन्न आहे. भूमध्य समुद्राच्या किनाऱ्यालगतच्या आफ्रिकेच्या प्रदेशांत सप्री, आलिव्ह, ओक, बुचाचीं झाडें, देवदार, सायप्रस मर्टल वगैरे झाडें वाढतात. साहाराच्या वालुकामय प्रदेशांत डोंकाचीं झाडें व खजूर, तालवृक्ष याशिवाय दुसरी कोणतीहि वनस्पति टिकू शकत नाहीं.

पश्चिम आफ्रिकेच्या विषुववृत्ताच्या भागांत व नाइलच्या थडींत दाट घनघोर अरण्यें वाढलीं आहेत व उंचवट्याच्या प्रदेशांत गवताचीं कुरणें दूरवर पसरलेलीं असतात. समुद्रकांठीं दलदलींत मॅनग्रव्ह झाडांची वाढ फार दाट असते.

ज्यापासून तेल काढिता येतें असे तालवृक्ष याखेरीज वेत, टेंभुरणी, महागनी, आफ्रिकन ओक, कापूस वगैरे विशिष्ट तऱ्हेचे वृक्ष आढळतात. ज्यापासून पूर्वी लिहिण्याकरितां भूर्जपत्राप्रमाणें कागद तयार करीत असत अशी " पापायरस " नांवाची वनस्पति आफ्रिकेच्या ईशान्य भागांत असलेल्या ... आढळते.

प्रा णी —वनस्पतींच्या वैशिष्ट्यावर प्राण्यांचें वसतिस्थान अवलंबून असतें. गवताळ माळरानासारख्या सपाट भागांत हरिणें, जिराफ, झीब्रा, रानरेडे, रानगाढवें, गेंडे वगैरे प्राण्यांचें वसतिस्थान असतें त्याचप्रमाणें तीं ज्यांचीं भक्ष्य आहेत असे हिंस्र प्राणी तेथेंच असतात. सिंह, चित्ता, तरस, अस्वलें, खोकडें व लांडगे इत्यादि हिंस्र पशु अटलस पर्वताच्या भागांत राहतात. कुरणांत व दाट अरण्यांत हत्ती कळप करून राहतात. याखेरीज बबून, मोडरील सपुच्छ व विपुच्छ माकडें हीं गवताच्या माळरानांत असतात. मोठ्या नद्या हें पाणघोडे, नक्र वगैरे जलचर प्राण्यांचें वसतिस्थान होय. दक्षिण यूरोपांत सापडणारे बहुतेक पक्षी आफ्रिकेंत आढळतात पण शहामृग व सेक्रेटरी ह्या दोन जातींचे पक्षी मात्र या खंडांतच असतात. विषारी साप, विंचू यांच्या पुष्कळ जाती विषुववृत्तांत आहेत. टोळ, वाळवी, यांचा कांहीं भागांत अतोनात उपद्रव होतो. दक्षिण व पूर्व आफ्रिकेंत कांहीं जागीं निद्रारोगकारक ' त्से ' माशा आहेत. त्याच्या दंशानें सर्व पाळीव प्राणी मरतात.

भू स्त र शा स्त्री य मा हि ती.—भूस्तरशास्त्रदृष्ट्या व आकृतींत आफ्रिकेचें हिंदुस्थान देशाशीं पुष्कळ साम्य आहे. दोहोंमध्यें मोठालीं पठारें आहेत. दोन्ही उत्तर भागांत रुंद असून दक्षिणेकडे निमुळतीं होत जातात. आफ्रिकेचा मध्यभाग म्हणजे उच्च पठार आहे. या पठाराची कड समुद्रकांठाशीं समांतर आहे. पठाराच्या भोंवतीं एक कमी उंचीचा पट्टा आहे व या पट्ट्याच्या पायथ्याशीं समुद्रकांठची सपाट जमीन आहे.

मध्य ( मेसोझोइक ) युग सुरू होण्यापूर्वी जी पृथ्वीच्या कवचाची हालचाल झाली तीमुळें आफ्रिकेंतील कांहीं खडकावर परिणाम झालेला दिसतो, परंतु एकंदरींत आफ्रिकेच्या मध्यभागांतील खडकाला त्याचा फारसा संसर्ग पोहोंचला नाहीं असेंच दिसतें. कारण अगदीं मूळचे स्फटिकमय खडक व त्याच्यावर मध्य युगांतील जे जलजन्य खडक आहेत, त्यांच्यांत कोणत्याहि प्रकारचा फरक झालेला नाहीं.

मध्ययुगाच्या पूर्वीच्या खडकांत प्रस्तरीभूत पदार्थ सापडत नसल्यानें त्यांचा कालनिर्णय करणें फार कठिण आहे. याकरितां यूरोपांतील कोणत्या खडकाशीं त्याचें साम्य आहे, यावरूनच पुष्कळ वेळां आफ्रिकेंतील ... युगापूर्वीच्या खडकाचा काल ठरवितात. आफ्रिकेचा ... भाग, पश्चिम व पूर्व आफ्रिका आणि त्याचप्रमाणें साहारा ... सर्व ठिकाणीं प्राकृतिक म्हणजे अगदीं मूळचे स्फटिकमय ... आहेत. समुद्रकांठीं मात्र त्यावर इतर खडकाचे थर आढळतात. हे मूळ खडक कणांश ( ग्रानाइट ), अंबूर ( नीस ) व सुविभाज्य स्फटिकमय ( शिस्ट ) जातीचे आहेत. यांच्यांत प्रस्तरीभूत पदार्थ मुळींच सांपडत नाहींत इतकेंच नव्हे, तर ते कँब्रियन, आर्डोव्हिशियन किंवा सिल्युरियन काळचे आहेत.

हे मुद्दा नीट ओळखतां येत नसल्यानें ते सर्व कॅम्ब्रियनपूर्व या सर्वसाधारण नावानें संबोधिले जातात

मध्य आफ्रिकेंत पुराण (पॅलिओझोइक) युगांतील जे खडक आहेत, त्यामध्ये समुद्रातील प्राण्यांच्या किंवा वनस्पतींच्या प्रस्तरीभूत भागाचा अंशहि सांपडत नसल्यामुळें तो भाग समुद्राच्या पाण्याखालीं केव्हांहि नसावा असेंच म्हणावें लागतें. कर्बजनक म्ह० इंग्लंडातील कोळशाचा काल ज्याला म्हणतां येईल, त्या काळाच्या शेवटच्या भागात आफ्रिका व हिंदुस्थान ही एकमेकांना जोडलेली असून त्याचें एक मोठें खंड असावें असे दिसतें. त्यावेळी तयार झालेले आफ्रिकेंतील व हिंदुस्थानांतील खडक व तसेंच त्या वेळचे दोन्ही ठिकाणचे प्राणी अगदी एकाच प्रकारचे होते या वेळच्या खड-

खडकांचा तक्ता.

(खुलासाठी विज्ञानेतिहास पृ. ६०३ पहा.)

| काळ | जलजन्य खडक सांपडण्याचें ठिकाण. | अग्निजन्य खडक सांपडण्याचें ठिकाण. |
|---|---|---|
| अगदीं अलीकडील काळातील खडक | वाळू, चुन्याच्या नळ्या, पोंवळ्याचे दगड, वाळूच्या टेकड्या वगैरे बऱ्याच ठिकाणीं आढळतात. | अग्निजन्य बेटें. |
| नूतनतम (प्लिस्टोसीन) उर्फ मानव पूर्व काळातील खडक. | पूर्व काळची वाळू, चुन्याच्या नळ्या, वगैरे बऱ्याच ठिकाणीं आढळतात | आफ्रिकेच्या मध्य व उत्तर भागांत आणि कांहीं बेटांत |
| नूतन काळातील खडक | उत्तर आफ्रिका, मादागास्कर | |
| नवपूर्व काळातील खडक. | उत्तर आफ्रिका. | |
| नवपूर्वेतर काळातील खडक | उत्तर आफ्रिका. | |
| नवप्रभात काळातील खडक | उत्तर आफ्रिका, पूर्व व पश्चिम किनारा; मादागास्कर. | |
| सितोपल काळातील खडक | उत्तर आफ्रिकेंतील पुष्कळ भागात, पूर्व व पश्चिम किनाऱ्यावरील सपाट जमिनीवर; मादागास्कर. | दक्षिण आफ्रिकेंतील डायमंड पाइप्स आणि अबिसीनियातील अर्हादी काळ वगैरे |
| (कारू खडकांचा भाग) ज्युरीन काळातील खडक | उत्तर व पूर्व आफ्रिका, मादागास्कर आणि दक्षिण आफ्रिका | दक्षिण आफ्रिकेंतील ज्वालामुखीस्फोटाचा मुख्य काळ व त्यावेळचे अग्निजन्य खडक |
| त्रिस्तर काळातील खडक | दक्षिण आफ्रिका, कांगो, मध्य आफ्रिका, आल्जेरिया व ट्युनिस | फारसे आढळत नाहींत |
| परमियन काळातील खडक | दक्षिण आफ्रिकेंतील एक्का खडक | |
| कर्बजनक काळातील खडक | उत्तर आफ्रिका; पूर्व आफ्रिकेंतील सबाकी नावाचे मातीचे खडक, दक्षिण आफ्रिकेंतील ड्वीका आणि विटेबर्ग खडक | |
| डेव्होनियन काळातील खडक | उत्तर आफ्रिका, कांगो, दक्षिण आफ्रिकेंतील बोकेव्हेल खडक | आढळत नाहींत. |
| सिलुरियन काळातील खडक | दक्षिण आफ्रिकेंतील वाळूचे खडक | ट्रान्सव्हालमधील विलप्रिन्स्बर्ग आणि व्हेंटर्सडॉर्प खडक |
| ऑर्डोव्हिशियन काळातील खडक | उत्तर आफ्रिका, फ्रेंच कांगो, आंगोला | |
| कॅम्ब्रियन काळातील खडक | | |
| कॅम्ब्रियनपूर्व काळातील खडक | क्वार्टझाइट वाळूचे खडक आणि शिस्ट खडक, बरेच ठिकाणीं सांपडतात | बरेच ठिकाणीं पण विशेषतः दक्षिण आफ्रिकेंत. |
| प्राक्कनिष्ठ काळातील खडक | नीस आणि शिस्ट. | नकार्तुक. |

काच्या ज्या जमिनी आहेत, त्यांना 'गोंडवणी' हे नाव आहे. आफ्रिकेंतली गोंडवणी जमीन ज्या ठिकाणीं तयार झाली त्या ठिकाणीं पूर्वी फार मोठाली तळीं होतीं तीं एकसारखी वाळूच्या व वनस्पतींच्या थरानीं भरली जात असतांनाच त्यांचा तळभाग खालीं खचत चालला होता. या दोन्ही गोष्टी एकाच वेळीं चालू असल्यामुळें तेथील खडकाचा व प्रस्तरीभूत पदार्थांचा थर १८००० फूट उंचीचा झाला. या खडकाच्या थराना आफ्रिकेंत 'कारू' हें नाव दिलें आहे. यामध्यें सर्व तऱ्हेचे जलजन्य खडक आहेत व आफ्रिकेंतील कोळसा याच खडकात सांपडतो. गोंडवणी जमीन तयार

होण्यापूर्वीच्या सुरवातीस हिंदुस्तानाप्रमाणें आफ्रिकेंतहि हिमनद्या कांहीं ठिकाणीं असल्या पाहिजेत, अशा तऱ्हेचा पुष्कळ पुरावा आहे. हिंदुस्थानांत गोंडवणी कालानंतर ज्वालामुखीचे मोठ्या प्रमाणावर स्फोट होऊन काळ्याथरी ( ट्रॅप ) खडक झाला, त्याप्रमाणे आफ्रिकेंतहि कारू काला नंतर ज्वालामुखीचे स्फोट होऊन अग्निजन्य खडक बरेच बनले आहेत. कारू खडकाचा प्रदेशहि मोठा आहे पूर्वेच्या बाजूस समुद्रकिनाऱ्यापर्यंत, पश्चिमेस किरटल पर्वतापर्यंत, दक्षिणेस केप कालनीपर्यंत व उत्तरेस सहाराच्या मध्यभागापर्यंत कारू खडकाचा विस्तार आहे

यानंतरच्या कालांत गोंडवणी जमिनीची शकलें झालीं हिंदुस्थान आफ्रिकेपासून अलग झाला. हल्लीं हिंदी महासागरांत व आफ्रिकेशेजारीं जी बेटें आहेत तीं त्या जमिनीचीं शकलें आहेत

ज्युरीन कालांत पूर्व आफ्रिकेंत मोझांबिकपर्यंत समुद्र येऊन पोहोंचला असावा व सितोपल ( क्रेटेसिअस ) कालांत समुद्र सहाराच्या मध्यभागापर्यंत गेला असावा कारण त्या ठिकाणीं सितोपल काळच्या समुद्रांत सापडणाऱ्या प्राण्यांच व वनस्पतींचे प्रस्तरीभूत झालेले भाग दृष्टीस पडतात

आफ्रिकेंत तृतीयावस्थाक ( दशरी ) काळांतील खडक पूर्व व पश्चिम समुद्रकिनाऱ्यावर काहीं ठिकाणीं अगदीं थोड्या प्रमाणांत आढळतात, परंतु उत्तर आफ्रिकेंत ते बऱ्याच मोठ्या प्रमाणांत सांपडतात. या खडकांत नम्युलिटिक ( नम्युलाइट नांवाचे प्रस्तरीभूत झालेले लहान प्राणी ज्यांत सांपडतात असा ) नांवाचा चुन्याचा खडक सांपडतो, हा एक फार महत्त्वाची गोष्ट आहे कारण हाच खडक आफ्रिकेंतील इजिप्तपासून आशियामधील चीन देशापर्यंत आढळतो

यूरोपांत हिमनद्यांचा जो काल होऊन गेला त्या वेळीं आफ्रिकेच्या उत्तर भागांतहि हिमनद्या असल्या पाहिजेत असें तेथें सांपडणाऱ्या वाळूवरून व खडकावरून वाटतें त्याचा प्रभाव किलीमांजेरो, केनिया, रवेंझोराय वगैरे ठिकाणापर्यंत पोहोंचलेला आढळतो

आफ्रिकेंत वज्रतुंड वगैरे अगदीं मूळचे अग्निजन्य खडक आहेत त्याशिवाय पूर्व आफ्रिकेच्या पठारावर व पश्चिम आफ्रिकेंत अग्निजन्य खडक आढळतात, परंतु ज्वालामुखीचे स्फोट आफ्रिकेंत कोणत्या कालांत प्रथमतः विशेष प्रमाणांत सुरू झाले हें जरी खात्रीनें सांगता येत नाहीं, तरी पहिले स्फोट दक्षिण आफ्रिकेंत ज्युरिन काळांत व पूर्व आफ्रिकेंतील सितोपल काळांत झाले असावेत असें वाटतें त्यानंतर केनिया, मावेंझी व त्याप्रमाणें किवो वगैरे ठिकाणचे अग्निजन्य खडक ज्वालामुखी वगैरेंच्या स्फोटांमुळे झाले उत्तर आफ्रिकेंत अगदीं नवप्रभात कालापासून तृतीयावस्थाक कालाच्या शेवटपर्यंत स्फोट होत असले पाहिजेत असे दिसतें

आफ्रिकेंतील निरनिराळ्या लोकांच्या जाती, त्यांची . . . व त्यांची संस्कृति यासंबंधीं व आफ्रिकेंतील व्यापारोपयोगी वस्तु व तेथील व्यापार या संबंधीं विवेचन पूर्वी ( विभाग चौथा पृ ४५२-५५ ) केलें गेलेंच आहे

, रोमन आफ्रिका.—ज्या भागाला आफ्रिका लोक लिबिया म्हणत होते त्याला रोमन लोकांनीं आफ्रिका हें नांव दिलें होतें रोमन परिचित आफ्रिकेंत इजिप्त व इथिओपिया हे प्रांत सोडून बाकीच्या सर्व माहीत असलेल्या सर्व भागाचा समावेश होत होता. इतिहास या व तीन कार्थेज व ॲटला सच्या पूर्वेकडील प्रदेशास आफ्रिका हें नांव दिलें होतें आफ्रिका या शब्दाची व्युत्पत्ति निराळी आढळते एक्रया टेर फिनिशिआ यापासून हा भाग विभक्त केला आहे म्हणून याचें नांव आफ्रिका असें पडलें असें कांहींचे मत आहे. फॉरिकिया (म्हणजे फळें पिकणारा प्रदेश ) यावरून आफ्रिका हें नांव पडलें असें नाहीं म्हणतात, इतरांचें असें मत आहे कीं ' आरिघा ' हे बर्बर लोक पूर्वी या भागांत रहात होते व त्यामुळे या प्रांताचें नांव आफ्रिका असें पडलें हे बर्बर लोक पूर्वी या भागांत होते असा रोमन व कार्थेजिअन लोकांचाहि समज होता. रोमन आफ्रिकेमध्ये सिरेनैका व मॉरेटानिया हे प्रांत समाविष्ट नव्हते तिसऱ्या प्युनिक युद्धाच्या वेळेस कार्थेजिअन लोकांची आफ्रिकेची सरहद्द टस्का नदीच्या मुखापासून मेक्साच्या आखातावरील टिना या शहरपर्यंत होती. आफ्रिकेच्या इतर भागावर न्युमिडिया किंवा बर्बर या लोकांच्या राजांचें स्वामित्व होतें

' ख्रि पू १४६ च्या वर्षी सिपिओनें कार्थेज घेतल्यावर हा सर्व प्रांत रोमन लोकांचा झाला व आपली सरहद्द ठरविण्याकरितां रोमन लोकांनीं उत्तरेस टाबार्कापासून दक्षिणेस दीनापर्यंत मोठा खंदक खणून त्यावर लहानसा तट उभारला होता या तटाचे कांहीं अवशेष १९०७ सालीं आढळले तिसऱ्या प्युनिक युद्धांत युटिका, हाडरमेटम, थेप्सस, लेप्टिस, मिनेर, आचुला, उझालिस थियुडोलिस हीं शहरें कार्थेजच्या विरुद्ध असलेल्या रोमन लोकांनीं लुटलीं व त्यामुळें त्यांची फार लौकर भरभराट झाली

' ख्रि पू १०६ या वर्षी जुगर्थाइन युद्ध झालें व त्यांत रोमन लोकांना लप्टिसमॅग्ना, थोईआ, सॅबॉट्र इत्यादि शहरें मिळालीं

ख्रि पू. ४६च्या वर्षी थॅप्सस येथें जी लढाई झाली तीमुळे रोमन लोकांना न्युमिडिया हा प्रांत मिळाला व त्याला हे लोक आफ्रिका नोव्हा हें नांव देऊ लागले ख्रि पू २५ यावर्षी रोमन आफ्रिकेंत पश्चिमेस आम्पसागा नदीच्या मुखापासून पूर्वेस ट्रिपोलिटानां व सिरेनैकापर्यंतचा प्रदेश मोडत होता राजा व सिनेट यामध्ये आफ्रिकेच्या रोमन साम्राज्याची वाटणी झाली तेव्हां आफ्रिकेचा प्रांत सिनेटच्या अमलाखालीं आला व तेव्हांपासून आफ्रिकेचा राज्यकारभार एका वरिष्ठ सुभेदारा (प्रोकान्सलकडे) कडे सोंपविला जात असे या प्रोकान्सलच्या हाताखालीं तीन अधिकारी असून तीन भागांवर